# दिव्य कुरआन
## सटीप मराठी भाषांतर

**सय्यद अबुलआला मौदूदी**
(यांच्या उर्दू भाषांतरावरून)

*मराठी भाषांतर*
**अब्दुलजब्बार कुरैशी**
**कुतुबुद्दीन हुसैन मनियार** **मुबारक हुसैन मनियार**

**निदा-ए-कुरआन, मुंबई-८.**

**पवित्र कुरआनचे मराठी भाषांतर मुस्लिमेतर बांधवांसाठी पूर्णतः मोफत वितरणासाठी प्रकाशित करण्यात येत आहे.**

**The Marathi translation of Holy Qur'an**
**Not For Sale.**

* **प्रकाशक** : निदा-ए-कुरआन
द्वारा- रिच डेकोर, इकबाल मसालावाला,
२४७, मौलाना आझाद रोड, ताज मंझिल,
बी.एस.सी. बँक समोर, मुंबई - ४००००८.
दूरध्वनी : २३०६३५६४,
फॅक्स : २३०८७९५०

१००० / जानेवारी : २००७

# अनुक्रमणिका

# प्रकाशकाचे मनोगत

स्तुती फक्त अल्लाहसाठीच आहे, ज्याने संपूर्ण सृष्टी व त्यातील सर्व वस्तूंची आणि सर्व सजीव व मानवांची निर्मिती केली. त्यांच्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व गोष्टी निर्माण केल्या. मानवाकरिता उपजीविकेची साधने उत्पन्न केली. त्याचप्रमाणे मानवाच्या मार्गदर्शनासाठी आपला ग्रंथ पवित्र कुरआन देखील अवतरित केला. अल्लाहच्या या मार्गदर्शक ग्रंथाचा संदेश जगातील सर्व मानवांपर्यंत पोहोचविण्याची जबाबदारी मुसलमानांवर आहे. कारण आता या सृष्टीच्या अंतिम क्षणापर्यंत कोणी ईशसंदेश देणारा अथवा एखादा प्रेषित पृथ्वीतलावर येणार नाही. याच कारणास्तव पवित्र कुरआनचा मराठी/हिंदी अनुवाद प्रकाशित करण्याचा आमचा मानस आहे. यात सुरुवातीला थोडक्यात प्रस्तावना देण्यात आलेली असून संक्षिप्त टीपांचाही समावेश करण्यात आला आहे. त्यामुळे पवित्र कुरआनचा अर्थ समजण्यास वाचकास निश्चित सोपे जाईल. या अल्पशा प्रयत्नाचा स्वीकार करावा हीच पालनकर्त्या अल्लाहपाशी प्रार्थना!

जानेवारी २००७ **इकबाल मसालावाला**

# प्रस्तावना

या अभिव्यक्तीच्या शीर्षकाचे ‘प्रस्तावना’ असे नाव पाहून कुणाचा असा चुकीचा समज होऊ नये की मी कुरआनाची प्रस्तावना लिहीत आहे. ही कुरआनाची नव्हे तर कुरआनाचे माझे भाष्य ‘तफ्हीमूल कुरआन’ची प्रस्तावना आहे. सदरहू प्रस्तावना लिहिण्यामागे माझ्या दृष्टीसमोर दोन हेतू राहिले आहेत.

त्यापैकी पहिला असा की, एका सामान्य वाचकाला अगोदरच अशा गोष्टींची चांगल्या प्रकारे माहिती दिली जावी ज्या समजून घेतल्यामुळे कुरआन आकलनाचा मार्ग सुलभ होतो. अन्यथा वाचनादरम्यान त्या गोष्टी वरचेवर किंतू बनत असतात. पुष्कळदा तर अशा गोष्टी समजून न घेतल्यामुळेच मनुष्य कुरआनरूपी अर्थसागराच्या पृष्ठभागावरच वर्षानुवर्षे हिंडत राहतो. खोलवर शिरण्याचा मार्गच त्याला सापडत नाही.

दुसरा हेतू असा की कुरआन समजून घेण्याचा प्रयत्न करीत असताना सर्वसाधारणपणे लोकांच्या मनात जे प्रश्न उद्भवत असतात त्यांची उत्तरे अगोदरच दिली जावीत.सदरहू प्रस्तावनेत मी केवळ अशाच प्रश्नांची उत्तरे देईन जी खुद्द माझ्या मनात प्रथम उद्भवली होती; किंवा ज्या प्रश्नांना नंतर मला सामोरे जावे लागले आहे. याशिवाय अन्य इतर प्रश्नही जर अनुत्तरित राहिले असतील तर त्यांच्यासंबंधीही मला कल्पना दिली जावी. ‘इन्शाअल्लाह’ त्यांची उत्तरेही पुढील आवृत्तीप्रसंगी या प्रस्तावनेत समाविष्ट केली जातील.

---------------------------------

सामान्यपणे आम्हाला अशाच प्रकारची पुस्तके वाचण्याची सवय आहे ज्यांच्यात एखाद्या विशिष्ट विषयावरील माहिती, त्यासंबंधीचे विचार व युक्तिवादांना एका विशिष्ट लेखनात्मक मांडणीनिशी निरंतरपणे सांगितलेले असते. याच कारणाने एखादा असा मनुष्य जो आतापर्यंत कुरआनाशी अपरिचित राहिला असावा जेव्हा पहिल्यांदाच हा ग्रंथ वाचण्याचा विचार करतो तेव्हा तो अशी अपेक्षा धरूनच वाचू लागतो की ‘पुस्तक’ म्हणून या ग्रंथातही इतर पुस्तकांप्रमाणे प्रथम विषय निश्चित केलेला असेल, नंतर त्यातील मूळ निबंधाला अनेक प्रकरणात आणि पोटभागात विभागून क्रमवार एकेका प्रश्नावर चर्चा केलेली असेल. त्याचप्रकारे जीवनाच्या एकेका क्षेत्रालाही वेगवेगळे करून त्यासंबंधीच्या सूचना व आज्ञा क्रमवार लिहिलेल्या असतील. परंतु जेव्हा पूर्णपणे अपरिचित अशी एक वेगळीच वर्णनशैली प्रत्ययास येते, तेथे तो पाहतो की श्रद्धात्मक नियम, नैतिक आदेश, शास्त्रीय आज्ञा, आवाहन,



उपदेश, धडा, टीका, निर्भर्त्सना, भीती, शुभवार्ता, सांत्वन, युक्तीवाद, पुरावे व प्रमाण, ऐतिहासिक कथा, सृष्टी-चिन्हांकडे संकेत, असे सर्वच विषय पुन्हा पुन्हा एकमेकानंतर येत आहेत. एकच विषय निरनिराळ्या पद्धतीने व वेगवेगळ्या शबदात पुन्हा पुन्हा उच्चारला जात आहे. तो पाहतो की एका विषयानंतर दुसरा व दुसऱ्यानंतर तिसरा अकस्मातपणे सुरू होत आहे. किंबहुना एका विषयामध्येच दुसरा विषय एकाएकी येत आहे. वाचक पाहतो की संबोधक आणि संबोधित वरचेवर बदलत असून संबोधण्याचा रोख राहूनराहून विभिन्न दिशांत वळत आहे. निबंधाची विविध प्रकरणात आणि पोटभागात विभागणीचा कोठेही नावनिशाण आढळत नाही. तो पाहतो की इतिहास असला तरी ऐतिहासिक पद्धतीने सांगितलेला नाही. तत्त्वज्ञान आणि अध्यात्म असले तरी तर्कशास्त्र आणि तत्त्वशास्त्राच्या भाषेत ते मांडलेले नाहीत. मानव आणि विश्वसृष्टीचा उल्लेख असला तरी भौतिकशास्त्राच्या पद्धतीने ते सांगितलेले नाही. वाचक पाहतो की या ग्रंथात संस्कृती, राजकारण, अर्थकारण आणि समाजकारणावरील संवाद असला तरी जीवनशास्त्राच्या शैलीत तो सांगितलेला नाही. त्यात कायद्यात्मक नियम आणि आज्ञा सांगितलेल्या असल्या तरी कायदे रचणाऱ्यांच्या पद्धतीशी त्या पूर्णपणे विभिन्न आहेत. त्यात नैतिक शिकवण सांगितली आहे तरी तिची शैली नैतिकशास्त्राच्या सबंध वाङ्मयापेक्षा वेगळ्या स्वरूपाची आहे. अशा सर्व गोष्टी पुस्तकासंबंधीच्या आपल्या पूर्वीच्या कल्पनेच्या अगदी विरूद्ध असल्याचे पाहून मनुष्य गोंधळात सापडतो. त्याला असे वाटू लागते की हे तर एक असंपादित, असमन्वित आणि विस्कळीत स्वरूपाचे साहित्य आहे. त्यात प्रारंभापासून ते शेवटपर्यंत असंख्य लहानमोठ्या विविध प्रकारच्या फुटकळ स्वरूपाच्या लेखांचा समावेश केलेला आहे. तथापि निरंतर मजकूराच्या स्वरूपात ते सर्व लिहिलेले आहेत. विरोधात्मक दृष्टिकोनातून पाहणारा याच आधारावर अनेक प्रकारचे आक्षेप रचू लागतो. तर त्याच्याशी अनुकूल दृष्टिकोन बाळगणारा कधी तर अर्थाकडे डोळेझांक करून आपल्या शंकांना बगल देण्याचा प्रयत्न करतो, तर कधी सदरहू विस्कळीतपणाचा सोयीस्कर अर्थ लावून आपल्या मनाची समजूत घालू लागतो, तर कधी तो अस्वाभाविक पद्धतीने त्यांच्यातील समन्वय शोधून विचित्र प्रकारचे निष्कर्ष काढतो. तर अनुकूल दृष्टिकोन बाळगणारा हा वाचक कधी कुरआन म्हणजे फुटकळ लेखांचा संग्रह, असे मत स्वीकारतो. त्यामुळे त्यातील प्रत्येक ‘आयत’ तिच्या मागील व पुढील संदर्भापासून वेगळी होऊन अर्थाचे अनर्थ करण्याचे लक्ष्यस्थान बनते व तसले सर्व अर्थ मूळ सांगणाऱ्याच्या पूर्णपणे हेतूविरूद्ध असतात.

---------------------------------

तसेच एखादे पुस्तक त्याच्या वाचकाला चांगल्या प्रकारे समजण्यासाठी हे आवश्यक असते की त्याला पुस्तकाचा विषय माहीत असावा, त्या पुस्तकाचा हेतू व उद्देश आणि त्याची मध्यवर्ती कल्पना माहीत असावी. पुस्तकाची वर्णनशैली त्याच्या परिचयाची असावी. पुस्तकातील परिभाषा आणि तिची विशिष्ट स्पष्टीकरणात्मक शैली याचीही त्याला ओळख असावी. तसेच त्या पुस्तकातील निवेदने, त्यांच्या सकृतदर्शनी मजकुरामागे ज्या वर्तमानांशी व मामल्यांशी संबंधित असतील, ते वर्तमान व ते मामलेही वाचकाच्या दृष्टीसमोर असणे जरूरीचे असते. सर्वसाधारणपणे जी पुस्तके आम्ही वाचत असतो त्यांच्यात या सर्व गोष्टी सहजपणे सापडत असतात, म्हणून त्यांच्या विषयांचा ठाव घेण्यासाठी आम्हाला फारसे कष्ट जाणवत नाहीत. परंतु इतर पुस्तकात ज्याप्रकारे सदरहू गोष्टी सहजपणे उपलब्ध होण्याची आम्हाला सवय आहे त्याप्रकारे त्या, कुरआनात आम्हाला आढळत नाहीत. म्हणून एखाद्या सामान्य पुस्तक-वाचकाच्या मन:स्थितीने आमच्यापैकी एखादा जेव्हा कुरआनाचे वाचन सुरू करतो तेव्हा त्याला ग्रंथाचा विषय, त्याचा हेतू व त्याचा उद्देश आणि त्याच्या मध्यवर्ती कल्पनेचा छडाच लागत नाही, कुरआनाची वर्णनशैली व त्याच्या स्पष्टीकरणाची पद्धतही त्याला काहीशी अपरिचित वाटते. तर बहुतेक ठिकाणी त्यातील मजकूराची पार्श्वभूमीदेखील त्याच्या दृष्टीपासून लपलेली राहते. याचा परिणाम असा होतो की विविध आयतींमध्ये बुद्धिमत्तेचे जे मोती विखुरले आहेत त्याचा कमी वा अधिक प्रमाणात लाभ घेऊनदेखील ईशवाणीच्या खऱ्या आत्म्यापर्यंत पोहोचण्यापासून मनुष्य वंचितच राहतो. त्याला ग्रंथज्ञान प्राप्त होण्याऐवजी त्यातील काही फुटकळ स्वरूपाच्या मुद्यांवर व लाभांवर समाधान मानावे लागते. इतकेच नव्हे तर पुष्कळसे असे लोक जे कुरआनाच्या वाचनानंतर शंकाग्रस्त बनत असतात, त्यांचे दिशाभूल होण्याचे एक कारण असेही आहे की कुरआन आकलनाच्या या आवश्यक मूलतत्त्वांशी अनभिज्ञ राहून जेव्हा ते वाचन करीत असतात तेव्हा त्याच्या पृष्ठांवर विविध विषय विखुरले असल्याचे त्यांना दिसते, बव्हंशी आयतींचा अर्थ त्यांच्यावर उघड होत नसतो. ज्यांना बऱ्याचशा आयती अशा दिसतात की ज्या आपल्या जागी स्वत: तर बुद्धिमत्तेच्या प्रकाशाने झगमगत आहेत परंतु मजकूरातील संदर्भाशी त्या पूर्णपणे विसंगत वाटतात. अनेक ठिकाणी स्पष्टीकरणाची माहिती आणि वर्णनशैलीचे ज्ञान नसल्यामुळे असे लोक आयतींच्या खऱ्या अर्थापासून भरकटले जाऊन दुसरीकडेच निघालेले असतात. तर पुष्कळ प्रसंगी पार्श्वभूमीची माहिती नसल्यामुळे त्यांना तीव्र स्वरूपाच्या गैरसमजूतींना सामोरे जावे लागते.

---------------------------------



कुरआन कोणत्या प्रकारचा ग्रंथ आहे? कुरआनाची अवतरणस्थिती आणि त्याची रचना कशाप्रकारची आहे? कुरआनात चर्चेचा विषय कोणता आहे? त्यातील एकूण संवाद कोणत्या उद्देशांसाठी आहेत? कुरआनातील असंख्य व विभिन्न प्रकारचे विषय कोणत्या मध्यवर्ती कल्पनेशी संलग्न आहेत? उद्दिष्टपूर्तीसाठी कुरआनात कोणती युक्तिवादशैली व वर्णनशैली अवलंबिलेली आहे? हे सर्व आणि अशाच प्रकारचे इतरही काही आवश्यक प्रश्न असे आहेत की जर प्रारंभीच माणसाला त्यांची उत्तरे सुस्पष्ट आणि सरळपद्धतीने मिळाली तर तो पुष्कळसा धोक्यापासून वाचू शकतो व त्याच्यासाठी कुरआनाच्या आकलनाचे व अध्ययनाचे मार्ग मोकळे होऊ शकतात. जो मनुष्य कुरआनात लेखनात्मक रचना शोधत असतो व तेथे ती न आढळल्यास मग ग्रंथाच्या पृष्ठांवर भरकटू लागतो, त्याचे गोंधळात येण्याचे खरे कारण हेच आहे की कुरआन वाचनासंबंधीच्या मौलिक गोष्टी त्याला माहीत नसतात. तो अशी कल्पना करून वाचण्यास प्रारंभ करतो की 'धार्मिक विषयावरील एक ग्रंथ' वाचण्यासाठी तो निघालेला आहे. 'धार्मिक विषय' आणि 'ग्रंथ' या दोन्ही गोष्टींसंबंधी त्याची कल्पनाही तीच असते जी सामान्यत: 'धर्म' आणि 'ग्रंथ' संबंधी जनमनात आढळते. परंतु वाचकाला जेव्हा त्याच्या कल्पनेपेक्षा अगदी वेगळ्या स्वरूपाच्या गोष्टीची तेथे अनुभूती येते तेव्हा तो स्वत:ला त्या गोष्टींशी समरस करू शकत नाही व त्या लेखनाचा हेतू त्याला न गवसल्यामुळे त्याच्या (कुरआनाच्या) पृष्ठावरील ओळींमध्येच तो काही अशा प्रकारे भरकटू लागतो जणू तो एखादा नवखा मुसाफिर असून एखाद्या अपरिचित शहराच्या गल्लीबोळात तो हरवला आहे. अशा प्रकारच्या हरवण्यापासून तो वाचू शकतो जर त्याला अगोदरच अशी कल्पना दिली गेली की जो ग्रंथ वाचण्यास तुम्ही निघाला आहात तो ग्रंथ सर्व जगाच्या साहित्यातील आपल्या शैलीचा एकमेव ग्रंथ आहे. त्या ग्रंथाचे संपादन व लेखन जगातील इतर सर्व ग्रंथांपेक्षा अगदी वेगळ्या प्रकारे झालेले आहे. आपला विषय व उद्देश, आपला संवाद व आपली रचना या दृष्टीनेदेखील तो ग्रंथ एक आगळीच वस्तू आहे. म्हणून आतापर्यंतच्या पुस्तकांच्या वाचनामुळे तुमच्या मनात जो पुस्तकी साचा तयार झालेला आहे तो साचा 'कुरआना'ला समजण्यासाठी तुमच्या उपयोगी पडणार नाही किंबहुना तो साचा तर मार्गातील अडथळाच ठरेल. कुरआनाला समजण्याची जर इच्छा असेल तर वाचनासंबंधीच्या आपल्या पूर्वकल्पना प्रथम मनातून काढून टाकल्या पाहिजेत व मग कुरआनाच्या आश्चर्यकारक वैशिष्ट्यांशी परिचित झाले पाहिजे.

---------------------------------

या संबंधाने वाचकाने सर्वप्रथम कुरआनाची वास्तवता जाणून घेतली पाहिजे. वाचकाने, या ग्रंथावर आपले ईमान आपली श्रद्धा ठेवो अथवा न ठेवो, परंतु हा ग्रंथ समजून घेण्यासाठी, प्रारंभबिंदू म्हणून, त्याला या ग्रंथाची तीच वास्तवता स्वीकारावी लागेल जी स्वत: या ग्रंथाने व त्याला प्रस्तुत करणाऱ्याने (अर्थात हजरत मुहम्मद-स.-) सांगितलेली आहे; व ती वास्तवता अशी आहे,

(१) विश्वस्वामीने, जो सबंध सृष्टीचा निर्माणकर्ता आणि मालक व शासकही आहे, त्याच्या अनंत व असीम राज्यातील या विभागात, जिला पृथ्वी म्हणतात, मानवाला निर्माण केले आहे, त्याला जाणण्याच्या, विचार करण्याच्या व समजून घेण्याच्या शक्ती दिल्या आहेत. मानवाला त्याने भल्या व बुऱ्यातील ओळख दिली आहे. त्याला निवडीचे व इराद्याचे स्वातंत्र्य दिले आहे. विनीयोगाचे, अधिकारही त्याला दिलेले आहेत. असे एकंदरीतपणे मानवाला त्याने एकप्रकारची स्वयत्तता (ॅळऊध्ध्श्भ) देऊन पृथ्वीवर त्याला आपला खलिफा (नायब) बनविलेला आहे.

(२) मानवाला सदरहू पदावर नियुक्त करताना विश्वस्वामीने चांगल्या प्रकारे त्याची कानउघाडणी करून ही गोष्ट त्याच्या लक्षात आणून दिली होती की तुमचा व सर्व जगाचा मालक, उपास्य आणि शासक मीच आहे. माझ्या या राज्यात तुम्ही स्वतंत्रही नाही व इतर कुणाचे दासही नाही. तसेच माझ्या व्यतिरिक्त इतर कोणीही आज्ञापालनास, बंदगी आणि उपासनास तुमच्याकरिता पात्रही नाही. जगातील हे सर्व जीवन ज्यात अधिकार देऊन तुम्हाला पाठविले जात आहे, वास्तविकपणे तुमच्यासाठी एका परीक्षेचा कालावधी आहे, ज्यानंतर तुम्हाला माझ्याकडे परत यावे लागेल व मी तुमच्या कामाची तपासणी करून निर्णय देईन की तुमच्यापैकी कोण परीक्षेत यशस्वी झाला आहे व कोण अयशस्वी ठरला आहे. तुमच्यासाठी योग्य वर्तन हेच आहे की आपला एकमेव उपास्य आणि शासक तुम्ही मलाच माना. जे मार्गदर्शन मी पाठवीन त्यानुसार जगात काम करा आणि जगाला परीक्षाक्षेत्र समजून या विवेकानिशी जीवन व्यतीत करा की तुमचे खरे उद्दिष्ट, माझ्या अंतिम निर्णयात यशस्वी ठरणे आहे. याउलट तुमच्याकरिता ते प्रत्येक वर्तन चुकीचे व अयोग्य आहे जे त्याच्याशी भिन्न असेल. जर पहिल्या वर्तनाचा तुम्ही अवलंब कराल (ज्याचे तुम्हाला स्वातंत्र्य आहे) तर तुम्हाला जगात शांती व समाधान प्राप्त होईल, व जेव्हा परतून तुम्ही माझ्या जवळ याल तेव्हा मी तुम्हाला चिरसुखाचे व आनंदाचे ते घर देईन ज्याचे नाव जन्नत (स्वर्ग) आहे. परंतु जर तुम्ही दुसऱ्या कोणत्याही वर्तनाने चालाल (ज्यावर चालण्याचेही तुम्हाला स्वातंत्र्य आहे) तर जगात तुम्हाला उपद्रव आणि



अशांततेचा आस्वाद घ्यावा लागेल व जेव्हा जगातून निघून तुम्ही परलोकात याल तेव्हा चिरदु:ख व संकटांच्या त्या खाईत तुम्ही लोटले जाल जिचे नाव दोजख (नरक) आहे.

(३) अशाप्रकारे समजावून सृष्टीच्या स्वामीने मानवजातीला भूतलावर जागा दिली आणि मानवजातीच्या प्रथम व्यक्तींना (आदम व हव्वा) ते मार्गदर्शनही देऊन टाकले ज्यानुसार त्यांना व त्यांच्या संततीला पृथ्वीतलावर काम करावयाचे होते. ही प्रथम माणसे अज्ञान आणि अंधकाराच्या स्थितीत निर्माण झाली होती असे नाही तर ईश्वराने जमिनीवरील त्यांच्या जीवनाचा प्रारंभ पूर्ण प्रकाशात केलेला होता. वस्तुस्थितीही त्यांना माहीत होती. त्या माणसांना त्यांचा जीवनकायदा सांगितलेला होता. ईश्वराचे आज्ञापालन (अर्थात इस्लाम) हीच त्याची जीवनपद्धती होती. आणि त्यांचा जीवनकायदा सांगितलेला होता. ईश्वराचे आज्ञापालन (अर्थात इस्लाम) हीच त्यांची जीवनपद्धती होती आणि आपल्या संततीलाही हीच गोष्ट त्यांनी शिकविली होती की तिने ईश्वराचे आज्ञाधीन (मुस्लिम) बनून राहावे. परंतु नंतरच्या शतकात हळूहळू त्या खऱ्या जीवनपद्धतीपासून (दीन-धर्मापासून) विमुख होऊन माणसे निरनिराळ्या प्रकारच्या चुकीच्या वर्तनाकडे निघाली. त्यांनी गाफिल होऊन त्या खऱ्या जीवनपद्धतीला हरवूनही टाकले आणि खोडसाळपणा करून तिला विकृतही केले. त्या माणसांनी ईश्वराबरोबर पृथ्वी व आकाशातील विभिन्न मानवी व अमानवी, काल्पनिक आणि भौतिक अस्तित्वांना ईशत्वात भागीदार ठरवून घेतले. ईश्वराने दिलेल्या सत्य ज्ञानात (अलइल्म) नाना तऱ्हेच्या भ्रामक कल्पनांची आणि दृष्टिकोनांची व तत्त्वज्ञानाचीही भेसळ करून त्यांनी असंख्य धर्म घडवून आणले. त्या लोकांनी, ईश्वराने ठरवून दिलेल्या न्यायपूर्ण नैतिक नियमांना व संस्कृतीला (शरीअतला) सोडून अथवा त्यांना विकृत करून आपल्या मनोवासनानुसार आणि आपल्या पूर्वग्रहदोषानुसार जीवनाचे असे कायदे रचून घेतले ज्यामुळे ईश्वराच्या भूमीवर सर्वत्र अन्याय माजले.

(४) ईश्वराने मानवाला जी मर्यादित स्वरूपाची स्वायत्तता दिली होती तिच्याशी ही गोष्ट सुसंगत नव्हती की त्याने आपल्या सर्जनात्मक हस्तक्षेपाचा उपयोग करून त्या बिघडलेल्या माणसांना जबरदस्तीने योग्य वर्तनाकडे वळवावे. व जगात काम करण्यासाठी जी सवड मानवजातीसाठी व तिच्या विविध राष्ट्रांसाठी त्याने ठरवून दिलेली होती तिच्याशीदेखील ही गोष्ट सुसंगत नव्हती की अशा प्रकारची बंडाळी उत्पन्न होताक्षणीच त्याने माणसांना नष्ट करून टाकावे. याशिवाय निर्मितीच्या

प्रारंभापासून ज्या कामाची जबाबदारी त्याने स्वत: घेतली होती ते असे की माणसांच्या स्वायत्ततेला अबाधित ठेवून त्यांच्यासाठी ठरलेल्या कार्यकालावधी दरम्यान तो त्यांच्या मार्गदर्शनाची व्यवस्था करीत राहील. तद्नुसार स्वत: होऊन घेतलेली आपली सदरहू जबाबदारी पार पाडण्यासाठी ईश्वराने मानवांपैकीच अशा माणसांना उपयोगात आणणे सुरू केले जे त्याच्यावर ईमान बाळगणारे व त्याच्या इच्छेचे अनसुरण करणारे होते. ईश्वराने अशा माणसांना आपले प्रतिनिधी बनविले. आपले संदेश त्यांच्याजवळ पाठविले, त्यांना वास्तवतेचे ज्ञान दिले. त्यांना खरा जीवनकायदा प्रदान केला व अशा प्रतिनिधींना या कामासाठी त्याने नियुक्त केले की त्यांनी आदमच्या संततीला त्याच सरळ मार्गाकडे परतण्याचे आवाहन करावे ज्यापासून ती भरकटली होती.

(५) असे प्रेषित-पैगंबर-निरनिराळ्या राष्ट्रात व देशात उदयास येत राहिले. हजारो वर्षापर्यंत त्यांच्या आगमनाचा क्रम सुरू होता. हजारोंच्या संख्येत त्यांची नियुक्ती झाली. त्या सर्वांचा धर्म एकच होता, अर्थात तेच खरे वर्तन जे प्रथमदिनीच मानवाला सांगितलेले होते. ते सर्व प्रेषित एकाच मार्गदर्शनाचे अनुयायी होते. अर्थात नीती, सदाचार आणि उद्दिष्टही तेच अनादी व अनंत नियम व तेच तत्त्व जे प्रारंभीच माणसासाठी योजलेले होते. त्या सर्व प्रेषितांचे ध्येय व उद्दिष्टही एकच होते. म्हणजे असे की त्याच एका धर्माकडे व मार्गदर्शनाकडे मानवजातीस आवाहन करावे. मग जे लोक ते आवाहन स्वीकारतील त्यांना संघटित करून एक असे राष्ट्र (उम्मत) बनवावे जे स्वत:ही अल्लाहचे कायदे पाळणारे असावेत आणि जगातही ईश्वरी कायद्यांचे वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी व त्या कायद्यांची अवज्ञा रोखण्यासाठी झटणारे असावेत. सदरहू प्रेषितांनी आपापल्या कारकिर्दीत आपले उद्दिष्ट पूर्ण क्षमतेनिशी पार पाडले परंतु नेहमी असेच घडले की माणसांची एक मोठी संख्या तर त्यांचे आवाहन स्वीकारण्यास तयारच झाली नाही व ज्यांनी ते आवाहन स्वीकारून 'उम्मते मुस्लिम' (मुस्लिम राष्ट्र) चे स्वरूप धारण केले तेही स्वत: हळूहळू बिघडत गेले. इथपावेतो की त्यांच्यापैकी काही राष्ट्रांनी ईश्वरी मार्गदर्शन पूर्णपणे हरवून टाकले, तर काहींनी ईश्वरी वचनांत व आदेशात स्वहस्ते फेरफार आणि भेसळ करून त्यांना विकृत करून टाकले.

(६) सरतेशेवटी विश्वस्वामीने अरबभूमीत हजरत मुहम्मद (स.) यांना त्याच कामासाठी नियुक्त केले ज्यासाठी पूर्वीचे प्रेषित येत् सत. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे संबोधित सर्व माणसेही होती आणि पूर्वीच्या प्रेषितांचे बिघडलेले अनुयायीही होते. सर्वांना खऱ्या व योग्य वर्तनाकडे आवाहन करणे, सर्वांना पुनरपि ईश्वरी मार्गदर्शन पोहोचविणे व जे सदरहू आवाहनाचा व मार्गदर्शनाचा स्वीकार करतील



त्यांना एक असे राष्ट्र बनविणे त्यांचे काम होते ज्या राष्ट्राने एकीकडे स्वत:च्या जीवनाची व्यवस्था ईश्वराच्या मार्गदर्शनानुसार उभी करावी तर दुसरीकडे जगाच्या सुधारणेसाठीही प्रयत्नांची पराकाष्ठा करावी. याच आवाहनाचा व मार्गदर्शनाचा ग्रंथ, हा कुरआन असून अल्लाहने तो हजरत मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरित केला आहे.

---------------------------------

कुरआनाची ही वास्तवता माहीत झाल्यानंतर वचकांसाठी हे समजणे सुलभ होईल की या ग्रंथाचा विषय कोणता आहे, त्याची मध्यवर्ती कल्पना कोणती व त्याचा हेतू आणि मुद्दा कोणता आहे.

कुरआनाचा विषय माणूस आहे. अशा दृष्टीने की सर्वमान्य सत्यानुसार माणसाचे कल्याण कोणत्या गोष्टीत आहे व अकल्याण कोणत्या गोष्टीत.

कुरआनाची मध्यवर्ती कल्पना अशी की वरकरणी दृष्टीमुळे किंवा कयास व तर्क लढविण्यामुळे अथवा वासनेच्या आहारी गेल्यामुळे माणसाने ईश्वरासंबंधी, सृष्टीव्यवस्थेसंबंधी, स्वत:संबंधी आणि स्वत:च्या ऐहिक जीवनासंबंधी जे दृष्टिकोन बनविलेले आहेत व त्या दृष्टिकोनानुसार त्याने जी वर्तने अंगिकारलेली आहेत; ते सर्वच सर्वमान्य सत्यानुसार चुकीचे असून अंतिम परिणामाच्या दृष्टीनेही खुद्द माणसासाठीच विनाशकारी आहेत. वास्तवता तीच आहे जी माणसाला खलिफा (नायब) बनवितांना ईश्वराने स्वत:च सांगितली होती. सदरच्या वस्तुस्थितीनुसार माणसाकरिता तेच वर्तन योग्य आणि इष्ट परिणामी आहे ज्या वर्तनाचा उल्लेख अगोदरच्या पृष्ठांत आम्ही 'खरे वर्तन' म्हणून केलेला आहे.

कुरआनचा हेतू माणसाला त्या 'खऱ्या वर्तना'कडे आवाहन करणे व अल्लाहच्या मार्गदर्शनाला स्पष्टपणे प्रस्तु करणे आहे; ज्याला माणूस आपल्या गाफिलपणामुळे हरवत आला आहे व खोडसाळपणामुळे विकृत करीत राहिला आहे.

सदरहू तीन मौलिक बाबींना लक्षात ठेवून एखाद्याने जर कुरआनाचे वाचन केले तर त्याला स्पष्टपणे असे दिसेल की हा ग्रंथ कोठेही त्याच्या विषयापासून, त्याच्या हेतूपासून व त्याच्या मध्यवर्ती कल्पनेपासून यत्किंचितदेखील दूर गेलेला नाही. प्रथमपासून ते शेवटपर्यंत या ग्रंथातील विविध प्रकारचे विषय त्याच्या मध्यवर्ती कल्पनेशी अशा प्रकारे संलग्न आहेत जसे एखाद्या कंठ्यातील लहानमोठी रंगीबेरंगी रत्ने त्या हारातील सरीशी संलग्न व समन्वित असतात. हा ग्रंथ पृथ्वी व आकाशांच्या रचनेवर, मानवाच्या निर्मितीवर, सृष्टीचिन्हांच्या निरीक्षणावर आणि गतकालीन

राष्ट्रांच्या घडलेल्या घटनांवर, चर्चा करतो, निरनिराळ्या राष्ट्रांच्या श्रद्धांवर व त्यांच्या नीतीमत्तावर व आचरणावर टीका करतो. हा ग्रंथ अध्यात्मिक बाबींचे व प्रश्नांचे स्पष्टीकरण करतो व इतर बऱ्याचशा गोष्टींचाही उल्लेख करतो. परंतु हे सर्व यासाठी नाही की त्याला भौतिकशास्त्र अथवा इतिहास किंवा तत्त्वज्ञानाचे अथवा अन्य एखाद्या शास्त्राचे शिक्षण द्यावयाचे आहे, तर हे यासाठी की त्याला सर्वमान्य सत्यासंबंधी माणसाच्या गैरसमजूती दूर करावयाच्या आहेत. त्याला खरी हकीकत लोकांच्या मनात रुजवावयाची आहे, माणसांच्या वास्तवतेविरूद्ध असलेल्या वर्तनाची चूक व त्याचे अनिष्ट परिणाम त्याला स्पष्ट करावयाचे आहेत. तर त्या वर्तनाकडे त्याला आवाहन करावयाचे आहे जे वास्तवतेनुसार आहे व इष्टपरिणामी आहे त्याच कारणांनी हा ग्रंथ प्रत्येक गोष्टीचा उल्लेख केवळ तितक्याच प्रमाणात आणि तशाच पद्धतीने करतो जे त्याच्या उद्दिष्टासाठी आवश्यक असते. नेहमी अशा गोष्टींचा उल्लेख आवश्यक त्या प्रमाणात केल्यानंतर असंबंधित तपशील सोडून हा ग्रंथ त्याच्या हेतूकडे व त्याच्या मध्यवर्ती कल्पनेकडे वळत असतो व त्याचे सर्व निवेदन कमालीची साम्यता राखून 'आवाहना'च्या आसाभोवती फिरत राहते.

---------------------------------

परंतु कुरआनाची वर्णनशैली, त्याची रचना व त्यातील बऱ्याचशा विषयांना मनुष्य तोपर्यंत चांगल्या प्रकारे समजू शकत नाही जोपर्यंत तो त्याची अवतरणस्थितीही चांगल्या प्रकारे समजून घेत नाही.

कुरआन काही अशा स्वरूपाचा ग्रंथ नाही की सर्वोच्च अल्लाहने एकाचवेळी तो लिहून हजरत मुहम्मद (स.) यांना देऊन टाकला असारा व सांगितले असावे की याला प्रकाशित करून लोकांना एका विशिष्ट जीवन-वर्तनाकडे बोलवा. तसेच हा कुरआन काही अशा स्वरूपाचा ग्रंथही नाही की लेखनात्मक पद्धतीने ग्रंथाचा विषय व त्याच्या मध्यवर्ती कल्पनेवर त्यात चर्चा केलेली असावी. याच कारणामुळे त्यात लेखनात्मक क्रमबद्धताही आढळत नाही व पुस्तकी शैलीही आढळत नाही. वास्तविकपणे कुरआनाचे खरे स्वरूप असे आहे की सर्वश्रेष्ठ अल्लाहने अरबस्तानातील मक्का शहरातून आपल्या एका दासाला प्रेषितत्वाच्या सेवेसाठी निवडले व त्याला हुकूम दिला की आपल्या शहरापासून व आपल्या घराण्या (कुरैश) पासून आवाहनाला प्रारंभ करा. हे कार्य सुरू करण्यासाठी प्रारंभी ज्या आदेशांची व सूचनांची गरज होती केवळ त्याच प्रथम दिल्या गेल्या. त्यांच्यात जास्त करून तीन विषयांचा समावेश होता.



त्यापैकी एक असा की पैगंबर (स.) यांना या गोष्टीची शिकवण देणे की त्यांनी प्रेषितत्वाच्या वैभवशाली कार्यासाठी स्वत:ला कशा प्रकारे तयार करावे आणि कोणत्या पद्धतीने काम करावे.

दुसरा असा की सर्वमान्य सत्यासंबंधी प्राथमिक स्वरूपाची माहिती देणे व सत्यासंबंधी सभोवतालच्या लोकांमध्ये ज्या गैरसमजूती पसरलेल्या होत्या व ज्यांच्यामुळे त्या लोकांचे वर्तन चुकीचे होत होते, त्यांचे ढोबळपद्धतीने खंडन करणे.

तिसरा असा की योग्य वर्तनाचे आवाहन देणे आणि ईश्वरी मार्गदर्शनाच्या त्या नैतिक मूलतत्त्वांना स्पष्ट करून सांगणे की ज्यांच्या अनुसरणात माणसाचे कल्याण व त्याचे सुदैव दडले आहे.

सुरवातीच्या काळातील हे संदेश प्राथमिक आवाहनाच्या अनुषंगाने काही लहान लहान संक्षिप्त बोलांचा समावेश असलेले असायचे. त्या बोलांची भाषा अत्यंत शुद्ध, अत्यंत गोड, अत्यंत प्रभावी आणि संबोधित राष्ट्राच्या रसिकतेनुसार उत्तम साहित्यिक सौंदर्य बाळगणारी होती. जेणेकरून ते बोल त्यांच्या हृदयात तीरासमान रूतून बसावेत, त्यांच्यातील लयमाधुर्यामुळे कर्ण आपोआप त्यांच्याकडे आकर्षिले जावेत आणि त्यांच्यातील प्रमाणबद्ध सौंदर्यामुळे जिव्हा न राहावून उत्स्फूर्तपणे त्यांचे उच्चारण करू लागाव्यात. शिवाय त्या बोलांवर स्थानिक रंगाची छाप अधिक होती. यद्यपि सांगितले तर जात होते विश्वव्यापी सत्य परंतु त्याच्यासाठी प्रमाण व पुरावे आणि उदाहरण मात्र त्याच निकटवर्ती परिसरातून घेतलेले होते ज्यांच्याशी संबोधित लोक चांगल्या प्रकारे परिचित होते. त्याच लोकांचा इतिहास, त्यांच्याच परंपरा, त्यांच्याच दैनंदिन निरीक्षणात येणारे भग्नावशेष आणि त्यांच्याच सर्व श्रद्धात्मक व नैतिक आणि सामूहिक स्वरूपाच्या बिघाडासंबंधी एकूण चर्चा केली जात होती. म्हणजे त्या लोकांसाठी ते बोल परिणामकारक ठरावेत.

अशाप्रकारे 'आवाहना'चा सदरहू प्राथमिक टप्पा चार-पाच वर्षांपर्यंत चालत राहिला. या कालावधीत पैगंबर (स.) त्या लोकांत करीत असलेल्या प्रचाराची प्रतिक्रिया तीन तऱ्हेच्या प्रकारात उमटली.

(१) पैगंबरांचे सदरहू आवाहन स्वीकारून काही सदाचारी माणसे मुस्लिमराष्ट्र (उम्मत) बनण्यासाठी तयार झाली.

(२) एक मोठी संख्या अज्ञानामुळे अथवा स्वार्थापोटी किंवा वडिलोपार्जित पद्धतीच्या प्रेमामुळे विरोधास तयार झाली.

(३) मक्का शहर आणि कुरैशांच्या सीमेपलीकडे जाऊन सदरहू नूतन आवाहनाचा आवाज तुलनात्मकरीत्या अधिक विस्तृत क्षेत्रात पोहोचू लागला.

---------------------------------

त्यानंतर येथून आता त्या आवाहनाचा दुसरा टप्पा सुरू होतो. या टप्प्यात इस्लामच्या चळवळीत आणि अज्ञानमूलक व्यवस्थेमध्ये भयंकर जीवघेणे संघर्ष पेटून ते सतत आठ-नऊ वर्षांपर्यंत चालत राहिले. केवळ मक्का शहरातच नव्हे, तसेच केवळ कुरैश लोकांतच नव्हे, तर अरबस्तानाच्या बव्हंशी विभागातदेखील जे लोक जुन्या अज्ञानमूलक व्यवस्थेला कायम ठेवू इच्छित होते ते लोक सदरहू चळवळीला हिंसेच्या मार्गाने नष्ट करण्यास तत्पर बनले, त्यांनी ती चळवळ चिरडून टाकण्यासाठी सर्व प्रकारचे डावपेच योजून पाहिले. खोटा प्रचार केला, शंकाकुशंका पसरविल्या आणि आरोप व आक्षेपांची सरबत्ती केली. सामान्यजनांच्या मनात नाना तऱ्हेचे वसवसे घातले. माहिती नसलेल्या लोकांना पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे म्हणणे ऐकण्यापासून रोखण्याचे प्रयत्न केले. इस्लाम स्वीकारणाऱ्यांवर अत्यंत क्रूरपणे जुलूम व अत्याचार केले. त्यांच्यावर आर्थिक व सामाजिक बहिष्कार टाकले व त्यांचा इतका छळ केला की त्यांच्यापैकी पुष्कळ लोकांना दोनदा घरादारांचा त्याग करून हब्श देशाकडे हिजरत करणे भाग पडले व सरतेशेवटी तिसऱ्यांदा सर्वच मुसलमानांना मदीनेकडे हिजरत करावी लागली. परंतु असा भयंकर आणि प्रतिदिन वाढत असलेला प्रतिकार होत असतानादेखील इस्लामी चळवळ फैलावतच होती. मक्का शहरातील एकही घर किंवा कुटुंब असे उरले नव्हते की ज्यातील कोणत्या न कोणत्या व्यक्तीने इस्लाम स्वीकारलेला नसावा, बहुतेक इस्लाम विरोधींच्या शत्रुत्वाची तीव्रता व त्यांच्या कडवटपणाचे कारण हेच होते की स्वत: त्यांचे भाऊ, पुतणे, मुले, मुली, बहिणी आणि मेव्हणे इस्लामी आवाहनाचे केवळ अनुयायीच बनले होते त्यासाठी प्राणार्पण करणारे सहायकही बनले होते. अशा प्रकारे इस्लामविरोधींचे प्रियआप्तेष्टच त्यांच्याशी झुंज देण्यासाठी उभे ठाकले होते. याउपरही मजेशीर लोक त्याअगोदरही त्यांच्या समाजात उत्तम लोक म्हणून गणले जात असत आणि इस्लामी चळवळीत सामील झाल्यानंतर तर ते इतके सत्यनिष्ठ व इतक्या शुद्ध आचरणाची माणसं बनत असत की जगाला त्या आवाहनाच्या श्रेष्ठत्वाची जाणीव झाल्याशिवाय राहू शकत नव्हती, जे आवाहन अशा लोकांना आकर्षित करीत होते व त्यांना अशा प्रकारे घडवीत होते.

अशाप्रकारच्या प्रदीर्घ व तीव्र संघर्षाच्या काळात सर्वोच्च अल्लाह प्रसंगानुसार



व गरजेनुसार आपल्या पैगंबरावर असे चैतन्यमय भाषण अवतरित होता की ज्याचा ओघ नदीच्या प्रवाहासारखा व ज्याची शक्ती महापुरासमान आणि ज्याचा प्रभाव खवळलेल्या उग्र अग्नीसमान होता. त्या भाषणात एकीकडे ईमानधारकांना त्यांची प्राथमिक कर्तव्ये सांगितली जायची, त्यांच्यात संघटनात्मक जाण उत्पन्न केली जायची, त्या ईमानधारकांना ईशभय, पापभीरुता आणि श्रेष्ठ आचरण व शुद्ध चारित्र्याची शिकवण दिली जायची. त्यांना सत्यधर्माच्या प्रचाराच्या पद्धती सांगितल्या जायच्या. यशस्वी ठरण्याची अभिवचने व जन्नत-स्वर्ग-प्राप्तीच्या आनंदवार्तेने त्यांचे धैर्य उंचावले जायचे तर संयम व सहनशीलता आणि धैर्यशीलतेने अल्लाहच्या मार्गात झटण्याचा उत्साह त्यांच्यात निर्माण केला जायचा. अशाप्रकारे प्राणार्पणाचा इतका जबरदस्त जोश आणि इतका दांडगा उत्साह त्यांच्यात उत्पन्न केला गेली की येणारी सर्व संकटे सहन करण्यासाठी व विरोधाच्या प्रचंड वादळाचाही मुकाबला करण्यासाठी ते तयार झाले होते. दुसरीकडे त्या चैतन्यमय भाषणात विरोध करणाऱ्यांना व सरळ मार्गापासून तोंड फिरविणाऱ्यांना आणि गफलतीची साखरझोप घेणाऱ्यां लोकांना अशा राष्ट्रांच्या झालेल्या शेवटाचे भय दाखविले गेले, ज्यांचा इतिहास त्यांना चांगल्या प्रकारे माहीत होता. त्या राष्ट्रांच्या उद्‌ध्वस्त वस्त्यांच्या भग्नावशेषापासून त्यांना धडा दिला गेला ज्या भग्नावशेषांवरून ते प्रवासाच्या हेतूने रात्रन् दिवस ये-जा करीत असत. त्या लोकांना एकेश्वरवाद आणि परलोकाचे प्रमाण व पुरावे त्या उघड निशाण्यांद्वारे दिले गेले; ज्या रात्रन् दिवस पृथ्वी व आकाशांत त्यांच्या डोळ्यासमोर प्रकटावस्थेत मौजूद होत्या व ज्यांना ते स्वत:ही आपल्या जीवनात सदोदित दिसत होत्या व जाणवत होत्या. त्या लोकांवर त्यांच्या अनेकेश्वरवादाचे दोष जीवनात अनिर्बंध असण्याच्या त्याच्या दाव्याचे व परलोकाच्या इन्काराचे दोष आणि वाडवडिलांचे अंधानुसरण करण्याचे दोष अशा स्पष्ट प्रमाणाद्वारे व पुराव्यानिशी उघड केले गेले जे अंत:करणात भिडणारे आणि बुद्धीला पटणारे होते. याशिवाय त्यांच्या एक अन् एक शंकेचे निरसन केले गेले. त्यांच्या प्रत्येक आक्षेपाचे योग्य उत्तर दिले गेले. त्या लोकांचा प्रत्येक गुंता व पेच ज्यात ते स्वत:ही गुंतलेले होते आणि इतरांनाही त्यात अडकविण्याचा ते प्रयत्न करीत होते त्याचे उकलन केले गेले. आणि सर्व बाजूंनी वेढून अज्ञानमूलक व्यवस्थेला असे घट्ट आवळले गेले की बुद्धीच्या व शहाणपणाच्या जगात तिला कोठेही थारा उरला नाही. त्याचबरोबर त्यांना ईश्वराचा कोप, 'कयामत'चे महाभयंकर प्रसंग आणि जहन्नम-नरकाच्या यातनेचे भय दाखविले गेले त्या लोकांची, त्यांच्या दुराचारासंबंधी, त्यांच्या चुकीच्या जीवनवर्तनासंबंधी,

अज्ञानमूलक रूढी व सत्याच्या शतृत्वासंबंधी तसेच ईमानधारकांच्या छळणूकीसंबंधी निर्भर्त्सना केली गेली तर नीतिमत्ता व संस्कृतीची ती महान मूलतत्त्वे त्यांच्या समोर प्रस्तुत केली गेली ज्यांच्या आधारावर सदैव ईश्वरप्रणीत सुसंस्कृतीची उभारणी होत आली आहे.

हा दुसरा टप्पा आपल्या जागी स्वत:च अनेक मजलांचा अंतर्भाव असलेला होता. त्यापैकी प्रत्येक मजलीमध्ये आवाहन अधिक विस्तृत होत गेले. आवाहनासाठी होणारे प्रयत्नही तीव्र होत गेले व त्यांचा प्रतिकारही अधिकाधिक प्रखर बनत गेला. निरनिराळ्या प्रकारच्या श्रद्धा आणि निरनिराळ्या प्रकारच्या कार्यपद्धती असलेल्या समूहांशी गाठ पडत गेली व अशा प्रकारच्या स्थित्यंतरानुसारच अल्लाहकडून येणाऱ्या संदेशात विषयांची विविधताही वाढत गेली.... अशी आहे महान कुरआनाच्या मक्केत अवतरलेल्या सूरतींची पार्श्वभूमी.

---------------------------------

सदरहू चळवळीला मक्केत आपले काम करताना तेरा वर्षे उलटली होती की अकस्मातपणे मदीना शहरात तिच्यासाठी एक असे केंद्र उपलब्ध झाले, जेथे अरबस्तानाच्या इतर सर्व विभागातून आपल्या अनुयायांना एकत्रित करणे व आपली शक्ती एका केंद्रात एकवटणे तिला शक्य झाले होते. तद्वत पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आणि इस्लामच्या अनुयायांनी बहुसंख्येने स्वदेश त्याग केला व हिजरत करून मदीना शहरात पोहोचले. अशाप्रकारे सदरहू आवाहनाने तिसऱ्या टप्प्यात पदार्पण केले.

तिसऱ्या टप्प्यात परिस्थिती पूर्णपणे बदलली होती. त्यात एका पद्धतशीर राज्यसत्तेच्या स्थापनेच्या कार्यात मुस्लिम राष्ट्राला यश आले. जुन्या अज्ञानमूलक व्यवस्थेची पताका उंचावणाऱ्यांशी सशस्त्र संग्राम सुरू झाले, पूर्वीच्या प्रेषितांच्या राष्ट्रांना (यहूदी व ख्रिस्तींना) सामोरे जावे लागले. खुद्द मुस्लिम उम्मतच्या (राष्ट्राच्या) आंतरिक व्यवस्थेतही निरनिराळ्या प्रकारच्या दांभिकांचा शिरकाव झाला व त्यांच्याशीही निपटावे लागले. अशाप्रकारे दहा वर्षांच्या तीव्र संघर्षानंतर सरतेशेवटी सदरहू चळवळीने यशात अशी मजल गाठली की संपूर्ण अरबस्तान तिच्या वर्चस्वाखाली आले. इतकेच नव्हे तर विश्वव्यापी आवाहनाचे व जागतिक सुधार घडवून आणण्याचे दार तिच्यासाठी खुले झाले. सदरच्या तिसऱ्या टप्प्यातही अनेक मजला होत्या व त्या प्रत्येकीत चळवळीच्या काही विशिष्ट गरजा होत्या; त्या



गरजांनुसार सर्वोच्च अल्लाहकडून पैगंबर (स.) यांच्यावर असे भाषण अवतरत होते जे कधी जळजळीत वक्तव्यशैलीच्या स्वरूपाचे असायचे तर कधी शाही फर्मान व राजाज्ञेच्या स्वरूपाचे असायचे. कधी अध्यापकीय पाठाच्या व शिक्षणाच्या स्वरूपाचे असायचे तर कधी सुधारणात्मक आणि प्रबोधनात्मक स्वरूपाचे असायचे. अशा प्रकारे अवतरणाच्या भाषणांद्वारे सांगितले गेले की जमातची व राज्याची उभारणी कशी करावी, सुसभ्य नागरिकत्व कसे निर्माण करावे, जीवनाच्या विविध क्षेत्रांची उभारणी कोणत्या नियमांच्या व कायद्यांच्या आधारे करावी. त्यात सांगितले होते की दांभिकांशी कसा व्यवहार करावा, आज्ञाधीन (जिम्मी) काफिरांशी कसा व्यवहार करावा, ग्रंथधारकांशी कशा प्रकारचे संबंध असावेत, युद्ध करणाऱ्या शत्रूंशी आणि करार केलेल्या राष्ट्रांशी कसा व्यवहार केला जावा. त्याचबरोबर संघटित ईमानधारकांच्या समूहाने जगात विश्वस्वामीचे नायब म्हणून कर्तव्य पार पाडण्यासाठी स्वत:ला कसे तयार करावे. अल्लाहकडून उतरत असलेल्या त्या भाषणांद्वारे एकीकडे मुसलमानांना शिक्षण दिले जात होते, त्यांना संस्कारक्षम केले जात होते, त्यांच्यातील उणीवांसाठी त्यांना समज दिली जात होती, ईशमार्गात जीवित व वित्तानिशी जिहाद करण्याचे त्यांना प्रोत्साहन दिले जात होते. त्या भाषणांद्वारे मुसलमानांना, त्यांच्या जय व पराजयावर, त्यांच्यावर येणारी संकटे व सुखदु:खाच्या स्थितीवर, त्यांची सुबत्ता आणि तंगीच्या स्थितीवर, त्यांच्यावरील शांततेच्या व भीतीच्या परिस्थितीवर, तात्पर्य असे की सर्व प्रकारच्या परिस्थितीत तिच्याशी सुसंगत असे नैतिक धडे दिले जात होते. त्याद्वारे मुसलमानांना अशा प्रकारे संस्कारक्षम केले जात होते की पैगंबर (स.) यांच्या पश्चातही त्यांचे उत्तराधिकारी बनून त्यांनी चळवळीचे व सुधारणेचे कार्य पार पाडू शकावे. दुसरीकडे अल्लाहकडून अवतरणाऱ्या त्या भाषणांद्वारे असे लोक जे ईमानाच्या कक्षेबाहेर होते अर्थात ग्रंथारक (यहूदी व ख्रिस्ती लोक) दांभिक, काफिर आणि अनेकेश्वरवादी (मुश्रिक) अशा सर्व लोकांना त्यांच्या निरनिराळ्या स्थितीनुसार समजावण्याचा प्रयत्न केला जात असे. त्यांना हळूवारपणे आवाहन देण्याचा, कठोरपणे निर्भर्त्सना करण्याचा व उपदेश देण्याचाही प्रयत्न केला जात असे. तसेच त्या लोकांना ईश्वराच्या प्रकोपाची भीती दाखविण्याचा आणि बोधदायी घटना आणि वर्तमानापासूनही धडा देण्याचा प्रयत्न केला जात होता जेणेकरून त्यांच्यावर प्रबोधनाची पूर्तता सिद्ध व्हावी.

अशी आहे महान कुरआनाच्या मदीनेत उतरलेल्या 'सूरती'ची पार्श्वभूमी.

---------------------------------

वरील चर्चेवरून ही गोष्ट पूर्णपणे स्पष्ट होते की दिव्य कुरआनाचे अवतरण एका आवाहनाबरोबर सुरू झाले. ते आवाहन आपल्या प्रारंभापासून ते पूर्णत्वाला पोहोचेपर्यंत तेवीस वर्षांच्या कालावधीत ज्या ज्या टप्प्यातून व ज्या ज्या मजलांमधून वाटचाल करीत होते त्या सर्वांच्या निरनिराळ्या प्रकारच्या गरजेनुसार कुरआनाचे विवध विभाग अवतरित होत गेले. अशाप्रकारे साकार झालेल्या ग्रंथात लेखनात्मक रचनेच्या त्या पद्धतीचा अवलंब होऊच शकत नाही जी एखाद्या डॉक्टरेटची पदवी प्राप्त करण्यासाठी लिहिलेल्या प्रबंधात अवलंबिली जात असते, हे अगदी उघड आहे. त्याशिवाय सदरहू आवाहनाच्या विकासाबरोबर कुरआनाचे जे लहान वा मोठे विभाग अवतरित झाले; तेदेखील पुस्तिकांच्या रूपात प्रकाशित केले जात नसत तर वक्तृत्वाच्या स्वरूपात ते निवेदन केले जात असत व त्याच स्वरूपात ते प्रसारितही केले जात असत. म्हणून त्यांची शैलीही लेखनात्मक नसायची तर वक्तृत्वशैली असायची. तसेच ते वक्तृत्वही एखाद्या प्राध्यापकाच्या लेक्चरसमान नव्हे तर एका अशा निमंत्रकाच्या भाषणासमान होते, ज्याला मन व बुद्धी आणि विचारशक्ती व भावना सर्वांनाच आवाहन करावयाचे असते, ज्या निमंत्रकाला हर प्रकारच्या वृत्ती व मन:स्थिती असणाऱ्यांना तोंड द्यावे लागत असते, ज्याला आपले आवाहन, आपला प्रचार आणि कार्यरत असलेल्या आपल्या चळवळीसंबंधाने असंख्य विभिन्न प्रकारच्या स्थितीत काम करावे लागत असते. संभवनीय सर्वच पैलूंनी आपली गोष्ट लोक-मनात रुजविणे, वैचारिक जगात परिवर्तन घडवून आणणे, भावनांचे वादळ उठविणे, होणाऱ्या विरोधांना निष्प्रभ करणे, साथीदारांची सुधारणा करणे, त्यांच्यावर चांगले संस्कार घडविणे, तसेच त्यांच्यात जोश आणि उत्साह निर्माण करणे, तसेच शत्रूंनाही मित्र आणि अमान्य करणाऱ्यांनाही मान्यकर्ते बनविणे, विरोध करणाऱ्यांचे युक्तिवाद खंडित करणे व त्यांच्या नैतिक शक्तीचा नि:पात करणे, तात्पर्य असे की त्या निमंत्रकाला ते सर्व काही करावे लागत असते जे एखाद्या आवाहनाच्या प्रमुखाला व एखाद्या चळवळीच्या नेत्यासाठी आवश्यक असते. म्हणून सदरहू कार्यासंबंधी अल्लाहने आपल्या प्रेषितावर जी भाषणे उतरविली त्यांची वक्तृत्वशैली तीच होती जी एखाद्या आवाहनाच्या स्थितीशी सुसंगत असते. अशा भाषणात महाविद्यालयीन प्राध्यापकांच्या लेक्चरसमान शैली शोधण्याचा प्रयत्न योग्य ठरत नाही.

---------------------------------

या चर्चेवरून ही गोष्ट चांगल्या प्रकारे समजू शकते की कुरआनात विषयांचे इतके पुनरुच्चारण का घडले आहे. एखाद्या आवाहनाची व व्यवहार्य चळवळीची



स्वाभाविक गरज हीच असते की ती चळवळ ज्यावेळी ज्या टप्प्यात असेल त्यावेळी अशाच गोष्टी सांगितल्या जाव्यात ज्या त्या टप्प्याशी सुसंगत असतील. जोपर्यंत आवाहन एका टप्प्यात असेल तोपर्यंत नंतरच्या टप्प्याची गोष्ट काढली जाऊ नये. तर त्याच टप्प्याच्या गोष्टींची उजळणी होत राहिली पाहिजे. या कामात मग काही महिने लागोत की कित्येक वर्षे खर्ची पडोत. परंतु एकाच प्रकारच्या गोष्टींची उजळणी एकाच मजकुराद्वारे व एकाच पद्धतीने होत राहिले तर त्या गोष्टी ऐकून ऐकून कान थकून जातात आणि मने वैतागू लागतात. म्हणून हेदेखील जरूरीचे असते की प्रत्येक टप्प्यात ज्या गोष्टी पुन्हा पुन्हा सांगावयाच्या असतील त्या दरवेळी नवनवीन शब्दात, नव्या शैलीत आणि नवनव्या थाटात सांगितल्या जाव्यात जेणेकरून अत्यंत सुखद पद्धतीने त्या हृदयांकित व्हाव्यात व आवाहनाची एका नंतर एक मजल चांगल्या प्रकारे भक्कम होत जावी. त्याचबरोबर ही गोष्टही जरूरीची असते की आवाहनाचा पाया ज्या श्रद्धांवर आणि ज्या तत्त्वांवर उभारला गेला असेल त्यांना प्रथम पावलापासून ते अंतिम मजल गाठेपर्यंत कोणत्याही वेळी व कोणत्याही स्थितीत दृष्टिआड होऊ देऊ नये. किंबहुना त्यांची उजळणी कोणत्याही परिस्थितीत आवाहनाच्या प्रत्येक टप्प्यात होत राहणेही आवस्यक असते. याच कारणास्तव इस्लामी आवाहनाच्या एका टप्प्यात कुरआनाच्या जितक्या सुरती उतरल्या आहेत त्या सर्वात सर्वसाधारणपणे एकाच प्रकारचे विषय निनिराळ्या शब्दात व विविध वर्णनशैलीद्वारे प्रकट झाले आहेत. तथापि एकेश्वरवाद आणि ईश्वरी गुण, परलोक आणि त्यातील जाबविचारणा, त्यातील शिक्षा व बक्षिशी तसेच प्रेषितत्व आणि ईशग्रंथावरील ईमान, ईशभय आणि संयम व ईश्वरावरील विश्वास व अशाच प्रकारच्या इतर मौलिक विषयांची पुनरावृत्ती संपूर्ण कुरआनात दिसून येते. कारण या मौलिक गोष्टींपासून गाफिलपणा इस्लामी चळवळीच्या कोणत्याही टप्प्यात खपवून घेण्यासारखा नव्हता. जर सदरहू मौलिक कल्पना जरादेखील कमकुवत झाल्या असत्या तर सदरहू इस्लामी चळवळ आपल्या खऱ्या आत्म्यानिशी चालू शकत नव्हती.

---------------------------------

थोड्या सखोलपणे विचार केला तर याच विवेचनाद्वारे या प्रश्नाचेही निराकरण होते की पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी कुरआन, त्याच क्रमानुसार का क्रमबद्ध केला नाही ज्या क्रमाने तो अवतरला होता.

वरील विवेचनावरून आपणास हे माहीत झालेच आहे की तेवीस वर्षातील कुरआनाचे अवतरण त्याच क्रमाने होत गेले आहे, ज्या क्रमाने आवाहनाचा प्रारंभ व

त्याचा विकास घडलेला आहे. आता हे अगदी उघड आहे की आवाहनाच्या परिपूर्णतेनंतरही अवतीर्ण झालेल्या विभागांसाठी तोच क्रम ठेवणे योग्य ठरू शकत नव्हते जो क्रम केवळ आवाहनाच्या विकसनशील अवस्थेशी सुसंगत होता. आता त्या विभागांसाठी तर अशा वेगळ्या प्रकारच्या क्रमबद्धतेची गरज होती जी आवाहनाच्या परिपूर्णतेनंतरच्या अवस्थेशी अधिक सुसंगतता राखणारी असारी. कारण प्रारंभी इस्लामी आवाहनाचे प्रथम संबोधित लोक इस्लामशी पूर्णपणे अनभिज्ञ होते; म्हणून त्यावेळी अगदी प्रारंभिक बिंदूपासून त्यांना शिक्षण देणे व उपदेश देणे सुरू केले गेले. परंतु इस्लामी आवाहन परिपूर्ण झाल्यानंतर त्याचे प्रथम संबोधित लोक ते ठरले जे त्यावर ईमान आणून एक राष्ट्र बनले होते. इतकेच नव्हे तर जे कार्य पैगंबर (स.) यांनी ‘दृष्टिकोनात्मक आणि व्यवहारात्मक’, असा दोन्ही पैलूंनी परिपूर्ण करून त्यांच्या स्वाधीन केले होते; ते कार्य पुढे चालविण्यासाठीही ते जबाबदार ठरले होते. अशाप्रकारे अपरिहार्यपणे आता अग्रक्रम या गोष्टीला मिळाले की सदरहू राष्ट्राने प्रथम स्वत:ची कर्तव्ये, आपले जीवन कायदे आणि पूर्वीच्या प्रेषितांच्या राष्ट्रांमध्ये जे उपद्रव उद्‌भवायचे त्यांची चांगल्या प्रकारे माहिती करून घ्यावी. त्यानंतर मग इस्लामशी अपरिचित असलेल्या जगासमोर ईश्वराचे मार्गदर्शन प्रस्तुत करण्यासाठी त्याने पुढाकार घ्यावा.

त्याशिवाय दिव्य कुरआन हा ज्या प्रकारचा ग्रंथ आहे, त्याला जर माणसाने चांगल्याप्रकारे समजून घेतले तर त्यावर स्वत:च ही गोष्ट उघड झाल्याशिवाय राहू शकत नाही की एकएका प्रकारच्या विषयांना एकएका ठिकाणी एकत्र करणे ही गोष्ट कुरआनच्या स्वभावाला अनुसरून नाही. कुरआनाच्या स्वभावाची निकड तर अशी आहे की त्याचे वाचन करणाऱ्या समोर मदीनेच्या टप्प्यातील गोष्टी मक्केच्या काळातील शिकवणी दरम्यान येत राहाव्यात तर मक्केच्या टप्प्यांतील गोष्टी मदीनेच्या काळातील भाषणांदरम्यान येत राहाव्यात. त्याचप्रमाणे प्रारंभीची चर्चा शेवटच्या काळातील आदेशांदरम्यान तर शेवटच्या काळातील आदेश प्रारंभी सांगितलेल्या शिकवणीच्या सानिध्यात वरचेवर येत रहावेत, जेणेकरून इस्लामचे परिपूर्ण चित्र आणि त्याचा व्यापक आराखडा त्याच्या नजरेत असावा व कोणत्याही वेळी तो एककल्ली बनू नये. त्याशिवाय कुरआनाला जर त्याच्या अवतरणक्रमानुसार जरी क्रमबद्ध केले असते तरीपण अशा प्रकारची क्रमबद्धता नंतरच्या लोकांसाठी केवळ अशाच स्वरूपात अर्थपूर्ण ठरू शकत होती जेव्हा की कुरआनाबरोबर त्याच्या अवतरणाचा संपूर्ण इतिहास व त्यातील प्रत्येक विभागाची अवतरणस्थिती व



अवतरणप्रसंगही लिहून जोडले असते व ते सर्व लिखाणही आवश्यक पुरवणीसमान कुरआनाबरोबरच राहिले असते. परंतु ही गोष्ट त्या हेतूविरूद्ध होती ज्या हेतूनिशी सर्वोच्च अल्लाहने त्याच्या वाणीचा हा संग्रह रचून सुरक्षित करविलाहोता. त्याच्या दृष्टीसमोर तर हीच गोष्ट होती की ईशवाणी तिच्या शुद्धस्वरूपात, इतर कोणत्याही वाणीच्या भेसळी किंवा समावेशाविना तिच्या मूळ संक्षिप्त स्वरूपात रचली जावी व तिचे वाचन मुलांनी, तरुणांनी, वृद्धांनी, स्त्रियांनी-पुरुषांनी, शहरवासीयांनी, खेडुतांनी, सामान्यजनांनी, विद्वानांनी, सर्वांनीच करावे. त्याचे वाचन प्रत्येक कालखंडात, प्रत्येक जागी व प्रत्येक स्थितीत केले जावे. त्याचप्रमाणे बुद्धी व शहाणपणाच्या वेगवेगळ्या पातळीच्या प्रत्येक माणसाला कमीतकमी इतकी गोष्ट तर माहीतच असावी की त्याचा ईश्वर त्याच्याकडून काय इच्छितो व काय इच्छित नाही. हेदेखील त्याच्या दृष्टीसमोर होते. जर ईशवाणीच्या संग्रहासमवेत त्याचा एक लांबलचक लेखी इतिहासही जोडलेला असता व त्याचे पठणही आवश्यक ठरविले असते तर हा हेतू साध्य झाला नसता हे उघडच आहे. वस्तुस्थिती अशी आहे की कुरआनाच्या विद्यमान रचनाक्रमावर ज्या लोकांचा आक्षेप आहे ते सदरहू ग्रंथाचा हेतू व त्याच्या उद्देशापासून पूर्णपणे अनभिज्ञ तर आहेतच किंबहुना हा ग्रंथ केवळ इतिहासशास्त्र आणि जीवनशास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठीच अवतरलेला आहे अशा गैरसमजुतीतही ते गुरफटले आहेत; असे वाटते.

---

कुरआनाच्या रचनाक्रमासंबंधी वाचकाला ही गोष्टही माहीत असली पाहिजे की कुरआनचा विद्यमान रचनाक्रम नंतरच्या लोकांनी लावलेला नाही तर स्वत: सर्वोच्च अल्लाहच्या आदेशानुसार पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनीच तो विद्यमान स्वरूपात क्रमबद्ध केला होता. त्यांची पद्धत अशी होती की जेव्हा एखादी सूरत अवतरत असे तेव्हा पैगंबर (स.) त्याचक्षणी त्यांच्या लेखकांपैकी एखाद्याला बोलवीत असत व ती सूरत त्याच्याकरवी अचूकपणे लिहवून घेतल्यानंतर सूचना देत असत की सदरच्या सूरतीला अमुक सूरतनंतर व अमूक सूरत अगोदर ठेवली जावी. त्याचप्रमाणे जर कुरआनाचा एखादा असा विभाग अवतरत असे ज्याला परिपूर्ण सूरत (अध्याय) बनविण्याची योजना नव्हती, तेव्हा पैगंबर (स.) आदेश देत असत की सदरहू विभाग अमुक संग्रहामध्ये अमुक जागी नोंदविला जावा. नंतर त्याच क्रमानुसार पैगंबर (स.) स्वत:ही नमाजमध्ये व इतर प्रसंगीही कुरआनाचे पठण करीत असत व त्याच क्रमानुसार प्रतिष्ठित सहाबा (रजि.) (प्रेषितांचे साथीदार) देखील ते पाठ करून घेत

असत. म्हणून हे एक प्रामाण्य ऐतिहासिक सत्य आहे की महान कुरआनचे अवतरण ज्या दिवशी पूर्ण झाले त्याच दिवशी त्याचा रचनाक्रमही पूर्ण झाला. जो त्याचा अवतरणकर्ता होता तोच त्याचा रचनाक्रम लावणाराही होता. ज्याच्या हृदयावर तो अवतरित झाला त्याच्याच हस्ते तो क्रमबद्धही केला गेला. दुसऱ्या कुणाचीही हिंमत नव्हती की त्यात हस्तक्षेप करावा.

---------------------------------

प्रथमपासूनच मुसलमानांसाठी नमाज फर्ज (अनिवार्य) केलेली असल्याने व कुरआनपठण नमाजमधील आवश्यक घटक ठरविला असल्यामुळे कुरआनाच्या अवतरणाबरोबरच त्याला तोंडपाठ करण्याचा क्रम मुसलमानांत सुरू झाला व जसजसे कुरआनाचे अवतरण होत गेले तसतसे मुसलमान त्याला तोंडपाठही करीत गेले. अशा प्रकारे कुरआनाची सुरक्षितता केवळ खजूरींच्या पानावर आणि हाडे व कातडीच्या तुकड्यांवरच अवलंबून नव्हती ज्यांच्यावर पैगंबर (स.) आपल्या लिहिणाऱ्याकरवी कुरआन उतरवून घेत असत, तर कुरआनाचे अवतरण झाल्याबरोबर तो प्रथम वीसएक लोकांच्या हृदयांवर, नंतर शेकडोंच्या, मग हजारोंच्या व नंतर लाखों लोकांच्या हृदयावर कोरला जात असे व कुणाही शैतानासाठी हे शक्यच नव्हते की त्यात एका शब्दाचाही त्याने फेरफार करू शकावा.

पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या मृत्यूनंतर जेव्हा अरबस्तानात धर्मविमुखतेचे (इर्तेदातचे) वादळ उठले व ते शमविण्यासाठी जेव्हा प्रतिष्ठित सहाबा (रजि.) यांना रक्तरंजित लढाया कराव्या लागल्या तेव्हा त्या लढायांत ज्यांना संपूर्ण कुरआन मुखोद्‌गत होते अशा सहाबां (रजि.) ची एक मोठी संख्या शहीद झाली होती. ते पाहून हजरत उमर (रजि.) यांच्या ध्यानात आले की कुरआनाला सुरक्षित करण्यासंबंधाने फक्त एकाच साधनावर विसंबून राहणे योग्य होणार नाही, तर मन:पटलावर त्याला सुरक्षित करण्याबरोबरच लेखपटलावरही सुरक्षित करण्याची व्यवस्था केली पाहिजे. म्हणून या कार्याची आवश्यकता त्यांनी हजरत अबूबकर (रजि.) यांच्यावर स्पष्ट केली. हजरत अबूबकर (रजि.) यांनी काही विचार केल्यानंतर त्यासंबंधी संमती दर्शवून हजरत जैद बिन साबित अन्सारी (रजि.) यांना कुरआन लिहून घेण्याच्या सेवेसाठी नियुक्त केले. हजरत जैद बिन साबित (रजि.) हे पूर्वी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या सेवेत कातिब-सचिव म्हणून काम करीत सत. कार्यपद्धती अशी ठरली की एकीकडे तर लेखी स्वरूपात असलेले सर्व विभाग जे पैगंबर (स.) यांनी पाठीमागे सोडले होते, ते उपलब्ध करावेत. तर दुसरीकडे सहाबा (रजि.) पैकी ज्यांच्या ज्यांच्या



जवळ कुरआन अथवा त्याचा काही भाग लेखी स्वरूपात असेल, तो त्यांच्याकडून घेतला जावा. नंतर मग कुरआन मुखोद्‌गत असलेल्या हाफिजांचीही मदत घेतली जावी सदरहू तीनही साधनांच्या एकमताच्या साक्षीने, पूर्णपणे अचूकतेची खात्री पटल्यानंतर, कुरआनाचा एकन् एक शब्द ग्रंथात नोंदला जावा. या योजनेनुसार गौरवशाली कुरआनाची एक प्रमाणसिद्ध प्रत तयार करून ती उम्मुलमुअ्मिनीन हजरत हफ्सा (रजि.) यांच्याकडे ठेवली गेली व लोकांना अशी आम मुभा दिली गेली की हवे त्याने या प्रमाणसिद्ध प्रतीची नक्कल उतरवून घ्यावी व हवे त्याने तिच्याशी तुलना करून स्वत:जवळच्या प्रतीत दुरुस्ती करून घ्यावी.

अरबस्तानाच्या निरनिराळ्या प्रदेशांच्या व टोळ्यांच्या भाषेतही तशीच विभिन्नता आढळते असे जशी आमच्या देशात शहराशहराच्या व जिल्ह्याजिल्ह्याच्या भाषेत भिन्नता आढळून येते; वास्तविकपणे सर्व ठिकाणची भाषा तशी एकच म्हटली जाते अर्थात मराठी, उर्दू, पंजाबी, बंगाली इ. दिव्य कुरआन जरी त्या भेषेत उतरला होता जी भाषा मक्का शहरातील कुरैश लोक बोलत असत तरीपण सुरवातीला या गोष्टीची मुभा दिलेली होती की इतर प्रदेशातील लोकांनी व टोळ्यांनी आपापल्या पद्धती व शैलीनुसार आणि वाक्‌प्रचारानुसार त्याला पठण करावे. कारण अशा प्रकारे कुरआनाच्या अर्थात काहीच फरक पडत नव्हता. केवळ इतकेच की त्याचा मजकूर त्यांच्या वळणानुसार मृदू होत असे. परंतु हळूहळू जेव्हा इस्लाम फैलावत गेला व अरब लोकांनी त्यांच्या वाळवंटातून निघून जगाचा एक मोठा भाग जिंकून घेतला आणि इतर राष्ट्रांतील लोकही इस्लामच्या कक्षेत येऊ लागले व अरब लोक व अरबेतर लोकांचा मोठ्या प्रमाणात मेलमिलाफ घडल्यामुळे अरबी भाषेवरही त्याचे परिणाम उमटू लागले तेव्हा अशी भीती उत्पन्न झाली की यापुढेही जर अरबी भाषेच्या इतर पद्धती व शैली आणि वाक्‌प्रचारानुसार कुरआन पठणाची मुभा कायम राहिली तर अनेक उपद्रव उभे राहतील. उदा. एखाद्या माणसाने दुसऱ्या एखाद्या माणसाला जर एखाद्या अशा पद्धतीने कुरआनाचे पठण करताना ऐकले, जी त्याच्या परिचयाची नसली व असे समजून की तो हेतूपुरस्सर ईशवाणीत बदल करीत आहे तर तो त्याच्याशी भांडण सुरू करील, किंवा अशा प्रकारच्या शाब्दिक भिन्नतेमुळे कालांतराने हळूहळू खरेखुरे अर्थबदल होण्याचे दार उघडेल, अथवा अरब आणि अरबेतर लोकांच्या मेलमिलाफाने ज्या लोकांची भाषा अशुद्ध बनेल असे लोक आपल्या अशुद्ध अरबी भाषेनुसार कुरआनात ढवळाढवळ करून त्याचे साहित्यिक सौंदर्य बिघडवून टाकतील अशीही भीती निर्माण झाली होती. या कारणांनी खलीफा हजरत उस्मान (रजि.) यांनी

इतर प्रतिष्ठित सहाबां (रजि.) (सोबती) यांच्या सल्ल्याने असे ठरविले की सर्व इस्लामी देशात केवळ त्याच प्रमाणसिद्ध कुरआनाच्या प्रतीच्या नकला प्रकाशित कराव्यात जी प्रत हजरत अबूबकर (रजि.) यांच्या आज्ञेवरून लिहिलेली होती, व इतर सर्व शैली आणि वाक्‌प्रचारानुसार लिहिलेल्या ग्रंथाच्या प्रकाशनाची मनाई केली जावी.

आज जो कुरआन आमच्या हाती आहे तो तंतोतंत हजरत अबूबकर सिद्दीक (रजि.) यांनी प्रमाणित केलेल्या ग्रंथानुसार आहे. त्याच्याच अनेक प्रती हजरत उस्मान (रजि.) यांनी सरकारी इतमामाने शहरोशहरी व गावोगावी पाठविल्या होत्या. हल्लीसुद्धा जगाच्या अनेक ठिकाणी कुरआनाच्या त्या प्रमाणित प्रती मौजूद आहेत. कुणाला जर कुरआनाच्या सुरक्षिततेसंबंधी अणूमात्रदेखील शंका वाटत असेल तर तो आपली खात्री अशा पद्धतीने करून घेऊ शकतो की पश्चिम आफ्रिकेतील एखाद्या पुस्तक विक्रेत्यांकडून कुरआनाची एक प्रत विकत घ्यावी, आणि जावा (इंडोनेशिया) मधील एखाद्या हाफिज (सर्व कुरआन मुखोद्‌गत असणारा) च्या मुखाने कुरआन ऐकून पडताळा करून पहावा. नंतर मग जगातील मोठमोठ्या वाचनालयातून हजरत उस्मान (रजि.) च्या काळापासून ते आजतागायत निरनिराळ्या शतकात लिहिलेल्या कुरआनाच्या ज्या प्रती आहेत त्यांच्याशीही त्याची तुलना करावी. अशा पडताळ्यात त्याला जर एका शब्दाचा नव्हे तर कानामात्रेचा जरी फरक आढळून आला तर त्याचे असे कर्तव्य ठरेल की त्याने आपल्या या सर्वात महान ऐतिहासिक शोधाची जगाला कल्पना द्यावी. एखादा शंकेखोर कुरआनाचे अल्लाहकडून अवतरणासंबंधी जर शंका घेऊ इच्छित असला तर तो तसे करू शकतो. परंतु ही गोष्ट की आमच्या हाती जो कुरआन आहे तो कसल्याही न्यूनाधिक्क्याविना तंतोतंत तोच कुरआन आहे जो पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी जगासमोर प्रस्तुत केला होता, हे तर एक असे ऐतिहासिक सत्य आहे ज्यात कसल्याही शंकेला वाव नाही. मानवी इतिहासात अशा प्रकारचे भक्कम आणि निर्णायक पुरावे असलेली दुसरी कोणतीही गोष्ट आढळत नाही. जर कोणी कुरआनाच्या शुद्धतेत शंका घेत असेल तर मग तो या गोष्टीतही शंका घेऊ शकतो की रोमन एम्पायर ननावाची एखादी सत्ता जगात अस्तित्वात होती; आणि यातही शंका घेऊ शकतो की मोगलांनी कधीकाळी हिंदुस्तानावर सत्ता गाजविलेली आहे. तसेच 'नेपोलियन' नावाच्या कुणा व्यक्तीचेही जगात कधी अस्तित्व राहिलेले आहे. अशा प्रकारच्या प्रमाणसिद्ध ऐतिहासिक सत्यांसंबंधी शंका व्यक्त करणे ज्ञानाचे नव्हे तर अज्ञानाचे लक्षण आहे.

---------------------------------



कुरआन एक असा ग्रंथ आहे ज्याच्याकडे असंख्य माणसे, असंख्य हेतूंनी वळत असतात. त्या सर्वांचे हेतू व गरजांना दृष्टीसमोर ठेवून काही सल्ला देणे माणसासाठी शक्य नाही. इच्छुकांच्या या गर्दीत मला केवळ अशाच लोकांत रस आहे जे कुरआनाला समजू इच्छितात व हे जाणू इच्छितात की हा ग्रंथ मानवी जीवनाच्या समस्यांत कोणते मार्गदर्शन देतो. अशा लोकांना मी कुरआनाच्या वाचनासंबंधी काही सल्ला देईन. त्याचबरोबर काही अशा अडचणी, ज्या सर्वसाधारणपणे कुरआनाच्या राचनासंबंधी माणसाला वाटत असतात, त्यांचे निराकरण करण्याचाही प्रयत्न करीन.

खरोखरीच कुरआन समजून घेण्याची ज्याची इच्छा आहे अशा माणसाने, मग त्याचे कुरआनवर ईमान-श्रद्धा असो वा नसो, कोणत्याही परिस्थितीत सर्वप्रथम हेच काम केले पाहिजे की आपल्या मनातून पूर्वीच्या मानलेल्या कल्पना व दृष्टिकोन, तसेच अनुकूल अथवा प्रतिकूल स्वरूपाची उद्दिष्टे शक्य तितके काढून टाकले पाहिजे आणि कुरआन समजून घेण्याचा शुद्ध हेतू बाळगून खुल्या मनाने त्याचे वाचन सुरू केले पाहिजे. जे लोक काही विशिष्ट कल्पना मनात बाळगून हा ग्रंथ वाचतात ते ग्रंथाच्या ओळींमध्ये स्वत:च्या कल्पना व विचारांचेच वाचन करीत राहतात. कुरआनाची गंधवार्ताही त्यांना लागत नाही. अशाप्रकारच्या वाचनाची पद्धत तर कोणत्याही पुस्तकाच्या वाचनासाठी योग्य नाही. परंतु अशाप्रकारे वाचन करणाऱ्यांसाठी विशेष करून कुरआन तर स्वत:च्या अर्थभांडाराचे दार मुळीच उघडत नाही.

तसेच जो माणूस कुरआनासंबंधी केवळ ढोबळ स्वरूपाची माहिती प्राप्त करू इच्छित असेल त्याच्यासाठी तर कदाचित एकदाच त्याचे वाचन करणे पुरेसे ठरेल. परंतु ग्रंथाच्या खोलवर शिरण्याची ज्याची इच्छा आहे त्याच्यासाठी दोनचार वेळा तो वाचणेही पुरेसे ठरू शकत नाही. त्याने तर पुन्हा पुन्हा कुरआनाचे वाचन केले पाहिजे व प्रत्येकदा एका विशिष्ट पद्धतीने तो वाचला पाहिजे. तसेच त्यातील महत्वाच्या मुद्यांची नोंद घेण्यासाठी एका विद्यार्थ्यासमान कागद व पेन्सिल बरोबर घेऊन त्याने वाचनास बसले पाहिजे. अशा पद्धतीने कुरआनाचे वाचन करण्याची ज्या लोकांची तयारी असेल त्यांनी कमीतकमी दोनदा तरी या हेतूने कुरआन वाचला पाहिजे की हा ग्रंथ आचार व विचारांची जी व्यवस्था प्रस्तुत करतो ती पूर्ण व्यवस्था एकंदरीत स्वरूपात त्याच्या दृष्टीसमोर यावी. प्राथमिक वाचनादरम्यान अशा वाचकांनी कुरआनाच्या संपूर्ण दृश्यावर एक व्यापक दृष्टिक्षेप प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा व हे पाहात राहावे की हा ग्रंथ कोणत्या मौलिक कल्पना प्रस्तुत करतो व नंतर त्या मौलिक

कल्पनांच्या आधारे कोणत्या प्रकारची जीवनव्यवस्था उभी करतो. अशा पद्धतीने कुरआनाचे वाचन चालले असताना मध्येच एखाद्या ठिकाणी एखादा प्रश्न मनात उभा राहिला तर तत्क्षणी तेथेच त्यासंबंधी एखादा निर्णय घेऊ नये. तर त्या प्रश्नाची नोंद घ्यावी व सहनशीलतेने वाचन पुढे चालू ठेवावे. बव्हंशी पुढे कोठे न् कोठे त्यांना त्याचे उत्तर मिळेल. जर तसे उत्तर मिळाले तर नोंदविलेल्या आपल्या प्रश्नाबरोबर त्याचीही नोंद करावी. परंतु पहिल्या वाचनादरम्यान अशा लोकांना जर त्यांच्या एखाद्या प्रश्नाचे उत्तर मिळाले नाही तर संयमाने दुसऱ्यांदा वाचन करावे. मी स्वानुभवावरून असे सांगतो की दुसऱ्या वेळेच्या वाचनात क्वचितच त्याचा एखादा प्रश्न अनुत्तरित राहील.

अशा पद्धतीने कुरआनावर व्यापक दृष्टिक्षेप टाकल्यानंतर त्याच्या सविस्तर वाचनाला प्रारंभ केला पाहिजे. असे वाचन करीत असताना वाचकाने कुरआनाच्या शिकवणीचा एक एक पैलू नीट लक्षात घेऊन त्याची नोंद घेतली पाहिजे. उदा.- वाचकाने ही गोष्ट समजून घेण्याचा प्रयत्न करावा की मानवतेचा कोणता आदर्श आहे; ज्याला कुरआन प्रिय ठरवितो तर कोणत्या नमुन्याची माणसे त्याच्याजवळ क्रोधास आणि धिक्कारास पात्र आहेत. या विषयावर चांगल्या प्रकारे ताबा मिळविण्यासाठी वाचकाला हवे की त्याने आपल्या वहीच्या एका बाजूवर 'प्रिय माणसा'ची वैशिष्ट्ये तर वहीच्या दुसऱ्या बाजूवर 'अप्रिय माणसा'ची वैशिष्ट्ये समोरासमोर लिहीत जावी. अथवा, उदा.- वाचकाने हे जाणून घेण्याचा प्रयत्न करावा की कुरआनाजवळ मानवाचे कल्याण व त्याच्या मुक्तीची मदार कोणत्या गोष्टीवर अवलंबून आहे. तसेच कोणत्या गोष्टी अशा आहेत ज्यांना कुरआनाने मानवासाठी हानीकारक आणि विनाशकारक ठरविल्या आहेत. हा विषयही स्पष्टपणे व सविस्तरपणे जाणून घेण्याची योग्य पद्धत हीच आहे की माणसाने स्वतःच्या वहीत 'कल्याणकारी गोष्टी' आणि 'विनाशकारक गोष्टी' अशी दोन शीर्षके परस्परासमोर लिहावी नंतर कुरआनाच्या वाचनादरम्यान प्रतिदिनी दोन्ही प्रकारच्या गोष्टींची नोंद घेत राहावी. अशाचप्रमाणे श्रद्धा, नीतीमत्ता, हक्क व अधिकार, कर्तव्ये, राहणीमान, संस्कृती, अर्थकारण, राजकारण, कानून-कायदे, सामूहिक व्यवस्था, तह, युद्ध आणि अशाच इतर जीवनसमस्यांपैकी प्रत्येकासंबंधी कुरआनातील सूचना व आदेशांची वाचकाने नोंद घेत राहावी व हे समजून घेण्याचा प्रयत्न करावा की त्यापैकी प्रत्येक क्षेत्र त्यात एकंदरीतपणे कशा स्वरूपात साकारले आहे, नंतर मग त्या सर्व क्षेत्रांना एकत्रितपणे जोडल्याने जीवनाचा संपूर्ण नकाशा कशा प्रकारचा तयार झाला आहे.

तसेच जीवनाच्या एखाद्या विशिष्ट समस्येसंबंधी कुरआनाचा दृष्टिकोन काय



आहे; या बाबतीत संशोधन करण्याची जर माणसाची इच्छा असेल तर त्यासाठीही उत्तम पद्धत हीच आहे की प्रथम अशा माणसाने त्या समस्येसंबंधीच्या प्राचीन तसेच अर्वाचीन साहित्याचा सखोलपणे अभ्यास करून हे जाणून घेतले पाहिजे की या समस्येचे मूळ मुद्दे कोणकोणते आहेत. त्यांच्यावर माणसाने आतापर्यंत काय विचार केलेला आहे, त्यासंबंधी त्याचा समज काय आहे. तसेच त्या समस्येच्या कोणकोणत्या मुद्यांचा अद्याप उलगडा झालेला नाही व त्याबाबतीत मानवी बुद्धीचा गाडा कोठवर जाऊन अडकतो आहे. त्यानंतर त्या समस्येच्या न उलगडलेल्या बाबींना दृष्टीत ठेवून माणसाने कुरआनाचे वाचन केले पाहिजे. माझा अनुभव असा आहे की अशाप्रकारे जेव्हा एखाद्या समस्येच्या संशोधनासाठी माणूस कुरआनाचे वाचन करू लागतो तेव्हा त्याला त्याच्या प्रश्नाची उत्तरे अशा आयतींतून मिळू लागतात ज्यांचे वाचन त्याने त्या अगोदर अनेकदा केलेले होते व तेव्हा ही गोष्ट त्याच्या ध्यानी व मनीही नव्हती की त्या आयतीत असा विषयही दडलेला आहे.

---------------------------------

परंतु कुरआन आकलनाच्या वरील सर्व उपाययोजनांनंतरही माणूस कुरआनाच्या आत्म्याशी पूर्णपणे परिचित होत नाही जोपर्यंत की तो प्रत्यक्षात ते कार्य करीत नाही ज्यासाठी कुरआन आलेला आहे. कुरआन केवळ दृष्टिकोन आणि विचारांचा ग्रंथ नाही की आपण आरामखुर्चीवर विसावून त्याचे वाचन करावे व त्याच्या सर्व गोष्टी समजू शकाव्यात. कुरआन काही, जगाच्या सर्वसाधारण धर्म-कल्पनेनुसार एखादा निव्वळ धार्मिक ग्रंथही नाही की मठींत आणि पाठशाळांत त्याच्या सर्व रहस्यांचे निराकरण करता येईल. कुरआन तर, या प्रस्तावनेच्या प्रारंभीच सांगितल्याप्रमाणे एका आवाहननाचा व एका चळवळीचा ग्रंथ आहे. कुरआनाने तर आल्याआल्याच एका शांत स्वभावी व सद्‌वृत्तीच्या माणसाला एकांतवासातून बाहेर काढून ईश्वराशी विमुख बनलेल्या जगाविरूद्ध उभे केले; असत्याविरूद्ध त्याच्याकरवी आवाज उठविला; आणि कुफ्र, दुराचार आणि पथभ्रष्टतेच्या तत्कालीन म्होरक्याविरूद्ध त्याचा संघर्ष करविला. कुरआनाने घराघरातून एकन् एक पुण्यात्म्याला व सत्प्रवृत्त व्यक्तीला आकर्षित करून, त्या सर्वांना सत्याचे आवाहन देणाऱ्याच्या झेंड्याखाली एकत्रित केले. तसेच कानाकोपऱ्यातील एकन् एक उपद्रवी आणि बिघाड माजविणाऱ्या व्यक्तीला त्याने चिथावणी दिली व सत्याचा पुरस्कार करणाऱ्यांशी त्यांचे युद्ध घडवून आणले. अशाप्रकारे एकट्या माणसाने दिलेल्या हाकेपासून कार्य प्रारंभ करून ते ईश्वरीखिलाफतच्या (ईश्वरीसत्तेच्या) स्थापनेपर्यंत

तब्बल तेवीस वर्षांपर्यंत कुरआनच त्या वैभवशाली चळवळीचे मार्गदर्शन करीत होता व सत्य आणि असत्यामधील त्या प्रदीर्घ आणि जीवघेण्या संग्रामाच्या काळात एकन् एक मजल व एकन् एक टप्प्यावर याच ग्रंथाने, उच्चाटनाच्या पद्धती आणि रचनेच्या योजनाही सांगितल्या. असे असताना हे कसे शक्य आहे बरे की धर्म आणि अधर्मातील लढाईत आणि इस्लाम व अज्ञानात चाललेल्या धुमश्चक्रीच्या मैदानात आपण पायही ठेवू नये व त्या संघर्षाची एकही मजल सर करण्याचा आपणास योग घडू नये, तरीपण केवळ कुरआनाचे शब्द वाचून वाचून त्यातील सर्व हकीकती आपणासमोर उघड होतील. कुरआन तर आपण केवळ त्याचवेळी समजू शकतो जेव्हा आपण या ग्रंथाचा संदेश घेऊन उभे राहाल व ईश्वराकडे आवाहन करण्याचे कार्य सुरू कराल व ज्या ज्या प्रकारे कुरआन मार्गदर्शन करील त्या त्या प्रकारे आपण पावले पुढे टाकत जाल. तेव्हा कोठे ते सर्व अनुभव आपणासही घडतील जे कुरआन अवतरित होत असताना घडले होते. तेव्हाच कोठे मक्का, हब्श आणि ताईफच्या मजलाही आपण पाहाल आणि बद्र व उहदपासून ते हुनैन आणि तबूक पर्यंतचे सर्व टप्पेही आपणासमोर येतील. तेव्हाच कोठे अबूजहल आणि अबूलहबशीही आपली गाठ पडेल, दांभिक व यहूदीही आपणास भेटतील. तिकेच नव्हे तर प्रारंभीच्या अग्रेसर (साबिकीने अव्वलीन) लोकांपासून ते उपकाराने ज्यांची मने जिंकली जायची ते 'मुअल्लिफतल कुलूब' पर्यंत असे सर्वच प्रकारचे मानवी नमुने आपणास पहावयासही मिळतील व त्यांची अनुभूतीही आपणास येईल. ही तर एका आगळ्याच प्रकारची साधना (सुलूक) असून हिला मी कुरआनी साधना असे म्हणतो. सदरहू साधनेचे वैभव असे की हिच्या ज्या ज्या मजलांवरून आपण जाल, कुरआनातील काही आयती व सूरती स्वत:समोर येऊन आपणास सांगत जातील की, त्या याच मजलीवर अवतरित झाल्या होत्या व हे मार्गदर्शन घेऊन आल्या होत्या. अशा अवस्थेत हे तर शक्य आहे की शब्दार्थ, व्याकरण आणि वर्णनातील काही मुद्दे अशा 'साधका'च्या दृष्टीपासून लपून राहावेत. परंतु कुरआनाने आपला आत्मा त्याच्यासमोर उघड करण्यात कंजूषपणा दाखवावा हे शक्यच नाही.

त्याचप्रमाणे या व्यापक नियमानुसार कुरआनाच्या आज्ञा, त्याची नैतिक शिकवण, त्याचे आर्थिक व सांस्कृतिक आदेश आणि जीवनाच्या विभिन्न पैलूंसंबंधी त्याने सांगितलेले नियम व कायदे माणसाला तोपर्यंत चांगल्या प्रकारे समजूच शकत नाहीत जोपर्यंत त्यांना तो प्रत्यक्ष व्यवहारात आणीत नाही. कुरआन अशा व्यक्तीलाही समजू शकत नाही जिने स्वत:च्या व्यक्तिगत जीवनाला कुरआनाला अनुसरण्यापासून



मुक्त ठेवलेले असेल तसेच ते राष्ट्रही कुरआनाला ओळखू शकत नाही ज्याच्या सर्वच सामूहिक संस्था या ग्रंथाने घालून दिलेल्या पायंड्याविरूद्ध चालत असाव्यात.

---------------------------------

कुरआनाचा असा दावा की तो अखिल मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी आलेला आहे, लहान व थोर सर्वांनाच माहीत आहे. परंतु जेव्हा एखादा मनुष्य त्यास वाचू लागतो तेव्हा तो पाहतो की त्याच्या बोलण्याचा अधिकतर रोख त्याच्या अवतरणकाळातील अरबवासीयांकडे आहे. अधूनमधून जरी मानवजातीला आणि सामान्यजनांनाही तो हाक देत असला तरीपण बव्हंशी गोष्टी त्यात अशाच सांगितलेल्या आहेत ज्यांचा संबंध अरब लोकांच्या आवडीशी, त्यांच्याच वातावरणाशी, अरब लोकांहच्याच इतिहासाशी व त्यांच्याच रूढी-परंपरांशी निगडित आहे. अशा गोष्टींना पाहून माणसाला विचार पडतो की जी गोष्ट सर्व मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी अवतरित झाली होती तिच्यात तत्कालीन स्वरूपाच्या, प्रादेशिक स्वरूपाच्या आणि अरब लोकांच्या संबंधीच्या गोष्टी मोठ्या प्रमाणात का आहेत? या मामल्याची वस्तुस्थिती समजून न घेतल्यामुळे काही लोक अशा शंकेत गुरफटतात की कदाचित ही वस्तू मुळात तर तिच्या समकालीन अरबवासींच्या सुधारणेसाठीच होती. परंतु कालांतराने ओढूनताणून जबरदस्तीनेच तिला सर्व मानवांसाठी व नेहमीसाठी मार्गदर्शक ग्रंथ म्हणून ठरवून घेतलेले आहे.

जो इसम वरील आक्षेप, केवळ आक्षेप म्हणून आक्षेप घेत नसेल आणि खरोखरीच कुरआन समजून घेऊ इच्छित असेल तर त्याला मी असा सल्ला देईन की प्रथम त्याने स्वत: कुरआनाचे वाचन करून जरा अशा ठिकाणावर खूण करावी जेथे कुरआनाने एखादी अशी श्रद्धा अथवा असे मत व अशी कल्पना प्रस्तु केली असावी किंवा एखादे असे नैतिक नियम किंवा अशी व्यावहारिक पद्धत आणि असा कायदा सांगितला असावा जो केवळ अरबस्तानासाठीच विशिष्ट असावा व खरोखरीच वेळ व काळ आणि स्थानाने ज्याला मर्यादित करून टाकले असावे. केवळ ही गोष्ट की कुरआन एका विशिष्ट स्थानाच्या व काळाच्या लोकांना संबोधून त्यांच्या अनेकेश्वरवादी श्रद्धांचे व रूढींचे खंडन करतो व त्याच लोकांच्या सभोवतालच्या वस्तूंना युक्तिवादाची साधने बनवून त्यांना एकेश्वरवादाचे पुरावे व प्रमाण ठरवितो, असा निष्कर्ष काढण्यासाठी पुरेशी ठरत नाही की कुरआनाचे आवाहन व त्याची हाकही तत्कालिन व स्थानिक स्वरूपाची आहे. पहायला तर असे हवे की अनेकेश्वरवादाचे खंडन करताना कुरआन जे काही सांगतो, काय ते जगातील सर्वच

अनेकेश्वरवादींवर त्याच प्रकारे लागू होत नाही ज्याप्रकारे अरब अनेकेश्वरवाद्यांच्या बहुदेववादावर ते लागू होत होते? काय तेच युक्तिवाद आम्ही प्रत्येक कालखंडातील व प्रत्येक देशातील अनेकेश्वरवादींच्या वैचारिक सुधारणेसाठी उपयोगात अणू शकत नाही? तसेच, काय एकेश्वरवाद सिद्ध करण्यासाठी कुरआनाच्या युक्तिवाद पद्धतीत किंचितसे फेरफार करून तेच युक्तिवाद प्रत्येक वेळी व प्रत्येक ठिकाणी उपयोगात आणले जाऊ शकत नाही? ज्याअर्थी उत्तरे होकारात्मक आहेत त्याअर्थी एका सार्वभौम शिकवणीत केवळ यासाठी तत्कालिन व स्थानिक स्वरूपाची ठरविण्याचे काहीच कारण नाही की ती एका विशिष्ट वेळी, एका विशिष्ट राष्ट्राला संबोधून प्रस्तुत केलेली होती. जगातील कोणतेही तत्त्वज्ञान व कोणतींीह जीवनपद्धती आणिकोणतीही विचारशाला अशी नाही ज्यातील सर्व गोष्टी सुरवातीपासून ते शेवटपर्यंत संबंधरहित पृथरभूत (ँएऊँण्ऊ) वर्णनशैलीत प्रस्तुत केलेल्या नसाव्यात. अशाप्रकारची पूर्णपणे पृथरभूत व संबंधरहित शिकवण प्रथम तर शक्यच नाही; आणि ती शक्य झाली तरी जी गोष्ट अशा पद्धतीने प्रस्तुत केली जाईल ती केवळ कागदी पृष्ठावरच राहील. माणसांच्या जीवनात भिनली जाऊन एका व्यवहार्य व्यवस्थेत तिचे रूपांतर अशक्य आहे.

तसेच एखाद्या वैचारिक, नैतिक आणि सामाजिक चळवळीला जर आंतरराष्ट्रीय स्तरावर पसरविण्याचा हेतू असेल तर त्यासाठीदेखील हे मुळीच आवश्यक नाही, किंबहुना उपयुक्तही ठरू शकत नाही, की प्रथमपासूनच तिला पूर्णपणे आंतरराष्ट्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न केला जावा. वास्तविकपणे याचीही योग्य व्यवहार्य पद्धत केवळ एकच आहे, ती अशी की ती चळवळ ज्या विचारांच्या व ज्या दृष्टिकोनाच्या व तत्त्वांच्या आधारे मानवी जीवनाची व्यवस्था उभारु इच्छित असेल त्या आधारांना सर्व शक्तिनिशी प्रथम खुद्द त्याच देशात प्रस्तुत केले पाहिजे जेथून तिचे आवाहन केले गेले असेल. तसेच त्याच लोकांच्या मनात त्या आधारांना रूजविले पाहिजे ज्यांच्या भाषेपासून व ज्यांच्या स्वभावापासून व ज्यांच्या आवडी व सवयी आणि ज्यांच्या वैशिष्ट्यांपासून चळवळीचे नेते चांगल्याप्रकारे परिचित असतील. नंतर मग स्वदेशातच त्या तत्त्वांना प्रत्यक्ष व्यवहारात आणून व त्यांच्या आधारे एक यशस्वी जीवन व्यवस्था चालवून जगासमोर तिचा एक आदर्श प्रस्तुत केला पाहिजे. तेव्हाच कोठे इतर राष्ट्रांचे त्या आवाहनाकडे लक्ष वेधले जाईल व त्यांची शहाणी व बुद्धिमान माणसे स्वत: पुढे येऊन त्या आवाहनाला समजून घेण्याचा व त्यांच्या देशातही ते प्रचलित करण्याचा प्रयत्न करतील. म्हणून केवळ इतकी गोष्ट की एखाद्या विचार व



आचार व्यवस्थेला प्रथमत: एकाच राष्ट्रासमोर प्रस्तुत केले गेले होते आणि त्याच राष्ट्राला ती समजविण्यासाठी व संतुष्ट करण्यासाठी युक्तिवादांचे सर्व बल खर्च केले गेले होते; या गोष्टीचे प्रमाण ठरू शकत नाही की ती 'विचार व आचार व्यवस्था' केवळ जातीय स्वरूपाची आहे. प्रत्यक्षात जी वैशिष्ट्ये एखाद्या राष्ट्रीय व्यवस्थेला एखाद्या आंतरराष्ट्रीय व्यवस्थेपासून आणि एखाद्या तात्कालिक स्वरूपाच्या व्यवस्थेला एखाद्या कायमस्वरूपी व्यवस्थेपासून वेगळी ठरवितात ही वैशिष्ट्ये अशी की राष्ट्रीय अथवा जातीय व्यवस्था एखाद्या राष्ट्राच्या अथवा जातीच्या वर्चस्वाचा व त्याच्या विशिष्ट हक्कांचा दावा सांगणारी असते. किंवा ती व्यवस्था काही अशी तत्त्वे व अशा कल्पना बाळगणारी असते ज्या इतर राष्ट्रात व जातीत चालू शकत नाहीत. याउलट जी व्यवस्था आंतरराष्ट्रीय स्वरूपाची असते ती सर्व माणसांना समान दर्जा आणि समान हक्क व अधिकार देण्यास तयार असते व तिच्या तत्त्वांतही सार्वभौमत्व आढळते. त्याचप्रमाणे तात्कालिक स्वरूपाची एखादी व्यवस्था आवर्जून अशा काही तत्त्वांवर आपला पाया उभारते जे कालांतराने पूर्णपणे अव्यवहार्य बनतात तर याच्या अगदी उलट एखाद्या कायमस्वरूपी व्यवस्थेची तत्त्वे व नियम बदलत चाललेल्या सर्व परिस्थितींना लागू पडत असतात. ही वैशिष्ट्ये दृष्टीसमोर ठेवून कुणा एखाद्याने तरी स्वत: कुरआनाचे वाचन करावे व जरा अशा गोष्टी निश्चित करण्याचा प्रयत्न करावा ज्यांच्या आधारे खरोखरी अशी कल्पना करता येऊ शकावी की कुरआनाने प्रस्तुत केलेली व्यवस्था तात्कालिक आणि जातीय स्वरूपाची आहे.

---

कुरआनासंबंधी सामान्य वाचकाच्या ऐकीवात ही गोष्टही आलेली असते की तो एक सविस्तर आदेशपत्र व घटनापत्र आहे. परंतु जेव्हा तो कुरआनाचे वाचन करू लागतो तेव्हा त्या सामाजिक व सांस्कृतिक आणि राजकीय व आर्थिक इ. बाबींसंबंधी सविस्तर आज्ञा व कायदे त्याला आढळत नाहीत. किंबहुना नमाज आणि जकातसारख्या उपासनाविधी व कर्तव्यासंबंधीदेखील, ज्यासंबंधी मोठ्या प्रमाणात आणि वरचेवर कुरआनात भर दिलेला आहे, त्यात असा कोणताही कायदा योजलेला दिसत नाही, ज्यात सर्व आवश्यक आज्ञांचा तपशील नमूद असावा. ही गोष्टदेखील माणसाच्या मनात गोंधळ निर्माण करते की कोणत्या अर्थाने कुरआन आदेशपत्र आहे बरे?

या बाबतीत सर्व गोंधळ केवळ यामुळे निर्माण होतो की वस्तुस्थितीचा एक पैलू पूर्णपणे माणसाच्या दृष्टिआड राहतो. म्हणजे असे की ईश्वराने केवळ ग्रंथच अवतरित

केला होता असे नाही तर त्यासह त्याने एका प्रेषिताचीही नियुक्ती केली होती. परंतु जर मूळ योजना केवळ इतकीच असती की फक्त बांधकामाचा एक नकाशा लोकांना देऊन टाकला जावा व त्यानुसार लोकांनी स्वत:च इमारत बांधून घ्यावी तर अशा परिस्थितीत खचितच बांधकामाच्या एकन् एक गोष्टीचा तपशील आम्हाला तेथे मिळाला पाहिजे. परंतु जेव्हा बांधकामाच्या सूचना व आदेशाबरोबरच शासकीय रीतीने एका अभियंत्याचीही नियुक्ती झाली असेल व त्या अभियंत्याने आदेशानुसार एक इमारतही बांधून उभी केली असेल तेव्हा त्या अभियंत्याकडे व त्याने उभ्या केलेल्या इमारतीकडे पूर्णपणे दुर्लक्ष करून केवळ नकाशातच सर्व लहानसहान बाबींचा तपशील शोधणे व ते न आढळल्याने नकाशाच्या अपूर्णतेची तक्रार करणे चुकीचे आहे. कुरआन जुजबी गोष्टींचा ग्रंथ नाही तर तत्त्वांचा आणि व्यापक नियमांचा ग्रंथ आहे. त्याचे मूळ कार्य असे की इस्लामी व्यवस्थेच्या वैचारिक व नैतिक मूलतत्त्वांना अत्यंत खुलासेवार केवळ प्रस्तुतच करावे असे नाही तर बौद्धिक युक्तिवाद आणि भावनात्मक आवाहन दोन्हींच्या सहाय्याने त्यांना भक्कमही करावे. आता उरले इस्लामी जीवनाचे व्यावहारिक रूप, तर या मामल्यात कुरआन माणसाचे मार्गदर्शन अशा पद्धतीने करीत नाही की जीवनाच्या प्रत्येक पैलूसंबंधी सविस्तर कायदे व कानून सांगावेत, तर जीवनाच्या प्रत्येक क्षेत्राच्या चतु:सीमा कुरआन दाखवितो आणि काही कोपऱ्यांवर ठळकपणे खूणशीला उभ्या करतो. त्यामुळे ही गोष्ट निश्चित होते की सर्वोच्च अल्लाहच्या इच्छेनुसार ह्या क्षेत्रांची रचना व उभारणी कोणत्या रूपरेषेवर झाली पाहिजे. अशा आदेशानुसार इस्लामी जीवनाला प्रत्यक्ष मूर्त स्वरूप देणे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे काम होते. त्यांना यासाठीच नियुक्त केलेले होते की त्या व्यक्तिगत चारित्र्य व आचरणाचा आणि त्या समाजाचा व राज्याचा नमुना त्यांनी जगाला दाखवावा जो कुरआनाने सांगितलेल्या तत्त्वांचे मूर्त रूप आणि व्यावहारिक विवरण आहे.

---------------------------------

सर्वसाधारणपणे लोकांच्या मनात उद्भवणारा आणखी एक प्रश्न असा की एकीकडे तर कुरआन अशा लोकांची अत्यंत निर्भर्त्सना करतो जे ईश्वरी ग्रंथाच्या आगमनानंतर मतभिन्नता आणि गटबाजीला बळी पडतात, आणि स्वधर्माला भग्न करून टाकतात. तर दुसरीकडे कुरआनाच्या आदेशांचे अर्थ लावण्यात व त्यांचे भाष्य करण्यात, केवळ नंतरच्या पिढीतीलच नव्हे तर खुद्द सहाबा (रजि.), त्यांचे शिष्यगण आणि इमामांच्या दरम्यानही इतके मतभेद आढळतात की कदाचित अशी एकही



आदेशात्मक आयत सापडणार नाही जिचे एकच भाष्य सर्वसंमत असावे. काय असे सर्व लोकही त्या निर्भर्त्सनेला पात्र आहेत जी कुरआनात सांगितलेली आहे? जर तसे नसेल तर मग ती कोणती गटबाजी आणि मतभिन्नता आहे जिची कुरआनात मनाई आलेली आहे?

हा अत्यंत व्यापक आणि सविस्तर चर्चेचा प्रश्न आहे. त्यावर सविस्तर चर्चा करण्यासाठी येथे वाव नाही. याठिकाणी कुरआनाच्या एका सामान्य विद्यार्थ्यासमोरील गुंता सोडविण्यासाठी केवळ इतका संकेत पुरेसा आहे की कुरआन अशा प्रकारच्या निरोगी मतभेदाच्याविरूद्ध नाही जो धर्माशी एकमत साधून व इस्लामच्या सामूहिक व्यवस्थेशी एकात्म राहून केवळ आज्ञा व नियमांच्या अर्थनिश्चितीत संशोधनाच्या आधारे व शुद्ध मनाने व्यक्त केला जात असेल. याउलट कुरआन तर अशा मतभिन्नतेची निर्भर्त्सना करतो जिचा प्रारंभ अहंकार व स्वार्थ आणि वक्रदृष्टीने होत असावा व गटबाजी आणि परस्परातील भांडणात जिची परिणती निघत असावी. असे दोन्ही प्रकारचे मतभेद त्यांच्या वास्तवतेच्या दृष्टीनेही समान नाहीत आणि निघणाऱ्या परिणामांच्या दृष्टीनेदेखील परस्पराशी सादृश्य नाहीत, की दोन्ही प्रकारांना एकाच काठीने हाकले जावे. त्यापैकी पहिल्या प्रकारचा मतभेद तर प्रगतीचे प्राण आणि जीवनाचा आत्मा आहे. असा मतभेद अशा प्रत्येक समाजात आढळेल ज्यात विचारी आणि बुद्धिवंत लोकांचा समावेश असेल. अशा प्रकारच्या मतभेदाचे अस्तित्व जिवंतपणाचे लक्षण आहे. तर अशा मतभेदाचा पूर्णपणे अभाव केवळ अशाच समाजात असू शकतो जो बुद्धिवंत माणसांनी नव्हे तर केवळ लाकडी ठोकळ्यांनी बनलेला असावा. उरला दुसऱ्या प्रकारचा मतभेद, तर सर्व जगाला ही गोष्ट माहीत आहे की ज्या समूहातही तो उद्‌भवला आहे, त्या समाजाला त्याने अस्ताव्यस्त करून सोडलेले आहे. अशा मतभेदांचे प्रकट होणे निरोगाचे नव्हे तर रोगाचे लक्षण आहे. त्यांच्यापासून निघणारे परिणाम कोणत्याही राष्ट्रासाठी कदापि लाभदायी ठरू शकत नाहीत. वर उल्लेखित दोन्ही प्रकारच्या मतभेदांमधील स्पष्टपणे आढळणारा फरक अशाप्रकारे समजा की,

एका प्रकारची स्थिती तर ती आहे जिच्यात ईश्वर आणि पैगंबरांच्या आज्ञापालनात जमातीच्या सर्व लोकांचे एकमत असावे. आज्ञा व नियम काढण्याचे स्थानही एकमताने कुरआन आणि सुन्ना हेच मानले जात असावे. तद्‌नंतरमग दोन धर्मपंडितांनी एखाद्या जुजबी स्वरूपाच्या समस्येच्या संशोधनात, अथवा दोन काजींनी-न्यायाधीशांनी एखाद्या खटल्याच्या निकालात एकमेकाशी मतभेद

दर्शवावा. तरीपण त्या उभयतांपैकी एकानेही त्या जुजबी प्रश्नाला व त्यासंबंधीच्या आपल्या मताला धर्माची मदारही ठरवू नये व त्याच्याशी भिन्न मत असणाऱ्याला धर्मबाह्यही ठरवू नये. किंबहुना त्या उभयतांनी आपापले पुरावे सादर करून आपापल्यापरीने संशोधनाची कर्तव्यपूर्तता करावी आणि ही गोष्ट लोकमतावर सोडावी किंवा ती न्यायालयीन समस्या असली तर देशाच्या सर्वोच्च न्यायालयावर सोपवावी किंवा ती सामूहिक बाब असली तर सामूहिक व्यवस्थेवर ती सोडावी की त्यांनी दोन्ही मतांपैकी इच्छा असेल त्याचा स्वीकार करावा किंवा दोन्हीही मतांना योग्य मानावे.

दुसरी स्थिती अशी की मुळापासून धर्माच्या मूलभूत गोष्टीतच मतभेद दर्शविला जावा. अथवा अशी की एखाद्या धर्मपंडिताने किंवा सूफी अथवा मुफ्ती (शास्त्री) अथवा मीमांसकाने किंवा एखाद्या नेत्याने एखाद्या अशा समस्येसंबंधी, जिला ईश्वराने व पैगंबरांनी धर्माची मौलिक समस्या म्हणून ठरविली नव्हती, एखादे मत स्वीकारावे आणि विनाकारणच ओढून ताणून तिला धर्माची मौलिक बाब ठरवावी, नंतर मग त्याच्याशी जो मतभेद करील त्याला धर्मबाह्य आणि बहिष्कृत ठरवावे. तसेच आपल्या समर्थकांचा एक जथा बनवून त्याने सांगावे की खरी मुस्लिम उम्मत केवळ त्यांचाच जथा असून उरलेले सर्व नरकवासी आहेत. आणि जाहीर आवाहन करावे की जो मुस्लिम असेल त्याने आमच्या या जथ्यात यावे अन्यथा तो मुस्लिम नाहीच.

कुरआनाने जेथे कोठे मतभेदाचा आणि गटबाजीचा विरोध केला आहे, त्या विरोधाने त्याला ह्या दुसऱ्या प्रकारचा मतभेदच अभिप्रेत आहे. उरला पहिल्या प्रकारचा मतभेद, तर त्याचे उदाहरण खुद्द पैगंबर (स.) यांच्यासमोर घडले होते. व पैगंबर (स.) यांनी केवळ इतकेच नव्हे की त्याला वैध ठरविले होते तर त्याची प्रशंसाही केली होती. कारण असे की तो मतभेद तर या गोष्टीचे लक्षण होते की समाजात विचार व चिंतन, जिज्ञासा व संशोधन आणि बोध व व्यासंगाच्या क्षमता आहेत. तसेच या गोष्टीचेही लक्षण होते की समाजातील बुद्धिवंत लोकांना त्यांच्या धर्मात व त्यातील आदेश व नियमात रस आहेत. तसेच आपल्या जीवनाच्या समस्येवरील उपाय धर्माच्या बाहेर नव्हे तर धर्मातच शोधण्याची त्यांची वृत्ती आहे, तसेच एकंदरीतपणे समाज या सुवर्ण कायद्याचे पालन करणारा आहे की तत्त्वांशी एकमत राहून आपली एकात्मता अबाधित ठेवावी व मग ज्ञानी व विचारवंत लोकांना योग्य मर्यादेच्या आत संशोधनाची व इज्तिहाद (संशोधनपर निष्कर्ष) चे स्वातंत्र्य देऊन उन्नतीचे दारही खुले ठेवावे.

---



# काही प्रमुख पारिभाषिक शब्द

प्रत्येक धार्मिक ग्रंथाप्रमाणे प्रबुद्ध कुरआनाचीदेखील एक विशिष्ट भाषा आहे व त्याचे काही विशिष्ट पारिभाषिक शब्द आहेत. दिव्य कुरआनाचे आवाहन व त्याची शिकवण समजून घेण्यासंबंधाने त्यांना निर्णायक महत्व प्राप्त आहे. जर कुणाला थोडे देखील कुरआन समजत नसेल तर त्याने कुरआनातील पारिभाषिक शब्दांच्या अर्थांची अगोदरच माहिती करून घ्यावी. पवित्र कुरआनचा परिचयदेखील या गोष्टीवर अवलंबून आहे की कमीत कमी त्यातील महत्वाच्या व ठळक अशा पारिभाषिक शब्दांचा तरी आवश्यक प्रमाणात खुलासा सांगितला जावा.

**अल्लाह :** दिव्य कुरआनातील सर्वाधिक महत्वाचा आणि मौलिक स्वरूपाचा पारिभाषिक शब्द म्हणजे 'अल्लाह' होय. म्हणून सर्वप्रथम त्याचाच अर्थ समजून घेतला पाहिजे. अरबी भाषेतील 'अल्लाह' हा शब्द वास्तविकपणे 'अलइलाह' असा होता; परंतु ज्या शब्दाचा वापर मोठ्या प्रमाणात होत असेल व ज्याचा उच्चार तोंडातून वरचेवर केला जात असेल तो जास्तीत जास्त सोपा असावा आणि सुलभतेने तोंडातून काढता यावा अशी अरब लोकांच्या भाषिक रसिकतेची वांछना असे. म्हणून आपल्या भाषिक नियमानुसार त्यांनी 'अलइलाह' या शब्दाला 'अल्लाह' असे रूप दिले. 'अलइलाह' याच्यात 'इलाह' हा मूळ शब्द आहे, व ईश्वर व उपास्य असा त्याचा अर्थ होतो. त्यातील 'अल' हे इंग्रजी भाषेतील The प्रमाणे सामान्यनामाला विशेषनाम बनविण्यासाठी उपपद म्हणून आहे. दिव्य कुरआन उतरण्यापूर्वी अरब लोक 'अल्लाह' त्या विशिष्ट अस्तित्वाला म्हणत असत ज्याच्यासंबंधी त्यांची श्रद्धा होती की तो परमोच्च गुणांनी संपन्न आहे. त्याची वास्तवता व त्याच्या महानतेचे ज्ञान संपादन करण्याला मानवी बुद्धी असमर्थ ठरते, त्याचे अस्तित्व आणि त्याच्या गुणांवर विचार व चिंतनाचा परिणाम, शेवटी आश्चर्यचकित होण्याशिवाय इतर काहीच निघत नाही, तो इतर सर्वांचे आशास्थान व आश्रयस्थान आहे, प्रिय आणि साध्य म्हणून आहे, गरजा भागविणारा, सत्ताधीश आहे, वैभवशाली आहे, पंचेंद्रियांच्या आवाक्याबाहेरचा आहे. याच्याशिवाय इतर सर्व परमोच्च गुण उदा. सर्जन, पालकत्व आणि स्वामित्व अन्नदान व शासन इ. देखील त्याच्याच अधिकारात आहेत. अशा गुणांनी संपन्न असल्याकारणाने तो पूजनीय आहे म्हणून त्याच्या प्रकोपाची भिती बाळगली पाहिजे. असा होता अरब लोकांजवळ 'अल्लाह' या पारिभाषिक शब्दाचा अर्थ, परंतु जेव्हा कुरआन उतरला तेव्हा त्याचे प्रथम संबोधक हेच अरब असल्याकारणाने त्याची भाषाही अरबीच राहिली व त्याला जे काही सांगावयाचे होते

याच भाषेतील शब्दात आणि वाक्यप्रचारात सांगावयाचे होते. म्हणून स्वाभाविकपणे, त्यानेही सृष्टीच्या निर्माणकर्त्याला व पालनकर्त्याला; 'अल्लाह' याच नावाने संबोधिले, जे नाव अरबलोकांत प्रचलित होते. परंतु हा पारिभाषिक शब्द अगदी त्याच अर्थाने व त्याच कल्पनेनुसार जशी अरब लोकांची कल्पना होती, कुरआनने घेतला नाही तर काही महत्वपूर्ण सुधारणा व मौलिक बदल करून घेतला. सर्वात महत्वाची सुधारणा व मौलिक बदल त्याने असा केला की ईशत्व आणि उपास्यत्वाच्या सर्व गुणांना केवळ अल्लाहसाठीच विशेष ठरविले, त्याने सांगितले की कुणा दुसऱ्या अस्तित्वात, मग तो कितीही महान का असू नये, उपास्यत्वाचा एकही गुण मौजूद नाही. म्हणून 'इलाह' म्हणा, 'अल् इलाह' म्हणा की 'अल्लाह' म्हणा, त्याच्याने अभिप्रेत प्रत्यक्षात केवळ तेच एक अस्तित्व असेल, त्याच एकमेव अस्तित्वासाठी हे शब्द उच्चारले जाऊ शकतात व उच्चारले गेले पाहिजेत. इतर कोणतेही अस्तित्व या नावाने पुकारले जाण्याच्या लायकीचे नाही. दुसरी मोठी सुधारणा कुरआनाने अशी केली की 'अल्लाह' या विशेष नावाशी अरब लोक जे गुण जोडत असत, व ते त्यांच्या दृष्टीने जरी परमोच्च सीमेला पोहचलेले होते, तरीपण कुरआनने त्यांना उणीवपूर्ण ठरवितांना फर्माविले की तुमच्या असमर्थ बुद्धीने उपास्यत्वाचे जे सर्वोच्च स्थान मानले आहे, वास्तविकपणे त्याच्यात बऱ्याचशा नीचताही आहेत. परमोच्च गुणासंबंधी तुमची कल्पना चुकीची आणि अपूर्ण आहे. 'अल्लाह'चे गुण अशा प्रकारचे आहेत व त्याचे स्थान असे आहे–

'अल्लाह'चे अस्तित्व कुरआनने ज्या गुणांनी संपन्न ठरविले आहे त्यांची संख्या मोठी आहे. थोडक्यात असे समजा की कोणताही चांगला गुण असा नाही जो त्याच्यात नसावा. त्यापैकी प्रमुख गुण असे,—

**(१)** तो आणि केवळ तोच निरंतर आहे व चिरंतर राहील. (सूरह बकरा, कसस)

**(२)** तो निराकार असून शारीरिकतेपासून पूर्णपणे पवित्र व उच्चतम आहे. (अनआम)

**(३)** तो कधी शारीरिक रूपही धारण करीत नाही, कोणत्याही वस्तूत प्रवेशही करीत नाही आणि कोणत्याही वस्तूशी एकरूपही होत नाही. (माईदा)

**(४)** प्रत्येक वस्तूचा सर्जनकर्ता आहे व सर्व विद्यमान सृष्टी त्याची निर्मिती आहे. (अनआम)

**(५)** तो कुणाचा पिताही नाही व पुत्रही नाही. (इखलास)



**(६)** सर्व सृष्टीचे शासनाधिकार प्रत्यक्षपणे त्याच्याच हातात आहे. (यासीन)

**(७)** आकाशापासून ते पृथ्वीपर्यंत विद्यमान सर्व विश्वाची व्यवस्था तोच चालवितो. (सजदा)

**(८)** सर्वांचा अन्नदाता व पालनकर्ता आहे. (साफ्फात)

**(९)** जीवन व मृत्यू दोन्हींचा निर्माणकर्ता आहे. (मुल्क)

**(१०)** सर्वांसाठी अभय व आश्रयस्थान आहे. (हश्र)

**(११)** गुप्त व उघड गतकालीन व भावी सर्व काही जाणतो. (बकरा, हश्र)

**(१२)** सर्वकाही ऐकतो. (अनआम)

**(१३)** प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. (बकरा)

**(१४)** सर्वांवर प्रभुत्व राखणारा आहे, कोणी त्याच्या निर्णयाला व हुकूमाला आव्हान देऊ शकत नाही. (हश्र)

**(१५)** बुद्धिमान आहे, त्याचे कोणतेही काम बुद्धिमत्तारहित व हेतूरहित असत नाही. (सबा)

**(१६)** मोठा कृपाळू व दयावान आहे. (फातिहा)

**(१७)** प्रेम व मेहेरबानी त्याचा बाणा आहे. (बकरा) त्याची कृपा व मेहेरबानी कणाकणाला व्याप्त आहे. (आअराफ) न्यायी आहे, लोकांशी न्यायपूर्ण वर्तन करतो. (यूनुस) कोणावर तिळमात्रही जुलूम करीत नाही. (काफ) त्याचे फर्मान व आदेश सर्वचे सर्व न्यायपूर्ण असतात. (अनआम)

**(१८)** अवज्ञाकारी व शिरजोरांवर सूड उगविणारा आहे. (आलिइम्रान)

**(१९)** क्षमायाचना करणाऱ्यांना माफी देत असतो. (बुरुज) अत्यंत तौबा-पश्चात्ताप स्वीकारणारा आहे. (नस्र)

**(२०)** सत्कर्माची मोठी कदर करणारा आहे. (तग़ाबुन)

**(२१)** त्याचा इरादा पूर्ण झाल्याशिवाय राहात नाही. (बकरा)

**(२२)** बोलणारा आहे आणि संभाषण करतो. (बकरा)

**(२३)** जे इच्छितो ते करतो. (आलिइम्रान) आणि जे काही इच्छितो तेच केवळ अस्तित्वात येऊ शकते इथपावेतो की त्याच्या मनोरथाविना स्वत: होऊन कोणी काही इच्छाही करू शकत नाही. (दहर)

**(२४)** निरपेक्ष आहे, प्रत्येक गोष्टीपासून निरपेक्ष आहे, त्याला कोणत्याही गोष्टीची गरज नाही. (फातिर)

**(२५)** स्वयंमेवस्तुत्य आणि स्तुत्य गुणसंपन्न आहे. (हूद)

**(२६)** प्रत्येक उणीवपासून अलिप्त व प्रत्येक परमोच्च गुणाने संपन्न आहे, ईशत्वाच्या वैभवाला साजेशी नसेल अशी कोणतीही गोष्ट त्याच्यात नाही. (हश्र)

**(२७)** तो सर्वंकषपणे अनुपम आहे. त्याला कोणत्याही गोष्टीने उपमाही दिली जाऊ शकत नाही. (शूरा) पृथ्वी व आकाशातील कोणत्याही गोष्टीने त्याचा अनुमान केला जाऊ शकत नाही. (रूम)

**(२८)** उपास्य केवळ तोच आहे. (बकरा) संपूर्ण सृष्टीत केवळ त्याचाच अंमल आहे, (जासिया) व त्याच्याशिवाय कोणीच नाही ज्यात या ईशत्वाचा व महानतेचा अंशमात्रही आढळावा, सर्वचे सर्व पूर्णपणे विवश व आज्ञांकित आहेत व त्याचेच दास आहेत. (रूम) शिवाय असेही नाही की तो आपल्या या दासांपैकी व गुलामांपैकी कुणाला जवळिकीचा बहुमान देऊन आपल्या शासनात सहभागी करीत असावा. (कहफ)

अल्लाहचे अस्तित्व आणि त्याच्या गुणवैशिष्ट्यासंबंधी वरील स्पष्टिकरणानंतर या प्रश्नासंबंधी आणखीन काही गोष्टी आहेत त्या माहीत असणे आवश्यक आहे.

**(१)** पहिली गोष्ट तर अशी की जेथपावेतो 'अल्लाह'च्या अस्तित्वाचा संबंध आहे, त्याच्या वास्तवतेचा ठाव घेणे मानवी विचारशक्तीला शक्य नाही. म्हणून अल्लाहला केवळ त्याच्या त्या गुणांद्वारेच ओळखले जाऊ शकते ज्यांच्या तेजोवलयांनी हे संपूर्ण सृष्टिजीवन भारले आहे. या ठिकाणी जे काही आहे ते सर्वचे सर्व त्याच्याच कोणत्या न कोणत्या गुणाचेच प्रदर्शन आहे. याच कारणाने पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला आहे, ''अल्लाहच्या निर्मितीवर विचार व चिंतन करीत रहा, परंतु खुद्द त्याच्या अस्तित्वासंबंधी तसे प्रयत्न करू नका.'' ईश्वरी अस्तित्वाची वास्तवता मानवी दृष्टीच्या व विचारशक्तीच्या बाहेरची आहे हे एक उघड सत्य आहे. म्हणून मानवाच्या वैचारिक कुवती व त्याच्या क्षमतेची ज्या माणसाला खरी कल्पना असेल त्यापासून ही गोष्ट लपून राहू शकत नाही की 'अल्लाह'चे अस्तित्व तर फार मोठी गोष्ट आहे. निर्मितीपैकी अगदी सामान्यातील सामान्य गोष्टीची स्थिती अशी आहे की आमचे ज्ञान तिच्या गुणापर्यंतच पोहचून थांबते; त्याच्या अस्तित्वाची काय हकीकत आहे ही गोष्ट बव्हंशी आमच्यासाठी एक रहस्यच राहते. मग त्या अस्तित्वाचा ठाव घेणे आमच्यासाठी कसे शक्य आहे जे इतर सर्व निर्मितीपासून मूलत:च वेगळे आहे, जे



सर्वंकषपणे अनुपम आहे, ज्याला इतर कोणत्याही वस्तूशी कसलीही सादृश्यता नाही, जो निर्माता आहे व त्याच्या व्यतिरिक्त इतर प्रत्येक निर्मिती आहे, जे अस्तित्व स्वयंभू आहे जेव्हा की इतर प्रत्येक वस्तू ऱ्हास पावणारी आहे नश्वर आहे, ज्याचा प्रत्येक गुण परमोच्च बिंदूला पोहचलेला आणि अनादी व अनश्वर आहे, जेव्हा की या चिंतनाच्या कक्षेत जर कोणती गोष्ट येऊ शकते तर ती सर्वोच्च अल्लाहच्या केवळ गुणांचे ज्ञान होय. त्याच्या अस्तित्वाच्या वास्तवतेचा ठाव घेणे बौद्धिक दृष्टीने केवळ अशक्य गोष्ट आहे, म्हणून महान कुरआनने आपला संवाद केवळ गुणांच्या चर्चेपुरताच मर्यादित ठेवला आहे.

**(२)** या अत्यंत महत्वाच्या प्रश्नासंबंधी लक्षात ठेवण्यासाठी दुसरी गोष्ट अशी की परमोच्च गुणांची ही मोठी संख्या, अस्तित्वाची अनेकता दर्शविणारी आहे असे कदापि नाही, (जसे की काही धर्माच्या अनुयायांनी कल्पना करून घेतली आहे) किंबहुना हे गुण व या शक्ती, सर्वच्या सर्व त्याच एका अस्तित्वात, 'अल्लाह'त केंद्रित आहेत. म्हणून महान कुरआनने हे उघड सत्य असे फर्मावून सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट केले आहे की, ''हवे तर तुम्ही 'अल्लाह' म्हणून पुकारा, हवे तर 'रहमान' (मेहेरबान) म्हणून, जे कोणते चांगले नाव तुम्ही घ्याल तर (त्याच्याने अभिप्रेत अल्लाहचे अस्तित्वच असेल) कारण सर्व चांगली नावे त्याच्यासाठीच आहेत.'' (बनीइस्राईल) म्हणजे तुम्ही ईशत्वाचा जो गुण व ज्या शक्तीला दृष्टीसमोर ठेवून ईश अस्तित्वाचे ध्यान कराल, त्याच्याने अभिप्रेत नेहमी तेच एक अस्तित्व असेल ज्याचे नाव अल्लाह आहे. उदा. तुम्ही जर कृपा व मेहेरबानीची मनात कल्पना बाळगून 'रहमान' म्हणतात तर त्याच्याने अभिप्रेत दुसरे एखादे अस्तित्व असेल, आणि जर काही इतर गोष्टी आणि गुणाच्या दृष्टीने 'अल्लाह' असे म्हटले तर त्याच्याने अभिप्रेत अन्य एखादे अस्तित्व असेल, असे कदापि समजू नका. नि:संशय वस्तुस्थिती हीच आहे की, आमच्या दृष्टीसमोर असलेले हे जग, यात परस्परविरूद्ध प्रकारच्या घटना व प्रसंग घडत असतात, येथे कृपा व मेहेरबानीचा वर्षावही होत असतो, येथे आरोग्य व जीवनही आहे व आजार आणि मृत्यूही आहे, तेथे अभय व शांतीही आहे व गोंधळ व उपद्रवदेखील, परंतु याचा असा अर्थ खचितच नाही की या विभिन्न आणि परस्परविरुद्ध घटनांचे उगमस्थानही वेगवेगळे आहेत व निरनिराळ्या शक्तींचे स्वामी निरनिराळे अस्तित्व आहेत; जे त्यांना प्रकट रूप देत राहतात. याउलट वस्तुस्थिती अशी आहे की या सर्व घटना व प्रसंगांचे उगमस्थान केवळ एकमेव 'अल्लाह' आहे. या ठिकाणी जे काही घडत असते त्याच्याच आज्ञेने घडत असते. त्या सर्व शक्ती व ज्यांचे प्रकटरूप या घटना आहेत त्या सर्व त्याच एका अस्तित्वाचे विविध गुण आहेत व सर्वचे सर्व

त्याच्यातच केंद्रित आहेत. कोणतीही शक्ती स्वत:चे वेगळे व स्वतंत्र अस्तित्व बाळगत नाही व कोणताही गुण असा नाही ज्याचा स्वामी इतर अस्तित्व असावा.

**(३)** तिसरी गोष्ट अशी की हे गुण, ज्यांनी सर्वोच्च अल्लाहचे अस्तित्व संपन्न आहे, सर्वचे सर्व सौंदर्याचे व उत्तमतेचे गुण आहेत. सर्व तऱ्हेचे दोष व सर्व उणीवांपासून ते पूर्णपणे मुक्त आहेत. त्यापैकी एकालादेखील वाईटपणाचे गुण म्हटले जाऊ शकत नाही. म्हणून महान कुरआनने आपल्या जागी स्वत: या गोष्टीलादेखील की सर्वोच्च अल्लाह सर्व तऱ्हेच्या उणीवा व दोषविहित आहे, त्याचा एक स्वतंत्र गुण म्हणून सांगितला आहे. ''तो अल्लाह असा आहे ज्याच्याखेरीज कोणीही उपास्य नाही, (सकल जगांचा) सम्राट आहे व सर्व दोष व उणीवांपासून उच्च आणि पवित्र आहे. (प्रत्येक दोषापासून) अलिप्त आहे''. (हश्र) तसेच ही गोष्ट स्पष्ट सांगितली आहे, ''त्याच्यासाठीच आहेत सर्व उत्तम गुण''. (बनीइस्राईल). या बाबतीत जगात सातत्याने ज्या अप्रिय घटना आणि कटूप्रसंग घडत असतात; त्यामुळे काही गोंधळ वाटू नये. कारण हे प्रसंग केवळ तात्कालिक परिणाम आणि अगदी मर्यादित अर्थाने अप्रिय असतात. अंतिम आणि वास्तविक परिणाम तसेच व्यापक हेतूंच्या दृष्टीने व विस्तृत अर्थाने ते अप्रिय खचितच नसतात. अगदी त्याचप्रकारे ज्याप्रकारे रुग्णावर डॉक्टरकडून शस्त्रक्रिया होणे किंवा त्याच्या तोंडात कडू औषधे टाकणे, उद्यानातील झुडूपांची माळ्याकरवी छाटणी होणे, खुनी आणि द्रोहींना न्यायालयाकरवी फाशी दिली जाणे; अशा सर्वगोष्टी बाह्यत: अप्रिय असतानादेखील वास्तविकपणे अप्रिय कदापि असत नाहीत. म्हणून या जगात ज्याअर्थी रोगराई पसरत असते, दुष्काळ येतो, महापूर येतात, अत्याचारी दुष्ट आणि उपद्रवकारी लोकांना श्रीमंती व प्रतिष्ठेचा बहर येत असतो व सदाचारींना संकटांचे आघात सोसावे लागत असतात; त्याअर्थी या जगाचा स्वामी (अल्लाह वाचवो) गाफिल, विघटनप्रिय, बेमुर्वत, जुलमी, रक्तपिपासू, व्यर्थकारी, खेळकर आणि कदर न जाणणारा आहे, या गोष्टीचा हा पुरावा आहे असे मुळीच नाही. कारण अशा प्रकारच्या घटनांच्या बाह्य स्तरावर जो बिघाड दिसतो प्रत्यक्षात महानतम असा सुधार त्यात गर्भित असतो. वरवर दिसणारा बिघाड अधिक महत्वपूर्ण रचनेची नांदी असते. ही गोष्ट वेगळी की एकीकडे उपद्रव आणि विघटनाच्या स्वभावात कल्लोळ व गोंधळ असतो म्हणून त्याकडे आम्ही चटकन लक्ष देतो, उशिरापर्यंत टक लावून त्याकडे पहात असतो जेव्हा की सुधार व रचनेच्या स्वभावात शांतता, स्तब्धता असते व त्याकडे दृष्टी मुश्किलीनेच वळत असते. एखादे घर जेव्हा बांधले जात असते, त्यावेळी कसलाच आवाज ऐकू येत नाही परंतु जेव्हा ते कोसळते तेव्हा संपूर्ण वस्ती त्याच्या प्रचंड आवाजामुळे खळबळून उठते. दुसरीकडे



खुद्द मानवी स्वभावाचीदेखील स्थिती अशी आहे की तो प्रिय गोष्टीपेक्षा अप्रिय गोष्टीमुळे आणि सुखापेक्षा दु:खामुळे अधिक प्रभावित होत असतो. दहा गोष्टी जर त्याला आनंद मिळवून देणाऱ्या असतील व केवळ एकच गोष्ट दु:ख देणारी उद्‌भवली तर केवळ हीच एक गोष्ट त्याच्या मनाचा ताबा घेईल व त्या दहा गोष्टींचा त्याला जणूकाय विसरच पडेल. या दोन्ही वस्तुस्थितींचा स्वाभाविक परिणाम असा होतो की उथळ दृष्टीचा मनुष्य जगातील घटनांचे खरे स्वरूप समजण्यासाठी असमर्थ ठरतो. बाह्यात्कारी उपद्रव आणि बिघाड तर तो पाहून घेतो परंतु तळातील विधायक हेतू आणि खोल वैचारिकतेपर्यंत त्याची दृष्टी पोहचत नाही. एरवी या घटनांपैकी एकही घटना अशी असत नाही जिचा अंतिम हेतू सुधार आणि रचना नसावा. म्हणून सर्वोच्च अल्लाहचा तो गुणदेखील जो या घटनेला कारणीभूत असतो, अपरिहार्यपणे सौंदर्य आणि उत्तमतेचाच गुण असतो.

**(४)** चौथी गोष्ट अशी की या विविध गुणांच्या कृती व प्रभावात पूर्णपणे अनुकूलता आहे. यापैकी कोणताही गुण अशा प्रकारे कार्य करीत नाही की त्याचा परिणाम म्हणून एखाद्या दुसऱ्या गुणाच्या निकडी नाकारल्या जाव्यात. याउलट प्रत्येक गुणाच्या स्वत:च्या कार्यमर्यादा आहेत, त्या एका ठराविक सीमेपर्यंत, अर्थात समतोल सीमेपर्यंत पोहचतात, आणि आधिक्य व अतिरेकाची लक्षणे दिसताक्षणीच, आपली पुढील वाटचाल थांबवितात. उदा. 'कृपा' हा अल्लाहचा एक गुण आहे परंतु त्याचे परमकृपाळू व दयाळू असण्याचा अर्थ, सदाचारी व दुराचारी सर्वच त्याच्या क्षमेने उपकृत होतील व त्याच्या अवज्ञा करणाऱ्यांनादेखील तो शिक्षा करणार नाही, असा मुळीच नाही. कारण त्यामुळे तो न्यायी, बुद्धिमान आणि गुणग्राहक, काहीच म्हटला जाणार नाही. त्याचप्रमाणे 'स्वेच्छाधिपती' असणे असाही त्याचा एक गुण आहे, म्हणजे असे की तो जे इच्छितो ते करतो व जे इच्छितो केवळ तेच घडते परंतु याचा असा अर्थ खचितच नाही की मनुष्याचा स्वत:चा इरादा व त्याचे कृत्य काहीच नाही, अल्लाहच ज्याला इच्छितो व जेव्हा इच्छितो, कसलेही कारण व कोणत्याही पात्रतेविना सरळमार्गी व पुण्यशील बनवितो आणि ज्याला इच्छितो त्याला पथभ्रष्टता आणि दुराचाराच्या खाईत लोटून देतो, तसेच हवे त्याला तो क्षमा करील व हवे त्याला नरकात टाकून देईल, याकडे लक्ष न देता की कोणाचे कर्म जगात कसे राहिले आहेत, कारण अशा स्थितीत तर त्याचे बुद्धिमान आणि न्यायी व सत्य जाणणारा असण्याला काही अर्थच उरत नाही. म्हणून हीच वस्तुस्थिती होती जी ध्यानात बसविण्यासाठी महान कुरआनने, ''अल्लाह ज्यावर इच्छितो कृपादृष्टी करतो'', असे फर्माविल्यानंतर ''आणि अल्लाह सर्व काही जाणणारा व बुद्धिमान आहे'', असे प्रतिपादन करणे

जरुरीचे मानले. म्हणजे एखाद्या वेळेस असा समज होऊ नये की अल्लाहची इच्छा डोळे बंद करून निर्णय घेत असते, नव्हे; असे मुळीच नाही. तो जो काही निर्णय घेत असतो तो पूर्णपणे ज्ञान व माहितीच्या आधारे व सत्य आणि न्यायाला धरूनच घेत असतो, बुद्धिमत्ता आणि शहाणपणाची कोणतीही निकड विसरली जात नाही.

अशाप्रकारे महान कुरआन आपल्या या सर्वात महत्वाच्या आणि मौलिक पारिभाषिक शब्दाचा, अर्थात 'अल्लाह' या शब्दाचा वापर करतो तेव्हा, वरील संपूर्ण चर्चा वाचल्यानंतर मनात जी कल्पना येते तोच त्याचा अर्थ असतो. दुसऱ्या एखाद्या धर्मातील वा धार्मिक भाषेतील एखादा पारिभाषिक शब्द तंतोतंत या अर्थात मोडतो किंवा नाही, कोण जाणे? जर असेल तर 'अल्लाह'चे भाषांतर त्या शब्दात करण्यात काही हरकत नाही एरवी तसे करणे कोणत्याही प्रकारे योग्य ठरणार नाही हे उघड आहे.

**नबी आणि रसूल-प्रेषित :** कुरआनातील दुसरा अत्यंत महत्वाचा पारिभाषिक शब्द म्हणजे नबी आणि रसूल-प्रेषित होय. नबी व रसूल असा मनुष्य असतो ज्यावर सर्वोच्च अल्लाहचे मार्गदर्शन अवतरत असते जेणेकरून त्याने स्वत:देखील त्याचे अनुसरण करावे आणि अल्लाहच्या इतर दासांपर्यंतही ते पोहचवावे. नबी, अरबी भाषेत उंच जमिनीलादेखील म्हणतात आणि मार्गातील खुणेलाही. त्याचप्रमाणे 'रसूल'चा शाब्दिक अर्थ 'पाठविलेला' असा होतो. मग तो एखादा संदेश असो की दूत असो. अशा व्यक्तीला, जिच्यावर अल्लाहचे मार्गदर्शन उतरते, 'नबी' अशासाठी फर्माविले गेले आहे की आपल्या प्रतिष्ठेच्या दृष्टिने तो इतर सर्व माणसांपेक्षा उच्चही असतो व मानवजातीसाठी कल्याण व मुक्तीच्या सन्मार्गातील खूणही असतो. त्याचप्रमाणे त्याला 'रसूल' याकरिता सांगितले गेले आहे की तो सृष्टिसम्राटाकडून त्याच्या रयतेजवळ पाठविलेला संदेशवाहक आणि दूत म्हणून असतो, त्यांच्यापर्यंत तो त्याचे आदेश पोहचते करतो. 'नबी आणि रसूल'च्या व्यक्तीत्वासंबंधी महान कुरआनात खालीलप्रमाणे स्पष्टीकरण दिलेले आहे.

**१.** तो मनुष्य असतो, केवळ मनुष्य; अगदी आम्हा व तुम्हासारखा मनुष्य, म्हणूनच निरपवादपणे सर्वच प्रेषित स्वत:संबंधी "आम्ही तुमच्याप्रमाणेच मनुष्य आहोत", अत्यंत स्पष्ट शब्दात असे घोषित करीत राहिले आहेत. शिवाय मनुष्यजातीपैकीदेखील केवळ पुरुषांनाच नबी बनविलेले आहे. स्त्रियांना या कार्यासाठी कधीही निवडलेले नाही. "आणि आम्ही तुमच्या पूर्वीदेखील कुणाला पाठविले नाही परंतु केवळ पुरुषांनाच व त्याच्याकडे आम्ही वही-दिव्यबोध पाठवीत



राहिलो." (यूसुफ-१०९) नबी ज्याअर्थी मनुष्य होते त्याअर्थी स्वाभाविकपणे इतर माणसांप्रमाणे भौतिक गरजा आणि मानवी आवश्यकता त्यांनाही लागल्या होत्या, जसे फर्माविलेही आहे, "नि:संशय हे लोक अन्न घेत असत व बाजारातही संचार करीत असत". (यूसुफ) तसेच "आम्ही त्याना पत्नी व मुले बाळगणारे बनविले होते". (रअद) या सर्व स्पष्टीकरणाअंती प्रेषितांचे मनुष्य असणे जरी सूर्यप्रकाशाइतके उघड होते तरीपण या प्रश्नांच्या महत्वामुळे हे आवश्यक होते की नकारात्मक पैलूनेदेखील कोणत्याही चुकीच्या वैचारिकतेला वाव राहू देऊ नये. म्हणून असे स्पष्ट केले गेले की अंबिया फरिश्त्यापैकीही नसत. "सांगून टाका की जमिनीवर जर फरिश्ते निर्धास्तपणे संचार करीत राहिले असते तर आम्ही त्याच्यावर एखाद्या फरिश्त्यालाच प्रेषित बनवून उतरले असते". (बनीइस्राईल) शिवाय, सर्वोच्च अल्लाह 'अवतार' घेऊन स्वत:च मानवी रूप धारण करून जगात येत राहिला असावा, असेदेखील नाही. म्हणूनच ईसाई लोकांच्या एका गटाने जेव्हा असे सांगितले, "अल्लाहच मरयमपुत्र येशू आहे" तेव्हा कुरआनने त्याला कुफ्र ठरविले. "खचितच कुफ्र केले त्या लोकांनी ज्यांनी सांगितले की अल्लाहच मरयमपुत्र येशू आहे".

**२.** नबी आणि रसूल असणे, म्हणजे नबूवत व प्रेषितत्व, हे एक अधिकारपद आहे. सर्वोच्च अल्लाहकडून त्यासाठी विशिष्ठ व्यक्तींची निवड व नियुक्ती होत असते. "वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह (आपले संदेश पाठविण्यासाठी) फरिश्त्यांपैकीही दूत निवडत असतो आणि मनुष्यांपैकीदेखील, तो सर्व काही ऐकणारा व पाहणारा आहे". (हज्ज) या संबंधाने अशा निवडलेल्या व नियुक्ती झालेल्या व्यक्तींच्या स्वत:च्या संकल्पालाही काही वाव असत नाही व त्यांच्या प्रयत्नांनादेखील नाही. माणसाच्या स्वत:चा निर्धार व संकल्प आणि धडपड व प्रयत्नांनी ही गोष्ट प्राप्त होत नसते. आपला प्रेषित कुणास करावा याचा निर्णय घेणारा तो अल्लाहच आहे. "अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो की आपल्या प्रेषितत्वाचे कार्य कुणाकडून घ्यावे व कसे घ्यावे". (अनआम) जपजाप्य व ध्यानग्यान आणि तपश्चर्येमुळे मनुष्य अध्यात्मिक दृष्टीने उच्च होऊ शकतो आणि स्वत:मध्ये फरिश्त्यांच्या गुणांचा रंग आणू शकतो परंतु हे शक्य नाही की आपल्या या खडतर तपश्चर्येच्या बळावर तो प्रेषितत्वपदापर्यंत पोहचावा व आपल्या त्या तपांमुळे प्रेषितत्वाने उपकृत व्हावा. कारण प्रेषितत्व एक अधिकारपद आणि ठराविक कामगिरी आहे. कोणतेही अधिकारपद स्वत: होऊन केवळ आपल्या प्रयत्नांनी मिळत नसते तर कुणा समर्थ अधिकारीच्या फर्मानाने व नियुक्तीनेच ते प्राप्त होत असते. म्हणून प्रेषितत्वदेखील, जे एक महान दैवी, पदाधिकार आहे, त्यालाच मिळू शकते ज्यासाठी सृष्टीच्या व

मानवजातीच्या खऱ्या शासनाकडून नियुक्ती आदेश निघाला असावा.

**३.** नबी जे काही आदेश देतो, आणि दीन शरीअत (धर्म व शास्त्र) म्हणून ज्या ज्या गोष्टींची शिकवण देतो ती त्याच्या स्वत:कडून नसून सर्वोच्च अल्लाहकडून असते. म्हणूनच प्रत्येक नबी लोकांना हेच सांगत राहिला आहे, ''मी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञा ऐकवीत आहे व त्याचाच संदेश पोहचवीत आहे''. (आअराफ) मग ज्या अर्थी नबीची प्रत्येक गोष्ट अल्लाहकडून असते त्याअर्थी त्याची आज्ञा पाळणे खरे म्हणजे अल्लाहची आज्ञा पाळणे होय व त्याची अवज्ञा करणे प्रत्यक्षात अल्लाहची अवज्ञा करणे आहे. स्पष्टपणे फर्माविले गेले आहे, ''ज्याने प्रेषिताचे आज्ञापालन केले त्याने अल्लाहचे आज्ञापालन केले'', (निसा) तसेच ''आम्ही (अर्थात अल्लाहने) ज्या कुणा प्रेषिताला पाठविले या करिताच पाठविले की ईश आज्ञेनुसार त्याचे आज्ञापालन केले जावे''. (निसा) खुद्द 'रसूल' हा शब्ददेखील हेच दर्शवितो की वस्तुस्थिती हीच असू शकते, कारण अल्लाहचे रसूल, म्हणजे अल्लाहकडून पाठविलेले असण्याचा अर्थच असा की तो जे काही सांगेल आपल्या व्यक्तीगत भूमिकेने व स्वत:हून सांगणार नाही तर आपल्या पाठविणाऱ्यातर्फे सांगेल, म्हणून त्याचे आज्ञापालन किंवा त्याची अवज्ञादेखील त्याची व्यक्तीश: आज्ञापालन किंवा अवज्ञा ठरणार नाही तर सर्व जगांच्या स्वामी अल्लाहचेच आज्ञापालन व त्याचीच अवज्ञा ठरेल.

या स्पष्टीकरणावरून 'नबी' आणि 'रसूल' या कुरआनी पारिभाषिक शब्दांचा जो अर्थ निश्चित होतो, तो ईशप्रसन्नता आणि धार्मिक महात्म्य व पावित्र्य दर्शविणाऱ्या इतर असंख्य शब्द व पारिभाषिक शब्दांच्या अर्थाहून मूलत:च भिन्न आहे, हे आपणास जाणवल्याशिवाय राहिले नसेल. विभूती, वली-अवलीया, पीर, फकीर, साधूसंत, ऋषीमुनी आणि अशाच प्रकारच्या इतर शब्दांपैकी एकही असा नाही जो या अर्थाला व्याप्त असावा. म्हणून हा कुरआनी पारिभाषिक शब्द आपली वास्तवता आणि आपल्या स्वरूपाच्या दृष्टिने एक असा पारिभाषिक शब्द आहे ज्याची कल्पना व अर्थ व्यक्त करण्यासाठी तोच प्रयुक्त झाला पाहिजे. एखाद्या दुसऱ्या शब्दात याचे भाषांतर केले गेले तरी त्याच स्वरूपात जेव्हा की ते तंतोतंत हीच कल्पना देत असावे व लोक ते ऐकून त्याचा हाच अर्थ घेत असावेत. याप्रमाणे फार्सी भाषेतील 'पैगंबर' हा शब्द अशाच प्रकारचा एक शब्द आहे. शेवटी नबी आणि रसूल यांच्यातील एक फरकदेखील समजून घेतला पाहिजे, या उभय शब्दांच्या वापरासंबंधीचा हा फरक आहे. महान कुरआनने या दोन्ही शब्दांना जरी त्याच विशिष्ट अर्थाचा पारिभाषिक शब्द म्हणून मानला आहे ज्याचे स्पष्टीकरण आताच आमच्यासमोर आले आहे. परंतु



नबी हा शब्द ज्याप्रमाणे याच पारिभाषिक शब्द व याच अर्थासाठी विशेष आहे, 'रसूल' हा शब्द त्याप्रमाणे विशेष नाही. 'नबी' हा शब्द तर असा आहे की कुरआन जेव्हाही तो शब्द बोलतो तेव्हा त्यापासून त्याला निश्चितपणे तोच विशिष्ट मनुष्य अभिप्रेत असतो ज्यावर सर्वोच्च अल्लाहची वही-दिव्यबोध उतरले आहे. परंतु रसूल-प्रेषित हा शब्द नबीच्या समानार्थी पारिभाषिक शब्द असण्याबरोबरच बऱ्याच ठिकाणी आपल्या शाब्दिक अर्थातदेखील प्रयुक्त झाला आहे. म्हणजे तो अंबियां (नबीचे अनेक वचन) साठीही वापरला गेला आहे व गैर नबीसाठीदेखील. त्याप्रमाणे फरिश्त्यांनादेखील जागोजागी अल्लाहने रसूल-प्रेषित सांगितलेले आहे, कारण तेदेखील सर्वोच्च अल्लाहकडून विविध कामगिरीवर नियुक्त केलेले आणि पाठविलेले असतात. आता उरला हा प्रश्न की मग रसूल या शब्दाला कुरआनात कोठे नबीच्या समानार्थी पारिभाषिक शब्द समजले जावे व कोठे शाब्दिक अर्थात बोललेला समजले जावे? तर या बाबतीत, स्पष्ट स्वरूपातील प्रत्येक ठिकाणी आपणास आढळणारे संदर्भच मार्गदर्शन करतील.

**वह्य किंवा वही - दिव्यबोध :** महान कुरआनचा महत्वाचा तिसरा पारिभाषिक शब्द 'वही' होय. सर्वोच्च अल्लाहकडून नबीवर जे मार्गदर्शन उतरत असते त्याला 'वही' असे फर्माविलेले आहे. अरबी भाषेतील 'वही'चा शाब्दिक अर्थ 'तीव्रसंकेत' असा होतो. मग तो संकेत हाताने असो, दृष्टीने असो, निव्वळ ध्वनी असो, स्पष्ट वाणी असो की लेखी असो, कसेही असो. याशिवाय संकेत कुणालातरी एखाद्या गोष्टीची कल्पना देण्यासाठीच असतो, दुसरे म्हणजे त्यात गुप्त अर्थाचाही समावेश असतो. म्हणून या शब्दाचा अर्थ गुप्त माहिती देणे व गुप्त आदेश आणि मनात एखादी गोष्ट टाकणे असादेखील झाला. 'वही' या अरबी शब्दाचा धातू 'ऐहा' आहे. त्यापासून निर्माण होणारी क्रियापदे अशाच सर्व निरनिराळ्या अर्थात व कसल्याही विशेषणाविना प्रत्येक गोष्टीसाठी वापरली जातात. त्याप्रमाणे महान कुरआनात ही क्रियापदे अल्लाह, मानव, शैतान, सर्वांसाठीच प्रयुक्त झाली आहेत. परंतु बाब जेव्हा या क्रियापदांच्या उपयोगाची नसेल व खुद्द 'वही' हा शब्द बोलला जात असेल तर मग त्यावेळी अर्थ आणि उपयोगातील व्यापकता राहात नाही व त्याच्याने अभिप्रेत हमखासपणे केवळ ती मार्गदर्शक वाणी असते जी नबींना सर्वोच्च अल्लाहकडून प्राप्त होत असते व अशा पद्धतीने प्राप्त होते की सर्वसामान्य मानवी ज्ञानेंद्रियांच्या आवाक्यापलिकडची असते. म्हणजे खास 'वही' हा शब्द कुरआनचा एक विशिष्ट पारिभाषिक शब्द आहे व तो प्रत्येक ठिकाणी याच पारिभाषिक शब्दाच्या स्वरूपात प्रयुक्त झाला आहे. परंतु 'ऐहा' व यापासून बनलेल्या क्रियापदांचे स्वरूप पारिभाषिक नव्हे व ते आपल्या सर्वसामान्य

शाब्दिक अर्थाने प्रयुक्त झाली आहेत. 'वही' केवळ सर्वोच्च अल्लाहकडून असते परंतु 'ऐहा' अल्लाह तसेच अन्य इतर सर्वांच्याचकडून असतो व प्रत्येक निर्मितीसाठी असतो. अंबिया (अ.) यांच्यावर उतरणाऱ्या मार्गदर्शनाला 'वही' यासाठीच म्हटले गेले आहे की त्याचे अवतरण इतर माणसांच्या दृष्टीपासून गुप्त असते. 'वही' म्हणजे केवळ अर्थ आहे असे नाही तर त्यात अर्थ, शब्द व शब्दरचना सर्वकाही मौजूद असतात. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर सर्वोच्च अल्लाहकडून प्रेषितांवर जे आदेश उतरत असतात, ज्याप्रमाणे त्यातील अर्थ सर्वोच्च अल्लाहकडून असतो त्याचप्रमाणे त्यातील शब्दही त्याच्याकडूनच असतात व त्या शब्दांची ती रचनादेखील, ज्यामुळे त्याना मजकुराचा स्वरूप येतो, त्याच्याकडूनच असते. म्हणून सदरहू 'वही'ला स्पष्ट शब्दात अल्लाहची वाणीदेखील फर्मावले गेले आहे.

सदरहू 'वही' (अर्थात दिव्य कुरआन) चे हजरत मुहम्मद (स.) पर्यंत पोहचण्याला अरबी भाषेत नुजूल - (अवतरण), इन्जाल (उतारणे) आण तन्जील (उतारले जाणे) फर्मावले गेले आहे. हे अवतरण काय होते, आणि हे उतरणे व उतारले जाण्याची कृती कशा प्रकारे घडत होती? या बाबतीत कुरआन आणि प्रमाणसिद्ध हदीसींद्वारे जे स्पष्टीकरण सापडते ते संक्षिप्तपणे खालीलप्रमाणे आहे.

**(अ)** सर्वोच्च अल्लाहचा एक खास फरिश्ता, ज्याचे नाव जिब्रईल असे आहे, ही ईशवाणी हजरत मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर उतारीत असे. ''हे नबी! विश्वसनीय फरिश्त्या (जिब्रईल) ने या (कुरआन) ला तुझ्या हृदयावर उतारले आहे.'' (सूरह शुअरा) ''तर खचितच त्याने त्याच्या (अर्थात अल्लाहच्या) आज्ञेने ते तुझ्या हृदयावर उतारले आहे.'' (सूरह बकरा) तात्पर्य असे की हाच फरिश्ता; कुरआन हजरत मुहम्मद (स.) पर्यंत पोहचविण्याचे माध्यम होता. सर्वोच्च अल्लाह ज्यावेळी, जितक्या आयती उतरवू इच्छित असे, त्यांना हजरत जिब्रईल (अ.) यांच्या सुपूर्द करून पैगंबर (स.) कडे पाठवीत असे व ते पूर्ण विश्वासार्हतेने व जबाबदारीने त्या आयती आणून हजरत मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर उतरवीत असत. यासंबंधी त्यांचे स्थान संपूर्णपणे केवळ एका माध्यमाचे आणि आज्ञाधारक सेवकाचेच काय ते होते. यात त्यांच्या स्वत:चे मत आणि त्यांच्या इच्छेला कोणतेही स्थान नव्हते. ईश आज्ञेविना ते येतही नसत, जसे दुसऱ्या क्रमांकाच्या आयतीत 'त्याच्या आज्ञेने' या शब्दावरून स्पष्ट होत आहे व जसे की आणखीन एका आयतीत खुद्द त्यांच्याच तोंडाने हे स्पष्टीकरण दिलेले आहे की ''हे नबी! ज्या ज्यावेळी आम्ही (वही घेऊन) उतरतो, तुझ्या रबची आज्ञा मिळाल्यावरच उतरतो.'' (सूरह मरयम), ते त्या वही आणि



ईशवाणीत काहीही कमीजास्त किंवा फेरबदल होऊ देत नसत. जसे की त्यांना 'विश्वसनीय फरिश्ता' असे सांगून स्पष्ट केले गेले आहे. दिव्य कुरआनात काही ठिकाणी या गोष्टीला की, जिब्रईल (अ.) यांनी या कुरआनाला नबी (स.) यांच्या हृदयावर उतारले आहे, अशाप्रकारेदेखील फर्मावलेले आहे, ''हा (कुरआन अल्लाहकडून) पाठविलेल्या वही खेरीज काहीच नाही जिला बलाढ्य शक्तिशाली (फरिश्त्या) ने त्याला (म्हणजे नबीला) शिकविले आहे.'' (सूरह नज्म) यावरून असे कळते की 'हृदयावर उतरविण्या'चा अर्थ काही सामान्य स्वरूपाचा नव्हता तर 'शिकवण' अर्थात पूर्णपणे शिकविणे असा होता. त्यानंतर सर्वोच्च अल्लाहची सदरहू वही आपल्या मूळ स्वरूपात 'जशीच्या तशीच' हजरत मुहम्मद (स.) यांना पाठ होत असे.

**(ब)** ज्यावेळी हजरत मुहम्मद (स.) यांच्या शुभ हृदयावर वहीचे अवतरण होत असे त्यावेळी त्यांच्यावर अत्यंत एकाग्रचित्ताची स्थिती पसरत असे. ते आपल्या सभोवतालापासून पूर्णपणे तुटले जात असत, मुखकमल लाल होत असे व त्याच्या स्नायूंवर अत्यंत तीव्र स्वरूपाचा ताण पडत आहे व ते थकले जात असल्याचे स्पष्टपणे दिसत असे. हिवाळ्याच्या दिवसातदेखील शुभ कपाळावर घाम बिंदू दरदरून येत असत. (बुखारी शरीफ) जेव्हा ते स्वार झालेल्या अवस्थेत असत तेव्हा खोगिरातून चरचरचा ध्वनी निघत असे.

एकदा हजरत हारिस बिन हिशाम (रजि.) या सहाबींनी विचारले की आपणा (स.) वर वही कशातऱ्हेने उतरते? फर्मावीले, ''कधी तर अशा प्रकारे जणू माझ्या कर्णात घंटिका नाद होत असावा. वही अवतरणाची ही पद्धत माझ्यावर मोठी कठीण जाते. मग फरिश्ता अल्लाहची वाणी मला पोहचती करून निघून जातो व मी तिला पूर्णपणे सुरक्षित केलेले असते. कधी अशा प्रकारे की फरिश्ता मानवी रूप धारण करून माझ्यासमोर येऊन उभा राहतो व मला जे काही ऐकावयाचे असते ते ऐकवितो. मी त्याने ऐकविलेली वाणी पाठ करून घेतो.''

या प्रतिपादनावरून कळाले की फरिश्ता दोन रूपात येत असे. एक तर मानवी रूपात व दुसरे आपल्या मूळच्या रूपात. या दुसऱ्या रूपासंबंधी त्यांचे असे फर्माविणे की ते माझ्यावर जास्त कठीण असते, म्हणजे तीव्रता व कठिणता असण्याविना पहिले रूपही नाही हे यावरून उघड होते. अर्थ असा निघाला की फरिश्त्याकडून 'वही' आत्मसात करणे कोणत्याही प्रकारे असो एक असामान्य कृती असे. त्याला शिकणे शिकविण्याची प्रचलित कृती व पद्धत कदापि समजली जाऊ नये. असे वाटते की

फरिश्त्याकडून वही आत्मसात करण्यासाठी पैगंबर (स.) पंचेंद्रियांचा उपयोग करीत नसत, तर आपल्या आंतरिक शक्तिंना एकवटून एखाद्या दुसऱ्या अवस्थेत स्थित्यंतरित होत असत व अशा प्रकारे सकृतदर्शनी अवस्थेपासून उच्च होऊन ईशवही आपल्या हृदयावर उतरवून घेण्यालायक होत असत. चित्ताग्रतेची स्थिती, शुभ मुखकमलावर पसरलेला लालिमा, शुभ कपाळाचे घामाने ओलसर होणे आणि कर्णात घंटिकानादासारखा आवाज जाणवणे याच गोष्टीचा परिणाम असे. कसेही असो, वस्तुस्थितीचे खरे ज्ञान तर अल्लाहलाच असू शकते. आमच्यासमोर या वही अवतरणाची गोष्ट जितक्या प्रमाणात स्पष्ट आहे ती केवळ इतकी आहे की अशा प्रकारची स्थिती होत असे ज्यात फरिश्ता अल्लाहची वही पैगंबर (स.) यांच्या स्वाधीन करीत असे. ही स्थिती स्पष्टपणे जागृतावस्थेची असतानादेखील बाह्यजगाशी तुटण्याची होत असे. काही अशाचप्रकारे तुटण्याची जशी आमची व तुमची स्थिती स्वप्नावस्थेत होत असते.

अशा आहेत त्या गोष्टी ज्या वही अवतरणाच्या प्रश्नासंबंधी आम्हाला सांगितल्या गेल्या आहेत व आमच्या माहितीत आल्या आहेत.

आता उरला अधिक चर्चा व संशोधनाचा मामला, म्हणजे वहीचे हे अवतरण प्रत्यक्षात आहे तरी काय, असा प्रश्न? तर दुसऱ्या शब्दात हा प्रश्न म्हणजे मुळात वहीची वास्तवता काय आहे? असा प्रश्न आहे. परंतु सामान्य मनुष्य वहीची वास्तवता समजू शकतो का? कुरआनचे उत्तर असे की 'नाही'. त्याप्रमाणे ज्या काळात तो उतरत होता, त्याच्या वितंडवादी विरोधकांनी प्रत्यक्षपणे असा प्रश्न उभा केला होता की ही 'वही' काय प्रकार आहे? तेव्हा त्यांच्या उत्तरात सर्वोच्च अल्लाहने नबी (स.) यांना आदेश दिला होता की, "सांगून टाका, वही माझ्या रबच्या (विशेष) बाबीपैकी आहे व तुम्हाला फार थोडे ज्ञान दिले गेले आहे." (सूरह बनीइस्राईल) म्हणजे समजण्याचा व जाणून घेण्याच्या ज्या स्वाभाविक क्षमतानिशी मनुष्य जन्मास आला आहे, त्या क्षमता इतक्या प्रमाणांत व अशाप्रकारच्या नाहीत की जेणेकरून वहीची वास्तवता समजून घेणे शक्य व्हावे. बौद्धिकदृष्ट्या पाहिले तर हे अत्यंत योग्य असेच उत्तर होते. कारण प्रेषितत्व जरी माणसांनाच प्रदान केले जात राहिले आहे तरीपण ते सामान्य मानवी कुवतीपेक्षा पूर्णत: एक वाढीव शक्ती आहे, त्याची वास्तवता केवळ तोच मनुष्य समजू शकतो ज्याला या सौभाग्याने उपकृत केलेले असावे, एखादे मूल जर प्रौढ वयातील संवेदना, आणि एखादा भोळाभाबडा निरक्षर जर वैज्ञानिक सत्ये जाणू शकत नाही, वास्तविकत: ती समजून घेण्याची क्षमता त्याच्यात कार्यशील जरी



नसली तरी मूलत: आणि उपजत स्वरूपात निश्चितपणे मौजूद असते... तर प्रेषितत्वाच्या विशिष्ट बाबी कुणी गैरनबी कसे समजू शकतो ज्याअर्थी की त्याच्यात ती समजून घेण्याची क्षमता मूलत: आणि उपजत स्वरूपातसुद्धा मौजूद असत नाही? तथापि एखाद्या गोष्टीची वास्तवता व तिचे मूळ व खरे स्वरूप पूर्णपणे समजून घेणे ही गोष्ट वेगळी आणि तिची पुसटशी कल्पना येणे ही गोष्ट निराळी आहे. पहिली गोष्ट जर आमच्यासाठी अशक्य असेल तर दुसरीदेखील अशक्य असावी हे आवश्यक नाही. याउलट वस्तुस्थिती याच्या अगदी विरूद्धच असते. कित्येक वस्तू अशा आहेत ज्यांची वास्तवता कळलेली नाही. परंतु तरीदेखील उदाहरणांद्वारे व सभोवतालच्या निरनिराळ्या माहितीच्या सहाय्याने आमची अनुमान दृष्टी त्यांच्या रूपांची झळक पाहिल्याशिवाय राहात नाही. त्याप्रमाणे 'वही' व तिच्या अवतरणाचा मामलादेखील अशाच प्रकारचा आहे. 'वही'चे खरे स्वरूप आणि वास्तवता काय आहे हे आम्ही जाणत नाही व जाणूही शकत नाही, यात शंका नाही. अशा गोष्टींपैकी सर्वाधिक महत्वाची आणि स्पष्ट गोष्ट म्हणजे खरे स्वप्न आहेत. या स्वप्नांची स्थिती अशी आहे की भावी काळातील एखाद्या क्षणी घडून येणार आहे अशी एखादी घटना एखाद्या निद्राधीन माणसाला, काहीशा सांकेतिक पद्धतीने आताच घडत असल्याचे दिसते. अशा प्रकारे उद्या घडणाऱ्या एखाद्या गोष्टीची माहिती एका विशिष्ट स्वरूपात त्याला आजच कळून येते. विचार करा भावी काळात घडणारी एक घटना, मानवी मनाला, जेव्हा की आपल्या सभोवतालापासून तो पूर्णपणे गाफिल आणि असंबंधित झालेला असतो, अगोदरच कशी जाणवते तसेच कोठून व कशा प्रकारे त्याला तिची माहिती प्राप्त होते? ज्या लोकांना या सृष्टीमागे कुणा अदृश्य शक्तीचे आणि काही उच्च कोटीच्या सत्यांचे अस्तित्व मान्यच नाही ते तर या संबंधाने न जाणो काय काय म्हणत असतात, परंतु ईश्वरावर व त्याच्या वैभवशाली महानतेवर विश्वास ठेवणारा याला याशिवाय इतर काहीच मानू शकत नाही की वास्तविकपणे ही एक दैवी कृपा असून कधीकधी दासांवर तिचा वर्षाव करून त्यांना उपकृत केले जात असते. म्हणजे परोक्षाचे ज्ञान राखणारा व घटना घडवून आणणारा त्यांना स्वप्नावस्थेत, एका विशिष्ट पद्धतीने, भावी काळात अशा प्रकारच्या प्रसंगाला सामोरे जावे लागणार आहे असे तो अगोदरच दाखवून देत असतो. स्वप्नात 'परोक्ष-लोक'कडून काही गोष्टीं अशा प्रकारे माहीत होणे एक अशी वास्तविकता आहे जिची माणसाला नेहमी अनुभूती येत असते. हा अनुभव असताना, वहीचे अवतरण आणि सर्वोच्च अल्लाहकडून काही विशिष्ट दासांप्रत मार्गदर्शन पोहचणे अनाकलनीय असले तर असो, परंतु कल्पना करण्याजोगेही नाही असे मुळीच नाही. तथापि जेव्हा एक सामान्य माणूस, निद्रावस्थेत

खुद्द त्याच्या मनावर अमुक गोष्ट कशाप्रकारे प्रकट झाली व त्याच्या स्वप्नाची वास्तवता काय आहे, हेच त्याला कळू शकत नाही तर तो वही आणि वहीच्या अवतरणांची वास्तवता कशा प्रकारे समजू शकतो?

पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी फर्माविले आहे, ''मुसलमानाची (खरी) स्वप्ने प्रेषितत्वाचा शेहचाळिसावा अंश आहे.'' (तिर्मिजी) त्याचप्रमाणे खुद्द पैगंबर (स.) यांचीही अवस्था अशी की 'वही'ला प्रारंभ होण्यापूर्वी सतत सहा महिन्यांचा कालावधी 'खऱ्या स्वप्नांचाच' काळ होता. म्हणजे त्या कालावधीत ते नेहमी स्वप्न पहात असत व स्वप्नात ते जे काही पहात असत नंतर व्यवहारिक जीवनात ते प्रत्यक्षपणे समोर येत असे. म्हणजे हा कालावधी त्यांची सामान्य मानवी अवस्था आणि त्यांच्या प्रेषितत्वादर्म्यानातील एक विकसनशील कालावधी होता व ही स्वप्ने एका प्रकारे प्रेषितत्वाची प्रस्तावना होती. या गोष्टीवरून माहीत झाले की खऱ्या स्वप्नाचे अस्तित्व, वही आणि वही अवतरणाच्या स्वरूपाची एक पुसटशी कल्पना निश्चितच देऊ शकते, कारण त्यांना वही आणि प्रेषितत्वाच्या मामल्याशी एक प्रकारची सादृश्यता आहे. बहुधा हीदेखील एक महत्वाची निकड आणि महत्वाचा हेतू होता ज्यासाठी खरी व चांगली स्वप्ने केवळ प्रेषितांसाठीच विशिष्ट राखली गेली नाहीत तर इतर लोकांसाठीही आम केली गेलीत, तसेच वहीचा क्रम संपुष्टात आला असतानादेखील खऱ्या स्वप्नाचे दार कयामत-अंतिम दिनापर्यंत उघडे ठेवले गेलेआहे जेणेकरून वही अवतरणाच्या स्वरूपाची कमीतकमी एक प्राथमिक कल्पना येण्यासाठी एक लांबचे उदाहरण व मार्गदर्शन सदैव मौजूद असावे.

**मलाईका-फरिश्ते :** दिव्य कुरआनात मलाईका अर्थात फरिश्ते या एका विशिष्ट निर्मितीचा उल्लेख मोठ्या प्रमाणात आला आहे. अनेक कारणांनी हा शब्ददेखील दिव्य कुरआनातील एक महत्वपूर्ण पारिभाषिक शब्दांपैकी आहे. विशेषकरून यासाठी की याच फरिश्त्यांपैकी काहीजण अंबिया (अ.) पर्यंत अल्लाहची वही पोहचविण्याचे माध्यम राहिले आहेत. याशिवाय याकरितादेखील की ज्यांची महानता व ज्यांचे वैभव लोकांसाठी उपद्रव ठरत राहिले आहे व ज्यांच्या आदर सत्कारात अतिरेक करून मनुष्य शिर्क-अनेकेश्वरवाद, कुफ्र आणि मूर्तिपूजेसारख्या हानिकारक पथभ्रष्टतेत गुरफटत राहिला आहे; ते फरिश्त्यांचे अस्तित्वच आहे. कोठे त्यांना अल्लाहची संतती ठरविले गेले आहे (अल्लाह त्यापासून वाचवो) तर कोठे त्यांना दैवी गुणांचेच दुसरे नाव म्हणून समजले गेले व अशा प्रकारे देवदेवतांची कल्पना पुढे आली. म्हणून यांच्यासंबंधी कुरआनने निश्चित केलेली कल्पना चांगल्या प्रकारे समजून घेणे



आवश्यक आहे. सर्वसामान्य माणसासाठी फरिश्ते; परोक्ष म्हणून आहेत. ते आमच्या ज्ञानेंद्रियांच्या आवाक्यापलिकडचे आहेत. म्हणून 'वही'प्रमाणेच त्यांचीही वास्तवता आम्ही समजू शकत नाही. धार्मिक उद्दिष्टे आणि हेतूंच्या दृष्टीने हे आवश्यक आहे असे नाही. धार्मिक दृष्टीने जी गोष्ट आवश्यक आहे ती केवळ ही की आम्हाला त्यांचे स्थान व त्यांच्या गुणांचे योग्य असे ज्ञान असावे. म्हणून अशीच माहिती आम्हाला दिलीही गेली आहे. दिव्य कुरआनातील प्रतिपादने आणि पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी सांगितलेल्या स्पष्टीकरणानुसार फरिश्त्यांचा दर्जा व त्यांचे गुण खालीलप्रमाणे आहेत.

**(१)** फरिश्ते, सर्वोच्च अल्लाहची एक प्रतिष्ठित, उच्च दर्जा बाळगणारी व निकटवर्ती अशी निर्मिती आहे. (सूरह अंबिया - २६)

**(२)** फरिश्ते सदैव सर्वोच्च अल्लाहच्या आज्ञांचे पूर्णपणे पालन व त्याच्या मर्जीचे अनुकरण करण्यात लागलेले असतात. त्यांच्यात ईश्वरी आज्ञा मोडण्याची मुळापासून क्षमताच नाही असे जरी कुरआन आम्हाला सांगत नसला तरी व्यवहारत: ते कधीच अवज्ञा करीत नाहीत व पूर्णपणे आज्ञांकित राहणे हाच त्यांचा बाणा आहे, पुन्हा पुन्हा तो असे स्पष्ट करीत असतो. (सूरह अंबिया - २७) सर्वोच्च अल्लाहच्या स्तुती व पावित्र्यगायनात सदैव मग्न असतात. (सूरह बकरा) व त्यांच्यावर नेहमी ईशभय पसरलेले असते. (सूरह अंबिया - २८)

**(३)** त्यांना असामान्य आणि अमाप कुवती दिल्या गेल्या आहेत. त्यांची संख्यादेखील अगणित किंबहुना कल्पनेपलिकडची आहे.

**(४)** सृष्टीत त्यांचा दर्जा, शासकीय कर्मचाऱ्यांसमान आहे. ईश्वरी आज्ञा व सूचनेनुसार ते या संपूर्ण विश्वव्यवस्थेचा कारभार चालवीत आहेत. आमच्या या जगापासून ते सृष्टीच्या अंतिम टोकापर्यंत ज्या आज्ञा व योजना राबविल्या जातात, याच फरिश्त्यांद्वारे राबविल्या जातात व घडते अशाप्रकारे की त्यांचे स्वत:चे मत व इच्छेला त्या बाबतीत काहीएक वाव नसतो किंबहुना त्यांना आपल्या स्वामीकडून जी आज्ञा मिळालेली असते, केवळ तिचीच ते अंमलबजावणी करतात. अशा प्रकारे त्याना असामान्य आणि अमाप कुवती दिलेल्या असण्याचा अर्थ याशिवाय दुसरा काहीच नाही की जी महान कर्तव्ये त्यांच्या सुपूर्त केली जातात, ती यथायोग्य प्रकारे पार पाडण्याची त्यांना पुरेपूर शक्ती दिली गेली आहे.

**(५)** श्रेष्ठतेच्या दृष्टीने त्यांचे असंख्य वर्ग आहेत. त्याचे ज्ञान अल्लाहशिवाय कुणालाच नाही. तथापि मूलत: त्यांचे दोन वर्ग आहेत. एक सामान्यजनांचा वर्ग, दुसरा विशेषजनांचा वर्ग. विशेषजनांच्या वर्गाला दिव्य कुरआनात, रूह या एका विशिष्ट

नावाने संबोधिले गेले आहे. यांना सामान्य फरिश्त्यांपेक्षा उच्च दर्जा प्राप्त असतो व सर्वोच्च अल्लाहच्या ते अधिक जवळ राहतात. ईश आदेशांनी सर्वप्रथम तेच उपकृत होतात. त्यानंतर ते आदेश घेऊन खालच्या वर्गातील त्या फरिश्त्यांप्रत पोहचते करतात ज्यांच्या विभागाशी त्या आदेशांचा संबंध असतो. या विशेष वर्गाच्या म्होरक्याचे नाव 'जिब्रईल' असे आहे. स्मरणात असेल की प्रेषितांपर्यंत सर्वोच्च अल्लाहची वही पोहचविण्याचे महान कर्तव्य जो पार पाडत राहिला आहे व ज्याने पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या हृदयावर कुरआन उतरले होते, तो हाच फरिश्ता आहे.

**इस्लाम :** कुरआन ज्याचे आवाहन देतो व कुरआनात जो दीन-धर्म आहे त्याचे नाव इस्लाम आहे. इस्लामचा शाब्दिक अर्थ आज्ञापालनार्थ मान तुकविणे व स्वत:ला स्वाधीन करणे असा होतो. परंतु जेव्हा हा शब्द शुद्ध शाब्दिक अर्थाशिवाय धार्मिक कल्पनाही बाळगून असतो तेव्हा त्याचा अर्थ विशिष्टपणे केवळ सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरात विनम्र होणे व आपल्या स्वत:ला त्याच्या स्वाधीन करणे असा होतो. जणूकाय दिव्य कुरआनने आपल्या प्रस्तुत केलेल्या धर्माला 'इस्लाम' यासाठी सांगितले आहे की हा शब्द त्याची वास्तवता व त्यामागील हेतू उत्तम प्रकारे व्यक्त करणारा होता, कारण इस्लाम उदयास येण्याचा हेतू याशिवाय अन्य काहीच नाही की अल्लाहच्या दासांनी आपल्या स्वत:ला पूर्ण खुशदिलीने, त्या आदेशांच्या स्वाधीन करावे जे त्याने त्यांना कुरआनद्वारे प्रदान केले आहेत. नि:शंकपणे केवळ याच धर्माची वास्तवता व त्याचा हेतू असा आहे असे नाही तर सर्वोच्च अल्लाहकडून आलेल्या प्रत्येक धर्माची वास्तवता व त्याचा हेतू हाच होता. निरपवादपणे साऱ्याच अस्मानी धर्मांच्या उदयास येण्याचा हेतू केवळ हाच होता की लोकांनी आपले जीवन अल्लाहच्या स्वाधीन करावे व अशा प्रकारे आपल्या खऱ्या स्वामीचे आज्ञाधारक बनावेत. म्हणून अर्थात्मक दृष्टिने त्यापैकी प्रत्येक धर्म 'इस्लाम'च होता. म्हणून खुद्द प्रबुद्ध कुरआननेदेखील ही वस्तुस्थिती पुन्हा पुन्हा व्यक्त केली आहे व फर्माविले आहे की सत्व आणि हेतूच्या दृष्टीने सर्वच धर्म एक होते व ज्या कुणा नबीवर जो कोणता ग्रंथ उतरला होता; तो प्रत्यक्षात 'इस्लाम' (ईश्वराची पूर्णपणे आज्ञाधारकता) च्याच आवाहनानिशी उतरला होता. म्हणून जेथपावेतो मूळ स्वरूपाचा संबंध आहे, केवळ कुरआनच्या अनुयायांचा नव्हे तर अखिल मानवजातीचा धर्म आदीपासून नेहमी 'इस्लाम'च राहिला आहे. केवळ मानवजातीपुरतेच नव्हे तर तो येथपर्यंत स्पष्टपणे सांगतो की 'इस्लाम'च संपूर्ण सृष्टीचा धर्म आहे. (आलिइम्रान - ८३) हे अशा प्रकारे की अणूपासून ते सूर्यापर्यंत, या आद्य व विद्यमान विश्वातील प्रत्येक वस्तू, त्याच नियमांचे पालन करीत आहे जे



तिच्यासाठी तिच्या निर्माणकर्त्याने निश्चित केलेल्या आहेत. परंतु सर्वच धर्म आपले स्वरूप आणि आपल्या हेतूच्या दृष्टीने इस्लामच होते अशी वस्तुस्थिती असतानादेखील जेथपावेतो कायदेशीरपणे नामाभिदानाचा संबंध आहे, दिव्य कुरआनने स्वत: जो दीन-धर्म प्रस्तुत केलेला आहे, विशिष्ट प्रकारे केवळ त्यालाच 'इस्लाम' म्हणून फर्माविले आहे, हे वैशिष्ट आणि श्रेष्ठत्व देण्याचे कारण म्हणजे कुरआन व त्याकरवी प्रस्तुत धर्माचे ते विशिष्ट आणि आगळे स्वरूप आहे जे त्याला इतर अस्मानी ग्रंथांच्या आणि धर्माच्या तुलनेत प्राप्त आहे (अर्थात अगोदरचे सर्व प्रेषित व नबी व त्यांच्यावर उतरणारे ग्रंथ हे ज्यांच्या त्यांच्या जाती व राष्ट्र आणि काळासाठीच उतरले होते. परंतु अंतिम पैगंबर हजरत मुहम्मद (स.) व त्यांच्यावर उतरलेला कुरआन अखिल मानवजातीसाठी असून ते स्थल व काल अबाधित आहे, म्हणूनच त्यात मानवी प्रकृतीशी सुसंगत अशी परिपूर्ण जीवन व्यवस्था एका जिवंत भाषेद्वारे प्रस्तुत केलेली आहे. त्यात कोणताही फेरफार अथवा भर न होता तो पूर्णपणे सुरक्षित आहे. ही वैशिष्ट्ये इतर कुठल्याही धर्म व धर्मग्रंथाला प्राप्त नाहीत) या धर्माचे विशिष्ट आणि आगळ्या स्वरूपामुळे 'इस्लाम' हा शब्द त्याची वास्तवता व त्याचा हेतू व्यक्त करणाराच नव्हे तर त्याचे नाव त्याचे चिन्हही असावे. त्याला हा जो अधिकार प्राप्त झाला आहे तो योग्यच आहे. इतर धर्मांसाठी हा शब्द केवळ त्यांची वास्तवता आणि त्यांचा हेतूच तेवढा व्यक्त करणारा राहिला आहे. अगदी त्याचप्रकारे ज्याप्रकारे 'कुरआन' प्रत्यक्षात प्रत्येक दैवी ग्रंथ होता, परंतु नाव आणि चिन्ह म्हणून हा शब्द, हजरत मुहम्मद (स.) यांच्यावर जो उतरला आहे, केवळ त्याच ग्रंथासाठी विशिष्ट आहे. तात्पर्य असे की कुरआनी धर्माचे हेदेखील एक विशिष्ट आणि आगळे स्वरूप आहे की नावाच्या बाबतीत त्याचा संबंध कुणा व्यक्ती अथवा राष्ट्रियत्वाशी नाही तर आपल्या हेतूशी संबंधित आहे. याचा परिणाम असा की एखादा मनुष्य केवळ त्याचे नावच ऐकून कल्पना करू शकतो की हा धर्म कसा आहे व तो कोणत्या गोष्टीचे आवाहन करतो. याउलट जगातील इतर धर्म आपल्या नावाद्वारे अशा प्रकारचे कसलेही मार्गदर्शन करू शकत नाहीत कारण त्यांच्या नावांचे संबंध आपले हेतू व आपल्या वास्तवतेऐवजी त्यांच्या व्यक्ती आणि राष्ट्रांशी जुळलेले आहेत. ख्रिस्ती धर्माचे नाव ईसाई अथवा ख्रिस्ती अशासाठी आहे की त्यास प्रस्तुत करणारे हजरत ईसा (अ.) येशू-ख्रिस्त होते. बौद्ध धर्माला बौद्धधर्म अशासाठी म्हटले जाते की त्याचे संस्थापक महात्मा बुद्ध होते. इतर इस्राईली घराणे त्याच्या पुढे अशाप्रकारे निष्प्रभ झाले होते की सबंध राष्ट्रच त्या नावाने व्याप्त झाले. नंतर मग मूसवी शरिअतदेखील त्याच नावाने संबोधली जाऊ लागली. परंतु कुरआनने आपले आवाहन व आपला

दीन-धर्म हजरत मुहम्मद (स.) यांच्या व्यक्तीत्वाशी किंवा त्यांच्या वंश व जातीशी संबंधित करून मुहम्मदित्व, अरबित्व किंवा हाशमित्व असे नाव दिले नाही तर 'इस्लाम' ठेवले. हेच त्याच्या तात्त्विक दर्जाच्या, त्याचे विश्वव्यापी आणि परिपूर्ण अशा स्वरूपाच्या अभिव्यक्तीसाठी आवश्यक होते.

**मुअ्मिन-ईमानधारक आणि मुस्लिम :** दिव्य कुरआनातील महत्वाच्या आणि उठून दिसणाऱ्या पारिभाषिक शब्दांपैकी मुअ्मिन-ईमानधारक आणि मुस्लिम हे पारिभाषिक शब्द आहेत. वास्तविकपणे हे दोन्ही एकाच व्यापक सत्याची दोन अंगे आहेत. एक ज्ञानाचे अंग व दुसरे कृतीचे अंग. म्हणून बाह्यत: दोन वेगवेगळे पारिभाषिक शब्द असतानादेखील प्रत्यक्षात ते एकच आहेत असेच म्हटले पाहिजे, जसे की पुढील तपशीलावरून हे स्पष्ट होईल.

**मुअ्मिन :** अशा माणसाला म्हटले गेले आहे जो दिव्य कुरआनला सत्य आणि त्याला अपेक्षित असलेल्या पद्धतीने अल्लाहचा ग्रंथ म्हणून मानतो. म्हणजे कुरआनने ज्या श्रद्धांना आणि तात्त्विक सत्यांना आपल्या आवाहनाचा पाया ठरविला आहे त्यांना सत्याधिष्ठित असणे मान्य करावे व तोंडानेदेखील तशी कबुली देऊन घोषित करावे. या श्रद्धा अथवा तात्त्विक सत्ये पाच आहेत. कुरआनात खालील शब्दात त्यांचा एकत्रितपणे उल्लेख आहे. ''किंबहुना पुण्य त्या व्यक्तीचे पुण्य आहे जो मानत असेल अल्लाहला[१], आखिरत-अंतिम दिनाला[२], फरिश्त्यांना[३], अस्मानी ग्रंथांना[४] आणि नबींना[५].'' (सूरह बकरा)

**१)** *'अल्लाहला मानणे'* याचा अर्थ असा की केवळ त्यालाच ईश्वर आणि उपास्य मानले जावे, सर्व परमोच्च उत्तमगुण आणि दैवी गुण केवळ त्याच्यासाठीच विशिष्ट असलेले मानले जावे. मग या सर्व गुणवैशिष्ट्यांच्या स्वभावत: अवश्य गोष्टींनादेखील सर्वस्वी त्याच्यासाठीच विशिष्ट मानले जावे म्हणजे या गुणांच्या आवश्यक निकडी म्हणून असलेले सर्व अधिकार व हक्कदेखील त्या निर्माणकर्त्या अस्तित्वातच केंद्रित असल्याचे मानले जावे. उदा. दासांना आज्ञा करणे, त्यांच्यासाठी कायदेकानून करण्याचा अधिकार, त्यांच्यासंबंधी फैसले करण्याचा अधिकार, प्रार्थना ऐकण्याचा व स्वीकारण्याचा अधिकार, त्यांना माफी देण्याचा वा शिक्षा करण्याचा अधिकार, त्यांना लाभ अथवा हानी, सुख अथवा दु:ख, आरोग्य किंवा आजार, जीवन अथवा मृत्यू देण्याचा अधिकार, तसेच कांकू न करता आपल्या आज्ञांचे पालन करविण्याचा हक्क, आपल्या इच्छा पूर्ण करविण्याचा हक्क, आपली उपासना करवून घेण्याचा हक्क इ. (अल्लाहला असे व अशाच प्रकारे मानणे कुरआनी आवाहन आणि



इस्लामचा मूळ पाया आहे. यालाच तौहीद-एकेश्वरवादाची श्रद्धा म्हणतात.)

**२)** *'आखिरत-अंतिम दिनाला मानणे'* म्हणजे असे की एका अशा दिवसाच्या येण्यावर विश्वास ठेवला जावा जेव्हा हे जग नष्ट होईल, संपूर्ण सृष्टिव्यवस्था कोलमडेल व या भूतलावर एक प्राणीसुद्धा जिवंत उरणार नाही, त्यानंतर जगातील प्रथम मानवापासून ते अगदी शेवटच्या माणसापर्यंत सर्वचे सर्व पुन्हा जिवंत केले जाऊन अल्लाहच्या हुजूरात सादर केले जातील, तेथे त्याच्या जगातील कर्मांचा संपूर्ण अहवाल समोर ठेवला जाईल, मग एक एका व्यक्तीचा हिशेब घेऊन सत्कर्माचा चांगला तर दुष्कर्माचा वाईट बदला दिला जाईल. म्हणजे ज्या इसमाची कार्यनोंद ईमान, सत्कार्य आणि बंदगी व आज्ञाधारकतेची कार्यनोंद सिद्ध होईल; त्याला सर्वोच्च अल्लाह उत्तम ऐश्वर्यांनी नटलेले दुसरे जीवन प्रदान करील. ते अनश्वर असेल. परंतु ज्या इसमाच्या कार्यनोंदीवरून ईमानऐवजी शिर्क-अनेकेश्वरवाद आणि कुफ्र-इन्कार, सत्कर्माऐवजी अवज्ञा व दुराचार आणि आज्ञाधारकता व बंदगीऐवजी खऱ्या स्वामीशी द्रोह केल्याचे सिद्ध होईल; त्याला दु:खपूर्ण जीवन दिले जाईल. हे जीवनदेखील सदैव राहणारे असेल. (हा, कुरआनी आवाहनाचा आणि इस्लामचा दुसरा अत्यंत महत्वाचा पाया आहे. याला आखिरत-परलोकाची श्रद्धा म्हणतात.)

**३)** *'फरिश्त्यांना मानणे'* म्हणजे असे की त्यांचे अस्तित्व खरे मानले जावे व त्यांना त्याच गुण व वैशिष्ट्यांचे मानले जावे ज्यांचे स्पष्टीकरण 'फरिश्ते' या शीर्षकाखाली अगोदर सांगितलेले आहे.

**४)** *'अस्मानी ग्रंथांना मानणे'* म्हणजे सर्वोच्च अल्लाहकडून मानवजातीच्या मार्गदर्शनासाठी जितकेही ग्रंथ उतरले आहेत; त्या सर्वांना अल्लाहचे ग्रंथ मानले जावे. त्यापैकी ज्यांच्यासंबंधी या गोष्टीची विश्वासपूर्ण साक्ष कुरआनने दिलेली आहे की ते अल्लाहकडून उतरले होते, त्यांना तर निश्चितच स्वरूपात व नामोल्लेखासहित दैवी ग्रंथ मानले जावे व ज्यांच्यासंबंधी अशी साक्ष सांगितलेली नसेल त्यांच्यासंबंधी केवळ परोक्षरीत्या व तात्त्विक स्वरूपात अशी श्रद्धा ठेवली जावी की माहीत नसलेले हे सर्व ग्रंथही अल्लाहचे ग्रंथ आहेत. अस्मानी ग्रंथांना मानण्याचा एक आवश्यक पैलू असादेखील आहे की मौजूद आणि माहीत असलेल्या ग्रंथांपैकीदेखील प्रत्येकाला तोच दर्जा दिला जावा जो त्याला अल्लाहकडून प्राप्त झाला आहे. व्यवहारत: याचा अर्थ असा की दिव्य कुरआनला शेवटचा ग्रंथ मानले जावे. असा शेवटचा ग्रंथ ज्याने पूर्वीच्या सर्व ग्रंथांना रद्दबातल ठरविले आहे व व्यवहारात केवळ त्याचेच अनुसरण करण्यावर आता प्रत्येकाची मुक्ती अवलंबून आहे.

५) *'नबी-प्रेषितांना मानणे'* याचा अर्थ असा की सर्वोच्च अल्लाहने प्रथमपासून ते शेवटपर्यंत जितक्या नबींना उभे केले आहे; त्यांच्यात फरक न करता सर्वांना अल्लाहचे नबी मानले जावे. त्यांच्यापैकी ज्या नबींची नावे सांगून, ते अल्लाहचे नबी होते असे दिव्य कुरआनने स्पष्ट केले आहे, त्यांना तर स्पष्टपणे नावाच्या निश्चितीसह नबी मानले जावे व उरलेल्यासंबंधी 'नबी' असण्याची श्रद्धा, केवळ 'परोक्ष'रीत्या आणि तात्त्विकपणे ठेवली जावी. सदरहू श्रद्धेतील एक आवश्यक बाब अशीही आहे की हजरत मुहम्मद (स.) यांना अल्लाहचे अंतिम नबी मानले जावे व त्याचबरोबर अखिल मानवजातीसाठी त्यांचे अनुकरण आवश्यक आहे हेदेखील मान्य केले जावे. म्हणजे त्यांच्या प्रेषित म्हणून नियुक्तीपासून ते जगातील अंतिम क्षणापर्यंतचा काळ केवळ त्यांच्याच प्रेषितत्वाचा काळ आहे, इतर सर्व प्रेषितांपैकी प्रत्येकाच्या प्रेषित्वाचे युग ईश्वर आज्ञेने संपले आहे व आता इतर कुणाचेही अनुकरण अल्लाहच्या हुजूरात स्वीकृतीपात्र ठरणार नाही.

**मुस्लिम :** अशा इसमाला म्हटले गेले आहे जो मुअ्मिन असण्याच्या व्यवहारात्मक निकडी पूर्ण करण्यासाठी प्रयत्नशील असावा, जो कुरआनचा आणि इस्लामचा अनुयायी असावा, ईश्वरी आज्ञापुढे जो विनम्र होत असावा. म्हणून या शब्दाचा अर्थच 'इस्लामवाला' म्हणजे सर्वोच्च अल्लाहचा आज्ञाधारक असा आहे. कुरआनला मानणे व त्याच्या आवाहनातील मौलिक श्रद्धांवर ईमान-विश्वास ठेवणे याला काहीच अर्थ राहात नाही जोपर्यंत की त्यातील आज्ञा व नियमांचे प्रत्यक्षपणे अनुसरण केले जात नाही; हे उघड आहे. म्हणून जो कोणी कुरआनला मानून व त्यातील मौलिक श्रद्धांवर ईमान आणून 'मुअ्मिन' बनतो, तो आदेशांच्या या संपूर्ण संग्रहाला, ज्याचे नाव कुरआन आणि इस्लाम आहे, आपल्या व्यवहारिक जीवनासाठी आज्ञापत्र ठरवील; असेच त्याच्या संबंधाने समज होणे हे स्वाभाविक आणि उघड आहे. याच कारणास्तव 'कुरआन'ला मानताक्षणीच मनुष्य केवळ 'मुअ्मिन'च नव्हे तर 'मुस्लिम' ही ठरतो. 'मुस्लिम' हा शब्द केवळ एकच विशेषणाचा दर्जा बाळगतो असे नाही, तर तो कुरआन आणि हजरत मुहम्मद (स.) याना मानणाऱ्याचे नाव आणि चिन्हदेखील आहे. म्हणूनच स्पष्टपणे फर्माविलेले आहे, ''त्याने तुमचे नाव मुस्लिम असे ठेवले.'' (सूरह हज) अर्थात ज्याप्रमाणे कुरआनी धर्माचे नामकरण कोणत्याही व्यक्ती अथवा वंशानुसार नाही त्याचप्रमाणे त्याला मानणाऱ्यांचे नावदेखील अशा नामकरणापासून पूर्णपणे वेगळे आहे. त्याचे नाव जर इस्लाम आहे तर याचेही मुस्लिम आहे. अशा प्रकारे केवळ गुणदर्शक स्वरूप बाळगण्यामुळे हे नावदेखील आपल्या धारकाचे तात्त्विक स्वरूप स्वत:च व्यक्त करणारे ठरते. तथापि इतर लोकांना जर आपल्या



राष्ट्रीय स्वभाव, आपली वडिलोपार्जित विचारसरणी आणि आपल्यावरील रीतीपरंपरा व प्रचलित रूढींच्या पगड्यामुळे 'मुस्लिम' आणि 'मोहमेडन' यांच्यातील फरक कळू शकत नसेल व परिणामत: इस्लामच्या अनुयायांना मुस्लिम म्हणण्याऐवजी ते मोहमेडन म्हणू लागत असतील तर ती गोष्ट वेगळी आहे. हाच 'मुस्लिम' शब्द फारसी भाषेतील मूळ अक्षर 'अ' आणि 'न'ची भर होऊन 'मुसलमान' असा झाला आहे.

**कुफ्र :** कुफ्र हा ईमान-श्रद्धाच्या उलट व विरूद्धार्थी पारिभाषिक शब्द आहे. या शब्दाचा मूळ शाब्दिक अर्थ लपविणे असा होतो. त्यानुसार याच क्रियापदाचा कर्ता काफिर, याचा शाब्दिक अर्थ 'लपविणारा' असा होतो. म्हणूनच लपविण्याची क्रिया करणाऱ्या बऱ्याच वस्तूंसाठी अरबी भाषेत विशेषण म्हणून या शब्दाचा वापर केला जातो. उदा. रात्र, समुद्र, शेतकरी इ. रात्र सर्व जगाला आपल्या कृष्णपटलात झाकून टाकते, समुद्राने आपल्या आतील प्राण्यांना लपवून ठेवलेले आहे, शेतकरी शेती करतांना बीयांना जमिनीत पुरतो म्हणून शाब्दिक अर्थाने यांच्यापैकी प्रत्येक काफिर आहे. कुरआनच्या भाषेत 'कुफ्र' दोन अर्थांनी प्रयुक्त झाला आहे. एक तर सर्वोच्च अल्लाहशी कृतघ्नता म्हणून. दुसरा दीन-धर्माच्या मौलिक श्रद्धांपैकी एखाद्या श्रद्धेचा इन्कार करणे म्हणून. वरवर पाहता 'कुफ्र' या शब्दाचे दोन वेगवेगळे अर्थ आहेत परंतु प्रत्यक्षात या वेगळेपणातदेखील गाढ सुसंगती आणि स्वाभाविक एकी मौजूद आहे. दोन्हीमध्ये फरक असेल तर केवळ इतकाच, जितका बी आणि त्याच्या झुडूपात अथवा सूर्य आणि त्यापासून निघून पसरणाऱ्या प्रकाशात असतो. वास्तविकपणे इन्कार असा अर्थ असलेला कुफ्र, कृतघ्नता या अर्थाच्या कुफ्रतूनच निर्माण होत असतो व त्याचाच अनिवार्य परिणाम म्हणून तो असतो. 'कुफ्र'चा मूळ शाब्दिक अर्थ व त्याच्या पारिभाषिक अर्थ वा अर्थादरम्यान जो संबंध आहे, तो समजण्यासाठी कोणत्याही लांबलचक स्पष्टीकरणाची जरूरी नाही. कृतघ्नता आणि इन्कार करणारा जे काही करतो ते याशिवाय इतर काय असते की सर्वोच्च अल्लाहचे 'उपकार' तो लपवितो, त्याच्या पालकत्वाचे व स्वामीत्वाचे हक्क लपवितो, आपले दास्यत्वाचे स्थान लपवितो आणि सर्वात शेवटी ज्यात विश्वस्वामी व पालनकर्त्या अल्लाहच्या उपकाराची जाणीव, त्याची बंदगी आणि आज्ञाधारकतेची संवेदना; गर्भित आहे, अशा त्या आपल्या मूळ प्रकृतीला तो लपवून घेतो. म्हणून सर्वोच्च अल्लाहशी कृतघ्नता त्याच्या वैशिष्ट्यांच्या स्वाभाविक आवश्यक गोष्टींच्या इन्काराला जर कुफ्र सांगितलेले आहे तर ही स्वीकारलेली एक अत्यंत व्यापक स्वरूपाची आणि यथायोग्य अशी अभिव्यक्ती होती. कुफ्र आणि काफिर (म्हणजे कुफ्रवाले) हे शब्द जेव्हा कुरआनात बोलले जातात तेव्हा सर्वसाधारणपणे हाच दुसरा अर्थ दृष्टीसमोर असतो.

म्हणजे काफिरने असा इसम अभिप्रेत असतो ज्याने अल्लाहच्या विशिष्ट गुणांपैकी एखाद्या गुणाचा इन्कार करावा किंवा त्यासाठीच्या स्वाभाविक आवश्यक गोष्टींचा इन्कार करावा किंवा आखिरतच्या दिवसाचा इन्कार करावा किंवा 'वही' आणि प्रेषितत्वाच्या वास्तवतेचा इन्कार करावा किंवा फरिश्त्यांचे अस्तित्व व त्यांच्या गुणवैशिष्ट्यांचा इन्कार करावा किंवा एखाद्या प्रेषिताला, पैगंबर म्हणून अमान्य करावे अथवा एखाद्या ईश्वरी ग्रंथाला ईश्वरी ग्रंथ म्हणून मानण्यास नकार द्यावा.

इन्कार या अर्थाच्या कुफ्रचे दर्जे वेगवेगळे आहेत, जसे की श्रद्धेचे दर्जे वेगवेगळे असतात. उदा. एक कुफ्र असे आहे जे सत्य गोष्ट स्पष्ट झाली असताना व तिचे आकलन घडले असतानादेखील केले जाते तर एक कुफ्र असे आहे जे अनभिज्ञतेवर अधिष्ठित आहे. हे दोन्ही एका स्वरूपाचे असू शकत नाहीत हे उघडच आहे. म्हणून न्यायाच्या दृष्टीने त्यांचे परिणामदेखील समान निघू शकत नाहीत. किंबहुना कुफ्र असतानादेखील सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरी क्षमापात्र असावेत असेदेखील कुफ्रचे काही प्रकार असणे शक्य आहे. केवळ शक्यच नव्हे तर कुरआनातील काही संकेतानुसार वस्तुस्थिती अशीच आहे. उदा. जर एखाद्या प्रेषिताचे आवाहन एखाद्या इसमापर्यंत पोहचले नाही अथवा पोहचले तरी योग्य पद्धतीने पोहचले नाही व म्हणून तो त्याच्या प्रेषितत्वावर ईमान आणत नाही किंबहुना इन्कार व कुफ्र करतो तर त्याला याबाबतीत असमर्थ समजले जाईल हे खचित परंतु एकेश्वरवादाची श्रद्धा याला अपवाद राहील की तिचा इन्कार करणारा कदापि माफ केला जाऊ शकत नाही, कारण एकेश्वरवादाची कल्पना मानवी प्रकृतीत उपजतपणे भिनलेली आहे. एकेश्वरवादाच्या उघड निशाण्या प्रत्येकाच्या दृष्टीसमोर सर्वत्र मौजूद आहेत. म्हणून या उघड सत्याच्या इन्कारासाठी मनुष्य कदापि असमर्थ समजला जाऊ शकत नाही. त्याचप्रमाणे अशीही संभावना आहे की, कुफ्रचे काही प्रकार असे असावेत जे अत्यंत कठोर शिक्षेला कारणीभूत ठरावेत, केवळ आखिरत-परलोकातच नव्हे तर या जगातील जीवनातदेखील. हे जग की जे बदल्याचे नव्हे तर केवळ 'कर्माचे' ठिकाण आहे, तरीपण त्यांच्यामुळे मनुष्य अत्यंत वाईट परिणामास पात्र ठरावा. म्हणून कुरआन सांगतो की असे घडणे हेदेखील एक सत्य आहे. याचे पुरावे अनेक वेळा आपल्या डोळ्यांनी पाहिलेले आहेत. अशा प्रकारच्या कुफ्रचे बोलके उदाहरण त्या लोकांचे कुफ्र आहे ज्यांना ईमानचे आवाहन प्रत्यक्षपणे प्रेषितांद्वारे मिळाले होते व ज्यामुळे त्यांच्यासमोर सत्याच्या स्पष्टीकरणात तसेच प्रबोधप्रमाणाच्या पूर्ततेत नाममात्रदेखील उणीव उरलेली नव्हती, अशा लोकांना परलोकात जे काही भोगावे लागेल ते तर लागणारच, पण या जगातदेखील त्यांना अशी शिक्षा केली गेली आहे की त्यांचे वंशदेखील शिल्लक राहिले नाही. भूकंप,



वादळे, ज्वालामुखींचे उद्रेक आणि दगडमारींच्या प्रकोपाने त्यांना क्षणार्धात नष्ट करून टाकले आहे किंवा ईमानधारकांच्या तलवारींनी त्यांचे समूळ उच्चाटन करून टाकले आहे, त्यांना जिम्मी म्हणूनही जिवंत राहू देण्याचा हक्क दिला गेला नाही जेव्हा की इतर कुफ्रधारकांसाठी या हक्काचा लाभ घेण्याची संधी नेहमी बाकी ठेवली गेली आहे.

**शिर्क - अनेकेश्वरवाद आणि मुश्रिक :** शिर्क या अरबी शब्दाचा अर्थ भागिदारी असा होतो. इस्लामी शास्त्राच्या परिभाषेत शिर्क म्हणजे कुणाही गैरईश्वराला[१] ईश्वराच्या अस्तित्वात किंवा त्याच्या गुणवैशिष्ट्यांत[२], किंवा गुणवैशिष्ट्यांच्या स्वाभाविक अनिवार्य गोष्टीत[३] भागिदार ठरविले जावे.

**१)** ईश्वराच्या अस्तित्वात भागिदार ठरविण्याचे काही प्रकार असे आहेत.

**अ)** त्याचे अस्तित्व इतर कुणाच्या अस्तित्वात किंवा इतर कुणाचे अस्तित्व त्याच्या अस्तित्वात विलीन असल्याचे मानणे म्हणजे त्याच्यासंबंधी अद्वैतवाद किंवा अवतारवादाची श्रद्धा बाळगणे.

**ब)** कुणाला त्याच्या जातबिरादरीचा मानणे.

**क)** कुणास त्याचा पिता अथवा पुत्र ठरविणे.

**२)** ईश्वराच्या गुण वैशिष्ट्यात भागिदार ठरविणे म्हणजे सर्वोच्च अल्लाहत जे गुण आहेत त्या गुणांपैकी एखादा गुण इतर कुणाच्या अस्तित्वातही मौजूद असल्याचे मानावे व तशाच विशिष्ट अर्थाने मानले जावे.

**३)** गुणवैशिष्ट्यांच्या स्वाभाविक अनिवार्य गोष्टीत भागिदार ठरविण्याचा अर्थ असा की त्या गुणांची स्वाभाविक निष्पत्ती म्हणून जे हक्क आणि अधिकार सर्वोच्च अल्लाहसाठी विशिष्ट असल्याचे सिद्ध होतात त्यापैकी एखाद्या अधिकाराचा किंवा हक्काचा इतर कुणासही मालक मानले जावे. उदा. ईश्वराचा एक गुण असा की आज्ञा आणि निर्णय देण्याचे सर्व अधिकार त्यालाच आहेत. या गुणाची एक आवश्यक निकड अशी की, भाग्य, चांगले वा वाईट करण्याचे अधिकारसामर्थ्य त्याच्याच अखत्यारीत आहे. दुसरे असे की दाद फिर्याद, विनवण्या आणि प्रार्थना केल्या जाण्याचा हक्क त्यालाच प्राप्त आहे. आता जर एखादा इसम संकटग्रस्त झाल्यानंतर इतर कुणाचा धावा करतो, अथवा आपला एखादा हेतू साध्य करून घेण्यासाठी आपल्या विनवण्या अन्य कुणाच्या हुजूरात सादर करतो तर हे सर्वोच्च अल्लाहच्या एका विशिष्ट गुणाच्या अनिवार्य गोष्टीत भागिदार मानणे ठरेल.

जो इसम असल्या प्रकारच्या श्रद्धा बाळगत असेल म्हणजे सर्वोच्च अल्लाहच्या अस्तित्वात किंवा त्याच्या गुणात किंवा त्या गुणांच्या अनिवार्य गोष्टीत कुणा गैरईश्वराला भागिदार किंवा वाटेकरी असेल तर तो कुरआनच्या शब्दात 'मुश्‌रिक' म्हटला जातो.

'शिर्क'ला कुरआनने 'महाजुलूम' म्हणजे सर्वोच्च अल्लाहचे सर्वात मोठे हक्क मारणे, ठरविले आहे, तसेच ते कदापि माफ न केले जाण्याचेही फर्माविलेले आहे.

**अहलेकिताब-ग्रंथधारक :** 'अहलेकिताब' या अरबी शब्दाचा अर्थ ग्रंथधारक असा होतो. परंतु कुरआनच्या परिभाषेत ज्याप्रमाणे किताब-ग्रंथ या शब्दाला एक मर्यादित व ठराविक अर्थ आहे व त्याच्याने अभिप्रेत निव्वळ ग्रंथ नसून केवळ ईश्वरीग्रंथ असतो त्याचप्रमाणे अहलेकिताबचादेखील एक विशिष्ट व ठराविक अर्थ आहे. याच्याने अभिप्रेत केवळ यहूदी-ज्यू आणि ईसाई-ख्रिस्ती लोक असतात. धर्मग्रंथ मानणारी सर्वच राष्ट्रे किंवा जमाती अभिप्रेत असत नाहीत. हे खरे की ज्या अर्थी 'किताब'ने अभिप्रेत ईश्वरी ग्रंथ असतो त्याअर्थी अहलेकिताबचा अर्थदेखील ईश्वरी ग्रंथ मानणारे असा होईल व तो केवळ काही ठराविक ग्रंथांना मानणाऱ्यांनाच मर्यादितपणे लागू होण्याऐवजी सर्वच ईश्वरी ग्रंथ मानणाऱ्यांपर्यंत विस्तृत असले पाहिजे, परंतु हे खरे असले तरी, हेदेखील एक सर्वमान्य सत्य आहे; की यावेळी जगात जितके धर्मग्रंथ आढळतात त्यापैकी कुरआनने ज्यांची ईश्वरी ग्रंथ म्हणून सत्यता प्रमाणीत केलेली आहे असे केवळ तीनच ग्रंथ आहेत. तौरत(बायबल), इंजील (गोस्पेल) आणि जबूर. म्हणून जेव्हा तो अहलेकिताब असा शब्द प्रयुक्त करील तेव्हा त्याच्याने मर्यादितपणे याच तीन्ही ग्रंथांची अनुयायी राष्ट्रे त्याला अभिप्रेत असणे हे स्वाभाविक आहे.

तौरातच्या आधारावर उदयास येणारे राष्ट्र यहूदी-ज्यू लोक आहेत तर इंजीलद्वारे निर्माण होणारे राष्ट्र ईसाई-ख्रिस्ती लोक आहेत. उरली जबूर तर तिच्या आधारावर कोणतेही वेगळे राष्ट्र उभे राहिले नाही कारण असे की हा एखादा स्वतंत्र ग्रंथ आहे असे नाही तर तौरातची पुरवणी म्हणून तिचे स्वरूप आहे. प्रसिद्ध इस्राईलवंशी प्रेषित हजरत दाऊद (अ.) यांच्यावर ती उतरली होती. तिला यहूदी आणि ईसाई दोन्ही लोक मानतात.

या तीन ग्रंथांखेरीज उरलेल्या ज्या ज्या ग्रंथांना हल्ली दैवी ग्रंथ म्हणून मानले जात आहे, त्यांच्या उल्लेख करण्यासंबंधाने कुरआन स्तब्ध आहे. म्हणून त्यांची सनद व त्यांच्या प्रमाणाच्या आधारावर त्यापैकी कुणासही ईश्वरी ग्रंथ व त्यांच्या अनुयायांना, अहलेकिताब-ग्रंथधारक म्हणण्यास कोणताच वाव नाही तथापि,



अनुमान व कयासाचे दार नेहमी खुले आहे. परंतु अनुमान बरोबरही असू शकतो आणि चूकदेखील, हे उघड आहे. म्हणून त्याला कुरआनी मान्यतेचा व प्रमाणितेचा पर्याय कदापि ठरविला जाऊ शकत नाही. यद्यपि या ठिकाणी चर्चा केवळ एका कुरआनी पारिभाषिक शब्दाच्या अर्थाची व त्याच्या हेतूचीच आहे, दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर चर्चा, कुरआनची मान्यता व सत्यताप्रमाणतेची आहे.

तात्पर्य, अहलेकिताब-ग्रंथधारक हा पारिभाषिक शब्द यहूदी आणि ईसाई लोकांसाठी चिन्ह म्हणून आहे. एखाद्या तिसऱ्या लोकसमूहाला त्या कक्षेत समाविष्ट असलेले समजले जाऊ शकत नाही.

***(मौलाना सद्‌रुद्दीन इस्लाही लिखित 'कुरआनचा परिचय' उर्दूवरून)***

---

# काही संक्षिप्त अक्षरे

* सदरहू ग्रंथाच्या मराठी मजकूरात आलेल्या महत्वाच्या व्यक्तींच्या नावासमोर कंसात काही संक्षिप्त अक्षरे दिलेली आहेत, त्यांचे अर्थ खालीलप्रमाणे आहेत.

**(स.) -** हे अक्षर 'सल्लल्लाहु अलैहिवसल्लम' याचे संक्षिप्त रूप म्हणून आहे. याचा अर्थ, अल्लाहचा त्यांच्यावर लोभ असो व त्यांना शांती लाभो असा होतो. हे प्रार्थनात्मक शब्द विशेषकरून अंतिम पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या नावानंतर उच्चारले जाणे आवश्यक असते.

**(अ.) -** हे अक्षर 'अलैहिस्सलाम' याचे संक्षिप्त रूप आहे. याचा अर्थ त्यांना शांती लाभो असा होतो. हे शब्द सर्वसाधारणपणे ईश्वराच्या प्रेषितांच्या नावानंतर उच्चारले जातात.

**(रजि.) -** हे अक्षर 'रजियल्लाहु अन्हु' याचे संक्षिप्त रूप आहे. याचा अर्थ 'अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला.' असा होतो. हे शब्द विशेषकरून पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे सोबती-सहाबा यांच्या नावानंतर उच्चारले जातात.

**(रह.) -** हे अक्षर 'रहमतुल्लाह अलैह्', याचे संक्षिप्त रूप आहे. याचा अर्थ 'त्यांच्यावर अल्लाहची कृपा असो', असा होतो. वर उल्लेखित व्यक्तींच्या व्यतिरिक्त निधन पावलेल्या इतर महत्वाच्या व्यक्तींच्या नावानंतर हे शब्द उच्चारले जातात.

# १ सूरह अल् फातिहा

*(मक्काकालीन, वचने ७)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

स्तवन[१] फक्त अल्लाहसाठीच आहे जो सर्व सृष्टीचा रब[२] (पालनकर्ता) आहे. एकमात्र कृपावंत आणि दयावंत, निर्णयाच्या दिवसाचा स्वामी आहे. (१-३)

आम्ही तुझीच बंदगी[३] (भक्ती) केरतो आणि तुजपाशीच मदत मागतो.

आम्हाला सरळ मार्ग दाखव. त्या लोकांचा मार्ग ज्याना तू अनुग्रहित केलेस. जे कोपग्रस्त झाले नाहीत व जे मार्गभ्रष्ट नाहीत.[४] (४-७)

१) सदरहू सूरह फातिहा सर्वश्रेष्ठ अल्लाहने, दासांना शिकविला आहे जेणेकरून दासांनी आपल्याकडून विनंती अर्ज म्हणून आपल्या रबच्या हुजूरात तो सादर करावा.

२) 'रब' हा शब्द अरबी भाषेत तीन अर्थांनी बोलला जातो– (अ) मालक, (ब) पालनपोषण करणारा, काळजी वाहणारा व देखरेख करणारा, (क) शासक, आज्ञापक, संयोजक आणि व्यवस्थापक. सर्वश्रेष्ठ अल्लाह या सर्व अर्थांनी सृष्टीचा रब आहे.

३) मूळ अरबी शब्द 'इबादत' (बंदगी) हासुद्धा अरबी भाषेत तीन अर्थांनी बोलला जातो. (अ) भक्ती व आराधना, (ब) ताबेदारी व आज्ञापालन, (क) बंदगी व गुलामी.

४) दासाच्या सदरहू प्रार्थनेचे उत्तर म्हणून हा संपूर्ण कुरआन आहे. दास आपल्या 'रब'कडे मार्गदर्शनाची प्रार्थना करतो आणि 'रब' त्याच्या हाकेला ओ देऊन हा कुरआन प्रदान करतो.



# २ सूरह अल् बकरा

*(मदीनाकालीन, वचने २८६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलीफ लाऽऽम मीऽऽम.[१] हा अल्लाहचा ग्रंथ आहे. यात काही संशय नाही. मार्गदर्शन आहे अल्लाहचे भय बाळगणाऱ्या त्या लोकांसाठी जे परोक्ष[२] वर श्रद्धा ठेवतात, नमाज कायम करतात[३] आणि जी उपजीविका आम्ही त्यांना दिली आहे तिच्यामधून खर्च करतात आणि जो ग्रंथ (हे मुहम्मद स.) तुमच्यावर अवतरला आहे (अर्थात कुरआन) आणि जे (ग्रंथ) तुमच्या पूर्वी अवतरले आहेत त्या सर्वांवर (देखील) जे श्रद्धा ठेवतात आणि मरणोत्तर जीवनावर दृढ विश्वास ठेवतात. (१-४)

असेच लोक आपल्या पालनकर्त्याकडून सरळ मार्गावर आहेत. आणि तेच सफल होणारे आहेत. (५)

ज्या लोकांनी (या गोष्टींचा स्वीकार करण्यास) नकार दिला त्यांच्यासाठी सर्वकाही समान आहे. तुम्ही त्यांना सावध करा अथवा करू नका ते कदापि मानणार (श्रद्धा ठेवणार) नाहीत. अल्लाहने त्यांच्या हृदयांवर शिक्कामोर्तब केले आहे.[४] आणि त्यांच्या कानांवर व डोळ्यांवर पडदा पडलेला आहे. (त्यामुळे) त्यांना कठोर शिक्षा आहे. (६-७)

काही लोक असे आहेत जे सांगतात की आम्ही अल्लाहवर आणि अंतिम

१) ही मुळाक्षरे दिव्य कुरआनच्या काही सूरतींच्या प्रारंभी आढळतात. भाष्यकारांनी यांचे निरनिराळे अर्थ सांगितले आहेत. परंतु यांच्या कोणत्याही अर्थावर एकमत नाही. खरे तर यांचे अर्थ जाणून घेणे अनावश्यक आहे कारण यांचा अर्थ माणसाने जाणला नाही तरी कुरआनपासून मार्गदर्शन प्राप्त करण्यात कोणतीही उणीव उरत नाही.

२) 'परोक्ष'ने अभिप्रेत मानवाच्या ज्ञानेंद्रियापासून लपलेल्या वास्तवता आहेत. त्या कधीही, प्रत्यक्षपणे सामान्य माणसांच्या अनुभवात व पाहण्यात येत नाहीत. उदा. ईश्वराचे अस्तित्व व त्याचे गुण, फरिश्ते, दिव्य प्रकटन (वह्य) जन्नत- स्वर्ग, दोजख- नरक इत्यादी.

३) नमाज कायम करण्याचा अर्थ केवळ इतकाच नव्हे की माणसाने नियमितपणे नमाज अदा करीत रहावे तर सामूहिक रीतीने नमाजची व्यवस्था पद्धतशीरपणे प्रस्थापित केली जावी, असा त्याचा अर्थ होतो. जर एखाद्या वस्तीतील प्रत्येक इसम नियमितपणे वेगळी नमाज पढत असेल, परंतु सामूहिक पद्धतीने हे कर्तव्य पार पाडण्याची व्यवस्था नसेल तर, तेथे नमाज कायम केली जात आहे असे म्हटले जाऊ शकत नाही.

४) अल्लाहने मुहर लावली म्हणून त्यांनी मान्य करण्यास नकार दिला. असा याचा अर्थ नाही तर अर्थ असा आहे की, वर ज्या मौलिक स्वरूपांच्या बाबीचा उल्लेख केला आहे त्यांनी त्या बाबींना रद्दबातल ठरविले व कुरआनने प्रस्तुत केलेल्या मार्गाविरूद्ध दुसरा मार्ग स्वत:साठी पसंत केला आहे. म्हणून अल्लाहने त्यांच्या हृदयांवर व कानांवर मुहर लावून टाकली.

न्यायदिनावर श्रद्धा ठेवतो. वास्तविक ते श्रद्धावंत नाहीत. ते अल्लाह आणि श्रद्धावंतांची फसवणूक करू पाहत आहेत. वस्तुतः ते स्वतःचीच फसवणूक करीत आहेत. परंतु त्यांना ते जाणवत नाही. (८-९)

त्यांच्या हृदयात विकृती[५] आहे. जिला अल्लाहने अधिक वाढू दिली आहे. आणि जे काही खोटे ते बोलताहेत त्याबद्दल त्यांना यातनामय शिक्षा आहे. जेव्हा त्यांना सांगितले जाते की, पृथ्वीवर अनाचार माजवू नका तेव्हा ते म्हणतात की, ''आम्ही तर सुधारणा करणारे आहोत!'' सावधान! हेच लोक अनाचारी आहेत, परंतु त्यांना ते कळत नाही. आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, ''ज्याप्रमाणे इतरांनी श्रद्धा ठेवली त्याचप्रमाणे तुम्हीसुद्धा श्रद्धा ठेवा.'' तेव्हा ते म्हणतात की, ''काय, आम्ही मूर्खांसारखी श्रद्धा ठेवावी? सावधान! हेच लोक मूर्ख आहेत, परंतु त्यांना त्याचे ज्ञान नाही. जेव्हा ते श्रद्धावंतांना भेटतात तेव्हा म्हणतात, ''आम्हीही श्रद्धा ठेवली आहे'' पण जेव्हा ते आपल्या शैतानांना भेटतात तेव्हा म्हणतात की, ''आम्ही तर तुमच्याच बरोबर आहोत आणि या लोकांची थट्टा करीत आहोत. (वास्तविक) अल्लाहच त्यांची थट्टा करीत आहे. त्यांना त्यांच्या बंडखोरीमध्येच राहू देत आहे. (त्यामुळे) ते ह्या बंडखोरीमध्ये असेच भरकटत चालले आहेत. हेच ते लोक आहेत ज्यांनी मार्गदर्शनाच्याऐवजी मार्गभ्रष्टता खरेदी केली आहे. परंतु त्यांच्या या व्यवहारामध्ये न त्यांना फायदा झाला न ते सन्मार्गावर आहेत. त्यांचे उदाहरण असे आहे जसे एखाद्या व्यक्तीने अग्नी प्रज्वलित करावा, त्यामुळे सर्व परिसर प्रकाशमान व्हावा आणि (त्याचवेळी) अल्लाहने ह्यांची दृष्टी हिरावून घ्यावी व ह्याना अशा अवस्थेत सोडावे की अंधारात ह्यांना काहीही दिसू नये.[६] हे बहिरे, मुके (व) आंधळे आहेत. तेव्हा हे मागे परतणार नाहीत. किंवा (ह्यांचे उदाहरण असे आहे की,) आकाशातून पर्जन्याचा वर्षाव होत आहे त्याचबरोबर अंधार, कडकडाट आणि लखलखाटही होत आहे. विजेचा कडकडाट ऐकून जीवाच्या भीतीने कानात बोटे खुपसून घेत आहेत. आणि अल्लाहने ह्या सत्य नाकारणाऱ्यांना (चोहिकडून) वेढले आहे. लखलखाटामुळे ह्यांची अवस्था अशी आहे जणु काही लवकरच ह्यांची दृष्टी हिरावून घेतली जाईल. जेव्हा त्यांच्यावर वीज चमकते तेव्हा त्या प्रकाशात ते पुढे चालू लागतात.

५) 'रोग'ने अभिप्रेत दांभिकतेचा रोग आहे. अल्लाहकडून या रोगांत वाढ करण्याचा अर्थ असा की, दांभिकाला अल्लाह तत्क्षणी शिक्षा करीत नाही तर त्याला सैल दोरी देत जातो व दांभिक आणखी दांभिक बनत जातो.

६) अर्थ असा की, अल्लाहच्या एका दासाने जेव्हा प्रकाश पसरविला आणि सत्याला असत्यापासून वेगळे करून अगदी स्पष्ट केले तेव्हा जे लोक डोळस होते, त्यांच्यावर तर सर्व वास्तवता स्पष्ट झाल्या, परंतु वासनांच्या आहारी जाऊन आंधळे बनलेल्या या दांभिकांना त्या प्रकाशात काहीच दिसले नाही.



आणि जेव्हा त्यांच्यावर अंधार पसरतो तेव्हा ते उभेच राहतात.[७] अल्लाहने जर इच्छिले असते तर ह्यांची श्रवणशक्ती व दृकशक्ती (दृष्टी) पूर्णतः हिरावून घेतली असती. निःसंशय अल्लाह सर्व गोष्टींवर सामर्थ्यवान आहे. (१०-२०)

लोकहो, उपासना (भक्ती) करा आपल्या पालनकर्त्याची ज्याने तुम्हाला आणि तुमच्या पूर्वीच्यांनाही निर्माण केले. जेणेकरून[८] तुम्ही (दुष्कृत्यापासून) परावृत्त राहू शकाल. तोच तर आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीचा बिछाना आणि आकाशाचे छत बनवले. आणि आकाशातून पर्जन्य वर्षविले आणि त्यापासून सर्व प्रकारची फिके व फळे तुमच्या उपजीविकेसाठी उत्पन्न केली. तेव्हा हे जाणत असताना (अन्य कुणालाही) अल्लाहचे समवर्ती ठरवू नका.[९] (२१-२२)

जर तुम्हाला आमच्या दासांवरील या ग्रंथाचे अवतरण आमच्याकडून (साक्षात अल्लाहकडून) असण्याबद्दल शंका असेल तर यातील अध्यायासमान एकच अध्याय रचून दाखवा. आपल्या सर्व समर्थकांना बोलवा. एक अल्लाह शिवाय ज्या कुणाची हवी असेल त्याची मदत घ्या आणि जर तुम्ही खरे असाल तर हे कार्य करून दाखवा. मात्र जर तुम्ही तसे केले नाही आणि कदापि करू शकणार नाही, तर भिऊन असा त्या भयंकर अग्नीला ज्याचे इंधन असेल मानव व दगड[१०] जो सत्याचा विरोध करणाऱ्यांसाठी भडकावलेला असेल. (२३-२४)

आणि हे पैगंबर (स.), जे इमान धारण करतील व सद्वर्तन करतील त्यांना खुशखबर द्या की त्यांच्यासाठी अशी नंदनवने असतील ज्यांच्या खालून झरे वाहत असतील. या बागांतील फळे दिसण्यात जगातील फळांसारखीच असतील. जेव्हा त्यांना एखादे फळ दिले जाईल तेव्हा ते म्हणतील की अशीच फळे यापूर्वी जगात आम्हाला दिली जात असत. त्यांच्यासाठी तिथे पवित्र व चारित्र्यवान जोडीदार असतील. आणि ते

७) पहिले उदाहरण अशा दांभिकांचे होते जे मनात तर पूर्णपणे इन्कार करणारे होते परंतु आपल्या एखाद्या गरजेपायी व हितापोटी मुसलमान बनले होते. हे दुसरे उदाहरण, जे शंकेच्या आणि द्विधा मन:स्थितीत तसेच ईमानच्या दुबळेपणात गुरफटले होते, त्यांचे आहे. काही अंशी ते सत्य मानणारे होते परंतु ज्यासाठी यातना भोगाव्या लागाव्यात व संकटाना तोंड द्यावे लागावे, अशी सत्यनिष्ठा ते मानणारे नव्हते.

८) म्हणजे जगात चुकीची पाहणी व चुक कर्मापासून तसेच परलोकावर (आखिरत) ईश्वराच्या प्रकोपापासून वाचण्याची अपेक्षा.

९) बंदगी व उपासनेच्या विविध प्रकारांपैकी एखाद्या प्रकारचे वर्तन ईश्वराशिवाय इतरांशीही ठेवणे.

१०) म्हणजे त्या ठिकाणी केवळ तुम्हीच दोजख-नरकाग्नीचे इंधन बनणार असे नाही तर ज्यांना तुम्ही आपले उपास्य ठरविले आहे व ज्यांच्यापुढे तुम्ही साष्टांग नमस्कार घालता त्या मूर्तीसुद्धा तेथे तुमच्या समवेत असतील.

सदैव तिथेच राहतील. (२५)

नि:संशय डास किंवा त्यापेक्षाही क्षुद्र गोष्टींचे उदाहरण देण्यास अल्लाहला मुळीच संकोच वाटत नाही.[११] जे लोक श्रद्धा ठेवतात ते जाणतात की हे त्यांच्या पालनकर्त्याकडून आलेले सत्य आहे. आणि जे नाकारणारे आहेत[१२] ते म्हणतात की ''ह्या उदाहरणात अल्लाहचे काय प्रयोजन आहे?'' अल्लाह यामधून कित्येकांना मार्गभ्रष्ट होऊ देईल तर कित्येकांना सन्मार्ग दाखवील. परंतु अवज्ञा करणाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कुणालाही तो मार्गभ्रष्ट होऊ देणार नाही. अल्लाहशी केलेल्या वचनाशी दृढबद्ध झाल्यानंतरही जे वचनभंग करतात[१३] आणि अल्लाहने ज्यांच्याशी संबंध जोडण्याचा आदेश दिला आहे त्याच्याशी संबंध तोडून टाकतात[१४] आणि पृथ्वीवर अनाचार माजवितात हेच ते आहेत जे नुकसान भोगणार आहेत. (२६-२७)

अल्लाहला तुम्ही कसे नाकारता? जेव्हा तुम्ही निर्जीव होतात तेव्हा त्याने तुम्हाला जीवन प्रदान केले. नंतर तोच तुमचे प्राण हरण करील. नंतर तुम्हाला पुनरुज्जीवन देईल. नंतर त्याच्याकडेच तुम्हाला परत जावयाचे आहे. तोच तर आहे ज्याने पृथ्वीमध्ये

**११)** या ठिकाणी एका आक्षेपाचा उल्लेख न करताच त्याचे उत्तर दिले गेले आहे. कुरआनात अनेक ठिकाणी सांगण्याचा हेतू स्पष्ट करण्यासाठी कोळी, माशी, मच्छर इत्यादींची जी दृष्टांते दिली गेली आहेत, त्यावर विरोधकांचा असा आक्षेप होता की ही कसली ईश्वरीवाणी आहे ज्यात अशा तुच्छ वस्तुंची दृष्टांते दिली गेली आहेत.

**१२)** मूळ अरबी शब्द 'फासिक' (अवज्ञाकारी) चा अर्थ, आज्ञाभंग करणारा, आज्ञाधारकतेच्या मर्यादेचे उल्लंघन करणारा असा होता.

**१३)** बादशाह आपल्या सेवकांच्या व प्रजेच्या नावे जे फर्मान व ज्या सूचना जारी करीत असतो, अरबी भाषेत त्यांना करार म्हणून संबोधिले जाते. अल्लाहच्या 'करार'ने अभिप्रेत त्याचे ते कायमस्वरूपी फर्मान आहे, ज्यानुसार अखिल मानवजाती केवळ त्याचीच बंदगी, आज्ञाधारकता आणि भक्ती-आराधना करण्यासाठी आज्ञापित आहे. ''मजबूत बांधीलकीनंतर'' याचा निर्देश त्या घटनेकडे आहे जेव्हा आदमच्या निर्मितीप्रसंगी अखिल मानवजातीकडून सदरहू फर्मानाच्या पालनाची प्रतिज्ञा घेतली गेली होती. जसे सूरह आराफ आयत क्र. १७२ मध्ये सांगितले गेले आहे.

**१४)** म्हणजे ज्या संबंधांच्या प्रस्थापनेवर व दृरढतेवर मानवाचे सामूहिक आणि व्यक्तिगत कल्याण आधारित आहे, व जे निकोप राखण्याचा अल्लाहने आदेश दिला आहे, त्यांच्यावर हे लोक कुऱ्हाड चालवितात.



तुमच्यासाठी सर्व गोष्टी निर्माण केल्या. नंतर आकाशाभिमुख झाला आणि सप्तआकाश[१५] बनविले. आणि तोच प्रत्येक गोष्टीला जाणतो आहे. (२८-२९)

आणि (आठवण करा) जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने दूतांना सांगितले की, ''मी पृथ्वीवर एक खलीफा[१६] (माझा प्रतिनिधी) बनविणार आहे.'' (तेव्हा त्या दूतांनी) विचारले, ''काय, तू हिच्यामध्ये त्याला बनविणार आहेस, जो हिच्यामध्ये अनाचार घडवील आणि रक्तपात करील? (पण) आमच्याकडून तर तुझे स्तवनासह गुणगान होत आहे, पवित्रगान होत आहे. (तेव्हा अल्लाह) म्हणाला, ''मी जाणतो जे तुम्ही जाणत नाही.'' आणि अल्लाहने आदमला सर्व नावे शिकविली. नंतर (त्यांना) (सर्व वस्तूंना) दूतांसमोर ठेवले आणि म्हणाला, ''जर तुम्ही सत्यवादी असाल, तर या वस्तूंची नावे सांगा!'' ते म्हणाले, ''तूच महिमावंत आहेस. तू जे काही आम्हाला शिकवलेस तेवढेच ज्ञान आम्हाला आहे. निःसंशय तूच सर्वज्ञ आणि तत्त्वज्ञ आहेस.'' मग अल्लाहने आदमला सांगितले ''यांना ह्या सर्व वस्तूंची नावे सांग.'' नंतर जेव्हा त्याने (आदमने) दूतांना सर्व नावे सांगितली तेव्हा (अल्लाह) म्हणाला, ''काय, मी तुम्हाला सांगितले नव्हते की, आकाश आणि पृथ्वीमधील गुप्त गोष्टी मीच जाणतो आणि मी तेही जाणतो जे काही तुम्ही प्रकट करता आणि जे काही लपविता?'' (३०-३३)

आणि (आठवण करा) जेव्हा आम्ही दूतांना आदेश दिला की, ''आदमच्या पुढे नतमस्तक व्हा. तेव्हा सर्वजण नतमस्तक झाले. परंतु इब्लीस झाला नाही. त्याने नाकारले व अहंकार केला आणि अवज्ञाकारींपैकी झाला. (३४)

मग आम्ही आदमला सांगितले की, ''हे आदम, तू आणि तुझी पत्नी दोघेही स्वर्गामध्ये राहा आणि इथे मनसोक्त हवे ते खा. परंतु ह्या झाडाच्या जवळ जाऊ नका. अन्यथा तुम्ही अत्याचारी व्हाल.'' (पण) शेवटी शैतानाने त्यांना त्यापासून मार्गभ्रष्ट केले आणि जिथे ते होते तिथून बाहेर काढले. (तेव्हा) आम्ही आदेश दिला की, ''खाली उतरा तुम्ही एकमेकांचे शत्रू आहात. आणि तुम्हाला एका निश्चित काळापर्यंत पृथ्वीवर रहावयाचे आहे. आणि तिथेच निर्वाह करायचा आहे. नंतर आदमने आपल्या पालनकर्त्याकडून काही

**१५)** सात आकाशांची वास्तवता काय आहे हे ठरविणे कठीण आहे. मानव प्रत्येक काळी आकाश किंवा दुसऱ्या शब्दांत वरच्या जगासंबंधी आपले निरीक्षणानुसार अथवा अनुमानानुसार विभिन्न कल्पना मांडित आला आहे. परंतु त्या कल्पना नेहमी बदलत राहिल्या आहेत. संक्षिप्तपणे इतकेच समजून घेतले पाहिजे की, याने अभिप्रेत एकतर असे की पृथ्वीच्या व्यतिरिक्त जी सृष्टी आहे तिला अल्लाहने सात भक्कम कक्षेत विभागून ठेवले आहे. अथवा असे की पृथ्वी या सृष्टीच्या ज्या भागात आहे तो भाग सात कक्षेत विभागलेला आहे.

**१६)** खलीफा म्हणजे तो, जो एखाद्याच्या मिळकतीत त्याने प्रदान केलेल्या अधिकारांचा त्याचा प्रतिनिधी म्हणून वापर करतो.

वचने शिकून घेतली. आणि पश्चात्ताप व्यक्त केला. तेव्हा अल्लाहने त्याच्या पश्चात्तापाचा स्वीकार केला. निःसंशय तो क्षमावंत आणि दयावंत आहे. (३५-३७)

आम्ही सांगितले की, ''तुम्ही सर्वजण इथून खाली उतरा. नंतर जर माझ्याकडून तुमच्याकडे काही मार्गदर्शन लाभले तर जे माझ्या मार्गदर्शनाचे अनुसरण करतील तर त्यांना न कोणते भय असेल न ते कधी शोक करतील. आणि जे लोक हे नाकारतील आणि आमच्या वचनांना खोटे ठरवतील तेच नरकाग्नीमध्ये पडतील आणि तिथेच सदैव खितपत राहतील. (३८-३९)

''हे इस्राईलच्या संततीनो,[१७] आठवण करा माझ्या त्या अनुग्रहाची जो मी तुमच्यावर केला होता आणि माझ्याशी केलेल्या वचन-कराराची तुम्ही पूर्तता करा. तुमच्याशी केलेल्या कराराची मी पूर्तता करीन. आणि फक्त माझेच भय बाळगा. आणि जो ग्रंथ मी अवतरला आहे त्यावर श्रद्धा ठेवा. जो तुमच्याजवळ असलेल्या ग्रंथाचे समर्थन करणारा आहे. आणि त्याला सर्वांपेक्षा अधिक नाकारणारे तुम्ही होवू नका. आणि माझ्या संकेतवचनांना अल्पशः लाभासाठी[१८] विकू नका. माझ्या कोपापासून स्वतःला वाचवा आणि सत्याला असत्याचे आवरण घालून सत्य लपवू नका जेव्हा तुम्ही जाणता. नमाज कायम करा, जकात अदा करा आणि जे माझ्यापुढे झुकत आहेत त्यांच्यासोबत तुम्हीही झुका. तुम्ही तर इतरांना सन्मार्गाचा अंगिकार करण्यास सांगता परंतु स्वतःला मात्र विसरता? वास्तविक तुम्ही ग्रंथाचे वाचन करीत आहात. काय तुम्ही बुद्धीचा मुळीच उपयोग करीत नाही? संयम व नमाजाचे सहाय्य घ्या. निःसंशय नमाज हे अत्यंत कठीण कर्म आहे. परंतु त्या सेवकांसाठी कठीण नाही जे जाणतात की सरतेशेवटी आपल्या पालनकर्त्याला भेटावयाचे आहे. आणि त्याच्याचकडे परत जावयाचे आहे.'' (४०-४६)

''हे इस्राईलच्या संततीनों, आठवण करा माझ्या अनुग्रहाची ज्याने मी तुम्हाला उपकृत केले होते. आणि जगातील सर्व जनसमुहावर श्रेष्ठत्व प्रदान केले होते.[१९] आणि

**१७)** मदीना शहराच्या व त्याच्या निकटच्या प्रदेशात यहूदी लोकांची मोठी संख्या वसलेली होती म्हणून येथून पुढे अनेक रुकुअ-खंड-पर्यंत त्यांना संबोधून प्रचार केला गेला आहे.

**१८)** 'थोड्या किंमतीवर'ने अभिप्रेत ते भौतिक लाभ आहेत, ज्यांच्यासाठी हे लोक अल्लाहच्या आज्ञांना व त्याच्या सूचनांना रद्द करीत होते. सत्याला विकून त्याच्या मोबदल्यात माणसाने सबंध जगातील धन जरी मिळविले तरी कोणत्याही परिस्थितीत ते मोल थोडेच आहे. कारण सत्य खचितच त्यापेक्षा बहुमोल गोष्ट आहे.

**१९)** याचा अर्थ असा नव्हे की तुम्हाला निरंतर जगातील सर्व राष्ट्रांपेक्षा श्रेष्ठ ठरविले आहे तर अर्थ असा की एक काळ होता जेव्हा जगातील राष्ट्रांपैकी तुम्हीच एक असे राष्ट्र होता ज्याच्याजवळ अल्लाहने दिलेले सत्यज्ञान होते व ज्यांना जगातील सर्व राष्ट्रांचा नेता आणि मार्गदर्शक बनविले होते, जेणेकरून त्यांनी आपल्या रबच्या मार्गाकडे सर्व लोकांना बोलवावे व चालवावे.



त्या दिवसाचे भय बाळगा जेव्हा कुणीही कुणाच्या यत्किंचितही उपयोगी पडणार नाही. कुणाकडून शिफारसही स्वीकारली जाणार नाही. व कुणालाही मोबदला घेऊन सोडले जाणार नाही. आणि गुन्हेगारांना कुठूनही मदत मिळू शकणार नाही.'' (४७-४८)

''आठवण करा त्या वेळेची जेव्हा आम्ही तुम्हाला फिरऔनी[२०] सत्तेच्या गुलामगिरीतून मुक्त केले. ज्यांनी तुम्हाला भयंकर यातनेत अडकवून ठेवले होते; तुमच्या मुलांना ठार करीत होते आणि तुमच्या मुलींना जिवंत ठेवीत होते. (वास्तविक) त्या स्थितीत तुमच्या पालनकर्त्याकडून तुमची परीक्षा पाहिली जात होती. (४९)

आठवण करा जेव्हा आम्ही समुद्र दुभंगून तुम्हाला सुखरूप पार केले. नंतर तिथेच तुमच्या डोळ्यांदेखत फिरऔनच्या लोकांना बुडवून टाकले. (५०)

आठवण करा, जेव्हा आम्ही मूसा (अ.) यांना चाळीस रात्रींच्या करारावर बोलविले[२१] तेव्हा तुम्ही त्याच्या मागे वासराचीच पूजा केलीत. तेव्हा तुम्ही घोर अत्याचार केलात. परंतु तरीही आम्ही तुम्हाला क्षमा केली जेणेकरून तुम्ही कृतज्ञ व्हाल. (५१-५२)

आठवण करा जेव्हा तुम्ही हा अत्याचार करीत होतात तेव्हा आम्ही मूसाला ग्रंथ व सत्यासत्यतेची कसोटी[२२] प्रदान केली होती, की जेणेकरून तुम्ही सन्मार्ग प्राप्त करू शकाल. (५३)

आठवण करा जेव्हा मूसा (अ.) (हा कृपाप्रसाद घेऊन परतला तेव्हा तो) आपल्या लोकांना म्हणाला की, ''लोकहो, तुम्ही वासराला उपास्य ठरवून स्वतःवर भयंकर अत्याचार केलात. तेव्हा तुम्ही आपल्या निर्मात्याच्या पुढे पश्चात्ताप व्यक्त करा आणि आपल्या लोकांना मारा[२३] (ज्यांनी हा घोर अन्याय केला) यातच तुमच्या पालनकर्त्यापाशी तुमचे भले आहे. त्यावेळी तुमच्या निर्मात्याने तुमचा पश्चात्ताप स्वीकारला. तो अत्यंत क्षमावंत आणि दयावंत आहे. (५४)

**२०)** मूळ अरबी शब्द 'आलेफिरऔन'चे भाषांतर आम्ही सदरहू शब्दात केले आहे. त्यात फिरऔनी घराणे तसेच मिसरचा सत्ताधारी वर्ग दोन्ही सामील आहेत.

**२१)** म्हणजे मिसरहून सुटका मिळाल्यानंतर जेव्हा बनीइस्राईल लोक सीना द्विपकल्पात पोहचले तेव्हा हजरत मूसा (अ.) यांना सर्वश्रेष्ठ अल्लाहने चाळीस दिवस आणि चाळीस रात्रींसाठी तूर पर्वतावर पाचारण केले जेणेकरून तेथे या लोकांसाठी, जे आता स्वतंत्र झाले होते, शरीअतचे कायदे आणि व्यवहारिक जीवनाच्या सूचना प्रदान कराव्यात.

**२२)** 'फुर्कान'ने अभिप्रेत, ती गोष्ट आहे जिच्याद्वारे सत्य आणि असत्यातील फरक स्पष्ट व्हावा. अर्थात ते धर्मज्ञान आणि धर्मबोध आहे. ज्याद्वारे माणूस सत्य आणि असत्यातील फरक ओळखू शकतो.

**२३)** म्हणजे आपल्या त्या माणसांना ठार करा ज्यांनी वासराला उपास्य ठरविले व त्याची पूजा केली.

आठवण करा जेव्हा तुम्ही मूसाला सांगितले होते की, आम्ही तुमच्या सांगण्यावर कदापि विश्वास ठेवणार नाही जोपर्यंत आमच्या डोळ्यांनी उघडपणे अल्लाहला (तुझ्याशी बोलताना) पाहात नाही. त्यावेळी एका कडकडाटाने तुम्हाला गाठले आणि तुम्ही अचेत होऊन कोसळलात. परंतु आम्ही तुम्हाला पुन्हा सचेत उभे केले जेणेकरून या उपकारानंतर तरी तुम्ही कृतज्ञ राहाल. (५५-५६)

आम्ही तुमच्यावर ढगांची सावली केली. 'मन्न' आणि 'सल्वा'चे अन्न तुम्हाला उपलब्ध करून दिले. तेव्हा तुमच्यासाठी ज्या स्वच्छ वस्तू तुम्हाला प्रदान केल्या आहेत त्याचा उपभोग घ्या. (परंतु तुमच्या पूर्वजांनी जे काही केले) तो त्यांनी आमच्यावर केलेला अत्याचार नसून त्यांनी स्वतःच त्यांच्यावर अत्याचार केला होता. (५७)

आठवण करा जेव्हा आम्ही तुम्हाला सांगितले होते की, (जी वस्ती तुमच्यासमोर आहे) त्यामध्ये दाखल व्हा. तिथे जे उत्पन्न होते त्याचा मनसोक्त उपभोग घ्या परंतु वसाहतीच्या दरवाजातून नतमस्तक होऊन प्रवेश करा आणि 'हित्ततून' 'हित्ततून'[२४] म्हणत जा. आम्ही तुमच्या अपराधांना दुर्लक्षित करू आणि सदाचाऱ्यांना खूप कृपा व दयेने उपकृत करू. परंतु जी गोष्ट त्यांना सांगितली होती तिला अत्याचाऱ्यांनी बदलून वेगळीच बनविली. सरतेशेवटी अत्याचार करणाऱ्यांविरूद्ध आम्ही आकाशातून प्रकोपाचा वर्षाव केला. ही शिक्षा होती त्या अवज्ञाकारांसाठी जी ते करीत होते. (५८-५९)

आठवण करा जेव्हा मूसा (अ.) यांनी आपल्या लोकांसाठी पाणी मिळावे म्हणून प्रार्थना केली तेव्हा आम्ही सांगितले की, ''अमुक खडकावर आपली काठी मारा'' त्यामुळे बारा स्रोत उसळून आले. आणि प्रत्येक टोळीने ओळखले की कोणता पाणवठा[२५] आपल्यासाठी आहे. (त्यावेळी हे मार्गदर्शन केले होते की) अल्लाहने दिलेल्या उपजीविकेचा उपभोग घ्या. आणि पृथ्वीवर अनाचार माजवत फिरू नका. (६०)

आठवण करा जेव्हा, तुम्ही सांगितले होते की, ''हे मूसा, आम्ही एकाच प्रकारच्या अन्नाचा उपभोग घेऊन संयम करू शकत नाही. आपल्या पालनकर्त्याकडे याचना करा की आमच्यासाठी जमिनीमधून पिके, भाजीपाला, गहू, लसूण, कांदा डाळी वगैरे उत्पन्न करावे.'' तेव्हा मूसा (अ.) ने सांगितले की, ''एक उत्तम प्रकारच्या वस्तूऐवजी तुम्ही कनिष्ठ दर्जाच्या वस्तू घेऊ इच्छिता?'' ठीक, कोणत्यातरी शहरी वस्तीमध्ये जाऊन राहा, जे काही तुम्ही मागता ते तिथे मिळेल.'' सरतेशेवटी इतकी पाळी आली की त्यांच्यावर

**२४)** 'हित्ततुन'चे दोन अर्थ असू शकतात. एक असे की ईश्वराकडे आपल्या अपराधांबद्दल क्षमायाचना करीत जा, दुसरे असे की लुटमार आणि कत्तलीऐवजी वस्तीतील रहिवाशांसाठी क्षमा आणि माफीची घोषणा देत जा.

**२५)** बनीइस्राईल लोकांची १२ घराणी होती. ईश्वराने प्रत्येक घराण्यासाठी वेगळा झरा काढला जेणेकरून त्यांच्यात पाण्यासाठी भांडण होऊ नये.



अपमान, अधोगती व दुर्दशा ओढवली. आणि ते अल्लाहच्या कोपाने वेढले गेले. हा परिणाम यामुळेच झाला की, अल्लाहच्या संकेताशी ते द्रोह करू लागले आणि प्रेषितांची नाहक हत्या करू लागले. हे ह्यामुळेच घडले कि त्यांनी अवज्ञा केली आणि शरिअत कायद्याचे वारंवार उल्लंघन केले. (६१)

निसंशय जे श्रद्धावंत (मुहम्मद स. यांच्यावर श्रद्धा ठेवणारे) आहेत. तसेच यहुदी, ईसाई किंवा साबिईन आहेत जे जे कोणी अल्लाह व मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवतील आणि सत्कर्मे करतील त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी आहे. त्यांना न कोणते भय असेल न ते कधी शोक करतील.[२६] (६२)

आठवा तो प्रसंग, जेव्हा आम्ही तूर पर्वताला तुमच्यावर अधांतरी उचलून धरले व तुमच्याकडून पक्के वचन घेतले आणि सांगितले कि, ''जो ग्रंथ आम्ही तुम्हाला देत आहोत त्यानुसार आचरण करण्याच्या दृढ निश्चयाने त्याचा स्वीकार करा आणि जे आदेश त्यामध्ये दिले आहेत त्याचे स्मरण ठेवा. जेणेकरून तुम्ही धर्मपरायणतेच्या मार्गावर चालू शकाल''. परंतु त्यानंतर तुम्ही आपल्या वचनाकडे पाठ फिरवली तरीदेखील अल्लाहचा अनुग्रह आणि त्याच्या दयेने तुमची साथ सोडली नाही अन्यथा तुम्ही केव्हाच उध्वस्त झाला असतात. (६३-६४)

तसेच तुम्हाला आपल्या जमातीपैकी त्या लोकांची गोष्ट तर माहितच आहे ज्यानी

**२६)** लिखाणातील संदर्भ दृष्टीसमोर ठेवले असता ही गोष्ट आपोआपच स्पष्ट होते की या ठिकाणी ईमान आणि सत्कर्माचा तपशील सांगण्याचा हेतू नाही की माणसाने कोणकोणत्या गोष्टी मानाव्यात आणि कोणकोणती कर्मे करावीत म्हणजे ईश्वराच्या ठायी मोबदल्यास तो पात्र ठरेल. या ठिकाणी तर हेतू यहूदी लोकांच्या या खोट्या अभिमानाचे खंडन करण्याचा आहे की ते यहूदी लोकसमूहालाच केवळ मुक्तीचा मक्तेदार समजत असत. ते संभ्रमात होते की त्यांच्या समूहाशी ज्यांचा संबंध आहे मग श्रद्धा व कृत्याच्या दृष्टीने ते कसेही का असेनात कोणत्याही परिस्थितीत मुक्ती त्यांच्यासाठी ठरलेली आहे. उरले, त्यांच्या समूहाशी संबंधित नसलेले इतर सर्व लोक तर ते केवळ नरकाचे इंधन बनण्यासाठीच जन्मास आले आहेत. त्यांची ही चुकीची कल्पना दूर करण्यासाठी फर्माविले जात आहे की अल्लाहजवळ वास्तविक गोष्ट तुमच्या या गटबाज्या नव्हेत तर जी गोष्ट विश्वासार्ह आहे ती म्हणजे ईमान आणि सत्कर्म होय. कोणताही मनुष्य या गोष्टी घेऊन जर हजर झाला तर तो आपल्या रबकडून आपला मोबदला प्राप्त करील. ईश्वरापाशी माणसाच्या गुणावर निर्णय दिला जाईल, तुमच्या जनगणनेच्या नोंदवहीवरून नव्हे.

सब्तच्या[२७] नियमाचा भंग केला होता. तेव्हा आम्ही त्यांना सांगितले की ''माकडे व्हा आणि अशा अवस्थेमध्ये रहा कि सर्व बाजूंनी तुमचा धिक्कार होवो.'' अशा तऱ्हेने आम्ही त्यांच्या झालेल्या परिणामाना तत्कालीन लोकांसाठी आणि नंतर येणाऱ्या पिढ्यांसाठी बोध आणि शिकवण ठेवली. (६५-६६)

नंतर तो प्रसंगही आठवा जेव्हा मूसाने आपल्या लोकांना सांगितले कि अल्लाह तुम्हाला एका गाईचा बळी देण्यास सांगत आहे. तेव्हा ते म्हणू लागले, ''तुम्ही आमची थट्टा करता काय? तेव्हा मूसा म्हणाला कि असे अज्ञानी कृत्य करण्यापासून (परावृत्त राहण्यासाठी) मी अल्लाहकडे शरण मागतो. तेव्हा ते म्हणाले, ठीक आहे. आपल्या पालनकर्त्याकडे प्रार्थना करा कि त्याने गाईविषयी सविस्तर सांगावे. मूसाने म्हटले, ''अल्लाहचा आदेश आहे की, गाय न वृद्ध असावी न अति लहान. मध्यम वयाची हवी. आता ईशआज्ञेचे अनुपालन करा.'' म्हणू लागले ''अल्लाहला पुन्हा विचारा, तिचा रंग कसा असावा.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''अल्लाहची इच्छा आहे, पिवळ्या जर्द रंगाची गाय हवी की पाहणाऱ्यांचे मन प्रसन्न व्हावे.'' पुन्हा म्हणू लागले, ''अल्लाहला स्पष्ट विचारून सांगा की, गाय कशी असावी. आम्ही तिच्यासंबंधी संभ्रमात आहोत. अल्लाहने इच्छिले तर आम्ही ती शोधून काढू''. मूसाने उत्तर दिले, ''अल्लाह फर्मावितो कि ती गाय अशी असावी जी राबविण्यांत आलेली नसेल किंवा जमीनही नांगरत नसेल अथवा पाणीही उपसत नसेल, धष्टपुष्ट परंतु डाग नसलेली असावी. त्यावर ते म्हणाले कि, ''होय आता तुम्ही ठीक ठीक सांगितलेत. त्यानंतर त्यांनी तिचा बळी दिला एरव्ही ते असे करतील असे वाटले नव्हते.[२८] (६७-७१)

तुम्हाला आठवतो तो प्रसंग जेव्हा तुम्ही एका व्यक्तीचे प्राण घेतले होते. मग तिच्यासंबंधी भांडू लागला होतात. व एकमेकांवर खुनाचा आरोप ठेवू लागला होतात, आणि अल्लाहने निर्णय घेतला होता कि जे काही तुम्ही लपवीत आहांत तो ते उघडकीस

**२७)** 'सब्त' म्हणजे शनिवार, बनीइस्राईलसाठी असा नियम घातला गेला होता की शनिवारला त्यांनी विश्रांती आणि उपासनेसाठी राखीव ठेवावा. त्या दिवशी कोणत्याही प्रकारचे सांसारिक काय इथपावेतो की स्वयंपाकाचे काम सुद्धा त्यांनी स्वत:ही करू नये व आपल्या सेवकाकडूनदेखील ते घेऊ नये.

**२८)** बनीइस्राईल लोकांना मिसरवासी आणि त्यांच्या शेजारील जातीकडून गाईची महत्ता, तिचे पावित्र्य आणि गायपूजेच्या रोगाची लागण लागली होती. याच कारणाने त्यांनी मिसरहून बाहेर निघताच वासराला उपास्य बनविले होते, म्हणून त्यांना आज्ञा दिली गेली की गाय बळी द्या. त्यांनी बगल देण्याचा प्रयत्न केला व तपशील विचारू लागले. परंतु जितका जितका तपशील ते विचारीत गेले तितकेच ते गुरफटत गेले. येथपावेतो की सरतेशेवटी तीच विशिष्ट प्रकारची सोनेरी गाय, जिला त्याकाळी पूजेसाठी विशिष्ट राखले जात होते, जणू बोट ठेवून सांगितले गेले की बलिदान करा.



आणील. त्यावेळेस आम्ही आज्ञा केली कि खून झालेल्या व्यक्तीच्या शवाला तिच्या एका भागाने आघात करा. पहा, अशाप्रकारे अल्लाह मृतांना पुनरुज्जीवन देतो आणि तुम्हाला आपले संकेत-चिन्हे दाखवितो जेणेकरून तुम्ही समजावे. परंतु असे संकेत-चिन्हे पाहून देखील शेवटी तुमची हृदये कठोर झाली, अगदी दगडाप्रमाणे कठोर. किंबहुना कठोरतेमध्ये त्यापेक्षाही अधिक. कारण दगडामध्ये एखादा असा असतो ज्याला पाझर फुटतो. आणि फुटून त्यामधून पाणी बाहेर पडते. व अल्लाहच्या भयाने तो खालीही कोसळतो. अल्लाह तुमच्या कारवायांपासून अनभिज्ञ नाही. (७२-७४)

हे मुस्लिमांनो, काय तुम्ही ह्या लोकांकडून अशी अपेक्षा करता कि हे तुमच्या आवाहनावर ईमान धारण करतील?[२९] वास्तविक यांच्यापैकी एका गटाची प्रवृत्ती अशी आहे कि अल्लाहची वाणी त्यांनी ऐकली आणि त्यानंतर चांगल्याप्रकारे समजून उमजून देखील हेतुपुरस्सर तिला विकृत केले. (अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर) ईमान धारण करणाऱ्यांना जेव्हा हे भेटतात तेव्हा म्हणतात कि ''आम्ही देखील ईमानधारक आहोत.'' परंतु जेव्हा आपसांत एकमेकांशी एकांतात बोलतात तेव्हा म्हणतात कि ''काय मूर्ख झालांत?'' या लोकांना त्या गोष्टी सांगता ज्या अल्लाहने तुम्हांवर उघड केल्या आहेत की ज्यामुळे त्यांनी तुमच्या पालनकर्त्याजवळ तुमच्या विरोधात त्या सादर कराव्यात? काय हे जाणत नाहीत कि जे काही ते लपवितात आणि जे काही ते प्रकट करतात ते सर्वकाही अल्लाह जाणतो आहे? यांच्यामध्ये दुसरा एक गट निरक्षरांचा आहे. ज्यांना धर्मग्रंथाचे ज्ञान तर नाहीच. फक्त आपल्या इच्छा-आकांक्षांना ते कवटाळून बसले आहेत आणि केवळ भ्रामक कल्पनेंत भरकटत चालले आहेत, तेव्हा त्या लोकांचा विनाश व विध्वंस आहे जे आपल्या हातांनी ग्रंथ लिहितात आणि लोकांना सांगतात कि ''हा अल्लाहकडून आलेला आहे.'' जेणेकरून त्याच्या मोबदल्यात काही लाभ करून घ्यावा. त्यांच्या हातांनी हे लिहिलेले देखील त्यांच्यासाठी विध्वंसाची सामुग्री आहे. आणि त्यांची ही कमाई देखील त्यांच्यासाठी विनाशकारक आहे. ते म्हणतात कि ''नरकाग्नी आम्हाला कदापि स्पर्ष करू शकणार नाही. फक्त काही थोड्या दिवसांची शिक्षा कदाचित झाली तर होईल.'' त्यांना विचारा ''काय तुम्ही अल्लाहकडून एखादे वचन घेतले आहे जे तो भंग करू शकणार नाही? किंवा अल्लाहच्या नांवावर अशा गोष्टी बोलता ज्याविषयी तुम्हाला

**२९)** हे व्याख्यान त्या नवमुस्लिमांना उद्देशून आहे ज्यांनी निकटच्या काळातच पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर ईमान आणले होते. त्यांच्या कानी अगोदरपासूनच प्रेषितत्व, ग्रंथ, फरिश्ते, परलोक, शरीअतच्या ज्या गोष्टी आल्या होत्या, त्या सर्व त्यांनी आपले शेजारी यहूदी लोकांकडून ऐकल्या होत्या. म्हणूनच त्यांची अशी अपेक्षा होती की जे लोक पूर्वीपासूनच प्रेषित आणि ग्रंथाचे अनुयायी आहेत, व ज्यांनी दिलेल्या बातम्यांमुळेच आम्हाला ईमानरूपी देणगी प्राप्ता झाली आहे, ते जरूर आम्हाला साथ देतील, किंबहुना या मार्गात पुढे पुढे राहतील.

ज्ञान नाही?'' काय त्यांची जबाबदारी अल्लाहने घेतली आहे? तुम्हाला नरकाग्नि का शिवणार नाही. जो कोणी वाईट (कर्मे) कमवील आणि अपराधाच्या दुष्चक्रांत अडकून पडेल तो नरकवासी असेल आणि नरकामध्येच सदैव खितपत पडेल. परंतु जे ईमान धारण करतील व सदाचार करतील तेच स्वर्गात वास करणारे असतील आणि ते सदैव स्वर्गात राहतील. (७५-८२)

आठवण करा, इस्राईलच्या संततीकडून आम्ही दृढ वचन घेतले होते कि अल्लाहशिवाय अन्य कुणाचीही भक्ती करू नका. मातापित्याशी, नातेवाईकांशी, अनाथ व गोरगरीबांशी चांगले वागा. लोकांना चांगल्या गोष्टी सांगा. नमाजचे पालन करा आणि जकात द्या. परंतु थोडे लोक वगळता तुम्ही सर्वांनी ह्या वचनाकडे पाठ फिरवलीत. आणि अजूनही पाठ फिरवीत आहात. तसेच आठवण करा, आम्ही तुमच्याकडून दृढ वचन घेतले होते कि आपसांत एकमेकांचे रक्त सांडू नका. एकमेकांना आपल्या घरापासून बेघर करू नका. आणि तुम्ही ते मान्यही केले होते. आणि स्वत: त्याचे साक्षीही आहात. परंतु आज तुम्ही तेच आहात जे आपल्या बांधवाची हत्या करता. आपल्या बांधवांपैकी काही लोकांना देशाबाहेर काढीत आहात. अत्याचार आणि अतीरेक करून त्यांच्याविरूद्ध कटकारस्थान करता. आणि जेव्हा ते युद्धबंदी होऊन तुमच्यापुढे येतात तेव्हा त्याना बंधमुक्त करण्यासाठी आर्थिक दंड घेता. वास्तविक त्यांना घराबाहेर काढणेच तुमच्यासाठी निषिद्ध होते. तर काय तुम्ही ग्रंथाच्या एका भागावर श्रद्धा ठेवता आणि दुसऱ्या भागाला नाकारता? तुमच्यापैकी जे लोक असे करतील त्यांच्यासाठी याशिवाय अन्य कोणती शिक्षा असेल कि ह्या ऐहिक जीवनामध्येही कठोर यातनांकडे त्यांना नेले जाईल. अल्लाह त्या कारवायांपासून अनभिज्ञ नाही ज्या तुम्ही करीत आहात. हे तेच लोक आहेत ज्यांनी मरणोत्तर जीवनाचा सौदा करून हे नश्वर जीवन खरेदी केले आहे. न ह्याची शिक्षा कमी होईल न ह्यांना कोणती मदत लाभेल. (८३-८५)

आम्ही मूसा (अ.) ला ग्रंथ दिला त्यानंतर सतत प्रेषित पाठविले. शेवटी मरियमपुत्र ईसाला स्पष्ट संकेत देऊन पाठविले. आणि पवित्र आत्म्याद्वारे[३०] त्याला मदत केली. पण तुमची ही कोणती रीत आहे कि जेव्हा जेव्हा कुणी प्रेषित तुमच्या इच्छेविरूद्ध कोणती गोष्ट घेऊन तुमच्याकडे आला तेव्हा तुम्ही त्या विरूद्ध बंडखोरी केलीत? काहीना खोटे ठरविलेत. तर काहींची हत्या केलीत. ते म्हणतात ''आमची हृदये सुरक्षित आहेत.'' कदापि नाही! सत्य गोष्ट ही आहे की त्यांच्या द्रोहामुळे अल्लाहने त्यांना धिक्कारलेले आहे म्हणून अल्पशीच श्रद्धा ते ठेवतात. तसेच आता जो ग्रंथ अल्लाहकडून त्यांच्याकडे आला

३०) 'पवित्र आत्मा'ने अभिप्रेत दिव्य प्रकट ज्ञानच आहे. आणि ते ज्ञान घेऊन येणारे जिब्रईल देखील आहेत. तसेच हजरत येशू मसीह यांचा पवित्र आत्मा, ज्यास अल्लाहने पवित्र गुणांनी सुशोभित केले होते, तो देखील आहे.



आहे त्याच्याशीही त्यांचे वर्तन कसे आहे? इतकं असूनही कि तो ग्रंथ त्यांच्यापाशी आधीपासून असलेल्या ग्रंथाचे समर्थन करीत आहे आणि तो येण्यापूर्वी हे स्वत: नास्तिकांविरूद्ध विजय व मदत मिळण्यासाठी प्रार्थना करीत होते.[३१] परंतु ती गोष्ट जेव्हा आली जिला त्यांनी ओळखले देखील तरीही त्यांनी ती मान्य करण्यास नकार दिला. अल्लाहकडून धिक्कार होवो ह्या नाकारणाऱ्यांचा! किती वाईट साधन आहे ज्याद्वारे हे लोक आपल्या जीवाचे समाधान करून घेत आहेत![३२] कि जे मार्गदर्शन अल्लाहने अवतरले आहे त्याचा स्वीकार करण्यास केवळ ह्याच दुराग्रहामुळे ते नकार देत आहेत कि अल्लाहने (अवतरण व प्रेषितत्व) देऊन आपल्या सेवकाला स्वेच्छापूर्वक अनुग्रह दिला.[३३] तेव्हा आता ते प्रकोपापाठोपाठ प्रकोपांस पात्र ठरले आहेत. अशा नाकारणाऱ्यांसाठी अपमानास्पद शिक्षा ठरलेलीच आहे. (८६-९०)

जेव्हा त्यांना सांगितले जाते कि अल्लाहने जे काही अवतरले आहे त्यावर ईमान धारण करा तेव्हा ते म्हणतात की, ''आम्ही तर केवळ त्यावर ईमान धारण करतो जे आमच्याकडे (अर्थात इसराईलच्या संततीकडे) अवतरले आहे. त्याव्यतिरिक्त जे काही आले आहे ते मानण्याचे नाकारतात. वास्तविक ते सत्य आहे आणि त्या शिकवणीचे समर्थन करीत आहे जे ह्यांच्याकडे आधीपासून आहे. त्यांना सांग की, ''जर तुम्ही फक्त त्याच शिकवणीवर विश्वास ठेवणार असाल जी तुमच्याकडे आली आहे तर यापूर्वी अल्लाहच्या त्या प्रेषितांची (जे खुद्द इसराईलच्या वंशामध्ये जन्मले होते) हत्या का केली? तुमच्याकडे कसकशा स्पष्ट संकेतांसह मूसा आले, तरीही तुम्ही असे अत्याचारी झालांत की त्यांची पाठ फिरताच वासराला उपास्य बनविले. जरा त्या दृढ वचनाचे स्मरण करा जे तूर पर्वताला तुमच्यावर उचलून धरून तुमच्याकडून आम्ही घेतले होते. आणि ताकीद दिली होती कि ''जो आदेश आम्ही देत आहोत त्याचे दृढतेने पालन करा आणि लक्षपूर्वक ऐका.'' तेव्हा तुमच्या पूर्वजांनी सांगितले कि, ''आम्ही ऐकले परंतु ते आम्ही मानणार नाही.'' त्यांच्या खोटेपणाची अवस्था अशी होती कि त्याच्या मनांत वासरूच वास करून बसले होते. सांग त्यांना कि, ''जर तुम्ही ईमानधारक असाल तर तुमची ही श्रद्धा किती

३१) पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या आगमनापूर्वी यहूदी लोक बेचैन होऊन त्या प्रेषिताची प्रतीक्षा करीत होते ज्याच्या आगमनाची भाकिते त्यांच्या प्रेषितांनी केली होती. ते प्रार्थना करीत असत की लवकरच त्या प्रेषिताने यावे की काफिरांचे वर्चस्व नष्ट व्हावे आणि मग आमच्या उन्नतीचा काळ सुरू व्हावा.

३२) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो की, ''किती वाईट गोष्ट आहे ज्यासाठी त्यांनी आपले प्राण विकले आहे.'' म्हणजे आपले भले व कल्याण आणि आपल्या मुक्तीचा बळी दिला.

३३) हे लोक इच्छा करीत होते की येणारा प्रेषित त्यांच्या जातीत जन्मास यावा, परंतु जेव्हा तो एका अशा जातीत जन्मला जिला ते लोक तुच्छ समजत असत, तेव्हा ते त्याच्या इन्कारासाठी तत्पर बनले. जणू त्यांचे म्हणणे असे होते की अल्लाहने त्यांना विचारून प्रेषित पाठविला असता.

वाईट आहे जी अशा वाईट कृत्यांचा तुम्हाला आदेश देत आहे. (९१-९३)

त्यांना सांगा की जर खरोखरच अल्लाहच्याजवळ मरणोत्तर जीवनाचे घर सर्व लोकांना सोडून खास तुमच्यासाठीच असेल तर तुम्ही मृत्यूची इच्छा केली पाहिजे. जर तुम्ही आपल्या विचारामध्ये खरे असाल. लक्षात ठेवा कि हे कदापि तशी इच्छा करणार नाहीत. कारण आपल्या हाताने कमवून जे काही त्यांनी तिथे पाठविले आहे त्यावरून त्यांची हीच अपेक्षा आहे कि त्यांना तिथे जावे लागणार नाही. अल्लाह अशा अत्याचाऱ्यांना उत्तम प्रकारे जाणतो आहे. जगण्याची लालसा करणाऱ्यांमध्ये तुम्ही ह्यांना अधिक लोभी पहाल. इतके कि ह्यासंबंधी अनेकेश्वरवाद्यांपेक्षाही अधिक पल्किडे गेलेले पहाल. त्यांच्यापैकी प्रत्येकजण हे इच्छित आहे की कसेही करून हजार वर्षे जगावे. वास्तविक दिर्घायुष्य कोणत्याही परिस्थितीत त्यांना प्रकोपापासून वाचवू शकणार नाही. जे जे कर्म ते करीत आहेत. अल्लाह ते पहात आहे. (९४-९६)

त्याना सांग की जो कुणी जिबरीलशी वैर करतो[३४] त्याला हे समजावयास हवे कि जिबरीलने अल्लाहच्या आज्ञेनेच हा कुरआन तुझ्या हृदयावर अवतरला आहे. जो अगोदर आलेल्या ग्रंथाचे समर्थन करीत आहे. आणि ईमानधारकांसाठी मार्गदर्शन व यशाची शुभवार्ता घेऊन आलेला आहे. (जर जिबरीलशी यांच्या वैराचे कारण हेच असेल तर सांगा कि) अल्लाह, त्याचे दूत, त्याचे प्रेषित आणि जिबरील व मिकाईल यांचे जे शत्रू आहेत अल्लाह त्या नाकारणाऱ्यांचा शत्रू आहे. (९७-९८)

आम्ही तुझ्याकडे अशी संकेतवचने अवतरली आहेत जी स्पष्टपणे सत्य व्यक्त करणारी आहेत. आणि त्यांचे अनुसरण करण्यास केवळ तेच लोक नाकारतात जे मार्गभ्रष्ट आहेत. नेहमी असेच घडत आले नाही काय कि जेव्हा जेव्हा त्यांना एखादे संकेतवचन दिले तेव्हा त्यांच्यापैकी एखाद्यातरी गटाने त्याचा भंग केला. किंबहुना त्यांच्यापैकी बहुतेक असेच आहेत जे मनापासून श्रद्धा ठेवीत नाही. आणि जेव्हा त्यांच्याकडे अल्लाहकडून कुणी प्रेषित त्या ग्रंथाची ग्वाही आणि समर्थन करणारा आला जो ग्रंथ यांच्याकडे पूर्वीपासून उपलब्ध होता– तेव्हा ह्या ग्रंथधारकांपैकी एका गटाने अल्लाहच्या ग्रंथाला अशारीतीने पाठीमागे टाकून दिले जणू काही त्यांना काहीच माहित नव्हते. आणि त्या गोष्टीचे अनुसरण करू लागले ज्या गोष्टी शैतान, सुलैमानच्या राज्याच्या नावाने सादर करीत असत. खरे पाहता ज्यांचा सुलैमानने कधीही द्रोह केला नाही. द्रोहामध्ये तर ते शैतान पडले होते जे लोकांना जादूटोण्याचे शिक्षण देत होते ते त्या गोष्टींच्या मागे लागले ज्या बाबीलमध्ये दोन दूत हारूत व मारूतवर अवतरल्या होत्या. वास्तविक ते (दूत) जेव्हा

**३४)** यहूदी केवळ पैगंबर मुहम्मद (स.) यांना आणि त्यांना मानणाऱ्यांनाच वाईट म्हणत होते असे नव्हे तर ईश्वराचे पवित्र दूत जिब्रईल (अ.) यांनाही अपशब्द बोलत असत आणि म्हणत की तो आमचा शत्रू आहे, तो दयेचा नव्हे तर कोप आणणारा दूत आहे.



कधी कुणाला ह्याची शिकवण देत असत तेव्हा आधी स्पष्टपणे बजावीत असत कि, ''पहा आम्ही एक सत्व परिक्षा आहोत तेव्हा तुम्ही द्रोहामध्ये पडू नका.[३५] तरीही हे लोक त्यांच्याकडून त्याच गोष्टी शिकत आले ज्यामुळे पतीपत्नीमध्ये दूही निर्माण व्हावी. ही तर स्पष्ट गोष्ट होती कि अल्लाहच्या अनुज्ञेशिवाय ते ह्यापासून कुणालाही हानी पोहोचवू शकत नव्हते. परंतु तरीही ते अशी गोष्ट शिकत आले जी खुद्द त्यांच्यासाठी लाभदायक तर नव्हतीच उलट हानीकारक होती आणि त्यांना चांगले माहित होते कि जो ह्या गोष्टीचा ग्राहक होईल त्याच्यासाठी मरणोत्तर जीवनांत काहीही हिस्सा नाही. किती वाईट सामुग्री होती ज्यासाठी स्वत:च्या जीवाच्या मोबदल्यांत त्यांनी सौदा केला आहे! किती चांगले झाले असते जर ते जाणत असते! श्रद्धा आणि अल्लाहचे भय बाळगले असते तर अल्लाहपाशी जो मोबदला त्यांना मिळाला असता तो त्यांच्यासाठी अधिक चांगला झाला असता. किती चांगले झाले असते जर त्यांना हे कळले असते! (९९-१०३)

हे श्रद्धावानांनो, 'राईना' म्हणू नका तर 'उन्जूरना' म्हणा आणि लक्षपूर्वक ऐका.[३६] हे नाकारणारे तर दु:खदायी प्रकोपास पात्र आहेत. हे लोक, ज्यांनी सत्य स्वीकारण्याचे नाकारले आहे ते ग्रंथधारकांपैकी असोत किंवा अनेकेश्वरवादी असोत ते कदापि इच्छित नाहीत कि तुझ्या प्रभूकडून तुझ्याकडे काही भले अवतरावे. परंतु अल्लाह ज्याच्यासाठी इच्छितो त्याला आपल्या कृपेसाठी खास निवडतो आणि तो अत्यंत कृपावंत आहे.

(१०४-१०५)

**३५)** सदरहू आयतच्या अर्थासंबंधी निरनिराळी विधाने आहेत. परंतु जे काही मी समजलो आहे ते असे की ज्या काळात बनीइस्राईलच्या वंशाचे सर्व लोक बाबील येथे बंदिस्त आणि दास बनले होते, त्या काळी सर्वश्रेष्ठ अल्लाहने दोन फरिश्त्यांना त्यांची परीक्षा घेण्यासाठी पाठविले असावे. ज्याप्रमाणे लुत लोकांजवळ फरिश्ते सुंदर मुलांच्या रूपात गेले होते. त्याचप्रकारे त्या इस्राईलीजवळ ते फरिश्ते साधूसंतांच्या रूपात गेले असावेत. तेथे त्यांनी एकीकडे जादूटोण्याच्या बाजारात आपले दुकान थाटले असेल तर दुसरीकडे कर्तव्यपूर्तता म्हणून प्रत्येकाला सावधानही करीत असावेत की पहा, आम्ही तुमची परीक्षा म्हणून आलो आहोत, तुम्ही आपल्या पारलौकिक जीवनाचे वाटोळे करून घेऊ नका, परंतु इतके करूनही लोक त्यांच्या चेटुकी कृत्यांवर आणि गंडेताईतांवर तुटून पडत असावेत.

**३६)** यहूदी लोक जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या सभेत येत असत तेव्हा सलाम करण्याद्वारे व संभाषणाद्वारे ते आपल्या मनातील द्वेष ओकीत असत. जेव्हा पैगंबर (स.) यांच्या समवेत बोलताना यहुदींना एखाद्या वेळी असे बोलण्याची गरज वाटत असे की, 'थांबा' आम्हाला थोडे हे म्हणणे समजून घेऊ द्या. तेव्हा ते 'राइना' असे उच्चारित असत. सदरहू शब्दाचा बाह्यत: अर्थ तर असा होतो की आम्हाला सवलत द्या अथवा आमचे म्हणणे ऐका. परंतु अनेक पैलूंनी त्यात वाईट अर्थही निघत असत. म्हणून मुसलमानांना आदेश दिला गेला की तुम्ही त्या शब्दाचा प्रयोग वर्ज्य करा व त्याऐवजी 'उन्जुरना' म्हणजे आमच्याकडे लक्ष द्या अथवा आम्हाला थोडे समजून घेऊ द्या, असे म्हणा.

ज्या एखाद्या संकेतवचनाला आम्ही रद्द करतो किंवा त्याचे विस्मरण करवितो तेव्हा त्यापेक्षा अधिक चांगले किंवा तशाच प्रकारचे दुसरे संकेतवचन पाठवितो.[३७] काय तुम्ही जाणत नाही कि अल्लाहला प्रत्येक गोष्ट करण्याचे सामर्थ्य प्राप्त आहे? काय तुम्हाला ठाऊक नाही कि पृथ्वी आणि आकाशामध्ये अल्लाहचेच अधिपत्य आहे आणि त्याच्याशिवाय अन्य कुणीही तुमची काळजी घेणारा व मदत करणारा नाही?

(१०६-१०७)

मग काय, तुम्ही आपल्या प्रेषिताकडे तशाच प्रकारचे प्रश्न आणि मागण्या करू इच्छिता जशा यापूर्वी मूसाकडे करण्यात आल्या होत्या?[३८] वास्तविक ज्या व्यक्तीने श्रद्धेच्या आचरणाऐवजी अश्रद्धेचे आचरण केले तो खचितच सरळ मार्गापासून भरकटला आहे. ग्रंथधारकांमध्ये बहुतेक लोक हे इच्छितात कि कसेही करून तुम्हाला श्रद्धेपासून दूर करून अश्रद्धेकडे न्यावे. जरी त्यांच्यावर सत्य प्रकट झाले आहे. तरीही आपल्या मनातील द्वेषामुळे तुमच्यासाठी त्यांची ही इच्छा आहे. त्यांना त्याबद्दल क्षमा कर व त्यांना तसेच सोडून दे. इथपर्यंत कि अल्लाह स्वत: आपला निर्णय लागू करील. निसंशय अल्लाहला सर्व गोष्टींवर सामर्थ्य आहे. नमाज अदा करा आणि जकात द्या. तुम्ही आपल्या मरणोत्तर जीवनासाठी जे काही भले कमवून पाठवता ते अल्लाहपाशी तुम्हाला आढळेल. (कारण) जे काही तुम्ही करीत आहात ते अल्लाहच्या दृष्टीमध्ये आहे. (१०८-११०)

त्यांचं म्हणणं असं आहे कि कोणीही व्यक्ती स्वर्गामध्ये जाणार नाही जोपर्यंत ती यहूदी होत नाही किंवा (ख्रिस्ती लोकांच्या दृष्टिकोनांतून) ख्रिस्ती होत नाही. ही त्यांची मनोकामना (भ्रम) आहे. त्यांना सांग तुम्ही सत्य असाल तर पुरावा सादर करा. कदापि नाही! सत्य हे आहे कि जो कोणी अल्लाहच्या आज्ञापालनामध्ये स्वत:ला समर्पित करील आणि सद्वर्तनी असेल त्याच्यासाठी त्याच्या पालनकर्त्याजवळ त्याचा मोबदला आहे आणि अशा लोकांना न कोणते भय असेल न ते कधी शोक करतील. (१११-११२)

यहुदी म्हणतात, ''ख्रिस्तींच्या जवळ काहीही नाही.'' ख्रिस्ती म्हणतात ''यहुद्यांपाशी काहीही नाही.'' वास्तविक दोघेही ग्रंथ वाचताहेत.आणि अशाच प्रकारे त्या

**३७)** हे एका विशिष्ट शंकेचे उत्तर आहे. यहूदी लोक मुसलमानांच्या मनात सदरहू शंका निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होते. त्यांचा आक्षेप असा होता की पूर्वीचे ग्रंथ सुद्धा ईश्वराकडून आले होते आणि हा कुरआन देखील ईश्वराकडून आहे तर मग त्या ग्रंथाच्या काही आज्ञांऐवजी या कुरआनात इतर आज्ञा का दिल्या गेल्या आहेत?

**३८)** यहूदी लोक छिद्रान्वेषण करून नाना तऱ्हेचे प्रश्न मुसलमानांसमोर उपस्थित करीत असत. ते त्यांना उत्तेजित करीत असत की आपल्या पैगंबरांना हे, हे आणि हे विचारा. यावर सर्वश्रेष्ठ अल्लाह मुसलमानांना सावध करीत आहे की याबाबतीत यहूद्यांचे अनुकरण करण्यापासून दूर रहा.



लोकांचेही दावे आहेत ज्यांना ग्रंथाचे ज्ञान नाही. ज्या ज्या मतभेदांमध्ये ते पडले आहेत त्यांचा निर्णय अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी करील. (११३)

आणि त्या व्यक्तीपेक्षा अधिक अत्याचारी कोण असेल जो अल्लाहच्या प्रार्थनास्थळामध्ये त्याचे नामस्मरण करण्यास प्रतिबंध करतो. आणि त्या स्थळांना उध्वस्त करण्याचा प्रयत्न करतो? असे लोक त्या प्रार्थनागृहामध्ये पाय ठेवण्यासही पात्र नाहीत आणि जर कधी गेले तर त्यांनी भीतभीतच जावे. त्यांचा ह्या नश्वर जीवनामध्येही धिक्कार आहे. आणि मरणोत्तर जीवनामध्येही त्यांना यातना आहेत. (११४)

पूर्व आणि पश्चिम अल्लाहच्याच आहेत. जिकडे तुम्ही तोंड कराल तिथे अल्लाहचे अस्तित्व आहे. कारण अल्लाह सर्वव्यापी आणि सर्वज्ञ आहे. (११५)

त्यांचं म्हणणं आहे कि अल्लाहला पुत्रही आहे. अल्लाह तर या गोष्टीपेक्षा कितीतरी पवित्र आहे. वास्तविक सत्य हे आहे कि पृथ्वी आणि आकाशामधील सर्व गोष्टींचा स्वामी अल्लाह आहे. सर्वजण त्याचेच आज्ञाधारक आहेत. तोच आकाश आणि पृथ्वीचा प्रवर्तक आहे. जेव्हा एखादी घटना घटित करण्याचे इच्छितो तेव्हा फक्त म्हणतो, ''तथास्तु'' आणि क्षणार्धात तसे घडते. (११६-११७)

ज्यांना ज्ञान नाही ते म्हणतात कि अल्लाह स्वत: आमच्याशी कां बोलत नाही? किंवा आमच्याकडे एखादा संकेत कां येत नाही? अशाच गोष्टी यापूर्वीचे लोकही बोलत होते. त्या सर्वांची मनोवृत्ती सारखीच आहे. विश्वास ठेवणाऱ्यांसाठी तर आम्ही स्पष्टपणे संकेतवचने उघड केली आहेत. (यापेक्षा स्पष्ट संकेत कोणता असेल कि) आम्ही तुला सत्य ज्ञानासह शुभवार्ता देणारा आणि सावध करणारा बनवून पाठविले आहे.[३९] तेव्हा नरकाशीच ज्यांचा संबंध जुळला आहे त्यांच्याबद्दल तू मुळीच जबाबदार नाहीस.

(११८-११९)

यहुदी आणि ख्रिस्ती तुमच्याशी कदापी सहमत होणार नाहीत जोपर्यंत त्यांच्या पद्धतीने तुम्ही वागणार नाही. त्यांना स्पष्टपणे सांगा कि अल्लाहने सांगितलेला मार्गच योग्य आहे. अन्यथा तुझ्याकडे आलेल्या ज्ञानानंतर जर तू त्यांच्या इच्छांचे अनुसरण करशील तर अल्लाहच्या प्रकोपापासून वाचविणारा तुझा कोणीही मित्र किंवा सहाय्यक असणार नाही. ज्या लोकांना आम्ही ग्रंथ दिले ते अशा रीतीने त्याचे अध्ययन करीत

**३९)** म्हणजे इतर खुणांची तर गोष्टच सोडा, अत्यंत उठून दिसणारी खूण तर हजरत मुहम्मद (स.) यांचे स्वत:चे व्यक्तिमत्व आहे. प्रेषितत्वापूर्वीची त्यांची स्थिती, व ते ज्या लोकांत व ज्या देशात जन्मले त्यांची स्थिती, ती परिस्थिती ज्यात त्यांचे पालनपोषण झाले व ४० वर्षांपर्यंत ज्यात त्यांनी जीवन व्यतीत केले. मग प्रेषितपदावर नियुक्त झाल्यानंतर त्यांनी जी वैभवशाली कामगिरी पार पाडली ती, हे सर्वकाही एक अशी उज्ज्वल निशाणी आहे की ती असतांना इतर कोणत्याही निशाणीची आवश्यकता राहात नाही.

आहेत जसे त्यांनी करायला हवे. ते ह्यावर मन:पूर्वक श्रद्धा ठेवतात.[४०] परंतु जे त्याच्याशी द्रोह करतील तर त्यांनाच नुकसान सोसावे लागेल. (१२०-१२१)

हे इस्राईलच्या संततीनो, स्मरण करा माझा अनुग्रह ज्याने तुम्हास उपकृत केले होते. आणि तुम्हाला सर्व जनसमुदायावर श्रेष्ठत्व बहाल केले होते. तेव्हा त्या दिवसांपासून स्वत:ला वाचवा जेव्हा कुणीही कुणाच्या यत्किंचितही उपयोगी पडणार नाही, न कुणाकडून मोबदला स्वीकारला जाईल न कुणाची शिफारस कुणाच्या उपयोगी पडेल न अपराध्याना कुठून कोणती मदत लाभेल. (१२२-१२३)

आठवण करा जेव्हा अल्लाहने इब्राहीमकडून काही गोष्टींमध्ये परीक्षा घेतली आणि जेव्हा तो परीक्षेमध्ये पूर्ण उतरला तेव्हा अल्लाहने त्यांना म्हटले, ''मी तुला सर्व लोकांचा नेता म्हणून नियुक्त करीत आहे.'' तेव्हा इब्राहीमने विचारले, ''आणि माझ्या संततीसाठीही हेच अभिवचन आहे?'' तेव्हा अल्लाहने उत्तर दिले, ''माझे अभिवचन अत्याचाऱ्यांसाठी नाही.''[४१] (१२४)

आणि ह्या काबागृहाला आम्ही साऱ्या लोकांसाठी 'मध्यवर्ती शांतीस्थान' निश्चित केले आणि लोकांना आदेश दिला कि इब्राहीम ज्या ठिकाणी प्रार्थनेसाठी उभा राहतो त्या स्थानाला कायमस्वरूपी नमाजचे स्थान बनवा. आणि इब्राहीम व इस्माईलला आदेश दिला कि, ''माझ्या या घराला परिक्रमा आणि एकांतवास तसेच रुकूअ व सजदा (नमाज अदा) करणाऱ्यांसाठी स्वच्छ (पवित्र) ठेवा. (१२५)

त्यानुसार इब्राहीमने प्रार्थना केली कि, ''हे माझ्या पालनकर्त्या, ह्या नगराला शांतीनगर बनव आणि येथील निवासीपैकी जे लोक अल्लाह आणि मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवतील त्यांना उपजीविकेसाठी सर्व प्रकारची फळे दे.'' त्याचा प्रतिसाद म्हणून त्यांच्या पालनकर्त्याने म्हटले, ''परंतु जे मानणार नाहीत त्यांना ऐहिक नश्वर जीवनाची सामुग्री तर मी देईन परंतु शेवटी नरक यातनांकडे मी त्यांना फरफटत घेऊन जाईन आणि ते अत्यंत वाईट स्थान असेल.'' (१२६)

आणि स्मरण करा जेव्हा इब्राहीम आणि इस्माईल ह्या गृहाच्या भिंती उभारीत होते व प्रार्थना करीत होते कि, ''हे आमच्या पालनकर्त्या, आमच्याकडून ह्या सेवेचा स्वीकार

**४०)** हा संकेत ग्रंथधारकांच्या सदाचारी गटाकडे आहे की त्यांच्याजवळ पूर्वीपासूनच असलेल्या ईश्वरी ग्रंथाचे ते लोक प्रामाणिकपणे व सत्यनिष्ठतेने वाचन करीत असल्याकारणाने ते या कुरआनला ऐकून किंवा वाचून त्यावर ईमान आणतात.

**४१)** अर्थात तुमच्या संततीपैकी जो सदाचारी अंश आहे, हे वचन केवळ त्यांच्याशीच संबंधित आहे. त्यांपैकी जे अत्याचारी असतील, त्यांच्यासाठी हे वचन नाही. या ठिकाणी 'अत्याचारी'ने अभिप्रेत केवळ लोकांवरच जे अत्याचार करीत असतात तेच आहेत असे नाही तर सत्य आणि सचोटीवर अत्याचार करणारे देखील आहेत.



कर. तू सर्वांचे ऐकणारा आणि सर्वकाही जाणणारा आहेस. हे प्रभू आम्हा दोघांना तुझे आज्ञाधारक बनव. आमच्या वंशामधून असा समाज घडव जो तुझाच आज्ञाधारक झालेला असेल. आम्हाला आमच्या उपासनेचा विधी सांग. आणि आमच्या उणीवांकडे दुर्लक्ष कर. निसंशय तू क्षमावंत आणि दयावंत आहेस. आणि हे प्रभू या लोकांमध्ये ह्यांच्यातील एक प्रेषित उभा कर. जो तुझे संदेश यांना ऐकवील आणि यांना ग्रंथ आणि विवेकाची शिकवण देऊन ह्यांचे जीवन पवित्र कर. तूच प्रभुत्वशाली न्याय करणारा आहेस. (१२७-१२९)

इब्राहीमच्या पद्धतीकडे कोण पाठ फिरवील? जो स्वत:ला अज्ञानी बनवील तोच इब्राहीमच्या धर्माकडे पाठ फिरवील. निसंशय आम्ही त्याला जगामध्ये आमचे कार्य करण्यासाठी निवडले होते. आणि परलोकामध्ये त्याची गणना सदाचाऱ्यांमध्ये आहे. जेव्हा पालनकर्त्याने त्याला सांगितले. ''मुस्लिम हो'' (स्वत:ला समर्पित कर)[४२] तेव्हा तो त्वरित म्हणाला, ''मी तर साऱ्या सृष्टीच्या पालनकर्त्याला समर्पित झालो आहे!'' आणि अशाच प्रकारचे आचरण करण्याचा आदेश त्याने आपल्या मुलाबाळांना दिला होता. आणि तोच आदेश याकूबनेही आपल्या संततीला दिला होता. त्याने म्हटले कि, ''माझ्या मुलांनो, अल्लाहने तुमच्यासाठी हा धर्म पसंत केला आहे तेव्हा मरेपर्यंत अल्लाहला समर्पित होऊन रहा.'' ''काय त्यावेळी तुम्ही उपस्थित होतात जेव्हा याकूब ह्या नश्वर जीवनाचा निरोप घेत होता?'' त्याने मृत्यूसमयी आपल्या मुलांना विचारले, ''मुलांनो माझ्या पश्चात तुम्ही कुणाची भक्ती कराल?'' त्या सर्वांनी उत्तर दिले आम्ही तुझ्याच अल्लाहची भक्ती करू ज्याची तू आणि तुझे पूर्वज इब्राहीम, इस्माईल आणि इसहाकने भक्ती केली. आणि आम्ही त्यालाच समर्पित झालो आहोत, असे ते लोक होते जे होऊन गेले. जे काही त्यांनी कमाविले ते त्यांच्यासाठी आहे आणि जे काही तुम्ही कमविणार आहांत ते तुमच्यासाठी असेल. तुम्हाला हे विचारले जाणार नाही कि ते लोक काय करीत होते. (१३०-१३४)

यहूदी म्हणतात ''यहूदी व्हा तर सन्मार्ग लाभेल.'' ख्रिस्ती म्हणतात, ''ख्रिस्ती व्हा तर तुम्हाला सन्मार्ग लाभेल.'' त्यांना सांग, ''नाही! धर्म तर इब्राहीमचा धर्म आहे. जो अनेकेश्वरवादी नव्हता. म्हणा कि, ''आम्ही श्रद्धा ठेवली अल्लाहवर आणि त्या मार्गदर्शनावर जे आमच्याकडे अवतरले आणि जे इब्राहीम, इस्माईल, इसहाक, याकूब आणि याकूबच्या संततीकडे अवतरले आणि जे मूसा, ईसा आणि दुसऱ्या सर्व प्रेषितांना त्यांच्या पालनकर्त्याकडून दिले गेले. आम्ही त्यांच्यात कोणातही भेदभाव करीत नाही. आणि आम्ही अल्लाहलाच समर्पित झालो आहोत.'' (१३५-१३६)

**४२)** मुस्लिम म्हणजे असा की ज्याने ईश्वरापुढे मान तुकवावी, ईश्वरालाच आपला मालक, स्वामी, शासक आणि उपास्य मानावे, ज्याने स्वत:ला सर्वस्वी ईश्वराच्या स्वाधीन करावे, आणि ईश्वराकडून जे मार्गदर्शन आले असेल त्यानुसार जगात जीवन जगावे. अशी श्रद्धा व अशा कार्यपद्धतीचे नाव 'इस्लाम' आहे. उत्पत्तीच्या प्रारंभापासून जगाच्या निरनिराळ्या देशात आणि राष्ट्रांत जे प्रेषित आले आहेत त्या सर्वांचादेखील हाच धर्म होता.

जर त्या लोकांनीही अशी श्रद्धा ठेवली जशी श्रद्धा तुम्ही ठेवली आहे तर ते सन्मार्गावर आहेत. आणि जर याकडे पाठ फिरवली तर स्पष्ट आहे कि ते संशयामध्ये (संभ्रमामध्ये) पडले आहेत. तेव्हा खात्री बाळगा कि त्यांच्याविरूद्ध अल्लाह तुमचा सहाय्यकर्ता म्हणून पुरेसा आहे. तो सर्वकाही ऐकतो आणि जाणतो आहे. (१३७)

सांग कि "अल्लाहचा रंग अंगिकारा, त्याच्या रंगापेक्षा उत्तम रंग आणखी कुणाचा असेल? आम्ही त्याचीच भक्ती करीत आहोत." (१३८)

हे प्रेषित, त्यांना सांगा "काय तुम्ही अल्लाहविषयी आमच्याशी भांडता? वास्तविक तो आमचाही पालनकर्ता आहे आणि तुमचाही पालनकर्ता आहे. आमचे कर्म आमच्यासाठी आहे आणि तुमचे कर्म तुमच्यासाठी आहे. आणि आम्ही फक्त अल्लाहचीच भक्ती करीत आहोत." किंवा काय तुमचे असे म्हणणे आहे कि इब्राहीम, इस्माईल, इसहाक याकूब आणि याकूबची संतती सर्वच्या सर्वजण यहूदी होते? किंवा ईसाई होते? विचार, "तुम्ही अधिक जाणता कि अल्लाह? त्या व्यक्तीपेक्षा अधिक अत्याचारी कोण असेल की ज्याने ती साक्ष लपविली जी अल्लाहकडून त्याच्याकडे आली होती आणि अल्लाह अनभिज्ञ नाही, ते असे लोक होते जे होऊन गेले त्यांचे कर्मफळ त्यांच्यासाठी आहे. आणि तुमचे कर्मफळ तुमच्यासाठी आहे. त्यांच्या कर्माविषयी तुम्हाला विचारले जाणार नाही. (१३९-१४१)

मूर्ख लोक अवश्य विचारतील कि "यांना झालंय तरी काय? पूर्वी हे ज्या किबल्याकडे (उपासना दिशेकडे) तोंड करीत होते. आणि नमाज पठण करीत होते त्यापासून ह्यांनी तोंड फिरविले?[४३] हे प्रेषित, त्यांना सांग "पूर्व-पश्चिम सर्व दिशा अल्लाहच्याच आहेत. अल्लाह ज्याला इच्छितो त्याला सन्मार्ग दाखवितो." आणि अशाच प्रकारे तर आम्ही तुम्हाला उत्तम समाज[४४] बनविले आहे. जेणेकरून जगांतील लोकांवर

**४३)** हजरत मुहम्मद (स.) मक्केहून हिजरत केल्यानंतर मदीना शहरात सोळा किंवा सतरा महिन्यांपर्यंत बैतुलमक्दिस-यरोशलेमकडेच तोंड करून नमाज पढत राहिले. मग काबागृहाकडे तोंड करून नमाज पढण्याची आज्ञा आली.

**४४)** 'उम्मतेवसत'ने अभिप्रेत एक असा उच्च आणि उत्तम लोकसमूह आहे जो न्याय, औचित्य आणि मध्यममार्गाचे अनुकरण दृढपणे करीत असावा, ज्याला जगातील राष्ट्रांमध्ये अध्यक्षीय स्थान प्राप्त असावे, ज्याचे संबंध सर्वांशी समानपणे सत्य व सचोटीचे असावे, आणि असत्य आणि अयोग्य संबंध कोणाशीही असू नये.



तुम्ही साक्ष व्हा. आणि प्रेषित तुमच्यावर साक्षी असतील."[४५] (१४२-१४३-)

पूर्वी जिकडे तुम्ही तोंड करीत होतात तिकडे किबला (उपासना दिशा) यासाठी ठरविली होती कि आम्ही पाहू इच्छित होतो कि कोण प्रेषिताचे अनुकरण करतो आणि कोण उलट फिरतो. ही बाब अत्यंत कठीण होती. परंतु त्यांच्यासाठी मुळीच कठीण सिद्ध झाली नाही ज्यांना अल्लाहचे मार्गदर्शन लाभले. अल्लाह तुमची ही श्रद्धा कदापि व्यर्थ जाऊ देणार नाही. विश्वास ठेवा कि तो लोकांसाठी अत्यंत करुणावंत आणि कृपावंत आहे. (-१४३)

हे प्रेषिता, तुमचे वारंवार आकाशाभिमुख होणे आम्ही पहात आहोत. म्हणून आम्ही त्याच किबल्याकडे (उपासना दिशेकडे) तुम्हाला वळवितो जे तुम्हाला अधिक पसंत आहे. तेव्हा मसजिदे-हरामकडे (काबागृहाकडे) तोंड करा. यापुढे जिथे कुठे तुम्ही असाल. तिथून तिच्याकडे तोंड करून नमाज पठण करा.[४६] (१४४)

ह्यापूर्वी ज्यांना ग्रंथ दिले आहेत. ते लोक चांगल्या प्रकारे जाणतात कि किबलाच्या परिवर्तनाचा (उपासना दिशा बदलण्याचा) हा आदेश त्यांच्या पालनकर्त्याकडूनच आलेला असून तो सत्यावर आधारित आहे, परंतु याउप्परही हे जे काही करीत आहेत त्यापासून

**४५)** याने अभिप्रेत असे की आखिरतमध्ये जेव्हा संपूर्ण मानवजातीचा एकत्रपणे हिशेब घेतला जाईल, त्यावेळी अल्लाहचा जबाबदार प्रतिनिधी म्हणून पैगंबर तुमच्यासंबंधी साक्ष देईल की योग्य विचारसरणी आणि योग्य आचरण व न्यायोचित व्यवस्थेची जी शिकवण आम्ही त्याला दिली होती ती त्याने कमी व जास्त न करता पूर्णपणे पोहचविली व प्रत्यक्षात त्यानुसार कृती करून दाखविली. त्यानंतर पैगंबराचे उत्तराधिकारी म्हणून तुम्हाला जनसामान्यांसंबंधी साक्षीदार म्हणून उभे रहावे लागेल व अशी साक्ष द्यावी लागेल की पैगंबराने जे काही तुमच्यापर्यंत पोचते केले होते, ते तुम्ही जनसामान्यांपर्यंत पोहचविण्यात, तसेच जे काही पैगंबराने अंमलात आणून तुम्हाला दाखविले होते ते तुम्ही जनसामान्यांना अंमलात आणून दाखविण्यात आपल्यापरीने कोणतीही कसूर केली नाही.

**४६)** उपासना-दिशा, बदलण्यासंबंधी दिला जाणारा हाच तो मूळ आदेश आहे. हा आदेश हिजरी सन २ च्या रजब अथवा शाबान महिन्यात उतरला. पैगंबर (स.) आमंत्रणावरून एका सोबत्याच्या घरी गेले होते. तेथे जुहर-दुपारच्या नमाजची वेळ झाली. पैगंबर (स.) नमाज पढविण्यासाठी उभे राहिले. दोन रकअती झाल्या होत्या की तिसऱ्या रकातीत अकस्मातपणे वह्य-दिव्य प्रकटनाद्वारे सदरहू आयत उतरली. तत्काळ पैगंबर (स.) व त्यांच्या नेतृत्वाखाली जमातच्या सर्व लोकांनी बैतुलमक्दिसकडून काबागृहाच्या दिशेला आपले तोंड वळविले. त्यानंतर मदीना व त्याच्या सभोवताली प्रदेशात सर्वत्र दवंडी दिली गेली. हे फर्माविण्यात आले की, 'हे तुमचे आकाशाकडे वरचेवर तोंड उठणे आम्ही पाहात आहोत' तसेच हे की, 'आम्ही तुम्हाला त्याच किबल्याकडे वळवीत आहोत ज्याला तुम्ही पसंत करता' यावरून असे स्पष्टपणे कळते की उपासना-दिशा बदलण्याचा आदेश येण्यापूर्वी पैगंबर (स.) त्याची प्रतीक्षा करीत होते.

अल्लाह अनभिज्ञ नाही. तुम्ही या ग्रंथधारकांकडे कोणतेही संकेत घेऊन या तरी हे तुमच्या उपासना दिशेचे अनुकरण करणार नाहीत. आणि तुम्हीही त्यांच्या उपासना दिशेचे अनुसरण करण्याची शक्यता नाही. आणि यांच्यापैकी कोणीही गट दुसऱ्या गटाच्या उपासना दिशेचे अनुकरण करणार नाही. तेव्हा जर ज्ञानानंतर, जे तुमच्याकडे आले आहे, यांच्या इच्छेनुसार अनुसरण केलेत तर खचितच तुमची गणना अत्याचाऱ्यांमध्ये होईल. ज्या लोकांना आम्ही ग्रंथ दिला आहे ते ह्या स्थळाला (ज्याला उपासना दिशा निर्धारित केली आहे) असे ओळखतात जसे आपल्या मुलाबाळांना ओळखतात.[४७] परंतु त्यांच्यापैकी एक गट जाणूनबुजून सत्य लपवित आहे. तुमच्या पालनकर्त्याकडून आलेली ही सत्य गोष्टच आहे. तेव्हा ह्याविषयी तुम्ही साशंक राहू नका. (१४४-१४७)

प्रत्येकासाठी एक दिशा आहे जिकडे तो वळतो. तेव्हा तुम्ही सत्कर्मात एकमेकांपेक्षा अग्रेसर व्हा. जिथे कुठे तुम्ही असाल तिथे अल्लाह तुम्हाला एकत्रित करील. निसंशय ईश्वर सर्व गोष्टींवर सामर्थ्यवान आहे. (१४८)

कोणत्याही ठिकाणाहून तुम्ही निघाल तिथून आपले तोंड (नमाजच्या वेळी) मसजीदे हरामकडे वळवा. कारण हा तुमच्या पालनकर्त्याचा सर्वस्वी सत्याधिष्ठित निर्णय आहे आणि अल्लाह तुमच्या कर्माविषयी अनभिज्ञ नाही आणि जिथून कुठे जाल आपले तोंड मसजीदे हरामकडे वळवा आणि जिथे कुठे असाल तिच्याकडेच तोंड करून नमाज पठण करा. ज्यामुळे लोकांना तुमच्या विरूद्ध भांडण्यासाठी कोणतेही कारण मिळू नये.[४८] होय, त्यांच्यामध्ये जे अत्याचारी आहेत ते कधीही गप्प बसणार नाहीत. तेव्हा त्यांना भिऊ नका. तर माझे भय बाळगा[४९] आणि यासाठी कि तुमच्यावर माझा अनुग्रह पूर्ण व्हावा. आणि ह्या अपेक्षेने कि माझ्या आदेशांच्या पालनाने तुम्हाला त्याचप्रकारे कल्याणाचा मार्ग लाभावा ज्या प्रकारे (तुम्हाला या गोष्टीने सफलता लाभली की) मी तुमच्यामध्ये खुद्द तुमच्यामधूनच एक प्रेषित पाठविला जो तुम्हाला आमचे संदेश ऐकवीत आहे. आणि तुमचे जीवन पवित्र करून तुम्हाला ग्रंथ व विवेकाची शिकवण देत आहे. आणि तुम्हाला त्या गोष्टी शिकवीत आहे ज्या तुम्हाला माहीत नाहीत. तेव्हा माझे स्मरण ठेवा मी तुमची

**४७)** हा अरबांचा वाक्यप्रचार आहे. ज्या वस्तूला माणूस खात्रीपूर्वक जाणतो तिला ते असे म्हणतात की तो त्या वस्तूला असे ओळखतो जसे आपल्या संततीला ओळखतो. यहूदी आणि ख्रिस्ती लोकांचे धर्मपंडित वास्तविकपणे ही गोष्ट चांगल्या प्रकारे जाणून होते की काबागृहाला हजरत इब्राहीम (अ.) यांनी बांधले होते. तर त्याउलट बैतुलमक्दिस त्याच्या १३०० वर्षांनंतर हजरत सुलैमान (अ.) यांच्या हस्ते बांधले गेले. ही गोष्ट कोणापासूनही लपलेली नव्हती.

**४८)** म्हणजे कोणाला असे बोलण्याची संधी मिळू नये की हे बरे ईमानधारक आहेत जे आपल्या ईश्वराच्या स्पष्ट आज्ञांचेसुद्धा उल्लंघन करतात.

**४९)** सदरहू वाक्याचा संबंध या विधानाशी आहे ''त्याच्याकडेच तोंड करून नमाज पढा जेणेकरून लोकांना तुमच्याविरूद्ध कोणतेही प्रमाण मिळू नये.''



आठवण ठेवीन. आणि माझ्याशी कृतज्ञ रहा कृतघ्न होऊ नका. (१४९-१५२)

हे श्रद्धावंतांनो, संयम आणि नमाजचे सहाय्य घ्या. अल्लाह संयमी लोकांच्या सोबत आहे. आणि जे अल्लाहच्या मार्गामध्ये मारले जातील त्यांना मृत म्हणू नका असे लोक तर वास्तविक जिवंत आहेत. परंतु त्यांचं जीवन तुम्ही जाणत नाही. आणि आम्ही खचितच तुम्हाला भय-भूख, जीवित व वित्त हानी आणि तुमच्या प्राप्तीमध्ये घट करून तुमची परिक्षा घेऊ. ह्या परिस्थितींत जे लोक संयमपूर्वक आचरण करतील. आणि जेव्हा जेव्हा आपत्ती येईल तेव्हा म्हणतील कि, ''आम्ही अल्लाहचेच आहोत, आणि अल्लाहकडेच आम्हाला परत जायचे आहे.'' त्यांना शुभसंदेश द्या. त्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याकडून मोठी कृपा होईल. आणि त्यांच्यावर दयेचे छत्र असेल आणि असेच लोक सन्मार्गी असतील. (१५३-१५७)

निसंशय सफा आणि मरवा अल्लाहच्या संकेतांपैकी आहेत. तेव्हा जो कोणी काबागृहाचे हज्ज किंवा उमरा करील[५०] त्याच्यामध्ये कोणताही दोष नाही कि या दोन (टेकड्यांच्या) दरम्यान तो परिक्रमा (प्रदक्षिणा) करील आणि जो कोणी स्वेच्छेने सत्कर्म करील तर निसंशय अल्लाहला त्याचे ज्ञान आहे आणि तो गुणग्राहकही आहे. (१५८)

आम्ही सर्व लोकांच्या मार्गदर्शनासाठी आपल्या ग्रंथात ज्याचे वर्णन केले आहे अशा आमच्या अवतरलेल्या स्पष्ट मार्गदर्शनाला जे लपवितात त्यांचा अल्लाहसुद्धा धिक्कार करतो आणि धिक्कार करणारेही त्यांचा धिक्कार करतात. तथापि जे लोक या प्रवृत्तीपासून परावृत्त होतील व सुधारणा करतील आणि स्पष्टपणे विवेचन करतील त्यांना मी क्षमा करतो आणि मी क्षमावंत आणि दयावंत आहे. (१५९-१६०)

**५०)** जुलहज्जा महिन्याच्या ठरलेल्या तारखांना काबागृहाची जी यात्रा केली जाते त्याचे नाव हज्ज होय. या तारखांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही काळात जी यात्रा केली जाईल ती 'उमरा' होय.

निसंशय जे लोक नाकारतात[५१] आणि त्याच अवस्थेत त्यांचा मृत्यू होतो. हेच ते लोक आहेत. ज्यांच्यावर अल्लाह, त्याचे दूत आणि सर्व लोकांकडूनही धिक्कार होतो. आणि अशाच अवस्थेत ते सदैव राहतील. त्यांच्या शिक्षेमध्ये कोणतीही घट होणार नाही न त्याना कोणता अवधी दिला जाईल. (१६१-१६२)

तुमचा ईश्वर एकच ईश्वर आहे. त्या परम दयाळु व कृपाळु ईश्वराशिवाय अन्य कुणीही ईश्वर नाही. निसंशय आकाश आणि पृथ्वीच्या निर्मितीमध्ये, रात्रंदिनाच्या परिवर्तनामध्ये आणि समुद्रांत वाहणाऱ्या नौकांमध्ये ज्या लोकांना लाभ देतात आणि जे पर्जन्य अल्लाहने आकाशांतून वर्षविले, व मृत जमीनीला पुनरुज्जीवीत केले आणि त्यामध्ये सर्व प्रकारच्या पशूंचा विस्तार केला तसेच हवेच्या परिवर्तनामध्ये आणि आकाश व पृथ्वीच्या दरम्यान निरपेक्ष सेवा करण्यास कार्यरत केलेल्या ढगांमध्ये त्या लोकांसाठी संकेत आहेत जे ज्ञानी आहेत. (परंतु ईश्वराच्या एकत्वाचा इतका पुरावा असूनदेखील) काही लोक असे आहेत जे अल्लाह व्यतिरिक्त इतरांना समवर्ती बनवितात. आणि त्यांच्यावर असे प्रेम करतात जसे अल्लाहशी प्रेम करायला हवे. वास्तविक जे ईमान धारण करतात त्यांना अल्लाहच सर्वाधिक प्रिय आहे. जी गोष्ट प्रकोपाला समोर पाहिल्यानंतर सुचेल ती आजच जर या अत्याचाऱ्यांना सुचली असती तर किती चांगले झाले असते? की सर्व अधिकार अल्लाहच्याच अखत्यारीत आहेत. आणि अल्लाह शिक्षा करण्यांत सुद्धा फार कठोर आहे. जेव्हा तो शिक्षा करील त्यावेळी परिस्थिती अशी असेल कि तेच

**५१)** मूळ अरबी शब्द 'कुफ्र' हा शब्द ईमान (श्रद्धा) विरूद्ध बोलला जातो. ईमानचा अर्थ मानणे, मान्य करणे आणि स्वीकारणे होय. याउलट 'कुफ्र'चा अर्थ द्रोह, अमान्य करणे, रद्द करणे आणि इन्कार करणे असा आहे. कुरआननुसार कुफ्रच्या आचरणाची निरनिराळी स्वरूपे आहेत. एक असे की, माणसाने मुळातच ईश्वराला मानू नये, किंवा त्याच्या सर्वोच्च सत्तेला मान्य करू नये व त्याला स्वत:चा व संपूर्ण सृष्टीचा स्वामी आणि उपास्य मानण्यास नकार द्यावा, किंवा त्याला एकमेव स्वामी आणि उपास्य मानू नये. दुसरे असे की अल्लाहला तर मानावे परंतु त्याच्या आज्ञा व त्याच्या सूचनांना ज्ञान आणि कायद्यांचे एकमेव उगमस्थान मान्य करण्यास नकार द्यावा. तिसरे असे की तत्त्वत: ही गोष्टही मान्य करावी की त्याला अल्लाहच्याच मार्गदर्शनानुसार चालले पाहिजे. परंतु अल्लाह आपल्या सूचना व आपल्या आज्ञा पोहचविण्यासाठी ज्या प्रेषितांना दुवा बनवितो त्यांना मान्य करू नये. चौथे असे की या प्रेषितांत भेदभाव करावा. आपली आवड आणि आपल्या पूर्वग्रहदोषापोटी त्यांच्यापैकी कोणाला मानावे तर कोणाला मानू नये. पाचवे असे की प्रेषितांनी ईश्वराकडून श्रद्धा, नीतीमत्ता आणि जीवनकायद्यासंबंधी ज्या शिकवणी दिल्या आहेत त्यांना किंवा त्यापैकी एखाद्या गोष्टीला मान्य करण्यास नकार द्यावा. सहावे असे की दृष्टिकोन म्हणून तर या सर्व गोष्टी मान्य कराव्यात परंतु प्रत्यक्ष व्यवहारात ईश्वरीआज्ञेचे जाणूनबुजून उल्लंघन करीत राहावे व त्याच्या अवज्ञेविषयीचा आग्रह धरावा. तसेच सांसारिक जीवनात आपल्या वर्तनाचा पाया आज्ञापालनावर नव्हे तर अवज्ञेवरच ठेवावा.



नेते ज्यांचे जगामध्ये अनुकरण केले गेले होते ते आपल्या अनुयायांपासून विभक्त होतील परंतु त्यांना शिक्षा होणारच. आणि त्यांचे सर्व उपक्रम आणि साधनांचा संबंध संपुष्टात येईल आणि ते लोक जे जगांत यांच्या मागे चालत होते ते म्हणतील, ''किती चांगले झाले असते जर आम्हाला पुन्हा एकदा संधी दिली असती तर ज्याप्रमाणे आज हे आमच्यापासून विभक्त होत आहेत आम्ही देखील त्यांच्यापासून विभक्त होऊन दाखविले असते.'' अशाप्रकारे अल्लाह त्यांचे कर्म त्यांच्यासाठी हळहळ व्यक्त करणारे बनवून दाखवील. आणि ते अग्नीमधून बाहेर पडू शकणार नाहीत. (१६३-१६७)

लोकहो, जमीनीमध्ये ज्या वैध आणि शुद्ध गोष्टी आहेत त्यांचे सेवन करा. आणि शैतानाच्या पाऊलवाटेचे अनुसरण करू नका. नि:संशय तो तुमचा उघड शत्रू आहे. कारण तो तुम्हाला वाईट आणि अश्लील गोष्टींचा आदेश देत आहे जेणेकरून तुम्ही अल्लाहविषयी त्या गोष्टी बोला ज्या तुम्ही जाणत नाही. (१६८-१६९)

जेव्हा त्यांना सांगितले जाते कि तुम्ही त्या आज्ञांचे अनुसरण करा जे अल्लाहने अवतरले आहेत तेव्हा ते म्हणतात कि ''आम्ही त्याच गोष्टींचे अनुसरण करू ज्याचे अनुसरण आमचे वाडवडील करीत होते.'' त्यांना काहीही कळत नसताना व ते सन्मार्गावर नसताना देखील त्यांचेच अनुसरण करणार का? इन्कार करणाऱ्या लोकांची अवस्था अशी आहे जणु गुराखी जनावरांना हांक देतो आणि जनावरे ओरड व हांकेखेरीज अन्य काहीच ऐकत नाहीत. ते बहिरे, मुके आणि आंधळे आहेत त्यामुळे त्यांना काहीही कळत नाही. (१७०-१७१)

हे ईमानधारकानो, तुम्ही पवित्र वस्तूंचे सेवन करा ज्या आम्ही तुम्हाला बहाल केल्या आहेत आणि अल्लाहशी कृतज्ञ रहा जर तुम्ही त्याचीच भक्ती करीत असाल. निसंशय अल्लाहकडून तुमच्यावर जर कोणता प्रतिबंध असेल तर तो म्हणजे तुम्ही मृत प्राण्यांचे मांस, रक्त, डुकराचे मांस आणि त्या गोष्टीही ज्यावर अल्लाह व्यतिरिक्त अन्य कुणाचे नांव घेतलेले असेल त्या गोष्टी तुमच्यासाठी वर्ज्य आहेत. परंतु जे लाचार असतील व जे अतीरेक करणारे नसतील आणि अल्लाहच्या मर्यादांचे उल्लंघन करण्याचा हेतू नसेल (त्यांनी जर ते खाल्ले) तर, त्यामध्ये कोणताही गुन्हा नाही. नि:संशय अल्लाह क्षमावंत आणि दयावंत आहे.[५२] (१७२-१७३)

जे लोक अल्लाहने अवतरलेल्या ग्रंथामधील सत्य लपवितात आणि क्षुद्र भौतिक लाभासाठी त्याचा सौदा करतात असे लोक अग्नी-भक्षण करून आपले उदरभरण करीत असतात. आणि अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्याशी काहीही बोलणार नाही. न

**५२)** सदरहू आयतीत हराम वस्तू उपयोगात आणण्याची परवानगी तीन अटींवर दिली गेली आहे. एक अशी की खरोखरच नाइलाजाची स्थिती असावी, उदाहरणार्थ, भूक अथवा तहानेमुळे जिवावर बेतले असावे, आजारामुळे प्राणास धोका निर्माण झाला असावा.

त्यांना पवित्र करील. आणि त्यांच्यासाठी यातनामय प्रकोप आहे. हेच ते लोक आहेत ज्यांनी सन्मार्गाऐवजी मार्गभ्रष्टता आणि क्षमेऐवजी प्रकोप ओढवून घेतला आहे. किती विचित्र आहे कि हे नरकाचा प्रकोप सहन करण्यास तयार आहेत. हे यामुळेच कि अल्लाहने तर सत्यासह ग्रंथ अवतरला परंतु त्या लोकांनी ग्रंथामध्ये मतभेद केला आणि दुराग्रह करून सत्यापासून दूर निघून गेले. (१७४-१७६)

सदाचार हा नव्हे कि तुम्ही आपले तोंड पूर्वेकडे किंवा पश्चिमेकडे करावे तर सदाचार हा आहे कि जे अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर ईमान धारण करतात तसेच सर्व दूतांवर, सर्व ग्रंथ आणि सर्व प्रेषितांवर ईमान धारण करतात ईश्वरी प्रेमापोटी आपल्याला प्रिय असलेली संपत्ती आपले नातेवाईक आणि अनाथ गरजवंत, वाटसरू व याचक तसेच गुलामांच्या मुक्ततेसाठी खर्च करतील आणि नमाज कायम करतील व जकात अदा करतील तसेच दिलेल्या वचनांची पूर्तता करतील आणि अडचणी, संकटे आणि युद्धप्रसंगी देखील संयम करतील हेच लोक सत्यशील आणि अल्लाहचे भय बाळगणारे आहेत. (१७७)

हे ईमानधारकानो, हत्येच्या बाबतीत तुमच्यासाठी हत्यादंडाचा आदेश नियत केला आहे. स्वतंत्र व्यक्तीने हत्या केली असेल तर त्या स्वतंत्र व्यक्तीस आणि गुलामाने हत्या केली असेल तर गुलामास मारले जावे आणि स्त्रीने हत्या केली असेल तर त्या स्त्रीची हत्या करावी. परंतु जर खूनी व्यक्तीच्या सोबत मृत व्यक्तीचा भाऊ जर क्षमेची वागणूक करू इच्छित असेल तर सर्वसामान्य नियमानुसार हत्यादंडाचा निर्णय घेतला जावा. खूनी व्यक्तीने चांगल्या प्रकारे अर्थदंड दिला पाहिजे.[५३] ही तुमच्या पालनकर्त्याकडून दिलेली मुभा आणि दया आहे. या उप्पर देखील जे अतीरेक करतील[५४] त्याच्यासाठी दु:खदायक यातना आहे. हे ज्ञानीजनहो, मृत्यूदंडामध्ये (समाजाच्या सुरक्षिततेचे) जीवन आहे. आशा आहे कि ह्या कायद्याचे भंग करण्यापासून तुम्ही स्वत:ला वाचवाल. (१७८-१७९)

तुमच्यावर हे नियत केले आहे कि जेव्हा तुमच्यापैकी कुणाच्या मृत्यूची घटका येऊन ठेपेल आणि तो आपल्या पश्चात संपत्ती सोडून जात असेल तर त्याने आई-वडील

५३) यावरून असे स्पष्ट झाले की इस्लामच्या फौजदारी कायद्यात खुनाची बाब बेदावापत्रासाठी पात्र आहे. खुन्याला 'किसास'पासून-प्राण घेण्यापासून माफ करण्याचा खून झालेल्याच्या वारसदारांना हक्क प्राप्त आहे. अशा परिस्थितीत खून करणाऱ्याचे प्राण घेण्याचा आग्रह धरणे, न्यायालयासाठी वैध नाही. तथापि माफ केल्याच्या स्थितीत खून करणाऱ्याने भरपाई म्हणून ठरलेले द्रव्य दिले पाहिजे.

५४) उदाहरणार्थ असे की खून झालेल्या व्यक्तीच्या वारसदारांनी मोबदला म्हणून द्रव्य प्राप्त केल्यानंतर पुन्हा सूड उगविण्याचा प्रयत्न करावा अथवा खुनी इसमाने ठरलेला मोबदला चुकता करण्यात चालढकल करावी आणि खून झालेल्याच्या वारसदारांनी त्याच्यावर जो उपकार केला आहे त्याची अशा कृतघ्नतेने परतफेड करावी.



आणि इतर नातेवाईकांसाठी प्रचलित पद्धतीने मृत्यूपत्र करावे[५५] हे सदाचाऱ्यांसाठी महत्वाचे कर्तव्य आहे. नंतर ज्यांनी मृत्यूपत्र ऐकले व त्यामध्ये बदल केले तर त्याचा गुन्हा बदल करणाऱ्यावर असेल. अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो. तरीसुद्धा ज्याला अशी शंका असेल कि मृत्यूपत्र करणाऱ्याने अजाणतेपणी किंवा जाणूनबुजून एखाद्याला त्याच्या हक्कापासून वंचित केले असेल परंतु नंतर त्या वंचितांमध्ये समेट करील तर त्यामध्ये त्याचा कोणताही गुन्हा असणार नाही. अल्लाह क्षमावंत व दयावंत आहे.

(१८०-१८२)

हे ईमानधारकानो, विहित केले तुमच्यावर उपवास जसे विहित केले होते तुमच्या पूर्वीच्यांवर जेणेकरून तुम्ही धर्मपरायण व्हाल. हे काही ठराविक दिवसांचे उपवास आहेत. तर तुमच्यापैकी जे आजारी असतील किंवा प्रवासांत असतील तर त्यांनी उपवास काळानंतर उपवास करावेत आणि ज्या लोकाना उपवास करण्याचे सामर्थ्य असेल (परंतु उपवास करणार नाहीत) त्यांनी दुर्बलांना मोबदला (फिदिया) म्हणून जेवू घालावे. एका उपवासासाठी एका दुर्बलाला जेवू घालावे आणि जो स्वेच्छापूर्वक अधिक भले करील तर ते त्याच्या स्वत:साठीच भले आहे. परंतु जर तुम्ही जाणलेत तर तुमच्यासाठी हेच अधिक उचित आहे कि तुम्ही उपवास[५६] करावा. (१८३-१८४)

रमजान महिन्यामध्ये कुरआनचे अवतरण झाले– मानवजाती-करिता मार्गदर्शन व

५५) वारसासंपत्तीच्या वाटपासंबंधी अद्याप कोणताही कायदा ठरला नव्हता अशा काळी सदरहू आज्ञा दिली गेली होती. त्यावेळी प्रत्येक व्यक्तीसाठी हे आवश्यक केले गेले होते की त्याने आपल्या वारसदारांचे हिस्से वसीयतद्वारे ठरवून जावे, जेणेकरून त्याच्या मृत्यूनंतर कुटुंबात तंटे होणार नाहीत व एखाद्या हक्कदाराचा हक्कही मारला जाऊ नये. नंतर जेव्हा वारसासंपत्तीच्या वाटपासंबंधी सर्वश्रेष्ठ अल्लाहने स्वत:च एक कायदा (जो पुढे सूरह 'निसा'त येणार आहे) ठरवून दिला तेव्हा, वारसदारांचे जे हिस्से सर्वश्रेष्ठ अल्लाहने ठरवून दिले आहेत त्यात वसीयतद्वारे कमी किंवा जास्त केले जाऊ शकत नाही. तसेच गैर वारसदाराच्या बाबतीत एकूण मालमत्तेच्या १/३ भागापेक्षा जास्तसाठी वसीयत केली जाऊ नये आणि मुस्लिम आणि काफीर एकमेकांचे वारसदार ठरू शकत नाही. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी असे नियमही घालून दिले आहेत.

५६) इस्लामच्या बहुतेक नियमांप्रमाणे रोजे अनिवार्य ठरविण्याचा नियम सुद्धा टप्प्या-टप्प्यानी लागू केला गेला आहे. हजरत मुहम्मद (स.) यांनी प्रारंभी मुसलमानांना प्रत्येक महिन्यात केवळ तीन दिवसांचे रोजे करण्याचा आदेश दिला होता. परंतु हे रोजे फर्ज-अनिवार्य नव्हते. मग हि. स. २ मध्ये रमजान महिन्याच्या या रोजांची आज्ञा कुरआनात उतरली. परंतु त्यात अशी सवलत दिली गेली की जे लोक रोजे सहन करण्याची शक्ती बाळगत असतानासुद्धा रोजे करीत नसतील तर त्यांनी प्रत्येक रोजाऐवजी एका गरीबाला जेऊ घालावे. नंतर दुसरी आज्ञा उतरली जी पुढे येत आहे.

मार्गदर्शनाच्या सुस्पष्ट पुराव्यांनी समाविष्ट सत्य व असत्याची कसोटी. ज्या कुणाला ह्या महिन्याचा लाभ होईल त्याने ह्या महिन्यांत पूर्ण उपवास करावेत. आणि जे आजारी असतील किंवा प्रवासांत असतील त्यांनी उपवास काळानंतर उरलेल्या उपवासांची संख्या पूर्ण करावी. अल्लाह तुमच्यासाठी सुविधा इच्छितो अडचणी इच्छित नाही. ही पद्धत ह्यासाठीच सांगितली जात आहे की तुम्ही उपवासांची संख्या पूर्ण करावी व ज्या सरळ मार्गावर अल्लाहने तुम्हाला आणले आहे आणि जे मार्गदर्शन अल्लाहने तुम्हाला प्रदान केले आहे त्यावर तुम्ही अल्लाहची थोरवी वर्णावी तसेच तुम्ही अल्लाहचे ऋण व्यक्त करावे. (१८५)

आणि जेव्हा माझे भक्त तुम्हाला माझ्याबद्दल विचारतील तर (त्यांना सांगा की) मी तर सदैव निकट आहे. धांवा करणारा जेव्हा माझा धांवा करतो तेव्हा मी त्याच्या हाकेला प्रतिसाद देतो. तेव्हा त्याने माझ्या प्रतिसादाचा शोध घ्यावा माझ्यावर श्रद्धा ठेवावी जेणेकरून ते सन्मार्गावर येतील. (१८६)

तुमच्यासाठी उपवास काळांत रात्री आपल्या पत्नींजवळ जाणे वैध केले आहे. त्या तुमच्यासाठी पोषाख आहेत आणि तुम्ही त्यांच्यासाठी पोषाख आहांत अल्लाहने जाणले की तुम्ही गुपचुपपणे स्वत:शीच प्रतारणा करीत होतात. म्हणून त्याने तुम्हाला क्षमा केली आणि दुर्लक्षही केले. तेव्हा आता तुम्ही त्यांच्याशी सोबत करा आणि ईश्वराने तुमच्यासाठी विहित केले आहे त्याची इच्छा करा. आणि खा व प्या इथपर्यंत कि रात्रीच्या काळोखी रेषेपासून पहाटेची पांढुरकी रेषा स्पष्ट दिसून येईल तेव्हा ही सर्व कामे सोडून रात्रीपर्यंत आपला उपवास पूर्ण करा. आणि जेव्हा तुम्ही मसजीदमध्ये एकांतवास सुरू कराल तेव्हा आपल्या पत्नीशी (शरीर) संबंध ठेवू नका. या अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत. तेव्हा त्यांच्याजवळ जाऊ नका. अशा तऱ्हेने अल्लाह आपले आदेश लोकांकरिता स्पष्ट समजावून सांगत आहे. जेणेकरून ते चुकीच्या वर्तनापासून परावृत्त राहतील. (१८७)

आणि तुम्ही आपसामध्ये दुसऱ्याची संपत्ती अवैधपणे गिळंकृत करू नका किंवा आपल्या अधिकाऱ्यांच्या पुढे ते ह्या हेतूने सादर करू नका कि तुम्हाला त्या संपत्तीमधील काही भाग हेतूपुरस्सर हकनाकपणे खाण्याची संधी मिळेल.[५७] (१८८)

लोक तुम्हाला चंद्राच्या घटत्या व वाढत्या कलांच्या विषयी विचारतात. त्यांना

**५७)** सदरहू आयतचा एक अर्थ तर असा की अधिकाऱ्यांना लाच देऊन अवैध लाभ घेण्याचा प्रयत्न करू नये. दुसरा अर्थ असा की जेव्हा तुम्ही स्वत: जाणता की संपत्ती दुसऱ्या इसमाची आहे तेव्हा केवळ त्याच्याजवळ तसा पुरावा नाही म्हणून अथवा डावपेचाने तुम्ही ती गिळंकृत करू शकता, या कारणापोटी त्या संबंधीचा खटला न्यायालयात घेऊन जाऊ नका. खटल्याच्या मांडणीनुसार न्यायाधीश ती संपत्ती तुम्हाला देऊन टाकणेही शक्य आहे, परंतु ती तुमची वैध मालमत्ता नसेल.



सांगा कि तो हजचा काळ आणि कालगणनेसाठी आहे. आणि सदाचार हा नव्हे कि तुम्ही मागील दाराने प्रवेश करावा. तर सदाचार हा आहे कि माणसाने ईश्वराच्या अप्रसन्नतेपासून स्वत:ला वाचवावे. आणि घरांमध्ये पुढील प्रवेशद्वारामधून दाखल व्हावे. आणि अल्लाहचे भय बाळगा जेणेकरून तुम्हाला यश लाभेल.[५८] (१८९)

आणि तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या लोकांशी लढा जे तुमच्याशी लढतात परंतु अतिरेक करू नका. अल्लाहला अतिरेक करणारे आवडत नाहीत. आणि त्यांच्याशी युद्ध करा जिथे कुठे तुमचा त्यांच्याशी सामना होईल. आणि त्यांना त्या ठिकाणाहून हाकलून लावा जिथून त्यांनी तुम्हाला हाकलले होते. हे यासाठीच की जरी हत्या करणे वाईट असले तरी उपद्रव करणे हे त्यापेक्षाही वाईट आहे.[५९] पवित्र मसजीदीच्या (काबागृहाच्या) निकट जोपर्यंत ते तुमच्याशी युद्ध करणार नाहीत तोपर्यंत तुम्हीही त्यांच्याशी युद्ध करू नका. परंतु जेव्हा ते युद्ध करतील तेव्हा तुम्हीही त्यांच्याशी युद्ध करा. द्रोह करणाऱ्यांसाठी हीच शिक्षा आहे. नंतर जर ते (युद्धापासून) परावृत्त झाले तर अल्लाह क्षमावंत व कृपावंत आहे. (१९०-१९२)

त्यांच्याशी तोपर्यंत युद्ध करा जोपर्यंत उपद्रव नष्ट होत नाही आणि अल्लाहसाठीच जीवनव्यवस्था (प्रस्थापित) व्हावी. मात्र जर ते परावृत्त झाले तर लक्षांत ठेवा की अत्याचाऱ्यांशिवाय कुणाशीही शत्रुत्व उचित नाही. (१९३)

प्रतिष्ठित (युद्धासाठी) महिने हे प्रतिबंधित महिने आहेत त्यामुळे त्या प्रतिबंधांचे पालन सर्वांनी सारखेच केले पाहिजे.[६०] म्हणून (प्रतिबंधित महिन्यांत) जे तुमच्यावर हात

**५८)** अरब लोकात ज्या भ्रामक रूढी प्रचलित होत्या त्यापैकी एक अशीही होती की हजयात्रेचा 'एहराम' परिधान केल्यानंतर आपल्या घरात ते दारामधून प्रवेश करीत नसत, तर मागच्या बाजूने भिंतीवरून उडी मारून किंवा भिंतीत खिडकीसारखे छिद्र बनवून प्रवेश करीत असत. तसेच प्रवासावरून परत आल्यानंतर सुद्धा घरांच्या मागच्या बाजूने ते प्रवेश घेत असत. सदरहू आयतीत केवळ याच रूढीचे खंडन केले आहे असे नाही तर सर्वच भ्रामक रूढींचा असे सांगून आघात केला गेला आहे की पुण्याई अशा रूढीत नाही तर अल्लाहचे भय बाळगणे व त्याच्या आज्ञाभंगापासून दूर राहणे हीच खरी पुण्याई आहे.

**५९)** याठिकाणी 'उपद्रव'ने एखाद्या समूहाचा किंवा व्यक्तीचा केवळ या कारणास्तव छळ करणे की त्याने असत्य सोडून सत्य स्वीकारले आहे, हे अभिप्रेत होय.

**६०)** अरबवासियांत हजरत इब्राहीम (अ.) यांच्या काळापासून अशी प्रथा चालत आली होती की जिल्कद, जिल्हज्ज आणि मुहर्रम हे तीन महिने हजसाठी विशिष्ट होते तर रजब हा महिना 'उमरा'साठी विशिष्ट होता. या चारही महिन्यात युद्ध, रक्तपात आणि लूटमार वर्ज्य होते जेणेकरून काबागृहाच्या यात्रेकरूंना शांतीने व सुखरूपपणे ईश्वराच्या घरापर्यंत जाता यावे व आपापल्या घरी परतता यावे. या कारणाने सदरहू महिन्यांना हराम-आदरणीय महिने म्हटले जात असे.

उगारतील त्यांच्याविरूद्ध तुम्हीही हात उगारा. आणि ईश्वरी कोपाचे भय बाळगा. आणि लक्षांत ठेवा कि अल्लाह धर्मपरायण लोकांसोबत आहे. (१९४)

ईश्वरी सेवा मार्गामध्ये (संपत्ती) खर्च करा आणि आपल्या हाताने स्वत:ला अडचणीत टाकण्यापासून परावृत्त रहा. आणि सद्वर्तन करा अल्लाहला सद्वर्तन करणारेच आवडतात. (१९५)

आणि अल्लाहच्या (प्रसन्नते) साठी हज (यात्रा) आणि उमरा (पवित्र काब्याचे दर्शन) पूर्ण करा. जर कुठे वेढले गेलात तर जी कुर्बानी उपलब्ध असेल ती अल्लाहच्यासाठी कुर्बान (समर्पित) करा.[६१] मात्र तोपर्यंत तुम्ही डोक्यावरील केसांचे मुंडण करू नका जोपर्यंत ती कुर्बानी आपल्याजागी पोहचत नाही. परंतु ज्या व्यक्तीला आजारपणामुळे किंवा डोक्याच्या व्याधीमुळे डोक्यावरील केसांचे मुंडण करणे अपरिहार्य झाले तर त्याने प्रतिदानाच्या रूपांत उपवासाचे व्रत करावे किंवा दान द्यावे किंवा कुर्बानी करावी.[६२] नंतर जर तुम्हाला सुलभता लाभली[६३] तर ज्याला हज करण्याची संधी लाभेल त्याने हज्जचा कालावधी येईपर्यंत उमरा करण्याचा लाभ घ्यावा. आणि आपल्या ऐपतीप्रमाणे कुर्बानी करावी आणि जर कुर्बानी करण्यास असमर्थ असेल तर हजच्या काळांत तीन उपवास करावेत आणि घरी परतल्यावर सात असे दहा रोजे पूर्ण करावेत. ही मुभा त्या लोकांकरिता आहे ज्यांची घरे मसजीदे हरामच्या (काबागृहाच्या) जवळ नसतील. आणि तुम्ही अल्लाहच्या अवज्ञेपासून अलिप्त रहा. लक्षात ठेवा की अल्लाह कठोर शिक्षा करणारा आहे. (१९६)

हज्जचे महिने नियत (निश्चित केलेले) आहेत. जी व्यक्ती ह्या निश्चित महिन्यामध्ये हज करण्याचे ठरवील तर त्याने वैषयिक वासनेपासून दूर रहावे. आणि अभद्र बोलू नये आणि भांडणतंटे करू नये. जे काही तुम्ही सत्कर्मे कराल ते अल्लाह जाणतो आहे आणि हज्जच्या काळांत सोबत शिदोरी घ्या. सर्वोत्तम शिदोरी म्हणजे अल्लाहचे भय बाळगणे होय. आणि हे ज्ञानीजनहो माझे भय बाळगा. आणि जर हज्जच्या काळांत तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या अनुग्रहाचा शोध घेतलांत तर त्यामध्ये काहीही गैर नाही.[६४] मग जेव्हा

**६१)** म्हणजे वाटेत जर एखादे असे कारण उद्भवले ज्यामुळे पुढे जाणे अशक्य झाले असेल व नाइलाजाने तेथेच थांबावे लागले असेल तर उंट, गाय आणि शेळी यापैकी जे कोणते जनावर उपलब्ध असेल ते अल्लाहसाठी कुर्बान करा.

**६२)** हदीस वरून असे कळते की अशा परिस्थितीत पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तीन दिवसांचे रोजे, अथवा सहा गरीबांना जेऊ घालणे किंवा कमीत कमी एक शेळी कापण्याची आज्ञा दिली आहे.

**६३)** म्हणजे ज्या कारणाने तुमचा नाइलाज होऊन वाटेतच थांबावे लागले होते ती सबब दूर व्हावी.

**६४)** 'रब'च्या कृपेच्या शोधाने अभिप्रेत हज प्रवासाच्या काळात अर्थप्राप्तीसाठी एखादे काम करणे होय.



अरफातहून निघाल तेव्हा मशअरे हराम (मुजदलफह) च्या जवळ अल्लाहचे स्मरण करा. आणि अशातऱ्हेने स्मरण करा जसे त्याने तुम्हाला मार्गदर्शन केले आहे. अन्यथा यापूर्वी तर तुम्ही भरकटलेले होतात. तेव्हा जिथून सर्व लोक परततात तुम्ही सुद्धा तिथून परत या. आणि अल्लाहजवळ क्षमा याचना करा.[६५] नि:संशय तो क्षमावंत आणि दयावंत आहे. नंतर जेव्हा हज्जसंबंधीचा विधी तुम्ही पूर्ण कराल तेव्हा त्यानंतर तुम्ही अल्लाहचे स्मरण करा जसे तुम्ही आपल्या पूर्वजांचे स्मरण करीत होतात. किंबहुना त्याहीपेक्षा अधिक स्मरण करा, (परंतु अल्लाहचे स्मरण करणाऱ्यांमध्येही खूप फरक आहे.) त्यांच्यापैकी काही तर असे आहेत जे म्हणतात कि, ''हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला या लोकीच सर्वकाही दे. अशा व्यक्तीसाठी परलोकमध्ये काहीही वाट्याला येणार नाही. आणि काहीजण असे म्हणतात कि, ''हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला ह्या लोकीही चांगले फळ दे आणि परलोकामध्येही चांगले फळ दे. आणि नरकाग्नीच्या यातनांपासून आम्हाला वाचव.'' हेच ते लोक आहेत ज्यांनी आपल्या कर्मानुसार जे प्राप्त केले आहे त्यानुसार त्यांचा हिस्सा आहे आणि अल्लाह लवकरच हिशोब घेणार आहे. हे गणतीचे काही ठराविक दिवस आहेत जे तुम्ही अल्लाहच्या स्मरणामध्ये घालविले पाहिजेत. परंतु जो त्वरित दोनच दिवसांत परतला तर त्यामध्ये काहीही हरकत नाही आणि जर एखादा अधिक काळ थांबून परतला तर त्यामध्येही काही हरकत नाही.[६६] जर त्याने अल्लाहचे भय बाळगले असेल. तेव्हा अल्लाहचे भय बाळगा आणि जाणून असा कि तुम्हाला त्याच्याकडे परत नेले जाईल. (१९७-२०३)

माणसामध्ये एखादा तर असा आहे की ऐहिक जीवनात ज्याच्या गोष्टी तुम्हाला मोहक वाटतात आणि आपल्या नेक नियतीवर तो वारंवार अल्लाहला साक्षी ठरवितो, परंतु वास्तविक पाहता तो सत्याचा अत्यंत वाईट शत्रू असतो. जेव्हा त्याला सत्ता प्राप्त

**६५)** हजरत इब्राहीम व हजरत इस्माईल (अ.) यांच्या काळापासून अरब लोकांची हजची परिचित पद्धत अशी होती की जिल्हज्जा महिन्याच्या ९ तारखेला मिनाहून अरफातला जात असत व रात्री तेथून परत येऊन मुज्दल्फा या ठिकाणी मुक्काम करीत असत. परंतु नंतरच्या काळात हळूहळू जेव्हा कुरैश जमातीची भटशाही प्रस्थापित झाली, तेव्हा त्यांनी सांगितले, आम्ही हरम-काबावाले आहोत. सामान्य अरब लोकांसमवेत अरफातपर्यंत जावे ही गोष्ट आमच्या प्रतिष्ठेला कमीपणाची गोष्ट आहे. म्हणून त्यांनी आपल्या वेगळेपणाची शान अशी निर्माण केली की ते मुज्दल्फा पर्यंतच जाऊन परत येत असत आणि सामान्य अरबांना पुढे अरफातपर्यंत जाण्यासाठी सोडत असत. त्याच गर्व आणि अहंकाराच्या मूर्तीला या आयतींद्वारे फोडले गेले आहे.

**६६)** म्हणजे तशरीकच्या (बकर ईद नंतरच्या तीन) दिवसांत मिनाहून मक्केकडे परतणे मग ते जिल्हज्जा महिन्याच्या बारा तारखेला होवो अथवा तेरा तारखेला, दोन्ही स्थितीत काहीच हरकत नाही.

होते,[६७] तेव्हा पृथ्वीतलावर त्याची सारी धावपळ केवळ याचकरिता असते की उपद्रव माजवावे, शेतीचा विध्वंस करावा व मानवजात नष्ट करावी - वास्तविक पाहता अल्लाह (ज्याला तो साक्षी ठरवीत होता) त्याला उपद्रव मुळीच आवडत नाही. आणि जेव्हा त्याला सांगितले जाते कि अल्लाहचे भय बाळग तेव्हा आपल्या प्रतिष्ठेच्या विचाराने तो गुन्ह्याकडे प्रवृत्त होतो. अशा व्यक्तीला नरकाचेच ठिकाण आहे. आणि ते अत्यंत वाईट स्थान आहे. माणसांमध्ये अशीही एखादी व्यक्ती असते कि तो आपल्या जीवाचे मोलही अल्लाहसाठी समर्पित करतो. अशा सेवकांवर अल्लाह अत्यंत प्रसन्न असतो. हे श्रद्धावंतांनो तुम्ही पूर्णपणे इस्लाममध्ये दाखल व्हा.[६८] आणि शैतानाच्या पाऊलवाटेचे अनुकरण करू नका. तो तुमचा उघड शत्रू आहे. जेव्हा तुमच्याकडे स्पष्ट मार्गदर्शन आले आणि यानंतरही तुम्ही डगमगू लागलात तर लक्षांत ठेवा कि अल्लाह अत्यंत प्रभुत्वशाली आणि न्यायकर्ता आहे– तेव्हा– काय ते ह्या गोष्टीच्या प्रतिक्षेत आहेत कि अल्लाहने मेघांच्या छत्रावर आरूढ होऊन देवदूतांच्या थव्यासह स्वत: निर्णय करावा? शेवटी सर्व गोष्टी अल्लाहपुढेच सादर होणार आहेत. (२०४-२१०)

इस्राईलच्या संततीला विचारा की आम्ही त्यांना किती स्पष्ट संकेत दिले. (शिवाय हेही विचारा की) अल्लाहची कृपा (ईश्वरीय मार्गदर्शन) प्राप्त झाल्यानंतर जो समाज त्या कृपेला विकृत करतो त्याला अल्लाह कशी कठोर शिक्षा देतो. (२११)

ज्या लोकांनी नाकारण्याची नीति अवलंबिली त्यांच्यासाठी सांसारिक जीवन अत्यंत प्रिय आणि मनाला आवडेल असे बनविलेले आहे. असे लोक श्रद्धावंतांचा उपहास करतात परंतु पुनरुत्थानाच्या दिवशी धर्मपरायण लोक त्यांच्या तुलनेने उच्च स्थानावर असतील. उरली भौतिक जीवनाची उपजीविका त्याविषयी अल्लाहला अधिकार आहे कि ज्याच्यासाठी इच्छिल त्याला अगणित देतो. (२१२)

प्रारंभी लोकांचा एकच समूहसमाज होता. तेव्हा अल्लाहने प्रेषित पाठविले शुभवार्ता देणारे आणि सावधान करणारे आणि त्यांच्यासोबत ग्रंथ अवतरले त्यांच्यामध्ये निर्णय करण्यासाठी ज्यामध्ये ते मतभेद करीत होते. मतभेद त्यांनी निर्माण केला ज्यांच्याकडे सत्याचे ज्ञान दिले होते. त्यांनी स्पष्ट मार्गदर्शन प्राप्त झाल्यानंतर आपसांतील दुराग्रहामुळे त्यांमध्ये मतभेद केले ज्यानी ईमान धारण केले त्याना अल्लाहने आपल्या हुकुमाने तो सत्यमार्ग दाखविला ज्यामध्ये लोकांनी मतभेद केला होता. अल्लाह ज्याला इच्छितो

**६७)** दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो ''जेव्हा तो परततो'' अर्थ असा की अशा बाता मारून जेव्हा तो परततो तेव्हा प्रत्यक्षात हे सर्व काही करतो.

**६८)** म्हणजे कोणताही अपवाद आणि काहीही राखीव न ठेवता आपले संपूर्ण जीवन इस्लामच्या वर्चस्वाखाली आणा. असे होता कामा नये की तुम्ही आपले जीवन विभिन्न भागात विभागून काही भागात इस्लामचे अनुकरण करावे तर काही भागांना त्याच्या अनुकरणातून वगळावे.



त्याला मार्ग दाखवितो. (२१३)

तेव्हा काय तुम्ही हे समजता कि तुम्ही सहजासहजी स्वर्गामध्ये दाखल व्हाल? वास्तविक अद्याप तुमच्यावर ते सर्वकाही ओढवले नाही जसे तुमच्या पूर्वीच्या लोकांवर ओढवले[६९] त्यांच्यावर कठीण प्रसंग ओढवले. आणि संकटे आली ह्यांना हादरवून सोडले इथपर्यंत की प्रेषित आणि त्यांचे सोबती ज्यांनी ईमान धारण केले होते ते म्हणू लागले कि अल्लाहची मदत केव्हा येईल? सावध व्हा अल्लाहची मदत जवळच आहे. (२१४)

लोक त्यांना (प्रेषितांना) विचारतात की आम्ही काय खर्च करावा? तुम्ही सांगा ''जे काही तुम्ही खर्च कराल तो आईवडिलांवर, नातेवाईकांवर, अनाथ आणि गोरगरिबांवर आणि वाटसरूंवर खर्च करा आणि जे काही भले तुम्ही कराल ते अल्लाहला माहीत असेल. (२१५)

तुमच्यावर युद्ध नियत केले आणि तुम्हाला ते योग्य वाटत नाही परंतु शक्य आहे की जी गोष्ट तुम्हाला नापसंत असेल परंतु तीच तुमच्यासाठी अधिक चांगली असेल आणि हेही शक्य आहे की जी गोष्ट तुम्हाला पसंत असेल ती तुमच्यासाठी वाईट असेल. अल्लाह जाणतो तुम्ही जाणत नाही. (२१६)

तुला विचारतात की 'हराम' महिन्यांत युद्ध करणे कसे आहे? तू सांग कि त्या महिन्यांत युद्ध करणे मोठा अपराध आहे. परंतु अल्लाहच्या मार्गापासून अडविणे आणि अल्लाहला नाकारणे आणि मस्जिदे हरामचा (काबागृहाचा) मार्ग अडविणे आणि काबागृहाच्या परिसरांतील लोकांना तेथून बाहेर काढणे अल्लाहच्या निकट यापेक्षाही वाईट

**६९)** अर्थ असा की प्रेषित तर जेव्हा जेव्हा जगात आले आहेत त्यांना व त्यांच्यावर ईमान आणणाऱ्या लोकांना, ईश्वराशी बंडखोरी व शिरजोरी करणाऱ्या लोकांशी तीव्र लढा द्यावा लागला आहे. ते आपले प्राण जोखीमात टाकून असत्य पद्धतीविरूद्ध सत्यधर्म प्रस्थापित करण्यासाठी झटले आहेत, तेव्हा कोठे ते जन्नतसाठी पात्र ठरले आहेत. ईश्वराचा स्वर्ग इतका स्वस्त नाही की तुम्ही ईश्वर व त्याच्या धर्मासाठी कसलेही कष्ट सोसू नये व तो तुम्हाला मिळावा.

आहे आणि अनाचार हा हत्येपेक्षाही वाईट आहे.[७०] ते सदैव तुमच्याशी युद्ध करीत राहतील इथपर्यंत कि जर ते करू शकतील तर तुम्हाला तुमच्या धर्मापासून परावृत्त करतील. आणि तुमच्यापैकी जे लोक आपल्या धर्माकडे पाठ फिरवतील आणि नाकारण्याच्याच परिस्थितीत मरेल त्याचे भौतिक आणि मरणोत्तर दोन्ही जीवनांतील आचरण व्यर्थ होईल. हेच ते लोक आहेत जे नरकवासी आहेत आणि सदैव नरकातच खितपत पडतील. आणि ज्या लोकांनी ईमान धारण केले आणि ज्यांनी अल्लाहच्या मार्गात घरादाराचा त्याग केला आणि लढा दिला[७१] हेच लोक अल्लाहच्या कृपेची आशा करतात. आणि अल्लाह क्षमावंत आणि दयावंत आहे. (२१७-२१८)

ते तुम्हाला दारू आणि जुगाराविषयी विचारतात. त्यांना सांगा की दोन्हीमध्ये मोठा अपराध आहे. जरी त्यामध्ये लोकांसाठी काही लाभ आहे परंतु त्यांचा अपराध त्यांच्या लाभापेक्षा अधिक मोठा आहे.[७२] ते तुम्हाला विचारतात की काय खर्च करावा? सांगा की

**७०)** ही गोष्ट एका घटनेशी संबंधित आहे. हि. सन २ च्या रजब महिन्यात हजरत मुहम्मद (स.) यांनी आठ माणसांची एक तुकडी 'नखला' कडे पाठविली होती. (नखला हे मक्का आणि ताईफ च्या दरम्यान एक ठिकाण आहे) त्या तुकडीला आदेश दिला होता की कुरैशांची हालचाल आणि त्यांच्या भावी इराद्यासंबंधीची माहिती प्राप्त करावी. युद्धाची कसलीही परवानगी पैगंबर (स.) यांनी त्या तुकडीला दिली नव्हती. परंतु वाटेतच त्या लोकांना एक व्यापारी काफिला भेटला. त्यांनी त्या काफिल्यावर हल्ला करून एकाला ठार केले व उरलेल्या लोकांना मालासह पकडून मदिन्यात आणले. ही कृती अशा वेळी झाली जेव्हा रजब महिना संपून, शाबान महिन्यास प्रारंभ होत होता आणि ही गोष्ट संदिग्ध होती की हल्ला रजब (अर्थात आदरणीय) महिन्यात झाला आहे की शाबान महिन्यात. परंतु कुरैशांनी, तसेच आडपडद्यात त्यांच्याशी संगनमत केलेल्या मदिन्यातील यहूदींनी आणि दांभिक लोकांनी मुसलमानांविरूद्ध डांगोरा पिटण्यासाठी या गोष्टीला खूपच प्रसिद्ध दिली. त्यांनी तीव्र आक्षेप घेणे सुरू केले की हे लोक निघाले आहेत मोठे अल्लाहवाले बनून परंतु वस्तुस्थिती अशी आहे की आदरणीय महिन्यातसुद्धा रक्तपात करण्यास चुकत नाहीत. याच आक्षेपाचे उत्तर सदरच्या आयतीत दिले गेले आहे.

**७१)** 'जिहाद'चा अर्थ, एखादे ध्येय साध्य करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्टा करणे, असा होतो. हा केवळ युद्धाचा समानार्थी शब्द आहे असे नाही. युद्धासाठी तर अरबी भाषेत, 'किताल' या शब्दाचा प्रयोग होतो. जिहाद, त्यापेक्षा कितीतरी व्यापक अर्थी शब्द आहे. या शब्दात युद्धासह सर्व प्रकारच्या प्रयत्नांचा समावेश होतो.

**७२)** ही मद्य आणि जुगारासंबंधी पहिलीच आज्ञा आहे. यात केवळ त्या संबंधाने नाराजी व्यक्त करून पुरे केलेले आहे. पुढे सूरह निसा, आयत क्र. ४३ आणि सूरह माईदा आयत क्र. ९० यात नंतरच्या आज्ञा येत आहेत.



जे काही आवश्यकतेपेक्षा अधिक असेल.[७३] अशा प्रकारे अल्लाह तुम्हाला आपली संकेतवचने स्पष्ट करून सांगत आहे जेणेकरून तुम्ही चिंतन करावे भौतिक आणि मरणोत्तर जीवनाचे. (२१९)

ते तुम्हाला अनाथांविषयी विचारतात. त्याना सांगा कि त्यांच्या उद्धारासाठी जो काही अवलंब कराल तो उत्तम असेल आणि त्याना तुम्ही आपल्यासोबत सामील कराल तर ते तुमचे भाऊबंदच आहेत. आणि अल्लाह अनाचारी आणि सुधारणावाद्यांना चांगल्याप्रकारे जाणतो. आणि अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हाला त्याने अडचणींत टाकले असते नि:संशय अल्लाह प्रभुत्वशाली आणि तत्वदर्शी आहे. (२२०)

आणि अनेकेश्वरवादी स्त्रीयांशी विवाह करू नका जोपर्यंत त्या इमान धारण करीत नाहीत तथापि मुसलमान दासी कोणत्याही अनेकेश्वरवादी मर्यादाशील स्त्रीपेक्षा अधिक उत्तम आहे. जरी तुम्हाला ती अधिक पसंत असेल. आणि आपल्या स्त्रीयांचे विवाह अनेकेश्वरवादी पुरुषांशी करू नका. इथपर्यंत कि ते श्रद्धा ठेवीत नाहीत. एक श्रद्धावंत गुलाम अनेकेश्वरवादी पुरुषापेक्षा अधिक उत्तम आहे जरी तुम्हाला तो चांगला वाटत असेल. हे लोक तुम्हाला अग्नीकडे बोलावीत आहेत आणि तो आपल्या आज्ञेद्वारे तुम्हाला स्वर्गाकडे व क्षमेकडे बोलवीत आहे आणि तो आपले आदेश स्पष्टपणे लोकांसमोर विषद करीत आहे जेणेकरून त्यांनी बोध घ्यावा. (२२१)

विचारतात की ऋतुस्रावाविषयी कोणता आदेश आहे? सांग त्यांना की ती क्लेशदायक अवस्था आहे तेव्हा तुम्ही ऋतुस्रावाच्या काळांत त्यांच्यापासून दूर रहा आणि जोपर्यंत ऋतुस्नान करीत नाहीत तोपर्यंत त्यांच्याजवळ जाऊ नका[७४] आणि जेव्हा त्या ऋतुस्नात होतील त्यानंतर अल्लाहने हुकुम दिला आहे त्याप्रमाणे त्यांच्या जवळ जा. नि:संशय अल्लाहला पश्चाताप करणारे आवडतात. आणि पावित्र्य राखणारेही त्याला आवडतात. तुमच्या पत्नी तुमच्यासाठी शेती (तुमचा वंशवृद्धि करणाऱ्या जननी) आहेत. जेव्हा तुमची इच्छा होईल तेव्हा (वंशवृद्धिच्या भावनेने) तिच्याकडे जा. आणि आपला

**७३)** या आयतीपासून हल्ली मोठे विचित्र अर्थ काढले जात आहेत. वास्तविकपणे सदरहू आयतीच्या शब्दावरून स्पष्टपणे प्रकट होते की लोक आपल्या संपत्तीचे मालक होते. ते प्रश्न असा विचारित होते की आम्ही ईश्वराच्या प्रसन्नतेसाठी काय खर्च करावे? फर्माविले गेले की, प्रथम त्यांनी आपल्या गरजा पूर्ण कराव्या मग जे जास्त उरले असेल ते अल्लाहच्या मार्गात खर्च करावे. एका दासाने आपल्या रबच्या मार्गात स्वखुशीने खर्च करावा असा हा स्वयंभावी खर्च आहे.

**७४)** अर्थ असा की, त्या स्थितीत त्यांच्याशी संभोग करू नका.

वंश पुढे चालवा आणि ईश्वरी कोपाचे भय बाळगा.[७५] आणि जाणून असा की तुमची त्याच्याशी भेट होणार आहे. आणि श्रद्धावंतांना शुभवार्ता सांगा. (२२२-२२३)

अल्लाहच्या नांवाचा उपयोग अशा शपथग्रहण करण्यासाठी उपयोग करू नका की त्यामुळे सदाचार, धर्मपरायणता आणि लोककल्याणाच्या कार्यापासून तुम्ही परावृत्त व्हाल. अल्लाह तुमच्या सर्व गोष्टी ऐकणारा आणि जाणणारा आहे. अल्लाह तुम्हाला तुमच्या निरर्थक शपथांबद्दल पकडणार नाही परंतु ज्या शपथा तुम्ही प्रामाणिकपणे घेता त्याविषयी तुम्हाला अवश्य विचारले जाईल. अल्लाह अत्यंत क्षमावंत आणि सहनशील आहे. (२२४-२२५)

जे लोक आपल्या पत्नीशी संबंध न ठेवण्याची शपथ घेतात त्यांच्यासाठी चार महिन्यांचा अवधी आहे.[७६] जर त्यांनी पुन्हा संबंध प्रस्थापित केले तर अल्लाह क्षमावंत व कृपावंत आहे. आणि जर त्यांनी तलाकचाच विचार केला असेल तर लक्षांत ठेवा अल्लाह सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे.[७७] (२२६-२२७)

ज्या स्त्रीयांना तलाक दिली गेली असेल त्यांनी तीन ऋतुस्त्रावापर्यंतच्या काळापर्यंत प्रतिक्षा करावी. आणि त्यांच्यासाठी हे वैध नाही कि अल्लाहने त्यांच्या गर्भाशयांत जे काही घडविले आहे ते त्यांनी लपवावे त्यांनी मुळीच तसे करू नये. जर त्या अल्लाह आणि अंतीम दिनावर विश्वास ठेवीत असतील. त्यांचे पती त्यांच्याशी संबंध सुधारण्यास तयार असतील तर ते या इद्दतच्या काळात त्यांना आपल्या पत्नी म्हणून परत स्वीकार

**७५)** सर्वंकष अर्थी शब्द आहेत. यातून दोन अर्थ निघतात आणि दोन्ही अर्थांचे महत्व सारखेच आहे. एक असा की आपला वंश टिकविण्याचा प्रयत्न करा जेणेकरून तुम्ही जग सोडण्यापूर्वी तुमच्याजागी काम करणारे दुसरे अस्तित्वात असावेत. दुसरा अर्थ असा की ज्या भावी पिढीला तुम्ही आपल्याजागी सोडून जाणार आहात तिला धर्म, नीतिमत्ता आणि माणुसकीच्या गुणांनी सुशोभित करण्याचा प्रयत्न करा.

**७६)** शरीअत-इस्लामी कायदेशास्त्राच्या परिभाषेत या गोष्टीला 'ईला' असे म्हणतात. पती व पत्नी यांच्यातील संबंध नेहमी आनंददायकच असू शकतील असे नाही, तर त्यांच्यात बिघाड येण्याची कारणे उद्भवतात. परंतु त्यांच्यातील असले बिघाड, की त्या उभयतांची कायद्यात्मक रीतीने तर एकमेकाशी बांधीलकी असावी व व्यवहारत: मात्र ते दोघे एकमेकापासून असे विभक्त रहावेत जणू ते पती व पत्नी नाहीच, ईश्वराच्या शरीअतला ते पसंत नाही. पती व पत्नी संबंधातील अशा बिघाडासाठी सर्वश्रेष्ठ अल्लाहने चार महिन्यांची मुदत ठरवून दिलेली आहे की एकतर या कालावधीत त्यांनी आपले संबंध नीट करावेत नाहीपेक्षा वैवाहिक संबंध तोडून टाकावेत जेणेकरून ते दोघे एकमेकापासून मुक्त होऊन ज्याच्याशी निभाव शक्य असेल त्याच्याशी त्यांनी विवाह करावा.

**७७)** म्हणजे तुम्ही जर अयोग्य गोष्टीसाठी पत्नीला सोडले आहे तर अल्लाहकडून स्वत:ला निर्भय समजू नका. तो तुमच्या अत्याचारापासून गाफील नाही.



करण्याचे हक्कदार आहेत.[७८] आणि याबाबतीत स्त्रियांना त्याचप्रमाणे हक्क आहे परिचित पद्धतीनुसार जसे पुरुषांना आहे. मात्र पुरुषांसाठी स्त्रियांपेक्षा एक दर्जा अधिक आहे. अल्लाह प्रभुत्वशाली आणि विवेकी आहे. (२२८)

तलाक फक्त दोन वेळा आहे नंतर त्याना एकतर सर्वसंमत पद्धतीने आपल्याजवळ ठेवून घ्या किंवा सन्मानपूर्वक त्यांना निरोप द्या.[७९] आणि तुमच्यासाठी हे वैध नाही की जे काही तुम्ही त्यांना दिले आहे त्यातून काहीही परत घ्यावे. अपवाद फक्त जर त्या दोघांना भय वाटत असेल की अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे ते पालन करू शकत नाहीत. नंतर जर तुम्हाला भय वाटत असेल की ते दोघे अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांवर कायम राहू शकत नसतील तर त्यांच्यामध्ये असा समेट घडविण्यामध्ये कोणताही अपराध नाही की पत्नीने आपल्या पतीला प्रतिदान देऊन स्वत:ला मुक्त करून घ्यावे.[८०] ह्या अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत त्याचे उल्लंघन करू नका आणि जे ह्या मर्यादांचे उल्लंघन करतील ते नि:संशय अत्याचारी आहेत. (२२९)

नंतर जर (दोन वेळा तलाक दिल्यानंतर पतीने आपल्या पत्नीला तिसऱ्यांदा) तलाक दिला तर ती स्त्री त्याच्यासाठी वैध नाही जोपर्यंत तिचा दुसऱ्या पुरुषाशी विवाह होऊन त्यानंतर तो पुरुष तिला तलाक देईल.[८१] तसेच त्या पहिल्या पतीला आणि या स्त्रीला वाटत असेल की अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे आपण पालन करू शकू तरच त्यांना पुन्हा विवाह करून वैवाहिक जीवन जगता येईल. या अल्लाहने घालून

**७८)** ही आज्ञा केवळ त्याच स्थितीशी संबंधित आहे जेव्हा पतीने पत्नीला एक किंवा दोन वेळा तलाक उच्चारली असेल. अशा स्थितीतील तलाक, 'तलाके रजइ'–पुनरपी विवाहास पात्र तलाक, असते. इद्दतच्या कालावधीच्या आत तो विवाहाविना पुन्हा संबंध प्रस्थापित करू शकतो.

**७९)** या आयतीनुसार एक पुरुष एका विवाह संबंधात आपल्या पत्नीवर जास्तीत जास्त दोनच वेळा 'तलाके रजइ'च्या हक्काचा वापर करू शकतो. ज्या मनुष्याने आपल्या विवाहितेला दोन वेळा तलाक देऊन तिच्याशी संबंध जोडले असेल, तो आपल्या आयुष्यात जेव्हा कधी तिला तिसऱ्यांदा 'तलाक' देईल, ती स्त्री त्याच्यापासून नेहमीसाठी विभक्त होईल.

**८०)** इस्लामी कायदे शास्त्रा (शरीअत) च्या परिभाषेत याला ''खुला'' म्हणतात. म्हणजे एका स्त्रीने आपल्या पतीला काही मोबदला देऊन त्याच्याकडून तलाक मिळविणे. अशा स्थितीत पुरुषाने, दिलेली संपत्ती किंवा तिचा काही भाग, ज्यावर परस्परात सहमत झाले असेल, स्त्रीकडून परत घ्यावे हे त्याच्यासाठी वैध ठरते. परंतु पुरुषाने जर स्वत:च स्त्रीला तलाक दिली असेल तर तो तिच्याकडून आपण दिलेली संपत्ती परत घेऊ शकत नाही.

**८१)** म्हणजे एखाद्या वेळी स्वेच्छेने तलाक द्यावा. यातून केवळ पूर्वीच्या पतीसाठी स्त्रीला पुनर्विवाह पात्र ठरविण्यासाठी केल्या जाणाऱ्या कुटिल विवाहाचे अथवा तलाकचे कोणतेही निमित्त निघत नाही.

दिलेल्या मर्यादा आहेत. ज्या तो लोकांच्या मार्गदर्शनासाठी स्पष्ट करीत आहे जे (त्याच्या मर्यादा भंग करण्याचा परिणाम) जाणतात. (२३०)

आणि जेव्हा तुम्ही पत्नींना तलाक द्याल व त्या आपला प्रतिक्षाकाळ पूर्ण करतील तेव्हा सर्वसंमत पद्धतीने त्यांना आपल्याजवळ ठेवून घ्या किंवा सन्मानपूर्वक त्यांना निरोप द्या. आणि त्यांना त्रास देण्यासाठी अडकवून ठेवू नका. जेणेकरून तुम्ही त्यांच्यावर अत्याचार करावा. यात अतिरेक करणारा स्वत:वरच अत्याचार करील. अल्लाहच्या संकेतवचनांशी खेळ करू नका. आणि अल्लाहने तुमच्यावर केलेल्या ऋणांची आठवण ठेवा. आणि तुम्हाला उपदेश करीत आहे की जो ग्रंथ आणि विवेक त्याने तुमच्यावर अवतरला आहे त्याचा आदर करा. आणि अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि जाणून असा की अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणतो आहे. (२३१)

जेव्हा तुम्ही आपल्या पत्नींना तलाक द्याल आणि त्या प्रतिक्षाकाळ पूर्ण करतील तेव्हा त्यांच्या नियोजित वराशी विवाह करण्यापासून प्रतिबंध करू नका. जेव्हा ते संमत्तीपूर्वक एकमेकांशी विवाह करू इच्छित असतील. तुम्हाला उपदेश देण्यात येत आहे की असे कृत्य मुळीच करू नका जर तुम्ही अल्लाह आणि अंतीम दिनावर श्रद्धा ठेवणारे असाल. तुमच्यासाठी पवित्र आणि पावन पद्धत हीच आहे की तुम्ही यापासून परावृत्त रहावे अल्लाह जाणतो पण तुम्ही जाणत नाही. (२३२)

ज्या माता-पित्यांची इच्छा असेल की त्यांच्या मुलांनी स्तनपान-काल पूर्ण होईपर्यंत दूध प्यावे तर मातांनी - आपल्या मुलांना पूर्ण दोन वर्षे स्तनपान करावे.[८२] अशा अवस्थेत मुलाच्या पित्याने परिचित पद्धतीनुसार त्यांना जेवण-खाण व कपडे-लत्ते दिले पाहिजेत. परंतु कोणावरही त्याच्या ऐपतीपेक्षा जास्त भार टाकला जाऊ नये. आईला या कारणास्तव त्रास दिले जाऊ नये की मूल तिचे आहे, आणि पित्यालासुद्धा या कारणास्तव त्रास दिला जाऊ नये की मूल त्याचे आहे - दूध पाजणाऱ्या स्त्रीचा हा हक्क जसा मुलाच्या पित्यावर आहे, तसाच त्याच्या वारसांवर देखील आहे. - परंतु जर उभयपक्ष परस्पर राजी-खुषी आणि सल्ला-मसलतीने दूध सोडवू इच्छित असतील तर असे करण्यास काही हरकत नाही. तुमचा विचार जर आपल्या मुलांना एखाद्या परक्या स्त्रीकडून दूध पाजावयाचा असेल तर यातसुद्धा काही हरकत नाही परंतु केवळ या अटीवर की त्याचा जो काही मोबदला ठरवाल, तो परिचित पद्धतीनुसार अदा करा. अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि समजून असा की जे काही तुम्ही करता ते सर्व अल्लाहच्या दृष्टीत आहे. (२३३)

तुमच्यापैकी जे लोक मरण पावतील, जर त्यांच्या पाठीमागे त्यांच्या पत्नीं जिवंत

**८२)** ही आज्ञा अशा स्थितीसंबंधी आहे जेव्हा पती व पत्नीची काडीमोड झाली असावी. मग ती तलाकद्वारे असो अथवा 'खुला' द्वारे असो किंवा फसख (विवाह मोड) वा 'फारकत' द्वारे असो आणि स्त्रीच्या पदरी दूध पिते मूल असावे.



असतील तर त्यांनी चार महिने दहा दिवस स्वत:ला थांबवून ठेवावे,[८३] नंतर जेव्हा त्यांची इद्दत पूर्ण होईल तेव्हा त्यांना अधिकार आहे की त्यांनी स्वत:संबंधी परिचित पद्धतीनुसार इच्छा असेल तसे करावे. तुमच्यावर त्याची काहीही जबाबदारी नाही अल्लाह तुम्हा सर्वांच्या आचरणाची खबर राखणारा आहे इद्दतच्या काळात तुम्ही हवे तर त्या विधवा स्त्रियांशी मागणीची इच्छा संकेताने व्यक्त करा, हवे तर मनांत लपवून ठेवा, दोन्ही स्वरूपात काही हरकत नाही. अल्लाह जाणतो की त्याचा विचार तुमच्या मनात येणारच. परंतु पहा, गुप्त करार-मदार करू नका. जर काही बोलणी करावयाची असेल तर प्रचलित पद्धतीनुसार करा आणि विवाहबद्ध होण्याचा निर्णय तोपर्यंत घेऊ नका जोपर्यंत इद्दत पूर्ण होत नाही. चांगल्या प्रकारे समजून घ्या की अल्लाह तुमची मनोदशा देखील जाणतो. म्हणून त्याचे भय बाळगा व हे देखील जाणून असा की अल्लाह सहनशील आहे (लहानसहान गोष्टींना) तो माफ करतो. (२३४-२३५)

तुम्हावर काही गुन्हा नाही की तुमच्या पत्नींना तुम्ही तलाक द्यावा या वेळेपूर्वी की त्यांना स्पर्श करण्याची घटका येईल अथवा महर ठरविला असेल. अशा स्थितीत त्यांना काही ना काही अवश्य दिले पाहिजे. सुखवस्तु व्यक्तीने आपल्या ऐपतीप्रमाणे व गरीबाने आपल्या कुवतीप्रमाणे परिचित पद्धतीनुसार द्यावे. हा हक्क आहे सदाचारी लोकांवर. आणि जर तुम्ही स्पर्श करण्यापूर्वी तलाक दिला असेल परंतु महर ठरविण्यात आला असेल, तर अशा स्थितीत महरचा अर्धा भाग द्यावा लागेल. ही बाब वेगळी आहे की स्त्रीने उदारता दाखवावी (आणि महर घेऊ नये) किंवा त्या पुरुषाने ज्याच्या अधिकारात वैवाहिक बंध आहे, उदारता_दाखवावी (आणि संपूर्ण महर द्यावा) आणि तुम्ही (अर्थात पुरुष) उदारतेचा व्यवहार करावा तर हा व्यवहार अल्लाहच्या प्रकोपाला भिऊन वागण्यासाठी अधिक सुसंगत आहे. परस्पर व्यवहारामध्ये औदार्याचा विसर पडू देऊ नका. तुमच्या कृती अल्लाह पाहात आहे. (२३६-२३७)

आपल्या नमाजांची काळजी घ्या. विशेषत: अशा नमाजाची की जिच्यांत नमाजची

**८३)** पतीच्या मृत्यूनंतरची ही 'इद्दत' अशा स्त्रियांसाठीही लागू आहे ज्याच्याशी त्यांच्या पतीचा 'पूर्णपणे एकांतवास' झाला नसावा. तथापि गर्भवती याला अपवाद आहे. अशा स्त्रीच्या पती वारल्यांची 'इद्दत' गर्भमुक्त होईपर्यंत आहे मग ही गर्भमुक्तता पतीच्या मृत्युनंतर लगेच का होत नाही किंवा त्यासाठी कित्येक महिने का लागू नयेत. ''स्वत:ला रोखून ठेवावे'' ने अभिप्रेत केवळ पुनर्विवाहापासून रोखणेच नव्हे तर स्वत:ला शृंगार करण्यापासूनही रोखावे असे देखील आहे.

सर्व वैशिष्ट्ये एकवटलेली आहेत.[८४] अल्लाहसमोर असे उभे रहा जसे आज्ञाधारक गुलाम उभे राहतात. अशांततेची परिस्थिती असेल तर तुम्ही पायी असा किंवा स्वार असा, जमेल तशी नमाज अदा करा. आणि जेव्हा शांती लाभेल तेव्हा अल्लाहचे त्या पद्धतीने स्मरण करा जसे त्याने तुम्हाला शिकविले आहे, ज्याची तुम्हाला पूर्वी माहिती नव्हती. (२३८-२३९)

तुम्हांपैकी जे लोक मरण पावतील आणि पाठीमागे पत्नीं सोडतील त्यांना हे आवश्यक आहे की त्यांनी आपल्या पत्नींसाठी असे मृत्यूपत्र (वसीयत) करून जावे की एक वर्षापर्यंत त्यांना उदरनिर्वाहाची सामुग्री देण्यात यावी व त्यांना घरातून बाहेर काढले जाऊ नये. नंतर जर त्या स्वत: निघून गेल्या तर स्वत:संबंधी प्रचलित पद्धतीनुसार त्या जे काही करतील त्याची कोणतीही जबाबदारी तुमच्यावर नाही, अल्लाह प्रभुत्वसंपन्न आणि बुद्धिमान व विवेकशील आहे. अशाच तऱ्हेने ज्या स्त्रियांना घटस्फोट देण्यात आला असेल त्यांना देखील योग्य प्रकारे काहीना काही देऊन निरोप देण्यात यावा. हा हक्क आहे अल्लाहचे भय बाळगणाऱ्या लोकांवर. (२४०-२४१)

अशा प्रकारे अल्लाह तुम्हाला आपल्या आज्ञा स्पष्टपणे निर्देशित करतो. आशा आहे की तुम्ही समजूनउमजून कृती कराल. (२४२)

तुम्ही त्या लोकांच्या दशेचा विचारदेखील केला काय की जे मृत्यूच्या भीतीने आपले घरदार सोडून निघाले होते आणि हजारोंच्या संख्येत ते होते? अल्लाहने त्यांना फर्माविले, मरा! नंतर त्याने त्यांना पुनरुज्जीवन दिले.[८५] वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह मानवावर मोठी कृपा करणारा आहे, परंतु बहुसंख्य लोक कृतज्ञता व्यक्त करीत नाहीत. मुसलमानांनो! अल्लाहच्या मार्गात युद्ध करा आणि चांगलेच समजून असा की अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे. तुमच्यात असा कोण आहे की जो अल्लाहला

**८४)** मूळ अरबी शब्द 'सलातुल वुस्ता' चा प्रयोग झाला आहे. 'वुस्ता' या शब्दाचा अर्थ 'मध्यवर्ती वस्तू' असाही होतो आणि उच्च आणि श्रेष्ठ वस्तू असाही होतो. सलाते (नमाज) वुस्ताने अभिप्रेत मध्यवर्ती नमाजही असू शकते आणि योग्य वेळी व विनम्रतापूर्वक तसेच अल्लाहच्या एकाग्रचित्ताने पढली जाणारी नमाज व ज्यात नमाजची सर्व वैशिष्टे एकवटली असावीत अशी नमाजही असू शकते. ज्या भाष्यकारांनी या शब्दाचा अर्थ मध्यवर्ती नमाज असा घेतला आहे ते सामान्यत: त्याच्याने असरची नमाज अभिप्रेत असल्याचे मानतात.

**८५)** हा संकेत इस्राईली लोकाच्या 'निर्गमना'च्या घटनेकडे आहे. सूरह माईदाच्या चौथ्या खंडात सर्वश्रेष्ठ अल्लाहने याचा तपशील सांगितला आहे.



चांगले कर्ज देईल की अल्लाह त्याला कित्येक पटीने वाढवून परत करील?[८६] घट करणेसुद्धा अल्लाहच्या अखत्यारीत आहे आणि वाढविणे देखील, आणि त्याच्याकडेच तुम्हाला परत जावयाचे आहे. (२४३-२४५)

मग तुम्ही त्या घटनेवर विचार केला काय जी मूसा(अ.)च्या नंतर बनीइस्राईलच्या सरदारांच्या बाबतीत घडली होती. त्यांनी आपल्या नबीला सांगितले, ''आमच्यासाठी राजा नेमून टाका की ज्यामुळे आम्ही अल्लाहच्या मार्गात युद्ध करावे.'' नबीने विचारले, ''असे तर होणार नाही ना की तुम्हाला युद्धाचा आदेश देण्यात यावा आणि मग तुम्ही लढू नये?'' ते सांगू लागले, ''बरे हे कसे होऊ शकते की आम्ही अल्लाहच्या मार्गात लढू नये जेव्हा आम्हाला आमच्या घरातून काढण्यात आले आहे आणि आमची मुले-बाळे आम्हापासून वेगळी केली गेली आहेत.'' परंतु जेव्हा त्यांना युद्धाचा आदेश दिला गेला तेव्हा एक अल्पशा संख्येशिवाय इतर सर्वजणांनी पाठ फिरविली आणि अल्लाह त्यांच्यापैकी प्रत्येक अत्याचाऱ्याला चांगलेच ओळखतो. (२४६)

त्यांच्या प्रेषिताने त्यांना सांगितले की अल्लाहने तुमच्यासाठी तालूतला बादशाह नेमले आहे. हे ऐकून ते म्हणाले, ''आमच्यावर बादशाह बनण्याचा तो कसा हक्कदार बनला? त्याच्या तुलनेत बाहशाह होण्याचे आम्ही जास्त हक्कदार आहोत. तो तर काही मोठा श्रीमंत नाही.'' प्रेषित उत्तरले, ''अल्लाहने तुमच्या तुलनेत त्यालाच निवडले आहे आणि त्याला बौद्धिक व शारीरिक दोन्ही प्रकारच्या क्षमता विपुल प्रमाणात बहाल केल्या आहेत. आणि अल्लाहला हा अधिकार आहे की त्याने आपला मुलुख हवे त्याला द्यावा. अल्लाह सर्वव्यापी व सर्वज्ञ आहे.'' याचबरोबर त्यांच्या नबीने असेही सांगितले की, ''ईश्वराकडून तो बादशाह म्हणून नियुक्त होण्याचे लक्षण हे आहे की त्याच्या कारकिर्दीत ती पेटी तुम्हाला परत मिळेल ज्यामध्ये तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यासाठी मन:शांतीची सामग्री आहे, ज्यामध्ये मूसाचे वंशज व हारूनच्या वंशजानी सोडलेले पवित्र अवशेष आहेत आणि ज्याला आता दूतांनी उचलले आहे, जर तुम्ही श्रद्धावंत असाल तर तुमच्यासाठी ही मोठी खूण आहे.'' (२४७-२४८)

नंतर जेव्हा तालूत लष्कर घेऊन निघाला तेव्हा त्याने सांगितले, ''एका नदीवर अल्लाहकडून तुमची परीक्षा घेतली जाणार आहे. जो तिचे पाणी पिईल तो माझा सोबती नव्हे. माझा सोबती तर केवळ तोच आहे जो आपली तहान त्याने भागविणार नाही. परंतु जर एखादा, एखादी ओंजळभर प्याला तर हरकत नाही.'' पण एका अल्पशा गटाखेरीज

**८६)** 'चांगले कर्ज'ने अभिप्रेत पुण्याईच्या शुद्ध भावनेने नि:स्वार्थपणे अल्लाहच्या मार्गात माल खर्च करणे होय. सर्वश्रेष्ठ अल्लाह त्याला आपल्यावर जबाबदारी असलेले कर्ज ठरवितो. तो वचन देतो की मी केवळ मूळ रक्कमेचीच परतफेड करणार आहे असे नाही तर त्याच्या कित्येक पटीने जास्तही देणार आहे.

ते सर्वजण त्या नदीच्या पाण्याने तृप्त झाले. (२४९-)

मग जेव्हा तालूत व त्याचे मुसलमान साथीदार नदी ओलांडून पुढे निघाले, तेव्हा त्यांनी तालूतला सांगितले की, आज आमच्यात जालूत व त्याच्या लष्कराशी सामना देण्याची शक्ती नाही.[८७] परंतु जे लोक असे समजत होते की एके दिवशी त्यांना अल्लाहशी भेटावयाचे आहे. त्यांनी सांगितले, ''अनेकदा असे घडले आहे की एक लहानसा गट अल्लाहच्या आज्ञेने एका मोठ्या गटावर प्रभावी ठरला आहे, अल्लाह सहनशील लोकांचा सहाय्यक आहे.'' आणि जेव्हा ते जालूत व त्याच्या लष्कराशी सामना देण्यासाठी निघाले तेव्हा त्यांनी प्रार्थना केली, ''हे पालनकर्त्या, आमच्यावर सहनशीलतेचा वर्षाव कर, आमचे पाय स्थिर कर आणि त्या अश्रद्धावंत समुदायावर आम्हाला विजयी कर.'' सरतेशेवटी अल्लाहच्या आज्ञेने त्यांनी अश्रद्धावंतांना पिटाळून लावले आणि दाऊदने जालूतला ठार केले आणि अल्लाहने त्याला राज्य व विवेकाने उपकृत केले आणि ज्या ज्या गोष्टी अल्लाहने इच्छिल्या त्यांचे ज्ञान त्याला दिले.- जर अल्लाह अशा प्रकारे मानवाच्या एका समुदायाला दुसऱ्या समुदायाच्या हस्ते हटवीत नसता तर पृथ्वीची व्यवस्था बिघडली असती - परंतु जगातील लोकांवर अल्लाहची मोठी कृपा आहे की (तो अशा तऱ्हेने हिंसाचाराच्या विनाशाची व्यवस्था करीत असतो.)

(-२४९-२५१)

ही अल्लाहची वचने आहेत जी आम्ही तुम्हाला ठीक-ठीक ऐकवीत आहोत, आणि हे मुहम्मद (स.) नि:संशय तुम्ही त्या लोकांपैकी आहात ज्यांना प्रेषित बनवून पाठविले गेले आहे. हे प्रेषित (जे आमच्याकडून मानवाच्या मार्गदर्शनाकरिता नियुक्त झाले) आम्ही यांना एक दुसऱ्यापेक्षा वरचढ दर्जे बहाल केले. यांच्यापैकी कोणी असा होता ज्याच्याशी स्वत: अल्लाहने संभाषण केले, कुणाला त्याने दुसऱ्या प्रकारे उच्च दर्जे प्रदान केले आणि शेवटी मरयमपूत्र ईसा-येशू (अ.) यांना दिव्य संकेत बहाल केले आणि पवित्र आत्म्याने त्याला सहाय्य केले. जर अल्लाहने इच्छिले असते तर शक्य नव्हते की या प्रेषितानंतर ज्या लोकांनी उज्ज्वल संकेत पाहिले असते त्यांनी आपसात लढाई केली असती परंतु (अल्लाहचे मनोरथ असे नव्हते की त्याने लोकांना सक्तीने मतभेदापासून रोखावे. या कारणाने) त्यांनी आपसात मतभेद निर्माण केले मग कोणी श्रद्धा ठेवली व कोणी द्रोहाचा मार्ग अवलंबिला. होय, अल्लाहने इच्छिले असते तर ते कदापि लढले नसते परंतु अल्लाह जे इच्छितो ते करतो. (२५२-२५३)

हे श्रद्धावंतांनो, जी काही धन-दौलत आम्ही तुम्हाला बहाल केली आहे त्यातून खर्च करा यापूर्वी की तो दिवस येईल ज्यामध्ये खरेदी-विक्री होणार नाही, मित्रताही

८७) बहुधा हे सांगणारे तेच लोक असावेत ज्यांनी नदीवर अगोदरच आपला उतावीळपणा प्रदर्शित केला होता.



उपयोगी पडणार नाही आणि शिफारस देखील चालणार नाही. आणि खरे अत्याचारी तेच आहेत जे द्रोहाचा मार्ग अवलंबितात. (२५४)

अल्लाह तो चिरंतनजीवी आहे ज्याने तमाम सृष्टीचा भार सांभाळलेला आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तो झोपतही नाही आणि त्याला झोपेची गुंगीही येत नाही, पृथ्वी आणि आकाशांत जे काही आहे त्याचेच आहे. असा कोण आहे जो त्याच्या पुढे त्याच्या परवानगीशिवाय शिफारस करू शकेल? जे काही दासांच्या समक्ष आहे त्यालाही तो जाणतो आणि जे काही त्यांच्यापासून अदृश्य आहे त्यालाही तो जाणतो आणि त्याच्या माहितीपैकी कोणतीही गोष्ट त्यांच्या बुद्धिकक्षेत येऊ शकत नाही याव्यतिरिक्त की एखाद्या गोष्टीचे ज्ञान तो स्वत:च त्यांना देऊ इच्छित असेल. त्याचे राज्य[८८] आकाश आणि पृथ्वीवर पसरले आहे, आणि त्यांचे संरक्षण काही त्याला थकवून सोडणारे काम नव्हे. फक्त तोच एकटा महान व श्रेष्ठ आहे. (२५५)

धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती नाही.[८९] सत्य असत्यापासून वेगळे केले गेले आहे. आता ज्याने कोणी, तागूत[९०] चा इन्कार करून अल्लाहवर श्रद्धा ठेवली त्याने एक असा मजबूत आधार ग्रहण केला जो कधीही तुटणार नाही, आणि अल्लाह (ज्याचा आधार त्याने घेतला आहे) सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. जे लोक श्रद्धा ठेवतात त्यांचा समर्थक व सहायक अल्लाह आहे आणि तो त्यांना अंधारातून काढून प्रकाशात आणतो. आणि जे लोक द्रोहाचा मार्ग अवलंबितात त्यांचे समर्थक व सहायक तागूत आहेत.[९१] आणि ते त्यांना प्रकाशापासून ओढून अंधाराकडे घेऊन जातात. हे नरकाग्नीमध्ये जाणारे लोक आहेत जेथे हे सदैव राहतील. (२५६-२५७)

८८) मूळ अरबी शब्द ''कुर्सी'' वापरला गेला आहे. सर्वसाधारणपणे राज्य व सत्तेसाठी रुपक शब्द म्हणून तो बोलला जातो. उर्दू (तसेच मराठी) भाषेतसुद्धा बहुधा खुर्ची हा शब्द वापरून शासनाधिकार असा अर्थ घेतला आहे. याच शब्दाच्या अनुषंगाने सदरहू आयत, 'आयतुल कुर्सी' या नावाने प्रसिद्ध आहे. या आयतीत सर्वोच्च अल्लाहचा हलका परिपूर्ण परिचय दिला गेला आहे की त्याचे उदाहरण इतर कोठेच सापडत नाही. म्हणूनच हदीसमध्ये या आयतीला कुरआनची सर्वश्रेष्ठ आयत ठरविले गेले आहे.

८९) म्हणजे कोणासही ईमान आणण्यासाठी विवश केले जाऊ शकत नाही.

९०) शाब्दिक अर्थाच्या दृष्टीने जो आपल्या वैध मर्यादेबाहेर गेला असेल अशा प्रत्येक इसमाला तागूत म्हटले जाईल. कुरआनच्या परिभाषेत तागूतने अभिप्रेत असा दास आहे ज्याने बंदगीची मर्यादा ओलांडून स्वत:च मालक आणि स्वामी असण्याचा आविष्कार आणावा व ईश्वराच्या दासांकडून आपली बंदगी करवावी.

९१) 'तागूत' या ठिकाणी 'तवागीत' या अनेक वचनी अर्थाने वापरला गेला आहे. म्हणजे अल्लाहशी विमुख होऊन मानव एकाच तागूतच्या कचाट्यात सापडतो असे नाही तर अनेक 'तवागीत' त्याच्या मानगुटीवर बसतात.

तुम्ही त्या माणसाच्या अवस्थेवर विचार केला नाही काय की ज्याने इब्राहीम (अ.) शी वाद घातला होता?[९२] वाद याबाबतीत की इब्राहीम (अ.) चा पालनकर्ता कोण आहे, आणि या कारणास्तव की त्या माणसाला अल्लाहने राज्य-सत्ता देऊन टाकली होती. जेव्हा इब्राहीम (अ.) नी सांगितले की, ''माझा पालनकर्ता तो आहे ज्याच्या अखत्यारीत जीवन व मृत्यू आहे.'' तेव्हा त्याने उत्तर दिले, ''जीवन व मृत्यू माझ्या अधिकारात आहे.'' इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''असे होय, तर अल्लाह, सूर्य पूर्वेकडून उदयास आणतो, तू जरा त्याला पश्चिमेकडून उदयास आणून दाखव.'' हे ऐकून तो सत्याचा इन्कार करणारा आश्चर्यचकित झाला, परंतु अल्लाह अत्याचाऱ्यांना सरळ मार्ग दाखवीत नसतो. (२५८)

अथवा उदाहरण म्हणून त्या माणसाकडे पहा ज्याचे एका अशा वस्तीवरून जाणे झाले जी आपल्या छतांवर कोलमडून पालथी पडलेली होती. त्याने सांगितले, 'ही वस्ती, जी नाश पावली आहे हिला अल्लाह कशाप्रकारे पुन्हा जीवन प्रदान करील?'' यावर अल्लाहने त्याचे प्राण काढून घेतले आणि तो शंभर वर्षांपर्यंत मृतावस्थेत पडून राहिला. नंतर अल्लाहने त्याला पुन्हा जीवन दिले आणि त्याला विचारले, ''सांग तू किती काळ पडून राहिला आहेस?'' त्याने उत्तर दिले, ''एक दिवस अथवा काही तास राहिलो असेन.'' फर्माविले, ''तुझ्यावर याच स्थितीत शंभर वर्षे व्यतीत झाली आहेत. आता जरा आपल्या अन्न आणि पाण्याकडे पहा, त्यांच्यात जरा देखील फरक पडलेला नाही. दुसरीकडे आपल्या गाढवाकडे देखील बघ, (की त्याच्या हाडांचा सापळा देखील जर्जर झाला आहे) आणि हे आम्ही यासाठी केले आहे की आम्ही तुला लोकांकरिता एक निशाणी बनवू इच्छितो. मग पाहा की हाडांच्या या सापळ्याला आम्ही कशा प्रकारे उत्थापित करून त्याच्यावर मांस व कातडी चढवितो.'' अशा प्रकारे जेव्हा सत्य स्थिती त्याच्यासमोर पूर्णपणे प्रकट झाली तेव्हा तो म्हणाला, ''मला माहीत आहे की अल्लाह प्रत्येक गोष्टीवर प्रभुत्व राखतो.'' (२५९)

आणि तो प्रसंग देखील नजरेसमोर असू द्या जेव्हा इब्राहीम (अ.) यांनी सांगितले होते की, ''माझ्या पालनकर्त्या! मला दाखव की तू मृतांना कशा प्रकारे जिवंत करतोस.'' फर्माविले, ''काय तुझी यावर श्रद्धा नाही?'' त्याने सांगितले, ''श्रद्धा तर आहेच परंतु मनाचे समाधान इच्छितो.''[९३] फर्माविले, ''बरे तर चार पक्षी घे आणि त्यांना आपल्याशी माणसाळून टाक. नंतर त्यांचा एकएक तुकडा तू एकाएका पर्वतावर ठेवून दे. नंतर त्यांना हांक दे. ते तुझ्याकडे धावत येतील. चांगले समजून घे की अल्लाह अत्यंत सामर्थ्यवान आणि बुद्धिमान आहे.'' (२६०)

**९२)** त्या इसमाने अभिप्रेत नमरूद आहे. तो हजरत इब्राहीम (अ.) यांच्या देशाचा (इराक) राजा होता.

**९३)** म्हणजे स्वत:च्या डोळ्यांनी पाहून जे समाधान प्राप्त होत असते ते.



जे लोक आपला माल अल्लाहच्या मार्गात खर्च करतात, त्यांच्या खर्चाचे उदाहरण असे आहे जसे एक बी पेरली जावी आणि तिच्यातून सात कणसे यावीत आणि प्रत्येक कणसांत शंभर दाणे असावेत. अशाच तऱ्हेने अल्लाह ज्याच्या कृतीला इच्छितो त्याला समृद्धी प्रदान करतो. तो उदारहस्त देखील आहे आणि जाणणारासुद्धा. जे लोक आपला माल अल्लाहच्या मार्गात खर्च करतात आणि खर्च केल्यानंतर मग उपकार दर्शवीत नाहीत आणि दु:ख देत नाहीत त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ आहे आणि त्यांच्याकरिता कोणताही दु:ख आणि भयाचा प्रसंग नाही. एक मधुर बोल आणि एखाद्या असह्य गोष्टीकडे थोडीशी डोळेझांक त्या दानापेक्षा श्रेष्ठ आहे ज्याच्या पाठीमागे दु:ख असेल. अल्लाह निरपेक्ष आहे आणि सहनशीलता त्याचा विशेष गुण आहे. हे श्रद्धावंतांनो, आपले दान, उपकार दाखवून आणि दु:ख देऊन त्या माणसासारखे मातीत मिसळू नका जो आपली संपत्ती केवळ लोकांना दाखविण्यासाठी खर्च करतो, आणि अल्लाहवरही श्रद्धा ठेवत नाही आणि परलोकावर सुद्धा. त्याच्या खर्चाचे उदाहरण असे आहे जणू एक खडक होता, ज्याच्यावर मातीचा थर जमलेला होता त्यावर जेव्हा जोराची वृष्टी झाली तेव्हा सर्व माती वाहून गेली आणि स्वच्छ खडक ते खडकच उरले. असे लोक आपल्याठायी दान देऊन जे पुण्य कमवितात, त्यापासून त्यांच्या हाती काहीही लागत नाही आणि अश्रद्धावंतांना सरळ मार्ग दाखविणे हा अल्लाहचा शिरस्ता नव्हे.[९४] याउलट जे लोक आपली संपत्ती केवळ अल्लाहची मर्जी संपादन करण्याकरिता मानसिक धैर्य व संतोषाने खर्च करतात त्यांच्या खर्च करण्याचे उदाहरण असे आहे जसे एखाद्या पठारावर एक बाग असावी, जर जोरदार वृष्टी झाली तर दुपटीने फळे यावीत व जरी जोराची वृष्टी झाली नाही तरीसुद्धा केवळ एक हलकासा तुषार देखील त्याकरिता पुरेसा व्हावा. जे काही तुम्ही करता ते सर्व अल्लाहच्या दृष्टीत आहे. (२६१-२६५)

तुम्हापैकी कोणी हे पसंत करतो काय की त्याच्याजवळ द्राक्षे आणि सर्व प्रकारच्या फळांनी बहरलेली बाग असावी आणि ती ऐन वेळी एका जोरदार वावटळीच्या माऱ्यात सापडून उध्वस्त व्हावी ज्या वेळेस तो स्वत: वृद्ध झाला असेल आणि त्याची अल्पवयीन

**९४)** या ठिकाणी 'काफिर' हा शब्द कृतघ्न आणि उपकार न मानणारा या अर्थाने प्रयोजिला गेला आहे.

मुले या वेळेस काही योग्यतेची नसतील?[९५] अशा प्रकारे अल्लाह आपल्या गोष्टी तुमच्यासमोर स्पष्टपणे समजावून सांगतो कदाचित तुम्ही मनन चिंतन करावे. (२६६)

हे श्रद्धावंतांनो! जी संपत्ती तुम्ही कमविली आहे आणि जे काही आम्ही जमिनीतून तुमच्याकरिता उत्पन्न केले आहे, त्यापैकी उत्कृष्ट भाग अल्लाहच्या मार्गात खर्च करा. असे होता कामा नये की त्याच्या मार्गात देण्याकरिता निकृष्टतम प्रतीची वस्तू निवडण्याचा तुम्ही प्रयत्न करावा, वास्तविक पाहता तीच वस्तू जर एखाद्याने तुम्हाला देऊ केली तर तुम्ही ती घेणे मुळीच पसंत करणार नाही याखेरीज की तुम्ही ते स्वीकारण्यात डोळेझांक कराल. तुम्ही समजून असावे की अल्लाह निरपेक्ष आहे आणि सर्वोत्तम गुणांनी तो संपन्न आहे. शैतान तुम्हाला दारिद्र्याचे भय दाखवितो व लज्जास्पद कार्यपद्धतीचे अवलंब करण्यास प्रोत्साहन देतो, परंतु अल्लाह तुम्हाला आपली क्षमा आणि कृपेची आशा देतो. अल्लाह फार उदार व विवेकशील आहे. तो ज्याला इच्छितो त्याला विवेक प्रदान करतो, आणि ज्याला विवेक लाभला त्याला खऱ्या अर्थी मोठी दौलत लाभली. या गोष्टीपासून केवळ तेच लोक बोध घेतात जे विवेकशील आहेत. (२६७-२६९)

तुम्ही जे काही खर्च केले असेल आणि जो काही नवस केला असेल[९६] अल्लाहला त्याचे ज्ञान आहे आणि अत्याचाऱ्यांचा कोणीही सहायक नाही. जर तुम्ही आपले दान जाहिररीत्या द्याल तर हे देखील चांगले आहे परंतु जर गुप्तरीत्या गरजूंना द्याल तर हे तुमच्यासाठी अधिक उत्तम आहे. तुमचे बरेचसे दोष या वर्तनाने नाहीसे होतात आणि जे काही तुम्ही करता अल्लाहला सर्व परिस्थितीत त्याचे ज्ञान आहे. (२७०-२७१)

हे नबी (स.), लोकांना सरळ मार्गावर आणण्याची जबाबदारी तुमच्यावर नाही.

**९५)** म्हणजे तुमच्या उभ्या जीवनाची कमाई एका अशा नाजुक प्रसंगी नष्ट व्हावी जेव्हा की तुम्ही तिच्या लाभाचे सर्वाधिक मोहताज असावेत व नव्याने पुन्हा कमाई करण्याची संधीही उरली नसावी, असे जर तुम्ही पसंत करीत नाही तर मग जगात आयुष्यभर काम केल्यानंतर परलोकाच्या जीवनात तुम्ही अशा स्थितीत पाऊल टाकावे की तेथे पोहचल्यानंतर, तुमच्या संपूर्ण जीवनकार्याला काहीच किंमत नाही, जे काही तुम्ही जगात कमाविले होते ते जगातच राहिले. परलोकासाठी काहीच कमावून आणले नाही की येथे त्याच्या इष्ट फळांचा उपभोग घेऊ शकावे, असा प्रसंग तुमच्यावर यावा हे तुम्ही कसे पसंत करता?

**९६)** 'नवस' म्हणजे माणसाने आपली एखादी इच्छा पूर्ण झाल्यावर एखादे असे पुण्यकार्य करण्याची प्रतिज्ञा करावी जे कार्य त्याच्यासाठी अनिवार्य (फर्ज) नसावे. जर ही इच्छा एखाद्या वैध व हलाल गोष्टीसाठी असेल व तिची मागणी अल्लाहकडेच केली गेली असेल व इच्छापूर्तीनंतर जे कार्य करण्याची माणसाने प्रतिज्ञा केली असेल तीही अल्लाहसाठीच असेल तर असा नवस अल्लाहच्या आज्ञापालनानुसार आहे. असा नवस फेडणे, मोबदला व पुण्याईस पात्र आहे. परंतु जर वस्तुस्थिती अशी नसेल तर, असा नवस करणे पाप आणि तो फेडणे शिक्षेस पात्र आहे.



अल्लाह ज्याला इच्छितो त्यालाच मार्गदर्शन प्रदान करतो आणि कल्याणकारी मार्गात जी संपत्ती तुम्ही खर्च करता ती तुमच्या स्वत:च्या हिताकरीता होय, शेवटी तुम्ही याचकरिता खर्च करता ना की अल्लाहची मर्जी संपादन करावी. म्हणून जी काही संपत्ती तुम्ही कल्याणकारी मार्गात खर्च कराल त्याचा पुरेपूर मोबदला तुम्हाला दिला जाईल आणि तुमचा हक्क कदापि हिरावला जाणार नाही. (२७२)

विशेषत: सहाय्य करण्यास पात्र ते गरीब आहेत जे अल्लाहच्या कार्यात असे गुंतले आहेत की स्वत:च्या उपजीविकेसाठी पृथ्वीवर काही धावपळ करू शकत नाहीत. त्यांचा स्वाभिमान पाहून अजाण मनुष्य समजतो की हे सुस्थितीत आहेत. तुम्ही त्यांच्या चेहऱ्यांवरून त्यांची आंतरिक स्थिती ओळखू शकता परंतु ते लोक असे नाहीत की जे लोकांच्या पाठीशी लागून काही मागतील. त्यांच्या सहाय्यासाठी जी काही संपत्ती तुम्ही खर्च कराल ती अल्लाहपासून दडून राहणार नाही. (२७३)

जे लोक आपली संपत्ती रात्री व दिवसा उघडपणे व गुप्तरीत्या खर्च करतात त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी आहे आणि त्यांच्यासाठी कसलेही भय आणि दु:खाला स्थान नाही. परंतु जे लोक व्याज खातात त्यांची दशा त्या माणसाप्रमाणे असते ज्याला शैतानाने स्पर्श करून झपाटून सोडले आहे.[९७] आणि ते या दशेत गुरफटण्याचे कारण हे आहे की ते म्हणतात, "व्यापारदेखील शेवटी व्याजासारखीच गोष्ट आहे."[९८] वास्तविक पाहता अल्लाहने व्यापाराला वैध केले आहे आणि व्याजाला निषिद्ध. म्हणून ज्याला त्याच्या पालनकर्त्याकडून हा उपदेश मिळेल आणि तो भविष्यात व्याज खाण्यापासून परावृत्त होईल तर जे काही त्याने पूर्वी खाल्ले असेल ते खाल्ले, त्याचे प्रकरण अल्लाहच्या स्वाधीन आहे.[९९] आणि जो या आज्ञेनंतर त्याच गोष्टीची पुनरावृत्ती करील तो

**९७)** अरबवासी वेड्या माणसाला 'मजनू' (म्हणजे भुताने झपाटलेला) या शब्दाने संबोधित असत. तसेच जेव्हा त्यांना एखाद्या इसमासंबंधी, तो वेडा झाला आहे, असे म्हणावयाचे असेल, तेव्हा ते, त्याला जिन लागला आहे, असे म्हणत असत. याच वाक्प्रचाराचा प्रयोग करताना कुरआन व्याज खाणाऱ्याला त्या माणसाची उपमा देत आहे जो भ्रमिष्ट झाला आहे.

**९८)** म्हणजे त्यांच्या दृष्टिकोनातील बिघाड असा की व्यापारात मूळ रकमेवर जो नफा घेतला जातो, तो आणि व्याज हे वेगवेगळ्या प्रकारचे असणे त्यांना समजत नाही. दोन्हींना ते एकाच प्रकारची गोष्ट मानून युक्तिवाद असा करतात की ज्याअर्थी व्यापारात लागलेल्या रकमेचा नफा वैध आहे त्याअर्थी कर्ज म्हणून दिलेल्या रकमेचा नफा अवैध का ठरावा.

**९९)** असे म्हटलेले नाही की जे काही त्याने खाल्ले ते अल्लाह माफ करील तर फर्माविले असे जात आहे की त्याचे प्रकरण अल्लाहच्या सुपूर्द आहे. या वाक्याद्वारे कळते की जे खाल्ले ते खाल्ले असे म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की जे खाल्ले गेले ते माफ केले गेले, तर याच्याने केवळ कायद्यात्मक सवलत अभिप्रेत आहे. म्हणजे जे व्याज खाल्ले गेले आहे ते परत करण्याची कायद्यात्मक मागणी केली जाणार नाही.

नरकवासी आहे, जेथे तो सदैव राहील. अल्लाह व्याजाचा ऱ्हास करतो आणि दान-धर्माची वाढ करतो आणि अल्लाह कोणत्याही कृतघ्न आणि वाईट आचरण करणाऱ्याला पसंत करत नाही. होय, जे लोक श्रद्धा ठेवतील आणि पुण्यकर्म करतील आणि नमाज कायम करतील व जकात देतील, नि:संशय त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी आहे आणि त्यांच्यासाठी कोणत्याही भयाचा आणि दु:खाचा प्रसंग नाही. (२७४-२७७)

हे श्रद्धावानांनो, अल्लाहचे भय बाळगा आणि जे काही तुमचे व्याज लोकांकडून येणे बाकी असेल ते सोडून द्या, जर खरोखर तुम्ही श्रद्धावंत असाल. परंतु जर तुम्ही असे केले नाही, तर सावध व्हा, अल्लाह व त्याच्या पैगंबराकडून तुमच्याविरूद्ध युद्धाची घोषणा आहे.[१००] अजूनसुद्धा पश्चात्ताप कराल (आणि व्याज सोडून द्याल) तर आपली मूळ रक्कम घेण्याचा तुम्हाला अधिकार आहे. तुम्ही कुणावर अत्याचार करू नका न तुमच्यावर कुणी अत्याचार करील तुमचा कर्जदार जर हलाखीच्या परिस्थित असेल तर सुबत्ता येईपर्यंत त्याला सवलत द्या. आणि जर दान करून टाकाल तर ते तुमच्यासाठी जास्त चांगले आहे, जर तुम्ही समजून घ्याल.[१०१] त्या दिवसाच्या संकटापासून आपला बचाव करा जेव्हा तुम्ही अल्लाहकडे परत जाल, तेथे प्रत्येक माणसाला त्याने कमाविलेल्या पुण्य व पापाचा पुरेपूर मोबदला मिळेल आणि कोणावरही कदापि अन्याय होणार नाही. (२७८-२८१)

हे श्रद्धावानांनो, जेव्हा एखाद्या ठराविक मुदतीसाठी तुम्ही आपापसांत कर्जाची

**१००)** सदरहू आयत मक्केच्या विजयानंतर उतरली होती, त्यावेळी संपूर्ण अरबस्तान इस्लामी राज्याच्या वर्चस्वाखाली आले होते. त्या पूर्वी व्याज जरी एक अप्रिय गोष्ट म्हणून समजली जात असे तरी कायदेशीरपणे ते बंद केले गेले नव्हते. ही आयत उतरल्यानंतर इस्लामी राज्याच्या हद्दीत व्याजाचा व्यवहार एक फौजदारी गुन्हा ठरला. या आयतच्या शेवटच्या शब्दांच्या आधारे हजरत इब्ने अब्बास (रजि.), हसन बसरी (रह.), इब्ने सीरीन (रह.) आणि रबी बिन अनस (रह.) यांचे मत असे आहे की जो इसम 'दारूल इस्लाम' (इस्लामी राज्य) मध्ये व्याज घेईल त्याला पश्चात्ताप करण्यास भाग पाडले जावे, तो जर त्यापासून परावृत्त झाला नाही तर त्याला ठार केले जावे. इतर इस्लामी कायदेतज्ज्ञाच्या मते अशा इसमाला कैदेत ठेवणे पुरेसे आहे. जोपर्यंत तो व्याज न खाण्याची प्रतिज्ञा करीत नाही, त्याला सोडले जाऊ नये.

**१०१)** याच आयतीवरून असा हुकूम काढला गेला आहे की जो इसम कर्जाची परतफेड करण्यासंबंधी लाचार बनला असेल तर इस्लामी न्यायालय त्याच्या धनकोंना त्याला सवलत देण्यास भाग पाडील. काही परिस्थितीत तर संपूर्ण कर्ज किंवा त्याचा काही अंश माफ करविण्याचाही तिला अधिकार असेल. इस्लामी कायदेतज्ज्ञांनी स्पष्ट केले आहे की एखाद्याचे राहते घर, जेवणखाण करण्याची भांडी, पेहरण्याचे कपडे आणि आपली कमाई तो ज्या उपकरणांनी करीत असेल ती, कोणत्याही परिस्थितीत जप्त केली जाऊ शकत नाही.



देवघेव कराल,[१०२] तेव्हा ते लिहून घेत जा. उभयपक्षांमध्ये एका माणसाने न्यायाचे दस्तऐवज लिहावे. ज्याला अल्लाहने लिहिण्या-वाचण्याची क्षमता प्रदान केली आहे त्याने लिहिण्यास नकार देता कामा नये. त्याने लिहावे आणि दस्तऐवजाचा मजकूर त्याने सांगावा ज्याच्यावर जबाबदारी येते (अर्थात कर्ज घेणारा), आणि त्याने अल्लाहचे आपल्या पालनकर्त्याच्या क्रोधाचे भय बाळगले पाहिजे की जो करार झाला असेल त्यात काहीही कमी-जास्त करू नये. परंतु जर कर्ज घेणारा स्वत: नादान किंवा दुर्बल अथवा मजकूर सांगण्यालायक नसेल तर त्याच्या मुखत्याराने न्यायसंगतरीतीने मजकूर सांगावा. नंतर आपल्या पुरुषांपैकी दोघांची यावर साक्ष घ्या. जर दोन पुरुष नसतील तर एक पुरुष आणि दोन स्त्रिया असाव्यात म्हणजे जर एखादी विसरली तर दुसरीने तिला आठवण करून द्यावी. हे साक्षीदार अशा लोकांपैकी असावेत ज्यांची साक्ष तुमच्यात सर्वमान्य असावी. साक्षीदारांना साक्षीदार म्हणून काम करण्यास सांगितले गेल्यास त्यास त्यांनी नकार देऊ नये. बाब लहान असो किंवा मोठी, मुदत ठरविण्याबरोबरच तिचे दस्तऐवज लिहून घेण्यात आळस करू नका. अल्लाहजवळ ही पद्धत तुमच्यासाठी अधिक न्यायसंगत आहे, त्यामुळे साक्ष सिद्ध होणे सवलतीचे ठरते, आणि तुम्ही शंका-कुशंकामध्ये गुंतण्याची शक्यता कमी राहते, परंतु जी व्यापारी देवाण घेवाण तुम्ही आपापसांत हातोहात करता ती लिहिली गेली नाही तरी हरकत नाही, पण व्यापारासंबंधी सौदे ठरवीत असताना साक्षीदार ठरवत जा. लिहिणाऱ्याला व साक्षीदाराला त्रास दिला जाऊ नये. असे कराल तर गुन्हेगार ठराल. अल्लाहच्या प्रकोपापासून स्वत:चे रक्षण करा. तो तुम्हाला योग्य कार्यपद्धतीची शिकवण देतो आणि त्याला प्रत्येक बाबीचे ज्ञान आहे. (२८२)

जर तुम्ही प्रवासांत असाल आणि दस्तावेज लिहिणारा कोणी मिळाला नाही तर वस्तू कब्जेगहाण ठेऊन व्यवहार करा.[१०३] (२८३-)

जर तुमच्यापैकी एखाद्याने दुसऱ्यावर विश्वास ठेवून त्याच्याशी एखादा व्यवहार केला, तर ज्याच्यावर विश्वास ठेवला गेला आहे, त्याने अमानत परत केली पाहिजे आणि त्याने अल्लाहचे - आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगावे. (-२८३-)

**१०२)** यावरून असा आदेश निघतो की कर्जाच्या बाबतीत मुदतीची निश्चिती झाली पाहिजे.

**१०३)** ताबेगहाणचा हेतू केवळ इतकाच आहे की कर्ज देणाऱ्याला आपल्या दिलेल्या कर्जाच्या परतफेडीची खात्री व्हावी. परंतु आपण दिलेल्या रकमेच्या मोबदल्यात गहाण ठेवलेल्या वस्तूचा लाभ घेण्याचा त्याला हक्क नाही कारण असे करणे म्हणजे व्याज घेणे होय. तथापि जर एखादे जनावर गहाण घेतले असेल तर त्याचे दूध उपयोगात आणले जाऊ शकते व त्याच्याकडून सवारी व वाहतुकीची सेवाही घेतली जाऊ शकते कारण वास्तविकपणे त्या जनावराच्या वैरण इ.साठी गहाण घेणारा जो खर्च करीत असतो त्याचा हा मोबदला होय.

आणि साक्ष कदापि लपवू नका. जो साक्ष लपवितो त्याचे हृदय पापाने भरलेले आहे. आणि अल्लाह तुमच्या कृत्यांपासून गाफिल नाही. (-२८३)

आकाशांत व पृथ्वीमध्ये जे काही आहे ते सर्व अल्लाहचे आहे. तुम्ही आपल्या मनांतील गोष्टी प्रकट करा अथवा लपवा अल्लाह कोणत्याही परिस्थितीत तुमच्याकडून त्यांचा हिशेब घेईल. मग त्याला हा अधिकार आहे, की त्याने हवे त्याला माफ करावे आणि हवे त्याला शिक्षा द्यावी. प्रत्येक गोष्टीवर त्याला सामर्थ्य आहे. (२८४)

पैगंबराने त्या मार्गदर्शनावर श्रद्धा ठेवली आहे जे त्याच्या पालनकर्त्याकडून त्याच्यावर अवतरले आहे, आणि श्रद्धावानांनीसुद्धा ते मार्गदर्शन मनापासून स्वीकारले आहे. हे सर्व अल्लाह आणि त्याच्या फरिश्त्यांना व त्याच्या ग्रंथांना आणि त्याच्या पैगंबरांना मानतात आणि त्यांचे विधान असे आहे की, ''आम्ही अल्लाहच्या पैगंबराना एक दुसऱ्यापासून वेगळे करीत नाही, आम्ही आज्ञा ऐकली आणि अनुसरण स्वीकारले. हे स्वामी! आम्ही तुझ्यापाशी गुन्हा माफीचे इच्छुक आहोत आणि आम्हाला तुझ्याकडेच परतावयाचे आहे.'' (२८५)

अल्लाह कोणत्याही व्यक्तीवर त्याच्या शक्तीपेक्षा जास्त जबाबदारीचे ओझे टाकीत नसतो. प्रत्येक व्यक्तीने जे पुण्य कमविले आहे, त्याचे फळ त्याच्यासाठीच आहे आणि जे पाप गोळा केले आहे त्याचा दुष्परिणाम त्याच्यावरच होणार आहे. (२८६-)

(श्रद्धावानांनो, तुम्ही अशी प्रार्थना करीत जा) हे आमच्या पालनकर्त्या! आमच्याकडून भूलचुकीने जे अपराध घडतील, त्यांच्यासाठी आम्हाला पकडू नकोस. हे स्वामी, आमच्यावर तसा भार टाकू नकोस जसा तू आमच्या पूर्वीच्या लोकांवर टाकला होतास. हे पालनकर्त्या! जो भार उचलण्याची शक्ती आमच्यात नाही तो आमच्यावर लादू नकोस. आमचे अपराध पोटात घे, आम्हाला क्षमा कर, आमच्यावर दया कर, तूच आमचा वाली आहेस, अश्रद्धावंतांच्या विरूद्ध आम्हाला सहाय्य कर. (-२८६)



# ३ सूरह आलिइमरान

*(मदीनाकालीन, वचने २००)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ, लाऽऽम, मीऽऽम. अल्लाह तो चिरंजीवी अस्तित्व ज्याने सृष्टीची व्यवस्था सांभाळली आहे. खरोखरच त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही. (१-२)

हे पैगंबर (स.), त्याने तुमच्यावर हा ग्रंथ अवतरला जो सत्य घेऊन आला आहे व त्या ग्रंथांच्या सत्यतेची साथ देत आहे, जे पूर्वी अवतरले होते. यापूर्वी त्याने मानवांच्या मार्गदर्शनाकरिता तौरात व इन्जील अवतीर्ण केले आहे. आणि त्याने ती कसोटी अवतीर्ण केली आहे, (जी सत्य आणि असत्य यातील फरक दर्शविणारी आहे.) आता जे लोक अल्लाहचा आदेश स्वीकारण्यास नकार देतील त्यांना निश्चितच कठोर शिक्षा मिळेल. अल्लाह अमर्याद शक्तीचा स्वामी आणि दुष्कर्मांचा बदला घेणारा आहे. (३-४)

पृथ्वी आणि आकाशांतील कोणतीही वस्तू अल्लाहपासून लपलेली नाही. तोच तर आहे, जो तुमच्या मातेच्या गर्भाशयात तुमचा आकार हवा तसा घडवितो, त्या जबरदस्त बुद्धिमानाशिवाय इतर कोणी ईश्वर नाही. तोच ईश्वर आहे, ज्याने हा ग्रंथ तुमच्यावर अवतरला आहे. या ग्रंथात दोन प्रकारची वचने आहेत. एक निर्णायक[१] आहेत, जी ग्रंथाचा मूळ आधार आहेत. आणि दुसरी संदिग्ध,[२] ज्या लोकांच्या मनात तेढ आहे, ते नेहमी

१) आयतेमुहकमात 'दृढ' आयतीने अभिप्रेत अशा आयती होत ज्यांची भाषा अगदी स्पष्ट आहे व ज्यांचा अर्थ निश्चित करण्यात कोणत्याही शंकेला वाव नाही. या आयती 'ग्रंथाचा मूळ आधार आहेत' म्हणजे ज्या हेतूपोटी 'कुरआन' उतरला आहे, तो हेतू याच आयतींनी साध्य होतो. त्यांच्यातच जगाला इस्लामचे आवाहन केले गेले आहे. त्यांच्यातच बोध व धडा आणि उपदेशाच्या गोष्टी फर्मावलेल्या आहेत. त्यांच्यातच पथभ्रष्टतेचे खंडन आणि सरळमार्गाचे स्पष्टीकरण केलेले आहे. त्यांच्यातच धर्माची मौलिक तत्त्वे सांगितलेली आहेत. त्यांच्यातच श्रद्धा, उपासना, नीतिमत्ता, अनिवार्य कर्मे आणि हुकूम देण्याच्या व मनाई करण्याच्या आज्ञा सांगितलेल्या आहेत.

२) 'संदिग्ध' म्हणजे अशा आयती ज्यांच्या अर्थात संदिग्धतेला वाव आहे. त्याचप्रमाणे ज्या वस्तू ज्ञानेंद्रियांच्या कक्षेपलीकडील आहेत, ज्यांना माणसाने कधी ना पाहिले, ना स्पर्श केले, ना चाखले. त्याच्याकरिता मानवी भाषेत असे शब्दही मिळू शकत नाही की जेणेकरून प्रत्येक श्रोत्याच्या मनात त्यांचे पुरेपूर चित्र अचूकपणे उभे राहावे. त्याकरिता हे अपरिहार्य आहे की अशा प्रकारचे विषय वर्णन करण्यासाठी मूळ वस्तुस्थितीशी निकटवर्ती सादृश्यता राखणाऱ्या अनुभूत वस्तूंसाठी जे शब्द व ज्या वर्णनशैली मानवी भाषेत उपलब्ध आहेत त्यांचा प्रयोग केला जावा हेही अगदी उघड आहे. म्हणून अशा परोक्षाच्या हकीगतीसाठी कुरआनात अशाच भाषेचा उपयोग केला आहे, 'संदिग्ध'ने अभिप्रेत त्याच आयती आहेत ज्यांच्यात अशी भाषा वापरली गेली आहे.

अनाचाराच्या शोधात 'संदिग्ध'तेचाच पाठपुरावा करीत असतात आणि त्यांना अर्थाचा मुलामा देण्याचा प्रयत्न करीत असतात. वास्तविक पाहता त्यांचा खरा अर्थ अल्लाहशिवाय कोणासही ठाऊक नाही. याउलट जे लोक ज्ञानाने परिपक्व आहेत ते म्हणतात की, "आमची यांच्यावर श्रद्धा आहे, ह्या सर्व आमच्या पालनकर्त्याकडूनच आलेल्या आहेत.[३]" आणि सत्य असे आहे की, एखाद्या गोष्टीपासून खरा बोध केवळ बुद्धिमान लोकच ग्रहण करतात. ते अल्लाहजवळ प्रार्थना करीत असतात की, "हे पालनकर्त्या! जेव्हा तू आम्हास सरळ मार्गावर आणले आहेस तर आमची मने वक्रतेत गुंतवू नकोस. आम्हाला तुझ्या औदार्याच्या भांडारातून कृपा प्रदान कर, कारण तूच खऱ्या अर्थाने उदार आहेस. हे पालनकर्त्या, नि:संशय तू एके दिवशी सर्व लोकांना एकत्रित करणार आहेस, ज्या दिवसाच्या आगमनाबद्दल कसलीही शंका नाही, तू आपल्या वचनापासून मुळीच ढळणारा नाहीस." (५-९)

ज्या लोकांनी द्रोहाचा मार्ग अवलंबिला आहे, त्यांना अल्लाहपासून वाचविण्यासाठी त्यांची धनसंपत्ती उपयोगी पडणार नाही किंवा त्यांची संततीदेखील. ते (नरकाग्नी)चे इंधन बनून राहतील. त्यांचा शेवट तसाच होईल, जसा फिरऔनचे सोबती व त्यांच्या पूर्वी अवज्ञा करणाऱ्यांचा झाला आहे. कारण त्यांनी अल्लाहच्या संकेतांना खोटे ठरविले. परिणामस्वरूप अल्लाहने त्यांच्या अपराधांसाठी त्यांना पकडले आणि सत्य असे आहे की अल्लाह कठोर शिक्षा देणारा आहे. म्हणून हे पैगंबर (स.), ज्या लोकांनी तुमचे आवाहन मान्य करण्यास नकार दिला आहे, त्यांना सांगून टाका की, ती वेळ जवळच आहे जेव्हा तुम्ही पराभूत व्हाल, व नरकाकडे तुम्हांस हाकून नेले जाईल, व नरक फारच वाईट स्थान आहे त्या दोन्ही गटांमध्ये तुमच्यासाठी बोधचिन्ह होते, जे (बदरच्या युद्धात) एक दुसऱ्याशी भिडले. एक गट अल्लाहच्या मार्गात लढत होता आणि दुसरा गट द्रोह करणारा होता. पाहणारे उघड्या डोळ्यांनी पाहात होते की, द्रोह करणाऱ्यांचा गट मुसलमानांच्या गटापेक्षा दुप्पट आहे.[४] पण (परिणामाने सिद्ध करून दाखविले की) अल्लाह आपल्या विजयाने व सहाय्याने हवे त्याला मदत देतो. डोळसपणा बाळगणाऱ्यांसाठी त्यामध्ये उत्तम बोध दडलेला आहे. (१०-१३)

३) या ठिकाणी कोणाला अशी शंका येऊ नये की जेव्हा ते लोक 'संदिग्ध'चा योग्य अर्थ जाणतच नाही तर मग त्यांनी त्याच्यावर ईमान कसे आणावे. वास्तुस्थिती अशी आहे की एका शहाण्या माणसाला 'कुरआन' ही अल्लाहची वाणी असल्याचा विश्वास दृढ आयतींच्या वाचनाने प्राप्त होतो, 'संदिग्ध'चा अर्थ लावण्याने नव्हे. 'दृढ' आयतीवर मनन् चिंतन केल्याने हा ग्रंथ खरोखरच अल्लाहचा ग्रंथ आहे अशी जेव्हा त्याची खात्री पटते तेव्हा 'संदिग्ध'मुळे त्याच्या मनात कसलाही गोंधळ निर्माण होत नाही.

४) वास्तविकपणे खरा फरक तिपटीचा होता. परंतु वरवर पाहणाऱ्यालासुद्धा असे वाटल्याशिवाय राहिले नसते की काफिरांचे सैन्य मुसलमानांपेक्षा दुप्पट आहे.



लोकांकरिता वासनाप्रिय गोष्टी,– स्त्रिया, संतती, सोन्या-चांदीचे ढीग, निवडक घोडे, पशू आणि शेतजमिनी– अत्यंत मोहक बनविल्या गेल्या आहेत, पण या सर्व वस्तू तर क्षणिक ऐहिक जीवनाची सामग्री आहे. खरे पाहता जे सर्वोत्तम ठिकाण आहे, ते अल्लाहजवळ आहे. त्यांना सांगा! यापेक्षा अधिक चांगली वस्तू काय आहे, ते सांगू? जे लोक अल्लाहच्या कोपाचे भय बाळगून वागतील, त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याजवळ उद्याने आहेत ज्यांच्याखालून कालवे वाहत असतील, तेथे त्यांना चिरकालीन जीवन प्राप्त होईल. पवित्र पत्नी त्यांच्या सोबती असतील आणि त्या अल्लाहच्या प्रसन्नतेने मान्यवर होतील. अल्लाह आपल्या दासांच्या वागणुकीवर देखरेख ठेवतो. हे ते लोक आहेत जे म्हणतात की, "हे स्वामी, आम्ही श्रद्धा ठेवतो आमच्या अपराधांबद्दल क्षमा कर आणि आम्हाला नरकाग्नीपासून वाचव." हे लोक संयमी आहेत, सत्यनिष्ठ आहेत, आज्ञाधारक व दानशूर आहेत, आणि रात्रीच्या अंतिम प्रहरी अल्लाहजवळ क्षमायाचना करीत असतात. (१४-१७)

अल्लाहने स्वत: या गोष्टीची ग्वाही दिली आहे की त्याच्याशिवाय कोणीही परमेश्वर नाही, आणि फरिश्ते व सर्व ज्ञान राखणारेसुद्धा रास्त व न्यायनीतीने यांची ग्वाही देतात की, त्या प्रभावशाली बुद्धीमंताशिवाय खरे पाहता कोणीही ईश्वर नाही. अल्लाहजवळ दीन (धर्म) केवळ इस्लामच आहे. या 'दीन'पासून दूर जाऊन जे विभिन्न मार्ग अशा लोकांनी अवलंबिले, ज्यांना ग्रंथ दिले गेले होते, त्यांच्या आचरणाचे कारण याशिवाय अन्य काही नव्हते, की त्यांनी ज्ञान पोहचल्यानंतर, आपापसात एकमेकांशी अतिरेक करण्यासाठी असे केले आणि जो कोणी अल्लाहचे आदेश व त्याच्या सूचनांचे पालन करण्यास नकार देईल, त्याचा हिशेब घेण्यास अल्लाहला विलंब लागत नाही. आता हे पैगंबर (स.), हे लोक जर तुमच्याशी भांडण करतील तर त्यांना सांगा, "मी आणि माझ्या अनुयायांनी तर अल्लाहसमोर मान तुकविली आहे." मग ग्रंथधारक व बिगर ग्रंथधारी दोघांना विचारा, "काय तुम्हीही त्याची आज्ञाधारकता व दास्यत्व स्वीकारले?' जर त्यांनी स्वीकारले तर त्यांना सरळ मार्ग प्राप्त झाला. जर त्यापासून पराङ्मुख झाले तर, तुमच्यावर फक्त संदेश पोहचविण्याची जबाबदारी होती. पुढे तर अल्लाह स्वत:च आपल्या सर्व दासांचे व्यवहार पाहणारा आहे. (१८-२०)

जे लोक अल्लाहचे आदेश व त्याच्या सूचना मान्य करण्यास नकार देतात आणि त्याच्या पैगंबरांना हकनाक ठार करतात आणि अशा लोकांच्या जीवावर उठतात जे मानवमात्रापैकी न्यायनीती व रास्तपणाचा आदेश देण्याकरिता पुढे येतात, त्यांना दुख़दायक शिक्षेची वार्ता ऐकवा. हेच ते लोक होत, ज्यांची कर्मे इहलोकात व परलोकात, दोहोंमध्ये वाया गेली आणि त्यांचा सहायक कोणी नाही. (२१-२२)

तुम्ही पाहिले नाही की, ज्या लोकांना ग्रंथाच्या ज्ञानातून काही भाग मिळाला आहे,

त्यांची अवस्था काय आहे? जेव्हा त्यांना अल्लाहच्या ग्रंथाकडे बोलाविले जाते, याकरिता की त्याने त्यांच्या दरम्यान निर्णय द्यावा, तेव्हा त्यांच्यापैकी एक गट त्याला बगल देतो व त्या निर्णयाकडे येण्यापासून विमुख होतो. त्यांची ही वर्तणूक या कारणास्तव आहे की, ते म्हणतात नरकाग्नी तर आम्हाला स्पर्शदेखील करणार नाही. आणि नरकाची शिक्षा मिळालीच, तर फक्त काही दिवस. त्यांच्या तथाकथित श्रद्धांनी त्यांना त्यांच्या धर्माच्या बाबतीत भयंकर चुकीच्या समजुतीत गुंतविले आहे. मग काय ओढवेल त्यांच्यावर, जेव्हा आम्ही त्यांना त्या दिवशी एकत्र करू, ज्या दिवसाचे आगमन निश्चित आहे? त्या दिवशी प्रत्येक व्यक्तीला तिच्या कमाईचा बदला पुरेपूर दिला जाईल व कोणावरही अत्याचार होणार नाही. (२३-२५)

सांगा, ''हे अल्लाह समस्त राज्याच्या स्वामी! तू हवे त्याला राज्य देतोस व हवे त्याकडून हिरावून घेतोस. हवे त्याला प्रतिष्ठा प्रदान करतोस व हवे त्याला अपमानित करतोस. कल्याण तुझ्याच अखत्यारित आहे. नि:संशय, तू प्रत्येक गोष्टीला समर्थ आहेस तू रात्रीला दिवसात ओवीत आणतोस आणि दिवसाला रात्रीत, निर्जिवातून सजीवास, बाहेर काढतोस व सजिवातून निर्जिवास व ज्याला इच्छितोस त्याला उदंड उपजीविका देतोस. (२६-२७)

श्रद्धावानांनी, श्रद्धावानांना सोडून अश्रद्धावानांना आपला मित्र-सोबती व सहायक मुळीच बनवू नये. जो असे करील त्याचा अल्लाहशी काही संबंध नाही. होय, त्यांच्या अत्याचारापासून वाचण्यासाठी सकृतदर्शनी जर तुम्ही अशी कार्यपद्धती अवलंबिली[५] तर ती क्षम्य आहे. परंतु अल्लाह तुम्हाला आपले स्वत:चे भय दाखवितो आणि तुम्हाला त्याच्याकडेच परत जावयाचे आहे.[६] हे नबी! लोकांना माहिती करून द्या की, तुमच्या मनात जे काही आहे त्याला गुप्त ठेवा अथवा प्रकट करा प्रत्येक स्थितीत अल्लाह ते

५) म्हणजे एखादा ईमानधारक जर एखाद्या इस्लाम शत्रूपक्षाच्या तावडीत सापडला असेल व त्याला शत्रूपक्षाच्या छळाचे भय असेल तर आपला ईमान-श्रद्धा लपवून ठेवण्याची तसेच तो त्यांच्यापैकीच एखादा आहे सकृतदर्शनी असे वागण्याची त्याला परवानगी आहे. किंवा त्याचे मुसलमान असणे उघड झाले असेल तर आपले प्राण वाचविण्यासाठी तो काफिरांशी मित्रत्वाचे वर्तन व्यक्त करू शकतो इथपावेतो की कमालीच्या भयावह स्थितीत जो इसम सहन करण्याची शक्ती बाळगत नसेल त्याला इन्काराचे शब्द- कल्म-ए-कुफ्र उच्चारण्याचीही मुभा आहे.

६) म्हणजे आपले प्राण वाचविण्यासाठी इस्लामी ध्येय धोरण आणि इस्लामी जमातीचे हित तसेच कोणत्याही मुसलमानाच्या जीवित व वित्ताला हानी पोहचविल्याविना तुम्ही आपले जीवित व वित्त सुरक्षित करावे इतपत तर तुम्ही 'तकीय्या'-कावा, दाखवू शकता परंतु सावधान, कुफ्र आणि काफिरांची अशी कोणतीही सेवा तुमच्या हाताने पार पडू नये जेणेकरून इस्लामच्या विरूद्ध कुफ्रचा प्रसार व मुसलमानांवर काफिरांचे वर्चस्व प्रस्थापित होणे शक्य व्हावे.



जाणतो, पृथ्वी व आकाशामधील कोणतीही वस्तू त्याच्या ज्ञानकक्षेबाहेर नाही आणि त्याची सत्ता प्रत्येक वस्तूवर प्रभावी आहे. तो दिवस उगवणार आहे, जेव्हा प्रत्येक सजीवाला आपल्या कृतीचे फळ उपलब्ध असल्याचे आढळेल मग त्याने पुण्य केले असो अथवा पाप, त्या दिवशी मनुष्य अशी कामना करील की, किती छान झाले असते, जर हा दिवस अद्याप त्याच्यापासून फार दूर असता! अल्लाह तुम्हाला आपल्या स्वत:चे भय दाखवतो आणि तो आपल्या दासांचा अत्यंत हितचिंतक आहे. (२८-३०)

हे पैगंबर (स.)! लोकांना सांगून टाका, ''जर तुम्ही खरोखर अल्लाहवर प्रेम करीत असाल, तर माझे अनुकरण करा, अल्लाह तुमच्यावर प्रेम करील आणि तुमच्या अपराधांना क्षमा करील, तो अत्यंत क्षमाशील व परम कृपाळू आहे.'' त्यांना सांगा! ''अल्लाह व पैगंबरांचे आज्ञाधारक बना.'' मग जर त्यांनी तुमचे आवाहन स्वीकारले नाही तर अल्लाह अवज्ञा करणाऱ्यांवर प्रेम करत नाही.'' (३१-३२)

अल्लाहने आदम (अ.) आणि नूह (अ.) आणि इब्राहीम (अ.) ची संतान व इम्रानची संतान[७] यांना सर्व दुनियेवर प्राधान्य देऊन (आपल्या प्रेषितपदाकरिता) निवडले होते. हे एका परंपरेचे लोक होते जे एक दुसऱ्याच्या वंशापासून जन्मले होते. अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो. (तो त्या वेळेस ऐकत होता) जेव्हा इम्रानची पत्नी[८] सांगत होती, ''हे माझ्या पालनकर्त्या! मी हे मूल जे माझ्या पोटात आहे, तुला अर्पण करते. ते तुझ्याच कार्याकरिता समर्पित असेल, माझी ही भेट स्वीकार कर. तू ऐकणारा व जाणणारा आहेस.'' मग जेव्हा ती मुलगी तिच्या पोटी जन्मास आली तेव्हा तिने सांगितले, ''हे पालनकर्त्या! माझ्या पोटी तर मुलगी जन्मली आहे - तिने कोणास जन्म दिला हे अल्लाहला ज्ञात होते. - आणि मुलगा मुलीसारखा असत नाही. बरे असो हिचे नाव 'मरयम' ठेविले आहे. आणि मी तिला आणि तिच्या भावी संततीला धिक्कारल्या गेलेल्या शैतानाच्या उपद्रवापासून तुझ्या संरक्षणात देते.'' सरतेशेवटी तिच्या पालनकर्त्याने त्या मुलीचा, प्रसन्नतेने स्वीकार केला. तिचे खूप चांगली मुलगी म्हणून संगोपन केले आणि ज़करिय्याला तिचे पालक बनविले. (३३-३७-)

ज़करिय्या जेव्हा तिच्याजवळ महिरपमध्ये जात असे तेव्हा तिच्याजवळ काही ना काही खाण्यापिण्याच्या वस्तू त्याला आढळत असत. तो विचारत असे, ''मरयम, हे

७) 'इमरान' हजरत मूसा (अ.) व हजरत हारून (अ.) यांच्या पित्याचे नाव होते, बायबलमध्ये त्याला 'अमराम' लिहिले गेले आहे.

८) इमरानच्या स्त्रीने अभिप्रेत जर 'इमरानची पत्नी' घेतली गेली तर हा इमरान तो नाही ज्याचा उल्लेख वर आला आहे तर हे हजरत मरयमचे पिता होते. त्यांचे नाव कदाचित इमरान असावे असा त्याचा अर्थ होईल परंतु जर इमरानच्या स्त्रीने अभिप्रेत 'इमरानवंशीय स्त्री' असे घेतले गेले तर हजरत मरयमच्या माता या वंशाच्या होत्या असा याचा अर्थ होईल.

तुझ्याजवळ कोठून आले?'' ती उत्तर देत असे, ''अल्लाहकडून आले आहे.'' अल्लाह ज्याला इच्छितो त्याला अमर्याद देतो. ही अगणित उपजीविका पाहून ज़करिय्याने आपल्या पालनकर्त्याचा धावा केला आणि म्हणाला, ''हे प्रभू! आपल्या सामर्थ्याने मला प्रामाणिक संतान प्रदान कर, तूच प्रार्थना ऐकणारा आहेस.'' उत्तरादाखल ईशदूतांनी त्याला हाक दिली जेव्हा तो महिरपमध्ये उभा, नमाज अदा करीत होता, ''अल्लाह तुला 'यहया'ची शुभवार्ता देत आहे. तो अल्लाहच्या शब्दाचे समर्थन करणारा म्हणून येईल. तो अल्लाहकडून एका आदेशाची[९] सत्यता प्रमाणित करणारा म्हणून येईल. आणि त्याच्यापाशी सरदारकी आणि श्रेष्ठत्वाची शान असेल. कमाल दर्जाची शिस्तबद्धता असेल. प्रेषितत्वाने भूषविला जाईल आणि सदाचारी लोकांत गणला जाईल.'' ज़करिय्या म्हणाला, ''हे पालनकर्त्या! मला पुत्र कसा काय होणार बरे, मी तर वृद्ध झालो आहे आणि माझ्या पत्नीला तर वंध्यत्व आहे.'' उत्तर मिळाले, ''असेच होईल.[१०] अल्लाह जे इच्छितो ते करतो.'' त्याने विचारले, ''स्वामी! मग एखादे संकेतचिन्ह माझ्याकरिता निश्चित कर.'' सांगितले, ''संकेतचिन्ह हे आहे की तू तीन दिवसांपर्यंत लोकांशी संकेताविना कोणतेही संभाषण करणार नाहीस (अथवा करू शकणार नाहीस.) या कालावधीत आपल्या पालनकर्त्याचे खूप स्मरण करीत राहा आणि सकाळ संध्याकाळ त्याचे पावित्र्यगान करीत रहा.'' (-३७-४१)

मग ती वेळ येऊन ठेपली जेव्हा ईशदूतांनी येऊन मरयमला सांगितले, ''हे मरयम! अल्लाहने तुझी निवड केली व तुला पावित्र्य दिले आणि जगातील सर्व स्त्रियांवर तुला प्राधान्य देऊन आपल्या सेवेकरिता निवडले. हे मरयम! आपल्या पालनकर्त्याशी आज्ञाधारक बनून राहा, त्याच्या पुढे नतमस्तक होत राहा व जे दास त्याच्या पुढे झुकणारे आहेत त्यांच्याबरोबर तूसुद्धा झुकत जा.'' (४२-४३)

(हे पैगंबर (स.)!) या परोक्षाच्या वार्ता आहेत ज्या आम्ही तुम्हाला दिव्यप्रकटनाद्वारे कळवीत आहोत, एरवी तुम्ही त्यावेळी त्या ठिकाणी हजर नव्हता, जेव्हा हैकलचे सेवक हा निर्णय घेण्याकरिता की मरयमचा पालक कोण असावा, यासाठी आपापले फांसे फेकत होते.[११] आणि त्यावेळी देखील तुम्ही हजर नव्हता जेव्हा त्यांच्या दरम्यान भांडण होत होते. (४४)

आणि जेव्हा दूतांनी म्हटले, ''हे मरयम, अल्लाह तुला आपल्या एका आदेशाची

९) अल्लाहचे 'फर्मान'ने अभिप्रेत हजरत ईसा-येशू-मसीह (अ.) आहेत. त्यांचा जन्म सर्वोच्च अल्लाहच्या एका अनन्यसाधारण फर्मानाने चमत्कारिक पद्धतीने झाला असल्या कारणाने दिव्य कुरआनात त्यांना 'अल्लाहकडून एक फर्मान' असे म्हटले गेले आहे.

१०) म्हणजे तुझे वार्धक्य आणि तुझी पत्नी वांझ असतानासुद्धा अल्लाह तुला पुत्र देईल.

११) म्हणजे फासेफेक करीत होते.



शुभवार्ता देत आहे. त्याचे नांव मरयमपुत्र, मसीह ईसा असेल व तो इहलोक व परलोकात प्रतिष्ठित राहील, अल्लाहच्या निकटवर्ती दासांमध्ये त्याची गणना होईल. तो लोकांशी पाळण्यातदेखील संभाषण करील आणि मोठा होऊनसुद्धा, आणि तो एक सदाचारी पुरुष असेल.'' हे ऐकून मरयम म्हणाली, ''हे पालनकर्त्या, मला मूल कसे होणार? मला तर कोणा पुरुषाने स्पर्श देखील केला नाही.'' उत्तर मिळाले, ''असेच होईल.[१२] अल्लाह जे इच्छितो ते निर्माण करतो. तो जेव्हा एखादे कार्य करण्याचा निर्णय घेतो तेव्हा फक्त म्हणतो की, 'हो' तर ते होते.'' (ईशदूतांनी पुन्हा आपल्या संभाषणाच्या ओघात म्हटले) ''आणि अल्लाह त्याला ग्रंथ व विवेकाची शिकवण देईल, तौरात व इन्जीलचे शिक्षण देईल, आणि त्याला बनीइस्राईलसाठी आपला प्रेषित नियुक्त करील.'' (४५-४९-)

(आणि जेव्हा तो प्रेषित म्हणून बनीइस्राईलपाशी आला तेव्हा त्याने सांगितले) ''मी तुमच्या पालनकर्त्याकडून तुम्हापाशी संकेतचिन्ह घेऊन आलो आहे. मी तुमच्यासमोर मातीपासून पक्ष्याच्या आकाराचा एक पुतळा तयार करतो आणि त्याला फुंकर मारतो. तो अल्लाहच्या आदेशाने पक्षी बनतो. मी अल्लाहच्या आज्ञेने जन्मजात आंधळ्याला व महारोग्याला बरे करतो आणि त्याच्या आज्ञेने मृताला जिवंत करतो. मी तुम्हाला सांगतो की तुम्ही काय खाता आणि आपल्या घरांत काय साठा करून ठेवता. यात तुमच्यासाठी पुरेशी निशाणी आहे जर तुम्ही श्रद्धावंत असाल. आणि मी ती शिकवण व त्या मार्गदर्शनाचे समर्थन करण्यासाठी आलो आहे जे यापूर्वीच्या तौरातमध्ये विद्यमान आहे, आणि यासाठी आलो आहे की तुम्हासाठी काही अशा वस्तुना मी वैध करावे ज्या तुम्हासाठी निषिद्ध करण्यात आल्या आहेत.[१३] पहा, मी तुमच्या पालनकर्त्याकडून तुम्हापाशी संकेत घेऊन आलो आहे, म्हणून अल्लाहचे भय बाळगा आणि माझी आज्ञा पाळा. अल्लाह माझाही पालनकर्ता आहे व तुमचा पालनकर्तासुद्धा. म्हणून तुम्ही त्याचीच भक्ती करा हाच सरळ मार्ग आहे. (-४९-५१)

जेव्हा ईसा (अ.) ला जाणवले की बनीइस्राईल नाकारण्यामध्ये तत्पर आहेत तेव्हा त्याने सांगितले, ''कोण अल्लाहच्या मार्गात माझा सहायक बनेल?'' हवारींनी[१४] उत्तर

१२) म्हणजे असे असतानासुद्धा की कोणत्याही पुरुषाने तुला स्पर्श केलेला नाही, तुला मूल होईल.

१३) म्हणजे तुमच्या अडाणी लोकांच्या भ्रामक कल्पना, तुमच्या शास्त्रींचे छिद्रान्वेषण, तुमच्या वैराग्यप्रिय लोकांचा अतिरेक आणि मुस्लिमेतर लोकांचा तुमच्यावरील पगडा व त्यांच्या वर्चस्वामुळे तुमच्या येथे मूळ ईश्वरी शरीअत-जीवन कायद्यात ज्या बंधनांची वाढ केली गेली आहे, त्यांना मी रद्दबातल करीन व ज्या वस्तू अल्लाहने तुमच्यासाठी हलाल व हराम ठरविल्या आहेत केवळ त्यांनाच मी हलाल किंवा हराम ठरवीन.

१४) 'हवारी' या शब्दाचा अर्थ जवळ जवळ तोच आहे, आमच्या येथे जो 'अन्सार' (मददगार, सहायक) या शब्दाचा आहे.

दिले, "आम्ही अल्लाहचे सहायक आहोत,[१५] आम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवली, साक्षी राहा की आम्ही मुस्लिम (अल्लाहच्या आज्ञेपुढे नतमस्तक होणारे) आहोत. स्वामी! जे फर्मान तू अवतरले आहेस, आम्ही त्याला मानतो आणि प्रेषिताचे अनुसरण स्वीकारतो. आमची नावे ग्वाही देणाऱ्यांमध्ये समाविष्ट कर." (५२-५३)

नंतर बनीइस्राईल (येशू मसीहच्याविरूद्ध) गुप्त कारस्थान करू लागले. उत्तरादाखल अल्लाहनेदेखील आपला गुप्त डाव योजिला आणि असे डाव योजण्यात अल्लाह सर्वात वरचढ आहे. (ती अल्लाहची गुप्त युक्तीच होती) जेव्हा त्याने सांगितले की, "हे ईसा (अ.), मी आता तुला परत घेईन[१६] आणि तुला माझ्याकडे उचलून घेईन व ज्यानी तुला नाकारले आहे त्यांच्यापासून (म्हणजे त्यांच्या सहवासातून व घाणेरड्या वातावरणातील, त्यांच्या संगतीत राहण्यापासून) तुला पवित्र करीन आणि तुझे अनुसरण करणाऱ्यांना पुनरुत्थानापर्यंत त्या लोकांवर वरचढ ठेवीन ज्यांनी तुला नाकारले आहे. मग सरतेशेवटी तुम्हां सर्वांना माझ्याकडे यावयाचे आहे. तेव्हा मी गोष्टींचा निर्णय देईन ज्या संबंधी तुम्हा दरम्यान मतभेद निर्माण झाला आहे. ज्या लोकांनी नाकारण्याचा मार्ग अंगिकारला आहे त्यांना इहलोक व परलोक दोहोंमध्ये कठोर शिक्षा देईन. आणि त्यांना कोणीही सहायक मिळणार नाही. आणि ज्यांनी श्रद्धा व सद्वर्तनाचे आचरण केले आहे, त्यांना त्यांचे मोबदले पुरेपूर दिले जातील. आणि (पक्के जाणून घ्या की) अल्लाह अत्याचारी लोकांवर कदापि प्रेम करीत नाही." (५४-५७)

हे पैगंबर (स.), संकेतवचने व बुद्धिमत्तेने ओतप्रोत वर्णने आहेत जी आम्ही तुम्हाला ऐकवीत आहोत. अल्लाहपाशी ईसा (अ.) चे उदाहरण आदम (अ.) सारखेच आहे की अल्लाहने त्याला मातीपासून निर्माण केले आणि आज्ञा दिली की अस्तित्वात ये आणि त्याचे अस्तित्व प्रत्यक्षात आले.[१७] ही वस्तुस्थिती आहे जी तुमच्या पालनकर्त्याकडून सांगण्यात येत आहे. आणि तुम्ही त्या लोकांत सामील होऊ नका जे यांच्यात शंका घेतात. (५८-६०)

हे ज्ञान आल्यानंतर आता याबाबतीत तुमच्याशी जो कोणी वाद घालत असेल तर हे प्रेषित, त्याला सांगा की, "या, आमची मुलेबाळे व तुमची मुलेबाळे आमच्या स्त्रिया व

**१५)** म्हणजे अल्लाहच्या कार्यात आपले सहायक आहोत.

**१६)** मूळ अरबी शब्द 'मुतवफ्फीक' वापरला गेला आहे. 'तवफ्फी'चा मूळ अर्थ वसूल करणे असा होतो. 'प्राणहरण करणे' हा सदरहू शब्दाचा लाक्षणिक अर्थ आहे, मूळ शाब्दिक अर्थ नव्हे.

**१७)** म्हणजे केवळ बापाविना जन्मास येणे हीच गोष्ट जर एखाद्याला देव अथवा देवपुत्र बनविण्यासाठी पुरेसे प्रमाण ठरत असेल तर मग ख्रिस्ती लोकांनी हजरत आदमसंबंधी तर अग्रक्रमाने अशी श्रद्धा ठरविली पाहिजे होते. कारण येशू मसीह तर केवळ बिन-बापाचे जन्मास आले होते परंतु आदम तर माता व पिता दोन्हीविनाच निर्माण झाले आहेत.



तुमच्या स्त्रिया, तसेच तुम्ही आणि आम्ही, आपण सर्व येऊया आणि अल्लाहजवळ सांगू या की, जो खोटा असेल त्याच्यावर अल्लाहचा कोप होवो. (अल्लाहकडून धिक्कार होवो.)" या अगदी खऱ्या घटना आहेत आणि वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहशिवाय अन्य कोणीही ईश्वर नाही आणि ते अस्तित्व केवळ अल्लाहचेच आहे ज्याची शक्ती सर्वांपेक्षा वरचढ आहे व ज्याची बुद्धिमत्ता विश्वव्यवस्थेत कार्यरत आहे. मग जर हे लोक (या अटीवर सामना करण्यापासून) पराङ्मुख होतील तर (त्यांचे द्रोही असणे स्पष्टपणे उघडकीस येईल) आणि अल्लाह तर विद्रोहीच्या स्थितीशी परिचित आहेच. (६१-६३)

(हे पैगंबर (स.)!) सांगा, "हे ग्रंथधारकानो या, एका अशा बाबीकडे जी आमच्या आणि तुमच्या दरम्यान समान आहे, हे की आपण अल्लाहशिवाय कोणाचीही भक्ती करू नये, त्याच्याबरोबर कोणासही भागीदार ठरवू नये, आणि आपल्यापैकी कोणीही अल्लाहशिवाय इतर कोणास आपला पालनकर्ता बनवू नये." या आवाहनाला स्वीकारण्यापासून ते जर पराङ्मुख झाले तर स्पष्ट सांगून टाका की साक्षी राहा आम्ही तर मुस्लिम (केवळ अल्लाहची भक्ती करणारे व त्याचे आज्ञापालन करणारे) आहोत. (६४)

हे ग्रंथधारकानो, तुम्ही इब्राहिम (अ.) च्या (धर्मा) संबंधी आमच्याशी का वाद घालता? तौरात व इंजील हे ग्रंथ तर इब्राहिम नंतरच उतरले आहेत. मग काय तुम्हाला एवढीशी गोष्टदेखील कळत नाही. तुम्हा लोकांना ज्या गोष्टीचे ज्ञान आहे त्यावर तर तुम्ही खूप वादंग माजविले, आता त्याबाबतीत विवाद का करू पाहता ज्यांचे तुम्हापाशी काहीच ज्ञान नाही. अल्लाह जाणतो. तुम्ही जाणत नाही. इब्राहिम (अ.) यहुदीही नव्हता की ख्रिस्तीदेखील नव्हता किंबहुना तो तर एक एकचित्त मुस्लिम होता[१८] आणि तो कदापि अनेकेश्वरवाद्यांपैकी नव्हता. इब्राहिम (अ.) शी संबंध ठेवण्याचा सर्वाधिक हक्क जर कोणाला पोहचतो तर तो त्या लोकांना पोहचतो ज्यांनी त्याचे अनुकरण केले. आणि आता हे प्रेषित (स.) आणि याचे अनुयायी या संबंधाचे अधिक हक्कदार आहेत. अल्लाह केवळ त्यांचाच समर्थक व मदतगार आहे जे श्रद्धा ठेवतात. (६५-६८)

(हे श्रद्धावानांनो) ग्रंथधारकांपैकी एक गट इच्छितो की येनकेनप्रकारेण तुम्हाला सरळ मार्गापासून दूर करावे. वास्तविक पाहता ते आपल्याशिवाय इतर कोणासही मार्गभ्रष्ट करीत नाहीत. परंतु त्यांना याचा विवेक नाही. हे ग्रंथधारकांनो, अल्लाहचे संकेत

**१८)** मूळ अरबी शब्द 'हनीफ' वापरला गेला आहे. त्याने अभिप्रेत एखादा असा मनुष्य आहे जो सर्व बाजूंनी तोंड फिरवून एका विशिष्ट मार्गावर चालतो. याचाच अर्थ आम्ही 'एकाग्र मुस्लिम' या शब्दाने व्यक्त केला आहे.

नाकारता, वास्तविक पाहता तुम्ही स्वत: त्यांचे निरीक्षण करीत आहात?[१९] हे ग्रंधारकांनो, सत्यावर असत्याचा रंग चढवून त्याला का शंकास्पद बनविता? जाणूनबुजून सत्याला का लपविता? (६९-७१)

ग्रंथधारकांपैकी एक गट म्हणतो की या पैगंबराला मानणाऱ्या लोकांवर जे काही अवतरले आहे, त्यावर सकाळी श्रद्धा ठेवा व संध्याकाळी ते नाकारा. कदाचित या युक्तीने हे लोक आपल्या श्रद्धेपासून परावृत्त होतील. तसेच हे लोक आपापसात म्हणतात की स्वधर्मीयांशिवाय कोणाचेही ऐकू नका. हे पैगंबर (स.), यांना सांगा, "वास्तविक मार्गदर्शन तर अल्लाहचेच मार्गदर्शन होय. आणि ही त्याचीच देणगी आहे की एखाद्याला तेच काही दिले जाते जे कधी तुम्हाला दिले गेले होते किंवा असे की इतरांना तुमच्या पालनकर्त्यापुढे रुजू करण्यासाठी तुमच्याविरूद्ध भक्कम प्रमाण मिळावे." हे पैगंबर (स.), यांना सांगा की, "कृपा व प्रतिष्ठा अल्लाहच्या अखत्यारित आहे. हवे त्याला त्याने ती प्रदान करावी. तो उदार दृष्टीचा आहे.[२०] व तो सर्वज्ञ आहे. आपल्या कृपेसाठी हवे त्याला निवडतो आणि त्याची कृपा अतिमहान आहे." (७२-७४)

ग्रंथधारकांमध्ये कुणी असा आहे की तुम्ही त्याच्या विश्वासावर गडगंज संपत्ती दिली तरी तो तुमची संपत्ती तुम्हाला अदा करील, आणि कुणाची अवस्था अशी आहे की तुम्ही एका दीनारच्या बाबतीत जरी त्याच्यावर विश्वास ठेवला तरी तो याशिवाय अदा करणार नाही की तुम्ही त्याच्या मानगुटीवर बसाल. त्यांच्या या नैतिक अवस्थेचे कारण असे आहे की ते सांगतात, "उम्मी (यहुदी-ज्यू खेरीज इतर लोक) लोकांच्या बाबतीत आमची काही विचारणा होणार नाही." आणि ही गोष्ट ते केवळ खोटी रचून तिचा संबंध अल्लाहशी

**१९)** दुसरा अनुवाद या वाक्याचा असाही होऊ शकतो, "तुम्ही स्वत: ही ग्वाही देता" दोन्ही स्वरूपात मूलभूत अर्थावर काही परिणाम होत नाही. वास्तविकत: पैगंबर मुहम्मद (स.) यांचे निर्मळ जीवन, त्यांच्या सोबती-सहाबा (रजि.)- च्या जीवनावर त्यांच्या शिकवणी व संस्काराचे होणारे आश्चर्यकारक परिणाम आणि कुरआनात फर्माविले जाणारे उच्चकोटीचे विषय, या सर्व गोष्टी सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या अशा उज्ज्वल निशाण्या होत्या की प्रेषितांच्या अहवाल आणि ईश्वरी ग्रंथांच्या शैलीशी परिचित असलेल्या अशा कोणत्याही व्यक्तीला या निशाण्यांना पाहून हजरत मुहम्मद (स.) यांच्या प्रेषितत्वात शंका घेणे फारच कठीण होते.

**२०)** मूळ अरबी शब्द 'वासेअ' वापरला गेला आहे. सर्वसाधारणपणे कुरआनात हा शब्द तीन प्रसंगावर येत असतो. एक प्रसंग जेव्हा एखाद्या मानवी समूहाच्या संकुचित दृष्टीचा व संकुचित विचारसरणीचा उल्लेख येत असतो व अल्लाह तुमच्यासारखा संकुचित दृष्टीचा नव्हे या वस्तुस्थितीसंबंधी त्या समूहाला सावध करावयाचे असते. दुसरा तो प्रसंग जेव्हा एखाद्याचा कंजूषपणा, संकुचित मनोवृत्ती आणि धैर्यहीनतेचा धिक्कार करताना, अल्लाह सढळ हाताचा आहे, तुमच्यासारखा नव्हे असे दाखवावयाचे असते. तिसरा तो प्रसंग जेव्हा लोक आपल्या संकुचित कल्पनेमुळे अल्लाहकडे एखाद्या प्रकारचा मर्यादितपणा जोडतात व अल्लाह अमर्याद आहे असे त्यांना दाखवावयाचे असते.



जोडतात. खरे पाहता त्यांना माहीत आहे (की अल्लाहने अशी कोणतीही गोष्ट फर्माविली नाही.) बरे त्यांची विचारणा का होणार नाही? जो कोणी आपले वचन पूर्ण करील व वाईट गोष्टींपासून दूर राहील तो अल्लाहचा प्रिय बनेल, कारण ईशपरायण लोक त्याला प्रिय आहेत. उरले ते लोक जे अल्लाहशी केलेला करार व आपल्या शपथा अल्पशा किमतीवर विकून टाकतात तर त्यांच्यासाठी पारलौकिक जीवनात कोणताही वाटा नाही. अल्लाह कयामतच्या दिवशी त्यांच्याशी बोलणारही नाही, त्यांच्याकडे पाहणारही नाही आणि त्यांना पवित्रही करणार नाही किंबहुना त्यांच्यासाठी तर अत्यंत यातनादायक शिक्षा आहे. (७५-७७)

त्यांच्यात काही लोक असे आहेत जे ग्रंथ वाचताना अशाप्रकारे जीभ वेडीवाकडी वळवितात की तुम्ही समजावे जे काही ते वाचत आहेत ते ग्रंथातीलच मजकूर होय, वास्तविक पाहता तो मजकूर ग्रंथातील नसतो. ते म्हणतात की हे जे काही आम्ही वाचत आहोत हे अल्लाहकडून आहे. खरे पाहता ते अल्लाहकडून असत नाही, ते जाणूनबुजून असत्य गोष्टीचा संबंध अल्लाहशी जोडतात. (७८)

कोणत्याही माणसाचे हे काम नव्हे की अल्लाहने त्याला ग्रंथ आणि आज्ञा व प्रेषितत्व प्रदान करावे आणि त्याने लोकांना म्हणावे की अल्लाहऐवजी तुम्ही माझे दास बना. तो तर हेच म्हणेल की खऱ्या अर्थी रब्बानी (धर्मोपदेशक) बना, जशी त्या ग्रंथाच्या शिकवणीची अपेक्षा आहे ज्याचे तुम्ही पठण करता व पाठ देता. तो तुम्हाला कदापि असे सांगणार नाही की अल्लाहच्या दूतांना अथवा प्रेषितांना आपला पालनकर्ता माना हे शक्य आहे का की एखाद्या प्रेषिताने तुम्हाला ईशद्रोहाची आज्ञा द्यावी जेव्हा तुम्ही आज्ञाधारी असाल. (७९-८०)

स्मरण करा, अल्लाहने प्रेषितांकडून वचन घेतले होते, की आज मी तुम्हाला ग्रंथ, विवेक व बुद्धीमत्तेने उपकृत केले आहे. उद्या जर एखादा दुसरा प्रेषित तुमच्याजवळ त्याच शिकवणीची ग्वाही देणारा आला जी शिकवण अगोदरपासूनच तुमच्याजवळ आहे तर

तुम्हाला त्याच्यावर श्रद्धा ठेवावी लागेल आणि त्याला सहकार्य द्यावे लागेल.[२१] असे फर्मावून अल्लाहने विचारले, ''काय तुम्ही हे मान्य करता आणि यावर माझ्यातर्फे कराराची मोठी जबाबदारी उचलता?'' त्यांनी सांगितले, ''होय, आम्ही मान्य करतो.'' अल्लाहने फर्माविले, ''मग साक्षी राहा आणि मी देखील तुमच्याबरोबर साक्षी आहे. यानंतर जो आपल्या करारापासून पराङमुख होईल तो अवज्ञाकारी आहे.'' (८१-८२)

आता का हे लोक अल्लाहच्या आज्ञापालनाची पद्धत (अल्लाहचा दीन) सोडून इतर एखादी पद्धत इच्छितात? वास्तविक पाहता आकाश व पृथ्वीमध्ये जे जे काही आहे ते आपणहून किंवा अपरिहार्यपणे अल्लाहला समर्पित झाले आहेत. आणि त्याच्याकडे सर्वांना रुजू व्हायचे आहे? हे पैगंबर (स.), सांगा की, ''आम्ही अल्लाहला मानतो, त्या शिकवणींना मानतो जी आम्हांवर उतरली आहे. त्या शिकवणीला देखील मान्य करतो ज्या इब्राहिम (अ.), इस्माईल (अ.), इसहाक (अ.), याकूब (अ.) आणि याकूब (अ.) च्या संततीवर उतरल्या होत्या आणि त्या आदेशांवर देखील श्रद्धा ठेवतो जे मूसा (अ.) व ईसा (अ.) आणि इतर प्रेषितांना त्यांच्या पालनकर्त्याकडून दिले गेले. आम्ही त्यांच्यापैकी एकाच्यामध्ये भेदभाव करीत नाही. आणि आम्ही अल्लाहच्या आदेशांच्या अधीन (मुस्लिम) आहोत.'' या आज्ञाधारकते (इस्लाम) शिवाय जो कोणी अन्य एखादी पद्धत अंगिकारत असेल, त्याची ती पद्धत कदापि स्वीकारली जाणार नाही व मरणोत्तर जीवनामध्ये तो अयशस्वी व विफल होईल. (८३-८५)

कसे शक्य आहे की, अल्लाह त्या लोकांना मार्गदर्शन प्रदान करील ज्यांनी श्रद्धेची देणगी मिळाल्यानंतर पुन्हा द्रोहाचा अंगिकार केला. वास्तविक पाहता त्यांनी स्वत: या गोष्टींची ग्वाही दिलेली आहे की हा पैगंबर सत्याधिष्ठित आहे. आणि त्या लोकांपर्यंत उज्ज्वल संकेतवचनेदेखील पोहचली आहेत. अल्लाह तर अत्याचाऱ्यांना मार्गदर्शन करीत नसतो. त्यांच्या अत्याचाराची योग्य शिक्षा तर हीच आहे की त्यांच्यावर अल्लाह आणि दूत व समस्त माणसांचा शाप आहे. अशाच स्थितीत ते सदैव राहतील, त्यांच्या शिक्षेत

**२१)** अर्थ असा की प्रत्येक प्रेषिताकडून याबाबतीत वचन घेतले जात राहिले आहे. याठिकाणी इतकी गोष्ट आणखी समजून घेतली पाहिजे की हजरत मुहम्मद (स.) यांच्यापूर्वी प्रत्येक प्रेषिताकडून हेच वचन घेतले जात राहिले आहे. तसेच याच कारणाने प्रत्येक प्रेषिताने आपल्या अनुयायांना नंतर येणाऱ्या प्रेषिताची बातमी दिली आहे व त्याला साथ देण्याचा त्यांना आदेश दिला आहे. परंतु ना कुरआनात, ना हदीसीत, कोठेच या गोष्टीचा मागमूसही सापडत नाही की प्रेषित हजरत मुहम्मद (स.) यांच्याकडून असे एखादे वचन घेतले गेले असावे किंवा त्यांनी आपल्या अनुयायांना एखाद्या नंतर येणाऱ्या प्रेषिताची खबर देऊन त्यावर ईमान आणण्याचा आदेश दिला असावा किंबहुना कुरआनात स्पष्टपणे पैगंबर मुहम्मद (स.) यांना 'खातिमून नबीय्यीन' प्रेषितांचा कळस म्हणून फर्माविले गेले आहे. तसेच बहुतेक हदीसीतसुद्धा पैगंबर (स.) यांनी फर्माविले आहे की त्यांच्यानंतर कोणताही प्रेषित येणार नाही.



सूटही मिळणार नाही किंवा त्यांना सवडदेखील दिली जाणार नाही. तथापि ते लोक वाचतील जे लोक यानंतर तौबा (पश्चात्ताप) करून आपल्या आचरणात सुधारणा करतील, अल्लाह क्षमा करणारा व कृपा करणारा आहे. परंतु ज्या लोकांनी श्रद्धा ठेवल्यानंतर अश्रद्धेचा अंगिकार केला आणि अश्रद्धेतच पुढे जात राहिले[२२] त्यांचा पश्चात्ताप कदापि स्वीकारला जाणार नाही, असले लोक तर पक्के मार्गभ्रष्ट आहेत. खात्री बाळगा, ज्या लोकांनी अश्रद्धेचा अंगिकार केला आणि अश्रद्धेच्या स्थितीतच प्राण सोडले, त्यांच्यापैकी एखाद्याने स्वत:ला शिक्षेपासून वाचविण्यासाठी पृथ्वी भरून जरी सोने मोबदल्यात दिले तरी ते स्वीकारले जाणार नाही. अशा लोकांसाठी दु:खदायक शिक्षा तयार आहे. आणि त्यांना आपला कोणीही सहायक आढळणार नाही. (८६-९१)

तुम्ही जोपर्यंत (अल्लाहच्या मार्गात) तुमच्या सर्वाधिक प्रिय वस्तू खर्च करत नाही; तोपर्यंत तुम्ही पुण्य प्राप्त करू शकत नाही. जे काही तुम्ही खर्च कराल त्याविषयी अल्लाह सर्वज्ञ आहे. (९२)

खाण्याच्या या सर्व वस्तू (ज्या इस्लामी धर्मकायद्यात वैध आहेत) बनीइस्राईल-करितादेखील वैध होत्या.[२३] तथापि काही वस्तू अशा होत्या ज्या तौरात उतरण्यापूर्वी इस्राईल (हजरत याकूब - अ.) ने स्वत: होऊन आपल्याकरिता निषिद्ध मानल्या होत्या. त्यांना सांगा, जर तुम्ही (आपल्या आक्षेपात) खरे असाल तर आणा तौरात आणि प्रस्तुत करा त्यातील एखादे उदाहरण यानंतरदेखील जे लोक स्वरचित खोट्या गोष्टींचा संबंध अल्लाहशी जोडत राहतील तेच वास्तविकपणे अत्याचारी आहेत. सांगा, अल्लाहने जे काही फर्माविले आहे ते सत्य फर्माविले आहे. तुम्ही एकचित्त होऊन इब्राहीम (अ.) च्या पद्धतीचे अनुकरण करावयास हवे आणि इब्राहीम (अ.) मुश्‌रिकां-(अनेकेश्वरवादी) पैकी

**२२)** म्हणजे केवळ इन्कार करण्यालाच पुरेसे मानले असे नाही तर प्रत्यक्षपणे विरोध आणि प्रतिकारही केला. लोकांना ईश्वराच्या मार्गापासून रोखण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्टा केली. शंका निर्माण केल्या, अपसमज पसरविला, मनांत भीती घातली, भयंकर कट कारस्थाने आणि खोडसाळपणा केला जेणेकरून पैगंबर (स.) यांचे ध्येयधोरण कसेही करून यशस्वी होऊ नये.

**२३)** कुरआन आणि हजरत मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीवर यहूदी धर्मपंडित जेव्हा कोणताही तात्त्विक आक्षेप घेऊ शकले नाही (कारण धर्माचा पाया ज्या गोष्टींवर आहे त्यात पूर्वीच्या प्रेषितांच्या शिकवणीत आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीत किंचित सुद्धा फरक नव्हता) तेव्हा त्यांनी कर्मकांडस्वरूपी आक्षेप सुरू केले. यासंबंधाने त्यांचा पहिला आक्षेप असा होता की आपण खाण्यपिण्याच्या काही अशा वस्तू वैध ठरविल्या आहेत ज्या पूर्वीच्या प्रेषितांच्या काळापासून निषिद्ध राहिल्या आहेत. याच आक्षेपाचे याठिकाणी उत्तर दिले जात आहे. त्याचप्रमाणे त्यांचा एक आक्षेप असाही होता की बैतुलमकदिस- यरोशलेमला सोडून काबागृहाला किबला (उपासना दिशा) का बनविले गेले. नंतरच्या आयती याच आक्षेपाच्या उत्तरादाखल आहेत.

नव्हता. (९३-९५)

नि:संशय सर्वप्रथम उपासनास्थळ जे मानवाकरिता बांधण्यात आले ते तेच आहे जे मक्का शहरी विद्यमान आहे. त्याला मांगल्य व समृद्धी दिली गेली होती आणि सर्व जगवासियांकरिता मार्गदर्शनाचे केंद्र बनविले गेले होते. त्यात स्पष्ट संकेतचिन्हे आहेत.[२४] इब्राहीम (अ.) चे प्रार्थनास्थान आहे, आणि त्याची अवस्था अशी आहे की जो त्यात दाखल होईल सुरक्षित झाला. लोकांवर अल्लाहचा हा हक्क आहे की या गृहापर्यंत पोहोचण्याची ऐपत आहे त्याने त्याची हजयात्रा करावी आणि जो कोणी या आदेशाचे पालन करण्यास नकार देईल त्याने समजून असावे की अल्लाह सकल जगवासियांपासून निरपेक्ष आहे. (९६-९७)

सांगा, हे ग्रंथधारकांनो! तुम्ही अल्लाहच्या गोष्टी मान्य करण्यास का नकार देता? ज्या कारवाया तुम्ही करीत आहात अल्लाह सर्वकाही पाहत आहे. सांगा, हे ग्रंथधारकांनो! हे काय तुमचे वर्तन आहे की जो अल्लाहच्या गोष्टी मान्य करतो त्यालादेखील तुम्ही अल्लाहच्या मार्गापासून रोखता आणि इच्छिता की त्याने वाकड्या मार्गाचे अनुसरण करावे, वस्तुत: तुम्ही स्वत: (तो सरळमार्गी असण्याबद्दल) साक्षी आहात. तुमच्या कारवायांपासून अल्लाह अनभिज्ञ नाही. (९८-९९)

हे श्रद्धावानांनो, जर तुम्ही या ग्रंथधारकांपैकी एका गटाची गोष्ट मान्य केलीत तर हे तुम्हाला श्रद्धेकडून पुन्हा अश्रद्धेकडे परत नेतील. तुमच्यासाठी अश्रद्धेकडे परतण्याला आता कुठे वाव उरला आहे जेव्हा तुम्हाला अल्लाहची वचने ऐकविली जात आहेत आणि तुमच्या दरम्यान त्याचा पैगंबर उपस्थित आहे? ज्याची बांधिलकी अल्लाहशी भक्कम असेल त्याला निश्चितच सरळ मार्ग मिळेल. (१००-१०१)

हे श्रद्धावानांनो! अल्लाहचे भय बाळगा जसे भय बाळगले पाहिजे आणि तुम्हाला अशा अवस्थेत मरण यावे की तुम्ही अल्लाहचे आज्ञाधारक आहात. सर्वजण मिळून

**२४)** म्हणजे या गृहात अशी स्पष्ट चिन्हे आढळतात जेणेकरून ते अल्लाहचे ठायी स्वीकृत झाले आहे व त्याला अल्लाहने आपले घर म्हणून पसंत केले असल्याचे सिद्ध होते. निर्जन व ओसाड प्रदेशात बनविले गेले आणि मग अल्लाहने त्याच्या सभोवताली राहणाऱ्यांच्या उदरनिर्वाहाची उत्तमात उत्तम व्यवस्था केली. अडीच हजार वर्षे अज्ञानापोटी संपूर्ण अरब देश अत्यंत अराजकतेच्या स्थितीत राहिला परंतु त्या उपद्रव माजलेल्या भूमीवर काबागृह व त्याच्या परिसराचाच एकमेव प्रदेश असा होता ज्यात शांतता प्रस्थापित राहिली. किंबहुना याच काबागृहाची बरकत होती की वर्षभरातील चार महिन्यांसाठी संपूर्ण देशाला त्यामुळे शांतता लाभत असे. मग आधीच अर्धशतकापूर्वी सर्वांनी पाहिले होते की 'अब्रहा'ने जेव्हा 'काबा'चा विध्वंस करण्यासाठी मक्केवर हल्ला केला तेव्हा त्याचे सैन्य कशाप्रकारे ईश्वरी प्रकोपाचे बळी ठरले. ही घटना त्यावेळी अरबस्थानाच्या लहान थोर सर्वांच्याच परिचयाची होती व ही घटना प्रत्यक्षपणे पाहणारे लोक या आयती उतरत होत्या त्यावेळीही मौजूद होते.



अल्लाहच्या दोरीस घट्ट[२५] धरून असा आणि आपसांत फाटाफूट होऊ देऊ नका. अलाहच्या त्या उपकाराची आठवण ठेवा, जो त्याने तुम्हावर केला आहे. तुम्ही एक दुसऱ्याचे शत्रू होता, त्याने तुमची मने जोडली आणि त्याच्या मेहेरबानी व कृपेने तुम्ही बंधू-जन झालात. तुम्ही अग्नीने भरलेल्या एका खड्ड्याच्या तोंडावर उभे होता, अल्लाहने तुम्हाला त्यापासून वाचविले. अशा प्रकारे अल्लाह आपली संकेतचिन्हे तुमच्यासमोर प्रकाशित करतो. कदाचित यामुळे तुम्हाला आपल्या कल्याणाचा सरळ मार्ग दिसावा.

(१०२-१०३)

सद्वर्तनाचे आवाहन करणारा व चांगुलपणाचा आदेश देणारा, तसेच दुराचाराचा प्रतिबंध करणारा एक गट तुमच्यात अवश्य असला पाहिजे, अशा लोकांना साफल्य लाभेल. एखाद्या वेळी तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नये जे गटागटात विभागले गेले आणि उघड उघड स्पष्ट सूचना मिळाल्यानंतर पुन्हा मतभेदांत गुरफटले. ज्यांनी हे वर्तन अवलंबिले ते त्या दिवशी कठोर शिक्षा भोगतील जेव्हा काहींचे चेहरे तेज:पुंज असतील तर काहींचे चेहरे काळवंडलेले असतील. ज्यांचे चेहरे काळवंडतील (त्यांना सांगण्यात येईल की) श्रद्धेची देणगी मिळाल्यानंतर अश्रद्धावंतांप्रमाणे वर्तन करता? बरे तर आता या कृतघ्नतेच्या मोबदल्यात प्रकोपाचा आस्वाद घ्या. उरले ते लोक ज्यांचे चेहरे तेज:पुंज असतील तर त्यांना अल्लाहच्या कृपाछत्राखाली जागा मिळेल आणि ते सदैव त्याच अवस्थेत राहतील. हे अल्लाहचे आदेश आहेत जे आम्ही तुम्हाला ठीकठीक ऐकवीत आहोत कारण अल्लाह जगवासियांवर अत्याचार करण्याचा कोणताही हेतू बाळगत नाही पृथ्वी आणि आकाशातील साऱ्या वस्तूंचा मालक अल्लाह आहे आणि सर्व व्यवहार अल्लाहच्याचपुढे सादर होतात. (१०४-१०९)

आता जगात तो सर्वोत्तम जनसमुदाय तुम्ही आहात ज्याला मानवांच्या मार्गदर्शन व सुधारणेकरिता मैदानात आणले गेले आहे. तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारा-पासून प्रतिबंध करता आणि अल्लाहवर श्रद्धा बाळगता. या ग्रंथधारकांनी[२६] श्रद्धा ठेवली असती तर ते त्यांच्याकरिता उत्तम होते. यांच्यात जरी काही लोक श्रद्धावंत देखील आढळतात तरी यांचे बहुतेक लोक अवज्ञा करणारे आहेत. हे तुमचे काही वाईट करू शकत नाहीत. जास्तीत जास्त फक्त थोडा त्रास देऊ शकतात. जर तुमच्याशी हे लढले तर लढाईत पाठ दाखवतील. मग असे लाचार होतील की यांना कोठूनही सहाय्य मिळणार नाही. यांच्या वाट्यास चहूकडे अपमान व तिरस्कारच आला. कोठे अल्लाहच्या हमीने

**२५)** अल्लाहच्या दोरीने अभिप्रेत त्याचा धर्म आहे. याला दोरी म्हणून अशासाठी संबोधित केलेले आहे की हेच ते नाते आहे जेणेकरून एकीकडे ईमानधारकांचे अल्लाहशी संबंध प्रस्थापित होते तर दुसरीकडे सर्व ईमानधारक एकमेकाला मिळून एक जमात बनतात.

**२६)** या ठिकाणी ग्रंथधारकाने अभिप्रेत यहूदी लोक आहेत.

अथवा मानवांच्या हमीने आश्रय मिळाला तर ही गोष्ट वेगळी आहे.[२७] हे अल्लाहच्या प्रकोपात वेढले गेले आहेत, यांच्यावर लाचारी व पराधीनता लादली गेली आहे. हे सर्व काही केवळ या कारणास्तव घडले आहे की हे अल्लाहच्या संकेत वचनांना नाकारीत राहिले आणि यांनी प्रेषितांची नाहक हत्या केली. हा त्यांच्या अवज्ञा व मर्यादाभंगाचा परिणाम आहे. (११०-११२)

परंतु सर्वच ग्रंथधारक सारखे नाहीत. यांच्यामध्ये काही लोक असे देखील आहेत जे सरळ मार्गावर कायम आहेत, रात्री अल्लाहच्या वचनांचे पठण करतात व त्याच्यापुढे नतमस्तक होत असतात. अल्लाह आणि मरणोत्तर दिनावर श्रद्धा बाळगतात, सदाचाराचा आदेश देतात व दुराचारापासून प्रतिबंध करतात आणि पुण्य कार्यात क्रियाशील असतात हे सदाचारी लोक आहेत. आणि जे पुण्य कार्य हे करतील त्याची अवहेलना केली जाणार नाही अल्लाह प्रकोपाला भिऊन वागणाऱ्या लोकांना चांगलेच ओळखतो. उरले ते लोक ज्यांनी अश्रद्धेचे वर्तन अंगिकारले तर अल्लाहच्या विरोधात त्यांना त्यांची संपत्तीही काहीच उपयोगी पडणार नाही की त्यांची संतती, ते तर नरकात जाणारे लोक आहेत व नरकातच सदैव राहतील. जे काही ते आपल्या या ऐहिक जीवनात खर्च करीत आहेत त्याचे उदाहरण त्या वाऱ्यासारखे आहे ज्याच्यात गारठा असावा आणि तो त्या लोकांच्या शेतीवरून वहावा ज्यांनी स्वत:वर जुलूम केला आहे, आणि तिचा नाश करून टाकावा. अल्लाहने यांच्यावर अत्याचार केला नाही, खरे म्हणजे हे स्वत:च आपल्यावर अत्याचार करीत आहेत. (११३-११७)

हे श्रद्धावंतांनो, आपल्या समाजाच्या लोकांशिवाय इतरांना आपले मर्मज्ञ बनवू नका, ते तुमच्या वाईटाच्या कोणत्याही संधीचा फायदा घेण्यात कसूर करीत नाहीत. तुम्हाला ज्या गोष्टीपासून हानी पोहचेल तीच गोष्ट त्यांना प्रिय आहे, त्यांच्या मनातील द्वेष त्यांच्या तोंडातून बाहेर पडतो आणि जे काही त्यांच्या अंत:करणात दडलेले आहे ते याहूनही भयंकर आहे. आम्ही तुम्हाला अगदी स्पष्ट सूचना देऊन टाकल्या आहेत, जर तुम्ही बुद्धीमंत असाल (तर यांच्याशी संबंध ठेवण्यात सावधगिरी बाळगा) तुम्ही त्यांच्याशी प्रेम करता परंतु ते तुमच्याशी प्रेम करीत नाहीत, खरे पाहता तुम्ही सर्व दिव्य ग्रंथांना मानता. जेव्हा ते तुम्हाला भेटतात तेव्हा ते म्हणतात की आम्हीदेखील (तुमच्या

**२७)** म्हणजे जगात यांना एखाद्या ठिकाणी थोडे फार सुख समाधान व शांती लाभली असली तरी ती त्यांच्या स्वबळाने प्रस्थापित झालेली शांती नव्हे तर इतरांच्या सहाय्याचा व मेहरबानीचा परिणाम होय. एखाद्या वेळी कोठे याना एखाद्या मुस्लिम राज्याने ईश्वराच्या नावावर अभयदान दिले तर कोठे एखाद्या ठिकाणी बलशाली होण्याची संधीही मिळाली आहे. परंतु तीसुद्धा आपल्या बहुबलाने नव्हे तर केवळ एखाद्या शेजाऱ्याच्या धैर्याने, हीच स्थिती त्या यहूदी राज्याची आहे जे इस्राईलच्या नावाने केवळ अमेरिका, ब्रिटन आणि रशियाच्या सहाय्याने प्रस्थापित झाले आहे.



पैगंबराला व तुमच्या ग्रंथाला) मानले आहे, पण जेव्हा ते वेगळे होतात तेव्हा तुमच्याविरूद्ध त्यांच्या क्रोधाची अशी स्थिती असते की ते आपली बोटे चावू लागतात, त्यांना सांगा की आपल्या क्रोधाग्नीत स्वत: जळून मरा, अल्लाह मनात लपलेली रहस्ये देखील जाणतो. तुमचे भले होते तेव्हा यांना वाईट वाटते आणि तुमच्यावर एखादे संकट येते तर हे आनंदित होतात. परंतु यांची कोणतीही क्लृप्ती तुमच्याविरूद्ध परिणामकारक ठरू शकत नाही परंतु अट अशी की तुम्ही संयम दाखवावा आणि अल्लाहचे भय बाळगून कार्य करीत रहावे. जे काही हे करीत आहेत त्यावर अल्लाह प्रभावी आहे. (११८-१२०)

(हे पैगंबर-स. मुसलमानांच्या समोर त्या प्रसंगाचा उलेख करा) जेव्हा तुम्ही प्रात:काळी आपल्या घरातून निघाला होता आणि (उहदच्या मैदानात) मुसलमानांना युद्धासाठी ठिकठिकाणी नेमत होता. अल्लाह सर्व गोष्टी ऐकतो व तो अत्याधिक माहिती राखणारा आहे. (१२१)

स्मरण करा जेव्हा तुमच्यापैकी दोन गट दुबळेपणा दाखवित होते, वास्तविक पाहता अल्लाह त्यांच्या मदतीसाठी उपस्थित होता आणि ईमानधारकांनी अल्लाहवर भिस्त ठेवली पाहिजे. बरे यापूर्वी बदरच्या युद्धात अल्लाहने तुम्हाला मदत केली होती. खरे पाहता त्यावेळी तुम्ही फार दुर्बल होता. म्हणून तुम्ही अल्लाहच्या कृतघ्नतेपासून दूर राहा. आशा आहे की तुम्ही आता कृतज्ञ बनाल. (१२२-१२३)

हे पैगंबर (स.), स्मरण करा जेव्हा तुम्ही श्रद्धावंतांना सांगत होता, ''काय तुमच्यासाठी ही गोष्ट पुरेशी नाही की अल्लाहने तीन हजार फरिश्ते उतरवून तुमची मदत करावी?'' नि:संशय जर तुम्ही संयम दाखविला आणि अल्लाहचे भय बाळगून काम केले तर ज्या क्षणी शत्रू तुमच्यावर चाल करून येईल त्याचक्षणी तुमचा पालनकर्ता (तीन हजारच नव्हे) पाच हजार सुसज्ज ईशदूतांद्वारे मदत करील. ही गोष्ट अल्लाहने तुम्हाला या कारणास्तव सांगितली आहे की तुम्ही खुश व्हावे आणि तुमची हृदये संतुष्ट व्हावीत, विजय व सहाय्य जे काही आहे ते अल्लाहकडूनच आहे जो अत्यंत शक्तिमान, बुद्धिमान व द्रष्टा आहे. (आणि ही मदत तुम्हाला तो यासाठी देईल) जेणेकरून अश्रद्धेच्या मार्गावर चालणाऱ्यांची एक बाजू तोडून टाकील अथवा त्यांचा असा अपमानजनक पराभव करील की त्यांनी विफलतेने परास्त व्हावे. (१२४-१२७)

(हे पैगंबर-स.) निर्णयाच्या अधिकारात तुमचा कोणताही वाटा नाही. अल्लाहला अधिकार आहे हवे तर त्यांना माफ करावे, हवे तर त्यांना शिक्षा करावी कारण ते अत्याचारी आहेत. पृथ्वी व आकाशात जे काही आहे त्याचा मालक अल्लाह आहे, हवे त्याला त्याने क्षमा करावे व हवे त्याला यातना देईल. तो माफ करणारा व परम दयाळू

आहे.[२८] (१२८-१२९)

हे श्रद्धावंतांनो! हे दाम दुप्पट व्याज खाण्याचे सोडून द्या आणि अल्लाहचे भय बाळगा, आशा आहे की सफल व्हाल. त्या आगीपासून स्वत:चा बचाव करा जी अश्रद्धावंतांकरिता तयार केली गेली आहे. अल्लाह आणि पैगंबरांचे आज्ञा पालन करा, अपेक्षा आहे की तुम्हावर दया केली जाईल. त्या मार्गावर धावत चला जो तुमच्या पालनकर्त्याची क्षमा व त्याच्या स्वर्गाकडे जातो ज्याचा विस्तार पृथ्वी व आकाशासमान आहे, आणि तो त्या ईशपरायण लोकांसाठी तयार केला गेला आहे. जे कोणत्याही स्थितीत आपली संपत्ती खर्च करतात, मग ते बिकट स्थितीत असोत अथवा चांगल्या स्थितीत, जे राग गिळून टाकतात व दुसऱ्याचे अपराध माफ करतात – असे सदाचारी लोक अल्लाहला अतिशय प्रिय आहेत– आणि ज्यांची स्थिती अशी आहे की जर त्यांच्याकडून एखादे अश्लील कृत्य घडल्यास किंवा एखादा गुन्हा करून त्यांनी स्वत:वर अत्याचार केल्यास त्यांना लगेच अल्लाहचे स्मरण होते आणि ते त्याच्याकडे आपल्या अपराधांची क्षमा-याचना करतात – कारण अल्लाहशिवाय इतर कोण आहे जो अपराध माफ करू शकतो– आणि ते समजूनउमजून आपल्या कर्मावर अडून बसत नाहीत. अशा लोकांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ असा आहे की तो त्यांना माफ करील व अशा नंदनवनात त्यांना दाखल करील ज्यांच्याखाली कालवे वहात असतील आणि तेथे ते सदैव राहतील. किती छान मोबदला आहे सत्कृत्य करणाऱ्यासाठी! तुमच्यापूर्वी अनेक कालखंड होऊन गेली आहेत. पृथ्वीवर फेरफटका मारून पहा त्या लोकांचा शेवट कसा झाला ज्यांनी (अल्लाहच्या आज्ञा व आदेशांना) खोटे लेखले. ही लोकांसाठी एक स्पष्ट व उघड विवेचन आहे आणि जे अल्लाहचे भय बाळगतात त्यांच्याकरिता मार्गदर्शन व उपदेश. (१३०-१३८)

वैफल्यग्रस्त होऊ नका, दु:खी होऊ नका, तुम्हीच प्रभावी ठराल जर तुम्ही श्रद्धावंत असाल. यावेळी जरी तुम्हाला आघात पोहचला आहे तरी यापूर्वी असाच आघात तुमच्या विरोधकांना देखील पोहचला आहे.[२९] हे तर कालचक्र आहे ज्याला आम्ही लोकांदरम्यान भ्रमण करवीत असतो, तुमच्यावर ही वेळ अशासाठी आणली गेली की अल्लाह हे पाहू इच्छित होता की तुमच्यात खरे श्रद्धावंत कोण आहेत, आणि त्या लोकांना वेगळे करू

**२८)** उहुदच्या युद्धात जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) जखमी झाले तेव्हा त्यांच्या तोंडातून काफिरांसाठी शाप निघाला. त्यांनी फर्माविले, "ते राष्ट्र कसे सफल होऊ शकते जे आपल्या प्रेषिताला जखमी करीत असावे." ही आयत त्याच संबंधाने उतरली आहे.

**२९)** बदरच्या युद्धाकडे संकेत आहे. सांगण्याचा आशय असा की जेव्हा तो आघात सहन करून काफीर लोकांचे धैर्य खचले नाही तेव्हा उहुदच्या युद्धातील या आघातामुळे तुम्ही का विषण्ण होत आहात.



इच्छित होता जे खरोखर (रास्त मार्गाचे) साक्षीदार आहेत.[३०] कारण अत्याचारी लोक अल्लाहला अप्रिय आहेत – आणि तो या परीक्षेद्वारे श्रद्धावानांना वेगळे करून अश्रद्धावंतांना वठणीवर आणू इच्छित होता. तुम्ही अशी समजूत करून घेतली आहे काय की सहजपणे स्वर्गामध्ये दाखल व्हाल. वास्तविक पाहता अल्लाहने अद्याप हे पाहिलेलेच नाही की तुम्हापैकी ते कोण लोक आहेत जे त्याच्या मार्गात प्राण पणाला लावणारे आणि त्याच्यासाठी संयम बाळगणारे आहेत. तुम्ही तर मृत्यूची इच्छा करीत होता! पण ही त्यावेळेची गोष्ट होती जेव्हा मृत्यू समोर आलेला नव्हता, तर घ्या, तो तुमच्यासमोर आलेला आहे आणि तुम्ही त्याला डोळ्याने पाहिले. (१३९-१४३)

मुहम्मद (स.) याशिवाय काही नाहीत की ते केवळ एक प्रेषित आहेत, त्यांच्यापूर्वी इतर प्रेषित देखील होऊन गेले आहेत, मग काय जर ते मरण पावले अथवा त्याना ठार केले गेले तर तुम्ही लोक मागच्या पावली परताल? लक्षात ठेवा! जे परत फिरले ते अल्लाहचे काहीही नुकसान करणार नाही, परंतु जे अल्लाहचे कृतज्ञ दास बनून राहतील तो त्यांना त्याचा मोबदला देईल. (१४४)

कोणीही सजीव अल्लाहच्या आज्ञेशिवाय मरू शकत नाही. मृत्यूची घटका तर लिहिली गेली आहे. जो कोणी ऐहिक लाभाच्या इराद्याने कार्य करील त्याला आम्ही इहलोकातच देऊ व जो कोणी परलोकातील लाभाच्या इराद्याने कार्य करील त्याला परलोकात लाभ मिळेल. आणि कृतज्ञता दाखविणाऱ्यांना आम्ही त्याचा मोबदला अवश्य देऊ. यापूर्वी कित्येक प्रेषित असे होऊन गेले आहेत ज्यांच्यासह मिळून असंख्य ईशभक्तांनी युद्ध केले. अल्लाहच्या मार्गात जी संकटे त्यांच्यावर कोसळली त्यामुळे ते हताश झाले नाहीत, त्यांनी दुबळेपणा दाखविला नाही. ते (असत्यापुढे) नतमस्तक झाले नाहीत अशाच संयमी लोकांना अल्लाह पसंत करतो. त्यांची प्रार्थना केवळ हीच होती की, "हे आमच्या पालनकर्त्या, आमच्या चुका आणि उणीवांबद्दल क्षमा कर, आमच्या कार्यात तुझ्या मर्यादांचे जे काही उल्लंघन झाले असेल ते माफ कर, आमचे पाय स्थिर कर आणि अश्रद्धावंतांविरूद्ध आम्हाला मदत कर." सरतेशेवटी अल्लाहने त्यांना जगातील लाभदेखील दिले व त्याहून श्रेष्ठतर, परलोकांतील लाभ देखील प्रदान केले. अल्लाहला असेच सत्कर्मी लोक पसंत आहेत. (१४५-१४८)

**३०)** मूळ अरबी शब्द 'व यत खिज मिन्कुम शुहदाअ' असे आहेत. याचा एक अर्थ तर असा की तुमच्यापैकी काही शहीद होऊ इच्छित होते म्हणजे काही लोकांना हुतात्मे होण्याचा बहुमान प्रदान करू इच्छित होता. दुसरा अर्थ असा की हल्ली ईमानधारकांबरोबरच दांभिकांचा समावेश असलेला तुमचा जो मिश्रित समूह आहे त्यातून जे खरेखुरे शूहदाअ अलन्नास आहेत म्हणजे आम्ही मुस्लिम लोकसमूहाला ज्या तेजस्वी पदाने भूषविले आहे त्या पदास पात्र आहेत, अशा लोकांना वेगळे करू इच्छित होता.

हे श्रद्धावानांनो, जर तुम्ही त्या लोकांच्या इशाऱ्यावर चालू लागला ज्यांनी अश्रद्धेच्या मार्गाचा अवलंब केला आहे तर ते तुम्हाला परत मागे नेतील आणि तुम्ही निराश व्हाल. (त्यांच्या गोष्टी चूक आहेत) सत्य असे आहे की अल्लाह तुमचा पाठीराखा व सहायक आहे आणि तो सर्वोत्तम सहाय्य करणारा आहे. लवकरच ती वेळ येणार आहे जेव्हा आम्ही सत्याचा इन्कार करणाऱ्यांच्या मनावर दरारा बसवू यासाठी की त्यांनी अल्लाहबरोबर अशांना भागीदार ठरविले आहे ज्यांच्या भागीदार असण्यासंबंधी अल्लाहने कोणतीही सनद उतरविली नाही. त्यांचे शेवटचे ठिकाण नरक आहे आणि फारच वाईट आहे ते ठिकाण जे त्या अत्याचाऱ्यांच्या नशिबी येणार आहे. (१४९-१५१)

अल्लाहने (समर्थन व सहाय्याचे) जे वचन तुम्हाला दिले होते ते तर त्याने पूर्ण केले. सुरवातीला त्याच्या हुकुमाने तुम्हीच त्यांना ठार करीत होता. पण जेव्हा तुम्ही दुबळेपणा दाखविला व आपल्या कार्यात आपापसांत मतभेद दाखविले, आणि ज्या क्षणी ती वस्तू अल्लाहने तुम्हाला दाखविली जिच्या प्रेमात तुम्ही गुरफटला होता (म्हणजे युद्धातील लुटीचा माल) तेव्हा तुम्ही आपल्या सरदाराच्या आज्ञेविरूद्ध गेला. - कारण की तुम्हापैकी काहीजण इहलोकाचे इच्छुक होते आणि काहीजण मरणोत्तर जीवनाची इच्छा बाळगून होते. - तेव्हा अल्लाहने तुम्हाला अश्रद्धावंतांच्या विरोधांत पराभूत केले की ज्यायोगे तुमची परीक्षा घ्यावी आणि सत्य असे आहे की असे असूनसुद्धा अल्लाहने तुम्हाला माफच केले कारण श्रद्धावंतांवर अल्लाह फार कृपादृष्टि ठेवतो. (१५२)

आठवा तो प्रसंग जेव्हा तुम्ही पळ काढीत होता, कोणाकडे वळून पाहण्याचे भान देखील तुम्हाला राहिले नव्हते, आणि पैगंबर तुमच्या पाठीमागून तुम्हाला हाक मारीत होता.[३१] तेव्हा तुमच्या त्या वागणुकीचा बदला अल्लाहने असा दिला की तुम्हाला दु:खापाठोपाठ दु:ख दिले म्हणजे भविष्यकाळांत तुम्हाला हा धडा मिळावा की जे काही तुमच्या हातातून निघून जाईल अथवा जे संकट तुमच्यावर कोसळेल त्याच्यामुळे निराश होऊ नये, अल्लाह तुमच्या सर्व कृत्यांची खबर राखणारा आहे. (१५३)

त्या दु:खानंतर मग अल्लाहने तुम्हांपैकी काही लोकांवर अशी समाधानाची स्थिती

**३१)** उहुदच्या युद्धात जेव्हा मुसलमानांवर आकस्मिकपणे दुतर्फी हल्ला झाला, मुसलमानांच्या रांगा पार विस्कटल्या तेव्हा काही लोक मदीनेकडे पळून गेले व काही उहुद पर्वतावर चढले. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आपल्या जागेवरून इंचभरसुद्धा हटले नाहीत. शत्रूंनी चोहोबाजूंनी एकच गर्दी केली होती. दहा, बारा माणसांची मूठभर जमात जवळ उरली होती परंतु अल्लाहचा प्रेषित अशा नाजूक प्रसंगीसुद्धा आपल्या जागी पर्वतासमान दृढ होता व पळ काढणाऱ्यांना पुकारीत होता, ''इलैय्य इबादल्लाह, इलैय्य इबादल्लाह,'' ''अल्लाहच्या दासांनो माझ्याकडे या, अल्लाहच्या दासांनो माझ्याकडे या.''



पसरविली की ते पेंगू लागले.[३२] पण एक दुसरा गट ज्याच्यापाशी सर्व महत्व केवळ आपल्या स्वत:चेच होते, अल्लाहच्या बाबतीत तऱ्हेतऱ्हेचे अज्ञानपूर्ण ग्रह करू लागला जे संपूर्णपणे सत्याविरूद्ध होते. हे लोक आता म्हणतात, ''या कार्यवाहीत आमचादेखील काही वाटा आहे?'' यांना सांगा, ''(कोणाचाही कसलाही वाटा नाही) या कामाचे सर्व अधिकार अल्लाहच्या हातात आहेत'' वास्तविक पाहता या लोकांनी आपल्या मनात जी गोष्ट लपवून ठेवली आहे ती तुमच्यासमोर प्रकट करत नाहीत. त्यांचा खरा उद्देश हा आहे की, ''जर (नेतृत्वाचे) अधिकारांत आमचा काही वाटा असता तर तेथे आम्ही मारले गेलो नसतो.'' यांना सांगा, ''जर तुम्ही आपल्या घरात देखील असता तर ज्या लोकांचा मृत्यू लिहिलेला होता ते स्वत: होऊन आपल्या वध-स्थानाकडे निघून आले असते.'' आणि हा प्रसंग ओढवला तो अशासाठी होता की जे काही तुमच्या मनांत लपलेले आहे, अल्लाहने त्याची परीक्षा घ्यावी आणि जे काही तुमच्या हृदयात आहे ते साफ करून टाकावे. अल्लाह मनांची स्थिती चांगलीच जाणतो. (१५४)

तुमच्यापैकी जे लोक सामन्याच्या दिवशी पाठ दाखवून गेले होते त्यांच्या या डळमळण्याचे कारण असे होते की, त्यांच्या काही उणीवांमुळे शैतानने त्यांचे पाय डळमळीत केले होते. अल्लाहने त्यांना माफ केले, अल्लाह फार क्षमाशील व सहनशील आहे. (१५५)

हे श्रद्धावंतांनो, अश्रद्धावंतांप्रमाणे गोष्टी करू नका ज्यांचे आप्तेष्ट व नातेवाईक एखादे वेळी जर प्रवासाला जातात अथवा युद्धात सामील होतात (आणि तेथे एखाद्या अपघाताला बळी पडतात) तर ते म्हणतात की जर ते आमच्याजवळ असते तर मारले गेले नसते अथवा त्यांची हत्या झाली नसती. अल्लाह अशा तऱ्हेच्या गोष्टींना त्यांच्या मनांतील शल्य व दु:खाचे कारण बनवून टाकतो. एरवी खरे पाहता मारणारा व जीवन देणारा तर अल्लाहच आहे आणि तुमच्या सर्व कृतीचा तोच निरीक्षक आहे. जर तुम्ही अल्लाहच्या मार्गात मारले गेला अथवा मेला तर अल्लाहची जी कृपा व क्षमा तुमच्या वाट्यास येईल ती त्या सर्व वस्तूपेक्षा जास्त उत्तम आहे, ज्या हे लोक जमा करतात. आणि मग तुम्ही मरा अथवा मारले जा कोणत्याही परिस्थितीत तुम्हा सर्वांना एकवटून अल्लाहकडेच रुजू व्हावयाचे आहे. (१५६-१५८)

हे पैगंबर (स.), ही अल्लाहची मोठी कृपा आहे की तुम्ही या लोकांसाठी फार कोमल स्वभावी ठरला आहात. एरवी जर तुम्ही एखादे वेळी शीघ्रकोपी स्वभावी व निष्ठूर

**३२)** इस्लामी लष्करातील काही लोकांच्या अनुभूतीत येणारा हा एक अजब अनुभव होता. त्या युद्धात सामिल असलेले हजरत अबू तल्हा (रजि.) खुद्द वर्णन करतात की त्या स्थितीत आम्हाला झोपेच्या गुंगीचा काही असा प्रभाव होत होता की तलवारी आमच्या हातातून सुटल्या जात होत्या.

असता तर हे सर्वजण तुमच्यापासून विभक्त झाले असते. यांचे अपराध माफ करा, यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना करा, आणि धर्म-कार्यात यांनासुद्धा सल्लामसलतीत सहभागी ठेवा, मग जेव्हा एखाद्या मतावर तुमचा निश्चय दृढ होईल तेव्हा अल्लाहवर भरोसा करा, अल्लाहला ते लोक प्रिय आहेत जे त्याच्या भरवशावर काम करतात. अल्लाह तुमच्या मदतीवर असेल तर कोणतीही शक्ती तुम्हावर वर्चस्व प्राप्त करणार नाही, आणि जर त्याने तुम्हाला सोडून दिले, तर त्यानंतर असा कोण आहे जो तुम्हाला मदत करू शकेल? तर मग जे खरे श्रद्धावंत आहेत त्यांनी अल्लाहवरच विश्वास ठेवला पाहिजे. (१५९-१६०)

कोणत्याही नबीचे हे काम असू शकत नाही की त्याने अपहार करावा - आणि जो कोणी अपहार करील तो आपल्या अपहारासहित पुनरुत्थानाच्या दिवशी हजर होईल, - मग प्रत्येक जीवाला त्याच्या कमाईचा पुरेपूर मोबदला मिळेल आणि कोणावर काहीही जुलूम होणार नाही. बरे हे कसे शक्य आहे की जो मनुष्य नेहमी अल्लाहच्या मर्जीप्रमाणे वागणारा आहे तो त्या माणसाप्रमाणे कृत्ये करील जो अल्लाहच्या कोपाने वेढला गेला आहे, आणि ज्याचे अंतिम ठिकाण नरक आहे, जे अत्यंत वाईट स्थान आहे. अल्लाहपाशी दोन्ही प्रकारच्या माणसात कित्येक पटीचा फरक आहे आणि अल्लाह सर्वांच्या कृत्यांवर नजर ठेवतो. खरे म्हणजे श्रद्धावंतांवर अल्लाहने तर हे फार मोठे उपकार केले आहे की त्यांच्या दरम्यान खुद्द त्यांच्याचपैकी एक अशा पैगंबराला उभे केले जो त्याची संकेतवचने त्यांना ऐकवितो, त्यांच्या जीवनाला सावरतो आणि त्यांना ग्रंथ व विद्वत्तेची शिकवण देतो वास्तविक पाहता हेच लोक या पूर्वी उघडपणे मार्गभ्रष्ट झाले होते. (१६१-१६४)

आणि ही तुमची काय स्थिती आहे की जेव्हा तुमच्यावर संकट कोसळले तेव्हा तुम्ही म्हणू लागला की हे कोठून आले? वस्तुतः (बदरच्या युद्धात) याच्यापेक्षा दुप्पट संकट तुमच्याकरवी (विरूद्ध पक्षावर) कोसळलेले आहे. हे पैगंबर (स.), यांना सांगा, हे संकट तुम्ही स्वतःच ओढून घेतले आहे, अल्लाह प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. जी हानी युद्धाच्या दिवशी तुम्हाला पोहोचली ती अल्लाहच्या आज्ञेने होती आणि ती यासाठी होती की अल्लाहने पाहावे की तुमच्यापैकी कोण श्रद्धावंत आहे आणि दांभिक कोण, ते दांभिक की जेव्हा त्यांना सांगण्यात आले, ‘‘या, अल्लाहच्या मार्गात युद्ध करा किंवा कमीतकमी (आपल्या शहराचे) रक्षण तरी करा,’’ तेव्हा म्हणू लागले, ‘‘जर आम्हाला माहीत असते की आज युद्ध होईल तर आम्ही अवश्य तुमच्याबरोबर आलो असतो.’’ ही गोष्ट जेव्हा ते सांगत होते तेव्हा ते श्रद्धेपेक्षा अश्रद्धेच्या अधिक जवळ होते. ते आपल्या मुखाने अशा गोष्टी सांगतात ज्या त्यांच्या मनामध्ये नसतात, आणि जे काही ते हृदयात लपवितात अल्लाह त्याला चांगलेच जाणतो. हे तेच लोक आहेत जे स्वतः तर बसून राहिले आणि यांचे जे भाईबंद लढावयास गेले आणि मारले गेले त्यांच्या संबंधाने यानी सांगून टाकले



की जर त्यांनी आमचे म्हणणे ऐकले असते तर मारले गेले नसते. यांना सांगा की जर तुम्ही आपल्या या वचनांत खरे असाल तर स्वतः तुमचा मृत्यू जेव्हा येईल तेव्हा त्याला टाळून दाखवा. (१६५-१६८)

जे लोक अल्लाहच्या मार्गात ठार झाले त्यांना मृत समजू नका, ते तर खरे पाहता जिवंत आहेत, आपल्या पालनकर्त्यापाशी उपजीविका प्राप्त करीत आहेत, जे काही अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यावर ते फार खूश आहेत, आणि समाधानी आहेत जे श्रद्धावंत त्यांच्या पाठीमागे जगात राहिले आहेत आणि अद्याप तेथे पोहचलेले नाहीत, त्यांच्यासाठीदेखील कोणत्याही भयाचे अथवा दुःखाचे कारण नाही. ते अल्लाहचे बक्षीस व त्याच्या कृपेबद्दल आनंदी व उल्हसित आहेत आणि त्यांना कळून आले आहे की, अल्लाह श्रद्धावंतांचा मोबदला वाया घालवीत नाही. ज्यानी जखमी होऊनसुद्धा अल्लाह व पैगंबरांच्या हाकेला ओ दिली[३३] त्यांच्यात जे लोक सदाचारी व पापभीरू आहेत, त्यांच्यासाठी मोठा मोबदला आहे. ज्यांना लोकांनी सांगितले की, ‘‘तुमच्याविरूद्ध मोठ्या फौजा गोळा झाल्या आहेत, त्यांची भीती बाळगा,’’ तर हे ऐकून त्यांची श्रद्धा अधिक वृद्धिंगत झाली आणि ते उत्तरले की, ‘‘अल्लाह आमच्यासाठी पुरेसा आहे आणि तोच सर्वोत्कृष्ट कार्यसिद्धीस नेणारा आहे.’’ सरतेशेवटी ते परमश्रेष्ठ अल्लाहच्या देणगी व कृपेसह परतले, त्यांना कोणत्याही प्रकारची हानी देखील पोहचली नाही आणि अल्लाहच्या मर्जीनुसार चालण्याचे श्रेयदेखील त्यांना प्राप्त झाले, अल्लाह मोठा कृपा

---

**३३)** उहुदच्या युद्धानंतर परतून अनेकेश्वरवादी जेव्हा बऱ्याच लांब अंतरावर निघून गेले तेव्हा त्यांना शुद्धी आली व ते आपापसात म्हणाले, आम्ही हे काय करून बसलो की मुहम्मदच्या शक्तीचा बीमोड करण्याची जी बहुमोल संधी आम्हाला लाभली होती ती हरवून आम्ही निघून आलो. म्हणून एका ठिकाणी थांबून त्यांनी आपापसात सल्लामसलत केली की मदीन्यावर लगेच दुसरा हल्ला चढविला जावा. परंतु मग पुन्हा धाडस झाले नाही व हे मक्केला परतले. इकडे हे लोक एखादे वेळी परत येतील पैगंबर (स.) यांना शंका होती. म्हणून उहुदच्या युद्धाच्या दुसऱ्याच दिवशी मुसलमानांना गोळा करून त्यांनी फर्माविले की काफिरांच्या मागावर निघाले पाहिजे. हा जरी अत्यंत नाजुक प्रसंग होता तरी जे सच्चे ईमानधारक होते ते प्राणपणाला लावण्यास तयार झाले व हजरत मुहम्मद (स.) यांच्या समवेत ‘हम्राउल असद’पर्यंत गेले. हे ठिकाण मदीनेपासून ८० मैल अंतरावर आहे. या आयतीचा संकेत याच प्राणांची बाजी लावणाऱ्यांकडे आहे.

करणारा आहे.[34] आता तुम्हाला कळून चुकले की तो खरे पाहता शैतान होता जो आपल्या साथीदारांचे तुम्हाला उगीचच भय दाखवीत होता म्हणून तुम्ही भविष्यात माणसांचे भय बाळगू नका माझे भय बाळगा जर तुम्ही खरोखर श्रद्धावंत असाल. (१६९-१७५)

(हे पैगंबर-स.) जे लोक आज अश्रद्धेच्या मार्गात खूपच धावपळ करीत आहेत त्यांच्या धावपळीने तुम्ही खिन्न होऊ नका, ते अल्लाहचे काहीही वाईट करू शकणार नाहीत. अल्लाहचा हेतू असा आहे की त्यांच्यासाठी मरणोत्तर जीवनात कोणताही वाटा असू नये, आणि सरतेशेवटी त्यांना कठोर शिक्षा मिळणार आहे. जे लोक श्रद्धा सोडून अश्रद्धेचे ग्राहक बनले आहेत नि:संशय ते अल्लाहचे काहीच नुकसान करीत नाहीत त्यांच्याकरिता दु:खदायक शिक्षा तयार आहे. त्यांना असे सैल सोडणे अश्रद्धावंतांनी आपल्या बाबतीत हितकारक समजू नये. आम्ही तर त्यांना याकरिता सैल सोडीत आहोत की यांनी पापाचे खूप मोठे ओझे जमा करावे. मग यांच्यासाठी भयंकर अपमानजनक शिक्षा आहे. (१७६-१७८)

अल्लाह श्रद्धावंतांना त्या परिस्थितीत कदापि राहू देणार नाही ज्या परिस्थितीत तुम्ही या वेळेस आढळता. तो पवित्र लोकांना अपवित्र लोकांपासून वेगळे केल्याशिवाय राहणार नाही. परंतु अल्लाहची ही प्रथा नाही की त्याने तुम्हाला परोक्षाची पूर्वसूचना द्यावी.[35] (परोक्षाच्या गोष्टींची माहिती देण्याकरिता तर) तो आपल्या प्रेषितांपैकी ज्याला इच्छितो त्याची निवड करतो म्हणून (परोक्षाच्या गोष्टींच्या बाबतीत) अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर श्रद्धा ठेवा. जर तुम्ही श्रद्धा आणि ईशपरायणतेचे वर्तन स्वीकाराल तर तुम्हाला फार मोठा मोबदला लाभेल. (१७९)

ज्या लोकांना अल्लाहने आपल्या कृपेने उपकृत केले आहे, आणि मग ते कंजूषपणाने वागतात तर त्यांनी या भ्रमात राहू नये की हा कंजूषपणा त्यांच्यासाठी चांगला

**३४)** उहुदहून परत जाताना अबू सुफ्यानने मुसलमानांना असे आव्हान दिले होते की पुढच्या वर्षी बदर येथे आमचा व तुमचा पुन्हा मुकाबला होईल. परंतु जेव्हा वचनपूर्तीची वेळ जवळ आली तेव्हा त्याचे धैर्य पार खचले. म्हणून त्याने बगल देण्यासाठी गुप्तपणे एका माणसाला पाठविले. त्याने मदीना येथे पोहचून मुसलमानांत अशा बातम्यांचा प्रसार करणे सुरू केले की या वर्षी कुरैशांनी जबरदस्त तयारी केली आहे आणि संपूर्ण अरबस्तानात ज्यांचा कोणीही मुकाबला करू शकणार नाही असे बलाढ्य सैन्य गोळा करीत आहेत. या प्रचारामुळे काही मुसलमान प्रभावित झाले होते. परंतु जेव्हा भर सभेत अल्लाहच्या पैगंबराने (स.) घोषणा केली की जर कोणी जाणार नसेल तर मी एकटाच निघणार तेव्हा पंधराशे प्राण ओवाळणारे त्यांच्याबरोबर निघण्यासाठी उभे राहिले. त्यांनाच घेऊन पैगंबर (स.) बदर कडे निघाले. अबू सुफ्यान मुकाबल्यासाठी आला नाही. मुसलमानांनी आठ दिवसांपर्यंत बदरला मुक्काम ठोकून व्यापारी देवाणघेवाणाने खूप आर्थिक फायदा करून घेतला.

**३५)** म्हणजे तुमच्यात कोण ईमानधारक आहे व कोण दांभिक आहे हे तुम्हाला दाखवावे.



आहे. नव्हे, हे त्यांच्याकरिता अत्यंत वाईट आहे. जे काही ते आपल्या कंजूषपणाने गोळा करीत आहेत तेच पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्या गळ्यातील जोखड बनतील. पृथ्वी व आकाशांचा वारसा अल्लाहकरिताच आहे, आणि तुम्ही जे काही करता अल्लाह त्याबाबत सर्वज्ञ आहे. (१८०)

अल्लाहने त्या लोकांचे विधान ऐकले जे म्हणतात की, अल्लाह गरीब आहे आणि आम्ही श्रीमंत आहोत.[36] यांच्या या गोष्टी देखील आम्ही लिहून घेऊ आणि यापूर्वी जे ते प्रेषितांची नाहक हत्या करीत आले आहेत तेही त्यांच्या कर्मनोंदपत्रात नमूद आहे (जेव्हा निर्णयाची वेळ येईल तेव्हा) आम्ही यांना सांगू की आता नरकाच्या प्रकोपाचा आस्वाद घ्या. ही स्वत: तुमच्या हाताने केलेली कमाई आहे, अल्लाह आपल्या दासांसाठी अत्याचारी नाही. (१८१-१८२)

जे लोक म्हणतात की, अल्लाहने आम्हाला आज्ञा दिली आहे की, आम्ही कोणाही पैगंबराला तोपर्यंत मानू नये जोपर्यंत तो आमच्या समोर अशी कुर्बानी देत नाही जिचे (परोक्षातून येऊन) अग्नीने भक्षण करावे. त्यांना सांगा, माझ्यापूर्वी तुमच्याकडे अनेक पैगंबर उज्ज्वल निशाण्या घेऊन आले होते. ज्याच्याबद्दल तुम्ही सांगत आहात तो संकेत सुद्धा आणला होता. जर तुम्ही प्रामाणिक आहात तर त्या प्रेषितांची हत्या तुम्ही कशासाठी केली? आणि हे पैगंबरा (स.)! हे तुम्हाला खोटे ठरवित आहेत तसेच अनेक प्रेषितांना तुमच्यापूर्वी खोटे ठरविले गेले आहेत जे उघड-उघड संकेत आणि दिव्य पुस्तिका व प्रकाश प्रदान करणारे ग्रंथ घेऊन आले होते. सरतेशेवटी प्रत्येकाला मृत्यू आहे आणि तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले कयामतच्या दिवशी प्राप्त करणार आहात. यशस्वी खऱ्या अर्थी तोच आहे जो तेथे नरकाग्नीपासून वाचेल व स्वर्गामध्ये दाखल केला जाईल. उरले हे जग, तर ही केवळ एक भुरळ पाडणारी बाब आहे. (१८३-१८५)

मुसलमानांनो, तुम्हाला प्राण व वित्त या दोन्हींच्या परीक्षा द्याव्याच लागतील, आणि तुम्ही ग्रंथधारक व अनेकेश्वरवाद्यांकडून पुष्कळशा त्रासदायक गोष्टी ऐकाल. जर या सर्व स्थितीत तुम्ही संयम आणि ईशपरायणतेच्या वर्तनावर दृढ राहाल तर हे मोठे धाडसाचे कार्य होय. या ग्रंथधारकांना त्या कराराची देखील आठवण करून द्या जो अल्लाहने त्यांच्याकडून घेतला होता की तुम्हाला ग्रंथाची शिकवण लोकांत प्रसारित करावी लागेल, ती लपवून ठेवता कामा नये. पण त्यांनी ग्रंथाला पाठीमागे घातले आणि अल्पशा किंमतीवर त्याला विकून टाकले. किती वाईट व्यवहार आहे हा जो हे करीत आहेत. तुम्ही त्या लोकांना प्रकोपापासून सुरक्षित समजू नका जे आपल्या कृतीवर प्रसन्न

**३६)** हे यहूदी लोकांचे कथन होते. दिव्य कुरआनात जेव्हा ही आयत आली की, ''असा कोण आहे ज्याने अल्लाहला चांगले कर्ज द्यावे'' तेव्हा तिचा उपहास करताना यहुदींनी सांगणे सुरू केले की होय बरे, अल्लाहमियाँ दरिद्री बनले आहेत. ते दासाकडून कर्ज मागू लागले आहेत.

आहेत आणि इच्छितात की अशा कार्याची प्रशंसा त्यांना लाभावी जे वस्तुत: त्यांनी केले नाहीत. खरोखर त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा तयार आहे पृथ्वी आणि आकाशांचा सार्वभौम मालक अल्लाह आहे आणि त्याची सत्ता सर्वांवर प्रभावी आहे. (१८६-१८९)

पृथ्वी आणि आकाशांच्या उत्पत्तीमध्ये व रात्र आणि दिवसाच्या आळीपाळीने येण्यात त्या ज्ञानी लोकांसाठी फार संकेत आहेत, जे उठता बसता आणि पहुडले असता प्रत्येक स्थितीत ईश्वराचे स्मरण करतात आणि पृथ्वी आणि आकाशांच्या रचनेत मनन व चिंतन करतात. (ते उत्स्फूर्तपणे उद्‌गार काढतात) "हे पालनकर्त्या, हे सर्वकाही तू व्यर्थ व निरुद्देश्य बनविलेले नाही, व्यर्थ कर्म करण्यापासून तू पवित्र आहेस. मग हे पालनकर्त्या, तू आम्हाला नरकाग्नीच्या प्रकोपापासून वाचव, तू ज्याला नरकामध्ये घातले त्याला खरोखर मोठे अपमान व नामुष्कीत लोटले आणि मग अशा अत्याचाऱ्यांचा कोणीही सहायक असणार नाही. स्वामी, आम्ही एका हांक देणाऱ्याला ऐकले जो श्रद्धेकडे बोलवीत होता आणि सांगत होता की आपल्या पालनकर्त्याला माना, आम्ही त्याचे निमंत्रण स्वीकारले, तर हे आमच्या स्वामी, जे अपराध आमच्याकडून झाले आहेत त्याबद्दल क्षमा कर, ज्या वाईट गोष्टी आमच्यात आहेत त्यांना काढून टाक आणि आमचा अंत सदाचारी लोकांसमवेत कर. हे प्रभू जी वचने तू आपल्या प्रेषितांद्वारे केलेली आहेस ती आम्हासाठी पूर्ण कर आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्हाला नामुष्की देऊ नकोस, नि:संशय तू वचनभंग करणारा नाहीस." (१९०-१९४)

उत्तरादाखल त्यांच्या पालनकर्त्याने फर्माविले, "मी तुमच्यापैकी कोणाचेही कृत्य वाया घालविणार नाही मग तो पुरुष असो अथवा स्त्री, तुम्ही सर्वजण परस्परांशी संबंधित आहात, म्हणून ज्या लोकांनी माझ्यासाठी स्वदेश त्याग केला आणि ज्यांना माझ्या मार्गात आपल्या घरातून बाहेर काढण्यात आले आणि जे छळले गेले आणि माझ्यासाठी लढले व मारले गेले - त्यांचे सर्व अपराध मी माफ करून टाकीन व त्यांना अशा उपवनांत दाखल करीन ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील. हा त्यांचा मोबदला आहे अल्लाहजवळ आणि सर्वोत्तम मोबदला अल्लाहजवळच आहे." (१९५)

हे पैगंबर (स.), शहरांमध्ये अश्रद्धावानांच्या धावपळीमुळे तुमची दिशाभूल होता कामा नये. ही केवळ काही दिवसांच्या जीवनाची थोडीशी मौज आहे, नंतर ते सर्वजण नरकामध्ये जातील जे अत्यंत वाईट ठिकाण आहे. याउलट जे लोक आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगून जीवन व्यतीत करतात त्यांच्यासाठी अशी उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहतात, त्या उद्यानांत ते सदैव राहतील, अल्लाहतर्फे ही त्यांच्यासाठी मेजवानीची सामग्री होय, आणि जे काही अल्लाहजवळ आहे सदाचारी लोकांकरिता तेच सर्वोत्तम आहे. ग्रंथधारकांमध्येसुद्धा काही लोक असे आहेत जे अल्लाहला मानतात, या ग्रंथावर श्रद्धा ठेवतात जो तुमच्याकडे पाठविण्यात आला आहे



आणि त्या ग्रंथावर देखील श्रद्धा ठेवतात जो याच्यापूर्वी खुद्द त्यांच्याकडे पाठविण्यात आला होता, अल्लाहच्या समोर विनम्र झालेले आहेत, आणि अल्लाहच्या संकेतवचनांना अल्पशा किंमतीला विकून टाकीत नाहीत, त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ आहे आणि अल्लाह हिशेब चुकता करण्यात विलंब लावीत नाही. (१९६-१९९)

हे श्रद्धावंतांनो, संयम पाळा, असत्यवाद्यांविरूद्ध दृढता दाखवा, सत्याच्या सेवेसाठी कटिबद्ध रहा व अल्लाहचे भय बाळगा, आशा आहे की तुम्ही सफल व्हाल. (२००)

# ४ सूरह अन्‌निसा

*(मदीनाकालीन, वचने १७६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

लोकहो, आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगा ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले आणि त्याच जीवापासून त्याची सहचारिणी बनविली आणि त्या दोघांच्यापासून पुष्कळ पुरुष व स्त्रिया जगात पसरविल्या. त्या अल्लाहचे भय बाळगा ज्याचा वास्ता देऊन तुम्ही एक दुसऱ्याकडून आपल्या हक्काची मागणी करता आणि नातेसंबंध विच्छेद करण्यापासून दूर रहा. खात्री बाळगा की अल्लाह तुम्हावर लक्ष ठेवून आहे. (१)

अनाथांची संपत्ती त्यांना परत करा. चांगल्या मालाला वाईट मालाने बदलू नका, आणि त्यांचा माल आपल्या मालात मिसळून खाऊ नका, हा फार मोठा गुन्हा आहे. (२)

आणि जर तुम्हाला भय असेल की तुम्ही अनाथांशी न्याय करू शकणार नाही तर ज्या स्त्रिया तुम्हाला पसंत पडतील त्यांच्यापैकी दोन-दोन, तीन-तीन, चार-चारशी विवाह करा.[1] परंतु जर तुम्हाला भय असेल की तुम्ही त्यांच्याशी न्याय करू शकणार नाही तर

१) हे लक्षात असावे की ही आयत एकाहून जास्त पत्नी बाळगण्याची परवानगी देण्यासाठी आलेली नव्हती कारण या आयतीच्या उतरण्या अगोदरपासूनच हे काम वैध होते, खुद्द अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या एकापेक्षा जास्त पत्न्या त्यावेळी मौजूद होत्या. वास्तविकपणे सदरहू आयत अशासाठी उतरली होती की युद्धात शहीद होणाऱ्यांची जी अनाथ मुले राहिली होती त्यांचा प्रश्न सोडविण्यासाठी फर्माविले गेले की जर त्या अनाथांचे हक्क तुम्ही तसे अदा करू शकत नसाल तर ज्यांच्यासमवेत अनाथ मुले आहेत अशा स्त्रियांशी विवाह करून घ्या.



मग एकच पत्नी करा.[2] किंवा त्या स्त्रियांना आपल्या दांपत्य जीवनात आणा ज्या तुमच्या ताब्यात आल्या आहेत,[3] अन्यायापासून वाचण्यासाठी हे औचित्याच्या अधिक निकटचे आहे. (३)

आणि स्त्रियांचे महर (स्त्रीधन) आनंदाने (कर्तव्य समजून) अदा करा. परंतु जर त्यांनी स्वत: स्वखुषीने स्त्रीधनाचा काही अंश तुम्हाला माफ केला तर तुम्ही तो भाग आनंदाने खाऊ शकता. (४)

आणि आपली ती संपत्ती जिला अल्लाहने तुमच्यासाठी जीवन स्थापन करण्याचे साधन बनविले आहे, नादान लोकांच्या स्वाधीन करू नका परंतु त्यांना आहार व वस्त्रप्रावरण द्या आणि त्यांना सन्मार्गदर्शन करा. (५)

आणि अनाथांची काळजी घेत रहा इथपावेतो की ते विवाहयोग्य वयात येतील.[4] मग जर तुम्हाला त्यांच्यात योग्यता आढळली तर त्यांची संपत्ती त्यांच्या स्वाधीन करा. असे कधीही करू नका की न्यायाच्या मर्यादा ओलांडून या भीतीपोटी त्यांचा माल घाईघाईने गिळंकृत कराल की ते मोठे झाल्यावर आपल्या हक्कांची मागणी करू लागतील. अनाथांचा जो पालक धनवान असेल त्याने ईशपरायणतेने वागावे व जो गरीब असेल त्याने परिचित

२) या आयतीनुसार बहुपत्निकत्वाला मर्यादित केलेले आहे व एकाच वेळी चार पेक्षा अधिक पत्न्या बाळगण्याची मनाई केलेली आहे. या गोष्टीवर मुस्लिम लोकसमुदायाच्या धर्मशास्त्रींचे मतैक्य आहे. तसेच सदरहू आयत बहुपत्निकत्वाच्या परवानगीला न्यायाच्या अटीने बद्ध करते. जो इसम न्यायाची अट पूर्ण करीत नाही परंतु एकापेक्षा जास्त पत्न्या बाळगण्याच्या परवानगीचा लाभ घेतो तो अल्लाहशी दगाबाजी करतो. इस्लामी राज्यातील न्यायालयाना असा अधिकार आहे की जी पत्नी अथवा ज्या पत्न्यांवर तो अन्याय करीत असेल त्यांना न्याय मिळवून द्यावा. काही लोक पाश्चिमात्य लोकांच्या विचारसरणीच्या पगड्याने पराभूत होऊन असे सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात की कुरआनचा मूळ हेतू बहुपत्निकत्वाच्या पद्धतीला (जी पाश्चिमात्य दृष्टिकोनानुसार वाईट पद्धत आहे) संपुष्टात आणावयाचा होता. परंतु अशा प्रकारच्या गोष्टी म्हणजे केवळ मानसिक गुलामीचा परिणाम होय. बहुपत्नीकत्व मुळात एक वाईट गोष्ट असणे आपल्या जागी स्वत:च मान्य करण्यालायक नाही कारण काही परिस्थितीत बहुतपत्निकत्व एक सामाजिक आणि नैतिक गरज ठरत असते. 'कुरआन'ने स्पष्ट शब्दात या पद्धतीला वैध ठरविले आहे. सांकेतिकपणेसुद्धा या पद्धतीच्या निषेधात असा कोणताही शब्द वापरलेला नाही जेणेकरून तो या पद्धतीला खऱ्या स्वरूपात संपुष्टात आणू इच्छित असल्याचे कळले असते.

३) 'दासी' अभिप्रेत आहेत. म्हणजे त्या स्त्रिया ज्या युद्धात कैद होऊन आल्या असाव्यात व युद्ध कैदींची अदलाबदल न होण्याच्या स्थितीत शासनाकडून लोकांत वाटल्या गेल्या असाव्यात.

४) म्हणजे जेव्हा ते प्रौढावस्थेला पोहचत असतील तेव्हा पाहात रहा की त्यांची बौद्धिक वाढ कशी आहे व आपले व्यवहार स्वत:च्या जबाबदारीवर हाताळण्याची क्षमता त्यांच्यात किती प्रमाणात निर्माण होत आहे.

पद्धतीने खावे.[५] नंतर जेव्हा त्यांची संपत्ती त्यांच्या स्वाधीन करू लागाल तेव्हा लोकांना त्यावर साक्षीदार बनवा आणि हिशेब घेण्यास अल्लाह पुरेसा आहे. (६)

पुरुषांसाठी त्या संपत्तीत वाटा आहे जी आई-वडील आणि जवळच्या नातेवाईकांनी मागे ठेवली असेल आणि स्त्रियांसाठीही त्या संपत्तीत वाटा आहे जी आई-वडील आणि जवळच्या नातेवाईकांनी मागे ठेवली असेल, मग ती कमी असो अथवा जास्त,[६] हा वाटा (अल्लाहकडून) ठरविलेला आहे. (७)

आणि जेव्हा वाटणीच्या वेळी कुटुंबातील लोक आणि अनाथ व गोर-गरीब आले तर त्या संपत्तीमधून त्यांनादेखील काही द्या आणि त्यांच्याशी भल्या माणसासारखे बोला. (८)

लोकांना या गोष्टीचा विचार करून भीती वाटली पाहिजे की जर त्यानी स्वत: आपल्या पाठीमागे असहाय संतती सोडली असती तर मृत्यूसमयी आपल्या संततीविषयी कसकशा प्रकारचे भय त्यांना वाटले असते, म्हणून त्या लोकांनी अल्लाहचे भय बाळगले पाहिजे आणि रास्त वचन बोलले पाहिजे. जे लोक अन्यायाने अनाथांची मालमत्ता गिळंकृत करतात खऱ्याअर्थी ते आपले पोट आगीने भरतात आणि निश्चितच ते नरकाच्या अग्नीत भडकत असलेल्या आगीत झोकून दिले जातील. (९-१०)

तुमच्या संततीविषयी अल्लाह तुम्हाला आदेश देत आहे की पुरुषाचा वाटा दोन

५) म्हणजे आपले सेवाशुल्क इतक्या प्रमाणात घ्यावे की प्रत्येक नि:पक्षपाती शहाण्या माणसाने ते मान्य करावे. तसेच जे काही सेवाशुल्क त्याने घ्यावे लपवून छपवून घेऊ नये तर जाहीरपणे ते ठरवून घ्यावे व त्याचा हिशेब ठेवावा.

६) या आयतीत स्पष्टपणे पाच कायद्यात्मक आज्ञा दिल्या गेल्या आहेत. एक अशी की वारसासंपत्ती केवळ पुरुषांच्याच वाट्याची आहे असे नाही तर स्त्रियांसुद्धा तिचे वाटेकरी आहेत. दुसरी अशी की वारसासंपत्तीचे कुठल्याही परिस्थितीत वाटप झाले पाहिजे मग ती किती का कमी असेना. तिसरी आज्ञा अशी की मृताने पाठीमागे सोडलेल्या संपूर्ण मालमत्तेला वाटणीस कोष्टकपत्र ठरविले गेले आहे. त्यात स्थावर व जंगम, शेतीची अथवा बिन शेतीची, वडिलोपार्जित असलेली अथवा तशी नसलेली असा कोणताही फरक केलेला नाही. चौथी, यावरून असे कळते की मालकाच्या हयातीत कोणताही वारसा हक्क निर्माण होत नाही तर जेव्हा मालक पाठीमागे काही मालमत्ता सोडून गेला असेल तेव्हाच वारसाहक्क निर्माण होतो. पाचवा कायदा यावरून असाही निघतो की निकटच्या नातेवाईकांच्या उपस्थितीत दुसऱ्या नातेवाईकांना वारसा मिळणार नाही. पुढे याच कायद्याचे स्पष्टीकरण आयत क्र. ११च्या शेवटी आणि आयत क्र. ३३ मध्ये केले गेले आहे.



स्त्रियांच्या बरोबर आहे.[७] जर (मृताचे वारस) दोनपेक्षा जास्त मुली असतील तर त्यांना वारसासंपत्तीपैकी दोन तृतीयांश दिला जावा[८] आणि जर एकच मुलगी वारस असेल तर अर्धी वारसासंपत्ती तिची होय. जर मृतास संतती असेल तर त्याच्या आईवडिलांपैकी प्रत्येकाला वारसासंपत्तीचा सहावा वाटा मिळाला पाहिजे.[९] आणि जर तो नि:संतान असेल आणि आई-वडीलच त्याचे वारस असतील तर आईला तिसरा वाटा दिला जावा.[१०] आणि जर मयताचे भाऊ बहिणीसुद्धा असतील तर आई सहाव्या हिश्याची वाटेकरी असेल.[११] (या सर्व वाटण्या त्यावेळी काढल्या जातील) जेव्हा मृत माणसाने केलेले मृत्यूपत्र पूर्ण केले गेले असेल आणि त्याच्यावर असलेले कर्ज अदा केले गेले असेल.[१२] तुम्हाला माहीत नाही की तुमचे आई-वडील व तुमच्या संततीपैकी कोण लाभाच्या दृष्टीने तुमच्या अधिक जवळ आहे. हे हिस्से अल्लाहने ठरवून दिलेले आहेत, आणि अल्लाह नि:संशय सर्व हकीगती जाणणारा आणि सर्व गर्भित हेतू जाणणारा आहे. (११)

७) इस्लामी कायदेशास्त्रात कौटुंबिक जीवनात पुरुषावर अधिक आर्थिक जबाबदारीचे भार टाकले गेले आहेत. तर स्त्रीला बऱ्याचशा आर्थिक जबाबदारीपासून मुक्त ठेवले गेले आहे. म्हणून वारसासंपत्तीत स्त्रीचा वाटा पुरुषांच्या तुलनेत कमी ठेवला जावा हेच न्यायाला धरून आहे.

८) हीच आज्ञा दोन मुलींसंबंधीही आहे. अर्थ असा की जर एखाद्या इसमाचा वारस कोणीही मुलगा नसला व केवळ मुलीच असल्या तर मग दोन मुली असोत किंवा दोनपेक्षा जास्त, कोणत्याही स्थितीत त्याच्या एकूण वारसासंपत्तीचा २/३ भाग त्या मुलींत वाटला जाईल व उरलेला १/३ इतर वारसदारांत. परंतु मृताला जर केवळ एकच मुलगा असेल तर इतर वारसदार नसल्याच्या स्थितीत तो एकूण मालमत्तेचा वारस ठरेल आणि जर इतर वारसदारही असतील तर मग त्यांचा वाटा दिल्यानंतर उरलेली सर्व मालमत्ता त्यालाच मिळेल.

९) म्हणजे मृताला संतती असल्याच्या स्थितीत कोणत्याही परिस्थितीत मृताच्या आई-वडिलांपैकी प्रत्येक १/६ चा वाटेकरी असेल. मग मृताचे वारसदार केवळ मुली असोत किंवा केवळ मुले असोत अथवा मुले व मुली असोत किंवा एक मुलगा व एक मुलगी असो. राहिला उरलेला २/३ भाग तर त्यात इतर वारसदार सामील असतील.

१०) आई वडिलांखेरीज इतर कोणीही वारस नसेल तर उरलेला २/३ भाग वडिलांना मिळेल. एरव्ही २/३ भागात वडील आणि इतर वारसदार वाटेकरी असतील.

११) भाऊ व बहीण असल्याच्या स्थितीत आईचा वाटा १/३ ऐवजी १/६ केला गेला आहे. अशा प्रकारे आईच्या वाट्यातील जो १/६ वा भाग घेतला आहे तो वडिलांच्या वाट्यात टाकला जाईल. कारण त्या स्थितीत वडिलांची जबाबदारी वाढलेली असते. हे लक्षात असावे की मृताचे आई व वडील जर जिवंत असतील तर त्याच्या भाऊ बहिणीला वाटा मिळत नाही.

१२) वसीयतचा उल्लेख जरी कर्जाच्या अगोदर आला आहे तरी वसीयतवर कर्जाला अग्रक्रम प्राप्त आहे यावर, मुस्लिम लोकसमूहाचे एकमत आहे. म्हणजे मृतावर जर कर्ज असेल तर सर्वप्रथम मृताच्या मालमत्तेतून कर्जाची परतफेड केली जाईल, नंतर वसीयत पूर्ण केली जाईल व मग वारसदारात तिचे वाटप होईल.

आणि तुमच्या पत्नीने जे काही ठेवले असेल त्याचा अर्धा वाटा तुम्हाला मिळेल, जर त्या नि:संतान असतील, परंतु संतती असल्यास वारसासंपत्तीमध्ये एक चतुर्थांश वाटा तुमचा आहे जेव्हा की त्यांनी जी वसीयत (मृत्यूपत्र) केली असेल ती पूर्ण करण्यात यावी, आणि कर्ज जे त्यांच्या अंगावर असेल ते अदा करण्यात यावे, व त्या तुम्ही पाठीमागे ठेवलेल्या संपत्तीच्या एक चतुर्थांशच्या वाटेकरी असतील जर तुम्ही नि:संतान असाल, परंतु संतान असल्यास त्यांचा वाटा एक अष्टमांश असेल,[१३] यानंतर जी वसीयत (मृत्यूपत्र) तुम्ही केली असेल ती पूर्ण केली जावी व जे कर्ज तुमच्यावर असेल ते अदा केले जावे. (१२-)

आणि तो पुरुष अथवा स्त्री (ज्याच्या वारसासंपत्तीची वाटणी करावयाची आहे) जर नि:संतानही असेल आणि त्या व्यक्तीचे आईवडीलदेखील हयात नसतील, पण त्याचा एक भाऊ अथवा एक बहीण असेल, तर भाऊ आणि बहीण प्रत्येकाला सहावा वाटा मिळेल व भाऊ-बहिण एकाहून अधिक असतील तर एकूण वारसासंपत्तीच्या एक तृतीयांश वाट्यात ते सर्वजण समाविष्ट होतील,[१४] जेव्हा की जे मृत्यूपत्र केले गेले असेल ते पूर्ण केले जावे, आणि मयत व्यक्तीने जे जे कर्ज करून ठेवले असेल ते अशा प्रकारे फेडण्यात यावे की ते नुकसानकारक ठरणार नाही[१५]– हा आदेश अल्लाहचा असून अल्लाह ज्ञाता, द्रष्टा व मृदुस्वभावी आहे. (-१२)

या अल्लाहने ठरवून दिलेल्या मर्यादा आहेत. जो अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करील त्याला अल्लाह अशा उपवनांत दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील आणि त्या उद्यानात तो सदैव राहील व हे तर मोठे यश होय. आणि जो अल्लाह व त्याच्या पैगंबराची अवज्ञा करील आणि त्याने ठरविलेल्या मर्यादांचे उल्लंघन करील त्याला अल्लाह आगीत टाकील ज्याच्यात तो सदैव राहील आणि त्याच्यासाठी अपमानकारक शिक्षा आहे. (१३-१४)

---

**१३)** म्हणजे एक पत्नी असो की अनेक पत्न्या, संतती असल्याच्या स्थितीत त्या १/८ भागाच्या तर संतती नसल्याच्या स्थितीत १/४ भागाच्या वाटेकरी असतील. हा १/४ किंवा १/८ वा भाग सर्व पत्नींना समसमान वाटला जाईल.

**१४)** या आयतीसंबंधी भाष्यकारांचे एकमत आहे की यात भाऊ व बहिणीने सावत्र भाऊ व सावत्र बहिणी अभिप्रेत आहेत, म्हणजे मृताशी नाते असणारे सावत्र भाऊ तर त्यांच्यासंबंधी आज्ञा याच सूरहच्या शेवटच्या आयतीत दिली गेली आहे.

**१५)** वसीयतीत अपायकारक म्हणजे अशा प्रकारे वसीयत केली असेल ज्यामुळे हक्कदार नातेवाईकांचे हक्क मारले जात असावेत. कर्जात अपायकारक म्हणजे केवळ हक्कदारांना वंचित ठेवण्यासाठी माणसाने खोटेच आपल्यावर एक असे कर्ज असण्याचे कबूल करावे जे त्याने प्रत्यक्षात घेतले नसावे, अथवा ज्यामुळे हक्कदार वारसासंपत्तीपासून वंचित होतील अशी एखादी युक्ती करावी.



तुमच्या स्त्रियांपैकी ज्यानी व्यभिचार केला असेल त्यांच्यासंबंधी आपल्यापैकी चार पुरुषांची साक्ष घ्या व जर चार पुरुषांनी साक्ष दिली तर त्यांना घरात बंद करून ठेवा येथपावेतो की त्यांना मृत्यू येईल अथवा अल्लाह त्यांच्यासाठी काही मार्ग काढील. आणि तुमच्यापैकी ज्यानी असे कृत्य केले असेल त्या दोघांना त्रास द्या मग जर त्यांनी पश्चात्ताप केला व आपली सुधारणा केली तर त्यांना सोडून द्या, अल्लाह फार पश्चात्ताप स्वीकारणारा आहे व दया करणारा आहे.[१६] (१५-१६)

परंतु हे समजून असा की अल्लाहकडे पश्चात्ताप स्वीकारण्याचा हक्क त्याच लोकांसाठी आहे जे नादानीमुळे एखादे वाईट कृत्य करून बसतात आणि त्यानंतर लगेच पश्चात्ताप करतात, अशा लोकांवर अल्लाह आपल्या कृपादृष्टीने पुन्हा लक्ष देतो आणि अल्लाह सर्वज्ञ, विवेकशील व बुद्धिमान आहे. परंतु पश्चात्ताप त्या लोकांकरिता नाही जे वाईट कृत्ये करतात येथपावेतो की जेव्हा त्यांच्यापैकी एखाद्याची मृत्यूची घटका येऊन ठेपते तेव्हा तो म्हणतो की आता मी पश्चात्ताप केला आणि याचप्रकारे पश्चात्ताप त्या लोकांकरितादेखील नाही जे मरेपर्यंत अश्रद्धावंत राहिलेत. अशा लोकांकरिता तर आम्ही दु:खदायक शिक्षा तयार करून ठेवली आहे. (१७-१८)

हे श्रद्धावंतांनो! तुमच्याकरिता हे वैध नाही की तुम्ही बळजबरीने स्त्रियांचे वारस बनावे.[१७] आणि हे देखील वैध नाही की त्यांना त्रस्त करून त्या स्त्रीधनाचा काही भाग तुम्ही हिरावून घेण्याचा प्रयत्न कराल जो तुम्ही त्यांना देऊन टाकला आहे, परंतु जर त्या उघडपणे अश्लील कृत्ये करतील तर (तुम्हाला जरूर त्यांना त्रास देण्याचा अधिकार आहे.)[१८] त्यांच्याशी चांगल्या प्रकारे जीवन व्यतीत करा. जर त्या तुम्हाला नापसंत असतील तर शक्य आहे की एखादी गोष्ट तुम्हाला पसंत नसेल परंतु अल्लाहने त्यांच्यातच बरेचसे भले ठेवले असेल. आणि जर तुम्ही एका पत्नीच्या जागी दुसरी पत्नी आणण्याचा इरादाच केला असेल तर तुम्ही जरी तिला ढीगभर संपत्ती दिली असली तरी त्यातील किंचितही परत घेऊ नका मग काय तुम्ही तिच्यावर आळ घेऊन आणि उघड अन्याय करून तो माल परत घ्याल? तुम्ही ते कसे घ्याल जेव्हा तुम्ही एक दुसऱ्यापासून सुखोपभोग घेतला आहे आणि त्यांनी तुमच्याकडून दृढ वचन घेतले आहे? (१९-२१)

---

**१६)** व्यभिचारासंबंधीची ही प्राथमिक आज्ञा होती. नंतर सूरह नूर मध्ये जिच्यात पुरुष व स्त्री दोन्हींना शंभर शंभर फटके मारण्याची एकच आज्ञा दिली गेली आहे, ती आयत उतरली.

**१७)** याने अभिप्रेत असे की पतीच्या मृत्यूनंतर त्याच्या कुटुंबातील लोकांनी त्याच्या विधवेला वारसा माल व संपत्ती समजून तिचे मालक होऊन बसू नये. स्त्रीचा पती जेव्हा मृत्यू पावला तेव्हा ती स्वतंत्र आहे. 'इद्दत' पूर्ण करून हवे तेथे तिने जावे व हवे त्याच्याशी विवाह करावा, हे तिला स्वातंत्र्य आहे.

**१८)** माल उपटण्यासाठी नव्हे तर अनैतिक वर्तनाची शिक्षा देण्यासाठी.

आणि ज्या स्त्रियांशी तुमच्या वडिलांनी विवाह केला असेल त्यांच्याशी कदापि विवाह करू नका, परंतु जे पूर्वी घडले ते घडले.[१९] खरे पाहता ही एक निर्लज्जपणाची कृती आहे, अप्रिय आहे व वाईट रूढी आहे.[२०] तुमच्यासाठी निषिद्ध केल्या गेल्या आहेत तुमच्या माता,[२१] क़न्या,[२२] बहिणी,[२३] आत्या, मावश्या, पुतण्या, भाच्या[२४] आणि तुमच्या दूध बहिणी[२५] व तुमच्या पत्नीच्या माता, आणि तुमच्या पत्नींच्या मुली ज्यांचे पालनपोषण तुमच्या पालकत्वाखाली झाले आहे.[२६] - ज्या पत्नींशी तुमचे शरीर-संबंध झाले असेल त्यांच्या मुली, परंतु एरव्ही जर (केवळ विवाह झाला असेल आणि) त्या पत्नींशी समागम झाला नसेल तर (त्यांना घटस्फोट देऊन त्यांच्या मुलींशी विवाह करून घेण्यात) तुमच्यावर कोणताही गुन्हा नाही. आणि तुमच्या त्या मुलांच्या पत्नीदेखील (निषिद्ध आहेत) (जी मुले) तुमच्या

---

**१९)** याचा अर्थ असा नव्हे की अज्ञानाच्या काळात ज्याने सावत्र आईशी विवाह केला होता ही आज्ञा आल्यानंतरसुद्धा तो तिला विवाहसंबंधात ठेऊ शकतो. तर अर्थ असा की पूर्वी अशा प्रकारचे जे विवाह झाले होते, त्याद्वारे जन्मात येणारी संतती आता ही आज्ञा आल्यानंतर अनौरस ठरणार नाही. तसेच आपल्या पित्यांच्या मालमत्तेतील त्यांचा वारसाहक्क रद्दबातल ठरणार नाही.

**२०)** इस्लामी कायद्यानुसार हे कृत्य फौजदारी गुन्हा आणि पोलिसांच्या हस्तक्षेपास पात्र आहे.

**२१)** 'आई' म्हणून सख्खी आणि सावत्र दोन्ही प्रकारच्या आईवर लागू आहे, म्हणून दोन्ही वर्ज्य आहेत. तसेच याच आज्ञेत पित्याची आई आणि आईची आई सुद्धा सामील आहेत.

**२२)** मुलगी या आज्ञेत नातीचाही समावेश आहे.

**२३)** सख्खी बहीण आणि आईकडून तसेच वडिलांकडून असणाऱ्या सावत्र बहिणी, तिन्ही या आज्ञेत एकसमान आहेत.

**२४)** या सर्व नात्यातसुद्धा सख्खी आणि सावत्र यांच्यात काहीही फरक नाही.

**२५)** ह्या गोष्टीत पूर्ण मुस्लिम समाज सहमत आहे की एखाद्या मुलाने अथवा मुलीने ज्या महिलेपासून स्तनपान केले आहे, ती महिला त्याच्याकरिता मातेच्या कक्षेत येते आणि तिचा पती पित्याच्या कक्षेत येतो. आणि ती सर्व नाती जी सख्ख्या माता आणि पित्याच्या संबंधात वर्जित होतात ती सर्व स्तनपान संबंधित माता आणि पित्याच्या संबंधात वर्जित होतात. ह्या मुलाकरिता स्तनपान संबंधित मातेचे केवळ तेच मूल हराम अथवा वर्जित होत नाही ज्याच्यासह त्याने त्या मातेपासून स्तनपान केले होते तर तिची सर्वच मुले त्याच्याकरिता सख्ख्या भावा-बहिणीप्रमाणे आणि त्यांची संतती त्याच्याकरिता सख्ख्या भाच्या आणि पुतण्याप्रमाणे आहे.

**२६)** अशा मुलीचे निषिद्ध ठरणे या अटीवर अवलंबून नाही की तिचे सावत्र पित्याच्या घरी पालनपोषण झाले असावे. सावत्र मुलगी माणसासाठी कोणत्याही परिस्थितीत निषिद्धच आहे मग तिचे सावत्र बापाच्या घरात पालनपोषण झाले असो किंवा नसो, याबाबतीत इस्लामी कायदेतज्ज्ञांचे जवळजवळ मतैक्य आहे.



वीर्यापासून जन्मली आहेत.[२७] आणि हे देखील तुमच्यासाठी निषिद्ध केले गेले आहे की तुम्ही दोन बहिणींना विवाह बंधनात एकत्र आणावे,[२८] परंतु पूर्वी जे काही घडले ते घडले, अल्लाह क्षमा करणारा आणि परम कृपाळू आहे.[२९] आणि त्या स्त्रियादेखील तुमच्याकरिता निषिद्ध आहेत ज्या इतर कोणाच्या विवाहबंधनांत असतील (मुहसनात) परंतु अशा स्त्रियांशी (विवाह करण्यामध्ये) त्या स्त्रिया अपवाद आहेत ज्या (युद्धामध्ये) तुमच्या हाती लागलेल्या असतील.[३०] हा अल्लाहचा कायदा आहे ज्याचे पालन तुमच्यावर बंधनकारक आहे.

(२२-२४-)

यांच्याखेरीज इतर ज्या स्त्रिया आहेत त्यांना आपल्या संपत्तीद्वारे प्राप्त करणे तुमच्यासाठी वैध करण्यात आले आहे, परंतु अट अशी की त्यांना विवाहबंधनात सुरक्षित करा, असे नव्हे की तुम्ही स्वच्छंद कामतृप्ती करू लागाल. मग ज्या दांपत्यजीवनाचा आनंद तुम्ही त्यांच्यापासून घ्याल त्याच्या मोबदल्यात त्यांचे महर (स्त्रीधन) कर्तव्य समजून अदा करा. परंतु महरचा ठराव केल्यानंतर परस्परांच्या राजी-खुषीने तुमच्यामध्ये जर काही तडजोड निघाली तर त्याला काही हरकत नाही. अल्लाह सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. आणि तुमच्यापैकी जर एखाद्याची इतकी ऐपत नसेल की त्यांचा सद्‌वर्तनी मुसलमान स्त्रियांशी विवाह होईल तर त्याने तुमच्या त्या दासींपैकी एखादीशी विवाह करावा ज्या युद्धामध्ये तुमच्या ताब्यात आल्या असतील व त्या श्रद्धावंत असतील. अल्लाह तुमच्या श्रद्धेची स्थिती चांगल्या प्रकारे जाणतो, तुम्ही सर्व एकाच जमातीचे लोक आहात, म्हणून त्यांच्या पालकांच्या अनुमतीने त्यांच्याशी विवाहबद्ध व्हा व परिचित पद्धतीनुसार त्यांचे महर (स्त्रीधन) अदा करा जेणेकरून त्या विवाहबंधनात सुरक्षित (मुहसनात) राहतील. त्यांनी स्वच्छंद कामतृप्ती करीत फिरू नये आणि त्यांनी गुप्तरीत्या प्रेमसंबंधही ठेऊ नये मग जेव्हा त्या विवाहबंधनात सुरक्षित होतील आणि त्या एखादे अश्लील कर्म करतील तर

---

**२७)** मुलाप्रमाणे नातूंची पत्नीसुद्धा आज्यांसाठी निषिद्ध आहे.

**२८)** पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचा आदेश आहे की मावशी आणि भाची तसेच आत्या आणि पुतणी यांनासुद्धा एकत्रपणे विवाह बंधनात ठेवणे निषिद्ध आहे. याबाबतीत हा नियम लक्षात घेतला गेला पाहिजे की अशा दोन स्त्रियांना विवाहबंधनात एकत्र ठेवणे कोणत्याही परिस्थितीत हराम आहे ज्यांच्यापैकी कोणी एक जर पुरुष असता तर तिचा दुसरीशी विवाह निषिद्ध ठरला असता.

**२९)** म्हणजे त्यासाठी जाब विचारला जाणार नाही परंतु ज्या इसमाने कुफ्रच्या स्थितीत दोन बहिणींना विवाहबंधनात एकत्र केले असेल, इस्लाम स्वीकारल्यानंतर अशा इसमाला एक बहिणीला ठेवून दुसरीला सोडावे लागेल.

**३०)** म्हणजे ज्या स्त्रिया युद्धात पकडून आणल्या जातील व त्यांचे काफिर पती 'दारुल हरब'-शत्रूराष्ट्रात मौजूद असतील त्या निषिद्ध नाहीत, कारण दारुल हरब मधून दारुल इस्लाम-इस्लामी राज्यात आल्यानंतर त्यांचे विवाहबंधन तुटले आहे.

त्याना त्या शिक्षेच्या तुलनेत अर्धी शिक्षा आहे जी मर्यादाशील स्त्रियांकरिता (मुहसनात) ठेवलेली आहे.[३१] ही सवलत तुम्हांपैकी त्या लोकांकरिता आहे ज्यांना विवाह न केल्यामुळे संयममर्यादा भंग पावण्याचे भय वाटत असेल, परंतु जर तुम्ही संयम पाळाल तर हे तुमच्यासाठी उत्तम आहे, आणि अल्लाह क्षमा करणारा व परम कृपाळू आहे. (-२४-२५)

अल्लाह इच्छितो की तुमच्यासाठी त्याने त्या पद्धती स्पष्ट कराव्यात आणि त्याच पद्धतीवर तुम्हास चालवावे ज्यांचे अनुसरण तुमच्यापूर्वी होऊन गेलेले सदाचारी लोक करीत होते. तो आपल्या कृपेसह तुमच्याकडे लक्ष देऊ इच्छितो आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमानदेखील आहे. होय, अल्लाह तर तुमच्यावर कृपेसह लक्ष देऊ इच्छितो परंतु जे लोक स्वत: आपल्या मनोवासनांचे अनुसरण करीत आहेत ते इच्छितात की तुम्ही सरळ मार्गापासून भरकटून दूर जावे. अल्लाह तुमच्यावरील बंधने शिथिल करू इच्छितो कारण मनुष्य दुबळा प्राणी निर्माण केला गेला आहे. (२६-२८)

हे श्रद्धावंतांनो! आपसात एकमेकांची संपत्ती खोट्या पद्धतीने खाऊ नका. व्यवहार झाला पाहिजे परस्परांच्या राजीखुषीने[३२] आणि स्वत:चा आत्मघात करू नका.[३३] खात्री बाळगा की अल्लाह तुम्हावर मेहरबान आहे, जो कोणी जुलूम व अत्याचाराने असे करील त्याला नि:संशय आम्ही आगीत लोटू आणि हे अल्लाहकरिता काही अवघड कार्य नाही.

**३१)** या रुकू-खंडात 'मुहसनात' हा शब्द दोन वेगवेगळ्या अर्थांत वापरला गेला आहे. एक म्हणजे पतीचे संरक्षण ज्यांना प्राप्त आहे अशा विवाहित स्त्रिया. दुसरा म्हणजे ज्यांना कुटुंबाचे संरक्षण प्राप्त आहे अशा अविवाहित कुलीन स्त्रिया. आयत क्र. २४ मध्ये 'मुहसनात' हा शब्द दासींच्या तुलनेत अविवाहित कुलीन स्त्रियांसाठी वापरला गेला असल्याचे सदरहू आयतीच्या विषयावरून अगदी स्पष्टपणे व्यक्त होत आहे. याउलट दासींसाठी मुहसनात हा शब्द पहिल्या अर्थाने वापरला गेला आहे. तसेच अगदी स्पष्टपणे फर्माविले आहे की जर त्यांना विवाहाचे संरक्षण मिळाले असेल तर त्यांच्यासाठी व्यभिचाराची शिक्षा, 'मुहसनात' (अविवाहित कुलीन स्त्रिया) साठी असलेल्या शिक्षेपेक्षा निम्मी शिक्षा आहे.

**३२)** 'खोट्यापद्धती'ने अभिप्रेत सत्याविरुद्ध असलेल्या आणि शरीअत व नैतिकतेच्या दृष्टीने ज्या अवैध आहेत, अशा सर्व पद्धती आहेत. 'परंपरांच्या राजीखुषी'ने अभिप्रेत स्वतंत्र आणि आकलनात असलेली राजीखुषी आहे. एखाद्या दबावाखाली अथवा फसवणूक व लबाडीवर आधारित राजीखुषी म्हणजे राजीखुषी नव्हे.

**३३)** हे वाक्य अगोदरच्या वाक्याचे परिशिष्टही असू शकते आणि एक स्वतंत्र वाक्य देखील असू शकते. जर अगोदरच्या वाक्याचे परिशिष्ट समजले गेले तर इतरांची संपत्ती अवैध रीतीने खाणे म्हणजे आपल्या स्वत:लाच विनाशात झोकणे होय, असा त्याचा अर्थ होईल जर त्याला एक स्वतंत्र वाक्य समजले गेले तर दोन अर्थ होतात. एक असा की इतरांची हत्या करू नका. दुसरा अर्थ असा की आत्महत्या करू नका.



जर तुम्ही त्या मोठमोठाल्या पापापासून अलिप्त राहिला ज्यांची तुम्हाला मनाई करण्यात येत आहे, तर तुमच्या लहानसहान दुष्कृत्यांचे आम्ही पापक्षालन करू, आणि तुम्हाला सन्मानाच्या ठिकाणी दाखल करू. (२९-३१)

आणि जे काही अल्लाहने तुमच्यापैकी एखाद्याला दुसऱ्याच्या तुलनेत अधिक दिले आहे त्याची अभिलाषा धरू नका, जे काही पुरुषांनी कमाविले आहे त्यानुसार त्यांचा वाटा आहे आणि जे काही स्त्रियांनी कमाविले आहे त्यानुसार त्यांचा वाटा होय, अल्लाहजवळ त्याच्या कृपेची प्रार्थना करीत राहा, नि:संशय अल्लाहला प्रत्येक वस्तूचे ज्ञान आहे. (३२)

आणि आम्ही त्या प्रत्येक वारसासंपत्तीचे हक्कदार ठरवून दिले आहेत, जी आई, वडील व जवळचे नातलग पाठीमागे ठेवतील. आता उरले ते लोक ज्यांच्याशी तुमचा करार-मदार झाला असेल तर त्यांचा वाटा त्यांना द्या. नि:संशय अल्लाह प्रत्येक वस्तूवर निरीक्षक आहे.[३४] (३३)

पुरुष स्त्रियांवर विश्वस्त[३५] आहेत. या आधारावर की अल्लाहने त्यांच्यापैकी एकाला दुसऱ्यावर श्रेष्ठत्व दिले आहे. आणि या आधारावर की पुरुष आपली संपत्ती खर्च करतात. मग ज्या प्रामाणिक स्त्रिया आहेत त्या आज्ञाधारक असतात आणि पुरुषांच्या गैरहजेरीत अल्लाहच्या देखरेखीत व संरक्षणात त्यांच्या हक्कांचे रक्षण करतात आणि ज्या स्त्रियांकडून तुम्हाला दुर्वर्तनाचे भय असेल त्यांची समजूत घाला, शयनगृहात त्यांच्यापासून अलिप्त रहा, आणि मार द्या,[३६] मग जर त्या तुमच्या आज्ञाधारक बनल्या

**३४)** अरबवासियांची पद्धत होती की ज्या लोकांदरम्यान मित्रत्व आणि बंधुत्वाचे करारमदार होत असत ते एकमेकाच्या वारसासंपत्तीचे वाटेकरी ठरत असत. त्याचप्रमाणे ज्याला पुत्र मानले जात असे तोसुद्धा मानलेल्या बापाचा वारसदार ठरत असे. सदरहू आयतीत अज्ञानकाळाच्या याच प्रथेला रद्दबातल फर्माविले गेले आहे की वारसासंपत्तीचे तर आम्ही ठरवून दिलेल्या कायद्यानुसारच नातेवाईकांत वाटप झाले पाहिजे तथापि ज्या लोकांशी तुमचे करार-मदार असतील त्यांना आपल्या हयातीत तुम्ही जे काही देऊ इच्छिता ते देऊ शकता.

**३५)** मूळ अरबी शब्द कव्वाम (विश्वस्त) अशा माणसाला म्हणतात जो एखाद्या व्यक्ती अथवा संस्थेच्या व्यवहारांना नीटनेटके चालविण्यासाठी व त्याचे रक्षण व देखरेखीसाठी तसेच त्याच्या गरजा भागविण्यासाठी जिम्मेदार असावा.

**३६)** असा अर्थ नव्हे की तिन्ही कामे एकाच वेळी उरकली जावीत तर अर्थ असा की शिरजोरीच्या स्थितीत या तिन्ही उपायांची परवानगी आहे. राहिले ते अंमलात आणणे तर कोणत्याही परिस्थितीत अपराध आणि शिक्षा यांच्यात ताळमेळ असला पाहिजे. जेथे सौम्य उपायाने सुधारणा होत असेल तेथे कठोर उपायाचा उपयोग केला जाऊ नये. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी पत्नींना मार देण्याची जेव्हा कधी परवानगी दिली आहे, खिन्न मनानेच दिली आहे. याउपरसुद्धा आपली नापसंतीच व्यक्त केली आहे.

तर विनाकारण त्यांच्यावर हात टाकण्यासाठी निमित्त शोधू नका. विश्वास ठेवा की अल्लाह हजर आहे जो उच्चतम व महान आहे आणि जर तुम्हाला पतिपत्नीचे संबंध बिघडण्याचे भय असेल तर एक पंच पुरुषाच्या नातेवाईकांपैकी आणि एक स्त्रीच्या नातेवाईकांपैकी नियुक्त करा, ते दोघे[३७] सुधारणा करू इच्छित असतील तर अल्लाह त्यांच्यामध्ये समेटाचा मार्ग काढील, अल्लाह सर्वकाही जाणणारा आणि खबर राखणारा आहे. (३४-३५)

आणि तुम्ही सर्वजण अल्लाहची भक्ती करा, त्याच्यासमवेत कोणाला भागीदार बनवू नका, आई-वडिलांशी नेक वर्तणूक ठेवा, नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीबांशी चांगला व्यवहार करा आणि आप्तशेजारी, अनोळखी शेजारी, तोंडओळख असणारा साथीदार[३८] व वाटसरू, आणि त्या दासी व दास जे तुमच्या ताब्यात असतील, त्यांच्याशी उपकाराचे व्यवहार करा, विश्वास ठेवा की अल्लाह एखाद्या अशा व्यक्तीला पसंत करत नाही जी आपल्या अहंभावात गर्विष्ठ असते व आपल्या मोठेपणावर अभिमान करीत असते. आणि असे लोकदेखील अल्लाहला पसंत नाहीत जे कंजूषपणा करतात आणि दुसऱ्यांनासुद्धा कंजूषपणाचा आदेश देतात व जे काही अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यास ते लपवितात. अशा कृतघ्न अश्रद्धावंत लोकांकरिता आम्ही नामुष्की आणणारी शिक्षा तयार ठेवली आहे. आणि ते लोक देखील अल्लाहला नापसंत आहेत जे आपली संपत्ती लोकांना केवळ दाखविण्यासाठी खर्च करतात आणि खरे पाहता ते अल्लाहवरही श्रद्धा बाळगत नाहीत अथवा अंतिम दिनावरदेखील. सत्य असे आहे की शैतान ज्याचा मित्र झाला त्याला अत्यंत वाईट मैत्री मिळाली बरे तर या लोकांवर कोणते संकट कोसळले असते जर यांनी अल्लाह व अंतिम दिनावर श्रद्धा ठेवली असती आणि जे काही अल्लाहने दिले आहे त्यातून खर्च केले असते. जर यांनी असे केले असते तर अल्लाहपासून यांच्या पुण्याईची स्थिती लपून राहिली नसती. अल्लाह कोणावरही तिळमात्रसुद्धा अत्याचार करीत नाही. जर कोणी एक पुण्य केले तर अल्लाह त्याला द्विगुणीत करतो व मग आपल्यातर्फे मोठा मोबदला प्रदान करतो. मग विचार करा की

३७) दोन्हींने अभिप्रेत मध्यस्थी करणारा तसेच दांपत्यही आहे. प्रत्येक भांडणात सुधारणा घडवून आणण्याची शक्यता आहे परंतु अट अशी की उभयपक्ष सुधारणाप्रिय असावेत तसेच मध्यस्थांची सुद्धा कसेही करून समेट व्हावा अशीच इच्छा असावी.

३८) याने अभिप्रेत सहवासी मित्रही आहे आणि एखाद्या वेळेस माणसाशी साथ व्हावी अशी एखादी व्यक्ती देखील आहे. उदा. आपण बाजारात जात असावे व एखादा माणूस आपल्याबरोबर चालत असावा, अथवा एखाद्या दुकानावर आपण खरेदी करीत असावे व एखादा दुसरा ग्राहकसुद्धा आपल्याजवळ बसला असावा किंवा प्रवासाच्या काळात एखादा माणूस आपला सहप्रवासी व्हावा, हा तात्पुरता शेजारसुद्धा सभ्य आणि सज्जन माणसावर एक हक्क लागू करतो. त्याची निकड अशी की शक्य तितके त्याने त्याच्याशी सद्वर्तन राखावे व त्याला त्रास देण्यापासून अलिप्त राहावे.



तेव्हा हे लोक काय करतील जेव्हा आम्ही प्रत्येक लोकसमूहामधून एक साक्षीदार आणू आणि या लोकांवर तुम्हाला (अर्थात पैगंबर मुहम्मद-स. यांना) साक्षीदार म्हणून उभे करू. तेव्हा ते सर्वजण ज्यांनी पैगंबरांचे म्हणणे ऐकले नाही आणि त्यांची अवज्ञा करीत राहिले, इच्छा करतील की पृथ्वीने तिच्या उदरात आम्हांस सामावून घेतले तर किती छान! तेथे हे आपली कोणतीही गोष्ट अल्लाहपासून लपवू शकणार नाहीत. (३६-४२)

हे श्रद्धावानांनो, जेव्हा तुम्ही नशेच्या स्थितीत असाल तेव्हा नमाजच्या जवळ जाऊ नका[३९] नमाज त्या वेळेस अदा केली पाहिजे जेव्हा तुम्हाला कळत असेल की तुम्ही काय बोलत आहात[४०] आणि याचप्रमाणे अपवित्रतेच्या स्थितीतसुद्धा[४१] नमाजच्याजवळ जाऊ नका जोपर्यंत तुम्ही स्नान करीत नाही याव्यतिरिक्त की तुम्ही रस्त्याने जात असाल[४२] आणि कधी जर असे घडले की तुम्ही आजारी असाल किंवा प्रवासात असाल अथवा तुम्हापैकी एखादा शौचास जाऊन आला असेल अथवा तुम्ही स्त्रियांना स्पर्श केला असेल,[४३] आणि मग पाणी उपलब्ध झाले नाही तर स्वच्छ मातीचा उपयोग करा आणि

३९) दारूसंबंधी ही दुसरी आज्ञा आहे. सुरह बकरामध्ये (आयत क्र.२१९) जी आज्ञा आली आहे ती पहिली होय.

४०) म्हणजे नमाज पढताना इतकी शुद्ध असली पाहिजे की तो काय उच्चार आपल्या तोंडावाटे काढत आहे, हे त्याला कळावे. असे होता कामा नये की तो उभा तर असावा नमाज पढण्यासाठी आणि सुरू करावी एखादी 'गझल'.

४१) अपवित्र (जनाबत) ने अभिप्रेत ती घाण आहे जी संभोगाने किंवा स्वप्नात वीर्य स्खलनामुळे येते.

४२) इस्लामी कायदेतज्ज्ञ आणि भाष्यकारांच्या एका गटाने या आयतींचा अर्थ असा घेतला आहे की अपवित्रतेच्या (जनाबत) स्थितीत मस्जिदीत जाऊ नये याव्यतिरिक्त की एखाद्या कामासाठी मस्जिदमधून जावे लागत असावे. दुसरा गट प्रवास अभिप्रेत असल्याचे मानतो. म्हणजे माणूस जर प्रवासात असला व त्याला अपवित्रता आली तर तयम्मूम केला जाऊ शकतो.

४३) 'स्पर्श'ने अभिप्रेत काय आहे याबाबतीत मतभेद आहे. अनेक इमामांच्या मते याच्यात समागम अभिप्रेत आहे. हेच मत इमाम अबू हनीफा (रह.) व त्यांच्या शिष्यांनी स्वीकारले आहे. याउलट काही इतर कायदेतज्ज्ञांच्या मते याने अभिप्रेत स्पर्श करणे किंवा हात लावणे असे आहे. हेच मत इमाम शाफई (रह.) यांनी स्वीकारले आहे. इमाम मालिक (रह.) यांचे मत असे आहे की जर स्त्रीने अथवा पुरुषाने एकमेकाला भोगवासनेच्या भावनांनी हात लावले तर त्यांचा वजू मोडेल परंतु जर भोगवासनेच्या भावनांविना एकमेकाच्या शरिराला स्पर्श झाला तर त्यास काहीही हरकत नाही.

ती आपल्या चेहऱ्या व हातावर फिरवा[४४] नि:संदेह अल्लाह मृदू व्यवहार करणारा व क्षमा करणारा आहे. (४३)

तुम्ही त्या लोकांनासुद्धा पाहिले आहे काय ज्यांना ग्रंथाच्या ज्ञानाचा काही भाग दिला गेला आहे? ते स्वत: मार्गभ्रष्टतेचे ग्राहक बनले आहेत आणि ते इच्छितात की तुम्हीसुद्धा मार्गभ्रष्ट व्हावे. अल्लाह तुमच्या शत्रूंना चांगल्या प्रकारे जाणतो आणि तुमच्या पुष्टी व सहाय्याकरिता अल्लाहच पुरेसा आहे. जे लोक यहुदी आहेत त्यांच्यात काही लोक आहेत जे शब्दांना त्यांच्या जागेपासून फिरवितात[४५] 'समीअना व असैना'[४६] आणि 'इसमअ गैर मुसमइन'[४७] व 'राइना'[४८] खरे पाहता जर त्यांनी म्हटले असते 'समिअना व अतअ्ना' आणि 'इसमाअ' व 'उन्जुरना' तर हे त्यांच्यासाठीच उत्तम होते आणि ती अधिक सत्यनिष्ठतेची पद्धत होती. परंतु त्यांच्यावर तर त्यांच्या असत्यवादामुळे अल्लाहचा धिक्कार ओढवला आहे, म्हणून ते अल्लाहवर कमीच श्रद्धा ठेवतात.

(४४-४६)

**४४)** आज्ञेचा तपशील असा की जर मनुष्याचे वजू (प्रार्थनेपूर्वी विशिष्ट पद्धतीने हात, पाय व तोंड धुणे) नसले किंवा त्याच्यासाठी स्नान अनिवार्य झाले असेल परंतु पाणी उपलब्ध नसेल तर 'तयम्मुम' करून तो नमाज पढू शकतो. जर तो आजारी असेल आणि वजू अथवा स्नान करणे त्याला अपायकारक ठरण्याची भीती असेल तर पाणी उपलब्ध असतानासुद्धा तयम्मुमच्या परवानगीचा लाभ घेतला जाऊ शकतो.

**४५)** याचे तीन अर्थ आहेत. एक असा की ईश्वरी ग्रंथाच्या शब्दात फेरफार करतात. दुसरा असा की विपरीत अर्थ लावून ग्रंथातील आयतींचा अर्थ काहीचा काहीच करून टाकतात. तिसरा असा की हजरत मुहम्मद (स.) व त्यांच्या अनुयायांच्या सोबतीत येऊन त्यांच्या गोष्टी ऐकतात व परत जाऊन लोकांसमोर खोट्या रीतीने निवेदन करतात. गोष्ट एक सांगितली जाते, ते तिला आपल्या खोडसाळपणाने विकृत करून लोकांत पसरवितात.

**४६)** म्हणजे जेव्हा त्यांना ईश्वराच्या आज्ञा ऐकविल्या जातात तेव्हा मोठ्याने म्हणतात 'समिअना' (आम्ही ऐकले) व हळूच उद्‌गारतात, 'असैना' (आम्ही मान्य केले नाही), अथवा 'अताअना' (आम्ही मान्य केले) या शब्दाचा उच्चार जिभेला वळवून अशा प्रकारे करतात की तो 'असैना' बनतो.

**४७)** म्हणजे बोलणी होत असताना जेव्हा ते एखादी गोष्ट हजरत मुहम्मद (स.) यांना सांगू इच्छितात तेव्हा म्हणतात 'इसमाअ' (ऐका) मग त्याचबरोबर 'गैर मुसमइन' असेही म्हणतात. हा द्व्यर्थी शब्द आहे. याचा एक अर्थ असा की आपण इतके आदरणीय आहात की कोणतीही मर्जीविरूद्धची गोष्ट आपणास ऐकविली जाऊ शकत नाही. दुसरा अर्थ असा की तुम्ही या पात्रतेचे नाहीत की काही तुम्हाला ऐकविले जावे. आणखी एक अर्थ असा की ईश्वर करो तुम्ही बहिरे व्हावे.

**४८)** याचे स्पष्टीकरण सूरह बकरा टीप. क्र. ३६ मध्ये झालेले आहे.



हे लोकहो ज्यांना ग्रंथ दिला गेला होता! मान्य करा त्या ग्रंथाला जो आता आम्ही अवतरला आहे आणि जो त्या ग्रंथाची सत्यता प्रमाणित करतो व समर्थन करतो जो तुमच्याजवळ अगोदरपासूनच उपलब्ध होता. यावर श्रद्धा ठेवा या अगोदर की आम्ही चेहरे विद्रूप करून मागे फिरवावे किंवा त्यांना त्याचप्रकारे धि:कारित करावे ज्याप्रकारे सब्तवाल्याशी (शनिवार न पाळणाऱ्यांशी) केले होते आणि लक्षात ठेवा की अल्लाहचा आदेश लागू होतच असतो अल्लाह केवळ त्याच्यासोबत अन्य कुणाला सामील करणाऱ्यांना क्षमा करीत नाही. याव्यतिरिक्त इतर जितके गुन्हे आहेत तो हवे ते माफ करतो, अल्लाहबरोबर ज्याने इतर कोणाला भागीदार केले त्याने तर एक मोठे असत्य रचले आणि भयंकर मोठ्या पापाची गोष्ट केली. (४७-४८)

तुम्ही त्या लोकांनासुद्धा पाहिले आहे काय जे स्वत: फार फार शुद्धात्मा असल्याचा दावा करतात? वास्तविक पाहता शुद्धता तर अल्लाहच ज्याला इच्छितो त्याला प्रदान करतो, आणि त्यांच्यावर तिळमात्र जुलूम केला जात नाही. पाहा तर खरे, हे अल्लाहबद्दल देखील खोटे कुभांड रचण्यास चुकत नाहीत आणि यांच्या स्पष्टपणे गुन्हेगार असण्यास एवढा एकच गुन्हा पुरेसा आहे. (४९-५०)

तुम्ही त्या लोकांना पाहिले नाही काय ज्यांना ग्रंथाच्या ज्ञानातून काही भाग दिला गेला आहे आणि त्यांची दशा अशी आहे की ते मिथ्या[४९] व तागूत[५०] (मर्यादेबाहेर जाणारा) ला मानतात. आणि अश्रद्धावंतांच्या बाबतीत म्हणतात की श्रद्धा ठेवणाऱ्यांपेक्षा तर हेच अधिक सन्मार्गावर आहेत.[५१] असेच लोक आहेत ज्यांचा अल्लाहने धिक्कार केला आहे आणि ज्याचा अल्लाहने धिक्कार केला मग त्याचा कोणीही सहायक तुम्हाला आढळणार नाही. राज्यात यांचा काही वाटा आहे काय? जर असे असते तर यांनी इतरांना एक फुटकी कवडीदेखील दिली नसती. मग काय हे इतरांशी याकरिता मत्सर करतात की अल्लाहने त्यांना आपल्या कृपेने उपकृत केले जर ही गोष्ट आहे तर यांना माहीत असावे की आम्ही तर इब्राहीम (अ.) च्या संततीस ग्रंथ व विवेक प्रदान केले व महान राज्य प्रदान केले. परंतु त्यांच्यापैकी काहींनी त्यावर श्रद्धा ठेवली व काही पराङ्‌मुख झाले, आणि

**४९)** अरबी शब्द 'जिब्त'चा मूळ अर्थ अवास्तव, बिनबुडाची आणि व्यर्थ गोष्ट असा होतो. इस्लामी परिभाषेत, जादू, ज्योतिष, फालगिरी, जादूटोणा- चेटुकी, शकून आणि मुहूर्त पाहणे व इतर सर्व भ्रामक व काल्पनिक गोष्टींना जिब्त म्हणून संबोधिले गेले आहे.

**५०)** स्पष्टीकरणासाठी पहा सूरह बकरा, टीप क्र. ८९-९०

**५१)** याठिकाणी अश्रद्धावंतांनी- अभिप्रेत आहेत अरब अनेकेश्वरवादी.

विमुख होणाऱ्यांकरिता तर केवळ नरकाचा भडकणारा अग्नीच पुरेसा आहे.[५२] ज्या लोकांनी आमची संकेतवचने मानण्यास नकार दिला आहे त्यांना खचितच आम्ही अग्नीत झोकून देऊ आणि जेव्हा त्यांच्या शरीराची त्वचा गळून पडेल तेव्हा त्या जागी दुसरी त्वचा निर्माण करू जेणेकरून ते प्रकोपाचा खूपच आस्वाद घेतील, अल्लाह खूप समर्थ आहे आणि आपल्या निर्णयांना अंमलात आणण्याची हिकमत चांगल्या प्रकारे जाणतो. आणि ज्या लोकांनी आमची संकेतवचने मान्य केली आणि सत्कृत्ये केली त्यांना आम्ही अशा उद्यानात दाखल करू ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील, जेथे ते सदासर्वदा राहतील आणि त्यांना पवित्र भार्या मिळतील आणि त्यांना आम्ही दाट छायेत ठेवू. (५१-५७)

मुसलमानांनो! अल्लाह तुम्हाला आज्ञा देतो की ठेवी ठेवीदारांच्या स्वाधीन करा, आणि जेव्हा लोकांदरम्यान न्यायनिवाडा कराल तेव्हा न्यायाने निवाडा करा[५३] अल्लाह तुम्हाला उत्तम उपदेश देत आहे आणि नि:संशय अल्लाह सर्वकाही ऐकतो व पाहतो. (५८)

हे श्रद्धावंतानो! आज्ञापालन करा अल्लाहचे, आज्ञापालन करा पैगंबराचे, आणि

**५२)** हे विसरायला नको की याठिकाणी उत्तर बनीइस्राईल लोकांच्या मत्सरी गोष्टींचे दिले जात आहे. या उत्तराचा अर्थ असा की तुम्हा लोकांचा जळफळाट होत आहे तरी कोणत्या गोष्टीसाठी? तुम्हीसुद्धा इब्राहीम (अ.) ची संतती आहात व हे इस्माईलवंशीसुद्धा इब्राहीम (अ.) चीच संतती आहेत. इब्राहीम (अ.) ला जगाच्या नेतृत्वाचे वचन आम्ही दिले होते, ते इब्राहीम (अ.) च्या लोकांपैकी केवळ त्या लोकांसाठी होते जे आम्ही पाठविलेल्या ग्रंथाचे व हिकमत (प्रगल्भ बोध) चे अनुसरण करतील. हा ग्रंथ व ही हिकमत अगोदर आम्ही तुमच्याजवळ पाठविली होती परंतु ही तुमचीच नालायकी होती की तुम्ही त्यापासून विमुख बनलात. आता हीच वस्तू आम्ही इस्माईली वंशजांना दिली आहे. हे त्यांचे सुदैव आहे की त्यांनी त्यावर ईमान आणले आहे.

**५३)** म्हणजे बनीइस्राईल ज्या बुराईमध्ये गुरफटले होते तुम्ही त्यांच्यापासून दूर रहा. बनीइस्राईलच्या मूलभूत चुकांपैकी एक अशी की त्यांनी आपल्या अधोगतीच्या काळात 'अमानती' म्हणजे जबाबदारीची पदे आणि धार्मिक नेतृत्व व राष्ट्रीय सरदारकीचे हुद्दे अशा लोकांना देण्यास सुरुवात केली जे अपात्र, हलकट वृत्तीचे, नीतीहीन, बेईमान आणि दुराचारी होते. परिणाम असा निघाला की वाईट लोकांच्या नेतृत्वात संपूर्ण राष्ट्र वाईट बनत गेले. मुसलमानांना सूचना दिली जात आहे की तुम्ही तसे करू नये. बनीइस्राईलचा दुसरा मोठा दोष असा होता ते न्यायाच्या गाभ्यास मुकले होते. ते व्यक्तिगत तसेच राष्ट्रीय स्वर्थापोटी नि:संकोचपणे ईमान गिळंकृत करीत असत. उघड हट्टीपणाचा अवलंब करीत असत. न्यायाच्या गळ्यावर सुरी चालविण्यात त्यांना यत्किंचित देखील संकोच वाटत नसे. सर्वोच्च अल्लाह मुसलमानांना आदेश देत आहे की तुम्ही एखाद्या वेळेस अन्यायी बनू नये. बात बोलाल तेव्हा कोणत्याही परिस्थितीत न्यायाची बोला व निर्णय द्याल तेव्हा न्यायपूर्ण निर्णय द्या, मग एखाद्याशी दोस्ती असो वा दुश्मनी.



त्या लोकांचे जे तुमच्यापैकी आज्ञाधिकारी असतील. मग जर तुमच्या दरम्यान एखाद्या बाबतीत वाद निर्माण झाला तर त्याला अल्लाह व पैगंबराकडे न्या.[५४] जर तुम्ही खरोखरच अल्लाह व अंतिम दिनावर श्रद्धा बाळगत असाल. हीच एक योग्य कार्यपद्धती आहे आणि शेवटाच्या दृष्टीने देखील अधिक चांगली आहे. (५९)

हे नबी (स.)! तुम्ही पाहिले नाही काय त्या लोकांना जे दावा तर करतात की आम्ही श्रद्धा ठेवतो आहोत त्या ग्रंथावर जे तुमच्याकडे अवतरविले गेले आहे आणि त्या ग्रंथावर जे तुमच्याअगोदर अवतरविण्यात आले होते परंतु इच्छितात असे की आपल्या बाबींचा निवाडा करण्यासाठी तागूतकडे (विद्रोही लोक) रुजू व्हावेत. वस्तुत: त्यांना तागूतशी द्रोह करण्याचा आदेश देण्यात आला होता.[५५] शैतान त्यांना भटकवून सरळ मार्गापासून फार लांब नेऊ इच्छितो. आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की या, त्या गोष्टीकडे, जी अल्लाहने अवतरली आहे आणि या, पैगंबराकडे, तेव्हा तुम्ही या दांभिकांना पाहता की हे तुमच्याकडे येण्याचे टाळतात. मग तेव्हा काय होते जेव्हा यांनी स्वहस्ते ओढवून घेतलेले संकट यांच्यावर कोसळते? त्या वेळेस हे तुमच्याजवळ शपथा घेत येतात आणि सांगतात की ईश्वराची शपथ, आम्ही तर केवळ भले इच्छित होतो आणि आमची मनिषा तर अशी होती की उभयपक्षात कोणत्या न कोणत्या प्रकारे समेट व्हावा अल्लाह जाणतो जे काही

**५४)** सदरहू आयत इस्लामच्या संपूर्ण धार्मिक, सांस्कृतिक आणि राजकीय व्यवस्थेचा पाया आणि इस्लामी राज्यघटनेचे सर्वात पहिले कलम आहे. यात निम्नलिखित चार कायमस्वरूपी तत्त्वे घालू दिलेली आहेत. (१) इस्लामी व्यवस्थेत वास्तविक आज्ञावंद्य सर्वोच्च अल्लाह आहे. एक मुसलमान सर्वप्रथम ईश्वराचा दास आहे. बाकी जे काही आहे ते त्यानंतर आहे. (२) इस्लामी राज्याचे दुसरे मूलाधार पैगंबरांचे आज्ञापालन आहे. (३) वर उल्लेखित दोन्ही आज्ञापालनानंतर व त्यांच्या ताब्याखाली तिसरी आज्ञाधारकता म्हणजे स्वत: मुसलमानांपैकी जे आज्ञाधिकारी (उलिल अम्र) असतील, त्यांची आहे. 'उलिल अम्र'च्या अर्थात जे मुसलमानांच्या सामुदायिक बाबींची कार्यधुरा वाहणारे असतील, मग ते इस्लामी विद्वान-उलेमा- असोत अथवा राजनैतिक मार्गदर्शन करणारे नेते असोत, किंवा देशाची व्यवस्था पाहणार अधिकारी, न्याय निवाडे करणारे न्यायाधीश असोत अथवा सांस्कृतिक व सामाजिक मामल्यात जातजमाती, वस्ती आणि मोहल्यांचे नेतृत्व करणारे म्होरके अथवा सरदार असोत, हे सर्व लोक यात समाविष्ट आहेत. (४) ईश्वराची आज्ञा आणि पैगंबरांची पद्धत मूलभूत कायदा आणि अंतिम प्रमाण आहेत. मुसलमानांदरम्यान किंवा सरकार व जनतेदरम्यान ज्या कोणत्या प्रश्नावर वाद निर्माण होईल त्याच्या न्याय निवाड्यासाठी कुरआन आणि सुन्नाह (पैगंबरी पद्धत) कडे रुजू केले जाईल व तेथून जो निर्णय प्राप्त होईल त्याच्यासमोर सर्व मान तुकवतील.

**५५)** याठिकाणी स्पष्टपणे 'तागुत'ने अभिप्रेत, ईश्वरी कायद्याशिवाय इतर एखाद्या कायद्यानुसार निर्णय देणारा शासक आहे. तसेच जी अल्लाहच्या सर्वोच्च सत्तेच्या आज्ञाधीनही राहात नाही व त्याच्या ग्रंथाला अंतिम प्रमाणही मान्य करीत नाही अशी न्यायव्यवस्थाही आहे.

यांच्या मनांत आहे, यांच्याकडे लक्ष देऊ नका. यांची समजूत घाला व असा उपदेश द्या जो यांच्या अंत:करणात उतरावा. (यांना सांगा की) आम्ही जो कोणी प्रेषित पाठविला आहे. याकरिताच पाठविला की अल्लाहच्या आदेशांच्या आधारावर त्याची आज्ञा पाळली जावी. जर यांनी ही पद्धत अंगिकारिली असती की जेव्हा हे स्वत:वर अत्याचार करून बसले होते तेव्हा तुमच्यापाशी आले असते आणि अल्लाहजवळ क्षमायाचना केली असती आणि प्रेषितांनी देखील माफीची दरखास्त केली असती, तर नि:संशय अल्लाह यांना क्षमा करणारा व कृपा करणारा आढळला असता. नाही, हे मुहम्मद (स.)! तुमच्या पालनकर्त्याची शपथ, हे कधीही श्रद्धावंत होऊ शकत नाहीत, जोपर्यंत आपल्या वादग्रस्त प्रश्नात हे तुम्हाला निर्णय देणारा मान्य करीत नाहीत. मग जो काही निर्णय तुम्ही द्याल त्यावर आपल्या मनांत देखील काही संकोच वाटू नये तर पूर्णत: मान्य करावे. जर आम्ही यांना आज्ञा दिली असती की आत्मघात करा अथवा आपल्या घरातून निघून जा तर यांच्यापैकी थोड्याच लोकांनी त्याची अंमलबजावणी केली असती. वास्तविक पाहता जो उपदेश यांना दिला जात आहे जर यांनी ते अमलात आणले असते तर हे यांच्यासाठी अधिक हितकारक व अधिक दृढतेचे कारण बनले असते. आणि जेव्हा यांनी असे केले असते तर आम्ही यांना आपल्याकडून फार मोठा मोबदला दिला असता. आणि यांना सरळमार्ग दाखविला असता. जे लोक अल्लाह आणि अल्लाहच्या पैगंबरांची आज्ञापालन करणारे लोक त्यांच्या समवेत असतील ज्यांना अल्लाहने आपल्या कृपाप्रसादाने अनुग्रहित केले आहे. अर्थात, नबी (प्रेषित), सत्यवचनी, शहीद व सदाचारी लोक.[५६] आणि किती चांगले मित्र आहेत हे! ही वास्तविक कृपा आहे जी अल्लाहकडून प्रदान होते आणि वास्तविकता समजण्याकरिता केवळ अल्लाहचे ज्ञानच पुरेसे आहे. (६०-७०)

हे श्रद्धावंतांनो! संघर्षासाठी सदैव सज्ज राहा, मग जसा प्रसंग असेल तसे वेगवेगळ्या तुकड्यांच्या स्वरूपात निघा अथवा एकत्र होऊन,[५७] होय, तुम्हामध्ये कोणी असादेखील आहे जो लढाईपासून अंग काढतो, जर तुमच्यावर एखादे संकट आले तर म्हणतो की अल्लाहने माझ्यावर मोठी कृपा केली की मी या लोकांबरोबर गेलो नाही, आणि जर अल्लाहकडून तुमच्यावर कृपा झाली तर म्हणतो– जणू काय तुमच्या व त्याच्या दरम्यान प्रेमाचे काही संबंधच नव्हते - मीदेखील त्यांच्याबरोबर असतो तर किती मोठे काम साधले असते. (अशा लोकांना माहीत असावे की) अल्लाहच्या मार्गात लढाई केली

**५६)** याचा अर्थ असा की परलोकात ते या लोकांसमवेत असतील. हा अर्थ नव्हे की यांच्यापैकी एखादा आपल्या या कृत्यामुळे प्रेषित देखील बनेल.

**५७)** हे लक्षात असावे की जेव्हा उहुदच्या पराभवामुळे सभोवतालच्या प्रदेशातील टोळ्यांचे साहस वाढले होते व मुसलमान सर्व बाजूंनी संकटात वेढले गेले होते त्या काळात हा फर्मान उतरला होता.



पाहिजे, त्या लोकांनी जे पारलौकिक जीवनाच्या बदल्यात ऐहिक जीवनाचा सौदा (विक्री) करतात, मग जो अल्लाहच्या मार्गात लढेल आणि मारला जाईल अथवा वरचढ राहील त्याला आम्ही अवश्य महान मोबदला प्रदान करू. मग काय कारण आहे की तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या असहाय पुरुष स्त्रियां आणि मुलांकरिता लढू नये ज्यांचे दुर्बल असल्यामुळे दमन केले गेले आहे आणि धावा करीत आहेत की, हे पालनकर्त्या! आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ ज्याचे रहिवाशी अत्याचारी आहेत, आणि तुझ्याकडून आमचा एखादा वाली व सहायक निर्माण कर.[५८] ज्या लोकांनी श्रद्धेचा मार्ग अवलंबिला आहे ते अल्लाहच्या मार्गात लढतात आणि ज्यांनी अश्रद्धेचा मार्ग अवलंबिला आहे ते तागूतच्या (विद्रोही लोकांच्या) मार्गात लढतात, तर शैतानाच्या साथीदारांशी लढा आणि खात्री बाळगा की शैतानाची कारस्थाने खरे पाहता अत्याधिक दुर्बल आहेत. (७१-७६)

तुम्ही त्या लोकांनादेखील पाहिले आहे का ज्यांना सांगण्यात आले होते की आपले हात रोखून ठेवा, आणि नमाज कायम करा व जकात अदा करा? आता जेव्हा त्यांना लढाईचा आदेश दिला गेला तर त्यांच्यापैकी एका गटाची अवस्था अशी आहे की लोकांना असे भीत आहेत जसे अल्लाहला भ्यायले पाहिजे अथवा याहूनही काही अधिक, म्हणतात, हे परमेश्वरा! हा आम्हावर लढाईचा आदेश का लादलास? आम्हाला आणखी सवलत का दिली नाहीस? यांना सांगा, ऐहिक जीवनाचे भांडवल फार थोडे आहे आणि परलोक ईशपरायण माणसाकरिता अधिक उत्तम आहे आणि तुम्हावर जुलूम तिळमात्रदेखील केला जाणार नाही.[५९] उरला मृत्यू तर जेथे कोठे तुम्ही असाल तो कोणत्याही परिस्थितीत तुम्हाला येणारच, मग तुम्ही कितीही मजबूत इमारतीत असा.

(७७-७८-)

जर त्यांना एखादा लाभ पोहचतो तर म्हणतात की हा अल्लाहकडून आहे आणि जर एखादे नुकसान झाले तर म्हणतात की हे नबी (स.), हे तुमच्यामुळे आहे, सांगा की सर्वकाही अल्लाहकडूनच आहे. या लोकांना झाले तरी काय की कोणतीच गोष्ट यांच्या लक्षात येत नाही? हे माणसा, तुला जी कोणती भलाई प्राप्त होते अल्लाहच्या कृपेने होते आणि जी संकटे तुझ्यावर ओढवतात ती तुझ्या स्वत:च्याच कृत्यामुळे होय.

(-७८-७९-)

**५८)** संकेत आहे त्या अत्याचारपीडित मुले, स्त्रिया आणि पुरुषांकडे ज्यांनी मक्केत व इतर टोळ्यांत इस्लाम स्वीकारलेला होता परंतु हिजरत करून मदीना येण्याचे सार्मथ्य त्यांच्यात नव्हते, व स्वत:ला अत्याचारापासून वाचवूही शकत नव्हते. हे बिचारे नाना तऱ्हेने छळले जात होते. ते प्रार्थना करीत असत की कोणी येऊन त्यांना या अत्याचारापासून वाचवावे.

**५९)** म्हणजे जरी तुम्ही ईश्वराच्या दीन-धर्माची सेवा केली व त्याच्या मार्गात प्राण पणाला लावले तरी ईश्वरापाशी तुमचा मोबदला वाया जाईल हे शक्य नाही.

हे मुहम्मद (स.), आम्ही तुम्हाला लोकांसाठी पैगंबर बनवून पाठविले आहे आणि यासाठी अल्लाहची साक्ष पुरेशी आहे. ज्याने पैगंबराची आज्ञा पाळली त्याने खरे म्हणजे अल्लाहचे आज्ञापालन केले आणि जो पराड्‌मुख झाला तर आम्ही तुम्हाला या लोकांवर पहारेकरी म्हणून तर पाठविले नाही. (-७९-८०)

ते तोंडावर म्हणतात की, आम्ही आज्ञाधारक आहोत. पण जेव्हा ते तुमच्यापासून निघून जातात तेव्हा त्यांच्यापैकी एक गट रात्री एकत्र होऊन तुमच्या गोष्टींविरूद्ध सल्लामसलत करतो. अल्लाह त्यांच्या या सर्व कुजबूजींची नोंद घेत आहे. तुम्ही त्यांची पर्वा करू नका आणि अल्लाहवर भीस्त ठेवा, तोच भीस्त ठेवण्यास पुरेसा आहे काय हे लोक कुरआनवर विचार करीत नाहीत? जर हे अल्लाहशिवाय अन्य कोणाकडून असते तर यांत पुष्कळसा विसंवाद आढळला असता.[६०] (८१-८२)

जेव्हा त्यांच्यापर्यंत शांततेची किंवा धोक्याची बातमी पोहचते तेव्हा हे तिचा (सर्वत्र) प्रसार करतात. जर त्यांनी पैगंबर आणि जबाबदार लोकांसमोर निवेदन केले असते तर त्यांच्यातील जाणकार लोकांनी तिचे स्वरूप जाणून अचूक निष्कर्ष काढला असता.[६१] तुम्हा लोकांवर अल्लाहची कृपा व मेहरबानी नसती तर (तुमच्या उणीवा अशा होत्या की) काही मोजक्या व्यक्ती सोडून तुम्ही सर्वजण शैतानच्या नादी लागला असता. (८३)

तर हे नबी (स.), तुम्ही अल्लाहच्या मार्गात लढा, तुम्ही आपल्या स्वत:खेरीज इतर कोणासाठी जबाबदार नाही तथापि श्रद्धावंताना लढण्यासाठी प्रवृत्त करा, दूर नाही की

**६०)** ही वाणी तर स्वत:च साक्ष देत आहे की ती ईश्वराखेरीज अन्य कोणाचीच वाणी असू शकत नाही. कोणत्याही माणसाला इतके सामर्थ्य प्राप्त नाही की वर्षानुवर्षे विभिन्न परिस्थितीत, विभिन्न प्रसंगी, विभिन्न विषयांवर व्याख्यान देत रहावे व प्रथमपासून ते शेवटपर्यंत त्याची सर्व व्याख्याने इतकी सुसंगत, एकरुप आणि समतोल संग्रह बनावे ज्याचा कोणताही भाग दुसऱ्या भागाशी प्रतिकूल नसावा. ज्यात मतांतराचा मागमूसही सापडू नये, ज्यात वक्त्याच्या मनातील निरनिराळ्या स्थितींनी आपले विभिन्न अंतरंग दाखवू नये व ज्यावर कधी फेरनजरचीही काही गरज भासू नये.

**६१)** तो आणीबाणीचा प्रसंग असल्याकारणाने सर्वत्र अफवांचे पीक पसरले होते. कधी धोक्याच्या, बिनबुडाच्या अतिशयोक्तीपूर्ण बातम्या येत व त्यामुळे अकस्मात मदीना व त्याच्या सभोवतालच्या प्रदेशात अस्वस्थता पसरत असे. कधी एखादा धूर्तशत्रू खरा धोका गुप्त ठेवण्यासाठी समाधानाच्या वार्ता धाडीत असे व लोक त्या ऐकून गाफिल होत असत. अशा प्रकारच्या अफवा पसरविण्याचे परिणाम किती दुरगामी असतात, सामान्य लोकांना याची कल्पना नव्हती. एखादी गोष्ट त्यांच्या ऐकिवात आली म्हणजे तिला घेऊन जागोजागी पसरवीत फिरत असत. याच लोकांची या आयतीत निर्भर्त्सना केली गेली आहे व त्यांना कडक शब्दात तंबी दिली गेली आहे की अफवा पसरविण्यापासून त्यांनी दूर राहावे, तसेच त्यांच्यापर्यंत येणारी प्रत्येक बातमी त्यांनी जबाबदार व्यक्तिपर्यंत पोहचवून स्वस्थ रहावे.



अल्लाह अश्रद्धावंतांचा जोर मोडून काढील. अल्लाहचा जोर सर्वात प्रचंड व त्याचे शासन कठोर आहे. जो चांगुलपणाची शिफारस करील त्याला त्यात वाटा मिळेल आणि जो वाईट गोष्टीची शिफारस करील त्याला त्यातून वाटा मिळेल, आणि अल्लाह सर्व गोष्टींवर नजर ठेवणारा आहे. (८४-८५)

आणि जेव्हा एखादा अदबीने तुम्हाला सलाम करील तर त्याला त्यापेक्षाही अधिक चांगल्या प्रकारे उत्तर द्या किंवा कमीतकमी त्याचप्रमाणे, अल्लाह प्रत्येक गोष्टीचा हिशेब घेणारा आहे अल्लाह ज्याच्याशिवाय अन्य कोणीही ईश्वर नाही, तो तुम्हा सर्वांना त्या पुनरुत्थानाच्या दिवशी एकत्र करील ज्याच्या येण्यात कोणताही संशय नाही, आणि अल्लाहच्या वचनापेक्षा अधिक खरी गोष्ट कोणाची बरे असू शकेल? (८६-८७)

मग हे तुम्हाला झाले तरी काय आहे की दांभिकासंबंधी तुमच्यादरम्यान मतभिन्नता किंवा दुमत आढळते वस्तुत: जे दुष्कर्म त्यांनी कमाविले आहे त्यांच्यामुळे अल्लाहने त्यांना परत फिरविले आहे. काय तुम्ही हे इच्छिता की ज्याला अल्लाहने सरळ मार्गावर आणले नाही त्यांना तुम्ही सरळ मार्गावर आणाल? वस्तुत: ज्याला अल्लाहने मार्गभ्रष्ट केले त्याच्यासाठी तुम्हाला कोणताच सन्मार्ग आढळणार नाही. ते तर हे इच्छितात की ज्याप्रमाणे ते स्वत: अश्रद्धावंत आहेत त्याचप्रमाणे तुम्हीही अश्रद्धावंत बनावे, म्हणजे तुम्ही व ते सर्वजण एकसारखेच व्हावे. म्हणून त्यांच्यापैकी कोणालाही आपला मित्र बनवू नका जोपर्यंत ते अल्लाहच्या मार्गात देशांतर (हिजरत) करून येत नाहीत, आणि जर ते स्थलांतरापासून पराड्‌मुख राहतील तर जेथे आढळतील तेथे त्यांना पकडा व ठार करा[६२] आणि त्यांच्यापैकी कोणासही आपला मित्र व सहायक बनवू नका. परंतु ते दांभिक या आदेशाला अपवाद आहेत जे एखाद्या अशा जनसमुदायाला जाऊन मिळतील ज्याच्याशी तुमचा करार आहे,[६३] अशाचप्रकारे ते दांभिक देखील अपवाद आहेत जे तुमच्यापाशी येतात आणि युद्धाविषयी त्यांचे मन खिन्न आहे. ते तुमच्याशीही युद्ध करू इच्छित नाहीत आणि आपल्या लोकांशीही नाही. अल्लाहने इच्छिले असते तर त्यांना तुमच्यावर लादले असते आणि ते देखील तुमच्याशी लढले असते. म्हणून जर ते तुमच्यापासून अलिप्त झाले आणि लढाईपासून दूर राहिले आणि तुमच्याकडे सलोखा व शांतीचा हात पुढे केला तर त्यांच्यावर हात उचलण्याचा कोणताच मार्ग अल्लाहने तुमच्यासाठी ठेवला नाही.

**६२)** मुसलमानांशी युद्ध करीत असलेल्या काफिरांशी ज्यांचे संबंध आहेत आणि इस्लामी राज्याविरूद्ध वैमनस्यपूर्ण कारवायात जे सक्रीय भाग घेत असावेत अशा दांभिक मुसलमानांसाठी ही आज्ञा आहे.

**६३)** याचा अर्थ असा नव्हे की अशा दांभिकांना मित्र व सहायक बनविले जाऊ शकते तर त्यांना पकडले व मारले जाऊ शकत नाही असा याचा अर्थ आहे कारण ज्यांचा इस्लामी राज्याशी करार-मदार आहे अशा एका राष्ट्राला ते जाऊन मिळाले आहेत.

आणखी एका प्रकारचे दांभिक तुम्हाला असे आढळतील जे इच्छितात की तुमच्याकडून देखील अभय लाभावे व आपल्या लोकांकडूनसुद्धा. पण जेव्हा कधी त्यांना उपद्रवाची संधी लाभेल तेव्हा ते त्यात उडी घेतील, असले लोक जर तुमच्याशी दोन हात करण्यापासून दूर राहत नसतील आणि समेट व सुरक्षा तुम्हापुढे सादर करत नसतील व आपले हात आवरत नसतील तर जेथे ते सापडतील त्यांना धरा व मारा, त्याच्यावर हात टाकण्यासाठी आम्ही तुम्हाला उघड अधिकार देऊन टाकला आहे. (८८-९१)

कोणत्याही श्रद्धावंताचे हे काम नव्हे की त्याने दुसऱ्या श्रद्धावंताला ठार करावे जोपर्यंत त्याच्याकडून चूक घडत नाही. आणि जी व्यक्ती एखाद्या श्रद्धावंताला चुकून ठार करील तर त्याचे प्रायश्चित हे आहे की तिने एका श्रद्धावंताला गुलामीतून मुक्त करावे.[६४] आणि ठार झालेल्या व्यक्तीच्या वारसांना खुनाबद्दल भरपाई द्यावी.[६५] परंतु त्याला अपवाद तो की जो खुनाची किंमत माफ करील, परंतु जर ठार झालेला तो मुसलमान एखाद्या अशा जनसमुदायापैकी असेल ज्याच्याशी तुमचे शत्रुत्व आहे तर त्याचे प्रायश्चित्त एक श्रद्धावंत गुलाम मुक्त करणे होय, आणि जर तो एखाद्या अशा मुस्लिमेतर जनसमुदायापैकी असेल ज्याच्याशी तुमचा करार आहे तर त्याच्या वारसांना खुनाबद्दल भरपाई द्यावी आणि एका

**६४)** ठार झालेला इसम मुसलमान असल्या कारणाने त्याच्या हत्येचे प्रायश्चित एका मुसलमान गुलामाला मुक्त करणे ठरविले गेले आहे.

**६५)** पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी खुनाच्या दंडाचे प्रमाण शंभर उंट, अथवा दोनशे गाई, अथवा दोन हजार शेळ्या ठरविले आहे. जर दुसऱ्या एखाद्या स्वरूपात एखादा इसम खुनाचा दंड देऊ इच्छित असेल तर त्याचे प्रमाण सदरहू वस्तूंच्याच बाजारी किमतीनुसार ठरविले जाईल. उदा. पैगंबर (स.) यांच्या काळात खुनाचा दंड भरणाऱ्यासाठी आठशे दीनार अथवा आठ हजार दिरहम निश्चित होते. जेव्हा हजरत उमर (रजि.) यांचा काळ आला तेव्हा त्यांनी फर्माविले की, आता उंटांची किंमत वाढली आहे म्हणून आता सोन्याच्या नाण्यात एक हजार दीनार, अथवा चांदीच्या नाणयात बारा हजार दिरहम खुनाचा दंड देवविला जाईल. परंतु खुनाच्या दंडासाठी निश्चित केलेले हे प्रमाण हेतुपुरस्सर केलेल्या खुनाबद्दल नव्हे तर चुकून झालेल्या खुनाबद्दल आहे हे लक्षात असावे.



श्रद्धावंत गुलामाला मुक्त करावे लागेल.[६६] परंतु ज्याला गुलाम आढळले नाही त्याने लागोपाठ दोन महिन्याचे उपवास करावेत.[६७] ही या गुन्ह्यासाठी अल्लाहसमोर तौबा (पश्चात्ताप) करण्याची रीत आहे,[६८] आणि अल्लाह ज्ञानी व बुद्धिमान आहे. उरली गोष्ट त्या व्यक्तीची की जो एखाद्या श्रद्धावंताला जाणूनबुजून ठार करील तर त्याचा मोबदला नरक आहे ज्यात तो सदैव राहील त्याच्यावर अल्लाहचा प्रकोप आणि त्याचा धिक्कार आहे आणि अल्लाहने त्याच्यासाठी कठोर शिक्षा तयार ठेवली आहे. (९२-९३)

हे श्रद्धावंतांनो, जेव्हा तुम्ही अल्लाहच्या मार्गात लढण्यासाठी निघाल तेव्हा मित्र व शत्रू यांच्या मधील फरक जाणून घ्या. आणि जो तुमच्या शांतीसाठी प्रार्थना करील त्याला म्हणू नका की तू श्रद्धावंत नाहीस, जर तुम्ही दुनियेतील लाभाची इच्छा करीत असाल तर अल्लाहजवळ तुमच्यासाठी पुष्कळशी संपत्ती (माले गनिमत) आहे. बरे ह्याच स्थितीत तुम्ही स्वत: देखील तर यापूर्वी गुरफटून गेलेला होता, नंतर अल्लाहने तुमच्यावर उपकार केले,

**६६)** सदरहू आयतीमधील आज्ञेचा सारांश असा, जर ठार झालेला इसम दारुल इस्लाम- इस्लामी राज्याचा रहिवाशी असेल तर त्याच्या मारेकऱ्याला खुनाची किंमतही भरावी लागेल आणि अल्लाहशी आपल्या गुन्ह्याबद्दल क्षमायाचनेसाठी एक गुलाम देखील मुक्त करावा लागेल. जर ठार झालेला दारुल हरब- शत्रू राष्ट्राचा रहिवाशी असेल तर मारेकऱ्याला केवळ एक गुलाम मुक्त करावा लागेल. त्याला खुनाची किंमत काहीच भरावी लागणार नाही. जर तो एखाद्या अशा दारूल कुफ्र- काफिर राष्ट्राचा रहिवाशी असेल ज्याच्याशी इस्लामी राज्याचा करार झाला असेल तर मारेकरल्याला एक गुलाम मुक्त करावा लागेल व त्याशिवाय खुनाची किंमतही भरावी लागेल, परंतु त्या किंमतीचे प्रमाण तेच असेल जे करार झालेल्या राष्ट्राच्या एखाद्या मुस्लिमेतर व्यक्तिला ठार केल्याच्या स्थितीत करारानुसार द्यावी लागत असावी.

**६७)** म्हणजे रोजे लागोपाठ केले पाहिजे. क्रम खंडित होऊ नये. जर एखाद्या व्यक्तीने शरीअतमान्य कारणाविना एक रोजासुद्धा मधेच सोडला तर नव्याने पुन्हा सुरुवातीपासून रोजांचा क्रम सुरू करावा लागेल.

**६८)** म्हणजे हा 'दंड नव्हे तर पश्चात्ताप (तौबा) आणि प्रायश्चित' आहे. दंडात पश्चात्ताप व खेद आणि आत्मसुधारणेची कोणतीही प्रेरणा असत नाही किंबहुना सर्वसाधारणपणे तो अत्यंत नाराजीने निरुपाय म्हणून दिला जात असतो व अप्रियता आणि कटुतेचे शल्य मागे राहते. याउलट सर्वश्रेष्ठ अल्लाह इच्छितो की ज्या दासाकडून अपराध घडला आहे त्याने उपासना, पुण्य कर्म आणि येणारे हक्क अदा करून त्याद्वारे त्या अपराधाच्या कुप्रभावापासून आपला आत्मा स्वच्छ करावा आणि खेद व पश्चात्तापानिशी अल्लाहकडे वळावे जेणेकरून केवळ गुन्हाच माफ व्हावा इतकेच नव्हे तर भावी काळासाठी तो स्वत: देखील अशा प्रकारच्या अपराधांच्या पुनरावृत्तीपासून सुरक्षित राहावा.

म्हणून शहानिशा करून घ्या.[६९] जे काही तुम्ही करता त्याची अल्लाहला खबर आहे. (९४)

मुसलमानांपैकी ते लोक की जे एखाद्या निमित्ताविना घरी बसून राहतात व जे अल्लाहच्या मार्गात प्राण व संपत्तीनिशी जिहाद (प्रयत्नांची पराकाष्टा) करतात, दोघांची स्थिती एकसमान नाही. अल्लाहने बसून राहणाऱ्यापेक्षा प्राण व संपत्तीनिशी युद्ध करणाऱ्यांचा दर्जा श्रेष्ठ ठेवला आहे असे अल्लाहने प्रत्येकासाठी भलाईचेच वचन दिले आहे परंतु त्याच्याजवळ जिहाद करणाऱ्यांच्या सेवेचा मोबदला बसून राहणाऱ्यांपेक्षा फार जास्त आहे, त्यांच्यासाठी अल्लाहकडून मोठे दर्जे आहेत आणि क्षमा व कृपा आहे आणि अल्लाह मोठा माफ करणारा व दया करणारा आहे. (९५-९६)

जे लोक आपणच स्वत:वर अत्याचार करीत राहिले होते[७०] त्यांचे आत्मे जेव्हा दूतांनी कब्जात घेतले तेव्हा त्याना विचारले की तुम्ही या कसल्या दशेत गुरफटला होता?

---

**६९)** इस्लामच्या प्रारंभीच्या काळी अस्सलाम अलैकुम हा शब्द मुसलमानांसाठी परंपरा आणि ओळखचिन्ह म्हणून असे. तसेच एक मुसलमान दुसऱ्या मुसलमानाला पाहून, मी तुमच्याच समुहापैकी एक आहे, मित्र आणि हितचिंतक आहे, शत्रू नव्हे, याच अर्थाने त्याचा प्रयोग करीत असे. विशेषकरून त्याकाळी या परंपरेचे महत्व या कारणास्तवसुद्धा अधिक होते की त्यावेळी अरबस्तानातील नवमुस्लिम आणि मुस्लिमेतरांच्या दरम्यान पोषाख, भाषा व दुसऱ्या कोणत्याही बाबतीत काही विशेष फरक नव्हता. जेणेकरून एका दृष्टिक्षेपात एका मुसलमानाने दुसऱ्या मुसलमानाला ओळखू शकावे. परंतु युद्धाच्या वेळी एक अडचण अशी उद्भवत असे की मुसलमान जेव्हा एखाद्या शत्रू गटावर हल्ला करीत असत व एखादा मुसलमान देखील त्यात सापडत असे तेव्हा मुसलमानांना हे दाखविण्यासाठी की तो त्याचाच धर्मबंधू आहे, तो मुसलमान 'अस्सलाम अलैकुम' अथवा 'लाइलाहाइलल्लाह' मोठ्याने उद्गारत असे. परंतु तो एखादा मुस्लिमेतरच आहे व केवळ आपले प्राण वाचविण्यासाठी तो कावेबाजी करीत आहे अशी शंका मुसलमानांना येत असे म्हणून काही वेळा ते त्याला ठार करीत असत. आयतीतील हेतू असा की जो इसम स्वत:ला मुसलमान म्हणून दर्शवित आहे, तो केवळ प्राण वाचविण्यासाठी खोटे बोलतो आहे, त्याच्याबाबतीत अशा ढोबळ स्वरूपाचा निर्णय देण्याचा तुम्हाला अधिकार नाही, तो खरा असणे हेही शक्य आहे व खोटा असणे हेही शक्य आहे. वस्तुस्थिती तर शहानिशा करुनच माहीत होऊ शकते. शहानिशा केल्याविना सोडून देण्यात जरी हे संभव आहे की खोटे बोलून एखाद्या काफिराने आपला जीव वाचवावा तर ठार करण्यात एखादा निरपराध मुसलमान तुमच्या हाताने मारला जावा अशीही शक्यता आहे.

**७०)** इस्लाम स्वीकारल्यानंतरसुद्धा कसल्याही लाचारी व निरुपायाच्या स्थितीविना आपल्या मुस्लिमेतरांत राहात होते व निम्मे इस्लामी तर निम्मे बिगरइस्लामी जीवन व्यतीत करण्यावर जे राजी होते, असले लोक अभिप्रेत आहेत. वास्तविकपणे एक दारूल इस्लाम उपलब्ध होते, त्याकडे हिजरत करून आपल्या धर्म व श्रद्धेनुसार पूर्णपणे इस्लामी जीवन जगणे त्यांच्यासाठी शक्य झाले होते. आपला ईमान वाचविण्यासाठी त्यांनी दारूल इस्लामकडे हिजरत करावी असे त्यांना आवाहनही केले गेले होते.



त्यांनी उत्तर दिले की, आम्ही पृथ्वीवर निर्बल व विवश होतो. दूतांनी सांगितले की अल्लाहची पृथ्वी विशाल नव्हती काय की तुम्ही देशांतर करून दुसरीकडे जावे? अशा लोकांचे ठिकाण नरक आहे. आणि ते फारच वाईट ठिकाण आहे. परंतु जे पुरुष, ज्या स्त्रिया व जी मुले खरोखरच विवश आहेत आणि देशांतराचा कोणताच मार्ग आणि साधन सापडत नाही, हे दूर नव्हे की अल्लाह त्यांना माफ करील. अल्लाह मोठा माफ करणार व क्षमा करणारा आहे. जो कोणी अल्लाहच्या मार्गात देशांतर करील तो पृथ्वीवर आश्रय घेण्यासाठी मुबलक जागा व उदरनिर्वाहासाठी मोठी सुबत्ता प्राप्त करील आणि जो आपल्या घरातून अल्लाह व पैगंबराकडे देशांतरासाठी निघाला, नंतर त्याला वाटेतच मृत्यू आला, त्याचा मोबदला अल्लाहच्या जवळ अनिवार्य ठरला, अल्लाह फार क्षमा करणारा व कृपाळू आहे.[७१] (९७-१००)

आणि जेव्हा तुम्ही प्रवासाला निघाल तर याच्यात काही हरकत नाही की तुम्ही नमाजला संक्षिप्त करावे[७२] (विशेषत:) जेव्हा तुम्हाला भीती वाटेल की अश्रद्धावंत तुम्हाला सतावतील कारण ते उघडउघड तुमच्या शत्रुत्वावर आहेत. (१०१)

आणि हे नबी (स.), जेव्हा तुम्ही मुसलमानांच्या दरम्यान असाल आणि (युद्धाच्या स्थितीत) त्यांना नमाज पठण करविण्यासाठी उभे असाल तर हे आवश्यक आहे की त्यांच्यातील एक गट तुमच्याबरोबर उभा रहावा आणि आपले हत्यार घेऊन असावा, नंतर त्याने जेव्हा सजदा केला असेल तेव्हा त्याने पाठीमागे जावे आणि दुसरा गट ज्याने अद्याप नमाज अदा केली नाही, त्याने येऊन तुमच्यासह नमाज अदा करावी आणि त्यानेसुद्धा जागरूक राहावे व सशस्त्र असावे,[७३] कारण अश्रद्धावंत यासाठी टपून आहेत की तुम्ही आपले हत्यार आणि आपले सामानाविषयी थोडे देखील गाफिल झालात तर ते एकदम

---

**७१)** याठिकाणी ही बाब समजून घेतली पाहिजे की जो कोणी अल्लाहच्या 'दीन'वर ईमान आणले असेल त्याच्यासाठी इस्लामेतर व्यवस्थेच्या वर्चस्वाखाली राहून जीवन व्यतीत करणे केवळ दोनच स्थितीत वैध ठरू शकते. एक अशी की त्या भूमिका तो इस्लामचे वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी व इस्लामेतर व्यवस्थेला इस्लामी व्यवस्थेत रुपांतरित करण्यासाठी, ज्याप्रमाणे ईश्वराचे प्रेषित व त्यांचे प्रारंभीचे अनुयायी प्रयत्न करीत राहिले आहेत, त्याचप्रमाणे त्यानेही प्रयत्न करीत रहावे. दुसरी स्थिती म्हणजे खरोखरच तेथून बाहेर निघण्याचा त्याला कोणताही मार्ग मिळत नसावा व अत्यंत अप्रियता व नाराजीने निरुपाय म्हणून तो तेथे राहात असावा.

**७२)** शांततेच्या काळात प्रवासात नमाज संक्षिप्त करणे असे की ज्यावेळेच्या नमाजीत चार रकअत अनिवार्य म्हणून आहेत त्यात दोनच रकआत पढल्या जाव्यात. युद्धाच्या स्थितीत नमाज संक्षिप्त करण्याची मर्यादा ठरलेली नाही. युद्धाच्या स्थितीत जशी काही सवलत मिळेल, नमाज अदा केली जावी.

**७३)** जेव्हा शत्रूच्या हल्ल्याचे भय तर असावे परंतु प्रत्यक्षात लढाईला तोंड फुटले नसावे, अशा भयाच्या स्थितीतील नमाजचा हा आदेश आहे.

तुमच्यावर तुटून पडतील, परंतु जर तुम्हाला पावसामुळे त्रासाचे वाटत असेल अथवा आजारी असाल तर शस्त्र दूर ठेवण्यात काहीही हरकत नाही, तरीसुद्धा जागरूक रहा. विश्वास ठेवा की अल्लाहने अश्रद्धावंतांसाठी अपमानजनक शिक्षा तयार ठेवली आहे. नंतर जेव्हा नमाज आटोपून घ्याल तेव्हा उभे असताना, बसले असताना किंवा पहुडले असताना देखील प्रत्येक स्थितीत अल्लाहचे स्मरण करीत रहा व जेव्हा शांतता लाभेल तर पूर्ण नमाज पठण करा. नमाज वास्तविक पाहता असे अनिवार्य कार्य आहे जे नियमित वेळेसह श्रद्धावंतांसाठी आवश्यक केले गेले आहे. (१०२-१०३)

या गटाचा पाठलाग करण्यात दुबळेपणा दाखवू नका, जर तुम्ही त्रास सहन करीत आहात तर तुमच्याप्रमाणे ते देखील त्रास सहन करीत आहेत. आणि तुम्ही अल्लाहकडून त्या गोष्टीची आशा बाळगता ज्याची आशा ते बाळगीत नाहीत. अल्लाह सर्वकाही जाणतो आणि तो विवेकशील व बुद्धिमान आहे. (१०४)

हे नबी (स.)! आम्ही हा ग्रंथ सत्यानिशी तुमच्याकडे उतरविला आहे की जो सरळ मार्ग अल्लाहने तुम्हाला दाखविला आहे त्यानुसार लोकांमध्ये न्यायनिवाडा करा. तुम्ही अपहार करणारांचे समर्थक बनू नका. अल्लाहजवळ क्षमेची याचना करा, तो मोठा क्षमा करणारा व दयावंत आहे. जे लोक स्वत:शी अप्रामाणिक[७४] असतील तुम्ही त्यांची वकिली करू नका अल्लाहला अप्रामाणिक व दुराचरणी गुन्हेगार पसंत नाहीत. हे लोक माणसापासून आपल्या कारवाया लपवू शकतात परंतु अल्लाहपासून लपवू शकत नाहीत. तो तर त्या वेळेसदेखील यांच्याबरोबर असतो जेव्हा हे रात्री गुप्तपणे त्याच्या मर्जीविरूद्ध सल्लामसलत करतात, यांच्या सर्व कृत्यांना अल्लाहने घेरले आहे. बरे तर तुम्ही लोकांनी या अपराध्यांतर्फे लौकिक जीवनात तर युक्तिवाद केलेत परंतु पुनरुत्थानाच्या दिवशी यांच्यासाठी कोण युक्तिवाद करील? शेवटी त्यांचा तेथे कोण बरे वकील असेल? जर एखाद्या व्यक्तीकडून वाईट कृत्य घडले अथवा आपल्या स्वत:वर अत्याचार केले आणि त्यानंतर अल्लाहजवळ माफीची विनंती केली तर अल्लाह त्याला क्षमा करणारा व कृपा करणारा आढळून येईल. जो वाईट कर्म करील तर त्याची ही कमाई त्याच्याकरिता संकट ठरेल. अल्लाहला सर्व गोष्टीची खबर आहे व तो विवेकशील व बुद्धिमान आहे. मग जो एखादी चूक वा अपराध करून त्याचा आरोप इतर निरपराध व्यक्तींवर लादेल, त्याने तर मोठे कुभांड व उघड पापाचे ओझे शिरावर घेतले. (१०५-११२)

हे नबी (स.)! जर अल्लाहची कृपा तुमच्यावर नसती व त्याची दया तुमच्या सोबत नसती तर त्यांच्यातील एका गटाने तुमचा गैरसमज करण्याचा निश्चय केला होता. खरे पाहता वस्तुस्थिती अशी होती की ते स्वत: आपल्या व्यतिरिक्त इतर कोणाचा गैरसमज

**७४)** जो मनुष्य इतरांशी बेईमानी करतो खरे पाहता तो सर्वप्रथम आपल्या स्वत:शी बेईमानी करीत असतो.



करीत नव्हते, आणि तुमचे काही नुकसान करू शकत नव्हते.[७५] अल्लाहने तुमच्यावर ग्रंथ व विवेक अवतरित केला आहे. आणि तुम्हाला ते सर्वकाही ज्ञात करून दिले आहे जे तुम्हाला माहीत नव्हते, आणि त्याची कृपा तुम्हांवर मोठी आहे. (११३)

लोकांच्या गुप्त कानगोष्टींमध्ये बहुधा काहीही भले असत नाही परंतु होय, जर कोणी दानधर्मासाठी गुप्तरित्या प्रवृत्त केले अथवा एखाद्या पुण्य कार्यासाठी अथवा लोकांच्या व्यवहारात सुधारणा घडवून आणण्यासाठी एखाद्याला काही सांगितले तर अर्थातच ही चांगली गोष्ट आहे, आणि जो कोणी अल्लाहची मर्जी संपादन करण्यासाठी असे करील त्याला आम्ही मोठा मोबदला प्रदान करू. परंतु जो कोणी पैगंबराच्या विरोधात कंबर कसेल आणि श्रद्धावंतांचे मार्गानुकरण करण्याऐवजी इतर मार्गाचे अनुसरण करील तेही अशा परिस्थितीत की त्याच्यावर सरळ मार्ग स्पष्ट झाला असेल तर त्याला आम्ही त्याच मार्गावर चालवू जिकडे तो स्वत: वळला आणि त्याला नरकामध्ये झोकू जे अत्यंत वाईट ठिकाण आहे. (११४-११५)

अल्लाहजवळ फक्त अनेकेश्वरवादासाठी क्षमा नाही, याखेरीज इतर सर्वकाही माफ होऊ शकते, ज्याला तो माफ करू इच्छितो. ज्याने अल्लाहबरोबर इतर कोणाला भागीदार केले तो तर मार्गभ्रष्टतेत फारच लांब भरकटत गेला. ते अल्लाहला सोडून देवदेवतांना उपास्य बनवितात, ते त्या विद्रोही शैतानाला उपास्य[७६] बनवितात, की ज्याला अल्लाहने धिक्कारग्रस्त केले आहे. (ते त्या शैतानाची आज्ञा पाळत आहेत) ज्याने अल्लाहला

**७५)** म्हणजे खोटा अहवाल आणि खोट्या साक्षी पुरवून तुमचा चुकीचा समज करण्यात ते जरी यशस्वी ठरले असते व आपल्या बाजूने न्यायाविरूद्ध निर्णय प्राप्त जरी केला असता तरी नुकसान त्यांचेच होते. तुमचे काहीच बिघडले नसते कारण ईश्वराठायी गुन्हेगार ते ठरले असते तुम्ही नव्हे. जो इसम सत्ताधिकाऱ्याची फसवणूक करून आपल्या बाजूने चुकीचा निर्णय मिळवितो, तो वास्तविकपणे स्वत:ला अशा गैरसमजूतीत टाकत असतो की अशा क्लृप्तींनी वास्तवता त्याच्या बाजूने झाली. वास्तविकपणे प्रत्यक्षात अल्लाहजवळ हक्क ज्याचा आहे त्याचाच राहतो. न्यायाधीशाच्या एखाद्या चुकीच्या समजुतीमुळे निर्णय देण्याने वास्तवतेवर काहीच परिणाम होत नाही.

**७६)** शैतानापुढे उपासनाविधी पार पाडीत असावा, त्याला देवत्व बहाल करीत असावा, या अर्थाने तर त्याला कोणीही उपास्य बनवीत नाही. आणि त्याला उपास्य बनविण्याचा प्रकार असा की माणूस आपल्या वासनेची धुरा शैतानाच्या हातात देतो व जिकडे जिकडे तो हाकत असतो तिकडे चालत असतो. जणू हा त्याचा दास आहे व तो याचा ईश्वर आहे. यावरून असे माहीत झाले की निमूटपणे आज्ञापालन आणि अंधानुकरणाचे नाव देखील उपासना आहे. जो इसम अशा प्रकारचे आज्ञापालन करतो वास्तविकपणे त्या व्यक्तीची उपासना करतो ज्याला त्याने अल्लाहला सोडून आपला वंदनीय बनविले असावे.

सांगितले होते, ''मी तुझ्या दासांकडून एक निश्चित वाटा घेऊनच राहीन,[७७] मी त्यांना बहकवीन, मोहपाशात अडकवीन व मी त्यांना आदेश देईन व ते माझ्या आज्ञेने जनावरांचे कान चिरतील.[७८] व मी त्यांना आज्ञा करीन व ते माझ्या आज्ञेने अल्लाहच्या रचनेत फेरबदल करतील.''[७९] त्या शैतानाला ज्याने अल्लाहऐवजी आपला वाली व पालक बनविला तो उघडपणे तोट्यात आला. तो या लोकांना अभिवचन देतो आणि यांना आशा दाखवितो, परंतु शैतानाची सर्व अभिवचने फसवणुकीशिवाय दुसरे काहीच नाही. या लोकांचे ठिकाण नरक आहे ज्यातून सुटकेचा कोणताही मार्ग यांना सापडणार नाही. उरले ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली व सत्कृत्ये केली तर त्यांना आम्ही अशा उद्यानात दाखल करू ज्यांच्या खालून कालवे वहात असतील आणि ते तेथे सदासर्वदा राहतील. हे अल्लाहचे सत्यवचन आहे, आणि अल्लाहपेक्षा आपल्या वचनात अन्य कोण सच्चा असू शकतो? (११६-१२२)

कर्मफळ तर तुमच्या इच्छेवरही अवलंबून नाही व ग्रंथधारकांच्या इच्छेवरदेखील नाही, जो कोणी दुष्कर्म करील त्याचे तो फळ भोगील आणि अल्लाहच्याविरूद्ध त्याला कोणी समर्थक व सहायक लाभणार नाही आणि जो कोणी सत्कृत्य करील मग तो पुरुष असो अथवा स्त्री जर तो श्रद्धावंत असेल तर असेच लोक स्वर्गामध्ये दाखल होतील

**७७)** म्हणजे त्यांची वेळ, त्यांचे श्रम व त्यांचे प्रयत्न, त्यांच्या शक्ती व त्यांच्या योग्यता, त्यांच्या संपत्ती व त्यांच्या संततीमधून आपला वाटा घेईन, त्यांची फसवणूक करून त्यांना अशा प्रकारे बहकवीन की ते या सर्व वस्तूचा बराचसा भाग माझ्या मार्गात खर्च करतील.

**७८)** अरब लोकांच्या भ्रामक प्रथांपैकी एकीकडे हा संकेत आहे. त्यांच्या येथे अशी प्रथा होती की जेव्हा सांडणी पाच किंवा दहा वेळा वेत होत असे तेव्हा तिचे कान चिरून तिला आपल्या देवाच्या नावाने सोडून देत असत व तिच्याकडून सेवा घेणे हराम समजत असत. त्याचप्रमाणे ज्या उंटाच्या वीर्यापासून दहा पिल्ले जन्माला येत असत त्याला देखील देवाच्या नावाने सोडले जात असे व त्याच्याकडून सेवा घेणे हराम समजले जात असे.

**७९)** ईश्वरी रचनेत फेरफार करण्याचा अर्थ, वस्तूंच्या मूळ रचनेत फेरबदल करणे असे नाही तर वास्तविकपणे या ठिकाणी ज्या फेरबदलाला शैतानी कृत्य ठरविले गेले आहे ते असे की माणसाने एखाद्या वस्तूपासून ते काम घ्यावे ज्यासाठी अल्लाहने तिला निर्मिलेले नाही. तसेच एखाद्या वस्तूपासून ते काम घेऊ नये ज्यासाठी ईश्वराने तिला निर्माण केले आहे. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे सर्व कृत्य माणूस जे आपल्या व वस्तूंच्या प्राकृतिक स्वभावाविरूद्ध करतो तसेच ते सर्व प्रकार ज्यांच्या प्रकृतीशी विमुख होण्यासाठी माणूस अवलंब करीत असतो. सदरहू आयतीनुसार शैतानाच्या मार्गभ्रष्ट करणाऱ्या उत्तेजनाचे परिणाम होय. उदाहरणार्थ, समलिंगी संभोग, संतती नियमन, वैराग्य, ब्रह्मचर्य, पुरुष आणि स्त्रियांना वांझ बनविणे, पुरुषांना खच्ची बनविणे, प्रकृतीने स्त्रियांच्या सुपूर्द ज्या सेवा केल्या आहेत त्यापासून त्यांना विमुख बनविणे आणि समाजजीवनाच्या ज्या क्षेत्रांसाठी पुरुषांना निर्माण केले आहे त्या क्षेत्रात स्त्रियांना ओढणे.



आणि त्यांचा हक्क यत्किंचित देखील हिरावून घेतला जाणार नाही. त्या माणसापेक्षा अन्य कोणाची जीवनपद्धती उत्तम असू शकते ज्याने अल्लाह समोर मान तुकविली आणि आपली वर्तणूक चांगली राखली आणि एकाग्र होऊन इब्राहीम (अ.) च्या पद्धतीचे अनुकरण केले, त्या इब्राहीम (अ.) च्या पद्धतीचे ज्याला अल्लाहने आपला मित्र बनविला होता. आकाशात व पृथ्वीत जे काही आहे ते अल्लाहचे आहे आणि प्रत्येक वस्तू अल्लाहने व्यापिली आहे. (१२३-१२६)

लोक तुमच्याकडे स्त्रियांसंबंधी आदेश विचारतात[८०] सांगा, अल्लाह तुम्हाला त्यांच्यासंबंधी आदेश देतो आणि त्याचबरोबर त्या आदेशांची आठवण करून देतो जे पूर्वीपासून तुम्हाला या ग्रंथात ऐकविले जात आहेत, अर्थात ते आदेश जे त्या अनाथ मुलींच्या संबंधी आहेत ज्यांचे हक्क तुम्ही अदा करत नाही आणि ज्यांचेबरोबर विवाह करण्यापासून दूर राहता (अथवा लालसेपोटी तुम्ही स्वत: त्यांच्याशी विवाह करू इच्छिता[८१]), आणि ते आदेश जे त्या मुलांविषयी आहेत जे बिचारे काहीच बळ राखत नाहीत, अल्लाह तुम्हाला आदेश देतो की अनाथासाठी न्यायावर दृढ रहा आणि जे काही चांगले तुम्ही कराल ते अल्लाहच्या माहितीपासून गुप्त राहणार नाही. (१२७)

जर एखाद्या स्त्रीला[८२] आपल्या पतीकडून वाईट वागणूक अथवा उपेक्षेचे भय असेल तर यामध्ये काहीही हरकत नाही की पतीपत्नी (काही हक्काच्या कमी अधिक

**८०)** ते फतवा काय विचारीत होते हे स्पष्ट केलेले नाही. परंतु आयत क्रमांक १२८ ते १३० यात जो फतवा दिला गेला आहे तेणेकरून प्रश्नांचे स्वरूप लक्षात येते.

**८१)** 'तर्गबून अन तन्किहू हुन्ना' याचा अर्थ 'तुम्ही त्यांच्याशी विवाह करण्याची आवड राखता' असाही होऊ शकतो आणि 'तुम्ही त्यांच्याशी विवाह करणे पसंत करीत नाही' असाही होऊ शकतो.

**८२)** या ठिकाणाहून लोकांच्या प्रश्नांचे उत्तर सुरू होते. प्रश्न असा होतो की एकापेक्षा जास्त पत्नी असण्याच्या स्थितीत न्यायाचा जो हुकूम दिला गेला आहे त्याची अंमलबजावणी कशी करावी जेव्हा की एक पत्नी जन्मभर आजारी आहे किंवा पतीपत्नी संबंधाच्या उपयोगाची राहिली नाही, अशा स्थितीतसुद्धा, दोन्हींच्याकडे समसमान ओढ ठेवावे, दोन्ही पत्नींशी समान प्रेम राखावे, दोन्हींशी समसमान शरीरसंबंध ठेवावा असे त्याच्यासाठी अनिवार्य आहे का? जर तो असे करीत नसेल तर न्यायाची अट पूर्ण करण्याचा तगादा असा आहे का की त्याने दुसरा विवाह करण्यासाठी पहिलीला फारकत द्यावी? तसेच पहिली पत्नी जर स्वत: वेगळी होऊ इच्छित नसेल तर त्या आकर्षण न राहिलेल्या पत्नीने आपल्या काही हक्काचा स्वत:च होऊन त्याग करून पतीला तलाक देण्यापासून परावृत्त करण्यास राजी करावे अशी एखादी तडजोड दांपत्यादरम्यान होऊ शकते का? असे करणे न्यायाच्या अटींविरूद्ध तर ठरणार नाही ना?

प्रमाणावर) परस्पर तडजोड[८३] करतील. तडजोड अधिक चांगली आहे. मने संकुचितपणाकडे शीघ्रतेने वळतात परंतु जर तुम्ही उपकारी वृत्तीने आणि अल्लाहचे भय बाळगून वागाल तर खात्री बाळगा की अल्लाह तुमच्या या कार्यपद्धतीपासून अनभिज्ञ राहणार नाही. पत्नींच्या दरम्यान पुरेपूर न्याय राखणे तुम्हाला शक्य नाही. तुम्ही इच्छिले तरी त्याला तुम्ही समर्थ ठरू शकत नाही. (म्हणून अल्लाहच्या आदेशाचा हेतू साध्य करण्यासाठी हे पुरेसे आहे की) एका पत्नीकडे इतके झुकू नका की दुसरी अधांतरी[८४] राहील. जर तुम्ही आपली वागणूक नीटनेटकी ठेवलीत आणि अल्लाहचे भय बाळगत राहिला तर अल्लाह क्षमाशील आणि कृपा करणारा आहे. परंतु पति-पत्नींनी एकदुसऱ्यापासून फारकत घेतलीच तर अल्लाह आपल्या विशाल सामर्थ्याने प्रत्येकाला दुसऱ्यावर अवलंबून राहण्यापासून मुक्त करील. अल्लाहचे औदार्य अतिविशाल आहे व तो बुद्धिमान व द्रष्टा आहे. आकाशात आणि पृथ्वीत जे काही आहे सर्व अल्लाहचेच आहे. तुमच्यापूर्वी ज्यांना ग्रंथ दिला होता त्यांना देखील हाच आदेश दिला होता आणि आता तुम्हाला देखील हाच आदेश देत आहोत की अल्लाहचे भय बाळगून काम करीत रहा परंतु जर तुम्ही मानत नसाल तर मानू नका, आकाश आणि पृथ्वीतील सर्व वस्तूंचा मालक अल्लाहच आहे व तो निरपेक्ष आहे, सर्वस्तुतीला पात्र. होय अल्लाहच मालक आहे त्या सर्व वस्तूंचा ज्या आकाशात आणि पृथ्वीत आहेत आणि कार्यसिद्धीकरिता केवळ तोच पुरेसा आहे. जर त्याने इच्छिले तर तो तुम्हाला बाजूस सारून तुमच्या जागी इतरांना आणील, आणि यावर त्याचे सर्वस्वी प्रभुत्व आहे. जो कोणी केवळ ऐहिक लाभाचा इच्छुक आहे त्याला माहीत असावे की अल्लाहजवळ ऐहिक लाभ देखील आहे आणि परलोकचा लाभसुद्धा. आणि अल्लाह सर्वकाही ऐकणारा व सर्वकाही पाहणारा आहे.

(१२८-१३४)

हे श्रद्धावंतांनो! न्यायावर दृढ राहणारे आणि अल्लाहसाठी साक्षीदार बना, यद्यपि

**८३)** म्हणजे तलाक व घटस्फोटापेक्षा अशा प्रकारे परस्परात तडजोड करून एका स्त्रीने त्याच पतीसमवेत राहणे ज्याच्यासमवेत तिने आयुष्याचा एक भाग व्यतीत केला आहे, हे अधिक बेहतर आहे.

**८४)** या आयतीवरून काही लोकांनी असा निष्कर्ष काढून घेतला आहे की कुरआन एकीकडे न्यायाच्या अटीसह बहुपत्निकत्वाची परवानगी देतो तर दुसरीकडे न्यायाला केवळ अशक्य ठरवून त्या परवानगीला प्रत्यक्षात रद्दबातल ठरवितो. परंतु वास्तविकपणे असा निष्कर्ष काढण्यासाठी सदरहू आयतीत कोणताच वाव नाही. जर केवळ इतकेच सांगण्यावर पुरे केले असते की 'तुम्ही पत्नीच्या दरम्यान न्याय राखू शकत नाही' तर असा निष्कर्ष काढला जाऊ शकत होता, परंतु त्यानंतरच हे जे फर्मावले गेले की, 'म्हणून एका पत्नीकडेच पूर्णपणे झुकू नका.' या वाक्यामुळे ख्रिस्ती युरोपचे अनुकरण करणारे लोक जो अर्थ काढू इच्छित आहेत त्यासाठी कोणताही वाव राहू दिलेला नाही.



तुमच्या न्यायाचा व तुमच्या साक्षीचा आघात तुम्हा स्वतःवर अथवा तुमच्या आईबापावर व नातेवाईकांवर जरी होत असेल तरी देखील मामल्यातील पक्षकार मग तो श्रीमंत असो अथवा गरीब, अल्लाह तुमच्यापेक्षा जास्त त्यांचा हितचिंतक आहे. म्हणून आपल्या मनोवासनेच्या अनुकरणात न्यायापासून दूर राहू नका आणि जर तुम्ही पक्षपाताची गोष्ट बोललाच अथवा सत्याला बगल दिली तर समजून असा की जे काही तुम्ही करता अल्लाहला त्याची माहिती आहे. (१३५)

हे श्रद्धावंतांनो! श्रद्धा ठेवा अल्लाहवर त्याच्या पैगंबरावर आणि त्या ग्रंथावर जो अल्लाहने आपल्या पैगंबरावर उतरविला आहे आणि प्रत्येक त्या ग्रंथावर जो यापूर्वी त्याने उतरविला आहे.[८५] ज्याने अल्लाह आणि त्याचे दूत व त्याचे ग्रंथ आणि त्याचे प्रेषित आणि अंतिम निवाड्याच्या दिवसावर श्रद्धा ठेवली नाही (कुफ्र),[८६] तो मार्गभ्रष्टतेत भरकटून फार दूर निघाला. ज्यांनी श्रद्धा ठेवली, मग द्रोह केला, पुन्हा श्रद्धा ठेवली, पुन्हा द्रोह केला मग आपल्या अश्रद्धेमध्येच वाढत गेले तर अल्लाह त्यांना कदापि क्षमा करणार नाही आणि त्याना कधी सरळ मार्गही दाखवणार नाही. आणि जे दांभिक श्रद्धावंतांना सोडून अश्रद्धावंतांना आपला मित्र बनवितात, त्यांना हा इशारा द्या की त्यांच्याकरिता दुःखदायक शिक्षा तयार आहे. काय हे लोक मानसन्मानाच्या इच्छेपायी त्यांच्याजवळ जातात? खरे पाहता मानसन्मान तर सर्वस्वी अल्लाहकरिताच आहे. अल्लाहने या ग्रंथात पूर्वीच तुम्हाला आदेश दिला आहे की जेथे तुम्ही ऐकाल की अल्लाहच्या वचनांविरूद्ध द्रोह केला जात आहे आणि त्यांची थट्टा केली जात आहे तेथे बसू नका, जोपर्यंत ते लोक एखाद्या दुसऱ्या गोष्टीत लागत नाहीत. आता जर तुम्ही असे करीत आहात तर तुम्ही देखील त्या लोकांसारखे आहात. खात्री बाळगा की अल्लाह दांभिकांना व अश्रद्धावंतांना नरकामध्ये एकत्र जमा करणारा आहे. हे दांभिक तुमच्या संबंधात प्रतीक्षा करीत आहेत. जर अल्लाहकडून विजय तुमचा झाला तर हे येऊन सांगतील की काय आम्ही तुमच्याबरोबर

**८५)** श्रद्धावंतांना, 'श्रद्धा ठेवा', असे म्हणणे वरवर पाहता विचित्र वाटते. परंतु वास्तविकपणे या ठिकाणी 'श्रद्धा' (ईमान) हा शब्द दोन वेगवेगळ्या अर्थांनी वापरला गेला आहे. श्रद्धा ठेवण्याचा एक अर्थ असा की माणसाने 'इन्कार' ऐवजी 'स्वीकार' चा मार्ग अवलंबावा, न मानणाऱ्यापासून वेगळे होऊन मानणाऱ्यांत सामील व्हावे. याचा दुसरा अर्थ असा की माणसाने जी गोष्ट मानावी ती शुद्ध अंतःकरणाने मानावी, पूर्ण गांभीर्याने आणि प्रामाणिकपणे मानावी. सदरहू आयतीत जे पहिल्या अर्थानुसार 'मानणाऱ्यात' गणले जातात अशा सर्व मुसलमानांना संबोधन आहे. त्यांनी दुसऱ्या अर्थाच्या दृष्टीने सच्चे श्रद्धावंत बनावे अशी त्यांच्याकडे मागणी केली गेली आहे.

**८६)** 'कुफ्र' करण्याचे देखील दोन अर्थ आहेत. एक असा की माणसाने स्वच्छ शब्दात इन्कार करावा. दुसरा असा की तोंडाने मानावे परंतु मनात मानू नये अथवा आपल्या वर्तनाने असे सिद्ध करावे की तो जी गोष्ट मानण्याचा दावा करीत आहे प्रत्यक्षात ती मानत नाही.

नव्हतो? जर अश्रद्धावंतांचे पारडे जड झाले तर त्यांना सांगतील की आम्ही तुमच्याविरूद्ध लढण्यास समर्थ नव्हतो काय, व तरी देखील आम्ही तुम्हाला मुसलमानांपासून वाचविले? बरे तर अल्लाहच तुमच्या आणि त्यांच्या मामल्याचा निर्णय पुनरुत्थानाच्या दिवशी करील आणि (त्या निर्णयाला) अल्लाहने अश्रद्धावंतांसाठी मुसलमानांवर वर्चस्व प्राप्त करण्याचा कोणताच वाव मुळीच ठेवला नाही. (१३६-१४१)

हे ढोंगी अल्लाहशी धोकेबाजी करीत आहेत, खरे पाहता तर अल्लाहनेच त्यांना फसवणुकीत टाकले आहे. जेव्हा हे नमाजसाठी उठतात तर आळसावलेले, केवळ लोकांना दर्शविण्यासाठी उठतात आणि अल्लाहचे क्वचितच स्मरण करतात. अश्रद्धा आणि श्रद्धा यांच्यामध्ये दोलायमान आहेत, धड या बाजूसही नाहीत व धड त्या बाजूसदेखील नाहीत. ज्याला अल्लाहने पथभ्रष्ट केले आहे त्यांच्याकरिता तुम्हाला कोणताही मार्ग सापडणार नाही.[८७] (१४२-१४३)

हे श्रद्धावंतांनो! श्रद्धावंतांना सोडून अश्रद्धावंतांना आपले मित्र बनवू नका. काय तुम्ही इच्छिता की अल्लाहला स्वत:च्याविरूद्ध उघड पुरावा द्यावा? खात्री बाळगा की ढोंगी नरकामध्ये सर्वात खालच्या थरात जातील आणि तुम्हाला त्यांचा सहायक कोणीच आढळणार नाही. परंतु यांच्यापैकी जे पश्चात्ताप करतील आणि आपल्या वागणुकीत सुधारणा करतील आणि अल्लाहशी बांधील राहतील आणि आपला धर्म फक्त अल्लाहसाठीच निर्भेळ ठेवतील, असे लोक श्रद्धावंतांसमवेत आहेत. आणि अल्लाह श्रद्धावंतांना अवश्य महान मोबदला प्रदान करील. शेवटी अल्लाहला काय पडले आहे की तुम्हाला विनाकारण त्याने शिक्षा द्यावी. जर तुम्ही कृतज्ञ दास बनून राहिलात आणि श्रद्धेच्या मार्गावर चालत राहिलात तर अल्लाह मोठा गुणग्राहक आहे.[८८] आणि सर्वांची परिस्थिती जाणणारा आहे. (१४४-१४७)

अल्लाह हे पसंत करीत नाही की माणसाने अपशब्दाकरिता तोंड उघडावे परंतु या व्यतिरिक्त की एखाद्यावर अत्याचार केला गेला असेल,[८९] आणि अल्लाह सर्वकाही

**८७)** म्हणजे ज्याने ईश्वराच्या वाणी व त्याच्या पैगंबराच्या चरित्रापासून बोध प्राप्त केले नसावे. ज्याला सत्यापासून पराङमुख आणि असत्यप्रियतेकडे आकर्षित पाहून ईश्वराने देखील त्याचकडे वळविले असावे ज्याकडे तो स्वत:च वळू पहात होता व ज्याच्या मार्गभ्रष्टतेच्या इच्छेमुळे ईश्वराने त्याच्यासाठी मार्गदर्शनाची दारे बंद आणि मार्गभ्रष्टतेचीच दारे उघडली असावी. अशा माणसाला सरळ मार्ग दाखविणे वास्तविकपणे कोणत्याही माणसाच्या आवाक्यातील काम नव्हे.

**८८)** धन्यवाद जेव्हा दासाकडून असेल तेव्हा उपकार जाणणाऱ्याच्या अर्थात असतो आणि जेव्हा ईश्वराकडून असेल तर तेव्हा गुणग्राहकतेच्या अर्थाने असतो.

**८९)** म्हणून अत्याचारपीडिताला असा अधिकार प्राप्त आहे की अत्याचाऱ्याविरूद्ध त्याने आवाज उठवावा.



ऐकणारा व जाणणारा आहे. (अत्याचारपीडित अवस्थेत जरी तुम्हाला अपशब्द उच्चारण्याचा हक्क आहे) परंतु जर तुम्ही अंतर्बाह्य चांगुलपणाच दाखवाल अथवा कमीत कमी वाईटाकडे दुर्लक्ष कराल, तर अल्लाह (चा देखील हाच गुण आहे की तो) मोठा क्षमा करणारा आहे यद्यपि तो शिक्षा देण्याचे पूर्ण सामर्थ्य बाळगतो. (१४८-१४९)

जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी द्रोह करतात आणि इच्छितात की अल्लाह आणि त्याच्या प्रेषितांच्या दरम्यान भेदभाव करावा आणि म्हणतात की आम्ही काहींना मान्य करू आणि काहींना मानणार नाही व अश्रद्धा व श्रद्धा यांच्या दरम्यानातून एक मार्ग काढण्याचा निश्चय करतात, ते सर्व पक्के अश्रद्धावंत आहेत आणि अशा अश्रद्धावंतांसाठी आम्ही अशी शिक्षा तयार करून ठेवली आहे जी त्यांना अपमानित व तिरस्करणीय करून सोडणारी असेल. याविरूद्ध जे लोक अल्लाह आणि त्याच्या सर्व प्रेषितांना मानतील आणि त्यांच्या दरम्यान फरक करणार नाहीत, त्यांना आम्ही अवश्य त्यांचा मोबदला प्रदान करू आणि अल्लाह मोठा क्षमा करणारा व दया करणारा आहे.

(१५०-१५२)

हे पैगंबर (स.)! हे ग्रंथधारक जर आज तुमच्याकडे मागणी करीत आहेत की तुम्ही आकाशातून एखादे लिखित त्यांच्यावर उतरवा तर याहून वरचढ अपराधयुक्त मागण्या यांनी पूर्वी मूसा (अ.) यांच्याजवळ केल्या आहेत. त्याला तर यांनी सांगितले होते की आम्हाला जाहिररीत्या 'ईश्वर' दाखवा आणि त्यांच्या याच अतिरेकामुळे अकस्मात त्यांच्यावर वीज कोसळली होती. मग त्यांनी वासराला आपला उपास्य बनविला. वस्तुत: यांनी उघड उघड संकेतचिन्हे पाहिली होती, याउपर देखील आम्ही त्यांच्याकडे दुर्लक्ष केले. आम्ही मूसा (अ.) यांना स्पष्ट फर्मान प्रदान केले, आणि या लोकांवर तूर पर्वताला उचलून यांच्याकडून (या फर्मानाच्या पालनाची) प्रतिज्ञा घेतली. आम्ही यांना आदेश दिला की दरवाजातून नतमस्तक होऊन दाखल व्हा.[९०] आम्ही यांना सांगितले की 'सब्त'च्या कायद्याचा भंग करू नका आणि यावर यांच्याकडून पक्के वचन घेतले. सरतेशेवटी यांच्या प्रतिज्ञाभंग करण्यामुळे आणि या कारणास्तव की यांनी अल्लाहच्या वचनांना खोटे ठरविले आणि अनेक प्रेषितांना नाहक ठार केले आणि इथपर्यंत सांगितले की आमची हृदये आवरणांत सुरक्षित आहेत.[९१] वस्तुत: खरे पाहता यांच्या असत्यप्रियतेमुळे अल्लाहने यांची हृदये मोहरबंद केली आहेत. आणि यामुळेच हे फारच कमी श्रद्धा ठेवतात – मग आपल्या अश्रद्धेमध्ये हे इतके पुढे गेले की मरयमवर भयंकर आळ घेतला. आणि

**९०)** याचा उल्लेख सूरह बकरा आयत क्र. ५८-५९ मध्ये आलेला आहे.

**९१)** म्हणजे मग तुम्ही काहीही सांगा, आमच्या मनावर त्याचा काहीच परिणाम होऊ शकत नाही.

खुद्द सांगितले की आम्ही प्रेषित मसीह मरयमपुत्र ईसा (अ.) याला ठार केले आहे.[९२] खरे पाहता प्रत्यक्षात यांनी त्याला ठारही केले नाही की क्रुसावरदेखील चढवले नाही, परंतु मामला यांच्याकरिता संदिग्ध बनविण्यात आला.[९३] आणि ज्या लोकांनी यासंबंधी मतभेद दर्शविले आहे ते देखील खरे पाहता शंकेत गुरफटले आहेत. यांच्याजवळ या मामल्यासंबंधी काहीच ज्ञान नाही, केवळ अनुमानाचे अनुसरण आहे त्यांनी 'मसीह'ला खचितच ठार केलेले नाही, किंबहुना अल्लाहने त्यांना आपल्याकडे उचलून घेतले, अल्लाह जबरदस्त शक्तिशाली आणि बुद्धिमान आहे. आणि ग्रंथधारकांपैकी कोणी असा असणार नाही जो त्याच्या मृत्यूपूर्वी त्याच्यावर श्रद्धा ठेवणार नाही[९४] आणि पुनरुत्थानाच्या दिवशी तो त्यांच्यावर ग्वाही देईल, तात्पर्य असे की यहुदींच्या याच अत्याचारी वर्तणुकीमुळे आणि या कारणास्तव की हे मोठ्या प्रमाणात अल्लाहच्या मार्गापासून रोखतात, आणि व्याज घेतात ज्यांची यांना मनाई केली गेली होती, आणि अवैधरीतीने लोकांचे माल खातात, आम्ही यांच्यासाठी त्या बऱ्याचशा पवित्र वस्तू निषिद्ध ठरविल्या ज्या पूर्वी यांच्यासाठी वैध होत्या[९५] आणि यांच्यापैकी जे अश्रद्धावंत आहेत त्यांच्यासाठी आम्ही दु:खदायक प्रकोप तयार ठेवला आहे, परंतु यांच्यामध्ये जे लोक परिपक्व ज्ञान

९२) म्हणजे त्यांचे गुन्हेगारी साहस इतके वाढलेले होते की प्रेषिताला प्रेषित म्हणून जाणत होते तरी देखील त्याच्या हत्येची कृती केली व गर्वाने सांगितले की आम्ही अल्लाहच्या प्रेषिताची हत्या केली आहे. याप्रसंगी सूरह मरयम रुकुअ (खंड) २ जर आमच्या टीपासहित वाचले गेले तर कळून येईल की 'बनीइस्राईल' हजरत ईसा (येशू) यांना प्रत्यक्षात प्रेषित म्हणून जाणत होते व त्यानंतरसुद्धा त्यांनी आपल्याठायी त्यांना क्रूसावर लटकविले.

९३) या आयतीने हे स्पष्ट होते की हजरत ईसा-येशू-मसीह (अ.) हे क्रूसावर लटकविल्या जाण्यापूर्वीच उचलून घेतले गेले होते. तसेच ख्रिस्ती आणि यहूदी या दोन्ही लोकांची ही कल्पना की मसीहने क्रूसावर प्राण सोडले, केवळ चुकीच्या समजुतीमुळे आहे. यहूदी लोकांनी क्रूसावर चढविण्यापूर्वीच सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्याना कोणत्यातरी एका क्षणी उचलून घेतले, मग नंतर यहूदी लोकांनी ज्या इसमाला क्रूसावर लटकविले तो अन्य कोणी तरी इसम होता. त्या इसमाला त्या लोकांनी कोणत्या कारणाने मरयमपुत्र ईसा समजले कोण जाणे.

९४) या वाक्याचे दोन अर्थ सांगितले आहेत व वाक्याच्या शब्दात दोन्ही अर्थ समानपणे संभवनीय आहेत. एक अर्थ आम्ही जे भाषांतर केले आहे तो आहे. दुसरा अर्थ असा की ग्रंथधारकांपैकी असा कोणीही नाही जो आपल्या मृत्यूपूर्वी मसीह (अ.) वर ईमान आणणार नाही.

९५) बहुधा पुढे सूरह अनआम आयत क्र. १४६ मध्ये जो विषय येणार आहे त्याच्याचकडे हा संकेत आहे. म्हणजे असे की बनी इस्राईलसाठी, ज्यांना नखें असतात असे सर्व प्राणी हराम ठरविले गेले. तसेच गाय आणि शेळीची चरबीसुद्धा त्यांच्यासाठी निषिद्ध ठरविली गेली. याशिवाय यहूदींच्या धर्मशास्त्रात इतर जे निर्बंध आणि ज्या कठोर गोष्टी आढळतात त्यांच्याकडेही हा संकेत असण्याची शक्यता आहे. एखाद्या जनसमूहासाठी जीवनक्षेत्र संकीर्ण केले जाणे म्हणजे वास्तविकपणे त्याच्यासाठी एक प्रकारची शिक्षाच आहे.



राखणारे आहेत आणि श्रद्धावंत आहेत ते सर्व त्या शिकवणीवर श्रद्धा ठेवतात, जी हे नबी (स.)! तुमच्याकडे अवतरली गेली आहे आणि जी तुमच्यापूर्वी अवतरली गेली होती. अशा प्रकारे श्रद्धा ठेवणाऱ्या आणि नमाज व जकातचे नियमित पालन करणाऱ्या आणि अल्लाह आणि मरणोत्तर जीवनाच्या दिवसावर खरी श्रद्धा बाळगणाऱ्या लोकांना आम्ही अवश्य महान मोबदला प्रदान करू. (१५३-१६२)

हे नबी (स.)! आम्ही तुमच्याकडे त्याचप्रकारे दिव्य प्रकटन (वही) पाठविले आहे, ज्याप्रकारे नूह (अ.) आणि त्यानंतरच्या प्रेषितांकडे पाठविले होते. आम्ही इब्राहीम (अ.), इस्माईल (अ.), इसहाक(अ.), याकूब (अ.) आणि याकूबची सन्तान, ईसा (अ.), अय्यूब, यूनुस, हारून आणि सुलेमान (अ.) कडे दिव्य प्रकटन पाठविले. आम्ही दाऊद (अ.) यांना जबूर दिला. आम्ही त्या प्रेषितांवर देखील दिव्य प्रकटन अवतरित केले ज्यांचा उल्लेख आम्ही यापूर्वी केला आहे आणि त्या प्रेषितांवर देखील ज्यांचा उल्लेख तुमच्याजवळ केला नाही. आम्ही मूसा (अ.)शी अशाप्रकारे बातचीत केली ज्या रीतीने बातचीत केली जाते. हे सर्व प्रेषित शुभवार्ता देणारे व भय दाखवणारे म्हणून पाठविले होते की त्यांना पाठविल्यानंतर लोकांजवळ अल्लाहच्याविरूद्ध कोणतेही प्रमाण राहू नये.[९६] आणि अल्लाह सर्व परिस्थितीत वर्चस्व बाळगणारा व बुद्धिमान व विवेकशील आहे. (लोक मानत नाहीत तर न मानोत) परंतु अल्लाह ग्वाही देतो की हे नबी (स.)! जे काही त्याने तुमच्यावर अवतरले आहे आपल्या ज्ञानाने अवतरले आहे, यावर ईशदूत देखील साक्षी आहेत यद्यपि अल्लाह साक्षी असणे सर्वथा पुरेसे आहे. जे लोक त्याला मानण्यास स्वत: नकार देतात व इतरांना अल्लाहच्या मार्गापासून रोखतात, नि:संशय ते पथभ्रष्टतेत सत्यापासून फारच दूर गेले आहेत. अशा प्रकारे ज्या लोकांनी अश्रद्धा व विद्रोहाची पद्धत अवलंबिली आणि जुलूम व अत्याचारास प्रवृत्त झाले, अल्लाह त्यांना मुळीच क्षमा करणार नाही आणि त्यांना कोणताच मार्ग नरकाच्या मार्गाशिवाय दाखविणार नाही, ज्यामध्ये ते सदैव राहतील अल्लाहसाठी हे काही अवघड कार्य नाही.

(१६३-१६९)

लोकहो! हा पैगंबर तुमच्याजवळ तुमच्या पालन-कर्त्याकडून सत्य घेऊन आला आहे. श्रद्धा ठेवा, तुमच्यासाठीच उत्तम आहे, आणि नकार देत असाल तर लक्षात ठेवा आकाशात व पृथ्वीत जे काही आहे ते सर्व अल्लाहचे आहे आणि अल्लाह सर्वज्ञ देखील

९६) म्हणजे या सर्व प्रेषितांना पाठविण्याचा हेतू एकच होता. तो हेतू असा की सर्वोच्च अल्लाह मानवजातीसाठी प्रबोधन प्रमाणाची परिपूर्णता करू इच्छित होता जेणेकरून अंतिम निवाड्याच्या प्रसंगी कोणा मार्गभ्रष्ट गुन्हेगाराला त्याच्यासमोर ही सबब पुढे करता येऊ नये की आम्ही अनभिज्ञ होतो व वस्तुस्थितीची माहिती देण्याची आपण कोणतीही व्यवस्था केली नव्हती.

आहे व बुद्धिमानसुद्धा.[९७] (१७०)

हे ग्रंथधारकांनो, आपल्या धर्मात अतिरेक करू नका.[९८] आणि अल्लाहशी सत्याखेरीज इतर कोणतीही गोष्ट जोडू नका. मसीह, मरयमपुत्र ईसा याव्यतिरिक्त इतर काहीच नव्हता की तो अल्लाहचा एक प्रेषित होता. आणि एक आदेश होता की जो अल्लाहने मरयमकडे पाठविला.[९९] आणि एक आत्मा होता अल्लाहकडून[१००] (ज्याने मरयमच्या गर्भात मुलाचे रूप धारण केले) म्हणून तुम्ही अल्लाह व त्याच्या प्रेषितावर

---

**९७)** म्हणजे तुमचा ईश्वर अनभिज्ञही नाही की त्याच्या राज्यात राहात असून देखील तुम्ही खोडसाळपणा करावा व त्याला माहीत होऊ नये, व तो नादानही नाही की आपल्या आदेशांची पायमल्ली करणाऱ्याना वटणीवर आणण्याचे काम त्याला येत नसावे.

**९८)** या ठिकाणी ग्रंथधारकांपासून अभिप्रेत ख्रिस्ती लोक आहेत. तसेच 'अतिरेक' म्हणजे एखाद्या गोष्टीच्या समर्थनात मर्यादेपलीकडे जाणे होय. यहूदी लोकांचा अपराध तर असा होता की ते येशू मसीहचा इन्कार व त्याच्या विरोधात मर्यादेपलीकडे गेले, आणि ख्रिस्ती लोकांचा अपराध असा की मसीहवरील श्रद्धा आणि प्रेमात ते मर्यादेपलीकडे गेले. त्यानी त्याला ईश्वराचा पुत्र किंबहुना खुद्द ईश्वर ठरविले.

**९९)** मूळ अरबी शब्द 'कलमा' प्रयुक्त झाला आहे. मरयमकडे 'कलमा' पाठविण्याचा अर्थ असा की अल्लाहने हजरत बीबी मरयम (अ.) यांच्या गर्भाशयावर हा आदेश उतरविला की कोणत्याही पुरुषाच्या वीर्याच्या संपर्काविनाच गर्भधारणा स्वीकारावी. ख्रिस्ती लोकांनी अगोदर 'कलमा' या शब्दाला 'कलाम' - वाणी - अथवा वाक्‌शक्तिच्या समानार्थी मानले. मग या वाणी व वाक्‌शक्तीपासून सर्वश्रेष्ठ अल्लाहचा, 'वाणी' हा वैयक्तिक गुण अभिप्रेत धरला, मग त्यापासून अल्लाहच्या सदरहू वैयक्तिक गुणाने मरयम (अ.) च्या शरीरात शिरून मसीह (अ.) यांच्या स्वरूपात प्रकट झालेले रूप धारण केले. असा कयास त्यांनी प्रस्थापित केला. अशाप्रकारे ख्रिस्ती लोकांत मसीह (अ.) यांच्या देवत्वाची दूषित श्रद्धा निर्माण झाली आणि या चुकीच्या कल्पनेने मूळ धरले की ईश्वराने आपल्या स्वत:ला किंवा आपल्या अनंत गुणांपैकी वाक्‌शक्ती व वाणी या गुणाला मसीहच्या रूपात प्रकट केले आहे.

**१००)** या ठिकाणी खुद्द मसीहलाच 'रुहूम्मिनहू' (ईश्वराकडून एक आत्मा) म्हटलेले आहे, तर सूरह बकरा आयत क्र. ८७ मध्ये हाच विषय अशाप्रकारे व्यक्त केला गेला आहे, आम्ही पवित्र आत्म्याने मसीहला सहाय्य केले. दोन्ही विधानांचा अर्थ असा की अल्लाहने मसीह (अ.) यांना, दुष्टतेपासून दूर असलेला, सर्वस्वी सत्य आणि सत्यप्रिय, आणि उत्तम नैतिक गुणांनी संपन्न असा आत्मा प्रदान केला होता. ख्रिस्ती लोकांनी यातसुद्धा अतिशयोक्ती केली. 'रुहुमसिनल्लाह'ला खुद्द अल्लाहचाच आत्मा ठरविला, आणि 'पवित्र आत्मा'चा अर्थ असा घेतला की 'मसीह'च्या रूपात संचारलेला तो खुद्द सर्वश्रेष्ठ अल्लाहचा स्वत:चा आत्मा होता. अशा प्रकारे अल्लाह आणि मसीहबरोबरच 'रुहुलकुदूस' 'पवित्र आत्मा' याला एक तिसरे देव बनविले गेले.



श्रद्धा ठेवा आणि असे म्हणू नका की, ''तीन'' आहेत.[१०१] परावृत्त व्हा. हे तुमच्याच हिताचे आहे. अल्लाह तर फक्त एकच आहे. तो पवित्र आहे यापासून की त्याचा कोणी पुत्र असावा.[१०२] पृथ्वी व आकाशांतील साऱ्या वस्तू त्याच्या मालकीच्या आहेत, आणि त्यांच्या पालनासाठी व देखरेखीसाठी केवळ तोच पुरेसा आहे. (१७१)

मसीह आणि निकटवर्ती ईशदूतांना तो (मसीह) दास असल्याबद्दल मुळीच संकोच वाटला नाही. जो कोणी (अल्लाहच्या) दास्यत्वास संकोच करण्यायोग्य गर्व करेल तर अल्लाह सर्वांना आपल्या समोर हजर करण्याची वेळ लवकरच आणील. तेव्हा ज्या लोकांनी श्रद्धा ठेवून सदाचरण अंगिकारले आहे ते आपला मोबदला पुरेपूर प्राप्त करतील आणि अल्लाह आपल्या कृपेने त्यांना जादा मोबदला प्रदान करील, आणि ज्या लोकांनी भक्तीला लांच्छनास्पद मानले व गर्व बाळगला, त्यांना अल्लाह यातनादायक शिक्षा देईल आणि अल्लाहव्यतिरिक्त ज्याच्या ज्याच्या पालकत्वावर व मदतीवर ते विश्वास ठेवतात त्यांच्यापैकी कोणीच त्यांना तेथे आढळणार नाही. (१७२-१७३)

लोकहो, तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्याजवळ उज्ज्वल प्रमाण आले आहे आणि आम्ही तुमच्याकडे असा प्रकाश पाठविला आहे जो तुम्हाला स्पष्ट मार्गदर्शन करणारा आहे. मग जे लोक अल्लाहची गोष्ट मान्य करतील व त्याचा आश्रय शोधतील, त्यांना

---

**१०१)** म्हणजे तीन ईश्वराची श्रद्धा सोडून द्या. मग ती कोणत्याही स्वरूपात तुमच्यात का असेना. वस्तुस्थिती अशी आहे की ख्रिस्ती लोक एकाच वेळी एकेश्वरवादालाही मानतात आणि त्रिईश्वरवादालासुद्धा. येशू मसीह (अ.) यांची जी वचने बायबलमध्ये सापडतात, त्यांच्या आधारे ईश्वर केवळ एकच ईश्वर आहे व त्याखेरीज अन्य कोणीही ईश्वर नाही, याचा कोणीही ख्रिस्ती इन्कार करू शकत नाही. एकेश्वरवाद हाच खरा धर्म आहे ही गोष्ट मान्य केल्याविना त्यांना गत्यंतर नाही. परंतु असे असून देखील मसीहच्या अस्तित्वात अतिशयोक्तिमुळे ते त्रिईश्वरवादही मानणारे आहेत तसेच या दोन परस्परविरूद्ध श्रद्धांचे एकाच वेळी कसे पालन करावे याचा आजतागायत ते फैसला करू शकलेले नाहीत.

**१०२)** हे ख्रिस्ती लोकांच्या चौथ्या अतिरेकाचे खंडन होय. ख्रिस्ती निवेदने खरी जरी असली तरी त्यावरून (विशेष करून पहिल्या तीन बायबलींवरून) जास्तीत जास्त केवळ इतकेच सिद्ध होते की येशू मसीह (अ.) यांनी ईश्वर आणि दासांच्या संबंधाला पिता आणि संततीच्या संबंधाची उपमा दिली होती. तसेच ईश्वरासाठी 'पिता' असा शब्द ते केवळ लक्षण आणि दृष्टांत म्हणून प्रयुक्त करीत असत. हे एकट्या येशू मसीहचेच वैशिष्ट्य आहे असे नाही तर प्राचीन काळापासून इस्राईलवंशीय ईश्वरासाठी पिता हा शब्द बोलत आले होते. याची उदाहरणे मोठ्या संख्येत बायबलच्या जुन्या करारात मौजूद आहेत. येशू मसीहने हा शब्द आपल्या जातीच्या वाक्यप्रचारानुसारच वापरला होता. ते ईश्वराला केवळ आपलाच नव्हे तर अखिल मानवजातीचा पिता म्हणत असत, परंतु ख्रिस्ती लोकांनी याठिकाणी पुन्हा अतिशयोक्ती केली व येशू मसीहना ईश्वराचा एकुलता एक मुलगा ठरविला.

अल्लाह आपल्या दया व कृपेच्या छत्राखाली घेईल आणि आपल्याकडे येण्याचा सरळमार्ग त्यांना दाखवील. (१७४-१७५)

हे नबी (स.), लोक तुम्हाला कलालासंबंधी[१०३] आदेश विचारतात, सांगा, अल्लाह तुम्हाला आदेश देतो, जर एखादा मनुष्य नि:संतान मेला असेल आणि त्याची एक बहीण असेल[१०४] तर तिला त्याच्या ठेवलेल्या मालमत्ते (वारसा) तून निम्मा हिस्सा मिळेल, आणि जर बहीण नि:संतान वारली असेल तर भाऊ तिचा वारस ठरेल.[१०५] जर मृताचे वारस दोन बहिणी असतील तर त्या ठेवलेल्या मालमत्तेतून दोन तृतीयांशच्या हक्कदार ठरतील,[१०६] आणि जर अनेक भाऊ-बहिणी असतील तर स्त्रियांचा एकेरी व पुरुषांचा दुप्पट वाटा असेल. अल्लाह तुमच्यासाठी आदेशांचे स्पष्टीकरण करीत आहे, जेणेकरून तुम्ही भटकत फिरू नये आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे ज्ञान बाळगतो. (१७६)

---

**१०३)** 'कलाला' या शब्दाच्या अर्थात मतभिन्नता आढळते. काहीच्या मते जो इसम नि:संतान असेल व ज्याचे वडील आणि आजोबा जिवंत नसतील असा मनुष्य 'कलाला' होय, तर काहींच्या मते केवळ नि:संतान स्थितीत मरण पावणाऱ्याला 'कलाला' म्हटले जाते. परंतु सामान्यत: इस्लामी शास्त्रींनी हजरत अबूबकर (रजि.) यांचे हे मत मान्य केले आहे की कलाला हा शब्द पहिल्या स्थितीलाच लागू होतो. खुद्द कुरआननुसारदेखील याचे समर्थन होते, कारण येथे 'कलाला'च्या बहिणीला वारसासंपत्तीतील अर्ध्याची वाटेकरी ठरविलेले आहे. वास्तविकपणे जर 'कलाला'चा वडील जिवंत असेल तर बहिणीला मुळातच कोणताही वाटा प्राप्त होत नाही.

**१०४)** या ठिकाणी अशा भाऊ व बहिणींच्या वारसाहक्काचा उल्लेख केला जात आहे जे मृताशी आई व वडील दोन्हीत किंवा केवळ वडिलांच्या बाबतीत सामायिक असावेत. हजरत अबूबकर (रजि.) यांनी एकदा प्रवचनात या अर्थाचे स्पष्टीकरण केले होते. त्यावेळी सहाबांपैकी कोणीही त्यांविरूद्ध मतभेद दर्शविला नव्हता. म्हणून ही बाब मतैक्य असलेली आहे.

**१०५)** म्हणजे जर अन्य कोणीही प्रथम श्रेणीतील नातेवाईक नसेल तर भाऊ तिच्या सर्व मालमत्तेचा वारस ठरेल. परंतु जर प्रथम श्रेणीतील एखादा नातेवाईक मौजूद असला उदा. पती, तर त्याचा वाटा अदा केल्यानंतर उरलेली सर्व मालमत्ता भावाला मिळेल.

**१०६)** हीच आज्ञा दोनपेक्षा जास्त बहिणींसाठीही आहे.



# ५ सूरह अल्‌ माईदा

*(मदीनाकालीन, वचने १२०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे श्रद्धावंतांनो! निषिद्धाचे पुरेपूर पालन करा.[१] तुमच्याकरिता चतुष्पाद वर्गातील सर्व जनावरे वैध केली गेली आहेत[२] त्यांच्या व्यतिरिक्त ज्यांच्याबद्दल पुढे तुम्हाला सांगण्यात येईल. परंतु एहराम (हजकरिता परिधान केलेली वस्त्रे) च्या अवस्थेत शिकारीला आपल्याकरिता वैध ठरवू नका. नि:संशय अल्लाह जे इच्छितो ती आज्ञा देतो. (१)

हे श्रद्धावंतांनो, ईश्वरी विधींची विटंबना करू नका.[३] निषिद्ध महिन्यांपैकी एखाद्याला वैध करू नका, कुर्बानीच्या जनावरांवर हात टाकू नका. त्या जनावरांवर हात टाकू नका ज्यांच्या गळ्यात ईश्वरार्पणाच्या खुणा म्हणून पट्टे घातले आहेत, त्या लोकांना छळू नका जे आपल्या पालनकर्त्याची कृपा आणि त्याच्या प्रसन्नतेच्या शोधात पवित्र गृहा (काबा) कडे जात असतील. मग जेव्हा एहरामची स्थिती संपेल तेव्हा तुम्ही शिकार करू शकता - आणि पहा

---

**१)** म्हणजे त्या मर्यादांचे व बंधनांचे पालन करा ज्या तुमच्यावर घातल्या आहेत.

**२)** मूळ अरबी शब्द 'अनआम' (चतुष्पाद) हा अरबी भाषेत उंट, गाय, शेळी आणि मेंढी यासाठी वापरला जातो. तर 'बहीमा' हा शब्द चराऊ जनावरासाठी वापरला जातो. 'चतुष्पाद वर्गातील सर्व चराऊ जनावरे तुमच्यासाठी हलाल केली गेली.' म्हणजे चतुष्पाद वर्गातील सर्व चराऊ जनावरे हलाल आहेत अर्थात ज्यांना सुळे नसतील, जे शाकाहारी असतील तसेच इतर प्राणीमात्रांच्या वैशिष्ट्यात चतुष्पादांशी साम्य राखत असतील. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी याचे स्पष्टीकरण आपल्या त्या आदेशांत केलेले आहे ज्यात हिंस्र पशू व पक्षी तसेच मुरदाड (मृत) खाणाऱ्या प्राण्याला हराम ठरविले आहे.

**३)** एखाद्या प्रणालीचे अथवा श्रद्धेचे तसेच एखाद्या विचार व आचार पद्धतीचे किंवा एखाद्या व्यवस्थेचे प्रतिनिधित्व करणाऱ्या अशा प्रत्येक वस्तूला त्या गोष्टीचे प्रतीक म्हटले जाईल. कारण ती वस्तू त्याकरिता चिन्ह अथवा निशाणीचे काम करते. सरकारी झेंडे, फौज व पोलीस इ. चे युनिफार्म, नाणी, नोटा आणि स्टॅम्प हे शासनाचे प्रतीक आहेत. चर्च, बळीस्थान आणि क्रूस हे ख्रिस्ती धर्माचे प्रतीक आहेत, शेंडी, जानवे आणि मंदिरे हे ब्राह्मणत्वाचे प्रतीक आहेत. केस, कडा आणि किरपान इ. शिख धर्माचे प्रतीक आहेत, हतोडा आणि कोयता साम्यवादाचे प्रतीक आहे. हे या सर्व प्रणाली आपापल्या अनुयायांकडून आपल्या प्रतीकांच्या आदराचा आदेश देतात व जर एखाद्या इसमाने एखाद्या व्यवस्थेच्या प्रतीकापैकी एखाद्याचा अपमान केला तर वास्तविकपणे तो त्या व्यवस्थेविरूद्ध शत्रुत्व करतो या गोष्टीची ती खूण आहे. तसेच तो अवमान करणारा खुद्द जर त्या व्यवस्थेशी संबंधित असेल तर त्याची सदरहू कृती त्या व्यवस्थेशी परावृत्त आणि बंड करण्याच्या समानार्थी आहे. 'शिआइरिल्लाह'ने अभिप्रेत त्या सर्व खुणा व निशाण्या आहेत ज्या अनेकेश्वरवाद आणि कुफ्र (इन्कार) व नास्तिकतेच्याविरूद्ध शुद्ध ईश्वरोपासनेच्या प्रणालीचे प्रतिनिधित्व करीत असाव्यात.

एका गटाने तुमच्यासाठी मस्जिदेहराम (काबा मस्जिद) चा मार्ग रोखला आहे तर या गोष्टीवर तुमच्या रागाने तुम्हाला इतके भडकवू नये की तुम्ही देखील त्याच्या विरोधात अत्याचार कराल.[४] नाही, जे कार्य पुण्यांचे व ईशपरायणतेचे आहे, त्यामध्ये सर्वांशी सहकार्य करा आणि जी पाप व अत्याचाराची कामे आहेत, त्यामध्ये कोणाशीही सहकार्य करू नका. अल्लाहचे भय बाळगा, त्याची शिक्षा फार कठोर आहे. (२)

तुम्हाकरिता निषिद्ध करण्यात आले आहेत मेलेले प्राणी, रक्त, डुकराचे मांस, ते जनावर जे अल्लाहशिवाय इतर कोणाच्या नावाने बळी दिले असेल. ते जे गुदमरून अथवा मार लागून अथवा उंचस्थानावरून पडून अथवा टक्कर लागून मेले असेल अथवा ज्याला एखाद्या हिंस्र प्राण्याने फाडले असेल त्याव्यतिरिक्त ज्याला जिवंत अवस्थेत असताना तुम्ही कापले असेल अथवा ते जे देवीवर बळी दिले असेल.[५] तसेच हे देखील तुमच्यासाठी निषिद्ध आहे की, फासे टाकून आपले भविष्य पाहावे. या सर्व कृती आज्ञा भंग करणाऱ्या आहेत. आज अश्रद्धावंतांना तुमच्या धर्माकडून पूर्ण निराशा झाली आहे म्हणून तुम्ही त्यांना भिऊ नका तर माझ्या कोपाचे भय बाळगा.[६] आज रोजी मी तुमचा धर्म तुमच्याकरिता परिपूर्ण केला आहे

४) काफिरांनी त्यावेळी मुसलमानांना काबागृहाच्या यात्रेपासून रोखले होते व हज्ज करण्यापासूनसुद्धा त्यांना वंचित ठेवले होते, म्हणून मुसलमानांच्या मनात असा विचार आला की ज्या काफिर टोळ्यांचे मार्ग इस्लामी प्रदेशाच्या जवळून जातात, त्यांना आम्हीसुद्धा हजपासून रोखावे व हजच्या काळात त्यांच्या काफिल्यांवर छापे मारणे सुरू करावे, परंतु सर्वश्रेष्ठ अल्लाहने सदरहू आयत उतरवून त्यांना या विचारापासून परावृत्त केले.

५) मूळ अरबी शब्द 'नुसुब' प्रयुक्त झाला आहे. याच्याने अभिप्रेत अशी सर्व स्थाने आहेत ज्याना अल्लाहशिवाय इतरांसाठी भेट व अर्पण आणि नवस करण्याकरिता लोकांनी विशिष्ट केले असावे. मग तेथे पाषाणांची अथवा लाकडाची मूर्ती असो किंवा नसो. आमच्या भाषेत त्याचा समानार्थी शब्द म्हणजे एखाद्या विभूती अथवा देवदेवतेशी अथवा एखाद्या अनेकेश्वरी श्रद्धेशी संबंधित असलेले 'स्थान' हा शब्द होय. अशा एखाद्या 'स्थाना'वर कापलेले जनावर देखील हराम आहे.

६) 'आज'ने अभिप्रेत एखादा विशिष्ट दिवस अथवा तारीख नव्हे तर ज्यावेळी ही आयत उतरली होती तो काळ अभिप्रेत आहे. आमच्या भाषेतसुद्धा 'आज' हा शब्द वर्तमान काळासाठी सर्वसामान्यपणे बोलला जातो. 'काफिरांची तुमच्या धर्माकडून निराशा झाली आहे.' म्हणजे आता तुमचा धर्म एक कायमस्वरूपी व्यवस्था बनला आहे. तो स्वत:च्या शासकीय सामर्थ्यानिशी प्रस्थापित व रूढ झाला आहे. त्याचे उच्चाटन करून तुम्हाला पुन्हा अज्ञानाकडे परत नेता येऊ शकेल याबाबतीत काफिरांची निराशा झाली आहे. 'म्हणून तुम्ही त्यांना भिऊ नका तर माझे भय बाळगा' म्हणजे या धर्माच्या आज्ञा व आदेशांच्या अंमलबजावणीत कोणत्याही काफिर शक्तिच्या वर्चस्वाचा व जुलूमाचा किंवा हस्तक्षेप व प्रतिकाराचा तुमच्याकरिता आता धोका उरलेला नाही. आता तुम्ही ईश्वराचे भय बाळगले पाहिजे की त्याच्या आदेशांच्या पालनात जर तुम्ही कुचराई केली तर तुमच्यासाठी असे कोणतेही निमित्त असणार नाही जेणेकरून तुमच्याशी जरा देखील सौम्य व्यवहार केला जावा.



आणि आपली कृपा तुम्हावर परिपूर्ण केली आहे. आणि तुमच्यासाठी इस्लाम तुमचा धर्म म्हणून संमत केला आहे.[७] (म्हणून वैध आणि अवैधतेची जी बंधने तुमच्यावर घातली गेली आहेत त्यांचे पालन करा.) परंतु जर एखाद्याने भुकेने विवश होऊन यापैकी एखादी वस्तू खाल्ली अन्यथा गुन्ह्याकडे त्याचा कल झाला असता तर नि:संशय अल्लाह क्षमा करणारा व कृपा करणारा आहे.[८] (३)

लोक विचारतात की त्यांच्याकरिता काय वैध केले गेले आहे, त्यांना सांगा, तुमच्याकरिता सर्व पवित्र वस्तू वैध केल्या गेल्या आहेत.[९] आणि ज्या शिकारी जनावरांना तुम्ही प्रशिक्षित केले असेल - ज्यांना अल्लाहने प्रदान केलेल्या ज्ञानाच्या आधारावर तुम्ही शिकार करण्याचे प्रशिक्षण देत असता - ते ज्या जनावराला तुमच्यासाठी धरून ठेवतील

७) धर्माला परिपूर्ण करणे ने अभिप्रेत त्याला एक कायमस्वरूपी विचार व आचार व्यवस्था आणि एक अशी परिपूर्ण संस्कृती व्यवस्था बनविणे होय ज्यात जीवनाच्या सर्व प्रश्नांची उत्तरे तात्त्विक अथवा सविस्तरपणे उपलब्ध होत असावी आणि मार्गदर्शन प्राप्त करण्यासाठी कोणत्याही परिस्थितीत त्याच्याबाहेर जाण्याची गरज भासत नसावी. देणगी परिपूर्ण करण्याने अभिप्रेत मार्गदर्शनरूपी देणगी परिपूर्ण करणे होय. इस्लामला धर्म म्हणून स्वीकार करण्याचा अर्थ असा की तुम्ही माझी बंदगी व आज्ञाधारकता स्वीकारण्याचा जो करार केला होता त्याला तुम्ही आपल्या प्रयत्नांनी खरा आणि प्रामाणिक सिद्ध करून दाखविला आहे. म्हणून मी त्याला स्वीकृतीचा दर्जा बहाल केला आहे. तसेच तुम्हाला आता अशा स्थितीत आणले आहे की प्रत्यक्षात आता माझ्या व्यतिरिक्त इतर कोणाच्याही बंदगी व आज्ञाधारकतेचे जोखड तुमच्या मानेवर राहिलेले नाही. आता ज्याप्रकारे श्रद्धेच्या दृष्टीने तुम्ही माझे मुस्लिम-आज्ञाधारक-आहात, त्याचप्रकारे व्यावहारिक जीवनातसुद्धा माझ्याव्यतिरिक्त इतर कोणाचे मुस्लिम बनून राहण्यासाठी कोणतीही अगतिकता, लाचारी तुम्हाला राहिलेली नाही.

८) स्पष्टीकरणासाठी पहा सूरह 'बकरा' टीप नं. ५२

९) विचारणाऱ्यांचा हेतू असा होता की त्यांना तमाम हलाल वस्तूंचा तपशील सांगितला जावा जेणेकरून त्याखेरीज इतर सर्व वस्तू त्यांनी हराम समजाव्या. उत्तरादाखल कुरआनने हराम वस्तूंचा तपशील सांगितला व त्यानंतर हा आम आदेश देऊन पुरे केले की सर्व पाक वस्तू हलाल आहेत. अशा प्रकारे प्राचीन धार्मिक दृष्टिकोन पूर्णपणे उलटला गेला. प्राचीन दृष्टिकोन असा होता की सर्व काही हराम आहे त्याव्यतिरिक्त की ज्याच्या निषिद्धतेसंबंधी स्पष्टीकरण दिलेले आहे. 'हलाल'साठी 'पाक' असल्याची अट अशासाठी घातली आहे की नापाक वस्तूंना हलाल ठरविण्याचा प्रयत्न केला जाऊ नये. उरला हा प्रश्न की वस्तू 'पाक' असण्याची निश्चिती कशी करता येईल तर याचे उत्तर असे की ज्या वस्तू धर्मशास्त्राच्या एखाद्या नियमानुसार नापाक ठरतील अथवा शुद्ध रसिकतेला ज्याची घृणा वाटत असावी, अथवा ज्या वस्तू सुसंस्कृत माणसाला सर्व सामान्यपणे आपल्या निर्मलतेच्या संवेदनेच्याविरूद्ध आढळल्या असाव्यात, त्याखेरीज सर्व काही पाक आहे.

त्यालाही तुम्ही खाऊ शकता.[१०] तथापि त्यावर अल्लाहचे नाव उच्चारा[११] आणि अल्लाहचा कायदा भंग करण्यापासून त्याची भीती बाळगा. अल्लाह हिशेब घेताना वेळ लागत नाही. (४)

आज तुमच्यासाठी सर्व पवित्र वस्तू वैध करण्यात आल्या आहेत. ग्रंथधारकांचे भोजन तुमच्यासाठी वैध आणि तुमचे जेवण त्यांच्याकरिता वैध[१२] आहे चारित्र्यवान व स्वतंत्र स्त्रिया मग त्या श्रद्धावंतांच्या जमातीतील असोत अथवा त्या लोकसमूहातील ज्यांना तुमच्यापूर्वी ग्रंथ दिला गेला होता,[१३] परंतु अट अशी की तुम्ही त्यांचे महर अदा करूनच विवाह बंधनात त्यांचे रक्षक बनावे. असे होऊ नये की, तुम्ही त्यांच्याशी स्वैर कामतृप्तीत लागावे किंवा लपून छपून अनैतिक संबंध ठेवावेत आणि एखाद्याने श्रद्धेच्या मार्गावर

**१०)** शिकारी जनावरांनी अभिप्रेत कुत्रे, चिते, ससाणे आणि शिकारे व त्याचबरोबर ज्याच्याकडून माणूस शिकार करण्याची सेवा घेतो असे सर्व पशू व पक्षी आहेत. प्रशिक्षित श्वापदाचे वैशिष्ट्य असे असते की तो ज्याची शिकार करतो त्याला इतर श्वापदांप्रमाणे फाडून खात नसतो तर आपल्या मालकासाठी धरून ठेवत असतो. म्हणूनच आम श्वापदांनी फाडलेले जनावर हराम आहे तर प्रशिक्षित श्वापदांनी केलेली शिकार हलाल आहे.

**११)** म्हणजे शिकारी प्रण्याला शिकार करणयासाठी सोडण्या अगोदर 'बिस्मिल्लाह' म्हणा. या आयतवरून हा नियम माहीत झाला की शिकारी प्राण्याला शिकारीवर सोडतांना ईश्वराचे नाव घेणे आवश्यक आहे. त्यानंतर जर शिकार जिवंत मिळाली तर ईश्वराचे नाव घेऊन त्याला कापले पाहिजे आणि जर ती जिवंत मिळाली नाही तर तसे न करताच ती हलाल ठरेल कारण प्रारंभी शिकारी प्राण्याला त्यावर सोडताना सर्वोच्च अल्लाहचे नाव घेतलेले होते. हीच आज्ञा 'बाणा' संबंधीही आहे.

**१२)** ग्रंथधारकांच्या जेवणात त्यानी कापलेल्या जनावराचाही समावेश आहे. आमच्यासाठी त्यांचे व त्यांच्यासाठी आमचे जेवण हलाल असण्याचा अर्थ असा की आमच्या व त्यांच्या दरम्यान खाण्यापिण्याच्या बाबतीत कसलाही अडथळा अथवा शिवाशीव नाही. आम्ही त्यांच्यासमवेत खाऊ शकतो आणि ते आमच्या समवेत. परंतु ही आम परवानगी देण्याअगोदर या वाक्याची पुनरावृत्ती केली आहे की, 'तुमच्यासाठी पाक वस्तू हलाल केल्या आहेत'. यावरून असे कळले की धर्मशास्त्र (शरीअत) च्या दृष्टीने पाकी व स्वच्छतेसाठी आवश्यक असलेल्या नियमांचे जर ग्रंथधारक पालन करीत नसतील किंवा त्यांच्या जेवणात हराम वस्तूंचा समावेश असेल तर ते वर्ज्य केले पाहिजे. उदा. ते जर ईश्वराचे नाव न घेताच जनावरे कापत असतील अथवा ईश्वराशिवाय इतर कोणाचे नाव उच्चारत असतील तर ते खाणे आमच्याकरिता वैध नाही.

**१३)** याने यहूदी व ख्रिस्ती लोक अभिप्रेत आहेत. विवाह करण्याची परवानगी केवळ त्यांच्या स्त्रियांशीच दिली आहे परंतु त्याचबरोबर अट अशी घातली आहे की त्या स्त्रिया 'मुहसिनात' (सुरक्षित, सुशील स्त्रिया) असाव्यात, अर्थात दुराचारी नसाव्यात. नंतरच्या वाक्यात अशी तंबी देखील दिली आहे की यहूदी अथवा ख्रिश्चन पत्नीसाठी ईमान गमावला जाऊ नये.



चालण्याचे नाकारले तर त्याचे संपूर्ण जीवनकार्य वाया जाईल व तो मरणोत्तर जीवनामध्ये दिवाळखोर बनेल. (५)

हे श्रद्धावंतांनो, जेव्हा तुम्ही नमाजसाठी उठाल तेव्हा हे आवश्यक आहे की तुम्ही आपले तोंड व हात कोपरापर्यंत धुवावे, डोक्यावर हात फिरवावे व पाय घोट्यापर्यंत धूत जावे.[१४] जर जनाबत (अपवित्रते) च्या स्थितीत असाल तर स्नान करून शुचिर्भूत व्हा. जर आजारी असाल किंवा प्रवासात असाल अथवा तुमच्यापैकी एखादा शौचास जाऊन आला असेल अथवा स्त्री-स्पर्श केला असेल, जर पाणी उपलब्ध नसेल तर स्वच्छ मातीचा उपयोग करा, त्या मातीवर फक्त हात मारून आपल्या चेहऱ्यावर व हातांवर फिरवा.[१५] अल्लाह तुमचे जीवन अडचणीचे करू इच्छित नाही तर तो इच्छितो की तुम्हाला शुचिर्भूत करावे व आपली देणगी तुम्हावर पूर्ण करावी, जेणेकरून तुम्ही कृतज्ञ बनाल. (६)

अल्लाहने जी देणगी तुम्हाला प्रदान केली आहे, त्याची आठवण ठेवा आणि त्या दृढवचनाला विसरू नका जे त्याने तुमच्याकडून घेतले आहे, म्हणजे तुमचे हे कथन की ''आम्ही ऐकिले व आज्ञाधारकता स्वीकारली.'' अल्लाहचे भय बाळगा, अल्लाह मनांतील रहस्य देखील जाणतो. हे श्रद्धावंतांनो, अल्लाहसाठी सत्यावर अढळ राहणारे व न्यायाची ग्वाही देणारे बना. एखाद्या गटाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके प्रक्षोभित करू नये की तुम्ही न्यायापासून विमुख व्हाल. न्याय करा, हे ईशपरायणतेशी अधिक निकटवर्ती आहे. अल्लाहचे भय बाळगून कार्य करीत राहा. जे काही तुम्ही करता, अल्लाह त्याची पुरेपूर खबर ठेवणारा आहे. जे लोक श्रद्धा ठेवतील व सत्कृत्य करतील, अल्लाहने त्यांना वचन दिले आहे की त्यांच्या चुका माफ केल्या जातील व त्यांना मोठा मोबदला मिळेल. उरले ते लोक जे द्रोह करतील व अल्लाहची संकेतवचने खोटी ठरवतील, तर ते नरकात जाणारे आहेत. (७-१०)

हे श्रद्धावंतांनो, अल्लाहच्या त्या उपकाराचे स्मरण करा जो त्याने (आता नुकतेच) तुम्हावर केला आहे, जेव्हा एका गटाने तुमच्यावर हात टाकण्याचा निश्चय केलेला होता

**१४)** पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी याचे जे स्पष्टीकरण केले आहे त्यावरून असे कळते की तोंड धुताना गुळणी करणे आणि नाक स्वच्छ करणे हे देखील सामील आहे. तसे केल्याविना तोंडाचे स्नान पूर्ण होत नाही. तसेच कान, डोक्याचा एक भाग असल्याकारणाने डोक्यावर हात फिरवण्यात कानांच्या आतून व बाहेरून हात फिरविणेही सामील आहे, तसेच वुजू प्रारंभ करण्याअगोदर हात धुवून घेतले पाहिजे कारण ज्या हातांनी मनुष्य वुजू करणार आहे प्रथम तेच पाक व्हावेत.

**१५)** स्पष्टीकरणासाठी पहा सूरह निसा टीप क्र. ४१, ४३

परंतु अल्लाहने त्यांचे हात तुमच्यावर उठण्यापासून रोखले.[१६] अल्लाहच्या कोपाचे भय बाळगून कार्य करीत राहा, श्रद्धावंतांनी अल्लाहवरच भंरवसा ठेवला पाहिजे. (११)

अल्लाहने बनीइस्राईलकडून पक्के करार करून घेतले होते आणि त्यांच्यात बारा निरीक्षक[१७] नियुक्त केले होते व त्यांना सांगितले होते की, "मी तुमच्याबरोबर आहे. जर तुम्ही नमाज प्रस्थापित केली आणि जकात अदा केली व माझ्या प्रेषितांना मानले आणि त्यांना मदत केली व ईश्वराला उत्तम कर्ज देत राहिला तर खात्री बाळगा की मी तुमच्यातील वाईट गोष्टी नाहीशा करीन आणि तुम्हाला अशा उद्यानांत दाखल करीन ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, परंतु त्यानंतर तुमच्यापैकी ज्याने अश्रद्धेचे वर्तन अंगिकारले तर त्याने वास्तविक पाहता सन्मार्ग[१८] हरवून टाकला." मग त्यांचे हे करारभंग करणेच होते की ज्यामुळे आम्ही त्यांना आपल्या कृपेपासून दूर ढकलले आणि त्यांची मने कठोर बनविली. आता त्यांची दशा अशी आहे की शब्दात फेरफार करून गोष्ट कोठल्या कोठे नेतात. जी शिकवण त्यांना दिली गेली होती त्याचा मोठा भाग ते विसरले आहेत आणि तुम्हाला नेहमीच त्यांच्या कोणत्या न कोणत्या अपहाराची माहिती मिळत असते. त्यांच्यापैकी फारच थोडे या दोषापासून वाचले आहेत. (मग जेव्हा हे या स्थितीप्रत पोहोचले आहेत तर ते जो काही खोडसाळपणा करतील तो यांच्याकडून अपेक्षितच आहे.) म्हणून यांना क्षमा करा आणि त्यांच्या कृत्याकडे दुर्लक्ष करीत राहा. अल्लाह त्या लोकांना पसंत करतो जे उत्तम वर्तन राखतात. (१२-१३)

याचप्रमाणे आम्ही त्या लोकांकडून पक्के वचन घेतले होते ज्यांनी सांगितले होते की आम्ही नसारा (ख्रिश्चन) आहोत परंतु त्यांना देखील जो पाठ दिला गेला होता, त्यांचा फार मोठा भाग ते विसरलेत. सरतेशेवटी आम्ही त्यांच्या दरम्यान पुनरुत्थानाच्या

**१६)** हा संकेत, हजरत अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी निवेदन केलेल्या या घटनेकडे आहे की यहुदी लोकांच्या एका गटाने पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांच्या निवडक सोबत्यांना जेवणाचे आमंत्रण देऊन बोलावले होते. त्यांनी त्यांच्यावर अकस्मातपणे तुटून पडण्याचा गुप्त कट रचला होता जेणेकरून इस्लामला गतप्राण करून टाकावे, परंतु ऐनवेळी अल्लाहच्या कृपेने पैगंबर (स.) यांना त्यांच्या कटाची माहिती कळाली, पैगंबर (स.) जेवणासाठी गेले नाही.

**१७)** अरबी शब्द 'नकीब' (निरीक्षक) चा अर्थ देखरेख आणि शोध घेणारा असा होतो. बनीइस्राईल लोकांची १२ घराणी होती. सर्वोच्च अल्लाहने त्यापैकी प्रत्येक घराण्यासाठी एक एक निरीक्षक खुद्द त्याच घराण्यातून नियुक्त करण्याचा आदेश दिला होता, जेणेकरून त्यांनी त्या लोकांच्या स्थितीवर नजर ठेवावी व त्यांना अधर्मापासून व दुराव्यापासून दूर ठेवण्याचा प्रयत्न करीत राहावे.

**१८)** मूळ अरबी शब्द, 'सवाअस्सबील' (राजमार्ग) म्हणजे असा राजमार्ग जो अंतिम उद्दिष्टाप्रत पोहचविण्यासाठी बनविलेला असावा, त्याला हरवून टाकण्याचा अर्थ असा की माणसाने राजमार्गापासून दूर होऊन पायवाटांवर भटकत राहावे.



दिवसापर्यंत शत्रुत्व आणि परस्पर द्वेष व द्रोहाचे बीज पेरले. आणि अवश्य एक वेळ अशी येईल ज्या वेळेस अल्लाह त्यांना दाखवील की ते जगात काय करीत होते. (१४)

हे ग्रंथधारकांनो! आमचा पैगंबर तुमच्यापाशी आला आहे जो दैवी ग्रंथातील पुष्कळशा त्या गोष्टी तुमच्यासमोर स्पष्ट करीत आहे ज्यावर तुम्ही पडदा टाकीत आहात आणि तुमच्या कित्येक गोष्टी माफही करतो.[१९] तुमच्यापाशी अल्लाहकडून प्रकाश आणि एक असा सत्यदर्शी ग्रंथ आला आहे, ज्याच्याद्वारे सर्वश्रेष्ठ अल्लाह त्या लोकांना जे त्याच्या प्रसन्नतेचे इच्छुक आहेत, शांती व सुरक्षिततेच्या पद्धती दाखवितो आणि आपल्या आदेशाने त्यांना अंधारातून बाहेर काढून प्रकाशाकडे आणतो आणि सरळ मार्गाकडे त्यांचे मार्गदर्शन करतो. (१५-१६)

नि:संशय अश्रद्धा त्या लोकांनी केली ज्यांनी सांगितले की मरयमपुत्र मसीह हाच ईश्वर आहे. हे नबी (स.) त्यांना सांगा की जर अल्लाहने मरयमपुत्र मसीह आणि त्याची आई तसेच पृथ्वीवरील सर्वांना नष्ट करू इच्छिले तर कोण त्याला या इराद्यापासून रोखू शकेल? अल्लाह तर पृथ्वी आणि आकाशांचा आणि त्या सर्व वस्तूंचा स्वामी आहे ज्या पृथ्वी आणि आकाशांमध्ये आढळतात तो जे काही इच्छितो सृजन करतो[२०] व त्याचे प्रभुत्व प्रत्येक वस्तूवर आहे. (१७)

यहुदी आणि ख्रिस्ती सांगतात की आम्ही अल्लाहचे पुत्र व त्याचे लाडके आहोत. त्यांना विचारा, मग तो तुमच्या अपराधांकरिता तुम्हाला शिक्षा का देतो? खरे पाहता तुम्ही देखील तशीच माणसे आहात जशी इतर माणसे अल्लाहने निर्माण केली आहेत. तो ज्याला इच्छितो माफ करतो आणि ज्याला इच्छितो शिक्षा देतो. पृथ्वी, आकाश आणि त्यात अस्तित्वात असलेल्या सर्व वस्तू त्याच्या मालकीच्या आहेत आणि त्याच्याकडे सर्वांना परतावयाचे आहे. (१८)

हे ग्रंथधारकांनो! आमचा हा पैगंबर अशा वेळी तुमच्यापाशी आला आहे आणि धर्माची अशी सुस्पष्ट शिकवण तुम्हाला देत आहे - जेव्हा प्रेषितांच्या आगमनाचा क्रम एका दीर्घ काळापासून बंद होता - ते अशाकरिता की तुम्ही असे सांगू नये की आमच्यापाशी कोणी शुभवार्ता देणारा आणि भय दाखविणारा आला नाही, तर पाहा,

**१९)** म्हणजे तुमच्या काही अशा चोऱ्या आणि बेईमान्या ज्या उघड्या करणे धर्म प्रस्थापनेसाठी अनिवार्य आहे, त्यांना तो उघड करतो. तर ज्यांना उघडकीस आणण्याची काही वास्तविक जरूरी नाही त्यांच्याकडे डोळेझाक करतो.

**२०)** म्हणजे केवळ मसीह (येशू) चे पित्याविना जन्मास येण्यामुळे तुम्हा लोकांनी त्याला देव बनवून घेतले. वास्तविकपणे अल्लाह ज्याला जसे इच्छितो जन्मास आणतो. कोणीही दास केवळ या कारणास्तव देव बनत नाही की त्याला अल्लाहने असाधारण पद्धतीने जन्मास आणले आहे.

आता तो शुभवार्ता देणारा व भय दाखविणारा आला आहे - आणि अल्लाह प्रत्येक वस्तूवर प्रभुत्व-संपन्न आहे.[२१] (१९)

आठवा, तो प्रसंग जेव्हा मूसा (अ.) यांनी आपल्या लोकांना सांगितले होते की, "हे माझ्या बांधवांनो! अल्लाहची ती देणगी ध्यानात घ्या जी त्याने तुम्हाला प्रदान केली होती. त्याने तुमच्यात नबी (प्रेषित) निर्माण केले. तुम्हाला सत्ताधारी बनविले आणि तुम्हाला ते सर्वकाही दिले जे या जगात कोणालाच दिले नव्हते. हे माझ्या बांधवांनो! या पवित्रभूमीत दाखल व्हा जी अल्लाहने तुमच्याकरिता विधिपूर्वक बहाल केली आहे.[२२] मागे फिरू नका नाहीतर अयशस्वी व निराश परताल." त्यांनी उत्तर दिले, "हे मूसा! तेथे तर मोठे शक्तीशाली लोक राहतात. आम्ही तेथे कदापि जाणार नाही जोपर्यंत ते तेथून निघून जात नाहीत. परंतु होय, जर ते निघून गेले तर आम्ही दाखल होण्यास तयार आहोत." त्या भिणाऱ्यांपैकी दोन माणसे अशी देखील होती ज्यांना अल्लाहने आपल्या कृपेने उपकृत केले होते.[२३] त्यांनी सांगितले की, "या शक्तीशाली लोकांच्या मुकाबल्यासाठी दरवाजात प्रवेश करा, जेव्हा तुम्ही आत दाखल व्हाल तेव्हा तुम्हासच वर्चस्व प्राप्त होईल, अल्लाहवर भरवसा ठेवा जर तुम्ही श्रद्धावंत असाल." परंतु त्यांनी पुन्हा तेच सांगितले की, "हे मूसा! आम्ही तर तेथे कदापि जाणार नाही जोपर्यंत ते तेथे आहेत. तुम्ही आणि तुमचा पालनकर्ता दोघे जा आणि लढा. आम्ही येथेच बसलो आहोत." यावर मूसा (अ.) ने सांगितले, "हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या अखत्यारीत कोणी नाही परंतु एक तर मी स्वत: अथवा माझा भाऊ, तर तू आम्हाला या अवज्ञा करणाऱ्या लोकांपासून वेगळे करून सोड." अल्लाहने उत्तर दिले, "बरे तर, तो प्रदेश चाळीस वर्षांपर्यंत यांच्याकरिता निषिद्ध आहे. हे भूतलावर वणवण भटकत राहतील, या अवज्ञाकारींच्या स्थितीवर मुळीच दया

---

**२१)** म्हणजे तुम्ही जर या खुषखबर देणाऱ्या व भय दाखविणाऱ्याचे म्हणणे ऐकले नाही तर लक्षात ठेवा, अल्लाह सामर्थ्यशाली व प्रभुत्वसंपन्न आहे. अशी प्रत्येक शिक्षा जी तुम्हाला तो करू इच्छित असेल कसल्याही प्रतिकाराविना करू शकतो.

**२२)** पॅलेस्टाईनची भूमी अभिप्रेत आहे. त्यावेळी कट्टर अनेकेश्वरवादी आणि दुराचारी लोकांची तेथे वस्ती होती. बनीइस्राईल लोक जेव्हा मिस्रमधून निघाले तेव्हा सर्वोच्च अल्लाहने त्या लोकांसाठी त्याच भूमीला निश्चित केले व आज्ञा दिली की तेथे जाऊन ती भूमी जिंका.

**२३)** या दोन्ही श्रेष्ठीपैकी एक हजरत नूनपुत्र युशा होते. ते हजरत मूसा (अ.) नंतर त्यांचे उत्तराधिकारी झाले. दुसरे हजरत कालिब होते. ते हजरत युशा यांचे उजवे हात म्हणून होते. चाळीस वर्षे भटकत राहिल्यानंतर बनीइस्राईल लोक जेव्हा पॅलेस्टाईनमध्ये दाखल झाले त्यावेळी हजरत मूसा (अ.) यांच्या साथीदारांपैकी हेच दोन श्रेष्ठी जिवंत होते.



दाखवू नका."[२४] (२०-२६)

आणि जरा यांना आदम (अ.) च्या दोन मुलांची गोष्टदेखील पूर्णपणे ऐकवा, जेव्हा त्या दोघांनी कुर्बानी दिली तेव्हा त्यांच्यापैकी एकाची कुर्बानी स्वीकारली गेली आणि दुसऱ्याची स्वीकारली गेली नाही. त्याने सांगितले, "मी तुला ठार मारीन." त्याने उत्तर दिले, "अल्लाह तर पापभीरू लोकांच्याच भेटी स्वीकारतो. जरी तू मला ठार मारण्यासाठी हात उचलशील तरी मी तुला मारण्याकरिता हात उचलणार नाही.[२५] मी सर्व विश्वांचा स्वामी अल्लाहच्या प्रकोपाला भितो. मी इच्छितो की माझा आणि तुझा गुन्हा तूच संचित करशील आणि नरकवासी बनून राहशील. अत्याचारीच्या अत्याचाराला हाच खरा योग्य मोबदला आहे." सरतेशेवटी त्याच्या मोहाने आपल्या भावाची हत्या करणे त्यासाठी सोपे केले आणि तो त्याला ठार मारून त्या लोकांत सामील झाला जे नुकसान सोसणारे आहेत. मग अल्लाहने एक कावळा पाठविला जो जमीन खणू लागला जेणेकरून त्याला दाखवावे की आपल्या भावाचे प्रेत कसे लपवावे. हे पाहून तो उद्‌गारला, "खेद आहे मजवर! मी या कावळ्यासारखासुद्धा बनू शकलो नाही की आपल्या भावाचे प्रेत लपविण्याची युक्ती काढली असती." यानंतर त्याने आपल्या कृत्यावर फार पश्चात्ताप केला.[२६] (२७-३१)

याच कारणास्तव बनीइस्राईलकरिता आम्ही हे फर्मान लिहिले होते की, "ज्याने एखाद्या माणसाला खुनाबद्दल अथवा पृथ्वीतलावर उपद्रव पसरविण्याव्यतिरिक्त अन्य कारणाने ठार केले तर त्याने जणू काही सर्व मानवांना ठार केले. आणि ज्याने कोणाला जीवनदान दिले त्याने जणू काही सर्व मानवजातीला जीवन प्रदान केले." परंतु त्यांची अवस्था अशी आहे की आमचे प्रेषित वरचेवर त्यांच्यापाशी उघड उघड आदेश घेऊन आले तरीसुद्धा त्यांच्यात मोठ्या संख्येने पृथ्वीवर अतिरेक करणारे लोक आहेत. (३२)

---

**२४)** या ठिकाणी या घटनेचा उल्लेख करण्यामागचा हेतू बनीइस्राईल लोकांना अशी तंबी देण्याचा आहे की हजरत मूसा (अ.) यांच्या काळात अवज्ञा, विमुखता आणि धैर्यहीनता दाखविल्यामुळे जी शिक्षा तुम्हाला मिळाली होती त्यापेक्षा आता फारच कठोर शिक्षा, हजरत मुहम्मद (स.) यांच्याविरूद्ध बंडाळीचे वर्तन अंगिकारल्यामुळे तुम्हाला भोगावी लागेल.

**२५)** याचा अर्थ असा नव्हे की तू जर मला ठार मारण्यासाठी येशील तेव्हा मी ठार होण्यासाठी निमूटपणे तुझ्या पुढ्यात येऊन बसेन तर अर्थ असा की तू जर मला ठार करण्यासाठी तयार झाला असशील तर खुशाल हो, मी तुला ठार करण्यासाठी तत्पर होणार नाही.

**२६)** या ठिकाणी या घटनेचा उल्लेख करण्यामागचा हेतू यहूदी लोकांनी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) व त्यांच्या प्रतिष्ठित सोबत्यांना ठार करण्याचा जो कट केला होता त्यावर त्यांची निर्भर्त्सना करणे होय. दोन्ही घटनेतील साम्य अगदी उघड आहे. हे लोक देखील मत्सरापोटी पैगंबर मुहम्मद (स.) यांना ठार करू पाहात होते आणि हजरत आदम (अ.) च्या त्या मुलानेसुद्धा मत्सरापोटीच आपल्या भावाची हत्या केली होती.

जे लोक अल्लाह आणि त्याचे पैगंबर यांच्याशी युद्ध करतात आणि भूमीवर याकरिता धावपळ करतात की हिंसाचार माजवावा,[२७] त्यांची शिक्षा ही आहे की ते ठार मारले जातील अथवा सुळावर चढविले जातील अथवा परस्परविरूद्ध दिशेने त्यांचे हात-पाय कापले जातील, अथवा त्यांना देशांतर करावयास लावले जाईल. हा अपमान व नामुष्की तर त्यांच्यासाठी दुनियेत आहे आणि मरणोत्तर जीवनामध्ये त्यांच्याकरिता याहून मोठी शिक्षा आहे. परंतु जे लोक पश्चात्ताप करतील यापूर्वी की तुम्ही त्यांच्यावर प्रभुत्व प्रस्थापित करावे - तुम्हाला माहीत असावयास हवे की अल्लाह माफ करणारा व दया करणारा आहे.[२८] (३३-३४)

हे श्रद्धावंतांनो! अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि त्याच्या ठायी त्याची प्रसन्नता मिळविण्याचे साधन शोधा.[२९] आणि त्याच्या मार्गात संघर्ष करा कदाचित तुम्हाला यश प्राप्त होईल चांगले समजून असा की ज्या लोकांनी अश्रद्धेचे वर्तन अंगिकारले आहे जर त्यांच्या ताब्यात पृथ्वीवरील सर्व संपत्ती असली आणि तितकीच पुनश्च, आणि ते इच्छा करतील की ती मोबदल्यात देऊन पुनरुत्थानाच्या दिवसाच्या यातनेपासून सुटका व्हावी तरी ती त्यांच्याकडून स्वीकारली जाणार नाही आणि त्यांना दु:खदायक शिक्षा झाल्याशिवाय राहणार नाही. ते इच्छा करतील की नरकाच्या अग्नीमधून पळून जावे परंतु बाहेर निघू शकणार नाहीत आणि त्यांना चिरंतन शिक्षा दिली जाईल. (३५-३७)

---

**२७)** पृथ्वीने या ठिकाणी तो देश किंवा प्रदेश अभिप्रेत आहे ज्यात शांती व सुव्यवस्था प्रस्थापित करण्याची जबाबदारी इस्लामी राज्याने उचलली असावी. अल्लाह आणि पैगंबराशी लढण्याचा अर्थ, इस्लामी राज्याने देशात जी सद्‌व्यवस्था प्रस्थापित केली आहे त्याविरूद्ध युद्ध करणे होय. इस्लामी कायदेतज्ज्ञांच्या मते याच्याने अभिप्रेत ते लोक आहेत जे शस्त्रसज्ज होऊन व टोळी जमवून दरोडेखोरी आणि लूटमार करीत असावेत.

**२८)** म्हणजे ते जर उपद्रव माजविण्याच्या प्रयत्नापासून परावृत्त झाले असतील आणि सद्‌व्यवस्था उद्‌ध्वस्त करण्याचे अथवा ती उलथून टाकण्याचे प्रयत्न त्यांनी सोडून दिले असतील तसेच नंतरच्या वर्तनाने ते शांतताप्रिय, कायद्याधीन आणि सद्‌वर्तनी मनुष्य बनत असल्याचे सिद्ध होत असेल व त्यांनतर त्यांच्या पूर्वीच्या अपराधांची माहिती मिळाली तर ज्यांचा वर उल्लेख झाला आहे त्या शिक्षेपैकी कोणतीही शिक्षा त्यांना केली जाणार नाही. तथापि लोकांचे हक्क त्यांनी जर मारले व हडप केले असतील तर त्याच्या जबाबदारीतून ते मुक्त ठरणार नाहीत. उदा. एखाद्या माणसाला त्यांनी ठार केले होते अथवा एखाद्याची संपत्ती घेतली होती, अन्य एखादा गुन्हा मानवी जीवित व वित्ताविरूद्ध केला होता तर त्या गुन्ह्यासंबंधी फौजदारी खटला त्यांच्याविरूद्ध चालविला जाईल परंतु बंडाळी आणि द्रोह तसेच ईश्वर आणि पैगंबराविरूद्ध युद्धाचा कोणताही खटला त्यांच्याविरूद्ध चालविला जाणार नाही.

**२९)** म्हणजे अशा प्रत्येक साधनाचे इच्छुक व त्याचे शोधक बनून राहा जेणेकरून तुम्हाला अल्लाहशी जवळीक व त्याची प्रसन्नता तुम्हाला प्राप्त होऊ शकेल.



आणि चोर मग तो पुरुष असो अथवा स्त्री दोघांचे हात कापून टाका,[३०] हा त्यांच्या कर्माचा बदला आहे आणि अल्लाहकडून अद्दल घडविणारी शिक्षा! अल्लाहचे सामर्थ्य सर्वांवर प्रभावी आहे आणि तो बुद्धिमान व द्रष्टा आहे. मग जो कोणी अत्याचार केल्यानंतर पश्चात्ताप करील आणि स्वत:ला सुधारेल तर अल्लाहची कृपादृष्टी पुनश्च त्याच्याकडे वळेल.[३१] अल्लाह अत्यंत क्षमा करणारा व दया करणारा आहे. तुम्हाला माहीत नाही काय की अल्लाह पृथ्वी व आकाशांच्या साम्राज्याचा स्वामी आहे? ज्याला इच्छिल त्याला शिक्षा करील आणि ज्याला इच्छिल त्याला क्षमा करील आणि तो प्रत्येक गोष्टीचा अधिकार बाळगतो. (३८-४०)

हे पैगंबर! ते लोक तुमच्या दु:खाला कारणीभूत ठरू नयेत जे अश्रद्धेच्या मार्गात फार घाई करीत आहेत. मग ते त्यापैकी असोत जे फक्त तोंडाने बोलतात की आम्ही श्रद्धा ठेवली परंतु त्यांची हृदये श्रद्धा ठेवीत नाहीत, अथवा त्यापैकी जे यहुदी आहेत ज्यांची अवस्था अशी आहे की असत्यासाठी कान टवकारून असतात आणि इतर लोकांकरिता जे तुमच्यापाशी कधीच आले नाहीत कानोसा घेत फिरत असतात. अल्लाहच्या ग्रंथाच्या शब्दांना त्यांची खरी जागा ठरलेली असताना देखील मूळ अर्थापासून फिरवतात आणि

---

**३०)** दोन्ही हात नव्हे तर एक हात. पहिल्या चोरीसाठी उजवा हात तोडला जाईल. 'सरका' माणसाने अन्य एखाद्याचा माल त्याच्या संरक्षणातून काढून आपल्या ताब्यात केला असावा, केवळ याच कृत्यावर लागू होतो. एका ढालीपेक्षा कमी किमतीच्या चोरीसाठी हात तोडला जाणार नाही. विश्वसनीय निवेदनांनुसार पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या शुभकाळात ढालीची किंमत दहा दिर्हम होत असे. त्या काळातील दिरहमच्या नाण्यात ३ मासे १.१/५ रत्ती इतकी चांदी असे. बऱ्याचशा वस्तू अशा आहेत ज्यांच्या चोरीबद्दल हात तोडण्याची शिक्षा केली जाणार नाही. उदा. फळे व भाज्यांची चोरी, अन्नाची चोरी, क्षुल्लक वस्तूंची चोरी, पक्ष्यांची चोरी, सरकारी खजिन्याची चोरी, तात्पर्य असे की अशा प्रकारच्या चोरीसाठी हात तोडला जाणार नाही. अशा सर्व चोऱ्या माफ आहेत असा अर्थ नाही.

**३१)** याचा अर्थ असा नव्हे की असल्या चोराचे हात तोडले जाऊ नयेत तर अर्थ असा की हात तोडल्यानंतर जो इसम पश्चात्ताप करील आणि आपले मन चोरीपासून शुद्ध करून अल्लाहचा सदाचारी दास बनेल तो अल्लाहच्या प्रकोपापासून वाचेल. अल्लाह त्याच्या प्रतिमेवरील तो डाग पुसून टाकील. परंतु जर एखाद्या इसमाने हात तोडल्यानंतरसुद्धा आपल्या स्वत:ला मनाच्या दुष्टाचारापासून शुद्ध केले नाही व ज्या दुष्ट भावनेपोटी त्याने चोरी केली व त्याचा हात तोडला गेला, तिचीच मनात जोपासना केली तर त्याचा अर्थ असा झाला की हात तर त्याच्या शरीरापासून वेगळा झाला असला तरी चोरी त्याच्या मनात मात्र पूर्ववत तशीच राहिली. म्हणून तो ईश्वरी प्रकोपास त्याचप्रमाणे पात्र राहील ज्याप्रमाणे हात तोडण्यापूर्वी होता. म्हणूनच दिव्य कुरआन चोराला आदेश देतो की त्याने अल्लाहची क्षमा मागावी व आपले मन शुद्ध करावे कारण मनाची शुद्धता न्यायालयाच्या शिक्षेने नव्हे तर केवळ पश्चात्ताप आणि अल्लाहकडे वळण्यानेच प्राप्त होत असते.

लोकांना सांगतात की जर तुम्हाला हा आदेश दिला गेला तर मान्य करा नाही तर मानू नका.[32] ज्याला अल्लाहनेच उपद्रवामध्ये टाकण्याचा इरादा केला त्याला अल्लाहच्या पकडीतून वाचविण्यासाठी तुम्ही काही करू शकत नाही.[33] हे ते लोक आहेत ज्यांच्या हृदयांना अल्लाहने शुद्ध करणे इच्छिले नाही. यांच्याकरिता जगात नामुष्की आणि परलोकात कठोर शिक्षा आहे. (४१)

हे असत्य ऐकणारे व निषिद्ध माल खाणारे आहेत, म्हणून हे जर तुमच्यापाशी आले तर तुम्हाला अधिकार देण्यात येत आहे की तुमची इच्छा असल्यास त्यांचा न्यायनिवाडा करा किंवा नकार द्या. नकार दिला तर हे तुमचे काही बिघडवू शकत नाही आणि निर्णय द्यायचा असेल तर मग न्यायपूर्ण रीतीने द्या, कारण अल्लाह न्यायी लोकांना पसंत करतो.[34] आणि हे तुम्हाला न्याय-निवाडा देणारा तरी कसे बनवितात जेव्हा यांच्याजवळ तौरात उपलब्ध आहे ज्यात अल्लाहचा आदेश लिहिलेला आहे, आणि हे त्यापासून पराङ्मुख होत आहेत? वस्तुस्थिती अशी आहे की हे लोक श्रद्धाच बाळगत नाहीत. (४२-४३)

आम्ही तौरात हा ग्रंथ अवतरला ज्यात मार्गदर्शन व प्रकाश होता. सर्व नबी (प्रेषित) जे मुस्लिम होते त्याला अनुसरून या यहुदी लोकांच्या सर्व बाबींचा निर्णय देत असत.

**३२)** म्हणजे अडाणी लोक सामान्यजनांना म्हणतात की जी आज्ञा आम्ही सांगत आहोत, मुहम्मद (स.) देखील तीच आज्ञा जर सांगत असतील तर ती मान्य करा नाहीतर अमान्य करा.

**३३)** अल्लाहद्वारे एखाद्याला उपद्रवात टाकल्या जाण्याचा अर्थ असा की ज्या माणसात सर्वोच्च अल्लाह एखाद्या प्रकारची वाईट प्रवृत्ती वाढत असल्याचे पाहतो त्याच्यासमोर लागोपाठ असे प्रसंग आणतो ज्यात त्या माणसाची कठोर परीक्षा असते. जर तो मनुष्य तोपर्यंत दुष्टतेकडे पूर्णपणे वळला नसेल तर त्या परीक्षेद्वारे तो सावरतो. त्याच्यात दुष्टतेचा मुकाबला करण्यासाठी भलेपणाच्या ज्या कुवती विद्यमान असतात त्या उफाळून येतात. परंतु जर तो दुष्टतेकडे पुरता झुकलेला असतो व त्याच्यातील भलेपणाने त्याच्या दुष्टतेशी आतल्या आतच हार खाल्लेली असते तेव्हा अशा प्रत्येक परीक्षेच्या प्रसंगी तो आणखी जास्त दुष्टतेच्या सापळ्यात अडकला जात असतो. हेच सर्वश्रेष्ठ अल्लाहचे उपद्रव आहे ज्यापासून वाईट बनत असलेल्या माणसाला वाचविणे त्याच्या कोणत्याही हितचिंतकाच्या आवाक्यात राहात नसते.

**३४)** यहूदी लोक तोपर्यंत इस्लामी राज्याची कायदेशीर प्रजा बनले नव्हते, तर इस्लामी राज्याशी त्यांचे संबंध करारावर अवलंबून होते. म्हणून पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या न्यायालयात येणे त्यांच्यासाठी जरुरीचे नव्हते. परंतु ज्याबाबतीत ते खुद्द स्वत:च्या धार्मिक कायद्यानुसार न्यायनिवाडा करू इच्छित नसत त्यांचा निवाडा करविण्यासाठी ते पैगंबर (स.) जवळ या आशेने येत असत की कदाचित पैगंबर (स.) यांच्या धर्मकायद्यात त्यांच्यासाठी एखादा दुसरा हुकूम असावा व अशा प्रकारे स्वत:च्या धार्मिक कायद्याच्या अनुकरणापासून त्यांना वाचता येईल.



आणि याचप्रकारे धर्मपंडित आणि धर्मशास्त्री[35] देखील (यावरच आपल्या निर्णयाची मदार राखत असत.) कारण त्यांना अल्लाहच्या ग्रंथाच्या संरक्षणाचे जबाबदार बनविण्यात आले होते व यावर ते साक्षी होते. म्हणून (हे यहूदी लोकहो!) तुम्ही लोकांना भिऊ नका तर माझे भय बाळगा आणि माझी संकेतवचने क्षुल्लक मोबदल्यात विकणे सोडून द्या. जे लोक अल्लाहच्या अवतरित केलेल्या कायद्याला अनुसरून न्यायनिवाडा करीत नसतील तेच द्रोही होत. (४४)

तौरातमध्ये आम्ही यहूदी लोकांसाठी हा आदेश लिहिला होता की प्राणाच्या बदल्यात प्राण, डोळ्यासाठी डोळा, नाकासाठी नाक, कानाबद्दल कान, दाताबद्दल दात आणि सर्व जखमांबद्दल बरोबरीचा बदला. मग जो किसास (हत्यादंड) ऐवजी दान (सदका) करील तर तो त्याच्यासाठी पापक्षालन (कफ्फारा) होय. आणि जे लोक अल्लाहद्वारे अवतरित केलेल्या कायद्याला अनुसरून न्यायनिवाडा करत नसतील तेच अत्याचारी होत. (४५)

मग आम्ही त्या प्रेषितानंतर मरयमपुत्र ईसाला पाठविले तौरातपैकी जे काही त्याच्यासमोर उपलब्ध होते, तो त्याची सत्यता प्रमाणित करणारा होता. आणि आम्ही त्याला 'इंजील' (नवा करार) प्रदान केले ज्यात मार्गदर्शन व दिव्य प्रकाश होता आणि तो ग्रंथदेखील तौरातपैकी जे काही त्याकाळी उपलब्ध होते त्यातील सत्य प्रमाणित करणारा होता तसेच त्यात अल्लाहचे भय बाळगणाऱ्या लोकांसाठी पुरेपूर मार्गदर्शन व उपदेश होता. आमची आज्ञा होती की इन्जीलधारकांनी या कायद्याला अनुसरून न्यायनिवाडा करावा जो अल्लाहने त्यात अवतरित केला आहे, व जे लोक अल्लाहने अवतरित केलेल्या कायद्याला अनुसरून न्यायनिवाडा करीत नसतील तेच फासिक (अवज्ञा करणारे)

**३५)** 'रब्बानी' याने अभिप्रेत धर्मविद्वान आहेत व 'अहबार'ने अभिप्रेत धर्मशास्त्री आहेत.

होत.[३६] (४६-४७)

मग हे पैगंबर (स.), आम्ही तुमच्याकडे हा ग्रंथ पाठविला जो सत्य घेऊन आला आहे आणि अलकिताब (पूर्वकालीन ईश्वरीय ग्रंथ) पैकी जे काही त्याच्यासमोर उपलब्ध आहे त्यातील सत्य प्रमाणित करणारा व त्याचा संरक्षक व त्याची निगा राखणारा आहे,[३७] म्हणून तुम्ही अल्लाहने अवतरित केलेल्या कायद्यानुसारच लोकांच्या मामल्यांचा न्यायनिवाडा करा आणि जे सत्य तुमच्यापाशी आले आहे त्यापासून पराड्मुख होऊन त्यांच्या इच्छेचे अनुकरण करू नका - आम्ही तुम्हा (मानवा) पैकी प्रत्येकासाठी एकच शरीअत (जीवनाचा कायदा) व एकच कार्यप्रणाली निश्चित केली. जर तुमच्या ईश्वराने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना एकच लोकसमूह (उम्मत) बनवू शकत होता परंतु त्याने हे यासाठी केले की जे काही त्याने तुम्हा लोकांना दिले आहे त्यात तुमची परीक्षा घ्यावी.

३६) या ठिकाणी, सर्वोच्च अल्लाहने जे त्याने उतरविलेल्या कायद्यानुसार न्यायनिवाडा करीत नसतील त्यांच्यासाठी तीन आदेश सिद्ध केले आहेत. एक असा की ते काफिर आहेत, दुसरा ते अत्याचारी आहेत आणि तिसरा असा की ते अवज्ञाकारी आहेत. जो इसम ईश्वरी आज्ञेविरूद्ध या कारणास्तव निवाडा करतो की तो अल्लाहच्या आज्ञेला चूक व आपल्या किंवा अन्य एखाद्या मनुष्याच्या आज्ञेला योग्य व बरोबर समजतो तो पूर्णपणे काफिर व अत्याचारी आणि अवज्ञाकारी आहे. जो इसम श्रद्धा म्हणून अल्लाहच्या आज्ञेला सत्याधिष्ठित समजतो परंतु प्रत्यक्षात त्याच्याविरूद्ध निवाडा करतो तो धर्मबाह्य जरी नसला तरी आपल्या ईमान-श्रद्धेत, कुफ्र, अत्याचार आणि अवज्ञेची भेसळ करीत आहे. त्याचप्रकारे ज्याने सर्व बाबतीत ईश्वरी आज्ञेपासून विमुखता पत्करली आहे तो सर्व बाबतीत काफिर, अत्याचारी आणि अवज्ञाकारी आहे. तर जो काही बाबतीत आज्ञांकित तर काही बाबतीत विमुख आहे त्याच्या जीवनात ईमान आणि इस्लामबरोबरच कुफ्र, अत्याचार आणि अवज्ञेची सरमिसळ अगदी त्याच प्रमाणात आहे ज्या प्रमाणात त्याने आज्ञाधीनता व अवज्ञेची सरमिसळ केली आहे.

३७) या ठिकाणी एका महत्वाच्या सत्यतेकडे निर्देश केलेला आहे. हा विषय अशा शब्दात जरी व्यक्त केला जाऊ शकत होता. ''पूर्वीच्या ग्रंथा''मधून जे काही आपल्या मूळ आणि वास्तविक स्वरूपात विद्यमान आहे कुरआन त्याची सत्यता प्रमाणित करतो परंतु सर्वश्रेष्ठ अल्लाहने ''पूर्वीच्या ग्रंथा''ऐवजी 'अलकिताब' (तो ग्रंथ) हा शब्द वापरला आहे. याने ते रहस्य उघड होते की कुरआन आणि निरनिराळ्या काळात व निरनिराळ्या भाषेत सर्वोच्च अल्लाहकडून उतरलेले इतर सर्व ग्रंथ मुळात एकच ग्रंथ होत. एकच त्यांचा रचयिता व लेखक आहे व त्या ग्रंथांचे उद्दिष्ट आणि ध्येयदेखील एकच आहे, त्यांची शिकवणसुद्धा एकच आहे व अखिल मानवजातीला त्याच्याद्वारे प्रदान केलेले ज्ञानदेखील एकच आहे. त्यांच्यात फरक असला तरी तो केवळ लिखाणाचा आहे. एकाच हेतूसाठी निरनिराळ्या संबंधितांच्या दृष्टिने निरनिराळ्या पद्धती अवलंबिल्या गेल्या आहेत. कुरआनला 'अलकिताब'चा संरक्षक व निगाह राखणारा म्हणून संबोधण्याचा अर्थ असा की पूर्वीच्या दैवी ग्रंथात सांगितलेल्या त्या सर्व सत्याधिष्ठित शिकवणी कुरआनने आपल्यात सामावून सुरक्षित केल्या आहेत, त्यांच्या सत्याथिष्ठित शिकवणी आता नष्ट होणार नाहीत.



म्हणून चांगुलपणात एक दुसऱ्यापेक्षा सरस ठरण्याचा प्रयत्न करा. सरतेशेवटी तुम्हा सर्वांना अल्लाहकडेच परत जावयाचे आहे, मग तो तुम्हाला सत्य:स्थिती दाखवून देईल ज्यामध्ये तुम्ही मतभेद करीत राहिला आहात तर हे पैगंबर (स.), तुम्ही अल्लाहद्वारे अवतरित केलेल्या कायद्यानुसार या लोकांच्या मामल्यांचा न्यायनिवाडा करा व त्यांच्या इच्छाआकांक्षाचे अनुकरण करू नका. सावध राहा की ह्या लोकांनी तुम्हाला संकटात गुंतवून त्या मार्गदर्शनापासून यत्किंचित देखील पराड्मुख करता कामा नये, जे मार्गदर्शन तुमच्याकडे अल्लाहने अवतरित केले आहे, मग जर हे यापासून पराङमुख झाले तर समजा की अल्लाहने यांच्या काही अपराधांची शिक्षा म्हणून यांना संकटात गुंतवून टाकण्याचा इरादाच केला आहे, आणि ही वस्तुस्थिती आहे की या लोकांतील बहुतेक अवज्ञा करणारे आहेत. (जर हे अल्लाहच्या वायद्यापासून विमुख होत आहेत) तर मग काय हे अज्ञानमूलक[३८] निर्णय इच्छितात? वास्तविक पाहता जे लोक अल्लाहवर विश्वास ठेवतात त्यांच्या दृष्टिने अल्लाहपेक्षा उत्तम न्याय देणारा दुसरा कोण असू शकेल?

(४८-५०)

हे श्रद्धावंतांनो, दांभिक यहूदी व पाखंडी ख्रिस्तींना आपले जीवलग बनवू नका, हे आपापसांतच एक दुसऱ्याचे मित्र आहेत आणि जर तुमच्यापैकी कोणी त्यांना आपला मित्र बनवीत असेल तर त्याची देखील गणना त्यांच्यातच होईल, नि:संशय अल्लाह अत्याचाऱ्यांना आपल्या मार्गदर्शनापासून वंचित करतो. (५१)

तुम्ही पाहता की त्यांच्या हृदयाला दांभिकतेचा रोग जडला आहे ते त्यांच्यातच धावपळ करीत राहतात. सांगतात की, ''आम्हाला भय वाटते की कदाचित आम्ही संकटाच्या चक्रात सापडू.'' परंतु दूर नव्हे की अल्लाह जेव्हा तुम्हाला निर्णायक विजय प्रदान करील अथवा आपल्याकडून इतर एखादी गोष्ट प्रकट करील तेव्हा हे लोक आपल्या या दांभिकपणावर जो ते आपल्या हृदयात लपवून आहेत पश्चात्ताप करतील आणि त्या वेळी श्रद्धावंत सांगतील, ''काय हे तेच लोक आहेत जे अल्लाहच्या नावावर मोठ्या कठोर शपथा घेऊन खात्री देत होते की आम्ही तुमच्याबरोबर आहोत?'' त्यांची सर्व कृत्ये वाया गेली आणि सरतेशेवटी ते अपयशी व निराश होऊन राहिले. (५२-५३)

३८) अज्ञानमूलक (जाहिलियत) हा शब्द इस्लामच्याविरूद्ध वापरला जातो. इस्लामची पद्धत मूर्तीमंत ज्ञान आहे कारण त्याकडे ईश्वराने मार्गदर्शन केले आहे. ईश्वराला वास्तवतेचे ज्ञान आहे. याउलट इस्लामविरूद्ध असलेली प्रत्येक पद्धत, अज्ञानमूलक पद्धत आहे. अरबस्तानाच्या इस्लामपूर्व काळाला अज्ञानमूलक काळ या अर्थाने सांगितला गेला आहे की त्या काळी ज्ञानाविना केवळ अनुमान व तर्क अथवा भ्रामक कल्पना किंवा इच्छाआकांक्षांच्या आधारावर लोकांनी आपल्यासाठी जीवनपद्धती ठरविल्या होत्या. ही कार्यपद्धती ज्या ठिकाणी व ज्या काळात अवलंबिली जाईल कोणत्याही परिस्थितीत तिला अज्ञानमूलक पद्धतच म्हटले जाईल.

हे श्रद्धावंतांनो! जर तुमच्यापैकी कोणी आपल्या धर्मापासून पराङमुख होत असेल (तर खुशाल व्हावे) अल्लाह आणखी कित्येक लोक असे निर्माण करील जे अल्लाहला प्रिय असतील आणि अल्लाह त्यांना प्रिय असेल, जे सत्जनांसाठी मृदू आणि दुर्जनांसाठी कठोर असतील,[३९] जे अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा करतील आणि कोणत्याही निर्भर्त्सना करणाऱ्यांच्या निर्भर्त्सनेला भिणार नाहीत. ही अल्लाहची कृपा आहे, तो ज्याला इच्छितो त्याला प्रदान करतो. अल्लाह सर्वव्यापी आहे आणि सर्वकाही जाणतो. (५४)

तुमचे मित्र तर खरे पाहता केवळ अल्लाह आणि अल्लाहचा पैगंबर आणि ते श्रद्धावंत होत जे नमाज प्रस्थापित करतात, जकात देतात व अल्लाहसमोर झुकणारे आहेत. आणि ज्याने अल्लाह आणि त्याचा पैगंबर व श्रद्धावंतांना आपले मित्र बनविले, त्याला माहीत असावे की अल्लाहचाच पक्ष यशस्वी राहणारा आहे. (५५-५६)

हे श्रद्धावंतांनो, तुमच्या पूर्वीच्या ग्रंथधारकांपैकी ज्या लोकांनी तुमच्या धर्माला थट्टा व मनोरंजनाचे साधन बनविले आहे, त्यांना व इतर अश्रद्धावंतांना आपले मित्र व सोबती बनवू नका. अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा जर तुम्ही श्रद्धावंत असाल. जेव्हा तुम्ही नमाजसाठी आवाहन करता तेव्हा ते त्याची थट्टा करतात व त्याला खेळ समजतात.[४०] याचे कारण असे आहे की त्यांना बुद्धी नाही. त्यांना सांगा, ''हे ग्रंथधारकांनो, तुम्ही ज्या गोष्टीने आमच्याशी वैर करीत आहात ती या व्यतिरिक्त अन्य काय आहे की आम्ही अल्लाहवर आणि धर्माच्या त्या शिकवणुकीवर श्रद्धा ठेवली आहे जी आमच्यावर अवतरली आहे व आमच्यापूर्वी देखील अवतरली होती, आणि तुमच्यापैकी बहुतेक लोक तर अवज्ञा करणारे आहेत?'' मग सांगा, ''काय मी त्या लोकांचा निर्देश करू, ज्यांचा

३९) 'श्रद्धावंतांसाठी मृदू' असण्याचा अर्थ असा की एखाद्याने श्रद्धावंतांविरूद्ध आपल्या शक्तीचा कधीच उपयोग करू नये. त्याचे चातुर्य व बुद्धिमत्ता, त्याची लायकी व त्याचा प्रभाव, त्याची संपत्ती व त्याचे शारीरिक बळ अशी कोणतीही गोष्ट मुसलमानांवर दबावासाठी, त्यांना त्रास देण्यासाठी व हानी पोहोचविण्यासाठी असू नये. मुसलमानांना आपल्यात तो सदैव एक मृदू स्वभावी, दयाळू, कनवाळू आणि सहिष्णू म्हणूनच आढळावा, 'अश्रद्धावंतांसाठी कठोर' असण्याचा अर्थ असा की एक श्रद्धावंत माणूस आपल्या ईमान-श्रद्धेच्या दृढतेमुळे, धर्मनिष्ठेमुळे, तत्त्व व नियमांचा भक्कमपणा, चारित्र्यशक्ती आणि ईमानाच्या डोळसपणामुळे इस्लामविरोधकांच्या मुकाबल्यात पर्वतासमान असावा की कोणालाही हटविता येत नाही. इस्लाम विरोधकांना तो कधी आपला हस्तक अथवा सहजभक्ष असल्याचे वाटू नये. त्यांना जेव्हा जेव्हा त्याच्याशी गाठ पडेल तेव्हा याची प्रचिती यावी की हा अल्लाहचा बंदा प्राण देऊ शकतो परंतु कोणत्याही मोलावर खरीदला जाऊ शकत नाही व कोणत्याही दबावापुढे नमू शकत नाही.

४०) म्हणजे 'अजान'ची हाक ऐकून त्याच्या नकला करतात, चेष्टामस्करीसाठी त्याचे शब्द बदलतात व विकृत करतात आणि टोमणे मारतात.



शेवट अल्लाहपाशी अवज्ञा करणाऱ्यांच्या शेवटापेक्षा अधिक वाईट आहे? ते, अल्लाहने ज्यांचा धिक्कार केला आणि ज्यांच्यावर त्याचा प्रकोप कोसळला, ज्यांच्यापैकी माकड व डुक्कर बनविले गेले, ज्यांनी 'तागूत' (अल्लाहशी द्रोह करणारे) ची भक्ती केली, त्यांचे स्थान आणखीनच वाईट आहे - आणि ते सन्मार्गापासून दूरवर भरकटलेले आहेत.''

(५७-६०)

जेव्हा हे तुमच्यापाशी येतात तेव्हा म्हणतात की आम्ही श्रद्धा ठेवली, खरे पाहता ते अश्रद्धा घेऊन आले होते व अश्रद्धा घेऊनच परत गेले आणि जे काही त्यांनी आपल्या हृदयात लपविले आहे ते अल्लाह चांगल्याप्रकारे जाणतो. तुम्ही पाहता की त्यांच्यापैकी पुष्कळसे लोक पाप व जुलूम आणि अत्याचाराच्या कृत्यांत धावपळ करीत हिंडतात आणि निषिद्ध माल खातात. अत्यंत वाईट कृत्ये आहेत जी ते करीत आहेत. यांचे धर्ममार्तंड व पुरोहित यांना पाप-वचनांच्या उच्चारणापासून व निषिद्ध माल खाण्यापासून का बरे प्रतिबंध करीत नाहीत? खचितच अत्यंत वाईट जीवनकार्य आहे जे ते रचित आहेत.

(६१-६३)

यहूदी म्हणतात, अल्लाहचे हात बांधलेले आहेत.[४१] - बांधले गेले यांचे हात[४२] आणि धिक्कारले गेले हे त्या बडबडीबद्दल जी हे करीत आहेत - अल्लाहचे हात तर उदार आहेत तो जसे इच्छितो तसे खर्च करतो. (६४-)

वस्तुस्थिती अशी की जी वाणी तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर अवतरली आहे ती उलट यांच्यापैकी बहुतेकांच्या शिरजोरी व असत्यप्रियतेत वृद्धी होण्यास कारणीभूत झाली आहे, आणि (याची शिक्षा म्हणून) आम्ही यांच्या दरम्यान पुनरूत्थान घडेपर्यंत वैर व शत्रुत्व घातले आहे. जेव्हा कधी हे युद्धाचा अग्नी भडकवितात, अल्लाह त्या अग्नीला विझवून टाकतो. हे पृथ्वीवर हिंसाचार पसरविण्याचा प्रयत्न करीत आहेत पण अल्लाह हिंसाचार माजविणाऱ्यांना मुळीच पसंत करीत नाही. (-६४)

जर (या शिरजोरीऐवजी) या ग्रंथधारकांनी श्रद्धा ठेवली असती व ईशभीरूतेचे वर्तन अंगिकारले असते तर आम्ही यांच्यातील वाईट गोष्टी यांच्यापासून दूर केल्या असत्या आणि यांना ऐश्वर्यसंपन्न स्वर्गामध्ये प्रवेश दिला असता. किती छान झाले असते जर यांनी तौरात व इंजील आणि त्या दुसऱ्या ग्रंथांना रूढ केले असते जे यांच्या पालनकर्त्याकडून यांच्याजवळ पाठविले गेले होते. असे केले असते तर यांच्यासाठी वरून

४१) अरबी वाक्यप्रचारानुसार एखाद्याचे हात बांधलेले असण्याचा अर्थ असा की तो कंजूष आहे, दानधर्म करण्यासाठी त्याचा हात पुढे होत नाही.

४२) म्हणजे कंजुषपणाला ते स्वत:च बळी पडले आहेत. जगात आपला कंजुषपणा आणि संकुचित मनोवृत्तीचे ते एक प्रतीक आहेत.

अन्नवृष्टी झाली असती व खालून जमिनीतून अमाप भेटले असते. जरी त्यांच्यात काहीजण सरळमार्गीसुद्धा आहेत परंतु त्यांच्यातील बहुसंख्य अत्यंत दुराचारी आहेत. (६५-६६)

हे पैगंबर (स.), जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर अवतरले आहे ते लोकांपर्यंत पोहोचवा. जर तुम्ही असे केले नाही तर प्रेषितत्वाचे कर्तव्य पार पाडले नाही. अल्लाह तुम्हाला लोकांच्या दुष्टतेपासून वाचविणारा आहे. खात्री बाळगा की तो अश्रद्धावंतांना (तुमच्या विरोधात) यशाचा मार्ग मुळीच दाखविणार नाही. स्पष्ट सांगून टाका की, ''हे ग्रंथधारकांनो, तुम्ही कदापि कोणत्याच मुलाधारावर नाही जोपर्यंत तौरात व इंजील आणि त्या इतर ग्रंथांवर तुम्ही दृढ रहात नाही जे तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्याकडून अवतरित केले गेले आहेत.'' खचितच हा आदेश जो तुमच्यावर अवतरित केला गेला आहे तो यांच्यापैकी बहुतेकांची प्रतारणा व इन्कार अधिक वाढवेल. पण नाकारणाऱ्यांच्या स्थितीबद्दल काही खेद करू नका. (खात्री बाळगा की येथे कुणाचीही मक्तेदारी नाही) मुसलमान असोत अथवा यहूदी, साबी असोत अथवा ख्रिस्ती, जो कोणी अल्लाह व अंतिम दिनावर श्रद्धा ठेवील आणि प्रामाणिक आचरण करील नि:संशय त्याच्यासाठी कोणत्याही प्रकारच्या भयाला स्थान नाही, आणि तो दु:खी होणार नाही.[४३] (६७-६९)

आम्ही बनीइस्राईलकडून दृढवचन घेतले आणि त्यांच्याकडे अनेक प्रेषित पाठविले परंतु जेव्हा कधी एखादा प्रेषित त्यांच्या मनोवासनेविरूद्ध काही घेऊन आला तेव्हा त्यांनी काहींना खोटे ठरविले आणि काहींना ठार केले. आणि आपल्याठायी अशी समजूत करून घेतली की कोणताही उपद्रव उद्भवणार नाही, जणू आंधळे आणि बहिरे बनले. तरीही अल्लाहने त्यांना माफ केले तेव्हा त्यांच्यापैकी बहुतेक लोक अधिकच आंधळे आणि बहिरे बनत गेले. अल्लाह त्यांची ही सर्व कृत्ये पाहात राहिलेला आहे. (७०-७१)

खचितच द्रोह त्या लोकांनी केला ज्यांनी म्हटले की, अल्लाह मरयमपुत्र-मसीह (येशू) च आहे. वास्तविक पाहता मसीह (अ.) ने सांगितले होते की, ''हे बनीइस्राईल अल्लाहची भक्ती करा जो माझा व तुमचासुद्धा पालनकर्ता आहे.'' ज्याने एखाद्याला अल्लाहसमवेत सहभागी ठरविले त्याच्यावर अल्लाहने स्वर्ग प्रतिबंधित केले आणि त्याचे स्थान नरक आहे व अशा अत्याचाऱ्यांचा कोणीच सहायक नाही. (७२)

खचितच द्रोह केला त्या लोकांनी, ज्यांनी म्हटले की, अल्लाह तिन्हींपैकी एक आहे खरे पाहता एकमेव ईश्वराशिवाय कोणीही ईश्वर नाही. जर हे लोक आपल्या या गोष्टीपासून परावृत्त झाले नाहीत तर यांच्यापैकी ज्याने द्रोह केला आहे त्याला कठोर शिक्षा दिली जाईल. मग काय हे लोक अल्लाहपाशी पश्चात्ताप व्यक्त करणार नाहीत आणि

**४३)** स्पष्टीकरणासाठी पहा सूरह बकरा आयत क्र. ६२, टीप क्र. २६



त्याच्याजवळ माफी मागणार नाहीत? अल्लाह फार क्षमाशील व दया करणारा आहे. (७३-७४)

मरयमपुत्र येशू याशिवाय काही नाही की तो फक्त एक प्रेषित होता. त्याच्यापूर्वी देखील अनेक प्रेषित होऊन गेले होते, त्याची आई एक सत्यवादी स्त्री होती, आणि ते दोघे (इतर माणसांप्रमाणेच) अन्न भक्षण करीत होते. पहा, आम्ही कशाप्रकारे त्यांच्यासमोर सत्यवचने स्पष्ट करतो, शेवटी पहा ते कुठे उलट परतून जातात.[४४] (७५)

त्यांना सांगा, काय तुम्ही अल्लाहला सोडून त्याची उपासना करता जो तुमच्या नुकसानीचाही अधिकार बाळगत नाही की फायद्याचाही नाही? वास्तविक पाहता सर्वांचे ऐकणारा व सर्वकाही जाणणारा तर अल्लाहच आहे. सांगा, ''हे ग्रंथधारकांनो, आपल्या धर्मामध्ये नाहक अतिरेक करू नका आणि त्या लोकांच्या कल्पनांचे अनुसरण करू नका, जे तुमच्या अगोदर स्वत: पथभ्रष्ट झाले व बहुतेकांना ज्यांनी पथभ्रष्ट केले आणि सन्मार्गापासून भरकटले.'' बनीइस्राईलपैकी ज्या लोकांनी अश्रद्धेचा मार्ग अवलंबिला ते दाऊद (अ.) आणि मरयमपुत्र येशू यांच्या वाणीद्वारे धिक्कारले गेले कारण ते दुराचारी झाले होते व मर्यादा-भंग करू लागले होते, त्यांनी एकमेकाला अपकृत्यापासून परावृत्त करण्याचे सोडून दिले होते,[४५] वाईट आचरण होते त्यांचे, जे त्यांनी अंगिकारले. आज तुम्ही त्यांच्यात पुष्कळसे असे लोक पाहता जे (श्रद्धावंतांच्या विरोधात) अश्रद्धावंतांचे समर्थन व त्यांच्याशी मैत्री करतात. निश्चितपणे अत्यंत वाईट शेवट आहे त्यांचा, ज्याची

**४४)** या थोडक्या शब्दात ख्रिश्चनांच्या येशू ख्रिस्ताच्या देवत्वाच्या श्रद्धेचे इतके स्पष्ट खंडन केलेले आहे की त्यापेक्षा अधिक स्पष्ट खंडन शक्य नाही. येशू मसीहसंबंधी, वास्तविकपणे तो कोण होता, असे जर एखाद्याला जाणून घेण्याची इच्छा असेल तर या लक्षणावरून तो केवळ एक मनुष्य होता हे अगदी नि:संदिग्धपणे त्याला कळू शकते. जो एका स्त्रीपोटी जन्मला, ज्याची वंशावळ देखील उपलब्ध आहे, ज्याचे शरीर मानवी शरीर होते, मनुष्यासाठी ज्या विशिष्ट आहेत अशा सर्व मर्यादा व बंधनानी जो बांधलेला आणि तीच गुणवैशिष्ट्ये बाळगणारा होता, ज्याला झोप येत असे, ज्याला अन्न घ्यावे लागत असे, ज्याला उष्मा व थंडी जाणवत असे, ईश्वराचा सहभागी व सहकारी आहे असे एखाद्या सुज्ञ माणसाच्या कल्पनेतसुद्धा येणार नाही, हे अगदी उघड आहे.

**४५)** प्रत्येक लोकसमूहाचे बिघडणे प्रथमत: काही माणसापासून सुरू होते. जर त्या लोकांची राष्ट्रीय सद्सद्विवेकबुद्धी जागृत असली तर लोकमताचे अशा बिघडलेल्या व्यक्तींवर दडपण राहून एकंदरितपणे ते राष्ट्र बिघडत नाही. परंतु अशा बिघडलेल्या काही व्यक्तींच्या संबंधाने ते राष्ट्र जेव्हा औदासिन्य दर्शविते व दुराचारी लोकांची निर्भर्त्सना करण्याऐवजी त्यांना दुष्कृत्ये करण्यासाठी समाजात मोकळे सोडत असते तर मग हळूहळू तोच बिघाड जो अगोदर काही व्यक्तींपुरताच मर्यादित होता संपूर्ण राष्ट्रात पसरल्याशिवाय राहात नाही. हीच गोष्ट होती, सरतेशेवटी जी बनीइस्राईल लोकांच्या बिघाडास कारणीभूत ठरली.

तयारी त्यांनी स्वत: आपल्यासाठी केली आहे. अल्लाह त्यांच्यावर क्रोधित झाला आहे आणि ते चिरस्थायी यातना भोगणारे होत. जर खरोखर हे लोक अल्लाह व पैगंबर आणि त्या गोष्टीला मानणारे असते, जी पैगंबरांवर अवतरली होती तर कदापि (श्रद्धावंतांविरूद्ध) अश्रद्धावंतांना त्यांनी आपले मित्र बनविले नसते. पण त्यांच्यापैकी तर बहुतेक लोक ईश्वराच्या आज्ञाधारकतेच्या बाहेर निघाले आहेत. (७६-८१)

तुम्हाला श्रद्धावंतांविरूद्ध सर्वात जास्त कठोर यहुदी व अनेकेश्वरवादी आढळतील आणि श्रद्धावंतांच्या मित्रत्वांत ते लोक अधिक जवळ असल्याचे आढळतील ज्यांनी सांगितले होते की आम्ही ख्रिश्चन आहोत, हे अशा कारणास्तव की त्यांच्यात उपासना-मग्न विद्वान व विरक्त साधू आढळतात आणि त्यांच्यात अहंकार नाही जेव्हा ते ही वाणी ऐकतात जी पैगंबरावर अवतरली आहे तेव्हा तुम्ही पाहता की सत्याची ओळख पटल्यामुळे त्यांचे डोळे अश्रूंनी भिजतात. ते अनायासे उद्‌गारतात, ''हे पालनकर्त्या, आम्ही श्रद्धा ठेवली, आमचे नाव ग्वाही देणाऱ्यांमध्ये लिही.'' आणि ते म्हणतात, ''का म्हणून आम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवू नये आणि जे सत्य आमच्यापर्यंत आलेले आहे ते का मान्य करू नये जेव्हा आम्ही अशी इच्छा बाळगतो की आमच्या पालनकर्त्याने आम्हाला सदाचारी लोकांत समाविष्ट करावे?'' त्यांच्या या कथनामुळे अल्लाहने त्यांना असा स्वर्ग प्रदान केला ज्याच्याखालून कालवे वाहतात व ते तेथेच सदैव राहतील. हा मोबदला आहे उत्तम आचरण करणाऱ्या लोकांकरिता, ज्यांनी आमच्या संकेतवचनांना मान्य करण्याला नकार दिला व त्यांना खोटे ठरविले, ते नरकास पात्र आहेत. (८२-८६)

हे श्रद्धावंतांनो, ज्या शुद्ध वस्तू अल्लाहने तुमच्यासाठी वैध (धर्मसम्मत) केलेल्या आहेत, त्या निषिद्ध ठरवू नका[४६] आणि मर्यादांचे उल्लंघन करू नका. अल्लाहला अतिरेक करणारे अत्यंत अप्रिय आहेत. जे काही वैध व विशुद्ध अन्न अल्लाहने दिले आहे ते खा व प्या आणि ईश्वराच्या अवज्ञेपासून दूर राहा ज्याच्यावर तुम्ही श्रद्धा ठेवली आहे. (८७-८८)

तुम्ही लोक ज्या निरर्थक शपथा घेता त्याबद्दल अल्लाह तुम्हाला परत शिक्षा करणार नाही पण ज्या शपथा तुम्ही जाणूनबुजून घेता, त्यांच्यासाठी तो जरूर तुम्हाला पकडील. (अशी शपथ मोडण्याचे) प्रायश्चित्त हे होय की दहा गरिबांना त्या सर्वसाधारण

**४६)** या संकेतवचनात दोन गोष्टी सांगितल्या आहेत. एक अशी की हलाल आणि हराम ठरविण्याला स्वत:च मुखत्यार बनू नका. हलाल-वैध-तेच आहे ज्यास अल्लाहने हलाल ठरविले आणि हराम-निषिद्ध-तेच आहे ज्यास अल्लाहने हराम ठरविले आहे. स्वत:च्या अधिकाराने एखाद्या हलाल वस्तुला हराम कराल तर ईश्वरी कायद्याऐवजी स्वकायद्याचे अनुयायी ठराल. दुसरी गोष्ट अशी की ख्रिस्ती ऋषी, हिंदू योगी, बौद्ध भिक्षूक आणि प्राच्यविद संतांप्रमाणे वैराग्य आणि सुखोपभोग वर्ज्य करण्याच्या पद्धतीचे अवलंबन करू नका.



प्रकारचे जेवण तुम्ही द्यावे, जे तुम्ही आपल्या मुलाबाळांना देता, अथवा त्यांना वस्त्रे द्यावीत किंवा एका गुलामाला मुक्त करावे आणि ज्याची अशी ऐपत नसेल त्याने तीन दिवसाचे उपवास करावेत. हे तुमच्या शपथांचे प्रायश्चित्त आहे की जेव्हा तुम्ही शपथ घेऊन ती मोडली असेल, आपल्या शपथांचे पालन करीत जा. अशाप्रकारे अल्लाह आपल्या आज्ञा तुमच्यासाठी स्पष्ट करीत आहे कदाचित तुम्ही कृतज्ञता दर्शवाल. (८९)

हे श्रद्धावंतांनो, ही दारू आणि जुगार व वेदी आणि शकून ही सर्व अमंगल शैतानी कामे होत, यांच्यापासून दूर राहा, आशा आहे की तुम्हाला यश मिळेल.[४७] शैतानाची तर अशीच इच्छा आहे की दारू व जुगाराद्वारे तुमच्यात शत्रुत्व व कपट निर्माण करावे आणि तुम्हाला अल्लाहचे स्मरण व नमाजपासून रोखावे. मग काय तुम्ही या गोष्टीपासून अलिप्त राहाल? अल्लाह व त्याच्या पैगंबराचे म्हणणे मान्य करा आणि अलिप्त राहा, परंतु जर तुम्ही अवज्ञा केली तर हे समजून असा की आमच्या पैगंबरावर स्पष्टपणे आदेश पोहचविण्याची फक्त जबाबदारी होती. (९०-९२)

ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि चांगले आचरण करू लागले त्यांनी पूर्वी जे काही खाल्ले व प्यायले त्यासाठी त्यांना (जबाबदार) धरले जाणार नाही, परंतु या अटीवर की भविष्यात त्यांनी त्या गोष्टीपासून दूर राहावे ज्या निषिद्ध केल्या गेल्या आहेत आणि श्रद्धेवर अढळ राहावे आणि सत्कार्य करावे, मग ज्या ज्या गोष्टींपासून प्रतिबंध केला जाईल त्यापासून दूर राहावे आणि जो अल्लाहचा आदेश असेल त्याला मान्य करावे, मग ईशपरायणतेनिशी सद्‌वर्तन ठेवावे. अल्लाह सदाचारी लोकांना पसंत करतो! (९३)

हे श्रद्धावंतांनो, अल्लाह तुमची त्या शिकारीद्वारे कठोर परीक्षा घेईल जी अगदी तुमच्या हाताच्या व भाल्यांच्या माऱ्यात असेल, हे पाहण्यासाठी की तुमच्यापैकी कोण त्याला अप्रत्यक्षरीत्या भितो, मग ज्याने यानंतर देखील अल्लाहने ठरवून दिलेल्या मर्यादेचे उल्लंघन केले त्याच्यासाठी भयंकर दु:खदायक शिक्षा आहे. हे श्रद्धावंतांनो, एहरामच्या

**४७)** 'दारू' हराम असण्यासंबंधी या अगोदर दोन आदेश आलेले होते. ते सूरह बकरा आयत क्र. २१९ आणि सूरह निसा, आयत क्र. ४३ यात येऊन गेले आहेत. आता हा शेवटचा आदेश येणयाअगोदर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका प्रवचनात लोकांना सावध केले की सर्वोच्च अल्लाहला दारू अत्यंत अप्रिय आहे. ती हराम ठरविणारा आदेश येणे हे दुरापास्त नव्हे. म्हणून ज्या ज्या लोकांजवळ दारू असेल ती त्यांनी विकून टाकावी. काही कालावधीनंतर सदरहू आयत उतरली व पैगंबर (स.) यांनी जाहीर केले की आता ज्यांच्याजवळ दारू आहे ते ती स्वत:ही घेऊ शकत नाही व इतरांना विकूही शकत नाही तर ती त्यांनी नष्ट करून टाकावी. म्हणून त्याचक्षणी मदीना शहराच्या गल्ली गल्लीत दारू ओतून टाकली गेली.

(हजच्या परिवेशाच्या) स्थितीत शिकार करू नका,[४८] आणि जर तुमच्यापैकी कोणी जाणूनबुजून असे केले तर जो प्राणी त्याने ठार केला असेल तर त्याला त्याच तोडीचा एक प्राणी जनावरांपैकी भेट द्यावा लागेल ज्याची निवड तुमच्यापैकी दोन न्यायी व्यक्ती करतील, आणि ही भेट काबागृहास पोहचविली जाईल, तसे नसेल तर या अपराधाचे प्रायश्चित्त म्हणून काही गरिबांना जेवू घालावे लागेल किंवा त्या प्रमाणात उपवास करावे लागतील जेणेकरून त्याने आपल्या कर्माचे फळ चाखावे. पूर्वी जे काही घडले ते अल्लाहने माफ करून टाकले, परंतु जर कोणी या कृत्याची पुनरावृत्ती केली तर त्याचा अल्लाह बदला घेईल, अल्लाह सर्वांवर वर्चस्व राखणारा आहे आणि बदला घेण्याचे सामर्थ्य राखतो. (९४-९५)

तुमच्यासाठी समुद्रातील शिकार व तिचे भक्षण वैध करण्यात आले, जेथे तुम्ही मुक्काम कराल तेथेसुद्धा ती तुम्ही खाऊ शकता आणि काफिल्यासाठी शिदोरी म्हणूनसुद्धा ती घेऊ शकता परंतु खुष्कीवरील शिकार, जोपर्यंत तुम्ही एहरामच्या अवस्थेत आहात, तुम्हासाठी निषिद्ध करण्यात आली आहे. म्हणून दूर राहा त्या ईश्वराच्या अवज्ञेपासून ज्याच्यासमोर तुम्हा सर्वांना गोळा करून हजर केले जाईल. (९६)

अल्लाहने आदरणीय गृह, काबाला लोकांकरिता (सामूदायिक जीवनाच्या) प्रस्थापनेचे साधन बनविले आणि (आदरणीय) महिना व कुर्बानीची जनावरे आणि पट्टेसुद्धा (या कार्यात सहायक बनविले) जेणेकरून तुम्हाला कळावे की अल्लाह आकाशांच्या व पृथ्वीच्या सर्व परिस्थितीचा जाणकार आहे आणि त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे. सावध व्हा, अल्लाह शिक्षा देण्यात सुद्धा कठोर आहे आणि त्याचबरोबर फार क्षमाशील व दयाळूदेखील आहे. पैगंबरावर तर केवळ संदेश पोहचविण्याची जबाबदारी आहे, यानंतर तुमच्या उघड व गुप्त सर्व गोष्टींना जाणणारा अल्लाह आहे. हे पैगंबर (स.), यांना सांगा की पवित्र आणि अपवित्र कोणत्याही परिस्थितीत एकसारखे नाहीत

४८) शिकार, मग ती माणसाने स्वत: करावी अथवा अन्य कोणाला कोणत्याही प्रकारे त्यात मदत करावी, या गोष्टीची हजचा वेश परिधान केल्यानंतरच्या स्थितीत मनाई आहे. तसेच हजचा वेश परिधान केलेल्यासाठी शिकार केलेले मांस खाणे वैध नाही. तथापि जर एखाद्या माणसाने स्वत:साठी खुद्द शिकार मारली असली व त्यातून त्याने हजचा पोशाख केलेल्या माणसाला भेट म्हणून काही दिले तर ते खाण्यात काही हरकत नाही. या आम आदेशाला इजा पोहचविणारे प्राणी अपवाद म्हणून आहेत. सर्प, विंचू, पिसाळलेला कुत्रा व इतर मानवाला इजा पोहचविणारे जे प्राणी आहेत ते हजच्या पोशाख केले असल्याच्या स्थितीत देखील मारले जाऊ शकतात.



मग निषिद्ध गोष्टींचे आधिक्य तुम्हाला कितीही मोहित करणारे असो,[४९] म्हणून हे सबुद्ध लोकांनो, अल्लाहच्या अवज्ञेपासून दूर राहा, आशा आहे की तुम्हाला यश लाभेल. (९७-१००)

हे श्रद्धावंतांनो, अशा गोष्टी विचारीत जाऊ नका ज्या तुम्हासमोर उघड केल्या गेल्या तर तुम्हाला त्या वाईट वाटतील.[५०] परंतु जर तुम्ही त्या अशावेळी विचारल्यात जेव्हा कुरआन अवतरित होत असेल तर त्या तुमच्यासमोर उघड करण्यात येतील आतापर्यंत जे काही तुम्ही केले ते अल्लाहने माफ केले, तो क्षमाशील व सहिष्णू आहे. तुमच्यापूर्वी एका समुदायाने अशाच प्रकारचे प्रश्न केले होते, मग ते लोक याच गोष्टीमुळे अश्रद्धेमध्ये गुरफटून गेले. (१०१-१०२)

अल्लाहने कोणालादेखील बहिरा ठरविले नाही अथवा सायबा किंवा वसीला आणि

४९) ही आयत श्रेष्ठतेचे आणि मूल्याचे एक औरच प्रमाण प्रस्तूत करते. ते माणसाच्या प्रमाणापेक्षा अगदी वेगळे आहे. वरकरणी पाहणाऱ्याच्या दृष्टीत शंभर रुपये, पाच रुपयांपेक्षा खचितच जास्त मौल्यवान आहेत कारण ते शंभर आहेत तर ते पाचच. परंतु सदरहू आयत म्हणते की शंभर रुपये जर ईश्वराची अवज्ञा करून मिळविले असतील तर, ते अवैध आहेत आणि पाच रुपये ईश्वराच्या आज्ञेचे पालन करीत कमावले गेले असतील तर ते पाक आहे. 'नापाक' मग तो कितीही प्रमाणात जास्त का असेना कोणत्याही प्रकारे तो पाकची बरोबरी करू शकत नाही.

५०) पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना काही लोक मोठे चमत्कारिक प्रकारचे निरर्थक प्रश्न विचारीत असत. अशा प्रश्नांची ना धार्मिक बाबतीत काही गरज वाटत होती ना सांसारिक बाबतीत, म्हणून ही तंबी दिली गेली आहे.

हाम,[51] पण हे अश्रद्धावंत अल्लाहवर खोटे आरोप ठेवतात आणि त्यांच्यापैकी बहुतेकजण निर्बुद्ध आहेत. (की अशा भ्रामक कल्पनांवर विश्वास ठेवतात.) आणि जेव्हा त्यांना सांगण्यात येते की या, त्या कायद्याकडे जो अल्लाहने अवतरला आहे आणि या, पैगंबराकडे, तर ते उत्तर देतात की आमच्यासाठी तर तीच पद्धत पुरेशी आहे ज्यावर आमचे पूर्वज आम्हाला आढळले आहेत. मग काय हे पूर्वजांचेच अनुकरण करीत राहतील जरी त्यांना काहीही माहीत नसेल व योग्य मार्गाची त्यांना जाणीवच नाही? (१०३-१०४)

हे श्रद्धावंतांनो, स्वत:ची काळजी घ्या, एखाददुसऱ्याच्या पथभ्रष्ट होण्याने तुमचे काहीही बिघडत नाही जर तुम्ही स्वत: सरळ मार्गावर असाल,[52] अल्लाहकडे तुम्हां सर्वांना

**५१)** हा अरब लोकांच्या भ्रामक रूढींचा उल्लेख आहे. बहिरा, अशा सांडणीला म्हणत असत जी पाच वेळा व्याली असेल व शेवटच्या वेळी तिला बछडा झाला असावा. अज्ञानाच्या काळात अरबवासी लोक तिचे कान फाडून तिला मोकाट सोडत असत. नंतर तिच्यावर कोणी स्वारही होत नसे, तिचे दूधही घेतले जात नसे व तिचे केसही काढले जात नसत. तिला अधिकार होता की हवे त्या शेतात व कुरणात चरावे आणि वाटेल त्या पाणोठ्यावर पाणी प्यावे. साइबा, अशा उंटाला, अथवा सांडणीला म्हणत असत जिला एखादा नवस पूर्ण झाल्यानंतर किंवा आजारातून बरे झाल्यानंतर अथवा एखाद्या संकटातून वाचल्यानंतर कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी धर्मादाय केले असावे. तसेच सांडणी जर दहा वेळा व्याली असली व प्रत्येकदा तिने मादी पिल्लू दिले असेल तर तिला देखील मुक्त सोडले जात असे. वसीला, जर शेळीचे पहिले करडू नर असेल तर ते देवांच्या नावाने बळी दिले जात असे व जर तिने पहिल्यांदा मादीला जन्म दिला असेल तर तिला ठेवले जात असे. परंतु जर नर आणि मादी बरोबरच जन्मली असली तर नराला तसेच देवांच्या नावाने सोडले जात असे, त्याचे नाव वसीला असे. 'हाम' जर एखाद्या उंटाचा नातू (उंटाच्या नर पिल्लाचे नर पिल्लु) स्वारी लायक होत असे तेव्हा त्या वृद्ध उंटाला मुक्त सोडले जात असे. तसेच जर एखाद्या उंटाच्या वीर्यापासून दहा बच्चांचे जन्म झाले असले तर त्यालासुद्धा मुक्त सोडले जात असे.

**५२)** म्हणजे माणसाने सदैव हे पाहात बसण्याऐवजी की अमका काय करीत आहे व अमक्याच्या श्रद्धेत कोणता दोष आहे व अमक्याच्या आचरणात काय दोष आहेत, त्याने हे पाहिले पाहिजे की तो स्वत: काय करीत आहे. परंतु सदरहू आयतीचा हेतू असा मुळीच नाही की माणसाने केवळ आपल्याच मुक्तीची काळजी घ्यावी व इतरांच्या सुधारणेची चिंता करू नये. हजरत अबूबकर सिद्दीक (रजि.) अशा चुकीच्या समजुतीचे खंडन करताना आपल्या एका प्रवचनात फर्मावितात, ''लोकहो! तुम्ही सदरहू आयत वाचता आणि तिचा चुकीचा अर्थ लावता.'' मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना असे फर्माविताना ऐकले आहे, जेव्हा लोकांची अवस्था अशी होईल की ते दुष्कर्मे पाहतील व ते रोखण्याचे प्रयत्न करणार नाहीत, अत्याचारीला अत्याचार करताना पाहतील व त्याचे हात धरणार नाहीत तेव्हा अल्लाहने सर्वांनाच आपल्या प्रकोपात वेढावे हे दुरापास्त नव्हे, अल्लाहची शपथ, तुमच्यासाठी अनिवार्य आहे की तुम्ही भलाईची आज्ञा करावी व बुराईपासून रोखावे अन्यथा अल्लाह तुमच्या मानगुटीवर अशा लोकांना बसवील जे तुमच्यापैकी सर्वाधिक दुष्ट असतील व ते तुम्हाला भयंकर त्रास देतील, मग तुमचे नेक लोक ईश्वराकडे प्रार्थना करतील परंतु ती स्वीकारली जाणार नाही.



परत जायचे आहे मग तो तुम्हाला दाखवेल की तुम्ही काय करीत राहिला आहात. (१०५)

हे श्रद्धावंतांनो, जेव्हा तुम्हापैकी एखाद्याची मृत्यूघटका येईल आणि तो मृत्यूपत्र करीत असेल तर त्याच्यासाठी साक्षीचे प्रमाण हे होय की तुमच्या समाजामधील दोन न्यायप्रिय व्यक्तींना[53] साक्षीदार बनवावे, किंवा जर तुम्ही प्रवासात असाल आणि त्यावेळी मृत्यूचे संकट आले, तर परक्यांमधून दोन साक्षीदार घ्यावेत. मग जर एखादी शंका निर्माण झाली तर नमाजनंतर दोन्ही साक्षीदारांना (मसजिदमध्ये) थांबवून घ्यावे व त्यांनी ईश्वराची शपथ घेऊन सांगावे की, ''आम्ही एखाद्या व्यक्तिगत फायद्यासाठी साक्ष विकणारे लोक नाही, आणि जरी कोणी आमचा नातेवाईक असला तरी (आम्ही त्याचा पक्ष घेणार नाही), आणि ईश्वराप्रीत्यर्थ दिलेल्या साक्षीला देखील आम्ही लपविणार नाही, जर आम्ही असे केले तर गुन्हेगारांमध्ये आमची गणना होईल.'' परंतु जर असे कळले की त्या दोघांनी स्वत:ला गुन्ह्यात लोटले आहे तर मग त्यांच्याऐवजी आणखी दोन व्यक्ती जे त्यांच्या तुलनेत साक्ष देण्यात अधिक प्रामाणिक असतील त्यांनी त्या लोकांतून उभे राहावे ज्यांचा हक्क मारला गेला असेल, आणि त्यांनी ईश्वराची शपथ घेऊन सांगावे की, ''आमची साक्ष त्यांच्या साक्षीपेक्षा जास्त सत्याधिष्ठित आहे आणि आम्ही आमच्या साक्षीमध्ये कोणताही अतिरेक केलेला नाही, जर का आम्ही तसे केले तर आम्ही अत्याचाऱ्यांपैकी एक बनू.'' या पद्धतीने रास्त अपेक्षा केली जाऊ शकते की लोक खरीखुरी साक्ष देतील, किंवा कमीत कमी या गोष्टीचे तरी भय बाळगतील की त्यांच्या शपथांनंतर एखादे वेळी दुसऱ्या शपथांमुळे रद्दबातल होऊ नयेत. अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि ऐका, अल्लाह अवज्ञा करणाऱ्यांना आपल्या मार्गदर्शनापासून वंचित करतो. (१०६-१०८)

ज्या दिवशी अल्लाह सर्व प्रेषितांना एकत्र करून विचारील की तुम्हाला काय प्रत्युत्तर[54] दिले गेले, तेव्हा ते म्हणतील की, आम्हाला काहीही कल्पना नाही, तूच सर्व गुप्त हकीकती जाणतोस! मग कल्पना करा त्या प्रसंगाची जेव्हा अल्लाह फर्मावील की, ''हे मरयमपुत्र ईसा, आठव माझ्या त्या देणगीला जी मी तुला व तुझ्या मातेला प्रदान केली होती. मी पवित्र आत्म्यामार्फत तुला सहाय्य केले, तू पाळण्यातदेखील लोकांशी संभाषण करीत होतास, आणि वय वाढल्यानंतरसुद्धा. मी तुला ग्रंथ आणि शहाणपणा व तौरात आणि इंजिलचे शिक्षण दिले, तू माझ्या आज्ञेने पक्षाकृती मातीचा पुतळा बनवून त्यात फुंकर घालत असे आणि तो माझ्या आज्ञेने पक्षी बनत असे, तू जन्मजात आंधळ्याला व महारोग्याला माझ्या आज्ञेने रोगमुक्त करीत असे. तू मृतांना माझ्या आज्ञेने बाहेर काढत

**५३)** म्हणजे धार्मिक, सत्यनिष्ठ आणि विश्वासार्ह मुसलमान.

**५४)** म्हणजे अंतिम निवाड्याच्या दिवशी प्रेषितांना विचारले जाईल की जगाला तुम्ही जे सन्मार्गाचे आवाहन केले होते त्याचे जगाने काय उत्तर दिले?

असे.[५५] मग जेव्हा तू बनीइस्राईलपाशी स्पष्ट संकेतचिन्हे घेऊन पोहोचलास आणि त्यांच्यापैकी जे लोक सत्याचा इन्कार करणारे होते त्यांनी म्हटले की हे संकेत जादुगिरीशिवाय इतर काहीही नाही, तेव्हा मीच तुला त्यांच्यापासून वाचविले. आणि मी जेव्हा 'हवारी'ना (येशू ख्रिस्ताच्या अनुयायांना) इशारा केला की माझ्यावर व माझ्या प्रेषितांवर श्रद्धा ठेवा, तेव्हा त्यांनी सांगितले की, ''आम्ही श्रद्धा ठेवली आणि साक्षी राहा की आम्ही मुस्लिम आहोत.'' - (हवारींच्या[५६] संबंधी) हा प्रसंगसुद्धा लक्षात ठेवावा की जेव्हा येशू ख्रिस्ताच्या अनुयायांनी सांगितले, ''हे मरयमपुत्र ईसा काय तुमचा पालनकर्ता आमच्यासाठी जेवणाचे एक (मोठे) ताट आकाशातून उतरवू शकेल? तेव्हा ईसा (अ.) नी सांगितले की अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा जर तुम्ही श्रद्धावंत असाल. त्यांनी सांगितले, ''आम्ही तर केवळ हेच इच्छितो की त्या ताटांत जेवावे आणि आमची मने संतुष्ट व्हावीत व अल्लाहला कळावे की आपण जे काही आम्हाला सांगितले आहे ते सत्य आहे व त्याचे आम्ही साक्षीदार व्हावे.'' तेव्हा मरयम-पुत्र ईसाने प्रार्थना केली, ''हे अल्लाह, आमच्या पालनकर्त्या, आम्हावर आकाशातून एक ताट उतरव जे आमच्यासाठी व आमच्या अगोदरच्या व नंतरच्यासाठी आनंदाचा प्रसंग ठरावा आणि तुझ्याकडून एक संकेत ठरावा, आम्हाला अन्न दे व तू सर्वोत्कृष्ट अन्नदाता आहेस.'' अल्लाहने उत्तर दिले, ''मी ते तुमच्यावर अवतरणार आहे, परंतु त्यानंतर तुमच्यापैकी जो कोणी द्रोह करील त्याला मी अशी शिक्षा देईन जी जगात कोणाला दिली गेली नसेल.'' - तात्पर्य, जेव्हा (या उपकारांची आठवण करून दिल्यानंतर) अल्लाह फर्माविल, ''हे मरयमपुत्र ईसा! काय तू लोकांना सांगितले होतेस की अल्लाहशिवाय मला आणि माझ्या मातेस देखील ईश्वर बनवा?''[५७] तेव्हा तो उत्तरादाखल सांगेल, ''पवित्र आहे अल्लाह, माझे हे काम नव्हते की

**५५)** म्हणजे मृतावस्थेतून काढून जिवंत अवस्थेत आणत असे.

**५६)** 'हवारी'चा उल्लेख आला असल्याकारणाने वक्तव्य क्रम थांबवून एक स्वतंत्र वाक्याच्या रूपात याठिकाणी 'हवारी'च्या संबंधीच, आणि एका घटनेकडे निर्देश केला गेला आहे. त्यावरून येशूकडून प्रत्यक्षपणे ज्या शिष्यांनी शिकवण घेतली होती ते येशूमसीहला एक मनुष्य आणि केवळ ईश्वराचा एक दास समजत असत. आपला गुरू, आपला देव अथवा देवाचा सहभागी अथवा देवपुत्र आहे असे त्यांच्या कल्पनेत देखील नव्हते. त्याचप्रमाणे येशूमसीहने आपल्या स्वत:लाही त्यांच्यासमोर एक असमर्थ ईश्वराचा एक दास म्हणूनच प्रस्तुत केले होते. ही गोष्ट अगदी स्पष्टपणे व्यक्त होते.

**५७)** ख्रिस्ती लोक अल्लाहसमवेत केवळ येशूमसीह आणि पवित्र आत्मा यांनाच ईश्वर मानण्यावर थांबले नाहीत तर येशूची आई हजरत मरयम याना देखील एक वेगळे उपास्य बनविले आहे. येशूमसीह नंतर पहिल्या तीन शतकांपर्यंत ख्रिस्ती जग या कल्पनेशी पूर्णपणे अपरिचित होते. तिसऱ्या इसवी शतकाच्या शेवटच्या काळात अलेक्झांड्रियाच्या काही धर्मपंडितांनी प्रथमत:च हजरत मरयमसाठी 'ईश्वरमाता' असे शब्द वापरले व त्यानंतर हळूहळू मरयमची उपासना चर्चमध्ये पसरत गेली.



ती गोष्ट सांगावी जी सांगण्याचा मला अधिकार नव्हता, जर मी तसे सांगितले असते तर अवश्य तुला माहीत झाले असते, तू जाणतो जे काही माझ्या मनात आहे, मी जाणत नाही जे काही तू जाणतोस, तू तर सर्व गुप्त हकिगतीचा ज्ञानी आहेस. मी त्यांना त्याशिवाय काहीच सांगितले नाही ज्याची मला तू आज्ञा दिली होती. ते हे की अल्लाहची भक्ती करा जो माझा पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्ता देखील मी त्या वेळेपर्यंतच त्यांचा निरीक्षक होतो जोपर्यंत मी त्याच्या दरम्यान होतो. जेव्हा तू मला परत बोलावून घेतलेस तेव्हा तूच त्यांचा निरीक्षक होतास आणि तू तर सर्वच गोष्टींचा निरीक्षक आहेस. आता जर तू त्यांना शिक्षा केलीस तर ते तुझे दास आहेत व जर तू माफी दिली तर तू प्रभुत्वसंपन्न व बुद्धिमान आहेस.'' तेव्हा अल्लाह फर्माविल, ''हा तो दिवस आहे, ज्या दिवशी खऱ्यांना त्यांची सचोटी लाभदायक ठरेल. त्यांच्याकरिता अशी उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहात आहेत. येथे ते सदैव राहतील, अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला व ते अल्लाहवर. हेच महान यश आहे.'' (१०९-११९)

पृथ्वी व आकाशांवर आणि त्यात अस्तित्वात असलेल्या सर्वांवर राज्य अल्लाहचेच आहे आणि प्रत्येक वस्तूवर तो प्रभुत्व राखतो. (१२०)

# ६ सूरह अल्‌अनआम

*(मक्काकालीन, वचने १६५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

स्तुती अल्लाहकरिता आहे ज्याने आकाश व पृथ्वी बनविली. अंधकार व प्रकाश निर्माण केले, तरी देखील ते लोक ज्यांनी सत्याचे आवाहन मानण्यास नकार दिला आहे, इतरांना आपल्या पालनकर्त्यासमान ठरवीत आहेत! तोच आहे ज्याने तुम्हाला मातीपासून निर्मिले, मग तुमच्याकरिता जीवनाची एक कालमर्यादा ठरवून दिली, आणि एक दुसरी कालमर्यादा आणखी देखील आहे जी त्याच्याजवळ ठरलेली आहे.[१] परंतु तुम्ही लोक आहात की शंका-कुशंकांत गुरफटला आहात. तोच एक ईश्वर आकाशातही आहे व पृथ्वीवरदेखील, तुमच्या गुप्त व प्रकट सर्व अवस्था जाणतो आणि जो वाईटपणा वा चांगुलपणा तुम्ही कमविता ते त्याला चांगल्याप्रकारे माहीत आहे. (१-३)

लोकांची परिस्थिती अशी आहे की, त्यांच्या पालनकर्त्याच्या संकेतांपैकी एकही संकेत असा नाही जो त्यांच्यासमोर आला आणि ते त्यापासून पराङमुख झाले नाहीत, म्हणून आता जे सत्य त्यांच्यापाशी आले त्यालादेखील त्यांनी खोटे ठरविले. तेव्हा, ज्या गोष्टीचा ते आतापर्यंत उपहास करीत राहिले आहेत, लवकरच त्याच्याशी संबंधित काही बातम्या त्यांच्यापर्यंत पोहोचतील.[२] यांनी पाहिले नाही की यांच्याअगोदर कित्येक अशा जनसमूहांना आम्ही नष्ट करून टाकले ज्यांचे आपापल्या काळांत प्राबल्य राहिले आहे? त्यांना आम्ही भूतलावर ती सत्ता प्रदान केली होती जी तुम्हाला प्रदान केलेली नाही, त्यांच्यावर आम्ही आकाशातून भरपूर वृष्टी केली आणि त्यांच्या खाली कालवे प्रवाहित केले, (परंतु जेव्हा त्यांनी कृतघ्नता दर्शविली तेव्हा) सरतेशेवटी आम्ही त्यांना त्यांच्या अपराधापायी नष्ट करून टाकले आणि त्यांच्याजागी नंतरच्या काळातील लोकांना उभे केले. (४-६)

हे पैगंबर (स.), आम्ही कागदावर लिखित एखादा ग्रंथ जरी तुमच्यावर अवतरित केला असता आणि लोकांनी आपल्या हातांनी स्पर्श करून जरी पाहिले असते तरी देखील ज्यांनी सत्याचा इन्कार केला आहे त्यांनी हेच सांगितले असते की ही तर उघड जादू आहे.

१) म्हणजे कयामतची घटका, जेव्हा अगोदरच्या व नंतरच्या सर्व माणसांना पुनरपि जिवंत केले जाईल व ते आपापला हिशोब देण्यासाठी आपल्या रबसमोर हजर होतील.

२) हा संकेत हिजरत-देशत्याग- आणि त्यानंतर लागोपाठ इस्लामला जे यश प्राप्त होणार होते त्यांकडे आहे. ज्यावेळी हा संकेत दिला गेला होता तेव्हा काफिरांना अशी कल्पनाही नव्हती की कशा प्रकारच्या बातम्या त्यांना ऐकाव्या लागणार आहेत व मुसलमानांच्याही ध्यानीमनी ते नव्हते.



ते म्हणतात की या पैगंबरावर एखादा दूत का अवतरला गेला नाही?[३] जर आम्ही एखादा दूत अवतरला असता तर आतापावेतो केव्हाच निर्णय झाला असता, मग यांना कोणतीच सवलत दिली गेली नसती. आणि आम्ही दूत जरी अवतरला असता तरी देखील त्याला मानवी रूपातच अवतरला असता आणि अशाप्रकारे यांना त्याच शंकेत गुरफटविले असते, ज्यात सध्या हे गुरफटलेले आहेत. (७-९)

हे नबी (स.), तुमच्याअगोदर देखील कित्येक प्रेषितांचा उपहास केला गेला आहे, परंतु त्या टवाळकी करणाऱ्या लोकांवर सरतेशेवटी तेच सत्य उलटल्याविना राहिले नाही ज्याचा उपहास ते करीत होते. यांना सांगा, जरा पृथ्वीतलावर फेरफटका मारून पाहा, खोटे ठरविणाऱ्यांचा शेवट कसा झाला आहे. (१०-११)

यांना विचारा, आकाशांत व पृथ्वीतलावर जे काही आहे ते कोणाचे आहे? - सांगून टाका, सर्वकाही अल्लाहचेच आहे, त्याने दया व कृपेची नीति स्वत:साठी अनिवार्य करून घेतली आहे. (म्हणूनच तो अवज्ञा व उद्धटपणावर तुम्हाला लगेच पकडीत नाही.) पुनरुत्थानाच्या दिवशी तो तुम्हा सर्वांना अवश्य जमा करील. हे एक सर्वस्वी नि:संदिग्ध सत्य आहे. परंतु ज्या लोकांनी आपणहून स्वत:ला विनाशाच्या धोक्यात टाकले आहे ते त्याला मानीत नाहीत. (१२)

रात्रीच्या अंधारात आणि दिवसाच्या उजेडात जे काही स्थिरावले आहे, सर्व अल्लाहचे आहे आणि तो सर्वकाही ऐकतो व जाणतो. सांगा, अल्लाहला सोडून काय मी इतर कोणाला आपला पालक बनवू? त्या अल्लाहला सोडून जो आकाश व पृथ्वीचा निर्माता आहे. तो उपजीविका देतो, उपजीविका घेत नाही. सांगून टाका, मला तर हाच आदेश दिला गेला आहे की सर्वप्रथम मी त्याच्यापुढे आज्ञापालनार्थ मान तुकवावी, (आणि ताकीद करण्यात आली आहे की कोणी अनेकेश्वरवादी होत असेल तर होवो) तू कोणत्याही परिस्थितीत अनेकेश्वरवाद्यांत सामील होऊ नकोस. सांगा, जर मी आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली तर मला भय वाटते की एका मोठ्या (भयंकर) दिवशी मला शिक्षा भोगावी लागेल. त्यादिवशी जो शिक्षेपासून वाचेल त्यावर अल्लाहने मोठीच दया केली. आणि हेच (उघड) स्पष्ट यश आहे. जर अल्लाहने तुम्हाला एखाद्या प्रकारची हानी पोहोचवली तर त्याच्याशिवाय इतर असा कोणीच नाही जो तुम्हाला त्या हानीपासून वाचवू शकेल. आणि जर त्याने तुम्हाला एखाद्या चांगल्या गोष्टीने उपकृत केले तर त्याला प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य प्राप्त आहे. त्याला आपल्या दासांवर सर्वाधिकार प्राप्त आहे आणि तो बुद्धिमान व जाणकार आहे. (१३-१८)

३) म्हणजे जेव्हा हा इसम ईश्वराकडून प्रेषित बनवून पाठविलेला आहे तेव्हा आकाशांतून एक फरिश्ता उतरला पाहिजे होता व त्याने सांगितले पाहिजे होते की हा ईश्वराचा प्रेषित आहे, याची गोष्ट ऐका अन्यथा तुम्हाला शिक्षा केली जाईल.

यांना विचारा, कोणाची साक्ष सर्वाहून श्रेष्ठ आहे? - सांगा, माझ्या व तुमच्यामध्ये अल्लाह साक्षी आहे आणि हा कुरआन माझ्याकडे 'वह्य' (दिव्य अवतरण) द्वारे पाठविला गेला आहे जेणेकरून तुम्हाप्रत आणि ज्या ज्या लोकांपर्यंत हा पोहोचेल त्या सर्वांना मी सावध करावे. काय खरोखरच तुम्ही अशी साक्ष देऊ शकता की अल्लाहबरोबर इतर ईश्वर देखील आहेत?[४] सांगून टाका, अशी साक्ष तर मी कदापि देऊ शकत नाही. सांगून टाका, ईश्वर तर तोच एक आहे आणि मी त्या अनेकेश्वरवाद्यांपासून सर्वस्वी अलिप्त आहे ज्यांत तुम्ही गुरफटला आहात. ज्या लोकांना आम्ही ग्रंथ दिला आहे ते या गोष्टीला अशाप्रकारे निःसंदिग्धपणे ओळखतात जशी त्यांना आपल्या पुत्रांना ओळखण्यात यत्किंचितही शंका वाटत नाही. परंतु ज्यांनी आपण होऊन स्वतःला नुकसानीत टाकले आहे ते हे मान्य करीत नाहीत. आणि त्या व्यक्तीपेक्षा अधिक अत्याचारी कोण असेल जो अल्लाहवर खोटे आळ घेतो अथवा अल्लाहची संकेतवचने खोटी ठरवितो. निःसंशय असले अत्याचारी कधीही सफल होऊ शकणार नाहीत. (१९-२१)

ज्या दिवशी आम्ही या सर्वांना एकत्र करू आणि अनेकेश्वरवाद्यांना विचारू की आता ते तुमचे ठरविलेले भागीदार कोठे आहेत ज्यांना तुम्ही आपला ईश्वर समजत होता? तर ते याखेरीज कोठलाच उपद्रव माजवू शकणार नाहीत (अशी खोटी साक्ष देतील) की हे आमच्या स्वामी! तुझी शपथ, आम्ही मुळीच अनेकेश्वरवादी नव्हतो. पहा, त्या वेळेस हे कशाप्रकारे आपल्याविरूद्ध स्वतःच असत्य रचतील, आणि तेथे यांचे सर्व बनावट उपास्य हरवलेले असतील. (२२-२४)

यांच्यापैकी काही लोक असे आहेत जे कान देऊन तुमचे म्हणणे ऐकल्यासारखे दाखवतात परंतु वस्तुस्थिती अशी आहे की आम्ही त्यांच्या हृदयावर पडदे घातले आहेत ज्यामुळे त्यांच्या काहीच लक्षात येत नाही आणि त्यांच्या कानांना बधिरता आणली आहे (की सर्वकाही ऐकूनसुद्धा काहीच ऐकत नाहीत.) मग त्यांनी कोणताही संकेत पाहिला तरी त्यावर ते श्रद्धा ठेवणार नाहीत. यावर परमावधी अशी की जेव्हा ते तुमच्याजवळ येऊन तुमच्याशी भांडतात तेव्हा त्यांच्यातील ज्या लोकांनी सत्य नाकारण्याचा निर्णय घेतला आहे ते (सर्व गोष्टी ऐकल्यानंतर) हेच सांगतात की या तर पुरातन कथांशिवाय इतर काहीच नाहीत. ते या सत्य गोष्टीला मान्य करण्यापासून लोकांना प्रतिबंध करतात आणि स्वतः देखील त्यापासून दूर पळतात (ते समजतात की अशा कृतीमुळे ते तुमचे काही

४) कोणत्याही गोष्टीची साक्ष देण्यासाठी केवळ अंदाज व कयास पुरेसा ठरत नाही तर त्यासाठी ज्ञान असणे आवश्यक आहे जेणेकरून माणसाने ठामपणे सांगू शकावे की असे आहे, तेव्हा प्रश्न करण्याचा हेतू असा की या प्राचीन व अर्वाचीन विश्वाचा ईश्वराशिवाय, जो बंदगी व उपासनेसाठी पात्र असावा असा इतरही कोणी सर्वसत्ताधीश शासक आहे खरोखरच तुम्हाला याचे ज्ञान आहे का?



वाईट करीत आहेत.) खरे पाहता मुळात ते स्वतःच्याच विनाशाची सामग्री तयार करीत आहेत. परंतु त्यांना याचे भान नाही. किती बरे झाले असते जर तुम्ही त्यावेळेची परिस्थिती पाहू शकला असता जेव्हा ते नरकाच्या काठावर उभे केले जातील, त्यावेळी ते म्हणतील, एखादा मार्ग असा निघावा की आम्हाला पृथ्वीवर पुन्हा परत पाठविले जावे आणि आपल्या पालनकर्त्याची संकेतवचने आम्ही खोटी ठरवू नये आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांमध्ये सामील व्हावे, तर किती बरे होईल! खरे पाहता ही गोष्ट ते केवळ या कारणास्तव म्हणतील की ज्या सत्यावर त्यांनी पडदा घातला होता ते त्यावेळी उघड होऊन त्यांच्यासमोर आलेले असेल. अन्यथा जर त्यांना पूर्व आयुष्याकडे परत पाठविले गेले तर पुन्हा ते तेच सर्वकाही करतील ज्यांची त्यांना मनाई करण्यात आली आहे. ते तर आहेतच लबाड, (म्हणून आपल्या या इच्छेच्या अभिव्यक्तीत देखील लबाडीचाच आधार घेतील.) आज हे लोक सांगतात की जीवन जे काही आहे ते फक्त हेच आमचे लौकिक जीवन आहे आणि आम्ही मृत्यूनंतर मुळीच पुन्हा जिवंत उठविले जाणार नाही. जर तुम्ही ते दृश्य पाहू शकाल तर किती छान होईल, जेव्हा हे आपल्या पालनकर्त्यासमोर उभे केले जातील, तेव्हा त्यांचा पालनकर्ता त्यांना विचारील, "काय ही वस्तुस्थिती नव्हे?" हे म्हणतील, "होय, आमच्या पालनकर्त्या ही वस्तुस्थितीच आहे.' तो फर्मावील, "बरे! तर आता वस्तुस्थितीच्या आपल्या नाकारण्याबद्दलच्या प्रकोपाचा आस्वाद घ्या."(२५-३०)

नुकसानीत आहेत ते लोक ज्यांनी अल्लाहशी आपल्या भेटीच्या वार्तेला खोटे ठरविले. जेव्हा आकस्मिक ती घटका येऊन ठेपेल तेव्हा हेच लोक खेद व्यक्त करतील की, "आमच्याकडून याबाबतीत कशी चूक झाली." आणि यांची दशा अशी असेल की त्यांनी आपल्या पाठीवर आपल्या पापाचे ओझे घेतले असेल. पहा किती वाईट ओझे आहे जे हे उचलत आहेत. ऐहिक जीवन तर एक खेळ-तमाशा आहे.[५] वास्तविक पाहता मरणोत्तर जीवनाचे ठिकाणच त्या लोकांकरिता अधिक उत्तम आहे जे दुराचारापासून अलिप्त राहू इच्छितात. मग काय तुम्ही बुद्धीचा उपयोग करणार नाही? (३१-३२)

हे पैगंबर (स.), आम्हाला माहीत आहे की ज्या गोष्टी हे लोक रचत आहेत त्यापासून

५) याचा अर्थ असा नव्हे की जगातील जीवनात काहीच गांभीर्य नाही व हे केवळ एक खेळ आणि मनोरंजन म्हणून बनविले आहे. वास्तविकपणे याचा अर्थ असा की परलोकातील खऱ्या आणि चिरजीवनाच्या तुलनेत हे जीवन असे आहे जसे एखाद्या माणसाने काही वेळ खेळ व करमणुकीत आपले मन रमवावे व मग मूळच्या गंभीर कार्याकडे वळावे. तसेच या जीवनाला खेळ व मनोरंजनाची उपमा अशासाठी देखील दिली गेली आहे की या ठिकाणी वास्तवता दडलेली असल्यामुळे नतद्रष्ट आणि बाह्यताप्रिय माणसांचा चुकीचा समज होण्याची बरीचशी कारणे अस्तित्वात आहेत. अशा चुकीच्या समजुतीच्या आहारी जाऊन लोक वास्तविक सत्याविरूद्ध अशा विचित्र, कार्यपद्धतीचा अवलंब करतात जेणेकरून त्यांचे जीवन केवळ एक खेळ आणि मनोरंजन बनून राहते.

तुम्हाला दु:ख होते, परंतु हे लोक तुम्हाला खोटे ठरवीत नाहीत तर हे अत्याचारी खरे पाहता अल्लाहच्या संकेतवचनांचा इन्कार करीत आहेत.[६] तुमच्यापूर्वी देखील अनेक पैगंबर खोटे ठरविले गेले, परंतु या खोटे ठरविण्यावर आणि त्यांना दिल्या गेलेल्या यातनांवर त्यांनी संयम दाखविला येथपर्यंत की आमची मदत त्यांना पोहोचली. अल्लाहच्या गोष्टींना बदलण्याची शक्ती कोणातच नाही. आणि पूर्वीच्या पैगंबरांशी जो काही व्यवहार झाला त्याविषयी बातम्या तुम्हापर्यंत आल्याच आहेत. तथापि जर या लोकांची उपेक्षा तुम्हाला सहन होत नसेल तर मग तुमच्यात जर काही सामर्थ्य असेल तर जमिनीतील एखादा भुयारी मार्ग शोधा किंवा आकाशाला शिडी लावा आणि त्यांच्यापाशी एखादे संकेतचिन्ह आणण्याचा प्रयत्न करा. जर अल्लाहने इच्छिले असते तर या सर्वांना सन्मार्गावर जमा केले असते, म्हणून अज्ञानी बनू नका.[७] सत्याच्या आवाहनास तेच प्रतिसाद देतात जे ऐकणारे आहेत! मृतांना[८] तर अल्लाह कबरीतूनच उठवील आणि नंतर ते (त्याच्या न्यायालयात सादर होण्यासाठी) परत आणले जातील. (३३-३६)

---

६) वस्तुस्थिती अशी आहे की जोपर्यंत पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी कुरआनच्या आयती ऐकविणे सुरू केले नव्हते तोपर्यंत त्यांचे लोक त्यांना विश्वस्त आणि खरा समजत असत. ते त्यांच्या सत्यनिष्ठतेवर पूर्णपणे विश्वास बाळगत असत. त्या लोकांनी त्यांना खोटे त्यावेळी ठरविले जेव्हा पैगंबर (स.) यांनी अल्लाहकडून संदेश पोहचविण्यास सुरुवात केली. या दुसऱ्या अवस्थेत देखील व्यक्तिगतरीत्या पैगंबरांना खोटे ठरविण्याचे धैर्य दाखवू शकणारी अशी कोणतीही व्यक्ती त्यांच्यात नव्हती. पैगंबरांच्या कट्टरातल्या कट्टर विरोधकाने देखील कोणत्याही सांसारिक मामल्यात कधी त्यांना खोटे बोलले आहे असा आरोप कधीही केला नाही. त्यांनी पैगंबर (स.) ना खोटे ठरविण्याचा जो काही प्रयत्न केला तो त्यांच्या प्रेषितत्वासंबंधीच केला. पैगंबरांचा सर्वात मोठा शत्रू 'अबुजहल' होता. हजरत अली (रजि.) चे निवेदन आहे की एखदा पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याशी बोलताना त्याने सांगितले, "आम्ही तुम्हाला तर खोटे म्हणत नाही परंतु जे काही तुम्ही प्रस्तुत करीत आहात त्याला खोटे ठरवितो."

७) म्हणजे या लोकांना एखादी अशी निशाणी दाखविली जावी जेणेकरून त्यांनी ईमान आणावे, या काळजीत तुम्ही पडू नका. सर्वच माणसांना सरळ मार्गावर जमा केले जावे हाच हेतू जर अल्लाहच्या दृष्टीसमोर असता तर त्याने सर्वांनाच ईमानधारक निर्मिले असते. मग प्रेषितांना पाठविण्याची व ईमान आणणारे आणि इन्कार करणारे यांच्या दरम्यान वर्षानुवर्षे संघर्ष करविण्याची गरजच काय होती.

८) ऐकणाऱ्यापासून अभिप्रेत ते लोक होते ज्यांचे अंत:करण जिवंत असते, ज्यांनी आपली बुद्धी व विचारशक्ती निलंबित केली नसावी आणि ज्यांनी आपल्या मनाच्या दारांना पूर्वग्रहदोषाची आणि अनास्थेची कुलुपे ठोकलेली नसावी. त्यांच्या उलट मृत ते लोक होत जे डोळ्यावर ढापणे लावून एका रेषेत आंधळ्याप्रमाणे वाटचाल करीत आहेत व त्या रेषेपासून हटलेली कोणतीही गोष्ट मान्य करण्यास तयार नाहीत मग ती उघडपणे सत्य का असत नाही.



हे लोक म्हणतात की या पैगंबरावर त्याच्या पालनकर्त्याकडून एखादे संकेतवचन का अवतरले गेले नाही? सांगा, अल्लाह संकेतवचन अवतरण्याचे पूर्ण सामर्ध्य बाळगतो परंतु यांच्यामधील बहुतेक लोक अज्ञानात गुरफटलेले आहेत.[९] जमिनीवर चालणाऱ्या एखाद्या प्राण्याला आणि हवेत पंखाने उडणाऱ्या एखाद्या पक्ष्याला पहा, हे सर्व तुमच्यासारख्याच प्रजातींमध्ये मोडतात. आम्ही त्याच्या भाग्यलेखात कोणतीही कसर ठेवली नाही, मग हे सर्व आपल्या पालनकर्त्याकडे एकवटले जातील, पण जे लोक आमच्या संकेतवचनांना खोटे ठरवितात, ते बहिरे आणि मुके आहेत, अंधारात पडलेले आहेत. अल्लाह इच्छितो त्याला पथभ्रष्ट करतो आणि ज्याला इच्छितो त्याला सरळ मार्गावर लावतो.[१०] यांना सांगा, थोडे विचार करून सांगा, जेव्हा तुमच्यावर अल्लाहकडून एखादे मोठे संकट येऊन कोसळते अथवा अंतिम घटका येऊन ठेपते तर काय तेव्हा तुम्ही अल्लाहशिवाय इतर कुणाचा धावा करता? सांगा, जर तुम्ही खरे असाल तर. त्यावेळी तुम्ही अल्लाहचाच धावा करता, मग जर त्याने इच्छिले तर तो तुमच्यावरून संकट टाळतो. अशा प्रसंगी तुम्ही ज्यांना अल्लाहचे भागीदार ठरविले आहे त्यांना विसरून जाता.[११] (३७-४१)

तुमच्यापूर्वी अनेक जनसमूहांकडे आम्ही प्रेषित पाठविले आणि त्या जनसमूहांना

---

९) निशाणीने अभिप्रेत इंद्रियगम्य चमत्कार आहे. सर्वोच्च अल्लाहच्या या कथनाचा अर्थ असा की चमत्कार न दाखविण्याचे कारण असे नाही की आम्ही ते दाखविण्यासाठी असमर्थ आहोत तर केवळ आपल्या अज्ञानामुळे हे लोक ते समजून घेत नाहीत, असे त्याचे एक दुसरेच कारण आहे.

१०) ईश्वराने भटकविणे असे आहे की एका अज्ञानप्रिय माणसाला अल्लाहच्या निशाण्यांचे निरीक्षण करण्याची सुबुद्धी दिली जाऊ नये आणि एका पूर्वग्रहदोष बाळगणाऱ्या विपरीत वास्तवताप्रिय अभ्यासकाने त्यांचे निरीक्षण केले तरी वास्तविकतेप्रत नेणाऱ्या खुणा त्याच्या दृष्टीपासून लपलेल्याच राहाव्यात व गैरसमजुतीत गुंतविणाऱ्या गोष्टी त्याला सत्यापासून अधिकाधिक दूर ओढत न्याव्यात. याउलट अल्लाहचा सुबोध हा आहे की एका 'सत्यनिष्ठ' ला ज्ञानाच्या साधनांद्वारे लाभ घेण्याची सुबुद्धी दिली जावी आणि अल्लाहच्या आयतीत त्याला वास्तवतेप्रत पोहचविणाऱ्या खुणा मिळत जाव्यात.

११) म्हणजे ही निशाणी तर तुमच्या स्वत:च्या अंत:करणात मौजूद आहे. जेव्हा तुमच्यावर एखादे मोठे संकट येते, अथवा मृत्यू आपल्या भयंकर रूपात समोर येऊन ठेपतो तेव्हा एकट्या ईश्वराच्या आश्रयाशिवाय अन्य कोणतेही आश्रयस्थान तुम्हाला दिसत नाही. मोठमोठे अनेकेश्वरवादी अशा प्रसंगी आपल्या उपास्यांना विसरून एकमेव ईश्वराचा धावा करू लागतात. कट्टरातला कट्टर नास्तिक देखील ईश्वरासमोर प्रार्थनेसाठी हात पसरतो. हा या गोष्टीचा पुरावा आहे की ईशभक्ती आणि एकेश्वरवादाची साथ प्रत्येक माणसाच्या अंत:करणात मौजूद आहे, त्यावर गफलतीचे आणि अज्ञानाचे कितीही पडदे टाकले गेले असले तरीसुद्धा कधी कधी ती साक्ष उफाळून समोर येऊन ठेपते.

संकटात व दु:खात टाकले जेणेकरून त्यांनी नम्रपणे आमच्यासमोर झुकावे. मग जेव्हा आमच्याकडून त्यांच्यावर संकट आले तेव्हा त्यांनी नम्रता का दर्शविली नाही? परंतु त्यांची हृदये तर अधिकच कठोर झाली आणि शैतानाने त्यांना दिलासा दिला की जे काही तुम्ही करीत आहात ते उत्तमच करीत आहात. मग जेव्हा त्यांना दिलेल्या उपदेशाचे त्यांनी विस्मरण केले तेव्हा आम्ही सर्व प्रकारच्या सुखसमृद्धिची दारे त्यांच्यासाठी उघडी केली, येथपावेतो की जेव्हा ते त्यांना दिल्या गेलेल्या सुखसमृद्धित खूप मग्न झाले, तेव्हा - अचानकपणे आम्ही त्यांना पकडले आणि आता परिस्थिती अशी होती की ते प्रत्येक मांगल्यापासून निराश झाले होते. अशा प्रकारे त्यांची मुळे कापून टाकली गेली, ज्यांनी अत्याचार केले होते आणि सर्व प्रशंसा आहे सकल जगांचा पालनकर्ता अल्लाहसाठीच. (४२-४५)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, कधी तुम्ही याचा तरी विचार केला, की जर अल्लाहने तुमची दृष्टी व श्रवणशक्ती तुमच्यापासून हिरावून घेतली आणि तुमच्या हृदयावर शिक्कामोर्तब केले[१२] तर अल्लाहशिवाय इतर कोणता असा ईश्वर आहे जो ह्या शक्ती तुम्हाला परत बहाल करू शकेल? पहा, कशाप्रकारे आम्ही वरचेवर आपली संकेतवचने त्यांच्यासमोर ठेवतो आणि हे कशाप्रकारे त्याच्यापासून दृष्टी चुकवितात. सांगा, कधी तुम्ही विचार केला की जर अल्लाहकडून अकस्मात किंवा जाहिररीत्या तुमच्यावर प्रकोप आला तर अत्याचाऱ्यांशिवाय इतर कोणी नष्ट होईल काय? आम्ही जो पैगंबर पाठवितो तो याचकरिता तर पाठवितो की ते सदाचारी लोकांना खुषखबरी देणारे व दुराचारी लोकांना भय दाखविणारे असतील. मग ते लोक त्यांचे म्हणणे ऐकतील व आपल्या कार्यपद्धतीत सुधारणा करतील त्यांच्यासाठी कोणत्याही प्रकारच्या भयाचा व दु:खाचा प्रसंग नाही. आणि जे आमच्या वचनांना खोटे ठरवतील ते आपल्या अवज्ञेपायी शिक्षा भोगल्याशिवाय राहणार नाहीत. (४६-४९)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''मी तुम्हाला असे सांगत नाही की माझ्याजवळ अल्लाहचे खजिने आहेत, मला परोक्षाचे ज्ञानही नाही व असेही सांगत नाही की मी ईशदूत आहे. मी तर केवळ त्या 'वह्य' (दिव्य अवतरणाने) चे पालन करतो जे माझ्यावर अवतरले जाते.'' मग यांना विचारा, ''आंधळा व डोळस दोघे समान असू शकतात काय? तुम्ही विचार करीत नाही?'' (५०)

आणि हे पैगंबर (स.), तुम्ही या (दिव्य प्रकटनाच्या ज्ञाना) द्वारे त्या लोकांना उपदेश करा जे लोक याचे भय बाळगतात की, आपण आपल्या पालनकर्त्यासमोर कधी तरी अशा अवस्थेत हजर केले जाऊ जेथे त्याच्याशिवाय कोणीही (असा सत्ताधीश) नसेल

**१२)** या ठिकाणी हृदयांवर मुहर करण्याने अभिप्रेत विचार व आकलनशक्तीचे हिरावून घेतले जाणे होय.



जो त्यांचा समर्थक व सहायक असेल किंवा त्यांची शिफारस करील, कदाचित (या उपदेशाने सावध होऊन) त्यांनी ईशपरायणतेचे वर्तन अंगिकारावे. आणि जे लोक आपल्या पालनकर्त्याचा अहोरात्र धावा करीत असतात व त्याची प्रसन्नता प्राप्त करण्यात गुंतलेले असतात त्यांना आपल्यापासून दूर लोटू नका. त्यांच्या हिशेबातील कोणत्याही गोष्टीचा भार तुमच्यावर नाही व तुमच्या हिशेबातील कोणत्याही गोष्टीचा भार त्यांच्यावर नाही. याउपर देखील जर तुम्ही त्यांना दूर लोटले तर अत्याचारी लोकांत गणले जाल, खरे पाहता आम्ही अशा तऱ्हेने या लोकांपैकी काहींना काहींच्याद्वारे परीक्षेत टाकले आहे[१३] जेणेकरून त्यांनी त्यांना पाहून म्हणावे, ''हेच ते आमच्यातील लोक आहेत ज्यांच्यावर अल्लाहची दया व कृपा झाली आहे?'' होय! काय अल्लाह आपल्या कृतज्ञ दासांना यांच्यापेक्षा अधिक जाणत नाही? जेव्हा तुमच्याजवळ ते लोक येतील जे आमच्या वचनांवर श्रद्धा ठेवतात तेव्हा त्यांना सांगा, ''तुमच्यावर शांती असो. तुमच्या पालनकर्त्याने दया आणि कृपेचा परिपाठ स्वत:साठी अनिवार्य केला आहे. (ही त्याची दया व कृपाच आहे की) जर तुमच्यापैकी एखाद्याने अज्ञानाने एखादे दुष्कर्म केले असेल व नंतर पश्चात्ताप व्यक्त केला व सुधारणा केली तर तो त्याला माफ करतो, नरमाई दाखवितो.''[१४] आणि आम्ही अशा तऱ्हेने आमची संकेतचिन्हे उघड करून प्रस्तुत करतो, जेणेकरून अपराध्यांचा मार्ग अगदी स्पष्ट व्हावा. (५१-५५)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''तुम्ही लोक अल्लाहशिवाय इतर ज्यांचा धावा करीत आहात त्यांची भक्ती करण्यास मला मनाई करण्यात आली आहे.'' सांगा, ''मी तुमच्या इच्छांचे अनुकरण करणार नाही, जर मी असे केले तर मी पथभ्रष्ट होईल, सरळमार्ग प्राप्त करणाऱ्यांपैकी राहू शकणार नाही.'' सांगा, ''मी आपल्या पालनकर्त्यातर्फे एका उज्ज्वल प्रमाणावर कायम आहे आणि तुम्ही त्याला खोटे ठरविले आहे, आता माझ्या अखत्यारीत ती गोष्ट मुळीच नाही जिच्याबद्दल तुम्ही घाई करीत आहात, निर्णयाचा सर्वस्वी अधिकार अल्लाहला आहे. तोच सत्य बाबी सांगतो आणि तोच सर्वोत्कृष्ट निवाडा

**१३)** म्हणजे दरिद्री आणि गरीब, तसेच समाजात ज्या लोकांना खालचे स्थान दिलेले आहे, सर्वप्रथम अशाच लोकांना ईमानची सुबुद्धी देऊन आम्ही श्रीमंती आणि प्रतिष्ठेचा अहंकार बाळगणाऱ्यांना परीक्षेत टाकले आहे.

**१४)** ज्या लोकांनी त्यावेळी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्यावर ईमान आणले होते त्यांच्यात असे पुष्कळ लोक होते ज्यांच्या हातून अज्ञानाच्या काळात मोठमोठी पापकर्मे घडली होती. आता इस्लाम स्वीकारल्यानंतर त्यांचे जीवन पूर्णपणे पालटले असले तरी इस्लाम-विरोधक त्यांच्या पूर्वाश्रमी जीवनातील दोष आणि कृत्यांसाठी टोमणे मारीत असत. म्हणून फर्माविले जात आहे की ईमानवाल्यांचे सांत्वन करा. त्यांना सांगा की जो इसम पश्चात्ताप व्यक्त करून आपली सुधारणा करून घेतो त्याच्या पूर्वीच्या अपराधांवर दोषी धरण्याची पद्धत अल्लाहजवळ नाही.

करणारा आहे.'' सांगा, ''जर एखादे वेळी ती गोष्ट माझ्या अखत्यारीत असती जिच्यासाठी तुम्ही घाई करीत आहात तर माझ्यात आणि तुमच्यात केव्हाच निर्णय लागला असता. परंतु अल्लाह अधिक चांगले जाणतो की अत्याचाऱ्यांशी कोणता व्यवहार केला गेला पाहिजे. त्याच्याजवळच परोक्षाच्या किल्ल्या आहेत ज्यांचे ज्ञान त्याच्याशिवाय इतर कोणालाच नाही. समुद्र व जमिनीत जे काही आहे ते सर्व त्याला माहीत आहे. झाडावरून गळून पडणारे कोणतेच पान असे नाही ज्याची माहिती त्याला नाही जमिनीच्या अंधकारपूर्ण थरांत कोणताच दाणा असा नाही, ज्याचे त्याला ज्ञान नाही. आर्द्र व शुष्क सर्वकाही एका खुल्या ग्रंथात लिहिलेले आहे. तोच तर आहे जो रात्री तुमचे प्राण हरण करतो व दिवसा जे काही तुम्ही करता ते जाणतो, मग, दुसऱ्या दिवशी तो तुम्हाला याच ऐहिक जगात परत पाठवितो जेणेकरून जीवनाची ठराविक मुदत पूर्ण व्हावी. सरतेशेवटी त्याच्याकडेच तुम्हाला परत जायचे आहे, मग तो तुम्हाला दाखवून देईल की तुम्ही काय करीत होता. आपल्या दासांवर तो संपूर्ण प्रभुत्व राखतो आणि तुमच्यावर निरीक्षक नियुक्त करून पाठवितो, येथपावेतो की जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याची मृत्यूघटका येऊन ठेपते तेव्हा त्याने पाठविलेले दूत त्याचे प्राण हरण करतात व आपले कर्तव्य बजावण्यात जरा देखील चूक करीत नाहीत. मग सर्वचेसर्व आपल्या खऱ्या स्वामी अल्लाहकडे परत आणले जातात, सावधान! निर्णयाचे सर्व अधिकार त्यालाच प्राप्त आहेत आणि हिशोब घेण्यात तो अत्यंत सत्वर आहे.'' (५६-६२)

हे पैगंबर (स.), यांना विचारा, वाळवंट व समुद्राच्या अंधकारांत कोण तुम्हाला संकटापासून वाचवितो? कोण आहे ज्याच्याजवळ तुम्ही (संकटसमयी) गयावया करून आणि गुपचुपपणे प्रार्थना करता? कुणाला म्हणता की जर त्याने या संकटातून वाचविले तर आम्ही जरूर कृतज्ञ बनू? - सांगा, अल्लाह तुम्हाला यापासून व प्रत्येक यातनांपासून मुक्त करतो. मग तुम्ही इतरांना त्याचा भागीदार ठरविता.[१५] - सांगा, ''तो याला समर्थ

**१५)** म्हणजे ही वस्तुस्थिती की एकटा अल्लाहच सर्वशक्तीमान आहे. समस्त अधिकारांचा स्वामी आणि तुमच्या भल्या व बुऱ्याचा सर्वाधिकारी आहे. त्याच्याच हातात तुमच्या भाग्याची धुरा आहे. याची साक्ष तर तुमच्या स्वत:च्या मनात मौजूद आहे. जेव्हा एखादा कठीण प्रसंग येतो व कार्यकारण संबंध तुटत असल्याचे दिसू लागतात तेव्हा त्यावेळी तुम्ही उत्स्फूर्तपणे त्याच्याचकडे धाव घेता परंतु अशी ही उघड निशाणी असताना देखील ईशत्वात कसल्याही पुराव्या व प्रमाणाविना तुम्ही इतरांना त्याचे भागीदार बनविले आहे. पोसले जाता त्याच्या अन्नावर आणि अन्नदाता ठरविता दुसऱ्यांना, सहाय्य मिळविता त्याच्या कृपा व मेहरबानीपासून आणि मददगार व हिमायती ठरविता इतरांना, दास आहात त्याचे आणि बंदगी करता दुसऱ्यांची, विघ्न हरतो तो, वाईट प्रसंगी गयावया करता त्याची, आणि जेव्हा तो प्रसंग टळतो तेव्हा तुमचे विघ्नहर्ता बनतात दुसरेच. नैवेद्य व भेटी चढविल्या जातात इतरांच्या नावाने.



आहे की तुम्हावर एखादा प्रकोप वरून कोसळवेल, अथवा तुमच्या पायाखालून उसळवेल किंवा तुम्हाला गटागटांत विभागून एका गटाला दुसऱ्या गटांच्या शक्तीचा आस्वाद चाखवील.'' पहा, आम्ही कशाप्रकारे वरचेवर विविध पद्धतींनी आमची संकेतवचने यांच्यासमोर प्रस्तुत करीत आहोत की कदाचित यांना सत्य समजावे. तुमचे समाजबांधव त्याचा इन्कार करीत आहेत, वास्तविक पाहता ते सत्य आहे. यांना सांगा की मी तुमच्यावर राखणदार बनविलो गेलो नाही.[१६] प्रत्येक वार्तेच्या प्रकट होण्याची एक वेळ निर्धारित आहे. लवकरच तुम्हाला स्वत:च परिणाम कळेल. (६३-६७)

आणि हे पैगंबर (स.), जेव्हा तुम्ही पाहाल की लोक आमच्या संकेतवचनांवर टीका करीत आहेत तर त्यांच्यापासून दूर व्हा - येथपावेतो की त्यांनी हे संभाषण सोडून दुसऱ्या गोष्टीत लागावे. आणि जर एखादे वेळी शैतानाने तुम्हाला विसर पाडला, तर जेव्हा तुम्हाला त्या चुकीची जाणीव होईल त्यानंतर पुन्हा अशा अत्याचाऱ्यांच्या जवळ बसू नका. त्याच्या हिशोबातील कोणत्याही गोष्टीची जबाबदारी पापभीरू लोकांवर नाही, परंतु त्यांना उपदेश करणे तुमचे कर्तव्य आहे कदाचित ते दुर्वर्तनापासून वाचू शकतील. सोडा त्या लोकांना ज्यांनी आपल्या धर्माला खेळ व तमाशा बनवून टाकले आहे आणि ज्यांना ऐहिक जीवनाने भुलविले आहे. होय, त्यांना हा कुरआन ऐकवून उपदेश व ताकीद देत राहा की एखाद्या वेळेस एखादी व्यक्ती स्वत: केलेल्या कृत्यांच्या आपत्तीत सापडू नये, आणि जर अशा अवस्थेत सापडली तर अल्लाहपासून वाचविणारा कोणी समर्थक व सहायक आणि कोणी बाजू मांडणारा तिच्यासाठी नसेल, आणि वाटेल ती वस्तू मोबदल्यात देऊन सुटू इच्छित असेल तर तीसुद्धा स्वीकारली जाणार नाही. कारण असे लोक तर स्वत: आपल्या कर्माच्या परिणामस्वरूप पकडले जातील. त्यांना तर सत्याच्या आपल्या इन्काराच्या मोबदल्यात उकळते पाणी पिण्यास मिळेल आणि दु:खदायक प्रकोप भोगावयास मिळेल. (६८-७०)

हे पैगंबर (स.)! त्यांना विचारा, काय आम्ही अल्लाहला सोडून त्यांचा धावा करावा जे आम्हाला लाभही पोहोचवू शकत नाहीत व नुकसानही नाही? आणि ज्याअर्थी अल्लाहने आम्हाला सन्मार्ग दाखवून दिला आहे तर काय आम्ही परत पावली मागे फिरावे? काय आम्ही आपली दशा त्या माणसासारखी करून घ्यावी ज्याला शैतानांनी वाळवंटात भटकविले असावे आणि तो हैराण व विक्षिप्तपणे फिरत असावा, वास्तविकपणे त्याचे सोबती त्याला हाका मारीत असतील की इकडे ये, हा सरळमार्ग अस्तित्वात आहे, सांगा, ''वस्तुत: खरे मार्गदर्शन तर केवळ अल्लाहचेच मार्गदर्शन आहे

**१६)** म्हणजे जे काही तुम्ही पाहात नाही ते जबरदस्तीने तुम्हाला पाहावयास लावावे व जे काही तुम्ही समजून घेत नाही बळजबरीने त्याचा तुम्हाला समज द्यावा, हे माझे काम नव्हे. तसेच हे कामही माझे नाही की जर तुम्ही पाहिले नाही तर तुमच्यावर प्रकोप कोसळवावा.

आणि त्याच्याकडून आम्हाला हा आदेश मिळाला आहे की सर्व सृष्टीच्या स्वामीपुढे मान तुकवा. नमाज स्थापित करा आणि त्याच्या अवज्ञेपासून दूर राहा, त्याच्याकडेच तुम्ही एकत्र केले जाल.'' तोच आहे ज्याने आकाश व पृथ्वीला सत्यानिशी निर्माण केले आहे.[१७] आणि ज्या दिवशी तो सांगेल की पुनरुत्थान व्हावे तेव्हा त्याच दिवशी ते होईल. त्याचेकथन सर्वस्वी सत्य आहे आणि ज्या दिवशी नरसिंग फुंकले जाईल त्या दिवशी सत्ता त्याचीच असेल, तो परोक्ष आणि अपरोक्ष[१८] प्रत्येक वस्तूचा ज्ञाता आहे आणि बुद्धिमान व जाणकार आहे. (७१-७३)

इब्राहीम (अ.) च्या घटनेची आठवण करा जेव्हा त्याने आपल्या पित्या आजरला सांगितले होते, ''काय तू मूर्तींना ईश्वर बनविलेस, मी तर तुला व तुझ्या लोकांना उघड पथभ्रष्ट पाहात आहे.'' इब्राहीम (अ.) ला आम्ही अशाप्रकारे पृथ्वी व आकाशांचे व्यवस्थापन दाखवीत होतो आणि याकरिता की तो विश्वास राखणाऱ्यांपैकी व्हावा. म्हणून जेव्हा रात्र त्याच्यावर पसरली तेव्हा त्याने एक नक्षत्र पाहिले, म्हणाला, ''हा माझा

१७) कुरआनात जागोजागी ही गोष्ट सांगितलेली आहे की अल्लाहने पृथ्वी व आकाशांना सत्याधिष्ठित अथवा सत्यानिशी निर्माण केले आहे. याचा एक अर्थ असा की पृथ्वी आणि आकाशांचे सर्जन केवळ खेळ म्हणून झालेले नाही. हे एखाद्या लहान मुलांचे खेळणे नव्हे की केवळ मनोरंजन म्हणून त्यांच्याशी त्याने खेळत राहावे आणि मग सहजच त्याची तोडफोड करून फेकून टाकावे. वास्तविकपणे हे एक अत्यंत गंभीर स्वरूपाचे कार्य आहे. ते हेतूपुरस्सर केले आहे. एक महान उद्दिष्ट त्याच्यात कार्यरत आहे. याचा एक कालचक्र पूर्ण झाल्यानंतर त्या कालावधीत जे काही पडले आहे, सर्जनकर्त्याने त्या संपूर्ण कामगिरीचा हिशोब घ्यावा व त्याच कालावधीच्या अंतिम परिणामावर दुसऱ्या कालचक्राचा पाया ठेवावा. हे अनिवार्य आहे. दुसरा अर्थ असा की अल्लाहने ही संपूर्ण सृष्टीव्यवस्था सत्याच्या भक्कम पायावर उभी केली आहे. न्याय, विवेक आणि सत्यतेच्या नियमांवर याची प्रत्येक वस्तू आधारित आहे. असत्यासाठी खरे म्हणजे या व्यवस्थेत मूळ धरण्यास व सफल होण्यास कोणताच वाव नाही. अल्लाहनेच असत्योपासकांना संधी द्यावी की ते जर आपले असत्य व अत्याचार आणि अवास्तवतेत वृद्धी करू इच्छित असले तर त्यांनी तसले प्रयत्न करून पाहावेत, ही गोष्ट वेगळी. तरीपण सरतेशेवटी पृथ्वी असत्याचे प्रत्येक बी ओकून बाहेर फेकेल आणि प्रत्येक असत्यवादी अंतिम हिशेबपत्रात, त्याने या दुष्टतेच्या वृक्षाची मशागत व सिंचनात जे परिश्रम घेतले आहेत ते सर्व वाया गेल्याचे पाहिल्याशिवाय राहणार नाही. तिसरा अर्थ असा की ईश्वराने ही सर्व सृष्टी स्वहक्काने निर्माण केली आहे आणि आपल्या स्वहक्काच्या आधारेच यावर सत्ता चालवीत आहे. त्याचा हुकूम या ठिकाणी अशासाठी चालतो की तोच आपण निर्मिलेल्या सृष्टीवर सत्ता चालविण्याचा हक्क बाळगतो. इतर कोणाचाही हुकूम येथे चालावा असा त्याला हक्क नाही.

१८) परोक्ष (गैब) ते सर्वकाही जे निर्मितीच्या दृष्टीतून गुप्त आहे. अपरोक्ष, ते सर्वकाही जे निर्मितीसाठी उघड आणि माहीत आहे.



पालनकर्ता आहे परंतु जेव्हा ते मावळले तेव्हा म्हणाला, अस्त पावणाऱ्यांवर तर मी आकर्षित होत नाही. मग जेव्हा चकाकणारा चंद्र पाहिला तेव्हा म्हणाला, हा माझा पालनकर्ता आहे. मग जेव्हा तो देखील अस्त पावला तर म्हणाला, जर माझ्या पालनकर्त्याने माझे मार्गदर्शन केले नसते तर मी सुद्धा मार्गभ्रष्ट लोकांत सामील झालो असतो. मग जेव्हा सूर्याला दैदीप्यमान पाहिले तर म्हणाला, हा आहे माझा पालनकर्ता, हा सर्वात मोठा आहे. परंतु तोही जेव्हा लयास गेला तेव्हा इब्राहीम (अ.) उद्गारला, हे माझ्या जातीबांधवांनो! मी त्या सर्वांपासून विरक्त आहे ज्यांना तुम्ही ईश्वराचा भागीदार ठरविता.[१९] मी तर एकाग्र होऊन आपले मुख त्या अस्तित्वाकडे केले आहे ज्याने जमीन आकाशांना निर्माण केले आहे आणि मी कदापि अनेकेश्वरवाद्यांपैकी नाही.'' त्याचे लोक त्याच्याशी भांडू लागले तर त्याने लोकांना सांगितले, ''काय तुम्ही लोक अल्लाहच्या बाबतीत माझ्याशी भांडता? वास्तविक पाहता त्याने मला सरळमार्ग दाखविला आहे. आणि तुम्ही ठरविलेल्या भागीदारांना मी भीत नाही. होय, जर माझ्या पालनकर्त्याने काही इच्छिले तर ते अवश्य घडू शकते. माझ्या पालनकर्त्याचे ज्ञान प्रत्येक वस्तूवर पसरले आहे, मग काय तुम्ही शुद्धीवर येणार नाही?[२०] आणि मग मी तुमच्या मानलेल्या भागीदारांना कसे भ्यावे जेव्हा तुम्ही अल्लाहबरोबर त्या वस्तूंना ईशत्वामध्ये भागीदार ठरविण्यास भीत नाही ज्यांच्यासाठी त्याने तुम्हांवर कोणतेही प्रमाण अवतरले नाही? आम्हा उभयपक्षांपैकी कोण निश्चिंतता व संतोषाला जास्त पात्र आहे? सांगा, जर काही तुम्हाला ज्ञान असेल तर खरे पाहता शांती तर त्यांच्यासाठी आहे आणि सन्मार्गावर तेच आहेत ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी आपल्या श्रद्धेला अत्याचाराशी जोडले नाही.'' (७४-८२)

हे होते आमचे ते बोधप्रमाण जे आम्ही इब्राहीम (अ.) ला त्याच्या लोकांविरूद्ध प्रदान केले. आम्ही ज्याला इच्छितो त्याला उच्च मान मरातब बहाल करतो. सत्य असे आहे की तुमचा पालनकर्ता अत्यंत बुद्धिमान व ज्ञानी आहे. (८३)

मग आम्ही इब्राहीम (अ.) ला, इसहाक (अ.) व याकूब (अ.) प्रमाणेच संतती दिली व प्रत्येकाला सन्मार्ग दाखविला (तोच सन्मार्ग जो) त्याच्याअगोदर नूह (अ.) ला

१९) या ठिकाणी हजरत इब्राहीम (अ.) यांना प्रेषितपदाने उपकृत केल्या जाण्याअगोदर त्याना सत्याप्रत नेण्याचे जे साधन ठरले त्यांच्या प्राथमिक चिंतनाची कैफियत सांगितलेली आहे. यात सांगितले आहे की एक यथायोग्य बुद्धी व दृष्टी बाळगणारा माणूस जो सर्वस्वी अनेकेश्वरोपासक वातावरणात जन्मला होता कशाप्रकारे सृष्टीतील चिन्हांचे निरीक्षण करून व त्यांच्यावर योग्य प्रकारे विचार व चिंतन करून सत्य गोष्टीच्या आकलनात यशस्वी ठरला.

२०) मूळ अरबी शब्द तजक्कुर प्रयुक्त झाला आहे. याचा खरा अर्थ, गफलतीत आणि फसगतीत असलेल्या अशा एखाद्या माणसाने सावध होऊन, ज्या गोष्टीपासून तो गाफिल आहे तिची आठवण करावी, असा होतो. म्हणून आम्ही 'अफला ततजक्करुन' या वाक्याचा सदरहू अनुवाद केला आहे.

दाखविला होता. आणि त्याच्याच वंशात आम्ही दाऊद (अ.), सुलैमान (अ.), अय्यूब (अ.), यूसुफ (अ.), मूसा (अ.) आणि हारून (अ.) यांना (सन्मार्ग) दाखविला. अशा प्रकारे आम्ही सदाचरण करणाऱ्या लोकांना त्यांच्या पुण्यांचे फळ देतो. (त्यांच्याच संततीत) ज़करिय्या (अ.), यह्या (अ.), ईसा (अ.) आणि इलयास (अ.) यांना (मार्गस्थ केले). त्यांच्यापैकी प्रत्येकजण सदाचारी होता. (त्यांच्याच वंशातून) इस्माईल (अ.), यसअ (अ.) आणि यूनुस (अ.) आणि लूत (अ.) यांना (मार्ग दाखविला). यांच्यापैकी प्रत्येकाला सर्व जगवासियांवर आम्ही श्रेष्ठत्व प्रदान केले. त्याचप्रमाणे त्यांचे वाड-वडील व त्यांची संतती व त्यांच्या भाऊबंदापैकी बहुतेकांना आम्ही उपकृत केले. त्यांना आमच्या सेवेसाठी निवडले आणि सरळ मार्गाकडे त्यांचे मार्गदर्शन केले! हे अल्लाहचे मार्गदर्शन आहे ज्याच्याद्वारे तो आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो त्याला मार्गदर्शन करतो. परंतु जर एखाद्या वेळी त्या लोकांनी अनेकेश्वरवाद स्वीकारला असता तर त्यांचे सर्व कर्मकृत्य नष्ट झाले असते. ते लोक होते ज्यांना आम्ही ग्रंथ, अधिकार आणि प्रेषितत्व प्रदान केले होते.[२१] आता जर हे लोक हे मान्य करण्यास नकार देत असतील तर (पर्वा नाही). आम्ही काही अन्य लोकांना हा कृपा-प्रसाद सुपूर्द केला आहे जे त्याला नाकारीत नाहीत. हे पैगंबर (स.), अल्लाहकडून मार्गदर्शन प्राप्त झालेले तेच लोक होते, त्यांच्याच मार्गावर तुम्ही चला आणि सांगून टाका की मी (या प्रचार व मार्गदर्शनाच्या) कामासाठी तुमच्याकडून कोणत्याही मोबदल्याचा इच्छुक नाही, हा तर सार्वजनिक उपदेश आहे तमाम जगवासियांसाठी. (८४-९०)

या लोकांनी अल्लाहसंबंधी फारच चुकीचा अंदाज लावला जेव्हा सांगितले की अल्लाहने कोणत्याही माणसावर काहीही अवतरलेले नाही. यांना विचारा, मग तो ग्रंथ ज्याला मूसा (अ.) ने आणले होते, जो तमाम मानवजातीसाठी प्रकाश व मार्गदर्शक होता, ज्याला तुम्ही खंड-खंड करून ठेवता, काही दाखविता व बरेचसे लपवून ठेवता, आणि ज्याच्या माध्यमाने तुम्हाला ते ज्ञान दिले गेले; जे तुम्हालाही प्राप्त झाले नव्हते व तुमच्या

**२१)** या ठिकाणी प्रेषितांना तीन गोष्टी प्रदान केल्या जाण्याचा उल्लेख आहे. एक ग्रंथ, अर्थात अल्लाहचे मार्गदर्शन पत्र, दुसरे हुकूम (अधिकार) म्हणजे सदरहू मार्गदर्शन पत्राचा खरा बोध आणि त्याच्या नियमांना सांसारिक जीवनावर लागू करण्याची क्षमता तसेच जीवनाच्या समस्येसंबंधी निर्णायक मत प्रस्थापित करण्याची उपजत योग्यता, तिसरे प्रेषितत्व. म्हणजे सदरहू मार्गदर्शन पत्रानुसार ईश्वराच्या निर्मितीच्या मार्गदर्शनाचे पद.



वाडवडिलांना देखील नव्हते, तर मग तो अवतरविणारा कोण होता?[२२] - केवळ एवढे सांगा की अल्लाह, मग त्यांना त्यांच्या युक्तीवादाशी खेळण्यास मोकळे सोडा. (त्याच ग्रंथासारखा) हा एक ग्रंथ आहे जो आम्ही अवतरला आहे. अत्यंत कल्याणकारी व समृद्धी प्रदान करणारा आहे. त्या वस्तूची सत्यता प्रमाणित करतो जी यापूर्वी आली होती आणि याकरिता अवतरित केला गेला आहे की याद्वारे तुम्ही लोकवस्तीच्या या केंद्राला (अर्थात मक्का) आणि त्याच्या परिसरात राहणाऱ्यांना सावध करावे. जे लोक परलोकाला मानतात ते या ग्रंथावर श्रद्धा ठेवतात आणि त्यांची अवस्था अशी आहे की आपल्या नमाजात नियमितपणा राखतात. आणि त्या माणसापेक्षा मोठा अत्याचारी इतर कोण असेल जो अल्लाहवर खोटे कुभांड रचतो अथवा सांगतो की माझ्याकडे दिव्य प्रकटन आले आहे. खरे पाहता त्यांच्यावर कसलेही दिव्य प्रकटन अवतरले गेले नाही. अथवा जो अल्लाहच्या अवतरित केलेल्या वस्तूच्या विरोधात सांगत असेल की मी देखील अशी वस्तू अवतरवून दाखवीन? किती छान होईल बरे जर तुम्ही अत्याचाऱ्यांना अशा दशेत पाहू शकाल जेव्हा ते मृत्यूच्या घरघरीत गटांगळ्या घेत असतील आणि दूत हात पुढे करून करून सांगत असतील की, "आणा, काढा आपले प्राण, आज तुम्हाला त्या गोष्टींपायी अपमानजनक यातना दिली जाईल, ज्या तुम्ही अल्लाहवर दोषारोप करून हकनाक बरळत होता आणि त्याच्या संकेतवचनांविरूद्ध उद्धटपणा करीत होता." (आणि अल्लाह फर्मावील) "तर पहा आता तुम्ही तसेच एकटे आमचे समोर हजर झालात जशा प्रकारे आम्ही तुम्हाला पहिल्यांदा एकाकी जन्माला घातले होते, जे काही आम्ही तुम्हाला जगांत दिले होते ते सर्व तुम्ही पाठीमागे सोडून आला आहात आणि आता आम्हाला तुमच्यासमवेत तुमची शिफारस करणारे देखील दिसत नाहीत, ज्यांच्याबद्दल तुम्ही समजत होता की तुमचे कार्य सिद्धीस नेण्यात त्यांचाही काही वाटा आहे, तुमचे आपापसातील सर्व संबंध तुटले आणि ते सर्व तुमच्यापासून अलिप्त झालेले आहेत ज्यांचा तुम्ही अहंकार बाळगत होता!" (९१-९४)

दाणे आणि बीज काढणारा अल्लाह आहे.[२३] तोच सजीवाला निर्जीवातून काढतो

**२२)** हे उत्तर यहूदी लोकांना दिले जात आहे म्हणून हजरत मूसा (अ.) वर तौरात उतरविण्याला प्रमाण म्हणून प्रस्तुत केलेले आहे. कारण ते स्वतःच तसे मानणारे होते. त्यांचे हे मान्य करण्याने की हजरत मूसा (अ.) यांच्यावर तौरात हा ग्रंथ उतरला होता, त्यांचे हे कथन की ईश्वराने कोणाही माणसावर काही उतरविले नाही, या कथनाचे आपोआपच खण्डन होते, हे अगदी स्पष्ट आहे. तसेच मनुष्यावर ईश्वरी वाणी प्रकट होऊ शकते व ती झाली आहे, कमीतकमी इतकी गोष्ट तर सिद्ध होतेच.

**२३)** म्हणजे जमिनीच्या थरात बी दुभंगून त्यापासून वृक्षाचे अंकुर बाहेर काढणारा.

आणि तोच निर्जीवाला सजीवातून बाहेर काढणारा आहे.[२४] ही सर्व कामे करणारा तर अल्लाहच आहे, मग तुम्ही कोठे भरकटले जात आहात? रात्रीचे आवरण फाडून तोच प्रात:काळ करतो, त्यानेच रात्रीला विश्रांतीची वेळ बनविली आहे. त्यानेच चंद्र व सूर्याच्या उदय आणि अस्ताचे प्रमाण ठरविले आहे. हे सर्व त्याच प्रचंड सामर्थ्य व ज्ञान असणाऱ्याचे निश्चित केलेले अंदाज आहेत. आणि तोच आहे ज्याने तुमच्यासाठी ताऱ्यांना वाळवंट व समुद्रातील अंध:कारात मार्ग शोधण्याचे साधन बनविले. पहा, आम्ही संकेत[२५] उघड करून सांगितले आहेत त्या लोकांसाठी की ज्यांना ज्ञान आहे. आणि तोच आहे ज्याने एका जिवापासून तुम्हाला निर्माण केले मग प्रत्येकासाठी एक विश्रामस्थान आहे आणि एक ती सुपूर्द केली जाण्याची जागा, हे संकेत आम्ही स्पष्ट केले आहेत त्या लोकांसाठी जे बोध घेतात आणि तोच आहे ज्याने आकाशातून पाण्याचा वर्षाव केला मग त्याद्वारे सर्व प्रकारच्या वनस्पती उगविल्या, मग त्याद्वारे हिरवीगार शेते व झाडे उगविली, मग त्याच्यापासून थरावर थर असलेले दाणे काढले आणि खजुराच्या फुलोऱ्यांतून फळांचे घोसच्या घोस उत्पन्न केले जे ओझ्यापायी झुकले जात आहेत आणि द्राक्षे, जैतून (ऑलिव्ह) व डाळिंबाच्या बागा, ज्यांची फळे एक दुसऱ्याशी साम्य तर ठेवतात तरीसुद्धा त्याची वैशिष्ट्ये वेगवेगळी आहेत. या झाडांना जेव्हा फळे येतात तेव्हा फळे येण्याची व मग ती पिकण्याची प्रक्रिया जरा विचारपूर्वक पाहा, या गोष्टीत संकेत आहेत त्या लोकांसाठी जे श्रद्धा ठेवतात. यावरही लोकांनी 'जिन्न'ना (अदृश्य निर्मितींना) अल्लाहचे भागीदार ठरविले[२६] वास्तविक पाहता तो त्यांचा निर्माता आहे आणि न समजता उमजता त्याच्यासाठी मुले व मुली बनविल्या, खरे पाहता तो पवित्र व उच्चतर आहे, त्या गोष्टीपासून ज्या हे लोक बोलतात. तो तर आकाशांचा व पृथ्वीचा आविष्कारक आहे, त्याची कोणी संतती कशी असू शकेल? ज्याअर्थी त्याची कोणीही जीवनसाथी नाही? त्याने प्रत्येक वस्तू निर्माण केली आहे व त्याला प्रत्येक वस्तूचे ज्ञान आहे. हा आहे

**२४)** सजीवाला निर्जीवातून बाहेर काढण्याचा अर्थ निर्जीव द्रव्यापासून जिवंत प्राणीमात्राला निर्माण करणे होय. तसेच निर्जीवाला सजीवातून बाहेर काढण्याचा अर्थ प्राणधारी शरीरांतून निर्जीव द्रव्ये बाहेर काढणे होय.

**२५)** म्हणजे या वस्तुस्थितीच्या निशाण्या की ईश्वर एकमेव आहे. इतर कोणी ईशत्वाचे गुणही बाळगत नाही आणि ईश्वरी अधिकारांचा वाटेकरी देखील नाही. तसेच ईश्वराच्या हक्कांपैकी कोणत्याही हक्कास कोणी पात्र देखील नाही.

**२६)** म्हणजे आपल्या कल्पनेनेच अशी धारणा करून घेतली आहे की सृष्टीच्या व्यवस्थेत व मानवाचे भाग्य व दुर्भाग्य बनविण्यात अल्लाहसमवेत इतर अदृश्य शक्ती देखील सहभागी आहेत. कोणी वरुणदेव आहे तर कोणी चैतन्यदेवता, कोणी लक्ष्मीची देवता आहे तर कोणी रोगराईची देवता मानतो. अशा प्रकारच्या मिथ्या कल्पना व श्रद्धा जगाच्या सर्वच अनेकेश्वरवादी लोकांत दुष्टात्मे, सैतान, राक्षस आणि देवदेवतेसंबंधी आढळतात.



अल्लाह तुमचा पालनकर्ता, कोणीही ईश्वर त्याच्या व्यतिरिक्त नाही, प्रत्येक वस्तूचा निर्माता. म्हणून तुम्ही त्याचीच भक्ती करा आणि तो प्रत्येक वस्तूचा रक्षणकर्ता आहे. दृष्टी त्याला पाहू शकत नाही पण तो दृष्टीला पाहत असतो. तो अत्यंत सूक्ष्मदर्शी आणि जाणकार आहे. (९५-१०३)

पहा तुमच्यापाशी तुमच्या पालनकर्त्याकडून डोळे उघडणारा प्रकाश आला आहे आता जो डोळसपणे कार्य करील तो आपलेच भले करील आणि जो आंधळ्याप्रमाणे करील तो स्वत:चे नुकसान करून घेईल. मी तुमच्यावर काही पहारेकरी म्हणून नव्हे![२७] (१०४)

अशा प्रकारे आम्ही आमचे संकेत वरचेवर विविध प्रकारे विशद याकरिता करतो की ह्या लोकांनी म्हणावे, "तुम्ही एखाद्याकडून शिकून आला आहात." आणि ज्या लोकांना ज्ञान आहे त्यांच्यावर वस्तुस्थिती स्पष्ट व्हावी. हे पैगंबर (स.), त्या 'वह्य' - दिव्य अवतरणाचे अनुसरण करीत जा जे तुमच्यावर तुमच्या पालनकर्त्याकडून अवतरले आहे कारण त्या एका पालनकर्त्याशिवाय अन्य कोणीही ईश्वर नाही. आणि अनेकेश्वरवादींच्या पाठीमागे लागू नका. जर अल्लाहने इच्छिले असते तर या लोकांनी अनेकेश्वरवाद केलाच नसता. तुम्हाला आम्ही त्यांच्यावर संरक्षक नेमलेले नाही की रखवालदार देखील नाही. आणि (हे मुसलमानांनो), हे लोक अल्लाहशिवाय ज्याचा धावा करतात त्यांचा उपहास करू नका, एखादे वेळेस असे होऊ नये की ते अनेकेश्वरवादाच्या पुढे जाऊन अज्ञानामुळे अल्लाहचा उपहास करू लागतील. आम्ही तर अशाच प्रकारे प्रत्येक गटासाठी त्याच्या कृतीला आकर्षक बनविले आहे, मग त्यांना आपल्या पालनकर्त्याकडेच परतून यावयाचे आहे, तेव्हा तो त्यांना दाखवील की ते काय करीत राहिले होते. (१०५-१०८)

हे लोक कठोर शपथा घेऊन-घेऊन सांगतात की जर एखादा संकेत (म्हणजे चमत्कार) आमच्यासमोर आला तर आम्ही त्यावर श्रद्धा ठेवू. हे पैगंबर (स.), यांना सांगा की, "संकेत तर अल्लाहच्या अखत्यारीत आहेत." आणि बरे तुम्हाला कसे समजावयाचे

**२७)** हे वाक्य जरी अल्लाहचे वचन असले तरी ते पैगंबर (स.) यांच्या वतीने व्यक्त केले जात आहे. ज्याप्रमाणे 'सुरतुल फातिहा' मुळात आहे अल्लाहची वाणी परंतु दासांच्या तोंडी व्यक्त होते. "मी तुमच्यावर काही रखवालदार म्हणून नाही." म्हणजे माझे काम केवळ इतकेच आहे की हा प्रकाश तुमच्यासमोर प्रस्तुत करावा, त्यानंतर डोळे उघडून पाहणे किंवा न पाहणे तुमच्या स्वत:चे काम आहे. ज्यांनी स्वत:चे डोळे मिटून घेतले आहेत बळजबरीने त्यांचे डोळे उघडावे, व जे काही पाहातच नाही त्यांना पाहणे भाग पाडावे ही सेवा माझ्या सुपूर्द केलेली नाही.

की जरी संकेत आले तरी हे श्रद्धा ठेवणार नाहीत.[२८] आम्ही त्याचप्रमाणे यांच्या हृदयांना व दृष्टीला फिरवीत आहोत ज्याप्रमाणे यांनी प्रथमत: या ग्रंथावर श्रद्धा ठेवली नव्हती आम्ही यांना यांच्या दुर्वर्तनातच भटकण्यासाठी सोडून देत आहोत जर आम्ही यांच्यावर ईशदूत जरी अवतरले असते आणि मृत लोक यांच्याशी बोलले जरी असते आणि जगभरातील वस्तू जरी यांच्या दृष्टीसमोर गोळा केल्या असत्या तरीसुद्धा यांनी श्रद्धा ठेवली नसती, ही गोष्ट वेगळी की अल्लाहची इच्छा हीच असावी. (की यांनी श्रद्धा ठेवावी) परंतु बहुतेकजण अज्ञानाची कृत्ये करतात. आणि आम्ही तर अशाच प्रकारे नेहमी शैतानी प्रवृत्तीच्या मानव व जिन्न यांना प्रत्येक प्रेषितांचे शत्रू बनविले आहे जे एक दुसऱ्यापाशी तोंडपुजलेपणा, धोकेबाजी व फसवणूक करीत राहिले आहेत. जर तुमच्या पालनकर्त्याची ही इच्छा असती की ते असे करू नये तर त्यांनी कधीही केले नसते, म्हणून तुम्ही त्यांना त्यांच्या स्थितीत सोडून द्या की ते कुभांड रचीत राहतील. (हे सर्वकाही आम्ही त्यांना याचकरिता करू देत आहोत की) जे लोक परलोकावर श्रद्धा ठेवीत नाहीत त्यांची हृदये (या आकर्षक फसवणुकीकडे) आकर्षिली जावीत आणि त्याने ते प्रसन्न व्हावेत आणि त्या वाईट गोष्टींची कमाई करावी ज्यांची कमाई ते करू इच्छितात.[२९] - मग ज्याअर्थी वस्तुस्थिती अशी आहे तर काय मी अल्लाहखेरीज इतर कोणी निर्णय करणारा शोधावा? खरे पाहता त्याने तर सर्व तपशीलासहित तुमच्याकडे ग्रंथ अवतरला आहे?[३०] आणि ज्या लोकांना आम्ही (तुमच्या अगोदर) ग्रंथ दिला होता, त्यांना माहीत आहे की हा ग्रंथ तुमच्या पालनकर्त्याकडूनच सत्यानिशी अवतरला आहे. म्हणून तुम्ही शंका घेणाऱ्यांमध्ये सामील होऊ नका. तुमच्या पालनकर्त्याचे वचन सत्य व न्यायाच्या दृष्टीने परिपूर्ण आहे. कोणी त्याच्या आदेशांना बदलणारा नाही आणि तो सर्वकाही ऐकतो व जाणतो.

(१०९-११५)

आणि हे पैगंबर (स.), जर तुम्ही त्या लोकांतील बहुतेकांच्या सांगण्यानुसार वागू

**२८)** हे मुसलमानांना उद्देशून आहे. एखादी अशी निशाणी प्रकट व्हावी जेणेकरून त्यांच्या पथभ्रष्ट भावांनी सरळ मार्गावर यावे अशी ती अत्यंत बेचैन होऊन आकांक्षा करीत होते.

**२९)** आयत क्र. ११० ते ११३ पर्यंत जी गोष्ट फर्माविलेली आहे ती अशी की आपल्या मनोरथानुसार ज्या पद्धतीने झाडांना फळे येत असतात किंवा खुद्द माणसाच्या डोक्यावर केस येतात त्याच पद्धतीने मानवाला मार्गदर्शन प्रदान केले जावे. सर्वोच्च अल्लाहचा मानवासंबंधी असा नियम नाही. तर त्याने मानवाला जगात त्याची परीक्षा घेण्यासाठी निर्माण केले आहे. त्याला परीक्षेच्या हेतूनेच तो सरळ मार्गाकडे जाऊ इच्छितो की मार्गभ्रष्टतेकडे हे त्याच्या आखत्यारीत दिले आहे. जर तो स्वत:च मार्गभ्रष्ट होऊ इच्छित असेल तर अल्लाह आपल्या इच्छेनुसार बळजबरीने त्याला मार्गदर्शन करीत नाही.

**३०)** या वाक्यात संबोधक पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आहेत आणि संबोधन मुसलमानांना आहे.



लागला जे भूतलावर वास्तव्य करून आहेत, तर ते तुम्हाला अल्लाहच्या मार्गापासून भ्रष्ट करतील, ते तर फक्त कल्पनेच्या आधारे चालतात व तर्क लढवितात. खरे पाहता तुमचा पालनकर्ता अधिक चांगल्याप्रकारे जाणतो की कोण त्याच्या मार्गापासून हटला आहे आणि कोण सन्मार्गावर आहे. (११६-११७)

मग जर तुम्ही लोक अल्लाहच्या वचनांवर श्रद्धा ठेवता तर ज्या जनावरावर अल्लाहचे नाव घेतले गेले आहे त्याचे मांस खा. ज्यावर अल्लाहचा नामोच्चार झाला असेल तुम्ही ती वस्तू का खाऊ नये? वस्तुत: ज्या वस्तूंचा उपयोग अगदी नाइलाज झाल्याखेरीज इतर सर्व परिस्थितीत अल्लाहने निषिद्ध ठरविला आहे त्यांचा तपशील त्याने तुम्हाला दिला आहे. पुष्कळशा लोकांची परिस्थिती अशी आहे की ज्ञानाविना केवळ आपल्या इच्छेपोटी पथभ्रष्ट करणाऱ्या गोष्टी करतात. या मर्यादा ओलांडणाऱ्यांना तुमचा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणतो. तुम्ही उघड गुन्ह्यापासूनही अलिप्त राहा आणि गुप्त गुन्ह्यापासूनसुद्धा, जे लोक पापकर्मे करतात ते आपल्या या कर्माचा मोबदला अवश्य प्राप्त करतील. आणि जे जनावर अल्लाहचे नाव घेऊन कापले गेले नसेल त्याचे मांस खाऊ नका, असे करणे अवज्ञा होय. शैतान आपल्या सोबत्यांच्या मनात शंका व आक्षेप भरवितात ते याकरिता की त्यांनी तुमच्याशी भांडण करावे, परंतु जर तुम्ही त्याची आज्ञा मानली तर निश्चितच तुम्ही अनेकेश्वरवादी आहात. (११८-१२१)

तो मनुष्य जो अगोदर मृत होता मग आम्ही त्याला जीवन दिले आणि त्याला प्रकाश प्रदान केला ज्याच्या उजेडात तो लोकांमध्ये जीवनाची वाटचाल करतो, तो त्या माणसासारखा होऊ शकतो काय जो अंध:कारात पडलेला असेल आणि कोणत्याही प्रकारे त्यातून बाहेर पडत नसेल?[३१] अश्रद्धावंतांकरिता तर त्यांची कृत्ये अशाचप्रकारे आकर्षक बनविण्यात आली आहेत, आणि अशाचप्रकारे आम्ही प्रत्येक वस्तीत तिच्या मोठमोठ्या अपराध्यांना गुंतविले आहे की तेथे त्यांनी आपल्या कुटिल नीतीचे जाळे पसरवावे. खरे पाहता ते आपल्या कुटिलतेच्या जाळ्यांत स्वत:च गुरफटतात, परंतु त्यांना त्याचे भान नाही. (१२२-१२३)

जेव्हा त्यांच्यासमोर एखादे वचन येते तेव्हा ते सांगतात, ''आम्ही मान्य करणार नाही जोपर्यंत ती गोष्ट स्वत: आम्हाला दिली जात नाही जी अल्लाहच्या प्रेषितांना दिली गेली आहे.'' अल्लाह अधिक चांगल्या प्रकारे जाणतो की आपल्या प्रेषितत्वाचे काम कोणाकडून घ्यावे व कसे घ्यावे? जवळच आहे तो काळ, जेव्हा या अपराधींना आपल्या

**३१)** ज्या माणसाला माणुसकीचा विवेक लाभला आहे, जो ज्ञानाच्या प्रकाशात वक्र मार्गाच्या दरम्यान सत्याचा सरळमार्ग स्पष्टपणे पाहात आहे असा मनुष्य त्या अविवेकी लोकांसमान जगात जीवन व्यतीत करील जे नादानीच्या व अज्ञानाच्या अंधकारांत भटकत फिरत आहेत, अशी अपेक्षा तुम्ही कसे करू शकता बरे?

कुटिलतेपायी अल्लाहपाशी, अपमान आणि कठोर यातनेला सामोरे जावे लागेल. (१२४)

म्हणून (ही वस्तुस्थिती आहे की) ज्याला अल्लाह मार्गदर्शन प्रदान करण्याची इच्छा करतो त्याचे मन इस्लामकरिता मोकळे करतो आणि ज्याला पथभ्रष्टतेत गुरफटविण्याची इच्छा करतो त्याच्या मनाला संकुचित बनवितो आणि अशा प्रकारे बनवितो की (इस्लामची कल्पना करताच) त्याला असे वाटू लागते जणू त्याचा आत्मा वर आकाशाकडे गमन करत आहे. (अशा प्रकारे अल्लाह सत्यापासून पलायन व त्याच्या द्वेषाची) अपवित्रता त्या लोकांवर प्रस्थापित करतो जे श्रद्धा ठेवीत नाहीत.[३२] वास्तविकत: हा मार्ग तुमच्या पालनकर्त्याचा सरळमार्ग आहे आणि त्याची चिन्हे त्या लोकांकरिता स्पष्ट केली आहेत जे उपदेश आत्मसात करतात. त्यांच्या पालनकर्त्याजवळ त्यांच्याकरिता शांतीचे निवासस्थान आहे आणि तो त्यांचा वाली आहे, त्या उचित कार्यप्रणालीमुळे जी त्यांनी अंगिकारली. (१२५-१२७)

ज्या दिवशी अल्लाह या सर्वांना वेढून एकत्र करील त्या दिवशी तो जिन (जिनरूपी शैतान) यांना संबोधून फर्मावील, ''हे जिनसमुदाय! तुम्ही तर मानवजातीचा खूपच उपयोग करून घेतला,'' मानवांपैकी जे त्यांचे सोबती होते ते म्हणतील, ''हे पालनकर्त्या, आम्हापैकी प्रत्येकाने एकमेकांचा खूपच उपयोग करून घेतला आणि आम्ही त्या घटकेपर्यंत येऊन पोहचलो आहोत जी तू आम्हासाठी निश्चित केली होती.'' अल्लाह फर्मावील, ''बरे तर अग्नी तुमचे निवासस्थान आहे, त्यांत तुम्ही सदैव राहाल.'' यापासून तेच लोक वाचतील ज्यांना अल्लाह वाचवू इच्छील, नि:संशय तुमचा पालनकर्ता बुद्धिमान व सर्वज्ञ आहे. पहा, अशा प्रकारे आम्ही (परलोकात) अत्याचाऱ्यांना एकमेकाचे सोबती बनवू, हे त्या कर्मामुळे जे ते (जगात एक दुसऱ्याच्या सहकार्याने) करीत होते. (त्याप्रसंगी अल्लाह त्यांना हेदेखील विचारील की) ''हे जिन्न व मानवसमुदाय! काय तुमच्यापाशी स्वत: तुमच्यापैकी असे प्रेषित आले नव्हते जे तुम्हाला माझी संकेतवचने ऐकवीत होते आणि या दिवसाच्या परिणामाचे भय दाखवीत होते.'' ते म्हणतील, ''होय, आम्ही आमच्याविरूद्ध स्वत:च ग्वाही देत आहोत.'' आज ऐहिक जीवनाने या लोकांना फसविले आहे, परंतु त्यावेळेस ते स्वत: आपल्याविरूद्ध ग्वाही देतील की ते अश्रद्ध होते (ही साक्ष त्यांच्याकडून या कारणास्तव घेतली जाईल की हे सिद्ध व्हावे की) तुमचा पालनकर्ता वस्त्यांना अत्याचाराने नष्ट करणारा नव्हता जेव्हा त्यांचे निवासी वास्तवतेपासून अनभिज्ञ असावेत. (१२८-१३१)

**३२)** या वाक्याने ही गोष्ट स्पष्ट झाली की जे लोक ईमान आणत नाहीत अल्लाह त्यांचे उर इस्लामसाठी संकुचित करतो व त्यांना मार्गदर्शन प्रदान करण्याची इच्छा करीत नाही.



प्रत्येक माणसाचा दर्जा त्याच्या कर्मानुसार आहे आणि तुमचा पालनकर्ता लोकांच्या कर्मापासून गाफील नाही. तुमचा पालनकर्ता निरपेक्ष आहे आणि त्याची अनुकंपा मोठी आहे. जर तो इच्छील तर तुम्हाला पदच्युत करील व तुमच्या जागी इतर ज्यांची इच्छील त्या लोकांची नियुक्ती करील, ज्याप्रमाणे त्याने तुम्हाला इतर काही लोकांच्या वंशातून उभे केले. तुम्हाला ज्या गोष्टीचे वचन दिले जात आहे ती निश्चितच अस्तित्वात येणार आहे आणि तुम्ही अल्लाहला विवश करण्याचे सामर्थ्य बाळगत नाही. हे पैगंबर (स.), सांगून टाका की लोकहो, तुम्ही आपल्या जागी कर्म करीत राहा आणि मीसुद्धा आपल्या जागी कर्म करीत आहे. लवकरच तुम्हाला माहीत पडेल की शेवट कोणाकरिता उत्तम ठरणार आहे. ही वस्तुस्थिती आहे की अत्याचारी केव्हाही सफल होऊ शकत नाही. (१३२-१३५)

ज्या लोकांनी अल्लाहकरिता स्वत: उत्पन्न केलेल्या शेती व जनावरांपैकी एक वाटा ठरविला आहे, आणि सांगतात की हा अल्लाहकरिता आहे, स्वकल्पनेने, आणि हे आम्ही ठरविलेल्या ईशभागीदाराकरिता. मग जो वाटा त्यांनी ठरविलेल्या भागीदाराकरिता आहे तो तर अल्लाहला पोहोचत नाही परंतु जो अल्लाहसाठी आहे तो त्यांच्या भागीदाराला पोहोचतो.[३३] किती वाईट निर्णय घेतात हे लोक. (१३६)

आणि अशाच प्रकारे कित्येक बहुदेववादींसाठी त्यांच्या भागीदारांनी (कल्पित

**३३)** ते लोक ईश्वराच्या नावाने जो हिस्सा काढीत असत तोदेखील नाना तऱ्हेच्या क्लृप्त्या करून कमी करत असत व कसेही करून आपल्या स्वरचित ईश भागीदारांचा वाटा वाढविण्याचा प्रयत्न करीत असत. उदा. जे धान्य अथवा जी फळे इ. ईश्वराच्या नावाने काढली जात असत त्यापैकी जर काही सांडले असेल तर ते 'भागीदारांच्या' वाट्यात सामील धरले जात असे व जर भागीदारांच्या वाट्यातून सांडले असले किंवा ईश्वराच्या वाट्यात मिळाले असले तर ते त्यांच्या वाट्यात परत टाकले जात असे. जर एखाद्या कारणाने भेट व नैवेद्याचे धान्य स्वत:च्या उपयोगात आणण्याची गरज वाटत असे तेव्हा ईश्वराचा वाटा खाऊन घेत असत परंतु 'भागीदारां'च्या वाट्याला हात लावताना भीत असत की एखाद्या वेळेस आपत्ती कोसळू नये.

देवांनी) त्यांच्या मुलांच्या हत्येस आकर्षक बनविले आहे.[३४] जेणेकरून त्यांना विनाशात टाकावे आणि त्यांच्याकरिता त्यांचा धर्म धूसर बनविला.[३५] जर अल्लाहने इच्छिले असते तर त्यांनी तसे केले नसते म्हणून यांना मोकळीक द्या की यांनी आपल्या कुभांड रचण्यात मग्न राहावे. (१३७)

सांगतात की ही जनावरे व ही शेते सुरक्षित आहेत, यांना फक्त तेच लोक खाऊ शकतात ज्यांना आम्ही खाऊ द्यावे. वस्तुत: हे निर्बंध त्यांचे स्वनिर्मित आहेत. मग काही जनावरे आहेत ज्यांच्यावर स्वार होणे व ओझे लादणे निषिद्ध केले गेले आहे आणि काही जनावरे आहेत की ज्यांच्यावर हे अल्लाहचे नामोच्चारण करीत नाहीत आणि हे सर्वकाही त्यांनी अल्लाहवर मिथ्या रचले आहे, लवकरच अल्लाह त्यांना यांच्या कुभांड रचण्याचा बदला देईल. (१३८)

आणि सांगतात की जे काही या जनावरांच्या पोटांत आहे हे पुरुषांकरिता वैध आहे आणि आमच्या स्त्रियांसाठी निषिद्ध आहे, परंतु जर ते मृत असेल तर ते खाण्यात दोघे सामील होऊ शकतात. या गोष्टी ज्या त्यांनी रचल्या आहेत त्याचे फळ अल्लाह त्यांना दिल्याशिवाय राहणार नाही, नि:संशय तो बुद्धिमान आहे व सर्व गोष्टींची त्याला खबर आहे. (१३९)

---

**३४)** या ठिकाणी 'भागीदार' हा शब्द एका दुसऱ्या अर्थाने प्रयुक्त झाला आहे. हा अर्थ अगोदरच्या अर्थापेक्षा वेगळा आहे. आयत क्र. १३६ मध्ये ज्यांना 'भागीदार' या शब्दाने संबोधिलेले होते ते त्यांचे ते उपास्य होते ज्यांची बरकत अथवा शिफारस किंवा मध्यस्थीला हे लोक समृद्धी मिळविण्यासाठी सहायक म्हणून समजत असत व देणगीबद्दल कृतज्ञतेस पूर्णपणे पात्र, ईश्वराच्या अधिकाराचे ते इतरांनाही वाटेकरी बनवीत असत. याउलट सदरहू आयतीत 'भागीदार'ने अभिप्रेत ज्यांनी संततीची हत्या करण्याचा पायंडा घातला होता, ती माणसे आणि या क्रूर प्रथेला त्या लोकांच्या दृष्टीत एक वैध व आवडते कृत्य बनविले होते ते शैतान होत. अरब लोकात संतती हत्येचे तीन प्रकार रूढ होते. त्या तिन्हीकडे कुरआनात संकेत आलेला आहे. (१) मुलींची हत्या, या विचाराने की कोणीही त्यांचा जावई असू नये, अथवा टोळ्याटोळ्यांच्या लढाईत त्या शत्रूंच्या हाती पडू नयेत अथवा एखाद्या अन्य कारणाने त्या त्यांच्या मानहानीस कारणीभूत ठरू नयेत. (२) लहान मुलांची हत्या, या विचाराने की त्यांच्या पालनपोषणाचा भार उचलला जाणार नाही व उदरनिर्वाहाच्या साधनांच्या कमतरतेमुळे ते असह्य ओझे होईल. (३) मुलांना आपल्या देवांच्या प्रसन्नतेसाठी बळी देणे.

**३५)** अज्ञानाच्या काळातील अरब लोक स्वत:ला हजरत इब्राहीम (अ.) व हजरत इस्माईल (अ.) यांचे अनुयायी म्हणत व समजत असत. म्हणून ज्या धर्माचे ते अनुकरण करीत आहेत तो ईश्वराला प्रिय असलेलाच धर्म आहे अशी त्यांची कल्पना होती परंतु त्या धर्मात नंतरच्या शतकात त्यांचे धार्मिक नेते, टोळींचे सरदार, समाजातील प्रतिष्ठित व वृद्ध आणि इतर निरनिराळे लोक श्रद्धा व कर्मकांड, आणि रूढीत वाढ करीत गेले, नंतरच्या पिढ्यांनी त्यांना मूळ धर्माचेच अंश मानले व अशा प्रकारे त्यांचा संपूर्ण धर्मच संशयास्पद बनला.



खचितच नुकसानीत आले ते लोक ज्यांनी आपल्या मुलांना अज्ञानाने व नादानपणे ठार केले आणि अल्लाहच्या दिलेल्या उपजीविकेला अल्लाहवर थोतांड रचून निषिद्ध मानले. निश्चितच ते मार्गभ्रष्ट झाले व कदापि ते सरळमार्ग प्राप्त करणाऱ्यांपैकी नव्हते. (१४०)

तो अल्लाहच आहे ज्याने तऱ्हेतऱ्हेच्या बागा व वेलीचे लतामंडपी उद्यान आणि पाणथळी (ओयासिस) निर्माण केल्या, शेती उगविली ज्यापासून विविध प्रकारची खाद्यान्ने प्राप्त होतात. त्याने जैतून (ऑलिव्ह) आणि डाळिंबाची झाडे निर्माण केली ज्यांची फळे बाह्यस्वरूपात सदृश्य बाळगतात आणि स्वादात विभिन्न असतात. खा, यांची फळे जेव्हा ही बहरतील आणि अल्लाहचा हक्क अदा करा जेव्हा त्याची कापणी कराल आणि मर्यादेचे उल्लंघन करू नका. अल्लाह मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्यांना पसंत करीत नाही. मग तोच तर आहे ज्याने, चतुष्पादांपैकी ती जनावरेदेखील निर्माण केली ज्यांच्याकडून स्वारी व ओझे वाहण्याची कामे घेतली जातात आणि ती जनावरेदेखील जे अन्न आणि वस्त्रांच्या उपयोगी पडतात.[३६] खा त्या वस्तूंतून ज्या अल्लाहने तुम्हाला प्रदान केल्या आहेत आणि शैतानचे अनुकरण करू नका की तो तुमचा उघड शत्रू आहे! या आठ नर व माद्या आहेत, दोन मेंढ्यांच्या जातीचे आणि दोन शेळ्यांच्या जातीचे. हे पैगंबर (स.), यांना विचारा की अल्लाहने त्यांचे नर निषिद्ध केलेले आहेत की माद्या अथवा ती कोकरे जे मेंढ्या व शेळ्यांच्या पोटात आहेत? ठीकठीक ज्ञानाच्या आधारे सांगा जर तुम्ही सत्यवचनी असाल. आणि अशाच तऱ्हेने दोन उंटाच्या जातीचे आणि दोन गाईच्या जातीचे. विचारा, यांचे नर अल्लाहने निषिद्ध केलेले आहेत अथवा माद्या की ती वासरे जी सांडणी व जी गाईच्या पोटात आहेत? तुम्ही त्यावेळी हजर होता काय जेव्हा अल्लाहने हे निषिद्ध केल्याची आज्ञा तुम्हाला दिली होती? मग त्या माणसापेक्षा मोठा अत्याचारी दुसरा कोण असेल ज्याने अल्लाहशी संबंधित खोटी गोष्ट सांगावी जेणेकरून ज्ञानाविनाच लोकांना चुकीचे मार्गदर्शन करावे. नि:संशय अल्लाह अशा अत्याचाऱ्यांना सन्मार्ग दाखवीत नसतो. (१४१-१४४)

हे पैगंबर (स.), यांना सांगा की जे दिव्यप्रकटन (वह्य) माझ्याजवळ आले आहे त्याच्यात तर मला कोणतीही वस्तू अशी आढळत नाही जी एखाद्या खाणाऱ्यासाठी निषिद्ध आहे. याखेरीज की ती मृत असेल किंवा सांडलेले रक्त असेल अथवा डुकराचे मांस जे अशुद्ध आहे अथवा असा मर्यादाभंग की अल्लाहशिवाय इतर कोणाच्या नावाने

---

**३६)** म्हणजे त्यांच्या कातडीपासून, त्यांच्या केसांपासून बिछायती बनविल्या जातात.

प्राणी बळी दिला गेला असेल.[३७] मग एखाद्याने नाइलाजाने (यांच्यातील एखादी वस्तू खाल्ली) आणि तो मर्यादाभंग करण्याची इच्छा बाळगत नसेल, आणि तो गरजेच्या मर्यादेचे उल्लंघन करीत नसेल तर नि:संशय तुमचा पालनकर्ता क्षमा करणारा व दया दाखविणारा आहे. आणि ज्या लोकांनी यहूदी धर्म अवलंबिला त्यांच्यासाठी आम्ही नखधारी सर्व प्राणी निषिद्ध केले होते आणि गाय व बकरीची चरबीदेखील या व्यतिरिक्त की त्यांच्या पाठींना व त्यांच्या आतड्यांना लागलेली असावी अथवा हाडांना लागलेली असेल. ही आम्ही त्यांना त्यांच्या दुर्वर्तनाची शिक्षा दिली होती.[३८] आणि हे जे काही आम्ही सांगत आहोत अगदी खरे सांगत आहोत. आणि आता जर त्यांनी तुम्हाला खोटे ठरविले तर त्यांना सांगा की तुमच्या पालनकर्त्याचे कृपाछत्र विशाल आहे आणि अपराध्यांकडून त्याचा प्रकोप परतविला जाऊ शकत नाही. (१४५-१४७)

हे अनेकेश्वरवादी लोक (तुमच्या या गोष्टीच्या उत्तरादाखल) जरूर सांगतील की, "जर अल्लाहने इच्छिले असते तर आम्हीही शिर्क (अनेकेश्वरवाद) केले नसते आणि आमच्या वाडवडिलांनी देखील, आणि आम्ही एखाद्या वस्तूला निषिद्ध देखील ठरविले नसते."[३९] अशाच खोट्या गोष्टी रचून रचून यांच्यापूर्वीच्या लोकांनी देखील सत्याला खोटे पाडले होते, इथपावेतो की सरतेशेवटी आमच्या प्रकोपाचा आस्वाद त्यांनी चाखला, यांना सांगा, "तुमच्याजवळ काही ज्ञान आहे काय जे तुम्ही आमच्यासमोर सादर करू शकाल? तुम्ही तर केवळ कल्पनाविलास करीत आहात, नुसते तर्क लढवीत आहात. मग सांगा, (तुमच्या या वादाविरूद्ध) "सत्याप्रत नेणारे, बोधप्रमाण तर अल्लाहपाशीच आहे,

---

**३७)** याचा अर्थ असा नाही की त्याशिवाय खाण्याची कोणतीही वस्तू इस्लामी शास्त्रात हराम नाही. तर अर्थ असा की ज्या वस्तू तुम्ही हराम ठरविल्या आहेत त्या हराम नव्हेत तर हराम या गोष्टी आहेत. स्पष्टीकरणासाठी पहा सूरह माइदा, टीप क्र. २, ९

**३८)** पहा सूरह आलेइम्रान आयत क्र. ९३ आणि सूरह निसा आयत क्र. १६०

**३९)** म्हणजे अपराधी आणि दुष्कर्मी लोक नेहमी जे निमित्त पुढे करीत राहिले आहेत तेच जुनाट निमित्त. तेही आपले अपराध आणि दुष्कर्मासाठी पुढे करतील की आमच्या बाबतीत अल्लाहची इच्छा हीच आहे की आम्ही अनेकेश्वरवादी राहावेत, व ज्या वस्तू आम्ही हराम ठरविलेल्या आहेत त्यांना हराम ठरवावे. एरव्ही तशी जर ईश्वराची इच्छा नसती की आम्ही तसे करावे तर आम्ही तशी कृत्ये करणे कसे शक्य होते बरे? म्हणून ज्याअर्थी आम्ही अल्लाहच्या मनोरथानुसार हे सर्वकाही करीत आहोत त्याअर्थी आम्ही बरोबर करीत आहोत. त्यात दोष असलाच तर तो आमच्यावर नव्हे, अल्लाहवर आहे. जे काही आम्ही करीत आहोत तसेच करणे आम्हाला भाग आहे कारण त्याशिवाय इतर काही करणे आमच्या आवाक्याबाहेरचे आहे.



नि:संशय जर अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना मार्गदर्शन केले असते."[४०]

(१४८-१४९)

यांना सांगा की, "आणा, आपले ते साक्षीदार जे या गोष्टीची साक्ष देतील की अल्लाहनेच या वस्तू निषिद्ध केल्या आहेत." मग जर त्यांनी (खोटी) साक्ष दिली तर तुम्ही त्यांच्याबरोबर ग्वाही देऊ नका,[४१] आणि त्यांच्या इच्छेचे मुळीच अनुसरण करू नका ज्यांनी आमचे संकेत खोटे ठरविले आहेत आणि जे मरणोत्तर जीवनाचा इन्कार करतात आणि जे इतरांना आपल्या पालनकर्त्यासमान ठरवितात. (१५०)

हे पैगंबर (स.), यांना सांगा की, "या, मी तुम्हाला ऐकवितो की तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यावर काय निर्बंध घातले आहेत.[४२] हे की त्याच्यासमवेत कुणालाही भागीदार बनवू नका आणि आई-वडिलांशी सद्वर्तन करा. आणि आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने ठार मारू नका, आम्ही तुम्हालादेखील उपजीविका देतो आणि

---

**४०)** म्हणजे तुम्ही स्वत:च्या नाइलाजापोटी हा जो युक्तिवाद करीत आहात की जर अल्लाहने इच्छिले असते तर आम्ही अनेकेश्वरवाद केला नसता, त्याने अर्थ पूर्णपणे व्यक्त होत नाही. आपले म्हणणे पूर्णपणे व्यक्त करू इच्छित असाल तर असे म्हणा की अल्लाहने इच्छिले असते तर आम्हा सर्वांना त्याने मार्गावर आणले असते. दुसऱ्या शब्दात तुम्ही स्वत:च्या निवडीने सरळ मार्गाचा अवलंब करण्यास तयार नाहीत तर ज्याप्रमाणे ईश्वराने फरिश्त्यांना जन्मजात सरळमार्गी बनविले होते, त्याचप्रमाणे तुम्हाला देखील बनविले असते, अशी तुमची इच्छा आहे. तेव्हा मानवासाठी ईश्वराची इच्छा जर अशीच असती तर जरूर तो तसे करू शकत होता यात शंकाच नाही परंतु त्याचे मनोरथ तसे नाही. म्हणून ज्या मार्गभ्रष्टतेला तुम्ही स्वत:साठी पसंत केले आहे, अल्लाहसुद्धा तुम्हाला त्यातच पडलेला राहू देईल.

**४१)** म्हणजे जर साक्ष देण्याच्या जबाबदारीची त्यांना जाण असेल आणि माणसाला जी गोष्ट माहीत असेल त्याचीच त्याने साक्ष दिली पाहिजे. याचे जर त्यांना भान असेल तर ते कदापि याची साक्ष देण्याचे धैर्य करणार नाहीत. परंतु जर हे लोक साक्ष देण्याच्या जबाबदारीच्या जाणिवेविनाच इतका धीटपणा दाखवू लागले की ईश्वराचे नाव घेऊन खोटी साक्ष देण्यातदेखील यांना संकोच वाटत नाही तर तुम्ही त्यांच्या त्या खोटारडेपणात त्यांचे सहकारी बनू नका.

**४२)** म्हणजे ज्यात तुम्ही अडकला आहात ते तुमच्या रबकडून घातलेले निर्णय नाहीत तर खरे निर्बंध हे आहेत.

त्यांनाही देतो व अश्लील गोष्टींच्या[४३] जवळपासदेखील फिरकू नका मग त्या उघड असोत अथवा गुपित, आणि कोणत्याही जीवाला ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले आहे ठार करू नका परंतु न्यायसंगत (असेल तर). या गोष्टी आहेत ज्यांचा आदेश त्याने तुम्हाला दिला आहे, कदाचित तुम्ही बुद्धीचा उपयोग कराल. आणि अनाथाच्या संपत्तीजवळ जाऊ नका, परंतु अशा मार्गाने जो योग्य असेल, येथपावेतो की तो प्रौढत्व गाठील. व वजनमापांत काटेकोर न्याय पाळा, आम्ही प्रत्येक माणसावर जबाबदारीचा तितकाच भार टाकतो जितका त्याच्या आवाक्यात आहे. आणि जेव्हा तुम्ही बोलाल तेव्हा न्यायोचित बोला मग ती गोष्ट आपल्या नातेवाईकांच्या बाबतीत का असेना व अल्लाहशी केलेल्या कराराची पूर्तता करा.[४४] या गोष्टीचे आदेश अल्लाहने तुम्हाला दिले आहेत कदाचित तुम्ही उपदेशाचा स्वीकार कराल. तसेच त्याचा आदेश असा आहे की हाच माझा सन्मार्ग आहे. म्हणून तुम्ही याच मार्गावर चला आणि इतर मार्गांवर चालू नका की ते त्याच्या मार्गापासून हटवून तुम्हाला परागंदा करतील, हाच आहे तो आदेश जो तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला दिला आहे, अधिक संभव आहे की, तुम्ही पथभ्रष्टतेपासून दूर राहाल. (१५१-१५३)

मग आम्ही मूसा (अ.) यांना ग्रंथ प्रदान केला होता जो सद्वर्तनाचा अंगिकार करणाऱ्या माणसांवर देणगीची परिपूर्तता व प्रत्येक आवश्यक गोष्टींचा तपशील तसेच पुरेपूर मार्गदर्शन व कृपा होता (आणि यासाठी बनीइस्त्राईलना दिला गेला होता की) कदाचित लोक आपल्या पालनकर्त्याच्या भेटीवर श्रद्धा ठेवतील.[४५] आणि अशाच प्रकारे हा ग्रंथ आम्ही अवतरला आहे, एक संपन्नता देणारा ग्रंथ. म्हणून तुम्ही याचे अनुसरण करा व अल्लाहच्या प्रकोपाला भिऊन वागा, जेणेकरून तुमच्यावर दया केली जाईल. आता तुम्ही असे सांगू शकणार नाही की ग्रंथ तर आमच्या पूर्वीच्या दोन समूहांना दिले गेले होते, आणि आम्हाला काहीच माहीत नव्हते की ते काय शिकत व शिकवित होते. आणि

४३) मूळ अरबी शब्द 'फवाहिश' (अश्लील गोष्टी) प्रयुक्त झाला आहे. ज्यांचा वाईटपणा अगदी स्पष्ट आहे, अशा सर्व कर्मांना हा शब्द लागू होतो. कुरआनात व्यभिचार, समलिंग भोग, नग्नता, खोटे आळ, कुभांड आणि पित्याच्या विवाहितेशी विवाह करणे या सर्वांना अश्लील कामे म्हणून गणले गेले आहे. हदीसींत चोरी, मद्यपान आणि भिक्षा मागणे यांना अश्लील कर्मांपैकीच असल्याचे सांगितलेले आहे. त्याचप्रमाणे इतर सर्व निर्लज्ज कामेसुद्धा अश्लील गोष्टीत समाविष्ट आहेत. ईश्वरी आदेश असा आहे की अशा प्रकारची सर्व कृत्ये उघडपणेही केली जाऊ नयेत व लपून छपून देखील केली जाऊ नयेत.

४४) 'अल्लाहशी करार'ने अभिप्रेत तो करार होय जो मानव आणि ईश्वर तसेच माणसामाणसादरम्यान स्वाभाविकपणे त्यावेळी आपोआप केला जातो ज्यावेळी एक मनुष्य ईश्वराच्या भूमीवर एका मानवी समाजात जन्म घेतो.

४५) हेतू असा की लोकांनी स्वत:ला बेजबाबदार समजणे सोडून द्यावे, हे मान्य करावे की त्यांना आपल्या रबसमोर हजर होऊन एके दिवशी आपल्या कर्मांचा जाब द्यावा लागणार आहे.



तुम्ही आता हा बहाणा देखील करू शकत नाही की जर आमच्यावर ग्रंथ अवतरला गेला असता तर आम्ही त्यांच्यापेक्षा जास्त सरळमार्गी सिद्ध झालो असतो. तुमच्याकडे तुमच्या प्रभूकडून उज्ज्वल प्रमाण आणि मार्गदर्शन व कृपा आलेली आहे. आता त्याच्यापेक्षा मोठा अत्याचारी कोण असेल जो अल्लाहची वचने खोटी ठरवीत असेल, आणि त्यांच्यापासून पराङमुख होत असेल, जे लोक आमच्या संकेत वचनांपासून पराङमुख होतात त्यांना या तोंड फिरविण्याबद्दल आम्ही अत्यंत वाईट शिक्षा दिल्याशिवाय राहणार नाही. मग आता लोक काय या प्रतीक्षेत आहेत की दूतांनी त्यांच्यासमोर येऊन ठेपावे, अथवा तुमचा पालनकर्ता स्वत: यावा, किंवा तुमच्या पालनकर्त्याचे काही स्पष्ट संकेतचिन्हे[४६] प्रकट व्हावीत? ज्या दिवशी तुमच्या पालनकर्त्याचे काही विशिष्ट संकेत प्रकट होतील तेव्हा मग एखाद्या अशा माणसाला त्याची श्रद्धा काहीही लाभ पोहचविणार नाही ज्याने आधीपासून श्रद्धा ठेवली नसेल किंवा त्याने आपल्या श्रद्धेमध्ये कोणताही भलेपणा जर कमविला नसेल. हे पैगंबर (स.), यांना सांगा, की तुम्ही वाट पाहा, आम्ही देखील प्रतीक्षा करीत आहोत. (१५४-१५८)

ज्या लोकांनी आपल्या धर्माचे तुकडे-तुकडे करून टाकले आणि गटा-गटांत विभाजित झाले खचितच त्यांच्याशी तुमचा काडीमात्र संबंध नाही, त्यांचा मामला तर अल्लाहच्या स्वाधीन आहे, तोच त्यांना दाखवील की त्यांनी काय-काय केले आहे. जो अल्लाहपाशी सद्व्यवहार घेऊन येईल त्याच्यासाठी दसपट मोबदला आहे आणि जो दुर्व्यवहार घेऊन येईल त्याला तेवढाच मोबदला दिला जाईल जितका गुन्हा त्याने केला असेल आणि कोणावरही अत्याचार केला जाणार नाही. (१५९-१६०)

हे पैगंबर (स.), सांगा माझ्या पालनकर्त्याने खचितच मला सरळमार्ग दाखविला आहे, अगदी सरळ धर्म, ज्यांत कोणतीही वक्रता नाही, इब्राहीम (अ.) ची पद्धत जी त्याने एकाग्रतेने अवलंबिली होती आणि तो अनेकेश्वरवाद्यांपैकी नव्हता. सांगा, माझी नमाज, माझ्या तमाम उपासनेच्या पद्धती,[४७] माझे जीवन व मरण, सर्वकाही समस्त विश्वांचा स्वामी अल्लाहसाठीच आहे, ज्याचा कोणीही भागीदार नाही. अशीच मला आज्ञा दिली गेली आहे आणि सर्वप्रथम आज्ञापालनात मान तुकविणारा मीच आहे. सांगा, मी अल्लाहशिवाय एखादा दुसरा पालनकर्ता शोधावा काय, वास्तविक तोच प्रत्येक वस्तूचा पालनकर्ता आहे? प्रत्येक व्यक्ती जे काही कमविते त्याला जबाबदार ती स्वत:च आहे,

४६) म्हणजे कयामतची लक्षणे, अथवा प्रकोप, अथवा अन्य एखादी अशी निशाणी जेणेकरून वस्तुस्थितीचे पूर्णपणे अनावरण होणे व ती प्रकट झाल्यानंतर परीक्षण व अजमावणीचा कोणताच प्रश्न शिल्लक राहू नये.

४७) मूळ अरबी शब्द 'नुसूक' प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ कुर्बानी असाही होतो आणि भक्तीच्या इतर सर्व प्रकारांवरही तो लागू होतो.

कोणीही ओझे उचलणारा दुसऱ्याचे ओझे उचलत नसतो,[४८] मग तुम्हा सर्वांना आपल्या पालनकर्त्या-कडे परतावयाचे आहे, त्यावेळी तो तुमच्यातील मतभेदांची वास्तवता तुमच्यावर प्रकट करील. तोच आहे ज्याने तुम्हाला भुतलावरील खलीफा (नायब) बनविला आणि तुमच्यापैकी काहींना काहींच्या तुलनेत अधिक उच्च दर्जे बहाल केले की ज्यायोगे जे काही तुम्हाला दिले आहे त्यात तुमची परीक्षा घ्यावी, नि:संशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यातही अत्यंत सत्वर आहे आणि फार क्षमाशील व दया करणारा देखील आहे. (१६१-१६५)

**४८)** म्हणजे प्रत्येक इसम स्वत:च आपल्या कर्माला जबाबदार आहे, एकाच्या कर्माचे ओझे दुसऱ्यावर नाही.



# ७ सूरह अल् आअराफ

*(मक्काकालीन, वचने २०६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ लाऽऽम मीऽऽम सॉऽऽद हा एक ग्रंथ आहे जो तुमच्याकडे अवतरला गेला आहे. म्हणून हे पैगंबर (स.), तुमच्या मनात यासंबंधी कोणतीही शंका असू नये.[१] हा अवतरण्याचा उद्देश असा आहे की तुम्ही याच्याद्वारे (नकार देणाऱ्यांना) भय दाखववे आणि श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांना उपदेश करावा. (१-२)

लोकहो! जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर अवतरले गेले आहे त्याचे अनुसरण करा आणि आपल्या पालनकर्त्याला सोडून अन्य कोणाचे अनुकरण करू नका - पण तुम्ही उपदेश कमीच मानता. (३)

कित्येक वस्त्या आहेत ज्यांना आम्ही नष्ट केले. त्यांच्यावर आमचा प्रकोप अकस्मात रात्रीच्या वेळी कोसळला, अथवा दिवसाढवळ्या अशा समयी आला जेव्हा ते विश्रांती घेत होते. आणि जेव्हा आमचा प्रकोप त्यांच्यावर आला तेव्हा त्यांच्या तोंडात याशिवाय कोणताही उच्चार नव्हता की खरोखरच आम्ही अत्याचारी होतो. (४-५)

म्हणून खचितच हे होणार आहे की आम्ही त्या लोकांना जाब विचारावे ज्यांच्याकडे आम्ही प्रेषित पाठविले आहेत आणि प्रेषितांना देखील विचारू (की त्यांनी संदेश पोहचविण्याचे कर्तव्य कितपत पार पाडले व त्यांना त्याचे काय उत्तर मिळाले.) मग आम्ही स्वत: संपूर्ण ज्ञानानिशी पूर्ण अहवाल त्यांच्यासमोर मांडू, बरे आम्ही कोठे गायब तर नव्हतो ना. आणि वजन त्या दिवशी अगदी बरोबर असेल,[२] ज्यांचे पारडे जड असतील तेच सफलता प्राप्त करणारे असतील आणि ज्यांचे पारडे हलके असतील तेच स्वत:ला नुकसानीत टाकणारे असतील कारण ते आमच्या संकेतवचनांशी अत्याचारी वर्तन करीत राहिले होते. (६-९)

आम्ही तुम्हाला भूतलावर अधिकारांनिशी वसविले आणि तुमच्यासाठी तेथे जीवनसामुग्री उपलब्ध केली, परंतु तुम्ही लोक कमीच कृतज्ञता व्यक्त करता. (१०)

आम्ही तुमच्या निर्मितीचा प्रारंभ केला मग तुम्हाला स्वरूप दिले मग दूतांना

**१)** म्हणजे कसलाही संकोच आणि भीती न बाळगता याला लोकांप्रत पोहचवा. विरोधक कोणत्या प्रकारे याचे स्वागत करतील याची तुम्ही काहीच पर्वा करू नका.

**२)** म्हणजे त्या दिवशी ईश्वराच्या न्यायतुळेत सत्याशिवाय कुठलीही गोष्ट वजनी असणार नाही आणि वजनाशिवाय कोणतेही गोष्ट सत्य असणार नाही. ज्याच्याजवळ जितके सत्य असेल तितकाच तो वजनदार असेल, निर्णय जो काही लागेल तो वजनानुसारच लागेल. इतर कोणत्याही गोष्टीला तिळमात्र देखील महत्व दिले जाणार नाही.

सांगितले की आदमसमोर नतमस्तक व्हा (सजदा करा). या आज्ञेनुसार सर्व नतमस्तक झाले परंतु इब्लीस नतमस्तक होणाऱ्यांमध्ये सामील झाला नाही.[३] (११)

विचारले, "तुला कोणत्या गोष्टीने नतमस्तक होण्यापासून रोखले जेव्हा मी तुला आज्ञा दिली होती?" म्हणाला, "मी त्याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे. तू मला अग्निपासून निर्माण केले व त्याला मातीपासून." फर्माविले, "असे होय, तर, तू येथून खाली उतर, तुला अधिकार नाही येथे मोठेपणाचा अहंकार करावा. चालता हो, की वस्तुत: तू त्यांच्यापैकी आहेस जे स्वत: आपला अपमान इच्छितात."[४] तो म्हणाला, "मला त्या दिवसापर्यंत सवलत दे जेव्हा हे सर्व दुसऱ्यांदा उत्थापित केले जातील." फर्माविले, "तुला सवलत आहे." म्हणाला, "बरे तर, ज्या तऱ्हेने तू मला मार्गभ्रष्ट केले आहेस, मीसुद्धा आता तुझ्या सरळ मार्गावर असलेल्या या मानवाच्या पाळतीवर राहीन. पुढून आणि मागून, उजवीकडून व डावीकडून चोहोबाजूंनी मी त्यांना घेरेन आणि तुला त्यांच्यापैकी बहुतेक कृतज्ञ आढळणार नाहीत फर्माविले, "चालता हो येथून, अपमानित व धि:कारित. विश्वास ठेव की यांच्यापैकी जे तुझे अनुकरण करतील तुझ्यासहित त्या सर्वांनिशी नरक भरून टाकीन. आणि हे आदम तू आणि तुझी पत्नी दोघे या स्वर्गामध्ये राहा, येथे जी वस्तू खाण्याची तुमची इच्छा असेल ती खा, परंतु त्या वृक्षाच्याजवळ फिरकू नका, नाहीतर अत्याचाऱ्यांपैकी व्हाल." (१२-१९)

मग शैतानने त्यांना बहकविले जेणेकरून त्यांचे गुप्तांग जे एकमेकापासून लपविले गेले होते त्यांच्यासमोर उघड झाले. त्याने त्या दोघांना सांगितले, "तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला या वृक्षाची जी मनाई केली आहे त्याचे कारण याशिवाय काहीही नाही की एखाद्या वेळेस तुम्ही देवदूत बनू नये. अथवा तुम्हाला अमरत्व लाभू नये." आणि त्याने शपथ घेऊन त्यांना सांगितले की मी तुमचा खरा हितचिंतक आहे. अशा प्रकारे त्या दोघांना फसवून त्याने हळूहळू आपल्या वळणावर आणले. सरतेशेवटी जेव्हा त्यांनी त्या वृक्षाचा आस्वाद घेतला तेव्हा त्यांचे गुप्तांग एकमेकासमोर उघडे झाले आणि ते आपल्या

---

३) याचा अर्थ असा नव्हे की 'इब्लीस' (शैतान) फरिश्त्यांपैकी होता. वास्तविकपणे ज्याअर्थी पृथ्वीची व्यवस्था पाहणाऱ्या फरिश्त्यांना आदम (अ.) पुढे सजदा करण्याची आज्ञा दिली गेली त्याअर्थी फरिश्त्यांच्या व्यवस्थापनेखाली असलेल्या सर्व निर्मितीने देखील आदमच्या आज्ञांकित व्हावे असा त्याचा अर्थ होता. त्या निर्मितीपैकी केवळ इब्लीसने पुढे होऊन तो आदमसमोर सजदा करणार नसल्याची घोषणा केली.

४) मूळ अरबी शब्द 'सागरीन' प्रयुक्त झाला आहे. अरबी भाषेत 'सागर'चा अर्थ ज्याने स्वत: होऊन अपमान, आणि खालचा दर्जा पत्करला आहे, असा होतो. म्हणून सर्वोच्च अल्लाहच्या फर्माविण्याचा अर्थ असा होता की दास आणि निर्मिती असतानादेखील तू आपल्या श्रेष्ठत्वाच्या दर्पात यावा, याचा अर्थ असा की तू स्वत:च अपमानित होऊ इच्छित आहेस.



गुप्तांगाना स्वर्गातील पानांनी झाकू लागले. तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने त्यांना पुकारले, "काय मी तुम्हाला त्या वृक्षापासून रोखले नव्हते आणि म्हटले नव्हते की शैतान तुमचा उघड शत्रू आहे?" दोघे बोलते झाले, "हे पालनकर्त्या, आम्ही स्वत:वर अत्याचार केला, जर आता तू आम्हाला क्षमा केली नाहीस व दया केली नाहीस तर खचितच आम्ही तोट्यात राहू."[५] फर्माविले, "चालते व्हा, तुम्ही एकमेकांचे शत्रू आहात, आणि तुमच्यासाठी एका विशिष्ट मुदतीपर्यंत पृथ्वीवरच निवासस्थान व जीवनसामग्री आहे." आणि फर्माविले, "तेथेच तुम्हाला जगणे व तेथेच मरणे आहे आणि त्यातूनच तुम्हाला सरतेशेवटी काढले जाईल." (२०-२५)

हे आदमच्या मुलांनो, आम्ही तुमच्यासाठी पोशाख उतरविला आहे की तुमच्या शरीरातील लज्जा-अंगांना झाकावे. आणि तुमच्यासाठी शरीर रक्षण व भूषणाचे साधन देखील व्हावे, आणि सर्वोत्तम पोशाख ईशकोपाच्या भयाचा पोशाख होय. हा अल्लाहच्या संकेतापैकी एक संकेत आहे कदाचित लोकांनी यापासून धडा घ्यावा. हे आदमच्या मुलांनो, असे होऊ नये की शैतानाने तुम्हाला पुन्हा तसेच उपद्रवामध्ये गुंतवावे ज्याप्रमाणे त्याने तुमच्या आई-वडिलांना स्वर्गामधून काढविले होते आणि त्यांचे पोशाख त्यांच्यावरून उतरविले होते जेणेकरून त्यांचे गुप्तांग एकमेकासमोर उघडे करावेत. तो आणि त्याचे सोबती तुम्हाला अशा ठिकाणाहून पाहतात की जेथून तुम्ही त्यांना पाहू शकत नाही. या शैतानांना आम्ही अश्रद्ध लोकांचा मित्र बनविले आहे. (२६-२७)

हे लोक जेव्हा एखादे अश्लिल कृत्य करतात तेव्हा ते म्हणतात की आमचे वाड-वडील याच रीतीवर आम्हाला आढळले आहेत आणि अल्लाहनेच आम्हाला असे

---

५) यावरून असे कळले की माणसात लज्जेची भावना एक स्वाभविक वृत्ती आहे. आपल्या शरीराचे विशिष्ट अंग दुसऱ्यांसमोर उघडे करताना स्वभावत: माणसाला लज्जा वाटत असते. ती त्या स्वाभाविक वृत्तीचे आद्य प्रकटरूप आहे. म्हणूनच मानवाला, त्याच्या प्राकृतिक स्वभावाच्या सरळ मार्गापासून हटविण्यासाठी शैतानाने जो पहिला डाव खेळला तो असा की मानवाच्या लज्जाशीलतेवर आघात करावा आणि नग्नतेच्या मार्गाने त्याच्यासाठी अश्लीलतेची दारे उघडावीत व त्याला वैषयिक बाबतीत कुमार्गी बनवावे. तसेच यावरून असेही कळले की उच्चस्थितीत पोहचण्याची मानवात एक स्वाभाविक तृष्णा अस्तित्वात आहे. म्हणून शैतानाला त्याच्यासमोर हितचिंतकाच्या रूपात यावे लागले व मी तुला अधिक उच्चस्थितीकडे नेऊ इच्छितो म्हणून सांगावे लागले. त्याचप्रमाणे यावरून असेही कळले की शैतानाविरूद्ध मानवाला श्रेष्ठ बनविणारा जो त्याचा प्रमुख गुण आहे तो म्हणजे त्याच्या हातून एखादा अपराध घडल्यास त्याने लज्जित होऊन अल्लाहकडे क्षमायाचना करावी. याउलट शैतानाला ज्या गोष्टीने अपमानित केले ती अशी की अपराध करून तो सर्वोच्च अल्लाहच्याविरूद्ध ताठ बनला आणि बंडखोरी करण्यास तयार झाला.

करण्याची आज्ञा दिली आहे.[६] त्यांना सांगा की अल्लाह अश्लिलतेची आज्ञा कदापि देत नसतो. काय तुम्ही अल्लाहचे नाव घेऊन त्या गोष्टी सांगता ज्यांच्यासंबंधी तुम्हाला ज्ञान नाही की त्या अल्लाहकडून आहेत? हे पैगंबर (स.), यांना सांगा की माझ्या पालनकर्त्याने तर सचोटी व न्यायाची आज्ञा दिली आहे. आणि त्याची आज्ञा तर अशी आहे की प्रत्येक उपासनेत आपली दिशा नीट ठेवा आणि त्याचे सच्चे भक्त होऊन त्यालाच पुकारा, ज्याप्रमाणे त्याने आता तुम्हाला निर्माण केले आहे तसेच तुम्ही पुन्हा निर्माण केले जाल. एका जमातीला तर त्याने सरळमार्ग दाखविला आहे पण दुसऱ्या जमातीवर तर मार्गभ्रष्टता चिकटून बसली आहे कारण त्यांनी अल्लाहऐवजी शैतानांना आपले पालक बनविले आहे व ते समजतात की आपण सरळ मार्गावर आहोत. (२८-३०)

हे आदमच्या मुलांनो, प्रत्येक उपासनेच्या वेळी पूर्ण, आकर्षक व स्वच्छ पोशाखात स्वत:ला शुचिर्भूत ठेवा.[७] आणि खा, प्या परंतु मर्यादांचे उल्लंघन करू नका, अल्लाह मर्यादेच्या बाहेर जाणाऱ्यांना पसंत करीत नाही. (३१)

हे पैगंबर (स.), यांना सांगा की कोणी अल्लाहच्या त्या भूषणाला अवैध करून टाकले ज्याला अल्लाहने आपल्या भक्तांसाठी निर्मिले होते आणि कोणी अल्लाहने प्रदान केलेल्या विशुद्ध वस्तूंना प्रतिबंध केला? सांगा, या साऱ्या वस्तू ऐहिक जीवनातसुद्धा श्रद्धावंतांसाठी होत आणि मरणोत्तर जीवनाच्या दिवशी तर खास त्यांच्यासाठीच असतील. अशाप्रकारे आम्ही आपल्या गोष्टी स्पष्टपणे मांडतो त्या लोकांसाठी ज्यांना ज्ञान आहे. (३२)

हे पैगंबर (स.), यांना सांगा की माझ्या पालनकर्त्याने ज्या वस्तू निषिद्ध केल्या आहेत त्या तर अशा आहेत, निर्लज्जपणाची कामे - मग ती उघड असोत अथवा गुप्त

६) अरब लोकांच्या नग्नावस्थेतील प्रदक्षिणेकडे संकेत आहे. त्यांच्यात पुष्कळ लोक 'हज'च्या प्रसंगी काबागृहाला नग्नावस्थेत प्रदक्षिणा घालीत असत. याबाबतीत त्यांच्या स्त्रिया त्यांच्या पुरुषापेक्षाही जास्त निर्लज्ज होत्या. त्यांच्या दृष्टीने हे एक धार्मिक कार्य होते व पुण्यकर्म समजून केले जात असे.

७) या ठिकाणी आभूषणाने अभिप्रेत परिपूर्ण पोषाख आहे. ईश्वराच्या उपासनेत उभे राहण्यासाठी माणसाने केवळ आपली लज्जास्थाने तेवढी झाकावी एवढेच पुरेसे नाही तर त्याचबरोबर आपल्या ऐपतीनुसार परिपूर्ण पोशाख करावा जेणेकरून त्याचे शरीरही झाकले जावे व ते भूषणावह देखील ठरावे हेसुद्धा जरूरीचे आहे. माणूस एखाद्या प्रतिष्ठित व्यक्तीची भेट घेण्यासाठी ज्याप्रमाणे चांगला पोशाख करतो त्याचप्रमाणे ईश्वराच्या उपासनेसाठी देखील चांगला पोशाख केला पाहिजे.



- आणि पाप[८] आणि सत्याच्या विरोधात अतिरेक[९] आणि अल्लाहबरोबर तुम्ही एखाद्या अशाला भागीदार कराल ज्याच्या संबंधात त्याने कोणतेही प्रमाण उतरविले नाही, आणि असे की अल्लाहच्या नावाने तुम्ही एखादी अशी गोष्ट सांगावी जिच्यासंबंधी तुम्हाला ज्ञान नसेल (की ती खरोखर त्यानेच फर्माविली आहे.) (३३)

प्रत्येक जनसमूहाकरिता एका निश्चित कालावधीचा काळ ठरलेला आहे. मग जेव्हा एखाद्या जनसमूहाचा कालावधी पूर्ण होतो तेव्हा एक क्षणभर देखील मागेपुढे होत नाही. (आणि ही गोष्ट अल्लाहने उत्पत्तीच्या प्रारंभीच स्पष्ट सांगून टाकली होती की) हे आदमच्या मुलांनो! लक्षात ठेवा, जर तुमच्यापाशी खुद्द तुमच्यापैकीच असे प्रेषित आले जे तुम्हाला माझी संकेतवचने ऐकवीत असतील, तर जो कोणी अवज्ञेपासून दूर राहील आणि आपल्या वर्तणुकीत सुधारणा घडवून आणील त्याच्यासाठी कोणतेही भय अथवा दु:खाचा प्रसंग नाही, आणि जे लोक आमची वचने खोटी ठरवतील आणि त्यांच्या विरोधात दुर्वर्तन करतील तेच नरकवासी असतील जेथे ते सदैव राहतील. त्याहून मोठा अत्याचारी कोण असेल ज्याने निव्वळ खोट्या गोष्टी रचून अल्लाहशी त्याचा संबंध जोडला अथवा अल्लाहच्या सत्य वचनांना खोटे लेखले? अशी माणसे आपल्या भाग्यलिखिताप्रमाणे आपला वाटा घेत राहतील[१०] इथपावेतो की ती घटका येऊन ठेपेल जेव्हा आमचे पाठविलेले दूत त्यांचे प्राणहरण करण्याकरिता पोहोचतील. त्यावेळेस ते त्यांना विचारतील की सांगा, "आता कोठे आहेत तुमचे आराध्य दैवत ज्यांचा तुम्ही अल्लाहच्या ऐवजी धावा करीत होता?" ते सांगतील, "ते सर्व आम्हापासून लोप पावले." ते स्वत: आपल्याविरूद्ध साक्ष देतील की खरोखरच आम्ही सत्य नाकारणारे होतो. अल्लाह फर्मावील, "जा, तुम्हीसुद्धा त्याच नरकामध्ये दाखल व्हा ज्यात तुमच्यापूर्वी होऊन गेलेले जिन्न व मानवसमूह दाखल झाले आहेत." प्रत्येक गट जेव्हा नरकात प्रवेश करील तेव्हा तो आपल्या पुढे गेलेल्या गटाचा धिक्कार करीत प्रवेश करील इथपावेतो की जेव्हा सर्व तेथे जमा होतील तेव्हा प्रत्येक नंतरचा गट आपल्या अगोदरच्या गटासंबंधी सांगेल की, हे पालनकर्त्या! हेच लोक होते ज्यांनी आम्हाला मार्गभ्रष्ट केले, म्हणून यांना नरकाची दुप्पट यातना दे. उत्तरादाखल फर्माविण्यात येईल, प्रत्येकासाठी

८) वास्तविकत: अरबी शब्द 'इसमुन' प्रयुक्त झाला आहे. त्याचा मूळ अर्थ कसूर, कमीपणा असा होतो. त्याने अभिप्रेत माणसाचे आपल्या रबच्या आज्ञापालनात कसूर करणे होय.

९) म्हणजे आपल्या ज्या मर्यादेपलीकडे जाऊन प्रवेश करण्याचा माणसाला हक्क प्राप्त नाही, अशा हद्दीत पाय ठेवणे होय.

१०) म्हणजे जगात त्यांच्या सवलतीचे जितके दिवस निश्चित आहेत तितके ते येथे राहतील आणि ज्या प्रकारचे वरकरणी चांगले वा वाईट जीवन व्यतीत करणे त्यांच्या भाग्यात आहे ते व्यतीत करतील.

दुप्पटच यातना आहेत परंतु तुम्ही जाणत नाही.[११] आणि पहिला गट दुसऱ्या गटाला सांगेल (जर आम्ही दोषास पात्र होतो) तर तुम्हाला आमच्यावर कोणते श्रेष्ठत्व प्राप्त होते, आता आपल्या कमाईचा परिणाम म्हणून प्रकोपाचा आस्वाद घ्या. (३४-३९)

खात्री बाळगा! ज्या लोकांनी आमची वचने खोटी ठरवली आणि त्यांच्या विरोधात शिरजोरी दाखविली आहे त्यांच्यासाठी आकाशाची दारे कदापि उघडली जाणार नाहीत. त्यांचा स्वर्गामध्ये प्रवेश तितकाच अशक्य आहे जितका सुईच्या छिद्रातून उंटाचे जाणे. अपराध्यांना आमच्यापाशी असाच बदला मिळत असतो. त्यांच्यासाठी नरकाचेच अंथरूण असेल व नरकाचेच पांघरूण असेल. हेच आहे फळ जे आम्ही अत्याचारींना देत असतो. याच्या उलट ज्या लोकांनी आमची वचने मान्य केली आहेत आणि सत्कृत्ये केली आहेत - आणि याबाबतीत आम्ही प्रत्येकाला त्याच्या ऐपतीप्रमाणेच जबाबदार ठरवीत असतो, हे स्वर्गात वास करणारे आहेत जेथे ते सदैव राहतील. त्यांच्या मनात एक दुसऱ्याच्याविरूद्ध जी मलीनता असेल ती आम्ही दूर करू. त्यांच्या खालून कालवे वाहत असतील आणि ते सांगतील, "स्तुती फक्त अल्लाहकरिताच आहे ज्याने आम्हाला हा मार्ग दाखविला. आम्ही स्वत: मार्ग प्राप्त करू शकलो नसतो जर अल्लाहने आमचे मार्गदर्शन केले नसते. आमच्या पालनकर्त्याने पाठविलेले प्रेषित खरोखर सत्यच घेऊन आले होते." त्यावेळेस वाणी ऐकू येईल, "हा स्वर्ग ज्याचे तुम्ही वारस बनविले गेले आहात तो तुम्हाला त्या कृत्यांच्या मोबदल्यात मिळाला आहे, जी तुम्ही करीत राहिला होता." (४०-४३)

मग हे स्वर्गामधील लोक नरकामधील लोकांना हांक मारून म्हणतील, "आम्हाला ती वचने सत्य आढळली जी आमच्या पालनकर्त्याने आमच्याशी केली होती. तुम्हाला देखील ती वचने सत्य आढळली काय जी तुमच्या पालनकर्त्याने केली होती?" ते उत्तर देतील, "होय", तेव्हा एक हाक मारणारा त्यांच्या दरम्यान हाक देईल की, "अल्लाहकडून धिक्कार असो त्या अत्याचारी लोकांचा जे अल्लाहच्या मार्गापासून लोकांना प्रतिबंध करीत होते व त्या मार्गाला वक्र करू इच्छित होते आणि परलोक नाकारणारे होते." (४४-४५)

या दोन्ही गटांच्या दरम्यान एक आडोसा राहिला असेल ज्याच्या उंचवट्यावर (आअराफ) काही अन्य लोक असतील, हे प्रत्येकाला त्याच्या चेहऱ्याच्या अवलोकनाने ओळखतील आणि स्वर्गवासियांना हांक मारून सांगतील की, "तुमचे कल्याण असो." हे

**११)** म्हणजे एक यातना स्वत: मार्गभ्रष्टता पत्करण्याबद्दल आणि दुसरी यातना इतरांना मार्गभ्रष्ट करण्याबद्दलची. एक शिक्षा स्वत:च्या अपराधांची आणि दुसरी शिक्षा स्वत:च्या अपराधांची आणि दुसरी शिक्षा इतरांसाठी अपराधी वृत्तीचा वारसा मागे ठेवण्याची.



लोक स्वर्गामध्ये दाखल तर झाले नसतील परंतु त्याची आशा करीत असतील[१२] मग जेव्हा त्यांची दृष्टी नरकवासियांच्याकडे वळेल तेव्हा म्हणतील, "हे पालनकर्त्या! आम्हाला या अत्याचारी लोकांत सामील करू नकोस. मग हे आअराफ (उंचवट्या) चे लोक नरकाच्या काही मोठमोठ्या व्यक्तींना त्याच्या खाणाखुणावरून ओळखून हांक मारतील की, "पाहिले ना तुम्ही, आज तुमच्या झुंडीही तुम्हाला उपयोगी पडल्या नाहीत आणि ती साधनसामुग्रीदेखील तुम्हाला उपयुक्त ठरली नाही ज्यांना तुम्ही मोठ्या अभिमानास्पद वस्तू समजत होता. आणि हे स्वर्गवासी लोक तेच नाहीत काय ज्यांच्याविषयी तुम्ही शपथा घेऊन सांगत होता की यांना तर अल्लाह आपल्या कृपेतून काहीच देणार नाही? आज यानाच सांगण्यात आले की, दाखल व्हा स्वर्गामध्ये तुम्हासाठी भयही नाही व दु:ख देखील नाही." (४६-४९)

आणि नरकातील लोक स्वर्गातील लोकांना हांक मारतील की, थोडेसे पाणी आम्हावर ओता अथवा जी उपजीविका अल्लाहने तुम्हाला दिली आहे त्यातीलच काही तरी आमच्याकडे टाका. ते उत्तर देतील की, "अल्लाहने या दोन्ही वस्तू सत्य नाकारणाऱ्या त्या लोकांकरिता निषिद्ध केल्या आहेत, ज्यांनी आपल्या धर्माला खेळ व मनोरंजन बनविले होते आणि ज्यांना ऐहिक जीवनाने भुरळ पाडली होती. अल्लाह फर्मावितो की आज आम्हीसुद्धा त्यांना त्याचप्रमाणे विसरून जाऊ ज्याप्रमाणे ते या दिवसाच्या भेटीला विसरत राहिले व आमच्या वचनांना नाकारीत राहिले." (५०-५१)

आम्ही या लोकांपर्यंत एक असा ग्रंथ आणलेला आहे ज्याला आम्ही ज्ञानाच्या आधारे तपशीलवार बनविला आहे आणि जो श्रद्धावंतांसाठी मार्गदर्शन व कृपा आहे. आता काय हे लोक याच्याशिवाय इतर एखाद्या गोष्टीची वाट पाहात आहेत की तो शेवट समोर यावा ज्याची वार्ता हा ग्रंथ देत आहे? ज्या दिवशी तो शेवट प्रत्यक्षात येईल तेव्हा तेच लोक ज्यांनी पूर्वी त्याला दुर्लक्षिले होते म्हणतील, "खरोखर आमच्या पालनकर्त्याचे प्रेषित सत्य घेऊन आले होते, मग काय आता आम्हाला काही शिफारस करणारे मिळतील जे आमच्यासाठी शिफारस करतील? अथवा आम्हाला पुन्हा परत पाठविले जाईल जेणेकरून जे काही आम्ही पूर्वी करीत होतो त्याऐवजी आता दुसऱ्या पद्धतीने कार्य करून दाखववे" - त्यांनी स्वत:ला नुकसानीत घातले आणि ते सर्व असत्य जे त्यांनी रचले होते ते त्यांच्यापासून आज हरवले. (५२-५३)

**१२)** म्हणजे हे 'उंचवटेवाले' ते लोक असतील ज्यांच्या जीवनाच्या पुण्याईची व जमेची बाजूही इतकी बळकट असणार नाही की ते जन्नतीत दाखल होऊ शकावेत आणि उण्यांची बाजू देखील इतकी वाईट असणार नाही की ते नरकाग्नीत झोकले जावेत. म्हणून ते जन्नत आणि दोजखच्या दरम्यान एका सीमेवर राहतील आणि त्यांना जन्नत लाभावी म्हणून ते अल्लाहच्या मेहरबानीची आशा बाळगून असतील.

वस्तुत: तुमचा पालनकर्ता अल्लाहच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले,[१३] मग आपल्या सिंहासनावर (अर्श) विराजमान झाला.[१४] जो रात्रीला दिवसावर झाकतो व परत दिवस रात्रीच्या पाठीमागे धावत येतो. ज्याने सूर्य, चंद्र व तारे निर्माण केले, सर्व त्याच्या आदेशाच्या अधीन आहेत. सावध रहा त्याचीच सृष्टी आहे व त्याचाच हुकूम आहे.[१५] फार समृद्धशाली[१६] आहे अल्लाह, सर्व विश्वाचा मालक व पालनकर्ता. आपल्या पालनकर्त्याला हाक मारा विनवणी करून आणि मौनपणे. खचितच तो मर्यादांचे उल्लंघन करणाऱ्याला पसंत करीत नसतो सुधारणा झालेल्या पृथ्वीवर हिंसाचार माजवू नका जेव्हा त्यात सुधारणा झालेली आहे[१७] आणि ईश्वरालाच हाक मारा, भय आणि अभिलाषेने, खचितच अल्लाहची कृपा सदाचारी लोकांच्या निकट आहे. (५४-५६)

आणि तो अल्लाहच आहे जो वाऱ्यांना आपल्या दयेच्या पुढे पुढे शुभवार्ता घेऊन पाठवितो, मग जेव्हा ते पाण्याने भरलेले ढग वर उचलून घेतात तेव्हा तो त्यांना एखाद्या निर्जिव भूमीकडे घेऊन जातो आणि तेथे वृष्टी करून विविध प्रकारची फळे काढतो. पहा, अशाप्रकारे आम्ही मृतांना मृतावस्थेतून बाहेर काढतो. कदाचित तुम्ही या निरीक्षणापासून बोध घ्याल. जी जमीन चांगली असते ती आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने खूप फळे फुले उगविते आणि जी निकृष्ट असते त्यापासून निरुपयोगी पिकाशिवाय काहीच निघत नाही. अशाच प्रकारे आम्ही संकेत पुन्हा पुन्हा प्रस्तुत करतो त्या लोकांकरिता जे कृतज्ञ रहाणारे आहेत. (५७-५८)

आम्ही नूह (अ.) ला त्याच्या लोकसमूहाकडे पाठविले[१८] त्याने सांगितले, ''हे

**१३)** या ठिकाणी 'दिवस' हा शब्द एकतर जगातील लोक ज्याला दिवस म्हणतात त्याच २४ तासांच्या दिवसाच्या समानार्थी आहे किंवा हा शब्द 'काळ'च्या समानार्थी प्रयुक्त झाला आहे.

**१४)** ईश्वराचे राजसिंहासनावर विराजमान होण्याची सविस्तर कैफियत समजणे आमच्यासाठी अगदी अशक्य आहे. हे 'संदिग्ध' आहे. त्याचा अर्थ निश्चित केला जाऊ शकत नाही.

**१५)** म्हणजे ईश्वरानेच ही सृष्टी निर्माण केली आहे व तोच तिचा शासनाधिकारी आहे, आपल्या निर्मितीला त्याने इतरांच्या स्वाधीन केलेले नाही आणि एखाद्या निर्मितीने स्वावलंबी बनून हवे ते करावे असा हक्कही त्याने कोणाला दिलेला नाही.

**१६)** अल्लाहचे अत्यंत बरकतवान असण्याचा अर्थ असा की त्याच्या गुणांना आणि भलेपणाला काही सीमाच नाही. असीम व अमाप कल्याण त्याच्या अस्तित्वामुळे फैलावत आहे.

**१७)** म्हणजे शेकडो व हजारो वर्षांत ईश्वराच्या प्रेषितांच्या आणि मानवजातीच्या सुधारकांच्या प्रयत्नांने मानवी नीती व संस्कृतीत ज्या सुधारणा झाल्या आहेत, आपल्या कुकर्मांनी त्यांच्यात बिघाड माजवू नका.

**१८)** हजरत नूह (अ.) यांचा लोकसमूह हल्ली ज्याला आपण 'इराक' या नावाने ओळखतो त्या प्रदेशात राहात होता.



माझ्या जातीबांधवांनो! अल्लाहची भक्ती करा, त्याच्याव्यतिरिक्त तुमचा कोणीही ईश्वर नाही. मला तुमच्याबाबतीत एका भयंकर दिवसाच्या प्रकोपाचे भय वाटते.'' त्याच्या जनसमूहातील सरदारांनी उत्तर दिले, ''आम्ही तर असे पाहतो की तुम्ही उघड पथभ्रष्टतेत अडकले आहात.'' नूह (अ.) ने सांगितले, ''हे माझ्या जातीबांधवानो! मी कोणत्याच पथभ्रष्टतेत पडलेलो नाही, उलट मी सर्व जगांच्या पालनकर्त्याचा प्रेषित आहे. मी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याचे संदेश पोहोचवितो व मी तुमचा हितचिंतक आहे आणि मला अल्लाहकडून ते सर्वकाही माहीत आहे जे तुम्हाला माहीत नाही. काय तुम्हाला या गोष्टीचे आश्चर्य वाटले की तुमच्यापाशी खुद्द तुमच्याच जातीबांधवांपैकी एका माणसाद्वारे तुमच्या पालनकर्त्याकडून स्मरण आले, जेणेकरून तुम्हाला सावध करावे आणि तुम्ही दुर्वर्तनापासून वाचावे आणि तुम्हावर कृपा केली जावी?'' परंतु त्यांनी त्याला नाकारले. सरतेशेवटी आम्ही त्याला व त्याच्या सोबत्यांना एका नावेतून सुटका दिली आणि त्या लोकांना बुडविले ज्यांनी आमची संकेतवचने खोटी ठरविली होती. नि:संशय ते आंधळे लोक होते. (५९-६४)

आणि 'आद'कडे आम्ही त्यांचे बंधू हूद (अ.)[१९] ला पाठविले. त्याने सांगितले, ''हे माझ्या जातीबांधवांनो! अल्लाहची भक्ती करा. त्याच्याशिवाय तुमचा कोणी ईश्वर नाही. मग काय तुम्ही दुर्वर्तनापासून दूर राहणार नाही?'' त्याच्या समाजाच्या सरदारांनी, जे त्याच्या गोष्टी ऐकण्यास नकार देत होते, उत्तरादाखल सांगितले, ''आम्ही तर तुम्हाला मूर्ख समजतो आणि आम्हाला वाटते की तुम्ही खोटे आहात.'' त्याने सांगितले, ''हे जातीबांधवांनो! मी मूर्ख नाही याउलट मी जगांच्या पालनकर्त्याचा प्रेषित आहे तुम्हाला आपल्या पालनकर्त्याचे संदेश पोहोचवितो आणि तुमचा असा हितैषी आहे की ज्याच्यावर विश्वास ठेवला जाऊ शकतो. काय तुम्हाला या गोष्टीचे आश्चर्य वाटले की तुमच्यापाशी स्वत: तुमच्या स्वकीयांपैकी एका माणसाद्वारे तुमच्या पालनकर्त्याकडून 'स्मरण' आले, ज्याद्वारे त्याने तुम्हाला सावध करावे? विसरू नका की तुमच्या पालनकर्त्याने नूह प्रेषिताच्या लोकानंतर तुम्हाला त्याचे उत्तराधिकारी बनविले आणि तुम्हाला खूप धष्टपुष्ट केले, म्हणून अल्लाहच्या सामर्थ्याच्या चमत्काराची आठवण ठेवा,[२०] आशा आहे की तुम्ही यश संपादन कराल.'' त्यांनी उत्तर दिले, ''काय तू आमच्यापाशी याकरिता आला आहेस की आम्ही एकट्या अल्लाहचीच उपासना करावी आणि त्यांना सोडून द्यावे ज्यांची

**१९)** 'आद' लोकांचे निवासस्थान अहकाफचा प्रदेश होता. हे मुलुख हिजाज, यमन आणि यमामा यांच्या दरम्यान स्थित आहे. याच ठिकाणाहून प्रसार पावून या लोकांनी यमनची पश्चिम किनारपट्टी, उमान व हजरमूत्तपासून ते इराकपर्यंत आपल्या सामर्थ्याची छाप बसविली होती.

**२०)** मूळ अरबी शब्द 'आलाअ' प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ देणगी असाही होतो आणि सामर्थ्य, चमत्कार व स्तुत्य गुण असा देखील होतो.

उपासना आमचे पूर्वज करीत आले आहेत? घेऊन ये त्या यातना ज्यांची तू आम्हाला धमकी देतोस जर तू खरा असशील.'' त्याने सांगितले, ''तुमच्या पालनकर्त्याने तुमचा धिक्कार केला व त्याचा प्रकोप कोसळला. तुम्ही त्या नावांकरिता माझ्याशी भांडता ज्याचे नामकरण तुम्ही आणि तुमच्या पूर्वजांनी केले आहे,[२१] ज्यांच्यासाठी अल्लाहने कोणतेच प्रमाण अवतरित केले नाही? ठिक आहे! तुम्हीसुद्धा प्रतीक्षा करा व मी देखील तुमच्याबरोबर प्रतीक्षा करतो.'' सरतेशेवटी आम्ही आपल्या कृपेने हूद (अ.) आणि त्यांच्या सोबत्यांना वाचविले आणि त्या लोकांचे समूळ उच्चाटन केले ज्यांनी आमची संकेतवचने खोटी ठरविली होती आणि श्रद्धाळू नव्हते. (६५-७२)

आणि समूदकडे त्यांचे बंधू सालेह (अ.) ला[२२] पाठविले त्याने सांगितले, ''हे जातीबांधवांनो! अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणी ईश्वर नाही, तुमच्यापाशी तुमच्या पालनकर्त्याचे उघड प्रमाण आले आहे. ही अल्लाहची सांड तुमच्यासाठी एक संकेतचिन्ह स्वरूप आहे,[२३] म्हणून हिला मोकळी सोडा जेणेकरून ती अल्लाहच्या जमिनीत चरत राहील. तिला कोणत्याही वाईट हेतूने स्पर्श करू नका नाहीतर एक अत्यंत दु:खदायक यातना तुम्हाला गाठील. आठवा, तो प्रसंग जेव्हा अल्लाहने आद लोकानंतर तुम्हाला त्यांचे उत्तराधिकारी बनविले आणि तुम्हाला भूतलावर वास्तव्य प्रदान केले की आज तुम्ही त्याच्या समतल मैदानांवर वैभवशाली महाल बनविता आणि त्याच्या पर्वतांना कोरून घरे बनविता, म्हणून त्याच्या सामर्थ्याच्या चमत्कारापासून बेसावध बनू नका आणि भूतलांवर हिंसाचार माजवू नका.'' (७३-७४)

त्याच्या जातीच्या सरदारांनी जे गर्वाने मोठे झाले होते, दुबळ्या वर्गाच्या त्या लोकांना ज्यांनी श्रद्धा ठेवली होती - सांगितले, ''काय तुम्हाला खरोखरच माहीत आहे की

**२१)** म्हणजे तुम्ही कोणाला वृष्टीचा, कोणाला वाऱ्यांचा, कोणाला धनदौलतीचा तर कोणाला रोगराईचा रब-स्वामी म्हणता, वास्तविकपणे यापैकी कोणीही प्रत्यक्षात कोणत्याही गोष्टीचा रब नाही. ही सर्व तुम्ही ठेवलेली केवळ नावे आहेत. जो यांच्यासाठी भांडतो तो खरे म्हणजे काही नावासाठीच भांडतो, कसल्याही वास्तवतेसाठी नव्हे.

**२२)** 'समूद' या लोकसमूहाचे निवासस्थान हल्ली अलहिजर या नावाने संबोधिला जाणारा वायव्य अरबस्तानाचा प्रदेश होता. वर्तमान काळात मदाईने सालेह म्हणून मदीना आणि तबूक यांच्या दरम्यान एक ठिकाण आहे. हेच समूद लोकांचे केंद्रस्थान होते. प्राचीनकाळी यालाच हिजर म्हटले जात असे. अद्यापही तेथे समूद लोकांच्या काही इमारती अस्तित्वात आहेत. त्यांनी पर्वतराजी कोरून त्या बनविल्या होत्या.

**२३)** सदरहू कथेचा जो तपशील वेगवेगळ्या ठिकाणी कुरआनात सांगितलेला आहे त्यावरून असे कळते की समूदवाल्यांनी स्वत:च हजरत सालेह (अ.) यांच्याकडे एका अशा निशाणीची मागणी केली होती जी सालेह (अ.) हे अल्लाहकडून नियुक्त असल्याचे उघड प्रमाण ठरावी. त्याच्याच उत्तरादाखल हजरत सालेह (अ.) नी सांडणी प्रस्तुत केली होती.



सालेह (अ.) आपल्या पालनकर्त्याचा प्रेषित आहे?'' त्यांनी उत्तर दिले, ''नि:संशय ज्या संदेशासहित त्याला पाठविण्यात आले आहे, तो आम्ही मान्य करतो.'' त्या मोठेपणाच्या वल्गना करणाऱ्यांनी सांगितले, ''जी गोष्ट तुम्ही मान्य केली आहे आम्ही तिला नाकारणारे आहोत.'' (७५-७६)

मग त्यांनी त्या सांडणीला ठार मारले[२४] आणि अत्यंत उद्धटपणे आपल्या पालनकर्त्याची आज्ञा भंग केली. आणि सालेह (अ.) ना सांगितले की, ''जर तू प्रेषित आहेस तर तू सांगतोस त्या यातना आमच्यावर घेऊन ये.'' सरतेशेवटी एका हादरून सोडणाऱ्या संकटाने त्यांना गाठले आणि ते आपल्या घरांत उघडेच्या उघडेच पडून राहिले. आणि सालेह (अ.) हे सांगत त्यांच्या वस्तीतून बाहेर निघून गेला, ''हे माझ्या जाती बांधवांनो! मी आपल्या पालनकर्त्याचा संदेश तुम्हाला पोहोचविला आणि मी तुमचे खूप हित चिंतिले परंतु मी काय करू तुम्हाला आपले हितचिंतक पसंतच नाहीत.''

(७७-७९)

आणि लूत (अ.) ला आम्ही प्रेषित बनवून पाठविले, मग आठवा जेव्हा त्याने आपल्या लोकांना सांगितले,[२५] ''तुम्ही इतके निर्लज्ज झाला आहात की ती अश्लील कृत्ये करता जी तुमच्या अगोदर जगात कोणी केली नाहीत? तुम्ही स्त्रियांना सोडून पुरुषाकडून आपली कामवासना भागविता? वस्तुस्थिती अशी आहे, तुम्ही सर्वस्वी मर्यादेचे उल्लंघन करणारे लोक आहात.'' परंतु त्याच्या लोकांचे उत्तर याव्यतिरिक्त काही नव्हते की, ''हाकलून द्या या लोकांना आपल्या वस्त्यातून, मोठे आले हे पवित्र व सोवळे बनून'' सरतेशेवटी आम्ही लूत (अ.) व त्याच्या परिवाराला - फक्त त्याच्या पत्नीला वगळून जी मागे राहणाऱ्यांपैकी होती - वाचवून बाहेर काढले आणि त्या जनसमुदायावर वर्षाव केला एका वृष्टीचा,[२६] तेव्हा पहा त्या अपराध्यांचा शेवट काय झाला? (८०-८४)

**२४)** सूरह कमर आणि सूरह शम्स यांत सांगितल्याप्रमाणे सांडणीला जरी एकाच व्यक्तीने ठार मारले होते तरीपण, ज्याअर्थी संपूर्ण लोकसमूह त्या अपराध्याच्या पाठीशी होता व ती व्यक्ती वास्तविकपणे आपल्या लोकांच्या मर्जीचा हस्तक म्हणून होती त्याअर्थी आरोप संपूर्ण लोकसमूहावर ठेवला गेला आहे.

**२५)** हजरत लूत (अ.) हे हजरत इब्राहीम (अ.) यांचे पुतणे होते. ते ज्या लोकसमूहाचे प्रबोधन करण्यासाठी पाठविले गेले होते ते लोकसमूह, ज्या ठिकाणी हल्ली मृतसमुद्र पसरला आहे, त्या प्रदेशात राहात असे.

**२६)** वृष्टीने अभिप्रेत या ठिकाणी पावसाचा वर्षाव नसून दगडधोंड्यांची वृष्टी आहे. जसे की इतर ठिकाणी कुरआनात सांगितले आहे.

आणि मदयनवासियांकडे[२७] आम्ही त्यांचे बंधू शुऐब (अ.) याला पाठविले. त्याने सांगितले, "हे जातीबांधवांनो! अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणी ईश्वर नाही. तुमच्यापाशी तुमच्या पालनकर्त्याचे स्पष्ट मार्गदर्शन आले आहे, म्हणून वजन व मापे प्रामाणिकपणे करा, लोकानां त्यांच्या वस्तूत कमी देऊ नका आणि सुधारणा झालेल्या या भूतलावर हिंसाचार माजवू नका, यातच तुमचे भले आहे जर खरोखरीच तुम्ही श्रद्धावंत[२८] असाल. (आणि जीवनाच्या) प्रत्येक मार्गावर वाटमारे बनून बसू नका की तुम्ही लोकांना भयग्रस्त करावे आणि श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांना अल्लाहच्या मार्गापासून तुम्ही प्रतिबंध करावा आणि सरळमार्गाला वाकडे बनविण्यासाठी तुम्ही उत्सुक व्हावे. आठवा तो काळ जेव्हा तुम्ही थोडेसे होता. मग अल्लाहने तुमची संख्या वाढविली आणि डोळे उघडून पहा की जगात उपद्रव माजविणाऱ्या लोकांचा काय शेवट झाला. जर तुमच्यापैकी एक गट त्या शिकवणुकीवर, ज्याच्यासहित मला पाठविण्यात आले आहे, श्रद्धा ठेवीत आहे आणि दुसरा गट श्रद्धा ठेवीत नाही तर संयमाने पाहात राहा इथपावेतो की अल्लाहने आपल्या दरम्यान निर्णय करावा आणि तोच सर्वोत्तम न्यायनिवाडा करणारा आहे."

(८५-८७)

त्याच्या जनसमुदायातील सरदारांनी जे आपल्या मोठेपणाच्या दर्पात पडले होते, त्याला सांगितले की, "हे शुऐब! आम्ही तुला व त्या लोकांना ज्यांनी तुझ्यासमवेत श्रद्धा ठेवली, आपल्या वस्तीतून हाकलून लावू अन्यथा तुम्हा लोकांना आमच्या संप्रदायात परत यावे लागेल." शुऐबने उत्तर दिले, "काय बळजबरीने आम्हाला परतविले जाईल, आम्ही तयार नसलो तरी? आम्ही अल्लाहवर कुभांड रचणारे ठरू जर आम्ही तुमच्या संप्रदायात परत आलो जेव्हा अल्लाहने त्यापासून आमची सुटका केली आहे, आमच्यासाठी त्याकडे परतणे आता कोणत्याही प्रकारे शक्य नाही याव्यतिरिक्त की ईश्वराने तशी इच्छा केली. आमच्या पालनकर्त्याचे ज्ञान प्रत्येक वस्तूवर व्याप्त आहे. त्याच्यावरच आम्ही भिस्त ठेवली. हे पालनकर्त्या! आमच्या व आमच्या जातीबांधवांच्या दरम्यान ठीक-ठीक निर्णयकर आणि तूच सर्वोत्तम निर्णय करणारा आहेस." (८८-८९)

त्याच्या जनसमुदायातील सरदारांनी, ज्यांनी त्याच्या गोष्टी स्वीकार करण्यास नकार

२७) 'मदयन'चा मूळ प्रदेश 'हिजाज'च्या वायव्य दिशेस आणि पॅलेस्टाईनच्या दक्षिणेत तांबडा समुद्र व अकबा खाडीच्या किनारी स्थित होता परंतु सीना द्विपकल्पाच्या पूर्व किनारपट्टीवर देखील याचा काही भाग पसरला होता. हे मोठे व्यापार व्यवसायी लोक होते. प्राचीन काळी तांबड्या समुद्राच्या किनारी यमेनहून मक्का आणि यनकूअवरून सीरियापर्यंत जो व्पपारी राजमार्ग जात होता तसेच इराकपासून मिस्रकडे जो व्यापारी राजमार्ग जात असे, जेथे ते एकमेकांना मिळतात तेथेच या लोकांच्या वस्त्या होत्या.

२८) या वाक्यावरून हे लोक खुद्द ईमानाचा दावा करणारे होते, हे अगदी स्पष्ट होते.



दिला होता, एकमेकास सांगितले, "जर तुम्ही शुऐबचे अनुयायित्व स्वीकारले तर नष्ट व्हाल."[२९] परंतु घडले असे की एका थरकांप उडवून देणाऱ्या संकटाने त्यांना गाठले व ते आपल्या घरांत उघडेच्या उघडे पडलेले राहिले. ज्या लोकांनी शुऐब (अ.) ला खोटे ठरविले ते नाश पावले जणूकाही कधी त्या घरांत ते राहीलेच नव्हते. शुऐबला खोटे ठरविणारेच शेवटी नष्ट झाले व शुऐब (अ.) असे सांगून त्यांच्या वस्त्यांतून बाहेर पडला की, "हे जातीबांधवांनो! मी आपल्या पालनकर्त्याचे संदेश तुम्हाला पोहोचविले आणि तुमच्या हितचिंतकाचे कर्तव्य पार पाडले, आता मी सत्य नाकारणाऱ्या लोकांबद्दल खेद तरी कसा व्यक्त करणार?" (९०-९३)

कधी असे घडले नाही की आम्ही एखाद्या वस्तीत प्रेषित पाठविला आणि त्या वस्तीतील लोकांना त्या आधी अडचणीच्या व कठीण परिस्थितीत टाकले नाही जेणेकरून ते विनम्र व्हावेत. मग आम्ही त्यांच्या दुरावस्थेला सुस्थितीत परिवर्तित केले इतके की ते खूप संपन्न झाले व म्हणू लागले की, "आमच्या पूर्वजांवरदेखील बरे वाईट दिवस येतच राहिले आहेत." सरतेशेवटी आम्ही त्यांना अचानक पकडले त्यांना कळलेसुद्धा नाही.[३०] जर वस्त्यातील लोकांनी श्रद्धा ठेवली असती व त्यांनी ईशपरायणतेचे वर्तन अंगिकारले असते तर आम्ही त्यांच्यावर आकाश व पृथ्वीतील समृद्धीची दारे उघडली असती, पण त्यांनी तर हे खोटे ठरविले, म्हणून आम्ही त्यांच्या त्या वाईट कमाईच्या हिशेबात त्यांना धरले, जी ते गोळा करीत होते. मग काय वस्त्यातील लोक आता यापासून निर्भय झाले

२९) ही गोष्ट केवळ शुऐब (अ.) यांच्या लोकसमूहाच्या सरदारांपर्यंतच मर्यादित आहे असे नाही तर प्रत्येक काळात बिघडलेल्या लोकांना सत्य व सचोटी आणि प्रामाणिकपणाच्या आचरणात अशाच प्रकारचे धोके वाटले आहेत. प्रत्येक काळातील उपद्रवकारींची हीच कल्पना राहिली आहे की व्यापार व राजकारण आणि इतर व्यावहारिक मामले, लबाडी, बेईमानी व अनैतिकतेविना चालू शकत नाहीत. ईमानदारी अंगिकारणे म्हणजे आपले वाटोळे करणे होय.

३०) एक एक प्रेषित आणि एकेका लोकसमूहाचा मामला वेगवेगळा वर्णन केल्यानंतर प्रत्येक काळात प्रेषितांच्या नियुक्तीच्या प्रसंगी सर्वोच्च अल्लाहने जो व्यापक कायदा अवलंबिला आहे तो आता सांगितला जात आहे. तो व्यापक कायदा असा, जेव्हा एखाद्या लोकसमूहात एखादा प्रेषित पाठविला गेला तेव्हा प्रथम त्या लोकसमूहाला आपत्ती व संकटात टाकले गेले जेणेकरून त्यांचे कान उपदेशासाठी उघडावे व ते आपल्या ईश्वरासमोर विनम्रपणे झुकण्यासाठी तयार व्हावेत. मग जेव्हा अशा अनुकूल वातावरणात देखील सत्य स्वीकारण्याकडे त्यांची मने वळली नाहीत तेव्हा त्यांना सुबत्तेच्या उपद्रवात टाकले गेले व येथूनच त्यांच्या विनाशाला प्रारंभ झाला. प्रेषिताचे म्हणणे ऐकले नसतांना देखील जेव्हा त्यांच्यावर देणग्यांचा वर्षाव झाला तेव्हा आमची पकड करू शकावा असा कोणीच ईश्वर नाही असाच त्यांचा समज झाला आणि आमच्यासारखा इतर कोणीच नाही अशी हवा त्यांच्या डोक्यात सामावली. सरतेशेवटी या गोष्टीने त्यांना ईश्वरी प्रकोपात गुरफटून टाकले.

आहेत की आमची धाड कधी अचानक त्यांच्यावर रात्रीच्या वेळी पडणार नाही जेव्हा ते झोपलेले असतील? अथवा काय ते निश्चिंत झाले आहेत की आमचा जबरदस्त हात कधी आकस्मिक त्यांच्यावर दिवसा पडणार नाही जेव्हा ते खेळत असतील? काय हे लोक अल्लाहच्या कारवाईपासून निर्भय आहेत? खरे पाहता अल्लाहच्या कारवाया[३१] पासून तोच जनसमुदाय निर्भय बनतो ज्याचा विनाश होणार असेल. (९४-९९)

आणि काय त्या लोकांना जे पूर्वीच्या भूवासियानंतर पृथ्वीचे वारस बनतात, या वस्तूस्थितीने त्यांना कोणताही धडा दिलेला नाही की जर आम्ही इच्छिले तर त्यांच्या अपराधांबद्दल त्यांना पकडू शकतो? (पण ते उद्‌बोधक वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करतात). आम्ही त्यांच्या हृदयाला मोहरबंद करून टाकतो, ते काहीच ऐकू शकत नाही. हे जनसमूह ज्यांच्या हकीगती आम्ही तुम्हाला ऐकवीत आहोत (तुमच्यासमोर उदाहरणस्वरूप उपस्थित आहेत) त्यांचे प्रेषित त्यांच्याजवळ स्पष्ट संकेतचिन्हे घेऊन आले. पण ज्या गोष्टीला त्यांनी एकदा खोटे ठरविले होते परत त्यांना ते मानणारे नव्हते. पहा अशाप्रकारे आम्ही सत्याचा इन्कार करणाऱ्या लोकांची हृदये मोहरबंद करून टाकतो. आम्हाला त्यांच्यापैकी बहुतेकांमध्ये करारपालनाची आस्था आढळली नाही बहुतेकजण अवज्ञाकारीच आढळले. (१००-१०२)

मग त्या लोकसमुदायानंतर (त्यांचा उल्लेख वर करण्यात आला आहे) आम्ही मूसा (अ.) ला आपल्या संकेतवचनांसह फिरऔन[३२] आणि त्याच्या जनसमुदायाच्या सरदाराकडे पाठविले परंतु त्यांनी देखील आमच्या संकेत वचनांशी अन्याय केला, मग पहा, त्या उपद्रव माजविणाऱ्यांचा काय शेवट झाला. (१०३)

मूसा (अ.) ने सांगितले, ''हे फिरऔन! मी सृष्टीच्या स्वामीकडून पाठविला गेलो आहे. माझा पदाधिकार हाच आहे की अल्लाहचे नाव घेऊन कोणतीही गोष्ट सत्याशिवाय मी सांगू नये, मी तुम्हा लोकांपाशी तुमच्या पालनकर्त्याकडून नियुक्तीचे स्पष्ट प्रमाण घेऊन आलो आहे, म्हणून तू बनीइस्राईलना माझ्याबरोबर पाठव.'' फिरऔनने सांगितले, ''जर तू एकतरी संकेत आणला असशील आणि तू आपल्या दाव्यात खरा असशील तर ती

**३१)** मुळात 'मक्र' हा अरबी शब्द प्रयुक्त झाला आहे. अरबी भाषेत त्याचा अर्थ गुप्त उपाययोजना असा होतो. म्हणजे एखाद्या व्यक्तिविरूद्ध अशी चाल आखणे की जोपर्यंत त्यावर आघात होत नाही तोपर्यंत त्याला कळूच नये की त्याचे दुर्दैव ओढवणार आहे. तर वरकरणी परिस्थिती पाहताना त्याला असेच वाटावे की सर्वकाही उत्तम आहे.

**३२)** फिरऔन (फाराव) या शब्दाचा अर्थ 'सूर्य देवाचे वंशज' असा होतो. प्राचीन इजिप्तवासी 'सूर्याला' जो त्यांचा महादेव अथवा सर्वोच्च देव होता, 'रअ' असे म्हणत असत. फिरऔन त्याच्याशीच संबंधित होता. हे कोणा एका व्यक्तीचे नाव होते असे नाही तर मिस्राधिपतीची ही पदवी होती. जसे रशियन राज्याची झार आणि इराणी बादशाहांची किसरा अशी पदवी होती.



सादर कर.'' मूसा (अ.) ने आपली काठी खाली फेकताक्षणीच तो एक साक्षात अजगर होता. त्याने आपल्या खिशातून हात बाहेर काढला तर सर्व पाहणाऱ्यांसमोर तो चकाकत होता. याउपर फिरऔनच्या लोकसमूहाच्या सरदारांनी आपापसात सांगितले की, ''खरोखर हा मनुष्य तर मोठा कुशल जादूगार आहे. तुम्हाला तुमच्या भूमीपासून वंचित करू इच्छितो.[३३] आता सांगा तुमचे काय म्हणणे आहे? मग त्या सर्वांनी फिरऔनला सल्ला दिला की याला व याच्या भावाला प्रतीक्षेत ठेवा आणि सर्व शहरात दवंडी देणारे पाठवा की प्रत्येक कुशल जादूगाराला तुमच्यापाशी आणावे. अशाप्रकारे जादूगार फिरऔनपाशी आले. त्यांनी सांगितले, ''जर आम्ही वरचढ ठरलो तर आम्हाला त्याचा मोबदला अवश्य मिळेल ना?'' फिरऔनने उत्तर दिले, ''होय, आणि तुम्ही आमच्यापाशी निकटवर्ती ठराल.'' मग त्यांनी मूसा (अ.) ला सांगितले, ''तुम्ही टाकता की आम्ही टाकावे.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''तुम्हीच टाका.'' त्यांनी जेव्हा आपला इंद्रजाल टाकला तेव्हा लोकांचे डोळे चक्रावून गेले, हृदयांना भयग्रस्त करून सोडले आणि महाभयंकर जादू साकार केली. आम्ही मूसा (अ.) ला संकेत दिला, टाक आपली काठी. त्याने टाकल्याबरोबर क्षणार्धात त्यांची ती खोटी जादू काठीने गिळून टाकली. (१०४-११७)

अशाप्रकारे जे सत्य होते ते सत्य सिद्ध झाले आणि जे काही त्यांनी बनविले होते ते मिथ्या होऊन गेले. फिरऔन आणि त्याचे सोबती सामन्याच्या मैदानात पराजित झाले आणि (विजयी होण्याऐवजी) उलट अपमानित झाले आणि जादूगारांची अवस्था अशी झाली की जणूकाय एखाद्या गोष्टीने आतूनच त्यांना नतमस्तक होण्यास भाग पाडले, म्हणू लागले, ''आम्ही सकल जगांच्या पालनकर्त्याला मानले, त्या पालनकर्त्याला ज्याला मूसा

**३३)** मूसा (अ.) यांचा प्रेषितत्वाचा दावा आपल्याठायी स्वत:च असा अर्थ बाळगून होता की ते वास्तविकता संपूर्ण जीवनव्यवस्थेला सर्वांगनिशी बदलू इच्छित आहेत. त्यात अपरिहार्यपणे देशाची राजकीय व्यवस्था देखील समाविष्ट आहे, कारण सकल जगांच्या स्वामीचा प्रतिनिधी कदापि रयत व आज्ञांकित बनून राहण्यासाठी येत नसतो तर आज्ञापक आणि शासक बनण्यासाठीच येत असतो. एखाद्या काफिराच्या सत्ताधिकाराला मान्य करणे त्याच्या प्रेषितपदाच्या बिलकुल विपरित आहे. हेच कारण आहे की हजरत मूसा (अ.) च्या मुखाने प्रेषितत्वाचा दावा ऐकता क्षणीच फिरऔन व त्याचे राज्याधिकारी यांच्यासमोर राजकीय, आर्थिक आणि सांस्कृतिक क्रांतिचा धोका निर्माण झाला. या व्यक्तिची गोष्ट जर मान्यता पावली तर सत्ता आमच्या हातातून गेल्याशिवाय राहणार नाही, हे त्यांनी हेरले होते.

(अ.) आणि हारून (अ.) मानतात.''[३४] (११८-१२२)

फिरऔनने सांगितले, ''मी तुम्हाला परवानगी देण्यापूर्वी तुम्ही त्यांच्यावर श्रद्धा ठेवली? निश्चितच हा एखादा गुप्त कट होता जो तुम्ही या राजधानीत केला जेणेकरून त्याच्या स्वामींना सत्ताभ्रष्ट करावे. बरे तर याचा परिणाम आता तुम्हाला माहीत होईल. मी तुमचे हात पाय उलट बाजूंनी तोडीन त्यानंतर तुम्हा सर्वांना सुळावर चढवीन.'' (१२३-१२४)

त्यांनी उत्तर दिले, ''कोणत्याही परिस्थितीत आम्हाला आमच्या पालनकर्त्याकडेच परतावयाचे आहे. तू ज्या कारणासाठी आमच्यावर सूड उगवू इच्छितोस तो याचसाठी की आमच्या पालनकर्त्याचे संकेत जेव्हा आमच्या समोर आले तेव्हा आम्ही ते मानले. हे पालनकर्त्या, आमच्यावर संयमाचा वर्षाव कर. आणि आम्हाला जगांतून अशा स्थितींत उचल की आम्ही तुझे आज्ञाधारक असू.[३५] (१२५-१२६)

फिरऔनला त्याच्या जनसमुदायातील सरदारांनी सांगितले, ''काय तू मूसा (अ.) आणि त्याच्या जातीबांधवांना असेच सोडून देशील की देशात त्यांनी उपद्रव माजवावे आणि

**३४)** अशा प्रकारे सर्वोच्च अल्लाहने फिरऔनींचा डाव त्यांच्यावरच उलटवला. त्यानी साऱ्या देशाच्या निपुण जादूगारांना बोलावून सर्वांसमोर यासाठी प्रात्यक्षिक करविले होते की जेणेकरून हजरत मूसा (अ.) जादूगार असल्याची सामान्यजनांची खात्री व्हावी अथवा कमीतकमी त्याना साशंक तरी बनवावे. परंतु या सामन्यात पराजित झाल्यानंतर खुद्द त्यांनीच बोलविलेल्या कलानिपुणांनी एकमताने निर्णय दिला की हजरत मूसा (अ.) जी गोष्ट प्रस्तुत करीत आहेत ती जादू मुळीच नाही तर ज्याच्यासमोर कुठल्याही जादूचा जोर चालू शकत नाही, खचितच तो सकल जगांच्या स्वामीच्या सामर्थ्याचा चमत्कार आहे.

**३५)** फिरऔनने डाव उलटत असल्याचे पाहून शेवटची चाल अशी खेळली होती की त्या एकूण प्रकरणाला मूसा (अ.) आणि जादूगारांचे कट ठरवावे व नंतर जादूगारांना शारीरिक यातना व ठार मारण्याचा धाक दाखवून त्यांच्याकरवी आपल्या आरोपाचा कबुलीजबाब घ्यावा. परंतु ही चालसुद्धा उलटली. जादूगारांनी सर्व तऱ्हेच्या शिक्षेसाठी स्वत:ची तयारी दाखवून असे सिद्ध केले की त्यांचे मूसा (अ.) यांच्या सत्यतेवर ईमान आणणे हा एखाद्या कटाचा नव्हे तर प्रामाणिकपणे सत्य स्वीकारण्याचा परिणाम होता. या ठिकाणी ही गोष्ट सुद्धा पाहण्याजोगी आहे की काही क्षणातच ईमानने त्या जादूगारांच्या चारित्र्यात किती महान क्रांती घडवून आणली होती. कोठे थोड्याच वेळापूर्वी त्याच जादूगारांची नीचपणाची अवस्था अशी होती की आपल्या वडिलोपार्जित धर्माचे समर्थन व सहाय्यासाठी घरातून बाहेर पडले होते व फिरऔनला विचारीत होते की जर आम्ही मूसा (अ.) च्या हल्ल्यातून आपल्या धर्माचे रक्षण केले तर आम्हाला बक्षीस मिळणार ना? तर कोठे आता ईमानरूपी देणगी प्राप्त झाल्यानंतर त्यांचीच सत्यनिष्ठा आणि साहसाने इतकी मर्यादा गाठली की थोड्याच वेळा अगोदर ज्या राजापुढे लालसेपोटी ते लोटांगण घालत होते, आता त्याचा बडेजाव आणि प्रताप ठोकरीत आहेत आणि तो ज्या भयंकर वाईट शिक्षेची धमकी देत आहे ती भोगण्यासाठी तर तयार आहेत परंतु ज्या सत्याची वास्तवता त्यांना उघड झाली होती, ते सोडण्यास तयार नव्हते.



त्यांनी तुझी व तुझ्या आराध्य्_देवतांची भक्ती सोडून द्यावी?'' फिरऔनने उत्तर दिले, ''मी त्यांच्या मुलांची हत्या करवीन आणि त्यांच्या स्त्रियांना जिवंत राहू देईन.[३६] आमच्या सत्तेची पकड त्यांच्यावर भक्कम आहे.'' (१२७)

मूसा (अ.) ने आपल्या जातीबांधवांना सांगितले, ''अल्लाहची मदत मागा, आणि संयम राखा भूमी अल्लाहची आहे, तो आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो त्याला तिचा वारस बनवितो,[३७] आणि अंतिम विजय त्यांच्याचसाठी आहे जे त्याला भिऊन काम करतील.'' त्याच्या जातीबांधवांनी सांगितले, ''तुझ्या आगमनापूर्वीही आम्ही छळले जात होतो आणि आता तुझ्या आगमनानंतरदेखील आम्हाला छळले जात आहे.'' त्याने उत्तर दिले, ''जवळ आहे ती वेळ की तुमच्या पालनकर्त्याने तुमच्या शत्रूचा नाश करावा आणि तुम्हाला जमिनींवर उत्तराधिकारी बनवावे, मग पाहू या की तुम्ही कसे आचरण करता.'' (१२८-१२९)

आम्ही फिरऔनच्या लोकांना कित्येक वर्षांपर्यंत दुष्काळ व उत्पत्तीच्या टंचाईत गुरफटविले की कदाचित ते शुद्धीवर येतील. परंतु त्यांची अवस्था अशी होती की जेव्हा सुकाळ येत असे तेव्हा सांगत की आम्ही यालाच पात्र आहोत व जेव्हा वाईट वेळ येत असे तेव्हा मूसा (अ.) आणि त्याच्या साथीदारांना आपल्या संबंधात अपशकूनी ठरवीत असत. खरे पाहता मुळात त्यांचा अपशकून अल्लाहपाशी होता, परंतु त्यांच्यापैकी बहुतेक अज्ञानी होते. त्यांनी मूसा (अ.) ला सांगितले की, ''तू आम्हाला मोहित करण्यासाठी वाटेल ते संकेत आणलेस तरी आम्ही तुझी गोष्ट मान्य करणार नाही.'' सरतेशेवटी आम्ही त्यांच्यावर वादळ पाठविले, टोळधाड सोडली, जिवाणू फैलावले, बेडूक टाकले आणि रक्ताचा वर्षाव केला. हे सर्व संकेत वेगवेगळे करून दाखविले. परंतु ते दुर्वर्तन करीतच राहिले आणि ते फारच अपराधी लोक होते जेव्हा जेव्हा त्यांच्यावर आपत्ती कोसळत असे तेव्हा तेव्हा ते म्हणत, ''हे मूसा, तुला आपल्या पालनकर्त्याकडून जो हुद्दा प्राप्त आहे त्याच्या आधारे आमच्यासाठी प्रार्थना कर, यावेळी तू जर आमच्यावरील ही आपत्ती टाळलीस तर आम्ही तुझे म्हणणे मान्य करू आणि बनीइस्राईलना तुझ्याबरोबर पाठवून देऊ.'' पण जेव्हा आम्ही त्यांच्यावरून आमचा प्रकोप एका ठराविक काळासाठी ज्याप्रत ते कोणत्याही परिस्थितीत पोहचणार होते, हटवीत असू तेव्हा ते पूर्णपणे आपल्या करारापासून पराङमुख होत असत तेव्हा आम्ही त्यांच्यावर सूड उगविला व त्यांना समुद्रात

**३६)** हे लक्षात असावे की छळणुकीचा एक काळ तर हजरत मूसा (अ.) यांच्या जन्मापूर्वीपासूनच सुरू झालेला काळ होता आणि झळणुकीचा हा दुसरा काळ म्हणजे हजरत मूसा (अ.) यांच्या प्रेषितपदावर नियुक्तीनंतर सुरू असलेला काळ होय. दोन्ही काळांत, बनीइस्राईलच्या मुलांना ठार केले गेले व त्यांच्या मुलींना जिवंत ठेवले गेले. ही गोष्ट सामायिक होती जेणेकरून त्यांचा वंश नष्ट व्हावा व ते लोक इतर लोकांत विलीन व्हावेत.

**३७)** हल्लीच्या काळांत काही लोक सदरहू आयतचे हे वाक्य 'भूमी अल्लाहची आहे' तेवढेच घेतात आणि नंतरचे वाक्य सोडून देतात 'ज्याला तो इच्छितो तिचा वारस बनवितो.'

बुडविले कारण त्यांनी आमच्या संकेतांना खोटे ठरविले होते व त्यांपासून बेपर्वा झाले होते. आणि त्यांच्या जागी आम्ही त्या लोकांना ज्यांना दुबळे करून सोडले गेले होते, त्या भूमीच्या पूर्व व पश्चिमेचे वारस बनविले जिला आम्ही समृद्धीने संपन्न केले होते.[३८] अशाप्रकारे बनीइस्राईलच्या बाबतीत तुझ्या पालनकर्त्याचे इष्ट वचन पूर्ण झाले कारण त्यांनी संयमाची कास धरली होती आणि आम्ही फिरऔन व त्याच्या लोकांचे ते सर्वकाही नष्ट करून टाकले जे ते बनवीत होते व उभारीत होते. (१३०-१३७)

बनीइस्राईलना आम्ही समुद्रातून पार केले, मग ते मार्गस्थ झाले व मार्गात एका अशा जनसमुदायाप्रत त्यांचे येणे झाले जो आपल्या काही मूर्तींवर मुग्ध झाला होता. सांगू लागले, "हे मूसा! आमच्याकरितादेखील एखादा असा उपास्य बनवा जसे या लोकांचे आराध्य दैवत आहेत,[३९] मूसा (अ.) ने सांगितले, "तुम्ही लोक मोठ्या नादानपणाच्या गोष्टी करता. हे लोक ज्या पद्धतीचे अनुसरण करीत आहेत ती तर विनाश पावणारी आहे आणि जे काम ते करीत आहेत ते सर्वस्वी मिथ्या आहे." मग मूसा (अ.) ने सांगितले, "काय मी अल्लाहव्यतिरिक्त अन्य कोणी उपास्य तुमच्यासाठी शोधावा? तो अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला जगातील सर्व लोकसमुदायावर श्रेष्ठत्व प्रदान केले आहे. आणि (अल्लाह फर्मावीत आहे) तो प्रसंग आठवा जेव्हा आम्ही फिरऔनवाल्यांपासून तुमची सुटका केली ज्यांची अवस्था अशी होती की ते तुम्हाला भयंकर यातना देत होते. तुमच्या मुलांना ठार करीत होते व तुमच्या स्त्रियांना जिवंत राहू देत होते आणि त्यात तुमच्या पालनकर्त्याकडून तुमची कठोर परीक्षा होती." (१३८-१४१)

आम्ही मूसा (अ.) ला तीस रात्री व दिवसांकरिता (सीना पर्वतावर) पाचारण केले व नंतर दहा दिवसांनी पुन्हा वाढ केली, अशाप्रकारे त्याच्या पालनकर्त्याकडून ठरविलेली मुदत पूर्ण चाळीस दिवस झाली. मूसा (अ.) ने जाताना आपले बंधू हारून (अ.) ला सांगितले, "माझ्या पाठीमागे तुम्ही माझ्या लोकसमूहात माझे उत्तराधिकारी बनून राहा आणि नीट कार्य करीत राहा आणि उपद्रव माजविणाऱ्यांच्या मार्गाचे अनुसरण करू नका." जेव्हा तो आमच्या ठरविलेल्या समयी पोहोचला आणि त्याच्या पालनकर्त्याने त्याच्याशी संभाषण केले, तेव्हा त्याने विनंती केली की, "हे पालनकर्त्या! मला सक्षम दृष्टी दे की मी तुला पाहावे." त्याने फर्माविले, "तू मला पाहू शकत नाहीस, बरे तर त्या समोरील पर्वताकडे पहा, जर तो आपल्या जागी स्थिर राहिला तर अलबत तू मला पाहू

३८) म्हणजे बनीइस्राईलना फलस्तीनच्या भूमीचे वारस बनविले. फलस्तीन व सीरिया या भूप्रदेशासाठीच दिव्य कुरआनात निनिराळ्या ठिकाणी आम्ही त्या भूपृष्ठावर समृद्धी राखली आहे, असे शब्द योजिले गेले आहेत.

३९) सदरहू लोकसमूह जरी मुसलमान होता तरी मिस्रमध्ये शतकानुशतके एका मूर्तिपूजक लोकसमूहात राहण्याची ही परिणती होती.



शकशील." म्हणून त्याच्या पालनकर्त्याने जेव्हा पर्वतावर तेज प्रगट केले तेव्हा त्याला चक्काचूर केले आणि मूसा (अ.) घेरी येऊन कोसळला. जेव्हा शुद्धीवर आला तेव्हा म्हणाला, "पवित्र आहे तुझे अस्तित्व, मी तुझ्यापाशी पश्चात्ताप व्यक्त करतो. आणि सर्वप्रथम श्रद्धा ठेवणारा मी आहे." - फर्माविले, "हे मूसा! मी तमाम लोकांवर प्राधान्य देऊन तुला निवडले की तू माझे प्रेषितत्व करावे आणि माझ्याशी संभाषण करावे. म्हणून मी जे काही तुला देईन ते घे आणि कृतज्ञता व्यक्त कर." (१४२-१४४)

त्यानंतर आम्ही मूसा (अ.) ला जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रासंबंधी उपदेश आणि प्रत्येक अंगाबाबतीत सुस्पष्ट मार्गदर्शन पाट्यावर लिहून दिले आणि त्याला सांगितले, या आदेशांना बळकट हातांनी सांभाळ आणि आपल्या लोकसमूहाला आज्ञा दे की याच्या उत्तम आशयाचे अनुसरण करा. लवकरच मी तुम्हाला अवज्ञाकारीचे घर दाखवीन. मी आपल्या संकेतांकडून त्या लोकांची दृष्टी फिरवीन जे कसल्याही हक्काविना भूतलावर मोठे बनतात, त्यांनी कोणतेही संकेत जरी पाहिले तरीदेखील कधीही ते त्या संकेतांवर श्रद्धा ठेवणार नाहीत. जर सरळमार्ग त्यांच्यासमोर आला तर याचा अवलंब करणार नाहीत आणि जर वक्र मार्ग दिसून आला तर त्याच्यावर चालू लागतील, याकरिता की त्यांनी आमच्या संकेतांना खोटे ठरविले आणि त्यापासून ते बेपर्वाई करीत राहिले. आमच्या संकेतांना ज्याने कोणी खोटे ठरविले आणि निर्णयाच्या दिवशी (अल्लाहच्या पुढे) मरणोत्तर जीवनाच्या हजेरीचा इन्कार केला, त्याचे सर्व केले सवरले वाया गेले. काय लोक याच्याखेरीज इतर काही मोबदला प्राप्त करू शकतात की जसे करावे तसे भरावे?

(१४५-१४७)

मूसा (अ.) च्या पाठीमागे त्याच्या राष्ट्राच्या लोकांनी आपल्या अलंकारापासून एका वासराची मूर्ती बनविली ज्यातून बैलासारखा आवाज निघत होता, काय त्यांना दिसत नव्हते की तो त्यांच्याशी बोलतही नाही, तसेच एखाद्या बाबतीत त्यांचे मार्गदर्शनही करीत नाही? परंतु तरी देखील त्यांनी त्याला आपला आराध्य बनविले आणि ते भयंकर अत्याचारी होते.[४०] मग जेव्हा त्यांच्या मोहाचा पाश भंग पावला आणि त्यांनी पाहिले की वास्तविकत: ते मार्गभ्रष्ट झाले आहेत तेव्हा म्हणू लागले की, "जर आमच्या पालनकर्त्याने आमच्यावर दया दाखविली नाही व आम्हाला क्षमा केली नाही तर आम्ही नष्ट होऊ." तिकडून मूसा (अ.) क्रोध व दु:खाने भरलेला आपल्या लोकांकडे परतला. येताक्षणीच त्याने सांगितले, "फारच वाईट वारसा चालविला तुम्ही लोकांनी माझ्या पाठीमागे! काय

४०) मिस्र देशातून निघताना त्यांच्यावरील मिस्री पगड्याचे हे दुसरे प्रकट रूप होते. मिस्रदेशात गायीचे पावित्र्य व पुजेची जी प्रथा होती, त्यापासून हे लोक इतक्या मोठ्या प्रमाणात प्रभावित झाले होते की प्रेषितांची पाठ वळताक्षणीच त्यांनी अराधनेसाठी एक कृत्रिम वासरू घडवून घेतले.

इतके देखील तुम्हाला संयम राखता आले नाही की आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेची प्रतीक्षा केली असती?'' आणि पाट्या फेकल्या आणि आपल्या बंधू (हारून) च्या डोक्याचे केस धरून त्याला ओढले. हारून (अ.) ने सांगितले, ''हे माझ्या आईच्या सुपुत्रा! या लोकांनी मला दाबून टाकले आणि त्यांनी मला ठार करावे हे नजीक आले होते, म्हणून शत्रूंना माझा उपहास करण्याची तू संधी देऊ नकोस आणि त्या अत्याचारी गटासमवेत माझी गणना करू नकोस.'' तेव्हा मूसा (अ.) ने सांगितले, ''हे पालनकर्त्या, मला व माझ्या भावाला क्षमा कर आणि आम्हाला आपल्या कृपाछत्रात घे, तू सर्वांत जास्त दयाळू आहेस.'' (उत्तरादाखल फर्माविण्यात आले की,) ''ज्या लोकांनी वासराला उपास्य बनविले ते जरूर आपल्या पालनकर्त्याच्या क्रोधांत सापडल्याशिवाय राहणार नाहीत आणि जगातील जीवनात अपमानित होतील. असत्य रचणाऱ्यांना आम्ही अशीच शिक्षा देतो. आणि जे लोक वाईट कृत्ये करतील व मग पश्चात्ताप व्यक्त करतील व श्रद्धा ठेवतील तर निश्चितच या पश्चात्ताप व श्रद्धेनंतर तुझा पालनकर्ता क्षमा करणारा व दया दर्शविणारा आहे.'' (१४८-१५३)

मग जेव्हा मूसा (अ.) चा रोग शांत झाला तेव्हा त्याने त्या पाट्या उचलून घेतल्या ज्यांच्या लिखाणांत मार्गदर्शन व कृपा होती त्या लोकांसाठी जे आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात, आणि त्याने आपल्या लोकसमूहातील सत्तर लोकांची निवड केली की त्यांनी (त्याच्यासमवेत) आम्ही ठरवून दिलेल्या वेळेवर हजर व्हावे.[४१] जेव्हा त्यांना एका भयंकर भूकंपाने गाठले तेव्हा मूसा (अ.) ने विनविले, ''हे माझ्या स्वामी, तू इच्छिले असते तर अगोदरच यांना व मला नष्ट करू शकत होता. काय तू त्या अपराधापायी जो आमच्यापैकी काही मूर्खांनी केला होता, आम्हा सर्वांना नष्ट करणार आहेस? ही तर तू घेतलेली एक परीक्षा होती की ज्याद्वारे तू ज्याला इच्छितो त्याला मार्गभ्रष्ट करतो आणि ज्याला इच्छितो त्याला सन्मार्ग प्रदान करतो. आमचा पालक तर तूच आहेस, म्हणून आम्हाला क्षमा कर आणि आमच्यावर कृपा कर, तू सर्वापेक्षा जास्त क्षमा करणारा आहेस आणि आमच्यासाठी या जगातीलही भले लिहा व मरणोत्तर जीवनातसुद्धा. आम्ही आपल्याकडे रूजू झालो आहोत. उत्तरादाखल फर्माविण्यात आले, ''शिक्षा तर मी ज्याला इच्छितो त्याला करतो, पण माझी कृपा प्रत्येक वस्तूवर आच्छादित आहे आणि ती मी त्या लोकांसाठी लिहीन जे अवज्ञापासून दूर राहतील, जकात देतील व माझ्या संकेतांवर श्रद्धा ठेवतील.'' (१५४-१५६)

(म्हणून आज ही कृपा त्या लोकांचा वाटा आहे) जे या निरक्षर पैगंबर-नबी (स.)

**४१)** हे पाचारण या हेतूने होते की लोकसमूहाच्या ७० प्रतिनिधींनी खुदावंताच्या हुजुरात हजर राहून लोकसमूहाच्या वतीने वासराची पूजा केल्याच्या अपराधाची क्षमा मागावी आणि पुनश्च आज्ञांकित राहण्याचा करार करावा.



चे अनुयायित्व पत्करतील[४२] ज्याचा उल्लेख त्यांना त्यांच्या तौरात व इंजीलमध्ये लिखित स्वरूपात आढळतो. तो त्यांना सदाचाराची आज्ञा देतो, दुराचारापासून रोखतो, त्यांच्यासाठी स्वच्छ वस्तू हलाल करतो व अस्वच्छ वस्तू हराम करतो, आणि त्यांच्यावरून ते ओझे उतरवितो जे त्यांच्यावर लादलेले होते आणि ती बंधने सोडतो ज्यामध्ये ते जखडलेले होते.[४३] म्हणून जे लोक याच्यावर श्रद्धा ठेवतील आणि याचे समर्थन व सहाय्य करतील व त्या प्रकाशाचे अनुसरण करतील जो याच्याबरोबर अवतरला गेला आहे, तेच सफल होणारे आहेत. हे मुहम्मद (स.) सांगा की, ''हे मानवांनो, मी तुम्हा सर्वांकडे त्या अल्लाहचा प्रेषित आहे जो पृथ्वी व आकाशांच्या राज्यांचा स्वामी आहे, त्याच्याशिवाय इतर कोणीही ईश्वर नाही, तोच जीवन प्रदान करतो व तोच मृत्यू देतो, म्हणून श्रद्धा ठेवा अल्लाहवर आणि त्याने पाठविलेल्या निरक्षर नबी (स.) वर जो अल्लाह व त्याच्या आदेशांना मानतो, आणि अनुसरण करा त्याचे, जेणेकरून तुम्ही सरळमार्ग प्राप्त कराल.'' (१५७-१५८)

मूसा (अ.) च्या लोकांत एक गट असा देखील होता जो सत्यानुसार मार्गदर्शन करीत असे व सत्यानुसारच न्याय करीत असे. आणि आम्ही त्या जनसमूहास बारा घराण्यांत विभागून त्यांना स्वतंत्र गटाचे रूप दिले होते. आणि जेव्हा मूसा (अ.) कडे त्याच्या लोकांनी पाणी मागितले, तेव्हा आम्ही त्याला संकेत दिला की अमुक खडकावर आपली लाठी मार. म्हणून त्या खडकामधून अकस्मात बारा झरे फुटले आणि प्रत्येक गटाने आपला पाणवठा निश्चित केला, आम्ही त्यांच्यावर ढगांची सावली केली आणि

**४२)** या ठिकाणी हजरत मुहम्मद (स.) यांच्यासाठी 'निरक्षर' (उम्मी) हा शब्द यहूदी लोकांच्या पारिभाषिक शब्दानुसार प्रयुक्त झाला आहे. बनीइस्राईल स्वत: खेरीज इतर सर्व लोकांना 'निरक्षर' (गोएम, अथवा जेंटाईल) म्हणत असत. त्यांचा वांशिक गर्व व अहंकार कोणा-उम्मी-चे नेतृत्व मान्य करणे तर दूरच राहो, 'उम्मी'चे आपल्या बरोबरीचे मानवी हक्कसुद्धा मान्य करण्यास तयार नव्हता. तद्वतच कुरआनात त्यांचे हे कथन दिले गेले आहे, ''उम्मीचे वित्त गिळंकृत करण्यासाठी आमची कसलीही जाबविचारणा होणार नाही.'' (आलेइम्रान, आयत क्र. ७५) म्हणून सर्वोच्च अल्लाह त्यांच्याच पारिभाषिक शब्दाचा प्रयोग करून फर्मावितो की आता तर याच उम्मीशी तुमचे भाग्य निगडित आहे. याचे अनुकरण स्वीकाराल तर माझ्या कृपेतून हिस्सा प्राप्त कराल अन्यथा शतकानुशतके ज्याने पीडित आला आहात तोच कोप तुमचे भाग्य लिखित आहे.

**४३)** म्हणजे त्यांच्या शास्त्रींनी आपल्या कायद्यात्मक छिद्रान्वेषणाद्वारे, त्यांच्या ऋषिंनी आपल्या तपश्चर्येच्या अतिशयोक्तिंनी आणि त्यांच्या अडाणी जनसामान्यांनी आपल्या भ्रामक कल्पना व स्वरचित नियम आणि मर्यादांनी त्यांच्या जीवनांना ज्या ओझ्याखाली दाबून ठेवले होते व ज्या बंधनांनी जखडले होते, हा पैगंबर ते सर्व ओझे दूर सारतो व ती सर्व बंधने तोडून जीवन स्वतंत्र करतो.

त्यांच्यावर 'मन्न' व 'सलवा' (आकाशातून अवतरलेले खाद्य) उतरविले, - ''खा ते स्वच्छ पदार्थ जे आम्ही तुम्हाला प्रदान केले आहेत.'' परंतु यानंतर त्यांनी जे काही केले ते आमच्यावर त्यांनी अत्याचार केला नाही तर उलट स्वत:वरच अत्याचार करीत राहिले. (१५९-१६०)

स्मरण करा तो प्रसंग जेव्हा त्यांना सांगितले गेले होते की, ''या वस्तीत जाऊन राहा आणि याच्या उत्पन्नांतून आपल्या मर्जीनुसार उपजीविका प्राप्त करा व ''हित्ततून हित्ततून'' म्हणत जा आणि शहराच्या दारातून नतमस्तक होत होत प्रवेश करा, आम्ही तुमचे अपराध माफ करू आणि पवित्र वर्तन राखणाऱ्यांना जास्त कृपेने उपकृत करू.'' परंतु जे लोक त्यांच्यापैकी अत्याचारी होते, त्यांनी ती गोष्ट जी त्यांना सांगितली गेली होती बदलून टाकली, आणि परिणाम असा झाला की आम्ही त्यांच्या अत्याचाराच्या शिक्षेपायी त्यांच्यावर आकाशातून प्रकोप पाठविला. (१६१-१६२)

आणि जरा यांना त्या वस्तीची कैफियतदेखील विचारा जी समुद्र किनारी वसली होती.[४४] यांना आठवून द्या तो प्रसंग की तेथील लोक सब्त (शनिवार) च्या दिवशी अल्लाहची आज्ञा भंग करीत होते आणि असे की मासे शनिवारच्या दिवशीच उसळून उसळून पृष्ठभागावर त्यांच्यासमोर येत असत व शनिवार सोडून इतर दिवशी येत नसत. हे यासाठी घडत असे की आम्ही त्यांच्या अवज्ञेपायी त्यांना परीक्षेत टाकत होतो. आणि यांना हे देखील आठवून द्या की जेव्हा त्यांच्यापैकी एका गटाने दुसऱ्या गटास सांगितले होते, ''तुम्ही अशा लोकांना उपदेश का करता, ज्यांना अल्लाह नष्ट करणार आहे अथवा कठोर शिक्षा देणार आहे.'' तेव्हा त्यांनी उत्तर दिले होते की, ''आम्ही हे सर्वकाही तुमच्या पालनकर्त्याच्या पुढे आपल्या बचावाचे साधन म्हणून आणि या अपेक्षेने करीत आहोत की कदाचित हे लोक त्याच्या अवज्ञेपासून दूर राहतील.'' सरतेशेवटी जेव्हा ते त्या आदेशांना पूर्णत: विसरून गेले ज्याची त्यांना आठवण करून दिली गेली होती तेव्हा आम्ही त्या लोकांना वाचविले जे वाईटापासून रोखत होते, आणि उरलेल्या सर्व लोकांना जे अत्याचारी होते, त्यांच्या अवज्ञेपायी त्यांना कठोर प्रकोपात पकडले. मग जेव्हा ते पूर्ण शिरजोरीने तीच कृत्ये करीत राहिले ज्यापासून त्यांना रोखले गेले होते, तेव्हा आम्ही

**४४)** संशोधकांचा बहुतांशी कल याकडे आहे की हे स्थळ ऐला, अथवा ऐलात किंवा ऐलोत होते. हल्ली तेथे इस्राईलच्या यहूदी राज्याने याच नावाने एक बंदर उभारले आहे. त्याच्या जवळच जॉर्डनचे प्रसिद्ध बंदर 'अकबा' स्थित आहे.



सांगितले, माकड बना[४५] अपमानित व तिरस्कृत. (१६३-१६६)

आणि आठवा जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने जाहीर केले की, ''तो पुनरुत्थानापर्यंत सतत असले लोक बनीइस्राईलवर लादत राहील जे त्यांना अत्यंत वाईट यातना देतील.'' नि:संशय तुमचा पालनकर्ता शिक्षा देण्यात फार सत्वर आहे आणि निश्चितपणे तो क्षमा व दया दर्शविणारा देखील आहे. (१६७)

आम्ही भूतलावर त्यांच्या तुकड्या, करून अनेक जनसमूहात त्यांना विभागून टाकले. काही लोक त्यांच्यात सदाचारी होते आणि काही त्यांच्यापेक्षा वेगळे. आणि आम्ही त्यांना बऱ्या आणि वाईट स्थितीने परीक्षेत टाकीत राहिलो की कदाचित हे परत वळतील. मग अगोदरच्या पिढ्यानंतर असे अपात्र त्यांचे उत्तराधिकारी झाले जे अल्लाहच्या ग्रंथाचे वारस असूनसुद्धा याच तुच्छ जगताचे लाभ उपटतात आणि सांगून टाकतात की अपेक्षा आहे की आम्हाला माफ केले जाईल, आणि जर तीच ऐहिक संपत्ती समोर आल्यास लगबगीने ती घेतात. काय त्यांच्याकडून ग्रंथाची प्रतिज्ञा घेतली गेली नाही की अल्लाहच्या नावाने तीच गोष्ट सांगावी जी सत्य आहे? आणि यांनी स्वत:च वाचले आहे जे ग्रंथात लिहिलेले आहे. परलोकातील निवासस्थान तर ईशपरायण लोकांसाठीच उत्तम आहे.[४६] काय एवढीशी गोष्ट देखील तुम्हाला कळत नाही? जे लोक ग्रंथाचे पालन करतात व ज्यांनी नमाज कायम केली आहे, निश्चितच अशा सदाचारी लोकांचा मोबदला आम्ही वाया

**४५)** या वर्णनावरून असे कळते की त्या वस्तीत तीन प्रकारचे लोक मौजूद होते. एक, जे धडधडीत ईश्वरी आज्ञेची पायमल्ली करीत होते. दुसरे ते लोक जे स्वत: तर अवज्ञा करीत नव्हते परंतु घडणाऱ्या त्या अवज्ञांना निमूटपणे पाहात होते आणि त्याविरूद्ध उपदेश करणाऱ्यांना म्हणत असत की त्या अभागी लोकांना उपदेश करून तरी काय साध्य होणार आहे. तिसरे ते लोक होते जे आपल्या ईमानी स्वाभिमानामुळे ईश्वरी मर्यादांची उघडउघड पायमल्ली सहन करू शकत नव्हते. कदाचित ते अपराधी लोक त्यांच्या उपदेशामुळे सरळ मार्गावर येतील किंवा त्यांनी सरळ मार्ग स्वीकारला नाही तर आपल्या परीने आपली कर्तव्यपूर्तता करून निदान ईश्वरासमोर आपल्या निर्दोषतेचा पुरावा तरी सादर करू, या विचाराने ते नेकीचा हुकूम आणि पापाला मनाईक करण्यात प्रयत्नशील होते. अशा परिस्थितीत जेव्हा त्या वस्तीवर अल्लाहचा प्रकोप कोसळला तेव्हा दिव्य कुरआन सांगतो की सदरहू तिन्ही गटांपैकी केवळ तिसराच गट त्यापासून सुरक्षित ठेवला गेला कारण त्याच गटाने ईश्वराच्या हुजूरात आपल्या बचावाचे निमित्त सादर करण्याची काळजी घेतली होती व तोच असा गट होता ज्याने आपण निर्दोष असल्याचा पुरावा दिला होता. उरलेल्या अगोदरच्या दोन्ही गटांची अत्याचाऱ्यांत गणना झाली व ते आपल्या अपराधाच्या प्रमाणानुसार प्रकोपग्रस्त झाले. तथापि माकड केवळ त्याच लोकांना बनविले गेले ज्यांनी पूर्णपणे शिरजोरी करून आज्ञेची पायमल्ली केली होती.

**४६)** सदरहू आयतचे दोन अनुवाद होऊ शकतात. एक आम्ही वर दिलेला आहे आणि दुसरा असा ''ईशभीरू लोकांसाठी तर परलोकाचे निवासस्थानच बेहतर आहे.''

जाऊ देणार नाही. यांना तो प्रसंग देखील आठवतो काय जेव्हा आम्ही पर्वताला हलवून यांच्यावर अशा प्रकारे आच्छादिले होते की जणूकाय ती छत्री असावी आणि हे कल्पना करीत होते की तो यांच्यावर कोसळेल आणि तेव्हा आम्ही यांना सांगितले होते की जो ग्रंथ आम्ही तुम्हाला देत आहोत त्याला समर्थपणे उचलून धरा, आणि जे काही त्यात लिहिले आहे, त्याला स्मरणांत ठेवा, अपेक्षा आहे की तुम्ही दुर्वर्तनापासून अलिप्त राहाल.

(१६८-१७१)

आणि हे नबी (स.), लोकांना आठवण करून द्या त्या प्रसंगाची जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने आदमच्या संततीच्या पाठीतून समस्त मानवजातीला अस्तित्वात आणले होते आणि त्यांना स्वत: त्यांच्यावरच साक्षीदार ठरवीत विचारले होते, "काय मी तुमचा पालनकर्ता नाही?" त्यांनी सांगितले, "निश्चितच आपण आमचे पालनकर्ता आहात, आम्ही याची ग्वाही देतो,"[४७] हे आम्ही याकरिता केले की एखादे वेळी पुनरुत्थानाच्या दिवशी असे सांगू नये की, "आम्ही तर या गोष्टीपासून अनभिज्ञ होतो.' अथवा असे सांगू नये की, "अनेकेश्वरवादाचा प्रारंभ तर आमच्या वाड-वडिलांनी आमच्या अगोदरच केला होता आणि आम्ही त्यानंतर त्यांच्या वंशात जन्मलो, मग आपण आम्हाला त्या अपराधाबद्दल पकडता काय जो दुष्कृत्य करणाऱ्या लोकांनी केला होता?" पहा! अशा तऱ्हेने आम्ही संकेत स्पष्टपणे प्रस्तुत करतो.[४८] आणि अशासाठी करतो की या लोकांनी त्याकडे परत यावे. (१७२-१७४)

आणि हे पैगंबर (स.), यांच्यासमोर त्या माणसाच्या स्थितीचे वर्णन करा ज्याला आम्ही आमच्या संकेतवचनांचे शिक्षण दिले होते परंतु त्याने त्यांच्या निर्बंधातून पळ काढला. सरतेशेवटी शैतान त्याच्या मागे लागला येथपर्यंत की त्याचा भरकटलेल्या लोकांत समावेश झाला. जर आम्ही इच्छिले असते तर त्याला त्या संकेतवचनांद्वारे उच्चस्थान दिले असते, परंतु त्याचा तर जमिनीकडेच कल राहिला आणि आपल्या मनोवासनेच्याच आहारी गेला, म्हणून त्याची स्थिती कुत्र्यासारखी झाली की तुम्ही त्याच्यावर हल्ला केला तरी तो जीभ लोंबकळत ठेवतो आणि त्याला सोडून दिले तरी

**४७)** अनेक हदीसीवरून कळल्याप्रमाणे आदमच्या निर्मितीप्रसंगी ही घटना घडली होती. त्यावेळी ज्याप्रमाणे फरिश्त्यांना एकत्र करून प्रथम मानवाला सजदा करविला गेला होता व पृथ्वीवर मानवच्या खिलाफत- प्रतिनिधित्वाची घोषणा केली गेली होती. त्याच्याप्रमाणे अखिल मानवजातीलादेखील, जी कयामतपर्यंत जन्मास येणारी होती, सर्वोच्च अल्लाहने एकाच वेळी अस्तित्वात आणून व विवेक प्रदान करून आपल्यासमोर हजर केले होते व त्यांच्याकडून आपल्या स्वामित्वाबद्दल साक्ष घेतली होती.

**४८)** म्हणजे मानवाच्या अंत:करणात मौजूद असलेल्या सत्यपरिस्थितीच्या त्या खुणा ज्या सत्याकडे माणसाचे मार्गदर्शन करीत असतात.



जीभ लोंबकळतच ठेवतो.[४९] हेच उदाहरण आहे त्या लोकांचे जे आमच्या संकेतवचनांना खोटे लेखतात. (१७५-१७६-)

तुम्ही या हकीगती त्यांना ऐकवीत राहा कदाचित हे काही विचार व चिंतन करतील. अत्यंत वाईट उदाहरण आहे, अशा लोकांचे ज्यांनी आमच्या संकेतवचनांना खोटे ठरविले, आणि ते स्वत:वर स्वत:च अत्याचार करीत राहिले आहेत. ज्याला अल्लाह मार्गदर्शन करतो फक्त तोच सरळमार्ग प्राप्त करतो व ज्याला अल्लाह आपल्या मार्गदर्शनापासून वंचित करतो तोच अयशस्वी व निराश बनतो. आणि ही सत्य स्थिती आहे की बरेचसे जिन्न व माणसे अशी आहेत ज्यांना आम्ही नरकासाठीच निर्माण केले आहे. त्यांच्याजवळ मने आहेत पण ते त्यांनी विचार करीत नाहीत, त्यांच्यापाशी डोळे आहेत पण ते पाहात नाहीत, त्यांच्याजवळ कान आहेत पण ते ऐकत नाहीत. ते जनावरांसारखे आहेत किंबहुना त्यांच्यापेक्षाही तुच्छ आहेत, हे ते लोक होत जे गफलतीत हरपले आहेत.[५०] (-१७६-१७९)

अल्लाह चांगल्या नावानांच पात्र आहे, त्याचा चांगल्या नावानीच धावा करा आणि त्या लोकांना त्यांच्या स्थितीत सोडा, जे त्याची नावे ठेवण्यात सत्यापासून पराङमुख होतात. जे काही ते करतात त्यांचा बदला त्यांना मिळाल्याशिवाय राहणार नाही,[५१] आमच्या निर्मितीत एक गट असा देखील आहे जो पुरेपूर सत्यानुसार मार्गदर्शन व

**४९)** कुरआनच्या भाष्यकारांनी पैगंबर (स.) च्या काळातील व त्या पूर्वीच्या इतिहासातील निरनिराळ्या व्यक्तींना सदरहू उपमा लागू केली आहे. परंतु वस्तुस्थिती अशी की त्या उपमेत दृष्टिसमोर असलेली ती विशिष्ट व्यक्ती तर पडद्याआड आहे तथापि ज्या कोणा व्यक्तीत हा दुर्गुण असेल त्या प्रत्येक व्यक्तीला ही उपमा लागू होते. सर्वश्रेष्ठ अल्लाह अशा व्यक्तीला कुत्र्याच्या अवस्थेची उपमा देतो. कुत्र्याची लोंबकळत असलेली जीभ व वाहात असलेली लाळ एका अशमनीय लोभाग्नीचे आणि कदापि तृप्त न होणाऱ्या वासनेचे लक्षण आहे. उपमेचे कारण तेच आहे ज्या कारणाने आपण आपल्या भाषेत अशा व्यक्तीला जी ऐहिक लालसेपोटी आंधळी होत असावी 'दुनियेचा कुत्रा' असे म्हणतो.

**५०)** म्हणजे आम्ही यांना तर निर्माण केले होते. हृदय, मेंदू, डोळे आणि कान देऊन परंतु जालिमांनी यांचा काहीच उपयोग केला नाही व आपल्या दुष्कर्मापायी सरतेशेवटी जहन्नमसाठीच पात्र बनले.

**५१)** 'चांगल्या नावांनी' अभिप्रेत अशी नावे आहेत ज्याद्वारे ईश्वराची महत्ता व उच्चता, त्याचे पावित्र्य व निर्मळता आणि त्याच्या उच्चतम गुणांची अभिव्यक्ती होत असावी. ईश्वराची नावे ठेवण्यात सत्यापासून पराङमुख होणे असे की ईश्वराला अशी नावे दिली जावीत जी त्याच्या दर्जापेक्षा कमी दर्जाची असावीत, जी त्याच्या आदराविरूद्ध असावीत, ज्यांच्याद्वारे दोष आणि कमीपणा त्याच्याशी जोडला जात असावा अथवा ज्यांच्याद्वारे त्याच्या पवित्र व उच्चतम अस्तित्वासंबंधी एखाद्या चुकीच्या धारणेची अभिव्यक्ती होत असावी.

सत्यानुसार न्याय करतो. उरले ते लोक ज्यांनी आमची संकेतवचने खोटी लेखली आहेत, तर त्यांना आम्ही क्रमाक्रमाने अशा पद्धतीने विनाशाकडे नेऊ की त्यांना पत्ता देखील लागणार नाही. मी त्यांना वाव देत आहे, माझ्या डावपेचांना काही तोड नाही.

(१८०-१८३)

आणि काय या लोकांनी कधी विचार केला नाही? यांच्या मित्रावर वेडेपणाचा काहीच परिणाम नाही.[५२] तो तर एक सावध करणारा आहे जो (वाईट परिणाम समोर येण्यापूर्वी) स्पष्टपणे खबरदार करीत आहे. काय या लोकांनी आकाश आणि पृथ्वीच्या व्यवस्थेवर कधी विचार केला नाही आणि कोणत्याही वस्तूला देखील जी अल्लाहने निर्मिली आहे डोळे उघडून पाहिले नाही? आणि काय याचा देखील यांनी कधी विचार केला नाही कदाचित यांचा जीवनकाल संपुष्टात येण्याची घटका जवळ येऊन ठेपली असेल? मग शेवटी पैगंबरांच्या या सूचनेनंतर इतर कोणती गोष्ट अशी असू शकते ज्यावर यांनी श्रद्धा ठेवावी? ज्याला अल्लाहने मार्गदर्शनापासून वंचित केले त्याच्याकरिता मग कोणीच मार्गदर्शक नाही, आणि अल्लाह त्यांना दुर्वर्तनातच भटकलेल्या अवस्थेत सोडून देतो. (१८४-१८६)

हे लोक तुम्हाला विचारतात की शेवटी ती पुनरुत्थानाची घटका अवतरणार तरी कधी? सांगा, ''त्याचे ज्ञान माझ्या पालनकर्त्याजवळच आहे, तिला तिच्या वेळेवर तोच जाहीर करील. आकाशांत व जमिनीत ती अत्यंत कठीण वेळ असेल, ती तुमच्यावर अकस्मात येईल.'' हे लोक त्यासंबंधी तुम्हाला अशाप्रकारे विचारतात जणूकाय तुम्ही तिच्या शोधात लागला आहात, सांगा, ''त्याचे ज्ञान तर केवळ अल्लाहला आहे पण बहुतेक लोक या सत्यापासून अनभिज्ञ आहेत.'' हे पैगंबर (स.), यांना सांगा की, ''मी स्वत:करिता कोणत्याही नफा तोट्याचा अधिकार बाळगत नाही, अल्लाहच जे काही इच्छितो ते होते आणि जर मला परोक्षाचे ज्ञान असते तर मी पुष्कळसे लाभ स्वत:साठी प्राप्त करून घेतले असते व मला कधीही एखादे नुकसान पोहचले नसते. मी तर केवळ

**५२)** 'मित्र'ने अभिप्रेत हजरत मुहम्मद (स.) आहेत. त्यांना मक्कावासियांचा मित्र यासाठी म्हटले गेले आहे की त्या लोकांकरिता ते अनोळखी नव्हते. त्याच लोकांत ते जन्मले, त्यांच्या दरम्यानच राहिले व वसले, बालपणानंतर तरुण आणि तरुणापणानंतर वृद्ध झाले, प्रेषित होण्यापूर्वी सर्व लोक त्यांना एक अत्यंत सुस्वभावी आणि शहाणा माणूस म्हणून ओळखत असत. प्रेषित झाल्यानंतर जेव्हा त्यांनी ईश्वरी संदेश पोहचविण्यास प्रारंभ केला तेव्हा अकस्मात त्यांना ते वेडा म्हणू लागले. त्यांचे असे बोलणे, प्रेषित होण्यापूर्वी हजरत मुहम्मद (स.) जे काही करीत होते त्या गोष्टीसाठी नव्हते तर प्रेषित होण्यानंतर ज्या गोष्टीचा ते प्रचार करू लागले होते त्याच गोष्टीसाठी होते, हे उघड आहे. याच कारणास्तव फर्माविले जात आहे की लोकांनी कधी विचार तरी केला आहे, की या गोष्टीपैकी कोणती गोष्ट वेडेपणाची आहे?



एक खबरदार करणारा व खुषखबर ऐकविणारा आहे त्या लोकांसाठी जे माझे म्हणणे मान्य करतील.'' (१८७-१८८)

तो अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला एका जिवापासून निर्माण केले व त्याच्याच जातीपासून जोडी बनविली म्हणजे तिच्या सान्निध्यात संतोष प्राप्त करावा. मग जेव्हा पुरुषाने स्त्रीला झाकले तेव्हा तिला एक सूक्ष्म गर्भ राहिला त्याचा भार वाहून ती संचार करीत राहिली, मग जेव्हा तिचा तो भार वाढला तेव्हा दोघांनी मिळून अल्लाहचा, आपल्या पालनकर्त्याचा धावा केला की, जर तू आम्हाला चांगले मूल दिलेस तर आम्ही तुझे कृतज्ञ राहू. पण जेव्हा अल्लाहने त्यांना एक सुखरूप मूल दिले तेव्हा ते त्याच्या बक्षीस व मेहरबानीत इतरांना त्याचा भागीदार ठरवू लागले.[५३] अल्लाह फार उच्च व श्रेष्ठ आहे त्या अनेकेश्वरवादी गोष्टीपासून जी हे लोक करतात. कसले नादान आहेत हे लोक की त्यांना अल्लाहचा भागीदार ठरवितात जे कोणतीही वस्तू निर्माण करीत नाहीत उलट स्वत: निर्मिले जातात. जे यांचीही मदत करू शकत नाहीत आणि आपल्या स्वत:चे सहाय्य करण्यास देखील समर्थ नाहीत जर तुम्ही यांना सरळमार्गावर येण्याचे आमंत्रण द्याल तर ते तुमच्या पाठीमागे येणार नाहीत. मग तुम्ही त्यांना हांक द्या अथवा स्तब्ध राहा, दोन्हीही अवस्थेत तुमच्यासाठी ते सारखेच राहतील.[५४] तुम्ही अल्लाहला सोडून ज्यांचा धावा करता ते तर केवळ दास आहेत ज्याप्रमाणे तुम्ही दास आहात. यांच्याकडे प्रार्थना करून पहा, यांनी तुमच्या प्रार्थनेचे उत्तर द्यावे जर यांच्याबाबतीत तुमच्या धारणा खऱ्या आहेत. काय यांना पाय आहेत की त्यांच्या सहाय्याने चालतील? काय यांना हात आहेत की त्यांनी पकडतील? काय यांना डोळे आहेत की ज्यांनी पाहतील? काय यांना कान आहेत की ज्यांनी ऐकतील? हे पैगंबर (स.), यांना सांगा की, ''बोलावून घ्या आपल्या

**५३)** अर्थ असा की संतती देणारा तर अल्लाह आहे. अल्लाहने जर स्त्रीच्या पोटात माकड अथवा सर्प किंवा आणखी एखादा अमानवी प्राणी निर्माण केला, अथवा अर्भकाला पोटातच आंधळा, बहिरा, पांगळा, लुळा बनविला अथवा त्याच्या शारीरिक, मानसिक आणि बौद्धिक शक्तित व्यंग ठेवले तर अल्लाहच्या रचनेत बदल करण्याचे, असे सामर्थ्य कोणालाच प्राप्त नाही, या वस्तुस्थितीची अनेकेश्वरवादींना देखील तशीच जाण आहे ज्याप्रकारे एकेश्वरवादींना आहे. तद्वत याच कारणास्तव गर्भ असतानाच्या काळांत सर्व आशा अल्लाहशीच बाळगल्या जातात की तोच सर्वांगपूर्ण मूल जन्माला आणील. परंतु जेव्हा ती आशा पूर्ण होते व चंद्रासारखे मूल लाभते तेव्हा कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी नैवेद्य व भेट मात्र एखाद्या देवतेला, एखाद्या अवताराल, एखाद्या वली व विभूतीच्या नावाने अर्पण केले जातात आणि मुलांचे असे नाव ठेवले जाते जणू तो ईश्वराशिवाय अन्य कोणाच्या मेहरबानीचा परिणाम होय.

**५४)** म्हणजे या अनेकेश्वरवाद्यांच्या खोट्या उपास्यांची अवस्था अशी आहे की सरळमार्ग दाखविणे व आपल्या उपासकांना मार्गदर्शन करणे तरक दूरच राहो, ते बिचारे तर एखाद्या मार्गदर्शकाच्या अनुकरणाच्यासुद्धा पात्रतेचे नाहीत इथपावेतो की कोणा हांक देणाऱ्याच्या हाकेचे उत्तर सुद्धा देऊ शकत नाहीत.

मानलेल्या भागीदारांना, मग तुम्ही सर्वजण मिळून माझ्याविरूद्ध डावपेच रचा आणि मला मुळीच सवड देऊ नका, माझा संरक्षक व सहायक तो अल्लाह आहे ज्याने हा ग्रंथ अवतरला आहे आणि तो सदाचारी लोकांची मदत करतो. याउलट तुम्ही अल्लाहव्यतिरिक्त ज्यांचा धावा करता ते तुम्हाला सहाय्य करू शकत नाहीत आणि स्वत: आपल्याला मदत करण्याचे देखील सामर्थ्य त्यांच्यात नाही, इतकेच नव्हे तर जर तुम्ही त्यांना सरळ मार्गावर येण्याचे आवाहन कराल तर ते तुमचे म्हणणे ऐकूही शकत नाहीत. सकृतदर्शनी तुम्हाला असे दिसते की ते तुमच्याकडे पाहात आहेत परंतु वस्तुत: ते काहीही पाहात नाहीत.''

(१८९-१९८)

हे पैगंबर (स.), मृदुता आणि क्षमाशीलतेच्या मार्गाचा अंगिकार करा. भलेपणाचे उद्‌बोधन देत राहा आणि अडाण्यांशी विवाद टाळा जर एखादे वेळी शैतानने तुम्हाला उद्युक्त केले तर अल्लाहचा आश्रय मागा, तो सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. वास्तविक पाहता जे लोक ईशभीरू आहेत त्यांची स्थिती तर अशी असते की एखाद्या वेळी शैतानाच्या प्रभावाने एखादा वाईट विचार त्यांना स्पर्श जरी करून जात असेल तरी ते ताबडतोब सावध होतात आणि मग त्यांना स्पष्ट दिसू लागते की त्यांच्यासाठी योग्य कार्यपद्धती कोणती आहे. उरले त्यांचे (अर्थात शैतानांचे) भाऊबंद, तर ते त्यांना त्यांच्या वाकड्या चालीत खेचून घेऊन जातात आणि त्यांना भटकविण्यात काहीही कसूर करीत नाहीत. (१९९-२०२)

हे पैगंबर (स.), जेव्हा तुम्ही या लोकांसमोर एखादे संकेतचिन्ह (अर्थात चमत्कार) प्रस्तुत करीत नाही तेव्हा ते म्हणतात की तुम्ही स्वत:साठी एखाद्या संकेताची निवड का म्हणून केली नाही? त्यांना सांगा, ''मी तर केवळ त्या (वह्य) दिव्य प्रकटनाचे अनुसरण करतो जे माझ्या पालनकर्त्याने माझ्याकडे पाठविले आहे, हा डोळसपणा आणणारा प्रकाश आहे तुमच्या पालनकर्त्याकडून आणि मार्गदर्शन व कृपा आहे त्या लोकांसाठी जे याला स्वीकारतील. जेव्हा कुरआनचे पठण तुमच्यासमोर केले जात असेल तेव्हा त्याला लक्षपूर्वक ऐका व शांत राहा कदाचित तुमच्यावरसुद्धा कृपा होईल.'' (२०३-२०४)

हे पैगंबर (स.), आपल्या पालनकर्त्याचे सकाळी व संध्याकाळी स्मरण करीत जा, मनातल्या मनात, अनुनय विनय आणि भय बाळगून आणि तोंडाने देखील हलक्या आवाजात. तुम्ही त्या लोकांपैकी बनू नका जे गाफील बनले आहेत. जे दूत तुमच्या पालनकर्त्याच्या ठायी निकटतम स्थान राखतात ते कधीही आपल्या मोठेपणाच्या दर्पात त्याच्या भक्तीपासून पराङमुख होत नाहीत. आणि त्याचे पावित्र्यगान करतात आणि त्याच्यापुढे नतमस्तक होतात.[५५] (२०५-२०६)

---

**५५)** सदरहू आयत वाचणाऱ्याने किंवा ती ऐकणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने सजदा करावा अशी या ठिकाणासंबंधीची आज्ञा आहे. दिव्य कुरआनात अशी १४ स्थळे आहेत जेथे सजदा-आयती आल्या आहेत.



# ८ सूरह अल्‌अन्‌फाल

*(मदीनाकालीन, वचने ७५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तुम्हाला अनफाल संबंधी विचारतात[१] सांगा, ''हे अनफाल तर अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आहेत. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा व आपापसातील संबंध सुधारा आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराची आज्ञा पाळा, जर तुम्ही श्रद्धावंत असाल.''[२] खरे श्रद्धावंत तर तेच लोक होत ज्यांची हृदये अल्लाहचा उल्लेख ऐकताच थरारून जातात आणि जेव्हा त्यांच्यासमोर अल्लाहच्या वचनांचे पठण होते तेव्हा त्यांची श्रद्धा अधिकच वाढत जाते, आणि ते आपल्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवतात, जे नमाज कायम करतात आणि आम्ही त्यांना जे काही दिलेले आहे त्यातून (आमच्या मार्गात) खर्च करतात. असलेच लोक खरे श्रद्धावंत आहेत, त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याजवळ मोठमोठाले दर्जे आहेत, अपराधांची क्षमा आहे आणि सर्वोत्तम उपजीविका आहे. (या गनिमी मालासंबंधी तशीच परिस्थिती समोर येत आहे जशी त्यावेळी आली होती जेव्हा) तुझ्या पालनकर्त्याने तुला सत्यानिशी तुझ्या घरातून बाहेर आणले होते आणि ही गोष्ट श्रद्धावंतांपैकी एका गटाला अप्रिय होती. ते त्या सत्याबाबत तुमच्याशी वाद घालत होते, वस्तुत: ते अगदी स्पष्टपणे जाहीर झाले होते. त्यांची दशा अशी होती जणुकाय त्यांना त्यांच्या डोळ्यांदेखत मृत्यूकडे हाकून नेले जात आहे. (१-६)

स्मरण करा तो प्रसंग जेव्हा अल्लाह तुम्हाला वचन देत होता की दोन्ही जमातींपैकी एक तुमच्या हाती लागेल.[३] तुमची इच्छा होती की दुर्बल जमात तुमच्या हाती लागावी.

---

**१)** मूळ अरबी शब्द 'अन्‌फाल' हे नफ्ल या शब्दाचे अनेकवचन आहे. हक्क अथवा आवश्यक असलेल्या गोष्टींपेक्षा जे अधिक असते त्याला अरबी भाषेत नफ्ल असे म्हणतात. जेव्हा ते आज्ञांकित असलेल्याकडून असेल तेव्हा त्याचा अर्थ एक दास आपल्या स्वामीसाठी स्वखुशीने कर्तव्यापेक्षा जास्त जी सेवा पार पाडतो, ती असते. उदा. नफ्ल नमाज. तसेच जेव्हा ते स्वामीकडून असेल तेव्हा त्याचा अर्थ स्वामी आपल्या दासाला त्याच्या हक्कापेक्षा जास्त जे बक्षीस देतो ते बक्षीस आणि ती देणगी असते. या ठिकाणी, बदरच्या युद्धात मुसलमानांच्या हाती जो गनिम माल लागला होता त्यासाठी नफ्ल हा शब्द प्रयुक्त झाला आहे. त्या मालाला 'अन्‌फाल' ठरविण्याचा हेतू असा की, ही तुमची कमाई नव्हे तर अल्लाहने तुम्हाला जे प्रदान केले आहे ते त्याचे बक्षीस आणि कृपाप्रसाद आहे, ही गोष्ट त्यांच्या ध्यानात बसविली जावी.

**२)** ही गोष्ट अशासाठी फर्माविली गेली की या मालासंबंधी एखादी आज्ञा येण्याआगोदर मुसलमानांपैकी विविध गट आपल्या हिश्श्यासंबंधी दावे प्रस्तुत करू लागले होते.

**३)** म्हणजे कुरैशांचा व्यापारी काफिला, हा सीरियाकडून येत होता अथवा कुरैशांचे सैन्य हे मक्केहून येत होते.

परंतु अल्लाहचा इरादा असा होता की आपल्या वचनांनी सत्याला सत्य करून दाखवावे व अश्रद्धांचे मूळ कापून टाकावे - म्हणजे सत्य, सत्य सिद्ध व्हावे व असत्य, असत्य ठरावे, मग ही गोष्ट अपराधी लोकांना कितीही अप्रिय का वाटेना. (७-८)

आणि तो प्रसंग जेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्यापाशी फिर्याद करीत होता. उत्तरादाखल त्याने फर्माविले, मी तुमच्या मदतीकरिता लागोपाठ एक हजार दूत पाठवीत आहे. ही गोष्ट अल्लाहने तुम्हाला केवळ याकरिताच सांगितली की तुम्हाला शुभवार्ता मिळावी व तुमची मने त्याद्वारे समाधानी व्हावीत एरव्ही मदत तर जेव्हा कधीही होते अल्लाहकडूनच होत असते, नि:संशय अल्लाह जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (९-१०)

आणि तो प्रसंग जेव्हा की अल्लाह आपल्याकडून गुंगीच्या स्वरूपात तुम्हावर समाधान व निर्भयतेची स्थिती पसरवीत होता,[४] व आकाशांतून तुमच्यावर पर्जन्यवृष्टी करीत होता; की जेणेकरून तुम्हाला शूचिर्भूत करावे आणि तुमच्यावरून शैतानाने टाकलेला अमंगळपणा दूर करावा व तुमचे मनोधैर्य वाढवावे आणि त्यायोगे तुमचे पाय स्थिर करावेत. (११)

आणि तो प्रसंग जेव्हा तुमचा पालनकर्ता दूतांना इशारा करीत होता की, ''मी तुमच्यासमवेत आहे, तुम्ही श्रद्धावंतांना स्थिर राखा, मी लगेच या अश्रद्धावंतांच्या मनावर वचक बसवितो, तर तुम्ही त्यांच्या मानांवर मारा व सांध्या सांध्यावर आघात करा.''[५] हे या कारणास्तव की या लोकांनी अल्लाह व त्याच्या पैगंबरांचा विरोध केला, आणि जो अल्लाह व त्याच्या पैगंबराचा विरोध करतो, अल्लाह त्याच्यासाठी अत्यंत कठोर पकड करणारा आहे. ही[६] आहे तुम्हा लोकांची शिक्षा, आता याचा आस्वाद घ्या, आणि तुम्हाला

४) हीच अनुभूती मुसलमानांना उहूदच्या युद्धातदेखील आली होती, असे सूरह आलेइम्रान आयत क्र. १५४ मध्ये येऊन गेले आहे.

५) येथपर्यंत बदरच्या युद्धाच्या ज्या घटनांची एक एक करून आठवण दिली गेली आहे त्यामागील हेतू म्हणजे 'अन्फाल' या शब्दाचा अर्थ स्पष्ट करणे होय. प्रारंभी फर्माविले गेले होते की या गनिम मालाला आपल्या जिवापाड प्रयत्नांचे फळ समजून त्याचे मालक आणि मुख्त्यार कोठे बनत आहात, ही तर वास्तविकपणे ईश्वरी देणगी आहे आणि देणारा स्वत:च आपल्या मालाचा मुख्त्यार आहे. आता याच्या पुराव्यासाठी या घटनांचे दाखले दिले गेले आहेत की या विजयात स्वत:च हिशेब करून पहा की तुमच्या स्वत:चे जिवापाड प्रयत्न आणि शौर्य आणि साहसाचा भाग किती होता आणि अल्लाहच्या मेहरबानीचा भाग किती आहे. म्हणून हा माल कशाप्रकारे वाटला जावा याचा निर्णय करणे तुमचे नव्हे तर अल्लाहचे काम आहे.

६) या वाक्याचे संबंधित काफिर कुरैश आहेत ज्यांचा बदरच्या युद्धात पराभव झाला होता.



माहीत व्हावे की सत्याचा इन्कार करणाऱ्यांसाठी नरकाची यातना आहे. (१२-१४)

हे श्रद्धावंतांनो, जर तुमची एक लष्कराच्या रूपात अश्रद्धावंतांशी गाठ पडली तर त्यांच्या मुकाबल्यात पाठ दाखवू नका. ज्यांनी अशा प्रसंगी पाठ दाखविली - याव्यतिरिक्त की युद्धाचा पवित्रा म्हणून अथवा एखाद्या दुसऱ्या फौजेस जाऊन मिळण्यासाठी - तर तो अल्लाहच्या कोपात वेढला जाईल. त्याचे ठिकाण नरक असेल, आणि ते अत्यंत वाईट परतण्याचे ठिकाण आहे. (१५-१६)

तेव्हा वस्तुस्थिती अशी आहे की तुम्ही त्यांना ठार केले नाही तर अल्लाहने त्यांना ठार केले, आणि हे पैगंबर (स.), दगड तू फेकले नाहीस तर अल्लाहने फेकले[७] (आणि श्रद्धावंतांचे हात जे या कार्यात वापरले गेले) तर हे अशासाठी होते की अल्लाहने श्रद्धावंतांना एका उत्तम परीक्षेतून यशस्वीपणे पार पाडावे. खचितच अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे. असा व्यवहार तर तुमच्याशी आहे आणि अश्रद्धावंतांशी व्यवहार असा आहे की अल्लाह त्यांची कारस्थाने निष्प्रभ करणारा आहे. (या अश्रद्धावंतांना सांगा), ''ज्याअर्थी तुम्हाला निर्णय हवा होता तर घ्या, निर्णय तुमच्यासमोर आलेला आहे.[८] आता परावृत्त व्हा, हे तुमच्यासाठी उत्तम आहे, अन्यथा पुन्हा परतून त्याच मूर्खपणाची तुम्ही पुनरावृत्ती केली तर आम्हीदेखील त्याच शिक्षेची पुनरावृत्ती करू व तुमचा जमाव मग तो कितीही मोठा असो तुमच्या काहीच उपयोगी पडणार नाही, अल्लाह श्रद्धावंतांच्या समवेत आहे.'' (१७-१९)

हे श्रद्धावंतांनो! अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करा. आणि आज्ञा ऐकल्यानंतर तिच्यापासून पराङमुख होऊ नका. त्या लोकांसमान होऊ नका ज्यांनी म्हटले की आम्ही ऐकले; वास्तविक ते काही ऐकत नाहीत. नि:संशय अल्लाहजवळ सर्वात वाईट प्रकारच्या जनावरांसारखे बहिरे व मुके लोक ते आहेत जे बुद्धिचा उपयोग करीत नाहीत. जर अल्लाहला माहीत असते की त्यांच्यात थोडादेखील चांगुलपणा आहे तर त्याने जरूर त्यांना ऐकण्याची सद्‌बुद्धी दिली असती. (परंतु चांगुलपणाविना) जर त्याने त्यांना ऐकविले असते तर त्यांनी विमुखतेने पाठ फिरविली असती. (२०-२३)

हे श्रद्धावंतांनो! तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या हाकेला प्रतिसाद द्या जेव्हा

७) बदरच्या लढाईत जेव्हा मुसलमान आणि काफिरांचे सैन्य परस्पराविरूद्ध उभे ठाकले आणि हातघाईचा प्रसंग आला तेव्हा पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी मूठभर वाळू हातात घेऊन 'शाहितल वूजूह' असे म्हणत ती काफिरांच्या दिशेने फेकली व त्याबरोबरच त्यांच्या संकेतावरून अकस्मातपणे मुसलमानांनी काफिरांवर हल्ला उठविला, त्याच घटनेकडे निर्देश आहे. अर्थ असा की फेकणारा हात तर पैगंबरांचा होता परंतु आघात मात्र अल्लाहकडून होता.

८) मक्केहून निघताना अनेकेश्वरवाद्यांनी काबागृहाचे पडदे धरून प्रार्थना केली होती की परमेश्वरा, दोन्ही समूहांपैकी जो श्रेष्ठ आहे त्याला विजय प्रदान कर.

की पैगंबराने तुम्हाला अशा गोष्टीकडे बोलवावे जी तुम्हाला जीवन प्रदान करणारी असेल आणि लक्षात ठेवा, अल्लाह मनुष्य व त्याच्या हृदयाच्या दरम्यान विद्यमान आहे आणि त्याच्याचकडे तुम्ही एकत्र केले जाल. आणि सावध राहा त्या उपद्रवापासून ज्याचा दुष्परिणाम प्रामुख्याने फक्त त्याच लोकांपर्यंत मर्यादित राहणार नाही ज्यांनी तुम्हापैकी पाप केलेले असेल[९] आणि जाणून असा की अल्लाह कठोर शिक्षा देणारा आहे. स्मरण करा ती वेळ जेव्हा तुम्ही थोडे होता, भूतलावर तुम्हाला दुर्बल लेखले जात होते, तुम्ही भीत होता की एखादेवेळी लोकांनी तुम्हाला नामशेष करू नये. मग अल्लाहने तुम्हाला आश्रयस्थान उपलब्ध करून दिले, आपल्या मदतीने तुमचे हात बळकट केले, आणि तुम्हाला चांगली उपजीविका पोहचविली की कदाचित तुम्ही कृतज्ञ बनाल. हे श्रद्धावंतांनो! जाणूनबुजून तुम्ही अल्लाह व त्याच्या पैगंबरांशी बेईमानी करू नका, आपल्या अमानतींमध्ये[१०] अफरातफर करू नका. हे जाणून असा की तुमची मालमत्ता व तुमची मुले-बाळे खरे पाहता परीक्षा-साधने होत आणि अल्लाहजवळ मोबदला देण्यासारखे बरेच काही आहे. हे श्रद्धावंतांनो! जर तुम्ही ईशपरायणता अंगिकाराल तर अल्लाह तुमच्यासाठी कसोटी उपलब्ध करून देईल.[११] व तुमच्यातील वाईटपणा तुम्हापासून दूर करील आणि तुमचे अपराध माफ करील. अल्लाह अत्यंत कृपा करणारा आहे. (२४-२९)

आणि तो प्रसंग देखील आठवण्याजोगा आहे जेव्हा सत्य नाकारणारे तुझ्याविरूद्ध युक्त्या योजीत होते की, एक तर तुला कैद करावे अथवा ठार मारावे किंवा देशांतर

९) याने अभिप्रेत ते सामूहिक उपद्रव आहेत जे रोगराईच्या साथीसमान अशी आपत्ती आणतात ज्यात केवळ पाप करणारेच सापडतात असे नव्हे तर जे लोक केवळ पापी समाजात राहणे सहन करीत असतात असे लोकसुद्धा सापडतात.

१०) आपल्या 'अमानती'ने अभिप्रेत अशा सर्व जबाबदाऱ्या आहेत ज्या एखाद्यावर विश्वास टाकून त्याच्या स्वाधीन केल्या जातात. मग त्या करारपालनाच्या जबाबदाऱ्या असोत की सामूहिक करार-मदारच्या, अथवा जमातच्या गुपितांची किंवा वैयक्तिक अथवा सामुदायिक मालमत्तेच्या, किंवा एखाद्या व्यक्तीवर विश्वास ठेवून एखाद्या जमातने तिच्या सुपूर्द केलेल्या हुद्याच्या व पदाच्या असोत.

११) 'कसोटी' खऱ्या आणि खोट्यातील फरक स्पष्ट करणाऱ्या गोष्टीला म्हणतात हाच अर्थ 'फुर्कान' याचाही आहे. म्हणूनच आम्ही 'फुर्कान'चा अनुवाद 'कसोटी' केला आहे. ईश्वरी कथनाचा मतितार्थ असा की जर तुम्ही जगात अल्लाहचे भय बाळगून काम कराल तर अल्लाह तुमच्यात अशी पारखशक्ती निर्माण करील जेणेकरून पदोपदी तुम्हाला स्वत:च कळत राहील की कोणते वर्तन योग्य आहे आणि कोणते अयोग्य, कोणता मार्ग सत्य आहे आणि ईश्वराकडे नेतो तर कोणता मार्ग असत्य आहे आणि शैतानाशी जोडतो.



करावे.[१२] ते आपल्या चाली खेळत होते आणि अल्लाह आपली चाल खेळत होता. नि:संशय अल्लाह सर्वोत्तम चाल खेळणारा आहे. जेव्हा त्यांना आमची वचने ऐकविली जात होती तेव्हा म्हणत होते की, "होय, ऐकले आम्ही! आम्ही इच्छिले तर अशाच गोष्टी आम्हीदेखील सांगू शकतो, या तर त्याच जुन्या कथा आहेत ज्या पूर्वापार लोक सांगत आले आहेत." आणि ती गोष्ट देखील स्मरणात आहे जी त्यांनी सांगितली होती की, "हे अल्लाह, जर हे खरोखर सत्य आहे तुझ्याकडून तर आमच्यावर आकाशांतून दगडांचा वर्षाव कर किंवा एखादा दु:खदायक प्रकोप आमच्यावर आण." त्यावेळेस तर अल्लाह त्यांच्यावर प्रकोप कोसळविणार नव्हता जेव्हा तू त्यांच्यामध्ये उपस्थित होतास, आणि हा अल्लाहचा शिरस्ता नव्हे की लोक क्षमा मागत आहेत आणि त्याने त्यांना यातना द्याव्यात. परंतु आता त्याने त्यांच्यावर कोप का पाठवू नये जेव्हा ते मसजिदेहराम (काबा मसजिद) चा मार्ग रोखत आहेत व खरे पाहता ते त्या मसजिदचे अधिकृत व्यवस्थापक नाहीत. तिचे अधिकृत व्यवस्थापक तर ईशपरायण लोकच असू शकतात परंतु बहुसंख्य लोकांना ही गोष्ट माहीत नाही. अल्लाहच्या घराजवळ या लोकांची नमाज काय असते? केवळ ते शिट्या वाजवतात व टाळ्या पिटतात तर घ्या आता या प्रकोपाचा आस्वाद, आपल्या त्या सत्याच्या इन्कारापायी जे तुम्ही करीत राहिला आहात, ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला ते मालमत्ता अल्लाहच्या मार्गापासून रोखण्यासाठी खर्च करीत आहेत व आता आणखीही खर्च करीत राहतील. परंतु सरतेशेवटी हेच प्रयत्न त्यांच्यासाठी पश्चात्तापाचे कारण बनतील मग पराभूत होतील, मग हे अश्रद्धावंत नरकाकडे घेरून आणले जातील. ते या करिता की अल्लाहने वाईटाला बाहेर काढून पवित्रतेपासून वेगळे करावे आणि सर्व प्रकारचे वाईट एकत्र करून मग त्या ढीगाला नरकामध्ये ढकलून द्यावे. हेच लोक खरे नुकसान प्राप्त करणारे आहेत. (३०-३७)

हे पैगंबर (स.), या अश्रद्धावंतांना सांगा की जर आता देखील परावृत्त झाले तर पूर्वी जे काही घडलेले आहे ते माफ केले जाईल, परंतु जर हे त्याच पूर्वीच्या चालीची पुनरावृत्ती करतील तर पूर्वीच्या लोकांशी जे काही घडले आहे ते सर्वांना माहीत आहे. (३८)

हे श्रद्धावंतांनो! या अश्रद्धावंतांशी युद्ध करा इथपर्यंत की हिंसाचार शिल्लक राहू

१२) हा त्या प्रसंगाचा उल्लेख आहे जेव्हा, पैगंबर हजरत मुहम्मद (स.) हे देखील मदीनेस प्रयाण करतील, अशी कुरैशांना वाटत असलेल्या या भीतीला आता खात्रीचे स्वरूप आले होते. त्यावेळी ते आपसात म्हणू लागले की जर हा माणूस मक्केतून बाहेर पडला तर मग तो आमच्या आवाक्यापलीकडचा होईल. म्हणून त्यांनी पैगंबर (स.) संबंधी अंतिम निर्णय घेण्यासाठी एक सभा घेतली आणि या संकटाचे विवरण कसे करता येईल याबाबतीत परस्परात सल्लामसलत केली.

नये आणि धर्म सर्वस्वी अल्लाहसाठी व्हावा. मग जर ते हिंसाचारापासून परावृत्त झाले तर त्यांची कृत्ये पाहणारा अल्लाह आहे, पण जर का त्यांनी मानले नाही तर समजून असा की अल्लाह तुमचा वाली आहे, आणि तो सर्वोत्तम सहायक व मदतगार आहे.

(३९-४०)

आणि तुम्हाला माहीत असावे की जो काही गनिमीमाल तुम्ही हस्तगत केला आहे,[१३] त्याचा पाचवा वाटा अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) व नातेवाईक व अनाथ, व गोर-गरीब व वाटसरू यांच्याकरिता आहे. जर तुम्ही श्रद्धा ठेवली आहे अल्लाहवर आणि त्या गोष्टीवर जी निर्णयाच्या दिवशी अर्थात दोन्ही सैन्याची गाठ पडण्याच्या दिवशी, आम्ही आमच्या दासावर अवतरली होती,[१४] (तर हा वाटा स्वखुशीने अदा करा) अल्लाह सर्व गोष्टींना समर्थ आहे. (४१)

आठवा तो प्रसंग जेव्हा तुम्ही खोऱ्याच्या अलीकडे होता आणि ते पलीकडे पडाव टाकून होते आणि काफिला तुमच्या खालच्या बाजूला होता; जर एखादेवेळी पूर्वीच तुमच्या आणि त्यांच्यामध्ये मुकाबल्याचा करार होता तर निश्चितच तुम्ही या प्रसंगाला बगल दिली असती, परंतु जे काही घडले त्याचे कारण असे की ज्या गोष्टीचा निर्णय अल्लाहने घेतलेला होता त्याला अल्लाहने प्रत्यक्षात आणावे म्हणजे जी नष्ट होणार आहे त्याने उघडपणे नष्ट व्हावे व ज्याला जिवंत राहावयाचे आहे त्याने उघडपणे जिवंत रहावे; खचितच अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे. (४२)

आठवा तो प्रसंग जेव्हा हे पैगंबर (स.), अल्लाह तुमच्या स्वप्नांत त्यांना थोडे करून दाखवीत होता.[१५] जर एखाद्या वेळेस तुम्हाला त्याने त्यांची संख्या जास्त दाखविली असती तर निश्चितच तुम्ही लोकांनी धीर सोडला असता आणि युद्धाच्या बाबतीत तुम्ही तंटा सुरू केला असता; परंतु अल्लाहनेच त्यापासून वाचविले. निःसंशय तो मनातील स्थिती देखील जाणणारा आहे. (४३)

**१३)** भाषणाच्या प्रारंभीच ज्या गनिम मालासंबंधी सांगितले गेले होते की हे अल्लाहचे बक्षीस आहे, त्यासंबंधी निर्णय देण्याचा अधिकार अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यानाच प्राप्त आहे. त्याच, गनिममालाच्या वाटणीचा नियम सांगून आता तो निर्णय दिला गेला आहे.

**१४)** म्हणजे ज्याद्वारे तुम्हाला विजय प्राप्त झाला व ज्याद्वारे तुम्हाला हा गनिममाल हस्तगत झाला ते सहाय्य व समर्थन.

**१५)** ही त्यावेळेची गोष्ट आहे जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) मुसलमानांना घेऊन मदीन्याहून निघत होते अथवा वाटेत एखाद्या मुक्कामी होते आणि काफिरांचे सैन्य प्रत्यक्षात किती आहे, अद्याप त्याची खात्री झाली नव्हती. त्यावेळी पैगंबर (स.) यांनी स्वप्नात ते सैन्य पाहिले, त्यात जे दृश्य त्यांच्यासमोर प्रस्तुत केले गेले त्यावरून शत्रूसंख्या काही फार जास्त नाही अशीच त्यांची कल्पना झाली.



आणि स्मरण करा की जेव्हा मुकाबल्याच्या वेळी अल्लाहने तुम्हा लोकांच्या नजरेत शत्रूंना कमी दाखविले आणि त्यांच्या नजरेंत तुम्हाला कमी करून दाखविले जेणेकरून जी गोष्ट घडणार होती तिला अल्लाहने प्रत्यक्षात आणावे, आणि सरतेशेवटी सर्व मामले अल्लाहकडेच रुजू होतात. (४४)

हे श्रद्धावंतांनो! जेव्हा एखाद्या समूहाशी तुमचा सामना होईल तेव्हा दृढ राहा, आणि अल्लाहचे खूप स्मरण करा, अपेक्षा आहे की तुम्हाला यश मिळेल. व अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आज्ञा पाळा व आपसांत भांडू नका नाहीतर तुमच्यात दुर्बलता येईल व तुमचा वचक नाहीसा होईल. संयम राखा.[१६] निश्चितच अल्लाह संयमी लोकांबरोबर आहे. आणि त्या लोकांसमान रंगढंग अंगिकारू नका जे आपल्या घरातून ऐटीत आणि लोकांना आपली शान दाखवीत निघाले व ज्यांचे वर्तन असे आहे की अल्लाहच्या मार्गापासून रोखतात, जे काही ते करत आहेत ते अल्लाहच्या पकडीच्या बाहेर नाही. (४५-४७)

जरा विचार करा त्या प्रसंगाचा जेव्हा शैतानाने त्या लोकांच्या कारवाया त्यांच्या दृष्टीत शोभिवंत करून दाखविल्या होत्या आणि त्यांना सांगितले होते की आज कोणीही तुमच्यावर वर्चस्व मिळवू शकत नाही आणि असे की मी तुमच्या संगतीत आहेत, मग जेव्हा दोन्ही समूह समोरासमोर उभे ठाकले तेव्हा तो उलट्या पाऊली फिरला आणि म्हणू लागला की माझी तुमची संगत नाही, मी काही पहात आहे ते तुम्ही पाहात नाही. मला अल्लाहची भीती वाटते, आणि अल्लाह फार कठोर शिक्षा देणारा आहे जेव्हा दांभिक आणि ते सर्व लोक ज्यांच्या हृदयांना रोग जडला आहे म्हणत होते की या लोकांना तर

**१६)** म्हणजे आपल्या भावना व आपल्या इच्छा आकांक्षा नियंत्रणात ठेवा. उतावीळपणा, घबराट, भीती आणि अनुचित जोश यापासून दूर राहा. शांतचित्त आणि समतोल निर्णयशक्तिने काम करा. धोके व संकटे तुमच्यासमोर असतील तर तुमचे पाय डळमळू नयेत. चिथावणी देणारे प्रसंग आले तर क्रोधाग्नीने प्रक्षोभित होऊन एखादी अयोग्य कृती तुमच्या हातून घडता कामा नये. संकटे चाल करून येत असली आणि परिस्थिती वाईट होत असल्याचे दिसत असेल तर अस्वस्थतेमुळे तुमचे भान हरपता कामा नये. ध्येयप्राप्तीच्या आसक्तीपोटी बेचैन होऊन अथवा एखाद्या अपरिपक्व युक्तिला वरकरणी परिणामकारक पाहून तुमचे इरादे उतावीळपणाचे बळी ठरू नयेत. तसेच यदाकदाचित ऐहिक लाभ व फायदे आणि वासनातृप्तीचे प्रलोभन तुम्हाला आपल्याकडे आकर्षित करीत असेल तर त्यांच्या मुकाबल्यातसुद्धा बेफाम होऊन तुम्ही त्यांच्याकडे ओढवले जावेत इतके दुर्बल तुमचे मन बनू नये. सदरहू सर्वच अर्थ एक शब्द 'सब्र' (संयम) यात गर्भित आहेत. सर्वोच्च अल्लाह फर्मावितो की जे लोक अशा सर्व प्रकारे संयमी असतील तर माझे सहाय्य त्यांनाच प्राप्त आहे.

यांच्या धर्माने पछाडले आहे.[१७] वस्तुत: जर एखाद्याने अल्लाहवर विश्वास ठेवला तर निश्चितच अल्लाह मोठा सामर्थ्यशाली व बुद्धिमान आहे. जर तुम्ही ते दृश्य पाहू शकला असता तर किती छान झाले असते! जेव्हा दूत विद्रोह्यांचे प्राण हरण करताना त्यांच्या चेहऱ्यावर व पाठीवर मारा करीत म्हणत होते, "घ्या आता जळण्याची शिक्षा भोगा, हा तो मोबदला आहे ज्याची सामग्री तुम्ही स्वहस्ते अगोदरच उपलब्ध करून ठेवलेली होती, एरव्ही अल्लाह तर आपल्या दासांवर मुळीच अत्याचार करणारा नव्हे." हा प्रसंग यांच्यावर तसाच ओढवला जसा तो फिरऔनवाल्यांवर व त्यांच्या पूर्वीच्या लोकांवर ओढवत राहिला आहे, की त्यांनी अल्लाहच्या संकेतांना मान्य करण्यास नकार दिला आणि अल्लाहने त्यांच्या अपराधापायी त्यांना पकडले, अल्लाह शक्तिशाली व कठोर शिक्षा करणारा आहे. हे अल्लाहच्या या रीतीप्रमाणेच घडले की तो आपली कोणतीही श्रेष्ठ देणगी की जी त्याने एखाद्या जनसमूहाला बहाल केलेली असेल तोपर्यंत बदलत नाही जोपर्यंत ते लोक स्वत:च्या कार्यपद्धतीत बदल करीत नाहीत. अल्लाह सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. फिरऔनवाले व त्यांच्या पूर्वीच्या लोकांच्या संबंधाने जे काही घडले ते याच नियमाप्रमाणे होते. त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या वचनांना खोटे लेखले, तेव्हा आम्ही त्यांच्या अपराधामुळे त्यांना नष्ट करून टाकले आणि फिरऔनवाल्यांना बुडवून टाकले. हे सर्व अत्याचारी लोक होते. (४८-५४)

खचितच अल्लाहजवळ जमिनीवर चालणाऱ्या निर्मितीपैकी सर्वात जास्त वाईट ते लोक आहेत ज्यांनी सत्य मानण्यास नकार दिला मग कोणत्याही प्रकारे ते स्वीकारण्यास ते तयार नाहीत. (विशेषत:) त्यांच्यापैकी ते लोक ज्यांच्याशी तू करार केला मग ते प्रत्येक प्रसंगी तो भंग करतात आणि त्यांना जरा देखील ईश्वराच्या प्रकोपाचे भय वाटत नाही.[१८] म्हणून जर हे लोक तुम्हाला युद्धात सापडले तर त्यांचा असा समाचार घ्या की

**१७)** अर्थात मदीनेतील दांभिक आणि ऐहिक लालसा व ईश्वराच्या विस्मरणाचा रोग ज्यांना जडला होता असे सर्व लोक. हे पाहून की मुसलमानांची मूठभर संख्या आणि शस्त्रसामग्रीरहित जमाव कुरैशासारख्या बलाढ्य शक्तिशी टक्कर देण्यास निघाली आहे. आपापसात हे म्हणत होते की हे लोक आपल्या धार्मिक जोशापायी वेडे झाले आहेत. या लढाईत यांचा सर्वनाश आहे यात शंकाच नाही. तरीसुद्धा यांच्या पैगंबराने यांच्यावर काही अशी मोहिनी घातली आहे की यांची मती मारली गेली आहे आणि उघड्या डोळ्याने ते मृत्यूच्या जबड्यात जात आहेत.

**१८)** या ठिकाणी विशेषकरून संकेत आहे यहूदी लोकांकडे, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी त्यांनी करार केलेला होता तरी देखील ते पैगंबर (स.) आणि मुसलमानांच्याविरूद्ध प्रयत्नशील होते. बदरच्या युद्धानंतर लगेच त्यांनी सूड उगविण्यासाठी कुरैशांना भडकविण्याचे सुरू केले होते.



त्यांच्यानंतर जे लोक असले वर्तन अंगिकारणारे असतील त्यांचे भान हरपले जाईल.[१९] अपेक्षा आहे की करार-भंग करणाऱ्यांच्या या अशा शेवटाने ते धडा घेतील. आणि जर तुम्हाला एखाद्या लोकसमुदायाकडून दगलबाजीची भीती असेल तर त्यांचे करार जाहीरपणे त्यांच्या तोंडावर फेकून द्या.[२०] निश्चितच अल्लाह विश्वासघातकी लोकांना पसंत करीत नाही. सत्याचा इन्कार करणाऱ्यांनी या भ्रमात पडू नये की त्यांनी विजय मिळविला. खचितच ते आम्हाला हरवू शकत नाहीत. (५५-५९)

आणि तुम्ही लोक, यथाशक्ती जास्तीत जास्त सामर्थ्य आणि तयार बांधून ठेवले जाणारे घोडे सज्ज ठेवा.[२१] जेणेकरून त्यायोगे अल्लाहच्या व आपल्या शत्रूंना आणि त्या इतर वैऱ्यांना भयभीत करावे ज्यांना तुम्ही जाणत नाही परंतु अल्लाह जाणतो. अल्लाहच्या मार्गात जे काही तुम्ही खर्च कराल त्याची पुरेपूर तुम्हाला परतफेड केली जाईल व तुमच्यावर कदापि अन्याय होणार नाही. (६०)

आणि हे पैगंबर (स.), जर शत्रूंचा कल, तह व शांततेकडे असेल तर तुम्ही देखील त्यासाठी तयार व्हा आणि अल्लाहवर भरोसा ठेवा. नि:संशय तोच सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. आणि जर ते दगाफटका करण्याची नियत बाळगून असतील तर तुमच्यासाठी अल्लाह पुरेसा आहे. तोच तर आहे ज्याने आपल्या मदतीने व श्रद्धावंतांच्याद्वारे तुमचे समर्थन केले. आणि श्रद्धावंतांची हृदये एकमेकाशी जोडली. तुम्ही पृथ्वीतलावरील सारी संपत्ती जरी खर्च केली असती तरीसुद्धा या लोकांची हृदये जोडू शकला नसता; परंतु तो अल्लाह आहे ज्याने यांची हृदये जोडली. खचितच तो मोठा सामर्थ्यशाली व बुद्धिमान आहे. हे नबी (स.)! तुमच्यासाठी आणि तुमच्या श्रद्धावंत

**१९)** याचा अर्थ असा की जर एखाद्या राष्ट्राशी आमचा करार झाला असेल त्यानंतरही करारपालनाच्या आपल्या जबाबदाऱ्या डावलून ते आमच्याविरूद्ध एखाद्या युद्धात भाग घेत असेल तेव्हा आम्हीदेखील कराराच्या नैतिक जबाबदाऱ्यातून मुक्त होऊ व त्यांच्याशी युद्ध करावे हा आमचा हक्क राहील. तसेच जर एखाद्या राष्ट्राशी आमचे युद्ध चालले असेल आणि आम्ही ज्याच्याशी करार केलेला आहे अशा राष्ट्राचे लोकसुद्धा शत्रूबरोबर युद्धात सामील झाले असल्याचे आम्हाला दिसले तर आम्ही त्यांना ठार करण्यात व शत्रूसारखाच त्यांच्याशीही व्यवहार करण्यात यत्किंचितदेखील मागेपुढे पाहणार नाही.

**२०)** म्हणजे त्याला स्पष्टपणे बजावून सांगा की आमचा व तुमचा आता कोणताही करार झालेला नाही कारण तुम्ही करार भंग करीत आहात.

**२१)** अर्थ असा की तुमच्याजवळ युद्धसामग्री आणि एक कायमस्वरूपी सैन्य सदोदित तयार असले पाहिजे जेणेकरून जरूरीच्या वेळी तातडीची कारवाई करता यावी. असे होता कामा नये की संकट डोक्यावर आले असता घाबरून घाईगर्दीने स्वयंसेवक, शस्त्रास्त्रे आणि रसद गोळा करण्याच्या प्रयत्नास लागावे आणि तुमची सज्जता होण्याअगोदर शत्रूने आपले काम उरकून घ्यावे.

अनुयायांकरिता तर बस अल्लाह पुरेसा आहे. (६१-६४)

हे नबी (स.)! श्रद्धावंतांना युद्धाचे प्रोत्साहन द्या. जर तुमच्यापैकी वीस जण संयमी असतील तर ते दोनशे जणांवर मात करतील. आणि जर शंभर माणसे अशी असतील तर ते सत्य नाकारणाऱ्यांपैकी हजार माणसांना भारी ठरतील; कारण ते असले लोक आहेत ज्यांना जाण नाही.[२२] बरे, आता अल्लाहने तुमचे भार हलके केले आणि त्याला कळून आले की अजून तुमच्यात दुर्बलता आहे, म्हणून जर तुमच्यापैकी शंभर जण संयमी असतील तर ते दोनशेवर आणि तुमच्यात असे एक हजार असतील तर ते अल्लाहच्या हुकुमाने दोन हजारांना भारी ठरतील.[२३] आणि अल्लाह त्या लोकांसमवेत आहे जे संयमी आहेत. (६५-६६)

कोणत्याही नबीसाठी हे उचित नाही की त्याच्याजवळ कैदी असावेत जोपर्यंत तो पृथ्वीतलावरील शत्रूंना पुरेपूर ठेचून काढत नाही. तुम्ही लोक लौकिक लाभाची इच्छा करता, वास्तविकत: अल्लाहच्या दृष्टीसमोर मरणोत्तर जीवन आहे; आणि अल्लाह प्रभुत्वसंपन्न आणि बुद्धिमान आहे. जर अल्लाहचे लिखित यापूर्वीच लिहिले गेले नसते तर जे काही तुम्हा लोकांनी घेतले आहे त्यापायी तुम्हाला मोठी शिक्षा दिली गेली असती. तर जे काही माल तुम्ही हस्तगत केला आहे तो खा कारण की तो वैध व शुद्ध आहे आणि

२२) आजकालच्या परिभाषेत ज्याला यथार्थशक्ति अथवा नैतिक धैर्य (मोराल) म्हणतात. सर्वोच्च अल्लाहने त्याच गोष्टीला बोध आणि विवेक म्हणून संबोधिले आहे. ज्या माणसाला आपल्या ध्येयाचा योग्य विवेक असेल आणि शांत चित्ताने खूप समजूनउमजून यासाठी तो झटत असेल की ज्या गोष्टीसाठी तो प्राणपणाला लावण्यासाठी आला आहे ती त्याच्या वैयक्तिकजीवनापेक्षा जास्त मौल्यवान आहे व ती गमावल्यानंतर जिण्याला अर्थ नाही, तो अविवेकीपणे लढणाऱ्या माणसापेक्षा कित्येक पटीने जास्त सामर्थ्य राखतो, शारीरिक दृष्टीने उभयतां दरम्यान काहीच फरक नसला तरी.

२३) याचा अर्थ असा नव्हे की अगोदर एकाविरूद्ध दहा असे प्रमाण होते आणि आता तुमच्यात दुर्बलता आली आहे म्हणून एकाविरूद्ध दोन असे प्रमाण निश्चित केले आहे. तर याचा वास्तविक अर्थ असा की तात्त्विक आणि अंतिम प्रमाणानुसार तर ईमानधारक आणि काफिरांच्या दरम्यान अनुक्रमे एक आणि दहा हेच प्रमाण आहे. परंतु ज्याअर्थी अद्याप तुम्हा लोकांवर नैतिक संस्कार परिपूर्ण झालेले नाहीत व अद्याप देखील तुमचा विवेक व तुमच्या उणीवेनुसार तूर्ततरी आपल्यापेक्षा दुप्पट शक्तीशी टक्कर देण्यात तुम्ही कुचराई करू नये. हे तुमच्याकडून अपेक्षित आहे. लक्षात असले पाहिजे की हे विधान हि. स. २ चे आहे जेव्हा की मुसलमानांपैकी बहुतेक लोकांनी नुकताच इस्लाम प्रवेश केला होता व त्यांच्यावरील संस्कार प्राथमिक अवस्थेत होते.



अल्लाहचे भय बाळगून असा.[२४] नि:संशय अल्लाह क्षमाशील आणि दया दाखविणारा आहे. (६७-६९)

हे नबी (स.), तुम्हा लोकांच्या ताब्यात जे कैदी आहेत त्यांना सांगा की जर अल्लाहला कळून आले की तुमच्या हृदयात काही चांगुलपणा आहे तर तो तुम्हाला त्यापेक्षा वरचढ देईल जे तुमच्याकडून घेण्यात आले आहे, आणि तो तुमचे अपराध माफ करील, अल्लाह क्षमाशील व दयाळू आहे. परंतु ते जर तुझ्याशी विश्वासघाताचा मानस ठेवत आहेत तर यापूर्वी त्यांनी अल्लाहशी प्रतारणा केलेली आहे, म्हणून त्याचीच अल्लाहने शिक्षा त्यांना दिली की ते तुझ्या ताब्यात आले, अल्लाह सर्वकाही जाणणारा व बुद्धिमान आहे. (७०-७१)

ज्या लोकांनी श्रद्धा स्वीकारली आणि स्थलांतर केले आणि अल्लाहच्या मार्गात आपले प्राण पणाला लावले व आपली मालमत्ता खर्च केली व ज्या लोकांनी स्थलांतर करणाऱ्या लोकांना आश्रय दिला व त्यांना मदत केली; ते खरोखर एकमेकाचे वाली आहेत. उरले ते लोक ज्यांनी श्रद्धा तर ठेवली परंतु ज्यांनी स्थलांतर केले नाही त्यांच्याशी पालकत्वाचे तुमचे काहीही संबंध नाहीत जोपर्यंत ते स्थलांतर करून येत नाहीत.[२५] परंतु जर ते धर्माच्या बाबतीत तुमच्याकडून मदत मागतील तर त्यांना मदत करणे तुमचे कर्तव्य

२४) बदरच्या युद्धापूर्वी युद्धासंबंधी सूरह मुहम्मदमध्ये जे प्राथमिक स्वरूपाचे आदेश दिले गेले होते, त्यात युद्ध कैद्यांकडून मोबदला घेण्याची परवानगी तर दिलेली होती, परंतु त्याचबरोबर अशी अटही घातली गेली होती की अगोदर शत्रूच्या शक्तिचा चांगल्या प्रकारे बिमोड केला जावा नंतरच कैदी पकडण्याकडे लक्ष दिले जावे. सदरहू आदेशानुसार मुसलमानांनी बदरच्या युद्धात जे कैदी पकडले व नंतर त्यांच्याकडून जो मोबदला वसूल केला तो होता तर परवानगीनुसारच. परंतु चूक अशी झाली की शत्रूच्या शक्तिचा बिमोड करण्याच्या ज्या अटीला अग्रक्रम दिला होता ती अट पूर्ण करण्याअगोदरच शत्रूंना कैद करण्यात आणि गनिम माल गोळा करण्यात मुसलमान मशगूल झाले. ही गोष्ट सर्वोच्च अल्लाहला पसंत पडली नाही. कारण जर असे केले गेले नसते आणि मुसलमानांनी शत्रूंचा पाठलाग केला असता तर कुरैशांच्या शक्तिचा त्याच वेळी बिमोड झाला असता.

२५) 'विलायत' हा शब्द अरबी भाषेत समर्थन, सहाय्य, मदत, पुष्टी, मित्रता, जवळीक, पालकत्व व यांच्याशी मिळत्याजुळत्या अर्थासाठी वापरला जातो. सदरहू आयतच्या संदर्भात स्पष्टपणे अभिप्रेत ते संबंध आहेत जे एका राज्याचे आपल्या नागरिकांशी आणि नागरिकांचे आपल्या राज्याशी आणि नागरिकांचे परस्परात एकमेकाशी असतात. अशा प्रकारे ही आयत घटनात्मक आणि राजनैतिक 'विलायत'ला इस्लामी राज्याच्या प्रादेशिक मर्यादेत राखते व त्या मर्यादेबाहेरील मुसलमानांना या विशिष्ट संबंधबाह्य असलेले ठरविते. सदरहू विलायत-रहित असण्याचे कायद्यात्मक परिणाम फार विस्तृत आहेत. या ठिकाणी त्यांचा तपशील देण्यास वाव नाही.

होय; परंतु अशा कोणत्याही जनसमुदायाच्याविरूद्ध नव्हे की ज्यांच्याशी तुमचा करार झालेला आहे.[२६] जे काही तुम्ही करता ते अल्लाह पाहतो. (७२)

आणि जे सत्याचा इन्कार करणारे आहेत ते एकमेकाचे सहाय्य करीत असतात. जर तुम्ही हे केले नाही तर पृथ्वीवर उत्पात आणि भयंकर बिघाड उद्भवेल.[२७] ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी अल्लाहच्या मार्गात घरदारांचा त्याग केला, संघर्ष केला व ज्यांनी आश्रय दिला व मदत केली तेच खरे श्रद्धावंत आहेत. त्यांच्यासाठी अपराधांची क्षमा व सर्वोत्तम उपजीविका आहे आणि ज्या लोकांनी नंतर श्रद्धा ठेवली आणि स्थलांतर करून आले व तुमच्याशी मिळून संघर्ष करू लागले, त्यांचासुद्धा तुमच्यात समावेश आहे. पण अल्लाहच्या ग्रंथात रक्ताचे नातेवाईक आपापसांत एक दुसऱ्याचे अधिक हक्कदार आहेत.[२८] नि:संशय अल्लाह प्रत्येक गोष्टीला जाणतो. (७३-७५)

---

**२६)** वरील विधानात इस्लामी राज्या (दारूल इस्लाम) च्या बाहेर राहणाऱ्या मुसलमानांना राजनैतिक विलायतच्या संबंधबाह्य ठरविले गेले होते. आता सदरहू आयत ही गोष्ट स्पष्ट करते की त्या संबंधाच्या बाहेर असताना देखील ते 'धार्मिक बंधुत्वा'च्या संबंधाचे बाहेर नाहीत. जर एखाद्या ठिकाणी त्यांच्यावर अत्याचार होत असेल आणि त्यांनी इस्लामी बंधुत्वाच्या संबंधाच्या आधारे 'दारूलइस्लाम'च्या सत्तेला व तेथील रहिवाश्यांना मदतीची हाक दिली तर आपल्या अत्याचारपीडित बंधूना सहाय्य करणे हे त्यांचे कर्तव्य राहील. परंतु यानंतर पुन्हा स्पष्टीकरण करताना फर्मावले आहे की त्यांच्या धार्मिक बंधुंच्या सहाय्याचे कर्तव्य अंधाधुंदपणे पार पाडले जाणार नाही तर आंतरराष्ट्रीय जबाबदाऱ्या आणि नैतिक मर्यादांचे आदर व बूज राखूनच ते पार पाडले जाईल. जर अत्याचार करणाऱ्या राष्ट्राशी 'दारूलइस्लाम'चे करार-मदाराचे संबंध असतील तर अशा परिस्थितीत अत्याचारपीडित मुसलमानांना असली कोणतीही मदत केली जाऊ शकणार नाही जी करारमदारांच्या नैतिक जबाबदारीच्याविरूद्ध ठरत असेल.

**२७)** म्हणजे जर 'दारूल इस्लाम'मधील मुसलमान एकमेकाचे 'वाली' बनत नसतील आणि हिजरत करून दारूल इस्लाममध्ये येत नसणाऱ्या व 'दारूलकुफ्र'मध्येच वास्तव्य करणाऱ्या मुसलमानांना, दारूल इस्लामचे मुसलमान आपल्या राजनैतिक विलायतच्या बाहेरील मानत नसतील, आणि जर बाहेरच्या अत्याचारपीडित मुसलमानांच्या मदतीच्या हाकेनंतर त्यांना मदत केली गेली नाही व त्याचबरोबर, ज्या राष्ट्राशी इस्लामी राज्याचे करार-मदार असेल तेथील मुसलमानांना कराराविरूद्ध मदत केली जाणार नाही, या कायद्याचेही पालन केले गेले नाही, आणि जर मुसलमानांनी काफिरांशी सहकाराचे संबंध समाप्त केले नाही तर पृथ्वीवर उपद्रव आणि भयंकर बिघाड माजेल.

**२८)** म्हणजे वारसासंपत्ती इस्लामी बंधुत्वाच्या आधारावर नव्हे तर नात्याच्या संबंधाच्या आधारे वाटली जाईल. या आशेचे स्पष्टीकरण पैगंबर हजरत मुहम्मद (स.) याची ही आज्ञा आहे की केवळ मुस्लिम नातेवाईकच एकमेकाचे वारस असतील. मुसलमान कोणा काफिराचा व काफिर कोणा मुसलमानाचा वारस ठरणार नाही.



# ९ सूरह अत्तौबा

*(मदीनाकालीन, वचने १२९)*

मुक्तीची घोषणा आहे,[१] अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) कडून त्या अनेकेश्वरवादी लोकांसाठी ज्यांच्याशी तुम्ही करार केले होते.[२] तर तुम्ही देशात आणखी चार महिने संचार करून घ्या आणि जाणून असा की तुम्ही अल्लाहला असफल करणारे नाहीत, आणि अल्लाह सत्याचा इन्कार करणाऱ्यांना अपमानित करणारा आहे. (१-२)

आम सूचना आहे, अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) कडून हज्जे अकबर[३] च्या दिवशी, तमाम लोकांच्यासाठी, की अल्लाह अनेकेश्वरवादी लोकांकडून जबाबदारीपासून मुक्त आहे,

---

**१)** सदरहू आयती रूकुअ क्र. ५ च्या शेवटपर्यंत हि. स. ९ मध्ये अशावेळी उतरल्या होत्या जेव्हा पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी हजरत अबूबकर (रजि.) यांची 'हज' यात्रेसाठी रवानगी केली होती. त्यांच्या पाठीमागे जेव्हा या आयती उतरल्या तेव्हा पैगंबर (स.) यांनी हजरत अली (रजि.) याना पाठविले जेणेकरून हाजी लोकांच्या आम जमावापुढे त्या ऐकविल्या जाव्यात व मग निम्नलिखित चार गोष्टींची घोषणा करावी. (१) जन्नतमध्ये अशी कोणतीही व्यक्ती प्रवेश करू शकणार नाही जी इस्लाम धर्म स्वीकारण्यापासून इन्कार करीत असेल, (२) या वर्षानंतर पुढे कोणीही अनेकेश्वरवादीने हजसाठी येता कामा नये, (३) अल्लाहच्या घराभोवती नग्नावस्थेत प्रदक्षिणा घालण्यास प्रतिबंध आहे. (४) ज्या लोकांशी अल्लाहच्या पैगंबर (स.) चे करार शिल्लक आहेत अर्थात ज्यांनी करारभंग केलेला नाही, कराराच्या मुदतीपर्यंत त्यांचे पालन केले जाईल. या आदेशांनुसार हजरत अली (रजि.) यांनी सदरच्या घोषणा जिलहज महिन्याच्या ३० तारखेला केल्या.

**२)** सूरह अन्फाल आयत क्र. ५८ मध्ये येऊन गेले आहे की जेव्हा एखाद्या राष्ट्राकडून बेइमानी (करारभंग अथवा दगलबाजी) ची भीती असेल तर जाहीरपणे त्याचा करार त्याच्याकडे फेकून द्या व त्यांना सावध करा की आता आमच्या व तुमच्या दरम्यान कोणताच करार उरलेला नाही. या नीतिनियमानुसार करार रद्द करण्याची सदरहू जाहीर घोषणा, करार झालेले असताना देखील जे नेहमी इस्लामविरूद्ध कटकारस्थाने करीत राहिले होते आणि संधी मिळताच करारपालन धाब्यावर बसवून शत्रुत्वासाठी तत्पर होत असत अशा सर्व टोळ्यांविरूद्ध केली गेली. या घोषणेनंतर अरब अनेकेश्वरवादींसाठी याशिवाय इतर कोणताच उपाय उरला नाही की एकतर लढण्यास तयार व्हावे आणि इस्लामी शक्तिशी मुकाबला करून स्वत:चा सर्वनाश ओढवून घ्यावा किंवा देश सोडून निघून जावे अथवा इस्लाम स्वीकारून स्वत:ला आणि आपल्या प्रदेशाला त्या शासनव्यवस्थेच्या ताब्यात द्यावे जिने अगोदरच देशाचा बव्हंशी प्रदेश इस्लामी राज्याच्या अधिपत्याखाली आणला होता.

**३)** हज्जे अकबर (मोठा) हा शब्द हज्जे असगर (लहान हज) च्या तुलनेत आहे. अरब लोक 'उमरा'ला लहान हज म्हणत असत. याविरूद्ध जिलहज्ज महिन्याच्या ठरलेल्या तारखांमध्ये जो हज होतो, त्याला हज्जे अकबर असे म्हटले जाते.

आणि त्याचा पैगंबरसुद्धा. आताही जर तुम्ही पश्चात्ताप केला तर ते तुमच्यासाठीच उत्तम आहे आणि जर तोंड फिरवीत आहात तर चांगले लक्षात ठेवा की तुम्ही अल्लाहला असफल करणारे नाहीत, आणि हे पैगंबर (स.)! सत्याचा इन्कार करणाऱ्यांना कठोर यातनेची खुशखबरी ऐकवा त्या अनेकेश्वरवादींखेरीज ज्यांच्याशी तुम्ही करार केले. आणि त्यांनी तुमच्याशी आपला करार पाळण्यांत कोणतीही कसूर केली नाही व तुमच्याविरूद्ध कुणाला मदतही केली नाही, तेव्हा अशा लोकांशी तुम्ही देखील कराराची मुदत पूर्ण होईपर्यंत प्रामाणिक राहा; कारण अल्लाह ईशपरायण लोकांनाच पसंत करतो. (३-४)

मग जेव्हा निषिद्ध महिने[४] लोटतील तेव्हा त्या अनेकेश्वरवादींना ठार करा, जेथे सापडतील तेथे त्यांची नाकेबंदी करा व प्रत्येक पातळीवर त्यांचा समाचार घेण्यासाठी सज्ज रहा. मग जर त्यांनी पश्चात्ताप केला व नमाज कायम केली आणि जकात दिली तर त्यांना सोडून द्या.[५] अल्लाह क्षमाशील आणि दया दाखविणारा आहे. आणि जर अनेकेश्वरवादींपैकी कोणी इसम शरण मागून तुमच्याकडे येऊ इच्छित असेल जेणेकरून अल्लाहची वाणी ऐकावी तर त्याला आश्रय द्या येथपावेतो की त्याने अल्लाहची वाणी ऐकावी. मग त्याला त्याच्या सुरक्षित ठिकाणी पोहचवा. हे अशासाठी करावयास पाहिजे की या लोकांना ज्ञान नाही. (५-६)

या अनेकेश्वरवाद्यांसाठी अल्लाह व त्याच्या पैगंबराजवळ कोणताही करार कसा बरे असू शकतो? - त्या लोकांखेरीज ज्यांच्याशी मसजिदेहरामजवळ तुम्ही करार केला होता.[६] म्हणून जोपर्यंत ते तुमच्याशी सरळ राहतील तोपर्यंत तुम्ही देखील त्यांच्याशी सरळ राहा, कारण अल्लाह ईशपरायण लोकांना पसंत करतो परंतु यांच्याशिवाय इतर अनेकेश्वरवाद्यांशी कोणताही करार कसा बरे होऊ शकतो; जेव्हा त्यांची स्थिती अशी आहे की तुमच्यावर ताबा मिळविला तर ते तुमच्यासंबंधी नात्यागोत्याचाही विचार करणार नाहीत एखाद्या कराराच्या जबाबदारीचा? ते आपल्या संभाषणाने तुम्हाला प्रसन्न करू पाहतात परंतु हृदये त्यांची नाकारतात व त्यांच्यापैकी बरेचजण अवज्ञाकारी आहेत. त्यांनी अल्लाहच्या वचनांच्या बदल्यात थोडीशी किंमत स्वीकारली, मग अल्लाहच्या मार्गात अडथळा बनून उभे राहिले. फारच वाईट कृत्ये आहेत जी हे करीत राहिले आहेत.

४) या ठिकाणी 'हराम' महिन्याने अभिप्रेत, अनेकेश्वरवाद्यांना जी सवलत दिली गेली होती ते चार महिने आहेत. या सवलतीच्या कालावधीत अनेकेश्वरवाद्यांवर चालून जाणे हे मुसलमानांसाठी वैध नव्हते. म्हणून त्यांना हराम महिने फर्मावले गेले आहे.

५) म्हणजे केवळ कुफ्र आणि अनेकेश्वरवाद वर्ज्य केल्याने प्रकरण संपते असे नाही तर त्यांना नमाज कायम करावी लागेल, जकात द्यावी लागेल अन्यथा त्यांनी कुफ्र टाकून इस्लाम अंगिकारला आहे असे मान्य केले जाणार नाही.

६) म्हणजे किनाना वंशीय, खुजाआ वंशीय आणि जमराह वंशीय.



कोणत्याही श्रद्धावंताच्या बाबतीत हे नात्या-गोत्याचाही विचार करीत नाहीत किंवा एखाद्या कराराच्या जबाबदारीचादेखील नाही. आणि अतिरेक नेहमी यांच्याकडूनच झालेला आहे. पण जर यांनी पश्चात्ताप केला व नमाज कायम केली व जकात दिली तर हे तुमचे धर्मबंधू आहेत.[७] आणि जाणणाऱ्या लोकांसाठी आम्ही आमचे आदेश स्पष्ट करीत आहोत. आणि जर प्रतिज्ञा घेतल्यानंतर यांनी पुन्हा आपल्या शपथा मोडल्या आणि तुमच्या धर्मावर हल्ले करण्यास सुरवात केली तर द्रोहाच्या ध्वजधारकांशी युद्ध करा कारण त्यांच्या शपथा विश्वासपात्र नाहीत, कदाचित (मग तलवारीच्या जोराने‌च) ते परावृत्त होतील.[८] (७-१२)

काय तुम्ही लढणार नाहीत अशा लोकांशी जे आपल्या प्रतिज्ञा भंग करीत राहिले व ज्यांनी पैगंबराला देशातून काढून टाकण्याचा निश्चय केला होता व अतिरेकास प्रारंभ करणारे तेच होते? तुम्ही त्यांना भिता काय? जर तुम्ही श्रद्धावंत असाल तर अल्लाह या गोष्टीला जास्त पात्र आहे की तुम्ही त्याची भीती बाळगावी. त्यांच्याशी लढा. अल्लाह तुमच्या हाताने त्यांना शिक्षा देईल आणि त्यांना अपमानित करील व त्यांच्या मुकाबल्यात तुम्हाला मदत करील आणि बऱ्याचशा श्रद्धावंतांचे काळीज थंड करील व हृदयाची आग शांत करील आणि ज्याला इच्छील त्याला पश्चात्ताप व्यक्त करण्याची सुबुद्धीदेखील देईल.[९] अल्लाह सर्वकाही जाणणारा व बुद्धिमान आहे. तुम्ही लोकांनी असा समज करून घेतला आहे काय की असेच तुम्हाला सोडून दिले जाईल? वास्तविक पाहता अल्लाहने अद्याप हे पाहिलेलेच नाही की तुम्हापैकी ते कोण आहेत ज्यांनी (अल्लाहच्या मार्गात) प्राण पणास लावले आणि अल्लाह व त्याचा पैगंबर व श्रद्धावंत यांच्याशिवाय इतर कोणासही

७) म्हणजे नमाज आणि जकातविना केवळ पश्चात्ताप व्यक्त केल्याने ते तुमचे धर्मबंधू ठरणार नाहीत. तथापि त्यांनी जर ही अट पूर्ण केली तर याचा परिणाम केवळ इतकाच होणार नाही की तुमच्यासाठी त्यांच्यावर हात टाकणे व त्यांच्या जीवित व वित्ताला हात लावणे हराम होईल तर याउपर याचा आणखीन असाही फायदा होईल की इस्लामी समाजात त्यांना समसमान हक्क प्राप्त होतील. कौटुंबिक, सांस्कृतिक आणि कायद्यात्मक दर्जाने ते इतर तमाम मुसलमानांच्या समान असतील. कोणताही भेदभाव आणि उच्चनीचता त्यांच्या उन्नतीच्या मार्गात अडकाठी ठरू शकणार नाही.

८) या ठिकाणी प्रतिज्ञा आणि शपथा घेण्याने अभिप्रेत मुसलमान असण्याची प्रतिज्ञा आणि इस्लामशी एकनिष्ठ असण्याच्या शपथा घेणे होय. अर्थ असा की जर हे लोक मुसलमान झाल्यानंतर पुन्हा कुफ्रकडे परतले तर त्यांच्याशी युद्ध केले जावे. याच आज्ञेनुसार हजरत अबूबकर (रजि.) यांनी 'मुरतिदीन' - धर्मबाह्य झालेल्यां-विरूद्ध युद्ध केले होते.

९) मुसलमान भीत होते की सदरहू घोषणा होताक्षणीच अरबस्तानच्या चौफेर वणवा भडकेल व आम्हाला एका भयंकर रक्तरंजित युद्धाला सामोरे जावे लागेल. सर्वोच्च अल्लाहने या आयतीत तुमची ही भीती अयोग्य आहे व परिणाम याचा उलट निघेल अशी खात्री पटविली आहे.

जिवलग मित्र बनविले नाही. जे काही तुम्ही करता अल्लाह त्याचा जाणकार आहे.
(१३-१६)

अनेकेश्ववादींचे हे काम नव्हे की त्यांनी अल्लाहच्या मस्जिदीचे सेवक बनावे ज्याअर्थी की आपल्याविरूद्ध ते स्वत:च द्रोहाची साक्ष देत आहेत, यांची सर्व कर्मे वाया गेलीत आणि नरकामध्ये यांना सदैव राहावयाचे आहे. अल्लाहच्या मस्जिदीमध्ये नियमित उपासना करणारे तर केवळ तेच लोक होऊ शकतात ज्यांनी अल्लाह आणि परलोकाला मानावे आणि नमाज कायम करावी, जकात द्यावी व अल्लाहव्यतिरिक्त कोणाचीही भीती बाळगू नये. यांच्याकडूनच अपेक्षा आहे की ते सरळमार्गावर चालतील. हज यात्रेकरूंना पाणी पाजणे आणि मसजिदेहराम (काबा मसजिद) ची सेवा करणे याला तुम्ही त्या व्यक्तीच्या कामाबरोबर ठरविले आहे काय ज्याने श्रद्धा ठेवली अल्लाहवर व 'मरणोत्तर' जीवनावर व ज्याने प्राण वेचले अल्लाहच्या मार्गात,[10] अल्लाहपाशी तर हे दोघे समान नाहीत व अल्लाह अत्याचारी लोकांना मार्ग दाखवीत नाही. अल्लाहच्या येथे तर त्याच लोकांचा दर्जा मोठा आहे ज्यांनी श्रद्धा ठेवली व ज्यांनी अल्लाहच्या मार्गात घरेदारे सोडली आणि जीवित व वित्तानिशी धर्मयुद्ध (जिहाद) केले, तेच यशस्वी आहेत. त्यांचा पालनकर्ता त्यांना आपली कृपा व प्रसन्नता आणि अशा स्वर्गाची शुभवार्ता देतो जेथे त्यांच्यासाठी चिरस्थायी ऐश्वर्याचा सरंजाम आहे. त्यांच्यात ते सदैव राहतील. निश्चितपणे अल्लाहजवळ सेवेचे फळ देण्यासाठी बरेच काही आहे. (१७-२२)

हे श्रद्धावंतांनो! आपले वडील व आपले बंधू यांना देखील आपले मित्र बनवू नका जर ते श्रद्धेवर अश्रद्धेला प्राधान्य देत असतील. तुम्हापैकी जे त्यांना आपले स्नेही बनवतील तेच अत्याचारी ठरतील हे पैगंबर (स.)! सांगून टाका की जर तुमचे वडील, तुमची मुले आणि तुमचे बंधू व तुमच्या पत्नीं व तुमचे आप्तेष्ट व नातेवाईक व तुमची ती धन-दौलत जी तुम्ही कमाविली आहे व तुमचे ते व्यापार-उदीम ज्यांच्या मंदावण्याची तुम्हाला भीती वाटते आणि तुमची ती घरे जी तुम्हाला पसंत आहेत, तुम्हाला अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) आणि अल्लाहच्या मार्गात धर्मयुद्धा (जिहाद) पेक्षा अधिक प्रिय असतील तर वाट पहा इथपर्यंत की अल्लाहने आपला निर्णय तुमच्या समक्ष आणावा, आणि अल्लाह अवज्ञाकारी लोकांना मार्ग दाखवीत नसतो. (२३-२४)

अल्लाहने यापूर्वी अनेक प्रसंगी तुम्हाला मदत केलेली आहे. नुकतेच हुनैनच्या

**१०)** या विधानाने असा फैसला करून टाकला की अल्लाहच्या घराची व्यवस्थापना आता अनेकेश्वरवादीकडे राहू शकत नाही. अनेकेश्वरवादी कुरैश हजयात्रेकरूंची सेवा करतात केवळ या आधारावर ते व्यवस्थापनेस पात्र ठरू शकत नाहीत.



युद्धाच्या दिवशी (त्याने केलेल्या मदतीचे वैभव तुम्ही पाहिले आहे)[11] त्या दिवशी तुम्हाला आपल्या मोठ्या संख्येचा गर्व होता, पण ती तुमच्या काहीच उपयोगी पडली नाही व जमीन विस्तृत असूनदेखील तुमच्याकरिता तंग झाली व तुम्ही पाठ दाखवून पळत सुटला. मग अल्लाहने आपली 'सकीनत' (मन:शांती) आपल्या पैगंबरावर व श्रद्धावंतांवर उतरविली; आणि ते लष्कर उतरविले जे तुम्हाला दिसत नव्हते आणि सत्याचा इन्कार करणाऱ्यांना शिक्षा दिली की हाच बदला आहे त्यांच्याकरिता जे सत्याचा इन्कार करतील. मग (तुम्ही हे सुद्धा पाहिले आहे की) अशा प्रकारे शिक्षा दिल्यानंतर अल्लाह ज्याला इच्छितो त्याला पश्चात्तापाची सुबुद्धीसुद्धा प्रदान करतो.[12] अल्लाह क्षमाशील व दया दाखविणारा आहे. (२५-२७)

हे श्रद्धावंतांनो! अनेकेश्वरवादी अपवित्र आहेत, म्हणून या वर्षानंतर हे मसजिदेहरामजवळ फिरकतादेखील कामा नये[13] व जर तुम्हाला हलाखीची स्थिती येण्याचे भय वाटत असेल तर दूर नव्हे की अल्लाहने इच्छिले तर त्याने आपल्या कृपेने तुम्हाला श्रीमंत करावे. अल्लाह सर्वज्ञ आणि बुद्धिमान आहे. (२८)

युद्ध करा ग्रंथधारकांपैकी त्या लोकांविरूद्ध जे अल्लाहवर व मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवत नाहीत, आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराने जे काही निषिद्ध ठरविले आहे त्याला निषिद्ध करीत नाहीत, आणि सत्य धर्माला आपला धर्म बनवीत नाहीत.

**११)** 'हुनैन'चे युद्ध हि. स. ८ च्या शव्वाल महिन्यात या आयती उतरण्याच्या केवळ १२/१३ महिने अगोदर, मक्का आणि ताईफ या शहरांच्या दरम्यान 'हुनैन' खोऱ्यात झाले होते. सदरहू युद्धात मुसलमानांकडून १२ हजार सैन्य होते तर दुसरीकडे काफिर त्यांच्यापेक्षा फारच कमी होते. परंतु असे असून देखील हवाजून टोळीच्या तिरंदाजांनी मुसलमानांचे तोंड वळवून टाकले आणि इस्लामी लष्कर सैरावैरा होऊन माघारी गेले. त्याप्रसंगी केवळ पैगंबर मुहम्मद (स.) आणि जीवाची बाजी लावणारे काही मूठभर सहाबा होते जे भक्कमपणे आपल्या जागी पाय रोवून होते. त्याच्याच खंबीरतेचा परिणाम होता की पुन्हा सैन्य शिस्तबद्ध होऊ शकले आणि सरतेशेवटी विजयश्री मुसलमानांना लाभली, अन्यथा मक्केच्या विजयाने जे काही प्राप्त झाले होते त्यापेक्षा कितीतरी जास्त 'हुनैन'मध्ये गमवावे लागले असते.

**१२)** संकेत या गोष्टीकडे आहे की हुनैनच्या युद्धात ज्या काफिरांनी हार खाल्ली होती, ते सर्व नंतर मुसलमान झाले.

**१३)** म्हणजे यापुढे त्यांचा हज आणि त्यांच्या यात्रेवरच केवळ बंदी आहे असे नाही तर मस्जिदेहरामच्या सीमेत त्यांच्या प्रवेशावर देखील बंदी आहे.

(त्यांच्याशी युद्ध करा) इथपावेतो की त्यांनी स्वहस्ते जिझिया द्यावा व छोटे बनून रहावे.[१४] यहूदी म्हणतात की 'उज़ैर' अल्लाहचा पुत्र आहे, आणि 'ईसाई' म्हणतात की मसीह (येशू) अल्लाहचा पुत्र आहे. या अवास्तव गोष्टी आहेत ज्या ते आपल्या तोंडातून काढतात, हे त्या लोकांचे अंधानुकरण आहे, जे त्यांच्यापूर्वी द्रोहामध्ये गुरफटले होते. अल्लाहचा कोप त्यांच्यावर. कोठून हे बहकविले जात आहेत. यांनी आपल्या धर्मपंडितांना व जोगींना अल्लाहशिवाय आपला पालनकर्ता बनविले आहे,[१५] आणि अशाचप्रकारे मरियमपुत्र मसीहला देखील. वास्तविक पाहता त्यांना एक उपास्याशिवाय इतर कोणाचीही भक्ती करण्याचा आदेश दिला गेला नव्हता, तो ज्याच्यशिवाय इतर कोणीही भक्तीचा अधिकारी नाही, पवित्र आहे तो त्या अनेकेश्वरवादी गोष्टींपासून ज्या हे लोक करीत आहेत. हे लोक इच्छितात की अल्लाहच्या प्रकाशाला आपल्या फुंकरांनी विझवून टाकावे, पण अल्लाह आपल्या प्रकाशाला परिपूर्ण केल्याशिवाय राहणार नाही, मग ते अश्रद्धांना कितीही असह्य का होईना! तो अल्लाहच आहे ज्याने आपल्या पैगंबराला मार्गदर्शन व सत्य धर्मासह पाठविले आहे जेणेकरून त्याने या सत्य धर्माचे सर्व धर्म पद्धतींवर वर्चस्व

**१४)** म्हणजे युद्धाचा हेतू त्यांनी ईमान आणावे आणि सत्य धर्माचे अनुयायी बनावेत असा मुळीच नाही तर त्यांचे शासन संपुष्टात यावे, त्यांनी भूतलावर शासक आणि सत्ताधिकारी बनून राहू नये किंबहुना भूतलावरील जीवनव्यवस्थेची धुरा, शासन आणि नेतृत्वाचे अधिकार सत्यधर्माच्या अनुयायांच्या हातात असावेत आणि ग्रंथधारक त्यांच्या वर्चस्वाखाली ताबेदार आणि आज्ञांकित बनून राहावेत. यानंतर त्यांच्यापैकी ज्याची इच्छा असेल त्याने स्वखुशीने मुसलमान बनावे अन्यथा 'जिझिया' देत राहावे. 'जिझिया' मोबदला आहे त्या अभयदानाचा आणि रक्षणाचा जो 'जिम्मी' लोकांना इस्लामी राज्यात द्यावा लागत असे. तसेच ते प्रतीक असते या गोष्टीचे की आज्ञाधीन बनून राहणे या लोकांना मान्य आहे.

**१५)** 'हदीस'मध्ये आहे की पूर्वाश्रमीचे ख्रिस्ती असणारे हजरत अदी बिन हातिम यांनी जेव्हा हजरत मुहम्मद (स.) यांच्या सेवेत हजर होऊन इस्लामचा स्वीकार केला तेव्हा त्यांनी पैगंबर (स.) यांना प्रश्न केला की सदरहू आयतीत आम्हावर आमच्या धर्मपंडितांना व साधूसंतांना ईश्वर बनविण्याचा जो आरोप लावला गेला आहे त्याची वास्तवता काय आहे, उत्तरात पैगंबर (स.) यांनी फर्माविले, काय ही वस्तुस्थिती नाही की जे काही हे लोक हराम ठरवितात ते तुम्ही हराम मानता आणि जे काही हे लोक हलाल ठरवितात ते तुम्ही हलाल मानता? त्यांनी सांगितले, असे तर निश्चितच आम्ही करतो. फर्माविले, बस हेच त्यांना रब-ईश्वर बनविणे होय. यावरून असे कळले की ईश्वरी ग्रंथाच्या प्रमाणाविना जे लोक मानवी जीवनासाठी वैध व अवैधच्या मर्यादा ठरवीत असतात, वास्तविकपणे ते आपल्याठायी अहंभावाने ईश्वराचे स्थान घेत असतात. तसेच जे त्यांचा या कायदे रचण्याचा अधिकार मान्य करतात ते त्यांना ईश्वर बनवितात.



प्रस्थापित करावे.[१६] मग अनेकेश्वरवादींना हे कितीही असह्य का होईना! हे श्रद्धावंतांनो! या ग्रंथधारकांच्या बहुतेक धर्मपंडित व साधु-संन्यासी लोकांची स्थिती अशी आहे की ते लोकांचा माल लबाडीने खातात आणि त्यांना अल्लाहच्या मार्गापासून रोखतात. दु:खदायक शिक्षेची खुशखबर द्या त्यांना जे सोने आणि चांदी साठवून ठेवतात आणि ते अल्लाहच्या मार्गात खर्च करीत नाहीत. एक दिवस येईल की याच सोने आणि चांदीवर नरकाची आग धगधगीत केली जाईल आणि नंतर यानेच त्या लोकांचे कपाळ, बाजू आणि पाठींना, डागले जाईल - हा आहे तो खजिना जो तुम्ही स्वत:साठी साठविला होता, घ्या आता आपल्या साठवलेल्या संपत्तीचा आस्वाद. (२९-३५)

वस्तुस्थिती अशी आहे की, महिन्यांची संख्या, ज्या दिवसापासून अल्लाहने पृथ्वी व आकाशांना निर्माण केले आहे, अल्लाहच्या लेखी बाराच आहेत आणि त्यापैकी चार महिने अवैध आहेत.[१७] हाच योग्य कायदा आहे म्हणून या चार महिन्यात स्वत:वर जुलूम करू नका व सर्व मिळून अनेकेश्वरवाद्यांशी लढा द्या, जसे ते सर्व मिळून तुमच्याशी लढतात. आणि समजून असा की अल्लाह - ईशपरायणांच्या समवेतच आहे.[१८] नसी (महिने बदलणे) तर द्रोहामध्ये आणखीच एक द्रोही कृती आहे, ज्यामुळे हे अश्रद्धावंत

**१६)** मूळ अरबी शब्द 'अद्दीन'चा अनुवाद अही 'धर्ममात्र' केला आहे. दीन हा शब्द अरबी भाषेत अशा जीवन व्यवस्थेला अथवा जीवनप्रणालीसाठी वापरला जातो जिची प्रस्थापना करणाऱ्याला प्रमाण आणि शासक मान्य करून त्याचे आज्ञापालन केले जावे. म्हणून पैगंबर (स.) ना पाठविण्याचा हेतू सदरहू आयतीत असा सांगितला गेला आहे की ज्या मार्गदर्शनाला व सत्यधर्माला त्याने ईश्वराकडून आणले आहे त्याचे धर्ममात्र म्हणून असलेल्या सर्व पद्धती आणि व्यवस्थेवर वर्चस्व प्रस्थापित करावे. प्रेषितांची पाठवणूक कधीही या हेतूपोटी झाली नाही की जी जीवनव्यवस्था तो घेऊन आला आहे ती इतर दुसऱ्या जीवनव्यवस्थेच्या आज्ञाधीन व अंकित बनून राहावी तसेच त्यांनी बहाल केलेल्या संधी व सवलतीत संकुचित होऊन राहावी, तर प्रेषित पृथ्वी व आकाशांच्या सम्राटाचा प्रतिनिधी म्हणून येतो. तो आपल्या सम्राटाच्या सत्यव्यवस्थेने वर्चस्व पाहू इचिछतो. जर एखादी दुसरी जीवनव्यवस्था जगात राहिली तरी तिला ईश्वरी व्यवस्थेने प्रदान केलेल्या सवलतीत संकुचित बनून राहिले पाहिजे. जसे 'जिझिया' अदा करण्याच्या स्वरूपात 'जिम्मी' (इस्लामी राज्यातील परधर्मीय नागरिकां) ची जीवनव्यवस्था असते. असे नव्हे की काफिरांचे वर्चस्व राहावे आणि सत्यधर्माच्या अनुयायांनी 'जिम्मी' बनून राहावे.

**१७)** चार हराम महिन्यांनी अभिप्रेत आहेत जिलकअद, जिलहज्जा आणि मुहर्रम, हज विधीसाठी आणि रज्जब उमरासाठी.

**१८)** म्हणजे अनेकेश्वरवादी जर या महिन्यातसुद्धा लढण्यापासून परावृत्त होत नसतील तर ज्याप्रमाणे ते एकजूट होऊन तुमच्याशी लढतात त्याचप्रमाणे तुम्हीसुद्धा एकजूट होऊन त्यांच्याशी लढा. सूरह बकरा आयत क्र. १९४ ही सदरहू आयतचे भाष्य करते.

लोक मार्गभ्रष्ट केले जातात. एखाद्या वर्षी एखाद्या महिन्याला वैध ठरवितात व एखाद्या वर्षी त्याला अवैध करून टाकतात, जेणेकरून अल्लाहने निषिद्ध ठरविलेल्या महिन्यांची संख्याही पूर्ण करता यावी व अल्लाहने ज्याला निषिद्ध केलेले आहे त्याला वैधसुद्धा करून घेता यावे[१९] त्यांची अपकृत्यें त्यांच्यासाठी शोभिवंत करण्यात आलेली आहेत, व अल्लाह सत्याचा इन्कार करणाऱ्यांना मार्गदर्शन करीत नसतो. (३६-३७)

हे श्रद्धावंतांनो![२०] तुम्हाला झाले तरी काय की जेव्हा तुम्हाला अल्लाहच्या मार्गात निघण्यासाठी सांगण्यात आले तेव्हा तुम्ही जमिनीशी खिळून राहिलात? तुम्ही मरणोत्तर जीवनाच्या तुलनेत लौकिक जीवनाला पसंत केले आहे काय? असे असेल तर तुम्हाला माहीत असावे की ऐहिक जीवनाचा हा सर्व सरंजाम मरणोत्तर जीवनामध्ये फारच थोडा भरेल. तुम्ही उठणार नाही तर अल्लाह तुम्हाला दु:खदायक शिक्षा देईल, आणि तुमच्या जागी दुसऱ्या एखाद्या समूहाला उभे करील आणि तुम्ही ईश्वराचे काहीही वाईट करू शकणार नाही, तो प्रत्येक वस्तूला समर्थ आहे. जर तुम्ही पैगंबराला मदत केली नाही तर काही पर्वा नाही. अल्लाहने त्याला त्याप्रसंगी मदत केली आहे जेव्हा अश्रद्धावंतांनी त्याला काढून टाकले होते. जेव्हा तो फक्त दोनपैकी - दुसरा होता, जेव्हा ते दोघे गुहेत होते, तेव्हा तो आपल्या साथीदाराला सांगत होता, "दु:खी होऊ नकोस. अल्लाह आमच्यासमवेत आहे."[२१] त्यावेळी अल्लाहने आपल्याकडून त्याच्यावर मन:शांती उतरविली आणि त्याला अशा लक्षराद्वारे मदत केली जे तुम्हाला दिसत नव्हते व अश्रद्धावंतांचे वचन

१९) अरबस्तानात 'नसी' दोन प्रकारची होती. एक प्रकार असा होता की युद्ध व मारामारी आणि खुनाचा सूड उगविण्यासाठी एखाद्या हराम महिन्याला हलाल ठरवून घेत असत व त्याऐवजी एखाद्या हलाल महिन्याला हराम ठरवून त्यांची संख्या पूर्ण करीत असत. दुसरा प्रकार असा होता की चंद्र वर्षाला सौर वर्षानुसार करण्यासाठी त्यात 'कबीसा' म्हणून एका महिन्याची भर करीत असत जेणेकरून हज नेहमी एकाच ऋतूत येत राहावा, चंद्राच्या हिशोबानुसार हजचे निरनिराळ्या ऋतूत भ्रमण करीत राहण्याने त्यांना अडचणींना सामोरे जावे लागत असे, त्यापासून त्यांची सुटका व्हावी. अशाप्रकारे ३३ वर्षांपर्यंत हज्ज आपल्या मूळ वेळेविरूद्ध इतर तारखेत होत असे. फक्त ३४ व्या वर्षी एकदा मूळ जिलहज्जाच्या ९ व १० तारखांत पार पडत असे. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी ज्यावर्षी हज्जतुल विदाअ (निरोपाचे हज) अदा केले त्यावर्षी हज आपल्या मूळ तारखांत आला होता व त्याच वेळेपासून नसीच्या पद्धतीस बंदी केली गेली.

२०) या आयती रुकुअ ९ च्या शेवटपर्यंत तबूक युद्धाच्या तयारीच्या काळात उतरल्या आहेत.

२१) हा त्या प्रसंगाचा उल्लेख आहे जेव्हा मक्केच्या काफिरांनी पैगंबर (स.) यांची हत्या करण्याचा संकल्प केला होता आणि पैगंबर (स.) ऐन त्या रात्री जी त्यांच्या हत्येसाठी निश्चित केलेली होती, मक्केहून निघून सौरगुहेत तीन दिवसांपर्यंत लपून होते व नंतर मदीनेकडे हिजरत केली होती. त्यावेळी गुहेत फक्त हजरत अबूबकर (रजि.) त्यांच्यासोबत होते.



खाली पाडले व अल्लाहचे वचन तर उच्चच आहे, अल्लाह जबरदस्त आणि द्रष्टा व बुद्धिमान आहे. (३८-४०)

निघा, मग तुम्ही हलके असा अगर बोजड असा व संघर्ष करा अल्लाहच्या मार्गात आपल्या जीवित व वित्तानिशी, हे तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही जाणत असाल. (४१)

हे पैगंबर (स.), जर फायदा सहज साध्य असता व प्रवास सोपा असता तर ते जरूर तुमच्यामागे चालण्यास तयार झाले असते, परंतु त्यांच्यासाठी हा मार्ग तर अत्यंत बिकट झालेला आहे.[२२] आता ते अल्लाहची शपथ घेऊन घेऊन सांगतील की जर आम्ही निघू शकलो असतो तर खचितच तुमच्याबरोबर निघालो असतो, ते स्वत:ला विनाशांत झोकत आहेत. अल्लाह चांगलेच जाणतो की ते लबाड आहेत. (४२)

हे पैगंबर (स.), अल्लाह तुम्हाला क्षमा करो. तुम्ही त्यांना परवानगी का दिली? (तुम्ही खुद् त्यांना परवानगी द्यावयास नको होती) जेणेकरून कोण खरे आहेत हे तुम्हावर उघड झाले असते व खोट्यांना देखील तुम्ही ओळखले असते. जे लोक अल्लाहवर व अंतिम दिनावर श्रद्धा ठेवतात ते तर कदापि तुमच्याकडे अशी विनंती करणार नाहीत की त्यांना आपल्या जीवित व वित्तानिशी युद्ध करण्यापासून माफ केले जावे. अल्लाह ईशपरायण लोकांना चांगल्याप्रकारे जाणतो. अशी विनवणी तर तेच लोक करतात जे अल्लाह आणि अंतिम दिनावर श्रद्धा ठेवत नाहीत, त्यांच्या हृदयांत शंका आहे आणि ते आपल्या शंकेतच द्विधाग्रस्त झाले आहेत. (४३-४५)

जर खरोखरच त्यांचा निघण्याचा इरादा असता तर त्यासाठी त्यांनी काही तरी तयारी केली असती, परंतु अल्लाहला त्यांचे उत्थान पसंतच नव्हते, म्हणून त्याने त्यांना आळशी करून टाकले आणि सांगितले गेले की, बसून राहा बसणाऱ्यांच्या बरोबर. जर ते तुमच्याबरोबर निघाले असते तर तुमच्यात वाईटपणा वाढविण्यापलीकडे त्यांनी काहीही केले नसते. त्यांनी तुमच्या दरम्यान उपद्रव माजविण्यासाठी धावपळ केली असती आणि तुमच्या जमातीची स्थिती तर अशी आहे की त्यात अद्याप पुष्कळसे असे लोक उपस्थित आहेत जे त्यांच्या गोष्टी कान लावून ऐकतात, अल्लाह या अत्याचाऱ्यांना चांगलेच जाणतो. यापूर्वीसुद्धा या लोकांनी उपद्रव पसरविण्याचे प्रयत्न केले आहेत आणि तुम्हाला अपयशी बनविण्यासाठी सर्व प्रकारच्या क्लृप्त्यांची उलाढाल केली आहे, येथपावेतो की त्यांच्या इच्छेविरूद्ध सत्य प्रकट झाले व अल्लाहचे कार्य सिद्धीस गेल्याशिवाय राहिले

२२) म्हणजे हे पाहून की सामना रोमसारख्या शक्तिशी आहे आणि काळ कडक उन्हाळ्याचा आहे, देशात दुष्काळ पसरला आहे, आणि नूतन वर्षाची पिके, ज्यांच्यावर आशा लागल्या होत्या, ती कापणीच्या तोंडावर आली आहेत, त्याना तबूकचा प्रवास फारच जड वाटू लागला.

नाही. (४६-४८)

त्यांच्यापैकी कोणी असा आहे जो म्हणतो की ''मला परवानगी द्या व मला संक्टात टाकू नका.'' ऐकून घ्या! उपद्रवातच तर हे लोक गुरफटले आहेत आणि नरकाने या अश्रद्धावंतांना वेढून ठेवले आहे. (४९)

तुमचे भले झाले तर यांना दुःख होते व तुम्हांवर एखादे संकट येते तेव्हा हे तोंड फिरवून खुश होऊन परततात व म्हणत जातात की बरे झाले. आम्ही अगोदरच आमचा मामला ठीकठाक केला होता. यांना सांगा, ''आम्हाला कदापि काहीही (चांगले-वाईट) पोहचत नाही परंतु ते जे अल्लाहने आमच्यासाठी लिहिले आहे. अल्लाहच आमचा वाली आहे. आणि श्रद्धावंतांनी त्याच्यावरच भिस्त ठेवली पाहिजे.'' (५०-५१)

यांना सांगा, ''तुम्ही आमच्याबाबतीत ज्या गोष्टीची वाट पाहात आहात ती याशिवाय अन्य काय आहे की दोन चांगल्या गोष्टींपैकी एक चांगली गोष्ट आहे.[२३] आणि आम्ही तुमच्याबाबतीत ज्या गोष्टीची प्रतीक्षा करीत आहोत ती अशी की अल्लाह स्वतःच तुम्हाला शिक्षा करतो की आमच्या हस्ते करवितो? बरे तर आता तुम्हीही वाट पहा आणि आम्हीदेखील तुमच्याबरोबर प्रतीक्षेत आहोत.'' (५२)

यांना सांगा, ''तुम्ही आपली संपत्ती राजीखुशीने खर्च करा किंवा नाराजीने ती कोणत्याही परिस्थितीत स्वीकारली जाणार नाही. कारण तुम्ही अवज्ञाकारी लोक आहात. यांनी दिलेली संपत्ती स्वीकृत न होण्याचे कारण याशिवाय दुसरे काही नाही की यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी द्रोह केला आहे. नमाजकरीता येतात तर मरगळत येतात आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करतात तेही अनिच्छापूर्वक खर्च करतात, यांची धनदौलत आणि यांची संतती - विपुलता पाहून फसू नका. अल्लाह तर असे इच्छितो की याच वस्तुद्वारे यांना ऐहिक जीवनात देखील कोपग्रस्त करावे आणि यांना मृत्यू आला तरी तो सत्याच्या इन्काराच्या स्थितीतच यावा. (५३-५५)

ते अल्लाहची शपथ घेऊन घेऊन सांगतात की आम्ही तुमच्यापैकीच आहोत, वास्तविक पाहता ते मुळीच तुमच्यापैकी नाहीत. खरेतर ते असे लोक आहेत जे तुम्हापासून भयभीत आहेत. जर त्यांना एखादे आश्रयस्थान मिळाले अथवा एखादी गुहा किंवा लपून बसण्यासाठी एखादी जागा, तर पळत जाऊन त्यात लपतील. (५६-५७)

हे पैगंबर (स.), यांच्यापैकी काही लोक दानाच्या[२४] वाटपासंबंधी तुमच्यावर आक्षेप घेतात, जर या मालामधून काही यांना दिले गेले तर हे खुश होतात आणि दिले गेले नाही तर नाक मुरडू लागतात. किती छान झाले असते की अल्लाह आणि पैगंबराने जे काही

२३) म्हणजे अल्लाहच्या मार्गात शहादत- हौतात्म्य किंवा इस्लामचा विजय.

२४) म्हणजे जकातचा माल.



त्यांना दिले होते त्यावर ते संतुष्ट राहिले असते व सांगितले असते की, ''अल्लाह आमच्यासाठी पुरेसा आहे, तो आपल्या कृपेने आम्हाला आणखी खूपसे देईल आणि त्याचा पैगंबरदेखील आमच्यावर मेहरबानी करील. आम्ही अल्लाहकडेच डोळे लावून बसलेलो आहोत.'' हे दान तर खऱ्या अर्थी फकीर आणि गोरगरिबांसाठी आहे.[२५] आणि त्या लोकांसाठी जे दान वसुलीच्या कामावर नेमले आहेत आणि त्या लोकांकरिता ज्यांची दिलजमाई[२६] अपेक्षित आहे. तसेच हे, गुलामांच्या मुक्ततेसाठी[२७] व कर्जदारांना मदत करण्यासाठी व ईश्वरी मार्गात[२८] आणि वाटसरूंच्या सेवेसाठी[२९] उपयोगात आणण्याकरिता आहे. एक कर्तव्य आहे अल्लाहकडून आणि अल्लाह सर्वकाही जाणणारा द्रष्टा व बुद्धिमान आहे. (५८-६०)

यांच्यापैकी काहीजण आहेत जे आपल्या शब्दांनी प्रेषिताला दुःख देतात आणि

२५) फकीरने ती व्यक्ती अभिप्रेत आहे जी आपल्या उदरनिर्वाहासाठी इतरांची गरजवंत असेल. मिसकीन (गोरगरीब) ते लोक आहेत जे सर्वसामान्य गरजवंतांच्या तुलनेत अधिक दारिद्र्यावस्थेत असतील.

२६) तालीफे कल्ब (दिलजमाई) चा अर्थ हृदयाकर्षण असा होतो, या आज्ञेचा उद्देश असा की जे लोक इस्लामच्याविरूद्ध प्रयत्नशील असतील व संपत्ती देऊन त्यांच्या द्वेषाची तीव्रता शमविली जात असेल, किंवा जे लोक काफिरांच्या कंपूत असे असतील की जर संपत्तीने त्यांना तोडले गेले तर तुटून ते मुसलमानांचे सहायक बनू शकत असतील, किंवा ज्या लोकांनी नुकताच इस्लाम प्रवेश केला असेल व त्यांच्यातील उणीवा पाहता जर त्यांना आर्थिक सहाय्य दिले गेले नाही तर ते पुन्हा कुफ्रकडे परतण्याची भीती असेल, अशा लोकांना कायमस्वरूपी अथवा तात्कालिक स्वरूपाच्या देणग्या देऊन इस्लामचे हिमायती व मदतगार अथवा आज्ञाधीन, अथवा कमीत कमी निरुपद्रवी शत्रू बनविले जावे.

२७) मान सोडविण्याने अभिप्रेत गुलामांना मुक्त करविणे होय.

२८) ईश्वरमार्गात, हा शब्द सर्वसामान्य आहे. अशी सर्व सत्कर्मे ज्यानी अल्लाह प्रसन्न होत असेल, या शब्दाच्या अर्थात मोडतात. इस्लामी विद्वानांच्या एका समूहाने असे मत व्यक्त केले आहे की या आज्ञेनुसार 'जकात'चा माल सर्व प्रकारच्या सत्कृत्यात खर्च केला जाऊ शकतो, परंतु त्यांच्या मोठ्या बहुसंख्येच्या मते या ठिकाणी 'फीसबीलिल्लाह'ने अभिप्रेत 'जिहाद फीसबीलिल्लाह' 'अल्लाहच्या मार्गात जिहाद'च्या अर्थात आहे. म्हणजे काफिर जीवनव्यवस्थेला नष्ट करून तिच्या जागी इस्लामी जीवनव्यवस्थेची प्रस्थापना करणे या हेतूने जे प्रयत्न केले जावेत ते. या प्रयत्नांत जे लोक सक्रीय असतील त्यांच्या प्रवास खर्चासाठी, सवारींसाठी, शस्त्र साहित्य आणि इतर सरंजाम उपलब्ध करण्यासाठी जकातने मदत केली जाऊ शकते, मग ते स्वतः सुस्थितीचे लोक का असेनात व आपल्या गरजांसाठी त्यांना त्यांच्या मदतीची गरज का नसेना.

२९) वाटसरू मग तो आपल्या घरी श्रीमंत का असेना परंतु प्रवासाच्या स्थितीत त्याला सहाय्याची गरज भासली तर त्याची मदत जकातने केली जाईल.

म्हणतात की हा माणूस कानाचा हलका आहे, सांगून टाका, “तो तुमच्या भल्यासाठी तसा आहे, अल्लाहवर श्रद्धा ठेवतो व श्रद्धावंतांवर विश्वास करतो, आणि सर्वस्वी कृपा आहे त्या लोकांसाठी जे तुम्हापैकी श्रद्धावंत आहेत. आणि जे लोक अल्लाहच्या पैगंबराला दु:ख देतात त्यांच्यासाठी दु:खदायक शिक्षा आहे.” (६१)

हे लोक तुमच्यासमोर शपथा घेतात जेणेकरून तुम्हाला प्रसन्न करावे, वास्तविक पाहता हे जर श्रद्धावंत आहेत तर अल्लाह आणि पैगंबर या गोष्टीचे जास्त हक्कदार आहेत की यांनी त्यांना प्रसन्न करण्याची काळजी घ्यावी. यांना माहीत नाही की जो अल्लाह व त्याच्या पैगंबराचा मुकाबला करतो त्याच्यासाठी नरकाची आग आहे ज्यात तो सदैव राहील? ही फार मोठी नामुष्की आहे. (६२-६३)

हे दांभिक भीत आहेत की एखादे वेळेस मुसलमानावर एखादा असा अध्याय अवतरू नये की ज्याने त्यांच्या हृदयातील भेद उघड होईल. हे पैगंबर (स.) यांना सांगा, “उपहास करा. अल्लाह ती गोष्ट उघड करणार आहे जी उघड होण्याची तुम्हाला भीती वाटते.” जर यांना विचारले की तुम्ही काय बोलत होता तर ते लगेच उत्तर देतात की, “आम्ही तर थट्टा मस्करी आणि मनोरंजन करीत होतो.”[३०] यांना सांगा, “काय तुमची थट्टा मस्करी अल्लाह आणि त्याच्या वचनांशी व त्याच्या पैगंबराशीच होती?” आता निमित्त शोधू नका. तुम्ही श्रद्धा ठेवल्यानंतर सत्य नाकारले आहे. आम्ही तुमच्यापैकी एका समूहास माफ जरी केले तरी दुसऱ्या समूहाला आम्ही अवश्य शिक्षा देऊ कारण तो अपराधी आहे. (६४-६६)

दांभिक पुरुष व दांभिक स्त्रिया सर्व एकमेकाशी सारखेच आहेत. दुष्कर्माचा आदेश देतात आणि सत्कर्मापासून परावृत्त करतात आणि आपले हात सत्कर्मापासून रोखतात, हे अल्लाहला विसरले म्हणून अल्लाह देखील यांना विसरला. निश्चितपणे हे दांभिकच अवज्ञाकारी आहेत. या दांभिक पुरुष, स्त्रिया व अश्रद्धावंतांच्याकरिता अल्लाहने नरकाग्नीचे

**३०)** तबूकच्या युद्धाच्या काळात दांभिक नेहमी आपल्या बैठकीत बसून पैगंबर (स.) आणि मुसलमानांची टर-टवाळी करीत असत आण जे लोक सद्भावनेने जिहादसाठी तयार असण्याचे त्यांना आढळत असत, आपल्या उपहासाने ते त्यांचे धैर्य खचविण्याचा प्रयत्न करीत असत. तद्वत हदीसींत त्यांची अनेक विधाने निवेदिली गेली आहेत. उदा. एका बैठकीत काही गप्पा गोष्टी करीत बसले होते. एकाने म्हटले, “अहो, रोमन लोकांना देखील तुम्ही काही अरबांसारखे समजला आहात की काय? उद्या पाहाच की युद्धासाठी आलेले हे सर्व शूर वीर दोरखंडाने बंदिस्त असतील.” दुसऱ्याने सांगितले, “याउपर जर शंभर शंभर कोरडे ओढण्याचा हुकूम झाला तर किती मजा वाटेल.” आणि एका दांभिकाने पैगंबर (स.) यांना युद्धाची जय्यत तयारी करताना पाहून आपल्या मित्रमंडळी व दोस्तांना सांगितले, “महाशयांकडे पहा, रोम आणि सीरियाचे किल्ले जिंकण्यासाठी साहेब निघाले आहेत.”



वचन दिले आहे, ज्यात हे सदैव राहतील, तोच यांच्यासाठी योग्य आहे. यांच्यावर अल्लाहचा धिक्कार आहे व यांच्यासाठी कायम राहणारी यातना आहे. - तुम्हा लोकांचे रंगढंग तर तेच आहेत जे तुमच्या पूर्वजांचे होते. ते तुमच्यापेक्षा अधिक शक्तीशाली व तुमच्यापेक्षा जास्त संपत्ती व संततीवाले होते. मग त्यांनी जगातच आपल्या वाट्याचा आनंद लुटला व तुम्हीदेखील आपल्या वाट्याचा आनंद त्याचप्रमाणे लुटला जसा त्यांनी लुटला होता. आणि तशाच विवादात तुम्ही देखील पडलात जशा विवादात ते पडले होते, म्हणून त्यांचा शेवट असा झाला की या लोकात व परलोकात त्यांचे केले सवरले सर्व वाया गेले आणि तेच तोट्यात आहेत. - या लोकापर्यंत यांच्या पूर्वजांचा इतिहास पोहचला नाही काय? नूह (अ.) चे लोक आद, समूद, इब्राहीम (अ.) चे लोक, मदयनचे लोक आणि त्या वस्त्या ज्यांना उलथून टाकले गेले,[३१] त्यांचे प्रेषित त्यांच्यापाशी उघड उघड संकेत घेऊन आले, मग हे अल्लाहचे काम नव्हते की त्यांच्यावर अत्याचार करावा, तर ते स्वत:च आपल्यावर अत्याचार करणारे होते. (६७-७०)

श्रद्धावंत पुरुष व श्रद्धावंत स्त्रिया हे सर्व एक दुसऱ्याचे मित्र आहेत, भलेपणाचा आदेश देतात व वाईट गोष्टीपासून रोखतात, नमाज कायम करतात, जकात देतात आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञाधारक आहेत, हे ते लोक आहेत ज्यांच्यावर अल्लाहचा कृपावर्षाव होणारच. खचितच अल्लाह सर्वांवर प्रभावी आणि चतूर व बुद्धिमान आहे. या श्रद्धावंत पुरुष आणि स्त्रियांसाठी अल्लाहचा वायदा आहे की त्यांना अशा बागा प्रदान करील ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, आणि ते त्याच्यात सदैव राहतील, त्या सदाबहार बागांत त्यांच्याकरिता स्वच्छ निवासस्थाने असतील, आणि सर्वात श्रेष्ठ गोष्ट म्हणजे अल्लाहची प्रसन्नता त्यांना प्राप्त होईल. हेच मोठे यश आहे. (७१-७२)

हे नबी (स.)![३२] अश्रद्धावंत आणि दांभिक दोघांचा सर्व शक्तिनिशी सामना करा आणि त्यांच्याशी कठोर व्यवहार करा. सरतेशेवटी यांचे ठिकाण नरक आहे आणि ते अत्यंत वाईट निवासस्थान आहे. हे लोक अल्लाहची शपथ घेऊन घेऊन सांगतात की आम्ही ती गोष्ट सांगितली नाही, वास्तविक पाहता त्यांनी जरूर ती विद्रोही गोष्ट सांगितली

**३१)** म्हणजे लूत लोकांच्या वस्त्या ज्या उलथापालथ करून टाकल्या गेल्या.

**३२)** येथून त्या आयतींना प्रारंभ होत आहे ज्या तबूकच्या युद्धानंतर उतरल्या होत्या.

आहे.[३३] त्यांनी इस्लाम स्वीकारल्यानंतर सत्याचा इन्कार केला आणि त्यांनी ते सर्वकाही करण्याचा निश्चय केला जे करू शकले नाहीत.[३४] हा सर्व त्यांचा राग याच गोष्टीवर आहे ना की अल्लाह व त्याच्या पैगंबराने आपल्या कृपेने यांना श्रीमंत केले आहे! आता जर हे आपल्या या वर्तनापासून परावृत्त झाले तर हे यांच्यासाठीच उत्तम आहे, आणि जर हे परावृत्त झाले नाहीत तर अल्लाह यांना अत्यंत दु:खदायक शिक्षा करील. इहलोकात व परलोकातसुद्धा. व पृथ्वीवर कोणीही नाही जो यांचा संरक्षक व सहायक असेल.

(७३-७४)

यांच्यापैकी काहीजण असेही आहेत ज्यांनी अल्लाहशी प्रतिज्ञा केली होती की जर त्याने आपल्या कृपेने आम्हाला उपकृत केले तर आम्ही दानधर्म करू आणि सदाचारी बनून राहू. पण जेव्हा अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना धनवान केले तेव्हा हे कंजूषपणाला प्रवृत्त झाले. आणि आपल्या प्रतिज्ञेपासून असे फिरले की यांना त्याची पर्वासुद्धा नाही. परिणाम असा झाला की त्यांच्या या प्रतिज्ञाभंगापायी जी त्यांनी अल्लाहशी केली व त्या असत्यामुळे जे ते बोलत राहिले, अल्लाहने यांच्या हृदयांत दंभ रुजविला जो त्याच्या ठायी हे हजर होण्याच्या दिवसापर्यंत यांचा पिच्छा सोडणार नाही. या लोकांना माहीत नाही काय की अल्लाहला यांचे गुप्त रहस्य आणि यांच्या गुप्त कानगोष्टीसुद्धा माहीत आहेत आणि तो तमाम परोक्षांच्या गोष्टींचा चांगल्या प्रकारे जाणकार आहे? (तो चांगल्या प्रकारे ओळखतो त्या कंजूष श्रीमंतांना) जे, स्वेच्छेने आणि आवडीने देणाऱ्या श्रद्धावंतांच्या आर्थिक कुर्बानीवर बाता मारतात आणि त्या लोकांची थट्टा उडवितात

३३) या ठिकाणी जिच्याकडे निर्देश केलेला आहे ती गोष्ट कोणी होती या संबंधाने कोणतीही खात्रीलायक माहिति आम्हाप्रत पोहचलेली नाही. तथापि निवेदनात अनेक अशा काफिरी गोष्टींचा उल्लेख आला आहे ज्या काफिरांची त्या काळी उच्चारल्या होत्या. उदा. एका दांभिकाने एका मुस्लिम युवकाशी बोलतांना सांगितले होते की, ''ही व्यक्ती अर्थात पैगंबर मुहम्मद (स.) ज्या गोष्टी प्रस्तुत करीत आहे त्या सर्व सत्य आहेत तर आम्ही सर्व गाढवांपेक्षाही जास्त तुच्छ आहोत.'' आणखी एका निवेदनात आहे की तबूकच्या प्रवासात एका ठिकाणी पैगंबर (स.) यांची सांडणी हरवली. त्यावेळी दांभिकाच्या एका टोळीने आपल्या बैठकीत बसून खूप थट्टा उडविली, आणि आपापसात सांगितले की, ''हे महाशय आकाशाच्या बातम्या तर ऐकवीत असतात परंतु त्यांच्या स्वत:च्या सांडणीची काहीच बातमी नाही की ती यावेळी कोठे आहे.''

३४) हा संकेत, दांभिकांनी तबूक युद्धाच्या काळात जी कटकारस्थाने केली होती त्यांच्याकडे आहे. एका प्रसंगी त्यांनी अशी योजना आखली की रात्री प्रवासाच्या वेळी पैगंबर (स.) यांचा कडेलोट करावा. त्यांनी आपापसात असेही ठरविले होते की तबूक येथे जर मुसलमानांचा पराभव झाला तर मदीनेत अब्दुल्लाह बिन उब्बइच्या डोक्यावर तत्काळ राजमुकुट ठेवला जावा.



ज्यांच्याजवळ (ईश्वराच्या मार्गात देण्यासाठी) त्याशिवाय काहीच नाही जे ते स्वत:वर कष्ट ओढवून देतात अल्लाह या थट्टा उडविणाऱ्यांचा उपहास करतो व त्यांच्यासाठी यातनादायक शिक्षा आहे. हे पैगंबर (स.)! मग तुम्ही अशा लोकांसाठी क्षमेची याचना करा अथवा न करा, जर तुम्ही सत्तर वेळा देखील त्यांना क्षमा करण्याची विनवणी कराल तरी अल्लाह त्यांना कदापि क्षमा करणार नाही. कारण त्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी द्रोह केला आहे, आणि अल्लाह अवज्ञाकारी लोकांना मुक्ति-मार्ग दाखवीत नसतो. (७५-८०)

ज्या लोकांना मागे राहण्याची परवानगी देण्यात आली होती, ते अल्लाहच्या पैगंबराला साथ न देण्यावर व घरात बसून राहण्यावर खुश झाले. आणि त्यांना हे असह्य वाटले की अल्लाहच्या मार्गात जीवित व वित्तानिशी युद्ध करावे. त्यांनी लोकांना सांगितले की, ''या कडक उन्हाळ्यात निघू नका.'' यांना सांगा की नरकाची आग याच्याही पेक्षा अधिक उष्ण आहे, किती छान झाले असते जर यांना याचा विवेक असता! आता या लोकांनी हसणे कमी केले पाहिजे व अधिक रडले पाहिजे, कारण ज्या दुष्टतेची कमाई हे करीत राहिले आहेत त्याचा मोबदला असाच आहे (की यांनी त्यावर रडले पाहिजे.) जर अल्लाहने तुम्हाला त्यांच्यात परत नेले आणि यापुढे त्यांच्यापैकी एखाद्या गटाने युद्धासाठी निघण्याची तुमच्याकडून परवानगी मागितली तर स्पष्ट सांगा, ''आता तुम्ही माझ्याबरोबर मुळीच निघू शकत नाही आणि माझ्या सोबत देखील कोणा शत्रूशी लढू शकणार नाही. तुम्ही पहिल्यांदा बसून राहणे पसंत केले होते तर आता मागे राहणाऱ्यांच्याबरोबर मागे राहा.'' (८१-८३)

आणि यापुढे यांच्यापैकी जो कोणी मृत्यू पावेल त्याच्या जनाजाची नमाज सुद्धा तुम्ही मुळीच पढू नका व त्यांच्या कबरीजवळ देखील कधी उभे राहू नका. कारण त्यांनी अल्लाह व त्याच्या पैगंबराशी द्रोह केला आहे. आणि ते मृत्यू पावले आहेत अशा अवस्थेत की ते अवज्ञाकारी होते. यांच्या श्रीमंती व विपुल संततीने तुमची फसगत होता कामा नये. अल्लाहने तर निश्चय केला आहे की या संपत्ती व संततीच्याद्वारे या जगातच यांना शिक्षा द्यावी आणि यांचे प्राण या अवस्थेत निघावे की हे द्रोह करणारे असतील.

(८४-८५)

जेव्हा कधी एखादी सूरत या आशयाची अवतरली की अल्लाहला माना आणि त्याच्या पैगंबराच्या संगतीने युद्ध करा तेव्हा तुम्ही पाहिले की यांच्यापैकी जे क्षमता बाळगणारे होते तेच तुम्हाला विनवू लागले की त्यांना युद्धामध्ये सामील होण्यापासून माफ केले जावे व त्यांनी सांगितले की आम्हाला सोडा की आम्ही बसणाऱ्याबरोबर बसून राहावे. या लोकांनी घरी बसणाऱ्यात सामील होणे पसंत केले आणि त्यांच्या हृदयांवर

मुहर लावण्यात आली, म्हणून त्यांच्या लक्षात आता काहीच येत नाही. याउलट पैगंबर (स.) ने व त्या लोकांनी ज्यांनी त्यांच्याबरोबर श्रद्धा ठेवली होती, आपल्या जीवित व वित्तानिशी युद्ध (जिहाद) केले आणि आता सर्व भलाई त्यांच्यासाठीच आहेत आणि तेच सफल होणारे आहेत. अल्लाहने त्यांच्यासाठी असले बाग तयार करून ठेवले आहेत की ज्यांच्याखालून कालवे वाहात आहेत. त्यात ते सदैव राहतील, हे आहे महान यश.

(८६-८९)

बदावी अरबांपैकी देखील बरेचसे लोक आले ज्यांनी निमित्ते केली जेणेकरून त्यांनाही मागे राहण्याची परवानगी दिली जावी. अशा प्रकारे बसून राहिले ते लोक ज्यांनी अल्लाह व त्याच्या पैगंबराशी (स.) श्रद्धेची खोटी प्रतिज्ञा केली होती. या बदावीपैकी ज्या लोकांनी विद्रोहाची पद्धत अंगिकारली आहे, लवकरच त्यांना दु:खदायक शिक्षेला तोंड द्यावे लागेल. (९०)

अशक्त व आजारी लोक व ते ज्यांना धर्म युद्धात प्रवेशाकरिता सामग्री प्राप्त नाही, जर मागे राहिले तर काहीही हरकत नाही, जर ते स्वच्छ मनाने अल्लाह व पैगंबरांशी एकनिष्ठ असतील.[35] अशा सत्कर्मींवर आक्षेप घेण्यास कोणतीही जागा नाही आणि अल्लाह क्षमा करणारा व दया दाखविणारा आहे. अशाच प्रकारे त्या लोकांवरदेखील आक्षेपास कोणतेही स्थान नाही ज्यांनी स्वत: येऊन तुम्हाला विनंती केली होती की आम्हाला स्वारी उपलब्ध करून दिली जावी आणि जेव्हा तुम्ही सांगितले की मी तुमच्यासाठी स्वारीची व्यवस्था करू शकत नाही तेव्हा ते निरुपाय होऊन परत गेले आणि स्थिती अशी होती की त्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहात होते व त्यांना या गोष्टीचे अतोनात दु:ख होते की तेस्वखर्चाने युद्ध प्रवेशाची ऐपत बाळगत नव्हते. तथापि आक्षेप अशा लोकांवर आहे जे धनवान आहेत आणि तरीदेखील तुमच्यापाशी विनवणी करतात की त्याना युद्ध-प्रवेशाची माफी देण्यात यावी, त्यांनी घरी बसून राहणाऱ्यांमध्ये सामील होणे पसंत केले व अल्लाहने त्यांची हृदये मुहर केली. म्हणून आता त्यांना काही समजत नाही (की अल्लाहजवळ त्यांच्या या वागणुकीचा काय परिणाम निघणार आहे.) (९१-९३)

तुम्ही जेव्हा परतून त्यांच्याकडे पोहचाल तेव्हा ते निरनिराळी निमित्ते सादर करतील परंतु तुम्ही स्पष्ट सांगून टाका, निमित्त पुढे करू नका! आम्ही तुमच्या कोणत्याही गोष्टीचा

**३५)** यावरून कळले की जे लोक सकृत्दर्शनी असमर्थ असले त्यांच्याबाबतीत देखील निव्वळ वार्धक्य व आजारपण अथवा केवळ नादारी क्षम्य असण्यास पुरेसे कारण ठरत नाही तर त्यांचे हे निरुपाय केवळ अशाच स्वरूपात त्यांच्यासाठी माफीचे कारण ठरू शकतात जेव्हा ते अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी खऱ्याअर्थी एकनिष्ठ असावेत. अन्यथा एकनिष्ठ नसलेल्या स्थितीत कर्तव्यपूर्ततेच्या प्रसंगी तो आजारी अथवा नादार होता, केवळ या कारणास्तव एखाद्या इसमाला माफ केले जाऊ शकत नाही.



विश्वास ठेवणार नाही. अल्लाहने आम्हाला तुमच्या हकीगती दाखविल्या आहेत. आता अल्लाह आणि त्याचा पैगंबर तुमचे वर्तन पाहील. मग तुम्ही त्याच्याकडे परतविले जाल, जो परोक्ष व अपरोक्ष सर्वकाही जाणणारा आहे. आणि तो तुम्हाला दाखवून देईल की तुम्ही काय करीत होता. तुम्ही परतल्यावर ते तुमच्यासमोर अल्लाहच्या शपथा वाहतील जेणेकरून तुम्ही त्यांच्याकडे कानाडोळा कराल. तर बेलाशक तुम्ही त्यांच्याकडे कानाडोळाच करा, कारण हे अपवित्र आहेत व त्यांचे खरे ठिकाण नरक आहे. - जे त्यांच्या कमाईच्या मोबदल्यात त्यांच्या नशिबी येईल. ते तुमच्यासमोर शपथा वाहतील जेणेकरून तुम्ही यांच्याशी प्रसन्न व्हावे. वास्तविकत: तुम्ही यांच्याशी प्रसन्न झाला तरी अल्लाह कदापि अशा अवज्ञाकारी लोकांशी प्रसन्न होणार नाही. (९४-९६)

हे बदावी अरब द्रोह व दांभिकतेत अधिक कठोर आहेत व यांच्याबाबतीत या गोष्टीची शक्यता जास्त आहे की त्या धर्माच्या मर्यादापासून अपरिचित असतील जो धर्म अल्लाहने आपल्या पैगंबरावर अवतरला आहे.[36] अल्लाह सर्वकाही जाणणारा व बुद्धिमान आहे या बदावींमध्ये असे असे लोक उपस्थित आहेत जे अल्लाहच्या मार्गात काही खर्च करतात तर त्याला आपल्यावर जबरदस्तीचा भुर्दंड समजतात आणि तुमच्याबाबतीत आपत्तीची वाट पाहात आहेत (की तुम्ही एखाद्या चक्रात अडकावे तेव्हा त्यांनी आपल्या मानगुटीवरील या व्यवस्थेच्या ताबेदारीचे जू झुगारावे ज्यात तुम्ही त्यांना जखडले आहे.)

**३६)** बदावी अरबने अभिप्रेत ते खेडूत आणि सखल प्रदेशी अरब आहेत जे मदीनेच्या सभोवती वस्ती करून होते. हे लोक मदीन्यात एका बलाढ्य आणि संघटित शक्तिचा उदय होताना पाहून प्रथमत: तर प्रभावित झाले, मग इस्लाम आणि कुफ्रच्या संघर्षाच्या काळात एका मुदतीपर्यंत, सधीसाधुपणा आणि कुंपणावरच राहण्याची चाल चालत राहिले. मग जेव्हा हिजाज आणि नज्दच्या एका मोठ्या भागावर इस्लामी राज्याची सत्ता स्थिरावली व विरोधी टोळ्यांचा जोर त्यांच्यापुढे ओसरू लागला तेव्हा इस्लामच्या वर्तुळात प्रवेश करावा यातच या लोकांना कालनुकूल हित दिसले. परंतु या धर्माला सत्यधर्म समजून शुद्ध अंत:करणाने ईमान आणले असावे व प्रामाणिकपणे त्याच्या अपेक्षा पूर्ण केल्या असाव्यात असे लोक त्यांच्यात कमीच होते. त्यांच्या या स्थितीला या ठिकाणी अशा प्रकारे वर्णिलेले आहे की शहरी लोकांच्या तुलनेत खेडूत व सखल प्रदेशी लोक दांभिकी वर्तन जास्त करतात आणि सत्याच्या इन्काराची प्रवृत्ती त्यांच्यात जास्त आढळते. मग याचे कारणही सांगितले आहे की शहरी लोक तर विद्वान आणि सत्यप्रिय लोकांच्या सहवासाचा लाभ घेऊन काही प्रमाणात धर्म व धर्ममर्यादांना जाणूनही घेतात परंतु हे बदावी आयुष्यभर निव्वळ एका आर्थिक पशूप्रमाणे रात्रन्दिवस उपजीविकेच्या चक्रातच अडकलेले असतात आणि पाशवी जीवनाच्या गरजेपेक्षा उच्चतर अशा कोणत्याही गोष्टीकडे लक्ष देण्याची त्यांना सवडच मिळत नाही. म्हणून धर्म आणि त्याच्या मर्यादांपासून त्यांचे अपरिचित राहण्याच्या संभावनान जास्त आहेत. पुढे आयत क्र. १२२ मध्ये त्यांच्या या रोगावर उपाय सुचविला गेला आहे.

वास्तविकपणे दुष्टतेचे चक्र खुद्द यांच्याच मानगुटीवर आहे. आणि अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो. आणि याच बदावींमध्ये काही लोक असेसुद्धा आहेत जे अल्लाह व अंतिम दिनावर श्रद्धा ठेवतात, आणि जे काही ते खर्च करतात त्याला अल्लाहच्या पाशी सान्निध्य व त्याच्या पैगंबराकडून कृपेची दुआ मिळविण्याचे साधन बनवितात. होय, ते अवश्य त्यांच्याकरिता जवळीकीचे साधन आहे, आणि अल्लाह अवश्य त्यांना आपल्या कृपेत दाखल करील. नि:संशय अल्लाह क्षमाशील व दया दाखविणारा आहे. (९७-९९)

ते मुहाजिर व अन्सार ज्यांनी सर्वप्रथम श्रद्धेच्या हाकेला ओ देण्यात पुढाकार घेतला व तसेच जे प्रांजळपणे त्यांच्या मागे आले, अल्लाह त्यांच्याशी प्रसन्न झाला व ते अल्लाहशी प्रसन्न झाले. अल्लाहने त्यांच्याकरिता अशा बागा उपलब्ध केल्या आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील व ते त्यांच्यात सदैव राहतील, हेच महान यश आहे. (१००)

तुमच्या सभोवती जे बदावी राहतात त्यांच्यापैकी बरेचसे दांभिक आहेत, आणि याचप्रमाणे खुद्द मदीनावासियांतसुद्धा दांभिक आहेत, जे दांभिकपणामध्ये पटाईत झालेले आहेत, तुम्ही त्यांना ओळखत नाही, आम्ही त्यांना ओळखतो. जवळ आहे ती वेळ जेव्हा आम्ही त्यांना दुहेरी शिक्षा देऊ, मग ते जास्त मोठ्या शिक्षेसाठी परत आणले जातील. (१०१)

आणखी काही लोक आहेत ज्यांनी आपल्या चुका कबुल केल्या आहेत. त्यांचे कृत्य मिश्रित आहे, काही प्रामाणिक आहेत तर काही दुष्ट. अशक्य नव्हे की अल्लाह यांच्यावर पुन्हा मेहरबान होईल कारण अल्लाह क्षमाशील व दया दाखविणारा आहे हे पैगंबर (स.), तुम्ही यांच्या मालमत्तेतून दान घेऊन यांना शुद्ध करा आणि (सद्‌वर्तनाच्या मार्गात) यांना पुढे करा आणि यांच्यासाठी कृपेची दुआ करा कारण तुमची दुआ यांच्यासाठी समाधानकारक ठरेल, अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो. काय या लोकांना माहीत नाही की तो अल्लाहच आहे जो आपल्या भक्तांचा पश्चात्ताप स्वीकारतो, आणि त्यांच्या दानधर्माला स्वीकृती प्रदान करतो, आणि हे की अल्लाह अत्यंत क्षमाशील व दयाळू आहे? आणि हे पैगंबर (स.)! या लोकांना सांगा की तुम्ही कर्म करा, अल्लाह आणि त्याचा पैगंबर व श्रद्धावंत सर्व पाहतील की तुमची कार्यपद्धती आता कशी राहते, मग तुम्ही त्याच्याकडे परतविले जाल जो दृश्य आणि अदृश्य सर्व गोष्टी जाणतो, आणि तो तुम्हाला दाखवून देईल की तुम्ही काय करीत राहिला होता. (१०२-१०५)

काही दुसरे लोक आहेत ज्यांचा मामला अजून अल्लाहच्या हुकूमावरून स्थगित आहे. वाटल्यास त्यांना शिक्षा करील आणि वाटल्यास तो पुनरपि त्यांच्यावर मेहरबान



होईल. अल्लाह सर्वकाही जाणतो आणि तो बुद्धिमान आहे. (१०६)

काही अन्य लोक आहेत ज्यांनी एक मसजिद बनविली या हेतूपोटी की (सत्याच्या आवाहनाला) हानी पोहोचवावी, आणि (ईश्वराची भक्ती करण्याऐवजी) द्रोह करावा आणि श्रद्धाळूंमध्ये फूट पाडावी, व (त्या सकृतदर्शनी प्रार्थनागृहास) त्या व्यक्तीसाठी पाळतीची जागा बनवावी जो यापूर्वी अल्लाह व त्याच्या पैगंबराविरूद्ध लढण्यासाठी तयार राहिला आहे. ते निश्चितच शपथा घेऊन घेऊन सांगतील की आमचा हेतू तर भलाईखेरीज दुसरा कोणत्याही गोष्टीचा नव्हता, पण अल्लाह साक्षी आहे की ते पुरते लबाड आहेत तुम्ही त्या इमारतीत कदापि उभे राहू नका. जी मसजिद प्रथम दिनापासून ईशपरायणतेवर स्थापन करण्यात आली होती तीच यासाठी अधिक योग्य आहे की तुम्ही तिच्यात (उपासनेसाठी) उभे राहावे; तिच्यात असे लोक आहेत जे शुद्ध राहणे पसंत करतात, आणि अल्लाहला स्वच्छता बाळगणारेच पसंत आहेत.[३७] मग तुमची काय कल्पना आहे की उत्तम मनुष्य तो आहे ज्याने आपल्या इमारतीचा पाया अल्लाहचे भय व त्याची प्रसन्नता प्राप्त करण्यावर ठेवला आहे अथवा तो ज्याने आपली इमारत एका दरीच्या पोकळ व निराधार कड्यावर उभारली आणि ती त्याला घेऊन सरळ नरकाच्या आगीत जाऊन कोसळली? असल्या अत्याचारी लोकांना अल्लाह कधीही सरळमार्ग दाखवीत नसतो. ही इमारत जी त्यांनी बनविली आहे सदैव त्यांच्या हृदयांत अविश्वासाचे मूळ बनून राहील. (ज्याच्या उच्चाटनाची आता कोणतीच शक्यता नाही) याशिवाय की त्यांच्या हृदयांची शकले होतील. अल्लाह अत्यंत जाणकार व बुद्धिमान आहे. (१०७-११०)

वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहने श्रद्धावंतांकडून स्वत: त्यांना व त्यांच्या

**३७)** मदीनेत त्यावेळी दोन मस्जिदी होत्या. शहराच्या उपविभागात असलेली मस्जिदेकुबा ही एक आणि दुसरी शहरात असलेली मस्जिदेनबवी. या दोन मस्जिदी मौजूद असताना एक तिसरी मस्जिद बनविण्याची काही गरज नव्हती. परंतु दांभिकांनी असे निमित्त पुढे केले की पावसाळ्यात आणि हिवाळ्याच्या रात्रीत आम लोकांना विशेषकरून वृद्ध आणि लाचारांना जे या दोन्ही मस्जिदीपासून लांब राहतात, त्यांना पाच वेळा हजर होणे कठीण जाते. म्हणून केवळ नमाजींच्या सवलतीसाठी ही एक नवीन मस्जिद आम्ही बांधू इच्छितो. अशा प्रकारे त्यांनी ती बांधण्याची परवानगी मिळविली व तिला आपल्या कट कारस्थानांचा अड्डा बनविला. त्यांची इच्छा होती की पैगंबर (स.) यांना फसवून त्यांच्या हस्ते तिचे उद्‌घाटन करवावे. परंतु सर्वोच्च अल्लाहने पैगंबर (स.) ना त्यांच्या इराद्यापासून अगोदरच सावध केले तद्वत तबूकहून परतल्यानंतर पैगंबरांनी त्या हानीकारक मस्जिदला उद्‌ध्वस्त करून टाकले.

मालमत्तेला स्वर्गाच्या मोबदल्यात खरीदिले आहे.[३८] ते अल्लाहच्या मार्गात लढतात आणि मारतात व मरतात. त्यांच्याशी (स्वर्गाचे अभिवचन) अल्लाहच्या पाशी एक पक्के अभिवचन आहे तौरात, इंजील आणि कुरआनमध्ये. आणि कोण आहे जो अल्लाहपेक्षा अधिक आपली प्रतिज्ञा पूर्ण करणारा असेल? तर आनंद साजरा करा आपल्या या सौद्यावर जो तुम्ही अल्लाहशी पूर्ण केला आहे, हेच सर्वात महान यश आहे अल्लाहकडे पुन्हा पुन्हा वळणारे,[३९] त्याची भक्ती करणारे, त्याचे महिमागान करणारे, त्याच्यासाठी पृथ्वीवर भ्रमण करणारे,[४०] त्याच्यासमोर झुकणारे व नतमस्तक होणारे सत्कर्माचा हुकूम देणारे व दुष्कर्मापासून रोखणारे आणि अल्लाहच्या मर्यादांचे रक्षण करणारे, (अशी शान असते त्या श्रद्धावंतांची जे अल्लाहशी खरेदी-विक्रीचा हा सौदा चुकता करतात) आणि हे पैगंबर (स.)! या श्रद्धावंतांना शुभवार्ता द्या. (१११-११२)

नबी आणि त्या लोकांसाठी ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, हे उचित नाही की अनेकेश्वरवादींसाठी क्षमेची प्रार्थना करावी; मग ते त्यांचे नातेवाईक का असेनात, ज्याअर्थी ही गोष्ट त्यांच्यावर उघड झालेली आहे की ते नरकाच्या लायकीचे आहेत. इब्राहीम (अ.) ने आपल्या वडिलांकरिता जी क्षमेची प्रार्थना केली होती ती तर त्या वचनामुळे होती जे त्याने आपल्या वडिलांना दिलेले होते, पण जेव्हा ही गोष्ट त्याच्यावर उघड झाली की त्याचा पिता अल्लाहचा शत्रू आहे तेव्हा तो त्यापासून अलिप्त राहिला. सत्य असे आहे की इब्राहीम (अ.) मोठा कोमलहृदयी ईशपरायण आणि सहिष्णू माणूस होता.

(११३-११४)

अल्लाहची ही रीत नव्हे की लोकांना मार्गदर्शन दिल्यानंतर पुन्हा मार्गभ्रष्ट करावे - जोपर्यंत की त्यांना स्पष्टपणे हे दाखविले जात नाही की त्यांनी कोणत्या गोष्टीपासून

३८) या ठिकाणी ईश्वर आणि दासा दरम्यान ईमानचा जो व्यवहार असतो त्याला सौदा म्हणून संबोधिले गेले आहे. याचा अर्थ असा ईमान वास्तविकपणे एक करार आहे. त्यानुसार दास स्वत:ची आणि आपल्या मालमत्तेची ईश्वराला विक्री करतो व त्याच्या मोबदल्यात ईश्वराकडून त्याचा हा वायदा स्वीकारतो की मृत्यूनंतर दुसऱ्या जीवनात तो त्याला स्वर्ग प्रदान करील.

३९) मुळात 'अत्ताईबून' असा शब्द प्रयोग झाला आहे. त्याचा शाब्दिक अनुवाद 'पश्चात्ताप करणारे' असा आहे. परंतु ज्या भाषाशैलीत हा शब्द प्रयुक्त झाला आहे त्यावरून पश्चात्ताप व्यक्त करणे ईमानधारकांचा कायमस्वरूपी गुणधर्म आहे हे अगदी स्पष्ट होते. म्हणून याचा खरा अर्थ असा की ते एकदाच पश्चात्ताप व्यक्त करतात असे नाही तर सदैव पश्चात्ताप व्यक्त करीत असतात. पश्चात्ताप (तौबा) चा मूळ अर्थ रूजू करणे अथवा वळणे असा आहे. म्हणून या शब्दाचे मूळ स्वरूप प्रकट करण्यासाठी आम्ही त्याचा स्पष्टीकरणात्मक अनुवाद 'ते अल्लाहकडे पुन्हा पुन्हा वळणारे' असा केला आहे.

४०) दुसरा अनुवाद 'रोजे करणारे' असा देखील होऊ शकतो.



अलिप्त राहिले पाहिजे. वास्तविक पाहता अल्लाह सर्वज्ञ आहे. आणि ही देखील वस्तुस्थिती आहे की अल्लाहच्याच ताब्यात पृथ्वी व आकाशांचे राज्य आहे, त्याच्याच अधिकारांत जीवन व मरण आहे आणि तुमचा कोणीही समर्थक व सहायक असा नाही जो तुम्हाला त्यापासून वाचवू शकेल. (११५-११६)

अल्लाहने क्षमा केली नबीला व त्या मुहाजिरीन व अन्सार लोकांना (देशांतर करणाऱ्या व त्यांची मदत करणाऱ्या लोकांना) ज्यांनी मोठ्या विपत्तीच्या प्रसंगी नबीला साथ दिली. यद्यपि त्यांच्यापैकी काही लोकांची हृदये डळमळू लागली होती.[४१] (परंतु जेव्हा त्यांनी नबीला साथ दिली तेव्हा) अल्लाहने त्यांना क्षमा केली. नि:संशय त्याचा व्यवहार या लोकांशी अत्यंत प्रेमळ व कृपेचा आहे - आणि त्या तिघांनादेखील त्याने माफ केले ज्यांचे प्रकरण पुढे ढकलले गेले होते - जेव्हा जमीन सर्वथैव विस्तीर्ण असूनदेखील त्यांच्यावर तंग झाली आणि त्यांच्या स्वत:चे जीवदेखील त्यांना भारी वाटू लागले आणि त्यांनी जाणून घेतले की अल्लाहपासून वाचण्यासाठी कोणतेही आश्रयस्थान खुद्द अल्लाहच्या कृपाछत्राशिवाय नाही; तेव्हा अल्लाह आपल्या कृपेने त्यांच्याकडे वळला जेणेकरून त्यांनी त्याच्याकडे परत यावे. नि:संशय अल्लाह अत्यंत क्षमाशील व परम दयाळू आहे.[४२] (११७-११८)

हे श्रद्धावंतांनो! अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि सत्यवादी लोकांना साथ द्या. मदीनानिवासी व सभोवतालच्या बदावींना हे मुळीच शोभले नाही की अल्लाहच्या पैगंबराला सोडून घरी बसून राहावे आणि त्यांच्यापासून बेपर्वा होऊन आपापल्या जीवाचीच काळजी घेण्यात लागले असावे कारण असे कधीही घडणार नाही की

४१) म्हणजे काही एकनिष्ठ 'सहाबा' देखील त्या कठीण प्रसंगी युद्धावर जाण्यापासून काही ना काही प्रमाणात जीव वाचवू लागले होते परंतु त्यांच्या हृदयात ईमान होते आमि ते शुद्ध अंत:करणाने सत्यधर्माशी प्रेम करीत होते. म्हणून सरतेशेवटी त्यानी आपल्या या दुर्बलतेवर विजय प्राप्त केला.

४२) हे तिन्ही गृहस्थ, कअब बिन मालिक (रजि.), हिलाल बिन उमय्या (रजि.) आणि मुरारा बिन रबीअ (रजि.) होते. तिन्ही सच्चे ईमानधारक होते. यापूर्वी आपली एकनिष्ठता त्यांनी अनेकदा सिद्ध केली होती, त्याग केले होते परंतु त्यांच्या इतक्या सेवा असून देखील तबूकच्या युद्धाच्या नाजूक प्रसंगी जेव्हा सर्व ईमानधारकांना लढण्यासाठी युद्धावर निघण्याचा हुकूम दिलेला होता, या गृहस्थानी आळशीपणा दाखविला. त्यावर कठोरतेने जाब विचारणा केली गेली. पैगंबर (स.) यांनी तबूकहून परत येताच मुसलमानांना आज्ञा केली की कोणीही या तिन्ही जणांशी बोलचाल व सलाम करता कामा नये. ४० दिवसांनंतर त्यांच्या पत्नींना देखील त्यांच्यापासून दूर राहण्याची ताकीद दिली गेली. मदीनेच्या वस्तीत अक्षरश: त्यांची जी दशा झाली होती तिचेच चित्र या आयतीत चितारलेले आहे. सरतेशेवटी जेव्हा त्यांच्या बहिष्काराला ५० दिवस झाले तेव्हा माफीची सदरहू आज्ञा उतरली.

अल्लाहच्या मार्गात भूक, तहान आणि शारीरिक कष्टाचा एखादा त्रास त्यांनीसोसावा आणि सत्याचा इन्कार करणाऱ्यांना जो मार्ग अप्रिय आहे, त्यावर एखादे पाऊल त्यांनी टाकावे आणि एखाद्या शत्रूवर त्यांनी (सत्याशी शत्रुत्वाचा) सूड उगवावा आणि याच्या मोबदल्यात त्यांच्या हिशेबी एखादे सत्कृत्य लिहिले जाऊ नये. नि:संशय अल्लाहजवळ परोपकारींच्या सेवेचा हक्क हिरावला जात नाही. अशाच प्रकारे हे देखील कधी घडणार नाही की (अल्लाहच्या मार्गात) त्यांनी थोडा किंवा फार खर्च सोसावा आणि (युद्धाची पराकाष्ठा करताना) त्यांनी एखादी दरी पार करावी आणि त्यांच्या हिशेबी त्याची नोंद होऊ नये, जेणेकरून अल्लाह त्यांच्या या उत्तम कामगिरीचे फळ त्यांना प्रदान करील.

(११९-१२०)

आणि हे काही आवश्यक नव्हते की सर्वचेसर्व श्रद्धावंत निघाले असते, परंतु असे का घडले नाही की त्यांच्या वस्तीतील प्रत्येक भागातून काही लोक निघाले असते आणि धर्माचा बोध प्राप्त केला असता, आणि परत जाऊन आपल्या प्रदेशातील रहिवाशांना सावध केले असते, जेणेकरून (मुस्लिमेतर वर्तन) त्यांनी वर्ज्य केले असते.[४३]

(१२१-१२२)

हे श्रद्धावंतांनो! युद्ध करा त्या सत्याचा इन्कार करणाऱ्यांशी जे तुमच्या निकट आहेत.[४४] आणि हे आवश्यक आहे की त्यांना तुमच्यात कठोरपणा आढळावा,[४५] व समजून असा की अल्लाह ईशपरायण लोकांसमवेत आहे. जेव्हा एखादी नवीन 'सूरत' अवतरते, तेव्हा त्यांच्यापैकी काहीजण (टिंगल म्हणून मुसलमानांना) विचारतात की, ''सांगा, तुम्हांपैकी कोणाच्या श्रद्धेमध्ये यामुळे वाढ झाली?'' ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे त्यांच्या श्रद्धेमध्ये तर खरोखर (प्रत्येक अवतरलेल्या सूरतने) वाढच केलेली आहे आणि ते तिच्यामुळे समाधानी आहेत. परंतु ज्या लोकांच्या हृदयांना (दांभिकतेचा) रोग जडलेला होता, त्यांच्या पूर्ववत मलीनतेवर आणखी एका मलीनतेची भर पडली आणि ते

**४३)** अभिप्रेत असे की तमाम बदावींचे मदिना शहरी येणे काही जरूरीचे नव्हते. प्रत्येक वस्ती आणि प्रदेशाच्या लोकांपैकी काहीच लोकांनी मदीन्यात येऊन धर्मज्ञान प्राप्त केले असते व परत जाऊन आपल्या प्रदेशातील लोकांना धर्म शिकविला असता तर बदावींना ज्यामुळे दांभिकतेचा रोग जडला आहे व ज्यामुळे इस्लामचा स्वीकार केला असताना देखील ते मुसलमान असण्याचे कर्तव्य पार पाडीत नाहीत, ते अज्ञान त्यांच्यात ठरले नसते.

**४४)** आयतच्या संदर्भावर विचार केला असता या ठिकाणी 'कुफ्फार' ने अभिप्रेत ते दांभिक लोक आहेत ज्यांच्या सत्याचा इन्कार पूर्णपणे प्रकट झालेला होता व इस्लामी समाजात मिसळून राहण्यामुळे समाजाला अतोनात हानी पोहचत होती, ही गोष्ट स्पष्टपणे प्रकट होते.

**४५)** म्हणजे आतापर्यंत त्यांच्याशी जो मृदू व्यवहार होत आला आहे, आता तो संपुष्टात आला पाहिजे.



मरेपर्यंत अश्रद्धेमध्येच गुरफटून राहिले. काय हे लोक पाहात नाहीत की प्रत्येक वर्षी एक दोनदा हे परीक्षेत टाकले जात असतात[४६] परंतु तरी देखील हे पश्चात्तापही करीत नाहीत व काही बोधही घेत नाहीत. जेव्हा एखादी सूरत अवतरते तेव्हा हे लोक नजरेनेच एकदुसऱ्याशी बोलतात की, एखादे वेळी तुम्हाला कुणी पाहात तर नाही ना? मग गुपचुपपणे निसटतात. अल्लाहने यांची हृदये फिरविली आहेत कारण हे अजाण लोक आहेत. (१२३-१२७)

पहा! तुम्हा लोकांजवळ एक पैगंबर आला आहे जो खुद्द तुम्हापैकीच आहे. तुम्हाला नुकसान पोहचणे त्याला जड वाटते. तुमच्या कल्याणाचा तो इच्छुक आहे. श्रद्धावंतांसाठी तो प्रेमळ आणि दयाळू आहे. - आता जर हे लोक तुमच्याशी विमुख होत आहेत तर हे पैगंबर (स.) यांना सांगून टाका की, ''माझ्यासाठी अल्लाह पुरेसा आहे. त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही त्याच्यावरच मी भिस्त ठेवली आणि तो स्वामी आहे महान राजसिंहासनाचा.'' (१२८-१२९)

**४६)** म्हणजे कोणतेही वर्ष असे लोटत नाही जेव्हा एकदा अथवा दोनदा अशी परिस्थिती समोर येत नाही ज्यात त्यांच्या ईमानचे दावे परीक्षेच्या कसोटीवर लावले जात नाही व त्या दाव्यांचे पितळ उघडे पडत नाही.

# १० सूरह यूनुस

*(मक्काकालीन, वचने १०९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ लाऽऽम रा. ही त्या ग्रंथाची वचने आहेत जी विवेक व बोधपूर्ण आहेत. (१)

लोकांकरिता ही एक अजब गोष्ट झाली काय की आम्ही खुद्द त्यांच्यातीलच एका माणसावर दिव्य प्रकटन (वह्य) पाठविले की (गफलतीत पडलेल्या) लोकांना सावध करावे, आणि जे श्रद्धा ठेवतील त्यांना शुभवार्ता द्यावी की त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याजवळ खराखुरा मानसन्मान व प्रतिष्ठा आहे? (यावर) इन्कार करणाऱ्यांनी म्हटले की ही व्यक्ती तर उघडपणे - जादूगार आहे.[१] (२)

वस्तुस्थिती तर अशी आहे की तुमचा पालनकर्ता तोच ईश्वर आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले मग राजसिंहासनावर विराजमान होऊन सृष्टीची व्यवस्था चालवीत आहे. कोणीही शिफारस करणारा नाही त्याच्या परवानगीशिवाय. हाच अल्लाह तुमचा पालनकर्ता आहे, म्हणून तुम्ही त्याचीच भक्ती करा. मग काय तुम्ही शुद्धीवर येणार नाही? (३)

त्याच्याकडेच तुम्हा सर्वांना परतावयाचे आहे, हे अल्लाहचे पक्के वचन आहे. नि:संशय निर्मितीचा प्रारंभ तोच करतो, मग तोच दुसऱ्यांदा निर्माण करील जेणेकरून ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली व ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांना न्यायपूर्ण मोबदला द्यावा, आणि ज्यांनी अश्रद्धेची पद्धत अवलंबिली त्यांनी उकळते पाणी प्यावे व दु:खदायक शिक्षा भोगावी, सत्याच्या त्या इन्कारापायी जे ते करीत राहिले. (४)

तोच आहे ज्याने सूर्याला तेजस्वी बनविले व चंद्रास कांतिमान बनविले आणि चंद्रकलेचे टप्पे योग्यरीत्या सुनिश्चित केले की जेणेकरून तुम्ही वर्ष व तारखांचे हिशेब माहीत करावे. अल्लाहने हे सर्वकाही सत्याधिष्ठित निर्माण केलेले आहे. तो आपले संकेत उघड करून करून प्रस्तुत करीत आहे त्या लोकांसाठी ज्यांना ज्ञान आहे नि:संशय रात्र व दिवसाच्या आलटून पालटून येण्यात व त्या प्रत्येक वस्तूमध्ये जी अल्लाहने पृथ्वी व आकाशांत निर्माण केली आहे त्या लोकांकरिता संकेत आहेत जे (चुकीची दृष्टी व

१) पैगंबर मुहम्मद (स.) यांना ते या अर्थाने जादूगार म्हणत असत की जो कोणी कुरआन ऐकून व त्यांच्या प्रचाराने प्रभावित होऊन ईमान आणत असे तो प्राणार्पणासाठी व सर्व जगाला मुकण्यासाठी व सर्व संकटे झेलण्यासाठी तयार होत असे.



चालीपासून) दूर राहू इच्छितात.[२] (५-६)

वस्तुस्थिती अशी आहे की ज्या लोकांना आमची भेट अपेक्षित नाही आणि जे ऐहिक जीवनावर संतुष्ट व समाधानी बनले आहेत व जे लोक आमच्या संकेतांपासून गाफील आहेत - त्यांचे शेवटचे ठिकाण नरक असेल त्या दुष्टतेपायी ज्यांची कमाई ते (आपल्या या चुकीच्या श्रद्धेमुळे व चुकीच्या आचरणामुळे) करीत राहिले. (७-८)

आणि ही देखील वस्तुस्थिती आहे की ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कृत्ये करीत राहिले त्यांना त्यांचा पालनकर्ता त्यांच्या श्रद्धेमुळे सरळमार्गी बनवील, ऐश्वर्यसंपन्न स्वर्गांमध्ये, त्यांच्या खालून कालवे वाहतील, तेथे त्यांची घोषणा अशी असेल की, ''पवित्र आहेस तू हे परमेश्वरा!'' त्यांची प्रार्थना अशी असेल, ''शांती व सुरक्षितता असो'' आणि त्यांच्या प्रत्येक गोष्टीचा शेवट असा असेल, ''सर्व स्तुती सर्व जगांच्या पालनकर्त्या अल्लाहसाठीच आहे.'' (९-१०)

जर एखादे वेळी अल्लाहने लोकांशी वाईट व्यवहार करण्यात तितकीच घाई केली असती जितकी ते लोक ऐहिक भले मागण्यासाठी घाई करतात तर त्यांची कार्यमुदत केव्हाच संपुष्टात आणली गेली असती. (परंतु ही आमची रीत नव्हे) म्हणून आम्ही त्या लोकांना ज्यांना आम्हाला भेटण्याची अपेक्षा नाही त्यांच्या शिरजोरीतच भटकत राहण्याची सूट देत असतो. माणसाची स्थिती अशी आहे की जेव्हा त्याच्यावर एखादा बिकट प्रसंग ओढवतो तेव्हा उभा असता, - बसता व पहुडला असता आमचा धावा करतो, पण जेव्हा आम्ही त्याचे संकट निवारण करतो तेव्हा अशाप्रकारे तो चालता होतो जणूकाही त्याने कधीही त्याच्या कोणत्याही बिकट प्रसंगी आमचा धावा केलाच नव्हता अशा प्रकारे मर्यादा ओलांडणाऱ्यासाठी त्यांची कृत्ये शोभिवंत बनविली गेली आहेत. लोकहो! तुमच्या पूर्वीच्या जनसमूहांना[३] आम्ही नष्ट करून टाकले जेव्हा त्यांनी अन्यायाचे वर्तन अवलंबिले

२) म्हणजे या खुणांनी वास्तवतेप्रत केवळ तेच लोक पोहचू शकतात ज्यांच्यात हे गुण आहेत. एक असा की अज्ञानाच्या पूर्वग्रहदोषापासून पाक होऊन, ज्ञान प्राप्त करण्याची अल्लाहने मानवाला जी साधने दिली आहेत त्यांचा त्याने उपयोग करावा. दुसरा असा की चुकांपासून स्वत:ला वाचवावे आणि योग्यमार्गाचा अवलंब करावा, त्यांच्यात स्वत: अशी इच्छा असली पाहिजे.

३) मूळात 'कर्न' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. सर्वसामान्यत: अरबी भाषेत त्याने 'एका युगातील लोक' अभिप्रेत असते. परंतु दिव्य कुरआनात ज्या पद्धतीने निरनिराळ्या प्रसंगी या शब्दाचा प्रयोग केला गेला आहे तेणेकरून असे वाटते की 'कर्न'ने अभिप्रेत, आपल्या काळात ज्याने उत्कर्ष गाठले असावे असे ते राष्ट्र होय, अशा राष्ट्राच्या विनाशाचा अर्थ हमखास केवळ इतकाच नव्हे की मुळासकट त्याचा वंशविच्छेद केला जावा तर उत्कर्षाच्या स्थानापासून त्याचे पतन होणे, त्याच्या संस्कृतीचे नष्ट होणे, त्याचे वेगळे अस्तित्व नाहीसे होणे व त्याचे घटक विखरून दुसऱ्या राष्ट्रांत विलीन होणे, हेसुद्धा विनाशाचेच प्रकार आहेत.

आणि त्यांचे पैगंबर त्यांच्यापाशी उघडउघड संकेत घेऊन आले आणि त्यांनी श्रद्धा ठेवलीच नाही. अशा प्रकारे आम्ही गुन्हेगारांना त्यांच्या गुन्ह्याचा बदला देत असतो. आता त्यांच्यानंतर आम्ही तुम्हाला भूतलावर त्यांची जागा दिली आहे जेणेकरून पाहावे, तुम्ही कशी कृत्ये करता. (११-१४)

जेव्हा आमच्या स्पष्ट गोष्टी त्यांना ऐकविल्या जातात तेव्हा ते लोक जे आम्हाला भेटण्याची अपेक्षा करीत नाहीत, म्हणतात, ''याच्याऐवजी एखादा अन्य कुरआन आणा अथवा याच्यात काही बदला करा.'' हे पैगंबर (स.) त्यांना सांगा, ''माझे हे काम नव्हे की मी आपल्याकडून याच्यात काही फेरबदल करावा. मी तर केवळ त्या दिव्य प्रकटनाचे अनुसरण करणारा आहे, जे माझ्याकडे पाठविले जाते. जर मी आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली तर मला एका मोठ्या भयंकर अशा दिवसाच्या यातनेची भीती आहे." आणि सांगा, ''जर अल्लाहची अशीच इच्छा असती तर मी हा कुरआन तुम्हाला कधीच ऐकविला नसता आणि अल्लाहने तुम्हाला याची खबरसुद्धा दिली नसती. तसे पाहिले तर मी यापूर्वी तुमच्यातच आयुष्य व्यतीत केले आहे, तुम्ही बुद्धीचा उपयोग करीत नाही काय?[४] मग त्याच्यापेक्षा मोठा अत्याचारी अन्य कोण असेल जो एक असत्य गोष्ट रचून अल्लाहशी तिचा संबंध जोडील अथवा अल्लाहच्या सत्य संकेतांना खोटे ठरवील नि:संशय गुन्हेगार कधीच सफल होऊ शकत नाहीत.'' (१५-१७)

हे लोक अल्लाहशिवाय त्यांची उपासना करीत आहेत जे यांना नुकसान आणि फायदादेखील पोहचवू शकत नाहीत, आणि म्हणतात की हे अल्लाहच्या येथे आमचे शिफारसी आहेत. हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''तुम्ही अल्लाहला त्या गोष्टीची खबर देता काय जिला तो आकाशांतही जाणत नाही व पृथ्वीवरही?[५]'' पवित्र आहे तो आणि श्रेष्ठ व उच्चतर आहे त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करतात. (१८)

प्रारंभी सर्व मानव एकच धर्मसमुदायी होते, नंतर त्यांनी विविध श्रद्धा व पंथ

---

**४)** म्हणजे मी तुमच्यासाठी काही अपरिचित माणूस नव्हे, तुमच्याच शहरात जन्मलो, तुमच्यामध्येच बालपणापासून ते या वयापर्यंत वाढलो. आता माझे उभे जीवन पाहता इमानेइतबारे तुम्ही असे म्हणू शकता का की हा कुरआन माझे स्वरचित साहित्य असू शकतो. तसेच आपल्या मनाने एखादी गोष्ट रचावी व ही अल्लाहकडून माझ्यावर उतरली आहे इतके धडधडीत खोटे मी बोलेन अशी तुम्ही माझ्याकडून अपेक्षा करता काय?

**५)** एखाद्या वस्तूचे अल्लाहला ज्ञान नसणे म्हणजे मुळातच ती वस्तू अस्तित्वातच नसणे असा त्याचा अर्थ होतो कारण अस्तित्वात असलेले सर्वकाही अल्लाहला ज्ञात आहे. म्हणून शिफारसींचे अस्तित्वात नसण्यासाठी ही एक अत्यंत मार्मिक वर्णनशैली आहे की सर्वश्रेष्ठ अल्लाह तर जाणत नाही की कोणी पृथ्वी व आकाशांत त्याच्या हुजुरात तुमची शिफारस करणारा आहे, मग ही तुम्ही कोणत्या शिफारसींची त्याला खबर देत आहात?



बनविले, आणि जर तुझ्या पालनकर्त्याकडून अगोदरच एक गोष्ट निश्चित केली गेली नसती तर ज्या गोष्टीत ते परस्पर मतभेद करीत आहेत, तिचा निर्णय लावला गेला असता.[६] (१९)

आणि हे जे ते सांगत आहेत की या पैगंबरावर याच्या पालनकर्त्याकडून एखादे संकेतवचन का अवतरले गेले नाही. तर यांना सांगा, ''परोक्षचा स्वामी व मुखत्यार तर अल्लाहच आहे, बरे तर प्रतीक्षा करा, मी देखील तुमच्याबरोबर प्रतीक्षा करीत राहतो.'' (२०)

लोकांची स्थिती अशी आहे की संकटानंतर जेव्हा आम्ही त्यांना कृपेचा स्वाद चाखवितो तेव्हा ते लगेच आमच्या संकेतांच्या बाबतीत क्लृप्त्या सुरू करतात.[७] यांना सांगा, ''अल्लाह आपल्या चालीत तुमच्यापेक्षा अधिक चपळ आहे, त्याचे फरिश्ते तुमच्या सर्व कुटिलतेची नोंद करीत आहेत.'' तो अल्लाहच आहे जो तुम्हाला खुष्की व पाण्यावर चालवितो तद्वतच जेव्हा तुम्ही नौकेत स्वार होऊन अनुकूल वाऱ्यात आनंदी व उल्हसित प्रवास करीत असता, आणि मग अकस्मात प्रतिकूल वाऱ्याचा जोर वाढतो आणि सर्व बाजूंनी लाटांचा मारा बसू लागतो आणि प्रवाशांना कळून चुकते की आपण वादळांत वेढले गेलो, त्याप्रसंगी सर्वजण अल्लाहसाठीच आपल्या धर्माला निर्भेळ करून अल्लाहजवळ प्रार्थना करतात की, ''जर तू आम्हाला या संकटातून तारलेस तर आम्ही कृतज्ञ दास बनू.'' परंतु जेव्हा तो त्यांना वाचवितो तर तेव्हा तेच लोक सत्यापासून विमुख होऊन पृथ्वीतलावर बंड करू लागतात, लोकहो, तुमचे हे बंड तुमच्याचविरूद्ध होत आहे. ऐहिक जीवनाची काही दिवसाची मौजमजा आहे (लुटून घ्या) नंतर आमच्याकडे तुम्हाला परत यावयाचे आहे, त्यावेळी आम्ही तुम्हाला दाखवून देऊ की तुम्ही काय काय करीत होता. जगातील हे जीवन (ज्याच्या नशेत मस्त होऊन तुम्ही आमच्या संकेतांकडे दुर्लक्ष करीत आहात) याचे उदाहरण असे आहे की जसे आकाशांतून आम्ही पाण्याचा वर्षाव केला तर जमिनीचे पीक जे माणसे व जनावरे सर्वजण खात असतात खूप घनदाट झाले, मग ऐन वेळी जेव्हा जमीन अत्यंत बहरलेली होती आणि शेते नटून थटून उभी होती आणि त्यांचे मालक अशा कल्पनेत होते की आम्ही आता याचा उपभोग घेण्यास समर्थ आहोत, अकस्मात रात्री किंवा दिवसा आमची आज्ञा आली आणि आम्ही तिला असे नष्ट

---

**६)** म्हणजे जर सर्वोच्च अल्लाहने अगोदरच हा निर्णय घेतला नसता की निवाडा कयामतच्या दिवशी लागेल तर येथेच त्यांचा निकाल लागला असता.

**७)** म्हणजे संकट सर्वोच्च अल्लाहकडून एक निशाणी असते. ती माणसाला जाणीव देते की प्रत्यक्षात अल्लाहशिवाय त्याचे निवारण करणारा कोणीच नाही. परंतु जेव्हा ते संकट चळते आणि चांगली वेळ येते तेव्हा मग हे म्हणू लागतात की हा आमच्या देवदेवतेचा व शिफारसींच्या मेहरबानीचा परिणाम आहे.

करून टाकले जणूकाही काल तेथे काहीच नव्हते अशा प्रकारे आम्ही संकेत उघड करून करून दाखवितो त्या लोकांसाठी जे विचार करणारे आहेत. (तुम्ही या नश्वर जीवनाच्या मोहपाशात पडला आहात) आणि अल्लाह तुम्हाला शांतिभुवन (दारुस्सलाम) कडे आमंत्रित करीत आहे.[८] (मार्गदर्शन त्याच्या अधिकारात आहे) तो ज्याला इच्छितो त्याला सरळमार्ग दाखवितो. ज्या लोकांनी भलाईची पद्धत अंगिकारली त्यांच्यासाठी भले आहे आणि कृपादेखील. व त्यांच्या मुखावर काळिमा व मानहानी पसरणार नाही, ते स्वर्गासाठी पात्र आहेत, जेथे ते सदैव राहतील आणि ज्या लोकांनी दुष्कर्म प्राप्त केले त्यांचे जसे दुष्कर्म असेल तसाच त्यांना मोबदला मिळेल. मानहानी त्यांच्यावर पसरली असेल. अल्लाहपासून त्यांना कोणीही वाचविणारा असणार नाही. त्यांच्या चेहऱ्यावर असा काळिमा पसरला असेल जणू रात्रीचे कृष्णपटल त्यांच्यावर पडले असतील. ते नरकाला पात्र आहेत जेथे ते सदैव राहतील. ज्या दिवशी आम्ही त्या सर्वांना (आपल्या न्यायालयात) एकत्र जमा करू, मग त्या लोकांना ज्यांनी अनेकेश्वरवादाचा अंगिकार केला - सांगू की, थांबा तुम्ही आणि तुमचे ठरविलेले भागीदारदेखील, मग आम्ही त्यांच्यामधील अनोळखीपणाचा पडदा दूर करू[९] आणि त्यांचे भागीदार म्हणतील की, ''तुम्ही आमची भक्ती तर करीत नव्हता. आमच्या आणि तुमच्या दरम्यान अल्लाहची ग्वाही पुरेशी आहे की (तुम्ही आमची भक्ती करीत असाल तरी) आम्ही तुमच्या त्या भक्तीपासून पूर्णपणे अनभिज्ञ होतो.'' त्यावेळी प्रत्येकजण आपल्या कर्माची फळे चाखील, सर्वजण आपल्या खऱ्या स्वामीकडे परतविले जातील आणि ते सर्व असत्य जे त्यांनी रचले होते हरवतील. (२१-३०)

यांना विचारा, कोण तुम्हाला आकाश व पृथ्वीतून उपजीविका देतो? या ऐकण्याच्या व पाहण्याच्या शक्ती कोणाच्या अधिकारात आहेत? कोण निर्जीवमधून सजीव आणि सजीवांमधून निर्जीव काढतो? कोण या विश्वव्यवस्थेची उपाययोजना करीत आहे? ते अवश्य म्हणतील की अल्लाह. सांगा, मग तुम्ही त्याच्याशी परायण का रहात नाही? तेव्हा हाच अल्लाह तुमचा खरा पालनकर्ता आहे. मग सत्यानंतर पथभ्रष्टतेशिवाय आणखी

८) म्हणजे जगात जीवन जगण्याच्या त्या पद्धतीकडे बोलवीत आहे जी परलोकातील जीवनात तुम्हाला 'दारूस्सलाम'चा अधिकारी बनवील. 'दारुस्सलाम'ने अभिप्रेत आहे जन्नत, व त्याचा अर्थ होतो 'शांतीभूवन', ती जागा जेथे कोणतीही आपत्ती, कोणतीही हानी, कोणतेही दु:ख आणि कोणतीही यातना असत नाही.

९) म्हणजे अनेकेश्वरवाद्यांना त्यांचे उपास्य ओळखून घेतील की हे ते लोक आहेत जे आमची उपासना करीत होते आणि अनेकेश्वरवादी आपल्या उपास्यांना ओळखतील की हे आहेत तेच ज्यांची आम्ही उपासना करीत होतो.



काय उरले आहे? शेवटी तुम्ही कोठे वळविले जात आहात?[१०] (हे पैगंबर (स.) पहा) अशा प्रकारे अवज्ञेचा अंगिकार करणाऱ्यावर तुमच्या पालनकर्त्याचे वचन सत्यप्रमाणित झाले, की ते मान्य करणार नाहीत. (३१-३३)

यांना विचारा तुम्ही ठरविलेल्या भागीदारांपैकी कोणी आहे जो निर्मितीचा प्रारंभसुद्धा करीत असेल आणि मग त्याची पुनरावृत्तीदेखील करीत असेल? सांगा, तो केवळ अल्लाह आहे जो निर्मितीचा प्रारंभही करतो व त्याची पुनरावृत्तीदेखील, मग तुम्ही या कोणत्या उलट्या मार्गावर चालविले जात आहात? (३४)

यांना विचारा की तुम्ही ठरविलेल्या भागीदारांपैकी कोणी असा आहे जो सत्याकडे मार्गदर्शन करीत आहे? सांगा, तो केवळ अल्लाहच आहे जो सत्याकडे मार्गदर्शन करतो. मग सांगा, जो सत्याकडे मार्गदर्शन करतो तो याचा अधिक हक्कदार आहे की त्याचे अनुकरण केले जावे अथवा त्याचे ज्याला स्वत:ला मार्ग सापडत नाही, याशिवाय की त्याला मार्गदर्शन केले जाईल? शेवटी तुम्हाला झाले तरी काय आहे, कसले विपरीत निर्णय घेत आहात? (३५)

वस्तुस्थिती अशी आहे की यांच्यापैकी बहुतेक लोक केवळ अनुमान व कल्पनांच्या पाठीमागे जात आहेत,[११] वास्तविक पाहता कल्पना, सत्याची गरज यत्किंचितही भागवीत नाही. जे काही हे करीत आहेत अल्लाह ते चांगलेच जाणतो. (३६)

आणि हा कुरआन ती वस्तू नव्हे जी अल्लाहच्या दिव्य-प्रकटना व ज्ञानाविना रचली जावी. उलट हा तर जे काही पूर्वीच आलेले आहे त्याचे समर्थन आणि त्या विशिष्ट

१०) लक्षात असावे की जाहीर संबोधन लोकांना आहे आणि त्यांना सवाल असा केला जात नाही की, ''तुम्ही कोठे बहकत आहात'' तर असा आहे की, ''तुम्ही कोठे वळविले जात आहात.'' यावरून हे अगदी स्पष्ट होते की कोणी असा दिशाभूल करणारा माणूस अथवा गट अस्तित्वात आहे जो लोकांना योग्य दिशेपासून दुसरीकडे वळवून चुकीच्या दिशेने नेत आहे. याच कारणास्तव लोकांना म्हटले जात आहे की तुम्ही आंधळे बनून चुकीचे मार्गदर्शन करणाऱ्याच्या मागे का भरकटत आहात? आपल्या डोक्यातील बुद्धीचा उपयोग करून विचार का करीत नाही की वस्तुस्थिती जेव्हा अशी आहे तर मग तुम्हाला कोणीकडे चालविले जात आहे.

११) म्हणजे ज्यांनी धर्म बनविले, ज्यांनी तत्त्वज्ञान रचले, आणि ज्यानी जीवन कायदे योजिले, त्यानी देखील हे सर्वकाही ज्ञानाच्या आधारे केले नाही तर तर्क व अनुमानाच्या आधारे केले. आणि ज्यांनी त्या धार्मिक व भौतिक नेत्यांचे अनुकरण केले त्यांनी देखील जाणून व समजून घेऊन नव्हे तर केवळ तर्काच्या आधारे अनुकरण पत्करले की इतके मोठे मोठे लोक जेव्हा असे म्हणतात व वाडवडील देखील त्यांना मानत आले आहेत व सर्व जग त्यांचे अनुकरण करीत आहे, म्हणून निश्चितपणे ते योग्यच म्हणत असतील.

ग्रंथाचा तपशील आहे. यात काहीच शंका नाही की हा विश्वाच्या अधिपतीकडून आहे. (३७)

हे लोक असे म्हणतात काय की पैगंबरांनी स्वत: हा रचला आहे? सांगा, ''जर तुम्ही या आपल्या आरोपात खरे असाल तर एक अध्याय या सारखा रचून आणा, आणि एक अल्लाहला सोडून इतर ज्यांना ज्यांना बोलविणे शक्य असेल त्यांना मदतीला बोलवा.'' मुळात असे आहे की जी गोष्ट यांच्या ज्ञानकक्षेत आली नाही आणि ज्याचा शेवटही यांच्यासमोर आला नाही, याला त्यांनी खोटे ठरविले. अशाच प्रकारे यांच्या पूर्वीच्या लोकांनीदेखील खोटे ठरविले आहे, मग पहा त्या अत्याचारींचा शेवट कसा झाला. यांच्यापैकी काहीजण श्रद्धा ठेवतील आणि काहीजण ठेवणार नाहीत, आणि तुझा पालनकर्ता या उपद्रवी लोकांना चांगलेच जाणतो. (३८-४०)

हे तुला जर खोटे ठरवीत असतील तर तू यांना सांगून टाक की, ''माझे कर्म माझ्यासाठी आहेत व तुमचे कर्म तुमच्यासाठी. जे काही मी करतो त्याच्या जबाबदारीतून तुम्ही मुक्त आहात व जे काही तुम्ही करीत आहात त्याच्या जबाबदारीतून मी मुक्त आहे.''[१२] (४१)

यांच्यात बरेचसे लोक असे आहेत जे तुझ्या गोष्टी ऐकतात, पण काय तू बहिऱ्यांना ऐकविणार मग ते काहीच का समजत नसतील?[१३] यांच्यात बरेचसे लोक आहेत जे तुला पाहतात परंतु काय तू आंधळ्यांना मार्ग दाखवशील जर त्यांना काहीच उमजत नसेल तरी? वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह लोकांवर अत्याचार करीत नाही, लोक स्वत:च आपल्यावर अत्याचार करतात. (आज हे ऐहिक जीवनात मस्त आहेत) आणि ज्या दिवशी अल्लाह यांना एकत्र करील तेव्हा (हेच ऐहिक जीवन यांना असे वाटू लागेल) जणू हे केवळ एक घटकाभर आपापसात ओळख करून घेण्यासाठी थांबले होते. (त्या प्रसंगी सत्यता पटेल की) खरोखरी भयंकर तोट्यात आले ते लोक ज्यांनी अल्लाहच्या भेटीला खोटे ठरविले आणि मुळीच ते सरळ मार्गावर नव्हते. ज्या वाईट परिणामाचे भय आम्ही यांना दाखवीत आहोत, त्यातील काही अंश तुझ्या जिवंतपणीच आम्ही दाखवावे अथवा त्या अगोदरच तुला उचलून घ्यावे, कोणत्याही परिस्थितीत यांना यावयाचे आमच्याकडेच

**१२)** म्हणजे विनाकारण भांडण आणि वितंडवाद घालत बसण्याची काहीच जरूरी नाही. जर मी कुभांड रचीत आहे तर आपल्या कृत्याचा मी स्वत: जबाबदार आहे, तुमच्यावर त्याची काहीच जबाबदारी नाही. परंतु जर तुम्ही खऱ्या गोष्टीला खोटे ठरवीत आहात तर माझे काही वाईट करीत नाही, स्वत:चेच काही वाईट करीत आहात.

**१३)** एक ऐकणे तर अशा प्रकारचे असते जसे पशू देखील हाक ऐकतात. दुसऱ्या प्रकारचे ऐकणे ते असते ज्यात अर्थाकडे लक्ष असते आणि गोष्ट जर योग्य असली तर तिला मान्य केले जाईल अशी तत्परता त्यात आढळते.



आहे आणि जे काही हे करीत आहेत याला अल्लाह साक्षी आहे. (४२-४६)

प्रत्येक जनसमुदाया (उम्मत) करिता एक प्रेषित आहे[१४] मग जेव्हा एखाद्या लोकसमूहाजवळ त्याचा प्रेषित येतो, तेव्हा पूर्ण न्यायानिशी त्यांचा निर्णय लावला जातो आणि त्यांच्यावर तिळमात्र देखील अत्याचार केला जात नाही. (४७)

म्हणतात, जर तुमची ही धमकी खरी असेल तर ती पूर्ण तरी केव्हा होईल? सांगा, ''माझ्या अखत्यारीत तर माझी स्वत:ची हानी व लाभ देखील नाही सर्वकाही अल्लाहच्या इच्छेवर अवलंबून आहे. प्रत्येक लोकसमूहाकरिता एक कालावधी आहे. जेव्हा ही मुदत भरून येते तेव्हा क्षणभर देखील ती पुढे मागे होत नाही.'' यांना सांगा, कधी तुम्ही याचा विचार तरी केला काय की जर अल्लाहचा प्रकोप अकस्मात रात्री अथवा दिवसा येऊन ठेपला (तर तुम्ही काय करू शकाल?) बरे ही अशी कोणती गोष्ट आहे जिच्याकरिता अपराध्यांनी घाई करावी? ज्या वेळेस तो तुम्हावर कोसळेल तेव्हाच तुम्ही त्याला मानणार काय? आता वाचू इच्छिता? वस्तुत: तुम्ही स्वत:च तो लवकर येण्याकरिता तगादा लावीत होता. मग अत्याचाऱ्यांना सांगितले जाईल की आता कायमस्वरूपी प्रकोपाचा आस्वाद घ्या, जे काही तुम्ही कमवीत राहिला आहात त्यासाठी या मोबदल्याशिवाय अन्य कोणता बदला तुम्हाला दिला जाऊ शकतो?'' (४८-५२)

मग विचारतात, खरोखरच हे सत्य आहे काय जे तुम्ही सांगत आहात? सांगा, ''माझ्या पालनकर्त्याची शपथ, हे सर्वस्वी सत्य आहे. आणि तुमच्यात इतके सामर्थ्य नाही की प्रकट होण्यापासून त्याला तुम्ही रोखावे.'' जर त्या प्रत्येक व्यक्तीजवळ जिने अत्याचार केला आहे, पृथ्वीची संपत्ती जरी असली तरी त्या प्रकोपापासून वाचविण्यासाठी ती सर्व मोबदला म्हणून देण्यास तयार होईल. जेव्हा हे लोक त्या प्रकोपाला पाहतील तेव्हा मनातल्या मनात पश्चात्ताप करतील. परंतु त्यांच्या दरम्यान पूर्ण न्यायानिशी निर्णय लावला

**१४)** 'उम्मत' हा मूळ अरबी शब्द या ठिकाणी केवळ एका समुदायाच्या अर्थातच आहे असे नाही तर एका प्रेषिताच्या आगमनानंतर त्याचे आवाहन ज्या ज्या लोकांप्रत पोहचेल ते सर्व त्याची 'उम्मत' आहेत. तसेच यासाठी प्रेषित त्यांच्या दरम्यान हयातच असावा हे देखील आवश्यक नाही तर प्रेषितानंतर देखील जोपर्यंत त्याची शिकवण उपलब्ध आहे व तो वास्तविकपणे ज्या गोष्टीची शिकवण देत होता हे माहीत करून घेणे प्रत्येक इसमासाठी शक्य आहे तो वेळपर्यंत जगातील सर्व लोक त्याची 'उम्मत' म्हणूनच ठरतील व पुढे जी आज्ञा सांगितली गेली आहे, ती त्या सर्वांना लागू पडेल. या अनुषंगाने पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या आगमनानंतर जगातील सर्व मानव त्यांची उम्मत आहेत व जोपर्यंत कुरआन आपल्या मूळ स्वरूपात निर्भेळ आहे तोपर्यंत ते सर्व त्यांची उम्मतच ठरतील. याच कारणास्तव आयतीत असे फर्माविलेले नाही की, ''प्रत्येक राष्ट्रात एक प्रेषित आहे'' तर फर्माविलेले असे आहे, ''प्रत्येक उम्मत-राष्ट्रासाठी एक प्रेषित आहे.''

जाईल. कसलाही अत्याचार त्यांच्यावर होणार नाही. ऐका, आकाशात आणि पृथ्वीत जे काही आहे अल्लाहचे आहे. अल्लाहचे वचन सत्य आहे, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत तोच जीवन प्रदान करतो व तोच मृत्यू देतो आणि त्याच्याकडेच तुम्हा सर्वांना परतावयाचे आहे. (५३-५६)

लोकहो! तुमच्यापाशी तुमच्या पालनकर्त्याकडून उपदेश आलेला आहे, ही ती गोष्ट आहे जी अंत:करणात जो विकार आहे त्यावर उपाय आहे आणि जे कोणी याचा स्वीकार करतील त्यांच्याकरिता मार्गदर्शन आणि कृपा आहे. हे पैगंबर (स.)! सांगा की, ''ही अल्लाहची कृपा व त्याची मेहेरबानी आहे की ही गोष्ट त्याने पाठविली यावर तर लोकांनी आनंद व्यक्त केला पाहिजे. हे त्या सर्व वस्तूपेक्षा उत्तम आहे, ज्यांना लोक गोळा करीत आहेत.'' हे पैगंबर (स.)! यांना सांगा, ''तुम्ही लोकांनी कधी याचा विचार तरी केला आहे की जी उपजीविका[१५] अल्लाहने तुमच्याकरिता उतरविली होती त्यापैकी तुम्ही स्वत:च कुणाला निषिद्ध व कुणाला वैध[१६] ठरविले?'' यांना विचारा अल्लाहने याची तुम्हाला परवानगी दिली होती? की तुम्ही अल्लाहवर कुभांड रचीत आहात?[१७] जे लोक अल्लाहवर हे मिथ्या कुभांड रचीत आहेत त्यांची काय कल्पना आहे की पुनरुत्थानाच्या दिवशी यांच्याशी कसा व्यवहार होईल, अल्लाह तर लोकांवर कृपादृष्टी ठेवतो परंतु बहुतेक लोक असे आहेत जे कृतज्ञता दाखवीत नाहीत. (५७-६०)

हे पैगंबर (स.)! तुम्ही ज्या अवस्थेत असता आणि कुरआनमधून जे काही ऐकविता आणि लोकहो! तुम्ही देखील जे काही करता त्या सर्व काळात आम्ही तुम्हाला पाहात असतो कोणतीही तिळमात्र वस्तू पृथ्वी व आकाशांत अशी नाही न लहान, न मोठी, जी तुझ्या पालनकर्त्याच्या दृष्टीपासून लपलेली आहे आणि एका स्पष्ट दप्तरात नोंद केलेली नाही. ऐका, जे अल्लाहचे मित्र आहेत, ज्यांनी श्रद्धा ठेवली व ज्यांनी ईशपरायण वर्तन

**१५)** या ठिकाणी 'रिज्क' (रोजी) असा शब्द प्रयुक्त झाला आहे. आमच्या येथे रिज्क हा शब्द केवळ खाण्यापिण्याच्या वस्तुंनाच लागू होतो, परंतु अरबी भाषेत रिज्जक केवळ अन्नाच्या अर्थानेच सीमित नाही तर देणगी, बक्षीस आणि 'भाग्य' अशा सर्व अर्थांनी तो आम आहे. सर्वोच्च अल्लाहने जगात मानवाला जे जे काही दिले आहे ते सर्व त्याचे रिज्क आहे.

**१६)** म्हणजे आपल्यासाठी स्वत:च कायदे करण्यास व शरीअतची रचना करण्यास मुखत्यार बनलेत. वास्तविकत: ज्याचा रिज्क आहे, त्याचाच हा अधिकार आहे की त्याने त्याचा उपयोग घेण्याच्या वैध व अवैध स्वरूपासाठी सीमा व नियम ठरवावे.

**१७)** कुभांडाचे तीन प्रकार आहेत. एक असा की, हे अधिकार अल्लाहने मानवांना सोपवून टाकले आहे असे एखाद्या व्यक्तीने समजावे. दुसरा असा की, अल्लाहचे हे कामच नव्हे की त्याने आमच्यासाठी कायदा व शरीअतची रचना करावी, असे एखाद्याने म्हणावे. तिसरा प्रकार असा की वैध व अवैध (हलाल व हराम) च्या या आज्ञा त्याने अल्लाहशी संबंधित कराव्यात, वास्तविकपणे प्रमाणादाखल त्याला अल्लाहचा कोणताही ग्रंथ प्रस्तुत करता येऊ नये.



अंगिकारले, त्यांच्याकरिता कसलेच भय अथवा दु:खाचा प्रसंग नाही, इहलोक व परलोक दोन्ही जीवनांत त्यांच्याकरिता आनंदाच्या वार्ता आहेत, अल्लाहची वचने बदलू शकत नाहीत, हेच मोठे यश आहे. हे पैगंबर (स.)! ज्या गोष्टी हे तुझ्यावर रचतात, त्या तुला दु:खी करू नयेत, प्रतिष्ठा सर्वस्वी अल्लाहच्या अधिकारात आहे आणि तो सर्वकाही ऐकतो व जाणतो. (६१-६५)

सावधान! आकाशात वास्तव्य करणारे असोत अथवा पृथ्वीवर, सर्वचे सर्व अल्लाहच्या मालकीचे आहेत. आणि जे लोक अल्लाहशिवाय काही (आपले स्वरचित) भागीदारांचा धावा करीत आहेत, ते निव्वळ मिथ्या व भ्रामक कल्पनेचे अनुयायी आहेत, व केवळ कल्पनाविलास करीत आहेत. तो अल्लाहच आहे ज्याने तुमच्यासाठी रात्र बनविली की तिच्यात संतोष प्राप्त करावा, व दिवसाला प्रकाशमान बनविले, यात संकेत आहेत त्या लोकांकरिता जे (उघड्या कानांनी पैगंबराचे आवाहन) ऐकतात. (६६-६७)

लोक म्हणतात की, अल्लाहने एखाद्याला पुत्र बनविले आहे. पवित्र आहे अल्लाह! तो तर निस्पृह आहे, आकाशांत व पृथ्वीत जे काही आहे सर्व त्याच्या मालकीचे आहे, तुमच्यापाशी या कथनाचे काय बरे प्रमाण आहे? तुम्ही अल्लाहसंबंधी त्या गोष्टी सांगता काय ज्याचे ज्ञान तुम्हाला नाही? हे पैगंबर (स.)! सांगा, जे लोक अल्लाहवर खोटे कुभांड रचतात ते कदापि सफल होऊ शकत नाहीत. जगातील काही दिवसाच्या जीवनांत मौजमजा करून घ्या, मग आमच्याकडे त्यांना परतावयाचे आहे, मग त्या द्रोहाच्या बदल्यात जे ते करीत आहेत आम्ही त्यांना कठोर यातनेचा आस्वाद चाखवू. (६८-७०)

या लोकांना नूह (अ.) ची कथा ऐकवा, त्या वेळेची कथा जेव्हा त्याने आपल्या लोकांना सांगितले होते की, ''हे देशबंधुंनो, जर माझे तुमच्या दरम्यान राहणे व अल्लाहची वचने ऐकवून ऐकवून तुम्हाला गाफिलपणातून जागे करणे तुम्हाला असह्य झाले आहे तर माझा विश्वास अल्लाहवर आहे, तुम्ही आपल्या मानलेल्या भागीदारांना बरोबर घेऊन एकमुखी निर्णय घ्या आणि जी योजना तुमच्या दृष्टीसमोर असेल तिच्यावर खूप विचारविनिमय करा जेणेकरून तिचा कोणताही पैलू तुमच्या दृष्टीतून सुटू नये, मग ती माझ्याविरूद्ध अंमलात आणा आणि मला मुळीच सवड देऊ नका. तुम्ही माझ्या उपदेशापासून तोंड फिरविले (तर माझे कोणते नुकसान केले?) मी तुमच्यापासून कोणत्याही मोबदल्याचा इच्छुक नव्हतो, माझा मोबदला तर अल्लाहपाशी आहे आणि मला आज्ञा दिली गेली आहे की (मग कुणी मान्य करो वा न करो) मी स्वत: मुस्लिम (आज्ञाकारी) बनून राहावे.'' त्यांनी त्याला खोटे ठरविले आणि परिणाम असा झाला की आम्ही त्याला व त्या लोकांना जे त्याच्याबरोबर नावेत होते वाचविले आणि त्यांनाच भूतलावर उत्तराधिकारी बनविले आणि त्या सर्व लोकांना बुडवून टाकले ज्यांनी आमच्या संकेतांना खोटे ठरविले होते. तर मग पहा ज्यांना सावध केले गेले होते (आणि तरी

देखील त्यांनी मान्य केले नाही) त्यांचा कसा शेवट झाला. (७१-७३)

मग नूह (अ.) नंतर आम्ही वेगवेगळ्या पैगंबरांना त्यांच्या लोकसमूहाकडे पाठविले आणि ते त्यांच्याकडे उघड-उघड संकेत घेऊन आले, परंतु ज्या गोष्टीला त्यांनी अगोदर खोटे ठरविले होते त्याला पुन्हा मानले नाही. अशा प्रकारे आम्ही मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्यांच्या हृदयावर मोहर लावतो. (७४)

मग त्याच्यानंतर आम्ही मूसा (अ.) आणि हारून (अ.) यांना आपल्या संकेतांसहित फिरऔन आणि त्याच्या सरदारांकडे पाठविले परंतु त्यांनी आपल्या मोठेपणाची घमेंड केली आणि ते अपराधी लोक होते. मग जेव्हा आमच्याकडून सत्य त्यांच्यासमोर आले तेव्हा त्यांनी सांगितले की ही तर उघड जादू आहे. मूसा (अ.) ने सांगितले की, "तुम्ही सत्याला असे बोलता जेव्हा ते तुमच्यासमोर आले? ही जादू आहे काय? खरे पाहता जादूगार सफल होत नसतात."[१८] त्यांनी उत्तरात सांगितले, "तू याकरिता आला आहेस काय की आम्हाला त्या पद्धतीपासून परावृत्त करावेस ज्यावर आमचे पूर्वज आम्हाला आढळले आणि पृथ्वीवर मोठेपणा तुम्हा दोघांचा चालावा? तुमचे म्हणणे तर आम्ही ऐकणारे नाहीच." आणि फिरऔन ने (आपल्या माणसांना) सांगितले की, "प्रत्येक कलानिपुण जादूगारास माझ्यासमोर हजर करा." जेव्हा जादूगार आले तेव्हा मूसा (अ.) नी त्यांना सांगितले, "जे काही तुम्हाला फेकावयाचे आहे फेका." मग जेव्हा त्यांनी फेकले तेव्हा मूसा (अ.) नी सांगितले, "हे जे काही तुम्ही फेकले आहे ती जादू आहे, अल्लाह आताच यांना रद्दबातल करीत आहे." उपद्रवी लोकांच्या कामाला अल्लाह सुधारू देत नाही. आणि अल्लाह आपल्या आदेशाने सत्याला सत्य करून दाखवितो मग अपराध्यांना ते कितीही अप्रिय का वाटेना." (७५-८२)

१८) अर्थ असा की सकृतदर्शनी जादू आणि चमत्कार (मोजिजा) यांच्या दरम्यान जी सादृश्यता असते त्या आधारावर तुम्हा लोकांनी नि:संकोचपणे याला जादू ठरविले परंतु नादानांनो, जादूगार कोणत्या नीती व चारित्र्याचे लोक असतात आणि कसल्या गरजेपोटी ते जादुगिरी करीत असतात हे तुम्ही पाहिले नाही. जादूगाराचे हेच काम असते का की नि:स्वार्थ आणि बेदरकारपणे एका जबरदस्त राजाच्या दरबारात यावे आणि त्याला त्याच्या मार्गभ्रष्टतेवर तंबी द्यावी व त्याला ईश्वरभक्ती आणि आत्मशुद्धीचा अंगिकार करण्याचे आवाहन करावे?



(मग पहा की) मूसा (अ.) ना त्यांच्या लोकांपैकी काही तरुणांखेरीज[१९] कोणीही मानले नाही, फिरऔनच्या भीतीने आणि आपल्या लोकांतील श्रेष्ठजनांच्या भीतीपायी (ज्यांना भय होते की) फिरऔन त्यांचा छळ करील. वस्तुस्थिती अशी आहे की फिरऔन भूतलावर वर्चस्व बाळगत होता आणि तो त्या लोकांपैकी होता जे कोणत्याही मर्यादेवर थांबत नाहीत.[२०] (८३)

मूसा (अ.) नी आपल्या लोकांना सांगितले की, "लोकहो! तुम्ही खरोखरच अल्लाहवर श्रद्धा ठेवत असाल तर त्याच्यावर विश्वास ठेवा, जर तुम्ही मुसलमान असाल." त्यांनी उत्तर दिले,[२१] "आम्ही अल्लाहवरच भिस्त ठेवली, हे आमच्या पालनकर्त्या! अत्याचारी लोकांच्या स्वाधीन करून आमची परीक्षा घेऊ नकोस. आणि आपल्या कृपेने आम्हाला अश्रद्धावंतांपासून मुक्ती दे." (८४-८६)

आणि आम्ही मूसा (अ.) आणि त्याच्या बंधूला संकेत दिला की, "मिस्रमध्ये काही घरे आपल्या लोकांकरिता उपलब्ध करा आणि आपल्या त्या घरांना उपासना-दिशा ठरवा

१९) मूळ अरबी शब्द जुर्रीयतन प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ संतती असा होतो. आम्ही 'तरुण' असा त्याचा अनुवाद केला आहे. मुळात या विशिष्ट शब्दाच्या प्रयोगाद्वारे दिव्य कुरआन जी गोष्ट विषद करू इच्छितो ती अशी की त्या धोकादायक स्थितीत सत्याला साथ देण्याचे आणि सत्याची पताका उंचावणाऱ्याला आपला नेता मानण्याचे धाडस काही मुलामुलींनी तर केले परंतु माता व पित्यांना तसेच राष्ट्राच्या वडीलधारी लोकांना त्याची सुबुद्धी लाभली नाही. त्यांच्यावर हितसाधूपणा, स्वार्थीवृत्ती आणि कातडीबचाऊपणाचा काही अशा प्रकारे पगडा बसला होता की त्या सत्याला साथ देण्यासाठी ते तयार झाले नाहीत ज्याचा मार्ग त्यांना संकटांनी भरलेला दिसत होता. इतकेच नव्हे तर उलट ते तरुणांनाच रोखत राहिले की मूसा (अ.) च्या जवळ जाऊ नका अन्यथा तुम्ही स्वत: देखील फिरऔनच्या कोपाचे लक्ष्य बनाल व आमच्यावरही आपत्ती ओढवून आणाल.

२०) म्हणजे आपले हित साधण्यासाठी कोणत्याही वाईटातल्या वाईट पद्धतीचा देखील अवलंब करण्यात संकोच बाळगत नाहीत. कसलेही अत्याचार, कसलीही अनैतिकता, आणि कसलीही क्रूरता व पाशवीपणा दाखविण्यात चुकत नाहीत. आपल्या वासनेच्या मागे प्रत्येक परिसीमा गाठू शकतात. एखाद्या ठिकाणी जाऊन थांबू शकावेत अशी कोणतीही सीमा त्यांना ठरली नाही.

२१) हे उत्तर, मूसा (अ.) यांना साथ देण्यासाठी जे तयार झाले होते त्या तरुणांचे होते. या ठिकाणी अरबी शब्द 'कालू' - त्यांनी सांगितले - यातील सर्वनाम राष्ट्रासाठी नव्हे तर जुर्रीयतन - तरुणासाठी योजलेला आहे, संदर्भाने ही गोष्ट अगदी स्पष्ट होते.

आणि नमाज कायम करा[२२] आणि श्रद्धावंतांना खूषखबर द्या.'' (८७)

मूसा (अ.) ने प्रार्थना केली, ''हे आमच्या पालनकर्त्या! तू फिरऔन आणि त्याच्या सरदारांना ऐहिक जीवनात ऐश्वर्य व मालमत्तेने उपकृत केले आहेस, हे पालनकर्त्या, काय हे अशाकरिता आहे की - त्यांनी लोकांना तुझ्या मार्गापासून बहकवावे? हे पालनकर्त्या! यांची संपत्ती नष्ट कर आणि यांच्या हृदयांवर अशी मोहर लाव की यांनी श्रद्धा ठेवू नये जोपर्यंत की ते दु:खदायक प्रकोप पाहात नाहीत.''[२३] सर्वश्रेष्ठ अल्लाहने उत्तरादाखल फर्माविले, ''तुम्हा दोघांची प्रार्थना स्वीकारली गेली, दृढ रहा आणि त्या लोकांच्या पद्धतीचे मुळीच अनुकरण करू नका ज्यांना ज्ञान नाही.'' (८८-८९)

आणि आम्ही बनीइस्राईलना समुद्रपार नेले. मग फिरऔन व त्याचे सैन्य जुलूम व अत्याचाराच्या हेतूने त्यांच्या मागे निघाले येथपावेतो की जेव्हा फिरऔन बुडू लागला तेव्हा उद्‌गारला, ''मी मान्य केले की खरा ईश्वर त्याच्याशिवाय कोणीही नाही ज्यावर बनीइस्राईलनी श्रद्धा ठेवली आणि मी देखील आज्ञाधारकांपैकीच आहे.'' (उत्तर दिले गेले) ''आता श्रद्धा ठेवतोस? एरव्ही या आगोदरपर्यंत तर अवज्ञा करीत राहिलास आणि उपद्रव माजविणाऱ्यांपैकी होतास आता तर आम्ही तुझ्या केवळ प्रेतासच वाचवू जेणेकरून तू नंतरच्या पिढ्यांकरिता उद्‌बोध-चिन्ह ठरावे. जरी बरीचशी माणसे अशी आहेत जे आमच्या संकेताकडे दुर्लक्ष करीत आहेत. (९०-९२)

आम्ही बनीइस्राईलना फार चांगले ठिकाण दिले व फार उत्तम उपजीविका प्रदान केली मग त्यांनी आपापसात मतभेद केले नाही परंतु त्यावेळी जेव्हा ज्ञान त्यांच्यापर्यंत

२२) मिस्र देशात शासनाकडून होणारा भयंकर छळ आणि खुद्द बनीइस्राईलींच्या ईमानाच्या दुर्बलतेमुळे इस्राईली व मिस्रि मुसलमानांच्या येथे सामुदायिक नमाजची व्यवस्था नष्ट झाली होती. त्यांची एकात्मता विखुरली जाण्याचे व त्यांच्या धार्मिक आत्म्यावर मृत्यू ओढवण्याचे हे एक फार मोठे कारण होते. म्हणून हजरत मूसा (अ.) यांना आज्ञा दिली गेली की या व्यवस्थेला पुन्हा प्रस्थापित करावे व मिस्रमध्ये काही घरे या हेतूने बांधा किंवा निश्चित करा की तेथे सामुहिकपणे नमाज पढली जावी. या घरांना उपासना-दिशा ठरविण्याचा अर्थ असा की त्या घरांना सर्व लोकसमूहासाठी केंद्र आणि रुजू होण्याचे ठिकाण ठरविले जावे व त्यानंतर लगेच 'नमाज कायम करा' म्हणण्याचा अर्थ असा की वेगवेगळे होऊन आपापल्या जागी नमाज पढण्याऐवजी लोकांनी निश्चित केलेल्या ठिकाणांवर एकत्र होऊन नमाज पढावी.

२३) ही प्रार्थना हजरत मूसा (अ.) यांनी मिस्रच्या वास्तव्याच्या अगदी शेवटच्या काळात केली होती व अशा परिस्थितीत केली होती जेव्हा एकापाठोपाठ एक निशाण्या पाहिल्यानंतर आणि धर्मबोध प्रमाणाच्या पूर्ततेनंतर देखील फिरऔन व त्याच्या राज्याचे सरदार, दरकदार, शत्रुत्वावर अत्यंत हट्टाने अडून बसले. अशा प्रसंगी प्रेषित जी शापवाणी उच्चारीत असतो ती, कुफ्रचा हट्ट धरणाऱ्यांच्या बाबतीत सर्वोच्च अल्लाहचा जो निकाल असतो, यथासंगतच असतो. म्हणजे असे की त्यांना ईमानची सुबुद्धी प्रदान केली जाऊ नये.



आले होते. नि:संशय तुझा पालनकर्ता पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्या दरम्यान त्या गोष्टीचा निर्णय लावील ज्यामध्ये ते मतभेद करीत राहिले आहेत. (९३)

आता जर तुला या मार्गदर्शनासंबंधी काही देखील शंका असेल जे आम्ही तुझ्यावर अवतरले आहे तर तू त्या लोकांना विचारून घे जे अगोदरपासून ग्रंथ वाचीत आहेत, प्रत्यक्षात तुझ्याजवळ हे सत्यच आले आहे, तुझ्या पालनकर्त्याकडून. म्हणून तू शंका घेणाऱ्यांपैकी बनू नकोस. आणि त्या लोकांमध्ये सामील होऊ नकोस ज्यांनी अल्लाहची वचने खोटी ठरविली, अन्यथा तू नुकसान सोसणाऱ्यांपैकी होशील.[२४] (९४-९५)

वस्तुस्थिती अशी आहे की ज्या लोकांवर तुझ्या पालनकर्त्याचे वचन खरे ठरले आहे[२५] त्यांच्यासमोर मग कोणते का संकेत येवोत ते कदापि श्रद्धा ठेवणार नाहीत जोपर्यंत दु:खदायक प्रकोप समोर येताना ते पाहणार नाहीत पण असे एखादे उदाहरण आहे काय की एका वस्तीने प्रकोप पाहून श्रद्धा ठेवली आणि तिची श्रद्धा तिला लाभदायक सिद्ध झाली? युनूस (अ.) च्या लोकांखेरीज (अन्य कोणतेही असे उदाहरण नाही) त्या लोकांनी जेव्हा श्रद्धा ठेवली होती अलबत तेव्हा आम्ही त्यांच्यावरील ऐहिक जीवनात अपमानजनक प्रकोप टाळला होता.[२६] आणि त्यांना एका कालावधीपर्यंत जीवनाचा उपभोग घेण्याची संधी दिली होती. (९६-९८)

जर तुझ्या पालनकर्त्याची इच्छा अशी असती (की पृथ्वीतलावर सर्व श्रद्धावंत व आज्ञाधारकच असावेत) तर सर्व भूतलवासीयांनी श्रद्धा ठेवली असती. मग तू लोकांना भाग पाडशील का की ते श्रद्धावंत बनतील? कोणताही जीव अल्लाहच्या आज्ञेविना श्रद्धा ठेवू शकत नाही, आणि अल्लाहचा प्रघात असा आहे की जे लोक बुद्धीचा उपयोग करीत

२४) हे संबोधन सकृतदर्शनी असल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याशी आहे परंतु मुळात हेतू त्या लोकांना गोष्ट ऐकविण्याचा आहे जे त्यांच्या आवाहनासंबंधी शंका घेत होते. ग्रंथधारकांचा हवाला अशासाठी दिला गेला आहे की अरबस्तानातील जनसामान्य तर दिव्य ग्रंथाच्या ज्ञानाला पारखे होते. त्यांच्यासाठी हा आवाज एक नवा आवाज होता. परंतु ग्रंथधारकांच्या धर्मपंडितांपैकी जे सत्यानिष्ठ आणि न्यायीवृत्तीचे होते ते या गोष्टीची सत्यता प्रमाणित करू शकत होते की ज्या गोष्टीचे आवाहन कुरआन देत आहे ती तीच गोष्ट आहे जिचे आवाहन पूर्वी सर्व प्रेषित देत राहिले आहेत.

२५) म्हणजे हे विधान की जे लोक स्वत: सत्याचे इच्छुक नसतात आणि जे आपल्या हृदयांवर, आग्रह, पूर्वग्रहदोष आणि हट्टीपणाची कुलुपे ठोकून असतात, तसेच जे भौतिक आसक्तीत मग्न असतात व अंतिम परिणामापासून बेफिकीर असतात, त्यांना ईमानची सुबुद्धी लाभत नसते.

२६) भाष्यकारांनी याचे कारण असे सांगितले आहे की हजरत यूनुस (अ.) यांनी प्रकोपाची वार्ता दिल्यानंतर सर्वोच्च अल्लाहच्या परवानगीविनाच ते आपले निवासस्थान सोडून निघून गेले होते. म्हणून प्रकोपाची चिन्हे पाहून जेव्हा असीरियन लोकांनी पश्चात्ताप व क्षमायाचना केली तेव्हा सर्वोच्च अल्लाहने त्यांना क्षमा केली.

नाहीत, तो त्यांच्यावर मार्गभ्रष्टता टाकून देतो. (९९-१००)

यांना सांगा, ''पृथ्वी आणि आकाशांत जे काही आहे ते डोळे उघडून पहा.'' आणि जे लोक श्रद्धा ठेवूच इच्छित नाहीत त्यांच्याकरिता संकेत आणि सूचना काय लाभदायक होऊ शकतात? आता हे लोक याशिवाय अन्य कोणत्या गोष्टीच्या प्रतीक्षेत आहेत की तेच वाईट दिवस पहावेत जे त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनी पाहिले आहेत? यांना सांगा, ''बरे तर प्रतिक्षा करा, मी देखील तुमच्याबरोबर प्रतिक्षा करतो.'' मग (जेव्हा असा प्रसंग येतो तेव्हा) आम्ही आपल्या पैगंबरांना व त्या लोकांना वाचवितो ज्यांनी श्रद्धा ठेवली असेल, आमचा असाच प्रघात आहे. आमचे हे कर्तव्य आहे की आम्ही श्रद्धावंतांना वाचवावे. (१०१-१०३)

हे पैगंबर (स.) सांगून टाका की, ''लोकहो, जर अद्यापही माझ्या धर्मासंबंधी तुम्ही एखाद्या शंकेत असाल तर ऐकून घ्या की तुम्ही अल्लाहशिवाय ज्यांची भक्ती करता मी त्यांची भक्ती करीत नाही तर केवळ त्याच ईश्वराची भक्ती करतो ज्याच्या अधिकारात तुमचा मृत्यू आहे. मला आज्ञा दिली गेली आहे की मी श्रद्धावंतांपैकी व्हावे. आणि मला फर्माविले गेले आहे की एकाग्र बनून आपल्या स्वत:ला ठीक ठीक या धर्मावर कायम करावे[२७] आणि कदापि देखील अनेकेश्वरवाद्यांपैकी असू नये. आणि अल्लाहला सोडून अशा कोणत्याही अस्तित्वाचा धावा करून नकोस जो तुला फायदाही पोहचवू शकत नाही आणि नुकसानही नाही. जर तू असे करशील तर अत्याचाऱ्यांपैकी बनशील. जर अल्लाहने तुला एखाद्या संकटात घातले तर स्वत: त्याच्याशिवाय इतर कोणी नाही जो संकट निवारण करील. आणि जर त्याने तुझ्यासाठी एखाद्या कल्याणाचा इरादा केला तर त्याच्या कृपेला रद्द करणारा देखील कोणी नाही. तो आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो त्याला आपल्या कृपेने उपकृत करतो, आणि तो क्षमा करणारा व दया करणारा आहे.''

(१०४-१०७)

हे मुहम्मद (स.) सांगून टाका की, ''लोकहो! तुमच्यापाशी तुमच्या पालनकर्त्याकडून सत्य आलेले आहे. आता जो सरळ मार्ग अनुसरील त्याचे सद्वर्तन

२७) मूळ अरबी शब्द 'अकिम वजहक लिद्दीने हनीफा' असे आहेत. 'अकिम वजहक'चा शाब्दिक अर्थ 'आपले मुख दृढ कर' असा होतो. याचा मथितार्थ असा की तुझा रोख एकाच दिशेने कायम असावा, डळमळीत आणि चलबिचल करणारा असू नये. कधी पुढे तर कधी मागे, कधी उजवी तर कधी डावीकडे होत राहू नये, बिलकुल नाकाच्या सरळ दिशेने त्याच मार्गावर दृष्टी स्थिरावून चाल जो तुला दाखविला गेला आहे. आपल्या जागी स्वत:च हा निर्बंध फार सुदृढ होता परंतु त्यावरच पुरे केले गेले नाही. त्यावर आणखी एक निर्बंध 'हनीफा'चा पाठविला गेला. 'हनीफा' त्याला म्हणतात जो सर्वांकडून तोंड वळवून एकाच बाजूचा बनला असावा.



त्याच्यासाठीच हिताचे होय आणि जो मार्गभ्रष्ट राहील त्याची मार्गभ्रष्टता त्याच्यासाठीच विनाशकारी आहे. आणि मी तुमच्यावर काही हवालदार नाही.'' आणि हे पैगंबर (स.) तुम्ही मार्गदर्शनाचे अनुसरण करीत रहा जे तुमच्याकडे दिव्य प्रकटन (वह्य) द्वारे पाठविले जात आहे, आणि संयम राखा इथपावेतो की अल्लाह निर्णय करील आणि तोच सर्वोत्तम निर्णय लावणारा आहे. (१०८-१०९)

# ११ सूरह हूद

*(मक्काकालीन, वचने १२३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ, लाऽऽम, रा. फर्मान[१] आहे, ज्याची वचने परिपक्व व तपशीलवार सांगितली गेली आहेत, एक ज्ञानी व जाणत्या अस्तित्वाकडून की तुम्ही भक्ती करू नये परंतु केवळ अल्लाहची, मी त्याच्यातर्फे तुम्हाला खबरदार करणारा देखील आहे व शुभवार्ता देणारादेखील. आणि तुम्ही आपल्या पालनकर्त्यापाशी क्षमायाचना करा आणि त्याच्याकडे परतून या तर तो तुम्हाला एका विशिष्ट मुदतीपर्यंत चांगली जीवनसामग्री[२] देईल आणि प्रत्येक श्रेष्ठीला त्याचे श्रेष्ठत्व प्रदान करील.[३] परंतु जर तुम्ही तोंड फिरविले तर मी तुमच्यासंबंधी एका मोठ्या भयंकर दिवसाच्या प्रकोपापासून घाबरतो. तुम्हा सर्वांना अल्लाहकडे परतावयाचे आहे आणि तो सर्वकाही करू शकतो. (१-४)

पहा, हे लोक आपली छाती वळवितात की जेणेकरून त्याच्यापासून लपावे.[४] खबरदार, जेव्हा हे वस्त्रांनी स्वत:ला झाकतात, अल्लाह त्यांच्या गुपितांना जाणतो व प्रकट गोष्टींनादेखील, त्याला तर रहस्यांचेदेखील ज्ञान आहे जे मनात आहेत भूतलावर चालणारा कोणताही प्राणी असा नाही ज्याच्या उपजीविकेची जबाबदारी अल्लाहवर नाही आणि ज्याच्यासंबंधी तो जाणत नाही की त्याचे वास्तव्य कोठे आहे? सर्वकाही एका स्पष्ट दप्तरांत नोंदलेले आहे. (५-६)

आणि तोच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले आणि

१) किताब- ग्रंथ चे भाषांतर या ठिकाणी वर्णनशैलीच्या अनुषंगाने 'फर्मान' केलेले आहे. अरबी भाषेत सदरहू शब्द केवळ ग्रंथ आणि लेखाच्याच अर्थात येत असतो असे नाही तर आदेश आणि शाही फर्मान या अर्थाने देखील येत असतो. खुद्द कुरआनातसुद्धा हा शब्द याच अर्थाने अनेक प्रसंगी प्रयुक्त झाला आहे.

२) म्हणजे जगात तुमच्या मुक्कामासाठी जी वेळ निश्चित आहे, त्यावेळेपर्यंत तो तुम्हाला वाईट प्रकारे नव्हे तर चांगल्या प्रकारे ठेवील. त्याच्या देणग्यांचा तुमच्यावर वर्षाव होईल. त्याच्या समृद्धीने तुम्ही उपकृत व्हाल. सुस्थित आणि संतोष व समाधानाने राहाल. जीवनात सुख व शांती नांदेल. अवमानित होऊन नव्हे तर मानसन्मानानेच प्रतिष्ठेने जगाल.

३) म्हणजे जो माणूस नीती व सत्कर्मात जितका पुढे जाईल अल्लाह त्याला तितकाच मोठा दर्जा बहाल करील, जो मनुष्यही आपल्या सदाचाराने स्वथ:ला ज्या प्रतिष्ठेस पात्र सिद्ध करील तो प्रतिष्ठा त्याला अवश्य प्रदान केली जाईल.

४) मक्केतील काफिरांची स्थिती अशी होती की अल्लाहचे पैगंबर (स.) यांना पाहून त्यांच्याकडून ते आपले तोंड फिरवीत असत की त्यांच्याशी सामना होऊ नये.



त्याचे सिंहासन (अर्श) पाण्यावर होते[५] जेणेकरून तुम्हाला अजमावून पाहावे तुमच्यात कोण उत्तम काम करणारा आहे.[६] आता जर हे पैगंबर (स.), तुम्ही म्हणता, की लोकहो, मृत्यूनंतर तुम्ही पुन्हा उठविले जाल तर इन्कार करणारे उद्‌गारतात, ही तर स्पष्ट जादूगिरी आहे.[७] आणि जर आम्ही एका विशिष्ट मुदतीपर्यंत त्यांची शिक्षा टाळली तर ते म्हणू लागतात की बरे कोणत्या गोष्टीने तिला थोपवून ठेवले आहे? ऐका! ज्या दिवशी त्या शिक्षेची वेळ येऊन ठेपेल तेव्हा ती कोणाच्याही परतविण्याने परतणार नाही आणि तीच गोष्ट त्यांना वेढून टाकील जिची चेष्टा ते करीत आहेत. (७-८)

जर एखादेवेळी आम्ही माणसाला आपल्या कृपेने उपकृत केल्यानंतर परत त्यापासून वंचित करतो तर तो निराश होतो आणि कृतघ्नता दाखवू लागतो. आणि जर त्या संकटानंतर जे त्याच्यावर आले होते त्याला आम्ही देणगीचा आस्वाद देतो तेव्हा तो म्हणतो की माझे तर सर्व अशुभ दूर झाले मग तो हर्षोन्मादित होतो व ऐटीत मिरवतो या दोषापासून जर कोणी मुक्त आहेत तर केवळ ते लोक होत जे संयमी व सदाचारी आहेत आणि तेच होत ज्यांच्यासाठी क्षमाही आहे व मोठा मोबदलादेखील. (९-११)

तर हे पैगंबर (स.)! असे होऊ नये की तुम्ही त्या गोष्टीपैकी एखाद्या गोष्टीला (न सांगता) सोडून द्यावे ज्या तुमच्याकडे दिव्य प्रकटनाने पाठविल्या जात आहेत आणि या गोष्टीने संकुचित हृदयी होऊन त्यांनी म्हणावे की, "या व्यक्तीवर एखादा खजिना का उतरविला गेला नाही? अथवा याच्या बरोबर एखादा दूत का आला नाही?" तुम्ही तर केवळ सावध करणारे आहात, नंतर प्रत्येक वस्तूची देखरेख करणारा अल्लाह आहे. (१२)

काय हे म्हणतात की पैगंबराने हा ग्रंथ स्वत: रचला आहे? सांगा, "असे असेल तर यासारख्या रचलेल्या दहा सूरती तुम्ही रचून आणा आणि अल्लाहव्यतिरिक्त जे जे (तुमचे उपास्य) आहेत त्यांना सहाय्यासाठी बोलवू शकत असाल तर बोलवून घ्या, जर तुम्ही (त्यांना उपास्य समजण्यात) खरे असाल. आता जर ते (तुमचे उपास्य) तुमच्या मदतीला पोहचत नसतील तर जाणून असा की हा अल्लाहच्या ज्ञानाने उतरला आहे

५) या पाण्याने काय अभिप्रेत आहे? आम्ही ज्या नावाने ओळखतो हेच ते पाणी आहे? अथवा विद्यमान रूपात आणण्यापूर्वी द्रव्याची जी पातळ स्थिती होती त्यासाठी केवळ रूपक शब्द म्हणून याचा प्रयोग केला गेला आहे? हे आम्ही सांगू शकत नाही. 'अर्श' (राजसिंहासन) वर असण्याचा अर्थ देखील निश्चित करणे कठीण आहे. त्यावेळी ईश्वराची सत्ता पाण्यावर होती असाही याचा अर्थ असण्याची शक्यता आहे.

६) म्हणजे जगात मानवाला निर्माण करून त्याची परीक्षा घेतली जावी, असा सर्जनाचा हेतू होता.

७) म्हणजे मृत्यूनंतर लोकांचे पुन्हा जिवंत होणे तर शक्य नाही, परंतु आम्ही ही असंभवनीय गोष्ट मान्य करावी म्हणून आमच्या अकलेवर जादू केली जात आहे.

आणि असे की अल्लाहशिवाय अन्य कोणीही खरा ईश्वर नाही. मग काय तुम्ही (या सत्य गोष्टीपुढे) समर्पित होणार?'' (१३-१४)

जे लोक केवळ या जगातील जीवन व त्याच्या शोभेचे इच्छुक असतात त्यांच्या कर्तृत्वाचे संपूर्ण फळ आम्ही त्यांना येथेच देऊन टाकतो आणि याच्यात त्यांच्यासाठी कोणतीही उणीव केली जात नाही. परंतु परलोकात असल्या लोकांसाठी अग्नीशिवाय काहीही नाही (तेथे कळून चुकेल की) जे काही त्यांनी जगात केले ते सर्व धुळीस मिळाले आणि आता त्यांचे सर्व केले सवरले केवळ मिथ्या आहे. (१५-१६)

मग बरे ती व्यक्ती जी आपल्या पालनकर्त्याकडून एक स्पष्ट साक्ष[८] बाळगत होती, यानंतर एक साक्षीदार देखील पालनकर्त्याकडून (त्या साक्षीच्या समर्थनार्थ) आला,[९] आणि अगोदरच मूसा (अ.) चा ग्रंथ मार्गदर्शक व कृपा म्हणून आलेला देखील उपस्थित होता, (तोसुद्धा भौतिकवाद्यांप्रमाणे याचा इन्कार करू शकतो काय?) असले लोक तर त्याच्यावर श्रद्धा ठेवतील. आणि मानवसमूहापैकी जो कोणी त्याचा इन्कार करील त्याच्यासाठी ज्या जागेचा वायदा आहे ती नरकाग्नी होय. म्हणून हे पैगंबर (स.), तुम्ही या गोष्टीच्या बाबतीत कोणत्याही शंकेत पडू नका, हे सत्य आहे तुमच्या पालनकर्त्याकडून परंतु बहुतेक लोक मानत नाहीत. (१७)

आणि त्या व्यक्तीपेक्षा अधिक अत्याचारी अन्य कोण आहे जो अल्लाहवर असत्य रचतो?[१०] असले लोक आपल्या पालनकर्त्याच्या ठायी सादर होतील आणि साक्षीदार

८) म्हणजे, या जगाचा सर्जनकर्ता, आणि शासक व अधिपती केवळ एक ईश्वर आहे या वास्तवतेची साक्ष ज्याला स्वत:च्या अस्तित्वात, पृथ्वी व आकाशांच्या रचनेत आणि सृष्टीच्या व्यवस्थेत मिळत असते. तसेच याच पुराव्यांना पाहून, या जीवनानंतर अन्य एखादे असे जीवन हमखास असले पाहिजे ज्यात माणसाने आपल्या ईश्वरासमोर आपल्या कर्माचा हिशेब द्यावा व आपल्या कृत्याचा मोबदला अथवा शिक्षा प्राप्त करावी, अगोदरच ज्याचे अंत:करण अशी ग्वाही देत असावे.

९) म्हणजे कुरआन, ज्याने येऊन या प्राकृतिक आणि बौद्धिक साक्षीचे समर्थन केले व त्याला सांगितले की प्रत्यक्षात ज्याची खूण सृष्टी व अंत:करणात तुला आढळली आहे वास्तवता तीच आहे.

१०) म्हणजे असे सांगावे की अल्लाहबरोबर ईशत्वात आणि बंदगी-अधिकार, राखण्यात इतर देखील भागीदार आहेत. अथवा असे सागावे की ईश्वराला आपल्या दासांच्या सरळमार्गी व पथभ्रष्ट असण्याशी काहीच कर्तव्य नाही व त्याने कोणताच ग्रंथ आणि प्रेषित आमच्या मार्गदर्शनासाठी पाठविलेला नाही तर आम्हाला मोकळे सोडले आहे की हवे ते ढंग आपल्या जीवनात अंगिकार करावेत. अथवा असे सांगावे की ईश्वराने आम्हाला उगीचच खेळ म्हणून निर्माण केले आहे व तसेच आम्हाला नष्ट देखील करील. त्याच्यासमोर आम्हाला कोणताही जाब द्यावा लागणार नाही व कोणताही मोबदला अथवा शिक्षा नाही.



साक्ष देतील की हे आहेत ते लोक ज्यांनी आपल्या पालनकर्त्यावर असत्य रचले होते. ऐका! अल्लाह धिक्कार करीत आहे अत्याचाऱ्यांचा,[११] त्या अत्याचाऱ्यांचा जे अल्लाहच्या मार्गापासून लोकांना रोखतात, त्याच्या मार्गास वाकडा बनवू इच्छितात, आणि मरणोत्तर जीवनाचा इन्कार करतात, ते पृथ्वीवर अल्लाहला अगतिक करणारे नव्हते आणि अल्लाहच्याविरूद्ध त्यांचा संरक्षकदेखील कोणी नव्हता. त्यांना आता दुहेरी यातना दिली जाईल, ते कोणाचे ऐकू देखील शकत नव्हते आणि त्यांना स्वत:लाही काही उमजत नव्हते हे ते लोक आहेत ज्यांनी स्वत: आपल्याला तोट्यात टाकले आणि ते सर्वकाही यांच्याकडून हरविले गेले जे यांनी रचले होते. नि:संशय तेच मरणोत्तर जीवनामध्ये सर्वात अधिक तोट्यात राहतील. उरले ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आणि आपल्या पालनकर्त्याचेच बनून राहिले तर निश्चितच ते स्वर्गीय लोक होत आणि स्वर्गामध्ये ते सदैव राहतील. या दोन्ही पक्षांचे उदाहरण असे आहे जसे एक मनुष्य आहे आंधळा-बहिरा आणि दुसरा पाहणारा व ऐकणारा, हे दोघे समान असू शकतात काय? तुम्ही (या उदाहरणाने) कोणताही बोध घेत नाही काय? (१८-२४)

(आणि अशीच परिस्थिती होती जेव्हा) आम्ही नूह (अ.) ला त्याच्या लोकांकडे पाठविले होते. (त्याने म्हटले) ''मी तुम्हा लोकांना स्पष्टपणे खबरदार करतो, की अल्लाहशिवाय इतर कोणाची भक्ती करू नका अन्यथा मला भीती आहे की तुम्हांवर एके दिवशी दु:खदायक प्रकोप कोसळेल.'' उत्तरादाखल त्याच्या समुदायाचे पुढारी ज्यांनी त्याचे म्हणणे ऐकण्यास नकार दिला होता, म्हणाले, ''आमच्या दृष्टीत तर तुम्ही यापेक्षा वेगळे काही नाही की तुम्ही केवळ एक मनुष्य आहात आमच्यासारखे आणि आम्ही पाहात आहोत की आमच्यापैकी केवळ त्या लोकांनी जे आमच्या येथे कनिष्ठ होते त्यांनी विचार न करता तुमचे अनुकरण स्वीकारले आहे आणि आम्हाला अशी कोणतीही गोष्ट आढळत नाही की ज्यांत तुम्ही लोक आमच्यापेक्षा काही पुढारलेले आहात, उलट आम्ही तर तुम्हाला खोटे समजतो.'' त्याने म्हटले ''हे देशबंधुंनो, जरा विचार तरी करा जर मी आपल्या पालनकर्त्याकडून एका स्पष्ट साक्षीवर अटळ होतो आणि त्याने मला आपल्या विशेष कृपेने देखील उपकृत केले. परंतु ती तुम्हाला दिसली नाही तर शेवटी आमच्याजवळ कोणते साधन आहे की तुम्ही मान्य करू इच्छित नाही आणि आम्ही जबरदस्तीने तुमच्या माथी मारावे? आणि हे देशबंधुंनो, मी या कामासाठी तुमच्याकडून कोणताही माल मागत नाही, माझा मोबदला तर अल्लाहपाशी आहे, आणि मी त्या लोकांना पिटाळू शकत नाही ज्यांनी माझे ऐकले आहे, ते स्वत:च आपल्या पालनकर्त्याच्या पुढे हजर होणार आहेत परंतु मी पाहात आहे की तुम्ही अडाणीपणा करीत

११) वर्णनशैलीवरून असे स्पष्ट होते की ही गोष्ट परलोकात त्यांना हजर होण्याच्या प्रसंगी सांगितली जाईल.

आहात. आणि हे देशबंधुंनो, जर मी या लोकांना हाकलून लावले तर अल्लाहच्या तावडीतून मला वाचविण्यासाठी कोण येईल? तुम्हा लोकांना एवढी गोष्ट देखील कळत नाही का? आणि मी तुम्हाला सांगत नाही की माझ्याजवळ अल्लाहचे खजिने आहेत, हे देखील सांगत नाही की मला परोक्षाचे ज्ञान आहे, हासुद्धा माझा दावा नाही की मी दूत आहे आणि हेदेखील मी सांगू शकत नाही की ज्या लोकांना तुमचे डोळे तुच्छतेने पाहतात त्यांना अल्लाहने कोणताच भलेपणा दिला नाही, त्यांची मन:स्थिती अल्लाहच अधिक चांगली जाणतो, जर मी असे म्हटले तर अत्याचारी ठरेन.'' (२५-३१)

सरतेशेवटी ते लोक म्हणाले की, ''हे नूह (अ.) तुम्ही आमच्याशी भांडण केले आणि आता खूप झाले. आता तर फक्त तो प्रकोप घेऊन या ज्याची तुम्ही आम्हाला धमकी देत आहात, जर तुम्ही खरे असाल.'' नूह (अ.) ने उत्तर दिले, ''तो तर अल्लाहच आणील जर त्याने इच्छिले आणि तुमच्यात ते सामर्थ्य नाही की तुम्ही त्याला रोखू शकाल. आता जर मी तुमचे काही हितचिंतन करू इच्छिले तरी माझे हितचिंतन तुम्हाला कोणतेच लाभ देऊ शकणार नाही जेव्हा अल्लाहनेच तुम्हाला भटकविण्याचा इरादा केला असेल.[१२] तोच तुमचा पालनकर्ता आहे आणि त्याच्याकडे तुम्हाला परतावयाचे आहे.''

(३२-३४)

हे पैगंबर (स.), हे लोक म्हणतात काय की या व्यक्तीने हे सर्वकाही स्वत:च रचले आहे? यांना सांगा, ''जर मी स्वत: हे रचले असेल तर माझ्यावर माझ्या अपराधाची जबाबदारी आहे आणि जो अपराध तुम्ही करीत आहात त्याच्या जबाबदारीतून मी मुक्त आहे.'' (३५)

नूह (अ.) कडे दिव्य प्रकटन केले गेले की तुमच्या लोकांपैकी ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली, बस्स त्यांनीच ठेवली, आता कोणी मानणार नाही, त्यांच्या कृत्यांवर दु:ख करण्याचे सोडून द्या आणि आमच्या देखरेखीत आमच्या दिव्य प्रकटनानुसार एक नौका बनविण्यास प्रारंभ करा. आणि पहा ज्या लोकांनी अत्याचार केला आहे त्यांच्यासंबंधी माझ्याकडे कोणतीही शिफारस करू नका, हे सर्वच्यासर्व आता बुडणारे आहेत.

(३६-३७)

नूह (अ.) नौका बनवीत होता आणि त्याच्या जनसमूहाच्या सरदारांपैकी जो कोणी त्याच्या जवळून जात असे तो त्याची टिंगल उडवीत असे. त्याने सांगितले, ''जर तुम्ही

१२) म्हणजे अल्लाहने जर तुमची हेकेखोरी, दुष्टता आणि पुण्याई बद्दल अनास्था पाहून असा निर्णय घेतला आहे की तुम्हाला सद्वर्तनाची सुबुद्धी देऊच नये व ज्या मार्गांनी तुम्ही भटकू इच्छित आहात त्यांच्यातच तुम्हाला भटकवावे तेव्हा आता तुमच्या भल्यासाठी माझे कोणतेच प्रयत्न सफल ठरू शकत नाही.



आमच्यावर हसत आहात तर आम्ही देखील तुमच्यावर हसत आहोत, लवकरच तुम्हाला स्वत: कळून चुकेल की कोणावर तो प्रकोप येईल ज्याने त्याची नामुष्की होईल आणि कोणावर ती आपत्ती कोसळेल जी टाळता टळणार नाही.''[१३] (३८-३९)

येथपावेतो की जेव्हा आमचा हुकूम आला आणि तो तुफान उफाळला[१४] तेव्हा आम्ही सांगितले, ''प्रत्येक जातीच्या प्राण्याची एक, एक जोडी नावेत ठेवा, आपल्या कुटुंबियांनादेखील, त्या व्यक्तींना सोडून ज्यांचा निर्देश अगोदरच केला गेला आहे.[१५] तिच्यात स्वार व्हा आणि त्या लोकांनासुद्धा बसवा ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे.'' आणि थोडेच लोक होते ज्यांनी नूह (अ.) बरोबर श्रद्धा ठेवली होती. नूह (अ.) यांनी सांगितले, ''स्वार व्हा यात, अल्लाहच्या नावानेच आहे हिचे चालणे आणि हिचे थांबणेसुद्धा, माझा पालनकर्ता मोठा क्षमाशील व कृपाळू आहे.'' (४०-४१)

या लोकांना घेऊन नौका चालली होती आणि एक, एक लाट पर्वतासमान उसळत होती. नूह (अ.) चा मुलगा दूर अंतरावर होता. नूह (अ.) ने हाक देऊन सांगितले, ''पुत्रा, आमच्याबरोबर स्वार हो, अश्रद्धावंतांबरोबर राहू नकोस.'' त्याने उलट उत्तर दिले, ''मी आताच एका पर्वतावर चढून जातो जो पाण्यापासून माझे रक्षण करील.'' नूह (अ.) ने सांगितले, ''आज कोणतीही वस्तू अल्लाहच्या आज्ञेतून वाचविणारी नाही, याशिवाय की

१३) हा मोठा अजब मामला आहे. त्यावर विचार केल्याने असे कळते की मनुष्याची जगाच्या बाह्यरूपाने कितपत फसवणूक होत असते. जेव्हा नूह (अ.) नदीपासून दूर अंतरावर भूमीवर आपले जहाज बनवीत असतील तेव्हा प्रत्यक्षात लोकांना ते एक अत्यंत हास्यास्पद कृत्य वाटत असेल व ते हसत हसत म्हणत असतील की म्हातारबुवाचा बावळटपणा शेवटी या थराला पोहचला की आता महाशय खुशकीवर जहाज चालवतील, त्यावेळी, काहीच दिवसानंतर खरोखरच येथे जहाज चालेल ही गोष्ट कोणाच्या स्वप्नातसुद्धा येऊ शकत नसावी. परंतु ज्या माणसाला वस्तुस्थितीचे ज्ञान होते व उद्या या ठिकाणी जहाजाची काय गरज वाटणार आहे ज्याला हे माहीत होते त्याला त्या लोकांच्या अज्ञानाचे व मग त्यांच्या मूर्खपणाचे उलट त्याला हसू येत असावे. म्हणत असेल, किती नादान आहेत हे लोक की दुर्दैव यांच्या शिरावर येऊन ठेपले आहे, मी यांना सावधान केलेले आहे की बस्स, ते कोसळू पाहात आहे व त्यांच्या डोळ्यादेखतच त्यापासून वाचण्याच्या तयारीत देखील लागलो आहे परंतु हे निश्चिंत बसले आहेत व उलट मलाच खुळ्यात काढीत आहेत.

१४) यासंबंधी भाष्यकारांची कथने वेगवेगळी आहेत परंतु आमच्याजवळ योग्य तेच आहे ते कुरआनच्या शब्दांनी लक्षात येते की वादळास प्रारंभ एका विशिष्ट तंदूराने झाला. त्या तंदूराच्या खालून पाण्याचा स्रोत उफाळला, मग एकीकडे आकाशातून मुसळधार पाऊस कोसळू लागला व दुसरीकडे जमिनीतून जागोजागी स्रोत उफाळू लागले.

१५) म्हणजे तुमच्या घरातील ज्या व्यक्तिसंबंधी सांगितले गेले आहे की ते काफिर आहेत व सर्वोच्च अल्लाहच्या कृपेस पात्र नाहीत त्याना नावेत बसवू नका.

अल्लाह एखाद्यावर दया दाखवील.'' इतक्यात एक लाट दोघांच्यामध्ये आली आणि तो देखील बुडणाऱ्यांमध्ये सामील झाला. (४२-४३)

आज्ञा झाली, ''हे पृथ्वी, आपले संपूर्ण पाणी गिळून टाक आणि हे आकाशा, थांब.'' यावर पाणी जमिनीत ओसरले, निर्णय लावण्यात आला, नौका जुदीवर[१६] ठेपली आणि म्हटले गेले की दूर झाला अत्याचाऱ्यांचा समूदाय. (४४)

नूह (अ.) ने आपल्या पालनकर्त्याला पुकारले. सांगितले, ''हे पालनकर्त्या! माझा मुलगा माझ्या कुटुंबियांपैकी आहे आणि तुझा वायदा खरा आहे आणि तू सर्व सत्ताधीशापेक्षा मोठा व श्रेष्ठ सत्ताधीश आहेस.'' उत्तरात फर्माविले गेले, ''हे नूह (अ.)! तो तुझ्या कुटुंबियांपैकी नाही, तो तर एक दुराचारी आहे.[१७] म्हणून तू त्या गोष्टीची याचना माझ्याकडे करू नकोस ज्याची वास्तविकता तुला माहीत नाही, मी तुला उपदेश करतो की आपल्या स्वत:ला अज्ञान्याप्रमाणे बनवू नकोस.'' नूह (अ.) ने लगेच विनविले, ''हे माझ्या पालनकर्त्या, मी तुझा आश्रय मागतो यापासून की ती गोष्ट तुझ्याजवळ मागावी जिचे ज्ञान मला नाही.[१८] ज़र तू मला माफ केले नाहीस आणि दया केली नाहीस तर मी नष्ट होऊन जाईन.'' (४५-४७)

आज्ञा झाली, ''हे नूह (अ.) उतर, आमच्याकडून सुरक्षा व समृद्धी आहे तुझ्यावर आणि त्या समुहावर जे तुझ्यासमवेत आहेत, आणि काही समूह असे देखील आहेत, ज्यांना आम्ही काही काळ जीवनसामग्री प्रदान करू मग त्यांना आमच्याकडून दु:खदायक यातना पोहचेल.'' (४८)

हे पैगंबर (स.), या परोक्षाच्या वार्ता आहेत ज्या आम्ही तुमच्याकडे दिव्यप्रकटन करीत आहोत. यापूर्वी तुम्ही त्यांना जाणत नव्हता आणि तुमचे लोक देखील. म्हणून

**१६)** 'जूदी' पर्वत कुर्दस्तानच्या इलाख्यात इब्नेउमर बेटाच्या ईशन्येस स्थित आहे. आजसुद्धा ते जूदी या नावाने प्रसिद्ध आहे.

**१७)** हे असेच आहे जसे एखाद्या व्यक्तीच्या शरीरातील एखादा अवयव सडला असावा व डॉक्टराने तो कापून टाकण्याचा निर्णय घेतला असावा. आता तो रुग्ण डॉक्टराला म्हणत आहे की हा तर माझ्या शरीराचा अंश आहे याला का कापता? तेव्हा डॉक्टर त्याला उत्तरात सांगत आहे की हा तुझ्या शरीराचा अंश राहिलेला नाही कारण हा नासला आहे. म्हणून एका सदाचारी पित्याशी त्याच्या नालायक मुलासंबंधी असे सांगणे की हे बिघडलेले काम आहे, याचा अर्थ असा की तुम्ही याच्या पालनपोषणाचे जे श्रम घेतलेत ते वाया गेलेत व हे काम बिघडले.

**१८)** म्हणजे अशी विनंती करावी जी योग्य असण्याचे मला ज्ञान नाही.



संयम बाळगा, कार्याचा शेवट तर ईशपरायण लोकांसाठीच आहे.[१९] (४९)

आणि 'आद'कडे आम्ही त्याचे बंधू हूद (अ.) ला पाठविले, त्याने सांगितले, ''हे देशबंधुंनो, अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणी ईश्वर नाही, तुम्ही केवळ असत्य रचले आहे हे देशबंधुंनो, या कार्यासाठी मी तुमच्याकडून काहीही मोबदला इच्छित नाही, माझा मोबदला तर त्याच्या पाशी आहे ज्याने मला निर्माण केले, तुम्ही जरादेखील बुद्धिचा उपयोग करीत नाही काय? हे माझ्या देशबंधुंनो, आपल्या पालनकर्त्याकडे माफी मागा, नंतर त्याच्याकडेच परतणार आहात, तो तुमच्यावर आकाशाची दारे उघडी करील आणि तुमच्या सद्यशक्तीत अधिक शक्तीची वाढ करील. गुन्हेगार बनून (भक्तीपासून) तोंड फिरवू नका.'' (५०-५२)

त्यांनी उत्तर दिले, ''हे हूद (अ.) तू आमच्याजवळ कोणतीही स्पष्ट साक्ष घेऊन आलेला नाहीस आणि तुझ्या सांगण्यावरून आम्ही आमच्या उपास्यांना सोडू शकत नाही आणि तुझ्यावर आम्ही श्रद्धा ठेवणारे नाही. आम्ही तर असे समजतो की तुझ्यावर आमच्या उपास्यांपैकी कोणाचे तरी अरिष्ट कोसळले आहे.''[२०] (५३-५४-)

हूद (अ.) ने सांगितले, ''मी अल्लाहची साक्ष प्रस्तुत करतो आणि तुम्ही साक्षी रहा की हे जे अल्लाहशिवाय इतरांना तुम्ही ईशत्वात भागीदार ठरविले आहे यापासून मी मुक्त आहे. तुम्ही सर्वच्या सर्व मिळून माझ्याविरूद्ध आपल्या कारवाईत कसूर ठेवू नका आणि मला यत्किंचितदेखील सवड देऊ नका, माझी भिस्त अल्लाहवर आहे जो माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्तादेखील. कोणताही प्राणी असा नाही ज्याच्या झिंज्या त्याच्या हातात नसतील. नि:संशय माझा पालनकर्ता सरळ मार्गावर आहे. जर तुम्ही तोंड फिरवीत असाल तर फिरवा. जो संदेश देऊन मी तुमच्याकडे पाठविला गेलो होतो तो मी तुम्हाप्रत पोहचविला आहे. आता माझा पालनकर्ता तुमच्या जागी दुसऱ्या लोकांना उठवील, आणि तुम्ही त्याचे काहीही बिघडवू शकणार नाही. खचितच माझा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीचा निरीक्षक आहे.'' (-५४-५७)

मग जेव्हा आमची आज्ञा आली तेव्हा आम्ही आमच्या कृपेने हूद (अ.) ची आणि

**१९)** म्हणजे ज्याप्रकारे नूह (अ.) आणि त्यांच्या साथीदारांचाच सरतेशेवटी बोलबाला झाला, त्याचप्रकारे तुमचा आणि तुमच्या साथीदारांचा देखील होईल. म्हणून यावेळी जी संकटे व जे कठीण प्रसंग तुमच्यावर गुदरत आहेत त्यामुळे विषण्ण बनू नका तर धैर्य आणि संयमाने आपले काम करीत राहा.

**२०)** म्हणजे तू एखाद्या देव देवतेच्या अथवा एखाद्या हजरतच्या स्थानावर काही आगळीक केली असेल त्याचीच ही शिक्षा आहे जी तुला भोगावी लागत आहे, की तू बहकलेल्या गोष्टी करीत आहेस आणि त्याच वस्तीत कालपर्यंत ज्यांच्यात तू सन्मानाने राहत होतास, आज तेथे शिवीगाळ आणि धोंडेमारीने तुझा सत्कार होत आहे.

त्या लोकांची ज्यांनी त्यांच्याबरोबर श्रद्धा ठेवली होती, सुटका केली आणि एका कठोर प्रकोपापासून त्यांना वाचविले. (५८)

हे आहेत आद, आपल्या पालनकर्त्याच्या वचनांचा यांनी इन्कार केला, त्यांच्या पैगंबरांचे ऐकले नाही, आणि सत्याच्या प्रत्येक जबरदस्त शत्रूचे अनुकरण करीत राहिले. सरतेशेवटी या जगात देखील त्यांचा धिक्कार केला गेला आणि पुनरुत्थानाच्या दिवशीसुद्धा. ऐका! आदनी आपल्या पालनकर्त्याशी विद्रोह केला. ऐका! दूर फेकले गेले आद, हूद (अ.) यांच्या राष्ट्राचे लोक. (५९-६०)

आणि समूदकडे आम्ही त्यांचा भाऊ सालेह (अ.) ला पाठविले. त्याने सांगितले, ''हे माझ्या देशबंधुंनो, अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणीही ईश्वर नाही. तोच आहे ज्याने तुम्हाला भूमीपासून निर्माण केले आणि येथे तुम्हाला वसविले, म्हणून तुम्ही त्याची क्षमायाचना करा आणि त्याच्याकडे परतून या. निश्चितच माझा पालनकर्ता जवळच आहे आणि तो प्रार्थनांना उत्तर देणारा आहे.''[२१] (६१)

त्यांनी सांगितले, ''हे सालेह (अ.)! याच्यापूर्वी तू आमच्यामध्ये असा इसम होतास ज्याच्याशी मोठ्या अपेक्षा निगडित होत्या. तू आम्हाला त्या उपास्यांच्या उपासनेपासून

**२१)** या लहानशा वाक्यात हजरत सालेह (अ.) यांनी अनेकेश्वरवादाच्या सर्व कारभाराचे मूळ कापून काढले आहे. अनेकेश्वरवादी समजतात व चाणाक्ष लोकांनी त्यांना तशी समज घालण्याचा प्रयत्न ही केला आहे की, सकल जगांच्या प्रभूचे पवित्र स्थान तर सामान्यजनांच्या पोहचपासून फारच दूर आहे. त्याच्या दरबारापर्यंत सामान्य माणसाची पोहोच कशी होऊ शकते बरे. तेथपर्यंत प्रार्थनेचे पोहचणे व मग त्याचे उत्तर मिळणे तर कोणत्याही प्रकारे शक्य होऊच शकत नाही जोपर्यंत की पवित्र आत्म्यांचा वशिला शोधला जात नाही व जोपर्यंत भेट व नैवेद्य आणि विनवणी पोहचविण्याची पद्धत जे जाणतात त्या धार्मिक पदाधिकाऱ्यांची सेवा प्राप्त केली जात नाही. हीच ती दिशाभूल आहे जेणेकरून ईश्वर व त्याच्या दासांदरम्यान अनेक लहान थोर देव-देवता आणि शिफारशींची एक मोठीच गर्दी उभी झाली आहे. हजरत सालेह (अ.) अज्ञानाच्या या सर्व मायेला केवळ दोन शब्दांनी निष्प्रभ करातत. एक असा की अल्लाह अत्यंत जवळ आहे. दुसरा असा की तो प्रार्थनेचे उत्तर देणारा आहे. म्हणजे तुमची ही कल्पना चूक आहे की तो तुमच्यापासून दूर आहे. तसेच हे देखील चूक आहे की तुम्ही विनामध्यस्थ सरळ त्याला पुकारून आपल्या प्रार्थनेचे उत्तर प्राप्त करू शकत नाहीत. तुमच्यातील प्रत्येक माणूस आपल्याजवळच त्याला आढळू शकतो, त्याच्याशी हितगूज करू शकतो, आपल्या दर्खास्ती सरळ त्याच्या हुजूरात सादर करू शकतो. तसेच तो आपल्या प्रत्येक दासाच्या प्रार्थनेला स्वत:च सरळ उत्तरही देतो. म्हणून जेव्हा सृष्टीसम्राटाचा आम दरबार प्रत्येक समयी प्रत्येकासाठी खुला आहे व प्रत्येक माणसाच्या जवळ देखील मौजूद आहे तर मग तुम्ही या कसल्या मूर्खपणात पडला आहात की त्याच्यासाठी मध्यस्थ, वशिले आणि शिफारशी धुंडाळीत फिरत आहात?



रोखू इच्छितोस काय ज्यांची पूजा आमचे वाडवडील करीत होते? तू ज्या पद्धतीकडे आम्हाला बोलवीत आहेस त्याच्याबद्दल आम्हाला मोठी शंका आहे जिने आम्हाला संभ्रमात टाकले आहे.'' (६२)

सालेह (अ.) ने सांगितले, ''हे माझ्या देशबंधुंनो! तुम्ही कधी या गोष्टीचादेखील विचार केलात काय की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून एक स्पष्ट साक्ष बाळगत होतो आणि त्याने आपल्या कृपेने देखील मला उपकृत केले तेव्हा यानंतर अल्लाहच्या तावडीतून मला कोण वाचवील जर मी त्याची अवज्ञा केली? तुम्ही माझ्या कोणत्या उपयोगी पडू शकता याखेरीज की मला जास्त तोट्यात घालाल. हे माझ्या देशबंधुंनो! पहा ही अल्लाहची सांड तुमच्यासाठी एक संकेत आहे. हिला अल्लाहच्या जमिनीत चरावयास मुक्त सोडा. हिची जरा देखील छेड काढू नका अन्यथा काही जास्त वेळ लागणार नाही की तुमच्यावर अल्लाहचा प्रकोप येईल.'' (६३-६४)

पण त्यांनी सांडणीला मारून टाकले. यावर सालेह (अ.) ने त्यांना बजावले की, ''आता केवळ तीन दिवस आणखी आपल्या घरात निवास करा, ही अशी मुदत आहे जी खोटी ठरणार नाही.'' (६५)

सरतेशेवटी जेव्हा आमच्या निर्णयाची घटका आली तेव्हा आम्ही आमच्या कृपेने सालेह (अ.) व त्या लोकांना ज्यांनी त्याच्याबरोबर श्रद्धा ठेवली होती, वाचविले आणि त्या दिवसाच्या नामुष्कीपासून त्यांना सुरक्षित ठेवले. नि:संशय तुझा पालनकर्ता वस्तुत: शक्तिशाली व वर्चस्व बाळगणारा आहे. उरले ते लोक ज्यांनी अत्याचार केले, एका भयंकर विस्फोटाने त्यांना धरले आणि ते आपल्या वस्तीत अशा प्रकारे निपचित पडलेले पडूनच राहिले, जणूकाही ते तेथे कधी वसलेच नव्हते. (६६-६८-)

ऐका, समूद लोकांनी आपल्या पालनकर्त्याशी द्रोह केला. ऐका, दूर फेकले गेले समूद. (-६८)

आणि पहा, इब्राहीम (अ.) जवळ आमचे दूत शुभवार्ता घेऊन पोहचले. म्हणाले, ''तुम्हावर सलाम असो.'' इब्राहीम (अ.) नी उत्तर दिले, ''तुमच्यावरदेखील सलाम असो.'' मग विनाविलंब इब्राहीम (अ.)ने एक भाजलेले वासरू (त्यांच्या मेजवानीसाठी) आणले.[२२] परंतु जेव्हा पाहिले की त्यांचे हात जेवणासाठी पुढे होत नाहीत[२३] तेव्हा तो

**२२)** यावरून असे कळते की फरिश्ते हजरत इब्राहीम (अ.) यांच्या येथे मानवी रूपात पोहचले होते आणि प्रारंभी त्यांनी स्वत:चा परिचय दिला नव्हता, म्हणून हजरत इब्राहीम (अ.) यांनी विचार केला की हे कोणी अनोळखी पाहुणे आहेत व ते आल्याबरोबर त्यांच्या मेजवानीची त्यांनी व्यवस्था केली.

**२३)** यावरून हजरत इब्राहीम (अ.) यांना माहीत झाले की हे फरिश्ते आहेत.

त्यांच्याविषयी साशंक झाला आणि मनात त्यांची भीती धरू लागला. त्यांनी सांगितले, ''भिऊ नका, आम्ही तर लूत (अ.) च्या लोकांकडे पाठविले गेलो आहोत.'' इब्राहीम (अ.) ची पत्नी देखील उभी होती. ती हे ऐकून हसली मग आम्ही तिला इसहाक (अ.) आणि इसहाक (अ.) नंतर याकूब (अ.) ची खुशखबरी दिली. ती म्हणाली, ''माझे दुर्दैव![24] आता मला संतती होईल काय जेव्हा मी चक्क म्हातारी झाले आणि माझे पती देखील म्हातारे झाले? ही तर मोठी विचित्र बाब आहे!'' दूतांनी सांगितले, ''अल्लाहच्या आज्ञेवर आश्चर्य करतेस? इब्राहीम (अ.) च्या कुटुंबियांनो, तुम्हावर तर अल्लाहची कृपा आणि त्याची समृद्धी आहे आणि निश्चितच अल्लाह अत्यंत प्रशंसेस पात्र व वैभवशाली आहे.'' (६९-७३)

मग जेव्हा इब्राहीम (अ.) ची भीड चेपली आणि (संतानच्या सुवार्तेने) त्याचे मन प्रसन्न झाले तेव्हा त्याने लूतच्या लोकांसाठी आमच्याशी भांडण मांडले.[25] वास्तविकत: इब्राहीम (अ.) मोठा सहिष्णू आणि कोमलहृदयी मनुष्य होता आणि सर्व स्थितीत आमच्याकडे तो रूजू होत असे. (सरतेशेवटी आमच्या दूतांनी त्याला सांगितले) 'हे इब्राहीम (अ.) यापासून परावृत्त व्हा, तुमच्या पालनकर्त्याची आज्ञा झालेली आहे आणि आता त्या लोकांवर प्रकोप कोसळल्यावाचून राहणार नाही जो कोणाच्या परतविल्याने परतू शकणार नाही.'' (७४-७६)

आणि जेव्हा आमचे दूत लूत (अ.) जवळ पोहोचले, तर त्यांच्या आगमनाने तो फार घाबरला आणि संकुचित हृदयी झाला. आणि म्हणू लागला, आज मोठ्या संकटाचा

**२४)** याचा अर्थ असा नाही की बीबी हजरत सारा, प्रत्यक्षात यावर आनंदित होण्याऐवजी उलट त्याला दुर्दैव समजत होत्या तर वास्तविकपणे स्त्रिया सामान्यत: आश्चर्याच्या प्रसंगी जे शब्दप्रयोग करतात हे त्यापैकीच आहे.

**२५)** 'भांडण' हा शब्द याप्रसंगी, हजरत इब्राहीम (अ.) आपल्या ईश्वराशी जे अत्यंत प्रेम व लाडाचे संबंध बाळगत होते ते व्यक्त करीत आहे. या शब्दाने दास व ईश्वरा दरम्यान दीर्घ वेळेपर्यंत वादविवाद झाला असल्याचे चित्र डोळ्यासमोर उभे राहते. दास आग्रह धरीत आहे की कसेही करून लूतच्या लोकांवरील प्रकोप टाळला जावा. ईश्वर उत्तरात सांगत आहे की ते राष्ट्र आता भलेपणापासून पूर्णत: दूर झाले आहे व त्याचे अपराध आता त्या मर्यादेच्या पलीकडे गेले आहेत की त्यांना काही सवलत दिली जावी. परंतु दास पुन्हा हेच म्हणत असतो की, ''पालनकर्त्या, त्यांच्यात यत्किंचित देखील भलेपणा उरला असेल तर त्यांना जरा सूट दे कदाचित त्या भलेपणाला यश यावे.''



दिवस आहे.[26] (या पाहुण्यांचे आगमन होताच) त्याच्या जातीचे लोक मोकाटपणे त्याच्या घराकडे धावले. अगोदरपासून ते अशा कुकर्माचे व्यसनी होते. लूत (अ.)ने त्यांना सांगितले, ''बंधूनो, या माझ्या मुली मौजूद आहेत. या तुमच्याकरिता निर्मळ[27] आहेत. अल्लाहचे काही तरी भय बाळगा आणि माझ्या पाहुण्यांच्या बाबतीत मला अपमानित करू नका, तुमच्यात कोणी भला माणूस नाही का?'' त्यांनी उत्तर दिले, ''तुला तर माहीतच आहे की तुझ्या मुलींमध्ये आमचा काहीच वाटा नाही. आणि तुला हे देखील माहीत आहे की आम्हाला काय हवे आहे.'' लूत (अ.) ने सांगितले, ''जर माझ्याजवळ इतके सामर्थ्य असते तर मी तुम्हाला सरळ केले असते, अथवा एखादा भक्कम आधारच असता तर मी त्याचा आश्रय घेतला असता.'' तेव्हा दूतांनी त्याला सांगितले, ''हे लूत (अ.), आम्ही तुझ्या पालनकर्त्याचे पाठविलेले दूत आहोत, हे लोक तुझे काहीच बिघडवू शकणार नाहीत बस्स तू थोडी रात्र उरली असता आपल्या कुटुंबियांना घेऊन निघून जा. आणि पहा, तुमच्यापैकी कुणीही मागे वळून पाहू नये. पण तुझी पत्नी (बरोबर जाणार नाही) कारण तिच्यावरही तेच काही ओढवणार आहे जे या लोकांवर ओढवणार आहे. यांच्या विनाशासाठी सकाळची वेळ निश्चित आहे, आणि सकाळ... आता अवकाशच किती आहे! (७७-८१)

मग जेव्हा आमच्या निर्णयाची वेळ आली तेव्हा आम्ही त्या वस्तीला उलथेपालथे करून टाकले आणि तिच्यावर भाजलेल्या मातीच्या दगडांचा ताबडतोब वर्षाव केला, ज्यापैकी प्रत्येक दगड तुझ्या पालनकर्त्याच्या येथे चिन्हांकित[28] होता. आणि अत्याचाऱ्यां-पासून ही शिक्षा काही दूर नाही. (८२-८३)

आणि मदयनवाल्याकडे आम्ही त्यांचा भाऊ शुऐब (अ.) याला पाठविले. त्याने सांगितले, ''हे माझ्या देशबंधुंनो, अल्लाहची भक्ती करा, त्याच्याशिवाय तुमचा कोणीही

**२६)** हे फरिश्ते सुंदर मुलांच्या रूपात हजरत लूत (अ.) यांच्या येथे पोहचले होते. परंतु हे फरिश्ते आहेत यापासून ते अनभिज्ञ होते. हेच कारण होते की त्या पाहुण्याच्या आगमनाने हजरत लूत (अ.) यांना अत्यंत अस्वस्थता आणि संकोच वाटू लागला. आपले लोक किती कुकर्मी आणि निर्लज्ज बनले आहेत हे त्यांना माहीत होते.

**२७)** याचा अर्थ असा नाही की हजरत लूत (अ.) यांनी त्यांच्यासमोर आपल्या मुलींना व्यभिचारासाठी प्रस्तुत केले होते. 'या तुमच्यासाठी निर्मलतापूर्वक आहेत' हे वाक्य असला चुकीचा अर्थ घेण्यास वाव राहू देत नाही. हजरत लूत (अ.) यांची इच्छा स्पष्टपणे अशी होती की आपली विषयवासना त्या नैसर्गिक आणि वैध रीतीने पूर्ण करा जी अल्लाहने ठरवून दिलेली आहे व त्यासाठी स्त्रियांचा तुटवडा नाही.

**२८)** म्हणजे प्रत्येक पत्थर ईश्वराकडून नियुक्त केलेला होता की त्याला विध्वंसाचे कोणते काम पार पाडणे आहे व कोणत्या पत्थवाला कोणत्या अपराध्यावर पडणे आहे.

ईश्वर नाही. आणि वजनमापात कमी देत जाऊ नका. आज मी तुम्हाला चांगल्या स्थितीत पाहात आहे परंतु मला भय आहे की उद्या तुमच्यावर असा दिवस येईल ज्याचा प्रकोप सर्वांना वेढून टाकील. आणि हे देशबंधुंनो, ठीक ठीक न्यायानिशी पूर्णपणे मोजमाप व वजन करा आणि लोकांना त्यांच्या वस्तूंमध्ये घट देऊ नका आणि भूतलावर उपद्रव माजवत फिरू नका. अल्लाहने दिलेली बचत तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही श्रद्धावंत असाल आणि कोणत्याही परिस्थितीत मी काही तुमच्यावर निरीक्षक नाही.'' (८४-८६)

त्यांनी उत्तर दिले, ''हे शुऐब (अ.)! तुझी नमाज तुला हेच शिकविते काय की आम्ही त्या सर्व उपास्यांना सोडावे ज्यांची उपासना आमचे वाडवडील करीत होते? अथवा असे की आम्हाला आमच्या मालाचा आमच्या इच्छेनुरूप विनियोग करण्याचा अधिकार नाही? केवळ तूच का एक उदारवृत्ती आणि सत्यवादी मनुष्य उरला आहेस!'' (८७)

शुऐब (अ.) ने सांगितले, ''बंधूंनो, तुम्ही स्वत:च विचार करा की जर मी आपल्या पालनकर्त्याकडून एका स्पष्ट साक्षीवर होतो आणि मग त्याने मला आपल्याकडून चांगली उपजीविका देखील दिली.[२९] (तर त्यानंतर तुमच्या पथभ्रष्टतेत आणि हरामखोरीत तुमचा सहभागी कसा होऊ शकेन?) आणि मी हे मुळीच इच्छित नाही की ज्या गोष्टींपासून मी तुम्हाला रोखतो त्या गोष्टी मी स्वत: कराव्यात. मी तर सुधारणा घडवून आणू इच्छितो जितके मला शक्य आहे आणि हे जे काही मी करू इच्छितो ते सर्व अल्लाहप्रणीत सद्‌बुद्धीवर अवलंबून आहे, त्याच्यावरच मी भिस्त ठेवली आणि प्रत्येक बाबतीत मी त्याच्याकडेच रूजू होतो. आणि हे देशबंधुंनो, माझ्याविरूद्ध तुमच्या अट्टाहासाने एखादे वेळी अशी पाळी आणू नये की सरतेशेवटी तुमच्यावर देखील तोच प्रकोप कोसळावा जो नूह (अ.) अथवा हूद (अ.) अथवा सालेह (अ.) यांच्या लोकांवर कोसळला होता. आणि लूत (अ.) चे लोक तर तुमच्यापासून काही दूरही नाहीत. पहा, आपल्या पालनकर्त्याची क्षमा मागा आणि त्याच्याकडे परतून या, नि:संशय माझा पालनकर्ता फार दयाळू आहे आणि प्रेम करणारा आहे.'' (८८-९०)

त्यांनी उत्तर दिले, ''हे शुऐब (अ.)! तुझ्या पुष्कळशा गोष्टी तर आम्हाला कळतच नाहीत आणि आम्ही पाहतो की तू आमच्या दरम्यान एक दुर्बल मनुष्य आहेस, तुझी जातबिरादरी नसती तर आम्ही तुला केव्हाच दगडांनी ठेचून मारले असते. तुझे सामर्थ्य तर

**२९)** म्हणजे माझ्या रबने मला सत्य ओळखणारा डोळसपणा दिला असताना, तसेच हलाल रोजीदेखील प्रदान केली असताना माझ्यासाठी हे वैध कसे ठरू शकते की जेव्हा ईश्वराने मजवर अशी कृपा केली आहे तेव्हा मी तुमच्या पथभ्रष्टता व हरामखोरींना सत्य व हलाल ठरवून त्याच्याशी कृतघ्न बनावे.



इतके नाही की तू आम्हाला जड जावास.'' (९१)

शुऐब (अ.) ने सांगितले, ''बंधूनो, माझे कुटुंब तुमच्यावर अल्लाहपेक्षा वरचढ आहे काय की तुम्ही कुटुंबाची भीती बाळगता आणि) अल्लाहला पूर्णपणे पाठीमागे टाकता? समजून असा की जे काही तुम्ही करीत आहात ते अल्लाहच्या पकडीच्या बाहेर नाही. हे माझ्या समाजातील लोकांनो तुम्ही आपल्या पद्धतीने कार्य करीत राहा आणि मी माझ्या पद्धतीने करीत राहीन, लवकरच तुम्हाला कळून चुकेल की कुणावर अपमानजनक प्रकोप ओढवतो आणि कोण खोटा आहे. तुम्हीही प्रतीक्षा करा आणि मी देखील तुमच्याबरोबर वाट पाहात आहे.'' (९२-९३)

सरतेशेवटी जेव्हा आमच्या निर्णयाची घटका आली तर आम्ही आमच्या कृपेने शुऐब (अ.) ला आणि त्याचे साथी श्रद्धावंतांना वाचविले, आणि ज्या लोकांनी अत्याचार केला होता त्यांना एका - भयंकर स्फोटाने असे गाठले की ते आपल्या वस्त्यांमध्ये जे निपचित पडले ते पडूनच राहिले, जणूकाय ते कधी तेथे राहिले, वसलेच नव्हते. (९४-९५-)

ऐका, मदयनवालेसुद्धा दूर फेकले गेले ज्याप्रमाणे समूदवाले फेकले गेले होते. (-९५)

आणि मूसा (अ.) ला आम्ही आपल्या वचने व स्पष्ट नेमणूक प्रमाणासह, फिरऔन आणि त्याच्या राज्याच्या सरदारांकडे पाठविले पण त्यांनी फिरऔनच्या हुकूमाचे अनुसरण केले. वस्तुत: फिरऔनचा हुकूम सत्याधिष्ठित नव्हता. पुनरुत्थानाच्या दिवशी तो आपल्या लोकांच्या पुढे पुढे असेल आणि आपल्या नेतृत्वात त्यांना नरकाग्नीकडे नेईल. किती वाईट आगमनस्थान आहे हे ज्यावर एखादा पोहचतो! आणि त्या लोकांचा जगातदेखील धिक्कार केला जाईल व पुनरुत्थानाच्या दिवशीही केला जाईल. किती हे वाईट फळ आहे जे एखाद्याला मिळेल. (९६-९९)

हा काही वस्त्यांचा वृत्तांत आहे जो आम्ही तुम्हाला ऐकवीत आहोत. काही अद्यापही उभ्या आहेत व काहींचे वस्तीरूप पीक कापले गेले आहे. आम्ही त्यांच्यावर अत्याचार केला नाही त्यांनी आपण होऊन स्वत:वर अत्याचार केला. आणि जेव्हा अल्लाहची आज्ञा आली तेव्हा त्यांचे ते उपास्य ज्यांचा ते अल्लाहला सोडून धावा करीत असत, त्यांच्या काही उपयोगी पडले नाहीत आणि त्यांनी विनाश व विध्वंसाव्यतिरिक्त अन्य कोणताच फायदा त्यांना दिला नाही. (१००-१०१)

आणि तुझा पालनकर्ता जेव्हा एखाद्या अत्याचारी वस्तीला पकडतो तेव्हा त्याची पकड अशीच असते, खरोखरच त्याची पकड अत्यंत कठोर आणि दु:खदायक असते. वस्तुस्थिती अशी आहे की यात एक संकेत आहे त्या प्रत्येक माणसासाठी ज्याने

परलोकातील यातनांचे भय बाळगले. तो एक दिवस असेल जेव्हा सर्व लोक जमा होतील आणि मग जे काही त्या दिवशी घडेल ते सर्वांच्या डोळ्यांदेखत घडेल. आम्ही त्याच्या आणण्यांत काही फार जास्त दिरंगाई करीत आहोत असे नाही, बस्स एक ठराविक वेळ त्याच्यासाठी निश्चित आहे. जेव्हा ती येईल, तेव्हा कोणाची बोलण्याची बिशाद राहणार नाही, याखेरीज की एखाद्याने अल्लाहच्या अनुमतीने काही विनंती करावी. मग काही लोक त्या दिवशी दुर्दैवी असतील व काहीजण सुदैवी. जे दुर्दैवी असतील ते नरकात जातील. (तेथे उष्णता व तहानेच्या अतिरेकाने) ते उसासे टाकतील आणि हुंकार देतील आणि त्याच स्थितीत ते सदैव राहतील जोपर्यंत आकाश व पृथ्वी टिकून आहेत,[३०] याखेरीज की तुझा पालनकर्ता जी इच्छा करील. नि:संशय तुझा पालनकर्ता पूर्ण अधिकार राखतो की जी इच्छा असेल ते करतो. उरले ते लोक जे भाग्यवान ठरतील ते स्वर्गामध्ये जातील आणि तेथे सदैव राहतील जोपर्यंत आकाश व पृथ्वी टिकून आहेत, याखेरीज की तुझ्या पालनकर्त्याने काही अन्य इच्छा करावी. असले बक्षीस त्यांना मिळेल ज्याचा क्रम कधीही खंडित होणार नाही. (१०२-१०८)

म्हणून हे पैगंबर (स.), तू त्या उपास्यांच्या बाबतीत कोणत्याही शंकेत पडू नकोस ज्यांची हे लोक उपासना करीत आहेत. हे तर (परिपाठाचे अंधानुकरण करणारे बनून) त्याचप्रमाणे पूजाअर्चा करीत आहेत ज्याप्रमाणे पूर्वी यांचे वाडवडील करीत होते, आणि आम्ही यांचा हिस्सा यांना भरपूर देऊ इतका की त्यात कसलीही काटकसर केली जाणार नाही. (१०९)

आम्ही यापूर्वी मूसा (अ.) लासुद्धा ग्रंथ दिलेला आहे त्याच्याबाबतीत देखील मतभेद केले गेले होते (ज्याप्रमाणे आज या ग्रंथाबद्दल केले जात आहेत जो तुम्हाला दिला गेला आहे.) जर तुझ्या पालनकर्त्याकडून एक गोष्ट अगोदरच ठरविली गेली नसती तर त्या मतभेद करणाऱ्यांच्या दरम्यान केव्हाच निकाल लावला गेला असता. ही वस्तुस्थिती आहे की हे लोक याकडून शंका व द्विधेत पडले आहेत आणि ही देखील वस्तुस्थिती आहे की तुझा पालनकर्ता त्यांना त्यांच्या कृत्यांचा पुरेपूर मोबदला दिल्याशिवाय राहणार नाही, खचितच तो यांच्या सर्व कारवायांची खबर राखणारा आहे. तर हे पैगंबर (स.), तुम्ही व तुमचे ते सोबती जे (द्रोह आणि बंडखोरीपासून श्रद्धा व आज्ञापालनाकडे) परत आले आहेत, ठीक ठीक सरळ मार्गावर दृढ राहा जशी तुम्हाला आज्ञा दिली गेली आहे आणि भक्तीच्या मर्यादांचे उल्लंघन करू नका. जे काही तुम्ही करीत आहात ते तुमचा पालनकर्ता पाहात असतो. या अत्याचाऱ्यांकडे यत्किंचितही झुकू नका अन्यथा नरकाच्या लपेटीत याल आणि तुम्हाला असा कोणी वाली किंवा पाठीराखा मिळणार नाही जो तुम्हाला

३०) वाक्यप्रचार म्हणून हे शब्द 'कायमस्वरूपी' या अर्थाने प्रयुक्त होतात.



अल्लाहपासून वाचवू शकेल आणि कोठूनही तुम्हाला मदत मिळणार नाही. आणि पहा, नमाज कायम करा दिवसाच्या दोन्ही टोकांवर आणि थोडी रात्र उलटल्यावर[३१] वस्तुत: पुण्याई पापांना दूर सारत असते ही एक आठवण करून देणारी गोष्ट आहे त्या लोकांसाठी जे अल्लाहची आठवण ठेवणारे आहेत. आणि संयम राखा, अल्लाह सदाचार करणाऱ्यांचा मोबदला कधी वाया घालवीत नाही. (११०-११५)

त्या लोकांत जे तुमच्यापूर्वी होऊन गेले आहेत, असली भली माणसे का शिल्लक राहिली नाहीत ज्यांनी लोकांना जमिनीत हिंसाचार माजविण्यापासून प्रतिबंधित केले असते? असले लोक निघाले तरी फारच थोडे ज्यांना आम्ही त्या लोकांमधून वाचविले, एरव्ही अत्याचारी लोक तर त्याच मौजमजेच्या नादी लागले ज्याची सामग्री त्यांना विपुल प्रमाणात दिली गेली होती आणि ते अपराधी बनून राहिले. तुझा पालनकर्ता असा नाही की वस्त्यांना नाहक उध्वस्त करीत राहील ज्याअर्थी त्यांचे निवासी सुधारणा करणारे असतील. नि:संशय जर तुझ्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर सर्व माणसांचा एक समुदाय बनविला असता, परंतु आता तर ते विभिन्न पद्धतीवरच चालत राहतील. आणि पथभ्रष्टतेपासून केवळ तेच लोक वाचतील ज्यांच्यावर तुझ्या पालनकर्त्याची कृपा आहे. याच (आवडी व निवडीचे स्वातंत्र्य आणि परीक्षे) साठी तर त्याने त्यांना निर्माण केले होते आणि तुझ्या पालनकर्त्याचे ते वचन पूर्ण झाले जे त्याने प्रतिपादिले होते की मी नरकाला जिन्न आणि माणसे या सर्वांनी भरून टाकीन. (११६-११९)

आणि हे पैगंबर (स.)! या प्रेषितांच्या गोष्टी ज्या आम्ही तुम्हाला ऐकवीत आहोत, या त्या गोष्टी आहेत ज्यांच्याद्वारे आम्ही तुमचे हृदय बळकट करतो. यांच्याद्वारे तुम्हाला सत्याचे ज्ञान मिळावे आणि श्रद्धावंतांना उपदेश आणि जागृती लाभावी उरले ते लोक जे श्रद्धा ठेवीत नाहीत तर त्यांना सांगून टाका की तुम्ही आपल्या पद्धतीने कार्य करीत राहा आणि आम्ही आपल्या पद्धतीने करीत राहू, परिणामाची तुम्हीदेखील प्रतीक्षा करा आणि आम्हीदेखील प्रतीक्षेत आहोत. आकाशांत आणि पृथ्वीत जे काही लपलेले आहे ते सर्व अल्लाहच्या अधिकारक्षेत्रात आहे. आणि संपूर्ण मामला त्याच्याकडेच रुजू केला जातो. तर हे पैगंबर (स.), तू त्याचीच भक्ती कर आणि त्याच्यावरच विश्वास ठेव, जे काही तुम्ही लोक करीत आहात त्यापासून तुझा पालनकर्ता अनभिज्ञ नाही. (१२०-१२३)

३१) दिवसाच्या टोकांनी अभिप्रेत सकाळ आणि संध्याकाळ आहे. काही रात्र उलटल्यानंतर ने अभिप्रेत 'ईशा'ची वेळ आहे. (नमाजच्या वेळेच्या तपशीलासाठी पहा सूरह बनीइस्राईल, आयत क्र. ७८, सूरह ताहा, आयत क्र. १३०, आणि सूरह रूम, आयत क्र. १७-१८)

# १२ सूरह यूसुफ

*(मक्काकालीन, वचने १११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ, लाऽऽम, रा. ही त्या ग्रंथाची वचने आहेत जी आपला उद्देश अगदी स्पष्टपणे व्यक्त करतात. आम्ही याला अवतरले आहे कुरआन[1] बनवून अरबी भाषेत जेणेकरून तुम्हा (अरबवासींना ते) चांगल्या प्रकारे समजू शकावे. हे पैगंबर (स.), आम्ही या कुरआनला तुमच्याकडे दिव्य प्रकटन करून उत्तम शैलीमध्ये घटना व हकीकती तुम्हास सांगत आहोत अन्यथा याच्यापूर्वी (या गोष्टीपासून) तुम्ही पूर्णपणे अनभिज्ञ होता. (१-३)

हे त्यावेळचे वर्णन आहे जेव्हा युसूफ (अ.) ने आपल्या वडिलांना सांगितले, ''हे पिता, मी स्वप्न पाहिले आहे की अकरा तारे आहेत व सूर्य आणि चंद्र आहे आणि ते माझ्यापुढे नतमस्तक होत आहेत.'' उत्तरात त्याच्या पित्याने सांगितले, ''बाळा, आपले हे स्वप्न आपल्या भावांना सांगू नकोस अन्यथा ते त्रास देत राहतील.[2] वस्तुस्थिती अशी आहे की शैतान माणसाचा उघड शत्रू आहे. आणि असेच घडेल (जसे तू स्वप्नांत पाहिले आहेस की) तुझा पालनकर्ता तुझी (आपल्या कार्यासाठी) निवड करील आणि तुला गोष्टींच्या तळापर्यंत पोहोचण्याचे शिकवील.[3] आणि तुझ्यावर व याकूब (अ.) च्या संततीवर आपली देणगी त्याचप्रकारे पूर्ण करील ज्याप्रकारे यापूर्वी त्याने तुझे वाडवडील

१) 'कुरआन'चा शाब्दिक अर्थ वाचणे असा होतो. ग्रंथाला या नावाने संबोधण्याचा हेतू असा की हा विशिष्ट आणि सामान्यजन अशा सर्वांच्या वाचनासाठी आहे व मोठ्या प्रमाणात वाचला जाणारा ग्रंथ आहे.

२) हजरत यूसुफ (अ.) यांचे दहा भाऊ दुसऱ्या मातेपासून होते आणि एक त्यांच्याहून लहान, त्यांचा सख्खा भाऊ होता. हजरत याकूब (अ.) यांना माहीत होते की सावत्र भाऊ यूसुफ (अ.) यांचा मत्सर करतात तसेच नैतिकतेच्या दृष्टीनेदेखील ते इतके सद्‌वर्तनी नाहीत की आपले हित साधण्यासाठी एखादी अयोग्य कृती करण्यात त्यांना संकोच वाटावा. म्हणून त्यांनी आपल्या सदाचारी मुलाला सावध केले की त्यांच्यापासून सावध राहावे. स्वप्नाचा स्पष्ट अर्थ असा होता की सूर्याने अभिप्रेत हजरत याकूब (अ.), चंद्राने अभिप्रेत त्याच्या पत्नी (हजरत यूसुफ (अ.) यांची सावत्र आई) आणि ११ ताऱ्यांनी अभिप्रेत त्यांचे ११ भाऊ आहेत.

३) मुळात 'ताअवीलुल अहादीस', असे शब्द प्रयुक्त झाले आहेत. याचा अर्थ केवळ स्वप्नकलांचे ज्ञान असा होतो असे नाही जसा समज झालेला आहे, तर याचा अर्थ असा की सर्वोच्च अल्लाह तुला व्यवहार, आकलन आणि सत्याप्रत पोहचण्याचे शिक्षण देईल तसेच तुला प्रत्येक मामल्याच्या खोलात शिरण्याची व त्याचा ठाव घेण्याची क्षमता प्राप्त होईल, असा डोळसपणा तुला प्रदान करील.



इब्राहीम (अ.) व इसहाक (अ.) यांच्यावर केलेली आहे. निश्चितच तुझा पालनकर्ता सर्वज्ञ व बुद्धिमान आहे.'' (४-६)

वस्तुस्थिती अशी आहे की यूसुफ (अ.) आणि त्यांच्या भावांच्या या वृत्तांतामध्ये प्रश्न करणाऱ्यांच्याकरिता मोठा संकेत आहे. हा वृत्तांत असा सुरू होतो की, त्याच्या बांधवांनी आपापसांत सांगितले की, ''हा यूसुफ (अ.) आणि याचा भाऊ[4] दोघे आमच्या वडिलांना आम्हा सर्वांपेक्षा अधिक प्रिय आहेत, वास्तविक पाहता आम्ही एक पूर्ण जथ्था आहोत, खरी गोष्ट अशी आहे की आमचे वडील पूर्णपणे बहकले आहेत. चला, यूसुफ (अ.) ला ठार करा अथवा त्याला कोठे तरी फेकून टाका जेणेकरून तुमच्या वडिलांचे लक्ष केवळ तुमच्याकडेच राहावे. हे काम उरकल्यावर पुन्हा सदाचारी बनून राहा.'' यावर त्यांच्यापैकी एकाने सांगितले, ''यूसुफ (अ.) ला ठार करू नका, जर काही करावयाचेच असेल तर त्याला एखाद्या कोरड्या विहिरीमध्ये टाकून द्या, एखादा येणारा जाणारा काफिला त्याला काढून नेईल.'' असे ठरल्यावर त्यांनी जाऊन आपल्या वडिलांना सांगितले, ''हे पिता, काय कारण आहे की आपण युसूफ (अ.) च्या बाबतीत आम्हावर विश्वास ठेवीत नाही, वास्तविक पाहता आम्ही त्याचे खरे हितचिंतक आहोत? उद्या त्याला आमच्याबरोबर पाठवून द्या. थोडे फळफळावळ खाईल व[5] खेळून बागडून मनोरंजनही करून घेईल. आम्ही त्याच्या रक्षणासाठी आहोतच.'' वडिलांनी सांगितले, ''तुमचे त्याला घेऊन जाणे मला जड जाते आणि मला भीती आहे की एखादे वेळी त्याला लांडग्याने फाडून खाऊ नये जेव्हा तुम्ही त्याच्याकडून गाफिल असाल.'' त्यांनी उत्तर दिले, ''जर आम्ही असताना एखाद्या लांडग्याने खाल्ले जर आम्ही एक जथा आहोत त्याअर्थी आम्ही तर अगदीच निकामी ठरू.'' अशा प्रकारे आग्रह करून जेव्हा ते त्याला घेऊन गेले आणि त्यांनी ठरवून घेतले की त्याला एका कोरड्या विहिरीत सोडून द्यावे तेव्हा आम्ही युसूफ (अ.) ला दिव्य प्रकटन केले की, ''एक वेळ येईल जेव्हा तू या लोकांना त्यांच्या या कृत्याची समज देशील, हे आपल्या कृत्याच्या परिणामापासून बेखबर आहेत.'' संध्याकाळी ते रडत रडत आपल्या वडिलांकडे आले आणि म्हणाले, ''हे पिता, आम्ही धावण्याच्या स्पर्धेत लागलो होतो आणि यूसुफ (अ.) ला आम्ही आमच्या साहित्याजवळ सोडले होते, इतक्यात लांडग्याने येऊन त्याला खाऊन टाकले. आपण आमच्या बोलण्यावर विश्वास ठेवणार नाही जरी आम्ही खरे असलो.'' आणि त्यांनी यूसुफ (अ.) च्या सदऱ्यावर खोटेनाटे रक्त लावून आणले होते. हे ऐकून त्यांच्या वडिलांनी सांगितले,

४) याने हजरत यूसुफ (अ.) यांचे सख्खे भाऊ 'बिन्यमीन' अभिप्रेत आहेत, जे त्यांच्यापेक्षा कित्येक वर्षांनी लहान होते.

५) आपल्या वाक्यप्रचारात मुलगा रानावनात फेरफटका मारून व काही फळे तोडून खात फिरत असेल तर लाडिवाळपणे असले शब्दप्रयोग केले जातात.

''किंबहुना तुमच्या वासनेने तुमच्याकरिता एक मोठे काम सोपे बनविले. बरे, संयम राखीन आणि चांगल्याच प्रकारे संयम बाळगीन, जी गोष्ट तुम्ही रचत आहात त्यावर अल्लाहकडूनच मदत मागितली जाऊ शकते.'' (७-१८)

तिकडे एक काफिला आला आणि त्याने आपल्या पाणक्याला पाणी आणावयास पाठविले, पाणक्याने विहिरीत पोहरा घातला तर (यूसुफ (अ.) ला पाहून) पुकारून उठला, ''शुभ असो, येथे तर एक मुलगा आहे.'' त्या लोकांनी त्याला व्यापाराचा माल समजून लपवून ठेवले, खरे पाहता जे काही ते करीत होते, अल्लाह त्याचा जाणकार होता. सरतेशेवटी त्यांनी थोड्याशा किमतीवर काही दिरहमच्या मोबदल्यात त्याला विकून टाकले आणि ते त्याच्या मूल्याच्या बाबतीत काही अधिक पात्र नव्हते. (१९-२०)

मिस्रच्या ज्या व्यक्तीने त्याला खरेदी केले, त्याने आपल्या पत्नीला सांगितले, ''याला चांगल्या प्रकारे ठेव, अशक्य नाही की हा आपल्याला लाभदायक ठरेल अथवा आम्ही त्याला आपला पुत्र बनवून घ्यावे.'' अशा प्रकारे आम्ही यूसुफ (अ.) साठी त्या भूभागात पाय स्थिरावण्याचा मार्ग काढला, आणि त्याला व्यवहार आकलनाचे शिक्षण देण्याची व्यवस्था केली. अल्लाह आपले काम केल्याशिवाय राहात नाही, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत. आणि जेव्हा तो आपल्या भर तारुण्यात पोहचला तेव्हा आम्ही त्याला निर्णयशक्ती आणि ज्ञान प्रदान केले, अशा प्रकारे आम्ही सदाचारी लोकांना मोबदला देत असतो. (२१-२२)

ज्या स्त्रीच्या घरी तो होता ती त्याच्यावर मोहिनी घालू लागली आणि एके दिवशी दारे बंद करून म्हणाली, ''ये'', यूसुफ (अ.) ने सांगितले, ''अल्लाहचा आश्रय, माझ्या पालनकर्त्याने[६] तर मला चांगला दर्जा बहाल केला (आणि मी हे काम करावे!) असले अत्याचारी कधीही सफल होत नसतात.'' ती त्याच्याकडे सरसावली आणि यूसुफ (अ.) देखील तिच्याकडे सरसावला असता जर त्याने आपल्या पालनकर्त्याचे प्रमाण पाहिले

६) सर्वसामान्यपणे भाष्यकार व अनुवादकांनी असे समजले आहे की या ठिकाणी 'माझ्या रब' हा शब्द हजरत यूसुफ (अ.) यांनी त्या माणसाच्या चाकरीत ते होते त्याच्यासाठी प्रयुक्त केला आहे व त्यांच्या या उत्तराचा अर्थ असा होता की माझ्या स्वामीने तर मला इतक्या चांगल्या प्रकारे ठेवले आहे, मग मी अशी नमकहरामी कशी करू शकतो की त्याच्या पत्नीशी व्यभिचार करावा. परंतु ही गोष्ट एका प्रेषिताच्या वैभवाच्या तुलनेत अत्यंत खालच्या पातळीची आहे की एका पापापासून अलिप्त राहण्यासाठी त्याने सर्वोच्च अल्लाहऐवजी एखाद्या दासाचा आदर करावा. कुरआनात असे कोणतेही उदाहरण मौजूद नाही की एखाद्या प्रेषिताने कधी ईश्वराशिवाय इतर कुणाला आपला 'रब' सांगितले असावे.



नसते.[७] असे घडले जेणेकरून आम्ही त्याच्यापासून दुष्टता व निर्लज्जता दूर करावी. खरे पाहता तो आमच्या निवडक दासांपैकी होता, सरतेशेवटी यूसुफ (अ.) पुढे आणि ती मागे असे दाराकडे धावले आणि तिने पाठीमागून यूसुफ (अ.) चा सदरा (ओढून) फाडून टाकला. दारावर त्या दोघांनी तिच्या पतीला उपस्थित पाहिले. त्याला पाहताच स्त्री म्हणून लागली, ''कोणती शिक्षा आहे त्या माणसासाठी ज्याने तुझ्या पत्नीवर वाईट हेतू ठेवावा? याशिवाय अन्य कोणती शिक्षा असू शकते की तो कैद केला जावा अथवा त्याला कठोर यातना दिली जावी?'' यूसुफ (अ.) ने सांगितले, ''हीच मला फूस लावण्याचा प्रयत्न करीत होती'' त्या स्त्रीच्या स्वत:च्या कुटुंबियांपैकी एका व्यक्तीने (परिस्थितीजन्य पुराव्यावरून) साक्ष प्रस्तुत केली की, ''जर यूसुफ (अ.) चा सदरा पुढून फाटला असेल तर स्त्री खरी आहे आणि हा खोटा आणि याचा सदरा पाठीमागून फाटला असेल तर स्त्री खोटी व हा खरा.''[८] जेव्हा पतीने पाहिले की यूसुफ (अ.) चा सदरा पाठीमागून फाटला आहे तेव्हा तो म्हणाला, ''या तर तुम्हा स्त्रियांच्या 'खसलती' आहेत. खरोखर मोठ्या भयंकर असतात तुमच्या चाली. यूसुफ (अ.)! या मामल्याकडे दुर्लक्ष कर. आणि हे महिले! तू आपल्या अपराधाची क्षमा माग तूच मुळात अपराधी होतीस.'' (२३-२९)

शहरातील स्त्रिया आपापसात चर्चा करू लागल्या की, ''अजीजची[९] पत्नी आपल्या युवक गुलामाच्या मागे लागली आहे. प्रेमाने तिला बेबंद करून सोडले आहे, आमच्या दृष्टीने तर ती उघड चूक करीत आहे.'' तिने जेव्हा त्यांच्या धूर्तपणाच्या गोष्टी ऐकल्या

७) मूळ अरबी शब्द 'बुर्हान'ने अभिप्रेत ईश्वराने सूचविलेले हे प्रमाण आहे जेणेकरून हजरत यूसुफ (अ.) यांच्या मनाने त्यांच्या वासनेला ही गोष्ट मानवयास लावली की या स्त्रीच्या विलासी आमंत्रणाला स्वीकारणे तुला शोभत नाही. ते प्रमाण अगोदरच्या वाक्यात येऊन गेले आहे की, ''माझ्या रबने तर मला हा दर्जा प्रदान केला व मी असे कुकर्म करावे, अशा जालिमांना कधी सफलता लाभत नसते.''

८) अर्थ असा आहे की जर यूसुफ (अ.) यांचा सदरा समोरून फाटला असेल तर आगळीक यूसुफ (अ.) कडून होती व स्त्री स्वत:चा बचाव करण्यासाठी झटत होती, याची ही स्पष्ट खूण आहे. परंतु जर यूसुफ (अ.) यांचा सदरा मागच्या बाजूने फाटला आहे तर त्याने स्पष्टपणे असे सिद्ध होते की स्त्री त्याच्या मागे लागली होती व यूसुफ (अ.) तिच्यापासून वाचू पाहात होता. याशिवाय आणखी परिस्थितीजन्य पुरावा सदरहू साक्षीत दडलेला होता. तो असा की त्या साक्षीदाराने लक्ष केवळ हजरत यूसुफ (अ.) यांच्या सदऱ्याकडेच वेधले आहे. यावरून हे अगदी उघड झाले की स्त्रीच्या शरीरावर अथवा तिच्या वस्त्रांवर आक्रमणाचे कोणतेही चिन्ह मुळातच आढळले नव्हते. वास्तविकत: जर हा खटला बलात्काराच्या प्रयत्नांचा असता तर स्त्रीवर त्याच्या स्पष्ट खुणा आढळल्या असत्या.

९) 'अजीज' त्या माणसाचे नाव होते असे नाही तर मिस्र देशात एखाद्या मोठ्या सत्ताधिकारी माणसासाठी परिभाषा म्हणून हे टोपण नाव वापरले जात असे.

तेव्हा त्यांना बोलावणे पाठविले आणि त्यांच्याकरिता तक्याची बैठक सजविली आणि मेजवानीत प्रत्येकीच्या पुढ्यात एक एक सुरी ठेवली, (मग ऐन त्यावेळी जेव्हा त्या फळे कापूनकापून खात होत्या) तिने यूसुफ (अ.) ला इशारा केला की त्यांच्यासमोर बाहेर ये. जेव्हा त्या स्त्रियांची दृष्टी त्याच्यावर पडली तेव्हा त्या अवाक झाल्या आणि आपले हात कापून घेतले आणि अनायासे उद्‌गारल्या, "हे अल्लाह, ही व्यक्ती मनुष्य नाही, हा तर कोणी प्रतिष्ठित दूत होय." अजीजच्या पत्नीने सांगितले, "पाहिलेत ना, हीच आहे ती व्यक्ती ज्याच्याबाबतीत माझ्यावर तुम्ही गोष्टी रचत होता, नि:संशय मी याला वश करण्याचा प्रयत्न केला होता परंतु हा त्यातून वाचला. जर याने माझे म्हणणे ऐकले नाही तर कैद केला जाईल आणि अत्यंत अपमानित होईल." यूसुफ (अ.) ने सांगितले, "हे माझ्या पालनकर्त्या, तुरुंगवास मला मान्य आहे यापेक्षा की मी ते काम करावे जे हे लोक माझ्यापासून अपेक्षा करतात आणि जर माझ्यापासून तू यांच्या चालींना टाळले नाहीस तर मी त्यांच्या जाळ्यात अडकेन आणि अज्ञानी लोकांमध्ये सामील होऊन जाईन." त्याच्या पालनकर्त्याने त्याची प्रार्थना स्वीकारली आणि त्या स्त्रियांच्या चाली त्याच्यापासून टाळल्या, नि:संशय तोच आहे जो सर्वांचे ऐकतो आणि सर्वकाही जाणतो." (३०-३४)

मग त्या लोकांना कल्पना सुचली की एका कालावधीसाठी त्याला कैद करावे वस्तुत: त्यांनी (त्याच्या निष्कलंकतेचे व आपल्या स्त्रियांच्या स्वैरपणाचे) स्पष्ट संकेत पाहिले होते.[१०] (३५)

तुरुंगात आणखी दोन गुलाम त्याच्याबरोबर दाखल झाले. एके दिवशी त्यांच्यापैकी एकाने सांगितले, "मी स्वप्न पाहिले आहे की मी दारू गाळीत आहे." दुसऱ्याने सांगितले, "मी पाहिले की माझ्या डोक्यावर भाकरी ठेवल्या आहेत आणि पक्षी त्या खात आहेत." दोघांनी सांगितले, "आम्हाला याचे भाकित सांगा, आम्ही पाहतो की आपण एक सदाचारी मनुष्य आहात." यूसुफ (अ.) ने सांगितले, "येथे जे जेवण तुम्हाला मिळते ते येण्यापूर्वी मी तुम्हाला या स्वप्नांचे भाकित सांगेन. हे त्या ज्ञानापैकी आहे जे माझ्या पालनकर्त्याने मला प्रदान केले आहे. वस्तुस्थिती अशी आहे की मी त्या लोकांचा मार्ग सोडून जे अल्लाहवर श्रद्धा ठेवीत नाहीत व परलोकचा इन्कार करतात, आपले वडिलधारी इब्राहीम (अ.), इसहाक (अ.) आणि याकूब (अ.) यांचा मार्ग अनुसरला आहे. आमचे हे काम नव्हे की आम्ही अल्लाहबरोबर एखाद्याला भागीदार ठरवावे, खरे पाहता ही अल्लाहची कृपा आहे आमच्यावर व सर्व मानवांवर (की त्याने आपल्याखेरीज अन्य कोणाचाही दास आम्हाला बनविले नाही) परंतु बहुतेक लोक कृतज्ञ बनत नाहीत. हे कैदेतील साथीदारांनो,

**१०)** यावरून असे कळले की एखाद्या व्यक्तीला न्याच्या अटीनुसार न्यायालयात गुन्हेगार सिद्ध केल्याविना तसेच पकडून तुरुंगात पाठविणे बेईमान सत्ताधाऱ्यांची जुनी प्रथा आहे. याबाबतीत हल्लीचे शैतान चार हजार वर्षांपूर्वीच्या दुष्टांपेक्षा काही अधिक वेगळे नाहीत.



तुम्ही स्वत:च विचार करा की पुष्कळसे विभिन्न पालनकर्ते उत्तम आहेत अथवा तो एक अल्लाह जो सर्वांवर प्रभावी आहे? त्याला सोडून तुम्ही ज्याची भक्ती करीत आहात ते याशिवाय काहीच नाहीत की बस्स काही नावे आहेत जे तुम्ही व तुमच्या वाडवडिलांनी ठेवली आहेत. अल्लाहने त्यांच्यासाठी कोणतेही प्रमाण अवतरिले नाही. शासनाची सत्ता अल्लाहखेरीज इतर कोणासाठी नाही. त्याची आज्ञा आहे की त्याच्या स्वत:शिवाय तुम्ही इतर कोणाचीही भक्ती करू नका. हीच थेट सरळ जीवनपद्धती आहे, पण बहुतेक लोक जाणत नाहीत. हे कैदेतील साथीदारांनो! तुमच्या स्वप्नांचा अर्थ हा आहे की तुम्हापैकी एक तर आपल्या पालनकर्त्या (मिस्राधिपती[११]) ला दारू पाजील. उरला दुसरा तर त्याला सुळावर चढविले जाईल आणि त्याचे डोके पक्षी चोच मारून मारून खातील. निर्णय लागला त्या गोष्टीचा जे तुम्ही विचारीत होता." (३६-४१)

मग त्यांच्यापैकी ज्याच्याविषयी कल्पना होती की तो मुक्त होईल त्याला यूसुफ (अ.) ने सांगितले की, "आपल्या पालनकर्त्याकडे (मिस्राधिपतीकडे) माझा उल्लेख कर." परंतु शैतानाने त्याला असा विसर पाडला की तो आपल्या पालनकर्त्यापाशी (मिस्राधिपतीपाशी) याचा उल्लेख करण्यास विसरला आणि यूसुफ (अ.) कित्येक वर्षे तुरुंगात पडून राहिला. (४२)

एके दिवशी[१२] बादशाहने सांगितले, "मी स्वप्नांत पाहिले आहे की सात लठ्ठ गायी आहेत ज्यांना सात रोडक्या गायी खात आहेत आणि अन्नाची सात कणसे हिरवी आहेत व सात सुकलेली. हे दरबारी लोकहो, मला या स्वप्नाचे भाकित सांगा जर तुम्हाला स्वप्नफल कळत असेल." लोकांनी सांगितले, "या तर गोंधळयुक्त स्वप्नांच्या गोष्टी आहेत आणि अशाप्रकारच्या स्वप्नांचे भाकित आम्ही जाणत नाही." (४३-४४)

त्या दोन कैद्यांपैकी जो वाचला होता आणि ज्याला एका दीर्घकाळानंतर आता आठवण झाली, त्याने सांगितले, "मी आपल्याला याचा अर्थ सांगतो, मला जरा (तुरुंगात यूसुफ (अ.) कडे) पाठवून द्या." (४५)

**११)** आयत क्र. २३ सह सदरहू आयत वाचली असता कळून येते की हजरत यूसुफ (अ.) यानी जेव्हा माझा रब म्हटले तेव्हा त्यांना सर्वोच्च अल्लाहचे अस्तित्व अभिप्रेत होते आणि जेव्हा मिस्राधिपतीच्या सेवकाशी म्हटले की तू तुझ्या रबला दारू पाजेल तेव्हा त्याने अभिप्रेत मिस्रचा राजा होता, कारण तो मिस्राधिपतीलाच आपला रब समजत होता.

**१२)** या दरम्यान कित्येक वर्षांच्या तुरुंगवासाचा अहवाल सोडून आता हजरत यूसुफ (अ.) यांचा भौतिक उत्कर्ष जेथून सुरू झाला तेथून अहवालशृंखला जोडली जात आहे.

त्याने जाऊन सांगितले, ''यूसुफ (अ.), हे मूर्तीमंत सत्य![१३] मला या स्वप्नाचा अर्थ सांग की सात लठ्ठ गायी आहेत ज्यांना सात रोडक्या गायी खात आहेत आणि सात कणसे हिरवी आहेत आणि सात सुकलेली, कदाचित मी त्या लोकांपाशी परत जावे आणि कदाचित त्यांनी जाणावे.''[१४] यूसुफ (अ.) यांनी सांगितले, ''सात वर्षांपर्यंत तुम्ही निरंतर शेतीवाडी करीत राहाल. या दरम्यान जी पिके तुम्ही कापाल त्याच्यापासून फक्त थोडासा हिस्सा, जो तुमच्या अन्नासाठी उपयोगी पडेल, काढा आणि उरलेला त्याच्या कणसांतच राहू द्या. नंतर सात वर्षे अत्यंत बिकट येतील, त्या काळात ते सर्व धान्य खाल्ले जाईल जे तुम्ही त्या काळासाठी साठवाल. जर काही उरेल तर केवळ तेच जे तुम्ही सुरक्षित ठेवले असेल. त्यानंतर मग एक वर्ष असे येईल की ज्यांत पाऊसरूपी कृपेने लोकांची याचनापूर्ती केली जाईल आणि ते रस गाळतील.'' (४६-४९)

बादशाहने सांगितले, ''त्याला माझ्याजवळ आणा, पण जेव्हा राजाचा दूत यूसुफ (अ.) जवळ पोहोचला तेव्हा तो म्हणाला, ''आपल्या राजाकडे परत जा आणि त्याला विचार की त्या स्त्रियांचा काय मामला आहे ज्यांनी आपले हात कापून घेतले होते? माझा पालनकर्ता तर त्यांचा कुटीलपणा चांगल्याप्रकारे जाणून आहे.'' यावर बादशाहने त्या स्त्रियांकडे पृच्छा केली, ''तुमचा काय अनुभव आहे त्या वेळचा जेव्हा तुम्ही यूसुफ (अ.) ला मोहित करण्याचा प्रयत्न केला होता?'' सर्वांनी एकमुखाने सांगितले, ''अल्लाहचा आश्रय, आम्हाला तर त्याच्यात दुष्टाईचा लेशमात्र देखील आढळला नाही.'' अजीजची पत्नी उद्‌गारली, ''आता सत्य उघड झाले आहे. ती मीच होते जिने त्याला फूस लावण्याचा प्रयत्न केला होता, नि:संशय तो अगदी खरा आहे.'' (५०-५१)

(यूसुफ (अ.) ने सांगितले,) ''यापासून माझा हेतू असा होता की (अजीज) ला हे ज्ञात व्हावे की मी पडद्याआड त्याच्याशी विश्वासघात केला नव्हता आणि असे की जे विश्वासघात करतात त्यांच्या कारस्थानांना अल्लाह सफलतेच्या मार्गावर नेत नाही मी आपल्या मनोवासनेपासून मुक्त नाही, मनोवासना तर वाईटाकडे प्रवृत्त करीतच असते, याखेरीज की ज्याच्यावर माझ्या पालनकर्त्याची कृपा होते. नि:संशय माझा पालनकर्ता अत्यंत क्षमाशील व परम कृपाळू आहे.'' (५२-५३)

**१३)** मूळ अरबी शब्द 'सिद्दीक' प्रयुक्त झाला आहे. अरबी भाषेत हा सचोटी आणि रास्तपणा यांच्या अंतिम दर्जासाठी प्रयुक्त होतो. यावरून तुरुंगवासाच्या काळात हजरत यूसुफ (अ.) यांच्या निर्मळ चारित्र्याचा त्या माणसावर किती खोलवर प्रभाव पडला होता व दीर्घ काळ लोटल्यानंतरसुद्धा तो प्रभाव किती दृढ होता याचा अंदाज केला जाऊ शकतो.

**१४)** म्हणजे आपला दर्जा व प्रतिष्ठा ओळखावी व त्यांना जाण व्हावी की केवढ्या प्रतिष्ठासंपन्न माणसाला त्यांनी कोठे डांबून ठेवले आहे तसेच मी आपणाशी कैदखान्यात जे वचन दिले होते ते पूर्ण करण्याची संधी प्राप्त व्हावी.



बादशाहने सांगितले, ''त्यांना माझ्याजवळ आणा की जेणेकरून मी त्यांना माझ्या खास सेवेत ठेवीन'' (५४-)

जेव्हा यूसुफ (अ.) ने त्याच्याशी बोलणी केली तेव्हा तो म्हणाला ''आता आपण आमच्याशी मानमरातब राखता आणि आपल्या अमानतीवर पूर्ण विश्वास आहे.'' यूसुफ (अ.) ने सांगितले, ''देशाचे खजिने माझ्या स्वाधीन करा. मी रक्षण करणाराही आहे आणि मला ज्ञानही आहे.'' (-५४-५५)

अशा प्रकारे आम्ही त्या भूभागात यूसुफ (अ.) यांच्यासाठी अधिकाराचा मार्ग सुरळीत केला. तो मुखत्यार होता की त्यात हवे तेथे आपले स्थान बनवावे.[१५] आम्ही आपल्या कृपेने ज्याला इच्छितो त्याला उपकृत करतो सदाचारी लोकांचा मोबदला आमच्यापाशी वाया घालविला जात नाही, आणि मरणोत्तर जीवनाचा मोबदला त्या लोकांसाठी जास्त उत्तम होय ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ईशपरायण होऊन कार्य करीत राहिले. (५६-५७)

यूसुफ (अ.) चे भाऊ मिस्रमध्ये आले आणि त्यांच्या येथे हजर झाले.[१६] त्याने त्यांना ओळखले पण ते त्याच्याशी अपरिचित होते. मग जेव्हा त्याने त्यांचा सरंजाम तयार करविला तेव्हा निघण्याच्या वेळी त्यांना सांगितले, ''आपल्या सावत्र भावाला माझ्याकडे आणावे. पाहात नाही काय की मी कशा प्रकारे माप भरून देतो आणि किती चांगले आदरातिथ्य करणारा आहे. जर तुम्ही त्याला आणले नाही तर माझ्याजवळ तुमच्यासाठी

**१५)** म्हणजे आता संपूर्ण मिस्रभूमी त्याची होती. त्याच्या प्रत्येक जागेला तो आपली जागा म्हणू शकत होता. त्याला ज्यापासून रोखले जाऊ शकावे असा एकही भाग तेथे उरला नव्हता. हे जणू हजरत यूसुफ (अ.) यांना त्या देशावर जो पूर्ण ताबा व सर्वकष सत्ता प्राप्त झाली होती त्याचे वर्णन होय. जुने भाष्यकारदेखील या आयतचे हेच भाष्य करतात. तद्वत इब्ने जैद याचा अर्थ हे सांगतात की, ''आम्ही यूसुफ (अ.) ला त्या सर्व वस्तुंचा मालक बनविले, ज्या मिस्र देशात होत्या. जगाच्या त्या भागात जेथे त्याला जे काही वाटेल ते करू शकत होता. तो भूप्रदेश त्याच्या स्वाधीन केलेला होता इथपावेतो की, फिरऔनला आपल्या अधीन करून त्याच्यापेक्षा वरचढ बनावे तर हेसुद्धा तो करू शकत होता. 'मुजाहिद यांचे मत आहे की मिस्रच्या बादशाहने यूसुफ (अ.) करवी इस्लामचा स्वीकार केला होता.

**१६)** या ठिकाणी पुन्हा सात, आठ वर्षातील घटना मध्येच वगळून वर्णनक्रम, जेथून बनीइस्राईल - याकूब (अ.) यांच्या संतानचा मिस्र येथे स्थलांतराला प्रारंभ झाला त्या ठिकाणाशी जोडले गेले आहे.

अजिबात धान्य नाही इतकेच नव्हे तर तुम्ही माझ्या जवळपासदेखील फिरकू नका.''[१७] त्यांनी सांगितले, ''आम्ही प्रयत्न करू की वडील त्याला पाठविण्यास तयार व्हावेत, आणि आम्ही असे जरूर करू.'' यूसुफ (अ.) ने आपल्या गुलामांना इशारा केला की, ''या लोकांनी धान्याच्या मोबदल्यात जो माल दिलेला आहे तो गुपचुप त्यांच्या सामानांतच ठेऊन द्या.'' यूसुफ (अ.) ने असे या आशेने केले की घरी पोहचल्यावर आपला परत मिळालेला माल ते ओळखतील (अथवा या औदार्यावर कृतज्ञ होतील) आणि आश्चर्य नव्हे की पुन्हा ते परततील. (५८-६२)

जेव्हा ते आपल्या वडिलांजवळ गेले तेव्हा म्हणाले, ''हे पिता, यापुढे आम्हाला धान्य देण्यास नकार देण्यात आला आहे म्हणून आपण आमच्या भावाला आमच्याबरोबर पाठवून द्यावे जेणेकरून आम्ही धान्य घेऊन येऊ. आणि त्याच्या रक्षणाचे आम्ही जबाबदार आहोत.'' वडिलांनी उत्तर दिले, ''मी त्याच्याही मामल्यात तुमच्यावर तसाच विश्वास ठेवू काय जसा यापूर्वी त्याच्या भावासंबंधी ठेवला होता? अल्लाह उत्तम रक्षक आहे व तो सर्वांपेक्षा जास्त दया करणारा आहे.'' मग जेव्हा त्यांनी आपले सामान उघडले तेव्हा पाहिले की त्यांचा मालसुद्धा त्यांना परत केलेला आहे. हे पाहून ते पुकारून उठले, ''हे पिता आम्हाला आणखी काय हवे, पहा, हा आमचा मालसुद्धा आम्हाला परत केला गेला आहे. परत आता आम्ही जाऊ आणि आमच्या मुलाबाळांसाठी रसद घेऊन येऊ. आपल्या भावाचे रक्षणही करू आणि एका उंटाचा भार आणखी जास्तही आणू. इतक्या धान्याची वाढ सहज होईल.'' त्यांच्या पित्याने सांगितले, ''मी त्याला कदापि तुमच्याबरोबर पाठविणार नाही जोपर्यंत तुम्ही अल्लाहच्या नावाने मला पक्के वचन देत नाही की त्याला माझ्याजवळ जरूर परत आणाल याव्यतिरिक्त की तुम्ही वेढलेच जाल.'' जेव्हा त्यांनी त्यांच्यासमोर आपापल्या प्रतिज्ञा घेतल्या तेव्हा तो म्हणाला, ''पहा, आमच्या या वचनावर अल्लाह पहात आहे.'' मग त्याने सांगितले, ''माझ्या मुलांनो मिस्रच्या

**१७)** ही गोष्ट हजरत युसूफ (अ.) यांनी, दुष्काळामुळे मिस्र देशात धान्यावर नियंत्रण असल्या कारणाने सांगितली असावी, धान्य घेण्यासाठी हे दहा बंधू आले होते परंतु ते आपले वडील व आपल्या अकराव्या धाकट्या भावाचा वाटा देखील मागत असावेत. यावर हजरत यूसुफ (अ.) म्हणाले असतील की तुमच्या वडिलांचे स्वत: न येण्यासाठी तर ते फार वृद्ध आणि अंध आहेत हे कारण योग्य ठरू शकते परंतु भावाने न येण्याची योग्य सबब काय असू शकते? असो, यावेळी तर आम्ही तुमच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तुम्हाला पूर्ण धान्य देत आहोत परंतु पुढे तुम्ही जर त्याला बरोबर आणले नाही तर तुमचा विश्वास उरणार नाही व तुम्हाला येथून कसलेच धान्य मिळणार नाही.



राजधानीत एकाच दरवाजाने दाखल होऊ नका.[१८] तर वेगवेगळ्या दरवाजाने जा. परंतु मी अल्लाहच्या मनोरथाविरूद्ध तुम्हाला वाचवू शकत नाही. हुकूम त्याच्याशिवाय कोणाचाही चालत नाही, त्याच्यावरच मी भिस्त ठेवतो. आणि ज्या कोणाला भिस्त ठेवायची असेल त्याने त्याच्यावरच ठेवावी.'' आणि घडलेदेखील असेच की जेव्हा ते वडिलांच्या आदेशानुसार शहरात (वेगवेगळ्या दरवाजांनी) दाखल झाले तेव्हा त्यांचा हा सावधगिरीचा उपाय अल्लाहच्या मनोरथाविरूद्ध काहीच उपयोगी ठरू शकला नाही. परंतु केवळ याकूब (अ.) च्या मनात जी एक शंका होती ती दूर करण्याकरिता त्याने आपल्या परीने प्रयत्न केला. नि:संशय तो, आम्ही दिलेल्या शिकवणीमुळे ज्ञानी होता परंतु बहुतेक लोक मामल्याच्या वास्तवतेला जाणत नाहीत. (६३-६८)

हे लोक यूसुफ (अ.) च्या पाशी पोहचले तेव्हा त्याने आपल्या भावाला आपल्याजवळ वेगळे बोलावून घेतले आणि त्याला कळवले की, ''मी तुझा तोच भाऊ आहे (जो हरविला गेलो होतो) आता तू त्या गोष्टीचे दु:ख करू नकोस जे हे लोक करीत राहिले आहेत.''[१९] (६९)

जेव्हा यूसुफ (अ.) त्या भावांचे सामान लादवू लागला तेव्हा त्याने आपल्या भावाच्या सामानात एक पेला ठेवून दिला. मग एका पुकारणाऱ्याने पुकारून सांगितले की, ''हे जथ्थेवाल्यांनो, तुम्ही चोर लोक आहात.'' त्यांनी मागे फिरून विचारले, ''तुमची कोणती वस्तू हरवली आहे?'' सरकारी कर्मचाऱ्याने सांगितले, ''बादशाहचे माप आम्हाला सापडत नाही.'' (आणि त्यांच्या जमादाराने सांगितले,) ''जो कोणी आणून देईल त्याच्याकरिता एक उंट वाहू शकेल इतके बक्षीस आहे याची मी हमी देतो.'' त्याच्या भावांनी सांगितले, ''अल्लाहची शपथ, तुम्हाला चांगलेच माहीत आहे की आम्ही या देशात उपद्रव माजविण्यासाठी आलेलो नाही आणि आम्ही चोऱ्या करणारे लोक नाही.'' त्यांनी सांगितले, ''बरे, तुमचे म्हणणे जर खोटे ठरले तर चोराला काय शिक्षा आहे?'' त्यांनी सांगितले, ''त्याची शिक्षा? ज्याच्या सामानातून वस्तू निघेल त्याला स्वत:च

**१८)** बहुधा या दुष्काळाच्या परिस्थितीत हे लोक जर एक जथा बनून मिस्र देशात दाखल होतील तर कदाचित त्यांना संशयास्पद समजले जाईल व ते लूटमार करण्याच्या हेतूने आले असतील असा समज होईल अशी हजरत याकूल (अ.) यांना शंका आली असावी.

**१९)** बहुधा या बेटीत बिनयमीनने ऐकविले असावे की त्यांच्या पाठीमागे सावत्र भावांनी त्याच्याशी काय काय दुर्वर्तन केले आणि हजरत यूसुफ (अ.) यांनी भावाचे सांत्वन केले असावे की आता तू माझ्याच जवळ राहशील, या जालिमांच्या कचाट्यात तुला पुन्हा जाऊ देणार नाही. याप्रसंगी दोन्ही भावांत असेही ठरले असावे की बिनयमीनला मिस्र देशात रोखण्यासाठी काय उपाय योजला जावा की जेणेकरून हजरत यूसुफ (अ.) हितकारक म्हणून जे पांघरूण घालू इच्छित होते ते देखील तसेच राहावे.

आपल्या शिक्षेपायी ठेवले जाईल, आमच्या येथे तर अशा अत्याचाऱ्यांना शिक्षा देण्याची हीच पद्धत आहे.'' तेव्हा यूसुफ (अ.) ने आपल्या भावाच्या अगोदर त्यांच्या थैल्यांची झडती घ्यावयास सुरूवात केली, मग आपल्या भावाच्या थैलीतून हरवलेली वस्तू बाहेर काढली - अशा प्रकारे आम्ही यूसुफ (अ.) चे समर्थन आमच्या युक्तीने केले. त्याचे हे काम नव्हते की बादशाहच्या धर्मात (मिस्रच्या शाही कायद्यात) आपल्या भावाला पकडावे, याशिवाय की अल्लाहनेच अशी इच्छा करावी.[२०] आम्ही ज्याचे इच्छितो त्याचे दर्जे उंचावतो, आणि एक ज्ञानी असा आहे जो प्रत्येक ज्ञानीपेक्षा उच्चतर आहे.'' (७०-७६)

त्या भावांनी सांगितले, ''याने चोरी केली तर काही आश्चर्याची गोष्ट नव्हे, याच्यापूर्वी याच्या भावाने (यूसुफ (अ.) ने) सुद्धा चोरी केली आहे.'' यूसुफ (अ.) ने त्यांचे हे म्हणणे ऐकून ते गिळले, सत्य त्यांच्यावर उघड केले नाही, बस्स (ओठांतल्या ओठांत) इतके सांगून थांबला की, ''फारच वाईट लोक आहात तुम्ही, (माझ्या समक्षच माझ्यावर) जो आरोप तुम्ही करीत आहात त्यातील सत्य अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो.'' (७७)

त्यांनी सांगितले, ''हे सत्ताधीश सरदार (अजीज)![२१] याचा पिता फार म्हातारा माणूस आहे, याच्याऐवजी आपण आमच्यापैकी कोणाला तरी ठेऊन घ्यावे, आम्हाला आपण फारच प्रामाणिक मनुष्य आढळता. यूसुफ (अ.) ने सांगितले, ''अल्लाह रक्षण करो, दुसऱ्या एखाद्या व्यक्तीला आम्ही कसे ठेवून घेऊ शकतो? ज्याच्याजवळ आम्हाला

**२०)** सामान्यतः सदरहू आयतचा अनुवाद असा केला जातो की, ''यूसुफ (अ.), बादशाहाच्या कायद्यानुसार आपल्या भावाला पकडू शकत नव्हते'', परंतु याचा अर्थ असा घेतला गेला तर गोष्ट अगदीच निरर्थक होते. बादशाहाच्या कायद्यात चोराला न धरण्याचे कारण काय असू शकते बरे? ज्याचा कायदा चोराला धरण्याची परवानगी देत नसावा जगात असेदेखील एखादे राज्य कधी राहिले आहे का? तर खरी गोष्ट अशी की बादशाहाच्या कायद्यानुसार कृती करावी, अल्लाहचे प्रेषित हजरत यूसुफ (अ.) यांचे ते काम नव्हते. म्हणूनच हजरत यूसुफ (अ.) यांनी भावांना त्यांच्या तेथील कायदा विचारता व इब्राहीम (अ.) यांच्या शरीअतनुसार आपल्या बंधूला धरले.

**२१)** या ठिकाणी 'अज़ीज़' हा शब्द हजरत यूसुफ (अ.) यांच्यासाठी जो प्रयुक्त झाला आहे केवळ त्याच आधाराव भाष्यकारांनी अनुमान केले आहे की जुलेखाचा पती ज्या हुद्यावर नियुक्त होता त्याच हुद्यावर हजरत यूसुफ (अ.) देखील नियुक्त झाले होते परंतु टीप क्र. ९ मध्ये आम्ही स्पष्टीकरण केले आहे की मिस्र देशात हा काही विशिष्ट हुद्दा होता असे नाही तर केवळ 'सत्ताधिकार' या अर्थात प्रयुक्त होत असे.



आमचा माल[२२] सापडला आहे त्याला सोडून दुसऱ्याला ठेवून घेतले तर आम्ही अत्याचारी ठरू.'' (७८-७९)

जेव्हा ते यूसुफ (अ.) पासून निराश झाले तेव्हा एका कोपऱ्यात जाऊन आपसात सल्ला-मसलत करू लागले, त्यांच्यात जो थोरला होता, तो म्हणाला, ''तुम्हाला माहीत नाही काय की तुमच्या वडिलांनी तुमच्याकडून अल्लाहच्या नावाने प्रतिज्ञा घेतली आहे? आणि याच्यापूर्वी यूसुफ (अ.) च्या बाबतीत जे काय तुम्ही केले आहे ते देखील तुम्हाला माहीत आहे. आता मी तर येथून मुळीच जाणार नाही जोपर्यंत माझे वडील मला परवानगी देत नाहीत, अथवा अल्लाहनेच माझ्यासंबंधी काही निर्णय द्यावा, तो सर्वात उत्तम न्याय करणारा आहे. तुम्ही जाऊन आपल्या वडिलांना सांगा की, ''हे पिता आपल्या सुपुत्राने चोरी केली आहे. आम्ही त्याला चोरी करताना पाहिले नाही, जे काही आम्हाला माहीत झाले आहे केवळ तेच आम्ही सांगत आहोत आणि परोक्षावर तर आम्ही नियंत्रण ठेवू शकत नाही. आपण त्या वस्तीतील लोकांना विचारून घ्यावे की जेथे आम्ही होतो, त्या काफिल्याला विचारा ज्यांच्यासमवेत आम्ही आलो आहोत. आम्ही आमच्या निवेदनात अगदी खरे आहोत.'' (८०-८२)

पित्याने ही कथा ऐकून सांगितले, ''वस्तुतः तुमच्या वासनेने तुमच्यासाठी आणखी

**२२)** चिंता लक्षात घ्यावी की 'चोर' म्हणत नाहीत तर म्हणतात की, ''ज्याच्याजवळ आम्हाला आमचा माल आढळला आहे.'' यालाच शरीअतच्या परिभाषेत 'तौरिया' म्हणतात. म्हणजे 'वस्तुस्थितीवर पडदा घालणे' अथवा 'वास्तविकता लपविणे'. जेव्हा एखाद्या अत्याचारपीडिताला अत्याचारीपासून वाचविण्याचा किंवा भयंकर अत्याचार टाळण्याचा कोणताच उपाय याशिवाय असू नये की काही अवास्तव गोष्ट सांगितली जावी अथवा एखादा खोटा बहाणा केला जावा तेव्हा अशा परिस्थितीतही पापभीरु माणूस उघडपणे खोटे बोलण्यापासून अलिप्त राहताना अशी गोष्ट अथवा उपाय योजण्याचा प्रयत्न करील जेणेकरून वस्तुस्थिती लपवून अरिष्ट टाळले जाऊ शकावे. आता पहा की या एकूण प्रकरणात हजरत यूसुफ (अ.) यांनी कशा प्रकारे वैध 'तौरिया'च्या अटी पूर्ण केल्या आहेत. भावाच्या अनुमतीने त्याच्या सामानात पेला ठेवला. परंतु चाकरांना त्याच्यावर चोरीचा आरोप करा असे सांगितले नाही. मग जेव्हा सरकारी नोकरांनी चोरीच्या आरोपात त्या लोकांना धरून आणले तेव्हा स्तब्धपणे उठून झडती घेतली. मग आता जेव्हा त्या भावांनी सांगितले की बिनयमीनच्या जागी आमच्यापैकी एखाद्याला ठेवून घ्यावे तेव्हा त्याच्या उत्तरात देखील त्यांचेच शब्द त्यांच्यावर उलटविले की ज्याच्या सामानातून माल निघाला आहे त्यालाच ठेवले जावे असा तुमचा फतवा होता तर आता तुमच्यासमोरच बिनयमीनच्या सामानातून आमचा माल निघाला आहे म्हणून यालाच आम्ही ठेवून घेत आहोत, दुसऱ्याला त्याच्या जागी कसे ठेवू शकतो?

एका मोठ्या गोष्टीला सोपे बनविले.[२३] बरे, तर मी याच्यावरदेखील संयम ठेवीन आणि उत्तम प्रकारे ठेवीन. काय अशक्य आहे की अल्लाहने त्या सर्वांना आणून मला भेटवावे, तो सर्वकाही जाणतो आणि त्याची सर्व कामे विवेकावर आधारित आहेत.'' मग तो त्यांच्याकडून तोंड फिरवून बसला आणि सांगू लागला की, ''हाय यूसुफ (अ.)!'' मनातल्या मनात त्याला दाटून येत होते दु:खाने आणि त्याचे डोळे पांढरे झाले होते. मुलांनी सांगितले, ''अल्लाहची शपथ, आपण तर केवळ यूसुफ (अ.) चीच आठवण करीत असता, आता पाळी अशी आली आहे की त्याच्या दु:खात आपण स्वत:ला क्षीण करून टाकाल अथवा आपला प्राणच गमवाल.'' त्याने सांगितले, ''मी आपल्या त्रासाची आणि दु:खाची फिर्याद अल्लाहशिवाय इतर कोणाकडेच करीत नाही, आणि अल्लाहशी जसा मी परिचित आहे तसे तुम्ही नाही. माझ्या मुलांनो, जाऊन यूसुफ (अ.) आणि त्याच्या भावाचा काही सुगावा घ्या, अल्लाहच्या कृपेपासून निराश होऊ नका, त्याच्या कृपेपासून तर केवळ अश्रद्धावंतच निराश होत असतात.'' (८३-८७)

जेव्हा हे लोक मिस्रला जाऊन यूसुफ (अ.) च्या समोर दाखल झाले तेव्हा त्यांनी विनंती केली की, ''हे सत्ताधीश सरदारा, आम्ही आणि आमचे कुटुंबजन भयंकर संकटात आहोत, आणि आम्ही काही क्षुल्लक पुंजी घेऊन आलो आहोत, आपण आम्हालाभरपूर धान्य देण्याची मेहरबानी करावी. आणि आम्हाला दान द्यावे, अल्लाह दान देणाऱ्याला मोबदला देतो.'' (हे ऐकून यूसुफ (अ.) ला राहवले नाही) त्याने सांगितले, ''तुम्हाला हे तरी माहीत आहे का की तुम्ही यूसुफ (अ.) आणि त्याच्या भावाशी काय केले होते, जेव्हा तुम्ही नादान होता?'' ते चमकून म्हणाले, ''काय, तुम्ही यूसुफ (अ.) आहात?'' त्याने सांगितले, ''होय, मी यूसुफ (अ.) आहे आणि हा माझा भाऊ आहे. अल्लाहने आमच्यावर उपकार केले. वस्तुस्थिती अशी आहे की जर एखाद्याने ईशपरायणता आणि संयमाने वागले तर अल्लाहजवळ असल्या सदाचारी लोकांचा मोबदला वाया घालविला जात नाही.'' त्यांनी सांगितले, ''अल्लाह शपथ, की तुम्हाला अल्लाहने आमच्यावर श्रेष्ठत्व प्रदान केले आणि खरोखरच आम्ही अपराध करणारे होतो.'' त्याने उत्तर दिले, ''आज तुमची कसलीच पकड नाही. अल्लाह तुम्हाला क्षमा करो, तो सर्वांत जास्त दया करणारा आहे. जा, माझा हा सदरा घेऊन जा आणि माझ्या वडिलांच्या तोंडावर टाका,

२३) म्हणजे तुमच्या ठायी, माझा पुत्र ज्याचे उच्च कोटीचे चारित्र्य मी चांगलेच जाणतो, तो एका पेल्याची चोरी करू शकतो, यावर विश्वास करणे फारच सोपे आहे. पूर्वी तुमच्यासाठी आपल्या एका बंधूला हेतुपूर्वक हरविणे व त्याच्या सदऱ्यावर खोटेनाटे रक्त फासून आणणे फार सोपे काम झाले होते. आता एका दुसऱ्या बंधूला खरेच चोर मानणे व येऊन मला त्याची खबर देणे देखील तसेच सोपे झाले आहे.



त्यांची दृष्टी परत येईल, आणि आपल्या सर्व मुलाबाळांना माझ्याजवळ घेऊन या.''

(८८-९३)

जेव्हा हा काफिला (इजिप्तहून) रवाना झाला तेव्हा त्यांच्या पित्याने ('कनआन' या ठिकाणी) सांगितले, ''मला यूसुफ (अ.) चा सुगंध जाणवत आहे, तुम्ही एखादे वेळी असे सांगू नये की मी वार्धक्याने साठळलो आहे.'' घरातील लोक म्हणाले, ''अल्लाहची शपथ, आपण अद्याप आपल्या त्या जुन्या विक्षिप्तपणामध्ये पडलेले आहात.''

(९४-९५)

मग जेव्हा शुभवार्ता आणणारा आला तेव्हा त्याने यूसुफ (अ.) चा सदरा याकूब (अ.) च्या तोंडावर टाकला आणि अकस्मातपणे त्यांची दृष्टी परत आली. तेव्हा त्याने सांगितले, ''मी तुम्हाला सांगत नव्हतो काय? मी अल्लाहकडून ते जाणतो जे तुम्ही जाणत नाही.'' सर्वजण उद्गारले, ''हे पिता, आपण आमच्या अपराधांच्या क्षमेसाठी प्रार्थना करा. खरोखरच आम्ही अपराध करणारे होतो.'' त्याने सांगितले, ''मी आपल्या पालनकर्त्याशी तुमच्यासाठी माफीची याचना करीन, तो मोठा माफ करणारा आणि दया दाखविणारा आहे.'' (९६-९८)

मग जेव्हा हे लोक यूसुफ (अ.) जवळ पोहचले तेव्हा त्याने आपल्या आईवडिलांना आपल्याबरोबर बसवून घेतले आणि (आपल्या सर्व कुटुंबियांना) सांगितले, ''चला, आता शहरात चला, अल्लाहने इच्छिले तर सुखासमाधानाने राहाल.'' (९९)

(शहरात प्रवेश केल्यानंतर) त्याने आपल्या मातापित्याला उठवून आपल्यापाशी सिंहासनावर बसविले आणि सर्वजण त्याच्यापुढे झुकले.[२४] यूसुफ (अ.) ने सांगितले, ''हे पिता, हे फळ आहे माझ्या त्या स्वप्नाचे जे मी पूर्वी पाहिले होते, माझ्या पालनकर्त्याने ते स्वप्न साकार केले. त्याचे उपकार आहेत की त्याने मला तुरुंगातून बाहेर काढले, आणि

२४) 'सजदा' या शब्दाने पुष्कळ लोकांचा चुकीचा समज झाला आहे. येथपावेतो की एका गटाने तर यालाच प्रमाण धरून बादशाह आणि पीरांसाठी सजद-ए-तहय्यत आणि सजद-ए-ताजीमी (आदरात्मक कपाळ टेकणे) वैध ठरवून घेतले आहे. दुसऱ्या लोकांना या अनिष्टापासून वाचण्यासाठी पूर्वीच्या धर्मशास्त्रात केवळ उपासनात्मक सजदा अल्लाहशिवाय इतरांसाठी हराम होता. उरला उपासनेच्या भावनेविना केलेला सजदा तर तो ईश्वराशिवाय इतरांनादेखील केला जाऊ शकतो. तथापि मुहम्मदी धर्मशास्त्रात अल्लाहशिवाय इतरांसाठी सर्व प्रकारचे सजदेदेखील हराम ठरविले गेले आहेत, असे कारण स्पष्ट करावे लागले आहे. परंतु या सर्व गैरसमजुती वास्तविकपणे या कारणास्तव उत्पन्न झाल्या आहेत की 'सजदा' या शब्दाला हल्लीच्या इस्लामी परिभाषेच्या समानार्थी समजले गेले. म्हणजे हात, गुडघे आणि कपाळ जमिनीवर टेकणे. खरे पाहता 'सजदा'चा मूळ अर्थ केवळ झुकणे असा होतो. या ठिकाणी हा शब्द याच अर्थाने प्रयुक्त झाला आहे.

तुम्हा लोकांना ओसाड भागातून आणून मला भेटविले, वस्तुत: शैतानाने माझ्या आणि माझ्या भावांच्या दरम्यान बिघाड निर्माण केले होते, वस्तुस्थिती अशी आहे की माझा पालनकर्ता नकळत उपाययोजनेद्वारे आपले मनोरथ साकार करतो, नि:संशय तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. हे माझ्या पालनकर्त्या, तू मला राज्य प्रदान केले आणि मला गोष्टीच्या तळापर्यंत पोहचण्याचे शिकविले. पृथ्वी व आकाश बनविणारा तूच इहलोकात व परलोकात माझा वाली आहेस, माझा शेवट इस्लामवर कर आणि परिणामांती मला सदाचारी लोकांबरोबर मिळव.'' (९९-१०१)

हे पैगंबर (स.), ही कथा परोक्षाच्या वार्तांपैकी आहे जी आम्ही तुमच्याकडे दिव्य प्रकटन म्हणून पाठवीत आहोत. एरव्ही तुम्ही त्यावेळी हजर नव्हता जेव्हा यूसुफ (अ.) च्या भावांनी आपापसांत संगनमत करून कट केला होता. परंतु तुम्ही मग कितीही इच्छा केलीत तरी, यांच्यातून बहुतेक लोक मान्य करून घेणारे नाहीत. वास्तविकपणे तुम्ही या सेवेबद्दल त्यांच्याकडून काही मोबदलाही मागत नाही. हा तर एक उपदेश आहे जो जगतवासियांकरिता आहे. (१०२-१०४)

पृथ्वी आणि आकाशात कित्येक संकेत आहेत ज्यावरून हे जात असतात आणि थोडेदेखील लक्ष देत नाहीत. यांच्यापैकी बहुतेक अल्लाहला मानतात परंतु अशा प्रकारे की त्याच्याबरोबर ते इतरांना भागीदार ठरवितात. हे समाधानी आहेत काय की अल्लाहच्या प्रकोपाचे एखादे संकट यांच्यावर झडप घालणार नाही? अथवा बेसावध असता पुनरुत्थानाची घटका अचानक यांच्यावर येणार नाही? तुम्ही यांना स्पष्ट सांगून टाका की, ''माझा मार्ग तर हा आहे, मी अल्लाहकडे बोलावितो, मी स्वत:देखील पूर्ण प्रकाशात आपला रस्ता पहात आहे आणि माझे सोबतीदेखील, आणि अल्लाह पवित्र आहे व अनेकेश्वरवाद्यांशी माझा काहीही संबंध नाही.'' (१०५-१०८)

हे पैगंबर (स.), तुमच्या अगोदर आम्ही जे प्रेषित पाठविले होते, ते सर्व देखील माणसेच होते, आणि जे याच वस्त्यांच्या निवासितांपैकी होते, आणि त्यांच्याकडे आम्ही दिव्य प्रकटन पाठवीत राहिलो होतो मग काय या लोकांनी जमिनीवर संचार केला नाही की त्या लोकांचा शेवट त्यांना दिसला नाही जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत? निश्चितच परलोकाचे घर त्या लोकांसाठी आणखी उत्तम आहे ज्यांनी (पैगंबरांचे म्हणणे मान्य करून) ईशपरायणतेचे वर्तन अंगिकारले. काय आतादेखील तुम्ही समजणार नाही? (पूर्वीच्या पैगंबरांशीसुद्धा हेच होत राहिले आहे की ते दीर्घकाळ उपदेश करीत राहिले आणि लोकांनी ऐकून घेतले नाही) इथपावेतो की जेव्हा पैगंबर लोकांपासून निराश झाले आणि लोकांनी देखील समजून घेतले की त्यांच्याशी खोटे बोलले गेले होते तेव्हा अकस्मात आमची मदत पैगंबरांना पोहचली. मग जेव्हा असला प्रसंग येतो तेव्हा आमचा कायदा असा आहे की ज्याला आम्ही इच्छितो वाचवितो आणि अपराध्यावरून तर आमचा



प्रकोप टाळलाच जाऊ शकत नाही. (१०९-११०)

पूर्वीच्या लोकांच्या या कथांमध्ये बुद्धी व विवेक बाळगणाऱ्यांसाठी धडा आहे. हे जे काही कुरआनमध्ये वर्णिले जात आहे या काही बनावट गोष्टी नाहीत तर जे ग्रंथ याच्यापूर्वी आलेले आहेत, हे त्यांचेच प्रमाणित सत्य आहे, आणि प्रत्येक गोष्टीचा तपशील[२५] आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांकरिता मार्गदर्शन व कृपा आहे. (१११)

**२५)** म्हणजे त्या प्रत्येक गोष्टीचा तपशील जो मानवाच्या प्रबोधनासाठी व मार्गदर्शनासाठी आवश्यक आहे. काही लोक 'प्रत्येक गोष्टीचा तपशील'ने विनाकारणच जगभरच्या गोष्टींचा तपशील अभिप्रेत धरतात व मग त्यांना मोठी अडचण अशी वाटू लागते की कुरआनात, जंगले, वैद्यकशास्त्र, गणित आणि इतर कला व शास्त्रांसंबंधी कोणताच तपशील आढळत नाही तर इतर काही लोक बळेच प्रत्येक कलेचा तपशील कुरआनात काढू लागतात.

# १३ सूरह अर्‌रअद

*(मक्काकालीन, वचने ४३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ, लाऽऽम, मीऽऽम, रा. ही ईश्वरी ग्रंथाची वचने आहेत, आणि जे काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुम्हांवर अवतरले गेले आहे ते सत्य आहे, पण (तुमच्या लोकांपैकी) बहुतेक लोक मानीत नाहीत. (१)

तो अल्लाहच आहे ज्याने आकाशांना अशा आधाराविना स्थापित केले जे तुम्हाला दिसत आहे,[१] मग तो आपल्या राजसिंहासनावर विराजमान झाला आणि त्याने सूर्य व चंद्राला एका कायद्याच्या आधीन केले, या साऱ्या व्यवस्थेतील प्रत्येक वस्तू एका ठरलेल्या वेळेसाठी चाललेली आहे आणि अल्लाहच या सर्व कार्याची तजवीज करीत आहे. तो संकेत उघड करून करून देतो[२] कदाचित तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा विश्वास बाळगाल. (२)

आणि तोच आहे ज्याने ही पृथ्वी विस्तृत केली आहे, हिच्यात पर्वतांच्या मेखा रोवल्या आहेत आणि नद्या प्रवाहित केल्या. त्यानेच प्रत्येक प्रकारच्या फळांच्या जोड्या निर्माण केल्या आणि तोच दिवसावर रात्र आच्छादित करीत असतो. या सर्व वस्तुमध्ये मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे गंभीरपणे विचार करतात. (३)

आणि पहा! पृथ्वीवर वेगवेगळे भू-भाग आढळतात जे एकमेकांशी संलग्न असलेले आहेत. द्राक्षांच्या बागा आहेत, शेते आहेत. खजुरींची झाडे आहेत ज्यांच्यापैकी काही एकेरी आहेत आणि काही दुहेरी, सर्वांना एकच पाणी सिंचित करतो, परंतु चवीत आम्ही काहींना उत्तम बनवितो तर काहींना कनिष्ठ. या सर्व वस्तूंमध्ये पुष्कळसे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे बुद्धिचा उपयोग करतात. (४)

---

१) दुसऱ्या शब्दात आकाशांना, इंद्रिय-अगम्य आणि अगोचर अशा आधारांवर उभारले. सकृतदर्शनी अफाट अंतराळातील या असंख्य व अमाप ग्रह व नक्षत्रांना सांभाळील अशी कोणतीही वस्तू नाही तथापि त्यापैकी प्रत्येकाला त्याच्या जागी व त्याच्या कक्षेवर रोखून धरले आहे व या वैभवशाली महाकाय गोष्टींना पृथ्वीवर किंवा एकमेकावर पडू देत नाही अशी इंद्रियांना अगम्य एक शक्ती आहे.

२) म्हणजे या गोष्टीच्या निशाण्या की अल्लाहचे पैगंबर (स.) ज्या वास्तवतेची खबर देत आहेत त्या प्रत्यक्षात खऱ्या वास्तवता आहेत, सृष्टीत सर्वत्र त्यांची ग्वाही देणारी चिन्हे मौजूद आहेत. लोकांनी जर डोळे उघडून पाहिले तर कुरआनात ज्या ज्या गोष्टीवर ईमान-श्रद्धा ठेवण्याचे आवाहन केले गेले आहे, पृथ्वी व आकाशात विखुरलेली अगणित चिन्हे त्यांची सत्यता पटवीत असल्याचे त्यांना दिसून येईल.



आता जर तुम्हाला आश्चर्य करावयाचे असेल तर आश्चर्य करण्यास योग्य लोकांचे हे कथन आहे, "जेव्हा आम्ही मरून माती होऊ तेव्हा काय आम्ही नव्याने निर्माण केले जाऊ?" हे ते लोक आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्त्याशी द्रोह केला आहे.[३] हे ते लोक आहेत ज्यांच्या मानेत जोखड[४] अडकलेले आहेत. हे नरकवासी आहेत आणि नरकामध्ये सदैव राहतील. (५)

हे लोक भल्यापूर्वी वाईटाकरिता घाई करीत आहेत[५] वस्तुत: यांच्यापूर्वी (ज्या लोकांचे असे वर्तन राहिले आहे त्यांच्यावर अल्लाहच्या प्रकोपाची) धडा शिकविणारी उदाहरणे घडलेली आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता लोकांचा अत्याचार असताना देखील त्यांच्या बाबतीत डोळेझांक करतो, आणि हेही सत्य आहे की तुझा पालनकर्ता कठोर शिक्षाही देणारा आहे. (६)

हे लोक ज्यांनी तुमचे म्हणणे ऐकण्यास इन्कार केला आहे, म्हणतात की, "या व्यक्तीवर याच्या पालनकर्त्याकडून एखादा संकेत का अवतरला नाही?" तुम्ही तर केवळ सावध करणारे आहात, आणि प्रत्येक जनसमूहासाठी एक मार्गदर्शक आहे. (७)

अल्लाह प्रत्येक गर्भवतीच्या गर्भाशयाबद्दल जाणतो, जे काही त्याच्यात तयार होते त्यालाही जाणतो आणि जे काही त्यात कमी जास्त होते त्याचीही त्याला माहिती असते. प्रत्येक गोष्टीसाठी त्याच्यापाशी एक प्रमाण निश्चित आहे. तो गुप्त आणि प्रकट प्रत्येक गोष्टीचा विज्ञाता आहे, तो महान आहे आणि प्रत्येक स्थितीत उच्चतर राहणारा आहे. तुम्हापैकी कोणीही मग तो मोठ्याने बोलो अथवा हळू आणि कोणी रात्रीच्या अंध:कारात लपलेला असो अथवा दिवसाच्या प्रकाशात चालत असो त्याच्यासाठी सर्व एकसारखेच आहे. प्रत्येक माणसाच्या पुढे आणि मागे त्याने नियुक्त केलेले निरीक्षक लागून आहेत जे

---

३) म्हणजे त्यांचे परलोकाचे इन्कार करणे वास्तविकपणे ईश्वर व त्याचे सामर्थ्य आणि चातुर्य व बुद्धिमत्तेचा इन्कार करणे होय. हे केवळ आम्ही मातीत मिसळल्यानंतर दुसऱ्यांदा पुन्हा आमचे निर्माण होणे अशक्य आहे. इतकेच म्हणतात, असे नाही तर त्यांच्या याच कथनात, ज्याने यांना निर्माण केले आहे, तो ईश्वर लाचार व निरुपाय, अगतिक आणि नादान व निर्बुद्ध आहे. (ईश्वर त्यापासून वाचवो) अशीही कल्पना गर्भित आहे.

४) मानेत जू अडकलेले असणे कैदी असण्याची खून आहे. या लोकांच्या मानेत जू अडकलेले असणयाचा अर्थ असा की हे लोक आपल्या अज्ञान आणि हेकेखोरीचे तसेच आपल्या मनोवासना व वाडवडिलांच्या अंधानुकरणाचे बंदिवान बनले आहेत. हे स्वतंत्रपणे विचार करू शकत नाहीत. यांना यांच्या पूर्वग्रहदोषाने असे जखडले आहे की हे परलोक मानू शकत नाहीत जरी ते मानणे सर्वस्वी योग्य आहे. तसेच परलोकाच्या इन्कारावर दृढ आहेत, जरी ते सर्वस्वी अयोग्य आहे.

५) म्हणजे प्रकोपाची मागणी करीत आहेत.

अल्लाहच्या आज्ञेने त्याच्यावर देखरेख करीत आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह कोणत्याही जनसमूहाच्या स्थितीत परिवर्तन करीत नाही जोपर्यंत तो स्वत: आपल्या गुणांना बदलत नाही आणि जेव्हा अल्लाहने एखाद्या जनसमूहावर अरिष्ट आणण्याचा निर्णय घेतला तेव्हा ते कोणाच्याही टाळल्याने टळू शकत नाही, आणि अल्लाहच्या विरोधात अशा जनसमूहाचा कोणी संरक्षक व मदतगारही असू शकत नाही. (८-११)

तोच आहे जो तुमच्यासमोर विजा चमकवितो ज्यांना पाहून तुम्हाला भयही वाटू लागते आणि आशाही पल्लवतात. तोच आहे जो पाण्याने भरलेले ढग उठवितो. मेघगर्जना त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्यगान[६] करते आणि दूत त्याच्या धास्तीने थरथर कापत त्याचे पावित्र्य वर्णन करतात. तो कडकडणाऱ्या विजांना पाठवितो (आणि कित्येक वेळा) त्यांना ज्यावर इच्छितो अगदी तशा स्थितीत कोसळवितो जेव्हा लोक अल्लाहच्या बाबतीत वाद घालीत असतात. खरोखर त्याची किमया मोठी जबरदस्त आहे. (१२-१३)

त्याचाच धावा करणे सत्याधिष्ठित आहे.[७] उरले ते ज्यांचा धावा हे लोक त्याला सोडून करतात, ते त्यांच्या प्रार्थनेला काहीच प्रतिसाद देऊ शकत नाहीत. त्यांचा धावा करणे तर असे आहे जसे एखाद्या मनुष्याने पाण्याकडे हात पसरून त्याला विनंती करावी की तू माझ्या तोंडापर्यंत पोहोच. वस्तुत: पाणी त्याच्यापर्यंत पोहचणार नाही, बस्स अशाच प्रकारे अश्रद्धावंतांच्या प्रार्थनादेखील काहीच नाही परंतु एक लक्षहीन बाण. तो तर अल्लाहच आहे ज्याला आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तू स्वखुशीने वा लाचारीने नतमस्तक होत आहे.[८] आणि सर्व वस्तूंच्या सावल्या सकाळ संध्याकाळ त्याच्या समोर

६) म्हणजे मेघगर्जना हे उघड करते की ज्या ईश्वराने हे वारे वाहायला लावले, ही बाष्प निर्माण करून उठविली, हे जड ढग एकत्र केले, या विजेला वृष्टीचे साधन बनविले व अशा प्रकारे भूतलाच्या निर्मितीसाठी पाणी उपलब्ध होण्याची व्यवस्था केली, तो आपल्या चातुर्यात व सामर्थ्यात परिपूर्ण आहे. आपल्या गुणवैशिष्ट्यात, दोषमुक्त आहे. आपल्या ईशत्वात भागीदार नसलेला असा एकमेव आहे. जनावरांसमान ऐकणारे तर या मेघगर्जनांचा केवळ आवाज तेवढा ऐकतात. परंतु जे विवेकी कान बाळगतात ते मेघवाणीने एकेश्वरवादाची घोषणा ऐकतात.

७) धावा करण्याने अभिप्रेत आपल्या गरजा भागविण्यासाठी मदतीकरिता पुकारणे होय. अर्थ असा की गरजा भागविणे व संकट निवारणाचे सर्वाधिकार त्याच्याच हातात आहे. म्हणून केवळ त्याचाच धावा करणे सत्याधिष्ठित आहे.

८) 'सजदा'ने अभिप्रेत आज्ञापालनार्थ झुकणे होय. हुकमाची अंमलबजावणी आणि आज्ञा पाळण्यासाठी नतमस्तक होणे होय.



झुकतात.[९] (१४-१५)

यांना विचारा आकाश व पृथ्वीचा पालनकर्ता कोण आहे? सांगा, अल्लाह, मग यांना सांगा की जर वस्तुस्थिती अशी आहे तर तुम्ही त्याला सोडून अशा उपास्यांना आपले कार्यसाधक ठरविले आहे का जे स्वत: आपल्याकरितादेखील कसल्याही फायद्या-तोट्याचे अधिकार बाळगत नाहीत? सांगा, काय आंधळा आणि डोळस समान असतात? काय प्रकाश व अंध:कार समान असतात? आणि जर असे नाही तर काय यांनी ठरविलेल्या भागीदारांनी देखील अल्लाहसारखे काही निर्माण केले आहे की जेणेकरून यांच्यासाठी सृजनाची बाब संदिग्ध बनली आहे? सांगा, प्रत्येक वस्तूचा सृजनकर्ता केवळ अल्लाह आहे आणि तो एकमेव आहे, सर्वांवर प्रभुत्वसंपन्न! (१६)

अल्लाहने आकाशातून पाण्याचा वर्षाव केला आणि प्रत्येक नदी आणि नाला आपल्या पात्रानुसार ते घेऊन निघाला. मग जेव्हा पूर आला तेव्हा पृष्ठभागावर फेसदेखील आला, आणि असेच फेस त्या धातूवरदेखील येत असतात ज्यांना दागिने व भांडी इत्यादी बनविण्यासाठी लोक वितळवीत असतात. याच उदाहरणाद्वारे अल्लाह सत्य आणि असत्याच्या बाबींना स्पष्ट करतो. जो फेस आहे तो नाहीसा होतो आणि जी वस्तू माणसाच्या फायद्याची आहे ती पृथ्वीत स्थिरावते. अशा प्रकारे अल्लाह उदाहरणांनी आपली गोष्ट समजावितो. (१७)

ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याचे आमंत्रण स्वीकारले त्यांच्यासाठी भलाई आहे आणि ज्यांनी त्याला स्वीकारले नाही ते जर पृथ्वीच्या सर्व संपत्तीचे जरी मालक असले व तितकीच आणखी संपत्ती त्यांनी मिळविली तरी ते अल्लाहच्या पकडीतून वाचण्यासाठी ती सर्व मोबदल्यात देऊन टाकण्यास तयार होतील. हे ते लोक आहेत ज्यांच्याकडून वाईट प्रकारे हिशेब घेतला जाईल आणि यांचे ठिकाण नरक आहे, अत्यंत वाईट ठिकाण.

बरे हे कसे शक्य आहे की तो मनुष्य जो तुमच्या पालनकर्त्याच्या या ग्रंथाला जो त्याने तुम्हावर अवतरला आहे, सत्य मानतो, आणि तो मनुष्य जो या वस्तुस्थितीशी आंधळा आहे, दोघे समान आहेत? उपदेश तर बुद्धिमान लोकच स्वीकारीत असतात. आणि त्यांचे वर्तन असे असते की अल्लाहशी केलेल्या आपल्या वचनांची ते पूर्तता करतात आणि त्याची भक्कम बांधीलकीनंतर सोडून टाकत नाहीत. त्यांचे वर्तन असे असते की अल्लाहने ज्या ज्या संबंधांना कायम राखण्याची आज्ञा दिली आहे त्यांना कायम ठेवतात. आपल्या पालनकर्त्याला भितात आणि या गोष्टीचे भय बाळगतात की एखादे

९) सावलीचे सजदा करण्याने अभिप्रेत असे की वस्तूंच्या सावलीचे सकाळ संध्याकाळ पश्चिम व पूर्वेकडे पडणे, म्हणजे या सर्व वस्तू कोणाच्या तरी आज्ञाधीन व कुणाच्या तरी कायद्याला बांधील आहेत, या गोष्टीची ती खूण होय.

वेळी त्यांच्याकडून वाईट प्रकारे हिशेब घेतला जाऊ नये. त्यांची अवस्था अशी असते की आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेकरिता संयमाने वागतात, नमाज कायम करतात, आमच्या दिलेल्या उपजीविकेतून उघड व गुप्तपणे खर्च करतात आणि वाईटाला भलाईने नाहीसे करतात, परलोकाचे घर त्याच लोकांसाठी आहे. अर्थात अशी उद्याने जी त्यांची चिरकालीन निवासस्थाने असतील, ते स्वत:देखील त्यांच्यात प्रवेश करतील व त्यांचे वाडवडील व त्यांच्या पत्नीं आणि त्यांच्या संततीपैकी जे जे सदाचारी आहेत तेदेखील त्यांच्या समवेत तेथे जातील. दूत चोहोंबाजूनी त्यांच्या स्वागताकरिता येतील. आणि त्यांना सांगतील, ''तुम्हावर कृपा आहे. तुम्ही जगात ज्याप्रकारे संयम पाळला त्यामुळे आज तुम्ही याचे हक्कदार ठरला आहात.'' तर किती छान आहे हे परलोकाचे घर! उरले ते लोक जे अल्लाहच्या वचनाशी बांधीलकी पक्की केल्यानंतर तोडून टाकतात, जे त्या संबंधांना तोडतात ज्यांना अल्लाहने जोडण्याची आज्ञा दिली आहे आणि जे पृथ्वीवर उपद्रव माजवितात, ते धिक्कारास पात्र आहेत. त्यांच्यासाठी परलोकात अत्यंत वाईट ठिकाण आहे. (१८-२५)

अल्लाह ज्याला इच्छितो विपुल उपजीविका प्रदान करतो आणि ज्याला इच्छितो त्याला मोजकी उपजीविका देतो. हे लोक ऐहिक जीवनात मग्न आहेत. खरे पाहता ऐहिक जीवन परलोकाच्या तुलनेत एका अल्पशा सामुग्री व्यतिरिक्त काहीच नाही. (२६)

हे लोक ज्यांनी (मुहम्मद (स.) च्या प्रेषितत्वाला मानण्यास) नकार दिला आहे. सांगतात, ''या व्यक्तीवर याच्या पालनकर्त्याकडून एखादी निशाणी का उतरली नाही?'' सांगा, अल्लाह ज्याला इच्छितो मार्गभ्रष्ट करतो आणि तो आपल्याकडे येण्याचा मार्ग त्यालाच दाखवितो जो त्याच्याकडे रुजू होतो. असलेच लोक आहेत ते ज्यांनी (या पैगंबराचे आवाहन) मानले आहे आणि त्यांच्या हृदयांना अल्लाहच्या स्मरणाने समाधान प्राप्त होते. जाणून असा! अल्लाहचे स्मरणच ती गोष्ट आहे ज्याने हृदयाला समाधान लाभत असते. मग ज्या लोकांनी सत्य आवाहनास मानले आणि सत्कर्मे केली, ते सुदैवी आहेत आणि त्यांच्यासाठी चांगला शेवट आहे. (२७-२९)

हे पैगंबर (स.), याच वैभवाने आम्ही तुम्हाला प्रेषित बनवून पाठविले आहे[१०] एका अशा जनसमूहात ज्याच्यापूर्वी अनेक जनसमूह होऊन गेले आहेत, जेणेकरून तुम्ही या लोकांना तो संदेश ऐकवावा जो आम्ही तुमच्यावर अवतरला आहे, अशा स्थितीत की हे आपल्या अत्यंत मेहरबान अल्लाहचे द्रोही बनले आहेत. यांना सांगा की तोच माझा पालनकर्ता आहे, त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही, त्याच्यावरच मी भरोसा केला व तोच माझे आश्रयस्थान आहे. (३०)

**१०)** म्हणजे ज्याची हे लोक मागणी करीत आहेत अशा एखाद्या निशाणीविना.



आणि काय झाले असते जर एखादा असा कुरआन अवतरला गेला असता ज्याच्या शक्तीने पर्वत चालू लागले असते अथवा जमीन दुभंगली असती अथवा मृतलोक कबरीतून निघून बोलू लागले असते? (अशा प्रकारचे संकेत दाखविणे काही कठीण नाही.) किंबहुना सर्वाधिकारच अल्लाहच्या अखत्यारीत आहे.[११] मग काय श्रद्धावंत (आतापर्यंत अश्रद्धावंतांच्या मागणीच्या उत्तरात एखादा संकेत प्रकट होण्याची आशा लावून बसले आहेत आणि ते हे समजून) निराश झाले नाहीत की जर अल्लाहने इच्छिले असते तर सर्व मानवांना बोध केला असता?[१२] ज्या लोकांनी अल्लाहशी द्रोहाची वर्तणूक अवलंबिली आहे त्यांच्यावर त्यांच्या कृत्यामुळे कोणती ना कोणती आपत्ती येतच असते अथवा त्यांच्या घराजवळ एखाद्या जागी आपत्ती कोसळत असते. हा क्रम चालू राहील येथपावेतो की अल्लाहचे वचन पूर्ण होईल. नि:संशय अल्लाह आपल्या वचनाविरूद्ध जात नाही. तुमच्यापूर्वी देखील कित्येक प्रेषितांची चेष्टा केली गेली आहे. परंतु मी सदैव इन्कार करणाऱ्यांना ढील दिली आणि सरतेशेवटी त्यांना पकडले. मग पहा, माझी शिक्षा किती कठोर होती. (३१-३२)

मग काय तो जो एक एक जीवाच्या कमाईवर नजर ठेवतो (त्याच्या विरोधात हे दु:साहस केले जात आहे की) लोकांनी त्याचे काही भागीदार ठरविले आहेत? हे पैगंबर (स.) यांना सांगा (जर खरोखर ते अल्लाहने स्वत: बनविलेले भागीदार आहेत तर) जरा त्यांची नावे घ्या की ते कोण आहेत? काय तुम्ही अल्लाहला एका नव्या गोष्टीची माहिती देत आहात जिला तो आपल्या पृथ्वीत जाणत नाही? अथवा तुम्ही लोक असेच तोंडात जे काही येते ते सांगता? वस्तुस्थिती अशी आहे की ज्या लोकांनी सत्याच्या आवाहनास स्वीकारण्यास नकार दिला

**११)** म्हणजे निशाण्या न दाखविण्याचे खरे कारण असे नाही की त्या दाखविण्यासाठी अल्लाह समर्थ नाही तर अशा पद्धतींचा अवलंब करणे हे अल्लाहच्या हितकारक दृष्टीविरूद्ध आहे. कारण मूळ हेतू तर मार्गदर्शन होणे असा आहे. एखाद्या प्रेषिताचे प्रेषितत्व मानण्यास भाग पाडणे नव्हे. लोकांच्या विचार व दृष्टीत सुधारणा झाल्याशिवाय मार्गदर्शन होणे शक्य नाही.

**१२)** म्हणजे समजल्या उमजल्याविनाच एखादे अनाकलनीय ईमान हवे असते तर त्याच्यासाठी निशाण्या दाखविण्याच्या औपचारिकतेची गरजच काय होती. हे काम तर अशा पद्धतीने देखील होऊ शकत होते की सर्व मानवांना अल्लाहने ईमानधारकच निर्माण केले असते.

आहे त्यांच्याकरिता त्यांच्या कुटिलतेंना[१३] आकर्षक बनविले गेले आहे. आणि ते सरळमार्गापासून रोखले गेले आहेत, मग ज्याला अल्लाह पथभ्रष्टतेत राहू देतो त्याला कोणी मार्ग दाखविणारा नाही असल्या लोकांसाठी जगातील जीवनातच यातना आहेत आणि परलोकांतील यातना याहूनही कठोर आहेत. कोणीही असा नाही की जो त्यांना अल्लाहपासून वाचविणारा असेल, ईशपरायण माणसांसाठी ज्या स्वर्गाचे वचन दिले गेले आहे त्याचे वैभव असे आहे की त्याच्या खालून कालवे वाहत आहेत, त्याची फळे चिरंतन आहेत, आणि त्याची सावली अनश्वर. हा शेवट आहे पापभीरु लोकांचा आणि सत्याचा इन्कार करणाऱ्यांचा शेवट असा आहे की त्याच्याकरिता नरकाग्नी आहे.

(३३-३५)

हे पैगंबर (स.)! ज्या लोकांना आम्ही पूर्वी ग्रंथ दिला होता ते या ग्रंथावर जो आम्ही तुमच्यावर अवतरला आहे, खुश आहेत आणि विविध गटांत काही लोक असेदेखील आहेत जे या ग्रंथाच्या काही गोष्टी मानत नाहीत. तुम्ही स्पष्टपणे सांगून टाका की, ''मला तर केवळ अल्लाहच्या भक्तीची आज्ञा दिली गेली आहे आणि यापासून मनाई केली गेली आहे की एखाद्याला त्याच्याबरोबर मी भागीदार ठरवावे, म्हणून मी त्याच्याकडे निमंत्रित करीत आहे आणि त्याच्याकडे मी रूजू होत आहे.'' याच आदेशानिशी आम्ही हे अरबी फर्मान तुमच्यावर अवतरले आहे. आता जे ज्ञान तुमच्यापाशी आलेले आहे ते असतानादेखील तुम्ही जर लोकांच्या इच्छेच्या मागे चाललात तर अल्लाहविरूद्ध तुमचा कोणी संरक्षक व मदतगारही नाही व त्याच्या पकडीतून तुम्हाला कोणी वाचवूही शकत नाही. (३६-३७)

तुमच्यापूर्वीदेखील आम्ही अनेक पैगंबर पाठविले आहेत आणि त्यांना आम्ही पत्नी व मुलेबाळे असलेलेच बनविले होते.[१४] आणि कोणत्याही पैगंबराचे हे सामर्थ्य नव्हते की

**१३)** या अनेकेश्वरवादाला कुटिलता म्हणण्याचे कारण असे की वास्तविकत: ज्या ग्रह व ताऱ्यांना अथवा फरिश्त्यांना अथवा आत्मे व महापुरुषांना ईश्वरी गुण व अधिकार बाळगणारे ठरविले गेले आहे व ज्यांना ईश्वराच्या विशिष्ट हक्कात भागीदार मानले गेले आहे, त्यापैकी कोणीही कधीदेखील या गुणांचा दावा केला नाही की त्या हक्कांची मागणी केली नाही. तसेच आमच्यासमोर पूजा आराधनेच्या विधी पार पाडा म्हणजे आम्ही तुमची कामे करू अशी शिकवणही त्यांनी लोकांना दिलेली नाही. हे तर चाणक्ष माणसांचे काम आहे की त्यांनी लोकांवर आपल्या ईशत्वाचा जम बसविण्यासाठी व त्यांच्या कमाईतून आपला वाटा उपटण्यासाठी काही बनावटी देव घडविले, लोकांना त्यांचे भाविक बनविले व आपल्या स्वत:ला कोणत्या ना कोणत्या प्रकारे त्यांचा प्रतिनिधी ठरवून आपले स्वार्थ साधणे सुरू केले.

**१४)** पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर जो आक्षेप घेतला जात असे त्याचे हे एक उत्तर आहे. ते म्हणत असत की हा चांगला पैगंबर आहे जो पत्नी व मुले बाळगतो. बरे प्रेषितांचादेखील मनोवासनांशी संबंध असू शकतो, वास्तविकपणे कुरैश लोक स्वत:च हजरत इब्राहीम (अ.) व हजरत इस्माईल (अ.) यांचे वंशज असण्याचा अभिमान बाळगत असत.



अल्लाहच्या आज्ञेशिवाय एखादा संकेत त्याने स्वत:च आणून दाखविला असता. प्रत्येक युगासाठी एक ग्रंथ आहे अल्लाह ज्याला इच्छितो त्याला नष्ट करतो आणि ज्या गोष्टीला इच्छितो तिला कायम ठेवतो. उम्मुलकिताब (मूल ग्रंथ) त्याच्यापाशीच आहे.[१५]

(३८-३९)

आणि हे पैगंबर (स.), ज्या वाईट शेवटाची धमकी आम्ही या लोकांना देत आहोत मग याचा काही भाग आम्ही तुमच्या जिवंतपणीच दाखवू किंवा तो प्रत्यक्षात येण्यापूर्वीच आम्ही तुम्हाला उचलून घेवू. कोणत्याही परिस्थितीत तुमचे काम फक्त संदेश पोहचविणेच होय आणि हिशेब घेणे आमचे काम होय. हे लोक पाहात नाहीत की आम्ही या भूमीवर चालून येत आहोत आणि हिचे वेटोळे सर्व बाजूंनी आवळत येत आहोत?[१६] अल्लाह राज्य करीत आहे, कोणी त्याच्या निर्णयावर पुनर्दृष्टी करणारा नाही आणि त्याला हिशेब घेण्यास काही विलंब लागत नाही. यांच्यापूर्वी जे लोक होऊन गेले आहेत त्यांनीदेखील मोठमोठाले डावपेच लढविले होते, परंतु खरा निर्णय तर पूर्णपणे अल्लाहच्याच हातात आहे. तो जाणतो की कोण काय कमवीत आहे, आणि लवकरच हे सत्याचा इन्कार करणारे पाहतील की कोणाचा शेवट चांगला होतो. (४०-४२)

हे इन्कार करणारे म्हणतात की तुम्हाला अल्लाहकडून पाठविलेले नाही, सांगा, ''माझ्या व तुमच्या दरम्यान अल्लाहची ग्वाही पुरेशी आहे तसेच त्या व्यक्तीची साक्ष ज्याला ग्रंथाचे ज्ञान आहे.'' (४३)

**१५)** 'उम्मुलकिताब'चा अर्थ मूळ ग्रंथ असा होतो. म्हणजे ज्याच्यातून सर्व दैवी ग्रंथ निघाले आहेत ते उगमस्थान व मूळस्रोत.

**१६)** म्हणजे काय तुमच्या विरोधकांना दिसून येत नाही की इस्लामचा प्रभाव अरब भूमीच्या कानाकोपऱ्यापर्यंत पसरला जात आहे आणि चोहिबाजूंनी या लोकांभोवती वेटाळे आवळत जात आहे? ही त्यांच्यावरील अरिष्टांची लक्षणे नाहीत तर काय आहे? सर्वोच्च अल्लाहचे असे फर्माविणे ''आम्ही या भूतलावर चालून येत आहोत'' एक अत्यंत मार्मिक वर्णनशैली आहे. सत्याचे आवाहन अल्लाहतर्फे असते, अल्लाह ते प्रस्तुत करणाऱ्या लोकांसमवेत असतो. म्हणून एखादा भूतलावर या आवाहनाचा प्रसार होणे याला सर्वश्रेष्ठ अल्लाह असे संबोधिले की आम्ही स्वत: त्या भूमीवर चालून येत आहोत.

# १४ सूरह इब्राहीम

*(मक्काकालीन, वचने ५२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ, लाऽऽम, रा. हे मुहम्मद (स.), हा एक ग्रंथ आहे जो आम्ही तुमच्याकडे अवतरला आहे जेणेकरून तुम्ही लोकांना अंधारातून काढून प्रकाशाकडे नेण्यासाठीच हा ग्रंथ आम्ही तुमच्यावर अवतीर्ण केला. त्यांच्या पालनकर्त्याच्या परवानगीने त्या ईश्वराच्या मार्गावर (आणावे) जो स्वयंभू[१] स्तुतीपात्र आहे. आणि पृथ्वी व आकाशातील सर्व चराचराचा स्वामी आहे. (१)

आणि अत्यंत कठोर शिक्षा आहे सत्य स्वीकारण्यास नकार देणाऱ्याकरिता जे ऐहिक जीवनाला पारलौकिक जीवनावर प्राधान्य देतात, जे अल्लाहच्या मार्गापासून लोकांना रोखत आहेत आणि इच्छितात की हा मार्ग (त्यांच्या इच्छेनुसार) वक्र व्हावा. हे लोक पथभ्रष्टतेत फार दूर गेलेले आहेत. (२-३)

आम्ही आपला संदेश देण्यासाठी जेव्हा कधी एखादा प्रेषित पाठविला आहे, त्याने आपल्या लोकांच्याच भाषेत संदेश दिला आहे जेणेकरून त्याने त्यांना चांगले स्पष्ट करून आपले म्हणणे मांडावे. मग अल्लाह ज्याला इच्छितो मार्गभ्रष्ट करतो आणि ज्याला इच्छितो सन्मार्ग दाखवितो, तो प्रभुत्वसंपन्न व बुद्धिमान आहे. (४)

आम्ही यापूर्वी मूसा (अ.) ला देखील आपल्या संकेतांसहीत पाठविले आहे. त्यालाही आम्ही आज्ञा दिली होती की आपल्या लोकांना अंधःकारातून प्रकाशात आण. आणि त्यांना अल्लाहच्या ऐतिहासिक बोधप्रद[२] घटना ऐकवून उपदेश दे. या घटनांमध्ये मोठे संकेत आहेत त्या प्रत्येक माणसासाठी जो संयम बाळगणारा व कृतज्ञ होणारा

१) 'हमीद' हा अरबी शब्द 'महमूद' या शब्दाचाच समानार्थी असला तरी या दोन्ही शब्दात एक सूक्ष्म फरक आहे. एखाद्या माणसाला 'महमूद' त्याच वेळी म्हणता येईल जेव्हा त्याची स्तुती केली गेली असेल अथवा केली जात असेल. परंतु 'हमीद' स्वयंभू स्तुतीस पात्र आहे, मग कोणी त्याची स्तुती करो वा न करो.

२) 'ऐय्याम' हा शब्द अरबी भाषेत स्मरणीय ऐतिहासिक घटनांसाठी पारिभाषिक शब्द म्हणून बोलला जातो. 'ऐय्यामिल्लाह'ने अभिप्रेत, सर्वोच्च अल्लाहने गतकाळातील राष्ट्रांना किंवा मोठमोठ्या व्यक्तींना त्यांच्या कृत्यानुसार मोबदला किंवा शिक्षा दिली आहे अशा मानवी इतिहासाच्या महत्वाच्या बाबी होय.



असेल.[३] (५)

स्मरण करा जेव्हा मूसा (अ.) ने आपल्या लोकांना सांगितले, ''अल्लाहच्या त्या उपकाराचे स्मरण ठेवा जे त्याने तुम्हावर केलेले आहे. त्याने तुम्हाला फिरऔन समर्थकांपासून सोडविले जे तुम्हाला कठोर यातना देत होते, ते तुमच्या मुलांची हत्या करीत असत आणि तुमच्या मुलींना जिवंत ठेवीत असत, यात तुमच्या पालनकर्त्याकडून तुमची मोठी परीक्षा होती. आणि स्मरण ठेवा, तुमच्या पालनकर्त्याने सावध केले होते की जर कृतज्ञ बनाल तर मी तुम्हाला आणखी जास्त उपकृत करीन आणि जर कृतघ्नता दर्शवाल तर माझी शिक्षा फारच कठोर आहे.'' आणि मूसा (अ.) ने सांगितले, ''जर तुम्ही द्रोह केला आणि सर्व पृथ्वीवासी देखील द्रोही झाले तरी (देखील) अल्लाह निरपेक्ष आणि आपल्या अस्तित्वात स्वयंभू स्तुतीपात्र आहे.'' (६-८)

तुम्हां[४] पर्यंत त्या जनसमूहांच्या हकीगती पोहचल्या नाहीत काय जे तुम्हापूर्वी होऊन गेले आहेत? नूह (अ.) चे लोक, आद, समूद आणि त्यांच्यानंतर येणारे कित्येक जनसमूह ज्यांची संख्या केवळ अल्लाहलाच माहीत आहे? त्यांचे पैगंबर जेव्हा त्यांच्यापाशी स्पष्ट गोष्टी व उघड उघड निशाण्या घेऊन आले तेव्हा त्यांनी आपल्या तोंडात हात दाबले[५] आणि सांगितले की, ''ज्या संदेशानिशी तुम्ही पाठविला गेला आहात, आम्ही तो मानत नाही आणि ज्या गोष्टीचे तुम्ही आम्हाला आमंत्रण देता त्यासंबंधी आम्ही अत्यंत संभ्रमात आहोत.'' त्यांच्या पैगंबरांनी सांगितले, ''काय अल्लाहच्या बाबतीत शंका आहे जो आकाशांचा व पृथ्वीचा निर्माता आहे? तो तुम्हाला आवाहन करीत आहे की तुमचे अपराध माफ करावेत व तुम्हाला एका निश्चित कालावधीपर्यंत मोकळीक द्यावी.'' त्यांनी उत्तर दिले, ''तुम्ही आमच्या सारखेच माणसं आहात; त्यापेक्षा वेगळे काही नाही तुम्ही आम्हाला त्या विभूतीच्या भक्तीपासून रोखू इच्छिता ज्यांची भक्ती पूर्वजांपासून होत आली आहे. बरे, तर आणा एखादे सुस्पष्ट प्रमाण.'' त्यांच्या पैगंबरांनी त्यांना सांगितले, ''खरोखरच आम्ही काहीच नाही परंतु तुमच्याचसारखे मानव. परंतु अल्लाह आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो त्याला उपकृत

३) म्हणजे या निशाण्या तर आपल्या जागी अस्तित्वात आहेत परंतु त्यांच्यापासून लाभ घेणे केवळ त्याच लोकांचे काम आहे जे अल्लाहच्या परीक्षेतून संयम आणि धैर्याने पार होणारे, आणि अल्लाहच्या देणग्यांची यथायोग्य प्रकारे जाणीव ठेवून त्यासाठी योग्य प्रकारे कृतज्ञता व्यक्त करणारे असावेत.

४) हजरत मूसा (अ.) यांचे भाषण वरती संपले. आता प्रत्यक्ष मक्केच्या काफिरांना संबोधन करण्यास सुरूवात होत आहे.

५) ही वर्णनशैली त्याच प्रकारची आहे जसे आपण आपल्या भाषेत म्हणतो, 'कानावर हात ठेवणे', अथवा 'तोंडांत बोट घालणे'.

करतो, आणि हे आमच्या अखत्यारीत नाही की तुम्हाला एखादे प्रमाण आणून द्यावे. प्रमाण तर अल्लाहच्याच आज्ञेने येऊ शकते आणि अल्लाहवरच श्रद्धावंतांनी विश्वास ठेवला पाहिजे. आणि आम्ही अल्लाहवर का विश्वास ठेऊ नये ज्याने आमच्या जीवन-मार्गात मार्गदर्शन केले आहे? ज्या यातना तुम्ही लोक आम्हाला देत आहात त्यावर आम्ही संयम बाळगू आणि विश्वास ठेवणाऱ्यांचा विश्वास अल्लाहवरच असला पाहिजे.''

(९-१२)

सरतेशेवटी इन्कार करणाऱ्यांनी आपल्या पैगंबरांना सांगून टाकले की, ''एक तर तुम्हाला आमच्या संप्रदायात परत[६] यावे लागेल अन्यथा आम्ही तुम्हाला आपल्या देशांतून हुसकावून देऊ.'' तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्याकडे दिव्य प्रकटन केले, ''आम्ही या अत्याचाऱ्यांना नष्ट करून टाकू. आणि त्यांच्यानंतर तुमचे भूतलावर पुनर्वसन करू. हे इनाम आहे त्याच्यासाठी जो माझ्या ठायी उत्तरदायी होण्याचे भय बाळगतो आणि माझ्या इशाऱ्याला भितो.'' त्यांना निर्णय हवा होता (तर असा त्यांचा निकाल लागला) आणि सत्याचा प्रत्येक उन्मत शत्रू तोंडघशी पडला. यानंतर त्यांच्यासाठी नरक आहे. जेथे त्याला रक्त पू सारखे द्रव पिण्यास दिले जातील, ज्याला तो जबरदस्तीने घशाखाली उतरविण्याचा प्रयत्न करील आणि मोठ्या कष्टाने उतरवू शकेल. मृत्यू त्याच्यावर सर्व बाजूंनी आच्छादित राहील परंतु तो मरू शकणार नाही व पुढे एक कठोर यातना त्याच्या जिवाशी लागून राहील. (१३-१७)

ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याशी द्रोह केला आहे, त्यांच्या कृत्याचे उदाहरण त्या राखेप्रमाणे आहे जिला एका वादळी दिवसाच्या वावटळीने, उडविले असावे. त्यांनी केलेल्या कृत्यांचे त्यांना काहीही फळ मिळू शकणार नाही, हेच परकोटीचे हरविणे होय. तुम्ही पाहत नाही काय अल्लाहने आकाश व पृथ्वीची निर्मिती सत्याधिष्ठित केली आहे? त्याने इच्छिले तर तो तुम्हा लोकांना घेऊन जाईल आणि तुमच्या जागी नवनिर्मिती करील. असे करणे त्याच्यासाठी काहीच कठीण नाही. (१८-२०)

आणि हे लोक जेव्हा एकाचवेळी अल्लाहसमोर उघडे पडतील तर त्यावेळी

**६)** याचा अर्थ असा नव्हे की प्रेषितजन (अ.) आपल्या पदावर नियुक्त होण्यापूर्वी आपल्या पथभ्रष्ट संप्रदायात सामील होत असत, तर याचा अर्थ असा की प्रेषितत्वाअगोदर ते एका प्रकारचे स्तब्ध जीवन जगत असल्याचे कारणाने एखाद्या धर्माचा प्रचार किंवा प्रचलित धर्माचे खंडन करीत नसत. म्हणून ते आमच्याच संप्रदायात आहेत असेच त्यांच्या लोकसमूहाला वाटत असे व प्रेषितत्वाचे कार्य सुरू केल्यानंतर, ते वडिलोपार्जित संप्रदायातून बाहेर पडले आहेत असा आरोप त्यांच्यावर केला जात असे. वास्तविकपणे प्रेषित होण्याअगोदर कधी ते अनेकेश्वरवादी संप्रदायात सामील झाले नव्हते की त्यातून बाहेर पडण्याचा आरोप त्यांच्यावर केला जाऊ शकावा.



त्यांच्यापैकी जे दुनियेत निर्बल होते ते बलवानांना सांगतील, ''दुनियेत आम्ही तुमच्या आज्ञेत होतो, आताही तुम्ही अल्लाहच्या प्रकोपापासून आम्हाला वाचविण्यासाठी काही करू शकता काय?'' ते उत्तर देतील, ''जर अल्लाहने आम्हाला मुक्तीचा एखादा मार्ग दाखविला असता तर आम्हीदेखील जरूर तुम्हाला दाखविला असता. आक्रोश करणे किंवा धैर्य दाखवणे सर्वकाही सारखेच आहे, कोणत्याही परिस्थितीत आमच्या वाचण्याचा मार्ग नाही.'' (२१)

आणि जेव्हा निकाल दिला जाईल तेव्हा शैतान म्हणेल, ''खरे असे आहे की अल्लाहने तुम्हाला जी वचने दिली होती ती सर्व खरी होती आणि मी जितकी वचने दिली त्यापैकी कोणतेही पूर्ण केले नाही. माझा तुमच्यावर काही जोर तर नव्हता. मी याशिवाय काहीच केले नाही की आपल्या मार्गाकडे तुम्हाला आमंत्रित केले व तुम्ही माझ्या हाकेला ओ दिली. आता माझी निर्भर्त्सना करू नका, आपल्या स्वत:चीच निर्भर्त्सना करा. येथे तर न मी तुमची दाद लावू शकतो व न तुम्ही माझी, यापूर्वी जो तुम्ही मला देवत्वात भागीदार बनविले होते.[७] मी त्या जबाबदारीतून मुक्त आहे, अशा अत्याचाऱ्यांसाठी तर दु:खदायक शिक्षा निश्चित आहे.'' (२२)

याउलट ज्या लोकांनी जगात श्रद्धा ठेवली आहे आणि ज्यांनी सदाचरण केले आहे, ते अशा बागेत दाखल केले जातील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील. तेथे ते आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने सदैव राहतील, आणि तेथे त्यांचे स्वागत सलामतीच्या अभिनंदनाने होईल. तुम्ही पाहत नाही काय की अल्लाहने 'पवित्र वचना'ला कशाची उपमा दिली आहे? त्याची उपमा अशी आहे जणू एका चांगल्या जातीचा वृक्ष ज्याचे मूळ जमिनीत खोलवर रुजले आहे आणि फांद्या आकाशाला भिडल्या आहेत, प्रत्येक क्षणी ते आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने फळे देत आहे. ही उदाहरणे अल्लाह याकरिता देत आहे की लोकांनी यापासून बोध घ्यावा. आणि दुर्वचनाची उपमा एका हलक्या प्रतीच्या झाडासारखी आहे जे जमिनीच्या पृष्ठावरून उपटून फेकले जाते, त्यांच्यासाठी कसलीच दृढता नाही. श्रद्धावंतांना अल्लाह एका दृढ वचनाच्या आधारावर इहलोक व परलोक दोहोंमध्ये स्थैर्य प्रदान करतो आणि अत्याचाऱ्यांना अल्लाह पथभ्रष्ट करतो, अल्लाहला अधिकार आहे जे हवे ते करतो. (२३-२७)

तुम्ही पाहिले त्या लोकांना ज्यांना अल्लाहची देणगी लाभली आणि तिला त्यांनी कृतघ्नतेने बदलून टाकले (आणि आपल्या सोबत) आपल्या लोक समूहाला सुद्धा

**७)** शैतानाला, श्रद्धा म्हणून तर कोणीही ईशत्वात भागीदार ठरवीत नाही व त्याची पूजाही करीत नाही हे अगदी उघड आहे. उलट सर्व त्याचा धिक्कारच करतात तथापि त्याचे आज्ञापालन व गुलामी आणि त्याच्या पद्धतीचे अंधानुकरण जरूर केले जात आहे, यालाच या ठिकाणी 'अनेकेश्वरवाद' या शब्दाने संबोधिले गेले आहे.

विनाशाच्या खाईत झोकून दिले अर्थात नरक ज्यात ते होरपळले जातील आणि ते अत्यंत वाईट ठिकाण आहे. आणि अल्लाहच्या काही समकक्ष (दावेदारांनी) तजवीज केले आहे की, त्यांना अल्लाहच्या मार्गापासून पथभ्रष्ट करावे. यांना सांगा, बरे तर, मौज करा, सरतेशेवटी तुम्हाला परत नरकातच जावयाचे आहे. (२८-३०)

हे पैगंबर (स.), माझ्या ज्या दासांनी श्रद्धा ठेवली आहे त्यांना सांगा की नमाज कायम करावी आणि जे काही आम्ही त्यांना दिले आहे त्याच्यातून जाहीर आणि गुप्तपणे (सन्मार्गात) खर्च करावे तो दिवस येण्यापूर्वी ज्यात खरेदी-विक्रीही होणार नाही आणि मित्रत्वाचा व्यवहारही होणार नाही. (३१)

अल्लाह तोच तर आहे ज्याने पृथ्वी व आकाशांना निर्माण केले आणि आकाशातून जल वर्षाव केला मग त्याच्याद्वारे तुम्हाला उपजीविका उपलब्ध करून देण्यासाठी विविध प्रकारची फळे निर्माण केली. ज्याने नावेला तुमच्यासाठी अंकीत केले की समुद्रात त्याच्या आज्ञेने चालावे आणि नद्यांना तुमच्यासाठी वशीभूत केले ज्याने सूर्य आणि चंद्राला तुमच्यासाठी वशीभूत केले की सतत ते वाटचाल करीत आहेत आणि रात्र आणि दिवसाला तुमच्यासाठी वशीभूत केले.[८] त्याने ते सर्वकाही दिले जे तुम्ही मागितले.[९] जर तुम्ही अल्लाहच्या देणगीची गणना करू पहाल तर करू शकणार नाही. वस्तुस्थिती अशी आहे की मनुष्य मोठाच अन्यायी आणि कृतघ्न आहे. (३२-३४)

आठवा ती वेळ जेव्हा इब्राहीम (अ.) ने प्रार्थना केली होती, ''हे पालनकर्ता! या नगराला (मक्क्याला) शांतीचे नगर बनव आणि मला व माझ्या संततीला मूर्तीपूजेपासून वाचव. हे पालनकर्ता! या मूर्तींनी बहुतेकांना पथभ्रष्टतेत टाकले आहे (संभव आहे की माझ्या संततीलादेखील त्या पथभ्रष्ट करतील, म्हणून त्यांच्यापैकी) जो माझ्या पद्धतीवर चालेल तो माझा आहे आणि जो माझ्याविरूद्ध पद्धत स्वीकारील तर निश्चितच तू माफ करणारा मेहरबान आहेस. हे पालनकर्ता! मी एका निर्जल व ओसाड खोऱ्यात आपल्या संततीपैकी काहींना तुझ्या आदरणीय घराजवळ आणून वसविले आहे, हे पानलकर्ता!

---

८) 'तुमच्याकरिता वशीभूत केले' याचा सर्व सामान्यपणे लोक 'तुमच्या आज्ञांकित केले' असा अर्थ घेतात व मग या आशयाच्या आयतीचे मोठे विचित्र अर्थ लावू लागतात इथपावेतो की पृथ्वी व आकाशांना वशीभूत करणे हेच मानवाचे अंतिम ध्येय आहे, असेच काही लोक समजून बसले. वास्तविकपणे मानवाकरिता या वस्तू वशीभूत करण्याचा अर्थ याशिवाय काहीच नाही की सर्वोच्च अल्लाहने यांना अशा नियमात बद्ध करून ठेवले आहे जेणेकरून मानवाकरिता या वस्तू लाभदायक बनविल्या गेल्या आहेत.

९) म्हणजे तुमच्या प्रकृतीच्या सर्व मागण्या पूर्ण केल्या, जे काही तुमच्या जीवनासाठी अपेक्षित होते ते उपलब्ध केले, तुमच्या अस्तित्वासाठी व तुमच्या विकासासाठी ज्या साधनसामग्रीची गरज होती, सर्व उपलब्ध केली.



असे मी अशासाठी केले आहे की या लोकांनी येथे नमाज कायम करावी, म्हणून तू लोकांच्या हृदयांना यांच्याकडे आकर्षित कर व यांना खावयास फळे दे, कदाचित हे कृतज्ञ होतील. पालनकर्ता! तू जाणतोस जे काही आम्ही लपवितो आणि जे काही प्रकट करतो.'' आणि खरोखरच अल्लाहपासून काहीही लपलेले नाही, जमिनीतही नाही आणि आकाशातही नाही ''धन्यवाद त्या ईश्वराला ज्याने मला या वार्धक्यात इस्माईल (अ.) आणि इसहाक (अ.) सारखी मुले दिली, वस्तुस्थिती अशी आहे की माझा पालनकर्ता खचितच प्रार्थना ऐकतो. हे पालनकर्त्या! मला नमाज कायम करणारा बनव व माझ्या संततीपासूनदेखील (असे लोक उभे कर जे हे काम करतील) पालनकर्त्या! माझी प्रार्थना स्वीकार कर, हे पालनकर्त्या! मला आणि माझ्या आई-वडिलांना[१०] आणि सर्व श्रद्धावंतांना त्या दिवशी माफ कर जेव्हा हिशेब प्रस्थापित होईल.'' (३५-४१)

आता हे अत्याचारी लोक जे काही करीत आहेत अल्लाहला त्यापासून तुम्ही बेसावध समजू नका. अल्लाह तर त्यांना टाळीत आहे, त्या दिवसासाठी जेव्हा अवस्था अशी असेल की डोळे विस्फारले ते विस्फारलेलेच राहतील. डोळे वर लावून पळत सुटले असतील. नजरा वर खिळलेल्या आणि हृदये उडली जात असतील. हे पैगंबर (स.), त्या दिवसाचे यांना भय दाखवा जेव्हा प्रकोप यांना येऊन गाठील. त्यावेळी हे अत्याचारी सांगतील, ''हे आमच्या पालनकर्ता! आम्हाला आणखी थोडी सवलत दे, आम्ही तुझ्या आवाहनास होकार देऊ आणि पैगंबरांचे अनुकरण करू.'' (पण यांना स्पष्ट उत्तर दिले जाईल की) ''तुम्ही तेच लोक नाहीत काय जे यापूर्वी शपथा घेऊन घेऊन सांगत होते की आमचा तर कधी ऱ्हास होणारच नाही? वास्तविकत: तुम्ही त्या लोकांच्या वस्तीत वास्तव्य करून चुकला होता ज्यांनी स्वत:च आपल्यावर अत्याचार केला होता आणि पाहिले होते की आम्ही त्यांच्याशी कसा व्यवहार केला आणि त्यांची उदाहरणे देऊन तुम्हाला आम्ही समजाविलेदेखील होते त्यांनी आपली सर्व कटकारस्थाने करून पाहिली पण त्यांच्या प्रत्येक कारस्थानाला अल्लाहपाशी उत्तर होते त्यांची कारस्थाने इतकी भयंकर होती की पर्वतही मागे सरावेत'' (४२-४६)

तर हे पैगंबर (स.), तुम्ही कदापि असा समज करून घेऊ नका की अल्लाह कधी आपल्या पैगंबरांना दिलेल्या वचनांच्याविरूद्ध वागेल. अल्लाह महान आहे आणि शिक्षाही करणारा आहे. सावध करा यांना त्या दिवसापासून जेव्हा पृथ्वी व आकाशाचे मूळ रूप

---

१०) हजरत इब्राहीम (अ.) यांनी सदरहू क्षमेच्या प्रार्थनेत आपल्या पित्याला त्या वचनासाठी सामील केले होते जे त्यांनी स्वदेशत्याग करतेवेळी दिले होते. 'तुझ्यासाठी माझ्या रबकडे मी क्षमायाचना करीन' (सूरह मर्यम, आयत क्र. ४७) परंतु तो तर अल्लाहचा शत्रू होता याची जेव्हा त्यांना जाणीव झाली तेव्हा त्यापासून त्यांनी स्वच्छपणे जबाबदारीतून मुक्त असण्याचे जाहीर केले. (सूरह तौबा, आयत क्र. ११४)

बदलले जाईल,[११] आणि सर्वच्या सर्व एकमेव महान शक्तिमान अल्लाहसमोर उघडे पडून हजर होतील. त्या दिवशी तुम्ही अपराध्यांना पाहाल की साखळदंडाने हातपाय जखडलेले असतील, वितळलेल्या शिशाचा पोषाख केलेला असेल आणि आगीच्या ज्वाला त्यांच्या चेहऱ्यावर आच्छादल्या जात असतील. हे अशासाठी घडेल की अल्लाहने प्रत्येक जीवाला त्याने केलेल्या कृत्यांचा बदला द्यावा. अल्लाहला हिशेब घेण्यास काही वेळ लागत नाही. (४७-५१)

हा एक संदेश आहे सर्व मानवांसाठी आणि हा पाठविला गेला आहे यासाठी की त्यांना याच्याद्वारे सावध केले जावे आणि त्यांनी जाणावे की वस्तुत: ईश्वर केवळ एकच आहे आणि जे बुद्धिमान आहेत त्यांनी (यावर) चिंतन करावे. (५२)

**११)** या आयतीने व कुरआनच्या इतर संकेताद्वारे असे कळते की कियामतमध्ये पृथ्वी व आकाश पूर्णपणे नेस्तनाबूद होतील असे नाही तर केवळ विद्यमान नैसर्गिक व्यवस्था अस्ताव्यस्त केली जाईल. त्यानंतर शिंग फुकले जाईल. पहिल्या आणि शेवटच्या फुंकरी दरम्यानच्या एका विशिष्ट मुदतीत, जी सर्वोच्च अल्लाहच जाणतो, पृथ्वी व आकाशांचे विद्यमान रूप बदलले जाईल व एक वेगळीच व्यवस्था दुसऱ्या नैसर्गिक नियमानिशी उभारली जाईल. तेच परलोक असेल. मग शिंगाच्या शेवटच्या फुंकरी बरोबरच, प्रथम मानव-आदमच्या निर्मितीपासून ते कयामतपर्यंत जितके मानव निर्माण झाले होते ते पुन्हा जिवंत केले जातील व सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरात सादर होतील. कुरआनच्या शब्दात याचेच नाव 'हश्र' असे आहे. ज्याचा शाब्दिक अर्थ एकत्र करणे किंवा गोळा करणे असा होतो.



# १५ सूरह अल्‌हिज्र

*(मक्काकालीन, वचने ९९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ, लाऽऽम, रा. ही वचने आहेत ईश्वरी ग्रंथाची व स्पष्ट कुरआनची.[१] (१)

दुरापास्त नाही, जेव्हा ते लोक ज्यांनी आज (इस्लामचे आवाहन स्वीकारण्यास) इन्कार केला आहे, पश्चात्ताप करून सांगतील की, आम्ही इस्लामचा स्वीकार केला असता तर बरे झाले असते! सोडा यांना, खाऊ-पिऊ द्या, मौज-मजा करू द्या आणि खोट्या आशेच्या संभ्रमात राहू द्या, लवकरच यांना कळून चुकेल. आम्ही यापूर्वी ज्या कोणा वस्तीला नष्ट केले आहे तिच्यासाठी एक विशिष्ट कार्यकालावधी लिहिली गेली होती. कोणताही जनसमूह आपल्या निश्चित वेळेपूर्वी नष्टही होऊ शकत नाही आणि त्यानंतर सुटूही शकत नाही. (२-५)

हे लोक म्हणतात, "हे अशा माणसा, ज्यावर हे स्मरण[२] अवतरले[३] आहे तू खचितच वेडा आहेस. जर तू खरा आहेस तर आम्हासमोर दूतांना घेऊन का येत नाहीस?" आम्ही दूतांना असेच अवतरीत नसतो. ते जेव्हा अवतरतात तेव्हा सत्यानिशी अवतरतात आणि मग लोकांना सवड दिली जात नाही.[४] उरले हे स्मरण, तर हे आम्ही अवतरले आहे आणि आम्ही स्वत: याचे संरक्षक आहोत. (६-९)

**१)** कुरआनसाठी 'मुबीन' (स्पष्ट) हा अरबी शब्द विशेषण म्हणून प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ असा की जो आपला उद्देश अगदी स्पष्टपणे व्यक्त करतो अशा त्या कुरआनच्या या आयती आहेत.

**२)** 'जिक्र' (स्मरण) हा शब्द कुरआनात ईश्वरी वाणीसाठी पारिभाषिक शब्द म्हणून प्रयुक्त झाला आहे. ईश्वरीवाणी सर्वस्वी उपदेश म्हणून येते. पूर्वी जितकेही ग्रंथ प्रेषितांवर उतरले होते ते सर्वच 'जिक्र' होते आणि हा कुरआनदेखील 'जिक्र' आहे. 'जिक्र'चा मूळ अर्थ 'आठवण करून देणे, सावध करणे, आणि उपदेश देणे' असा होतो.

**३)** हे वाक्य ते लोक टोमणा म्हणून बोलत असत. हा जिक्र पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर उतरला आहे हे तर त्यांना मान्यच नव्हते. तसे मान्य केल्यानंतर ते पैगंबर (स.) याना वेडा म्हणू शकत नव्हते. वास्तविकपणे त्यांच्या बोलण्याचा अर्थ 'तो माणूस आहे ज्याचा दावा असा आहे की माझ्यावर जिक्र उतरला आहे'; असा आहे.

**४)** म्हणजे फरिश्ते केवळ तमाशा दाखविण्यासाठी उतरविले जात नाही की, जेव्हा एखाद्या राष्ट्राने सांगितले की बोलवा फरिश्त्यांना तर ते लगेच हजर व्हावेत. फरिश्ते पाठविण्याची वेळ तर ती शेवटची वेळ असते जेव्हा एखाद्या राष्ट्राचा निकाल लावण्याचे ठरविले जाते. 'सत्यानिशी उतरतात' म्हणजे सत्य घेऊन उतरणे होय. अर्थात ते अल्लाहचा सत्याधिष्ठित निर्णय घेऊन येतात व तो अंमलात आणल्याशिवाय राहात नाहीत.

हे पैगंबर (स.), आम्ही तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या बऱ्याचशा जनसमूहात प्रेषित पाठविले आहेत. कधी असे घडले नाही की त्यांच्याजवळ एखादा प्रेषित आला आणि त्यांनी त्याची चेष्टा उडविली नाही. अपराध्यांच्या हृदयांत तर आम्ही या स्मरणाला अशाच प्रकारे (कांबीप्रमाणे) आरपार करतो.[5] ते यावर श्रद्धा ठेवीत नसतात. अशा प्रवृत्तीच्या लोकांची हीच पद्धत पूर्वापार आली आहे. जर आम्ही त्यांच्यावर आकाशाचे एखादे दार उघडले असते, आणि ते दिवसाढवळ्या आकाश रोहण करू लागले असते, तरीदेखील त्यांनी हेच सांगितले असते की आमच्या डोळ्यांची फसगत होत आहे किंबहुना आमच्यावर जादू केली गेली आहे. (१०-१५)

ही आमची किमया आहे की आकाशात आम्ही बरेचशे मजबूत गड बनविले,[6] ते पाहणाऱ्यांसाठी (ताऱ्यांनी) सुशोभित केले. आणि प्रत्येक धि:कारित शैतानापासून त्यांना सुरक्षित केले. कोणताही शैतान त्यात मार्ग प्राप्त करू शकत नाही याखेरीज की त्याने काही कानोसा घ्यावा[7] आणि जेव्हा तो कानोसा घेण्याचा प्रयत्न करतो तेव्हा एक प्रदीप्त

५) मुळात 'नसलुकुहू' हा अरबी शब्द प्रयुक्त झाला आहे, 'सलक'चा अर्थ अरबी भाषेत एखाद्या वस्तूला दुसऱ्या वस्तूत प्रविष्ट करणे, पार करणे आणि ओवणे असा होतो. जसे धागा सुईच्या छिद्रातून पार करणे. म्हणून आयतचा अर्थ असा की ईमानधारकांच्या हृदयात तर हे स्मरण मन:शांती आणि आत्म्याचा आहार बनून शिरत असते. परंतु अपराध्यांच्या हृदयात ते पलिता बनून लागत असते. ते ऐकून त्यांच्या अंत:करणात असा अग्नी भडकतो जणू एखादी तापलेली सळई होती जी त्यांचा ऊर भेदून पार झाली.

६) मूळ अरब शब्द 'बुरूज' प्रयुक्त झाला आहे. अरबी भाषेत 'बुरूज' शब्दाचा अर्थ किल्ला, कोट आणि भक्कम इमारत असा होतो. नंतरच्या मजकुरावर विचार केल्याने असे वाटते की कदाचित वरच्या जगातील तो प्रदेश अभिप्रेत आहे ज्याच्यापैकी प्रत्येक प्रदेशाला अत्यंत भक्कम सीमांनी दुसऱ्या प्रदेशापासून विलग करून ठेवले आहे. या अर्थानुषंगाने 'बुरूज' या शब्दाला सुरक्षित प्रदेशाच्या अर्थात घेणे आम्ही अधिक योग्य समजतो.

७) म्हणजे ते शैतान जे आपल्या मित्रांना परोक्षाच्या वार्ता आणून देण्याचा प्रयत्न करतात वास्तविकपणे परोक्षाच्या ज्ञानाची साधने त्यांच्याजवळ अजिबात नाहीत. सृष्टी त्यांच्यासाठी मोकळे रान नाही की हवे तेथे जावे व अल्लाहची रहस्ये माहीत करून घ्यावी. ते कानोसा घेण्याचा प्रयत्न जरूर करतात परंतु प्रत्यक्षात त्याच्या पदरी काहीच पडत नाही.



ज्वाला त्याचा पाठलाग करते.[8] (१६-१८)

आम्ही भूतलाचा विस्तार केला, तिच्यात पर्वत रोवले, तिच्यात प्रत्येक जातीची वनस्पती यथायोग्य मोजमाप केलेल्या प्रमाणांनिशी उगविली आणि तिच्यात उदरनिर्वाहाची साधने उपलब्ध केली, तुमच्यासाठीही व त्या पुष्कळशा निर्मितीसाठीदेखील ज्यांना उपजीविका देणारे तुम्ही नाही. कोणतीही वस्तू अशी नाही जिचे खजिने आमच्याजवळ नाहीत. आणि ज्या वस्तूलादेखील आम्ही उतरवितो एका ठराविक प्रमाणात उतरवितो. फलदायी वाऱ्यांना आम्हीच पाठवितो, मग आकाशातून पावसाचा वर्षाव करतो, आणि त्या पाण्याने तुम्हाला तृप्त करतो, या दौलतीचे खजिनदार तुम्ही नाहीत. जीवन आणि मरण आम्ही देतो आणि आम्हीच सर्वांचे वारस[9] होणार आहोत. पूर्वी जे लोक तुमच्यापैकी होऊन गेले आहेत त्यांनाही आम्ही पाहून ठेवले आहे आणि नंतर येणारेदेखील आमच्या नजरेत आहेत खचितच तुमचा पालनकर्ता त्या सर्वांना एकत्र करील, तो बुद्धिमानही आहे व सर्वज्ञदेखील. (१९-२५)

आम्ही मानवाला कुजलेल्या मातीच्या सुक्या गाऱ्यापासून निर्माण केले[10] आणि

८) अरबी शब्द 'शिहाबेमुबीन' याचा प्रदीप्त ज्वाला असा अर्थ होतो. दिव्य कुरआनात दुसऱ्या ठिकाणी याकरिता 'शिहाबे साकिब' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. म्हणजे अंध:काराचा उच्छेद करणारी ज्वाला, याने अभिप्रेत केवळ तुटून कोसळणारे तारे, ज्यांना आमच्या परिभाषेत उल्का म्हटले जाते हमखास तेच असावेत असे नाही तर ती अन्य एखाद्या प्रकारची किरणेही असू शकतील. उदा. अंतरिक्षातील किरणे अथवा त्यांच्याहीपेक्षा तीव्र अन्य एखादे प्रकार असावे जे आमच्या माहितीत आले नसावे तथापि कधी जमिनीकडे कोसळताना ज्या आमच्या दृष्टीस पडत असतात त्याच या उल्का असाव्यात व वरील जगाकडे उड्डाण करतांना त्याच शैतानांच्या मार्गात अडसर बनत असाव्यात याची देखील संभावना आहे.

९) म्हणजे तुमच्यानंतर आम्हीच उरणार आहोत. तुम्हाला जे काही मिळाले आहे ते केवळ तात्पुरत्या उपयोगासाठी मिळाले आहे. सरतेशेवटी आम्ही दिलेल्या प्रत्येक वस्तूला तसेच सोडून रिकाम्या हातांनी तुम्ही निरोप घ्याल व या सर्व वस्तू जशाच्या तशा आमच्या खजिन्यात शिल्लक राहतील.

१०) या ठिकाणी कुरआन या गोष्टीचा अगदी स्पष्टपणे उलगडा करीत आहे की मनुष्य पशू योनीच्या टप्प्यातून विकास पावत मनुष्य योनीच्या क्षेत्रात आला आहे असे मुळीच नाही जसे आधुनिक काळाच्या डार्विनी विचारसरणीने प्रभावित झालेले कुरआनचे काही भाष्यकार सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत आहेत, तर मनुष्याच्या निर्मितीचा प्रारंभ प्रथमपासूनच प्रत्यक्षपणे भूद्रव्यांनी झाला आहे. त्याची हकीगत सर्वश्रेष्ठ अल्लाहने, 'कुजलेल्या मातीच्या वाळलेल्या गाऱ्या' या शब्दात वर्णिली आहे. या शब्दांनी हे स्पष्टपणे व्यक्त होत आहे की खमीर आलेल्या मातीने एक पुतळा बनविला गेला होता, पूर्ण झाल्यानंतर तो वाळला व मग त्यात आत्मा फुंकला गेला.

त्यापूर्वी जिन्नांना आम्ही अग्नीच्या ज्वालेपासून निर्माण केले होते.[११] मग आठवा तो प्रसंग जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने देवदूतांना सांगितले की, ‘‘मी सेंद्रीय शुष्क मृत्तिकेपासून एक मनुष्य निर्माण करीत आहे. जेव्हा मी त्याला पूर्णपणे बनवीन आणि त्यामध्ये आपल्या आत्म्यातून काही फुंकेन तर मग तुम्ही सर्व त्याच्या समोर नतमस्तक व्हा. त्याप्रमाणे सर्व दूत नतमस्तक झाले. ‘इबलीस’खेरीज त्याने नतमस्तक होणाऱ्यांची साथ देण्यास नकार दिला. पालनकर्त्याने विचारले, ‘‘हे इब्लीस! तुला काय झाले, तू नतमस्तक होणाऱ्यांची साथ दिली नाहीस?’’ त्याने सांगितले, ‘‘माझे हे काम नव्हे की मी त्या मनुष्यापुढे नतमस्तक व्हावे ज्याला तू सेंद्रिय शुष्क मातीपासून निर्माण केले आहे.’’ पालनकर्त्याने फर्माविले, ‘‘बरे, तर चालता हो येथून कारण तू बहिष्कृत आहेस आणि आता बदल्याच्या दिवसापर्यंत तुझ्यावर धिक्कार आहे.’’ त्याने विनंती केली, ‘‘माझ्या पालनकर्ता! जर अशी गोष्ट आहे तर मग मला त्या दिवसापर्यंत सवड दे जेव्हा सर्व माणसे पुन्हा उठविली जातील.’’ फर्माविले, ‘‘बरे, तर तुला सवड आहे त्या दिवसापर्यंत ज्याची वेळ आम्हाला माहीत आहे.’’ तो म्हणाला, ‘‘माझ्या पालनकर्त्या! जसे तू मला भरकटविलेस तसेच आता मी पृथ्वीत त्यांच्यासाठी आकर्षणे निर्माण करून त्या सर्वांना भरकटवून टाकीन. तुझ्या त्या दासांखेरीज ज्यांना तू त्यांच्यापैकी निवडक केलेले असशील.’’ फर्माविले, ‘‘हा रस्ता आहे जो थेट माझ्यापर्यंत पोहचतो.[१२] निस्संदेह जे माझे खरे दास आहेत त्यांच्यावर तुझी काहीही मात्रा चालणार नाही. तुझी तर मात्रा केवळ त्या भरकटलेल्या लोकांवरच चालेल जे तुझे अनुकरण करतील,[१३] आणि या सर्वांसाठी नरकाची धमकावणी आहे.’’

(२६-४३)

हा नरक (ज्याची धमकी इब्लीसच्या अनुयायांना दिली गेली आहे) याची सात दारे

**११)** ‘समूम’ या अरबी शब्दाचा अर्थ ‘उष्ण हवा’ असा होतो. ‘नार’ (अग्न) ला त्याच्याशी संबंधित केल्या स्वरूपात त्याचा अर्थ, अग्निऐवजी तीव्र उष्णता असा होतो. याद्वारे कुरआनात ज्या ठिकाणी असे फर्माविले गेले आहे की जिन्नांना अग्निपासून निर्माण केले गेले आहे, त्या सर्व ठिकाणांचे स्पष्टीकरण होते.

**१२)** ‘हाजा सिरातून अलय्या मुसतकीम’ याचे दोन अर्थ होऊ शकतात. एक अर्थ, आम्ही वर जे भाषांतर केले आहे तो आणि दुसरा असा ‘ही गोष्ट खरी आहे. मी देखील याचे नियमीत पालन करीन.’

**१३)** या वाक्याचा दुसरा अर्थ असाही होऊ शकतो की माझ्या दासावर (अर्थात आम मानवांवर) तुझी काहीच सत्ता असणार नाही की बळेच तू त्यांना अवज्ञाकारी बनवावे, तथापि जे स्वतःच बहकले असतील व स्वतः होऊन तुझे अनुकरण करू इच्छितील त्यांना तुझ्या मार्गी लागण्यासाठी मोकळे सोडले जाईल, त्यांना जबरदस्तीने आम्ही परावृत्त करण्याचा प्रयत्न करणार नाही.



आहेत, प्रत्येक दारासाठी त्यांच्यापैकी एक भाग खास केला गेला आहे.[१४] याउलट ईशपरायण लोक बागेत आणि झऱ्यांच्यामध्ये राहतील. आणि त्यांना सांगितले जाईल की प्रवेश करा यात सुखरूपपणे आणि निर्भयपणे व बिनधोकपणे. त्यांच्या हृदयात जी काही थोडी फार खोट-कपट असेल ती आम्ही काढून टाकू, ते आपापसांत भाऊ-भाऊ बनून समोरासमोर तख्तांवर बसतील. त्यांना तेथे कोणत्याही कष्टाला सामोरे जावे लागणार नाही आणि ते तेथून निष्काशीत केले जाणार नाहीत. (४४-४८)

हे पैगंबर (स.)! माझ्या दासांना खबर द्या की मी फार क्षमाशील आणि परम कृपाळू आहे, परंतु याबरोबरच माझा प्रकोपदेखील अत्यंत दुःखदायी आहे. (४९-५०)

आणि यांना जरा इब्राहीम (अ.) च्या पाहुण्यांची कहाणी ऐकवा. जेव्हा ते आले त्याच्या येथे आणि म्हणाले, ‘‘सलाम असो तुम्हांवर,’’ तेव्हा त्याने सांगितले, ‘‘आम्हाला तुमचे भय वाटते.’’ त्यांनी उत्तर दिले, ‘‘भिऊ नका, आम्ही तुम्हाला एका मोठ्या ज्ञानी मुलाची खुशखबर देत आहोत.’’[१५] इब्राहीम (अ.) ने सांगितले, ‘‘तुम्ही या म्हातारपणी मला संततीची सुवार्ता देता काय? थोडे विचार तरी करा की कसली सुवार्ता तुम्ही मला देत आहात?’’ त्यांनी उत्तर दिले, ‘‘आम्ही तुम्हाला सत्याधिष्ठित सुवार्ता देत आहोत, तुम्ही निराश होऊ नये.’’ इब्राहीम (अ.) ने सांगितले, ‘‘आपल्या पालनकर्त्याच्या कृपेपासून निराश तर केवळ पथभ्रष्ट लोकच होत असतात.’’ मग इब्राहीम (अ.) ने विचारले, ‘‘हे अल्लाहच्या दूतांनो! ती कोणती मोहीम आहे ज्यास्तव आपले आगमन झाले आहे?’’ ते म्हणाले, ‘‘आम्ही एका अपराधी जनसमुहाकडे पाठविले गेलो आहोत. केवळ लूत (अ.) चे कुटुंबीय याला अपवाद आहेत, त्या सर्वांना आम्ही वाचवू, त्याच्या पत्नीव्यतिरिक्त की जिच्यासाठी (अल्लाह फर्मावितो की) आम्ही नियोजित केले आहे की ती पाठीमागे राहणाऱ्यांत समाविष्ट असेल.’’ (५१-६०)

मग जेव्हा हे दूत लूत (अ.) पाशी पोहचले, तर त्याने सांगितले, ‘‘आपण अनोळखी दिसता.’’ त्यांनी उत्तर दिले, ‘‘नाही, तर आम्ही तीच गोष्ट घेऊन आलेलो

**१४)** नरकाची ही दारे बहुधा त्या पथभ्रष्टते आणि अवज्ञेनुसार असतील ज्यांच्या अनुसरणापायी मनुष्य स्वतःसाठी नरकाचा मार्ग उघड करीत असतो. उदा. कोणी नास्तिकतेच्या मार्गाने दोजखकडे जातो, कोणी अनेकेश्वरवादाच्या मार्गाने, कोणी दांभिकतेच्या मार्गाने तर कोणी वासनांच्या आहारी जाऊन, आणि अवज्ञा व दुराचाराच्या मार्गाने, कोणी जुलूम व अत्याचाराच्या मार्गाने आणि लोकछळणुकीच्या मार्गाने, कोणी मार्गभ्रष्टतेचा प्रचार आणि कुफ्रच्या प्रस्थापनेच्या मार्गाने तर कोणी अश्लीलता व निर्लज्जतेच्या मार्गाने, ज्या माणसाचा जो गुण अधिक ठळक असेल त्यानुसारच जहन्नमकडे जाण्यासाठी त्याचा मार्ग निश्चित होईल.

**१५)** म्हणजे हजरत इसहाक (अ.) जन्माला येण्याची खुशखबर, जसे की सूरह हूदमध्ये स्पष्टपणे सांगितले आहे.

आहोत जिच्या येण्यात हे लोक शंका घेत होते. आम्ही तुम्हाला खरे सांगतो की आम्ही सत्यानिशी तुमच्यापाशी आलेलो आहोत. म्हणून आता काही रात्र उरली असता आपल्या कुटुंबियांना घेऊन निघून जा आणि स्वत: त्यांच्या मागोमाग चला. तुमच्यापैकी कोणीही मागे वळून पाहू नये. बस्स, सरळ चालत जा जिकडे जाण्याची तुम्हाला आज्ञा दिली जात आहे.'' आणि त्याला आम्ही आमचा हा निर्णय पोहचविला की उजाडताच यांचे समूळ उच्चाटन केले जाईल. (६१-६६)

इतक्यात शहराचे लोक हर्षोन्मादित होऊन लूत (अ.) च्या घरावर चालून आले. लूत (अ.) ने सांगितले, ''बंधूनो! हे माझे पाहुणे आहेत, माझी फजिती करू नका, अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा, मला अपमानित करू नका.'' ते म्हणाले, ''आम्ही वारंवार तुम्हाला मनाई केली नाही काय की साऱ्या जगाचे मक्तेदार बनू नका?'' लूत (अ.) ने (जेरीस येऊन) सांगितले, ''जर तुम्हाला काही करावयाचेच असेल तर या माझ्या मुली हजर आहेत.''[१६] (६७-७१)

तुझ्या जीवाची शपथ हे पैगंबर (स.), त्यावेळी त्यांच्यावर एक प्रकारची धुंदी चढली होती ज्यामध्ये ते अनियंत्रित होत चालले होते. सरतेशेवटी तांबडे फुटताच एका भयंकर स्फोटाने त्यांना गाठले आणि आम्ही त्या वस्तीला उलथेपालथे करून टाकले आणि त्यांच्यावर भाजलेल्या मातीच्या दगडांचा वर्षाव केला. (७२-७४)

या घटनेत मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे दृष्टे (ज्ञानी) आहेत. आणि तो प्रदेश (जेथे ही घटना घडली होती) हमरस्त्यावर स्थित आहे.[१७] यांच्यात बोध-सामग्री आहे त्या लोकांसाठी जे श्रद्धावंत आहेत. (७५-७७)

आणि ऐका वाले[१८] अत्याचारी होते, तर पहा की आम्हीदेखील त्यांच्यावर सूड उगविला, आणि या दोन्ही जनसमूहांचे उध्वस्त प्रदेश खुल्या रस्त्यावर स्थित आहेत.[१९] (७८-७९)

हिज्रच्या लोकांनीदेखील पैगंबरांना खोटे ठरविले आहे. आम्ही आमची वचने त्यांच्यापाशी पाठविली, आमची वचने त्यांना दाखविली परंतु ते सर्वांकडे दुर्लक्षच करीत

**१६)** स्पष्टीकरणासाठी पहा सूरह हूद, टीप क्र. २६, २७

**१७)** म्हणजे हिजाज ते सीरिया आणि इराक ते इजिप्तला जातांना हा उद्‌ध्वस्त मुलूख वाटेत लागतो. सामान्यत: या सर्व मुलुखात आजतागायत ठळकपणे दिसणाऱ्या त्या विनाश चिन्हांना काफिल्याचे लोक पाहात असतात.

**१८)** म्हणजे हजरत शुऐब (अ.) यांच्या राष्ट्राचे लोक. 'ऐका' हे तबूकचे प्राचीन नाव होते.

**१९)** मदयन आणि 'ऐका' वाल्याचा मुलूख देखील हिजाजहून फलस्तीन व सीरियाकडे जाताना वाटेत लागतो.



राहिले. ते पर्वत कोरून घरे बनवीत असत आणि आपल्याठायी अगदी निर्धास्त आणि समाधानी होते सरतेशेवटी एका भयंकर स्फोटाने सकाळ होताच त्यांना गाठले. आणि त्यांची संपत्ती त्यांच्या काहीही उपयोगी पडली नाही. (८०-८४)

आम्ही जमीन आणि आकाशांना आणि त्यांच्यात अस्तित्वात असलेल्या सर्वांना सत्याशिवाय इतर कोणत्याही आधारावर निर्माण केले नाही. आणि निर्णयाची घटका निश्चितच येणार आहे, मग हे पैगंबर (स.)! तुम्ही (या लोकांच्या अशिष्टतेवर) सभ्यतेने दुर्लक्ष करीत रहा. निश्चितच तुमचा पालनकर्ता सर्वांचा निर्माता आहे आणि तो सर्वकाही जाणतो. आम्ही तुम्हाला सात वचने अशी दिली आहेत जी पुनरोक्ती करण्यास योग्य आहेत,[२०] आणि तुम्हाला महान कुरआन प्रदान केला आहे. तुम्ही त्या ऐहिक सामग्रीकडे दृष्टिक्षेपदेखील करू नका, जी आम्ही यांच्यापैकी वेगवेगळ्या प्रकारच्या लोकांना देऊन टाकली आहे, आणि यांच्या स्थितीवरदेखील आपले मन दु:खी होऊ देऊ नका. यांना सोडून श्रद्धावंतांकडे वळा. आणि न मानणाऱ्यांना सांगा, ''मी तर उघडउघड सूचना देणारा आहे.'' ही त्याच प्रकारची सूचना आहे जशी आम्ही त्या फूट पाडणाऱ्या लोकांकडे पाठविली होती, ज्यांनी आपल्या कुरआनला तुकडेतुकडे केले आहे.[२१] तर शपथ आहे तुझ्या पालनकर्त्याची आम्ही जरूर त्या सर्वांना विचारू की तुम्ही काय करीत होतात? (८५-९३)

तर हे पैगंबर (स.), तुम्हाला ज्या गोष्टीची आज्ञा दिली जात आहे ती पुकारून सांगा आणि अनेकेश्वरवाद्यांची अजिबात पर्वा करू नका. तुमच्यातर्फे आम्ही त्या चेष्टा करणाऱ्यांचा समाचार घेण्यास पुरेसे आहोत, जे अल्लाहबरोबर अन्य इतरांना देखील ईश्वर ठरवितात, लवकरच त्यांना माहीत होईल. (९४-९६)

आम्हाला माहीत आहे ज्या गोष्टी हे तुमच्यावर रचतात, त्यामुळे तुमचे अंत:करण दु:खी होत आहे. (त्याचा इलाज असा आहे की) आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्यगान करा, त्याच्या ठायी नतमस्तक व्हा, आणि त्या शेवटच्या घटकेपर्यंत आपल्या पालनकर्त्याची भक्ती करीत रहा जिचे आगमन निश्चित आहे. (९७-९९)

**२०)** म्हणजे सूरह फातिहाच्या आयती. अगोदरच्या इस्लामी विद्वानांच्या बहुसंख्येचे एकमत आहे. किंबहुना इमाम बुखारी (रह.) यांनी तर दोन अप्रत्यक्ष निवेदने देखील या गोष्टीच्या प्रमाणादाखल प्रस्तुत केली आहेत की स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी 'सात आयती' यांच्यापासून सूरह फातिहा अभिप्रेत असल्याचे सांगितले आहे.

**२१)** म्हणजे त्या ग्रंथाला जो कुरआन प्रमाणेच त्यांना दिला गेला होता, त्याचे तुकडे तुकडे करून टाकले. त्याच्या एखाद्या भागाचे अनुसरण केले तर अन्य एखाद्याकडे त्यांनी पाठ फिरविली.

# १६ सूरह अन्नह्ल

*(मक्काकालीन, वचने १२८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

येऊन ठेपला अल्लाहचा निर्णय,[१] आता त्याच्यासाठी घाई करू नका. अनेकेश्वरवादापासून तो पवित्र आहे आणि श्रेष्ठ आहे. तो ज्या दासाला इच्छितो त्यावर आपल्या आज्ञेने दूताद्वारे या आत्म्याला[२] अवतीर्ण करतो. (या सूचनेसह की लोकांना) ‘‘सावध करा, माझ्याशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही, म्हणून तुम्ही माझ्या कोपाची भीती बाळगा.’’ त्याने आकाशाला व जमिनीला सत्याधिष्ठित निर्माण केले आहे, तो फार उच्च व श्रेष्ठ आहे त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करीत आहेत. (१-३)

त्याने मानवाला एका लहानशा थेंबापासून निर्माण केले आणि पाहता पाहता तो भांडखोर बनला.[३] त्याने जनावरे निर्माण केली ज्यांच्यात तुम्हाकरिता पोषाखही आहे आणि अन्नदेखील आणि तऱ्हेतऱ्हेचे दुसरे फायदेसुद्धा त्यांच्यात तुम्हासाठी सौंदर्य आहे, जेव्हा सकाळी तुम्ही त्यांना चरावयास पाठविता आणि जेव्हा संध्याकाळी तुम्ही त्यांना परत आणता, ते तुमच्यासाठी ओझे वाहून अशा अशा ठिकाणी घेऊन जातात जेथे तुम्ही जिवापाड परिश्रमाशिवाय पोहचू शकत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की तुमचा पालनकर्ता फार मायाळू व मेहरबान आहे. त्याने घोडे व खेचरे आणि गाढवे निर्माण केली की जेणेकरून तुम्ही त्यांच्यावर स्वार व्हावे आणि ती तुमच्या जीवनाची शोभा व्हावी. तो पुष्कळशा अन्य वस्तू (तुमच्या फायद्यासाठी) निर्माण करतो ज्याचे तुम्हाला ज्ञानदेखील

---

१) म्हणजे तो प्रकट होण्याची व अंमलात येण्याची वेळ जवळ आली आहे. बहुधा या फैसल्याने अभिप्रेत पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे मक्केहून हिजरत करणे आहे. थोड्याच कालावधीनंतर तसा हुकुमही दिला गेला. कुरआनच्या अध्ययनाने कळते की प्रेषित ज्या लोकांमध्ये नियुक्त केला जातो, ते जेव्हा इन्काराची सीमा गाठतात तेव्हा प्रेषिताला हिजरत-स्वदेश त्यागाची आज्ञा दिली जाते व हाच हुकूम त्यांच्या भाग्याचा निकाल लावतो. त्यानंतर त्या लोकांवर एकतर विनाशकारी प्रकोप येतो किंवा प्रेषित व त्याच्या अनुयायांकरवी त्यांचे मूळ कापून टाकले जाते.

२) आत्म्याने अभिप्रेत प्रेषितात्मा आणि दिव्य प्रकटन होय ज्यांनी समृद्ध होऊन प्रेषित कृती व उक्ती करीत असतो.

३) याचे दोन अर्थ असू शकतात व बहुधा दोन्ही अभिप्रेत आहेत. एक अर्थ असा की अल्लाहने वीर्याच्या क्षुद्र अशा थेंबापासून तो मनुष्य जन्मास घातला, जो वाद-विवादाची क्षमता बाळगतो व आपल्या उद्देशासाठी युक्तिवाद करू शकतो. दुसरे असे की ज्या माणसाला ईश्वराने वीर्यासारख्या क्षुद्र द्रव्याने जन्मास घातले आहे, त्याच्या आहंभावाचा अतिरेक तर पहा की खुद्द ईश्वराविरूद्धच भांडण्यासाठी तो तत्पर बनला आहे.



नाही.[४] आणि अल्लाहवरच आहे सरळमार्ग दाखविणे जेव्हा की वाकडे मार्ग देखील अस्तित्वात आहेत. जर त्याने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना मार्ग दाखविले असते. (४-९)

तोच आहे ज्याने आकाशांतून तुमच्यासाठी पर्जन्यवृष्टी केली ज्याने तुम्ही स्वत:देखील तृप्त होता आणि तुमच्या जनावरांसाठीसुद्धा चारा उत्पन्न होतो. तो त्या पाण्याद्वारे शेती फुलवितो आणि जैतून व खजूर व द्राक्षे आणि तऱ्हेतऱ्हेची इतर फळे निर्माण करतो. यात एक मोठा संकेत आहे त्या लोकांसाठी जे गांभिर्याने विचार करतात. (१०-११)

त्याने तुमच्या कल्याणासाठी रात्र व दिवसाला आणि सूर्य व चंद्राला वश केले आहे आणि सर्व नक्षत्रेही त्याच्याच आज्ञेने वशीभूत आहेत, यात खूप संकेत आहेत त्या लोकांसाठी जे बुद्धीचा उपयोग करतात. आणि या ज्या पुष्कळशा रंगीबेरंगी वस्तू त्याने तुमच्यासाठी जमिनीत उत्पन्न करून ठेवल्या आहेत, यांच्यातसुद्धा निश्चितच संकेत आहेत त्या लोकांसाठी जे बोध घेणारे आहेत. (१२-१३)

तोच आहे ज्याने तुमच्यासाठी समुद्राला वश केले आहे जेणेकरून तुम्ही त्यापासून ताजे मांस घेऊन खावे आणि त्याच्यापासून अलंकाराच्या वस्तू काढाव्यात ज्या तुम्ही परिधान करता. तुम्ही पाहता की नौका समुद्राचे ऊर फाडीत चालते, हे सर्व काही यासाठी आहे की तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेचा शोध करावा[५] व त्याचे कृतज्ञ व्हावे. (१४)

त्याने धरतीवर पर्वतांच्या मेखा गाडल्या जेणेकरून पृथ्वीने तुम्हाला घेऊन ढळू नये. त्याने नद्या प्रवाहित केल्या व नैसर्गिक मार्ग बनविले जेणेकरून तुम्हाला मार्गदर्शन प्राप्त व्हावे. त्याने जमिनीत मार्ग दाखविणारी चिन्हे ठेवली आणि नक्षत्रांपासून देखील लोक मार्गदर्शन प्राप्त करतात. (१५-१६)

मग तो, जो निर्माण करतो व ते, जे काहीही निर्माण करीत नाहीत, दोघे एक समान आहेत काय? काय तुम्ही चिंतन करीत नाही? जर तुम्ही अल्लाहच्या देणग्यांची गणना करू इच्छिले तर गणना करू शकत नाही, वस्तुस्थिती अशी आहे की तो फारच क्षमाशील व दयाळू आहे. खरे पाहता तो तुमच्या प्रकटचेही ज्ञान राखतो व अप्रकटचेही. (१७-१९)

---

४) म्हणजे बऱ्याचशा अशा वस्तू आहेत ज्या मनुष्याच्या भल्यासाठी कार्यशील आहेत व माणसाला माहीतच नाही की कोणकोणत्या ठिकाणी किती सेवक त्याची सेवा करण्यात लागले आहेत व कोणती सेवा पार पाडीत आहेत.

५) म्हणजे वैध पद्धतीने आपली रोजी प्राप्त करण्याचा प्रयत्न करा.

ोआणि त्या दुसऱ्या विभूती ज्यांचा अल्लाहला सोडून लोक धावा करतात ते कोणत्याही वस्तूचे निर्माते नाहीत तर ते स्वत:च निर्माण केले गेले आहेत. मृत आहेत, जिवंत नाहीत आणि त्यांना काहीही माहीत नाही की त्यांना केव्हा (दुसऱ्यांदा जिवंत करून) उठविले जाईल.[६] (२०-२१)

तुमचा ईश्वर तर केवळ एकच ईश्वर आहे. परंतु जे लोक परलोकाला मानत नाहीत त्यांच्या मनात नकार वास्तव्य करून आहे. आणि ते घमेंडीत पडले आहेत. अल्लाह निश्चितच यांची सर्व कृत्ये जाणतो, अप्रकटसुद्धा व प्रकटदेखील, तो त्या लोकांना मुळीच पसंत करीत नाही जे अहंकारात पडले असतील. (२२)

आणि जेव्हा एखादा त्यांना विचारतो की तुमच्या पालनकर्त्याने ही काय चीज अवतरली आहे.[७] तर म्हणतात, ''अहो, त्या तर जुन्या काळातील पुराणकथा आहेत.'' या गोष्टी ते अशासाठी करीत आहेत की पुनरुत्थानाच्या दिवशी आपले ओझेही पूर्णपणे उचलतील आणि त्याचबरोबर त्या लोकांचा भार देखील उचलतील ज्यांना हे अज्ञानापायी पथभ्रष्ट करीत आहेत, पहा, किती कठीण जबाबदारी आहे ही. जिला ते आपल्या डोक्यावर घेत आहेत? यांच्यापूर्वीदेखील बरेचसे लोक (सत्याला परास्त करण्याकरिता) अशीच कुटिलता करीत राहिले आहेत. तर पाहून घ्या की अल्लाहने त्यांच्या कुटिलतेचा इमला पायासकट उखडून टाकला आणि त्याचे छप्पर त्यांच्या डोक्यावर कोसळले आणि अशा दिशेने त्यांच्यावर प्रकोप आला जिकडून त्याचे आगमन त्यांच्या कल्पनेतही नव्हते. मग अंतिम दिनी अल्लाह त्यांना खजील व अपमानित करील आणि त्यांना सांगेल, ''दाखवा आता कोठे आहेत माझे ते भागीदार ज्यांच्यासाठी तुम्ही (सत्यवादींशी) भांडणे करीत होता?'' ज्ञानीजन म्हणतील, ''आज नामुष्की व दुर्दैव आहे अश्रद्धावंतांसाठी (काफिरांसाठी).'' होय, त्याच अश्रद्धावंतांसाठी जे आपल्या स्वत:वर अत्याचार करताना जेव्हा दूतांच्या हाती पकडले जातात (तेव्हा शिरजोरी सोडून) लगेच लोटांगण घालतात आणि म्हणतात, ''आम्ही तर काही अपराध करीत नव्हतो.'' दूत उत्तर देतात, ''करीत नव्हता! अल्लाह तुमची कृत्ये चांगल्याच प्रकारे जाणतो. आता जा, नरकाच्या दारांत शिरा, तेथेच तुम्हाला सदैव राहावयाचे आहे.'' तर वस्तुस्थिती अशी आहे की ते अत्यंत वाईट ठिकाण आहे अहंकारी लोकांकरिता. (२३-२९)

दुसरीकडे जेव्हा ईशपरायण लोकांना विचारले जाते की ही काय वस्तू आहे जी

६) हे शब्द स्पष्टपणे असे दर्शवीत आहेत की या ठिकाणी विशेषकरून ज्या बनावटी देवांचे खंडन केले जात आहे ते मृत माणसे आहेत कारण फरिश्ते तर मृत नसून जिवंत आहेत. तसेच लाकडी व दगडी मूर्तींच्यासंबंधी दुसऱ्यांदा जिवंत उठविल्या जाण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

७) अरबस्तानात जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांची चर्चा होऊ लागली तेव्हा बाहेरचे लोक मक्कावासियांशी पैगंबर (स.) यांच्या व कुरआनसंबंधी प्रश्न विचारीत असत.



तुमच्या पालनकर्त्याकडून अवतरली आहे तर ते उत्तर देतात, ''उत्तम वस्तू अवतरली आहे.'' अशा प्रकारच्या पुण्यकर्मी लोकांसाठी या जगातही कल्याण आहे आणि परलोकातील घर तर हमखास त्यांच्यासाठी उत्तम आहे. फारच चांगले घर आहे. ईशपरायण लोकांचे. चिरंतन निवासाचे स्वर्ग ज्याच्यात ते दाखल होतील, खालून कालवे वाहात असतील आणि सर्व काही तेथे अगदी इच्छेप्रमाणे असेल. असा मोबदला देतो अल्लाह ईशपरायण लोकांना. त्या ईशपरायणांना ज्यांचे आत्मे शुचिर्भूत अवस्थेत जेव्हा दूत हरण करतात तेव्हा म्हणतात सलाम असो तुम्हांवर या स्वर्गामध्ये आपल्या कर्माच्या मोबदल्यात.'' (३०-३२)

हे पैगंबर (स.), आता जे हे लोक वाट पाहात आहेत तर याच्याशिवाय आता काय उरले आहे की दूतांनीच घेऊन पोहचावेत अथवा तुझ्या पालनकर्त्याचा निकाल लागू व्हावा? अशाच प्रकारची धिटाई यांच्यापूर्वी पुष्कळशा लोकांनी केली आहे, मग जे काही त्यांच्याशी घडले ते त्यांच्यावर अल्लाहचा अत्याचार नव्हता तर त्यांच्या स्वत:चा अत्याचार होता जो त्यांनी आपल्या स्वत:वर केला. त्यांच्या कृत्यांचे दुष्परिणाम सरतेशेवटी त्यांच्याच अंगलट आले आणि तीच गोष्ट त्यांच्यावर ओढवल्याविना राहिली नाही जिची चेष्टा ते करीत होते. (३३-३४)

हे अनेकेश्वरवादी म्हणतात, ''जर अल्लाहने इच्छिले असते तर आम्हीही आणि आमच्या पूर्वजांनीदेखील त्याच्याशिवाय अन्य कोणाची उपासनाही केली नसती आणि त्याच्या आज्ञेशिवाय एखाद्या वस्तूला निषिद्धदेखील ठरविले नसते.'' असलेच निमित्त यांच्यापूर्वीचे लोक देखील करीत राहिले आहेत, तर पैगंबरावर स्पष्ट गोष्टी पोहचविण्याव्यतिरिक्त काही जबाबदारी आहे काय? आम्ही प्रत्येक जनसमूहात एक पैगंबर पाठविला, आणि त्याच्याद्वारे सर्वांना खबरदार करून टाकले की, ''अल्लाहची भक्ती करा आणि अनिर्बंध बनलेल्या (तागूत) च्या उपासनेपासून अलिप्त राहा.'' त्यानंतर त्यांच्यापैकी कुणाला अल्लाहने मार्गदर्शन दिले आणि कुणावर पथभ्रष्टता ओढवली. मग जरा धरतीवर चालून फिरून पाहा की खोटे ठरविणाऱ्यांचा शेवट कसा झाला आहे. हे प्रेषित, तुम्ही त्यांना सरळ मार्गावर आणण्यासाठी कितीही इच्छुक असा परंतु जे पथभ्रष्ट होतात त्यांना अल्लाह मार्गदर्शन करीत नाही. आणि अशा लोकांना कोणीही मदत करू शकत नाही. (३५-३७)

हे लोक अल्लाहच्या नावाने कठोर शपथा घेऊन सांगतात, ''अल्लाह कोणत्याही मरणाऱ्याला पुन्हा जिवंत करून उठविणार नाही'' का उठविणार नाही? हे तर एक वचन आहे ज्याला पुरे करणे त्याने स्वत:साठी अनिवार्य ठरविले आहे, पण बहुतेक लोक जाणत नाहीत. आणि असे घडणे यासाठी आवश्यक आहे की अल्लाहने यांच्यासमोर ही वस्तुस्थिती उघड करावी जिच्यासंबंधी हे मतभेद करीत आहेत. आणि सत्याचा इन्कार

करणाऱ्यांना हे कळावे की ते खोटारडे होते. (उरली त्याची शक्यता, तर) आम्हाला कोणतीही वस्तू अस्तित्वात आणण्यासाठी यापेक्षा अधिक काही करावे लागत नाही की तिला आदेश देतो, ''घडो.'' आणि बस्स तसे घडते. (३८-४०)

जे लोक अत्याचार सहन केल्यानंतर अल्लाहखातर देशत्याग करून गेले आहेत त्यांना आम्ही जगातच चांगले ठिकाण देऊ आणि परलोकातील मोबदला तर फार मोठा आहे.[८] माहीत व्हावे त्या अत्याचारपीडितांना ज्यांनी संयम राखला आहे व जे आपल्या पालनकर्त्याच्या भरवशावर काम करीत आहेत. (की किती चांगला शेवट त्यांच्या प्रतीक्षेत आहे.) (४१-४२)

हे पैगंबर (स.), आम्ही तुमच्या अगोदरदेखील जेव्हा कधी पैगंबर पाठविले आहेत, माणसांमधूनच पाठविले आहेत ज्यांच्याकडे आम्ही आमच्या संदेशाचे दिव्य प्रकटन करीत होतो, स्मरणधारी लोकांना[९] विचारा जर तुम्ही लोक स्वत: जाणत नसाल. पूर्वीच्या पैगंबरांना देखील आम्ही उज्ज्वल संकेत व ग्रंथ देऊन पाठविले होते आणि आता हे पुन:स्मरण तुमच्यावर अवतरले आहे की जेणेकरून तुम्ही लोकांच्यासमोर त्या शिक्षणाचे स्पष्टीकरण करीत राहावे जे त्यांच्यासाठी अवतरले गेले आहे,[१०] आणि जेणेकरून लोक (स्वत:देखील) गांभिर्याने विचार करतील. (४३-४४)

मग ते लोक जे (पैगंबराच्या आवाहनाविरूद्ध) वाईटात वाईट चाली खेळत आहेत या गोष्टींपासून अगदीच निर्भय झाले आहेत काय की अल्लाहने त्यांना जमिनीत खचवावे अथवा असल्या दिशेने प्रकोप आणावे जिकडून तो येण्याचे त्यांच्या कल्पनेतही नसेल. अथवा अकस्मात चालता फिरता त्यांना धरावे, किंवा अशा स्थितीत त्यांना पकडावे जेव्हा त्यांना स्वत:च येणाऱ्या संकटाची धास्ती लागली असेल व त्यापासून वाचण्याच्या काळजीत ते दक्ष असतील? त्याने हवे ते करण्याची इच्छा करतील. हे लोक त्याला जेरीस आणण्याची शक्ती बाळगत नाहीत. वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता मोठा मृदूस्वभावी आणि दयावान आहे. (४५-४७)

८) हा संकेत, काफिरांच्या असह्यकारक छळाला वैतागून ज्यानी हब्शकडे हिजरत केली होती त्या मुहाजिरीनकडे आहे.

९) म्हणजे ज्या लोकांना दैवी ग्रंथाचे ज्ञान आहे त्यांना विचारा की प्रेषित मानवच असत अथवा अन्य काही असत?

१०) म्हणजे अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर ग्रंथ अशासाठी उतरविला गेला होता की ते आपल्या उक्ती व कृतीने त्या ग्रंथाच्या शिकवणी व आज्ञांचे स्पष्टीकरण आणि विश्लेषण करतात. यावरून पैगंबर (स.) यांची पद्धत कुरआनचे सनदशीर अधिकृत स्पष्टीकरण आहे ही गोष्ट आपोआपच सिद्ध होते.



आणि काय हे लोक अल्लाहने निर्माण केलेल्या कोणत्याच वस्तूला पाहात नाहीत की तिची सावली कशा प्रकारे अल्लाहच्या ठायी नतमस्तक होत उजव्या व डाव्या बाजूला पडते?[११] सर्वचे सर्व अशा प्रकारे लाचारी व्यक्त करीत आहेत. पृथ्वी व आकाशांत जितक्या प्रमाणात सजीव निर्मिती आहे आणि जितके दूत, सर्व अल्लाहच्यासमोर नतमस्तक होत आहेत, ते कदापि शिरजोरी करीत नाहीत, आपल्या पालनकर्त्याशी जो त्याच्या वरती आहे, भितात आणि जी काही आज्ञा दिली जाते त्याचप्रमाणे काम करतात. (४८-५०)

अल्लाहचा फर्मान आहे, ''दोन उपास्य बनवू नका,[१२] उपास्य तर केवळ एकच आहे म्हणून तुम्ही माझ्याच कोपाचे भय बाळगा.'' त्याचेच आहे ते सर्वकाही जे आकाशांत आहे व जे काही जमिनीत आहे आणि पूर्णत: त्याचाच धर्म (सर्व सृष्टीत) चालत आहे.[१३] मग काय अल्लाहला सोडून तुम्ही अन्य कोणाची भीती बाळगाल? (५१-५२)

तुम्हाला जी काही देणगी प्राप्त आहे अल्लाहकडूनच आहे. मग जेव्हा एखादा बिकट प्रसंग तुमच्यावर ओढवतो तेव्हा तुम्ही लोक आपली गाऱ्हाणी घेऊन त्याच्याकडे धाव घेता. पण जेव्हा अल्लाह तो प्रसंग टाळतो तेव्हा अकस्मात तुमच्यापैकी एक गट आपल्या पालनकर्त्याबरोबर दुसऱ्यांना (या मेहरबानीप्रतीच्या कृतज्ञतेत) भागीदार बनवू लागतो जेणेकरून अल्लाहच्या कृपेबद्दल कृतघ्न बनावे. बरे, मजा करा, लवकरच तुम्हाला कळेल. (५३-५५)

हे लोक ज्यांची वास्तवता जाणत नाहीत त्यांचे हिस्से, आम्ही दिलेल्या अन्नात ठरवितात - अल्लाहची शपथ, जरूर तुम्हाला विचारले जाईल की ही असत्ये तुम्ही कशी रचली होती? (५६)

११) म्हणजे सर्व आकारात्मक वस्तूंच्या सावल्या या गोष्टीचे प्रतीक आहे की पर्वत असोत की वृक्ष, पशू असोत की मानव, सर्वचे सर्व एका सर्वव्यापी कायद्याच्या पकडीत जखडले आहेत. सर्वांच्या कपाळावर बंदगीचा ठसा लागलेला आहे. ईशत्वात कोणाचा यत्किंचित देखील भाग नाही. सावली पडणे हे एखाद्या वस्तूचे भौतिक वस्तू असण्याचे उघड चिन्ह आहे, तर भौतिक असणे हे दास व निर्मिती असण्याचे स्पष्ट प्रमाण आहे.

१२) दोन ईश्वर असण्याच्या नकारात दोनपेक्षा जास्त ईश्वरांचा इन्कार समाविष्ट असणे क्रमप्राप्तच आहे.

१३) दुसऱ्या शब्दात, त्याच्याच आज्ञाधारकतेवर या सर्व जैविक कार्यशालेची व्यवस्था टिकून आहे.

हे अल्लाहसाठी मुली निश्चित करतात.[१४] पवित्र आहे अल्लाह! आणि यांच्यासाठी ते जे यांना हवे आहे?[१५] जेव्हा यांच्यापैकी एखाद्याला मुलीच्या जन्माची खुशखबर देण्यात येते तेव्हा त्याच्या चेहऱ्यावर काळिमा पसरतो व तो रक्तासमान घोट गिळून बसतो. लोकांच्यापासून लपत छपत फिरतो की या वाईट बातमीनंतर कोणाला काय तोंड दाखवावयाचे, विचार करतो की अपमानित होऊन मुलीला घेऊन रहावे अथवा मातीत गाडावे? पहा, कसे वाईट निर्णय आहेत, जे हे ईश्वरासंबंधी लावतात.[१६] वाईट विशेषणे लावण्यालायक तर ते लोक आहेत जे मरणोत्तर जीवनावर विश्वास ठेवत नाहीत, अल्लाहसाठी सर्वात उच्च विशेषणे आहेत, तोच तर सर्वांवर प्रभुत्वसंपन्न आणि बुद्धिमत्तेत परिपूर्ण आहे. (५७-६०)

जर एखादे वेळी लोकांना अल्लाहने त्याच्या अत्याचाराबद्दल लगेच पकडले असते तर भूतलावर कोणत्याही सजीवाला सोडले नसते. परंतु तो सर्वांना एका ठराविक कालावधीपर्यंत सवड देतो, मग जेव्हा ती वेळ येऊन ठेपते तेव्हा तिच्यापेक्षा कोणीही एक क्षणभर देखील मागे पुढे होऊ शकत नाही. आज हे लोक त्या गोष्टी अल्लाहसाठी योजीत आहेत ज्या आपल्या स्वत:साठी यांना नापसंत आहेत, त्यांच्यासाठी सर्वकाही ठीक असल्याचे त्यांच्या जिव्हा खोटे कथन करतात. यांच्यासाठी तर एकच गोष्ट आहे आणि ती आहे नरकाचा अग्नी. निश्चितच हे सर्वांच्या अगोदर तिच्यात पोहचविले जातील. (६१-६२)

अल्लाहची शपथ, हे पैगंबर (स.)! तुमच्या अगोदरदेखील अनेक जनसमूहांत आम्ही पैगंबर पाठविले आहेत (आणि पूर्वीसुद्धा असेच होत राहिले आहे की) शैतानने त्यांची वाईट कृत्ये त्यांना सुशोभित करून दाखविली (आणि पैगंबराचे म्हणणे त्यांनी मानले नाही.) तोच शैतान आज या लोकांचादेखील वाली बनला आहे आणि हे दुःखदायी शिक्षेस पात्र बनत आहेत. आम्ही हा ग्रंथ तुम्हावर यासाठी अवतरला आहे की तुम्ही त्या मतभेदांची वास्तवता यांच्यावर स्पष्ट करावी ज्यामध्ये हे गुरफटले आहेत. हा ग्रंथ मार्गदर्शन व कृपा बनून उतरला आहे त्या लोकांसाठी जे याला मानतात. (६३-६४)

(तुम्ही प्रत्येक पावसाळ्यात पाहता की) अल्लाहने आकाशांतून पावसाचा वर्षाव

**१४)** अरब अनेकेश्वरवाद्यांच्या उपास्यांत देव कमी होते, व देवता जास्त होत्या व त्या ईश्वर कन्या आहेत अशी त्या देवतांसंबंधी त्यांची धारणा होती. त्याचप्रमाणे फरिश्त्यांना देखील ते ईश्वराच्या मुली ठरवीत असत.

**१५)** अर्थात मुले.

**१६)** म्हणजे स्वत:साठी ज्या मुली असण्याला हे लोक इतके लज्जास्पद व अपमानास्पद समजतात, ईश्वरासाठी तेच नि:संकोचपणे योजतात.



केला आणि अकस्मात मृत पडलेल्या जमिनीत त्याच्यामुळे प्राण ओतले[१७] निश्चितच याच्यात एक संकेतचिन्ह आहे ऐकणाऱ्यांसाठी. (६५)

आणि तुमच्यासाठी प्राणीमात्रांतदेखील एक बोध आहे. त्यांच्या पोटांतील शेण व रक्तामधून आम्ही तुम्हाला एक पदार्थ पाजतो म्हणजे निर्भेळ दूध जे पिणाऱ्यासाठी आल्हाददायक आहे. (६६)

(अशाच प्रकारे) खजूरीच्या झाडापासून व द्राक्षाच्या वेलींपासून आम्ही एक पदार्थ तुम्हाला पाजतो ज्यापासून तुम्ही मादकही बनविता आणि शुद्ध अन्नदेखील.[१८] निश्चितच यांच्यात एक संकेत आहे बुद्धिचा उपयोग करणाऱ्यांसाठी. (६७)

आणि पहा, तुमच्या पालनकर्त्याने मधमाशीवर ही गोष्ट दिव्य प्रकटन केली[१९] की पर्वतामध्ये आणि वृक्षामध्ये आणि मांडवावर चढविलेल्या वेलीत आपले मोहळ बनव व प्रत्येक प्रकारच्या फळांचे रस शोषून घे आणि आपल्या पालनकर्त्याच्या सुरळीत केलेल्या मार्गावर चालत राहा. या माशीमधून रंगीबेरंगी एक सरबत निघते जे लोकांकरिता आरोग्यदायी आहे, निश्चितपणे यातदेखील संकेत आहे त्या लोकांकरिता जे गांभिर्याने विचार करतात. (६८-६९)

आणि पहा, अल्लाहने तुम्हाला निर्माण केले, मग तो तुम्हाला मृत्यू देतो आणि तुमच्यापैकी एखादा वृद्ध जर्जर वयापर्यंत पोहचविला जातो जेणेकरून सर्वकाही जाणल्यानंतरही त्याला काही कळत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहच ज्ञानातही

**१७)** म्हणजे हे दृश्य प्रत्येक वर्षी तुमच्या डोळ्यासमोर येत असते की जमीन पूर्णपणे निर्जीव, सपाट मैदान झालेली आहे, चैतन्याची कोणतीच लक्षणे तिच्यात अस्तित्वात नाहीत. ना गवत ना रोपटी, ना वेली ना वनस्पती, ना फुले ना पाकळ्या, ना कोणत्याही प्रकारचे जिवाणू. अशातच पावसाळा आला व एक दोनदा तुषार पडले न पडले तोच त्याच जमिनीतून चैतन्याचे झरे उफाळू लागले. जमिनीच्या थरात दडलेली असंख्य मुळे अकस्मात जिवंत झाली आणि अगोदरच्या पावसाळ्यानंतर ज्या मृत झाल्या होत्या त्याच वनस्पती पुन्हा प्रत्येकातून उत्पन्न झाल्या. उन्हाळ्यात ज्यांचा मागमूस देखील राहिला नव्हता असे अगणित जिवाणू अकस्मातपणे पुन्हा त्याच थाटाने प्रकट झाले जसे मागच्या पावसाळ्यात दिसत होते. हे सर्वकाही वरचेवर तुम्ही आपल्या जीवनात पाहात असता तरीसुद्धा पैगंबरांच्या मुखाने हे ऐकून की अल्लाह सर्व मानवांना दुसऱ्यांदा पुन्हा जिवंत करील, तुम्हाला आश्चर्य वाटत असते.

**१८)** यात एक अप्रत्यक्ष संकेत दारूच्या निषिद्धतेकडेदेखील आहे की ती पाक उपजीविका नाही.

**१९)** वह्य (दिव्य प्रकटन) चा शाब्दिक अर्थ असा गुप्त आणि मार्मिक संकेत होतो जे संकेत देणाऱ्या व संकेत मिळविणाऱ्याखेरीज इतर कोणासही कळू नये. याच अनुषंगाने या शब्दाचा वापर टाळणे, उतरविणे (गोष्ट मनात उतरविणे) आणि गूढ बोध (गुप्त शिकवण व उपदेश) या अर्थाने प्रयुक्त होतो.

परिपूर्ण आहे आणि सामर्थ्यातदेखील. (७०)

आणि पहा, अल्लाहने तुमच्यापैकी काहींना काहींवर उपजीविकेत वर्चस्व दिले आहे. मग ज्या लोकांना हे वर्चस्व दिले गेले आहे ते असे नाहीत की आपली उपजीविका आपल्या गुलामांना देतात जेणेकरून दोघे त्या उपजीविकेत बरोबरीचे वाटेकरी होतील. तर काय अल्लाहचे उपकार मानण्यास या लोकांचा नकार आहे?[२०] (७१)

आणि तो अल्लाहच आहे ज्याने तुमच्यासाठी तुमच्या सहचारिणी पत्नी बनविल्या. आणि त्यानेच या पत्नींपासून तुम्हाला पुत्रपौत्र प्रदान केले आणि चांगल्या चांगल्या वस्तू तुम्हाला खावयास दिल्या. मग काय हे लोक (हे सर्वकाही पाहत व जाणत असताना देखील) असत्याला मानतात[२१] आणि अल्लाहचे उपकार नाकारतात. आणि अल्लाहला सोडून अशांना पूजतात ज्यांच्या हातात आकाशातूनही त्यांना काही उपजीविका देणे नाही आणि जमिनीतूनदेखील नाही आणि हे कामदेखील ते करूच शकत नाहीत? तर मग अल्लाहकरिता उदाहरणे बनू नका.[२२] अल्लाह जाणतो तुम्ही जाणत नाही. (७२-७४)

अल्लाह एक उदाहरण देतो. एक तर आहे गुलाम जो दुसऱ्याच्या मालकीचा आहे

**२०)** वर्तमानकाळात काही लोकांनी या आयतीतून असा अर्थ काढला आहे की ज्या लोकांना अल्लाहने रोजीत श्रेष्ठत्व प्रदान केले असेल त्यानी आपली रोजी आपले नोकर व आपल्या दासांकडे हमखास वळविली पाहिजे. जर त्यांनी वळविली नाही तर ते अल्लाहची देणगी नाकारणारे ठरतील. वस्तुत: अगोदरपासून सर्व भाषण अनेकेश्वरवादाचे खंडन आणि एकेश्वरवादाच्या समर्थनार्थ होत आले आहे व पुढेही सतत हाच विषय चालत आहे. संदर्भ दृष्टीसमोर ठेवून पाहिले असता, तुम्ही स्वत: आपल्या मालमत्तेत जेव्हा आपल्या नोकरांना व दासांना बरोबरीचा दर्जा देत नाही तेव्हा अल्लाहने जे उपकार तुमच्यावर केले आहेत त्याचे आभार व्यक्त करण्यात अल्लाहबरोबर त्याच्या अधिकारशून्य दासांनादेखील सामील करावे आणि आपल्या जागी असे समजून असावी की अधिकारात आणि हक्क राखण्यात अल्लाहचे हे दासदेखील त्याच्या बरोबरीचे वाटेकरी आहेत, ही गोष्ट तुम्ही योग्य कशी समजता, असा युक्तिवाद केला असल्याचे स्पष्टपणे कळते.

**२१)** म्हणजे निराधार आणि अवास्तव श्रद्धा बाळगतात की त्यांचे भाग्य उजळविणे किंवा ते बिघडविणे, त्यांचे नवस पूर्ण करणे व प्रार्थना करणे, त्यांना संतती देणे, त्यांना रोजी उपलब्ध करून देणे, त्यांच्या चाललेल्या खटल्यात जय मिळवून देणे, जितवणे व त्यांना रोगराईपासून वाचविणे, हे देव-देवतेंच्या आणि जिन्न व अगोदर व नंतरच्या विभूतींच्या अधिकारात आहे.

**२२)** म्हणजे अल्लाहला भौतिक बादशाह आणि राजे व महाराजेप्रमाणे समजू नका की ज्याप्रमाणे कोणी त्यांचा सवंगडी आणि निकटवर्ती नोकरांच्या माध्यमाविना त्यांच्याप्रत आपले अर्ज व विनंती पोहचवू शकत नाही. त्याचप्रमाणे अल्लाहसंबंधीदेखील तुम्ही अशी कल्पना करू लागावे की तो आपल्या राजमहालात फरिश्ते आणि अवलियें व इतर निकटवर्तींच्या गर्दीमध्ये बसला आहे व कोणाचे व कोणतेही काम त्या मध्यस्थाविना त्याच्या येथे होऊ शकत नाही.



आणि स्वत: काहीच अधिकार बाळगत नाही. दुसरा मनुष्य आहे ज्याला आम्ही आमच्याकडून उत्कृष्ट उपजीविका दिली आहे आणि तो त्यातून उघड व गुप्तपणे खूप खर्च करतो. सांगा हे दोन्ही समान आहेत काय? स्तुती अल्लाहसाठीच आहे.[२३] परंतु बहुतेक लोक (या सरळ गोष्टीस) जाणत नाहीत. (७५)

अल्लाह आणखी एक उदाहरण देतो. दोन माणसे आहेत, एक मुका-बहिरा आहे, कोणतेही काम करू शकत नाही, आपल्या मालकावर भार बनलेला आहे. जिकडेही त्याने त्याला पाठवावे कोणतेही भले काम त्याच्याकरवी होत नाही. दुसरा मनुष्य असा आहे की न्यायाचा आदेश देतो व स्वत: सरळ मार्गावर कायम आहे. सांगा, हे दोन्ही समान आहेत काय? (७६)

आणि पृथ्वी व आकाशांतील सत्याचे अंतर्ज्ञान तर अल्लाहलाच आहे आणि पुनरुत्थान उद्भवण्याच्या मामल्यास काहीच विलंब लागणार नाही. परंतु केवळ माणसाच्या डोळ्याचे पाते लवण्याएवढेच किंबहुना यापेक्षाही कमी, वस्तुस्थिती अशी आहे की, अल्लाह सर्वकाही करू शकतो. (७७)

अल्लाहने तुम्हाला तुमच्या मातांच्या उदरांतून निर्मिले अशा अवस्थेत की तुम्ही काहीच जाणत नव्हता. त्याने तुम्हाला कान दिले, डोळे दिले आणि विचार करणारे हृदय दिले, याकरिता की तुम्ही कृतज्ञ बनावे. (७८)

काय या लोकांनी कधी पक्षांना पाहिले नाही की नभोमंडळात वातावरणाच्या कशा प्रकारे अधीन आहेत? अल्लाहखेरीज कोणी त्यांना पेलले आहे? यात अनेक संकेत आहेत त्या लोकांकरिता जे श्रद्धा ठेवतात. (७९)

अल्लाहने तुमच्यासाठी तुमच्या घरांना विश्रांतीस्थान बनविले. त्याने जनावरांच्या कातड्यापासून तुमच्यासाठी अशी घरे निर्माण केली जी तुम्हाला प्रवास व मुक्काम दोन्ही परिस्थितीत हलकी आढळतात.[२४] त्याने जनावरांची लोकर, लव आणि केसापासून तुमच्याकरिता परिधान करण्याच्या व वापरावयाच्या अनेक वस्तू निर्माण केल्या ज्या जीवनाच्या निश्चित कालावधीपर्यंत तुम्हाला उपयोगी पडतात त्याने आपल्या निर्माण केलेल्या बऱ्याचशा वस्तूंपासून तुमच्याकरिता सावलीची व्यवस्था केली, पर्वतात तुमच्यासाठी आश्रयस्थान बनविले, आणि तुम्हाला असे पोशाख प्रदान केले जे तुम्हाला उष्णतेपासून सुरक्षित ठेवतात आणि काही इतर पोशाख जे परस्परातील युद्धात तुमचे संरक्षण करतात. अशा प्रकारे तुम्हांवर तो आपल्या देणग्यांची परिपूर्णता करतो कदाचित

**२३)** या प्रश्नाच्या उत्तरात दोन्ही बरोबर आहेत असे अनेकेश्वरवादी म्हणू शकले नाहीत. म्हणून फर्माविले, स्तुती अल्लाहसाठीच आहे, इतकी गोष्ट तर तुमच्या लक्षात आली.

**२४)** म्हणजे कातडी तंबू, अरबस्तानात तेच प्रचलित होते.

तुम्ही आज्ञाधारक बनावे. आता जर हे लोक विमुख होत असतील तर हे पैगंबर (स.), तुमच्यावर सत्याचा संदेश स्पष्टपणे पोहचवण्याखेरीज इतर कोणतीच जबाबदारी नाही. हे अल्लाहचे उपकार ओळखतात, मग त्याचा इन्कार करतात आणि यांच्यातील बहुतेक लोक असे आहेत जे सत्य स्वीकारण्यास तयार नाहीत. (८०-८३)

(यांना याचे काही भान तरी आहे की त्या दिवशी काय दशा होईल?) जेव्हा आम्ही प्रत्येक जनसमूदायातून एक साक्षीदार उभा करू, मग अश्रद्धावंतांना वाद घालण्यास संधी दिली जाणार नाही[२५] व त्यांच्याकडून पश्चात्ताप व क्षमायाचनेची मागणीदेखील केली जाणार नाही. अत्याचारी लोक जेव्हा एकदा शिक्षा पाहतील तर त्यानंतर त्यांच्या शिक्षेत कपात केली जाणार नाही आणि त्यांना एका क्षणाची सवडदेखील दिली जाणार नाही. आणि जेव्हा ते लोक ज्यांनी जगात अनेकेश्वरवाद पत्करला होता आपल्या ठरविलेल्या भागीदारांना पाहतील तेव्हा सांगतील, "हे पालनकर्त्या! हेच आहेत आमचे ते भागीदार ज्यांचा आम्ही तुला सोडून धावा करीत होतो." यावर त्यांचे ते उपास्य त्यांना स्पष्ट उत्तर देतील, "तुम्ही खोटारडे आहात."[२६] त्या वेळेस हे सर्व अल्लाहसमोर लीन होतील आणि त्यांचे ते सर्व रचलेले कुभांड परागंदा होतील जे हे जगात रचित होते ज्या लोकांनी स्वत: द्रोहाचा मार्ग अवलंबिला आणि इतरांना अल्लाहच्या मार्गापासून रोखले त्यांना आम्ही यातनेवर यातना देऊ, त्या उपद्रवाबद्दल जे ते जगात माजवीत असत. (८४-८८)

(हे पैगंबर (स.), यांना त्या दिवसासंबंधी सावध करा) जेव्हा आम्ही प्रत्येक जनसमुदायातून खुद्द त्यांच्यामधूनच एक साक्षीदार उभा करू जो त्यांच्याविरूद्ध साक्ष देईल, आणि या लोकांविरूद्ध साक्ष देण्यासाठी आम्ही तुम्हाला समोर आणू आणि (ही त्याच साक्षीची तयारी आहे की) आम्ही हा ग्रंथ तुमच्यावर उतरविला आहे जो प्रत्येक गोष्टीचा अगदी स्पष्टपणे खुलासा करणारा आहे आणि मार्गदर्शन, कृपा आणि खुशखबरी आहे त्या लोकांकरिता ज्यांनी आज्ञापालनार्थ मान तुकविली आहे. (८९)

अल्लाह न्याय, भलाई आणि नातेवाईकांचे हक्क अदा करण्याची आज्ञा देतो, आणि दुष्कर्म व स्वैराचार आणि अन्याय व अत्याचाराची मनाई करतो, तो तुम्हाला उपदेश करतो जेणेकरून तुम्ही बोध घ्यावा. अल्लाहचे करार पूर्ण करा जेव्हा तुम्ही त्याच्याशी एखादा करार केलेला असेल आणि आपल्या शपथा पक्क्या केल्यानंतर मोडून

**२५)** त्यांना आपली बाजू मांडण्याची परवानगी दिली जाणार नाही असा अर्थ नव्हे तर अर्थ असा की त्यांना आपली बाजू मांडण्यास जागाच राहणार नाही, अशा अगदी स्पष्ट आणि अखंडनीय व नि:संदिग्ध साक्षीद्वारे त्यांचे अपराध शाबीत केले जातील.

**२६)** खूषही नव्हतो, किंबहुना आम्हाला तर माहीतदेखील नव्हते की तुम्ही आम्हाला पुकारीत आहात.



टाकू नका ज्याअर्थी तुम्ही अल्लाहला आपल्यावर साक्षीदार बनविले आहे. अल्लाहला तुमची सर्व कृत्ये माहित आहेत. तुमची स्थिती त्या स्त्रीसारखी होऊ नये जिने स्वत:च परिश्रमपूर्वक सूत कातले आणि मग स्वत:च त्याचे तुकडे तुकडे करून टाकले. तुम्ही आपल्या शपथांना आपसातील व्यवहारात लुबाडण्याचे शस्त्र बनविता की जेणेकरून एका समूहाने दुसऱ्या समूहापेक्षा जास्त लाभ उचलावा. वास्तविकपाहता अल्लाह या करारमदारांच्याद्वारे तुमची परीक्षा घेतो आणि निश्चितच तो पुनरुत्थानाच्या दिवशी तुमच्या तमाम मतभेदांची वास्तविकता तुमच्यावर उघड करील. जर अल्लाहचा हेतू असा असता (की तुमच्यात कोणतेही मतभेद होऊ नयेत) तर त्याने तुम्हा सर्वांना एकच समूह बनविले असते, परंतु तो ज्याला इच्छितो त्याला पथभ्रष्टतेत टाकतो व ज्याला इच्छितो त्याला सरळ मार्ग दाखवितो आणि निश्चितच तुमच्याकडे तुमच्या कृत्यासंबंधी विचारणा झाल्याशिवाय राहणार नाही. (९०-९३)

(आणि हे मुसलमानांनो!) तुम्ही आपल्या शपथांना आपापसात एक दुसऱ्याला फसविण्याचे साधन बनवू नका. एखादे वेळी असे होऊ नये की एखादा पाया भक्कम झाल्यानंतर तो घसरावा आणि या अपराधापायी की तुम्ही, लोकांना अल्लाहच्या मार्गापासून रोखले, दुष्परिणाम पहावा व कठोर शिक्षा भोगावी.[२७] अल्लाहच्या कराराला अल्पशा लाभासाठी विकू नका, जे काही अल्लाहपाशी आहे ते तुमच्यासाठी अधिक उत्तम आहे जर तुम्ही जाणत असाल, जे काही तुमच्यापाशी आहे ते खर्च होऊन जाणार आहे व जे काही अल्लाहजवळ आहे तेच उरणार आहे आणि आम्ही जरूर संयम बाळगणाऱ्यांना त्याचे मोबदले त्यांच्या उत्तम कर्मानुसार देऊ. जो कोणी सत्कर्म करील मग तो पुरुष असो अथवा स्त्री मात्र तो श्रद्धावंत असावा, त्याच्याकडून आम्ही जगात निर्मळ जीवन व्यतीत करवू आणि (परलोकात) अशा लोकांना त्यांचा मोबदला त्यांच्या उत्तम कृत्यानुसार प्रदान करू. (९४-९७)

मग जेव्हा तुम्ही कुरआनचे पठण करू लागाल तेव्हा धिक्कारलेल्या शैतानापासून

**२७)** म्हणजे असे होता कामा नये की एखाद्या माणसाला इस्लामची सत्यता पटल्यानंतर तुमची अनैतिकता पाहून त्याला या धर्माचा वीट यावा आणि या समूहाच्या ज्या ज्या लोकांशी त्याची गाठ पडली ते चारित्र्यात व व्यवहारात त्याला काफिरांपेक्षा वेगळे आढळले नसावे, या कारणाने तो ईमानधारकांच्या समूहात सामील होण्यापासून दूर राहावा.

अल्लाहचे आश्रय मागा.[२८] त्याला त्या लोकांवर सत्ता प्राप्त होत नाही जे श्रद्धा ठेवतात व आपल्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवतात. त्याचा जोर तर त्याच लोकांवर चालतो जे त्याला आपला वाली बनवितात व त्याच्या बहकविण्याने अनेकेश्वरवाद पत्करतात. (९८-१००)

जेव्हा आम्ही एका वचनाच्या जागी दुसरे वचन अवतीर्ण करतो आणि अल्लाह उत्तम जाणतो की त्याने काय अवतरावे - तेव्हा हे लोक म्हणतात की तुम्ही स्वत: हे कुरआन रचता. खरी गोष्ट अशी आहे की यांच्यापैकी बहुतेकजण सत्यापासून अनभिज्ञ आहेत. यांना सांगा की त्याला तर पवित्र आत्म्याने ठीक ठीक माझ्या पालनकर्त्याकडून क्रमश: अवतीर्ण केले आहे.[२९] की जेणेकरून श्रद्धा ठेवणाऱ्याच्या श्रद्धेला दृढ करावे आणि आज्ञापालन करणाऱ्यांना जीवनाच्या व्यवहारात सरळमार्ग दाखवावा व त्यांना यश व सौभाग्याची शुभवार्ता द्यावी. (१०१-१०२)

आम्हाला माहीत आहे हे लोक तुमच्याविषयी असे म्हणतात की या व्यक्तीला एक मनुष्य साक्षर करतो वस्तुत: ज्या मनुष्याकडे यांचा संकेत आहे त्याची भाषा अरबी नाही आणि ही स्पष्ट अरबी भाषा आहे. वस्तुस्थिती अशी आहे की जे लोक अल्लाहच्या संकेतांना मानीत नाहीत अल्लाह कधीच त्यांना खऱ्या गोष्टीपर्यंत पोहचण्याची सद्‌बुद्धी देत नाही आणि अशा लोकांसाठी दु:खदायक प्रकोप आहे. (खोट्या गोष्टी पैगंबर रचीत नाही तर) असत्य ते लोक रचीत आहेत जे अल्लाहच्या वचनांना मानीत नाहीत.[३०]

---

२८) याचा अर्थ केवळ इतकाच नाही की तोंडाने ''अअजू बिल्लाहि मिनश्‌शैतानिर्रजीम''– ''मी बहिष्कृत शैतानापासून अल्लाहचा आश्रय घेतो'' उच्चारावे. तर याबरोबरच प्रत्यक्षात मन:पूर्वक अल्लाहशी अशी प्रार्थना देखील केली पाहिजे की कुरआनचे वाचन करताना त्याला शैतानाच्या दिशाभूल करणाऱ्या भ्रमापासून सुरक्षित ठेवावे कारण ज्याला येथून बोध प्राप्त झाला नाही त्याला मग कोठूनही बोध प्राप्त होणार नाही व ज्याने या ग्रंथापासून दिशाभूल करवून घेतली त्याला मग मार्गभ्रष्टतेच्या चक्रातून जगाची कुठलीही गोष्ट मुक्त करू शकणार नाही.

२९) मूळ अरबी शब्द 'रूहुलकुदुस'चा शाब्दिक अर्थ 'पवित्र आत्मा' किंवा 'पावित्र्यतेचा आत्मा' असा होतो. परिभाषेत हा किताब हजरत जिब्रईल (अ.) यांना दिला गेला आहे. या ठिकाणी दिव्य बोध (वह्य) आणणाऱ्या फरिश्त्याचे नाव घेण्याऐवजी त्याचा किताब प्रयुक्त करण्याचा हेतू श्रोत्यांना या वास्तवतेसंबंधी सावध करणे होय की ही वाणी एक असा आत्मा घेऊन येत आहे जो मानवी दोष आणि उणीवांपासून मुक्त आहे. तो अत्यंत सचोटीने व प्रामाणिकपणे अल्लाहचा संदेश पोहचवितो.

३०) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो 'असत्य तर ते लोक रचीत असतात जे अल्लाहच्या आयतींवर ईमान आणत नाहीत.'



वास्तविक पाहता तेच खोटे आहेत. (१०३-१०५)

जो माणूस श्रद्धा ठेवल्यानंतर द्रोह करील (तो जर) अगतिक केला गेला असेल आणि श्रद्धेवर मन संतुष्ट असेल (तर काही हरकत नाही) परंतु ज्याने मनापासून अश्रद्धा स्वीकारली तर त्याच्यावर अल्लाहचा कोप आहे. अशा सर्व लोकांसाठी मोठा प्रकोप आहे.[३१] हे याकरिता की यांनी परलोकाऐवजी ऐहिक जीवनाला पसंत केले आणि अल्लाहचा कायदा असा आहे की तो त्या लोकांना मुक्तीचा मार्ग दाखवीत नसतो ज्यांनी त्याच्या देणगीशी कृतघ्नता केली आहे. हे ते लोक आहेत ज्यांच्या हृदयावर, कानांवर व डोळ्यांवर अल्लाहने मोहर लावलेली आहे, हे गफलतीत बुडून गेले आहेत. हेच परलोकात नुकसानीत रहातील.[३२] याउलट ज्या लोकांची अशी स्थिती आहे की जेव्हा (श्रद्धा ठेवण्यामुळे) ते छळले गेले तेव्हा त्यांनी घरेदारे सोडली, स्थलांतर केले, अल्लाहच्या मार्गात कष्ट सोसले आणि धैर्य दाखविले, त्यांच्यासाठी खचितच तुझा पालनकर्ता क्षमाशील व कृपाळू आहे. (या सर्वांचा फैसला त्या दिवशी होईल) जेव्हा प्रत्येक प्राणी आपल्याच बचावाच्या काळजीत पडलेला असेल आणि प्रत्येकास त्याने केलेल्या कृत्यांचा मोबदला पुरेपूर दिला जाईल आणि कोणावरही तिळमात्र देखील अन्याय होणार नाही. (१०६-१११)

अल्लाह एका वस्तीचे उदाहरण देत आहे. ती सुखासमाधानाचे जीवन व्यतीत करीत होती आणि चहूकडून तिला विपुल उपजीविका पोहचत होती की तिने अल्लाहच्या देणग्यांशी कृतघ्नता दर्शविण्यास प्रारंभ केला. तेव्हा अल्लाहने तिच्या रहिवाशांना त्यांच्या कृत्यांची फळे अशी चाखविली की भूक व भयाचे संकट त्यांच्यावर पसरले. त्यांच्यापाशी स्वत: त्यांच्या लोकसमूहातूनच एक पैगंबर आला, परंतु त्यांनी त्याला खोटे ठरविले.

---

३१) सदरहू आयत त्या मुसलमानांसंबंधी आहे ज्यांचा त्यावेळी भयंकर छळ केला जात होता आणि असह्य यातना देऊन त्यांना कुफ्रसाठी विवश केले जात होते. त्यांना सांगितले गेले आहे की जर एखाद्या वेळी अत्याचारांपायी विवश होऊन केवळ जीव वाचविण्यासाठी तुम्ही 'कुफ्रचे वचन तोंडाने उच्चारले, आणि तुमची मने मात्र कुफ्रच्या श्रद्धेपासून अलिप्त राहिली तर क्षमा केली जाईल. परंतु जर मनापासून तुम्ही कुफ्रचा स्वीकार केला तर जगात भलेच तुम्ही आपले प्राण वाचवा, ईश्वराच्या प्रकोपापासून तुम्ही वाचू शकणार नाही.

३२) हा संकेत त्या लोकांसंबंधी आहे ज्यांनी ईमानचा मार्ग कठीण असल्याचे पाहून तो वर्ज्य केला होता व पुनहा आपल्या काफिर व अनेकेश्वरवादी राष्ट्रास जाऊन मिळाले होते.

सरतेशेवटी त्यांना प्रकोपाने गाठले जेव्हा ते अत्याचारी बनलेले होते.[३३] (११२-११३)

म्हणून हे लोकहो! अल्लाहने जी काही वैध आणि शुद्ध उपजीविका तुम्हाला दिली आहे ती खा आणि अल्लाहच्या उपकाराबद्दल कृतज्ञ व्हा जर तुम्ही खरोखर त्याचीच भक्ती करणारे असाल. अल्लाहने जे काही तुमच्यासाठी निषिद्ध ठरविले आहे ते मृत प्राणी आणि रक्त व डुकराचे मांस आणि तो प्राणी ज्याच्यावर अल्लाहशिवाय इतर कोणाचे नाव उच्चारलेले असेल. तथापि भुकेने विवश व व्याकुळ होऊन जर एखाद्याने या वस्तू खाल्ल्या, आणि त्याला अल्लाहची अवज्ञा किंवा मर्यादा भंग करण्याची इच्छा नसेल तर अल्लाह निश्चितच क्षमाशील व दयावंत आहे आणि या ज्या तुमच्या जिभा खोट्या आज्ञा काढीत असतात की ही वस्तू वैध आहे व ती निषिद्ध[३४] तर अशा आज्ञा काढून अल्लाहवर असत्य रचू नका, जे लोक अल्लाहवर खोटे कुभांड रचतात ते कदापि यश प्राप्त करीत नसतात. दुनियेतील चैन क्षणभंगूर आहे, सरतेशेवटी त्याच्यासाठी दु:खदायक शिक्षा आहे. (११४-११७)

त्या वस्तू आम्ही विशेषकरून यहूदी लोकांसाठी निषिद्ध ठरविल्या होत्या ज्याचा उल्लेख यापूर्वी आम्ही तुमच्याकडे केलेला आहे. आणि हा आमचा त्यांच्यावर अत्याचार नव्हता तर त्यांचा स्वत:चाच अत्याचार होता जो ते स्वत:वर करीत होते. तथापि ज्या लोकांनी अज्ञानामुळे वाईट कृत्ये केली आणि नंतर पश्चात्ताप करून आपल्या कृत्यात सुधारणा केली. तर खचितच पश्चात्ताप व सुधारणा केल्यानंतर तुझा पालनकर्ता

**३३)** हजरत इब्न अब्बास (रजि.) यांचे कथन आहे की या ठिकाणी खुद्द मक्का नगरीला नाव न उच्चारता उदाहरण म्हणून प्रस्तुत केलेले आहे. सदरहू भाष्यानुसार भय आणि भुकेचे जे अरिष्ट पसरण्याचा या ठिकाणी उल्लेख आहे त्याने, पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या नियुक्तीनंतर एका दीर्घ कालावधीपर्यंत जो दुष्काळ पसरला होता, तो अभिप्रेत आहे.

**३४)** ही आयत अगदी स्पष्ट उलगडा करते की वैध व अवैध ठरविण्याचा अधिकार ईश्वराखेरीज इतर कोणालाच नाही. दुसरा कोणताही इसम वैध आणि अवैधचा निर्णय देण्याचे धाडस करील, तो अमर्याद ठरेल याखेरीज की ईश्वरी कायद्याला प्रमाण मानून त्याच्या आदेशांना आधारभूत धरून अमुक वस्तू किंवा अमुक कृत्य वैध आहे व अमुक अवैध असल्याचे त्याने सांगावे. स्वच्छंदपणे वैधव अवैध ठरविण्यास अल्लाहवर असत्य व कुभांड रचणे अशासाठी फर्माविले गेले आहे की जो इसम अशा प्रकारचे हुकूम सोडतो, त्याचे सदरहू कृत्य दोन प्रकारच्या अवस्थेपासून वाचू शकत नाही. एक तर तो असा दावा सांगतो की तो ईश्वरी ग्रंथाच्या प्रमाणाची उपेक्षा करून तो ज्याला वैध अथवा अवैध म्हणत आहे ते ईश्वरानेच वैध व अवैध ठरविले आहे. किंवा त्याचा दावा असा की वैध व अवैध ठरविण्याच्या अधिकारापासून अलिप्त होऊन अल्लाहने मानवाला स्वत: आपल्या मर्जीनुसार कायदे निर्माण करण्यासाठी मुक्त सोडले आहे. यापैकी जो कोणता दावा तो अपरिहार्यत: असत्य आणि अल्लाहवर कुभांड ठरतो.



त्याच्यासाठी क्षमाशील व दयाळू आहे. वस्तुस्थिती अशी आहे की इब्राहीम (अ.) आपल्या अस्तित्वानेच एक संपूर्ण जनसमुदाय होता, अल्लाहचा आज्ञाधारक व एकाग्र. तो कधीही अनेकेश्वरवादी नव्हता. अल्लाहच्या देणग्यांप्रती कृतज्ञता व्यक्त करणारा होता. अल्लाहने त्याला निवडले आणि त्याला सरळमार्ग दाखविला. जगात त्याला भलाई दिली आणि परलोकात तो निश्चितपणे सदाचारी लोकांपैकी असेल. मग तुमच्याकडे आम्ही हे दिव्य प्रकटन पाठविले की एकाग्रतेने इब्राहीम (अ.) च्या पद्धतीचे अनुकरण करा आणि तो अनेकेश्वरवाद्यापैकी नव्हता. उरला 'सब्त' तर तो आम्ही त्या लोकांवर लादला होता ज्यांनी त्याच्या आज्ञामध्ये मतभेद निर्माण केले होते आणि निश्चितपणे तुझा पालनकर्ता पुनरुत्थानाच्या दिवशी त्या सर्व गोष्टींचा निर्णय लावील ज्यामध्ये ते मतभेद करीत राहिले आहेत. (११८-१२४)

हे पैगंबर (स.), आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे आमंत्रित करा मुत्सद्देगिरीने व उत्तम उपदेशासहित, आणि लोकांशी विवाद करा अशा पद्धतीने जी उत्तम असेल. तुमचा पालनकर्ता अधिक उत्तम जाणतो की कोण त्याच्या मार्गापासून भ्रष्ट झाला आहे आणि कोण सरळ मार्गावर आहे. आणि जर तुम्हा लोकांना बदला घ्यायचा असेल तर फक्त त्या प्रमाणांतच घ्यावा जितका तुमच्यावर अत्याचार केला गेला असेल. परंतु जर तुम्ही संयम बाळगला तर निश्चितपणे संयम बाळगणाऱ्यांसाठी उत्तम आहे. हे पैगंबर (स.), संयमाने कार्य करीत राहा आणि तुमचे हे संयम अल्लाहने दिलेल्या सुबुद्धीमुळेच आहे, या लोकांच्या कृत्यांवर दु:खी होऊ नका आणि त्यांच्या कुटिल कारवायांवर संकुचित वृत्ती बाळगू नका. अल्लाह त्या लोकांसमवेत आहे जे ईशपरायणतेने वागतात आणि परोपकार करीत असतात. (१२५-१२८)

# १७ सूरह बनीइस्राईल

*(मक्काकालीन, वचने १११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

पवित्र आहे तो जो घेऊन गेला एका रात्री आपल्या भक्ताला मस्जिदेहराम (काबा मस्जिद) पासून दूरच्या त्या मस्जिदपर्यंत जिच्या वातावरणाला त्याने समृद्धी दिली आहे जेणेकरून त्याला आपल्या काही संकेतांचे निरीक्षण घडवावे.[१] वास्तविकपणे तोच आहे सर्वकाही ऐकणारा व पाहणारा. (१)

आम्ही यापूर्वी मूसा (अ.) ला ग्रंथ दिला होता आणि त्याला बनी इस्राईलसाठी मार्गदर्शनाचे साधन बनविले होते या आदेशासह की माझ्याशिवाय कोणालाही आपला वकील बनवू नये.[२] तुम्ही त्या लोकांचे वंशज आहात ज्यांना आम्ही नूह (अ.) सह नावेवर स्वार केले होते आणि नूह (अ.) एक कृतज्ञ दास होता. मग आम्ही आपल्या ग्रंथात[३]

१) इस्लामी पारिभाषिक शब्दात 'मेअराज' या नावाने प्रसिद्ध असलेली तीच ही घटना आहे. बऱ्याचशा व विश्वासार्ह अशा निवेदनांनुसार हिजरतच्या एक वर्ष अगोदर सदरहू घटना घडली. हदीस आणि पैगंबर (स.) यांच्या चरित्रपर ग्रंथात या घटनेचा तपशील सहाबा (रजि.) यांच्या एका मोठ्या संख्येद्वारे निवेदित झाला आहे. अशा निवेदनांची संख्या २५ पर्यंत गेली आहे. दिव्य कुरआन केवळ मस्जिदे हराम (काबा मस्जिद) ते मस्जिदे अक्सा (बैतुलमक्दिस-जरोशलेम) येथपर्यंतच पैगंबर (स.) यांच्या प्रवासाचे वर्णन करतो तर बैतुलमक्दिस ते वरील जगताच्या परमोच्चस्थानी पोहचून सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरात त्यांच्या हजेरीचा सविस्तर उल्लेख हदीसीत केला गेला आहे. सदरच्या प्रवासाची कैफियत काय होती? ते स्वप्नावस्थेत घडले होते की जागृतावस्थेत? तसेच पैगंबर (स.) यांनी व्यकिश: स्वत: प्रयाण केले होते की आपल्या जागी बसल्या बसल्या केवळ अध्यात्मिक स्वरूपातच त्यांना सदरहू निरीक्षण घडविले गेले होते? दिव्य कुरआनाचे शब्द स्वत:च या प्रश्नांची उत्तरे देत आहेत. 'पवित्र आहे तो ज्याने नेले.' अशा प्रकारे वर्णनाची सुरुवात हेच दाखवीत आहे की सर्वोच्च अल्लाहच्या असामान्य अशा सामर्थ्याने साकार झालेली ही एखादी अत्यंत महान अशी असामान्य घटना होती. स्वप्नात एखाद्या व्यक्तीचे अशा प्रकारच्या गोष्टी पाहणे, अथवा आंतरिक दृष्ट्या म्हणून पाहणे या गोष्टीला इतके महत्व प्राप्त होत नाही की ती वर्णन करण्यासाठी सर्व उणीवा आणि दोषापासून पवित्र आहे. ते अस्तित्व ज्याने आपल्या दासाला हे स्वप्न दाखविले अथवा आंतरिक दृष्टाव्यात हे सर्व दाखविले. अशा प्रस्तावनेची गरज भासावी, हे अगदी स्पष्ट आहे. तसेच हे शब्ददेखील 'एका रात्री आपल्या दासाला नेले' देही प्रवास घडल्याचे द्योतक आहेत. स्वप्नावस्थेतील प्रवास अथवा आंतरिक दृष्टाव्यातील प्रवासासाठी हे शब्द कोणत्याही प्रकारे यथार्थ ठरू शकत नाहीत. म्हणून ही केवळ एक आध्यात्मिक अनुभूती नव्हती तर सर्वोच्च अल्लाहने अंतिम पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना घडविलेला एक देही प्रवास आणि साक्षात निरीक्षण होते, हे मान्य केल्याशिवाय आम्हाला गत्यंतर नाही.



बनीइस्राईलना या गोष्टीवरसुद्धा सावधान केले होते की तुम्ही पृथ्वीवर दोन वेळा मोठे उपद्रव माजवाल आणि मोठी शिरजोरी दाखवाल. सरतेशेवटी जेव्हा त्यापैकी पहिल्या शिरजोरीची वेळ आली, तेव्हा हे बनी इस्राईल! आम्ही तुमच्या विरोधात आमचे असे दास उभे केले जे फार सामर्थ्यवान होते आणि ते तुमच्या देशात सर्वत्र पसरले,[४] हे एक वचन होते जे साकार होणारच होते. त्यानंतर आम्ही तुम्हाला त्यांच्यावर वर्चस्व प्रस्थापित करण्याची संधी दिली आणि तुम्हाला संपत्ती आणि संततीद्वारे मदत केली आणि तुमची संख्या पहिल्यापेक्षा वाढविली पहा! तुम्ही भलाई केली तर ती तुमच्या स्वत:साठीच भलाई होती आणि वाईट केले तर ते तुमच्या स्वत:साठी वाईट सिद्ध झाले. मग जेव्हा दुसऱ्या वचनाची वेळ आली तेव्हा काही दुसऱ्या शत्रुंना तुमच्यावर लादले जेणेकरून त्यांनी तुमचे चेहरे विद्रुप करावेत आणि मसजिद (बैतुलमक्दिस) मध्ये तसेच शिरावे जसे पहिले शत्रू शिरले होते आणि ज्या वस्तूवर त्यांचे हात पडतील तिला नष्ट करून टाकावे.[५] शक्य आहे की आता तुमचा पालनकर्ता तुमच्यावर दया दाखवील, परंतु जर तुम्ही पुन्हा आपल्या जुन्या चालीची पुनरावृत्ती केली तर आम्हीदेखील पुन्हा आपल्या शिक्षेची पुनरावृत्ती करू आणि देणगीला लपविणाऱ्यांसाठी नरकात तुरुंग बनवून ठेवले आहे. (२-८)

वस्तुस्थिती अशी आहे की हा कुरआन तो मार्ग दाखवितो जो अगदी सरळ आहे, जे लोक याला मान्य करून भली कृत्ये करू लागतील त्यांना हा शुभवार्ता देतो की त्यांच्यासाठी मोठा मोबदला आहे. आणि जे लोक मरणोत्तर जीवनाला मानत नसतील त्यांना ही वार्ता देतो की त्यांच्यासाठी आम्ही दु:खदायक शिक्षा तयार ठेवली आहे. (९-१०)

मनुष्य अरिष्ट असे मागतो जसे भले मागितले पाहिजे. मनुष्य फारच उतावीळ

२) म्हणजे विश्वास आणि भरवशाची मदार, ज्यावर भिस्त ठेवली जावी, ज्याच्या स्वाधीन आपले सर्व मामले केले जावेत, ज्याच्याकडे मार्गदर्शन आणि मदतीसाठी रूजू केले जावे.

३) ग्रंथाचे या ठिकाणी तौरात अभिप्रेत आहे असे नाही तर दिव्य कुरआनात ज्यासाठी 'अलकिताब' (तो ग्रंथ) हे नाव पारिभाषिक शब्द म्हणून अनेक ठिकाणी प्रयोजिले गेले आहे, तो दैवी लेखसंग्रह अभिप्रेत आहे.

४) याच्याने, बनीइस्राईल लोकांवर असेरियन आणि बेबिलोनियन लोकांकरवी जो महाभयंकर विनाश ओढवला, तो सर्वनाश अभिप्रेत आहे.

५) याने अभिप्रेत, ते 'रोमन' लोक आहेत ज्यांनी बैतुलमक्दिस पूर्णपणे उद्ध्वस्त करून टाकले, 'बनी इस्राईल'ना झोडपून 'फलस्तीन' बाहेर घालविले व त्यानंतर आज दोन हजार वर्षांपासून ते जगभरात परागंदा आणि विस्कळीतावस्थेत आहेत.

ठरला आहे.[६] (११)

पहा, आम्ही रात्र आणि दिवस असे दोन संकेत बनविले आहेत. रात्रीचा संकेत आम्ही प्रकाशहीन बनविला, आणि दिवसाच्या संकेताला प्रकाशमान केले जेणेकरून तुम्ही आपल्या पालनकर्त्याची कृपा शोधावी आणि महिना व वर्षाचा हिशेब माहीत करून घ्यावा. अशाच प्रकारे आम्ही प्रत्येक गोष्टीचे पृथ:करण केले आहे. (१२)

प्रत्येक माणसाचा शकून आम्ही त्याच्या स्वत:च्या गळ्यात लटकविलेला आहे.[७] आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही एक लेख त्याच्यासाठी काढू जो त्याला उघड पुस्तकाप्रमाणे आढळेल. वाच, आपल्या कृत्यांची नोंद, आज स्वत:चा हिशेब करण्यासाठी तू स्वत:च पुरेसा आहेस. (१३-१४)

जो कोणी सरळ मार्गाचा अवलंब करील त्याचे सरळ मार्गावर चालणे त्याच्या स्वत:साठीच लाभदायक आहे. आणि जो पथभ्रष्ट होईल त्याच्या पथभ्रष्टतेचा दुष्परिणाम त्याच्यावरच होणार आहे. एखादा ओझे उचलणारा दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही.[८] आणि आम्ही शिक्षा देणार नाही जोपर्यंत की (लोकांना सत्य-असत्याचा फरक समजाविण्यासाठी) आम्ही एक पैगंबर पाठवीत नाही. (१५)

जेव्हा आम्ही एखाद्या वस्तीला नष्ट करण्याचा इरादा करतो तेव्हा तिच्या सुखवस्तू

---

६) मक्केतील काफीर, पैगंबर मुहम्मद (स.) यांना वरचेवरर जे असे म्हणत असत की, 'बस्स, आणा तो प्रकोप ज्याचे आम्हाला तुम्ही भय दाखविता' अशा त्यांच्या मूर्खपणाच्या गोष्टीचे हे उत्तर आहे. अगोदरच्या वर्णनानंतर लगेच हे वाक्य प्रतिपादन करण्याचा हेतू या गोष्टीवर तंबी देण्याचा आहे की, मूर्खांनो! इष्ट मागण्याऐवजी प्रकोप मागता? ईश्वरी प्रकोप जेव्हा एखाद्या राष्ट्रावर कोसळतो तेव्हा त्याची काय गतद होते याची तुम्हाला काही कल्पना तरी आहे? याचबरोबर काफिरांचे जुलूम व अत्याचार आणि त्यांच्या हेकेखोरीला त्रासून कधी कधी त्यांच्यावर प्रकोप कोसळविण्याची जे मुसलमान प्रार्थना करू लागत असत,– वास्तविक पाहता अद्याप त्याच काफिरांत असे लोकही मौजूद होते जे नंतर भावी काळात ईमान आणणारे आणि संपूर्ण जगात इस्लामचा झेंडा उंचावणारे होते.– अशा प्रार्थना करणाऱ्या मुसलमानांसाठीदेखील तंबी होती. यावर सर्वोच्च अल्लाह फर्मावितो की मनुष्य फारच अधीर ठरला आहे. अशी प्रत्येक वस्तूची मागणी करतो तात्कालिक जिची गरज वाटू लागावी, वास्तविकपणे नंतर त्याला स्वत:च अनुभवाने कळून येते की जर त्यावेळी त्याची प्रार्थना स्वीकारली गेली असती तर ती त्याच्यासाठी इष्ट ठरली नसती.

७) म्हणजे प्रत्येक माणसाचे सुदैव अथवा दुर्दैव आणि त्याच्या शेवटाचे भले अथवा वाईटाची कारणे व सबबी खुद्द त्याच्या अस्तित्वातच मौजूद आहेत.

८) अर्थ असा की प्रत्येक मनुष्य स्वत:साठी कायमस्वरूपी एक नैतिक जबाबदारी बाळगतो. तो आपल्या वैयक्तिक स्वरूपात सर्वोच्च अल्लाहसमोर उत्तरदायी आहे. सदरहू व्यक्तिगत जबाबदारीत इतर कोणीही व्यक्ती त्याची सहभागी नाही.



लोकानां हुकूम देतो आणि ते तिच्यात अवज्ञा करू लागतात. तेव्हा प्रकोपाचा निर्णय त्या वस्तीवर लागू होतो आणि आम्ही तिला उद्ध्वस्त करून टाकतो.[९] पाहून घ्या, कित्येक अशा पिढ्या आहेत ज्या नूह (अ.) नंतर आमच्या आज्ञेने नष्ट झाल्या. तुझा पालनकर्ता आपल्या दासांच्या पापांची पुरेपूर खबर राखणारा आहे आणि सर्वकाही पाहात आहे. (१६-१७)

जो कोणी (या जगात) झटपट लाभाचा इच्छुक असेल त्याला जे द्यायचे ते आम्ही येथेच देऊन टाकतो. मग त्यांच्या नशीबी नरक लिहितो. ज्यात तो होरपळेल निर्भर्त्सित आणि कृपेला वंचित होऊन, आणि जो मरणोत्तर जीवनाचा इच्छुक असेल व त्यासाठी प्रयत्न करील जसे त्यासाठी प्रयत्न करणे आवश्यक आहे आणि तो श्रद्धावंत असेल तर अशा प्रत्येक माणसाच्या प्रयत्नांची कदर केली जाईल.[१०] यांनाही व त्यांनाही उभयपक्षांना आम्ही (जगात) जीवनसामग्री देत आहोत, ही तुझ्या पालनकर्त्याची देणगी आहे आणि तुझ्या पालनकर्त्याच्या देणगीला प्रतिबंध करणारा कोणीही नाही. परंतु पहा, जगातच आम्ही एका गटाला दुसऱ्यावर कसे श्रेष्ठत्व दिलेले आहे.[११] आणि मरणोत्तर जीवनामध्ये

---

९) ज्या वस्तुस्थितीसंबंधी सदरहू आयतीत बजावले गेले आहे ती अशी की सरतेशेवटी समाजाला सर्वनाश करणारी गोष्ट म्हणजे त्या समाजातील सुखवस्तू आणि उच्च वर्गीयांचे बिघडणे होय. जेव्हा एखाद्या राष्ट्रावर अरिष्ट यावयाचे असले तेव्हा त्याचे श्रीमंत आणि सत्ताधारी लोक अवज्ञाकारी होऊ लागतात. जुलूम व अत्याचार आणि दुराचार व खोडसाळपणा करू लागतात, व सरतेशेवटी हाच उपद्रव संपूर्ण राष्ट्र बुडवून टाकतो. म्हणून जो समाज स्वत:च आपला शत्रू बनला नसेल त्याने सत्तासूत्रे आणि संपत्तीच्या किल्ल्या हलकट वृत्तीच्या आणि अनैतिक लोकांच्या हातात जाऊ देता कामा नये.

१०) म्हणजे त्याच्या कामाची कदर केली जाईल. जितके आणि जसे प्रयत्न त्याने परलोकातील यशासाठी केले असतील त्यांची फळे त्याला अवश्य मिळतील.

११) म्हणजे जगातच हा फरक ठळकपणे दिसून येतो की परलोकाचे इच्छुक, इहलौकिक प्रेमीपेक्षा श्रेष्ठ असतात. हे श्रेष्ठत्व या दृष्टीने नव्हे की याचे अन्न व पोषाख आणि यांची घरे व स्वाऱ्या व याच्या संस्कृती व राहणीमानाची ऐट त्या लोकांपेक्षा वरचढ आहे तर या दृष्टीने की हे लोक जे काही मिळवितात ते सचोटी, प्रामाणिकपणा व ईमानदारीने मिळवीत आहेत, आणि त्यांना जे काही प्राप्त होत आहे ते अन्यायाने, बेईमान्या करून व नाना तऱ्हेच्या हरामखोऱ्या करून प्राप्त होत आहे. मग यांना जे काही मिळते, ते तारतम्य राखून खर्च होत असते. त्यातील हक्कदारांचे हक्क अदा होतात, त्यातून याचक आणि आचवलेल्यांचाही वाटा काढला जातो व त्यातून ईश्वराच्या प्रसन्नतेसाठी इतर पुण्य कार्यासाठीदेखील द्रव्य खर्च केले जाते. याउलट इहलौकिक प्रेमींना जे काही मिळते ते जास्तीत जास्त चैनीत आणि कुकर्मात व तऱ्हेतऱ्हेच्या बिघाडाच्या व उपद्रवजनक कामात पाण्यासारखे खर्च केले जाते. अशाच प्रकारे परलोक इच्छुकांचे जीवन इहलोकप्रेमींच्या जीवनापेक्षा सर्वस्वी उच्चतर असते.

त्याचे दर्जे आणखी जास्त होतील आणि त्याची प्रतिष्ठा आणखी वरचढ असेल.

(१८-२१)

तू अल्लाहबरोबर कोणी दुसरा ईश्वर बनवू नकोस नाहीतर धिक्कारलेला व अगतिक बनून राहशील. (२२)

तुझ्या पालनकर्त्याने निर्णय दिलेला आहे की तुम्ही लोकांनी इतर कोणाचीही भक्ती करू नये परंतु केवळ त्याची. आई-वडिलांशी सद्‌वर्तन करा, जर तुमच्यापाशी त्यांच्यापैकी कोणी एक अथवा दोघे वृद्ध होऊन राहिले तर त्यांच्यासाठी 'ब्र' शब्ददेखील काढू नका व त्यांना झिडकारून प्रत्युत्तरदेखील देऊ नका. तर त्यांच्याशी आदरपूर्वक बोला, आणि नरमी व दयार्द्रतेने त्यांच्यासमोर नमून रहा. आणि प्रार्थना करीत जा की, "हे पालनकर्त्या, यांच्यावर दया कर ज्याप्रमाणे यांनी दया व वात्सल्याने बालपणी माझे संगोपन केले." तुमचा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणतो की तुमच्या मनात काय आहे. जर तुम्ही सदाचारी बनून रहाल तर तो अशा सर्व लोकांना क्षमा करणारा आहे जे आपल्या अपराधासंबंधी सावध होऊन भक्तीच्या वर्तनाकडे परततील. नातेवाईकाला त्याचा हक्क द्या आणि गरीब व वाटसरूला त्याचा हक्क. वायफळ खर्च करू नका. वायफळ खर्च करणारे शैतानाचे बंधू होत, आणि शैतान आपल्या पालनकर्त्याशी कृतघ्न आहे जर त्यांच्यापैकी (अर्थात गरजू नातेवाईक, गरीब व वाटसरूंपैकी कोणास) तुम्हाला टाळावयाचे असेल या सबबीवर की अद्याप तुम्ही अल्लाहच्या त्या कृपेला जिचे तुम्ही उमेदवार आहात, शोधत आहात तर त्यांना सौम्य उत्तर द्या. आपला हात गळ्यात अडकवू नका आणि त्याला एकदम मोकळेदेखील सोडू नका की तुम्ही निर्भर्त्सित व लाचार बनून राहावे.[१२] तुझा पालनकर्ता ज्याच्यासाठी इच्छितो, विपूल उपजीविका करतो आणि ज्याच्यासाठी इच्छितो तंग करतो, तो आपल्या दासांच्या स्थितीची खबर ठेवणारा आहे आणि त्यांना पहात आहे. आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने ठार करू नका. आम्ही त्यांनाही उपजीविका देऊ आणि तुम्हालासुद्धा. वस्तुत: त्यांना ठार करणे एक मोठा अपराध आहे. व्यभिचाराच्या जवळपास फिरकू नका, ते फार वाईट कृत्य आहे आणि अत्यंत वाईट मार्ग. कोणाचीही हत्या करू नका जिला अल्लाहने निषिद्ध ठरविले आहे, परंतु सत्यानिशी आणि जी व्यक्ती अन्यायाने ठार केली गेली असेल तिच्या वारसास आम्ही किसास (बदला) च्या मागणीचा हक्क दिला आहे.[१३] म्हणून त्याने हत्या करण्यात

---

**१२)** 'हात बांधून घेणे' ही कंजूषपणासाठी उपमा आहे व हात मोकळे सोडण्याने वायफळ खर्च अभिप्रेत आहे.

**१३)** मूळ शब्द 'त्याच्या वालीला आम्ही सुल्तान प्रदान केले आहे' असे आहेत. सुल्तानने या ठिकाणी 'प्रमाण' अभिप्रेत आहे ज्याच्या आधारे तो किसास (बदला) ची मागणी करू शकतो.



मर्यादा ओलांडू नये[१४] त्याला मदत दिली जाईल.[१५] अनाथाच्या संपत्तीजवळ फिरकू नका परंतु उत्तम रीतीने, येथपावेतो की तो आपल्या तारुण्यापर्यंत पोहचेल. वचनाचे पालन करा. नि:संशय वचनाबद्दल तुम्हाला जाब द्यावा लागेल. मापाने द्याल तेव्हा पूर्ण भरून द्या आणि वजन कराल तेव्हा ठीक तराजूने वजन करा ही चांगली पद्धत आहे आणि परिणामाच्या दृष्टीनेदेखील हीच उत्तम आहे. एखाद्या अशा गोष्टीमागे लागू नका जिचे तुम्हाला ज्ञान नसेल.[१६] निश्चितच डोळे, कान व हृदय या सर्वांच्याकडे जाब विचारला जाईल. पृथ्वीवर घमेंडीत चालू नका, तुम्ही पृथ्वीला फाडूही शकत नाही किंवा पर्वताच्या उंचीला गाठू शकत नाही. (२३-३७)

या गोष्टीपैकी प्रत्येकाचा वाईट पैलू तुझ्या पालनकर्त्याजवळ अप्रिय आहे.[१७] या त्या विवेकाच्या गोष्टी आहेत ज्यांना तुझ्या पालनकर्त्याने तुझ्यावर दिव्यप्रकटन केले आहे.

(३८)

आणि पहा! अल्लाहबरोबर कोणी दुसऱ्याला ईश्वर बनवू नकोस नाहीतर तू नरकात घातला जाशील, धिक्कारलेला आणि प्रत्येक चांगुलपणापासून वंचित होऊन,[१८] किती चमत्कारिक बाब आहे की तुमच्या पालनकर्त्याने तर तुम्हाला पुत्रसंततीने उपकृत केले आणि आपल्या स्वत:साठी दूतांना मुली बनविल्या? मोठी असत्य गोष्ट आहे जी तुम्ही लोक उच्चारता. (३९-४०)

आम्ही या कुरआनात वेगवेगळ्या प्रकारे लोकांना समजाविले की शुद्धीवर या, परंतु ते सत्यापासून अधिकच दूर पळून जात आहेत. हे, पैगंबर (स.), यांना सांगा जर

---

**१४)** हत्या करण्यात मर्यादा ओलांडण्याचे अनेक प्रकार असू शकतात व त्या सर्वांची मनाई आहे. उदा. सुडाच्या आवेशात अपराध्याशिवाय इतरांनाही ठार करणे, किंवा अपराध्याला यातना देऊन मारणे, अथवा ठार केल्यानंतर त्याच्या शवावर राग काढणे, अथवा खुनाचा मोबदला वसूल केल्यानंतर पुन्हा त्याला ठार करणे, इ.

**१५)** त्यावेळपर्यंत इस्लामी राज्य प्रस्थापित झाले नव्हते म्हणून, त्याला मदत कोण करील या गोष्टीचा उलगडा केलेला नाही. हिजरतनंतर जेव्हा इस्लामी राज्य प्रस्थापित झाले तेव्हा त्याला मदत करणे त्याच्या मित्रांचे किंवा त्याच्या जातबिरादरीचे काम नव्हे तर इस्लामी राज्य व त्याच्या न्यायसंस्थेचे काम आहे, असे निश्चित केले गेले. कोणत्याही व्यक्तीला अगर समुहाला स्वत:च सूड घेण्याचा अधिकार नाही तर हे अधिकारस्थान इस्लामी राज्याचे आहे की न्याय मिळविण्यासाठी त्याची मदत मागितली जावी.

**१६)** असे फर्माविण्यामागील आशय असा की लोकांनी आपल्या व्यक्तिगत अथवा सामूहिक जीवनात ग्रह आणि कल्पनाऐवजी 'ज्ञाना'चे अनुसरण करावे.

**१७)** म्हणजे या आज्ञांपैकी कोणतीही आज्ञा जर भंग केली गेली तर ते अप्रिय आहे.

**१८)** या फर्मानचे संबोधन प्रत्येक माणसाला आहे. अर्थ असा की हे मानवा, तू हे काम करू नकोस.

अल्लाहबरोबर दुसरेदेखील उपास्य असते जसे हे लोक म्हणतात, तर राजसिंहासनाच्या स्वामीच्या स्थानावर पोहचण्याचा त्यांनी जरूर प्रयत्न केला असता. पवित्र आहे तो आणि फार उच्च व श्रेष्ठ आहे त्या गोष्टीपासून, ज्या हे लोक सांगत आहेत. त्याचे पावित्र्य तर सप्त आकाश आणि पृथ्वी व त्या सर्व वस्तू वर्णन करीत आहेत ज्या आकाश व पृथ्वीत आहेत.[१९] कोणतीही वस्तू अशी नाही जी त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्य-गान करीत नाही, परंतु तुम्हाला त्यांचे पावित्र्य-गान समजत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की तो अत्याधिक सहिष्णू व क्षमा करणारा आहे. (४१-४४)

जेव्हा तुम्ही कुरआन पठण करता तेव्हा आम्ही तुमच्या आणि मरणोत्तर जीवनावर श्रद्धा न ठेवणाऱ्यांदरम्यान एक पडदा उभा करतो, आणि त्यांच्या हृदयावर असे अवरण घालतो की त्यांना काही समजत नाही, आणि त्यांचे श्रवणेंद्रिय बधिर करतो.[२०] आणि जेव्हा तुम्ही कुरआनमध्ये आपल्या एकमेव पालनकर्त्याचा उल्लेख करता तेव्हा ते तिरस्काराने तोंड फिरवितात.[२१] आम्हाला माहीत आहे की जेव्हा ते कान लावून तुमच्या गोष्टी ऐकतात तर खरोखर काय ऐकतात. आणि जेव्हा बसून आपापसात कान गोष्टी करतात तेव्हा काय म्हणतात. हे अत्याचारी आपापसात म्हणतात की हा तर एक जादूग्रस्त

**१९)** म्हणजे संपूर्ण सृष्टी व त्यातील प्रत्येक वस्तू आपल्या पूर्ण अस्तित्वानिशी अशी साक्ष देत आहे की ज्याने तिला निर्माण केले आहे व जो तिचे पालनपोषण व देखरेख करीत आहे, त्याचे अस्तित्व प्रत्येक दोष आणि उणीव आणि व्यंगापासून पवित्र आहे, तसेच ईशत्वात त्याचा कोणी सहभागी व वाटेकरी असावा यापासूनही तो पूर्णपणे पवित्र आहे.

**२०)** म्हणजे कुरआन जे आवाहन करीत आहे त्यासाठी माणसाच्या मनावर कुलपे लागावीत व त्याचे कान बंद करावेत, हा परलोकावर ईमान न आणण्याचा स्वाभाविक परिणाम होय. कुरआनाचे तर आवाहनच या आधारावर आहे की ऐहिक जीवनाच्या दर्शनी अंगाला पाहून फसू नका. सत्य व असत्याचे निर्णय या जगात नव्हे तर परलोकात होतील. पुण्य ते आहे ज्याचा इष्ट परिणाम परलोकात निघेल, मग जगात त्यामुळे माणसाला कितीही त्रास का होत नाही आणि दुष्टाई ती आहे जिचा परिणाम परलोकात खचितच वाईट निघेल, मग जगात ती कितीही रुचकर आणि उपयुक्त का असत नाही. आता जो इसम परलोकच मानत नाही तो कुरआनच्या सदरहू आवाहनाकडे कसे लक्ष देऊ शकतो बरे?

**२१)** म्हणजे तुम्ही एकमेव अल्लाहलाच केवळ स्वामी व मुखत्यार ठरविता व त्याचेच स्तुतीगान करता. ही गोष्ट त्यांना अत्यंत असह्य होते. ते म्हणतात, हा अजब माणूस आहे ज्याच्याजवळ, परोक्षज्ञान आहे तर अल्लाहला, सामर्थ्य आहे तर अल्लाहचे, कृती आणि अखत्यार आहेत तर बस्स केवळ अल्लाहचेच, अहो, आमचे हे ठाणकाधिष्ठित, ज्याच्याकडून आम्हाला संतती प्राप्त होते, आजाऱ्यांना रोगमुक्ती लाभते, व्यापार-धंदे चमकू लागतात, केलेले नवस पूर्ण होतात, यांनाही काही महत्व आहे की नाही?



मनुष्य आहे ज्याच्या पाठीमागे तुम्ही लोक जात आहात.[२२] पहा! कशा गोष्टी आहेत ज्या हे लोक तुमच्यावर रचतात, हे भटकलेले आहेत. यांना मार्ग सापडत नाही. (४५-४८)

ते म्हणतात, "जेव्हा आम्ही केवळ हाडे आणि माती बनून राहू तेव्हा काय आमचे पुनर्निर्माण व पुनरुत्थान केले जाईल?" यांना सांगा, "तुम्ही दगड अथवा लोखंड जरी झालात, अथवा त्याहूनसुद्धा कठीण एखादी वस्तू जी तुमच्या मनात जीवधारणेपासून दूर असेल." (तरीसुद्धा तुम्ही पुनरुत्थानापासून वाचणार नाही) ते जरूर विचारतील, "कोण आहे तो जो आम्हाला पुन्हा जीवन देईल?" उत्तरादाखल सांगा, "तोच, ज्याने तुम्हाला पहिल्यांदा निर्माण केले." ते डोके हलवून हलवून विचारतील,[२३] "बरे तर हे घडणार केव्हा?" तुम्ही सांगा, "काय आश्चर्य की ती घटका जवळच येऊन ठेपली असेल. ज्या दिवशी तो तुम्हाला पुकारील तर तुम्ही त्याची स्तुती करीत त्याच्या हाकेला ओ म्हणून निघून याल आणि तुमची कल्पना त्यावेळी अशी असेल की आम्ही तर केवळ थोड्याच वेळेपर्यंत या स्थितीत पडून राहिलो आहोत."[२४] (४९-५२)

आणि हे पैगंबर (स.), माझ्या दासांना (म्हणजे श्रद्धावंत दासांना) सांगा की मुखाने ती गोष्ट काढत जा, जी उत्तम असेल.[२५] खरे पाहता हा शैतान आहे जो माणसांच्या दरम्यान उपद्रव निर्माण करण्याचा प्रयत्न करतो. वस्तुस्थिती अशी आहे की शैतान

**२२)** मक्केच्या काफिरांची अवस्था अशी होती की लपूनछपून कुरआन ऐकत असत व मग त्यावर तोडगा कोणता असला पाहिजे यासाठी आपापसात सल्लामसलत करीत असत. बहुतेक वेळा ते आपल्याच माणसांपैकी एखाद्यावर अशी शंकाही घेत असत की कदाचित कुरआन ऐकण्याचा या माणसावर काहीतरी परिणाम झाला असावा, म्हणून ते सर्व मिळून त्याचा समज घालू लागत असत की अहो! तुम्ही हे कुणाच्या फेऱ्यात अडकत अहा, हा माणूस तर जादूग्रस्त आहे, म्हणजे कोणा शत्रूने त्यावर जादू केली आहे, म्हणून बहकल्यासारख्या गोष्टी करू लागला आहे.

**२३)** मूळ अरबी शब्द 'इन्गाज' (हलविणे) याचा डोक्याला वरून खाली आणि खालून वरच्या बाजूस हलविणे असा अर्थ होतो. ज्याप्रमाणे आश्चर्य व्यक्त करण्यासाठी, अथवा उपहास करण्यासाठी म्हणून करतो.

**२४)** म्हणजे जगात मृत्यू पावल्यापासून ते कयामतच्या दिवशी उत्थापित होण्याच्या वेळेपर्यंतचा कालावधी तुम्हाला काही तासांपेक्षा जास्त वाटणार नाही. आम्ही काही वेळ झोप घेत होतो की अकस्मात या उत्थापनेच्या गोगाटाने आम्ही खडबडून उठलो, असेच त्यावेळी तुम्ही समजाल.

**२५)** म्हणजे विरोधकांनी कशाही अप्रिय गोष्टी केल्या तरी कोणत्याही परिस्थितीत मुसलमानांनी कोणतीही असत्य गोष्ट तोंडावाटे काढू नये, की क्रोधात संयम सोडून असभ्यतेचे उत्तर असभ्यतेने दिले जाऊ नये तर शांत चित्ताने जी गोष्ट यथायोग्य असे, सत्याधिष्ठित असेल आणि त्यांच्या आवाहनाच्या प्रतिष्ठेला साजेशी असेल तीच गोष्ट बोलली जावी.

मानवाचा उघड शत्रू आहे. तुमचा पालनकर्ता तुमच्या स्थितीशी चांगलाच परिचित आहे, त्याने इच्छिले तर तुमच्यावर दया करावी अथवा इच्छिले तर तुम्हाला यातना द्यावी,[२६] आणि हे पैगंबर (स.), आम्ही तुम्हाला लोकांवर हवालदार करून पाठविलेले नाही. (५३-५४)

तुझा पालनकर्ता पृथ्वी व आकाशातील सृजनांना अधिक जाणतो. आम्ही काही पैगंबरांना काहींपेक्षा वरचढ दर्जे दिले. आणि आम्हीच दाऊद (अ.) ला 'जबूर' (ग्रंथ) दिला होता. (५५)

यांना सांगा, "अल्लाह व्यतिरिक्त ज्यांचा तुम्ही धावा करता ते कोणताही त्रास तुमच्यापासून दूरही करू शकत नाहीत अथवा बदलूदेखील शकत नाहीत.[२७] ज्यांचा धावा हे लोक करतात ते तर स्वत:च आपल्या पालनकर्त्याच्या ठायी पोहचण्यासाठी वशिला शोधत आहेत की कोण त्यांच्या अधिक जवळचा होतो आणि ते त्याच्या कृपेचे इच्छुक आणि त्याच्या प्रकोपापासून भयभीत आहेत.[२८] वस्तुस्थिती अशी आहे की तुझ्या पालनकर्त्याचा प्रकोप आहेच भीती धरण्यालायक. (५६-५७)

आणि कोणतीही वस्ती अशी नाही जिला आम्ही पुनरुत्थानापूर्वी नष्ट करणार नाही अथवा भयंकर यातना देणार नाही. हे ईश्वरी लेखात नमूद केलेले आहे. (५८)

आणि आम्हाला संकेत पाठविण्यास प्रतिबंध केला नाही, परंतु या गोष्टीने की

**२६)** म्हणजे, आम्ही जन्नती आहोत व अमुक व्यक्ती अगर समूह, दोजखी-नरकास पात्र आहे. असले दावे ईमानवाल्यानी कदापि सांगू नयेत. याबाबतचा निर्णय अल्लाहच्याच अखत्यारीत आहे. तोच सर्व माणसांचे अंतरंग व बाह्यरंग आणि त्यांचे वर्तमान व भविष्य जाणतो. कुणावर कृपा करावी व कुणाला यातना द्यावी याचा निर्णय तोच घेणार आहे. तात्विकदृष्ट्या अल्लाहच्या ग्रंथाच्या आधारे, कोणत्या प्रकारची माणसे कृपेस पात्र आहेत व कोणत्या प्रकारची माणसे यातनेस पात्र, असे म्हणण्याचा एखाद्या मुसलमानाला अधिकार जरूर आहे परंतु अमुक माणसाला यातना दिली जाईल व अमुक माणसाला क्षमा मिळेल असे म्हणण्याचा कुणासही अधिकार नाही.

**२७)** केवळ अल्लाहशिवाय इतरांनाही सजदा करणे अनेकेश्वरोपासना आहे असे नाही तर अल्लाहशिवाय एखाद्या दुसऱ्या कोणाची प्रार्थना करणे किंवा त्याला मदतीसाठी पुकारणे हादेखील अनेकेश्वरवाद आहे, ही गोष्ट यावरून अगदी स्पष्टपणे कळते.

**२८)** हे शब्द अगदी स्पष्टपणे निदर्शनास आणत आहे की अनेकेश्वरवाद्यांच्या ज्या उपास्यांचा आणि फिर्याद ऐकणाऱ्यांचा या ठिकाणी उल्लेख केला जात आहे, त्याच्याने दगडी मूर्ती अभिप्रेत आहेत असे नाही तर एकतर फरिश्ते आहेत किंवा गत काळातील प्रतिष्ठित माणसे आहेत.



यांच्यापूर्वीच्या लोकांनी त्यांना खोटे ठरविले आहे.[२९] (म्हणून पहा) समूद लोकांना आम्ही जाहिररीत्या सांडणी आणून दिली आणि त्यांनी तिच्यावर अत्याचार केला. आम्ही संकेत याचसाठी पाठवीत असतो की लोकांनी ते पाहून भयभीत व्हावे. स्मरण करा हे पैगंबर (स.), आम्ही तुम्हाला सांगून टाकले होते की तुझ्या पालनकर्त्याने या लोकांना वेढून टाकले आहे. आणि हे जे काही आम्ही तुम्हाला आता दाखविले आहे[३०] याला आणि त्या झाडाला ज्याला कुरआनमध्ये धिक्कारले गेले आहे,[३१] आम्ही या लोकांसाठी केवळ एक उपद्रव बनवून ठेवले आहे.[३२] आम्ही यांना इशाऱ्यावर इशारा देत राहिलो आहोत, परंतु प्रत्येक इशारा त्यांच्या शिरजोरीत वाढ करीत राहिला आहे. (५९-६०)

आणि स्मरण करा जेव्हा आम्ही दूतांना सांगितले की, आदमपुढे नतमस्तक व्हा तेव्हा सर्व नतमस्तक झाले पण इब्लीस (शैतान) नतमस्तक झाला नाही. त्याने सांगितले, "काय मी त्याच्यापुढे नतमस्तक होऊ ज्याला तू मातीने बनविले आहेस?" मग तो म्हणाला, "पहा तर खरे, काय हा माझ्यावर श्रेष्ठत्व प्रदान करण्यायोग्य होता? जर तू मला पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत सवड दिलीस तर मी याच्या संपूर्ण वंशाचे समूळ उच्चाटन करून टाकीन. केवळ थोडेच लोक माझ्यापासून वाचतील." सर्वश्रेष्ठ अल्लाहने फर्माविले, "बरे तर जा, यांच्यापैकी जे कोणी तुझे अनुकरण करतील तुझ्यासह त्या

**२९)** काफिरांची ही मागणी की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना एखादा चमत्कार दाखवावा, त्याचे हे उत्तर आहे. सांगण्याचा आशय असा की असा चमत्कार पाहिल्यानंतर जेव्हा लोक त्याला खोटे ठरवितात, तेव्हा मग अपरिहार्यपणे त्यांच्यावर प्रकोप कोसळविणे आवश्यक होते व अशा लोकसमूहाला नष्ट केल्याविना सोडले जात नाही. आता ही अल्लाहची सर्वस्वी कृपाच आहे की तो असले कोणतेही चमत्कार धाडीत नाही. परंतु चमत्काराची मागणी करून समूद लोकांप्रमाणे स्वत:ची दुर्गत बनवू इच्छिता, इतके तुम्ही मूर्ख लोक आहात.

**३०)** संकेत 'मेअराज'कडे आहे. या ठिकाणी मूळ अरबी शब्द 'रुअ्या' स्वप्नाच्या अर्थात नाही तर डोळ्यांनी पाहण्याच्या अर्थात आहे.

**३१)** अर्थात 'जक्कुम' वृक्ष, ज्यासंबंधी कुरआनात कळविले गेले आहे की तो नरकाच्या तळात उत्पन्न होईल व नरकवासींना ते खावे लागेल. त्याचा धिक्कार करण्याने, त्याचे अल्लाहच्या कृपेपासून दूर होणे अभिप्रेत आहे.

**३२)** म्हणजे त्यांच्या भल्यासाठी आम्ही तुम्हाला 'मेअराज'चे निरीक्षण घडविले, जेणेकरून तुमच्यासारख्या सत्यनिष्ठ आणि विश्वासार्ह माणसाद्वारे या लोकांना मूळ वास्तवतेचे ज्ञान प्राप्त व्हावे आणि सावध होऊन त्यांनी सरळ मार्गावर यावे. परंतु या लोकांनी उलट यासाठी तुमचा उपहास केला. आम्ही तुमच्याकरवी यांना सावध केले की येथील हरामखोऱ्या सरतेशेवटी तुम्हाला 'जक्कुम'चे घास गिळविल्याशिवाय राहणार नाही, परंतु त्यांनी याची टर उडविली आणि म्हणू लागले, जरा हा माणूस पहा, एकीकडे म्हणतो की नरकात भयंकर अग्नी भडकत असेल तर दुसरीकडे माहिती सांगतो की तेथे झाडे उगतील.

सर्वांसाठी नरकातच भरपूर मोबदला आहे. तू ज्याला ज्याला आपल्या आमंत्रणाने फूस लावू शकतो, लाव. त्यांच्यावर आपले स्वार व प्यादे चालून आण, संपत्ती आणि संततीमध्ये त्यांच्याबरोबर भागीदारी कर आणि त्यांना आश्वासनाच्या जाळ्यात अडकव आणि शैतानाचे आश्वासन एका फसवणुकीशिवाय काहीही नाही, नि:संशय माझ्या दासांवर तुला कोणताही अधिकार प्राप्त होणार नाही आणि भिस्त ठेवण्यासाठी तुझा पालनकर्ता पुरेसा आहे.'' (६१-६५)

तुमचा (खरा) पालनकर्ता तर तो आहे, जो समुद्रात तुमची नौका वल्हवितो जेणेकरून तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा. वस्तुस्थिती अशी आहे की तो तुमच्या स्थितीवर अत्यंत मेहरबान आहे. जेव्हा समुद्रात तुमच्यावर संकट येते, तेव्हा त्या एकाशिवाय अन्य ज्यांचा तुम्ही धावा करीत असता ते सर्व हरवलेले असतात. परंतु जेव्हा तो तुम्हाला वाचवून खुष्कीवर पोहचवितो तेव्हा तुम्ही त्याच्यापासून विमुख होता. मनुष्य खरोखरच मोठा कृतघ्न आहे. बरे तर काय तुम्ही या गोष्टीपासून अगदीच निर्भय आहांत की अल्लाहने तुम्हाला एखादे वेळी खुष्कीवरच जमिनीत खचवावे किंवा तुमच्यावर दगडांचा वर्षाव करणारे वादळ पाठवावे आणि त्यापासून तुम्हाला वाचविणारा कोणीही संरक्षक सापडू नये? आणि काय तुम्हाला याची भीती नाही की अल्लाहने पुन्हा एखादेवेळी तुम्हाला समुद्रात न्यावे आणि तुमच्या कृतघ्नतेबद्दल भयंकर वादळी वारा पाठवून तुम्हाला बुडवून टाकावे आणि तुमच्या या दुर्दशेची खबरबात विचारणारा कोणीच सापडू नये, ही तर आमची मेहरबानी आहे की आम्ही मानवजातीला मोठेपण दिले आणि त्यांना खुष्की व जलमार्गावर वाहने दिली आणि त्यांना निर्मल पदार्थांचे अन्न दिले व आपल्या बऱ्याचशा निर्मितीवर स्पष्ट श्रेष्ठत्व प्रदान केले. मग विचार करा त्या दिवसाचा जेव्हा आम्ही प्रत्येक मानवगटाला त्याच्या नेत्यासह बोलवू त्यावेळी ज्या लोकांना त्यांचा कृति-लेख उजव्या हातात दिला गेला ते आपली कार्यनोंद वाचतील आणि त्यांच्यावर तिळमात्रदेखील अन्याय होणार नाही. आणि जो या जगात अंध बनून राहिला तो परलोकातसुद्धा नेत्रहीनच राहील, किंबहुना मार्गप्राप्तीत नेत्रहीनाहूनदेखील अधिक अपयशी. (६६-७२)

हे पैगंबर (स.), या लोकांनी या प्रयत्नांत कोणतीही उणीव राहू दिली नाही की तुम्हाला उपद्रवात टाकून त्या दिव्य प्रकटनापासून परावृत्त करावे, जो आम्ही तुमच्याकडे पाठविला आहे, जेणेकरून तुम्ही आमच्या नावाने स्वत:कडून एखादी गोष्ट रचावी. जर तुम्ही असे केले असते तर त्यांनी जरूर तुम्हाला आपले मित्र बनविले असते. आणि जर आम्ही तुम्हाला दृढ ठेवले नसते तर तुम्ही त्यांच्याकडे काही ना काही अंशी झुकला असता. परंतु जर तुम्ही असे केले असते तर आम्ही तुम्हाला जगातसुद्धा दुहेरी यातना चाखावयास लावली असती आणि परलोकातसुद्धा दुहेरी यातना, मग आमच्याविरूद्ध



तुम्हाला कोणीच सहायक मिळाला नसता. (७३-७५)

आणि हे लोक या गोष्टीलासुद्धा तत्पर राहिलेले आहेत की तुमचे पाय या भूमीवरून उखडून टाकावेत व तुम्हाला येथून बाहेर घालवून द्यावे, परंतु हे जर असे करतील तर तुमच्यानंतर हे स्वत: येथे काही जास्त काळ टिकू शकणार नाहीत. (७६)

हा आमचा कायमचा शिरस्ता आहे, जो त्या सर्व पैगंबरांसंबंधी आम्ही अवलंबिला आहे, ज्यांना तुमच्यापूर्वी आम्ही पाठविले होते आणि आमच्या शिरस्त्यात तुम्हाला कोणताही बदल आढळणार नाही. (७७)

नमाज कायम करा मध्यान्हीनंतर ते रात्रीच्या अंधारापर्यंत.[३३] आणि प्रात:कालीन कुरआन (पठण) देखील आवश्यक करा. कारण प्रात:कालीन कुरआन साक्षात असतो.[३४] मध्यरात्री 'तहज्जूद' (विशिष्ट नमाज) पठण करा,[३५] ही तुम्हासाठी 'नफ्ल' (अतिरिक्त) देणगी आहे. जेणेकरून तुमच्या पालनकर्त्याने तुम्हास स्तुत्यस्थानावर आरूढ करावे.[३६]

(७८-७९)

आणि प्रार्थना करा, ''हे पालनकर्त्या, मला जेथे कोठे तू नेशील सत्यानिशी ने आणि जेथून काढावयाचे असेल, सत्यानिशी काढ आणि आपल्याकडून एका सत्ताधिकारास माझे सहायक बनव.[३७] (८०)

आणि घोषणा कर की, ''सत्य आले आणि असत्य नष्ट झाले. असत्य तर नष्ट होणारच आहे.'' (८१)

आम्ही या कुरआनच्या अवतरणक्रमात ते काही उतरवित आहोत जे त्याच्या अनुयायांसाठी तर रोगनिवारक आणि कृपा आहे, परंतु अत्याचाऱ्यांकरिता हानीव्यतिरिक्त

---

**३३)** यात दुपारच्या 'जुहर'पासून ते रात्रीच्या 'ईशा'पर्यंतच्या चारही नमाज येतात.

**३४)** पहाटेच्या कुरआनने, पहाटेच्या नमाजीत कुरआन पठन करणे अभिप्रेत आहे. प्रात: कुरआनचे साक्षी असण्याचा अर्थ असा की ईश्वराचे फरिश्ते विशेष करून त्याचे साक्षीदार बनतात कारण त्याला एक विशेष महत्व प्राप्त आहे.

**३५)** 'तहज्जुद'चा अर्थ झोप मोडून उठणे असा होतो. म्हणून रात्रीच्या वेळी तहज्जुद करण्याचा अर्थ असा की रात्रीचा एक भाग झोपेत काढल्यानंतर मग उठून नमाज पढली जावी.

**३६)** म्हणजे इहलोकात व परलोकात तुम्हाला अशा दर्जावर पोहचवावे जेथे तुम्ही निर्मितीकरवी स्तुत्य बनून राहावे. चोहीकडून तुम्हावर प्रशंसा आणि वाखाणणीचा वर्षाव व्हावा आणि तुमचे अस्तित्व एक प्रशंसनीय अस्तित्व ठरावे.

**३७)** म्हणजे एकतर खुद्द मलाच सत्ता प्रदान कर किंवा एखाद्या सत्तेला माझी सहायक बनव जेणेकरून, तिच्या शक्तीने मी जगातील हे बिघाड दुरुस्त करू शकावे, अश्लीलता आणि अवज्ञेचे हे महापूर थोपवू शकावे व तुझा न्यायपूर्ण कायदा प्रचलित करू शकावे.

अन्य कोणत्याच गोष्टीत वाढ करीत नाही. मानवाची अवस्था अशी आहे की आम्ही जेव्हा त्याला देणगी प्रदान करतो तेव्हा तो ऐटीत येतो व पाठ दाखवतो आणि जेव्हा जरा संकटात सापडतो तेव्हा निराश होऊ लागतो. हे पैगंबर (स.), या लोकांना सांगा की, ''प्रत्येक आपल्या पद्धतीने काम करीत आहे, आता तुमचा पालनकर्ताच हे उत्तम जाणतो की सरळ मार्गावर कोण आहे.'' (८२-८४)

हे लोक तुम्हाला आत्म्याविषयी विचारतात, सांगा, ''हा आत्मा माझ्या पालनकर्त्याच्या आज्ञेने येतो, पण तुम्हा लोकांना अल्पज्ञान मिळाले आहे.''[३८] आणि हे पैगंबर (स.), आम्ही इच्छिले तर ते सर्वकाही तुमच्याकडून हिरावून घेऊ, जे आम्ही तुम्हाला दिव्य प्रकटनाद्वारे प्रदान केले आहे. मग आमच्याविरूद्ध तुम्हाला कोणी समर्थक मिळणार नाही, जो ते परत मिळवून देऊ शकेल. हे तर जे काही तुम्हाला प्राप्त झाले आहे तुमच्या पालनकर्त्याच्या कृपेने मिळाले आहे, वस्तुस्थिती अशी आहे की त्याची कृपा तुम्हावर फार मोठी आहे. सांगून टाका की मानव आणि जिन (अदृश्य निर्मिती) सर्वच्या सर्वजणांनी मिळून जरी या कुरआनसारखी एखादी वस्तू आणण्याचा प्रयत्न केला तरी आणू शकणार नाही, मग ते सर्व एक दुसऱ्याचे सहायक का असेनात. (८५-८८)

आम्ही या कुरआनात लोकांना वेगवेगळ्या पद्धतीने समजाविले पण बहुतेक लोक नकार देण्यावरच दृढ राहिले. आणि त्यांनी सांगितले, ''आम्ही तुझे म्हणणे मान्य करणार नाही, जोपर्यंत तू आमच्यासाठी जमीन चिरून एक झरा प्रवाहित करीत नाहीस. अथवा तुझ्यासाठी खजूर व द्राक्षांची एक बाग निर्माण व्हावी आणि तू त्यात कालवे प्रवाहित करावेस. अथवा तू आकाशाचे तुकडे-तुकडे करून आमच्यावर कोसळवावेस जसा की तुझा दावा आहे. अथवा अल्लाह आणि दूतांना आमच्या समक्ष समोरासमोर आणावे. अथवा तुझ्यासाठी सोन्याचे एक घर बनवावे. अथवा तू आकाशावर चढून जावे आणि

**३८)** या ठिकाणी 'रुह' या शब्दाने आत्मा अभिप्रेत आहे असे सर्वसामान्यपणे समजले जाते. म्हणजे लोकांनी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याकडे जीवन आत्म्यासंबंधी विचारले होते की त्याची वास्तवता काय आहे, तर तो अल्लाहच्या आज्ञेने येत असतो, असे त्याचे उत्तर दिले गेले. परंतु आयतीचा संदर्भ दृष्टीसमोर ठेवून पाहिल्यास या ठिकाणी आत्म्याने अभिप्रेत प्रेषितत्वाचा आत्मा अथवा दिव्यबोध (वह्य) असल्याचे स्पष्टपणे कळते. हीच गोष्ट सूरह नह्ल, आयत क्र. २ आणि सूरह मोमिन, आयत क्र. १५ व सूरह शूरा आयत क्र. ५२ मध्ये फर्माविली गेली आहे. प्रारंभिक काळातील विद्वानांपैकी इब्ने अब्बास (रजि.), कतादा व हसन बसरी (रह.) यांनीदेखील हेच भाष्य स्वीकारले आहे. 'रहुल्मआनी'कार यांनी 'हसन बसरी' व 'कतादा' यांचे कथन उद्धृत केले की, 'रुह-आत्माने अभिप्रेत हजरत जिब्रईल (अ.) आहेत व ते कसे उतरतात आणि कशा प्रकारे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या हृदयात दिव्यबोध टाकतात, मूळ प्रश्न असा होता.'



तुझ्या चढण्यावरदेखील आम्ही विश्वास करणार नाही, जोपर्यंत तू आमच्यावर एक असा लेख उतरवून आणत नाहीस ज्यास आम्ही वाचावे,'' हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''पवित्र आहे माझा पालनकर्ता काय एक संदेश आणणाऱ्या मानवाशिवाय मी अन्य काही आहे?'' (८९-९३)

लोकांसमोर जेव्हा कधी मार्गदर्शन आले तेव्हा त्याच्यावर श्रद्धा ठेवण्यासाठी त्यांना कोणत्याही गोष्टीने रोखले नाही परंतु त्यांच्या याच वचनाने की, ''काय अल्लाहने मानवाला पैगंबर बनवून पाठविले?'' यांना सांगा, जर भूतलावर ईशदूत समाधानाने वावरू लागले असते, तर जरूर आम्ही आकाशातून एखाद्या ईशदूतालाच त्यांच्यासाठी पैगंबर बनवून पाठविले असते. (९४-९५)

हे पैगंबर (स.), यांना सांगून टाका की माझ्या व तुमच्या दरम्यान केवळ एक अल्लाहची साक्ष पुरेशी आहे. तो आपल्या दासांच्या स्थितीची खबर राखणारा आहे आणि सर्व काही पहात आहे. (९६)

ज्याला अल्लाहने बोधित केले तोच मार्गदर्शन मिळविणारा आहे, आणि ज्याला तो मार्गभ्रष्ट करील त्याच्याशिवाय अशा लोकांसाठी तुला कोणीच समर्थक व सहायक मिळू शकत नाही. या लोकांना आम्ही पुनरुत्थानाच्या दिवशी तोंडघशी फरफटत आणू. आंधळे, मुके आणि बहिरे, यांचे ठिकाण नरक आहे. जेव्हा जेव्हा तिची आग मंद पडू लागेल आम्ही तिला आणखीन प्रदिप्त करू. हा बदला आहे त्यांच्या या कृत्यांचा की त्यांनी आमच्या आयतींचा इन्कार केला आणि म्हटले, ''आम्ही जेव्हा केवळ हाडे व माती बनून जाऊ तेव्हा नव्याने आम्हाला निर्माण करून उभे केले जाईल काय?'' काय त्यांना हे उमगले नाही की ज्या अल्लाहने आकाश व पृथ्वी निर्माण केली तो या सारख्यांना निर्माण करण्याचे सामर्थ्य अवश्य राखतो? त्याने यांच्या पुनरुत्थानाची एक वेळ निश्चित केली आहे जिचे येणे नि:संशय आहे, पण अत्याचाऱ्यांचा हट्ट आहे की ते त्याचा इन्कारच करतील. (९७-९९)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''जर एखादे वेळी माझ्या पालनकर्त्याच्या कृपेचे खजिने तुमच्या ताब्यात असते तर तुम्ही खर्च होण्याच्या भीतीने त्यांना जरूर रोखून ठेवले

असते, खरोखरच मनुष्य मोठा संकुचित मनाचा आहे.[३९] (१००)

आम्ही मूसा (अ.) ला नऊ संकेतचिन्हे प्रदान केली होती, ती स्पष्टपणे दिसत होती.[४०] आता तुम्ही स्वत: बनी इस्राईलना हे विचारा की जेव्हा मूसा (अ.) त्यांच्याकडे आले तेव्हा फिरऔनने हेच सांगितले होते ना की, ''हे मूसा (अ.) मी समजतो की तू जरूर एक जादूपीडित आहेस.'' मूसा (अ.) ने त्याच्या उत्तरादाखल सांगितले, ''तुला चांगलेच माहीत आहे की, हे दृष्टी वृद्धींगत करणारे संकेत जमीन व आकाशाच्या पालनकर्त्याशिवाय कोणीही उतरविलेले नाहीत,[४१] आणि माझी कल्पना अशी आहे की हे फिरऔन तू जरूर एक शापित मनुष्य आहेस.'' सरतेशेवटी फिरऔनने बेत केला की मूसा (अ.) आणि बनीइस्राईलचे पृथ्वीवरून उच्चाटन करून टाकावे परंतु आम्ही त्याला व त्याच्या सोबत्यांना एकत्रितपणे बुडवून टाकले. आणि त्यानंतर बनीइस्राईलना सांगितले की आता तुम्ही धरतीवर रहा, मग जेव्हा मरणोत्तर जीवनाच्या वचनाच्या पूर्ततेची वेळ येऊन ठेपेल तर आम्ही तुम्हा सर्वांना एकत्र आणून हजर करू. (१०१-१०४)

या कुरआनला आम्ही सत्यानिशी उतरविले आहे आणि सत्यानिशीच हा अवतरला आहे आणि हे पैगंबर (स.)! तुम्हाला आम्ही याव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामाकरिता पाठविले नाही की (जो मान्य करील त्याला) शुभवार्ता द्या आणि (जो मान्य करणार नाही त्याला) ताकीद द्या. आणि या कुरआनला आम्ही थोडे थोडे करून उतरविले आहे जेणेकरून तुम्ही थांबून थांबून सावकाशपणे ते लोकांना ऐकवावे, आणि याला आम्ही

**३९)** मक्केचे अनेकेश्वरवादी ज्या मानसिक कारणांनी पैगंबर (स.) यांच्या प्रेषितत्वाचा इन्कार करीत असत, त्यापैकी एक महत्वाचे कारण असे की तसे न केल्याने त्यांना पैगंबर (स.) यांचे श्रेष्ठत्व मान्य करावे लागत होते परंतु आपल्या एखाद्या समकालीन अथवा समवर्गीयाचे श्रेष्ठत्व मान्य करण्यात माणूस मुश्किलीनेच तयार होत असतो. यासाठीच फर्माविले जात आहे की, कोणाचेही वास्तविक श्रेष्ठत्व मान्य करण्यात हृदये दु:खी व्हावीत या अवस्थेला ज्यांची कृपणता पोहचली आहे अशा लोकांना जर एखाद्या वेळी ईश्वराने आपल्या कृपेच्या खजिन्याच्या किल्ल्या सुपूर्द केल्या असत्या तर त्यांनी कुणाला फुटकी कवडी देखील दिली नसती.

**४०)** या ९ निशाण्यांचा तपशील सूरह आअराफ मध्ये येऊन गेला आहे.

**४१)** हजरत मूसा (अ.) यांनी ही गोष्ट अशासाठी फर्माविली की एका संपूर्ण देशात दुश्काळ पडणे, अथवा लक्षावधी चौरस मैल भूभाग व्याप्त असलेल्या मुलूखात बेडकांचा एक आपत्तीच्या रूपात सुळसुळाट होणे, अथवा संपूर्ण देशातील धान्यसाठ्यांना कीड लागणे, व अशाच प्रकारची इतर सार्वत्रिक अरिष्टे कोणा जादूगाराच्या जादू, अथवा कोणा मानवी शक्तीच्या प्रयोगांनी प्रकट होऊ शकत नाहीत. जादूगार केवळ एका मर्यादित ठिकाणी एका जमावाच्या नजरांवर जादू करून त्यांना काही चमत्कार दाखवू शकतो, तेदेखील वास्तविक असतात असे नाही तर केवळ दृष्टीची फसवणूक कणारे असतात.



(वेळोवेळी) क्रमश: उरतविले आहे. हे पैगंबर (स.)! या लोकांना सांगा, तुम्ही याला माना अथवा मानू नका. ज्या लोकांना यापूर्वी ज्ञान दिले गेले आहे त्यांना जेव्हा हा ऐकविला जातो तेव्हा ते साष्टांग नतमस्तक होतात, आणि म्हणतात, ''पवित्र आहे आमचा पालनकर्ता त्याचे वचन तर पूर्ण होणारच होते.'' आणि ते रुदन करत साष्टांग घालतात आणि याला ऐकून त्यांची विनम्रता आणखी वृद्धिंगत होते. (१०५-१०९)

हे पैगंबर (स.)! यांना सांगा, ''अल्लाह म्हणून साद घाला अथवा कृपावंत म्हणून, ज्या नावानेदेखील तुम्ही साद घालाल त्याच्याकरिता सर्व चांगलीच नावे आहेत.''[४२] आणि आपली नमाज फार मोठ्या आवाजानेही अदा करू नका न फार खालच्या आवाजात, या दोहो दरम्यान मध्यम स्वरूपाच्या स्वराचा अवलंब करा.[४३] आणि म्हणा, स्तुती आहे त्या अल्लाहसाठी ज्याने कुणाला स्वत:चा पुत्रही बनविले नाही व कोणी त्याच्या साम्राज्यात त्याचा भागीदार नाही आणि तो लाचारही नाही की एखादा त्याचा पाठीराखा असावा. आणि त्याचा महिमा वर्णन करा. कमाल दर्जाचा महिमा.

(११०-१११)

**४२)** मक्केतील अनेकेश्वरवाद्यांचा हा आक्षेप की सृजनकर्त्यासाठी 'अल्लाह' असे नाव तर आम्ही ऐकले होते, परंतु 'रहमान' हे नाव तुम्ही कोठून आणले? त्याचे हे उत्तर आहे. त्यांच्या येथे सर्वोच्च अल्लाहसाठी 'रहमान' हे नाव प्रचलित नसल्या कारणाने ते या नावावर नाक मुरडीत असत.

**४३)** हजरत इब्ने अब्बास (रजि.) यांचे कथन आहे की मक्केत जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) किंवा इतर सहाबा (रजि.) नमाज पढतांना मोठ्याने कुरआन पठन करीत असत तेव्हा काफिर गोंधळ माजवू लागत आणि पुष्कळदा शिवीगाळीचाही वर्षाव करू लागत. यासाठी आज्ञा झाली की इतक्या मोठ्यानेही पठन करू नका की जे ऐकून काफिरांनी गोंधळ घालावा व इतक्या धीमेपणेदेखील पठन करू नका की ते तुमच्या सोबत्यांनाही ऐकू येऊ नये. सदरहू आज्ञा केवळ त्याच परिस्थितीपुरती मर्यादित होती. मदीनेत जेव्हा परिस्थिती पालटली तेव्हा सदरहू आज्ञा उरली नाही. तथापि जेव्हा कधी मुसलमानांना मक्केसारख्या त्या परिस्थितीला सामोरे जावे लागेल त्यांनी याच आदेशानुसार वागले पाहिजे.

# १८ सूरह अल्कहफ

*(मक्काकालीन, वचने ११०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

स्तवन अल्लाहसाठी आहे, ज्याने आपल्या भक्तांवर हा ग्रंथ अवतरला आणि त्यात काही वक्रता ठेवली नाही. यथायोग्य सरळ गोष्ट सांगणारा ग्रंथ, जेणेकरून त्याने लोकांना अल्लाहच्या कठोर प्रकोपापासून सावध करावे आणि श्रद्धा ठेवून सत्कृत्ये करणाऱ्यांना खुशखबर द्यावी की त्यांच्याकरिता चांगला मोबदला आहे, ज्यांत ते सदैव राहतील, आणि त्या लोकांना भय दाखवावे जे सांगतात की अल्लाहने कोणा एकाला मुलगा बनविला आहे. या गोष्टीचे यांनाही काही ज्ञान नाही व त्यांच्या पूर्वजांनादेखील नव्हते, भयंकर गोष्ट आहे जी त्यांच्या तोंडातून निघते, ते निव्वळ खोटे बरळतात. (१-५)

बरे तर हे पैगंबर (स.)! कदाचित तुम्ही यांच्या मागे दु:खापायी आपले प्राण गमावणार आहात, जर यांनी या शिकवणुकीवर श्रद्धा ठेवली नाही? वस्तुस्थिती अशी आहे की हा जो काही सरंजाम पृथ्वीवर आहे, याला आम्ही पृथ्वीचा शृंगार बनविला आहे जेणेकरून या लोकांची परीक्षा घ्यावी की यांच्यापैकी कोण अधिक चांगली कृत्ये करणारा आहे. सरतेशेवटी हे सर्व आम्ही एक सपाट मैदान बनवणार आहोत. (६-८)

काय तुम्ही समजत आहात की गुहा व शिलालेखवाले[१] आमच्या एखाद्या मोठ्या चमत्कारिक संकेतांपैकी होते? जेव्हा ते काही नवयुवक गुहेत आश्रित झाले व त्यांनी सांगितले, ''हे पालनकर्त्या! आम्हाला आपल्या विशेष कृपेने अनुग्रहीत कर आणि आमचा मामला दुरुस्त कर.'' तर आम्ही त्यांना त्याच गुहेत थांबवून वर्षानुवर्षे निद्रावस्थेत ठेवले मग आम्ही त्यांना उठविले, जेणेकरून पहावे त्यांच्या दोन गटांपैकी कोण आपल्या अस्तित्वमुदतीची बरोबर गणना करतो. (९-१२)

आम्ही त्यांची खरी कथा तुम्हाला ऐकवितो, ते काही नवयुवक होते ज्यांनी आपल्या पालनकर्त्यावर श्रद्धा ठेवली होती आणि आम्ही त्यांना मार्गदर्शनात गती प्रदान केली[२] होती. आम्ही त्यांचे मन त्यावेळी दृढ केले जेव्हा ते उभे राहिले आणि त्यांनी ही घोषणा केली की, ''आमचा पालनकर्ता तर केवळ तोच आहे जो आकाशांचा व पृथ्वीचा पालनकर्ता आहे. आम्ही त्याला सोडून इतर कोणत्याच उपास्याचा धावा करणार नाही.

१) म्हणजे आपला ईमान वाचविण्यासाठी ज्यांनी गुहेत आश्रय घेतला होता व नंतर ज्यांच्या गुहेवर स्मृतीचिन्ह म्हणून शिलालेख लावला गेला होता ते तरुण.

२) निवेदनावरून असे कळते की हे तरुण हजरत येशू मसीह (अ.) यांचे प्राथमिक काळातील अनुयायांपैकी होते. ते रोमन राज्यातील प्रजाजन होते. त्याकाळी रोमन सत्ता अनेकेश्वरवादी असून एकेश्वरवादींशी तिने भयंकर शत्रुत्व मांडले होते.



जर आम्ही असे करू तर अगदी अनुचित गोष्ट करू.'' (मग त्यांनी आपसात एकमेकाला सागितले) ''हे आमचे लोक तर सृष्टीच्या पालनकर्त्याला सोडून इतरांना उपास्य बनवून बसले आहेत, हे लोक त्यांच्या उपास्य असल्याबद्दल एखादा स्पष्ट पुरावा का आणत नाहीत? बरे त्या इसमापेक्षा मोठा अत्याचारी अन्य कोण असू शकतो जो अल्लाहवर कुभांड रचतो? आता ज्याअर्थी तुम्ही त्यांच्यापासून व त्यांच्या अल्लाहव्यतिरिक्त उपास्यांपासून अलिप्त झाला आहात तर, चला आता अमुक गुहेत जाऊन आश्रय घ्या. तुमचा पालनकर्ता तुमच्यासाठी आपल्या कृपेचे छत्र विस्तृत करील आणि तुमच्या कार्यासाठी सरंजाम उपलब्ध करून देईल.'' (१३-१६)

तुम्ही त्यांना गुहेत पाहिले असते[३] तर तुम्हाला असे दिसून आले असते की सूर्योदय होतो तेव्हा त्यांच्या गुहेला सोडून उजव्या बाजूला चढतो आणि जेव्हा अस्ताला जातो तेव्हा त्यांना चुकवून डाव्या बाजूला खाली उतरतो आणि ते गुहेत एका विस्तृत जागी पडून असतात हा अल्लाहच्या संकेतांपैकी एक आहे, ज्याला अल्लाह मार्ग दाखवितो तोच मार्ग प्राप्त करणारा आहे आणि ज्याला अल्लाहने भटकविले त्याच्यासाठी तुम्हाला कोणताही मार्गदर्शक, वाली आढळणार नाही. तुम्ही त्यांना पाहून असे समजला असता की ते जागे आहेत, वस्तुत: झोपलेले होते. आम्ही त्यांच्या उजव्या डाव्या कुशी बदलवीत होतो आणि त्यांचा कुत्रा गुहेच्या तोंडाशी हात-पाय पसरून बसला होता. जर एखादे वेळी तुम्ही त्यांना डोकावून पाहिले असते तर उलटपावली पळत सुटला असता आणि तुमच्यावर या दराऱ्याने जरब बसली असती. (१७-१८)

आणि याच अजब चमत्काराने आम्ही त्यांना उठवून बसविले,[४] जेणेकरून त्यांनी आपापसांत थोडी विचारपूस करावी. त्यांच्यापैकी एकाने विचारले, ''सांगा, किती वेळ या स्थितीत राहिला?' इतरांनी सांगितले, ''कदाचित दिवसभर अथवा त्यापेक्षा काही कमी राहिलो असू.'' मग ते म्हणाले, ''अल्लाहच उत्तम जाणतो की आमचा किती काळ या अवस्थेत गेला. चला, आता आपल्यापैकी एखाद्याला चांदीचे हे नाणे देऊन शहरात पाठवू या आणि त्याने पाहावे की सर्वांत उत्तम जेवण कोठे मिळते. तेथून त्याने काही तरी खावयास आणावे पण त्याने जरा सावधगिरीने काम केले पाहिजे. असे होऊ नये की त्याने आपण येथे आहोत म्हणून कोणाला कळू द्यावे. जर एखादे वेळी त्या लोकांचा हात

३) मध्यंतरी याचा उल्लेख सोडण्यात आला आहे की आपसात ठरल्यानुसार हे लोक शहराच्या बाहेर पडून पर्वता दरम्यानातील एका गुहेत जाऊन लपले जेणेकरून दगडमाऱ्याने ठार होण्यापासून अथवा धर्मविमुख होण्यास भाग पडण्यापासून वाचता यावे.

४) म्हणजे च्या चमत्कारिक पद्धतीने ते झोपविले गेले होते व त्यांच्या स्थितीपासून जगाला अनभिज्ञ ठेवले गेले होते तसेच एका प्रदीर्घ कालावधीनंतर त्यांचे जागे होणेदेखील नियतीचा अद्भूत चमत्कार होता.

आमच्यावर पडला तर बस्स, दगडांनीच ठेचून ठार करतील, अथवा बळेच आम्हाला आपल्या धर्मात परत नेतील, आणि असे घडले तर आम्ही कधीही सफल होणार नाही. अशाप्रकारे आम्ही शहरवासियांना त्यांच्या स्थितीबद्दल माहिती दिली[५] जेणेकरून लोकांना कळावे की अल्लाहचे वचन सत्य आहे आणि असे की पुनरुत्थानाची घटका नि:संशय आल्यावाचून राहणार नाही. (पण जरा कल्पना करा की जेव्हा विचार करण्यासारखी गोष्ट खरोखर अशी होती) त्यावेळी ते आपापसांत याबद्दल भांडण करीत होते की यांच्या (गुहानिवासियांच्या) बाबतीत काय केले जावे. काही लोकांनी सांगितले, "यांच्यावर एक भिंत उभारा, यांचा पालनकर्ताच यांच्या बाबतीत उत्तम जाणतो."[६] पण जे लोक त्यांच्या बाबतीत प्रभावी होते त्यांनी सांगितले, "आम्ही तर यांच्यावर एक प्रार्थनागृह बनवू."[७]

(१९-२१)

काही लोक म्हणतील की ते तीन होते व चौथा त्यांचा कुत्रा होता. आणखी काही इतरजण सांगतील की ते पाच होते व सहावा त्यांचा कुत्रा होता. हे सर्व व्यर्थ बडबड करीत आहेत. काही इतर लोक म्हणतात की ते सात होते आणि आठवा त्यांचा कुत्रा

५) म्हणजे जेव्हा तो इसम जेवण विकत आणण्यासाठी शहरात गेला तेव्हा जग पार बदलले होते. मूर्तिपूजक रोम ख्रिस्ती बनून दीर्घ कालावधी उलटला होता. भाषा, संस्कृती, पोशाख प्रत्येक बाबतीत स्पष्ट प्रमाणात फरक झालेला होता. दोनशे वर्षांपूर्वीचा हा माणूस आपला थाटमाट, वस्त्रालंकार आणि भाषा प्रत्येक गोष्टीच्या दृष्टीने तत्काळ तो एक गंमत ठरला. मग जेव्हा त्याने अन्नपदार्थ खरीदण्यासाठी पुरातन काळातील नाणे देऊ केले तेव्हा दुकानदाराचे डोळे आश्चर्याने विस्फारले. चौकशीअंती, हा मनुष्य तर येशू मसीहच्या त्या अनुयायांपैकी एक आहे जो दोनशे वर्षांपूर्वी आपला ईमान वाचविण्यासाठी पळून गेला होता असे कळले. सदरहू बातमी क्षणार्धात शहरातील ख्रिस्ती वस्तीत पसरली व पदाधिकाऱ्यांबरोबरच सामान्यजनांनी त्या गुहेवर गर्दी केली. आता गुहानिवासी (असहाबे कहफ) ना जेव्हा माहीत झाले की ते झोपेतून तब्बल दोनशे वर्षांनंतर उठले आहेत तेव्हा आपल्या ख्रिस्ती बांधवांना सलाम करून ते जमिनीवर निजले व गतप्राण झाले.

६) वर्णनशैली पाहता हे सदाचारी ख्रिस्तीचे कथन होते, असे कळते. त्यांचे मत असे होते की, 'गुहावासी' ज्याप्रमाणे गुहेत लवंडले आहेत त्यांना तसेच लवंडल्या स्थितीत राहू द्या आणि गुहेचे तोंड बंद करून टाका. हे कोण लोक आहे, या माणसाचा दर्जा काय आहे व ते कसल्या मोबदल्यास पात्र आहेत, ही गोष्ट त्यांच्या रबलाच चांगली माहीत आहे.

७) त्यावेळी ख्रिस्ती लोकांतदेखील अनेकेश्वरवादी विचार पसरले होते. पूर्वीच्या मूर्तींच्या जागी पूजेसाठी त्यांना या नवीन मूर्ती सापडल्या होत्या, म्हणून हे असे घडले.



होता.[८] सांगा माझा पालनकर्ताच उत्तम जाणतो की ते किती होते. थोडेच लोक त्याची खरी संख्या जाणतात. म्हणून स्थूल चर्चेपेक्षा अधिक त्यांच्या संख्येसंबंधी कुणाशी काही विचारूदेखील नका.[९] आणि पहा,[१०] कोणत्याही गोष्टीविषयी कधीही असे म्हणत जाऊ नका की मी हे काम उद्या करून टाकीन. (तुम्ही काहीही करू शकत नाही) याखेरीज की जर अल्लाह इच्छिल, जर विस्मरणाने असली गोष्ट तोंडातून निघाली तर लगेच आपल्या पालनकर्त्याची आठवण करा आणि म्हणा, "आशा आहे की माझा पालनकर्ता या बाबतीत सन्मार्गाच्या अधिक जवळच्या गोष्टीकडे माझे मार्गदर्शन करील." आणि ते आपल्या गुहेत तीनशे वर्षे राहिले आणि (काही लोक कालगणनेत) ९ वर्षे पुढे गेले आहेत. तुम्ही म्हणा, अल्लाह त्यांच्या मुक्कामाचा कालावधी अधिक जाणतो.[११] आकाशाचे व पृथ्वीचे सर्व गुप्त अहवाल त्यालाच माहीत आहेत. किती छान आहे तो पाहणारा व ऐकणारा! पृथ्वी व आकाशातील निर्मितीची खबरदारी घेणारा, त्याच्याशिवाय अन्य कोणी नाही. आणि तो आपल्या राज्यात कोणासही भागीदार करीत नाही.

(२२-२६)

हे पैगंबर (स.), तुमच्या पालनकर्त्याच्या ग्रंथातून ते काही तुमच्याकडे दिव्य बोध पाठविले गेले आहे ते (जसेच्या तसे) ऐकवा, त्याची प्रतिपादने बदलण्याचा कोणासही अधिकार नाही. (आणि जर तुम्ही कोणासाठी त्यात फेरबदल कराल तर) त्याच्यापासून

८) यावरून असे कळते की सदरहू घटनेच्या पावणे तीनशे वर्षांनंतर कुरआनच्या अवतरणकाळात या घटनेच्या तपशीलासंबंधी अनेक कथा ख्रिस्ती लोकांत पसरल्या होत्या, व सर्वसाधारणपणे विश्वसनीय अशी माहिती लोकांना उपलब्ध नव्हती, तरी पण ज्याअर्थी तिसऱ्या विधानाचे सर्वोच्च अल्लाहने खंडन केले नाही, म्हणून खरी संख्या सातच असावी असा कयास केला जाऊ शकतो.

९) अर्थ असा की खरी महत्वाची गोष्ट त्यांची संख्या नव्हे, तर सदरहू कथेद्वारे जे बोध प्राप्त होतात त्यांना खरे महत्व आहे.

१०) अगोदरच्या आयतीच्या विषयानुषंगाने वक्तव्यओघाच्या क्रमादरम्यान फर्माविले गेलेले असे हे एक स्वतंत्र वाक्य आहे. अगोदरच्या आयतीत सूचित केले गेले होते की गुहावासी - असहाबे कहफ - ची खरी संख्या अल्लाहलाच माहीत आहे. त्याचा शोध घेणे एक अनावश्यक काम आहे. या संबंधाने पुढील गोष्ट फर्माविण्याअगोदर एक औपचारिक वाक्य म्हणून, व आणखी एक सूचना पैगंबर (स.) आणि ईमानवाल्यांना दिली गेली, ती अशी की, मी उद्या अमुक काम करून टाकीन, असा दावा तुम्ही कधीच सांगू नका. हे काम तुम्ही करू शकाल किंवा नाही हे तुम्हाला काय माहीत?

११) म्हणजे असहाबे कहफच्या संख्येप्रमाणेच त्यांच्या निवास कालावधीच्या बाबतीतदेखील लोकांत मतभेद आहे परंतु त्याचा शोध घेण्याची तुम्हाला काही जरूरी नाही. ते किती काळ त्या स्थितीत राहिले ही गोष्ट अल्लाहच जाणतो.

बचाव करून पळ काढण्यास कोणतेही आश्रयस्थान तुम्हाला मिळणार नाही. आणि आपल्या मनाला त्या लोकांच्या सहचर्यात संतुष्ट करा जे आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेचे इच्छुक बनून सकाळ व संध्याकाळी त्याचा धावा करतात आणि त्यांच्याकडून कदापि दृष्टी वळवू नका. काय तुम्ही भौतिक शोभा पसंत करता? कोणत्याही अशा व्यक्तीची आज्ञा पाळू[12] नका, ज्याच्या हृदयाला आम्ही आमच्या स्मरणापासून बेसावध केले आहे आणि ज्याने मनमानी अनुसरण अंगिकारले आहे आणि ज्याची कार्यपद्धती न्यूनाधिक्क्यावर आधारलेली आहे. स्पष्ट सांगून टाका, हे सत्य आहे तुमच्या पालनकर्त्याकडून, आता ज्याची इच्छा असेल मान्य करावे आणि ज्याची इच्छा असेल त्याने नाकारावे. आम्ही (इन्कार करणाऱ्या) अत्याचाऱ्यांसाठी एक अग्नी तयार ठेवला आहे ज्याच्या ज्वालांनी त्यांना वेढून घेतले आहे. तेथे जर त्यांनी पाणी मागितले तर अशा पाण्याने त्यांचे आतिथ्य केले जाईल जे तेलावरील पापुद्र्यासारखे असेल आणि त्यांचे तोंड होरपळून टाकील, निकृष्ट पेय पदार्थ आणि अत्यंत वाईट विश्रांतीस्थान! उरले ते लोक जे श्रद्धावंत असतील आणि सत्कृत्ये करतील, तर निश्चितच आम्ही सत्कृत्ये करणाऱ्या लोकांचा मोबदला वाया घालवीत नसतो. त्यांच्यासाठी सदाबहार स्वर्ग आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, तेथे ते सुवर्ण कंकणांनी विभूषित केले जातील[13] तलम रेशम आणि भरजरी हिरवी वस्त्रे ते परिधान करतील आणि उच्चासनावर लोड लाऊन बसतील. उत्तम मोबदला आणि उत्कृष्ट दर्जाचे निवासस्थान! (२७-३१)

हे पैगंबर (स.), त्यांच्यासमोर एक उदाहरण प्रस्तुत करा. दोन व्यक्ती होत्या, त्यांच्यापैकी एकाला आम्ही द्राक्षांच्या दोन बागा दिल्या आणि त्यांच्याभोवती खजुरीच्या झाडांची कुंपणे लावली आणि त्यांच्या दरम्यान शेतजमीन ठेवली. दोन्ही बागा भरपूर फळा-फुलांनी बहरल्या आणि फळधारणेस त्यांनी जरादेखील उणीव ठेवली नाही. त्या बागांत आम्ही एक कालवा प्रवाहित केला. आणि त्याला खूप नफा प्राप्त झाला. हे सर्व मिळाल्यावर एके दिवशी आपल्या शेजाऱ्याशी बोलताना तो म्हणाला, ''मी तुझ्यापेक्षा अधिक श्रीमंत आहे व तुझ्यापेक्षा अधिक सामर्थ्यवान मनुष्यबळ राखतो.'' मग तो आपल्या स्वर्गात प्रविष्ट झाला आणि स्वत:बद्दल अत्याचारी बनून म्हणू लागला, ''मला

**१२)** म्हणजे त्याची गोष्ट ऐकू नका, त्याच्या पुढे नमू नका, त्याचे मनोरथ पूर्ण करू नका आणि त्याच्या म्हणण्यानुसार चालू नका. या ठिकाणी 'आज्ञापालन' हा शब्द त्याच्या व्यापक स्वरूपात प्रयुक्त झाला आहे.

**१३)** प्राचीन काळात राजे महाराजे सुवर्ण कंकणे घालीत असत. जन्नतवासींच्या वस्त्रालंकारात या वस्तूंचा उल्लेख करण्याचा हेतू असे निर्दशनास आणावयाचा आहे की, तेथे त्यांना शाही पोशाख पेहरविले जातील, काफिर व अवज्ञाकारी राजाधिराज तेथे खजील व अपमानित केला जाईल तर ईमानधारक सदाचारी मजूर तेथे राजशाही थाटाने व वैभवाने राहील.



वाटत नाही की ही दौलत कधी नष्ट होईल आणि पुनरुत्थानाची घटका कधी येईल, तथापि जर एखादे वेळी माझ्या पालनकर्त्याच्या ठायी मला परतविले गेले तरी यांच्यापेक्षा अधिक वैभवशाली जागा मी जरूर प्राप्त करीन.'' त्याच्या शेजाऱ्याने बोलताना त्याला सांगितले, ''काय तू द्रोह करतोस त्या अस्तित्वाशी ज्याने तुला मातीने व नंतर वीर्याने निर्माण केले आणि तुला एक परिपूर्ण मानव बनविले? राहिलो मी, तर माझा पालनकर्ता तर तोच अल्लाह आहे आणि मी त्याच्याबरोबर कोणासही भागीदार करीत नाही. आणि जेव्हा तू आपल्या स्वर्गात प्रवेश करीत होतास तेव्हा तुझ्या तोंडातून असे का निघाले नाही की, 'जशी अल्लाहची इच्छा, त्याच्याशिवाय अन्य कोणतीही शक्ती नाही!'[14] जर तुला मी संपत्ती व संततीत तुझ्यापेक्षा कमी आढळत आहे तर दूर नाही की माझा पालनकर्ता मला तुझ्या स्वर्गापेक्षा उत्तम प्रदान करील आणि आकाशातून तुझ्या स्वर्गावर एखादे अरिष्ट पाठवील ज्यामुळे ती सपाट मैदान बनून राहील, अथवा त्याचे पाणी जमिनीत मुरेल आणि मग ते तुला कोणत्याही प्रकारे वर काढता येणार नाही.'' सरतेशेवटी त्याचे सर्व फळ नष्ट झाले आणि तो आपल्या द्राक्षांच्या बागेला मांडवावर उलथून पडल्याचे पाहून आपण केलेल्या लागवडीबद्दल हातवारे करीत बसला आणि खेदाने म्हणू लागला की, ''मी आपल्या पालनकर्त्याचा कोणी भागीदार ठरविला नसता.'' - अल्लाहशिवाय त्याची मदत करणारा एकही जथा त्याच्या जवळ नव्हता व तो स्वत:देखील या आपत्तीचा मुकाबला करू शकला नाही. त्यावेळी कळले की कार्यसिद्धीचा अधिकार केवळ सत्यमेव अल्लाहसाठीच आहे. तो देईल तेच सर्वोत्तम इनाम व तो दाखविल तोच हितावह शेवट. (३२-४४)

आणि हे पैगंबर (स.), यांना जगातील जीवनाची हकीगत या दृष्टांताद्वारे समजावून द्या की आज आम्ही आकाशातून पर्जन्यवृष्टी केली म्हणून जमिनीची झुडुपे खूप घनदाट झाली, आणि उद्या त्याच वनस्पती भुसा बनून राहतील ज्याला वारा उडवील, अल्लाह प्रत्येक गोष्टीवर सामर्थ्यसंपन्न आहे. ही मालमत्ता व ही संतती केवळ ऐहिक जीवनाची हंगामी शोभा आहे. वास्तविक बाकी राहणारी सत्कृत्येच तुझ्या पालनकर्त्याजवळ परिणामाच्या दृष्टीने उत्तम आहेत आणि त्यांच्यापासूनच चांगल्या आशा निगडित केल्या जाऊ शकतात. त्या दिवसाची काळजी हवी, जेव्हा आम्ही पर्वतांना चालवू आणि पृथ्वी तुम्हाला पूर्णपणे विवस्त्र दिसेल आणि आम्ही सर्व माणसांना अशा प्रकारे घेरून गोळा करू की (अगोदर व नंतरच्यापैकी) एकदेखील सुटणार नाही. आणि सर्वच्या सर्व तुमच्या पालनकर्त्याच्या ठायी ओळी ओळीत हजर केले जातील, हे पहा, आलात ना तुम्ही

**१४)** म्हणजे जशी काही अल्लाहची इच्छा असेल तसेच घडेल. माझा किंवा अन्य कुणाचा कसलाही जोर नाही. आमचा जर काही अधिकार चालू शकला तर अल्लाहकरवी सुबुद्धी आणि त्याच्या समर्थनानेच चालू शकतो.

आमच्यापाशी त्याचप्रमाणे जसे आम्ही तुम्हाला पहिल्यांदा निर्माण केले होते. तुम्ही तर असे समजला होता की आम्ही तुमच्यासाठी वचनाची कोणतीही वेळ निश्चित केलेली नाही. आणि कर्मनोंद पुढे ठेवली जाईल. त्यावेळी तुम्ही पहाल की अपराधी लोक आपल्या जीवन पुस्तकातील नोंदीला भीत असतील आणि म्हणत असतील की, ''आमचे दुर्दैव! हे कसले पुस्तक आहे की आमची लहान मोठी कोणतीही कृती अशी उरली नाही जी यामध्ये नोंदली गेली नाही. जे जे काही त्यांनी केले होते ते सर्व त्यांच्या पुढ्यात त्यांना आढळेल आणि तुझा पालनकर्ता कोणावर तिळमात्र अन्याय करणार नाही. (४५-४९)

स्मरण करा, जेव्हा आम्ही दूतांना सांगितले की, आदमपुढे नतमस्तक व्हा, तेव्हा ते नतमस्तक झाले परंतु इब्लीस नतमस्तक झाला नाही, तो जिनपैकी होता, म्हणून आपल्या पालनकर्त्याच्या हुकमाच्या बाहेर गेला.[१५] आता काय तुम्ही मला सोडून त्याला व त्याच्या संततीला आपला पालक बनविता? वास्तविक ते तुमचे शत्रू आहेत? फारच वाईट बदल आहे ज्यास अत्याचारी लोक अवलंबित आहेत. मी आकाश व पृथ्वी निर्माण करताना त्यांना बोलविले नव्हते आणि त्यांच्या स्वत:च्या निर्मितीतसुद्धा त्यांना सामील केले नव्हते, माझे काम हे नव्हे की भ्रष्टकर्त्यांना आपला सहायक बनवीत राहू.[१६]

(५०-५१)

हे लोक काय करतील त्या दिवशी जेव्हा त्यांचा पालनकर्ता त्यांना म्हणेल की हाक मारा त्या विभूतींना ज्यांना तुम्ही माझे भागीदार समजून बसला होता. हे त्यांचा धावा करतील परंतु ते त्यांच्या मदतीला येणार नाहीत आणि आम्ही त्यांच्या दरम्यान विनाशाचा एकच खड्डा समाईक करून टाकू. सर्व अपराधी त्या दिवशी अग्नी पाहतील आणि समजून घेतील की आता त्यात त्यांचे पतन आहे आणि त्यांना त्यापासून वाचविण्यासाठी कोणतेही आश्रयस्थान मिळणार नाही. (५२-५३)

आम्ही या कुरआनात लोकांना वेगवेगळ्या पद्धतीने समजाविले परंतु मनुष्य फारच भांडखोर ठरला आहे. त्याच्या समोर जेव्हा मार्गदर्शन आले तेव्हा ते मान्य करणे आणि

१५) म्हणजे 'इब्लीस' हा फरिश्त्यांपैकी नव्हता तर जिन्नांपैकी होता. म्हणूनच आज्ञाधीनतेच्या बाहेर जाणे त्याला शक्य झाले. फरिश्त्यांपैकी असता तर अवज्ञा करूच शकत नव्हता. याऊलट 'जिन्न' मानवाप्रमाणेच स्वतंत्राधिकार बाळगणारी निर्मिती आहे. त्यांना जन्मजात आज्ञाधीन निर्माण केलेले नाही तर कुफ्र व ईमान - श्रद्धा व नकार आणि आज्ञाधारकता व अवज्ञा दोन्ही गोष्टींचे स्वातंत्र्य प्रदान केलेले आहे.

१६) अर्थ असा की हे शैतान तुमच्या आज्ञाधारकतेचे व बंदगीचे अधिकारी कसे ठरले बरे? बंदगी करण्यास पात्र तर केवळ सर्जनकर्ताच असू शकतो. या शैतानांची अवस्था तर अशी आहे की आकाशांच्या व पृथ्वीच्या निर्मितीत सहभागी असणे तर दूरच राहो, हे तर स्वत:च निर्मिती आहेत.



आपल्या पालनकर्त्या पुढे क्षमायाचना करण्यापासून त्यांना बरे कोणत्या गोष्टीने रोखले? याशिवाय अन्य काहीच नाही की ते प्रतीक्षेत आहेत की त्यांच्याबरोबर तसेच काही व्हावे जसे पूर्वीच्या लोकसमूहाबरोबर घडले आहे अथवा असे, की त्यांनी प्रकोप समोर येताना पहावा. (५४-५५)

पैगंबरांना आम्ही या कामाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही उद्देशाने पाठवीत नसतो की त्यांनी शुभवार्ता आणि इशारा देण्याची जबाबदारी पार पाडावी. पण श्रद्धाहीनांची स्थिती अशी आहे की ते असत्याची शस्त्रे घेऊन सत्याला तुच्छ लेखण्याचा प्रयत्न करतात. आणि त्यांनी माझ्या वचनांना व त्यांना दिल्या गेलेल्या धमक्यांना चेष्टेचे साधन बनविले आहे. आणि त्या इसमापेक्षा अधिक अत्याचारी अन्य कोण आहे ज्याला त्याच्या पालनकर्त्याची वचने ऐकवून उपदेश केला जावा आणि त्याने त्यापासून पराङमुख व्हावे आणि त्या वाईट परिणामाला विसरावे ज्याची व्यवस्था त्याने स्वत:साठी खुद्द आपल्या हातांनी केली आहे? (ज्या लोकांनी ही पद्धत अवलंबिली आहे) त्यांच्या हृदयावर आम्ही आवरणे चढविली आहेत, जे त्यांना कुरआनचे म्हणणे समजू देत नाहीत आणि त्यांच्या कानांत आम्ही बधिरता आणली आहे. तुम्ही त्यांना मार्गदर्शनाकडे कितीही बोलवा, ते या स्थितीत कधीही मार्गदर्शन प्राप्त करू शकणार नाहीत. (५६-५७)

तुझा पालनकर्ता क्षमाशील व दयाळू आहे, त्याने यांच्या कृतीवर यांना पकडू इच्छिले असते तर लवकरच प्रकोप पाठविला असता परंतु यांच्यासाठी निर्णयाची एक वेळ ठरलेली आहे, आणि त्यांच्यापासून वाचून पळ काढण्याचा यांना कोणताच मार्ग सापडणार नाही. (५८)

या प्रकोपग्रस्त वस्त्या तुमच्यासमोर हजर आहेत. यांनी जेव्हा अत्याचार केले तेव्हा आम्ही यांना नष्ट केले आणि यांच्यापैकी प्रत्येकाच्या विनाशासाठी आम्ही वेळ निश्चित करून ठेवली होती. (५९)

(जरा यांना ती हकीगत ऐकवा जी मूसा (अ.) वर ओढवली होती) जेव्हा मूसा (अ.) ने आपल्या सेवकाला सांगितले होते की, ''मी माझा प्रवास पूर्ण करणार नाही जोपर्यंत दोन्ही नद्यांच्या संगमावर पोहचत नाही. अन्यथा मी एका दीर्घ काळापर्यंत चालतच राहीन.''[१७] मग जेव्हा ते त्यांच्या संगमावर पोहचले तेव्हा ते आपल्या (जवळील)

१७) हजरत मूसा (अ.) यांचा सदरहू प्रवास कोणत्या काळात घडला होता तसेच ज्यांच्या संगमावर सदरहू घटना घडली त्या दोन नद्या कोणत्या, हे कोणत्याही खात्रीलायक अशा माध्यमाने कळू शकले नाही. परंतु या कथेवर विचारचिंतन केल्याने असे वाटते की ही घटना हजरत मूसा (अ.) यांच्या मिस्त्र येथील वास्तव्याच्या काळातील आहे, जेव्हा त्यांचा फिरऔनबरोबर संघर्ष सुरू होता. तर दोन नद्यांनी अभिप्रेत निळसर नाईल व पांढरट नाईल आहेत. ज्यांच्या संगमावर हल्लीचे खार्टूम शहर वसले आहे. आमच्या या तर्काची कारणे देताना आम्ही तफहीमूल कुरआन, खंड तिसरा यांत सूरह कहफचे भाष्य करताना सविस्तर चर्चा केली आहे.

माशापासून गाफिल झाले आणि तो निघून अशा प्रकारे नदीत गेला जणू एखादा सुरूंग लागला असावा. पुढे जाऊन मूसा (अ.) ने आपल्या सेवकाला सांगितले, ''आणा, आमची न्याहारी, आजच्या प्रवासात तर आम्ही भयंकर थकलो आहोत.'' सेवकाने सांगितले, ''आपण पाहिले! हे काय घडले? जेव्हा आम्ही त्या खडकाजवळ थांबलो होतो तेव्हा मला माशाची आठवण राहिली नाही आणि शैतानाने मला इतके गाफिल करून टाकले की त्याचा उल्लेख (आपल्यासमोर करण्यास) विसरलो. मासा तर चमत्कारिकरीत्या नदीत गेला.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''याचाच तर शोध आम्ही करीत होतो.''[१८] म्हणून ते दोघे आपल्या पदचिन्हावरून परत फिरले. आणि तेथे त्यांना आमच्या दासांपैकी एक दास भेटला ज्याला आम्ही आपल्या कृपेने उपकृत केले होते आणि आपल्यातर्फे एक विशेष ज्ञान प्रदान केले होते.[१९] (६०-६५)

मूसा (अ.) ने त्याला सांगितले, ''काय मी आपल्या समवेत राहू शकतो जेणेकरून आपण मलादेखील तो सुज्ञपणा शिकवावा जो आपणाला अवगत केला गेला आहे.'' त्याने उत्तर दिले, ''आपण माझ्या बरोबरीने धीर धरू शकणार नाही, आणि ज्या गोष्टीची माहिती आपल्याला नसेल आपण त्यावर धीर तरी कसा धरावा बरे?'' मूसा (अ.) ने सांगितले, ''जर अल्लाहने इच्छिले तर मी आपल्याला संयमी आढळेन आणि कोणत्याही बाबतीत मी आपली अवज्ञा करणार नाही.'' त्याने सांगितले, ''बरे! जर आपण माझ्याबरोबर येत आहात तर मला कोणतीही गोष्ट आपण विचारू नये, जोपर्यंत मी स्वत:च त्याचा उल्लेख आपणासमोर करीत नाही.'' (६६-७०)

आता हे दोघे रवाना झाले येथपावेतो की ते एका नौकेत स्वार झाले तेव्हा त्या व्यक्तीने नौकेत छिद्र पाडले, मूसा (अ.) ने सांगितले, ''आपण यात छिद्र पाडले की जेणेकरून नावेतील सर्व लोक बुडून जावेत? ही तर आपण एक भयंकर गोष्ट केली आहे.'' त्याने सांगितले, ''मी तुम्हाला सांगितले नव्हते की तुम्ही माझ्या सोबत धीर धरू शकणार नाही?'' मूसा (अ.) ने सांगितले, ''चूकभूलसाठी आपण मला धरू नका, माझ्या बाबतीत आपण कठोरता दाखवू नका.'' (७१-७३)

पुन्हा ते दोघे निघाले येथपावेतो की त्यांना एक मुलगा भेटला आणि त्या व्यक्तीने त्याला ठार करून टाकले. मूसा (अ.) ने सांगितले, ''आपण एका निरपराध्याचे प्राण घेतले, वस्तुत: त्याने कुणाचा खून केला नव्हता. हे कृत्य तर आपण फारच वाईट केले.'' त्याने सांगितले, ''मी तुम्हाला सांगितले नव्हते की माझ्या बरोबरीने तुम्ही धीर धरू शकणार नाही?'' मूसा (अ.) ने सांगितले, ''यानंतर जर मी आपल्याला काही विचारले

**१८)** म्हणजे अंतिम उद्दिष्टांची हीच खूण तर आम्हाला सांगण्यात आली होती.

**१९)** सर्व विश्वसनीय हदिसीत त्या दासाचे नाव 'खिज्र' असे सांगितले गेले आहे.



तर आपण मला बरोबर ठेऊ नका. घ्या, आता तर माझ्याकडून आपल्याला निमित्त सापडले.'' (७४-७६)

मग ते पुढे निघाले येथपावेतो की एका वस्तीत पोहचले आणि तेथील लोकांपाशी जेवण मागितले. परंतु त्यांनी त्या दोघांच्या पाहुणचाराला नकार दिला, तेथे त्यांनी एक भिंत पाहिली जी ढासळू पाहात होती. त्या व्यक्तीने त्या भिंतीस पुन्हा पूर्वपदावर आणले. मूसाने सांगितले, ''जर आपण इच्छिले असते तर या कामाची मजुरी घेऊ शकला असता.'' त्याने सांगितले, ''पुरे, आता माझे आणि तुमचे सहचर्य संपले. आता मी तुम्हाला त्या गोष्टींची हकीगत सांगतो ज्यावर तुम्ही धीर धरू शकला नाही. त्या नावेची हकीगत अशी आहे की ती काही गरीब माणसांची होती. ते दर्यामध्ये काबाडकष्ट करीत होते. मी तिला सदोष बनवले कारण पुढे एका अशा बादशाहचा मुलुख होता जो प्रत्येक नाव बळजबरीने हिरावून घेत होता. त्या मुलाची गोष्ट अशी की त्याचे आईवडील श्रद्धावंत होते, आम्हाला भय वाटले की हा मुलगा आपल्या अतिरेक व द्रोहामुळे त्यांना त्रस्त करील. म्हणून आम्ही इच्छिले की त्याच्या पालनकर्त्याने त्याच्याऐवजी त्यांना अशी संतती द्यावी जी चारित्र्यानेसुद्धा त्यांच्यापेक्षा उत्तम असावी आणि ज्याच्याकडून नातेवाईकांशी सद्‌वर्तनदेखील जास्त चांगले असावे आणि या भिंतीची हकीगत अशी आहे की ही दोन अनाथ मुलांची आहे. ते या शहरात राहतात. या भिंतीखाली या मुलांसाठी एक खजिना पुरलेला आहे आणि यांचा बाप एक सदाचारी मनुष्य होता. म्हणून तुमच्या पालनकर्त्याने इच्छिले की ही दोन मुले प्रौढ व्हावीत व आपला खजिना काढून घ्यावा. हे तुमच्या पालनकर्त्याच्या कृपेच्या आधारे केले गेले आहे, मी काही आपल्या स्वत:च्या अधिकारात

केलेले नाही, अशी आहे हकीगत त्या गोष्टींची ज्यावर तुम्ही धीर धरू शकला नाही.''[२०] (७७-८२)

आणि हे पैगंबर (स.), हे लोक तुम्हापाशी जुलकरनैन संबंधी विचारणा करतात. यांना सांगा, ''मी त्याचा काही अहवाल तुम्हाला ऐकवितो. (८३)

आम्ही त्याला भूतलात सत्ताधिकार प्रदान केलेला होता आणि त्याला सर्व प्रकारचे सरंजाम व साधने प्रदान केली होती. त्याने (प्रथम पश्चिमेकडील एका मोहिमेचे) आयोजन केले. येथपावेतो की जेव्हा तो मावळतीपर्यंत पोहचला,[२१] तेव्हा त्याने काळ्या पाण्यात सूर्यास्त होताना पाहिला,[२२] आणि तेथे त्याला एक लोकसमूह आढळला. आम्ही सांगितले, ''हे जुलकरनैन, तुला हे सामर्थ्यदेखील प्राप्त आहे की त्यांना त्रास द्यावा आणि हेदेखील की त्यांच्याशी सद्व्यवहार करावा.'' त्याने सांगितले, ''जो त्यांच्यापैकी अत्याचार करील त्याला आम्ही शिक्षा करू मग तो आपल्या पालनकर्त्याकडे परतविला जाईल. आणि तो त्याला आणखीन कठोर यातना देईल. आणि जो त्यांच्यापैकी श्रद्धा ठेवील आणि सदाचरण करील त्याच्यासाठी चांगला मोबदला आहे आणि आम्ही त्याला मवाळ आदेश देऊ.'' (८३-८८)

२०) या कथेत हजरत खिज्र यांनी जी तीन कामे केली होती ती अल्लाहच्या आज्ञेनेच केली होती हे अगदी स्पष्ट आहे. परंतु त्यापैकी पहिली दोन कामे अशी होती ज्यांची परवानगी ईश्वराने पाठविलेल्या कोणत्याही शरीअत-आचारसंहितेत कोणत्याही माणसाला कधीच दिलेली नाही, ही गोष्टदेखील स्पष्ट आहे. इथपावेतो की इलहाम-दैवी प्रेरणेच्या आधारेदेखील, एखाद्याच्या मालकीच्या नौकेला भविष्यात एखादा बळजबरीने हिरावून घेईल म्हणून तिला निकामी करणे आणि एखाद्या मुलाला, मोठा झाल्यावर तो शिरजोर अथवा काफिर होईल म्हणून ठार करावे, कोणत्याही माणसाला अशी परवानगी प्राप्त नाही. म्हणून हजरत खिज्र यांनी सदरहू कामे शरीअतच्या आज्ञेवरून केली असे नव्हे तर ईश्वरी मनोरथानुसार केली होती व अशा प्रकारच्या आज्ञेसाठी सर्वश्रेष्ठ अल्लाह मानवाव्यतिरिक्त एका दुसऱ्याच प्रकारच्या निर्मितीकरवी काम घेत असतो, ही गोष्ट मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाही. सर्वोच्च अल्लाहने हजरत मूसा (अ.) यांना आपल्या त्या दासाजवळ यासाठी पाठविले होते की या ईश्वरेच्छेच्या कारखान्यात ज्या मसलतीनुसार काम चालत असते त्यांचे आकलन मनुष्याच्या आवाक्या पलीकडचे आहे, आडपडदा न राखता त्यांना एक दृष्टिक्षेप घडवावा, हे कथेच्या स्वरूपावरूनच स्पष्ट होते. सर्वोच्च अल्लाहने हजरत खिज्रसाठी 'दास' असा शब्द प्रयुक्त केला आहे. त्यांना मनुष्य ठरविण्यासाठी केवळ इतकाच आधार पुरेसा उरत नाही. सूरह अंबिया, आयत क्र. २६ आणि सूरह जुखरुफ, आयत क्र. १९ आणि इतर अनेक ठिकाणी फरिश्त्यांसाठी देखील हा शब्द प्रयुक्त झाला आहे.

२१) म्हणजे पश्चिमेच्या अंतिम सीमेपर्यंत.

२२) म्हणजे तेथे सूर्यास्ताच्या वेळी असे वाटत होते की सूर्य समुद्राच्या काळपट गढूळ पाण्यात अस्त पावत आहे.



मग त्याने (एका दुसऱ्या मोहिमेची) तयारी केली, येथपावेतो की तो उगवतीपर्यंत जाऊन पोहोचला[२३] तेथे त्याने पाहिले की सूर्य एका अशा जनसमूहावर उगवत आहे ज्याच्यासाठी उन्हापासून बचावाची कोणतीही व्यवस्था आम्ही केलेली नाही. अशी स्थिती होती त्यांची, आणि जुल्करनैनजवळ जे काही होते ते आम्ही जाणत होतो. (८९-९१)

मग त्याने (आणखी एका मोहिमेचे) आयोजन केले. येथपावेतो की जेव्हा दोन पर्वतांच्या दरम्यान पोहोचला तेव्हा त्याला त्यांच्यापाशी एक लोकसमूह भेटला तो महत्प्रयत्नानेच एखादी गोष्ट समजत होता. त्या लोकांनी सांगितले की, ''हे जुल्करनैन, याजूज व माजूज[२४] या भूप्रदेशात उपद्रव माजवितात. तर काय आम्ही तुला या कामासाठी काही कर द्यावा की तू आमच्या आणि त्यांच्या दरम्यान एखादा तट बांधशील?'' त्याने सांगितले, ''जे काही माझ्या पालनकर्त्याने मला दिलेले आहे ते खूप आहे. तुम्ही फक्त मेहनतीनिशी मला सहाय्य करा, मी तुमच्या आणि त्यांच्या दरम्यान तट बांधून देतो. मला लोखंडी चादरी आणून द्या,'' शेवटी जेव्हा दोन्ही डोंगरामधील पोकळी त्याने भरून काढली तेव्हा लोकांना सांगितले की आता अग्नी प्रज्वलित करा. येथपावेतो की (जेव्हा ही लोखंडी भिंत) अगदी अग्निप्रमाणे लालबुंद करून टाकली तेव्हा त्याने सांगितले, ''आणा, आता मी यावर वितळलेले तांबे ओतीन.'' (ही तटबंदी अशी होती की) याजूज आणि माजूज त्यावर चढून देखील येऊ शकत नव्हते आणि त्याला भगदाड पाडणे त्यांना तर अधिकच कठीण होते. जुलकरनैनने सांगितले, ''ही माझ्या पालनकर्त्याची कृपा आहे परंतु जेव्हा माझ्या पालनकर्त्याच्या अभिवचनाची घटका येईल तेव्हा तो हिला जमीनदोस्त करील आणि माझ्या पालनकर्त्याचे अभिवचन सत्याधिष्ठित आहे.'' (९२-९८)

आणि[२५] त्या दिवशी आम्ही लोकांना सोडून देऊ की (समुद्राच्या लाटाप्रमाणे) एक

२३) म्हणजे पूर्वेच्या अंतिम सीमेपर्यंत.

२४) याजूज माजूज ने अभिप्रेत, प्राचीन काळापासून सुसंस्कृत देशावर जे विध्वंसक हल्ले घडवीत राहिले आहेत आणि अधूनमधून ज्यांच्या टोळधाडी उठून आशिया व युरोप दोन्हीकडे रोख करीत राहिल्या आहेत ते आशिया खंडाच्या ईशान्य प्रदेशातील लोकसमूह आहेत. हेज्केल (बायबल) च्या पुस्तिकेत (अध्याय ३८, ३९) त्यांचा मुलुख रशिया आणि तोबल (हल्लीचे तोबाल्सिक) आणि मिस्क (हल्लीचे मास्को) सांगितलेले आहे. इस्राईली इतिहासकार 'युसिफोस' त्याने अभिप्रेत सेंथियन लोकसमूह येतो. सदरहू लोकसमूहाचा प्रदेश काळ्या समुद्राच्या उत्तरेस व पूर्वेस स्थित होता. 'जेरुम'च्या म्हणण्यानुसार 'माजुज' लोक काकेशियाच्या उत्तरेस खज्र समुद्राजवळ आबाद होते.

२५) अभिप्रेत आहे कयामतचा दिवस. 'जुलकरनैन'ने जो संकेत कयामतच्या सत्याधिष्ठित वचनाकडे केला होता त्या अनुषंगाने सदरहू आयत त्यांच्या कथनावर भर देताना फर्माविली गेली आहे.

दुसऱ्याशी लगट होईल आणि शिंग फुंकले जाईल. आणि आम्ही सर्व मानवांना एकत्र जमा करू. आणि तो दिवस असेल जेव्हा आम्ही नरकाला श्रद्धाहीनांसमोर आणू, जे माझ्या उपदेशापासून अंध बनले होते आणि काही ऐकण्याकरिता मुळीच तयार नव्हते. (९९-१०१)

तर काय हे लोक ज्यांनी द्रोह अवलंबिला आहे, अशी कल्पना बाळगतात की मला सोडून माझ्या दासांना आपले कार्यसाधक ठरवावे? आम्ही अशा श्रद्धाहीनांच्या पाहुणचारासाठी नरक तयार करून ठेवला आहे. (१०२)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, काय आम्ही तुम्हाला सांगावे की आपल्या कृत्यामध्ये सर्वात जास्त अपयशी आणि विफल लोक कोण आहेत? जगातील जीवनात ज्यांची सर्व धावपळ सरळ मार्गापासून भ्रष्ट राहिली आणि ते समजत राहिले की ते सर्वकाही यथायोग्य करीत आहेत. हे ते लोक आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्त्याची वचने मानण्यास नकार दिला आणि त्याच्या पुढे हजर होण्याचा विश्वास केला नाही. म्हणून त्यांची सर्व कृत्ये वाया गेली, पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्यांना काहीच वजन देणार नाही. त्यांचा मोबदला नरक आहे त्या द्रोहाच्या बदल्यात जे त्यांनी केले आणि त्या उपहासापायी जो ते माझ्या आयतींशी आणि माझ्या पैगंबरांशी करीत राहिले. तथापि ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांच्या पाहुणचारासाठी फिरदौसच्या (स्वर्गाच्या) बागा असतील, ज्यांत ते सदैव राहतील आणि कधीही इतरत्र जाण्याची त्यांची इच्छा होणार नाही. (१०३-१०८)

हे पैगंबर (स.), सांगा की, जर समुद्र माझ्या पालनकर्त्याच्या गोष्टी लिहिण्यासाठी शाई बनला तर तो संपेल परंतु माझ्या पालनकर्त्याच्या गोष्टी संपणार नाहीत. इतकेच नव्हे तर तितकीच शाई आम्ही आणखीन आणली तर तीदेखील पुरेशी ठरणार नाही.[२६] (१०९)

हे पैगंबर (स.)! सांगा, मी तर एक मनुष्य आहे तुम्हासारखाच, माझ्याकडे 'दिव्यबोध' पाठविला जातो की तुमचा परमेश्वर केवळ एकच परमेश्वर आहे. म्हणून जो कोणी आपल्या पालनकर्त्याच्या भेटीची आशा करील त्याने सत्कृत्ये करावीत आणि भक्तीमध्ये आपल्या पालनकर्त्यासमवेत इतर कोणाला भागीदार करू नये. (११०)

**२६)** सर्वोच्च अल्लाहच्या 'गोष्टी'ने अभिप्रेत त्याची कार्ये व कौशल्ये, आणि सामर्थ्य व हिकमतींचे चमत्कार आहेत.



# १९ सूरह मरयम

*(मक्काकालीन, वचने ९८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

"काऽऽफ, हाऽ, याऽ, ऐऽऽन, सॉऽऽद." उल्लेख आहे त्या कृपेचा जी तुझ्या पालनकर्त्याने आपला भक्त जकरिय्यावर केली होती, जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याला हळुवारपणे पुकारले. (१-३)

त्याने विनविले, "हे पालनकर्त्या! माझी हाडेदेखील खिळखिळी झाली आहेत आणि डोके वार्धक्याने भडकले आहे. हे पालनकर्त्या, मी कधी तुझ्याजवळ प्रार्थना करून निष्फळ राहिलो नाही. मला माझ्या पाठीमागे आपल्या भाईबंदांच्या दुष्टतेचे भय आहे आणि माझी पत्नी वांझ आहे. तू मला आपल्या विशेष कृपेने एक वारस प्रदान कर, जो माझा वारसदेखील असावा व ज्याला याकूब वंशीयाचा वारसादेखील मिळावा. आणि हे पालनकर्त्या! त्याला सर्वप्रिय मनुष्य बनव." (उत्तर दिले गेले), "हे जकरिय्या, आम्ही तुला एका मुलाची सुवार्ता देतो ज्याचे नाव 'याहया' असेल, आम्ही या नावाचा कोणी मनुष्य यापूर्वी निर्माण केला नाही." सांगितले, "हे पालनकर्त्या! माझ्या येथे पुत्र कसा बरे होईल, ज्याअर्थी माझी पत्नी वांझ आहे आणि मी वयोवृद्ध झालो आहे?" उत्तर आले, "असेच घडेल.[१] तुझा पालनकर्ता फर्मावितो की ही तर माझ्यासाठी क्षुल्लकशी गोष्ट आहे. बरे यापूर्वी तर मी तुला निर्माण केलेच आहे जेव्हा तू काहीच नव्हतास." जकरिय्याने सांगितले, "हे माझ्या पालनकर्त्या, माझ्याकरिता एखादी खूण निश्चित कर." फर्माविले, "तुझ्यासाठी खूण ही आहे की तू सतत तीन दिवस लोकांशी बोलू शकणार नाहीस." त्याप्रमाणे तो कमानीमधून निघून आपल्या लोकांसमोर आला आणि त्याने संकेताने त्यांना सूचना दिली की सकाळ संध्याकाळ पावित्र्यगान करा. (४-११)

"हे याहया! ईशग्रंथाला भक्कमपणे धारण कर."[२] (१२-)

आम्ही त्याला बालपणातच हुकुमाने उपकृत केले.[३] आणि आपल्याकडून त्याला कोमल हृदय, निर्मलता प्रदान केली आणि तो मोठा पापभीरू, आणि आपल्या

**१)** म्हणजे तू वृद्ध व तुझी पत्नी वांझ असतानासुद्धा तुझ्या येथे पुत्र जन्म घेईल.

**२)** दरम्यानच्या काळात हा तपशील की या ईश्वरी फर्मानानुसार हजरत याहया (अ.) जन्मले व ते तरुण वयास पोहचले, सोडला गेला आहे.

**३)** 'हकम' म्हणजे निर्णयशक्ती, 'इज्तिहाद' (अर्थात धर्माची मूलतत्त्वे व नियम आणि शिकवणीनुरुप आवश्यकतेनुसार व्यापक नियम व कायदे रचण्याची) शक्ती, धर्माचा प्रगाढ बोध व्यवहार, मामल्यात यथायोग्य मत प्रस्थापित करण्याची क्षमता, आणि अल्लाहतर्फे मामल्यांचा निकाल देण्याचा अधिकार होय.

आईवडिलांचे हक्क जाणणारा होता. तो दुर्वर्तनीही नव्हता व अवज्ञाकारीदेखील नाही. सलाम त्यावर ज्या दिवशी तो जन्मला व ज्या दिवशी तो मृत्यू पावेल आणि ज्या दिवशी तो जिवंत करून उठविला जाईल. (-१२-१५)

आणि हे पैगंबर (स.), या ग्रंथात मरयमचा वृत्तांत वर्णन करा जेव्हा ती आपल्या लोकांपासून अलिप्त होऊन पूर्व दिशेस एकांतवासिनी झाली होती.[४] आणि आडपडदा करून त्यांच्यापासून लपून बसली होती.[५] या स्थितीत आम्ही तिच्याजवळ आपल्या आत्म्यास (म्हणजे दूतांस) पाठविले आणि तो तिच्यासमोर एका पूर्ण मानवाच्या रूपात प्रकट झाला. मरयम अकस्मात उद्‌गारली, ''जर तू एखादा ईशपरायण मनुष्य आहेस तर मी परमदयाळू ईश्वराचे आश्रय मागते तुझ्यापासून.'' त्याने सांगितले, ''मी तर तुझ्या पालनकर्त्याचा प्रेषित आहे आणि यासाठी पाठविला गेलेलो आहे की तुला एक निर्मळ मुलगा द्यावा.'' मरयमने सांगितले, ''माझ्याठायी कसा मुलगा होईल तर मला कोणत्याही पुरुषाने स्पर्शदेखील केलेला नाही आणि मी काही व्यभिचारिणी नाही.'' दूताने सांगितले, ''असेच घडेल.''[६] तुझ्या पालनकर्त्याने फर्माविले की असे करणे माझ्यासाठी फार सोपे आहे आणि आम्ही असे यासाठी करू की त्या मुलाला लोकांसाठी एक संकेत बनवावे,[७] आणि आपल्याकडून एक कृपा. आणि हे काम होणारच आहे.'' (१६-२१)

मरयमने त्या मुलाचा गर्भ धारण केला. आणि ती तो गर्भ घेऊन एका दूरवरच्या ठिकाणी गेली. मग प्रसूती वेदनेने तिला एका खजुरीच्या झाडाखाली पोहचविले. ती म्हणू लागली, ''मी यापूर्वीच मेले असते आणि माझा मागमूसही उरला नसता.''[८] दूताने चरणाकडून हाक मारून तिला सांगितले, ''दुःख करू नकोस, तुझ्या पालनकर्त्याने तुझ्याखाली एक झरा प्रवाहित केला आहे. आणि तू थोडे या झाडाच्या खोडाला हलव, तुझ्यावर ताज्या रसाळ खजुरी पडतील. तर तू खा आणि पी आणि आपले डोळे थंड कर, मग जर तुला एखादा मनुष्य दृष्टीस पडला तर त्याला सांग की मी परमदयाळूसाठी उपवासाचे व्रत केले आहे, म्हणून मी आज कोणाशीही बोलणार नाही.'' (२२-२६)

४) म्हणजे बैतुल मक्दिस-यरोशलेमच्या पूर्व भागात.

५) म्हणजे 'एतिकाफ' एकांतात ध्यानस्थ बसल्या होत्या.

६) म्हणजे याविनाच की एखाद्या पुरुषाने तुला स्पर्श करावा, तू पुत्र प्रसवशील.

७) म्हणजे आम्ही त्या मुलाला एक जिवंत चमत्कार बनवू इच्छितो.

८) सदरहू उद्‌गार ज्या परिस्थिती व प्रसंगाचे आहेत त्यावरून असे कळते की बीबी मरयम (अ.) यांनी ही गोष्ट प्रसूतीच्या यातनेपोटी उद्‌गारली आहे असे नव्हे तर अशासाठी उच्चारली आहे की बापाविना जो मुलगा प्रसवला आहे त्याला घेऊन कोठे जावे. याच कारणाने त्या गर्भार अवस्थेत एकट्याच दूरवरच्या ठिकाणी गेल्या होत्या, वास्तविकपणे त्यांच्या आई व कुटुंबातील इतर लोक गावात मौजूद होते.



मग ती त्या मुलाला घेऊन आपल्या लोकांत आली. लोक म्हणू लागले, ''हे मरयम, हे तर तू मोठे पाप केलेस. हे हारूनच्या भगिनी.[९] तुझा बापही काही वाईट मनुष्य नव्हता आणि तुझी आईदेखील काही व्यभिचारिणी नव्हती.'' मरयमने मुलाकडे इशारा केला. लोकांनी सांगितले, ''आम्ही याच्याशी काय बोलावे जे पाळण्यात असलेले एक मूल आहे?'' मूल उद्‌गारले, ''मी अल्लाहचा दास आहे.[१०] त्याने मला ग्रंथ दिला आणि प्रेषित बनविले, आणि समृद्धशाली बनविले, जेथे कोठे मी असेन, आणि नमाज व जकात सुनियमित करण्याची आज्ञा दिली जोपर्यंत मी जिवंत असेन, आणि आपल्या आईसंबंधी कर्तव्यपालन करणारा बनविले.[११] आणि मला दुर्वर्तनी आणि कठोर बनविले नाही. सलाम आहे माझ्यावर जेव्हा मी जन्मलो आणि जेव्हा मी मरेन आणि जेव्हा जिवंत करून मला उठविले जाईल.''[१२] (२७-३३)

हा आहे मरयमपुत्र ईसा आणि ही आहे त्याच्यासंबंधी ती सत्य गोष्ट ज्यात लोक संशय घेत आहेत. अल्लाहचे हे काम नव्हे की त्याने एखाद्याला पुत्र बनवावे. तो पवित्र अस्तित्व आहे. तो जेव्हा एखाद्या गोष्टीचा निर्णय घेतो तेव्हा म्हणतो की अस्तित्वात ये,

९) म्हणजे हारून घराण्याची मुलगी, एखाद्या घराण्याच्या व्यक्तीला त्या घराण्याचा भाऊ म्हटले जावे असा अरबी भाषेतील वाक्यप्रचार आहे. त्या लोकांच्या या गोष्टीचा अर्थ असा होतो की, आमच्या सर्वात उच्च घराण्याची मुली, तू हे काय करून बसलीस.

१०) हीच ती खूण ज्याचा उल्लेख या अगोदर आयत क्र. २१ मध्ये आला आहे. नवजात मुलाने पाळण्यातच पडल्या पडल्या बोलणे प्रारंभ केले, म्हणून ते कसल्याही पापाची परिणती नव्हे तर अल्लाहने दाखविलेला एक चमत्कार आहे हे उघड झाले. सूरह आले इम्रान, आयत क्र. ४६ आणि सूरह माइदा, आयत क्र. ११० यात देखील हजरत ईसा-येशू (अ.) यांनी पाळण्यात संभाषण केले होते म्हणून फर्माविले आहे.

११) माता पित्याचे हक्क जपणारा नव्हे तर केवळ मातेचे हक्क जपणारा म्हणून फर्माविले आहे. हादेखील, हजरत ईसा (अ.) यांचा कोणीही पिता नव्हता, या गोष्टीचा पुरावा आहे. तसेच याच गोष्टीचा अगदी स्पष्ट पुरावा म्हणजे कुरआनात त्यांना प्रत्येक ठिकाणी 'मरयमपुत्र ईसा' असेच म्हटले गेले आहे.

१२) ही निशाणी दाखवून सर्वोच्च अल्लाहने त्यावेळी बनी इस्राईल लोकांसाठी प्रबोधनप्रमाण परिपूर्ण केले होते. तेच कारण आहे की जेव्हा तरुण वयात येऊन हजरत ईसा (अ.) यांनी प्रेषितत्वाच्या कार्यास प्रारंभ केला व त्या लोकांनी केवळ त्यांचा इन्कारच केला असे नव्हे तर त्यांच्या जिवावर ते उठले व त्यांच्या आदरणीय मातेवर व्यभिचाराचा आळ लावण्यासही ते चुकले नाही, तेव्हा सर्वोच्च अल्लाहने त्या लोकांना अशी शिक्षा केली जी इतर कोणत्याही लोकसमूहास दिली गेली नाही.

आणि ती अस्तित्वात येते.[१३] (३४-३५)

(आणि ईसाने म्हटले होते की) ''अल्लाह माझाही पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्तासुद्धा, म्हणून तुम्ही त्याचीच भक्ती करा, हाच सरळमार्ग आहे.'' परंतु नंतर वेगवेगळे गट आपापसात विरोध करू लागले. म्हणून त्या लोकांनी द्रोह केला त्यांच्यासाठी ती वेळ अत्यंत विनाशाची असेल जेव्हा ते एक भयंकर मोठा दिवस पाहतील. जेव्हा ते आमच्यासमोर उपस्थित होतील त्या दिवशी तर त्यांचे कानदेखील चांगले ऐकत असतील आणि त्यांचे डोळेसुद्धा चांगले पहात असतील. परंतु आज हे अत्याचारी उघड मार्गभ्रष्टतेत गुरफटलेले आहेत. हे पैगंबर (स.), अशा स्थितीत जेव्हा हे लोक बेसावध आहेत आणि श्रद्धा ठेवीत नाहीत, यांना त्या दिवसाची भीती दाखवा जेव्हा निर्णय केला जाईल आणि पश्चात्तापाशिवाय अन्य कोणताच उपाय उरणार नाही. सरतेशेवटी आम्हीच पृथ्वी व तिच्या सर्व वस्तूंचे वारस ठरू आणि सगळे आमच्याकडे परतविले जातील. (३६-४०)

आणि या ग्रंथात इब्राहीम (अ.) ची गोष्ट वर्णन करा. निःसंशय तो एक सत्यवादी मनुष्य आणि नबी होता. (यांना जरा त्या प्रसंगाची आठवण करून द्या.) जेव्हा त्याने आपल्या पित्याला सांगितले की, ''हे पित्या, आपण का त्या वस्तूंची उपासना करता ज्या ऐकतही नाहीत आणि पहातही नाहीत आणि आपले कोणतेही काम पार पाडू शकत नाहीत? बाबा, माझ्याजवळ एक असे ज्ञान आले आहे जे आपल्याजवळ आले नाही. आपण माझे अनुकरण करावे. मी आपल्याला सरळमार्ग दाखवीन. बाबा, शैतानची भक्ती करू नये. शैतान तर 'परम दयाळू'ची अवज्ञा करणारा आहे. बाबा, मला भीती आहे की एखादेवेळी तुम्ही 'परम दयाळू'च्या प्रकोपात अडकू नये आणि शैतानचे सोबती बनून रहावे.'' पित्याने सांगितले, ''इब्राहीम (स.), काय तू माझ्या उपास्यापासून पराङ्मुख झाला आहेस? जर तू परावृत्त झाला नाहीस तर मी तुला दगडांचा वर्षाव करून ठार करीन. बस्स, तू माझ्यापासून कायमचा वेगळा हो.'' इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''सलाम आहे तुम्हाला, मी आपल्या पालनकर्त्याजवळ प्रार्थना करीन की त्याने आपल्याला क्षमा करावी. माझा पालनकर्ता माझ्यावर फारच कृपावंत आहे. मी तुम्हा सर्वांनासुद्धा सोडतो आणि त्यांनादेखील ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता. मी तर माझ्या पालनकर्त्यालाच पुकारीन, आशा आहे की मी माझ्या पालनकर्त्याला पुकारून विफल ठरणार नाही.'' मग जेव्हा तो त्या लोकांपासून आणि त्यांचे अल्लाहखेरीज असलेल्या उपास्यापासून वेगळा झाला, तेव्हा आम्ही त्याला इसहाक (अ.) आणि याकूब (अ.)

**१३)** ख्रिस्ती लोकांसाठी प्रबोधनप्रमाणाची ही परिपूर्णता आहे. केवळ चमत्काराने एखाद्याचे जन्मास येणे हे या गोष्टीचे प्रमाण ठरत नाही की त्याला ईशपुत्र (अल्लाह त्यापासून रक्षण करो) ठरवावे.



सारखी संतती दिली आणि प्रत्येकाला प्रेषित बनविले. आणि त्यांना आपल्या कृपेने उपकृत केले आणि त्यांना खरा नावलौकिक प्रदान केला. (४१-५०)

आणि वर्णन करा या ग्रंथात मूसा (अ.) चे. तो एक निवडलेला माणूस होता आणि तो प्रेषित (नबी) होता.[१४] आम्ही त्याला तूर पर्वताच्या उजव्या बाजूने पुकारले आणि रहस्ये सांगून त्याला जवळीक प्रदान केली, आणि आपल्या कृपेने त्याचा भाऊ हारून (अ.) ला नबी बनवून त्याला (मदतनीस म्हणून) दिले. (५१-५३)

आणि या ग्रंथात इस्माईल (अ.) चा उल्लेख करा. तो वचनाचा खरा होता आणि प्रेषित (नबी) होता. तो आपल्या कुटुंबियांना नमाज आणि जकातची आज्ञा देत होता आणि आपल्या पालनकर्त्यापाशी तो एक प्रिय मनुष्य होता. (५४-५५)

आणि या ग्रंथात इद्रीस (अ.) चा उल्लेख करा. तो एक सत्यनिष्ठ मनुष्य व एक नबी होता. आणि आम्ही त्याला एक उच्चस्थानी उचलले होते. (५६-५७)

**१४)** अरबी शब्द 'रसूल'चा अर्थ 'प्रेषित' पाठविलेला असा होतो. अरबी शब्द 'नबी' याच्या अर्थनिश्चितीत शब्दशास्त्रपंडितात मतभिन्नता आहे. काहींच्या मते 'नबी'चा अर्थ खबर देणारा असा आहे तर काहींच्या मते 'नबी' शब्दाचा अर्थ 'उच्च दर्जा बाळगणारा' आणि 'उच्च पदस्थ' असा होतो. म्हणून रसूलनबी' प्रेषित नबी असे एखाद्या इसमाला म्हणण्याचा अर्थ एकतर 'उच्च पदस्थ प्रेषित' आहे, किंवा सर्वोच्च अल्लाहतर्फे वार्ता देणारा प्रेषित, असा आहे. दिव्य कुरआनात हे दोन्ही शब्द सामान्यपणे समानार्थी प्रयुक्त झाले आहेत. परंतु काही ठिकाणी रसूल, आणि नबी हे शब्द अशा तऱ्हेनेदेखील प्रयुक्त झाले आहेत जेणेकरून त्या उभय शब्दात दर्जा अथवा कार्याच्या दृष्टीने काही पारिभाषिक अंतर असल्याचे निदर्शनात येते. उदा. सूरह हज, आयत क्र. ५३ मध्ये फर्माविलेले आहे, 'आम्ही तुमच्यापूर्वी पाठविले नाही कोणी रसूल आणि कोणी नबी परंतु' या शब्दाद्वारे स्पष्टपणे असे व्यक्त होते की रसूल आणि नबी, हे दोन वेगवेगळे पारिभाषिक शब्द आहेत. त्यांच्या दरम्यान काहीतरी अर्थात्मक फरक निश्चितच आहे. याच कारणासाठी भाष्यकारांदरम्यान, सदरहू फरक कोणत्या स्वरूपाचा आहे असा वाद निर्माण झाला आहे. परंतु वस्तुस्थिती अशी आहे की निर्णायक प्रमाणानिशी रसूल-प्रेषित, आणि नबी यांच्यातील वेगवेगळ्या स्थानाची निश्चिती कोणीही करू शकलेला नाही. जास्तीत जास्त विश्वासपूर्ण रीतीने जी गोष्ट सांगितली जाऊ शकते ती केवळ अशी की 'रसूल' हा शब्द नबी या शब्दाच्या तुलनेने विशेष आहे. म्हणजे प्रत्येक रसूल, नबीदेखील असतो परंतु प्रत्येक नबी रसूल असत नाही. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर नबी (अंबिया) पैकी सर्वसामान्य नबीपेक्षा ज्यांना अधिक महत्वाचे मन्सब सोपविले गेले होते अशा महातेजस्वी विभूतींसाठी बोलला गेला आहे. याचे समर्थन त्या हदीसद्वारेही होते ज्यात अल्लाहच्या अंतिम प्रेषित (स.) यांना जेव्हा प्रेषित-रसूलांची संख्या विचारली गेली तेव्हा आपण ३१३ अथवा ३१५ सांगितली आणि अंबिया (नबी) ची संख्या विचारली गेली तेव्हा आपण एक लक्ष चोवीस हजार इतकी सांगितली.

हे ते पैगंबर आहेत ज्यांना अल्लाहने इनाम बहाल केले. आदम (अ.) च्या संततीपैकी, आणि त्या लोकांच्या वंशापासून ज्यांना आम्ही नूह (अ.) च्या समवेत नौकेत स्वार केले होते, आणि इब्राहीम (अ.) च्या वंशापासून, आणि इस्राईलच्या वंशापासून - आणि हे त्या लोकांपैकी होते ज्यांना आम्ही मार्गदर्शन प्रदान केले आहे आणि त्यांना निवडले आहे. त्यांची अवस्था अशी होती की जेव्हा त्या परम दयाळूची संकेतवचने त्यांना ऐकविली जात तेव्हा साश्रू नयनांनी नतमस्तक होत असत. (५८)

त्यांच्यानंतर ते दुष्टपुत्र त्यांचे उत्तराधिकारी बनले ज्यांनी नमाज व्यर्थ घालविली आणि मनोवासनेच्या आहारी गेले. तर निकटच आहे, की त्यांना पथभ्रष्टतेच्या परिणामांना सामोरे जावे लागेल. तथापि ज्यांनी पश्चात्ताप केला आणि श्रद्धा ठेवली आणि सदाचरण अवलंबिले ते स्वर्गामध्ये दाखल होतील. आणि त्यांचे तिळमात्रदेखील हक्क मारले जाणार नाहीत. त्यांच्यासाठी सदैव राहणारे स्वर्ग आहेत ज्यांचे परमदयाळूने आपल्या दासांना आडपडद्यात वचन दिले आहे आणि खचितच ते वचन पूर्ण होऊनच राहणार आहे. तेथे ते कोणतीही वाह्यात गोष्ट ऐकणार नाहीत. जे काही ऐकतील योग्यच ऐकतील आणि त्यांची उपजीविका त्यांना सतत सकाळ-संध्याकाळ मिळत राहील. हाच आहे तो स्वर्ग ज्याचा वारस आमच्या दासांपैकी आम्ही केवळ त्यालाच बनवू जो पापभीरू आहे. (५९-६३)

हे पैगंबर (स.), आम्ही तुमच्या पालनकर्त्याच्या हुकुमाविना उतरत नसतो.[१५] जे काही आमच्यासमोर आहे व जे काही आमच्या मागे व जे काही त्यांच्या दरम्यान आहे, प्रत्येक वस्तूचा तोच स्वामी आहे, आणि तुमचा पालनकर्ता विसरणारा नाही. तो पालनकर्ता आहे आकाशांचा व पृथ्वीचा आणि त्या सर्व वस्तूंचा ज्या आकाश व पृथ्वी दरम्यान आहे, म्हणून तुम्ही त्याची भक्ती करा आणि त्याच्याच भक्तीवर अढळ रहा, तुमच्या माहितीप्रमाणे त्याच्या समान कोणी आहे काय? (६४-६५)

मनुष्य म्हणतो, काय खरोखरच जेव्हा मी मेलो असेन तेव्हा पुन्हा जिवंत करून बाहेर आणला जाईन? काय मनुष्याला आठवत नाही आम्ही पूर्वी त्याला निर्माण केले आहे जेव्हा तो काहीच नव्हता? तुझ्या पालनकर्त्याची शपथ आम्ही अवश्य या सर्वांना आणि यांच्यासमवेत शैतानांना देखील घेरून आणू. मग नरकाच्या सभोवती आणून यांना गुडघ्यावर खाली पाडू, मग प्रत्येक गटातून अशा प्रत्येक व्यक्तीला निवडून काढू जो 'परमदयाळू'च्या विरोधात जास्त दुर्वर्तनी बनला होता, मग हे आम्हाला माहीत आहे की

**१५)** या ठिकाणी शब्द सर्वोच्च अल्लाहचेच असले तरी बोलणारे फरिश्ते आहेत, म्हणजे फरिश्ते अल्लाहचे प्रेषित (स.) यांना सांगत आहेत की आम्ही स्वअधिकाराने येत नसतो तर जेव्हा अल्लाह पाठवितो तेव्हाच येत असतो.



त्यांच्यापैकी कोण नरकामध्ये फेकला जाण्याच्या लायकीचा आहे. तुमच्यापैकी असा कोणीही नाही जो नरकात येणार नाही. ही तर एक ठरलेली गोष्ट आहे जिला पूर्ण करणे तुझ्या पालनकर्त्यावर आहे. मग आम्ही त्या लोकांना वाचवू जे (जगात) ईशपरायण होते आणि अत्याचाऱ्यांना त्याच स्थितीत सोडून देऊ. (६६-७२)

या लोकांना जेव्हा आमची उघडउघड वचने ऐकविली जातात तेव्हा इन्कार करणारे श्रद्धावंतांना म्हणतात, "सांगा, आम्हा उभय पक्षांपैकी कोण उत्तम स्थितीत आहे आणि कोणत्या मैफली जास्त वैभवशाली आहेत?[१६] वस्तुत: यांच्यापूर्वी आम्ही कित्येक अशा लोकसमुदायांना नष्ट केलेले आहे जे यांच्यापेक्षा अधिक साधन-सामुग्री बाळगत होते आणि सकृत्दर्शनी वैभवात यांच्यापेक्षा वरचढ होते यांना सांगा, जो माणूस मार्गभ्रष्टतेत गुरफटतो त्याला परम दयाळू सवलत देत असतो येथपावेतो की जेव्हा असले लोक ती गोष्ट पाहून घेतात जिच्यासंबंधी त्यांना वचन दिले गेले आहे - मग तो अल्लाहचा प्रकोप असो अथवा पुनरुत्थानाची घटका - तेव्हा त्यांना कळून चुकेल की कुणाची स्थिती वाईट आहे आणि कुणाचा गट दुर्बल! याउलट जे लोक सरळमार्ग अवलंबितात, अल्लाह त्यांना सन्मार्गात गती प्रदान करतो, आणि बाकी राहणारी सत्कृत्येच तुझ्या पालनकर्त्याजवळ मोबदला व शेवटाच्या दृष्टीने उत्तम आहेत. (७३-७६)

मग तू पाहिलेस का त्या माणसाला जो आमचे संकेत मानण्यास नकार देतो, आणि म्हणतो की मी तर संपत्ती व संततीने अनुग्रहीत होतच राहीन? काय त्याला परोक्षाची माहिती झाली आहे अथवा काय त्याने परमकृपाळूकडून एखादे वचन घेतले आहे? मुळीच नाही, जे काही हा बरळत आहे ते आम्ही लिहून घेऊ आणि त्याच्यासाठी शिक्षेत आणखी अधिक वाढ करू. ज्या साधन-सामुग्री व फौजफाट्याचा हा उल्लेख करीत आहे, ते सर्व आमच्याच जवळ राहणार आणि हा एकटाच आमच्यासमोर हजर होईल. (७७-८०)

या लोकांनी अल्लाहला सोडून आपले काही उपास्य बनवून ठेवले आहेत की ते यांचे पाठीराखे बनतील. कोणीही पाठीराखा असणार नाही. ते सर्व यांच्या उपासनेचा इन्कार करतील, आणि उलट यांचे विरोधक बनतील. (८१-८२)

**१६)** मक्केतील काफिरांचा युक्तिवाद असा होता की पाहून घ्या, कोण अल्लाहची कृपा व त्याच्या देणग्यांनी नवाजिला जात आहे? कोणांची घरे अधिक शानदार आहेत? कुणाचे राहणीमान अधिक उच्च आहे? कोणाच्या महफिली जास्त थाटाने भरतात? जर हे सर्वकाही आम्हाला प्राप्त आहे व मुसलमान त्याला आचवले असावेत तर स्वत:च विचार करा की आम्ही जर असत्यावर असतानादेखील असली मौजमजा करावी व तुम्ही सत्याधिष्ठित असतानाही अशाप्रकारे फाटके व दुर्दशेत राहावे हे शक्य तरी होते का?

काय तुम्ही पहात नाही की आम्ही सत्याचा इन्कार करणाऱ्यावर शैतान सोडलेले आहेत जे यांना खूप-खूप (सत्याच्या विरोधासाठी) उत्तेजित करीत आहेत? तर आता यांच्यावर प्रकोप कोसळण्यासाठी बेचैन होऊ नका. आम्ही यांचे दिवस मोजीत आहोत. तो दिवस येणार आहे जेव्हा ईशपरायण लोकांना आम्ही अतिथीप्रमाणे 'परमदयाळू'च्या ठायी सादर करू. आणि गुन्हेगारांना आम्ही तृषार्त जनावराप्रमाणे नरकाकडे हाकून नेऊ. त्यावेळी लोक कोणतीही शिफारस आणण्यास समर्थ असणार नाहीत, त्याखेरीज ज्याने 'परमदयाळू'च्या ठायी परवाना मिळविला असेल. (८३-८७)

ते म्हणतात की परमदयाळूने एखाद्याला पुत्र बनविले आहे. अत्यंत वाह्यात गोष्ट आहे जी तुम्ही घडून आणली आहे. निकटच आहे की आकाशाने फाटावे, पृथ्वीने दुभंगावे आणि पर्वताने ढासळावे. या गोष्टीवर की लोकांनी परमदयाळूला अपत्य असल्याचा दावा केला. परमदयाळूचे वैभव असे नाही की त्याने एखाद्यास पुत्र बनवावे. पृथ्वी व आकाशांत जे काही आहे सर्व त्याच्या ठायी दास म्हणून हजर होणार आहेत. तो सर्वव्यापी आहे आणि त्याने त्यांची मोजदाद करून ठेवली आहे. पुनरुत्थानाच्या दिवशी सर्व त्याच्यासमोर एक एकटे हजर होतील. (८८-९५)

निश्चितच ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे आणि सत्कृत्ये करीत आहेत, लवकरच परमदयाळू त्यांच्यासाठी इतरांना सहृदय करील.[१७] म्हणून हे पैगंबर (स.)! या वाणीला आम्ही सोपे बनवून तुमच्या भाषेत यासाठी अवतरले आहे की तुम्ही पापभीरू लोकांना आनंदवार्ता द्यावी व हट्टी लोकांना भयसूचना द्यावी. यापूर्वी आम्ही कित्येक जनसमुदायांना नष्ट करून टाकले आहे, मग काय आज तुम्हाला कुठे त्यांची चिन्हे आढळतात अथवा त्यांची कुजबूजही कोठे ऐकू येते? (९६-९८)

**१७)** म्हणजे आज मक्केतील रस्त्यांवर त्यांना अपमानित केले जात आहे परंतु ही स्थिती कायम राहणार नाही. आपली सत्कृत्ये आणि आपल्या उच्च नीतीमत्तेमुळे जेव्हा ते लोकप्रिय बनतील, हृदयें त्यांच्याकडे आकर्षिली जातील. जग त्यांच्यापुढे लोटांगण घालील, ती वेळ जवळ आहे. दुष्टता व दुराचार, अहंकार आणि गर्व, लबाडी व पाखंडीपणा यांच्या आधारे जी सत्ता आणि जे पुढारीपण चालत असेल त्यामुळे माना जरी तुकविल्या जात असल्या परंतु मने मात्र त्यामुळे जिंकता येऊ शकत नाही. याउलट जे लोक सचोटी व दानत, सत्यनिष्ठता आणि उच्च नीतीमत्तेनिशी सरळमार्गाचे आवाहन करतील, प्रथमत: जगाला त्यांचा कितीका तिटकारा येऊ नये सरतेशेवटी मने त्यांच्याकडे आकर्षिली जातात. लबाड लोकांचा खोटारडेपणा जास्त काळपर्यंत त्यांचा मार्ग रोखू शकत नाही.



# २० सूरह तॉहा

*(मक्काकालीन, वचने १३५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तॉहा. आम्ही हे कुरआन तुमच्यावर यासाठी अवतरले नाही की तुम्ही संकटात पडावे. हे तर एक पुन:स्मरण होय अशा प्रत्येक इसमासाठी ज्याने भीती बाळगावी.[१] अवतरले गेले आहे त्याच्याकडून ज्याने निर्माण केले पृथ्वी आणि उत्तुंग आकाशांना. तो परमदयाळू (सृष्टीच्या) राजसिंहासनावर विराजमान आहे. स्वामी आहे त्या सर्व वस्तूंचा ज्या आकाशांत व पृथ्वीत आहेत, ज्या पृथ्वी व आकाशांच्या दरम्यान आहेत आणि ज्या मातीखाली आहेत. तुम्ही वाटल्यास आपले म्हणणे मोठ्याने सांगा, तो तर हळूच सांगितलेली गोष्ट किंबहुना त्याच्यापेक्षाही अधिक गुप्त गोष्टदेखील जाणतो. तो अल्लाह आहे, त्याच्याशिवाय अन्य कोणीच परमेश्वर नाही, त्याची उत्कृष्ट नामावली आहे. (१-८)

आणि तुम्हाला काही मूसा (अ.) ची वार्ताही मिळाली आहे का? जेव्हा त्याने एक अग्नी पाहिला[२] आणि आपल्या कुटुंबियांना सांगितले की, "थोडे थांबा, मी एक अग्नी पाहिला आहे. कदाचित मी तुमच्यासाठी एखादा निखारा आणावा अथवा या अग्नीवर मला (रस्त्याविषयी) एखादे मार्गदर्शन प्राप्त व्हावे."[३] (९-१०)

तेथे पोहचला तेव्हा हाक दिली गेली, "हे मूसा (अ.)! मीच तुझा पालनकर्ता आहे. पादत्राणे काढून ठेव. तू 'तुवा' या पवित्र खोऱ्यात आहेस आणि मी तुला निवडले आहे. ऐक, जे काही दिव्य प्रकटन केले जात आहे. मीच अल्लाह आहे. माझ्याशिवाय कोणीच

**१)** म्हणजे हे पैगंबर (स.) हा कुरआन अवतरित करून आम्ही एखादे अघटित काम तुमच्याकडून घेऊ इच्छितो असे नाही. जे लोक मानत नाहीत त्यांना मानावयास भाग पाडावे व ईमानसाठी ज्यांची हृदयें बंदिस्त झाली आहेत त्यांच्यात ईमानचा शिरकाव केल्याविना राहू नये असे काम तुमच्या सुपूर्द केलेले नाही. हे तर एक स्मरण आणि आठवण आहे व अशाकरिता पाठविले आहे की ज्याच्या मनात ईशभय आहे, हे ऐकून त्याने शुद्धीवर यावे.

**२)** ही त्यावेळची घटना आहे जेव्हा हजरत मूसा (अ.) मदयन शहरात काही वर्षे देशांतराच्या अवस्थेत जीवन व्यतीत केल्यानंतर आपल्या पत्नी (जिच्याशी मदयन येथे विवाह झाला होता) सह मिस्रकडे परत जात होते.

**३)** असे वाटते की ही रात्रीची वेळ आणि हिवाळा होता. हजरत मूसा (अ.) सीना द्विपकल्पाच्या दक्षिणी प्रदेशातून जात होते. दुरून एक अग्नी प्रज्वलित पाहून त्यांनी विचार केला की तेथून थोडा अग्नी तरी प्राप्त होईल जेणेकरून मुलाबाळांना रात्रभर ऊब देण्याची व्यवस्था होईल अथवा कमीत कमी पुढे मार्ग कोणत्या दिशेने आहे याची तरी माहिती मिळेल. विचार केला होता जगातील मार्ग प्राप्त करण्याचा व तेथे प्राप्त झाला परलोकाचा मार्ग.

ईश्वर नाही. म्हणून तू माझीच भक्ती कर आणि माझ्या स्मरणाकरिता नमाज कायम कर. पुनरुत्थानाची घटका अवश्य येणार आहे. मी ती वेळ गुप्त ठेवू इच्छितो जेणेकरून प्रत्येक सजीवाला आपल्या प्रयत्नानुसार मोबदला मिळावा, तर असा कोणताही इसम जो त्यावर श्रद्धा ठेवीत नाही आणि आपल्या मनोवासनांचा दास बनला आहे त्याने तुला त्या क्षणाच्या काळजीपासून रोखता कामा नये अन्यथा तू विनाशात पडशील. आणि हे मूसा, हे तुझ्या हातात काय आहे?'' मूसा (अ.). ने उत्तर दिले, ''ही माझी काठी आहे. मी यावर आधार घेऊन चालतो, याने आपल्या शेळ्यांसाठी पाने झाडतो, आणखीही अनेक कामे आहेत जी हिच्या साह्याने पार पाडतो.'' फर्मावले, ''फेकून दे हिला मूसा (अ.).'' त्याने फेकून दिली, आणि अकस्मात तो एक सर्प होता जो पळत होता. फर्मावले, ''पकड याला आणि भिऊ नकोस, आम्ही याला पुन्हा तशीच करू जशी ही होती. आणि जरा आपला हात आपल्या काखेत दाब, तळपत निघेल कोणत्याही त्रासाविना.[४] हा दुसरा संकेत आहे यासाठी की आम्ही तुला आपले मोठे संकेत दाखविणार आहोत. आता तू फिरऔनजवळ जा, तो दुर्वर्तनी झाला आहे.'' मूसा (अ.) ने विनविले, ''हे पालनकर्त्या, माझे हृदय विस्तृत कर. आणि माझे कार्य माझ्यासाठी सुलभ कर. आणि माझी जिव्हाग्रंथी उलगडून दे, जेणेकरून लोकांना माझे बोलणे कळेल, आणि माझ्यासाठी माझ्या घराण्यातून एक वजीर नेमून दे हारून जो माझा भाऊ आहे, त्याच्याद्वारे माझे हात बळकट कर, आणि त्याला माझ्या कामात सहभागी कर, जेणेकरून आम्ही खूप तुझ्या पावित्र्याचे वर्णन करू, आणि तुझी चर्चा करू. तू नेहमी आमच्या स्थितीवर दृष्टि राखणारा आहेस.'' फर्मावले, ''दिले गेले जे काही तू मागितलेस, हे मूसा (अ.), आम्ही पुन्हा एकदा तुझ्यावर उपकार केले. आठव ती घटका जेव्हा आम्ही तुझ्या आईला इशारा केला, असा इशारा जो दिव्य प्रकटनाद्वारेच केला जातो की या बाळाला पेटीत ठेव आणि पेटी नदीत सोडून दे. नदी तिला काठावर फेकून देईल आणि तिला माझा शत्रू आणि या बाळचा शत्रू उचलून घेईल.'' (११-३९-)

''मी माझे प्रेम तुझ्यावर पांघरले आणि अशी व्यवस्था केली की तुझे संगोपन माझ्या देखरेखीत व्हावे. स्मरण कर जेव्हा तुझी बहीण चालत होती, मग जाऊन सांगते की मी तुम्हाला तिचा पत्ता देऊ जी या बाळाचे पालनपोषण चांगल्या प्रकारे करील.[५] अशा प्रकारे आम्ही तुला पुन्हा तुझ्या आईजवळ पोहचविले जेणेकरून तिचे डोळे थंड रहावेत आणि ती दु:खी होऊ नये. आणि (हेही आठव की) तू एका व्यक्तीला ठार केले होतेस,

४) म्हणजे प्रकाशमान असा होईल जसा सूर्य, परतु तुम्हाला त्याचा काहीच त्रास होणार नाही.

५) म्हणजे नदीच्या काठाने टोपली बरोबर चालत होती. मग जेव्हा फिरऔनच्या कुटुंबियांनी मुलास उचलून घेतले व तेथे त्याच्यासाठी दाईचा शोध होऊ लागला तेव्हा हजरत मूसा (अ.) च्या बहिणीने तेथे जाऊन त्यांना ही गोष्ट सांगितली.



आम्ही तुला त्या फंद्यातून काढले आणि तुला निरनिराळ्या परीक्षांतून गुंतविले व तू मदयनच्या लोकांदरम्यान अनेक वर्षे वास्तव्य करून राहिलास. मग आता तू यथायोग्य वेळेवर आलेला आहेस. हे मूसा, मी तुला आपल्या कामास योग्य बनविले आहे. जा, तू आणि तुझा भाऊ माझ्या संकेतासह. आणि हे पहा तुम्ही माझ्या स्मरणात कसूर करू नका जा तुम्ही दोघे फिरऔनजवळ तो शिरजोर बनला आहे. त्याच्याबरोबर नरमाईने बोला, कदाचित तो उपदेश स्वीकारील अथवा भीती बाळगील?'' (-३९-४४)

दोघांनी विनविले,[६] ''हे पालनकर्त्या आम्हाला भय आहे की तो आम्हावर अत्याचार करील अथवा तुटून पडेल.'' फर्मावले, ''भिऊ नका, मी तुमच्यासमवेत आहे, सर्वकाही ऐकत आहे आणि पहात आहे जा त्याच्याजवळ आणि सांगा की आम्ही तुझ्या पालनकर्त्याचे प्रेषित आहोत, बनीइस्राईलना आमच्यासमवेत जाण्यासाठी मुक्त कर आणि त्यांना त्रास देऊ नकोस, आम्ही तुझ्याजवळ तुझ्या पालनकर्त्याचे संकेत घेऊन आलो आहोत आणि शांती व सुरक्षितता आहे त्याच्यासाठी जो सरळ मार्गाचे अनुसरण करील. आम्हाला दिव्य बोधाद्वारे कळविले गेले आहे की प्रकोप आहे त्याच्यासाठी जो खोटे ठरवील आणि तोंड फिरवील.'' (४५-४८)

फिरऔनने सांगितले,[७] ''बरे तर मग तुम्हा दोघांचा पालनकर्ता कोण आहे हे मूसा (अ.)?'' मूसा (अ.) ने उत्तर दिले, ''आमचा पालकर्ता तो आहे ज्याने प्रत्येक वस्तूला तिचे स्वरूप प्रदान केले मग तिला मार्ग दाखविला.''[८] फिरऔन म्हणाला, ''आणि पूर्वी ज्या पिढ्या होऊन गेल्या आहेत त्यांची मग काय स्थिती होती?''[९] मूसा (अ.) म्हणाला,

६) ही त्यावेळची घटना आहे जेव्हा हजर मूसा (अ.) मिस्र पोहचले व हजरत हारून (अ.) प्रत्यक्षपणे त्यांचे सहकारी बनले. त्यावेळी फिरऔनजवळ जाण्याअगोदर दोन्हीनी सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरात अशी विनंती केली असावी.

७) आता त्यावेळचा किस्सा प्रारंभ होतो जेव्हा दोन्ही भाऊ फिरऔनच्या येथे पोहचले.

८) म्हणजे जगातील प्रत्येक वस्तू जशी काही बनलेली आहे, त्यानेच बनविल्यामुळे बनली आहे. मग प्रत्येक वस्तूला त्याचा विशिष्ट आकार देऊन तसेच सोडले गेले असावे असे त्याने केलेले नाही तर त्यानंतर तोच त्या सर्व वस्तूंना मार्गदर्शन करीत असतो. जगातील कुठलीही वस्तू अशी नाही जिला आपल्या रचनेचा उपयोग आणि आपल्या रचनेमागील उद्दिष्ट पूर्ण करण्याची पद्धत त्याने शिकविली नसावी. कानाला ऐकणे, डोळ्यास पाहणे, माशाला पोहणे आणि चिमणीला उड्डाण करण्याचे त्यानेच शिकविले आहे. तो प्रत्येक वस्तूचा केवळ निर्माताच आहे असे नाही तर त्याबरोबर तो मार्गदर्शक व शिक्षकदेखील आहे.

९) म्हणजे रब केवळ तोच एक ईश्वर आहे अशीच जर गोष्ट आहे तर मग हे आम्हा सर्वांचे वाडवडील जे शतकानुशतके पिढ्यांनंतर पिढ्यांनी इतर बऱ्याचशा देवांची उपासना करीत आले आहेत, त्यांचे तुमच्यापाशी कोणते स्थान आहे? काय ते सर्व प्रकोपास पात्र आहेत? काय त्या सर्वांच्या अकला मारल्या गेल्या होत्या?

"त्याचे ज्ञान माझ्या पालनकर्त्यापाशी एका लेखात सुरक्षित आहे. माझा पालनकर्ता चुकतही नाही आणि विसरतही नाही"[१०] तोच,[११] ज्याने तुमच्यासाठी जमिनीची चादर अंथरली, आणि तिच्यात तुमच्यासाठी मार्ग बनविले, व वरून पर्जन्यवृष्टी केली, मग त्याद्वारे विविध प्रकारचे उत्पन्न काढले खा आणि आपल्या जनावरांनासुद्धा चारा. निश्चितच यात बरेच संकेत आहेत बुद्धी बाळगणाऱ्यांसाठी. याच जमिनीतून आम्ही तुम्हाला निर्माण केले, हिच्यातच आम्ही तुम्हाला परत नेऊ आणि हिच्यातूनच तुम्हाला दुसऱ्यांदा बाहेर काढू. (४९-५५)

आम्ही फिरऔनला आमचे सर्वच संकेत दाखविले. परंतु तो खोटेच ठरवीत गेला आणि मानले नाही. म्हणू लागला, "हे मूसा (अ.), तू आमच्याजवळ यासाठी आलेला आहेस का की आपल्या जादूच्या जोरावर आम्हाला आमच्या देशातून बाहेर काढावे? बरे, आम्हीसुद्धा तुझ्या मुकाबल्यात तशीच जादू आणतो. ठरव, केव्हा आणि कोठे मुकाबला करावयाचा. आम्हीही या करारापासून फिरणार नाही आणि तूसुद्धा फिरू नकोस. खुल्या मैदानात समोर ये." मूसा (अ.) ने सांगितले, "उत्सवाचा दिवस ठरला, आणि दिवसाउजेडी लोकांनी जमा व्हावे."[१२] फिरऔनने परतून आपले सर्व डावपेच एकत्रित केले आणि मुकाबल्यासाठी आला. मूसा (अ.) ने (ऐनवेळी विरोधी दलास संबोधून) सांगितले, "हे दुर्दैवी लोकांनो, खोटे आळ रचू नका अल्लाहवर.[१३] नाहीतर तो एका

**१०)** फिरऔनच्या प्रश्नांमागचा हेतू श्रोत्यांच्या व तसेच त्यांच्याद्वारे सर्व लोकसमूहाच्या हृदयांत पूर्वग्रहदोषाचा अग्नी भडकविणे असा होता. हजरत मूसा (अ.) यांच्या या उत्तरामुळे त्याचे सर्व विषारी दात तुटले, की ते लोक जसे काही होते, आपले काम उरकून ईश्वराकडे गेले आहेत. त्यांची प्रत्येक कृती, त्या मागचा हेतू ईश्वराला माहीत आहे, त्यांच्याशी जो काही व्यवहार ईश्वरास करावयाचा आहे त्याला तोच जाणतो.

**११)** भाषाशैलीद्वारे स्पष्टपणे असे जाणवते की हजरत मूसा (अ.) यांचे उत्तर 'विसरत नाही येथेच संपले आहे,' येथून आयत क्र. ५५ पर्यंत संपूर्ण लिखाण सर्वोच्च अल्लाहकडून स्पष्टीकरण आणि आठवण म्हणून प्रतिपादित झाले आहे.

**१२)** फिरऔनचा हेतू असा होता की एकदाचे जादूगारांकरवी दोरींना व काठींना सर्प बनवून दाखविले म्हणजे मूसा (अ.) च्या चमत्काराचा लोकांच्या मनावर जो प्रभाव झालेला आहे तो नाहीसा होईल. ही तर हजरत मूसा (अ.) यांची मनोकामना होती. त्यांनी फर्माविले की एखादा वेगळा दिवस आणि वेगळे स्थळ ठरविण्याची गरजच काय आहे, समारंभाचा दिवस जवळ आहे. त्यात देशातील सर्व लोक राजधानीत एकत्रित होतात. तेथेच यात्रेच्या मैदानात मुकाबला व्हारा जेणेकरून सर्व लोकांनी पाहावे. तसेच वेळसुद्धा दिवसाच्या संपूर्ण उजेडाची असली पाहिजे म्हणजे शंका राहण्यास वावच ठरू नये.

**१३)** म्हणजे या चमत्काराला जादू आणि ते दाखविणाऱ्या प्रेषितास लबाड जादूगार ठरवू नका.



भयंकर प्रकोपाने तुमचा सर्वनाश करील. ज्याने कोणी खोटे रचले तो निष्फळ ठरला."

(५६-६१)

हे ऐकून त्यांच्या दरम्यान मतभेद उद्भवले आणि ते गुपचुपपणे आपापसात सल्लामसलत करू लागले.[१४] सरतेशेवटी काही लोकांनी सांगितले की, "हे दोघे तर केवळ जादूगार आहेत. यांचा उद्देश असा आहे की आपल्या जादूच्या बळावर तुम्हाला तुमच्या भूमीतून हद्दपार करावे आणि तुमच्या आदर्श जीवनपद्धतीचे उच्चाटन करावे. आपल्या सर्व युक्त्या प्रयुक्त्या आज एकत्र करा आणि एकजुटीने मैदानात या. मात्र हे समजून असा की आज जो कोणी वरचढ ठरला तोच यशस्वी झाला." (६२-६४)

जादूगार म्हणाले, "मूसा (अ.) तुम्ही फेकता की आम्ही अगोदर फेकावे?" मूसा (अ.) म्हणाला, "नाही, तुम्हीच फेका," एकाएकी त्यांच्या दोऱ्या आणि काठ्या जादूच्या बळावर मूसा (अ.) ला पळत असल्याचे भासू लागल्या. आणि मूसा (अ.) आपल्या मनात भयभीत झाला.[१५] आम्ही सांगितले, "भिऊ नकोस, तूच वरचढ ठरशील. फेक जे

**१४)** यावरून असे कळते की त्या लोकांना आपला दुबळेपणा स्वत:च आपल्या मनात जाणवत होता. त्यांना माहीत होते की हजरत मूसा (अ.) यांनी फिरऔनच्या दरबारात जे काही दाखविले होते, ते जादू नव्हते. ते अगोदरच या मुकाबल्यात भीत भीत आणि संकोच बाळगूनच आले होते. मग ऐन वेळी जेव्हा हजरत मूसा (अ.) नी त्यांना ललकारून तंबी दिली तेव्हा त्यांचे धैर्य अकस्मात खचले. त्यांच्यात मतभेद याबाबतीत उद्भवले असणार की या मोठ्या सणाच्या प्रसंगी जेव्हा की देशभरातून येणारे लोक एकत्रित आहेत, खुल्या मैदानात आणि दिवशाच्या पूर्ण उजेडात मुकाबला करणे योग्य आहे किंवा नाही. जर या ठिकाणी आम्ही हार खाल्ली आणि जादू व चमत्कारातील फरक उघड झाला तर मग प्रकरण सावरता सावरले जाऊ शकणार नाही.

**१५)** म्हणजे हजरत मूसा (अ.) यांच्या तोंडून 'फेका' असा शब्द बाहेर पडल्याबरोबर जादूगारांनी अकस्मात आपल्या काठ्या व दोऱ्या त्यांच्या दिशेने फेकल्या व अकस्मातपणे, शेकडो सर्प धावत त्यांच्यावर चालून येत आहेत असे त्यांना दिसले. या दृश्यामुळे तत्काळ एका प्रकारची दहशत हजरत मूसा (अ.) यांना आपल्या अंत:करणात जाणवली असली तर यात काही नवल आहे अशातली गोष्ट नव्हे. मानव कोणत्याही परिस्थितीत मानवच असतो, मग तो प्रेषित का असू नये. मानवी वैशिष्ट्ये त्यापासून विभक्त होऊ शकत नाही. या ठिकाणी ही गोष्ट उल्लेखनीय आहे की, सामान्य माणसांप्रमाणेच प्रेषितदेखील जादूने प्रभावित होऊ शकतो, जादू जरी त्याच्या प्रेषितत्वाच्या कार्यात अडथळा आणू शकत नाही तरी त्याच्या मानवी इंद्रियावर परिणाम जरूर करू शकते. या गोष्टीची वास्तवता या ठिकाणी कुरआन प्रमाणिक करीत आहे. यावरून अशा लोकांच्या विचारांतील चूक उघडकीस येते जे हदीसीत, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर जादूचा परिणाम झाल्याची निवेदने वाचून केवळ त्याच निवेदनांना खोटे ठरवितात असे नाही तर त्याच्याही पुढे जाऊन सर्वच हदीसींना अविश्वसनीय ठरवू लागतात.

काही तुझ्या हातात आहे, आताच यांच्या सर्व बनावटी वस्तूंना गिळून टाकील. यांनी जे काही घडवून आणले आहे ही तर जादूगारांची फसवेगिरी आहे, आणि जादूगार कदापि यशस्वी होऊ शकत नाही मग तो कितीही थाटात येवो.'' शेवटी असेच घडले की सर्व जादूगार नतमस्तक स्थितीत आणले गेले[१६] आणि त्यांनी पुकारले, ''मानले आम्ही हारून आणि मूसा (अ.) च्या पालनकर्त्याला.'' फिरऔनने सांगितले, ''तुम्ही त्याच्यावर श्रद्धा ठेवली यापूर्वी की मी तुम्हाला तशी परवानगी द्यावी? कळून चुकले की हा तुमचा गुरू आहे ज्याने तुम्हाला जादूगिरी शिकविली होती. बरे, आता मी तुमचे हात पाय विरूद्ध दिशेने कापावयास लावतो आणि खजुराच्या खोडावर तुम्हाला सुळी देतो, मग तुम्हाला कळेल की आम्हा दोघांपैकी कोणाचा प्रकोप अधिक कठोर आणि प्रदीर्घ आहे.'' (म्हणजे मी तुम्हाला अधिक कठोर शिक्षा देऊ शकतो की मूसा (अ.)) जादूगाराने उत्तर दिले, ''शपथ आहे त्याची ज्याने आम्हाला निर्माण केले आहे. हे कदापि संभव नाही की आम्ही उज्ज्वल संकेत समोर आल्यानंतरदेखील (सत्यावर) तुला प्राधान्य द्यावे, तुला जे काही करावयाचे असेल ते करून टाक. तू जास्तीत जास्त याच जगातील जीवनाचाच केवळ निर्णय करू शकतोस. आम्ही तर आमच्या पालनकर्त्यावर श्रद्धा ठेवली जेणेकरून त्याने आमचे अपराध माफ करावे आणि या जादूगिरीपासून, ज्यासाठी तू आम्हाला भाग पाडले होते, क्षमा करावी. अल्लाहच चांगला आहे आणि तो बाकी उरणार आहे.'' वस्तुस्थिती अशी आहे की[१७] जो अपराधी बनून आपल्या पालनकर्त्याच्या ठायी हजर होईल त्याच्यासाठी नरक आहे की जिच्यात तो जिवंतही राहणार नाही व मरणारही नाही. आणि जो त्याच्या ठायी श्रद्धावंत म्हणून हजर होईल, ज्याने सत्कृत्ये केली असतील अशा सर्व लोकांसाठी उच्च दर्जे आहेत, सदाबहार उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वहात असतील, त्यांच्यात ते सदैव राहतील, हा मोबदला आहे त्या व्यक्तीसाठी ज्याने पावित्र्य स्वीकारले. (६५-७६)

आम्ही[१८] मूसा (अ.) वर दिव्य प्रकटन केले की आता रात्रीच्या रात्री माझ्या दासांना

**१६)** म्हणजे जेव्हा त्यांनी हजरत मूसा (अ.) यांच्या काठीची कामगिरी पाहिली तेव्हा लगेच त्यांचा विश्वास बसला की खचितच हा चमत्कार आहे. त्यांच्या कलेसारखी गोष्ट मुळीच नाही म्हणून ते अकस्मात व अनायासे अशा प्रकारे सजद्यात पडले जणू एखाद्याने त्यांना उचलून पाडले असावे.

**१७)** जादूगारांच्या कथनात सर्वोच्च अल्लाहकडून स्वत: ही वाढ आहे. भाषाशैलीवरून, हे शब्द जादूगारांच्या कथनाचा भाग नाही, असे स्पष्ट होत आहे.

**१८)** मध्यंतरी, यानंतरच्या मिस्र येथील दीर्घकालीन वास्तव्यात ज्या परिस्थितीतून जावे लागले होते त्याचा तपशील सोडला गेला आहे. आता त्यावेळचा उल्लेख प्रारंभ होत आहे जेव्हा हजरत मूसा (अ.) यांना आज्ञा झाली की बनीइस्राईलना घेऊन मिस्रहून कूच करावे.



घेऊन निघून जा, आणि त्यांच्यासाठी समुद्रातून शुष्क मार्ग बनव, तुला कोणाच्या पाठलागाचीही यत्किंचित धास्ती वाटू नये आणि (समुद्रामधून जात असताना) भीतीही वाटू नये. (७७)

पाठीमागून फिरऔन आपले सैन्य घेऊन पोहचला, आणि मग समुद्र त्यांच्यावर असा आच्छादित झाला जसे यथायोग्य होते. फिरऔनने आपल्या लोकांना मार्गभ्रष्टच केले होते. काही सत्य मार्गदर्शन केले नव्हते. (७८-७९)

हे[१९] बनीइस्राईल, आम्ही तुम्हाला तुमच्या शत्रूपासून मुक्ती दिली आणि तूर पर्वताच्या उजव्या बाजूला तुमच्या हजेरीसाठी वेळ निश्चित केली आणि तुम्हावर मन्न व सलवा उतरविले. खा, आम्ही दिलेले शुद्ध अन्न आणि ते खाऊन दुर्वर्तन करू नका, नाहीतर तुम्हावर माझा प्रकोप कोसळेल आणि ज्याच्यावर माझा प्रकोप झाला, मग तो कोसळल्याविना राहिला नाही. तथापि जो पश्चात्ताप करील आणि श्रद्धा ठेवील व सत्कृत्ये करील, मग सरळ वाट चालत राहील त्याच्यासाठी मी फार क्षमा करणारा आहे.

(८०-८२)

आणि कोणत्या गोष्टीने आपल्या लोकांच्या अगोदर तुला आणले हे मूसा (अ.)?[२०] त्याने सांगितले, ''ते काय माझ्या पाठोपाठ येतच आहेत. मी घाई करून तुझ्या ठायी आलेलो आहे, हे माझ्या पालनकर्त्या, जेणेकरून तू माझ्यावर प्रसन्न व्हावे.'' फर्माविले, ''बरे तर ऐका, आम्ही तुमच्या पाठीमागे तुमच्या लोकांना परीक्षेत टाकले आणि सामरीने त्यांना मार्गभ्रष्ट करून टाकले.''[२१] (८३-८५)

मूसा (अ.) तीव्र रागाच्या व दु:खाच्या स्थितीत आपल्या लोकांकडे परतला. जाऊन त्याने सांगितले, ''हे माझ्या जातीबांधवांनो, तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला चांगले वचन

**१९)** समुद्र ओलांडण्यापासून ते सीना पर्वताच्या परिसरात पोहचेपर्यंतचा वृत्तांत मध्यंतरी सोडला गेला आहे. याचा तपशील सूरह आअराफ खंड १६ व १७ यात आलेला आहे.

**२०)** आता त्या प्रसंगाच्या उल्लेखास प्रारंभ होत आहे जेव्हा हजरत मूसा (अ.) तूर पर्वताच्या परिसरात बनीइस्राईलना सोडून 'शरीअत'च्या आज्ञा घेण्यासाठी तूर पर्वतावर गेले होते. सर्वोच्च अल्लाहच्या या फर्माविण्याद्वारे असे कळते की हजरत मूसा (अ.) आपल्या लोकसमूहाला वाटेतच सोडून आपल्या रबची भेट घेण्याच्या उलट इच्छेने पुढे निघाले होते.

**२१)** म्हणजे सोन्याचे वासरू बनवून त्यांना त्याच्या पूजेत लावले.

दिले नव्हते काय?[२२] तुम्हाला खूप दिवस लागले आहेत काय? अथवा तुम्ही आपल्या पालनकर्त्याचा प्रकोपच आपल्यावर ओढवून घेऊ इच्छित होता की तुम्ही माझ्याशी वचनभंग केला?'' त्यांनी उत्तर दिले, ''आम्ही आपल्याशी वचनविरोध काही स्वअधिकाराने केला नाही, मामला असा झाला की लोकांच्या दागिन्यांच्या ओझ्याने आम्ही लादलो होतो आणि आम्ही बस्स, त्यांना फेकून दिले होते.''[२३] मग[२४] अशाच प्रकारे सामरीनेदेखील काही टाकले. आणि त्यांच्यासाठी एका वासराची मूर्ती बनवून बाहेर आणली जिच्यातून बैलासारखा आवाज निघत होता. लोक ओरडले, ''हाच आहे तुमचा ईश्वर आणि मूसा (अ.) चा ईश्वर, मूसा (अ.) ला याचा विसर पडला.'' काय ते पहात नव्हते की तो त्यांच्या बोलण्याचे उत्तरही देत नाही आणि त्यांच्या लाभहानीचा काही अधिकारदेखील राखत नाही. हारून (अ.) ने (मूसा (अ.) च्या आगमना) पूर्वी त्यांना सांगून टाकले होते की, ''लोकहो! तुम्ही याच्यामुळे उपद्रवात सापडला आहात, तुमचा पालनकर्ता तर 'रहमान' (परमदयाळू) आहे, म्हणून तुम्ही माझे अनुकरण करा आणि माझे म्हणणे मान्य करा.'' परंतु त्यांनी त्याला सांगितले, ''आम्ही तर याचीच पूजा करीत राहू जोपर्यंत की मूसा (अ.) आमच्यात परत येत नाही.'' (८६-९१)

मूसा (अ.) (आपल्या लोकांना दरडावल्यानंतर हारूनकडे वळला आणि) म्हणाला, ''हारून (अ.), जेव्हा तू पाहिले होतेस की हे मार्गभ्रष्ट आहेत तेव्हा कोणत्या गोष्टीने तुझे हात रोखले होते की माझ्या पद्धतीचे अनुसरण करू नये. तू माझी आज्ञा भंग

---

**२२)** म्हणजे आजतागायत तुमच्या रबने तुम्हाला जितकी पण भलाईची वचने दिली आहेत, ही सर्व तुम्हाला मिळत राहिली आहेत. तुम्हाला मिस्रतून सुखरूपपणे बाहेर काढले, गुलामीतून तुमची सुटका केली, तुमच्या शत्रूची दाणादाण उडविली, तुमच्यासाठी या वैराण आणि खडकाळ प्रदेशात सावली आणि आहाराचा बंदोबस्त केला. ही सर्व चांगली वचने काय पूर्ण झाली नाहीत? त्याने तुम्हाला 'शरीअत' आणि मार्गदर्शक लेख प्रदान करण्याचे जे वचन दिले होते, तुमच्याजवळ ते एकटे कल्याण आणि भल्याचे वचन नव्हते का?

**२३)** जे 'सामरी'च्या उपद्रवात सापडले होते, त्या लोकांचे हे निमित्त आहे. त्यांचे म्हणणे असे होते की आम्ही दागदागिने फेकून दिले होते. आमची नियत काही वासरू बनविण्याची नव्हती व काय बनणार आहे हेदेखील आम्हाला माहीत नव्हते. यानंतर घटना जी काही घडली ती होतीच काही अशी की ती पाहून आम्ही अनायासेच शिर्क (अनेकेश्वरोपासना) मध्ये गुरफटलो.

**२४)** इथपासून ते आयत क्र. ९१ च्या शेवटपर्यंतच्या लिखाणावर सखोल विचार केल्याने स्पष्टपणे जाणवते की लोकांचे उत्तर 'फेकून दिले होते' येथे संपले आहे. नंतरचा तपशील सर्वोच्च अल्लाह स्वत:च सांगत आहे.



केलीस?''[२५] हारूनने उत्तर दिले, ''हे माझ्या आईच्या मुला! माझी दाढी धरू नकोस आणि माझ्या डोक्याचे केस ओढू नकोस. मला या गोष्टीचे भय होते की तू येऊन सांगशील की तूच बनीइस्राईलमध्ये फूट पाडलीस आणि माझ्या म्हणण्याचा मान राखला नाहीस.''[२६] मूसा (अ.) ने सांगितले, ''आणि सामरी तुझा काय मामला आहे?'' त्याने उत्तर दिले, ''मी ती गोष्ट पाहिली जी या लोकांना दिसली नाही. मग मी प्रेषितांच्या पदचिन्हापासून एक मूठ भरून उचलली व ती टाकली. माझ्या मनाने मला काही असेच सुचविले,''[२७] मूसा (अ.) ने सांगितले, ''बरे तर जा, आता आजीवन तुला हेच ओरडावे

---

**२५)** 'आज्ञे'ने अभिप्रेत ती आज्ञा आहे जी पर्वतावर जाताना, आणि आपल्या जागी हजरत हारून (अ.) यांना बनीइस्राईलची सरदारी सोपविण्यासमयी हजरत मूसा (अ.) नी दिली होती. सूरह आअराफ आयत क्र. १४२ मध्ये याचा उल्लेख झालेला आहे की हजरत मूसा (अ.) यांनी जाताना आपले बंधू, हजरत हारून (अ.) ना सांगितले की तुम्ही माझ्या लोकसमूहात माझे उत्तराधिकारी म्हणून राहा, आणि पहा सुधारणा करावी, अवज्ञाकारींच्या पद्धतीचे अनुसरण करू नये.

**२६)** हजरत हारून (अ.) यांच्या उत्तराचा अर्थ असा मुळीच नाही की लोकांचे एकोप्याने राहणे, त्यांच्या सरळमार्गावर राहण्यापेक्षा जास्त महत्वाचे आहे, तसेच एकात्मता मग ती अनेकेश्वरवादावर आधारित का असू नये, फाटाफूटपेक्षा बेहतर आहे. सदरहू आयतचा असा अर्थ जर एखादा इसम घेईल तर कुरआनापासून मार्गदर्शन प्राप्त करणअयाऐवजी मार्गभ्रष्टता प्राप्त करील. हजरत हारून (अ.) यांचे म्हणणे पूर्णपणे समजण्यासाठी सदरहू आयत सूरह आअराफ च्या आयत क्र. १५० बरोबर जोडून वाचले पाहिजे. त्या ठिकाणी हजरत हारून (अ.) फर्मावितात, ''माझ्या आईच्या मुला, या लोकांनी मला दाबून टाकले आणि जवळच होते की मला मारून टाकले असते. म्हणून तू शत्रूंना माझे हसे उडविण्याची संधी देऊ नकोस आणि या अत्याचारी समूहात माझी गणना करू नकोस.'' आता यावरून वस्तुस्थितीच असे चित्र समोर येते की हजरत हारून (अ.) यांनी लोकांना सदरहू मार्गभ्रष्टतेपासून रोखण्याचा पुरेपूर प्रयत्न केला, परंतु त्या लोकांनी त्यांच्याविरूद्ध दंगल माजवली व त्यांना ठार मारण्यास तत्पर झाले. नाइलाजास्तव, एखाद्या वेळेस हजरत मूसा (अ.) यांच्या आगमनापूर्वी या ठिकाणी यादवी माजू नये व नंतर येऊन त्यांनी आक्षेप घ्यावा की तसेच निर्माण झालेल्या परिस्थितीला तुम्ही जर आटोक्यात आणू शकत नव्हता तर परिस्थितीला तुम्ही इतक्या टोकापर्यंत का बिघडवू दिले? माझ्या आगमनाची वाट का पाहिली नाही? या भीतीपोटी ते स्तब्ध राहिले.

**२७)** प्रेषित ने अभिप्रेत बहुधा या ठिकाणी खुद्द हजरत मूसा (अ.) आहेत. सामरी एक धूर्त माणूस होता. हजरत मूसा (अ.) यांना देखील आपल्या कुटिलतेच्या जाळ्यात अडकवू पाहिले. त्यांना तो म्हणाला की हजरत, ही आपल्याच चरणस्पर्शित मातीची बरकत आहे की मी जेव्हा त्या मातीस वितळलेल्या सोन्यात टाकले तेव्हा अशा वैभवाचे वासरू त्यातून बाहेर आले.

लागणार आहे की मला स्पर्श करू नका.[२८] आणि तुझ्यासाठी जाब विचारण्याची एक घटका निश्चित आहे जी कदापि टळणार नाही आणि पहा आपल्या या उपास्याकडे ज्यावर तू भाळला होतास आम्ही आता याला जाळून टाकू आणि भुकटी करून नदीत प्रवाहित करू. लोकहो! तुमचा ईश्वर तर केवळ एक अल्लाहच आहे ज्याच्याव्यतिरिक्त इतर कोणी ईश्वर नाही. प्रत्येक वस्तूवर त्याचे ज्ञान व्याप्त आहे.'' (९२-९८)

हे पैगंबर (स.)! अशाप्रकारे आम्ही पूर्वी घडलेल्या प्रसंगाच्या वार्ता तुम्हाला ऐकवीत आहोत. आणि आम्ही खास आपल्यापासून तुम्हाला एक उपदेशपाठ (जिक्र) प्रदान केले आहे. जो कोणी यापासून पराङमुख होईल तो पुनरुत्थानाच्या दिवशी पापाचे भयंकर ओझे उचलेल, आणि असे सर्व लोक सदैव त्याच्या अरिष्टात गुरफटून राहतील आणि पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्यासाठी (या अपराधाच्या जबाबदारीचे ओझे) भयंकर त्रासदायक ओझे असेल. त्यादिवशी जेव्हा शिंग फुंकले जाईल आणि आम्ही अपराध्यांना अशा स्थितीत घेरून आणू की त्यांचे डोळे (भीतीमुळे) थिजलेले असतील, आपापसांत हळूहळू म्हणतील की, ''जगात तुम्ही मुश्किलीने काही दहाच दिवस घालविलेअसतील.'' आम्हाला चांगलेच माहीत आहे की ते काय बोलत असतील. (आम्हाला हेदेखील माहीत आहे की) त्यावेळी त्यांच्यापैकी जो जास्तीत जास्त जपून अंदाज लावणारा असेल तो म्हणेल की नव्हे, तुमचे जगातील जीवन केवळ एका दिवसाचे होते. हे लोक तुम्हाला विचारतात की बरे, त्या दिवशी हे पर्वत जातील तरी कुठे? सांगा की माझा पालनकर्ता त्यांना धूळ बनवून उडवून देईल. आणि पृथ्वीला असे सपाट सुरळीत मैदान बनवून टाकील, की त्यात तुम्हाला एखादासुद्धा वळसा आणि सुरकुती दिसणार नाही. त्या दिवशी सर्व लोक हाक देणाऱ्याच्या हाकेवर सरळ चालत येतील, कोणी थोडासुद्धा ताठपणा दाखवू शकणार नाही आणि आवाज कृपावंताच्या पुढे दबून जातील, एका चाहूलीव्यतिरिक्त तुम्हाला काहीही ऐकू येणार नाही. त्यादिवशी शिफारस उपयुक्त ठरणार नाही याशिवाय की एखाद्याला कृपावंत तशी परवानगी देईल आणि त्यांचे म्हणणे ऐकून घेणे पसंत करील, तो लोकांची मागील पुढील सर्व स्थिती जाणतो आणि दुसऱ्यांना त्याचे पूर्ण ज्ञान नाही. लोकांची मस्तके त्या चिरंजीव व चिरस्थायीच्यासमोर नम्र होतील. निष्फळ ठरेल तो, ज्याने त्यावेळी एखाद्या अत्याचाराचे पापओझे उचललेले असेल, आणि कसलाही अत्याचार अथवा हक्क मारला जाण्याची भीती नसेल त्या व्यक्तीला जी सत्कृत्ये करील आणि याचबरोबर ती श्रद्धावंतसुद्धा असेल. (९९-११२)

**२८)** म्हणजे केवळ इतकेच नव्हे की उभ्या जीवनासाठी समाजाशी त्याचे संबंध तोडले गेले व त्याला अस्पृश्य बनवून सोडले गेले, तर प्रत्येक माणसाला त्याने स्वत:च आपल्या अस्पृश्यतेची माहिती द्यावी व दुरूनच लोकांना सांगत राहावे की मी अस्पृश्य आहे, मला शिवू नका, अशी जबाबदारीदेखील त्याच्यावरच टाकली गेली.



आणि हे पैगंबर (स.), अशाच प्रकारे आम्ही याला अरबी भाषेत कुरआन अवतरले आहे[२९] आणि यात वेगवेगळ्या प्रकारे इशारे दिले आहेत कदाचित या लोकांनी तिरक्या चालीपासून दूर राहावे अथवा त्यांच्यात काही शुद्धीवर येण्याची चिन्हे याच्यामुळे दिसावीत. (११३)

तर उच्च व श्रेष्ठ आहे अल्लाह, खरा बादशाह,[३०] आणि पहा, कुरआन पठणात घाई करत जाऊ नका जोपर्यंत तुमच्याकडे त्याचे दिव्य प्रकटन परिपूर्णत्वाला पोहचत नाही, आणि प्रार्थना करा की हे पालनकर्त्या, माझे ज्ञान वृद्धिंगत कर.[३१] (११४)

आम्ही यापूर्वी आदमला एक आज्ञा दिली होती परंतु तो विसरून गेला आणि आम्हाला त्याच्यात निर्धार आढळला नाही.[३२] आठवा ती वेळ जेव्हा आम्ही दूतांना सांगितले होते की आदमपुढे नतमस्तक व्हा. ते सर्व तर नतमस्तक झाले पण एक इब्लीस (शैतान) ने नकार दिला. यावर आम्ही आदमला सांगितले की, ''पहा, हा तुमचा आणि तुमच्या पत्नीचा वैरी आहे, असे होता कामा नये की याने तुम्हाला स्वर्गामधून हुसकावून द्यावे आणि तुम्ही संकटात पडावे. येथे तर तुम्हाला अशा सुखसोयी उपलब्ध आहोत की तुम्ही उपाशी व वस्त्रहीन रहातही नाही की तहान व ऊनही तुम्हाला त्रास देत नाही.'' परंतु शैतानने त्याला फूस लावली, म्हणू लागला, ''हे आदम, दाखवू का तुला ते झाड ज्यापासून चिरंतन जीवन व चिरकाल सत्ता प्राप्त होते?' सरतेशेवटी त्या उभयता (पती-पत्नी) नी त्या झाडाचे फळ खाऊन टाकले. परिणाम असा झाला की लगेच त्यांचे गुप्तांग

**२९)** म्हणजे अशाच प्रकारचे विषय, शिकवणी आणि उपदेशांनी ओतप्रोत. कुरआनात जी सांगितली गेली आहेत त्या सर्व विषयाकडे हा संकेत आहे.

**३०)** अशा प्रकारची वाक्ये कुरआनात सामान्यत: एका व्याख्यानाची सांगता करताना फर्माविली जात असतात. त्या मागचा हेतू असा की व्याख्यानाची सांगता सर्वोच्च अल्लाहच्या स्तुती व गुणगानाने व्हावी. वर्णनशैली आणि पुढील व मागील संदर्भ लक्षात घेता असे स्पष्टपणे कळते की या ठिकाणी एक व्याख्यान संपले आहे आणि 'वलकद अहिद्ना इला आदम' (आम्ही यापूर्वी आदमला एक आज्ञा दिली होती) पासून दुसरे व्याख्यान सुरू होत आहे.

**३१)** या शब्दाद्वारे स्पष्टपणे असे कळत आहे की पैगंबर मुहम्मद (स.) दिव्यबोध (वह्य) प्राप्त करीत असताना ते पाठ करण्याचा व पुनरुच्चाराचा प्रयत्न करीत असावेत, म्हणून संदेश ऐकण्यावर लक्ष पूर्णपणे केंद्रित होत नसावे. ही अवस्था पाहून त्यांना सूचना दिली गेली की दिव्य बोध अवतरत असताना आपण ते पाठ करण्याचा प्रयत्न करीत जाऊ नये.

**३२)** हे स्पष्ट झाले की नंतर हजरत आदम (अ.) कडून सदरहू आज्ञेचा जो भंग झाला तो हेतुपुरस्सर शिरजोरी म्हणून झाला नाही तर गफलत आणि भूलचूकीने आणि इरादा व निर्धाराच्या दुर्बलतेला बळी पडल्यामुळे घडला होता.

एकमेकांसमोर उघड झाले आणि लागले ते स्वत:ला स्वर्गाच्या पानांनी झाकावयास.[३३] आदम (अ.) ने आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली आणि सरळ मार्गावरून भरकटला नंतर त्याच्या पालनकर्त्याने निवड केली आणि त्याच्या पश्चात्तापाचा स्वीकार केला. आणि त्याला मार्गदर्शन प्रदान केले.[३४] आणि फर्माविले, "तुम्ही दोघे (पक्ष, म्हणजे मानव आणि शैतान) येथून खाली उतरा. तुम्ही एकमेकाचे शत्रू रहाल. आता जर माझ्याकडून एखादे मार्गदर्शन पोहचले तर जो कोणी माझ्या या मार्गदर्शनाचे अनुसरण करील तो भटकणारही नाही आणि दुर्भाग्यात गुरफटणारही नाही. आणि जो माझे 'जिक्र' (उपदेशपाठ) पासून तोंड फिरवील त्याच्यासाठी त्याचे जीवन अडचणीचे होईल.[३५] आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्याला अंध उठवू." तो म्हणेल, "हे पालनकर्त्या, जगात तर मी डोळस होतो, येथे मला आंधळा म्हणून का उठविले?" सर्वश्रेष्ठ अल्लाह फर्मावील, "होय, अशाच प्रकारे तर आमच्या वचनांना, जेव्हा त्या तुझ्यापाशी आल्या होत्या तू विसरला होतास, त्याचप्रकारे आज तू विसरला जात आहेस." अशा तऱ्हेने आम्ही मर्यादेबाहेर जाणाऱ्यांना आणि आपल्या पालनकर्त्याच्या संकेतांना न मानणाऱ्यांना (जगात) बदला देत असतो. आणि मरणोत्तर जीवनाचा प्रकोप अधिक तीव्र आणि अधिक दीर्घकालीन आहे. (११५-१२७)

मग काय त्या लोकांना (इतिहासाच्या या धड्याने) कोणतेही मार्गदर्शन मिळाले नाही की यांच्यापूर्वी कित्येक लोकसमुदायांना आम्ही नष्ट करून टाकले आहे ज्यांच्या (उद्ध्वस्त) वस्त्यांमध्ये हे आज वावरत आहेत? वास्तविकत: यांच्यात पुष्कळ संकेत आहेत त्या लोकांसाठी जे सद्बुद्धी बाळगणारे आहेत. (१२८)

जर तुझ्या पालनकर्त्याकडून पूर्वीच एक गोष्ट निश्चित केली गेली नसती आणि सवलतीची एक मुदत ठरविली गेली नसती तर अवश्य यांचासुद्धा निकाल लावला गेला असता. म्हणून हे पैगंबर (स.), ज्या गोष्टी हे रचत आहेत त्यावर संयम बाळगा आणि

---

**३३)** दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर अवज्ञा होताक्षणीच, सरकारी इतमामाने त्यांना जे ऐश्वर्य प्राप्त होते ते हिरावून घेतले गेले. सर्वप्रथम त्यांची अभिव्यक्ती सरकारी पोशाख हिरावून घेण्याच्या रूपानेच झाली. अन्न, पाणी आणि निवाऱ्याची पाळी तर नंतर येणार होती.

**३४)** म्हणजे शैतानाप्रमाणे बहिष्कृत व धिक्कारग्रस्त केले नाही तर जेव्हा लज्जित होऊन त्याने पश्चात्ताप व्यक्त केला तेव्हा अल्लाहने त्यांच्याशी अशा मेहरबानीचा व्यवहार केला.

**३५)** जगात जीवन तंग असण्याचा अर्थ, त्याला तंगी व टंचाई लागून राहील असे नव्हे तर अर्थ असा की येथे त्याला शांती लाभणार नाही. करोडपती असला तरी बेचैन राहील. त्रिभुवनांचा सम्राट असला तरी अस्वस्थता आणि बेचैनीपासून तो मुक्त होणार नाही. त्याचे जगातील यश सहस्रावधी अयोग्य उपाययोजनांचा परिणाम असेल जेणेकरून आपल्या अंत:करणापासून ते सभोवती असलेल्या संपूर्ण सामूहिक वातावरणापर्यंत प्रत्येक वस्तूशी त्याचा कायमचा संघर्ष होत राहील. त्यामुळे सुख व शांती आणि खरा आनंद त्याला कदापि लाभणार नाही.



आपल्या पालनकर्त्याच्या गौरव व स्तुतीसमवेत त्याचे पावित्र्यगान करा सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तापूर्वी आणि रात्रीच्या वेळी देखील पावित्र्यगान करा आणि दिवसाच्या मध्यांवर,[३६] कदाचित तुम्ही संतुष्ट व्हावे.[३७] आणि नजरदेखील देऊ नकोस लौकिक जीवनातील त्या वैभवाकडे जे आम्ही यापैकी विविध प्रकारच्या लोकांना देऊन ठेवले आहे, ते तर आम्ही त्यांची परीक्षा पाहण्यासाठी दिले आहे, आणि तुझ्या पालनकर्त्याने दिलेली वैध उपजीविकाच उत्तम आणि चिरस्थायी आहे.[३८] आपल्या कुटुंबियांना नमाजचा आदेश द्या आणि स्वत: देखील त्याचे पालन करीत रहा. आम्ही तुमच्यापासून कसलीही उपजीविका इच्छित नाही, उपजीविका तर आम्हीच तुम्हाला देत आहोत आणि अंतीम कल्याण तर ईशपरायणतेसाठीच आहे. (१२९-१३२)

ते म्हणतात, हा इसम आपल्या पालनकर्त्याकडून एखादा संकेत (चमत्कार) का आणत नाही? आणि त्यांच्यापाशी पूर्वीच्या धर्मग्रंथाच्या सर्व शिकवणुकीचे वर्णन स्पष्टपणे आले नाही का?[३९] जर आम्ही त्याच्या येण्यापूर्वी यांना एखाद्या प्रकोपाने नष्ट केले असते तर मग या लोकांनीच सांगितले असते की हे आमच्या पालनकर्त्या, तू आमच्याकडे एखादा प्रेषित का पाठविला नाहीस की अपमानित होण्यापूर्वी व नामुष्की येण्याअगोदरच आम्ही तुझ्या संकेतांचे अनुसरण केले असते? हे पैगंबर (स.), यांना सांगा, प्रत्येकजण आपल्या कर्माच्या परिणामांच्या प्रतीक्षेत आहे, म्हणून आता प्रतीक्षेत रहा, लवकरच तुम्हाला कळेल की कोण सरळ मार्गावर चालणारे आहेत आणि कोण बोध लाभलेले आहेत. (१३३-१३५)

---

**३६)** रबची स्तुती व गुणगानाबरोबर त्याचे पावित्र्यगान करण्याने अभिप्रेत नमाज आहे. नमाजच्या वेळासंबंधी या ठिकाणीदेखील स्पष्ट इशारा केलेला आहे. सूर्योदयापूर्वी 'फज्र' नमाज, सूर्यास्तापूर्वी 'असर' नमाज आणि रात्रीच्या वेळेत 'इशा' व 'तहज्जुद' या नमाज. उरले दिवसाचे टोक तर ते तीनच असू शकतात. एक टोक सकाळचे आहे, दुसरे टोक सूर्याचे कलणे होय आणि तिसरे टोक म्हणजे संध्याकाळ आहे. म्हणून दिवसाच्या टोकांनी अभिप्रेत क्रमश: फज्र, जुहर आणि मगरिब, याच नमाज असू शकतात.

**३७)** याचे दोन अर्थ असू शकतात. एक असा की आपल्या ध्येयासाठी तुम्हाला नाना तऱ्हेच्या ज्या असह्य गोष्टी सहन कराव्या लागत आहेत त्या आपल्या विद्यमान स्थितीवर संतुष्ट राहा. दुसरा असा की तुम्ही हे काम जरा करून बघा तर खरे, याचा परिणाम असा काही समोर येईल जेणेकरून तुमचे मन प्रसन्न होईल.

**३८)** अरबी शब्द 'रिज्क'चा अनुवाद आम्ही 'हलाल रोजी' केला आहे कारण सर्वोच्च अल्लाहने 'हराम मालास' रबची रोजी म्हणून कोठेच संबोधिलेले नाही.

**३९)** म्हणजे यांच्यापैकीच एका निरक्षर इसमाने तो ग्रंथ सादर केला आहे ज्यात प्रारंभापासून ते आतापर्यंतच्या सर्व दैवी ग्रंथाचे विषय आणि शिकवणीचे सत्व काढून ठेवले गेले आहे. मानवाच्या मार्गदर्शनासाठी त्या ग्रंथात जे काही होते, ते सर्वच केवळ या ग्रंथात एकवटलेले आहे असे नाही तर त्यांचा उलगडा करून इतके स्पष्ट केलेले आहे की गांवढळ 'बद्दु'देखील ते समजून, त्यापासून लाभ घेऊ शकतात, काय हा चमत्कार थोडा आहे?

# २१ सूरह अल्अंबिया

*(मक्काकालीन, वचने ११२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जवळ येऊन ठेपली आहे लोकांच्या हिशोबाची घटका आणि ते गाफील आहेत. त्यांच्याजवळ जो काही नवीन उपदेश त्यांच्या पालनकर्त्याकडून येतो, त्याला संकोचाने ऐकतात आणि खेळांत लागलेले रहातात. त्यांचे मन (दुसऱ्याच चिंतेत) दंग आहे. (१-३-)

आणि अत्याचारी आपापसांत कानगोष्टी करतात की, ''हा इसम खरे तुमच्यासारखाच एक मनुष्य तर आहे, मग काय तुम्ही डोळ्यादेखत जादूच्या फंद्यात अडकणार?'' (-३)

पैगंबराने सांगितले, माझा पालनकर्ता ती प्रत्येक गोष्ट जाणतो जी आकाश आणि पृथ्वीत केली जाते, तो ऐकणारा व जाणणारा आहे.[१] (४)

हे म्हणतात, ''किंबहुना हे स्वप्न विभ्रम आहे, किंवा स्वरचित आहे, एवढेच नव्हे तर ही व्यक्ती कवी आहे. अन्यथा आणावे याने एखादे संकेतचिन्ह ज्याप्रमाणे पूर्वकालीन पैगंबर संकेतचिन्हांसह पाठविले गेले होते.'' वस्तुत: यांच्यापूर्वी कोणत्याही वस्तीने, जिला आम्ही नष्ट केले, श्रद्धा ठेवली नव्हती. आता काय हे श्रद्धा ठेवतील? (५-६)

आणि हे पैगंबर (स.), तुमच्या अगोदरसुद्धा आम्ही माणसांनाच पैगंबर म्हणून पाठविले होते, ज्यांच्यावर आम्ही दिव्यबोध प्रकट करीत होतो. तुम्हाला जर याचे ज्ञान नसेल तर ग्रंथधारकांना विचारून घ्या त्या पैगंबरांना आम्ही आहार विरहित शरीर संपदा दिली नव्हती. तसेच ते अमर देखील नव्हते. मग पहा, की सरतेशेवटी आम्ही त्यांच्याशी केलेले वचन पूर्ण केले, आणि त्यांना व ज्यांना ज्यांना आम्ही इच्छिले, वाचविले, आणि मर्यादा भंग करणाऱ्यांना आम्ही ठार केले. (७-९)

लोकहो, आम्ही तुमच्याकडे असा एक ग्रंथ पाठविला आहे ज्यामध्ये तुमचाच

१) म्हणजे पैगंबराने या खोट्या प्रचाराचे व कानगोष्टीच्या या मोहिमेचे उत्तर याशिवाय कदापि दिले नाही की तुम्ही लोक ज्या काही बाता बनविता त्या सर्व ईश्वर ऐकतो आणि जाणतो, मग मोठ्याने उच्चारा की पुटपुटत कानात फुंका. अन्यायी शत्रूंच्या मुकाबल्यात कधीही जशास तसे उत्तर देण्यास तो तत्पर झाला नाही.



उल्लेख आहे, तुम्हाला कळत नाही काय?[२] (१०)

कित्येक अत्याचारी वसाहती आहेत, ज्यांना आम्ही चिरडून टाकले आणि त्यांच्यानंतर दुसऱ्या एखाद्या जनसमुदायास उभे केले. जेव्हा त्यांना आमचा प्रकोप जाणवला तेव्हा लागले तेथून पळ काढायला (म्हटले गेले) ''पळू नका, जा आपल्या त्याच घरात आणि ऐश्वर्याच्या साधनांत ज्यात तुम्ही चैन करीत होता, कदाचित तुम्हाला विचारले जाईल.''[३] म्हणू लागले, ''आमचे दुर्दैव! नि:शंकपणे आम्ही अपराधी आहोत.'' आणि ते असाच पुकारा करीत राहिले येथपावेतो की आम्ही त्यांचे खळे केले. आणि त्यांच्यात आयुष्याची ठिणगी सुद्धा शिल्लक ठेवली नाही. (११-१५)

आम्ही हे आकाश आणि पृथ्वी व जे काही त्याच्यात आहे, काही खेळ म्हणून बनविलेले नाही. जर आम्हाला एखादे खेळणे बनवायचे असते आणि जर असेच काही आम्हाला करावयाचे असते तर आपल्यापासूनच करून घेतले असते.[४] परंतु आम्ही तर असत्यावर सत्याचा प्रहार करतो, जो त्याचे कपाळमोक्ष करतो आणि तो पाहता पाहता नष्ट होतो आणि तुम्हासाठी विनाश आहे त्या गोष्टीमुळे ज्या तुम्ही रचता. (१६-१८)

पृथ्वी व आकाशांत जी काही सृष्टी आहे ती अल्लाहचीच आहे. आणि जे (दूत) त्याच्याजवळ आहेत ते आपल्याला मोठे समजून त्याच्या भक्तीपासून बंड करीत नाहीत

२) म्हणजे याच्यात काही कल्पनाविलासाच्या गोष्टी तर नाही, तुमच्या स्वत:चाच उल्लेख आहे, तुमच्याच मानसिक व व्यावहारिक जीवनाची चर्चा आहे. तुमच्याच प्रकृती व रचनेवर आणि प्रारंभ व शेवट वर गुफ्तगू आहे. तुमच्याच सभोवती असलेल्या त्या निशाण्या निवडून प्रस्तुत केलेल्या आहेत ज्या वास्तवतेकडे निर्देश करीत आहेत, आणि तुमच्याच नैतिक गुणापैकी उत्कृष्ट व निकृष्ट यांतील फरक स्पष्ट करून दाखविले जात आहे व ते योग्य असण्याबद्दल तुमच्या स्वत:चीच अंत:करणे ग्वाही देत आहेत. या सर्व गोष्टीत कोणती गोष्ट अशी अस्पष्ट आणि गुंतागुंतीची आहे की जिच्या आकलनास तुमची बुद्धी निरुपायी ठरली असावी?

३) याचे अनेक अर्थ असू शकतात. उदा. जरा चांगल्या प्रकारे या प्रकोपाचे निरीक्षण करा म्हणजे उद्या एखाद्याने याचा अहवाल विचारला तर सांगता यावे. आपल्या त्याच थाटाने पुन्हा महफिली रंगवा, कदाचित आताही तुमच्या खिजमतगारांनी हात बांधून विचारावे की स्वामी काय आज्ञा आहे. आपली तीच मंडळे व समित्या स्थापून बसा, कदाचित आता देखील तुमचे वैचारिक सल्ले आणि धूर्त मतापासून लाभ घेण्यासाठी लोकांनी हजर व्हावे.

४) म्हणजे आम्हाला खेळावयाचेच असते तर खेळणे बनवून आम्ही स्वत:च खेळलो असतो. त्या स्वरूपात हा जुलूम तर कदापि केला गेला नसता की उगीचच एक संवेदनशील, विवेकी आणि जबाबदार निर्मिती जन्मास आणली गेली असती. तिच्या दरम्यान सत्य व असत्याचा संघर्ष आणि ओढाताण लावली गेली असती व केवळ आपल्या मौज व मनोरंजनेखातर सदाचारी दासांना विनाकारण आम्ही यातनेत टाकले असते.

आणि शिथिलसुद्धा[५] होत नाहीत. रात्रंदिवस त्याचे पावित्र्यगान करीत राहतात, विश्रांती घेत नाहीत. (१९-२०)

काय या लोकांचे पृथ्वीवरील बनविलेले उपास्य असे आहेत (जे निर्जीवाला सजीव करून) उभे करतात? (२१)

जर आकाश व पृथ्वीत एका अल्लाहशिवाय दुसरे उपास्य असते तर (पृथ्वी व आकाश) दोहोंची व्यवस्था बिघडली असती. म्हणून पवित्र आहे राजसिंहासनाचा स्वामी अल्लाह त्या गोष्टीपासून जे हे लोक रचीत आहेत. तो आपल्या कामासाठी (कोणासमोर) उत्तरदायी नाही व सर्वजण उत्तरदायी आहेत. (२२-२३)

त्याला सोडून यांनी दुसरे उपास्य बनविले आहेत काय? हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''आणा आपले प्रमाण, हा ग्रंथ आहे त्यांचा जे माझ्यासोबत आहेत आणि त्यांचाही ग्रंथ आहे जे माझ्या पूर्वी होऊन गेले आहेत.'' परंतु यांच्यापैकी बहुतेक लोक वस्तुस्थितीपासून अनभिज्ञ आहेत, म्हणून ते विमुख झालेले आहेत. आम्ही तुमच्यापूर्वीही जो पैगंबर पाठविला त्याला हाच दिव्य बोध दिला आहे की माझ्याव्यतिरिक्त अन्य कोणीच उपास्य नाही, म्हणून तुम्ही माझीच भक्ती करा. (२४-२५)

हे म्हणतात, ''रहमान संतती बाळगतो.'' ''अल्लाह पवित्र आहे, ते (म्हणजे दूत) तर दास आहेत ज्यांना प्रतिष्ठा दिली गेली आहे. त्याच्या पाशी पुढे होऊन बोलत नाहीत आणि फक्त त्याच्या आज्ञेची अंमलबजावणी करतात. जे काही त्यांच्यासमोर आहे तेही तो जाणतो आणि जे काही त्यांच्या दृष्टीआड आहे तेसुद्धा तो जाणतो, ते कुणाचीही शिफारस करीत नाहीत, त्याव्यतिरिक्त की ज्याच्याबाबतीत शिफारस ऐकण्यास अल्लाह सहमत होतो, आणि ते त्याच्या भयाने लटपटतात, आणि जर त्यांच्यापैकी कुणी सांगितले की अल्लाहशिवाय मीदेखील एक उपास्य आहे तर आम्ही त्याला नरकाची शिक्षा देऊ. आमच्या येथे अत्याचाऱ्यांचा हाच बदला आहे. (२६-२९)

काय ते लोक ज्यानी (पैगंबराचे म्हणणे ऐकण्यास) नकार दिला आहे, विचार करीत नाही की हे सर्व आकाश व पृथ्वी परस्पर एकसंघ होते, मग आम्ही त्यांना विभक्त केले, आणि पाण्यापासून प्रत्येक सजीव निर्माण केला? काय ते (आमच्या या निर्मितीस) मानत नाहीत? आणि आम्ही पृथ्वीत पर्वत रोवले जेणेकरून तिने यांना घेऊन कलंडू नये, आणि त्यात प्रशस्त मार्ग बनविले, कदाचित लोकांनी आपला मार्ग जाणून घ्यावा. आणि आम्ही आकाशाला एक सुरक्षित आच्छादन बनविले. परंतु हे सृष्टीच्या संकेतांकडे लक्षच देत नाहीत. आणि तो अल्लाहच आहे ज्याने रात्र आणि दिवस बनविले आणि सूर्य व चंद्र

५) म्हणजे ईश्वराची बंदगी करणे त्यांना अप्रियही नाही की निरिच्छेने बंदगी करता करता ते मलूल होत असावेत आणि ईश्वरी आज्ञेचे पालन करताना त्यांना थकवादेखील येत नाही.



निर्माण केले, सर्व एकाच नभोमंडळात तरंगत आहेत.[६] (३०-३३)

आणि हे पैगंबर! (स.) तुमच्यापूर्वी आम्ही कोणाला सुद्धा चिरकाल ठेवले नाही. जर तुम्ही मर्त्य झाला तर हे लोक काय अमर्त्य राहू शकतील? प्रत्येक जीवीतास मृत्यूची चव चाखावयाची आहे. आणि आम्ही चांगल्या व वाईट स्थितीत आणून तुम्हा सर्वांची परीक्षा घेत आहोत. सरतेशेवटी तुम्हाला आमच्याकडेच रुजू व्हायचे आहे. (३४-३५)

हे सत्याचा इन्कार करणारे जेव्हा तुम्हाला पाहतात तेव्हा तुम्हाला थट्टेचा विषय बनवितात. म्हणतात, ''हा आहे का तो इसम जो तुमच्या उपास्यांचा उल्लेख करीत असतो?'' आणि त्यांची स्वत:ची स्थिती अशी आहे की ते कृपावंताच्या स्मरणास नकार देतात. (३६)

माणसाला (स्वभावत:च) उतावीळ बनविण्यात आले आहे. आता मी तुम्हाला आपले संकेत दाखवून देत आहे, घाई करू नका. हे लोक म्हणतात, ''अखेर ही धमकी पूर्ण कधी होणार, जर तुम्ही खरे असाल?'' या ईशद्रोह्यांना त्या वेळेचे काही ज्ञान असते जेव्हा हे आपले तोंडही आगीपासून वाचवू शकणार नाहीत न आपल्या पाठी आणि यांना कोठून मदतही पोहचणार नाही. ती आपत्ती अकस्मात येईल आणि त्यांच्यावर अशाप्रकारे एकदम झडप घालील की हे तिला परतवूही शकणार नाहीत की यांना क्षणभर सवलतही मिळणार नाही. उपहास तुमच्या पूर्वीच्या पैगंबरांचादेखील केला गेला आहे. परंतु त्यांचा उपहास करणारे त्याच गोष्टीच्या फेऱ्यात आले ज्याचा उपहास ते करीत असत.

(३७-४१)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''कोण आहे जो तुम्हाला रात्री अथवा दिवसा कृपावंतापासून वाचवू शकेल?'' परंतु हे आपल्या पालनकर्त्याच्या उपदेशापासून तोंड फिरवीत आहेत. काय हे काही असे उपास्य बाळगतात जे आमच्या विरोधात यांना सहाय्य करतील? ते तर आपल्या स्वत:चीदेखील मदत करू शकत नाहीत आणि त्यांना आमचे समर्थनदेखील प्राप्त नाही. खरी गोष्ट अशी आहे की या लोकांना आणि यांच्या वाडवडिलांना आम्ही जीवनाची साधनसामुग्री देत राहिलो येथपावेतो की यांना दीर्घकाळ

६) 'फलक' हा अरबी शब्द अंतराळ आणि मंडलाच्या अगदी समानार्थी आहे. अरबी भाषेतील आकाशाच्या सर्व परिचित नावांपैकी एक नाव आहे. 'सर्व एक एका नभोमंडळात तरंगत आहेत' यावरून दोन गोष्टी स्पष्टपणे लक्षात येतात. एक अशी की ही सर्व नक्षत्रे एकाच फलक (नभोमंडळ) मध्ये आहे असे नाही तर प्रत्येकाचा 'फलक' वेगळा आहे. दुसरी गोष्ट अशी की 'फलक' काही अशी वस्तू नाही की ज्यात ही नक्षत्रे खुंट्याप्रमाणे जडविलेली असावीत व तो स्वत:च त्यांना घेऊन भ्रमण करीत असावा, तर तो एखादा द्रव्य पदार्थ आहे किंवा वातावरण आणि अंतरिक्ष स्वरूपाची एखादी गोष्ट आहे, ज्यात या नक्षत्रांची हालचाल तरंगण्याच्या कृतीशी साम्य राखते.

झाला. परंतु काय यांना दिसत नाही की आम्ही जमिनीला विविध दिशेने आकुंचित करीत राहिलो आहोत?[७] मग काय हे वरचढ ठरतील? यांना सांगा, ''मी तर दिव्य बोधाच्या आधारावर तुम्हाला सावध करीत आहे'' परंतु बहिरे हाक ऐकत नसतात जेव्हा त्यांना सावध केले जाते आणि तुझ्या पालनकर्त्याच्याप्रकोपाचा थोडादेखील स्पर्श यांना झाला म्हणजे लगेच आक्रोश करू लागतील की, आमचे दुर्दैव! नि:संशय आम्ही अपराधी होतो. (४२-४६)

पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही ठीकठीक वजन करणारे तराजू ठेवू. मग कोणत्याही व्यक्तीवर यत्किंचितदेखील अत्याचार होणार नाही. ज्याने मोहरीच्या दाण्याबरोबरदेखील काही केले सवरले असेल ते आम्ही समोर आणू आणि हिशेब लावण्यास आम्ही पुरेसे आहोत. (४७)

पूर्वी आम्ही मूसा आणि हारून (अ.) यांना कसोटी, प्रकाश आणि 'आठवण' प्रदान केली आहे त्या ईशपरायण लोकांच्या कल्याणाकरिता ज्याना न बघता आपल्या पालनकर्त्याची भीती वाटते आणि ज्यांना (हिशोबाच्या) त्या घटकेचे भय लागून राहिले आहे, आणि आताही समृद्धशाली 'आठवण' आम्ही (तुमच्यासाठी) अवतरली आहे. मग काय तुम्ही हिला स्वीकारण्यास नकार देता? (४८-५०)

त्याच्याही पूर्वी आम्ही इब्राहीम (अ.) याला सूज्ञपणा प्रदान केला होता. आणि आम्ही त्याला चांगल्याप्रकारे जाणत होतो. आठवा, तो प्रसंग जेव्हा त्याने आपल्या वडील व आपल्या लोकांना सांगितले होते की, ''या मूर्त्या कसल्या आहेत ज्यावर तुम्ही मोहित होत आहात?'' त्यांनी उत्तर दिले, ''आम्हाला आमचे वाडवडील त्यांची उपासना करताना आढळले आहेत.'' त्याने सांगितले, ''तुम्ही देखील पथभ्रष्ट आहात आणि तुमचे वाडवडीलदेखील स्पष्टपणे मार्गभ्रष्टतेत गुरफटले होते.'' त्यांनी सांगितले, ''काय तू आमच्यासमोर आपले खरे विचार मांडत आहेस की थट्टा करीत आहेस?'' त्याने उत्तर दिले, ''नाही, किंबहुना खरोखरच तुमचा पालनकर्ता तोच आहे जो आकाश आणि पृथ्वीचा स्वामी आणि त्यांचा स्रष्टा आहे. यावर मी तुम्हासमक्ष ग्वाही देतो आणि अल्लाह शपथ मी तुमच्या गैरहजेरीत तुमच्या मूर्तींचा जरूर समाचार घेईन.'' त्याप्रमाणे त्याने

७) म्हणजे पृथ्वीवर आमच्या प्रभावी शक्तीच्या कार्यशीलतेची ही चिन्हे उघडपणे दिसतात की अकस्मात कधी दुष्काळाच्या स्वरूपात, कधी रोगाच्या साथीच्या स्वरूपात, कधी महापूरांच्या स्वरूपात, कधी भूकंपाच्या स्वरूपात, कधी थंडी व उष्म्याच्या स्वरूपात एखादी आपत्ती अशा प्रकारे कोसळते जी माणसाचे सर्व केले सवरले वाया घालविते, हजारो व लाखो माणसे मरतात, वस्त्या नष्ट होतात, उभी असलेली शेते गारद होतात, उत्पन्न घटते, व्यापारात मंदी येऊ लागते. तात्पर्य असे की मानवी जीवनाच्या साधनसामुग्रीत कधी कोणत्याकडून कमी होते तर कधी कोणत्या बाजूने. मनुष्य आपले सर्व बळ लावूनदेखील अशा हानी रोखू शकत नाही.



त्यांना छिन्नविछिन्न करून टाकले आणि केवळ त्यांच्या मोठ्याला सोडून दिले जेणेकरून कदाचित त्यांनी त्याच्याकडे रूजू व्हावे. (त्यांनी येऊन मूर्तींची ही दशा पाहिली तेव्हा) म्हणू लागले, ''आमच्या उपास्यांची ही दशा कोणी केली? भलताच कोणी अत्याचारी होता तो.'' (काही लोक) म्हणाले, ''आम्ही एका तरुणाला यांचा उल्लेख करताना ऐकले होते ज्याचे नाव इब्राहीम (अ.) आहे.'' त्यांनी सांगितले, ''तर धरून आणा त्याला सर्वांसमक्ष, जेणेकरून लोकांनी पाहावे (त्याचा कसा समाचार घेतला जातो.)'' (इब्राहीमच्या आगमनानंतर) त्यांनी विचारले, ''इब्राहीम (अ.), तू आमच्या उपास्यांशी हे कृत्य केले आहेस का?'' त्याने उत्तर दिले, ''किंबहुना, हे सर्वकाही यांच्या या सरदाराने केले असेल, यांनाच विचारा जर हे बोलत असतील.''[८] हे ऐकून ते आत्माभिमुख झाले व (मनातल्या मनात) म्हणू लागले, ''खरोखर तुम्ही स्वत:च अत्याचारी आहात.'' परंतु पुन्हा त्यांची बुद्धि फिरली, आणि म्हणाले, ''तुला माहीत आहे की हे बोलत नाहीत.'' इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''मग काय तुम्ही अल्लाहला सोडून त्या वस्तूंना पूजत आहात ज्या तुमचा काही फायदा करण्यासही समर्थ नाहीत व नुकसानीसाठीही नाहीत. धि:कार असो तुम्हावर आणि तुमच्या या उपास्यांवर, ज्यांची तुम्ही अल्लाहला सोडून उपासना करीत आहात. काय तुम्हाला जरादेखील अक्कल नाही?'' त्यांनी सांगितले, ''जाळून टाका याला, आणि सहाय्य करा आपल्या उपास्यांचे जर तुम्हाला काही करावयाचे असेल.'' आम्ही सांगितले, ''हे अग्नी! थंड हो आणि शांती व सुरक्षा हो इब्राहीमसाठी.''[९] ते इच्छित होते की इब्राहीमशी दुष्टपणा करावा. परंतु आम्ही त्यांना दारूण अपयशी केले. आणि आम्ही त्याला आणि लूत (अ.) ला वाचवून त्या भूमीकडे काढून नेले, ज्यात आम्ही जगवासियांकरिता भरभराट ठेविली आहे, आणि आम्ही त्याला

८) या शब्दांनीच हे अगदी स्पष्ट होत आहे की, त्या लोकांनी उत्तरादाखल स्वत:च हे कबूल करावे की त्यांचे हे उपास्य सर्वस्वी लाचार आहेत व त्यांच्याकडून कोणत्याही कृतींची अपेक्षादेखील केली जाऊ शकत नाही, म्हणूनच ही गोष्ट हजरत इब्राहीम (अ.) यांनी सांगितली होती. अशा प्रसंगी एखादा इसम युक्तिवादासाठी वस्तुस्थितीविरूद्ध जे बोलतो त्याला खोटे म्हणून ठरविले जाऊ शकत नाही कारण तो स्वत:ही खोटेपणाच्या नियतने असे म्हणत नाही व ज्यांना तो सांगत असतो तेदेखील ते खोटे म्हणून समजत नाहीत. बोलणारा तसे बोध प्रमाणाची परिपूर्णता म्हणून सांगत असतो व ऐकणारादेखील याच अर्थाने ते घेत असतो.

९) आलेल्या शब्दांनी आणि त्याच्या मागचे व पुढचे संदर्भ देखील या अर्थाला पुष्टी देत आहेत की त्यानी खरोखरच आपल्या सदरहू निर्णयाला अंमलात आणले, व जेव्हा अग्नीखाई तयार करून त्यांनी हजरत इब्राहीम (अ.) ना त्यात झोकले तेव्हा सर्वोच्च अल्लाहने अग्नीला आज्ञा केली की इब्राहीमसाठी ती थंड व्हावी व इजारहित बनून राहावी. अशाप्रकारे दिव्य कुरआनात ज्यांचा उल्लेख आला आहे त्यांच्यापैकीच हादेखील एक चमत्कार आहे, हे अगदी स्पष्ट आहे.

इसहाक (अ.) प्रदान केला व याकूब (अ.), त्यानंतर अधिक.[10] आणि प्रत्येकाला सदाचारी बनविले. आणि आम्ही त्यांना नेता बनविले जे आमच्या आज्ञेने मार्गदर्शन करीत होते आणि आम्ही त्यांना दिव्य बोधद्वारे पुण्यकर्माचा आणि नमाज कायम करण्याचा आणि जकात देण्याचा आदेश दिला, आणि ते आमच्या भक्तीत राहणारे होते.

(५१-७३)

आणि लूत (अ.) ला आम्ही अधिकार व ज्ञान प्रदान केले आणि त्याला त्या वस्तीतून वाचवून नेले जी (समलिंगी) व्यभिचार करीत होती. खरोखर तो अत्यंत वाईट, अवज्ञाकारी लोकसमूह होता आणि लूत (अ.) ला आम्ही आपल्या कृपाछत्रात दाखल केले, तो सदाचारी लोकांपैकी होता. (७४-७५)

आणि हीच देणगी आम्ही नूह (अ.) ला दिली. आठवा, जेव्हा या सर्वांच्या अगोदर त्याने आमचा धावा केला होता. आम्ही त्याची प्रार्थना स्वीकारली आणि त्याची व त्याच्या कुटुंबियांची महापीडेतून सुटका केली. आणि त्या लोकांच्याविरूद्ध त्याला सहाय्य केले, ज्यांनी आमचे संकेत खोटे ठरविले होते ते अत्यंत वाईट लोक होते म्हणून आम्ही त्या सर्वांना बुडवून टाकले. (७६-७७)

आणि याच देणगीने आम्ही दाऊद (अ.) आणि सुलेमान (अ.) यांना भूषविले. आठवा, तो प्रसंग जेव्हा ते दोघे एका शेतजमिनीच्या खटल्याचा निर्णय करीत होते, ज्यात रात्रीच्या वेळेस इतर लोकांच्या शेळ्या फैलावल्या होत्या आणि आम्ही त्यांच्या न्यायनिवाड्याकडे स्वत: पाहात होतो. त्यावेळी आम्ही अचूक निर्णय सुलैमानला उमगविले. वस्तुत: अधिकार व ज्ञान आम्ही दोघांनाही प्रदान केले होते. (७८-७९-)

दाऊद (अ.) समवेत आम्ही पर्वत व पक्ष्यांना अधीन केले होते जे पावित्र्यगान करीत होते. या कार्याचे कर्ते आम्हीच होतो. आणि आम्ही त्याला तुमच्या फायद्यासाठी चिलखत बनविण्याचा उद्योग शिकविला होता जेणेकरून तुम्हाला एकमेकाच्या माऱ्यापासून वाचवावे. मग काय तुम्ही कृतज्ञ आहात? आणि सुलैमान (अ.) साठी आम्ही वेगवान वाऱ्याला अधीन केले होते जो त्याच्या आज्ञेने त्या भूमीकडे वाहात असे ज्यात आम्ही समृद्धी ठेवली होती. आम्ही प्रत्येक गोष्टीचे ज्ञान राखणारे होतो. आणि शैतानांपैकी आम्ही अशा बऱ्याचशांना त्याचा ताबेदार बनविले होते जे त्याच्यासाठी सूर मारीत आणि याशिवाय इतर कामे करीत असत. या सर्वांची देखरेख करणारे आम्हीच होतो.

(-७९-८२)

आणि हीच (सुजाणपणा आणि अधिकार व ज्ञानाची देणगी) आम्ही अय्यूब (अ.)

---

**१०)** म्हणजे मुलानंतर नातूही असा झाला ज्याला प्रेषितत्वाने भूषविले गेले.



ला दिली होती. आठवा, जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याचा धावा केला की, ''मी यातनाग्रस्त आहे. आणि तू सर्वाधिक दयावान आहेस.'' आम्ही त्याची प्रार्थना स्वीकारली आणि जो त्रास त्यालाहोता तो दूर केला आणि केवळ त्याची मुलेबाळेच त्याला दिली असे नाही तर त्यांच्याबरोबर तितकेच आणखीन दिले, आपली विशेष कृपा म्हणून, आणि यासाठी की हा एक धडा ठरावा भक्तीत राहणाऱ्यांसाठी. (८३-८४)

आणि हीच देणगी इस्माईल (अ.) व इद्रीस (अ.) आणि जुल्किफ्ल (अ.) यांना दिली की हे सर्व संयमी लोक होते. आणि त्यांना आम्ही आपल्या कृपाछत्रात दाखल केले कारण ते सदाचारींपैकी होते. (८५-८६)

आणि मासेवाल्यालादेखील[11] आम्ही उपकृत केले, आठवा, जेव्हा तो रूसून निघून गेला होता.[12] आणि समजला होता की आम्ही त्याला पकडणार नाही, सरतेशेवटी त्याने अंधारातून धावा केला,[13] ''नाही अन्य कोणी परमेश्वर परंतु तूच, पवित्र आहे तुझे अस्तित्व, नि:संशय मी अपराध केला.'' तेव्हा आम्ही त्याची प्रार्थना स्वीकारली आणि दु:खापासून त्याची मुक्तता केली, आणि अशाच प्रकारे आम्ही श्रद्धावंतांना वाचवीत असतो. (८७)

आणि ज़करिय्या (अ.) ला, जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याचा धावा केला की, ''हे पालनकर्त्या, मला एकटा सोडू नकोस, आणि सर्वोत्तम वारस तर तूच आहेस.'' तर आम्ही त्याची प्रार्थना स्वीकारली आणि त्याला याहया (अ.) प्रदान केला आणि त्याच्या पत्नीला त्याच्यासाठी सुधारून दिले. हे लोक सत्कृत्यांत धावपळ करीत असत आणि आवडीने व भीतीने आमचा धावा करीत असत आणि आमच्या पुढे विनम्र होत.

(८८-९०)

आणि ती स्त्री जिने आपल्या शीलाचे रक्षण केले होते.[14] आम्ही तिच्यात आपला

---

**११)** हजरत यूसुफ (अ.) अभिप्रेत आहेत. कोठे त्यांचे नाव घेतले गेले आहे तर कोठे 'जुन्नून' व 'साहिबूलहूत' अर्थात 'मासेवाला' या किताबाने संबोधिले गेले आहे. मासेवाला त्यांना अशासाठी म्हटले गेलेले नाही की ते मासे पकडत होते किंवा विकत होते तर सर्वोच्च अल्लाहच्या आज्ञेने एका माशाने त्यांना गिळंकृत केले होते. जसे की सूरह 'साफ्फात' आयत क्र. १४२ मध्ये सांगितले गेले आहे.

**१२)** म्हणजे ते आपल्या लोकसमूहावर नाराज होऊन निघून गेले याअगोदर की ईश्वराकडून हिजरत - देशत्यागाची आज्ञा मिळावी व त्यांना आपल्या कर्तव्यपूर्ततेच्या जागेपासून दूर होणे वैध ठरले असते.

**१३)** म्हणजे माशाच्या पोटातून जे स्वत:च अंधारमय होते आणि वरून समुद्रातील अंधकाराची अधिक भर.

**१४)** अभिप्रेत आहेत बीबी हजरत मरयम (अ.)

आत्मा फुंकला व तिला आणि तिच्या पुत्रास साऱ्या दुनियेसाठी संकेत बनविले. (९१)

हा तुमचा समूह वास्तविकत: एकच समूह आहे आणि मी तुमचा पालनकर्ता आहे. म्हणून तुम्ही माझी भक्ती करा. परंतु (हे लोकांचे कारस्थान आहे की) त्यांनी आपसात आपला धर्म तुकडे तुकडे करून टाकला. सर्वांना आमच्याकडे परतावयाचे आहे. मग जो पुण्यकर्म करील, श्रद्धावंत असेल तर त्याचे कार्य नाकारले जाणार नाही आणि त्याची आम्ही नोंद घेत आहोत. आणि शक्य नाही की ज्या वस्तीला आम्ही नष्ट केले आहे ती पुन्हा परतू शकेल. येथपावेतो की जेव्हा याजूज आणि माजूज मुक्त केले जातील आणि प्रत्येक उंचीवरून ते निघून येतील. आणि सत्यवचनाची पूर्तता[१५] होण्याची वेळ जेव्हा निकट येऊन ठेपेल तेव्हा अकस्मातपणे त्या लोकांचे डोळे विस्फरलेलेच राहतील ज्यांनी द्रोह केला होता. म्हणतील, "आमचे दुर्दैव, आम्ही या गोष्टीपासून बेसावध राहिलो होतो, किंबहुना आम्ही अपराधी होतो." नि:संदेह तुम्ही आणि तुमचे ते उपास्य ज्यांची तुम्ही अल्लाहला सोडून उपासना करता नरकाचे इंधन होत, तेथेच तुम्हाला जावयाचे आहे.[१६] जर हे खरोखर ईश्वर असते तर तेथे गेले नसते, आता सर्वांना सदैव त्यातच राहावयाचे आहे. तेथे ते उसासे टाकतील व स्थिती अशी बनेल की त्यात काहीही ऐकू येणार नाही. उरले ते लोक ज्यांच्यासाठी आमच्याकडून कल्याणाचा अगोदरच निर्णय झाला आहे, तर ते निश्चितच त्यापासून दूर ठेवले जातील, तिचे सळसळणेदेखील ते ऐकणार नाहीत आणि ते सदासर्वदा आपल्या आवडत्या वस्तूंच्या दरम्यान राहतील, तो अत्यंत भीतीचा क्षण, त्यांना थोडेसुद्धा अस्वस्थ करणार नाही, आणि दूत त्यांना पुढे होऊन भेटतील व म्हणतील, "हा तुमचा तोच दिवस आहे ज्याचे तुम्हाला वचन दिले जात होते."

(९२-१०३)

तो दिवस जेव्हा आकाशाला आम्ही असे गुंडाळून ठेवू जसे कागदाच्या गुंडाळीमध्ये कागद गुंडाळले जातात. ज्याप्रमाणे पूर्वी आम्ही निर्मितीचा प्रारंभ केला होता त्याचप्रमाणे आम्ही पुन्हा त्याची पुनरावृत्ती करू. हे एक वचन आहे आमच्याकडून. आणि हे काम आम्हाला कोणत्याही परिस्थितीत करावयाचे आहे. आणि जबूरमध्ये उपदेशानंतर आम्ही हे लिहून ठेवले आहे की पृथ्वीचे वारस आमचे सदाचारी दास ठरतील.[१७] यात एक मोठी

**१५)** म्हणजे कयामत उद्भवण्याची वेळ.

**१६)** 'निवेदनात' आले आहे की, सदरहू आयतवर अनेकेश्वरवादींच्या सरदारांपैकी एकाने आक्षेप घेतला की, अशाप्रकारे तर केवळ आमचे उपास्यच नव्हे तर, येशू मसीह, उजैर आणि फरिश्तेदेखील जहन्नममध्ये जातील, कारण जगात त्यांचीही उपासना केली जाते. यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी फर्मावीले, "होय, अशी प्रत्येक व्यक्ती जिने अल्लाहऐवजी तिची बंदगी केले जाणे पसंत केले, ती त्या लोकांसमवेत असेल ज्यांनी तिची बंदगी केली."

**१७)** सदरहू आयत समजण्यासाठी सूरह जुमर, आयत क्र. ७३-७४ पहा.



वार्ता आहे भक्तीमध्ये राहणाऱ्या लोकांसाठी. (१०४-१०६)

हे पैगंबर (स.), आम्ही तर तुम्हाला जगवासियांसाठी कृपा बनवून पाठविले आहे. त्यांना सांगा, "माझ्यापाशी जो दिव्य बोध येतो तो असा आहे की तुमचा परमेश्वर केवळ एकच परमेश्वर आहे, मग तुम्ही आज्ञापालनासाठी मान तुकविता काय?" जर त्यांनी तोंड फिरविले तर त्यांना सांगून टाका की, "मी जाहिरपणे तुम्हाला सावध केले आहे. आता हे मला माहीत नाही की ती गोष्ट जिचे वचन तुम्हाला दिले जात आहे, जवळ आहे की दूर. अल्लाह त्या गोष्टीदेखील जाणतो ज्या मोठ्या आवाजात सांगितल्या जातात आणि त्यादेखील ज्या तुम्ही लपवून करता. मी तर असे समजतो की कदाचित हा (उशीर) तुमच्यासाठी एक उपद्रव आहे. आणि तुम्हाला एका विशिष्ट अवधीपर्यंत मजा करण्याची संधी दिली जात आहे." (१०७-१११)

(सरतेशेवटी) पैगंबर (स.) नी सांगितले की, "हे माझ्या पालनकर्त्या! सत्यानिशी निर्णय कर आणि हे लोकहो, तुम्ही ज्या गोष्टी रचीत आहात त्यांच्या विरोधात आमचा दयाळू पालनकर्ता आमच्यासाठी मदतीचा आधार आहे." (११२)

# २२ सूरह अल्हज

*(मदीनाकालीन, वचने ७८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

लोकहो, आपल्या पालनकर्त्याच्या कोपापासून स्वत:ला वाचवा, वस्तुस्थिती अशी आहे की पुनरुत्थानाचा हादरा महा (भयंकर) गोष्ट आहे. ज्या दिवशी तुम्ही पाहाल, की प्रत्येक दूध पाजणारीला आपल्या दूध पिणाऱ्या बाळाचा विसर पडेल. प्रत्येक गर्भवतीचा गर्भपात होईल, आणि लोक तुम्हाला नशेत दिसतील, वास्तविक पाहता त्यांनी नशा केली नसेल तर तो अल्लाहचा भयंकर प्रकोपच असेल. (१-२)

काही लोक असे आहेत जे ज्ञानाविना अल्लाहसंबंधी वाद घालतात, आणि प्रत्येक उद्दाम-शैतानचे अनुकरण करू लागतात. वस्तुत: त्याच्या तर नशिबातच असे लिहिले आहे की जो त्याला मित्र बनवील त्याला तो पथभ्रष्ट करणारच आणि नरकाच्या प्रकोपाचा मार्ग दाखवील. लोकहो, जर तुम्हाला मरणोत्तर जीवनासंबंधी काही शंका असेल तर तुम्हाला माहीत असले पाहिजे की आम्ही तुम्हाला मातीपासून निर्मिले आहे, मग वीर्यापासून, नंतर रक्ताच्या गोळ्यापासून मग मांसाच्या तुकड्यापासून जी आकारयुक्तही असते आणि आकारहीनसुद्धा. (हे आम्ही अशासाठी सांगत आहोत) की जेणेकरून तुमच्यावर सत्य स्पष्ट करावे. आम्ही ज्या (वीर्या) ला इच्छितो एका विशिष्ट कालावधीपर्यंत गर्भाशयात थांबवून ठेवतो, मग तुम्हाला एका अर्भकाच्या रूपात काढून आणतो (मग तुमचे संगोपन करतो) जेणेकरून तुम्ही आपले तारुण्य गाठावे, आणि तुमच्यापैकी कोणी अगोदरच परत बोलाविला जातो आणि कोणी निकृष्टतम वयाकडे परतविला जातो जेणेकरून सर्वकाही जाणून घेतल्यानंतर मग काहीही न कळण्याची अवस्था प्राप्त होते. आणि तुम्ही पाहता की जमीन कोरडी पडली आहे मग ज्याक्षणी आम्ही तिच्यावर पाऊस पाडला तेव्हा अकस्मात ती तरारून गेली व फुलली आणि तिने सर्व प्रकारच्या नयनरम्य वनस्पती उगविण्यास प्रारंभ केला. हे सर्वकाही या कारणामुळे आहे की अल्लाहच सत्य आहे, आणि तो मृतांना जीवित करतो व तो सर्व गोष्टींवर प्रभुत्व राखतो. आणि हे (या गोष्टीचे प्रमाण आहे) की पुनरुत्थानाची घटका आल्याशिवाय राहणार नाही, यामध्ये कोणत्याही शंकेला वाव नाही. आणि अल्लाह अवश्य त्या लोकांना उठवील जे कबरींमध्ये पोहचलेले आहेत. (३-७)

काही अन्य लोक असे आहेत जे कोणत्याही ज्ञान आणि मार्गदर्शन व प्रकाश प्रदान करणाऱ्या ग्रंथाविना ताठ मान करून अल्लाहच्या बाबतीत वाद घालतात, जेणेकरून लोकांना अल्लाहच्या मार्गापासून भ्रष्ट करावे, अशा व्यक्तीसाठी जगात नामुष्की आहे आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्याला अग्नीच्या प्रकोपाची चव चाखवू. हे आहे तुझे



ते भविष्य जे तुझ्या स्वत:च्या हातानी तुझ्याकरिता तयार केले आहे, एरव्ही अल्लाह आपल्या दासावर अन्याय करणारा नाही. (८-१०)

आणि लोकांत कोणी असाही आहे जो काठावर राहून अल्लाहची भक्ती करतो,[१] जर लाभ झाला तर संतुष्ट होतो आणि जर एखादे संकट आले तर परत फिरतो, त्याचे इहलोकही गेले व परलोकदेखील, हा आहे उघड तोटा. मग तो अल्लाहला सोडून त्यांचा धावा करतो जे त्याला नुकसानही पोहचवू शकत नाहीत व फायदाही नाही. ही आहे मार्गभ्रष्टतेची परिसीमा तो त्यांचा धावा करतो ज्यांचा तोटा त्यांच्या फायद्यापेक्षा अधिक आहे निकृष्टतम आहे त्याचा वाली आणि अत्यंत वाईट आहे त्याचा सोबती. (याउलट) अल्लाह त्या लोकांना ज्यांनी श्रद्धा ठेवली व सत्कृत्ये केली, निश्चितच अशा स्वर्गांमध्ये दाखल करील ज्यांच्याखालून कालवे वाहात असतील, अल्लाह जे काही इच्छितो ते करतो. ज्या व्यक्तीची कल्पना अशी असेल की अल्लाह इहलोकात व परलोकात त्याला काहीही मदत करणार नाही तर त्याने एखाद्या दोरीद्वारे आकाशापर्यंत पोहचून भगदाड पाडावे. मग पाहावे की त्याची युक्ती एखाद्या अशा गोष्टीला रद्द करू शकते का जी त्याला अप्रिय आहे. (११-१५)

अशाच उघड उघड गोष्टीसह आम्ही या कुरआनला अवतरित केले आहे, आणि अल्लाह ज्याला इच्छितो त्याला मार्गदर्शन करतो. (१६)

जे लोक श्रद्धावंत आहेत आणि जे यहुदी आहेत तसेच साबी, ख्रिस्ती व मजूश (अग्नीपूजक आहेत) तसेच जे अनेकेश्वरवादी आहेत त्या सर्वांच्या दरम्यान अल्लाह निर्णय करील पुनरुत्थानाच्याच्या दिवशी. प्रत्येक गोष्ट अल्लाहच्या दृष्टीत आहे. तुम्ही पहात नाही की जे काही आकाशात आहे आणि जे पृथ्वीवर आहे तसेच सूर्य, चंद्र, तारे, पर्वत आणि वृक्ष व जनावरे आणि बहुतेक लोक देखील अल्लासमोर नतमस्तक होत आहेत

बरेचसे ते लोकदेखील आहेत जे प्रकोपास पात्र झाले आहेत? आणि ज्याला अल्लाहने अपमानित व लज्जित केले त्याला पुन्हा कोणी मान देणारा नाही, अल्लाह जे काही इच्छितो ते करतो. (१७-१८)

---

१) म्हणजे द्रोह आणि इस्लामच्या सरहद्दीवर उभे राहून उपासना करतो, जसे एखादा द्विधा अवस्थेतील माणूस एखाद्या फौजेच्या काठाशी उभा असावा, जर विजय होत असताना पाहिले तर त्यात सामील व्हावे आणि पराभव होत असल्याचे पाहिले तर गुपचूप सटकावे.

हे दोन पक्ष आहेत ज्यांच्या दरम्यान आपल्या पालनकर्त्यासंबंधी वितंडवाद[2] आहे, यांच्यापैकी ते लोक ज्यांनी सत्य नाकारले, त्यांच्यासाठी अग्नीचा पोषाख तयार केला गेला आहे. त्यांच्या डोक्यावर उकळते पाणी टाकले जाईल ज्यामुळे त्यांची केवळ त्वचाच नव्हे तर पोटाच्या आतील भागदेखील वितळेल आणि त्यांचा समाचार घेण्यासाठी लोखंडी घण असतील. जेव्हा जेव्हा ते घाबरून नरकामधून बाहेर पडण्याचा प्रयत्न करतील परत त्यातच ढकलून दिले जातील की चाखा आता जळण्याच्या शिक्षेची चव. (दुसरीकडे) ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांना अल्लाह अशा स्वर्गांमध्ये दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील. तेथे ते सोन्याच्या कंकणांनी आणि मोत्यांनी विभूषित केले जातील. आणि त्यांचे पोषाख रेशमाचे असतील. त्यांना पवित्र गोष्ट स्वीकारण्याची सुबुद्धी प्रदान केलेली आहे आणि त्यांना स्तवनीय गुणसंपन्न ईश्वराचा मार्ग दाखविला गेला आहे. (१९-२४)

ज्या लोकांनी द्रोह केला आणि जे (आज) अल्लाहच्या मार्गापासून प्रतिबंध करीत आहेत आणि त्या आदरणीय मस्जिदच्या यात्रेत अडचण आणीत आहेत जी आम्ही सर्व लोकांसाठी बनविली आहे,[3] ज्यात स्थानिक रहिवाशी व बाहेरून येणाऱ्यांचे हक्क समान आहेत. (त्यांचे वर्तन निश्चितच शिक्षेस पात्र आहे.) या (आदरणीय मस्जिद) मध्ये जो कोणी सत्यापासून दूर जाऊन अत्याचाराचा मार्ग अवलंबील त्याला आम्ही यातनादायक प्रकोपाची चव चाखवू. (२५)

आठवा ती वेळ जेव्हा आम्ही इब्राहीम (अ.) साठी या घरा (काबागृहा) ची जागा योजिली होती (या आदेशासह) की माझ्यासमवेत कोणासही भागीदार करू नका आणि माझ्या घराला पवित्र प्रदक्षिणा घालणाऱ्या, उभे राहणाऱ्या आणि झुकणाऱ्या व नतमस्तक होणाऱ्यांसाठी पवित्र ठेवा, आणि लोकांत हजची आम घोषणा करा की त्यांनी तुमच्यापाशी प्रत्येक लांबवरच्या ठिकाणाहून पायी व उंटावर स्वार होऊन यावे, म्हणजे त्यांनी ते फायदे पाहावेत जे येथे त्यांच्यासाठी ठेवलेले आहेत. आणि काही ठराविक दिवशी त्या जनावरांवर अल्लाहचे नाव घ्यावे बळी द्यावे (कुर्बानी करावी) जी त्याने त्यांना प्रदान केलेली आहेत, स्वत:देखील खावे आणि अडचणीत असलेल्या वंचित लोकांनासुद्धा द्यावे. मग आपली अस्वच्छता दूर करावी आणि आपले नवस फेडावे आणि

---

२) या ठिकाणी ईश्वरासंबंधी झगडणाऱ्या सर्व समूहांची, ते मोठ्या प्रमाणात असतानादेखील दोन पक्षात विभागणी केलेली आहे. एक पक्ष तो जो प्रेषितांचे म्हणणे मान्य करून ईश्वराची यथायोग्य दास्यत्व स्वीकारतो. दुसरा पक्ष तो जो प्रेषितांचे म्हणणे अमान्य करून कुफ्रचा मार्ग स्वीकारतो. मग त्यांच्या आपसात कितीही मतभेद का असू नये व त्यांच्या द्रोहाने विभिन्न रूपे का अवलंबिली असू नयेत.

३) म्हणजे पैगंबर मुहम्मद (स.) व त्यांच्या अनुयायांना हज आणि उमरा अदा करू देत नाहीत.



या प्राचीन गृहाची प्रदक्षिणा करावी. (२६-२९)

असा होता (काबा उभारण्याचा उद्देश) आणि जो कोणी अल्लाहने स्थापिलेल्या आदराचा मान राखील तर हे त्याच्या पालनकर्त्यापाशी त्याच्या स्वत:साठीच उत्तम आहे. (३०-)

आणि तुमच्यासाठी पाळीव जनावरे वैध ठरविली गेलीत[4] त्या जनावरांखेरीज जे तुम्हाला सांगितले गेले आहेत. म्हणून मूर्तींच्या घृणास्पद गोष्टीपासून अलिप्त राहा. खोट्या गोष्टी वर्ज्य करा. एकाग्र होऊन अल्लाहचे दास बना, त्याच्याबरोबर कोणासही भागीदार बनवू नका. आणि जो कोणी अल्लाहबरोबर अन्य कुणास सहभागी करील तर तो जणू काही आकाशावरून कोसळेल. एक तर त्याला पक्षी उचलून नेतील अथवा वारा त्याला अशा जागी नेऊन फेकील जेथे त्याच्या चिंधड्या उडतील.[5] (-३०-३१)

ही आहे वस्तुस्थिती (ती समजून घ्या) आणि जो अल्लाहच्या नेमून दिलेल्या प्रतिकांचा आदर करील ही हृदयाची ईशपरायणता.[6] आहे. (३२)

---

४) या प्रसंगी पाळीव जनावरांचे हलाल असण्याचा उल्लेख करण्यामागचा हेतू दोन चुकीच्या समजूतींचे निवारण करणे होय. पहिली अशी की कुरैश आणि अनेकेश्वरवादी अरब लोक, 'बहीरा', 'साईबा', 'वसीला' आणि 'हाम' यांचीदेखील अल्लाहने वर्ज्य ठरविलेल्या वस्तूत गणना करीत असत. म्हणून फर्माविले गेले की त्याने वर्ज्य ठरविलेले हे नाहीत किंबहुना त्याने सर्व पाळीव जनावरे हलाल ठरविली आहेत. दुसरे असे की हज वेष धारलेल्या (एहराम) अवस्थेत ज्याप्रमाणे शिकार निषिद्ध आहे त्याचप्रमाणे एखाद्या वेळी असा समज होऊ नये की त्या अवस्थेत पाळीव जनावरे कापणे व त्यांचे भक्षणदेखील हराम आहे. म्हणून सांगितले गेले आहे की हे अल्लाहकरवी निषिद्ध ठरविलेल्यापैकी नाही.

५) या उपमेत आकाशाने अभिप्रेत मानवाची प्राकृतिक अवस्था होय. त्यात तो एका ईश्वराखेरीज अन्य कुणाचाही दास असत नाही तसेच त्यात एकेश्वरवादाशिवाय अन्य कोणताच धर्म त्याची प्रकृती जाणत नसते. जर माणसाने प्रेषितांनी केलेले मार्गदर्शन मान्य केले तर तो याच प्राकृतिक अवस्थेवर ज्ञान आणि डोळसपणे दृढ होतो व पुढेही त्याची भरारी उंच उंचच होत राहते, अधोगतीला जात नाही. परंतु अनेकेश्वरवाद (केवळ अनेकेश्वरवादच नव्हे तर नास्तिकवाद आणि पाखंडदेखील) स्वीकारल्याबरोबर तो आपल्या स्वाभाविक आकाशातून अकस्मात कोसळतो व त्यावर दोन अवस्थेपैकी कोणतीही एक हमखास ओढवते. एक अशी की शैतान आणि मार्गभ्रष्ट करणारी माणसे त्यावर झेप घेतात व प्रत्येक त्याला उचलून नेण्याचा प्रयत्न करतो. दुसरी अशी की त्याच्या स्वत:च्या मनोवासना व भावना व कल्पना त्याला उडवीत फिरत असतात व सरतेशेवटी त्याला एखाद्या खोल दरीत नेऊन फेकतात.

६) म्हणजे हा आदरभाव अंत:करणातील ईशभयाचा परिणाम होय. हे या गोष्टीचे प्रतीक आहे की माणसाच्या अंत:करणात काही ना काही तरी ईशभिरूता आहे. म्हणूनच तर तो त्याच्या प्रतिकांचा आदर करीत आहे.

तुम्हाला एका ठराविक मुदतीपर्यंत त्या (बळी देण्याच्या जनावरा) पासून लाभ घेण्याचा हक्क आहे,[७] मग त्यांची (बळी देण्याची) जागा याच प्राचीन घराजवळ आहे. (३३)

प्रत्येक जनसमूहासाठी आम्ही बळी देण्यासंबंधीचा कायदा ठरवून दिला आहे जेणेकरून (त्या जनसमूहाच्या) लोकांनी त्या जनावरावर अल्लाहचे नाव घ्यावे जी त्याने त्यांना प्रदान केलेली आहेत.[८] (या निरनिराळ्या पद्धतीत उद्देश एकच आहे) तर तुमचा परमेश्वर एकच परमेश्वर आहे आणि त्याचेच तुम्ही आज्ञाधारक बनून राहा, आणि हे पैगंबर, शुभवार्ता दे, विनम्रतेचा अवलंब करणाऱ्यांना. ज्यांची अवस्था अशी आहे की अल्लाहचा उल्लेख ऐकताच त्याच्या हृदयांचा थरकाप होतो, जे काही संकट त्यांच्यावर येते त्यावर ते संयम ठेवतात नमाज कायम करतात आणि जी काही उपजीविका आम्ही त्यांना दिली आहे त्यातून खर्च करतात. (३४-३५)

आणि (बळीच्या) उंटांना आम्ही तुमच्यासाठी अल्लाहच्या संकेतचिन्हांमध्ये सामील केले आहे, तुमच्यासाठी त्यांच्यात कल्याण आहे. म्हणून त्यांना उभे करून त्यांच्यावर अल्लाहचा नामोच्चार करा,[९] आणि जेव्हा (बळी दिल्यावर) त्यांच्या पाठी जमिनीवर स्थिरावतील[१०] तेव्हा त्यातून स्वतः खा आणि त्यांनादेखील खाऊ घाला जे वंचित राहिले आहेत आणि त्यांनासुद्धा जे गरजवंत आहेत. या जनावरांना आम्ही अशा प्रकारे तुमच्यासाठी अधीन केले आहे की जेणेकरून तुम्ही कृतज्ञता व्यक्त करावी. त्यांचे

७) पहिल्या आयतीत अल्लाहच्या प्रतिकांचे आदर करण्याच्या आज्ञेनंतर हे वाक्य एका चुकीच्या समजुतीचे निवारण करण्यासाठी फर्माविले आहे. अल्लाहच्या प्रतिकात बळीची जनावरेदेखील समाविष्ट आहेत. अरब लोकांचा असा समज होता की सदरहू जनावरे काबागृहाकडे नेत असताना त्यांच्यावर स्वार होता कामा नये. तसेच त्यांच्यावर ओझेही लादले जाऊ नये, या चुकीच्या समजुतीचे निवारण करण्यासाठी फर्माविले गेले की यांच्याकरवी जी कामे घेण्याची गरज लागेल ती घेतली जाऊ शकतात.

८) या आयतीवरून दोन गोष्टी माहीत झाल्या. एक अशी की 'कुर्बानी' ही सर्व ईश्वरीय शास्त्रांतील उपासनाव्यवस्थेचे एक आवश्यक घटक म्हणून राहिले आहे. दुसरी अशी की मुळात अल्लाहच्या नावाने कुर्बानी होय, की जी सर्व शास्त्रांत एकसमान राहिली आहे. राहिला तिचा वेळ आणि प्रसंग व इतर तपशील तर त्यांच्यात विविध काळातील शास्त्रांतील आज्ञा निरनिराळ्या राहिल्या आहेत.

९) यांच्यावर अल्लाहचे नामोच्चारणाने अभिप्रेत त्यांचा गळा चिरतांना अल्लाहचे नाव उच्चारणे होय. उंटाला प्रथम उभे करून त्याच्या नरड्यात भाला खुपसला जातो. याला 'नहर' असे म्हणतात.

१०) पाठीचे जमिनीवर स्थिरावणे याचा अर्थ केवळ ते जमिनीवर कोसळावेत असे नाही तर ते कोसळून शांत व्हावेत. म्हणजे त्यांचे तडफडणे बंद व्हावे व पूर्णपणे प्राण निघावे असा आहे.



मांसही अल्लाहला पोहचत नाही आणि त्यांचे रक्तदेखील नाही परंतु त्याला तुमची निष्ठा पोहचते. त्याने यांना तुमच्यासाठी अशाप्रकारे अधीन केले आहे की जेणेकरून त्याने प्रदान केलेल्या मार्गदर्शनावर तुम्ही त्याचा महिमा वर्णावा.[११] आणि हे पैगंबर (स.), शुभवार्ता द्या सदाचारी लोकांना. (३६-३७)

खचितच अल्लाह प्रतिकार करतो त्या लोकांच्या बाजूने ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे. निश्चितच अल्लाह कुणा अपहार करणाऱ्या कृतघ्नाला पसंत करीत नसतो. परवानगी दिली गेली त्या लोकांना ज्यांच्याविरूद्ध युद्ध सुरू आहे, कारण ते अत्याचारपीडित आहेत.[१२] आणि अल्लाह निश्चितपणे त्यांच्या मदतीला समर्थ आहे. हे ते लोक आहेत जे आपल्या घरांतून नाहक बाहेर काढले गेले, केवळ या अपराधापायी की ते म्हणत होते,

''आमचा पालनकर्ता अल्लाह आहे.'' जर अल्लाह लोकांना एक दुसऱ्याकरवी हटवीत नसता तर मठ, आणि चर्च व 'सिनेगॉग' आणि मस्जिदी ज्यांत अल्लाहचे नाव मोठ्या प्रमाणात घेतले जाते, सर्व उद्ध्वस्त केली गेली असती. अल्लाह जरूर त्या लोकांना सहाय्य करील जे त्याला सहाय्य करतील.[१३] अल्लाह मोठा शक्तीशाली आणि जबरदस्त आहे. हे ते लोक आहेत ज्यांना आम्ही जर पृथ्वीवर सत्ता बहाल केली तर ते नमाज कायम करतील, जकात देतील, सत्कर्माचा आदेश देतील आणि वाईटाला प्रतिबंध करतील, आणि सर्व बाबींचा अंतिम परिणाम अल्लाहच्या अखत्यारीत आहे. (३८-४१)

११) म्हणजे मनापासून त्याची महानता व श्रेष्ठता मान्य करा आणि कृतीने तसे जाहिरपणे दर्शवा. तसेच 'कुर्बानी'च्या आज्ञेमागचा हेतू व कारणाकडेही हा संकेत आहे. जनावरांचे वशीभूत केले जाण्याच्या देणगीबद्दल अल्लाहप्रती कृतज्ञता व्यक्त व्हावी केवळ याच कारणास्तव कुर्बानी आवश्यक ठरविलेली आहे असे नाही तर ज्याची ही जनावरे आहेत व ज्याने ती आमच्यासाठी वशीभूत केली आहेत त्याचे मालकी हक्क आम्ही मनापासून आणि सकृत्‌दर्शनीदेखील मान्य करावे जेणेकरून, हे सर्वकाही आमचे आहे असा गैरसमज कदापि होऊ नये, या कारणास्तवदेखील कुर्बानी आवश्यक ठरविलेली आहे.

१२) अल्लाहच्या मार्गात युद्ध करण्याबाबतीत सर्वप्रथम उतरलेली अशी ही आयत आहे. सदरहू आयतीत तशी केवळ परवानगी दिलेली होती. नंतर सूरह बकरा आयत क्र. १९० ते १९३ आणि २१६ आणि २२४ या युद्धाचा आदेश देणाऱ्या आयती उतरल्या. या आदेशादरम्यान काही महिन्यांचेच तेवढे अंतर आहे. आमच्या संशोधनाप्रमाणे जिलहज्ज हि. स. १ मध्ये परवानगी उतरली तर आज्ञा, बदरच्या युद्धाच्या काही अगोदर रजब अथवा शाबान, हि. स. २ मध्ये उतरली.

१३) हा विषय दिव्य कुरआनात अनेक ठिकाणी वर्णिला गेला आहे की जे लोक मानवजातीस एकेश्वरवादाचे आमंत्रण देण्यासाठी आणि सत्यधर्म प्रस्थापित करण्यासाठी तसेच दुष्टाईच्या जागी भलाईच्या प्रसारासाठी प्रयत्नशील असतात ते अल्लाहचे मदतगार आहेत कारण हे अल्लाहचे कार्य आहे जे पार पाडण्यात ते त्याला साथ देत असतात.

हे पैगंबर (स.), जर ते (म्हणजे अश्रद्ध) तुम्हाला खोटे ठरवीत असतील तर त्यांच्यापूर्वी नूह (अ.) चे लोक व आद लोक आणि समूद लोक आणि इब्राहीम (अ.) चे लोक व लूत (अ.) चे लोक आणि मदियननिवास्यांनी देखील खोटे लेखले आहे आणि मूसा (अ.) यांनादेखील खोटे लेखले गेले आहे. त्या सर्व सत्याचा इन्कार करणाऱ्यांना मी अगोदर सवड दिली, मग पकडले, आता पाहून घ्या की माझी शिक्षा कशी होती. कित्येक अपराधी वस्त्या आहेत ज्यांना आम्ही नष्ट केले आहे आणि आज त्या आपल्या छतासह पालथ्या पडलेल्या आहेत, कित्येक विहिरी निरुपयोगी आणि कित्येक महाल भग्नावशेष बनले आहेत. काय हे लोक भूतलावर वावरत नाहीत की जेणेकरून यांची हृदये बोध घेणारी व यांचे कान ऐकणारे बनले असते? वस्तुस्थिती अशी आहे की डोळे आंधळे नसतात तर ती हृदये आंधळी बनतात जी उरात स्थित आहेत. (४२-४६)

हे लोक प्रकोपासाठी घाई करीत आहेत, अल्लाह कदापि आपल्या वचनाच्याविरूद्ध करणार नाही, पण तुझ्या पालनकर्त्याजवळील एक दिवस तुमच्या गणनेतील हजार वर्षांबरोबर असतो.[१४] कित्येक वस्त्या ज्या अत्याचारी होत्या, मी त्यांना प्रथम सवड दिली, मग पकडले, आणि सर्वांना परत तर माझ्याकडेच यावयाचे आहे. (४७-४८)

हे पैगंबर (स.), सांगून टाका की, "लोकहो, मी तर तुमच्यासाठी केवळ ती व्यक्ती आहे जी (वाईट वेळ येण्यापूर्वी) स्पष्टपणे खबरदार करणारी आहे." मग जे श्रद्धा ठेवतील व सत्कृत्ये करतील त्यांच्यासाठी क्षमा आहे व मानाची उपजीविका. आणि जे आमच्या संकेतांचे वैभव नष्ट करण्याचा प्रयत्न करतील ते नरकाचे सोबती आहेत. (४९-५१)

आणि हे पैगंबर (स.), तुमच्यापूर्वी आम्ही कोणी असा प्रेषितही पाठविला नाही न नबीदेखील (ज्याच्या बाबतीत हा मामला समोर आला नाही की) जेव्हा त्याने इच्छा केली, शैतान त्याच्या इच्छेत विघ्नकर्ता झाला नाही. अशा प्रकारे शैतान जी काही विघ्ने आणतो, अल्लाह त्यांना नाहीसे करतो, आणि आपल्या संकेतांना सुदृढ करून टाकतो, अल्लाह सर्वज्ञ आहे व बुद्धिमान. (तो यासाठी असे होऊ देतो) की जेणेकरून शैतानाने आणलेल्या अडथळ्याला उपद्रव बनवावे त्या लोकांसाठी ज्यांच्या हृदयांना (दांभिकतेचा) रोग जडला

**१४)** म्हणजे मानवी इतिहासात ईश्वरी निर्णय तुमच्या घड्याळानुसार व जंत्रीनुसार होत नसतात की आज एखादे चुकीचे अथवा योग्य वर्तन अंगिकारल्याबरोबर उद्याच त्याचे चांगले किंवा वाईट परिणाम समोर प्रकट झाले. एखाद्या लोकसमूहाला जर असे सांगितले गेले की अमूक एखादे वर्तन अंगिकारण्याचे पडसाद तुमच्या विनाशाच्या स्वरूपात उमटतील तर उत्तरात, असे वर्तन अंगिकार करून आम्हाला दहा, वीस अथवा पन्नास वर्षे लोटली आहेत आतापर्यंत आमचे काहीच वाईट झालेले नाही, जर त्यांनी असा युक्तिवाद सांगितला तर तो लोकसमूह फारच मूर्ख म्हणावा कारण ऐतिहासिक परिणाम उमटण्यासाठी दिवस, महिने आणि वर्षे तर दूरच राहो शतकेदेखील काही मोठी गोष्ट नाही.



आहे आणि त्यांची हृदये खोटी आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की हे अत्याचारी लोक द्वेषांत फार दूर निघाले आहेत आणि ज्ञानाने विभूषित लोकांनी जाणून घ्यावे की हे सत्य आहे तुझ्या पालनकर्त्याकडून आणि त्यांनी यावर श्रद्धा ठेवावी व त्यांची हृदये याच्यासमोर नमावीत, निश्चितच अल्लाह श्रद्धावंतांना नेहमी सरळमार्ग दाखवितो.[१५]

(५२-५४)

नाकारणारे तर शंकेतच पडलेले राहतील येथपावेतो की त्यांच्यावर पुनरुत्थानाची घटका अकस्मात येईल, अथवा एक अशुभ दिनाचा प्रकोप कोसळेल. त्या दिवशी राज्य अल्लाहचेच असेल, आणि तो त्यांच्या दरम्यान निर्णय करील. जे श्रद्धा बाळगणारे आणि सत्कृत्ये करणारे असतील ते ऐश्वर्यसंपन्न स्वर्गात जातील आणि ज्यांनी द्रोह केला असेल व आमच्या संकेतांना खोटे ठरविले असेल त्यांच्याकरिता अपमानजनक प्रकोप असेल. आणि ज्या लोकांनी अल्लाहच्या मार्गात हिजरत (देश त्याग) केली मग ठार केले गेले अथवा मृत्यू पावले, अल्लाह त्यांना उत्तम उपजीविका देईल आणि नि:संशय अल्लाहच सर्वोत्तम उपजीविका देणारा आहे. तो त्यांना अशा ठिकाणी पोहचवील जेणेकरून ते आनंदित होतील. नि:संशय अल्लाह सर्वज्ञ व सहिष्णू आहे. हा तर आहे त्यांचा शेवट,

**१५)** अर्थ असा की शैतानच्या या खोडसाळ कृत्यांना अल्लाहने लोकांसाठी परीक्षा आणि खऱ्याला खोट्यापासून वेगळे करण्याचे एक साधन बनविले आहे. विकृत बुद्धीचे लोक याच गोष्टीपासून चुकीचे निर्णय घेतात व या गोष्टी त्यांना मार्गभ्रष्ट करण्याचे साधन ठरतात. उजळ मनाच्या लोकांना याच गोष्टी पैगंबर आणि दिव्य ग्रंथाचे सत्याधिष्ठित असण्याबद्दल खात्री पटवितात. ते जाणून घेतात की या सर्व शैतानाच्या खोड्या आहेत. या गोष्टीमुळे त्यांचे असे समाधान होते की हे आवाहन खचितच कल्याण आणि सचोटीचे आवाहन आहे अन्यथा शैतानचा याच्याबाबतीत इतका आटापिटा झाला नसता. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे आवाहन त्यावेळी ज्या अवस्थेत होते ते पाहून, पैगंबर (स.) आपल्या उद्दिष्टात अयशस्वी झाले असल्याची दिशाभूल, वरकरणी दृष्टी बाळगणाऱ्यांची होत होती. पाहणारे जे काही पाहात होते ते तर केवळ हेच होते की आपल्या लोकसमूहाने आपल्यावर ईमान आणावे अशी मनोकामना बाळगणारा एक इसम, सरतेशेवटी त्याला हिजरत-स्वदेश त्याग करावे लागले आणि मक्कावासी अश्रद्धावंत यशस्वी झाले आहेत. अशा परिस्थितीत लोक, पैगंबर (स.) यांच्या या निवेदनाला की मी अल्लाहचा प्रेषित आहे, त्याचे समर्थन माझ्या पाठीशी आहे तसेच कुरआनच्या या घोषणा की प्रेषितांना खोटे ठरविणाऱ्या लोकसमूहावर प्रकोप कोसळत असतो. जेव्हा ऐकत असत तेव्हा त्यांना पैगंबर (स.) आणि दिव्य कुरआनची सत्यता शंकास्पद वाटत असे. पैगंबर (स.) यांचे विरोधक हे पाहून उड्या मारीत कल्पना करीत असत की कोठे गेले ते ईश्वराचे समर्थन, आणि काय झाले त्या प्रकोपाच्या धमक्यांचे ज्याचे आम्हाला भय दाखविले जात होते, आता का तो प्रकोप कोसळत नाही, अशाच गोष्टींचे उत्तर सदरच्या आयतीत दिले गेले आहे.

आणि जो कोणी बदला घेईल तर एवढाच जेवढा त्याच्यावर केला गेला असेल आणि मग नंतरही त्याच्यावर आगळीक झाली तर अल्लाह त्याला अवश्य सहाय्य करील. अल्लाह माफ करणारा व क्षमाशील आहे. (५५-६०)

हे यासाठी की रात्रीतून दिवस व दिवसांतून रात्र काढणारा अल्लाहच आहे, आणि तो सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे. हे यासाठी की अल्लाहच सत्य आहे आणि ते सर्व मिथ्या आहेत ज्यांचा अल्लाहला सोडून हे धावा करतात, आणि अल्लाहच वर्चस्व बाळगणारा आणि महान आहे. काय तुम्ही हे पाहात नाही की अल्लाह आकाशातून पाण्याचा वर्षाव करतो ज्यामुळे पृथ्वी हिरवीगार बनते? वस्तुस्थिती अशी आहे की तो सूक्ष्मदर्शी व जाणणारा आहे.[१६] त्याचेच आहे जे काही आकाशांत आहे आणि जे काही पृथ्वीत आहे. नि:संदेह तोच निरपेक्ष व स्तुत्य आहे. काय तुम्ही पाहात नाही की त्याने ते सर्वकाही तुमच्या अधीन केले आहे जे पृथ्वीत आहे आणि त्यानेच नावेला नियमबद्ध केले आहे की ती त्याच्या आज्ञेने समुद्रात चालते, आणि त्यानेच आकाशाला अशाप्रकारे सांभाळले आहे की त्याच्या आज्ञेशिवाय ते जमिनीवर पडू शकत नाही? वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह लोकांसाठी फार प्रेमळ व दयाळू आहे. तोच आहे ज्याने तुम्हाला जीवन प्रदान केले, तोच तुम्हाला मरण देईल आणि तोच पुन्हा तुम्हाला जिवंत करील. खरे असे आहे की मनुष्य फारच, सत्य नाकारणारा आहे.[१७] (६१-६६)

प्रत्येक लोकसमुदाया (उम्मत) करिता आम्ही एक उपासनापद्धती निश्चित केली आहे, ज्याचे अनुकरण तो करतो, तर मग हे पैगंबर (स.)! त्यांनी याबाबतीत तुमच्याशी भांडण करू नये.[१८] तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे निमंत्रण द्या. नि:संशय तुम्ही सरळ मार्गावर आहात. आणि जर ते तुमच्याशी भांडले तर सांगा की, ''जे काही तुम्ही करीत आहात, अल्लाहला चांगलेच माहीत आहे. अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी तुमच्या दरम्यान त्या सर्व गोष्टींचा निर्णय लावील ज्यांच्याशी तुम्ही मतभेद करीत राहिला आहात.'' काय तुम्हाला माहीत नाही की आकाश व पृथ्वीतील प्रत्येक वस्तू अल्लाहच्या

**१६)** म्हणजे द्रोह आणि अन्यायाचे वर्तन अंगिकारणाऱ्यांवर प्रकोप कोसळविणे, श्रद्धावंत आणि सद्वर्तनी दासांना इनाम देणे, अत्याचारपीडित, सत्यप्रिय लोकांची दाद फिर्याद ऐकणे आणि शक्तीनिशी अन्यायाचा मुकाबला करीत असलेल्या सत्यप्रेमी लोकांची मदत करणे हे सर्व यामुळे आहे की अल्लाहची गुणवैशिष्ट्ये अशी अशी आहेत.

**१७)** म्हणजे हे सर्वकाही पाहूनसुद्धा प्रेषितांनी जी वास्तवता प्रस्तुत केली आहे तिचा इन्कार केला जातो.

**१८)** म्हणजे ज्याप्रकारे पूर्वीच्या प्रेषितांनी आपापल्या काळातील लोकसमूहांसाठी एक उपासना व्यवस्था आखली होती, त्याचप्रकारे या काळातील लोकसमूहासाठी तुम्ही एक उपासनापद्धती आखली आहे. आता तुमच्याशी वाद घालण्याचा अधिकार कोणासही प्राप्त नाही कारण या काळातील सत्याधिष्ठित उपासनापद्धती हीच आहे.



माहितीत आहे? सर्वकाही एका पुस्तकात नोंदलेले आहे. अल्लाहसाठी हे काहीही कठीण नाही. (६७-७०)

हे लोक अल्लाहला सोडून त्यांची उपासना करीत आहेत ज्यांच्यासंबंधी त्याने एखादे प्रमाणही अवतरीले नाही आणि हे स्वत:देखील त्यासंबंधी काही ज्ञानही बाळगत नाहीत. या अत्याचाऱ्यांसाठी कोणीही सहायक नाही. आणि जेव्हा यांना आमची सुस्पष्ट वचने ऐकविली जातात तेव्हा तुम्ही पाहता की, सत्याचा इन्कार करणाऱ्याचे चेहरे विकृत होऊ लागतात आणि असे वाटते की आता ते त्या लोकांवर तुटून पडतील जे आमची वचने यांना ऐकवितात. यांना सांगा, ''मी दाखवू का तुम्हाला की याच्यापेक्षा अधिक वाईट गोष्ट कोणती आहे? आग, अल्लाहने तिचाच वायदा त्या लोकांसाठी करून ठेवला आहे जे सत्य मान्य करण्यास नकार देतील, आणि ते फारच वाईट ठिकाण आहे.''

(७१-७२)

लोकहो, एक उदाहरण दिले जात आहे. लक्षपूर्वक ऐका, ज्या उपास्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता ते सर्वजण मिळून एक माशीदेखील निर्माण करू इच्छित असतील तर करू शकणार नाहीत किंबहुना जर माशीने त्यांच्याकडून एखादी वस्तू हिसकावून घेतली तर ते ती सोडवूदेखील शकत नाहीत. मदत इच्छिणारेही दुबळे आणि ज्यांच्याकडून मदत इच्छिली जाते तेही दुबळे या लोकांनी अल्लाहची कदरच ओळखली नाही जशी त्यांनी ओळखायला हवी होती. वस्तुस्थिती अशी आहे की शक्तिमान व प्रतिष्ठावान तर अल्लाहच आहे. (७३-७४)

वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह (आपल्या आज्ञा पाठविण्यासाठी) दूतांपैकीसुद्धा संदेशवाहक निवडतो आणि मानवांपैकीसुद्धा. तो ऐकणारा व पाहणारा आहे, जे काही लोकांच्या समोर आहे तेही तो जाणतो आणि जे काही त्यांच्या पलीकडे आहे त्याचीही त्याला माहिती आहे. आणि सर्व गोष्टी त्याच्याकडेच रूजू होतात.

(७५-७६)

हे श्रद्धावंतांनो, झुका व नतमस्तक व्हा, आपल्या पालनकर्त्याची भक्ती करा आणि सत्कृत्ये करा. यामुळेच अपेक्षा केली जाऊ शकते की तुम्हाला यश लाभेल. अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा करा जशी ती करायला हवी. त्याने तुम्हाला आपल्या कार्यासाठी निवडले आहे आणि धर्मामध्ये तुमच्यावर कोणतीही अडचण ठेवली नाही. दृढ व्हा आपल्या पिता इब्राहीम (अ.) च्या परंपरे (मिल्लत) वर. अल्लाहने पूर्वीसुद्धा तुमचे नाव मुस्लिम ठेवले होते आणि या (कुरआन) मध्येसुद्धा (तुमचे असेच नाव आहे) जेणेकरून पैगंबराने तुमच्यावर साक्षी राहावे आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार. म्हणून नमाज कायम करा, जकात द्या आणि अल्लाहशी दृढनिष्ठ व्हा. तो आहे तुमचा वाली, फारच चांगला आहे तो वाली आणि फारच चांगला आहे तो सहायक. (७७-७८)

# २३ सूरह अल्मुअ्मिनून

*(मक्काकालीन, वचने ११८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

निश्चितच यश प्राप्त केले आहे श्रद्धावंतांनी, जे आपल्या नमाजमध्ये नम्रता अंगिकारतात, व्यर्थ गोष्टींपासून दूर राहतात, जकातच्या पद्धतीची अंमलबजावणी करतात, आपल्या गुप्तांगांचे रक्षण करतात.[१] आपल्या पत्नी व त्या स्त्रियांखेरीज ज्या त्यांच्या अधिकृत मालकीत[२] आहेत ज्यांच्यापासून (सुरक्षित न ठेवण्यात) ते निंदनीय नाहीत, परंतु जे त्याखेरीज अन्य काही इच्छित असतील तर तेच आगळीक करणारे आहेत. आपल्या अमानती आणि आपल्या वचनांचा व करारांचा मान राखतात. आणि आपल्या नमाजचे रक्षण करतात. हेच लोक ते वारस आहेत जे वारशात नंदनवन प्राप्त करतील आणि त्यात सदैव राहतील. (१-११)

आम्ही मानवाला मातीच्या सत्वापासून बनविले, मग त्याला एका सुरक्षित जागी ठिबकलेल्या थेंबात परिवर्तित केले. मग त्या थेंबाला गोळ्याचा आकार दिला, नंतर गोळ्याला मांस बनविले मग मांसाची हाडे बनविली, नंतर हाडावर मांस चढविले मग त्याला एक दुसरीच निर्मिती बनवून उभे केले.[३] तर मोठा यशदायी आहे अल्लाह सर्व निर्मात्यांपेक्षा चांगला निर्माता. मग त्यानंतर तुम्हाला अवश्य मरावयाचे आहे. नंतर पुनरुत्थानाच्या दिवशी निश्चितपणे तुम्ही उठविले जाल. (१२-१६)

आणि तुमच्यावर आम्ही सात रस्ते बनविले.[४] निर्मितीकार्यापासून आम्ही अजाण

१) याचे दोन अर्थ आहेत. एक असा की आपल्या शरीराच्या लज्जास्पद विभागांना गुप्त ठेवतात. म्हणजे नग्नता वर्ज्य मानतात व आपली गुप्तांगे इतरांसमोर उघडत नाहीत. दुसरा असा की ते आपले शील जपतात. म्हणजे लैंगिक बाबतीत स्वैर वर्तनी असत नाहीत आणि विषयवासनेच्या उपभोगात मोकाट होत नाहीत.

२) म्हणजे दासी, ज्या युद्धात पकडल्या गेल्या असाव्यात आणि युद्धकैद्यांची अदलाबदल झाली नसल्या कारणाने इस्लामी शासनाकडून एखाद्याच्या मालकीत दिल्या गेल्या असाव्यात.

३) म्हणजे हेच सर्वकाही पशूप्राण्यांच्या निर्मितीत जरी घडत असले तरी याच सर्जनकृतीने पशूपेक्षा अगदी वेगळी अशी एका औरच प्रकारची निर्मिती रूपात माणसाला अल्लाहने उभे केले आहे.

४) बहुधा याच्याने अभिप्रेत ग्रहांच्या भ्रमणांचे मार्ग आहेत. त्या काळातील मानवाला सातच ग्रह माहीत होते. म्हणून सातच मार्गांचा उल्लेख केलेला आहे. त्याच्याव्यतिरिक्त अन्य मार्ग नाहीत असा अर्थ नाही.



नव्हतो,[५] आणि आकाशातून आम्ही ठीक हिशेबानुसार एका विशिष्ट प्रमाणात पाणी उतरविले आणि त्याला पृथ्वीत स्थिरावले, आम्ही त्याला हवे तसे नाहीसे करू शकतो. मग त्या पाण्याद्वारे आम्ही तुमच्यासाठी खजूर व द्राक्षाच्या बागा उत्पन्न केल्या, तुमच्यासाठी या बागांमध्ये पुष्कळशी स्वादिष्ट फळे आहेत आणि यांच्यापासून तुम्ही उपजीविका मिळविता. आणि तो वृक्षदेखील आम्ही निर्माण केला जो तुरेसीना (पर्वत) मधून निघतो.[६] तेलसुद्धा घेऊन उगवतो आणि खाणाऱ्यासाठी कालवणसुद्धा. (१७-२०)

आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुमच्यासाठी जनावरांतदेखील एक बोध आहे. त्यांच्या पोटात जे काही आहे त्याच्यातूनच एक पदार्थ (म्हणजे दूध) आम्ही तुम्हाला पाजतो. आणि तुमच्यासाठी त्यात बरेचसे अन्य फायदेसुद्धा आहेत. त्यांना तुम्ही खाता, आणि त्यांच्यावर व होड्यांवर स्वारदेखील केले जाता. (२१-२२)

आम्ही नूह (अ.) ला त्याच्या लोकसमूहाकडे पाठविले. त्याने म्हटले, ''हे माझ्या बांधवानो! अल्लाहची भक्ती करा त्याच्याशिवाय तुमच्यासाठी कोणीही ईश्वर नाही, तुम्ही भीत नाही का?'' त्याच्या लोकसमूहाच्या ज्या सरदारांनी मानण्यास नकार दिला ते म्हणू लागले की, ''हा व्यक्ती काहीच नाही परंतु एक मनुष्य तुमच्यासारखा. याचा हेतू असा आहे की तुमच्यावर वर्चस्व प्राप्त करावे. अल्लाहला जर पाठवावयाचे असते तर दूत पाठविले असते. ही गोष्ट तर आम्ही कधी आपल्या वाडवडिलांच्या वेळी ऐकलीच नाही

५) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो 'आणि निर्मितीकडून आम्ही गाफील नव्हतो. अथवा, नाही' पहिल्या अनुवादानुसार आयतचा अर्थ असा की हे सर्वकाही जे आम्ही बनविले आहे, हे सहजच एखाद्या अडाण्याच्या हस्ते अकल्पित घडले आहे असे नाही तर एका विचारपूर्वक योजनेनुसार पूर्ण ज्ञानानिशी बनविलेले आहे. महत्वपूर्ण नियम यात कार्यरत आहेत. तुच्छापासून ते अति उच्चापर्यंत सर्व सृष्टीव्यवस्थेत परिपूर्ण एकवाक्यता आढळते. या विशाल कार्यशाळेत सर्वत्र एका प्रकारची उद्दिष्टता दिसून येते व सर्जनकर्त्याची ती बुद्धिमत्ता सिद्ध करीत आहे. दुसऱ्या अनुवादानुसार अर्थ असा होतो की या सृष्टीत जितक्याही निर्मिती आम्ही सर्जन केल्या आहेत, त्यांच्या कोणत्याही गरजेसंबंधी आम्ही कधीच गाफिल आणि कोणत्याही अवस्थेपासून कधीही अनभिज्ञ राहिलो नाही. कोणत्याही वस्तूला आम्ही आमच्या योजनेविरूद्ध घडू दिले नाही व जाऊ दिले नाही. कोणत्याही वस्तूला, आवश्यक असलेल्या तिच्या नैसर्गिक गोष्टी उपलब्ध करण्यात आम्ही कुचराई केलेली नाही. एक एक कण नि कण आणि पानांच्या स्थितीपासून आम्ही परिचित राहिलो आहे.

६) अभिप्रेत 'जैतून'-'आलिव्ह' आहे. हे रोम समुद्राच्या सभोवताली प्रदेशातील उत्पन्नापैकी सर्वात जास्त महत्वाची वस्तू आहे. तुरेसीनाकडे याला संबंधित करण्याचे कारण बहुधा असे आहे की तोच प्रदेश ज्यातील अतिप्रसिद्ध आणि बिनीचे ठिकाण तूरेसीना आहे, तेच या वृक्षाचे मूळ जन्मस्थान आहे.

(की मानव पैगंबर म्हणून यावा). काहीच नाही. केवळ या माणसाला जरा वेड लागले आहे. काही काळ आणखी वाट पहा (कदाचित बरा होईल).'' नूह (अ.) ने सांगितले, ''हे पालनकर्त्या, या लोकांनी जे मला खोटे ठरविले आहे यावर आता तूच मला सहाय्य दे.'' आम्ही त्याच्याकडे दिव्य बोध केला की आमच्या देखरेखीत व आमच्या दिव्य बोधानुसार नौका तयार कर. मग जेव्हा आमची आज्ञा येईल आणि तो जलप्रलय उसळू लागेल तेव्हा प्रत्येक प्रकारच्या प्राण्यांपैकी एक एक जोडी घेऊन तिच्यात स्वार हो. आणि आपल्या कुटुंबियांनादेखील सोबत घे, त्यांच्याव्यतिरिक्त ज्यांच्याविरूद्ध अगोदर निर्णय झाला आहे आणि अत्याचाऱ्यांच्या संबंधात मला काही सांगू नकोस. हे आता बुडणारे आहेत. मग जेव्हा तू आपल्या सोबत्यांसमवेत नौकेवर स्वार होशील तेव्हा म्हण, ''धन्य आहे तो अल्लाह ज्याने आम्हाला अत्याचारी लोकांपासून मुक्ती दिली आणि म्हण, हे पालनकर्त्या, मला समृद्धशाली जागी उतरव आणि तूच सर्वोत्तम जागा देणारा आहेस!'' (२३-२९)

या कथेत मोठे संकेत आहेत आणि परीक्षा तर आम्ही घेत असतोच. (३०)

त्यांच्यानंतर आम्ही एक दुसऱ्या युगातील लोकसमूह उभा केला. मग त्यांच्यात खुद्द त्यांच्याच लोकांतील एक प्रेषित पाठविला. (ज्याने त्यांना निमंत्रण दिले) की अल्लाहची भक्ती करा, तुमच्यासाठी त्याच्याशिवाय अन्य कोणी उपास्य नाही, तुम्ही भीत नाही काय? त्याच्या लोकसमूहाच्या ज्या सरदारांनी मानण्यास नकार दिला आणि परलोकाच्या अस्तित्वास खोटे ठरविले, ज्यांना आम्ही जगातील जीवनात सुखी ठेवले होते, ते म्हणू लागले, ''ही व्यक्ती कोणी नाही परंतु एक मनुष्य तुमच्याच सारखा. जे काही तुम्ही खाता तेच हा खातो आणि जे काही तुम्ही पिता तेच हा पितो. आता जर तुम्ही आपल्या सारख्याच एका माणसाची आज्ञाधारकता स्वीकारली तर तुम्ही नुकसानीतच राहाला. हा तुम्हाला कळवितो की जेव्हा तुम्ही मेल्यानंतर माती व्हाल आणि जेव्हा हाडांचा सांगाडा बनून राहाल तेव्हा तुम्ही (कबरीतून) काढले जाल. असंभव, पूर्णत: असंभव आहे हे वचन, जे तुमच्याशी केले जात आहे. जीवन काहीच नाही परंतु केवळ या जगातीलच जीवन, येथेच आम्हाला मरावयाचे व जगावयाचे आहे आणि आम्ही कदापि उठविले जाणार नाही. हा माणूस केवळ अल्लाहच्या नावाने असत्य रचीत आहे, आणि आम्ही कदापि याचे मानणारे नाही.'' प्रेषिताने सांगितले, ''हे पालनकर्त्या, या लोकांनी जे मला खोटे ठरविले आहे यावर आता तूच मला सहाय्य कर.'' उत्तरात फर्माविले गेले, ''जवळ आहे ती घटका जेव्हा ते आपल्या कृत्यावर पश्चात्ताप करतील.'' सरतेशेवटी तंतोतंत सत्याबरहुकुम एका महान कल्लोळाने त्यांना गाठले आणि आम्ही त्यांना कचरा बनवून फेकून दिले, दूर हो अत्याचारी लोकसमूहा! (३१-४१)

मग आम्ही त्याच्यानंतर दुसरे लोकसमूह उठविले. कोणताही जनसमूह आपल्या वेळेपूर्वीही नष्ट झाला नाही की त्यानंतर तग धरू शकला नाही. मग आम्ही लागोपाठ



आपले पैगंबर पाठवीत राहिलो. ज्या कुणा समूहापाशी त्याचा पैगंबर आला त्याने त्यास खोटे ठरविले, आणि आम्ही एकापाठोपाठ एका लोकसमुदायास नष्ट करीत गेलो, येथपावेतो की आम्ही त्यांना केवळ एक कथा बनवून सोडले. धिक्कार असो त्या लोकांचा जे श्रद्धा ठेवत नाहीत! (४२-४४)

मग आम्ही मूसा (अ.) व त्याचा भाऊ हारून (अ.) यांना आपली संकेतवचने आणि उघड प्रमाणासहित फिरऔन आणि त्याच्या सहकाऱ्यांकडे पाठविले, परंतु त्यांनी गर्व केला आणि बडेजाव केला म्हणू लागले, ''काय आम्ही आमच्याच सारख्या दोन माणसांवर श्रद्धा ठेवावी? आणि माणसेही ती, ज्यांचा लोकसमूह आमचा गुलाम आहे?'' म्हणून त्यांनी दोघांना खोटे ठरविले आणि नष्ट होणाऱ्यांना जाऊन मिळाले आणि मूसा (अ.) ला आम्ही ग्रंथ प्रदान केला की जेणेकरून लोकांनी त्यापासून मार्गदर्शन प्राप्त करावे. (४५-४९)

आणि मरयमपुत्राला व त्याच्या आईस आम्ही एक संकेत बनविले आणि त्यांना एका पठारावर ठेवले जी समाधानाची जागा होती आणि झरे त्यात वाहात होते. (५०)

हे पैगंबरानो! शुद्ध पदार्थ खा आणि चांगली कर्मे करा, तुम्ही जे काही करता मी ते चांगलेच जाणतो आणि तुमचा हा लोकसमूदाय (उम्मत) एकच लोकसमूदाय आहे आणि मी तुमचा पालनकर्ता आहे, म्हणून तुम्ही माझीच भीती बाळगा. (५१-५२)

परंतु नंतर लोकांनी आपल्या दीन-धर्माचे आपापसांत तुकडे तुकडे करून टाकले. प्रत्येक गटाजवळ जे काही आहे त्याच्यातच तो मग्न आहे, तर सोडून द्या यांना, बुडून राहू द्या आपल्या असावधानतेत एका विशिष्ट वेळेपर्यंत. (५३-५४)

काय यांना वाटते की आम्ही यांना संपत्ती व संततीने मदत करीत आहोत तर जणूकाय यांना कल्याणकारी गोष्टी देण्यात उत्साही आहोत? नव्हे, वस्तुस्थितीची यांना जाण नाही. वास्तविकत: जे लोक आपल्या पालनकर्त्याच्या धास्तीने भयभीत होणारे असतात, जे आपल्या पालनकर्त्याच्या संकेतांवर श्रद्धा ठेवतात, जे आपल्या पालनकर्त्याबरोबर कोणाला भागीदार बनवीत नाही, आणि ज्यांची स्थिती अशी आहे की देतात जे काही देतात आणि हृदयाचा त्यांचा या विचाराने थरकांप होत असतो की आम्हाला आमच्या पालनकर्त्याकडे परतावयाचे आहे, तेच भल्या गोष्टीकडे धाव घेणारे आणि अहमहमिका करून त्यांना प्राप्त करणारे आहेत. आम्ही कोणत्याही इसमाला त्याच्या आवाक्यापेक्षा जास्त आजमावत नसतो आणि आमच्याजवळ एक ग्रंथ आहे जो (प्रत्येकाची स्थिती) यथायोग्य दाखविणारा आहे,[७] आणि लोकांवर अत्याचार कोणत्याही परिस्थितीत केला जाणार नाही. परंतु हे लोक या गोष्टीपासून अजाण आहेत आणि त्यांची

**७)** म्हणजे प्रत्येक व्यक्तीची कृतीनोंद, ज्यात त्याचे सर्व केलेसवरलेलेंची नोंद आहे.

कृत्येसुद्धा त्या पद्धती (जिचा वर उल्लेख केला गेला आहे) पासून वेगळी आहेत. ते आपली ही कृत्ये करीत राहतील येथपावेतो की जेव्हा आम्ही त्यांच्या विलासी लोकांना प्रकोपात पकडू तेव्हा ते मदतीसाठी ओरडू लागतील, आता बंद करा मदतीसाठी गयावया, आमच्याकडून आता कोणतेही सहाय्य तुम्हाला मिळणार नाही. माझे संकेत ऐकविले जात असत तेव्हा तुम्ही (पैगंबराचा आवाज ऐकताच) परत पावली पळत सुटत होता. आपल्या दर्पात त्याची पर्वा करीत नव्हता, चव्हाट्यावर ह्याविषयी बाता मारीत होता आणि बकवास करीत होता. (५५-६७)

मग या लोकांनी कधी या वाणीवर विचार केला नाही? अथवा त्याने एखादी अशी गोष्ट आणली आहे जी कधी त्यांच्या पूर्वजांपर्यंत आली नव्हती? अथवा हे आपल्या पैगंबराशी कधी परिचित नव्हते की (अनोळखी मनुष्य असल्यामुळे) त्याला बिचकतात? अथवा यांचे म्हणणे असे आहे की तो वेडा आहे? नव्हे किंबहुना त्याने तर सत्य आणले आहे आणि सत्यच त्याच्यातील बहुतेकांना अप्रिय आहे - आणि सत्य जर कोठे त्यांच्या इच्छेमागे चालले असते तर आकाश व पृथ्वी आणि त्यांच्या सर्व वस्तींची व्यवस्था कोलमडली असती - नव्हे, तर आम्ही त्यांचा स्वत:चाच उल्लेख त्यांच्यापाशी आणला आहे आणि ते आपल्या उल्लेखापासून तोंड फिरवीत आहेत. (६८-७१)

तू त्यांच्याकडून काही मागत आहेस काय? तुझ्यासाठी तर तुझ्या पालनकर्त्याने दिलेलेच उत्तम आहे आणि तो उत्तम उपजीविका देणारा आहे. तू तर त्यांना सरळ मार्गाकडे बोलावीत आहेस, परंतु जे लोक मरणोत्तर जीवनाला मानत नाहीत ते सरळ मार्गापासून दूर राहून चालू इच्छितात. (७२-७४)

जर आम्ही यांच्यावर दया केली आणि तो त्रास ज्यात हे हल्ली गुरफटलेले आहेत,[८] दूर केला, तर हे आपल्या दुराचारात पूर्णपणे बहकतील यांची स्थिती तर अशी आहे की आम्ही यांना यातनेत गुरफटविले तरीसुद्धा हे आपल्या पालनकर्त्याच्या पुढे झुकले नाहीत आणि नम्रतादेखील स्वीकारीत नाहीत. तथापि जेव्हा अवस्था या शिगेला येईल की आम्ही यांच्यावर भयंकर प्रकोपाचे द्वार उघडू तर अकस्मात तुम्ही पाहाल की त्या परिस्थितीत हे प्रत्येक भल्या गोष्टीपासून निराश असतील. (७५-७८)

तो अल्लाहच तर आहे ज्याने तुम्हाला ऐकण्याची व पाहण्याची शक्ती दिली आणि विचार करण्यासाठी मन दिले. परंतु तुम्ही लोक कमीच कृतज्ञ होता. तोच आहे ज्याने तुम्हाला पृथ्वीतलावर पसरविले आणि त्याच्याकडेच तुम्ही एकत्र केले जाल. तोच जीवन प्रदान करतो आणि तोच मृत्यू देतो, रात्र व दिवसाचे भ्रमण त्याच्याच सामर्थ्यकक्षेत आहे.

---

८) अभिप्रेत, पैगंबर मुहम्मद (स.) यांची प्रेषित म्हणून नियुक्तीनंतर काही वर्षांपर्यंत अस्तित्वात असलेला दुष्काळ होय.



तुमच्या लक्षात ही गोष्ट येत नाही का? परंतु हे लोक तेच काही सांगतात जे यांच्या पूर्वजांनी सांगून ठेवले आहे. हे म्हणतात, ''आम्ही जेव्हा मरून माती बनू आणि हाडांचे सांपळे बनून राहू तेव्हा आम्हाला परत जिवंत करून उठविले जाईल काय? आम्ही सुद्धा असली वचने खूप ऐकली आहेत आणि आमच्यापूर्वी आमचे वाडवडीलसुद्धा ऐकत राहिले आहेत. या केवळ पुराणकथा आहेत.'' (७९-८३)

यांना सांगा, दाखवा जर तुम्हाला माहीत असेल की ही पृथ्वी व हिची सर्व वस्ती कुणाची आहे? हे जरूर म्हणतील, अल्लाहची. सांगा, मग तुम्ही शुद्धीवर का येत नाही? यांना विचारा, सप्त आकाश आणि महान सिंहासनाचा स्वामी कोण आहे? हे जरूर म्हणतील, अल्लाह. सांगा, मग अल्लाहशी परायण का होत नाही? यांना सांगा, दाखवा जर तुम्ही जाणत असाल की प्रत्येक वस्तूवर सत्ता कुणाची आहे? आणि कोण आहे जो आश्रय देतो आणि त्याच्याविरूद्ध कोणी आश्रय देऊ शकत नाही? हे जरूर म्हणतील की ही गोष्ट तर अल्लाहसाठीच आहे. सांगा, मग कोठून तुमची फसगत होत आहे? जी सत्य बाब आहे ती आम्ही यांच्यासमोर आणली आहे आणि काही शंका नाही की हे लोक खोटारडे आहेत.[९] अल्लाहने कोणासही आपली संतती बनविले नाही,[१०] आणि कोणी दुसरा ईश्वर त्याच्यासमवेत नाही. जर असे असते तर प्रत्येक ईश्वर आपल्या सृष्टीला घेऊन वेगळा झाला असता, आणि मग ते एकदुसऱ्यावर चालून आले असते. पवित्र आहे अल्लाह त्या गोष्टींपासून ज्या हे लोक रचतात. दृश्य व अदृश्याचे ज्ञान राखणारा तो

---

९) म्हणजे आपल्या या कथनात खोटे आहेत की अल्लाहशिवाय अन्य कुणालादेखील ईश्वरी गुण, अधिकार आणि हक्क किंवा त्यांचा काही अंश प्राप्त आहे. तसेच आपल्या या कथनात खोटे की मरणोत्तर जीवन असंभवनीय आहे. त्यांचा खोटेपणा त्यांच्या स्वत:च्याच कबूलीद्वारे सिद्ध होत आहे. एकीकडे, पृथ्वी व आकाशांचा स्वामी आणि सृष्टीतील प्रत्येक वस्तूचा अधिकारी अल्लाह आहे, असे मान्य करणे, तर दुसरीकडे, ईशत्व त्या एकट्याचे आहे असे नाही तर इतरदेखील (जे अपरिहार्यपणे त्याची निर्मिती आणि दासच असतील) त्यांत वाटेकरी आहेत, या दोन्ही गोष्टी परस्परांशी अगदी विसंगत आहेत. हे अगदी स्पष्ट आहे. त्याचप्रमाणे एकीकडे आम्हाला व या अति भव्य सृष्टीला अल्लाहने निर्माण केले आहे असे म्हणणे तर दुसरीकडे, स्वत:च निर्माण केलेल्या सृष्टीला दुसऱ्यांदा निर्माण करू शकत नाही असे म्हणणे अकलेच्याविरूद्ध आहे हेदेखील उघडच आहे. म्हणून यांच्या स्वत:च मान्य केलेल्या सत्यतेनुसार त्यांनी स्वीकारलेला अनेकेश्वरवाद आणि परलोकाचा इन्कार या दोन्ही खोट्या श्रद्धा आहेत, हे सिद्ध होते.

१०) हे कथन केवळ ख्रिस्तित्वाच्या खंडनासाठीच आहे असा एखाद्याचा या ठिकाणी चुकीचा समज होऊ नये. नव्हे, अरब अनेकेश्वरवादीदेखील आपल्या उपास्यांना ईश्वराची संतती म्हणून ठरवीत असत. जगातील बहुतेक अनेकेश्वरवादी या मार्गभ्रष्टतेत त्यांच्याशी समानावस्थेत राहिले आहेत.

सर्वोच्च आहे त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक योजीत आहेत. (८४-९२)

हे पैगंबर (स.)! प्रार्थना करा, "हे पालनकर्त्या, ज्या प्रकोपाची यांना धमकी देण्यात येत आहे तो माझ्या उपस्थितीत जर तू आणला, तर हे माझ्या पालनकर्त्या! या अत्याचारी लोकांत माझा समावेश करू नकोस."[११] आणि वस्तुस्थिती अशी आहे की आम्ही तुमच्या डोळ्यांदेखतच ती गोष्ट आणण्याचे पूर्ण सामर्थ्य राखतो ज्याची धमकी आम्ही यांना देत आहोत. (९३-९५)

हे पैगंबर (स.)! वाईटाचे निवारण सर्वोत्कृष्ट पद्धतीने करा. ज्या काही गोष्टी ते तुम्हावर रचतात त्या आम्हाला पुरेपूर माहीत आहेत. आणि प्रार्थना करा की, "हे पालनकर्त्या! मी शैतानाच्या दुष्प्रेरणेपासून तुझा आश्रय मागतो, इतकेच नव्हे तर हे माझ्या पालनकर्त्या, मी तर यापासूनदेखील तुझा आश्रय मागतो की ते माझ्यापाशी येतील. (९६-९८)

(हे लोक आपल्या कृत्यापासून परावृत्त होणार नाहीत) इथपावेतो की जेव्हा यांच्यापैकी एखाद्याला मरण येईल तेव्हा सांगू लागेल की, "हे माझ्या पालनकर्त्या, मला त्याच जगात परत पाठव, जे मी सोडून आलो आहे, आशा आहे की मी आता सत्कर्म करीन." मुळीच नाही, ही तर केवळ एक गोष्ट आहे जी तो बरळत आहे. आता या सर्व (मरणाऱ्यांच्या) मागे एक आड (बरज़ख) आहे. मरणोत्तर जीवनाच्या दिवसापर्यंत.[१२] मग ज्या क्षणी शिंग फुंकले जाईल त्यांच्यात मग कोणतेही नाते उरणार नाही आणि ते एकमेकाला विचारणारदेखील नाहीत. त्यावेळेस ज्यांचे पारडे जड असेल तेच यश संपादन करतील आणि ज्यांचे पारडे हलके असेल तेच लोक असतील ज्यांनी आपल्या स्वतःला तोट्यात घातले, ते नरकात सदैव राहतील. अग्नी त्यांच्या मुखाचे चामडे भक्ष करून टाकील आणि त्यांचे जबडे बाहेर निघतील. "काय तुम्ही तेच लोक नाहीत की माझे संकेत तुम्हाला ऐकविले जात होते तेव्हा तुम्ही त्यांना खोटे ठरवीत होता?" ते सांगतील, "हे आमच्या पालनकर्त्या, आमच्या दुर्दैवाने आम्हाला व्यापिले होते. आम्ही खरोखरच पथभ्रष्ट

**११)** त्या प्रकोपात पैगंबर (स.) हे अडकण्याचा खरोखरी काही धोका होता अथवा आपण अशी प्रार्थना केली नसती तर त्यात तेही गुरफटले असते (अल्लाह त्यापासून वाचवो) असा याचा अर्थ नाही तर सदरहू वर्णनशैली, अशी कल्पना येण्यासाठी उपयोजिली गेली आहे की अल्लाहचा प्रकोप आहेच मुळात भिती बाळगण्यालायक गोष्ट, ती अशी भयंकर चीज आहे की गुन्हेगारांनीच नव्हे तर सदाचरणी लोकांनी आपली पुण्याई असतानादेखील त्यासंबंधी ईश्वराचा आश्रय घेतला पाहिजे.

**१२)** मूळ अरबी शब्द, 'बर्जख' हा 'पर्दा' (पडदा) या फारसी शब्दाचा अपभ्रंश आहे. आयतीचा अर्थ असा की आता यांच्या व जगाच्या दरम्यान एक पडदा आड आहे जो त्यांना परत जाऊ देणार नाही आणि कयामतपर्यंत हे इहलोक व परलोक दरम्यानच्या या सरहद्दीवर थांबून असतील.



लोक होतो. हे पालनकर्त्या! आता आम्हाला यातून बाहेर काढ. मग जर आम्ही अपराध केला तर अत्याचारी ठरू." सर्वश्रेष्ठ अल्लाह उत्तर देईल, "दूर व्हा माझ्या समोरून, पडून राहा त्यामध्येच आणि माझ्याशी बोलू नका. तुम्ही तेच लोक तर आहात की माझे काही दास जेव्हा सांगत होते की हे आमच्या पालनकर्त्या, आम्ही श्रद्धा ठेवली, आम्हाला क्षमा कर आम्हावर दया दाखव, तू सर्व दया दाखवणाऱ्याहून उत्तम दयाळू आहेस, तेव्हा तुम्ही त्यांचा उपहास केला येथपावेतो की त्यांच्या हट्टापायी तुम्ही हेदेखील विसरला की मीदेखील कोणी आहे, आणि तुम्ही त्यांच्यावर हसत राहिला. आज त्यांच्या त्या संयमाचे मी हे फळ दिले आहे की तेच यशस्वी आहेत." मग सर्वश्रेष्ठ अल्लाह त्यांना विचारील, "सांगा, पृथ्वीतलावर तुम्ही किती वर्षे राहिलात? ते सांगतील, "एक दिवस अथवा दिवसाचाही काही अंश आम्ही तेथे राहिलो आहोत, गणना करणाऱ्यांना विचारून घ्या." फर्माविले जाईल, "थोडाच वेळ राहिला आहात ना, त्याचवेळी तुम्ही हे जाणले असते. काय तुम्ही हे समजून बसला होता की आम्ही तुम्हाला व्यर्थच निर्माण केले आहे आणि तुम्हाला आमच्याकडे कधी परतावयाचेच नाही?" (९९-११५)

म्हणून सर्वोच्च आहे अल्लाह, खरा बादशाह, कोणी परमेश्वर त्याच्याशिवाय नाही, स्वामी आहे महान सिंहासनाचा आणि जो कोणी अल्लाहसहित एखाद्या अन्य उपास्याचा धावा करील ज्याच्यासंबंधी त्याच्याजवळ कोणताच पुरावा नाही,[१३] तर त्याचा हिशेब त्याच्या पालनकर्त्याजवळ आहे. असले द्रोही कधीच यश संपादन करू शकत नाहीत. (११६-११७)

हे पैगंबर (स.)! सांगा, माझ्या पालनकर्त्या! क्षमा कर आणि दया दाखव आणि तू सर्व दया दाखविणाऱ्यांपेक्षा उत्तम दयाळू आहेस. (११८)

**१३)** दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो की 'जो कोणी अल्लाहबरोबर इतर कुणा देवाचा धावा करतो, त्याच्याजवळ आपल्या या कृत्यासाठी कोणतेही प्रमाण नाही.

# २४ सूरह अन्नूर

*(मदीनाकालीन, वचने ६४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हा एक अध्याय आहे जो आम्ही अवतरला आहे, आणि याला आम्ही अनिवार्य ठरविला आहे आणि यात आम्ही सुस्पष्ट उपदेशपर वचने[१] अवतरली आहेत, कदाचित तुम्ही बोध घ्यावा. (१)

व्यभिचारी स्त्री व व्यभिचारी पुरुष दोहोंपैकी प्रत्येकास शंभर फटके मारा.[२] आणि त्यांची कीव करू नका, अल्लाहच्या धर्माच्या बाबतीत जर तुम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाह आणि अंतिम दिनावर श्रद्धा बाळगत असाल. आणि त्यांना शिक्षा देते वेळेस श्रद्धावंतांचा एक समूह उपस्थित असावा.[३] (२)

व्यभिचाऱ्याने विवाह करता कामा नये परंतु केवळ व्यभिचारिणीबरोबर अथवा अनेकेश्वरवादी स्त्रीशी, आणि व्यभिचारीणी स्त्रीशी विवाह करता कामा नये परंतु केवळ

१) म्हणजे सदरच्या सूरतेत ज्या गोष्टी सांगितलेल्या आहेत त्या केवळ शिफारशी म्हणून असाव्यात की मनात आले तर मानाव्यात अन्यथा वाटेल ते करीत राहावे, असे नाही तर या निस्चित स्वरूपी व त्यांचे पालन अनिवार्य आहे. जर तुम्ही ईमानधारक असाल तर त्यांचे अनुकरण तुमचे कर्तव्य आहे.

२) 'व्यभिचारा'संबंधी प्राथमिक आज्ञा सूरह निसा आयत क्र. १५ मध्ये येऊन गेली आहे. आता ही त्याची निश्चित स्वरूपी शिक्षा ठरविली आहे. ही शिक्षा अशा स्थितीसाठी आहे जेव्हा की व्यभिचारी पुरुष अविवाहित अथवा व्यभिचारी स्त्री अविवाहित असेल. दिव्य कुरआनातदेखील अशा स्वरूपासंबंधी संकेत मौजूद आहे. जसे की सूरह निसा आयत क्र. २५ वरून कळते. तसेच अनेक हदीसी, पैगंबर (स.) आणि सन्मार्गी खलिफांची कृती परंपरा आणि मुस्लिम लोकसमूहाचे मतैक्य (इज्मा) याद्वारे देखील, विवाहित असल्याच्या स्थितीत व्यभिचाराची शिक्षा 'रज्म' - दगडांनी ठेचून मारणे असे सिद्ध आहे.

३) म्हणजे शिक्षा उघडपणे सर्वांसमक्ष दिली जावी जेणेकरून गुन्हेगाराची फटफजिती आणि इतर लोकांसाठी धडा व बोधप्रत ठरावी व या गुन्ह्याचा मुस्लिम समाजात फैलाव होऊ नये.



व्यभिचारी अथवा अनेकेश्वरवादी पुरुषाने आणि हे निषिद्ध केले गेले आहे श्रद्धावंतांसाठी.[४] (३)

आणि जे लोक मर्यादाशील स्त्रियांवर आळ घेत असतील[५] मग चार साक्षीदार घेऊन येत नसतील, त्यांना ऐंशी फटके मारा आणि त्यांच्या साक्षी कधी स्वीकारू नका, आणि ते स्वत:च अवज्ञाकारी आहेत. त्या लोकांव्यतिरिक्त जे या कृतीनंतर पश्चात्ताप करतील व सुधारणा घडवून आणतील कारण की अल्लाह अवश्य (त्यांच्या बाबतीत) क्षमाशील व परम दयाळू आहे.[६] (४-५)

आणि जे लोक आपल्या पत्नींवर आरोप ठेवतील[७] आणि त्यांच्यापाशी त्यांच्या स्वत:खेरीज इतर कोणीही साक्षीदार नसेल तर त्यांच्यापैकी एका व्यक्तीची साक्ष (अशी असावी की त्या व्यक्तीने) चार वेळा अल्लाहची शपथ घेऊन साक्ष द्यावी की तो (आपल्या आरोपात खरा आहे.) आणि पाचव्या वेळेस सांगावे की त्याचा अल्लाह धिक्कार करो, जर तो (आपल्या आरोपात) खोटा असेल. आणि स्त्रीची शिक्षा अशाप्रकारे टळू शकेल की

४) म्हणजे आत्मशुद्ध न झालेल्या व्यभिचारीसाठी योग्य आहे तर व्यभिचारिणीच योग्य आहे अथवा मग अनेकेश्वरवादी स्त्री, कोणत्याही ईमानधारक शीलवान स्त्रीसाठी तो योग्य नाही. ईमानवाल्यासाठी हे 'हराम' आहे की त्यांनी माहिती असतानादेखील आपल्या मुली आपल्या अवज्ञाकारींना द्याव्यात. त्याचप्रमाणे व्यभिचारिणी स्त्रियां (आत्मशुद्ध न झालेल्या) साठी जर योग्य आहेत तर त्यांच्याचसारखे व्यभिचारी किंवा अनेकेश्वरवादी कोणत्याही ईमानधारक सदाचारीसाठी त्या योग्य नाहीत. ईमानवाल्यासाठी हे 'हराम' आहे की ज्या स्त्रियांच्या बदफैलीची स्थिती त्यांना माहीत असावी त्यांच्याशी त्यांनी बुद्धिपुरस्सर विवाह करावा. सदरहू आज्ञा, अशाच स्त्री व पुरुषासंबंधी लागू पडते जे आपल्या कुवर्तनावर कायम असावेत. ज्या लोकांनी प्रायश्चित्त करून आपली सुधारणा केली असेल त्यांच्यावर हा हुकूम लागू होत नाही कारण प्रायश्चित्त आणि आत्मशुद्धी केल्यानंतर 'व्यभिचारी' असण्याचा दुर्गुण त्यांना चिकटून राहात नाही.

५) म्हणजे व्यभिचाराचा आळ, हाच हुकूम शीलवान पुरुषांवर व्यभिचाराचा आळ घेण्यासंबंधीदेखील आहे. इस्लामी शास्त्राच्या परिभाषेत असला आळ घेण्यास 'क़जफ' म्हटले जाते.

६) या गोष्टीवर इस्लामी शास्त्री (फुकहा) चे मतैक्य आहे की तौबा-पश्चात्ताप केल्याने 'क़जफ'संबंधी शिक्षा रद्द होत नाही तसेच यावरही मतैक्य आहे की 'तौबा' करणारा अवज्ञाकारी राहणार नाही, सर्वोच्च अल्लाह त्याला माफ करील. तथापि यात मतभेद आहे की तौबा केल्यानंतर त्याची साक्ष मान्य केली जाणार की नाही. त्याची साक्ष स्वीकारली जाणार नाही हनफी शाळेतील शास्त्री असे मानतात तर इमाम शाफई (रह.), इमाम मालिक (रह.) आणि इमाम अहमद (रह.) असल्या व्यक्तीची साक्ष स्वीकारार्ह मानतात.

७) म्हणजे व्यभिचाराचा आरोप ठेवत असावेत.

चार वेळा तिने अल्लाहची शपथ घेऊन साक्ष द्यावी की हा पुरुष (आपल्या आरोपात) खोटा आहे. आणि पाचव्या वेळेस सांगावे की तिच्यावर अल्लाहचा प्रकोप कोसळो जर तो (आपल्या आरोपात) खरा आहे.[८] तुम्हा लोकांवर अल्लाहची कृपा व त्याची मेहेरबानी झाली नसती आणि ही गोष्ट नसती की अल्लाह मोठा करुणाकर व बुद्धिमान आहे (तर पत्नीवर दोषारोपाच्या मामल्याने तुम्हाला मोठ्या पेचात आणले असते.) (६-१०)

ज्या लोकांनी हे कुभांड रचून आणले आहे ते तुमच्यातीलच एक टोळके आहे.[९] या घटनेस आपल्यासाठी अरिष्ट समजू नका किंबहुना हेदेखील तुमच्याबाबतीत कल्याणकारीच आहे.[१०] ज्याने याच्यात जेवढा वाटा उचलला त्याने त्यात तितकेच पाप कमविले. आणि ज्या व्यक्तीने याच्या जबाबदारीचा मोठा वाटा आपल्या शिरावर[११] घेतला त्याच्याकरिता तर भयंकर प्रकोप आहे. ज्या वेळेस तुम्हा लोकांनी ते ऐकले होते त्या वेळेसच श्रद्धावंत पुरुषांनी व श्रद्धावंत स्त्रियांनी आपल्या स्वत:शीच सद्‌विचार का केला नाही?[१२] आणि का सांगून टाकले नाही की हा तर स्पष्ट आळ आहे? त्या लोकांनी

---

८) 'शरीअत'च्या परिभाषेत याला 'लआन' असे म्हणतात. 'लआन'ची ही कृती घरबसल्या उरकली जाऊ शकत नाही तर इस्लामी न्यायालयात पार पाडली पाहिजे. 'लआन'ची मागणी पुरुषाकडूनही केली जाऊ शकते व स्त्रीकडूनदेखील. आरोप ठेवल्यानंतर जर 'लआन'ला पुरुष बगल देत असेल, किंवा स्त्री शपथा वाहण्याला नकार देत असेल तर जोपर्यंत आरोपी 'लआन' करीत नाही तोपर्यंत त्याला 'कैदे'ची शिक्षा आहे असे हनफी शास्त्रींचे मत आहे. उभय पक्षाकडून 'लआन' घडल्यानंतर स्त्री व पुरुष एकमेकासाठी हराम ठरतात.

९) येथपासून ते आयत क्र. २६ पर्यंत, इतिहासात 'इफ्‌क' या नावाने जी घटना प्रसिद्ध आहे त्या प्रकरणासंबंधी बोलले गेले आहे. त्या घटनेत दांभिकांनी हजरत आयशा सिद्दिका (रजि.) यांच्यावर व्यभिचाराचा, अल्लाह त्यापासून वाचवो, आळ घेतला होता व त्याचा इतका प्रचार केला होता की काही मुसलमानदेखील त्यात गुरफटले होते.

१०) अर्थ असा की घाबरू नका, दांभिकांनी तर आपल्या समजूतीप्रमाणे मोठा वर्मी आघात तुमच्यावर केला आहे परंतु इन्शाअल्लाह हा त्यांच्यावरच उलटेल व तुमच्यासाठी लाभदायक ठरेल.

११) म्हणजे अब्दुल्लाह बिन उब्बइ, तोच सदरचा आळ रचयिता आणि उपद्रवाचा खरा जनक होता.

१२) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो की, आपल्या माणसांसंबंधी, अथवा आपले धर्मबांधव व आपल्या समाजातील लोकांसंबंधी सद्‌बुद्धी का बाळगली नाही. आयतीचे शब्द दोन्ही अर्थांना व्याप्त आहेत. परंतु आम्ही जे भाषांतर स्वीकारले आहे, ते अधिक अर्थपूर्ण आहे. याचा अर्थ असा की तुमच्यापैकी प्रत्येकाने असा विचार का केला नाही की हजरत आयशा (रजि.) यांना ज्या परिस्थितीला सामोरे जावे लागले होते जर तशाच परिस्थितीला त्यालाही तोंड द्यावे लागले असते तर काय त्याच्याने व्यभिचार घडला असता?



(आपल्या दोषारोपणाच्या पुराव्यात) चार साक्षीदार का आणले नाहीत? आता ज्याअर्थी त्यांनी साक्षीदार आणले नाहीत अल्लाहजवळ तेच खोटे आहेत,[१३] जर तुम्हावर इहलोकात व परलोकात अल्लाहची कृपा, दया व मेहेरबानी नसती तर ज्या गोष्टीत तुम्ही गुंतला होता त्यापायी तुमच्यावर मोठा प्रकोप ओढवला असता. (जरा विचार तर करा त्या वेळेस तुम्ही किती भयंकर चूक करीत होता.) जेव्हा तुमच्यापैकी एकाच्या तोंडून दुसऱ्याच्या तोंडी ती खोटी गोष्ट पसरली आणि तुम्ही आपल्या तोंडाने ते सर्वकाही बोलले ज्याच्यासंबंधी तुम्हाला मुळीच माहिती नव्हती. तुम्ही याला एक क्षुल्लक गोष्ट समजत होता, वस्तुत: अल्लाहपाशी ही एक मोठी गोष्ट होती. (११-१५)

ही ऐकताक्षणीच तुम्ही असे का म्हटले नाही, "आम्हाला अशी गोष्ट तोंडाने उच्चारणे शोभत नाही, पवित्र आहे अल्लाह, हे तर एक भयंकर कुभांड आहे." अल्लाह तुम्हाला उपदेश देतो की यापुढे कधीही असे कृत्य मुळीच करता कामा नये जर तुम्ही श्रद्धावंत असाल. अल्लाह तुम्हाला सुस्पष्ट सूचना देत आहे आणि तो सर्वज्ञ आणि बुद्धिमान आहे (१६-१८)

---

१३) या ठिकाणी कोणाचा असा चुकीचा समज होऊ नये की येथे आरोप खोटा असण्याचा आधार आणि प्रमाण केवळ साक्षीदारांच्या अनुपस्थितीला ठरविला जात आहे, आणि मुसलमानांना सांगितले जात आहे की तुम्हीदेखील केवळ याच कारणास्तव याला उघड आळ म्हणून माना की आरोप लावणाऱ्यांनी चार साक्षीदार आणलेले नाही. असा चुकीचा समज प्रत्यक्षात तेथे जी परिस्थिती उद्‌भवली होती त्या परिस्थितीला दृष्टीसमोर न ठेवल्यामुळेच निर्माण होतो. आरोप ठेवणाऱ्यांनी आरोप अशासाठी लावलेला नाही की त्यांनी अथवा त्यांच्यापैकी कोणा एकाने, (अल्लाह त्यापासून सुरक्षित ठेवो), स्वत:च्या डोळ्यांनी ती गोष्ट पाहिली होती जिला ते तोंडावाटे काढत होते, नव्हे, तर केवळ या आधारे इतके भयंकर आरोप रचले होते की योगायोगे हजरत आयशा (रजि.) काफिल्यापासून मागे पडल्या होत्या व नंतर हजरत सफवान (रजि.) यांनी त्यांना आपल्या उंटावर स्वार करून काफिल्यात आणले होते. हजरत आयशा (रजि.) यांचे असे मागे पडणे, (अल्लाह त्यापासून वाचवो), एखाद्या संगनमताची परिणती होती, त्या प्रसंगी कोणतीही सुबुद्ध व्यक्ती अशी कल्पनादेखील करू शकत नव्हती. संगनमत करणारे अशा पद्धतीने तर संगनमत करीत नसतात की सैन्य प्रमुखाच्या पत्नीने गुपचूपपणे काफिल्यामागे एका इसमाबरोबर राहावे आणि मग त्याच इसमाने आपल्या उंटावर बसवून दिवसाढवळ्या ऐन दुपारच्या वेळी उघडपणे तिच्यासमवेत लष्कराच्या पडावात पोहचवावे. सदरहू वस्तुस्थिती त्या उभयतांच्या निष्पाप असण्याचा स्वत:च पुरावा देत होती. अशा परिस्थितीत जर आरोप ठेवला जाऊ शकत होता तर केवळ याच आधारावर ठेवला जाऊ शकत होता की बोल लावणाऱ्यांनी स्वत:च्या डोळ्यांनी एखादा मामला पाहिला असावा, एरव्ही परिस्थितीजन्य पुरावे, ज्यांच्या आधारे जालिमांनी आरोपाचा पाया रचला होता, त्यांच्यात कसल्याही शंकाकुशंकेला वाव नव्हता.

जे लोक इच्छितात की श्रद्धावंतांच्या समुदायात अश्लीलता पसरावी ते लोक इहलोकात व परलोकात दु:खदायी शिक्षेस पात्र आहेत. अल्लाह जाणतो आणि तुम्ही जाणत नाही. जर अल्लाहची कृपा व त्याची दया आणि मेहरबानी तुमच्यावर नसती आणि हे असे नसते की अल्लाह मोठा प्रेमळ आणि दयाळू आहे, (तर या गोष्टीने जी नुकतीच तुमच्यात पसरविली गेली होती अत्यंत वाईट परिणाम दाखविले असते.) (१९-२०)

हे श्रद्धावंतांनो, शैतानच्या पावलांचे अनुसरण करू नका. त्याचे अनुकरण कोणी करील तर तो अश्लीलता आणि दुराचाराचीच आज्ञा देईल. जर अल्लाहची कृपा व त्याची दया आणि मेहरबानी तुमच्यावर नसती तर तुमच्यापैकी कोणीही पवित्र होऊ शकला नसता, परंतु अल्लाहच ज्याला इच्छितो त्याला पवित्र करतो, आणि अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे. (२१)

तुमच्यापैकी जे लोक कृपाविभूषित व ऐपत बाळगणारे आहेत त्यांनी अशी शपथ घेऊ नये की आपल्या नातेवाईक, गोरगरीब व अल्लाहच्या मार्गात हिजरत (देशत्याग) करणाऱ्या लोकांना मदत करणार नाही. त्यांना माफ केले पाहिजे आणि त्याकडे कानाडोळा केला पाहिजे, काय तुम्हाला आवडत नाही की अल्लाहने तुम्हाला माफ करावे? आणि अल्लाहचा गुण असा आहे की तो क्षमाशील व दयाळू आहे.[१४] (२२)

जे लोक शीलवान, अजाण श्रद्धावंत स्त्रियांवर आळ घेतात त्यांचा इहलोक व परलोकात धिक्कार केला गेला आणि त्यांच्यासाठी मोठा प्रकोप आहे. त्यांनी त्या दिवसाला विसरू नये की जेव्हा त्यांच्या स्वत:च्या जिभा, त्यांचे हात, पाय त्यांच्या कृत्यांची साक्ष देतील. त्या दिवशी अल्लाह तो बदला त्यांना पुरेपूर देईल ज्याला ते पात्र आहेत आणि त्यांना माहीत होईल की अल्लाहच सत्य आहे, खऱ्याला खरे करून दाखविणारा. (२३-२५)

अपवित्र स्त्रिया अपवित्र पुरुषांसाठी आहेत आणि अपवित्र पुरुष अपवित्र स्त्रियांसाठी. पवित्र स्त्रिया पवित्र पुरुषांसाठी आहेत आणि पवित्र पुरुष पवित्र स्त्रियांसाठी. ते निष्कलंक आहेत त्या गोष्टीपासून जे आळ घेणारे घेतात. त्यांच्यासाठी क्षमा आहे आणि सन्मानपूर्वक उपजीविका. (२६)

**१४)** सदरहू आयत याबाबतीत उतरली आहे की आरोप ठेवणाऱ्या लोकांत जे काही भोळेभाबडे मुसलमान सामील झाले होते त्यांच्यापैकी एक हजरत अबूबकर (रजि.) याचे जवळचे नातेवाईकदेखील होते. त्यांच्यावर हजरत अबूबकर (रजि.) नेहमी उपकार करीत राहात असत. या यातनादायक घटनेनंतर हजरत अबूबकर (रजि.) यांनी शपथ घेतली होती की यापुढे ते त्यांच्याशी कसलेही उपकारी वर्तन ठेवणार नाही. सर्वोच्च अल्लाहला ही गोष्ट आवडली नाही की अबूबकर सिद्दीक (रजि.) यांच्यासारख्या माणसाने क्षमाशीलता दाखवू नये.



हे लोकहो! [१५] ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, आपल्या घराशिवाय दुसऱ्यांच्या घरात प्रवेश करीत जाऊ नका जोपर्यंत त्या घरातील लोकांची सम्मती मिळत नाही आणि त्या घरातील लोकांना तुम्ही सलाम करीत नाही. ही पद्धत तुमच्यासाठी उत्तम आहे. अपेक्षा आहे की तुम्ही हे लक्षात ठेवाल. मग जर तेथे कोणी आढळला नाही तर प्रवेश करू नका जोपर्यंत तुम्हाला परवानगी दिली जात नाही, आणि जर तुम्हाला सांगितले गेले की,[१६] परत जा तर निघून जा. ही तुमच्यासाठी अधिक पवित्र पद्धत आहे.[१७] आणि जे काही तुम्ही करता ते अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो. तथापि तुमच्यासाठी यात काही हरकत नाही की अशा घरात प्रवेश करावा जे कोणाच्या राहण्याचे स्थान नाही आणि ज्यात तुमच्या लाभाची (अथवा कामाची) एखादी वस्तू असेल.[१८] तुम्ही जे काही जाहीर करता आणि जे काही लपविता सर्वांचे अल्लाहला ज्ञान आहे. (२०-२९)

हे पैगंबर (स.), श्रद्धावंत पुरुषांना सांगा की त्यांनी आपल्या दृष्टींची जपणूक

**१५)** सदरहू सूरहच्या प्रारंभी ज्या आज्ञा दिल्या गेल्या होत्या, त्या अशासाठी होत्या की समाजात दुष्टाईचा फैलाव झाला असल्यास त्याचे निवारण कसे केले जावे. आता अशा आज्ञा दिल्या जात आहेत ज्यांचा हेतू समाजात मुळापासून दुष्टाचीई उत्पत्तीच थांबविली जावी आणि सांस्कृतिक चालीरीतीत सुधारणा घडवून आणून, ज्यामुळे अशा प्रकारचे बिघाड उत्पन्न होत असतात, त्या वाटाच बंद केल्या जाव्यात.

**१६)** म्हणजे कोणाच्या रिकाम्या घरात प्रवेश करणेच योग्य नाही याव्यतिरिक्त की घरमालकाने स्वत:च माणसाला तशी परवानगी दिली असावी. उदा. त्याने आपणास सांगितले असावे की जर मी हजर नसलो तर आपण माझ्या खोलीत बसून राहा अथवा तो अन्य एखाद्या ठिकाणी असावा व आपणाकडून कळविल्यानंतर त्याने सांगावा पाठवावा की आपण थांबून असा, मी लगेच येतो.

**१७)** एखादा मनुष्य कामामध्ये व्यस्त असल्यास अथवा भेटण्याची त्याची इच्छा नसल्यास इन्कार करू शकतो. त्याला तसा अधिकार आहे. यावर वाईट वाटण्याचे काहीच कारण नाही.

**१८)** याने अभिप्रेत आहेत हॉटेल्स, धर्मशाळा, अतिथीगृहे, दुकान आणि मुशाफिरखाने, जेथे लोकांना प्रवेश करण्याची आम परवानगी असते.

करावी.[१९] आणि आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे, ही त्यांच्यासाठी अधिक पवित्र पद्धत आहे. जे काही ते करतात अल्लाह त्याची खबर राखणारा आहे. (३०)

आणि हे पैगंबर (स.), श्रद्धावंत स्त्रियांना सांगा की, त्यांनी आपल्या दृष्टींची जपणूक करावी आणि आपल्या लज्जास्थानांचे रक्षण करावे.[२०] आणि आपला साजशृंगार दर्शवू नये त्याव्यतिरिक्त जे सहजासहजी प्रकट होईल आणि आपल्या छातीवर आपल्या ओढणीचा पदर घालून ठेवावा. त्यांनी आपला साजशृंगार प्रकट करू नये परंतु या लोकांसमोर, पती, पिता, पतीचे वडील,[२१] आपली मुले, पतीची मुले,[२२] भाऊ,[२३] भावांची मुले, बहिणींची मुले[२४] आपल्या मेलमिलाफाच्या स्त्रिया,[२५] आपल्या दासी,

---

**१९)** वास्तविकपणे 'ग़ज़्जबस्र' अशी आज्ञा दिली गेली आहे. सदरहू अरबी शब्दाचे भाषांतर सर्वसाधारणपणे दृष्टी खाली करणे किंवा ठेवणे असा केला जातो. परंतु खरे पाहता या आज्ञेचा अर्थ सदैव खालीच पहात राहणे असा नाही तर पूर्णपणे दृष्टी रोखून न पाहणे आणि पाहण्यासाठी नजरा अगदी मोकाट न सोडणे असा होतो. हा अर्थ 'नजरांची जपणूक'ने पूर्णपणे व्यक्त होतो. म्हणजे ज्या वस्तूला पाहणे योग्य नसेल त्यापासून दृष्टी वळविली जावी हे विचारात न घेता की माणसाने दृष्टी खाली करावी अथवा इतर दुसऱ्या बाजूने तिला वळवून घ्यावे. उपलब्ध संदर्भाद्वारे देखील असे कळते की हे बंधन ज्या गोष्टीसाठी घातले गेले आहे ते म्हणजे पुरुषांचे स्त्रियांना पाहणे, अथवा इतर लोकांच्या गुप्त अंगावर दृष्टी टाकणे किंवा अश्लील दृश्यांवर दृष्टी रोखणे होय.

**२०)** ही गोष्ट लक्षात असू द्यावी की दिव्य शरीअतची स्त्रियांकडून, अपेक्षा केवळ तितकीच आहे जितकी पुरुषांकडून आहे. म्हणजे नजरांची जपणूक आणि गुप्तांगांचे रक्षण, असे नव्हे तर त्यांच्याकडून शरीअत इतर काही अशा अपेक्षादेखील बाळगते ज्या पुरुषांकडून अपेक्षित नाहीत. यावरून स्त्री आणि पुरुष हे समान नाहीत हे अगदी स्पष्ट होत आहे.

**२१)** वडिलांच्या अर्थात आजोबा व पणजोबा तसेच आईचे वडील आणि आजोबा हेदेखील सामील आहेत. म्हणून स्त्री आपले वडील आणि सासऱ्यासमोर ज्याप्रमाणे येऊ शकते त्याचप्रमाणे ती आपल्या आजोबा आणि आपल्या पतीच्या आजोळीच्या माणसासमोरदेखील येऊ शकते.

**२२)** मुलांत, नातू व पणतू सर्वांचा समावेश आहे. याबाबतीत सख्खे आणि सावत्र असला कोणताच फरक नाही. आपल्या सावत्र मुलांच्या संततीसमोरही स्त्री तशाच मोकळ्यापणे शृंगार प्रदर्शित करू शकते ज्याप्रमाणे आपल्या स्वत:च्या संतती व मुलांच्या संततीसमोर करू शकते.

**२३)** 'भावा'त सख्खे व सावत्र आणि आईवडील भाऊ सर्व समाविष्ट आहेत.

**२४)** भावंडांने अभिप्रेत तिन्ही प्रकारचे भाऊ व बहिणी आहेत तसेच त्यांची मुले, नाती व नातू हे सर्व त्यांच्या संततीत मोडतात.

**२५)** यावरून आपोआपच हे स्पष्ट होते की स्वैर आणि कुमार्गी स्त्रियांच्या समोर कुलीन मुस्लिम स्त्रीने आपला शृंगार प्रदर्शित करू नये.



गुलाम, ते हाताखालचे पुरुष जे एखादा अन्य प्रकारचा हेतू बाळगत नसतील[२६] आणि ती मुले जी स्त्रियांच्या गुप्त गोष्टींशी अद्याप परिचित झाली नसतील त्यांनी आपले पाय जमिनीवर आपटत चालू नये की जेणेकरून त्यांनी जो आपला शृंगार लपविलेला आहे त्याचे ज्ञान लोकांना होईल. (३१-)

हे श्रद्धावंतांनो, तुम्ही सर्वजण मिळून अल्लाहजवळ पश्चात्ताप व्यक्त करा, अपेक्षा आहे की सफल व्हाल. (-३१)

तुमच्यापैकी जे लोक अविवाहित असतील आणि तुमच्या दास-दासींपैकी जे सदाचारी असतील त्यांचे विवाह करून द्या. जर ते गरीब असतील तर अल्लाह त्यांना आपल्या कृपेने श्रीमंत बनवील. अल्लाह विशाल आणि सर्वज्ञ आहे. आणि ज्यांना विवाहाची संधी उपलब्ध नसेल त्यांनी संयम अंगिकारावा येथपावेतो की अल्लाह आपल्या कृपेने त्यांना समृद्ध बनवील. (३२-३३-)

आणि तुमच्या दासदासींपैकी जे करार करण्याची विनंती करतील त्यांच्याशी करार करा[२७] जर तुम्हाला माहीत असेल की त्याच्यांत भलेपणा आहे[२८] आणि त्यांना त्या मालमत्तेतून द्या जी अल्लाहने तुम्हाला दिली आहे.[२९] (-३३-)

आणि आपल्या दासींना आपल्या ऐहिक लाभापोटी वेश्या व्यवसायासाठी अगतिक करू नका[३०] जेव्हा त्या स्वत: सच्चरित्र राहू इच्छित असतील[३१] आणि जर कोणी

---

**२६)** म्हणजे हाताखालचे असल्या कारणाने ते त्या घरातील स्त्रियांसंबंधी एखादी अपवित्र अभिलाषा बाळगण्याचे धाडस करू शकतील अशी शंका घेण्यास काहीच वाव राहू नये.

**२७)** 'करार'चा अर्थ असा की कुणी दास किंवा दासी आपल्या मुलींसाठी आपल्या स्वामीला जर मोबदला चुकता करण्याचे दर्शवीत असतील व जर स्वामी ते मान्य करीत असेल तर त्या उभयतां दरम्यान ठरलेल्या अटींची लेखापढी व्हावी.

**२८)** 'भलेपणा'ने अभिप्रेत दोन गोष्टी आहेत. एक अशी की गुलामाची, लेखापढी मोबदला चुकता करण्याची ऐपत असावी. दुसरी अशी की त्याच्यात इतकी सचोटी व दानत मौजूद असावी की त्याच्या वचनावर विश्वास ठेवून करार केला जावू शकावा.

**२९)** आम हुकूम आहे. स्वामीनेदेखील काही ना काही रक्कम माफ करावी. मुसलमानांनीदेखील मदत करावी, बैतुलमाला (सरकारी खजिना) तूनही त्यांना सहाय्य दिले जावे.

**३०)** अज्ञानमूलक काळात अरब लोक आपल्या दासींकडून वेश्या व्यवसाय करवीत असत व त्यांची कमाई खात असत. इस्लामात हा व्यवसाय निषिद्ध ठरविला गेला.

**३१)** अर्थ असा की जर दासी स्वेच्छेने बदफैली करीत असेल तर आपल्या अपराधासाठी ती स्वत:च जबाबदार आहे. कायदा तिच्या अपराधाबाबत तिला धरेल. परंतु तिचा मालक बळजबरीने तिच्याकडून वेश्या व्यवसाय करवून घेत असेल तर जबाबदारी मालकाची आहे व तोच धरला जाईल.

बळजबरी केली तर या जबरदस्तीनंतर अल्लाह त्यांच्यासाठी क्षमा करणारा आणि परम कृपाळू आहे. (-३३)

आम्ही अगदी स्पष्ट मार्गदर्शन करणारी संकेतवचने तुमच्यापाशी पाठविली आहेत. आणि त्या लोकसमुदायांची बोधप्रद उदाहरणेदेखील आम्ही तुमच्यासमोर प्रस्तुत केली आहेत, जे तुमच्यापूर्वी होऊन गेले आहेत व ते उपदेश आम्ही दिलेले आहेत, जे भीती बाळगणाऱ्यांसाठी असतात. (३४)

अल्लाह आकाशांचा व पृथ्वीचा प्रकाश[३२] आहे. (सृष्टीमध्ये) त्याच्या प्रकाशाची उपमा अशी आहे जणू एका कोणाड्यामध्ये दिव्याची ज्योत तेवत असेल. तो एका काचेमध्ये ठेवलेला. मोत्याप्रमाणे चमकणारा तारा. आणि तो एका अशा शुभ्र जैतुनच्या वृक्षाच्या तेलाने तेवत आहे. जो पौर्वात्यही नाही की पाश्चिमात्यही नाही. अग्नीचा स्पर्श देखील झाला नसला तरी तो तेजस्वी होतो. प्रकाशावर प्रकाश (वाढण्याची सर्व साधने एकवटली असतील)[३३], अल्लाह आपल्या प्रकाशाकडे ज्याला इच्छितो त्याला मार्गदर्शन करतो, तो लोकांना दृष्टांत देऊन गोष्ट समजावून देतो. प्रत्येक गोष्ट त्याला चांगल्या प्रकारे माहीत आहे. (त्याच्या प्रकाशाकडे मार्ग प्राप्त करणारे) त्या घरात आढळतात ज्यांना उंच करण्याची व ज्यांच्यात आपले नामस्मरण करण्याचा अल्लाहने आदेश दिलेला आहे. त्यांच्यात असले लोक प्रातः-सांज त्याचे पावित्र्यगान करतात, ज्यांना व्यापार आणि खरेदी-विक्री अल्लाहच्या स्मरणापासून व नमाज कायम करण्यापासून व जकात अदा करण्यापासून बेसावध ठेवीत नाही. ते त्या दिवसाची भीती बाळगत असतात ज्या दिवशी हृदयात खळबळ माजण्याची व डोळे स्थिरावण्याची पाळी येईल, (आणि ते हे सर्वकाही

**३२)** म्हणजे सृष्टीत जे काही प्रदर्शित आहे ते त्याच्याच तेजामुळे आहे.

**३३)** या उदाहरणात 'दिवा'ने सर्वोच्च अल्लाहचे अस्तित्व आणि 'मेहराब'ने सृष्टीला उपमा दिलेली आहे. तसेच 'फानूस'ने अभिप्रेत, त्या सत्य अस्तित्वाने स्वतःला सृष्टीच्या नजरेपासून जे अदृश्य ठेवले आहे ती अदृश्यता होय. जणू ही अदृश्यता वास्तविकपणे गुप्ततेची नसून पराकाष्ठेच्या प्रकटीकरणाची अदृश्यता आहे. सृष्टीची नजर ते पाहण्यास असमर्थ आहे की प्रकाश इतके जाज्वल्यमान, विशाल आणि अभिव्यापक आहे ज्याचे अवलोकन मर्यादित नजरा करू शकत नाही. उरले हे वर्णन की 'दिवा एका अशा जैतून-ऑलिव्ह वृक्षाच्या तेलापासून प्रकाशित केला जात असावा जो पौर्वात्यही नसावा व पाश्चिमात्यदेखील.' तर केवळ दिव्याच्या प्रकाशाची पराकाष्ठा व उच्चांकाची कल्पना घेण्यासाठी आहे. कारण प्राचीन काळी जास्तीत जास्त प्रकाश जैतूनच्या तेलाच्या दिव्यानी प्राप्त केला जात असे, त्यापैकी जो दिवा उच्च आणि खुल्या जागेतील वृक्षापासून काढलेल्या तेलाने प्रकाशित केला जात असे तो सर्वाधिक प्रकाशमय असे. तसेच हे जे फर्माविले आहे की 'त्याचे तेल आपोआपच भडका घेत असावे मग त्याला अग्नीस्पर्श न घडलेला का असेना', याच्यानेदेखील दिव्याचा प्रकाश पराकाष्ठेचा जाज्वल्यमान असण्याची कल्पना देणे, असा हेतू आहे.



यासाठी करतात) जेणेकरून अल्लाहने त्यांच्या उत्कृष्ट कृत्यांचा मोबदला त्यांना द्यावा आणि याउपर आपल्या कृपेने त्यांना उपकृत करावे, अल्लाह ज्याला इच्छितो त्याला बेहिशेब देतो. (याच्या उलट) ज्यांनी सत्याचा इन्कार केला त्यांच्या कृत्याचे उदाहरण असे आहे जसे निर्जल वाळवंटातील मृगजळ, की तहानलेला त्याला पाणी समजून होता, परंतु तो जेव्हा तेथे पोहचला तेव्हा काहीही आढळले नाही, तर तेथे त्याला अल्लाह असलेला आढळला, ज्याने त्याचा हिशेब पुरेपूर चुकता केला आणि अल्लाहला हिशेब घेताना विलंब लागत नाही. अथवा त्याचे उदाहरण असे आहे जसे एखाद्या खोल समुद्रातील अंधार की वर एक लाट आच्छदिली आहे, त्यावर आणखी एक लाट, आणि तिच्यावर ढग, अंधःकारावर अंधःकार आच्छादित आहे, माणसाने हात काढले तर तेही त्याला पाहता येऊ नये. ज्याला अल्लाहनेच प्रकाश प्रदान केला नाही त्याच्यासाठी मग कोणताही प्रकाश नाही. (३५-४०)

काय तुम्ही पाहात नाही की अल्लाहचे पावित्र्यगान करीत आहेत ते सर्वजण जे आकाशांत आणि पृथ्वीत आहेत आणि ते पक्षी जे पंख पसरून उडत आहेत? प्रत्येक जण आपली भक्ती आणि पावित्र्यगान करण्याची पद्धत जाणतो, आणि हे सर्वजण जे काही करीत आहेत, अल्लाहला त्याची माहिती आहे आकाश व पृथ्वीचे राज्य अल्लाहसाठीच आहे आणि त्याच्याकडेच सर्वांना परतावयाचे आहे. (४१-४२)

काय तुम्ही पाहात नाही की अल्लाह ढगाला हळू हळू चालवितो, मग त्याच्या तुकड्यांना परस्परांशी जोडतो, मग त्याला एकवटून एक दाट मेघ बनवितो, मग तुम्ही पाहता की त्याच्या आवरणातून पावसाचे थेंब ठिबकत येतात. आणि तो आकाशांतून, त्या पर्वतांच्यामुळे जे त्यांच्यात उंचावले आहेत,[३४] गारांचा वर्षाव करवितो, मग ज्याला इच्छितो त्याला हानी पोहचवितो आणि ज्याला इच्छितो त्याला वाचवितो. त्याच्या विजेचा लखलखाट डोळे दिपवितो. रात्र व दिवसाची उलथापालथ तोच करीत आहे. याच्यात एक बोध आहे, डोळस लोकांसाठी. (४३-४४)

आणि अल्लाहने प्रत्येक जीवमात्र एक प्रकारच्या पाण्याने निर्माण केला. कुणी पोटावर चालत आहे तर कुणी दोन पायांवर आणि कुणी चार पायांवर. जे काही तो इच्छितो निर्माण करतो, तो प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे. (४५)

आम्ही अगदी स्पष्ट वस्तुस्थिती दर्शविणारी वचने अवतरली आहेत. पुढे सरळ

**३४)** याच्याने अभिप्रेत थंडीने गोठलेले ढगही असू शकतात ज्यांना लाक्षणिक रीतीने आकाशातील पर्वत सांगितले गेले असावे, आणि जे आकाशात उंचावले आहेत, पृथ्वीवरील ते पर्वतही असू शकतात ज्यांच्या शिखरांवरील गोठलेल्या बर्फाच्या परिणामामुळे कधी कधी हवा इतकी थंड होते की ढग गारठू लागतात व गारांच्या रूपात वृष्टी होऊ लागते.

मार्गाकडे मार्गदर्शन अल्लाहच ज्याला इच्छितो त्याला करतो. (४६)

हे लोक म्हणतात की आम्ही श्रद्धा ठेवली अल्लाह व पैगंबर (स.) यांच्यावर आणि आम्ही आज्ञाधारकता स्वीकारली, परंतु यानंतर यांच्यापैकी एक गट (आज्ञाधारकतेपासून) तोंड फिरवितो, असले लोक मुळीच श्रद्धावंत नाहीत. जेव्हा त्यांना बोलाविले जाते अल्लाह आणि पैगंबराकडे जेणेकरून पैगंबराने त्यांच्या परस्परांतील तंट्याचा निकाल लावावा, तेव्हा यांच्यापैकी एक पक्ष त्याला बगल देतो. तथापि जर सत्य त्यांना अनुकूल असेल तर मोठे विनम्र बनून पैगंबरांकडे येतात. काय यांच्या हृदयांना (दांभिकतेचा) रोग जडलेला आहे? अथवा हे शंकेत गुरफटलेले आहेत? किंवा या लोकांना अशी भीती आहे की अल्लाह व त्याचा पैगंबर त्यांच्यावर अत्याचार करील? खरी गोष्ट अशी आहे की अत्याचारी तर हे लोक स्वत:च आहेत. श्रद्धावंतांचे कर्तव्य तर असे आहे की जेव्हा त्यांना अल्लाह व पैगंबर (स.) कडे बोलाविले जाईल की पैगंबर त्यांच्या प्रकरणात निकाल देतील तेव्हा त्यांनी सांगावे की आम्ही ऐकले व आज्ञा पाळली. असलेच लोक सफलता प्राप्त करणारे आहेत, आणि यशस्वी तेच आहेत जे अल्लाह आणि पैगंबरांचे आज्ञापालन करतील आणि अल्लाहचे भय बाळगतील व त्याच्या अवज्ञेपासून स्वत:ला वाचवतील. (४७-५२)

हे (दांभिक) अल्लाहच्या नावाने कठोर शपथा घेऊन घेऊन सांगतात, ''आपण जर आज्ञा दिली तर आम्ही घरातून बाहेर पडू.'' यांना सांगा, ''शपथा घेऊ नका, तुमच्या आज्ञापालनाची स्थिती माहीत आहे. तुमच्या कृत्यापासून अल्लाह अनभिज्ञ नाही.'' सांगा, ''अल्लाहचे आज्ञाधारक बना आणि पैगंबराचे आज्ञांकित बनून राहा, परंतु जर तुम्ही तोंड फिरवीत असाल तर चांगले समजून असा की पैगंबरांवर ज्या कर्तव्याचा भार टाकला गेला आहे, त्याला जबाबदार तो आहे आणि तुमच्यावर ज्या कर्तव्याचा भार टाकला गेला आहे, त्याला जबाबदार तुम्ही. त्याचे आज्ञापालन कराल तर स्वत:च सन्मार्ग प्राप्त कराल, पैगंबराची जबाबदारी यापेक्षा अधिक काही नाही की त्याने स्पष्टपणे आज्ञा पोहचवाव्यात.'' (५३-५४)

अल्लाहने वचन दिले आहे तुमच्यापैकी त्या लोकांना जे श्रद्धा ठेवतील आणि सत्कृत्ये करतील. तो त्यांना पृथ्वीतलावर त्याचप्रमाणे खलीफा (आपला नायब) बनवील ज्याप्रमाणे त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांना बनविलेले आहे, त्यांच्यासाठी त्यांच्या त्या धर्माची भक्कम पायावर उभारणी करील, ज्या धर्माला सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्यासाठी पसंत केले आहे, आणि त्यांची (हल्लीची) भीतीची अवस्था शांततेत परिवर्तित करील,



फक्त त्यांनी माझी भक्ती करावी आणि माझ्यासमवेत कोणालाही भागीदार बनवू नये[३५] आणि याउपर जे, द्रोह[३६] करतील तर असलेच लोक अवज्ञाकारी होत. नमाज कायम करा, जकात द्या आणि पैगंबर (स.) यांची आज्ञा पाळा, आशा आहे की तुमच्यावर दया केली जाईल. जे लोक द्रोह करीत आहेत, त्यांच्यासंबंधी गैरसमज करून घेऊ नका की ते पृथ्वीवर अल्लाहला नमवितील. त्यांचे स्थान नरक आहे आणि ते अत्यंत वाईट स्थान आहे. (५५-५७)

हे श्रद्धावंतांनो, हे आवश्यक आहे की तुमचे दास, दासी आणि तुमची ती मुले जी अद्याप सज्ञान नाहीत, अशांनी तीन घटिकेत परवानगी घेऊन तुमच्याजवळ येत जावे. सकाळच्या नमाजपूर्वी आणि दुपारच्या वेळी जेव्हा तुम्ही कपडे उतरून ठेवता, आणि रात्रीच्या नमाजनंतर. या तीन वेळा तुमच्यासाठी पडद्याच्या वेळा आहेत. यांच्यानंतर ते विना परवानगी आले तर तुमच्यावरही काही गुन्हा नाही आणि त्यांच्यावरही नाही. तुम्हाला एक दुसऱ्याकडे वरचेवर यावेच लागते. अशाप्रकारे अल्लाह तुमच्यासाठी आपल्या आदेशांचे स्पष्टीकरण करतो आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. आणि जेव्हा तुमची मुले सज्ञान होतील तेव्हा हे आवश्यक आहे की त्यांनी तशाच प्रकारे परवानगी घेऊन यावे जसे त्यांची मोठी माणसे परवानगी घेत राहिली आहेत. अशाप्रकारे अल्लाह आपली वचने तुमच्यासमोर उलगडतो आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. (५८-५९)

आणि ज्या स्त्रिया तारुण्य ओलांडून बसल्या असतील, विवाहाच्या उमेदवार नसतील, त्यांनी जर आपल्या चादरी उतरून ठेवल्या तर त्यांच्यावर कोणताही गुन्हा नाही परंतु अट अशी की त्या शृंगाराचे प्रदर्शन करणाऱ्या नसाव्यात तथापि त्यांनीसुद्धा लज्जा बाळगून वागले तर त्यांच्यासाठीच उत्तम होय, आणि अल्लाह सर्वकाही ऐकतो आणि जाणतो. (६०)

काही हरकत नाही जर एखादा आंधळा किंवा पांगळा अथवा आजारी आणि तुमच्यासाठी यात काहीही हरकत नाही की आपल्या घरातून खा अथवा आपल्या वाडवडिलांच्या घरातून, अथवा आपल्या आई-आजीच्या घरांतून, अथवा आपल्या भावांच्या घरांतून किंवा आपल्या बहिणींच्या घरांतून अथवा आपल्या चुलत्यांच्या घरांतून किंवा आपल्या आत्यांच्या घरांतून अथवा आपल्या मामांच्या घरांतून, किंवा आपल्या

**३५)** काही लोक याचा असा अर्थ समजून बसले आहेत की ज्या कोणाला जगात सत्ता प्राप्त आहे त्याला खिलाफत-ईश्वरी उत्तराधिकार प्राप्त आहे. वास्तविकपणे आयतीत फर्माविले गेले असे आहे की जे ईमानधारक असतील, अल्लाह त्यांना खिलाफत प्रदान करील.

**३६)** याचा अर्थ असाही होऊ शकतो की 'खिलाफत' प्राप्त करून कृतघ्नता दाखवावी आणि असादेखील होऊ शकतो की दांभिकी वर्तनाला तत्पर बनावेत, की दिखाऊपणे ईमानधारक असावे आणि प्रत्यक्षात ईमानशून्य.

मावशींच्या घरांतून अथवा त्या घरांतून ज्यांच्या किल्ल्या तुमच्या सुपूर्द असतील किंवा आपल्या मित्रांच्या घरांतून. यातसुद्धा काही हरकत नाही की तुम्ही लोक मिळून खा अथवा वेगळे-वेगळे. तथापि जेव्हा घरांत प्रवेश कराल तेव्हा आपल्या लोकांना सलाम करीत जा - अभिष्टचिंतन, अल्लाहकडून निश्चित केले गेलेले, मोठ्या समृद्धीचे आणि पवित्र. अशाप्रकारे सर्वश्रेष्ठ अल्लाह तुमच्यासमोर संकेत वर्णन करतो, अपेक्षा आहे की तुम्ही समजुतदारपणा दाखवाल. (६१)

श्रद्धावंत तर वस्तुत: तेच लोक आहेत ज्यांनी अल्लाह व त्याच्या पैगंबराला मनापासून मानले आणि जेव्हा एखाद्या सामूहिक कार्याप्रसंगी पैगंबर (स.) समवेत ते असतील तेव्हा त्यांची परवानगी घेतल्याखेरीज त्यांनी जाऊ नये. हे पैगंबर (स.), जे लोक तुमच्यापासून परवानगी मागतात, तेच अल्लाह व पैगंबराला मानणारे आहेत. मग जेव्हा ते आपल्या एखाद्या कामानिमित्त परवानगी मागतील तर तुम्ही त्याला परवानगी देत जा, आणि अशा लोकांसाठी अल्लाहजवळ क्षमा-याचना करीत जा. अल्लाह निश्चितच क्षमाशील व कृपाळू आहे. (६२)

मुसलमानांनो, आपल्या दरम्यान पैगंबर (स.) यांचे बोलाविणे आपल्यातील एक दुसऱ्याचे बोलाविण्यासारखे समजू नका. अल्लाह त्या लोकांना चांगल्याच प्रकारे जाणतो जे तुमच्यापैकी असे आहेत जे एक दुसऱ्याचा आडोसा घेऊन गुपचुपपणे निसटतात. पैगंबर (स.) ची आज्ञा भंग करणाऱ्यांना भीती असली पाहिजे की त्यांनी एखाद्या उपद्रवात अडकू नये अथवा त्यांच्यावर दु:खदायक प्रकोप कोसळू नये. सावध राहा, आकाश व पृथ्वीत जे काही आहे ते अल्लाहचे आहे. तुम्ही ज्या कोणत्या वर्तनावर आहात, अल्लाह ते जाणतो. ज्या दिवशी लोक त्याच्याकडे परतविले जातील तेव्हा तो त्यांना दाखवील जे काही ते करून आले आहेत. त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे. (६३-६४)



# २५ सूरह अलफ़ुर्क़ान

*(मक्काकालीन, वचने ७७)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अत्यंत समृद्धशाली आहे तो ज्याने हा फ़ुर्क़ान (निकष) आपल्या दासांवर अवतरला जेणेकरून सर्व जगवासियांसाठी खबरदार करणारा ठरावा. तो जो पृथ्वी व आकाशांचा स्वामी आहे ज्याने कोणाला पुत्र बनविलेले नाही, साम्राज्यामध्ये ज्याच्याबरोबर कोणीही भागीदार नाही, ज्याने प्रत्येक वस्तू निर्माण केली, मग तिचे एक मोजमाप (तकदीर) निश्चित केले लोकांनी त्याला सोडून असले उपास्य बनविले जे कोणत्याही वस्तूची निर्मिती करीत नाहीत तर जे स्वत: निर्मिले जातात. जे खुद्द आपल्यासाठीसुद्धा कोणत्याही नफा व नुकसानीचा अधिकार बाळगत नाहीत. जे मारू शकत नाहीत, चैतन्य देऊ शकत नाहीत आणि मृतांना पुन्हा उत्थापितही करू शकत नाहीत. (१-३)

ज्या लोकांनी पैगंबरांची गोष्ट मान्य करण्यास नकार दिलेला आहे ते सांगतात की, 'हा कुरआन' एक स्वरचित गोष्ट आहे जी या व्यक्तीने स्वत:च रचली आहे आणि अन्य काही लोकांनी या कामात याला मदत केली आहे.'' मोठा अत्याचार आणि अतिशय खोटेपणा आहे ज्यावर हे लोक उठले आहेत. म्हणतात, ''या जुन्या लोकांनी लिहिलेल्या गोष्टी आहेत ज्या हा माणूस उद्धृत करवितो. आणि त्या याला सकाळ-संध्याकाळ ऐकविल्या जात असतात.'' हे पैगंबर (स.) यांना सांगा, ''याला अवतरले आहे त्याने, जो पृथ्वी व आकाशांचे रहस्य जाणतो.'' वस्तुस्थिती अशी आहे की तो अत्यंत क्षमाशील, दयावान आहे. (४-६)

ते म्हणतात, ''कसा हा प्रेषित आहे जो अन्न खातो आणि बाजारात हिंडतो फिरतो? याच्याजवळ एखादा दूत का पाठविला गेला नाही जो याच्यासोबत राहिला असता व (नकार देणाऱ्यांना) त्याने धमकावले असते? अथवा याच्यासाठी एखादा खजिनाच उतरविला गेला असता अथवा याच्यापाशी एखादी बागच असती जिच्यापासून (समाधानाची) याने उपजीविका प्राप्त केली असती?'' आणि हे अत्याचारी म्हणतात, ''तुम्ही लोक तर एका जादू केल्या गेलेल्या माणसाच्या नादी लागला आहांत.'' पहा, कशा कशा हुज्जती हे लोक तुमच्यासमोर घालीत आहेत. असे बहकले आहेत की कोणतीही उचित गोष्ट यांना उमजत नाही. अत्यंत समृद्ध आहे तो, ज्याने इच्छिले तर त्यांनी सुचविलेल्या वस्तुंपेक्षाही वरचढ तो तुम्हाला देऊ शकतो, (एक नव्हे) अनेक उद्याने, ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, आणि मोठमोठाले महाल. (७-१०)

मुळात गोष्ट अशी आहे की या लोकांनी त्या घटकेला खोटे मानले आहे.[१] आणि

**१)** अर्थात अंतिम प्रलयाला.

जो त्या घटकेला खोटे ठरवील त्याच्यासाठी आम्ही भडकलेली आग उपलब्ध करून ठेवली आहे. ती जेव्हा दुरून यांना पाहील तेव्हा हे तिच्या क्रोधाचे व आवेशाचे आवाज ऐकून घेतील. आणि जेव्हा हे हाता-पायांनी बंदिस्त तिच्यात एका अरुंद जागेत घुसडले जातील तेव्हा आपल्या मृत्यूला पुकारू लागतील. (तेव्हा त्यांना सांगितले जाईल) आज एका मृत्यूला नव्हे तर अनेक मृत्यूंना पुकारा. (११-१४)

यांना विचारा, हा शेवट चांगला आहे की तो शाश्वत स्वर्ग ज्याचे वचन ईशपरायण पापभीरूंशी केले गेले आहे? जे त्यांच्या कृतींचा मोबदला व त्यांच्या सफरीची शेवटची मजल असेल, ज्यात त्यांची प्रत्येक इच्छा पूर्ण होईल, ज्यात ते सदासर्वदा राहतील, जी प्रदान करणे तुमच्या पालनकर्त्याकडून एक पूर्ततायोग्य वचन आहे. (१५-१६)

आणि तोच दिवस असेल जेव्हा (तुमचा पालनकर्ता) या लोकांनादेखील घेरून आणील आणि यांच्या त्या आराध्य दैवतांनासुद्धा बोलावून घेईल अल्लाहला सोडून ज्यांना आज हे पूजत आहेत, मग तो त्यांना विचारील, ''काय तुम्ही माझ्या या दासांना मार्गभ्रष्ट केले होते? अथवा हे स्वत:च सरळ मार्गापासून भटकले होते?'' ते सांगतील, ''पवित्र आहे आपले अस्तित्व, आमची तर अशीदेखील हिंमत केली नव्हती की आपल्याशिवाय इतर कोणास आमचा वाली बनवावे. परंतु आपण यांना व यांच्या वाडवडिलांना भरपूर जीवन-सामग्री दिली येथपावेतो की हे पाठ फिरवून गेले आणि अरिष्टपीडित होऊन राहिले.'' असे खोटे ठरवतील ते (तुमचे दैवत) तुमच्या त्या गोष्टी ज्या आज तुम्ही बोलत आहात,[२] मग तुम्ही आपल्यावरील अरिष्ट टाळू शकणार नाही की तुम्ही कोठून मदतही मिळवू शकणार नाही. आणि तुमच्यापैकी जो कोणी अत्याचार करील त्याला आम्ही कठोर प्रकोपाची चव चाखवू. (१७-१९)

हे पैगंबर (स.), तुमच्यापूर्वी जे कोणतेही पैगंबर आम्ही पाठविले होते, ते सर्वही अन्न खाणारे आणि बाजारात हिंडणारे, फिरणारे लोकच होते. वस्तुत: आम्ही तुम्हा लोकांना एक दुसऱ्यासाठी परीक्षेचे माध्यम बनविलेले आहे.[३] काय तुम्ही सहनशीलता बाळगता?[४] तुमचा पालनकर्ता सर्वकाही पाहतो. (२०)

२) सदरहू आयतीत दैवतांनी अभिप्रेत मूर्ती अथवा चंद्र व सूर्य इ. नाहीत तर ईशदूत आणि ज्यांना जगात देव म्हणून मानले गेले होते ती नेक माणसे होत. ही गोष्ट विषयावरून स्वत:च निदर्शनात येत आहे.

३) म्हणजे प्रेषित आणि श्रद्धावंतांसाठी इन्कार करणारे परीक्षा म्हणून आहेत तसेच इन्कार करणाऱ्यांसाठी प्रेषित व श्रद्धावंत परीक्षा म्हणून आहेत.

४) म्हणजे हा गर्भित हेतू समजून घेतल्यानंतर काय आता तुमचे सांत्वन झाले आहे की ज्या उद्दिष्टांसाठी तुम्ही काम करीत आहात, त्या कल्याणकारी उद्दिष्टासाठी परीक्षा घेणारी ही स्थिती अत्यावश्यक आहे?



जे लोक आमच्या पुढे हजर होण्याची शक्यता बाळगत नाहीत ते म्हणतात, ''आमच्यापाशी दूत का पाठविले जात नाहीत? मग आम्ही आमच्या पालनकर्त्याला पाहू.'' मोठा अहंकार बाळगला आहे यांनी आपल्या मनात, आणि सीमा ओलांडली यांनी आपल्या दुराचारात. ज्या दिवशी हे दूतांना पाहतील तो गुन्हेगारांसाठी काही शुभ दिवस नसेल. किंचाळून उठतील की परमेश्वराचा आश्रय असो, आणि जे काही यांनी केले सवरले आहे ते घेऊन आम्ही धुळीसारखे उडवून देऊ. बस्स, तेच लोक जे स्वर्गाला पात्र आहेत त्या दिवशी चांगल्या जागा मिळवतील आणि दुपार घालविण्यासाठी चांगली जागा मिळवतील. आकाशाला कापीत एक ढग त्या दिवशी प्रकट होईल आणि दूतांचे थवेच्या थवे उतरविले जातील. त्या दिवशी खरी बादशाही केवळ कृपावंताचीच असेल आणि तो इन्कार करणाऱ्यांसाठी अत्यंत कठोर दिवस असेल. अत्याचारी मनुष्य आपल्या हाताचा चावा घेईल आणि खेदाने म्हणेल, ''मी पैगंबरांना साथ दिली असती! माझे दुर्दैव! मी अमूक इसमाला मित्र बनविले नसते! त्याच्या बहकविण्यामुळे मी तो उपदेश मानला नाही जो माझ्याकडे आला होता, शैतान माणसासाठी मोठा घातकी ठरला.'' आणि पैगंबर म्हणेल की, ''हे माझ्या पालनकर्त्या, माझ्या लोकांनी या कुरआनला थट्टेचे लक्ष्य बनविले होते.'' (२१-३०)

हे पैगंबर (स.), आम्ही तर अशाच प्रकारे गुन्हेगारांना प्रत्येक पैगंबराचे शत्रू बनविले आहे. आणि तुमच्यासाठी तुमचा पालनकर्ता मार्गदर्शनासाठी व सहाय्यासाठी पुरेसा आहे. (३१)

इन्कार करणारे म्हणतात, ''या इसमावर संपूर्ण कुरआन एकाच वेळी का अवतरला गेला नाही?'' - होय, असे यासाठी केले गेले आहे की याला चांगल्या प्रकारे आम्ही तुमच्या मनात बिंबवीत आहोत. आणि (याच हेतूने) आम्ही याला एका विशिष्ट क्रमाने वेगवेगळ्या विभागांचे रूप दिले आहे. आणि (यात हा गर्भित उद्देशही आहे) की जेव्हाकधी ते तुमच्यासमोर एखादी निराळी गोष्ट (अथवा चमत्कारिक प्रश्न) घेऊन आले त्याचे योग्य उत्तर वेळीच आम्ही तुम्हाला देऊन टाकले आणि उत्तम प्रकारे गोष्टीची उकल केली. - जे लोक तोंडघशी नरकाकडे लोटले जाणार आहेत त्यांची भूमिका अत्यंत वाईट आहे आणि त्याचा मार्ग पराकोटीचा चुकीचा आहे. (३२-३४)

आम्ही मूसा (अ.) ला ग्रंथ दिला[5] आणि त्याच्याबरोबर त्याचा भाऊ हारून (अ.) ला मदतीला दिले. आणि त्यांना सांगितले की जा, त्या लोकसमूहाकडे ज्याने आमच्या वचनांना खोटे ठरविले आहे. सरतेशेवटी त्या लोकांना आम्ही नष्ट करून सोडले. हीच स्थिती नूह (अ.) च्या लोकसमूहाची झाली, जेव्हा त्यांनी पैगंबरांना खोटे ठरविले, आम्ही त्यांना बुडवून टाकले आणि जगभरातील लोकांसाठी एकधडा देणारे संकेत बनविले, आणि या अत्याचाऱ्यांसाठी आम्ही एक वेदनादायक प्रकोप उपलब्ध करून ठेवला आहे. अशाप्रकारे आद व समूद आणि असहाबुर्रस्स[6] आणि दरम्यानच्या शतकातील बरेच लोक नष्ट केले गेले. त्यांच्यापैकी प्रत्येकाला आम्ही (अगोदर नष्ट होणाऱ्यांची) उदाहरणे देऊन देऊन समजाविले आणि सरतेशेवटी प्रत्येकाला गारद करून टाकले. आणि त्या वस्तीवरून तर हे लोक गेलेच आहेत ज्यावर अत्यंत वाईट वृष्टी केली गेली होती.[7] यांनी तिची स्थिती पाहिली नसेल काय? परंतु हे मृत्यूनंतर दुसऱ्या जीवनाची अपेक्षाच करीत नाहीत. (३५-४०)

हे लोक जेव्हा तुम्हाला पाहतात तेव्हा तुमची कुचेष्टा करतात, (म्हणतात) "हाच का तो ज्याला अल्लाहने पैगंबर बनवून पाठविले आहे? याने तर आम्हाला पथभ्रष्ट करून आमच्या उपास्यांपासून परङमुखच केले असते जर आम्ही त्यांच्यावरील श्रद्धेवर ठाम राहिलो नसतो." ती घटका दूर नाही जेव्हा प्रकोप पाहून यांना खुद्द कळून येईल की कोण पथभ्रष्टतेत दूर भरकटला गेला होता. (४१-४२)

कधी तुम्ही त्या माणसाच्या स्थितीचा विचार केला आहे काय ज्याने आपल्या मनोवासनेला आपला देव बनविला आहे? तुम्ही अशा माणसाला सरळ मार्गावर आणण्याची जबाबदारी घेऊ शकता काय? काय तुम्हाला असे वाटते की यापैकी बहुतेक लोक ऐकतात व समजतात? हे तर पशुप्रमाणे आहेत किंबहुना त्यांच्याहूनही पुढे निघालेले. (४३-४४)

---

**५)** या ठिकाणी ग्रंथाने अभिप्रेत बहुधा तो ग्रंथ नाही, मिस्र बाहेर पडताना, जो हजरत मूसा (अ.) यांना दिला गेला होता तर प्रेषितपदावर नियुक्त झाल्यापासून ते मिस्रच्या बाहेर पडेपर्यंत हजरत मूसा (अ.) ना जे आदेश दिले गेलेत ते आदेश होत. यात अल्लाहच्या हुकमाने हजरत मूसा (अ.) यांनी फिरऔनच्या राजदरबारात जी भाषणे केली होती त्याचाही समावेश आहे व फिरऔनच्याविरूद्ध संघर्ष करतेवेळी त्यांना ज्या सूचना दिल्या जात होत्या त्यांचाही समावेश आहे. दिव्य कुरआनात जागोजागी या गोष्टींचा उल्लेख आहे परंतु बव्हंशी या गोष्टी तौरातमध्ये सामील केलेल्या नाहीत. तौरातचा प्रारंभ त्या दहा आज्ञेने होतो ज्या निर्गमनानंतर 'तूरेसीना' पर्वतावर शिलालेखांच्या स्वरूपात त्यांना दिल्या गेल्या होत्या.

**६)** अरबी भाषेत 'रस्स' अंध कूपाला म्हणतात. 'असहाबुर्रस्स' (अंधकूपवाले) ते लोक होते ज्यांनी आपल्या प्रेषिताला विहिरीत झोकून अथवा लटकावून ठार करून टाकले होते.

**७)** म्हणजे लूत लोकांची वसाहत. अत्यंत वाईट वर्षावाने अभिप्रेत पत्थरांचा वर्षाव आहे.



तुम्ही पाहिले नाही की तुमचा पालनकर्ता कशाप्रकारे सावली पसरवितो? जर त्याने इच्छिले असते तर तिला त्याने कायमस्वरूपी सावली बनविले असते. आम्ही सूर्याला त्यावर पुरावा बनविले.[8] मग (जसजसा सूर्य वर येत जातो) आम्ही त्या सावलीला हळूहळू आमच्याकडे आवळीत जातो.[9] (४५-४६)

आणि तो अल्लाहच आहे ज्याने रात्रीला तुमच्यासाठी पोशाख, आणि झोपेला मृत्यू-शांती, आणि दिवसाला जिवंत होण्याची घटका बनविले. (४७)

आणि तोच आहे जो आपल्या कृपेच्या पुढेपुढे वाऱ्यांना शुभवार्ता बनवून पाठवितो. मग आकाशांतून स्वच्छ पाणी उतरवितो जेणेकरून त्याद्वारे एका मृत भूभागाला जीवनदान द्यावे. आणि आपल्या निर्मितीपैकी अनेक जनावरे व मानवांना तृप्त करावे. हा चमत्कार आम्ही वरचेवर त्यांच्यासमोर आणतो जेणेकरून त्यांनी काही बोध घ्यावा, परंतु बहुतेक लोक इन्कार व कृतघ्नतेशिवाय अन्य कोणतेही वर्तन अंगिकारण्यास नकार देतात.

(४८-५०)

जर आम्ही इच्छिले असते तर एक एक वस्तीत एक एक सावध करणारा उभा केला असता.[10] तर हे पैगंबर (स.), अश्रद्धावंतांचे म्हणणे मुळीच ऐकू नका आणि या कुरआननिशी त्यांच्याबरोबर जबरदस्त प्रयत्नांची पराकाष्ठा करा. (५१-५२)

आणि तोच आहे ज्याने दोन समुद्रांना मिळवून ठेवले आहे. एक चवदार व गोड आणि दुसरे कडू व खारे, आणि दोघांच्या दरम्यान एक पडदा आड आहे, एक अडवणूक आहे ज्याने त्यांना सरमिसळ होण्यापासून रोखले आहे.[11] (५३)

---

**८)** नाविकांच्या परिभाषेत 'दलील' (वाटाड्या) अशा माणसाला म्हणतात जो नौकांना मार्ग दाखवीत असावा. सावलीला सूर्यासाठी दलील ठरविण्याचा अर्थ असा की सावलीचे विस्तारणे व आखडणे हे सूर्याचे उंचावणे व ढळणे आणि उदय व अस्त पावणे याच्या अंकित आहे.

**९)** आपल्याकडे आवळण्याने अभिप्रेत अदृश्य व नाहीसे करणे होय, कारण प्रत्येक वस्तू जी नष्ट होते ती अल्लाहकडेच परतते. प्रत्येक वस्तू त्याच्याकडून येते व त्याच्याकडेच जाते.

**१०)** म्हणजे असे करणे आमच्या सामर्थ्या पलीकडचे होते असे नाही. वाटले असते तर जागोजागी प्रेषित निर्माण केले असते परंतु अही तसे केले नसून जगभरासाठी एकच पैगंबर नियुक्त केला. ज्याप्रमाणे एकच सूर्य साऱ्या जगासाठी पुरेसा ठरत आहे त्याचप्रमाणे हा मार्गदर्शनरूपी सूर्यच साऱ्या जगासाठी पुरेसा आहे.

**११)** ही स्थिती अशा प्रत्येक जागी उद्भवते जेथे एखादी मोठी नदी समुद्राला येऊन मिळत असावी. याशिवाय खुद्द समुद्रातदेखील निरनिराळ्या ठिकाणी गोड पाण्याचे झरे आढळतात. या झऱ्यांचे पाणी समुद्रातील अत्यंत खारट पाण्यादरम्यानदेखील आपल्या गोडव्याला सोडत नाही. उदा. बहरीन व इतर ठिकाणी फारिस समुद्रधुनीच्या तळाशी असे अनेक झरे निघाले आहेत. त्यांच्यातून लोक गोड पाणी प्राप्त करीत असतात.

आणि तोच आहे ज्याने पाण्यापासून मनुष्य निर्माण केला, मग त्याच्यापासून वंश व सासरच्या दोन वेगळ्या शृंखला चालविल्या. तुझा पालनकर्ता मोठाच सामर्थ्यवान आहे. (५४)

त्या उपास्याला सोडून लोक अशांची उपासना करीत आहेत जे त्यांचा फायदाही करू शकत नाहीत व हानीही नाही. आणि याउपर अधिक असे की अश्रद्धावंत, आपल्या पालनकर्त्याच्या विरोधात प्रत्येक बंडखोराचा सहायक बनलेला आहे. (५५)

हे पैगंबर (स.), तुम्हाला तर आम्ही केवळ एक खुशखबर देणारा व सावध करणारा बनवून पाठविले आहे.[१२] यांना सांगा, ''मी या कामासाठी तुमच्याकडून काही मोबदला मागत नाही. माझा मोबदला केवळ हाच आहे की ज्याची इच्छा असेल त्याने आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाचा अवलंब करावा.'' (५६-५७)

हे पैगंबर (स.), त्या परमेश्वरावर विश्वास ठेवा जो जिवंत आहे आणि कधीही मरणार नाही, त्याच्या स्तुतीसमवेत त्याचे पावित्रगान करा. आपल्या दासांच्या अपराधापासून केवळ त्याचेच माहितगार असणे पुरेसे आहे. तोच ज्याने सहा दिवसात पृथ्वी व आकाश आणि त्या सर्व वस्तू निर्माण केल्या ज्या पृथ्वी आणि आकाशांच्या दरम्यान आहेत, मग स्वत:च अर्श (ईश-आसना) वर विराजमान झाला - कृपावंत त्याची शान बस्स कुणा जाणकारालाच विचारा. (५८-५९)

या लोकांना जेव्हा सांगितले जाते की त्या कृपावंताला सजदा करा (नतमस्तक व्हा), तर सांगतात, ''कृपावंत काय असतो? तू ज्याला सांगशील त्याला आम्ही सजदा करीत राहावे का?'' हे आवाहन त्यांच्या तिरस्कारात उलट आणखी भर टाकते. (६०)

फार समृद्ध आहे तो ज्याने आकाशांत बुरूज उभारले आणि त्यात एक दिवा व एक चमकणारा चंद्र प्रकाशित केला. तोच आहे ज्याने रात्र व दिवसाला एकमेकाचा उत्तराधिकारी बनविले त्या प्रत्येक मानवासाठी जो बोध घेऊ इच्छितो अथवा कृतज्ञ होऊ इच्छितो. (६१-६२)

कृपावंताचे (अस्सल) दास ते आहेत जे जमिनीवर नम्रपणे चालतात[१३] आणि

**१२)** म्हणजे तुमचे काम कुणा ईमानवाल्यास मोबदला देणे अथवा कुणा इन्कार करणाऱ्यास शिक्षा करण्याचे नाही. तुम्ही कुणा एकाला ईमानकडे ओढून आणणे किंवा इन्कारापासून जबरदस्तीने परावृत्त करण्यावर नियुक्त नाही. तुमची जबाबदारी याहून जास्त काहीच नाही की जो सरळमार्ग स्वीकारीत असेल त्याला इष्टपरिणामाची खुषखबर द्यावी आणि जो आपल्या कुमार्गावर दृढ राहात असेल त्याला अल्लाहकडून धरले जाण्याचे भय दाखवावे.

**१३)** म्हणजे अहंकाराने अक्कड व ऐट दाखवीत चालत नाहीत. जब्बर आणि उपद्रवकारी लोकांप्रमाणे आपल्या चालीने आपले बळ प्रदर्शित करण्याचा प्रयत्न करीत नाहीत तर त्यांचे चालणे एका सज्ज, सद्प्रवृत्ती व सुस्वभावी माणसाच्या चालीसारखे असते.



अडाणी त्यांच्या तोंडी लागले तर म्हणतात की तुम्हाला सलाम. ते आपल्या पालनकर्त्याच्या ठायी नतमस्तक होण्यात अहोरात्र उभे राहतात. जे प्रार्थना करीत असतात की, ''हे आमच्या पालनकर्त्या, नरकाच्या यातनांपासून आम्हाला वाचव, त्याच्या यातना तर जीवघेण्या आहेत, ते तर फारच वाईट निवास व ठिकाण आहे.'' जो खर्च करतात तो न फाजील खर्च करतात न कंजुषपणा, त्यांचा खर्च दोन्ही टोकांच्या दरम्यान संतुलनावर आधारित असतो. जे अल्लाहशिवाय इतर कोणत्याही उपास्याचा धावा करीत नाहीत, अल्लाहने निषिद्ध ठरविलेल्या कोणत्याही जिवाला हकनाक ठार करीत नाहीत आणि व्यभिचारही करीत नाहीत, हे कृत्य जो कोणी करील तो आपल्या गुन्ह्याचे फळ भोगील, पुनरुत्थानाच्या दिवशी त्याला सतत यातना दिली जाईल आणि त्यातच तो सदैव अपमानित पडून राहील. याशिवाय की एखाद्याने (या अपराधानंतर) पश्चात्ताप केलेला असेल आणि श्रद्धा ठेवून तो सत्कृत्ये करू लागला असेल. अशा लोकांच्या वाईट गोष्टींना अल्लाह भल्या गोष्टींनी बदलून टाकील, आणि तो अत्यंत क्षमाशील, दयावान आहे. जो मनुष्य पश्चात्ताप करून सदाचारांचा अवलंब करतो तो तर अल्लाहकडे परत येतो जसा की खऱ्या अर्थाने परतावयास हवे. (आणि कृपावंताचे दास ते आहेत) जे असत्याचे साक्षी बनत नाहीत आणि एखाद्या वायफळ गोष्टीजवळून गेल्यास ते सज्जनाप्रमाणे निघून जातात. ज्यांना त्यांच्या पालनकर्त्याचे संकेत ऐकवून जर उपदेश केला गेला तर ते त्यावर आंधळे व बहिरे बनून राहात नाहीत. जे प्रार्थना करीत असतात, ''हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला आमच्या पत्नीं व संततीपासून नेत्रसुख प्रदान कर आणि आम्हाला पापभीरूंचा नेता (मार्गदर्शक) बनव.''[१४] - हे आहेत ते लोक जे आपल्या संयमाचे फळ उत्तुंग मजल्यांच्या रूपाने प्राप्त करतील. शुभचिंतन व सलामाने त्यांचे स्वागत होईल ते सदासर्वदा तेथे राहतील, किती छान आहे ते निवास व ते ठिकाण! (६३-७६)

हे पैगंबर (स.), लोकांना सांगा, ''माझ्या पालनकर्त्याला तुमची काय गरज पडली

**१४)** म्हणजे आम्ही ईश्वरी कोपाचे भय व आज्ञापालनात सर्वांच्या पुढे राहावे. भलाई व सत्कर्मे करण्यात अग्रेसर व्हावे. केवळ नेकच बनावे असे नाही तर नेकीचे पुढारी असावे व आमच्यामुळे अलम दुनियेत नेकीचा फैलाव व्हावा. या गोष्टीचा उल्लेख या ठिकाणी वास्तविकपणे हे दर्शविण्यासाठी केला गेला आहे की जे धनदौलत आणि प्रताप व प्रतिष्ठेत नव्हे तर नेकी व पापभिरूतेत एक दुसऱ्यांपेक्षा सरस ठरण्याचा प्रयत्न करतात, हे ते लोक आहेत.

आहे जर तुम्ही त्याचा धावा करीत नसाल.[१५] आता ज्याअर्थी तुम्ही खोटे लेखलेच आहे, लवकरच ती शिक्षा भोगाल की जीव वाचविणे कठीण होईल.'' (७७)

**१५)** म्हणजे जर तुम्ही अल्लाहकडे प्रार्थना केली नाही व त्याची बंदगी केली नाही आणि आपल्या गरजांच्या पूर्ततेत सहाय्यासाठी त्याचा धावा केला नाही तर तुमचे काहीच वजन सर्वोच्च अल्लाहच्या नजरेत नाही जेणेकरून काडीमात्रदेखील त्याने तुमची पर्वा करावी. निव्वळ निर्मिती म्हणून तुमच्यात आणि पत्थरांत कोणताही फरक नाही. तुमच्यावाचून अल्लाहचे काही अडलेले नाही की तुम्ही बंदगी करणार नसाल तर त्याचे काम थांबेल. त्याच्या मेहरनजरेस जी गोष्ट तुमच्याकडे वळविते, ते तुमचे त्याच्यासमोर हात पसरविणे व त्याच्याकडे प्रार्थना करणेच होय. हे काम करीत नसाल तर केरकचऱ्यासमान टाकले जाल.



# २६ सूरह अश्शुअरा

*(मक्काकालीन, वचने २२७)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

ताऽसीऽऽम् - मीऽम्.[१] या स्पष्ट ग्रंथाच्या आयती आहेत. (१-२)

हे पैगंबर (स.), कदाचित तुम्ही या दु:खाने आपले प्राण गमावून बसाल की हे लोक श्रद्धा ठेवत नाहीत. आम्ही इच्छिले तर आकाशातून अशी वचने अवतरू शकतो की यांच्या माना त्यापुढे नमतील.[२] या लोकांपाशी कृपावंताकडून जो कोणता नवीन उपदेश येतो हे त्याच्याशी विमुख होतात. आता ज्याअर्थी यांनी खोटे ठरविले आहे, लवकरच यांना त्या गोष्टीची (विविध मार्गाने) वास्तविकता माहीत होईल ज्याची हे टिंगल करीत आले आहेत. (३-६)

आणि काय यांनी पृथ्वीतलावर कधी दृष्टिक्षेप टाकला नाही की आम्ही किती विपूल प्रमाणात सर्व प्रकारची उत्कृष्ट वनस्पती त्यावर निर्माण केली आहे? निश्चितच यात एक संकेत आहे,[३] परंतु यापैकी बहुतेकजण मानणारे नाहीत. आणि वस्तुस्थिती अशी आहे की

**१)** म्हणजे त्या ग्रंथाच्या आयती ज्या आपले म्हणणे स्पष्टपणे उघड करून सांगतात. त्या वाचून किंवा ऐकून प्रत्येक माणूस समजू शकतो की त्या कोणत्या गोष्टीकडे बोलावीत आहेत. कोणत्या गोष्टीची मनाई करीत आहेत. कुणाला सत्य आणि कुणाला असत्य ठरवीत आहेत. मानणे किंवा न मानणे ही गोष्ट वेगळी परंतु या ग्रंथाची शिकवण त्याच्या लक्षात आली नाही आणि काय त्यजणे व काय स्वीकारण्याचे आमंत्रण देत आहे, हे त्याला त्यापासून कळू शकलेले नाही. कोणताही इसम असे निमित्त सांगू शकत नाही.

**२)** म्हणजे एखादी अशी निशाणी उतरविली असती जेणेकरून तमाम अश्रद्धावंतांना श्रद्धा आणि आज्ञापालनाचे वर्तन अंगिकारणे भाग पडले असते. सर्वोच्च अल्लाहसाठी हे काहीच मुश्किलीचे नाही. तो जर असे करीत नाहीत तर याचे कारण असे नाही की हे काम त्याच्या सामर्थ्यापलीकडचे आहे तर असल्या प्रकारचे बळजबरीची श्रद्धा त्याला नको आहे, हे त्याचे कारण आहे.

**३)** म्हणजे सत्य शोधासाठी कुणाला जर एखाद्या निशाणीची आवश्यकता वाटत असेल तर त्याला लांब जाण्याची काही जरूरी नाही. डोळे उघडून जरा जमिनीची उपज पाहावी. त्याला कळून येईल की सृष्टी व्यवस्थेची जी वास्तवता (एकेश्वरवाद) प्रेषित प्रस्तुत करीत आहेत, ती योग्य आहे की अनकेश्वरवादी व नास्तिक सांगत असतात त्या कल्पना.

तुझा पालनकर्ता सामर्थ्य-संपन्नही आहे आणि दयावानदेखील.[४] (७-९)

यांना त्या वेळची गोष्ट ऐकवा, जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने मूसा (अ.) ला पुकारिले, ''अत्याचारी जनसमुदायाकडे जा - फिरऔनच्या लोकसमुहाकडे - काय ते भीत नाहीत?'' त्याने विनविले, ''हे माझ्या पालनकर्त्या मला भय आहे की ते मला खोटे ठरवतील. माझे मन दबले जाते व माझी जीभ चालत नाही. आपण हारूनकडे प्रेषितत्व पाठवावे, आणि माझ्यावर त्यांच्या येथे एका अपराधाचे आरोपदेखील आहे, म्हणून भीती वाटते की ते मला ठार मारतील.'' फर्माविले, ''मुळीच नाही, तुम्ही दोघे जा आमचे संकेत घेऊन, आम्ही तुम्हाबरोबर सर्वकाही ऐकत राहू. फिरऔनपाशी जा आणि त्याला सांगा, आम्हाला सर्व जगांच्या पालनकर्त्याने यासाठी पाठविले आहे की तू बनीइस्राईलना आमच्याबरोबर जाऊ द्यावेस.'' (१०-१७)

फिरऔनने सांगितले, ''काय आम्ही तुझे आपल्या येथे मुलाप्रमाणे पालनपोषण केले नव्हते? तू आपल्या आयुष्याची अनेक वर्षे आमच्या दरम्यान घालविलीस, आणि त्यानंतर तू करून गेलास जे काही करून गेला. तू फार कृतघ्न मनुष्य आहेस.'' मूसा (अ.) ने उत्तर दिले, ''त्यावेळी ते काम मी अजाणपणे केले होते. मग मी तुमच्या भीतीने पळून गेलो. त्यानंतर माझ्या पालनकर्त्याने मला हुकुम प्रदान केला आणि मला पैगंबरांत समाविष्ट केले. उरले तुझे उपकार ज्यांचा ठपका तू माझ्यावर ठेवला आहेस, तर त्याची वस्तुस्थिती अशी आहे की तू बनीइस्राईलना गुलाम बनविले होते.''[५] फिरऔनने सांगितले, ''आणि जगतांचा पालनकर्ता काय असतो?'' मूसा (अ.) ने उत्तर दिले, ''आकाशांचा आणि पृथ्वीचा पालनकर्ता आणि त्या सर्व वस्तूंचा पालनकर्ता ज्या आकाश व पृथ्वीच्या दरम्यान आहेत, जर तुम्ही विश्वास बाळगणारे असाल.'' फिरऔनने आपल्या सभोवतीच्या लोकांना सांगितले, ''ऐकलेत ना?'' मूसा (अ.) ने सांगितले, ''तुमचाही पालनकर्ता आणि तुमच्या त्या वाडवडिलांचा पालनकर्तादेखील जे पूर्वी होऊन गेले आहेत.'' फिरऔनने (उपस्थितांना) सांगितले, ''तुमचे हे पैगंबर साहेब जे तुमच्याकडे

४) म्हणजे त्याचे सामर्थ्य तर इतके जबरदस्त आहे की जर एखाद्याला शिक्षा करू इच्छिले तर क्षणभरात त्याला नष्ट करून टाकावे. परंतु असे असतानादेखील शिक्षा करण्यात घाई करीत नाही, वर्षानुवर्षे व शतकानुशतके ढील देत असतो, विचार करण्याची, समजून घेण्याची आणि सावरण्याची सवलत देत जातो, तसेच आयुष्यभरातील अवज्ञांना एकदाच्या पश्चात्ताप व क्षमायाचनेवर माफ करण्यास तयार असतो, ही सर्वस्वी त्याची दयार्द्रता आहे.

५) म्हणजे तुझ्या घरात पालनपोषणासाठी का आलो असतो जर तू बनीइस्राईलवर अत्याचार केले नसते. तुझ्या अत्याचारामुळेच तर माझ्या आईने मला टोपलीत टाकून नदीत सोडले होते. एरव्ही माझ्या पालनपोषणासाठी माझे स्वतःचे घर नव्हते का? म्हणून त्या संगोपनाच्या उपकाराचा ठपका ठेवणे तुला शोभत नाही.



पाठविले गेले आहेत, अगदीच वेडे दिसतात.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''पूर्व व पश्चिम आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे सर्वांचा पालनकर्ता, जर आपण काही बुद्धी बाळगत असाल.''

फिरऔनने सांगितले, ''जर तू माझ्याशिवाय इतर कोणास उपास्य मानले तर तुलाही त्या लोकांत सामील करीन जे तुरुंगात खितपत पडले आहेत.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''मी तुझ्यासमोर एक स्पष्ट गोष्ट आणली तरी?'' फिरऔनने सांगितले, ''बरे तर घेऊन ये जर तू खरा असशील.'' (१८-३१)

(त्याच्या तोंडातून ही गोष्ट पडताक्षणीच) मूसा (अ.) ने आपली काठी फेकली आणि अकस्मात ती - एक अजगर बनली. मग त्याने आपला हात (बगलेतून) काढला आणि तो सर्व पाहणाऱ्यांसमोर चकाकत होता.[६] (३२-३३)

फिरऔन आपल्या सभोवतीच्या सरदारांना म्हणाला, ''हा माणूस निश्चितच एक निष्णात जादूगार आहे. इच्छितो की आपल्या जादूच्या जोरावर तुम्हाला तुमच्या देशातून हाकलून द्यावे.[७] आता सांगा, तुम्ही काय आज्ञा देता?'' त्यांनी सांगितले, ''याला आणि याच्या भावाला थांबवून ठेवा आणि शहरात दवंडी देणारे पाठवा की प्रत्येक शहाण्या जादूगारास त्यांनी आपल्याकडे घेऊन यावे.'' त्याप्रमाणे एके दिवशी ठरलेल्या वेळी जादूगारांना एकत्र करण्यात आले आणि लोकांना सांगितले गेले, ''तुम्ही मेळाव्यात याल

६) ज्याक्षणी हजरत मूसा (अ.) यांनी बगलेतून हात बाहेर काढले, अकस्मात सर्व परिसर चकाकून उठले आणि जणू सूर्यच उगवला आहे असा भास झाला.

७) दोन्ही चमत्कारांच्या महानतेची कल्पना यावरून केली जाऊ शकते की कोठे एका क्षणापूर्वी तो आपल्या रयतेपैकी एका व्यक्तीला भरदरबारी प्रेषितत्वाच्या गोष्टी आणि बनीइस्राईल लोकांच्या सुटकेची मागणी करताना पाहून खुळ्यात काढत होता आणि जर तू माझ्याशिवाय इतर कुणास उपास्य म्हणून मानले तर मी तुला बंदीवासात खितपत ठेवून ठार करीन अशी धमकावणी देत होता तर कोठे आता या निशाण्या पाहताक्षणीच आपले राज्य व आपला देश हिरावून घेतले जाण्याचा धोका त्याला वाटू लागला, इतकी धास्ती त्याने खाल्ली.

ना? कदाचित आम्ही जादूगारांच्याच धर्मावर राहू जर ते वरचढ ठरले.''[८] (३४-४०)

जेव्हा जादूगार मैदानात आले तेव्हा ते फिरऔनला म्हणाले, ''आम्हाला बक्षीस तर मिळेल ना जर आम्ही वरचढ ठरलो?'' तो म्हणाला, ''होय, आणि तुम्ही तर त्यावेळी निकटवर्तीय लोकांत सामील व्हाल.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''टाका, जे काही तुम्हाला टाकावयाचे आहे.'' त्यांनी लगेच आपल्या दोऱ्या व काठ्या टाकल्या व म्हणाले, ''फिरऔनच्या प्रतापाने आम्हीच वरचढ ठरू.'' मग मूसा (अ.) ने आपली काठी फेकली, तर अकस्मात ती त्यांच्या खोट्या चमत्कारांना गिळंकृत करीत चालली होती. यावर सर्व जादूगार स्वत:हून उत्स्फूर्तपणे नतमस्तक झाले आणि बोलते झाले की, ''मानले आम्ही सर्व जगाच्या पालनकर्त्याला, मूसा (अ.) आणि हारून (अ.) यांच्या पालनकर्त्याला.'' फिरऔनने सांगितले, ''तुम्ही मूसा (अ.) चे म्हणणे ऐकले यापूर्वी की मी तुम्हाला तशी परवानगी द्यावी! निश्चितच हा तुमचा ज्येष्ठ आहे ज्याने तुम्हाला जादू शिकविली आहे, बरे, इतक्यातच तुम्हाला कळेल. मी तुमचे हातपाय विरूद्ध बाजूने कापणार आणि तुम्हा सर्वांना सुळावर चढविणार.'' त्यांनी उत्तर दिले, ''काही पर्वा नाही, आम्ही आमच्या पालनकर्त्याच्या ठायी पोहचू आणि आम्हाला अपेक्षा आहे की आमचा पालनकर्ता आमचे अपराध माफ करील कारण सर्वप्रथम आम्ही श्रद्धा ठेवली आहे.'' (४१-५१)

आम्ही[९] मूसा (अ.) ला दिव्यबोध (वह्य) पाठविला की, ''रात्रीच्या रात्रीच माझ्या दासांना घेऊन निघून जा, तुमचा पाठलाग केला जाईल.'' यावर फिरऔनने (सैन्य गोळा करण्याकरिता) शहरात दवंडी देणारे पाठविले. ''हे काही मूठभर लोक आहेत, आणि

८) म्हणजे केवळ दवंडी व जाहिरातीवरच बस्स केले गेले असे नाही तर लोकांना प्रोत्साहन देऊन सामना पाहण्यासाठी आणावे या हेतूने माणसे पिटाळली गेली. यावरून असे कळते की भरल्या दरबारी जे चमत्कार हजरत मूसा (अ.) यांनी दाखविले होते, त्याची बातमी आम लोकांत पसरली होती व त्यामुळे देशवासी प्रभावित होत चालले असल्याची फिरऔनला भीती वाटत होती. ज्या उपस्थितांनी दरबारात हजरत मूसा (अ.) यांचा चमत्कार पाहिला होता व बाहेर ज्या लोकांपर्यंत त्याबद्दल विश्वसनीय बातम्या पोहचल्या होत्या, त्या लोकांच्या आपल्या वडिलोपार्जित धर्मावरून श्रद्धा डळमळू लागल्या होत्या. आणि आता त्याच्या धर्माची मदार केवळ या गोष्टीवरच कायम होती की कसेही करून मूसा (अ.) यांनी जी कामगिरी करून दाखविली आहे, जादूगारांनीदेखील ती करून दाखवावी. फिरऔन आणि त्याचे राज्याधिकारी खुद्द त्याला एक निर्णायक सामना समजत होते. त्यांनी स्वत: पिटाळलेली माणसे आम जनतेच्या मनात ही गोष्ट रुजवीत हिंडत होते की जर जादूगार यशस्वी ठरले तर आम्ही मूसा (अ.) च्या धर्मात प्रवेश करण्यापासून सुरक्षित राहू अन्यथा आमच्या धर्माची व श्रद्धेची काही धडगत नाही.

९) आता एका दीर्घ काळातील घडलेल्या घटनांना सोडून जेव्हा हजरत मूसा (अ.) यांना मिस्रहून हिजरत (देशत्याग) करण्याची आज्ञा झाली होती, त्यावेळचा उल्लेख केला जात आहे.



यांनी आम्हाला खूप नाराज केले आहे आणि आम्ही एक असा समुदाय आहोत ज्यांचा बाणा नेहमी सावध राहणे होय.'' अशाप्रकारे आम्ही त्यांना त्यांच्या बागांतून व त्यांच्या झऱ्यांतून, आणि खजिने व त्यांच्या उत्तम निवासस्थानांतून काढून आणले. हे तर घडले त्यांच्याशी (आणि दुसरीकडे) बनीइस्राईलना आम्ही या सर्व वस्तूंचे वारस बनविले.

(५२-५९)

सकाळ होताच हे लोक त्यांच्या पाठलागासाठी निघाले, जेव्हा दोन्ही जमातीचा आमना सामना झाला तेव्हा मूसा (अ.) चे सोबती ओरडले, ''आम्ही तर धरले गेलो.'' मूसा (अ.) ने सांगितले, ''कदापि नाही, माझ्याबरोबर माझा पालनकर्ता आहे. तो निश्चितच मला मार्गदर्शन करील.'' आम्ही मूसा (अ.) ला दिव्य बोधाद्वारे आज्ञा दिली, ''मार आपली काठी समुद्रावर.'' अकस्मात समुद्र दुभंगला आणि त्याचा प्रत्येक भाग एक भव्य पर्वताप्रमाणे झाला. त्याच जागी आम्ही दुसऱ्या जमातीलादेखील जवळ घेऊन आलो. मूसा (अ.) आणि त्या सर्व लोकांना जे बरोबर होते, आम्ही वाचविले, आणि दुसऱ्यांना बुडविले. (६०-६६)

या घटनेत एक संकेत आहे परंतु या लोकांपैकी बहुतेकजण मानणारे नाहीत आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि दयाळूदेखील.

आणि यांना इब्राहीम (अ.) चा किस्सा ऐकवा जेव्हा त्याने आपले वडील व आपल्या लोकसमूहाला विचारले होते की, ''या काय वस्तू आहेत ज्यांची तुम्ही पूजा करता?'' त्यांनी उत्तर दिले, ''काही मूर्त्या आहेत ज्यांची आम्ही पूजा करतो आणि त्यांच्याच सेवेत आम्ही लागलेलो असतो.'' त्याने विचारले, ''हे तुमचे ऐकतात का जेव्हा तुम्ही यांचा धावा करता? अथवा हे तुमचा काही फायदा किंवा नुकसान करतात का?'' त्यांनी उत्तर दिले, ''नाही, किंबहुना आम्हाला आमचे वाडवडील असेच करताना आढळले आहेत.'' यावर इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''कधी तुम्ही (डोळे उघडून) त्या वस्तूंना पाहिले तरी काय ज्यांची उपासना तुम्ही आणि तुमच्या पूर्वीचे वाडवडील करीत राहिले आहेत? माझे तर हे सर्व शत्रू आहेत, सर्व जगांच्या एका पालनकर्त्याव्यतिरिक्त, ज्याने मला निर्माण केले मग तोच मला मार्गदर्शन करतो. जो मला खाऊ व पिऊ घालतो.

(६७-७९)

आणि जेव्हा आजारी पडतो तेव्हा तोच मला बरे करतो. तो मला मृत्यू देईल आणि मग पुन्हा मला जीवन प्रदान करील. आणि ज्याच्यापासून मी आशा बाळगतो की तो मोबदल्याच्या दिवशी माझी चूक माफ करील.'' (यानंतर इब्राहीम (अ.) ने प्रार्थना केली) ''हे माझ्या पालनकर्त्या, मला हुकूम प्रदान कर आणि मला सदाचारी लोकांशी मिळव आणि नंतरच्या येणाऱ्यांत मला खरे नावलौकिक प्रदान कर आणि मला ऐश्वर्यसंपन्न

स्वर्गाच्या वारसदारांमध्ये सामील कर आणि माझ्या बापास क्षमा कर की निःसंशय तो मार्गभ्रष्ट लोकांपैकी आहे. आणि मला त्या दिवशी खजील होऊ देऊ नकोस जेव्हा सर्व लोक जिवंत करून उठविले जातील, जेव्हा मालमत्ताही काही फायदा पोहचवू शकणार नाही व संततीदेखील नाही, याशिवाय की एखादी व्यक्ती शुद्ध मनाने अल्लाहच्या ठायी हजर होईल.'' (८०-८९)

(त्यादिवशी)[१०] स्वर्ग, पापभीरूंजवळ आणला जाईल आणि नरक भटकलेल्या लोकांसमोर उघडला जाईल, आणि त्यांना विचारले जाईल की, ''आता कोठे आहेत ते, ज्यांची तुम्ही ईश्वराला सोडून उपासना करीत होता, ते तुम्हाला काही सहाय्य करीत आहेत का? अथवा स्वतःचा बचाव करू शकतात काय?'' मग ते उपास्य व हे बहकलेले लोक आणि शैतानाची सेना सर्वच्या सर्व तिच्यात खोलवर ढकलले जातील. तेथे हे सर्व आपापसांत भांडतील आणि बहकलेले लोक सांगतील, ''ईश्वराची शपथ, आम्ही तर उघडपणे मार्गभ्रष्टतेत गुरफटलेलो होतो, जेव्हा तुम्हाला सर्व जगांच्या पालनकर्त्याच्या बरोबरीचा दर्जा देत होतो. आणि ते अपराधी लोकच होते ज्यांनी आम्हाला या मार्गभ्रष्टतेत टाकले. आता कोणी आमचा शिफारशीही नाही आणि कोणी जिवलग मित्रही नाही. जर आम्हाला एकदा परतण्याची संधी मिळाली तर आम्ही श्रद्धावंत बनू.'' (९०-१०२)

निश्चितच याच्यात एक मोठा संकेत आहे[११] परंतु यापैकी बहुतेकजण श्रद्धा ठेवणारे नाहीत. आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि परम कृपाळूसुद्धा. (१०३-१०४)

नूह (अ.) च्या लोकसमूहाने प्रेषितांना खोटे ठरविले. स्मरण करा जेव्हा त्यांचा भाऊ नूह (अ.) ने त्यांना सागिंतले होते, ''काय तुम्ही भीत नाही? मी तुमच्यासाठी एक विश्वसनीय प्रेषित आहे, म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा. मी या कामासाठी तुमच्याकडून कोणत्याही मोबदल्याचा इच्छुक नाही. माझा मोबदला तर सर्व जगांच्या पालनकर्त्याकडे आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि (निर्धास्तपणे) माझ्या आज्ञेत राहा.'' त्यांनी उत्तर दिले, ''आम्ही तुला मानावे काय? वास्तविकतः तुझे अनुकरण क्षुद्रतम लोकांनी स्वीकारले आहे.'' नूह (अ.) ने सांगितले, ''मला काय माहीत की त्यांची कृत्ये कशी आहेत त्यांचा हिशेब तर माझ्या पालनकर्त्याकडे आहे. जर तुम्ही विवेक बाळगला असता! माझे हे काम नव्हे की ज्यांनी श्रद्धा ठेवली त्यांना मी झिडकारावे. मी तर केवळ एक स्पष्टपणे सावध करणारा मनुष्य आहे.'' त्यांनी सांगितले, ''हे नूह (अ.) जर तू परावृत्त झाला नाहीस तर झिडकारलेल्या

**१०)** येथून ते आयत क्र. १०२ पर्यंतचा मजकूर हजरत इब्राहीम (अ.) यांच्या कथनाचा भाग नाही तर सर्वोच्च अल्लाहकडून त्यात भर म्हणून आहे.

**११)** म्हणजे हजरत इब्राहीम (अ.) यांच्या कथेत.



लोकांत समाविष्ट होऊन राहशील.'' नूह (अ.) ने प्रार्थना केली, ''हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या लोकांनी मला खोटे ठरविले. आता माझ्या आणि यांच्या दरम्यान निर्णायक फैसला कर आणि मला व जे श्रद्धावंत माझ्यासमवेत आहेत, त्यांना वाचव.'' सरतेशेवटी आम्ही त्याला व त्याच्या सोबत्यांना एका भरलेल्या नावेत वाचविले[१२] आणि यानंतर उरलेल्या लोकांना बुडवून टाकले. (१०५-१२०)

निश्चितच याच्यात एक संकेत आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण मानणारे नाहीत. आणि वस्तुस्थिती अशी आहे की, तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि परमकृपाळूदेखील. (१२१-१२२)

'आद'नी पैगंबरांना खोटे लेखले. स्मरण करा जेव्हा त्यांचा भाऊ हूद (अ.) ने त्यांना सांगितले होते, ''तुम्ही भीत नाही काय? मी तुमच्यासाठी एक विश्वसनीय प्रेषित आहे, म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञांकित होऊन राहा, मी या कामासाठी तुमच्याकडून कसल्याही मोबदल्याचा इच्छुक नाही. माझा मोबदला तर सर्व जगांच्या पालनकर्त्याकडे आहे. ही तुमची काय अवस्था आहे की प्रत्येक उंच स्थळी व्यर्थ एक स्मारक इमारत बांधून टाकता, आणि मोठमोठाले महाल उभारता जणू तुम्ही सदैव राहणारे आहात. आणि जेव्हा एखाद्यावर हात टाकता तेव्हा कठोर बनून टाकता, म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञांकित राहा. भय बाळगा त्याचे ज्याने ते सर्वकाही तुम्हाला दिले आहे जे तुम्ही जाणता, तुम्हाला जनावरे दिलीत, संतती दिली, उद्याने दिलीत आणि झरे दिलेत. मला तुमच्याबाबतीत एका भयंकर दिवसाच्या प्रकोपाची भीती आहे.'' त्यांनी उत्तर दिले, ''तू उपदेश कर अथवा करू नकोस, आमच्यासाठी सर्व एकसमान आहे. या गोष्टी तर अशाच चालत आलेल्या आहेत. आणि आम्ही प्रकोपात गुरफटणारे नाही.'' सरतेशेवटी त्यांनी त्याला खोटे ठरविले आणि आम्ही त्यांना नष्ट करून टाकले. (१२३-१३९-)

निश्चितच यात एक संकेत आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण मानणारे नाहीत. आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि परमकृपाळूदेखील. (-१३९-१४०)

समूदनी प्रेषितांना खोटे ठरविले. आठवा जेव्हा त्यांचा बंधू सॉलेह (अ.) ने त्यांना सांगितले, ''तुम्ही भीत नाही काय? मी तुमच्यासाठी एक विश्वसनीय पैगंबर आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझी आज्ञा पाळीत राहा. मी या कामासाठी

**१२)** 'भरलेली नाव'ने अभिप्रेत असे की ती नाव श्रद्धावंत माणसांनी आणि इतर जनावरांनी भरली होती. त्या जनावरांचे एक एक जोडपे बरोबर घेण्याचा आदेश दिलेला होता. सूरह, हूद, आयत क्र. ४० मध्ये याचा उल्लेख आहे.

तुमच्याकडून कोणत्याही मोबदल्याचा इच्छुक नाही. माझा मोबदला तर सर्व जगांच्या पालनकर्त्याकडे आहे. तुम्हाला त्या सर्व वस्तूंमध्ये, ज्या येथे आहेत, बस्स, अशाच प्रकारे समाधानाने राहू दिले जाईल काय? या बागा आणि झऱ्यांत? या शेतात आणि खजूरींच्या बागांत की ज्यांचे घड रसाळ आहेत? तुम्ही डोंगर खणूनखणून आनंदाने त्यांच्यात इमारती उभारता, अल्लाहचे भय बाळगा आणि माझी आज्ञा पाळीत राहा. त्या मोकाट लोकांचे आज्ञापालन करू नका, जे पृथ्वीतलावर उपद्रव माजवितात आणि कोणतीही सुधारणा करीत नाहीत.'' त्यांनी उत्तर दिले, ''तू केवळ एक जादूपीडित मनुष्य आहेस. तू आमच्यासारखाच एका माणसापेक्षा अन्य काय आहेस? आण एखादा संकेत जर तू खरा असशील.'' सॉलेह (अ.) ने सांगितले, ही उंटीण आहे, एक दिवस तिच्या पिण्यासाठी व एक दिवस तुम्ही सर्वांनी पाणी घेण्यासाठी हिला कदापि त्रास देऊ नका, नाहीतर एका भयंकर दिवसाचा प्रकोप येऊन तुम्हाला गाठील.'' परंतु त्यांनी तिच्या पायाच्या घोंडशिरा कापून टाकल्या. आणि सरतेशेवटी पश्चात्ताप करीत राहिले. प्रकोपाने त्यांना येऊन गाठले. (१४१-१५८-)

निश्चितच यांच्यात एक संकेत आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण मानणारे नाहीत. आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि परमकृपाळूदेखील. (-१५८-१५९)

लूत (अ.) च्या लोकांनी प्रेषितांना खोटे ठरविले. स्मरण करा जेव्हा त्यांचा भाऊ लूत (अ.) ने त्यांना सांगितले होते, ''काय तुम्ही भीत नाही? मी तुमच्यासाठी एक विश्वसनीय पैगंबर आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझी आज्ञा पाळत राहा. मी या कामासाठी तुमच्याकडून कोणत्याही मोबदल्याचा इच्छुक नाही. माझा मोबदला तर सर्व जगांच्या पालनकर्त्याकडे आहे. काय तुम्ही जगातील निर्मितीपैकी पुरुषाजवळ जाता? आणि तुमच्या पत्नींमध्ये तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यासाठी जे काही निर्माण केले आहे ते सोडून देता? किंबहुना तुम्ही लोक तर मर्यादा ओलांडून गेला आहात.'' त्यांनी सांगितले, ''हे लूत (अ.), जर तू या गोष्टीपासून परावृत्त झाला नाहीस तर जे लोक आमच्या वस्तीतून काढले गेले आहेत, तू सुद्धा त्यांच्यात सामील होऊन राहशील.'' त्याने सांगितले, ''तुमच्या कृत्याने जे लोक कुढत आहेत, त्यांच्यात मी सामील आहे. हे पालनकर्त्या, मला व माझ्या कुटुंबियांना यांच्या अपकृत्यापासून मुक्ती दे.'' सरतेशेवटी आम्ही त्याला व त्याच्या सर्व कुटुंबियांना वाचविले. एका म्हातारीला वगळून जी मागे राहणाऱ्यांपैकी होती.[१३] मग उरलेल्या लोकांना आम्ही नष्ट करून टाकले आणि त्यांच्यावर एक अत्यंत वाईट वर्षाव केला, जो त्या घाबरणाऱ्यांवर कोसळला होता. (१६०-१७३)

**१३)** याने अभिप्रेत हजरत लूत (अ.) यांची पत्नी आहे.



निश्चितच यांच्यात एक संकेत आहे, परंतु यांच्यापैकी बहुतेकजण मानणारे नाहीत आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि परमकृपाळूदेखील. (१७४-१७५)

'ऐकावाल्यां'नी प्रेषितांना खोटे ठरविले.[१४] स्मरण करा जेव्हा शुऐब (अ.) ने त्यांना सांगितले, ''काय तुम्ही भीत नाही? मी तुमच्यासाठी एक विश्वसनीय प्रेषित आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझी आज्ञा पाळत राहा. मी या कामासाठी तुमच्याकडून कोणत्याच मोबदल्याचा इच्छुक नाही. माझा मोबदला तर सर्व जगांच्या पालनकर्त्याकडे आहे. माप ठीक भरा आणि कोणालाही कमी देऊ नका. खऱ्या तराजूने वजन करा आणि लोकांना त्यांच्या वस्तू कमी देऊ नका. पृथ्वीतलावर उपद्रव पसरवीत फिरू नका आणि त्याच अस्तित्वाचे भय बाळगा ज्याने तुम्हाला आणि पूर्वीच्या पिढ्यांना निर्मिले आहे.'' त्यांनी सांगितले, ''तू केवळ एक जादूपीडित मनुष्य आहेस, तू अन्य काही नाहीस केवळ एक मनुष्य आमच्यासारखा आणि आम्ही तर तुला अगदी खोटा मानतो. जर तू खरा आहेस तर आमच्यावर आकाशाचा एखादा तुकडा पाड.'' शुऐब (अ.) ने सांगितले, ''माझा पालनकर्ता जाणतो जे काही तुम्ही करीत आहात.'' त्यांनी त्याला खोटे लेखले, सरतेशेवटी छत्रीवाल्या दिवसाचा प्रकोप त्यांच्यावर कोसळला.[१५] आणि तो फारच भयावह दिवसाचा प्रकोप होता. (१७६-१८९)

निश्चितच यात एक निशाणी आहे परंतु यांच्यापैकी बहुतेक मानणारे नाहीत. आणि वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता जबरदस्तही आहे आणि परमकृपाळूदेखील. (१९०-१९१)

ही सर्व जगांच्या पालनकर्त्याकडून अवतरलेली वस्तू आहे.[१६] ही घेऊन तुझ्या हृदयावर विश्वसनीय आत्मा[१७] उतरला आहे जेणेकरून तू त्या लोकांत सामील व्हावेस जे (ईश्वराकडून त्याच्या निर्मितीस) सावध करणारे आहेत. अगदी स्पष्ट अरबी भाषेत आणि

**१४)** 'ऐकावाले' (अस्हाबूल ऐका) यांचा उल्लेख पूर्वी सूरह अलहज, आयत क्र. ७८-८४ मध्ये आला आहे.

**१५)** या शब्दावरून जी गोष्ट लक्षात येते ती अशी की त्या लोकांनी अस्मानी प्रकोपाची मागणी केली असल्याकारणाने सर्वोच्च अल्लाहने त्यांच्याकडे एक ढग पाठविला. त्यांच्यावर तो ढग छत्रीसमान तोपर्यंत आच्छादित राहिला जोपर्यंत प्रकोप-वृष्टीने त्यांना पूर्णपणे नष्ट करून टाकले नाही. ही गोष्टदेखील लक्षात असावयास हवी की हजरत शुऐब (अ.) मदयन देशाकडेही पाठविले गेले होते व ऐकाकडेदेखील. दोन्ही लोकांवर प्रकोप दोन निरनिराळ्या स्वरूपात कोसळला.

**१६)** म्हणजे हा कुरआन ज्याच्या आयती ऐकविल्या जात आहेत.

**१७)** म्हणजे जिब्रईल (अ.)

पूर्वीच्या लोकांच्या ग्रंथातसुद्धा हे आढळून येते.[१८] काय या (मक्कावासी) लोकांसाठी हा संकेत नाही की यास बनीइस्राईल (यहूदी) चे विद्वान जाणतात?[१९] (परंतु यांच्या हट्टाग्रहाची स्थिती तर अशी आहे की) जर याला आम्ही एखाद्या अरबेतर माणसावर जरी अवतरला असता आणि ही (प्रासादिक अरबी वाणी) त्याने यांना पठण करून ऐकविली असती तरीसुद्धा यांनी मान्य केले नसते. अशाच प्रकारे आम्ही या (स्मरणा) ला गुन्हेगारांच्या हृदयांत घातले आहे.[२०] ते यावर श्रद्धा ठेवणार नाहीत जोपर्यंत यातनादायक प्रकोप पाहात नाहीत. मग जेव्हा तो यांच्यावर बेसावध असता कोसळेल, तेव्हा ते म्हणतील, "आता आम्हाला थोडी सवड मिळू शकेल का?" (१९२-२०३)

मग काय हे लोक आमच्या प्रकोपासाठी घाई करीत आहेत? तुम्ही कधी विचार केला, जर आम्ही यांना वर्षानुवर्षे चैन करण्याची सवड जरी दिली आणि मग पुन्हा तीच गोष्ट यांच्यावर कोसळली जिचे यांना भय दाखविले जात आहे तरी ती जीवन-सामग्री जी यांना मिळाली आहे यांच्या काय उपयोगी पडणार? (२०४-२०७)

जोपर्यंत आम्ही कोणत्याही वस्तीमध्ये उपदेश करणारे पाठविले नाहीत तोपर्यंत आम्ही कोणत्याही वस्तीला नष्ट केले नाही. आणि आम्ही अत्याचार करणारे नव्हतो. (२०८-२०९)

हा (उज्ज्वल ग्रंथ) घेऊन शैतान उतरलेले नाहीत, न ही कृती त्यांना साजेशी आहे. आणि ते असे करूही शकत नाहीत. ते तर याच्या श्रवणापासूनदेखील दूर ठेवले गेले आहेत.[२१] (२१०-२१२)

म्हणून हे पैगंबर (स.), अल्लाहबरोबर अन्य कोणाही उपास्याचा धावा करू नका, अन्यथा तुम्हीसुद्धा शिक्षा भोगणाऱ्यांमध्ये सामील व्हाल. आपल्या निकटतम नातेवाईकांना

**१८)** म्हणजे हेच स्मरण, हेच अवतरण आणि हीच दिव्य शिकवण पूर्वीच्या दैवी ग्रंथातदेखील मौजूद आहे.

**१९)** म्हणजे बनीइस्राईलच्या धर्मपंडितांना ही गोष्ट माहीत आहे की जी शिकवण दिव्य कुरआनात दिलेली आहे, ती पूर्णपणे तीच शिकवण आहे जी पूर्वीच्या दैवी ग्रंथात दिली गेली होती. पूर्वीच्या ग्रंथांची शिकवण यापेक्षा विभिन्न होती असे ते म्हणून शकत नाही.

**२०)** म्हणजे ही वाणी सत्यवादी लोकांसमान त्यांच्या अंत:करणात आत्मिक शांती आणि मानसिक स्वास्थ्य बनून शिरत नाही तर एक तप्त लोह-सळी बनून अशाप्रकारे शिरते की ते पेटून उठतात व त्यातील मजकुरावर विचार करण्याऐवजी तिचे खंडन करण्यासाठी क्लृप्त्या शोधू लागतात.

**२१)** म्हणजे ज्यावेळी हा कुरआन पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर उतरत होता त्यावेळी शैतान त्याला ऐकूही शकत नव्हते, हे तर राहोच की पैगंबर (स.) यांच्यावर कोणती गोष्ट अवतरत आहे हे त्यांना कळू शकावे.



भय दाखवा. आणि श्रद्धावंतांपैकी जे लोक तुमचे अनुकरण करतील, त्यांच्याशी आदरभावाने वागा. परंतु जर त्यांनी तुमची अवज्ञा केली तर त्यांना सांगा की, जे काही तुम्ही करीत आहात त्या जबाबदारीपासून मी मुक्त आहे. आणि त्या जबरदस्त आणि परमकृपाळूवर भिस्त ठेवा, जो तुम्हाला त्यावेळी पाहात असतो जेव्हा तुम्ही उठता.[२२] आणि नतमस्तक होणाऱ्या लोकांत तुमच्या हालचालींवर दृष्टी ठेवतो. तो सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. (२१३-२२०)

लोकहो, काय तुम्हाला मी सांगू की, शैतान कोणावर उतरत असतात? ते प्रत्येक बनावटगिरी करणाऱ्या दुराचाऱ्यांवर उतरत असतात. ऐकीव गोष्टी कानांत फुंकतात आणि त्यांच्यापैकी बहुतेक खोटे असतात.[२३] (२२१-२२३)

उरले कवी,[२४] तर त्यांच्या पाठीमागे बहकलेले लोक चालत असतात. काय तुम्ही पाहात नाही की ते प्रत्येक खोऱ्यात भटकतात आणि अशा गोष्टी सांगतात ज्या ते करीत नाहीत त्या लोकांव्यतिरिक्त ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली व अल्लाहचे पुष्कळ स्मरण केले आणि जेव्हा त्यांच्यावर अत्याचार केला गेला तेव्हा केवळ बदला घेतला.[२५] आणि अत्याचार करणाऱ्यांना लवकरच कळेल की त्यांना कोणत्या परिणामांस तोंड द्यावे लागेल.[२६] (२२४-२२७)

**२२)** उठण्याने अभिप्रेत रात्री नमाजसाठी उठणेही असू शकते आणि प्रेषितत्वाचे कर्तव्य पार पाडण्यासाठी उठणेदेखील.

**२३)** मक्केतील अश्रद्धावंतांच्या त्या आरोपाचे हे उत्तर आहे की ते अल्लाहचे पैगंबर (स.) यांना ज्योतिषी म्हणत असत.

**२४)** हेदेखील त्यांच्या या आरोपाचे उत्तर आहे की ते पैगंबर (स.) यांना कवी म्हणत असत.

**२५)** या ठिकाणी अगोदर केलेल्या कवींच्या सर्वसामान्य निर्भर्त्सनेने अशा कवींना वगळले गेले आहे ज्यांच्या ठायी चार वैशिष्ट्ये असावीत. प्रथम असे की ते श्रद्धावंत असावेत, दुसरे असे की, व्यावहारिक जीवनात ते सदाचारी असावेत, तिसरे असे की अल्लाहचे मोठ्या प्रमाणात स्मरण करणारे असावेत व चौथे म्हणजे त्यांनी वैयक्तिक स्वार्थापोटी कुणाची टवाळी तर करू नये तथापि जेव्हा अत्याचाऱ्यांविरूद्ध सत्याच्या समर्थनाची गरज भासेल तेव्हा एक योद्धा, बाण व तलवारीने जे काम घेतो तेच काम त्याने आपल्या वाणीकरवी घ्यावे.

**२६)** अत्याचार करणाऱ्यापासून अभिप्रेत या ठिकाणी ते लोक आहेत जे 'सत्यला पराभूत करण्यासाठी सर्रास हट्टीपणाने पैगंबर (स.) यांच्यावर कवी, ज्योतिषी, जादूगिरी आणि वेडेपणाचा आळ घेत हिंडत होते. जेणेकरून अज्ञानी लोकांचा पैगंबर (स.) यांच्या आवाहनाविषयी गैरसमज व्हावा व त्यांनी त्यांच्या शिकवणीकडे लक्ष देऊ नये.

# २७ सूरह अन्नम्ल

*(मक्काकालीन, वचने ९३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

ताऽ-सीऽऽन्. हे संकेत आहेत कुरआन आणि स्पष्ट[१] ग्रंथाचे मार्गदर्शन आणि खुशखबर, त्या श्रद्धावंतांसाठी जे नमाज कायम करतात आणि जकात देतात, आणि शिवाय ते असे लोक आहेत जे मरणोत्तर जीवनावर पूर्ण विश्वास ठेवतात. वस्तुस्थिती अशी आहे की जे लोक मरणोत्तर जीवन मानीत नाहीत त्यांच्यासाठी आम्ही त्यांच्या कृत्यांना आकर्षक बनविले आहे, म्हणून ते भटकत फिरत असतील. हे ते लोक आहेत ज्यांच्यासाठी वाईट शिक्षा आहे, आणि मरणोत्तर जीवनात हेच सर्वात जास्त तोट्यात राहणारे आहेत. आणि हे पैगंबर (स.), नि:संशय तुम्ही हा कुरआन एका बुद्धिमान व ज्ञानी अस्तित्वाकडून प्राप्त करीत आहात. (१-६)

(यांना त्यावेळची कथा ऐकवा) जेव्हा मूसा (अ.) ने आपल्या कुटुंबियांना सांगितले, "मला एक अग्नीसारखा दिसला आहे. मी आता तेथून एखादी बातमी आणतो अथवा एखादा निखारा वेचून आणतो, जेणेकरून तुम्ही ऊब घ्यावी." तेथे जेव्हा पोहचला तेव्हा हाक आली, "धन्य आहे तो जो या अग्नीत आहे आणि जो याच्या परिसरांत आहे. पवित्र आहे अल्लाह सर्व जगन्निवासींचा पालनकर्ता, हे मूसा (अ.), हा मी आहे अल्लाह जबरदस्त आणि बुद्धिमान. आणि टाक तर जरा आपली लाठी." ज्याक्षणी मूसा (अ.) ने पाहिले लाठी सर्पाप्रमाणे वळवळत आहे तेव्हा पाठ फिरवून तो पळाला आणि मागे वळूनसुद्धा पाहिले नाही. "हे मूसा (अ.) भिऊ नकोस, माझ्या पुढे पैगंबर भीत नसतात, याव्यतिरिक्त की एखाद्याने चूक केली असेल. मग जर वाईटानंतर त्याने चांगुलपणाने (आपल्या कृत्यास) बदलून टाकले तर मी माफ करणारा मेहेरबान आहे. आणि जरा आपला हात आपल्या छातीजवळ तर धर, चकाकत निघेल कोणत्याही अडचणींशिवाय हे (दोन संकेत) नऊ संकेतांपैकी आहेत, फिरऔन आणि त्याच्या लोकांकडे (घेऊन जाण्यासाठी), ते मोठे दुराचारी लोक आहेत." (७-१२)

परंतु जेव्हा आमची उघड उघड संकेतचिन्हे त्या लोकांसमोर आली तेव्हा त्यांनी सांगितले की, ही तर उघड जादू आहे. त्यांनी सर्रास अत्याचार आणि घमेंडीच्या मार्गाने त्या संकेतचिन्हांचा इन्कार केला, वस्तुत: त्यांच्या मनाला ते पटले होते. आता पहा, त्या उपद्रवी लोकांचा शेवट कसा झाला. (१३-१४)

---

१) म्हणजे त्या ग्रंथाच्या आयती जो आपली शिकवण आणि आपल्या आज्ञा व सूचना अगदी स्पष्ट रीतीने वर्णन करतो.



(दुसरीकडे) आम्ही दाऊद (अ.) व सुलैमान (अ.) यांना ज्ञान प्रदान केले, आणि त्यांनी सांगितले की, "कृतज्ञ आहोत त्या अल्लाहचे ज्याने आम्हाला पुष्कळशा आपल्या श्रद्धावंत दासांवर श्रेष्ठत्व प्रदान केले." आणि दाऊद (अ.) चा वारस सुलैमान (अ.) झाला, आणि त्याने सांगितले, "लोकहो, आम्हाला पक्षांच्या भाषा शिकविल्या गेल्या आहेत आणि आम्हाला सर्व प्रकारच्या वस्तू दिल्या गेल्या आहेत,[२] नि:संशय ही (अल्लाहची) ढळढळीत कृपा आहे." सुलैमान (अ.) साठी जिन्नांचे, माणसांचे आणि पक्षांचे लष्कर जमविले गेले होते आणि ते पूर्ण नियंत्रणाखाली ठेवले जात होते. (एकदा तो त्यांच्यासमवेत कूच करीत होता) येथपावेतो की हे सर्व जेव्हा मुंग्यांच्या खोऱ्यात पोहचले, तेव्हा एका मुंगीने सांगितले, "हे मुंग्यानो, आपल्या बिळात शिरा, कदाचित असे होऊ नये की, सुलैमान (अ.) आणि त्याच्या लष्कराने तुम्हाला तुडवून टाकावे आणि त्यांना याची खबरसुद्धा नसावी." सुलैमान (अ.) तिच्या बोलण्यावर स्मित करून हसला आणि म्हणाला, "हे माझ्या पालनकर्त्या, मला नियंत्रणात ठेव की[३] मी तुझ्या त्या उपकाराबद्दल कृतज्ञता व्यक्त करीत राहीन जे तू माझ्यावर व माझ्या मातापित्यावर केले आहेस, आणि असे सत्कृत्य करावे जे तुला आवडेल आणि आपल्या कृपेने मला आपल्या सदाचारी दासांमध्ये सामील कर." (१५-१९)

(आणखी एका प्रसंगी) सुलैमान (अ.) ने पक्षांचे निरीक्षण केले आणि म्हणाला, "काय झाले आहे की अमुक सुतार पक्षी दिसत नाही? तो कुठे बेपत्ता झाला आहे काय? मी त्याला कठोर शिक्षा देईन, अथवा त्याचा बळी देईन अन्यथा त्याला माझ्यासमोर योग्य कारण द्यावे लागेल." काही जास्त वेळ गेला नाही की त्याने येऊन सांगितले, "मी ती माहिती मिळविली आहे जी आपल्याला ज्ञात नाही. मी सबा[४]च्या संबंधी विश्वसनीय बातमी घेऊन आलो आहे. मी तेथे एक स्त्री पाहिली जी त्या लोकांची शासक आहे. तिला सर्व प्रकारची साधनसामग्री प्रदान केली गेली आहे आणि तिचे सिंहासन फार वैभवशाली आहे. मी पाहिले की ती व तिचे लोक अल्लाहऐवजी सूर्यासमोर नतमस्तक होतात." शैतानाने[५]

---

२) म्हणजे अल्लाहने दिलेले सर्वकाही आमच्याजवळ मौजूद आहे.

३) म्हणजे ज्या वैभवशाली शक्ती व कुवती तू मला दिल्या आहेस त्या अशा आहेत की मी जरादेखील बेसावधपणात राहिलो तर बंदगीचे सीमोल्लंघन होऊन आपल्या मोठेपणाच्या खुळात न जाणो कोठेच्या कोठे भरकटीन. म्हणून हे माझ्या पालनकर्त्या, तू मला नियंत्रणात ठेव जेणेकरून मी देणगीबद्दल कृतघ्न बनण्याऐवजी त्याबद्दल सदैव कृतज्ञता दाखवीत राहावी.

४) 'सबा' हा दक्षिण अरबस्तानाचा प्रसिद्ध व्यापार व्यवसायी लोकसमूह होता. त्याच्या राजाचे केंद्र मआरिब (सन्आपासून ५५ मैल अंतरावर) होते.

५) वर्णनशैलीवरून स्पष्ट होत आहे की येथून आयत क्र. २६ च्या शेवटपर्यंत 'हुदहुद'-सुतारपक्षीच्या कथनात सर्वोच्च अल्लाहकडून स्वत: केलेली वाढ आहे.

त्यांची कृत्ये त्यांच्यासाठी आकर्षक बनविलीत आणि त्यांना सरळमार्गापासून रोखले. या कारणास्तव त्यांना हा सरळ मार्ग लाभत नाही की अल्लाहपुढे नतमस्तक व्हावे, जो आकाश आणि पृथ्वीतील दडलेल्या वस्तू काढतो, आणि ते सर्वकाही जाणतो जे तुम्ही लपविता आणि प्रकट करता, अल्लाह ज्याच्याशिवाय कोणीही उपास्य नाही, जो महान राजसिंहासन (अर्श) चा मालक आहे. (२०-२६)

सुलैमान (अ.) ने सांगितले, "आताच आम्ही पाहून घेतो की तू खरे म्हटले आहेस अथवा तू खोटे बोलणाऱ्यांपैकी आहेस. माझे हे पत्र घेऊन जा आणि याला त्या लोकांकडे टाकून दे आणि मग दूर राहून पहा की ते कोणती प्रतिक्रिया व्यक्त करतात." (२७-२८)

राणी[6] म्हणाली, "हे दरबारी लोकहो, माझ्याकडे एक फार महत्वाचे पत्र पाठविले गेले आहे ते सुलैमान (अ.) कडून आहे आणि ते कृपावंत व दयावंत अल्लाहच्या नावाने सुरू केले गेले आहे. मजकूर असा आहे की, "माझ्या विरोधात दुर्वर्तन करू नका आणि आज्ञाधारक[7] बनून माझ्यासमोर हजर व्हा." (२९-३१)

(पत्र ऐकवून) राणी म्हणाली, "हे सरदारांनो, याबाबतीत मला सल्ला द्या, मी कोणत्याही मामल्याचा निर्णय तुमच्याशिवाय घेत नसते." त्यांनी उत्तर दिले, "आम्ही शक्तिमान आणि लढवय्ये लोक आहोत. पुढील निर्णय घेणे आपल्या हाती आहे, आपण स्वत: पहा की आपणास कोणता आदेश द्यावयाचा आहे." राणी म्हणाली, "राजे जेव्हा एखाद्या देशात घुसून येतात तेव्हा ते त्याचे वाटोळे करतात आणि त्यातील प्रतिष्ठितांना अपमानित करतात, असेच काही ते करीत असतात. मी त्या लोकांकडे एक भेट पाठविते, मग पाहते की माझे दूत कोणते उत्तर घेऊन परत येतात." (३२-३५)

जेव्हा तो (राणीचा दूत) सुलैमान (अ.) कडे आला तेव्हा तो म्हणाला, "तुम्ही लोक संपत्तीने माझी मदत करू इच्छिता काय? जे काही अल्लाहने मला देऊन ठेवले आहे त्याच्यापेक्षा फार जास्त आहे जे तुम्हाला दिले गेले आहे. तुमची भेट तुम्हालाच लखलाभ होवो. (हे दूता!) परत जा आपल्या पाठविणाऱ्याकडे! आम्ही त्यांच्यावर अशा सैन्यासह येऊ ज्यांचा मुकाबला ते करू शकणार नाहीत. आणि आम्ही त्यांना असे अपमानित करून तेथून काढू की ते लाचार बनून राहतील." (३६-३७)

सुलैमान (अ.) ने सांगितले, "हे दरबारी लोकांनो! तुमच्यापैकी कोण तिचे सिंहासन माझ्यापाशी आणील त्या अगोदर की ते लोक आज्ञाधारक बनून माझ्यासमोर हजर होतील?" जिन्नांपैकी एका सशक्ताने सांगितले, "मी ते हजर करीन यापूर्वी की

---

**६)** मधली कथा सोडून जेव्हा 'हुदहुद'ने पत्र राणीच्या पुढ्यात टाकले त्या प्रसंगाचा उल्लेख होत आहे.

**७)** म्हणजे इस्लाम स्वीकारून अथवा आज्ञांकित बनून.



आपण आपल्या जागेवरून उठाल. मी याचे सामर्थ्य बाळगतो आणि विश्वस्त आहे." ज्या व्यक्तीजवळ ग्रंथाचे एक ज्ञान होते, तो म्हणाला, "मी आपली पापणी लवण्यापूर्वी ते आणून देतो." ज्याक्षणी सुलैमान (अ.) ने ते सिंहासन आपल्याजवळ ठेवलेले पाहिले, तो उद्‌गारला, "हा माझ्या पालनकर्त्याचा कृपाप्रसाद आहे जेणेकरून तो माझी परीक्षा घेत आहे की मी कृतज्ञ बनतो की कृतघ्नता दाखवितो आणि जो कुणी कृतज्ञ बनतो आणि कृतज्ञता दाखवितो त्याच्यासाठीच लाभकारी आहे, अन्यथा एखाद्याने कृतघ्नता दर्शविली तर माझा पालनकर्ता निरपेक्ष आणि स्वयंसिद्ध प्रतिष्ठावान आहे." (३८-४०)

सुलैमान (अ.) ने सांगितले,[8] "अपरिचित रीतीने तिचे सिंहासन तिच्यासमोर ठेऊन द्या, पाहू या किती खऱ्या गोष्टीपर्यंत ती पोहचते अथवा त्या लोकांपैकी होते ज्यांना सरळमार्ग पावत नाही." राणी जेव्हा हजर झाली तेव्हा तिला सांगण्यात आले तुझे सिंहासन असेच आहे का? ती म्हणू लागली, "हे तर जणू तेच आहे. आम्ही तर अगोदरच जाणून घेतले होते आणि आम्ही आज्ञेत मान तुकविली होती. (अथवा आम्ही मुसलमान[9] बनलो होतो)" (तिला श्रद्धा ठेवण्यापासून) ज्या गोष्टीने रोखून ठेवले होते ती त्या उपास्यांची आराधना होती ज्यांची ती अल्लाहशिवाय पूजा करीत होती कारण ती एका अश्रद्धावंत लोकसमुदायापैकी होती. (४१-४३)

तिला सांगितले गेले की, महालात प्रवेश कर. तिने जे पाहिले तर तिला वाटले की, पाण्याचा हौद आहे आणि उतरण्याकरिता तिने आपल्या विजारीचा खालचा भाग वर उचलला. सुलैमान (अ.) ने सांगितले, "ही काचेची गुळगुळीत फरसबंदी आहे." यावर ती उद्‌गारली, "हे माझ्या पालनकर्त्या (आजपर्यंत) मी स्वत: आपल्यावर मोठा अन्याय करीत राहिले आणि आता मी सुलैमान (अ.) समवेत सर्व जगांच्या पालनकर्त्या अल्लाहची आज्ञाधारकता स्वीकारली." (४४)

आणि समूद लोकांकडे आम्ही त्यांचा भाऊ सॉलेह (अ.) ला (हा संदेश देऊन) पाठविले की, अल्लाहची भक्ती करा, तर एकाएकी ते परस्परविरोधी दोन पक्ष बनले. सॉलेह (अ.) ने सांगितले, "हे माझ्या देशबांधवांनो, भल्याच्या अगोदर बुराईसाठी का घाई करता? का बरे अल्लाहची क्षमा मागत नाही? कदाचित तुमच्यावर दया केली जाईल." त्यांनी सांगितले, "आम्हाला तर तुम्ही आणि तुमचे सोबती अपशकुनाचे प्रतीक आढळला आहात." सॉलेह (अ.) ने उत्तर दिले, "तुमच्या शुभ व अशुभ शकुनांचे सूत्र

---

**८)** आता त्या प्रसंगाचा उल्लेख सुरू होत आहे जेव्हा सबाची राणी हजरत सुलैमान (अ.) यांची भेट घेण्यासाठी हजर झाली.

**९)** म्हणजे हा चमत्कार पाहण्याअगोदरच सुलैमान (अ.) यांचे गुण व त्यांच्याबद्दल माहिती आम्हाला कळाली होती. त्या आधारे ते अल्लाहचे प्रेषित आहेत, केवळ एका सत्तेचे अधिपती नाहीत अशी आमची खात्री झाली होती.

तर अल्लाहजवळ आहे. खरी गोष्ट अशी आहे की तुम्हा लोकांची परीक्षा होत आहे.'' (४५-४७)

त्या शहरात नऊ जथेदार होते जे देशात उपद्रव माजवीत आणि कोणतेही सुधारणेचे काम करीत नसत. त्यांनी आपापसांत सांगितले, ''अल्लाहची शपथ घेऊन प्रतिज्ञा करा की आम्ही सॉलेह (अ.) आणि त्याच्या कुटुंबियांवर छापा मारू आणि मग त्यांच्या सरदाराला[१०] सांगू की आम्ही त्याच्या कुटुंबियांच्या हत्येच्या वेळी हजर नव्हतो, आम्ही अगदी खरे सांगतो. ''हा डाव तर ते खेळले आणि मग एक डाव आम्ही खेळलो ज्याची त्यांना माहिती नव्हती. आता पहा की त्यांच्या डावाचा शेवट कसा झाला. आम्ही नष्ट करून टाकले त्यांना आणि त्यांच्या सर्व लोकांना. त्यांची घरे ओस पडली आहेत त्या अत्याचारापायी जे ते करीत होते. यात एक बोधप्रद संकेत आहे त्या लोकांसाठी जे ज्ञान बाळगतात. आणि वाचविले आम्ही त्या लोकांना ज्यांनी श्रद्धा ठेवली होती. आणि अवज्ञेपासून दूर राहात होते. (४८-५३)

आणि लूत (अ.) ला आम्ही पाठविले. आठवा ती वेळ जेव्हा त्याने आपल्या समूहाला सांगितले, ''तुम्ही डोळ्यांदेखत व्यभिचार[११] करता काय? काय तुमची हीच परंपरा आहे की स्त्रियांना सोडून पुरुषाजवळ संभोगासाठी जाता? वस्तुस्थिती अशी आहे की तुम्ही लोक घोर अज्ञानमूलक कृत्य करीत आहात.'' परंतु त्यांच्या लोकसमूहाचे उत्तर याशिवाय काही नव्हते की त्यांनी सांगितले, ''काढून टाका लूत (अ.) च्या कुटुंबियांना आपल्या वस्तीतून. हे मोठे पावित्र्यवान बनतात.'' सरतेशेवटी आम्ही वाचविले त्याला व त्याच्या कुटुंबियांना, त्याच्या पत्नीखेरीज जिचे पाठीमागे राहणे आम्ही निश्चित केलेले होते, आणि वर्षविली त्यांच्यावर एक वृष्टी, अत्यंत वाईट वृष्टी होती ती त्यांच्यासाठी ज्यांना ताकीद दिली गेली होती. (५४-५८)

(हे पैगंबर (स.)!) सांगा, स्तुती आहे अल्लाहसाठी आणि सलाम आहे त्याच्या त्या दासांवर ज्यांना त्याने निवडले. (५९-)

(यांना विचारा) अल्लाह उत्तम आहे की ते उपास्य ज्यांना हे लोक त्याचा भागीदार

---

**१०)** म्हणजे हजरत सॉलेह (अ.) यांच्या जमातीच्या सरदाराशी ज्यास प्राचीन टोळीवाल्यांच्या वहिवाटीनुसार त्यांच्या खुनाबद्दल दाव्याचा अधिकार होता. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळात त्यांचे चुलते अबूतालिब यांना जे स्थान प्राप्त होते, तेच हे स्थान होय. कुरैशांतील अश्रद्धावंतदेखील याच भीतीपोटी हात आवरून होते की जर त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना ठार केले तर हाशिम वंशाचे सरदार अबूतालिब आपल्या टोळीच्या बाजूने खुनाबद्दल दाव्यासाठी उभे ठाकतील.

**११)** म्हणजे एक दुसऱ्यासमोर व्यभिचार करतात. याचे स्पष्टीकरण पुढे सूरह अनकबूत, आयत क्र. २९ मध्येही केले गेले आहे की ते आपल्या भरसभेत असले कुकर्म करीत असत.



बनवीत आहेत? तो कोण आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला निर्माण केले आणि तुमच्यासाठी आकाशातून पाण्याचा वर्षाव केला, मग त्याच्याद्वारे त्या प्रियदर्शनी बागा उगविल्या ज्यांच्या झाडांना उगविणे तुमच्या आवाक्यात नव्हते? अल्लाहबरोबर कोणी दुसरा उपास्यदेखील (या कामांमध्ये सामील) आहे काय? (नाही) किंबहुना हेच लोक सरळ मार्गापासून दूर होऊन भरकटत चालले आहेत. (-५९-६०)

आणि तो कोण आहे ज्याने पृथ्वीला निवासस्थान बनविले आणि त्यात नद्या प्रवाहित केल्या व त्यात (पर्वतांच्या) खुंट्या रोवल्या आणि पाण्याच्या दोन साठ्यांच्या दरम्यान अडसर उभारले? काय अल्लाहसमवेत एखादा अन्य उपास्य सुद्धा (या कामात सहभागी) आहे? नाही, तर यांच्यापैकी बहुतेक लोक नादान आहेत. (६१)

कोण आहे जो अस्वस्थ झालेल्याची प्रार्थना ऐकतो जेव्हा तो त्याचा धावा करतो आणि कोण त्याचा त्रास दूर करतो? आणि (कोण आहे जो) तुम्हाला पृथ्वीचा नायब बनवितो? काय अल्लाहसमवेत कोणी अन्य उपास्य सुद्धा (हे कार्य करणारा) आहे? तुम्ही लोक कमीच विचार करता. (६२)

आणि तो कोण आहे जो खुष्की व समुद्राच्या अंधकारात तुम्हाला मार्ग दाखवितो आणि कोण आपल्या कृपेपुढे वाऱ्यांना सुवार्ता घेऊन पाठवितो? काय अल्लाहसमवेत कोणी दुसरा उपास्य सुद्धा (हे कार्य करीत) आहे? फार उच्च व श्रेष्ठतर आहे अल्लाह त्या शिर्क (अनेकेश्वरवादा) पासून जे हे करीत आहेत. (६३)

आणि तो कोण आहे जो निर्मितीस प्रारंभ करतो आणि मग तिची पुनरावृत्ती करतो? आणि कोण तुम्हाला आकाश व पृथ्वीपासून उपजीविका देतो? काय अल्लाहसमवेत कोणी अन्य उपास्य सुद्धा (या कामात भागीदार) आहे? सांगा की आणा आपले प्रमाण जर तुम्ही खरे असाल. (६४)

यांना सांगा, अल्लाहशिवाय आकाशांमध्ये व पृथ्वीत कोणी परोक्षाचे ज्ञान बाळगत नाही व ते (तुमचे उपास्य तर हेसुद्धा) जाणत नाहीत की केव्हा ते उठविले जातील. (६५)

किंबहुना मरणोत्तर जीवनाचे तर ज्ञानच या लोकांकडून हरवले आहे, किंबहुना त्यासंबंधी साशंक आहेत, किंबहुना हे त्या बाबतीत आंधळे आहेत. हे इन्कार करणारे म्हणतात, ''काय जेव्हा आम्ही व आमचे वाडवडील माती बनलेली असू, तेव्हा खरोखर आम्हाला थडग्यांमधून काढले जाईल? या बातम्या आम्हालासुद्धा खूप दिल्या गेल्या आहेत आणि पूर्वी आमच्या वाडवडिलांनासुद्धा दिल्या जात राहिल्या आहेत, परंतु या तर बस्स कथाच आहेत ज्या पूर्व काळापासून ऐकत आलेलो आहोत.'' सांगा, थोडे पृथ्वीवर फेरफटका मारून पहा की गुन्हेगारांचा कसा शेवट झालेला आहे. हे पैगंबर (स.), यांच्या

दशेवर दु:ख करू नका आणि यांच्या डावपेचावर कष्टीही होऊ नका. ते म्हणतात की, हे वचन केव्हा साकार होईल जर तुम्ही खरे असाल.'' सांगा, यात काय नवल की ज्या प्रकोपासाठी तुम्ही घाई करीत आहात त्याचा एक भाग तुमच्याजवळ येऊन ठेपला आहे. वस्तुस्थिती अशी आहे की तुझा पालनकर्ता तर लोकांवर फार मेहेरबानी करणारा आहे परंतु बहुतेक लोक कृतज्ञता दर्शवीत नाहीत. नि:संशय तुझा पालनकर्ता चांगल्याच प्रकारे जाणतो जे काही त्यांच्या मनांमध्ये दडलेले आहे आणि जे काही ते व्यक्त करतात. आकाश व पृथ्वीची कोणतीही गुप्त गोष्ट अशी नाही, जी एका स्पष्ट ग्रंथात नमूद असलेली नाही.[१२] (६६-७५)

ही वस्तुस्थिती आहे की हा कुरआन बनीइस्राईलना बहुतांशी त्या गोष्टींची वास्तविकता दर्शवितो ज्यात ते मतभेद बाळगतात, आणि हा मार्गदर्शन व कृपा आहे श्रद्धावंतांसाठी. निश्चितच (अशाप्रकारे) तुझा पालनकर्ता या लोकांच्या दरम्यानसुद्धा आपल्या आदेशाने निवाडा करील[१३] आणि तो जबरदस्त आणि सर्वकाही जाणणारा आहे. तर हे पैगंबर (स.), अल्लाहवर भरोसा ठेवा, खचितच तुम्ही उघड सत्यावर आहात, तुम्ही मृतांना[१४] ऐकवू शकत नाही, व त्या बहिऱ्यांपर्यंतही आपलीहाक पोहचवू शकत नाही जे पाठ फिरवून पळत सुटले आहेत, आणि आंधळ्यांनाही मार्ग दाखवून भटकण्यापासून वाचवू शकत नाही. तुम्ही तर आपले म्हणणे त्यांनाच ऐकवू शकता जे आमच्या वचनांवर श्रद्धा ठेवतात आणि मग आज्ञाधारक बनतात. (७६-८१)

आणि जेव्हा आमचे वचन पूर्ण होण्याची वेळ त्यांच्यावर येऊन ठेपेल तेव्हा आम्ही त्यांच्यासाठी एक जीव जमिनीतून काढू जो त्यांच्याशी संभाषण करील की लोक आमच्या

**१२)** स्पष्ट ग्रंथाने अभिप्रेत आहे विधिलेख.

**१३)** म्हणजे कुरैशातील अश्रद्धावंत आणि श्रद्धावंतांच्या दरम्यान.

**१४)** म्हणजे अशा लोकांना ज्यांची सद्सद्विवेकबुद्धी मृत झाली आहे व ज्यांच्यात हेकेखोरी, हट्टाग्रहाने तसेच रूढीप्रियतेने सत्य व असत्य यांच्यातील फरक समजण्याची कोणतीही क्षमता राहू दिली नाही.



वचनांवर विश्वास ठेवीत नव्हते.[१५] आणि जरा कल्पना करा त्या दिवसाची जेव्हा आम्ही प्रत्येक लोकसमुदायातून एक फौजची फौज त्या लोकांची घेरून आणू जे आमच्या संकेतांना खोटे ठरवीत होते, मग त्यांची (त्यांच्या प्रकारानुसार यथाश्रेणी) वर्गवारी केली जाईल येथपावेतो की जेव्हा सर्वजण येतील तेव्हा (त्यांचा पालनकर्ता त्यांना) विचारील की, ''तुम्ही माझ्या संकेतांना खोटे ठरविले, वास्तविक तुम्ही त्यांना ज्ञानकक्षेत आणले नव्हते? जर असे नाही तर दुसरे तुम्ही काय करीत होता?'' आणि त्याच्या अत्याचारामुळे प्रकोपाचे वचन त्यांच्यावर पूर्ण होईल तेव्हा ते काहीही बोलू शकणार नाहीत. त्यांना उमगत नव्हते का की आम्ही रात्र त्यांना विश्रांती घेण्यासाठी बनविली होती आणि दिवसाला प्रकाशमान केले होते? यात बरेच संकेत होते त्या लोकांसाठी जे श्रद्धा ठेवीत आहेत. (८२-८६)

आणि काय घडेल त्या दिवशी जेव्हा शिंग फुंकले जाईल आणि धसका घेतील ते सर्व जे आकाशांत आणि पृथ्वीत आहेत, त्या लोकांखेरीज ज्यांना अल्लाह त्या धास्तीपासून वाचवू इच्छिल आणि सर्व निमूटपणे त्याच्या हुजुरात हजर होतील. आज तू पर्वतांना पाहतोस आणि समजतोस की खूप दृढ आहेत पण त्यावेळी हे ढगांप्रमाणे उडत असतील, हा अल्लाहच्या सामर्थ्याचा चमत्कार असेल, ज्याने प्रत्येक वस्तूला परिपूर्ण घडविले आहे. तो भल्याप्रकारे जाणतो की तुम्ही लोक काय करता, जो मनुष्य भलेपणा घेऊन येईल त्याला त्याच्यापेक्षा अधिक चांगला मोबदला मिळेल आणि असले लोक त्या

**१५)** हजरत अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे की हे त्यावेळी घडेल जेव्हा पृथ्वीवर कोणी नेकीचा आदेश देणारा व बुराईपासून रोखणारा उरणार नाही. एक हदीस हजरत अबूसईद खुदरी (रजि.) यांच्याकडून निवेदित आहे. त्यात ते फर्मावितात की हीच गोष्ट त्यांनी स्वत: पैगंबर (स.) यांच्या मुखाने ऐकली होती. त्यावरून हे स्पष्ट होते की जेव्हा माणसे नेकीचे आदेश आणि बुराईपासून रोखण्याचे काम सोडून देतील तेव्हा प्रलय उद्भवण्याअगोदर सर्वोच्च अल्लाह एका जनावराद्वारे शेवटच्या वेळी बोध प्रमाणित करील. सदरहू जनावर एकच असेल की एका विशिष्ट प्रकारचा प्राणीमात्र असेल, की ज्याचे अनेक वंशज पृथ्वीतलावर फैलावतील ही गोष्ट स्पष्ट नाही. 'दाब्बतम मिनलअर्द' या अरबी शब्दात दोन्ही अर्थ समाविष्ट आहेत. सदरहू जनावराची बाहेर येण्याची वेळ कोणती असेल? या संबंधाने पैगंबर (स.) यांचे कथन असे, 'सूर्य पश्चिमेकडून उगवेल, व एकेदिवशी दिवसाढवळ्या हे जनावर बाहेर निघेल.' उरले एखाद्या जनावराचे माणसाबरोबर मानवी भाषेत संभाषण करणे तर हा अल्लाहच्या सामर्थ्याचा चमत्कार आहे. तो हवे त्याला वाक्शक्ती प्रदान करू शकतो. प्रलयापूर्वी तर तो केवळ एका जनावरालाच वाक्शक्ती बहाल करील. परंतु जेव्हा प्रलय साकार होईल तेव्हा अल्लाहच्या न्यायालयात माणसाचे डोळे व कान, व त्याच्या शरीराची त्वचादेखील वाचा फोडेल, जसे दिव्य कुरआनात स्पष्टपणे सांगितले आहे. (हा मीम अस्सजदा, आयत क्र. २०, २१)

दिवसाच्या धास्तीपासून सुरक्षित राहतील, आणि जो वाईटपणा घेऊन येईल असले सर्व लोक पालथ्या तोंडी अग्नीत फेकले जातील. काय तुम्ही याव्यतिरिक्त अन्य एखादा मोबदला प्राप्त करू शकता की, जसे तुम्ही कराल तसेच तुम्हाला लाभेल. (८७-९०)

(हे पैगंबर (स.) यांना सांगा,) ''मला तर हीच आज्ञा दिली गेली आहे की या (मक्का) शहराच्या पालनकर्त्याची भक्ती करावी ज्याने याला (आदरणीय) बनविले आहे आणि जो प्रत्येक गोष्टीचा स्वामी आहे. मला आज्ञा दिली गेली आहे की मी मुस्लिम-आज्ञाधारक बनून राहावे आणि हा कुरआन पठण करून ऐकवावे.'' आता जो मार्गदर्शन स्वीकारील तो आपल्याच भल्यासाठी मार्गदर्शन स्वीकारील आणि जो मार्गभ्रष्ट असेल त्याला सांगा की, ''मी तर केवळ सावध करणारा आहे.'' यांना सांगा, स्तुती अल्लाहसाठीच आहे. लवकरच तो तुम्हाला आपले संकेत दाखवून देईल आणि तुम्ही त्यांना ओळखाल, आणि तुझा पालनकर्ता अनभिज्ञ नाही त्या कृत्यांपासून जी तुम्ही लोक करीत आहात. (९१-९३)



# २८ सूरह अल्क़सस

*(मक्काकालीन, वचने ८८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तॉऽ सीऽऽम् मीऽऽम. ही स्पष्ट ग्रंथाची वचने आहेत. आम्ही मूसा (अ.) आणि फिरऔनचा काही वृत्तांत खरा खरा तुम्हाला ऐकवितो. अशा लोकांच्या लाभासाठी जे श्रद्धा ठेवतील. (१-३)

हकीकत अशी आहे की फिरऔनने भूतलावर दुर्वर्तन केले आणि तिच्या निवासीयांना गटागटांत विभागले. त्यांच्यापैकी एका गटाला तो अपमानित करीत असे, त्यांच्या मुलांना ठार करीत असे व त्यांच्या मुलींना जिवंत ठेवीत असे. खरोखरच तो हिंसाचारी लोकांपैकी होता. आणि आम्ही असा इरादा बाळगत होतो की मेहेरबानी करावी त्या लोकांवर, ज्यांना भूतलावर दुर्बल बनवून ठेवले गेले होते आणि त्यांना नेते बनवावे आणि त्यांनाच वारस बनवावे आणि भूतलावर त्यांना सत्ता प्रदान करावी आणि त्यांच्याकडून फिरऔन आणि हामान आणि त्यांच्या सैन्यांना तेच सर्वकाही दाखवावे. ज्यांचे त्यांना भय वाटत होते. (४-६)

आम्ही मूसा (अ.) च्या आईला संकेत[१] दिला की, ''याला दूध पाज, मग जेव्हा तुला त्याच्या जिवाचे भय वाटेल तेव्हा त्याला नदीत सोडून दे आणि कसलेही भय आणि दुःख बाळगू नकोस आम्ही त्याला तुझ्यापाशीच परत घेऊन येऊ आणि त्याला पैगंबरांत समाविष्ट करू.'' सरतेशेवटी फिरऔनच्या कुटुंबियांनी त्याला (नदीतून) काढून घेतले की जेणेकरून तो त्यांचा शत्रू आणि त्यांच्यासाठी दुःखाचे कारण ठरेल. खरोखरच फिरऔन आणि हामान व त्यांचे लष्कर (आपल्या युक्तीमध्ये) मोठे दुराचारी होते. फिरऔनच्या पत्नीने (त्याला) सांगितले, ''हा माझ्या आणि तुझ्यासाठी नेत्रसुख आहे, याला ठार करू नकोस, कदाचित हा आमच्यासाठी लाभदायक ठरेल अथवा आम्ही याला पुत्रच मानू.'' आणि ते (परिणामापासून) बेसावध होते. (७-९)

तिकडे मूसा (अ.) ची आई हवालदिल होत होती. तिने तिचे रहस्य उघड केले असते जर आम्ही तिचे धैर्य दृढ केले नसते जेणेकरून ती (आमच्या वचनावर) श्रद्धा ठेवणाऱ्यांपैकी होती. तिने बाळाच्या बहिणीला सांगितले, याच्या मागेमागे जा, म्हणून ती अलग राहून त्याला अशा प्रकारे पाहात राहिली की (शत्रूंना) ते कळले नाही. आणि आम्ही स्तनपान करविणाऱ्यांना बाळावर निषिद्ध केले होते. (ही स्थिती पाहून) त्या मुलीने त्यांना सांगितले, ''मी तुम्हाला अशा घराचा पत्ता देऊ का जेथील लोक याच्या संगोपनाची

१) मध्यंतरी हा उल्लेख वगळला गेला आहे की याच परिस्थितीत एका इस्राईली कुटुंबात ते मूल जन्मले ज्यास जगाने मूसा (अ.) या नावाने ओळखले.

जबाबदारी घेतील आणि त्याचे हितचिंतक होतील?'' अशाप्रकारे आम्ही मूसा (अ.) ला त्याच्या आईकडे परत आणले जेणेकरून तिचे नेत्र सुखावले जावेत. आणि ती दुःखी होऊ नये व तिने जाणावे की अल्लाहचे वचन खरे होते, परंतु बहुतेक लोक ही गोष्ट जाणत नाहीत. (१०-१३)

जेव्हा मूसा (अ.) ने तारुण्य गाठले आणि तो समर्थ झाला तेव्हा आम्ही त्याला हुकूम आणि ज्ञान प्रदान केले, आम्ही सदाचारी लोकांना असाच मोबदला देत असतो. (एके दिवशी) तो शहरात अशावेळी प्रविष्ट करता झाला जेव्हा शहरवासी बेसावध पडले होते. तेथे त्याने पाहिले की दोन माणसे भांडत आहेत. एक त्याच्या लोकांपैकी होता आणि दुसरा त्याच्या शत्रूशी संबंधित होता. त्याच्या स्वकीयांपैकी माणसाने शत्रू लोकांतील माणसांविरूद्ध त्याला मदतीसाठी हाक दिली. मूसा (अ.) ने त्याला एक ठोसा मारला आणि त्याचा शेवट केला. (हे कृत्य घडताच) मूसा (अ.) ने सांगितले, ''ही शैतानाची कामगिरी होय, तो कट्टर शत्रू आणि स्पष्टपणे मार्गभ्रष्ट करणारा आहे.'' मग तो म्हणू लागला, ''हे माझ्या पालनकर्त्या, मी आपल्या स्वतःवर अत्याचार केला, मला क्षमा कर'' म्हणून अल्लाहने त्याला क्षमा केली,[२] तो क्षमा करणारा कृपाळू आहे. मूसा (अ.) ने प्रतिज्ञा केली, ''हे माझ्या पालनकर्त्या, हा उपकार जो तू माझ्यावर केला आहेस,[३] यानंतर आता कधीही मी अपराध्यांचा मदतनीस बनणार नाही.'' (१४-१७)

दुसऱ्या दिवशी तो सकाळीच भीतभीत आणि सर्व बाजूंनी धोक्याची चाहूल घेत शहरातून जात असता त्याने अकस्मात काय पाहिले की तोच इसम ज्याने काल त्याला मदतीसाठी हाक दिली होती, आज पुन्हा त्याला हाक देत आहे. मूसा (अ.) ने सांगितले, ''तू तर मोठा बहकलेला मनुष्य आहेस.'' मग जेव्हा मूसा (अ.) ने इरादा केला की शत्रू लोकांच्या माणसावर हल्ला चढवावा तेव्हा त्याने ओरडून[४] सांगितले, ''हे मूसा (अ.) काय आज तू मला त्याचप्रमाणे ठार करू पाहात आहेस ज्याप्रकारे काल एका इसमाला

२) अरबी शब्द 'मग़फिरत'चा अर्थ दुर्लक्ष करणे व क्षमा करणे असाही होतो आणि लज्जेवर पांघरूण घालणे असादेखील होतो. हजरत मूसा (अ.) यांच्या प्रार्थनेचा अर्थ असा होता की माझा हा अपराध (जो तुला माहीत आहे की मी तो हेतुपुरस्सर केलेला नाही) माफही कर आणि त्यावर पांघरूणही घाल जेणेकरून शत्रूंना तो कळू नये.

३) म्हणजे असे की माझे हे कृत्य गुप्त राहिले आणि शत्रू लोकांच्या कोणत्याही व्यक्तीने मला पाहिले नाही व मला सुरक्षितपणे निघून जाण्याची संधी मिळाली.

४) हा पुकारणारा तोच इस्राईली होता ज्याच्या मदतीसाठी हजरत मूसा (अ.) पुढे सरसावले होते. त्याला दटावणी दिल्यानंतर जेव्हा ते मिस्री माणसाला मारण्यासाठी सरसावले तेव्हा इस्राईलीचा असा समज झाला की हे मलाच मारण्यासाठी येत आहेत. म्हणून त्याने ओरडणे प्रारंभ केले व आपल्या मूर्खपणामुळे आदल्या दिवशीच्या खुनाचे गुपित उघड करून टाकले.



ठार केले आहेस? तू या देशात कठोर बनून राहू इच्छितो, सुधार करू इच्छित नाहीस.'' यानंतर एक मनुष्य नगराच्या पलीकडील टोकाकडून धावत आला आणि म्हणाला,[५] ''हे मूसा! सरदार लोकांत तुला ठार मारण्याची सल्लामसलत होऊ लागली आहे. येथून निघून जा, मी तुझा हितचिंतक आहे.'' ही वार्ता ऐकताच मूसा (अ.) भीत व घाबरत निघाला आणि त्याने प्रार्थना केली की, ''हे माझ्या पालनकर्त्या, मला अत्याचाऱ्यांपासून वाचव.'' (१८-२१)

(इजिप्तहून निघून) जेव्हा मूसा (अ.) ने मदयनची वाट धरली तेव्हा तो म्हणाला, ''आशा आहे की माझा पालनकर्ता मला योग्य मार्गावर लावील.''[६] आणि जेव्हा तो मदयनच्या विहिरीवर पोहचला तेव्हा त्याने पाहिले की बरेचसे लोक आपल्या जनावरांना पाणी पाजत आहेत आणि त्यांच्यापासून अलग एका बाजूला दोन स्त्रिया आपल्या जनावरांना थोपवीत आहेत. मूसा (अ.) ने त्या स्त्रियांना विचारले, ''तुम्हाला काय अडचण आहे?'' त्यांनी सांगितले, ''आम्ही आपल्या जनावरांना पाणी पाजू शकत नाही. जोपर्यंत हे मेंढपाळ आपली जनावरे घेऊन जात नाहीत आणि आमचे वडील म्हातारे गृहस्थ आहेत.'' हे ऐकून मूसा (अ.) ने त्यांच्या जनावरांना पाणी दिले, नंतर एका सावलीच्या जागी जाऊन बसला आणि म्हणाला, ''हे पालनकर्ता, जे काही इष्ट तू माझ्यावर अवतरशील मी त्याचा गरजवंत आहे.'' (काही जास्त वेळ गेली नव्हती की) त्या दोन्ही स्त्रियांपैकी एक लाजत लाजत त्यांच्याजवळ आली आणि म्हणू लागली, "माझे वडील आपणास बोलवीत आहेत जेणेकरून आपण आमच्यासाठी जनावरांना जे पाणी पाजले आहे त्याचा मोबदला आपणास द्यावा.'' मूसा (अ.) जेव्हा त्याच्याजवळ पोहचला आणि आपला सर्व किस्सा त्याला सांगितला तेव्हा तो म्हणाला, ''काही भय बाळगू नकोस, आता तू अत्याचारी लोकांपासून वाचून आला आहेस.'' (२२-२५)

त्या दोन्ही स्त्रियांपैकी एकीने आपल्या वडिलास सांगितले, ''हे पिता, या माणसाला नोकर म्हणून ठेवून घ्या. उत्तम माणूस ज्याला आपण नोकर म्हणून ठेवावे असा तोच असू शकतो जो धष्टपुष्ट आणि विश्वासू असेल.'' तिच्या वडिलाने (मूसा (अ.) ला) सांगितले, ''मी इच्छितो की आपल्या या दोन मुलींपैकी एकीचा विवाह आपल्याशी करावा या अटीवर की तुम्ही माझ्याकडे आठ वर्षे नोकरी करावी, आणि जर दहा वर्षे पूर्ण केलीत तर हे तुमच्या मर्जीवर आहे. मी तुमच्यावर सक्ती करू इच्छित नाही. अल्लाहने इच्छिले तर मी तुम्हाला प्रामाणिक मनुष्य आढळेन.'' मूसा (अ.) ने उत्तर दिले, ''ही गोष्ट माझ्या

५) म्हणजे या दुसऱ्या झगड्यात जेव्हा खुनाचे गुपित उघड झाले व त्या मिस्री माणसाने जाऊन ती माहिती दिली तेव्हा ही घटना घडली.

६) म्हणजे अशा मार्गाव जेणेकरून मी 'मदयन'ला सुखरुपपणे पोहचावे.

व आपल्या दरम्यान ठरली. या दोन्ही मुदतींपैकी जी कोणती मी पूर्ण करीन त्यानंतर पुन्हा कोणतीही आगळीक मजवर होऊ नये आणि जो काही करार - मदार आम्ही करीत आहोत, अल्लाह त्यावर रक्षक आहे.'' (२६-२८)

जेव्हा मूसा (अ.) ने मुदत पूर्ण केली आणि तो आपल्या कुटुंबियांना घेऊन निघाला तेव्हा तूर पर्वताच्या दिशेने त्याला एक अग्नी दृष्टीस पडला. त्याने आपल्या कुटुंबियांना सांगितले, ''थांबा, मी एक अग्नी पाहिला आहे, कदाचित मी तेथून एखादी खबर आणीन किंवा त्या अग्नीपासून एखादा निखारा तरी आणीन की ज्याने तुम्ही ऊब घेऊ शकाल.'' तेथे पोहचला तर खोऱ्याच्या उजव्या किनाऱ्यावर[७] शुभक्षेत्रात एका वृक्षापासून पुकारले गेले की, ''हे मूसा (अ.), मीच अल्लाह आहे, सर्व जगवाल्यांचा स्वामी.'' आणि (आज्ञा दिली गेली की) ''टाक, आपली काठी.'' ज्याक्षणी मूसा (अ.) ने पाहिले की ती काठी सर्पाप्रमाणे वळसे घेत आहे तेव्हा तो पाठ फिरवून पळत सुटला. आणि त्याने वळूनसुद्धा पाहिले नाही. (फर्माविले गेले) ''मूसा (अ.), परत ये आणि भिऊ नकोस. तू पूर्णपणे सुरक्षित आहेस. आपला हात छातीजवळ ने, चकाकत निघेल कोणत्याही अडचणीशिवाय आणि भीतीपासून वाचण्यासाठी आपला बाहू आवळून घे[८] दोन उज्ज्वल संकेत आहेत तुझ्या पालनकर्त्याकडून फिरऔन आणि त्याच्या दरबारी लोकांच्यासमोर प्रस्तुत करण्यासाठी. ते मोठे अवज्ञाकारी लोक आहेत.'' मूसा (अ.) ने विनविले, ''हे स्वामी, मी तर त्यांचा एक माणूस ठार केलेला आहे. भय वाटते की ते मला ठार करतील. आणि माझा भाऊ हारून माझ्यापेक्षा जास्त वाक्चतुर आहे. त्याला माझ्यासमवेत सहायक म्हणून पाठव की जेणेकरून तो माझे समर्थन करील. मला भय आहे की ते लोक मला खोटे ठरवतील.'' फर्माविले, ''आम्ही तुझ्या भावाच्या सहाय्याने तुझे हात मजबूत करू आणि तुम्हा दोघांना असा प्रताप बहाल करू की ते तुमचे काहीही वाईट करू शकणार नाहीत. आमच्या संकेतांच्या जोरावर वर्चस्व तुमचे व तुमच्या अनुयायांचेच होईल.'' (२९-३५)

मग जेव्हा मूसा (अ.) त्या लोकांजवळ आमचे उघड उघड संकेत घेऊन पोहचला तेव्हा ते म्हणाले की, ''हे अन्य काही नसून एक बनावटी जादू आहे. आणि या गोष्टी तर आम्ही आपल्या वाडवडिलांच्या काळात कधीही ऐकल्या नाहीत.'' मूसा (अ.) ने उत्तर दिले, ''माझा पालनकर्ता त्या माणसाच्या स्थितीशी चांगला परिचित आहे जो त्याच्याकडून मार्गदर्शन घेऊन आला आहे आणि तोच उत्तम जाणतो की अखेरीस कोणाचा शेवट चांगला होणार आहे, सत्य असे आहे की अत्याचारी कधीही सफल होत

७) म्हणजे हजरत मूसा (अ.) यांच्या उजव्या हाताकडे जो किनार होता त्यावर.

८) म्हणजे जेव्हा कधी एखादा धोकादायक प्रसंग असा आला की जेणेकरून तुमच्या मनात भीती उत्पन्न व्हावी तेव्हा आपला बाहू आवळून घेत जा, त्यामुळे तुमचे हृदय खंबीर बनेल व भीड आणि दहशतीची कसलीही स्थिती तुमच्यावर उरणार नाही.



नाहीत.'' (३६-३७)

आणि फिरऔनने सांगितले, ''हे दरबारी लोकहो, मी तर स्वत: खेरीज तुमच्या कोणत्याही उपास्याला जाणत नाही. हामान, जरा विटा भाजवून माझ्यासाठी एक उंच इमारत बनव तर खरे. कदाचित त्यावर चढून मी मूसा (अ.) च्या ईश्वराला पाहू शकेन. मी तर त्याला खोटा समजतो.'' (३८)

त्याने आणि त्याच्या लष्करांनी पृथ्वीवर कोणत्याही अधिकाराविना आपल्या मोठेपणाची घमेंड केली आणि कल्पना केली की त्यांना कधीही आमच्याकडे परतावयाचे नाही. सरतेशेवटी आम्ही त्याला व त्याच्या लष्करांना पकडले आणि समुद्रात फेकून दिले. आता पहा की या अत्याचाऱ्यांचा कसा शेवट झाला. आम्ही त्यांना नरकाकडे निमंत्रित करणारे म्होरके बनविले, आणि पुनरुत्थानाच्या दिवशी ते कोठूनही कोणतीही मदत प्राप्त करू शकणार नाहीत. आम्ही या जगात त्यांच्यामागे धिक्कार लावला. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी ते मोठ्या घृणेत गुरफटलेले असतील. (३९-४२)

पूर्वीच्या पिढ्यांना नष्ट केल्यानंतर आम्ही मूसा (अ.) ला ग्रंथ प्रदान केला, लोकांकरिता डोळसपणाचे साधन बनवून, मार्गदर्शन व कृपा बनवून, जेणेकरून लोक कदाचित बोध घेतील. (हे पैगंबर (स.), तुम्ही त्यावेळी पश्चिमी कोपऱ्यांत[९] हजर नव्हता, जेव्हा आम्ही मूसा (अ.) ला ग्रंथ प्रदान केला, आणि तुम्ही साक्षीदारांतही सामील नव्हता. किंबहुना त्यानंतर (तुमच्या काळापर्यंत) आम्ही अनेक पिढ्या उभ्या केल्या आहेत आणि त्यांच्यावर दीर्घकाळ लोटला आहे. तुम्ही मदयनच्या निवासियांदरम्यानदेखील हजर नव्हता की तुम्ही त्यांना आमचे संकेत ऐकवीत राहिला असतात. परंतु (त्यावेळच्या या वार्ता) पाठविणारे आम्ही आहोत. आणि तुम्ही तूरच्या पायथ्याशीसुद्धा त्यावेळी हजर नव्हता जेव्हा आम्ही (मूसा (अ.) ला पहिल्यांदा) पुकारले होते, परंतु ही तुमच्या पालनकर्त्याची कृपा आहे (की तुम्हाला ही माहिती दिली जात आहे) जेणेकरून तुम्ही त्या लोकांना सावध करावे, ज्याच्याजवळ तुमच्यापूर्वी कोणीही सावध करणारा आला नाही, कदाचित ते जागे होतील (आणि आम्ही हे अशासाठी केले की) एखादे वेळी असे होऊ नये की त्यांनी केलेल्या आपल्या कृत्यापायी एखादे संकट जर त्यांच्यावर आले तर सांगतील की, ''हे पालनकर्त्या, तू आमच्याकडे एखादा पैगंबर का पाठविला नाहीस की आम्ही तुझ्या वचनांचे अनुसरण केले असते आणि श्रद्धावंतांपैकी बनलो असतो.'' (४३-४७)

परंतु जेव्हा आमच्या येथून सत्य त्यांच्यापाशी आले तेव्हा ते म्हणू लागले, ''का बरे दिले गेले नाही याला तेच काही जे मूसा (अ.) ला दिले गेले होते?'' काय या

९) पश्चिमी कोपऱ्याने अभिप्रेत तुरेसीना (पर्वत) आहे. तो हिजाज़च्या पश्चिमेकडे स्थित आहे.

लोकांनी त्याचा इन्कार केला नाही, जे यापूर्वी मूसा (अ.) ला दिले गेले होते?[१०] त्यांनी सांगितले, "दोन्ही जादू[११] आहेत ज्या एकमेकाला मदत करतात." आणि म्हणाले, "आम्ही कोणाला मानत नाही." (हे पैगंबर (स.)) यांना सांगा, "बरे तर आणा, अल्लाहकडून एखादा ग्रंथ जो या दोघांपेक्षा जास्त मार्गदर्शन करणारा असेल. जर तुम्ही खरे असाल, मी त्याचेच अनुयायित्व स्वीकारीन." आता जर ते तुमची ही मागणी पूर्ण करणार नसतील तर समजा की मूलत: हे आपल्या इच्छांचे अनुसरण करणारे आहेत. आणि त्या व्यक्तीपेक्षा जास्त कोण मार्गभ्रष्ट असेल जी अल्लाहच्या मार्गदर्शनाविना केवळ आपल्या इच्छांचे अनुकरण करीत असेल? अल्लाह असल्या अत्याचाऱ्यांना कदापि मार्गदर्शन करीत नाही. आणि (उपदेशाची) गोष्ट लागोपाठ आम्ही त्यांच्यापर्यंत पोहचविली आहे जेणेकरून यांनी गफलतीतून जागे व्हावे. (४८-५१)

ज्या लोकांना यांच्यापूर्वी आम्ही ग्रंथ दिला होता ते या (कुरआन) वर श्रद्धा ठेवतात.[१२] आणि जेव्हा हे त्यांना ऐकविले जाते तेव्हा ते म्हणतात की, "आम्ही यांच्यावर श्रद्धा ठेवली, हा खरोखरच सत्य आहे आमच्या पालनकर्त्याकडून. आम्ही तर पहिल्यापासूनच मुस्लिम आहोत." हे ते लोक आहेत ज्यांना त्यांचा मोबदला दोन वेळा दिला जाईल,[१३] त्या दृढतेबद्दल जी त्यांनी दाखविली. ते वाईटाचे भल्याने निवारण करतात आणि जी काही उपजीविका त्यांना आम्ही दिली आहे,त्यातून ते खर्च करतात, आणि जेव्हा त्यांनी बाष्कळ गोष्ट ऐकली तेव्हा हे सांगून त्यापासून अलिप्त झाले की, "आमची कृत्ये आमच्यासाठी आणि तुमची कृत्ये तुमच्यासाठी, तुम्हाला सलाम आहे.

**१०)** म्हणजे मक्केतील काफिरांनी मूसा (अ.) यांनाच कोठे मानले होते की आता, "मुहम्मद (स.) यांना ते चमत्कार का दिले गेले नाहीत जे हजरत मूसा (अ.) यांना दिले गेले होते", असे सांगतात.

**११)** म्हणजे कुरआन आणि तौरात दोन्ही.

**१२)** याच्याने अभिप्रेत असे नाही की सर्व ग्रंथधारक (यहूदी व इसाई) यावर ईमान आणतात तर हा संकेत वास्तविकपणे त्या घटनेकडे आहे जी हा सूरह उतरण्याच्या काळात घडली होती व याच्याने मक्कावासींना लज्जित करण्याचा हेतू आहे की तुम्ही आपल्या घरी आलेल्या देणगीला ठोकरीत आहात. वास्तविकपणे दूरदूरचे लोक याची खबरबात ऐकून येत आहेत व तिची कदर ओळखून त्यापासून लाभ घेत आहेत. ती घटना जिच्याकडे हा संकेत आहे, अशी की जवळजवळ २० ख्रिस्ती लोक हबशहून पैगंबर मुहम्मद (स.) जवळ आले व त्यांच्याकडून कुरआन ऐकून त्यांनी ईमान आणले.

**१३)** म्हणजे एक मोबदला पूर्वीच्या ग्रंथावर ईमान आणण्याचा व दुसरा मोबदला कुरआनवर ईमान आणण्याचा.



आम्ही असभ्य लोकांसारखी पद्धत अनुसरू इच्छित नाही."[१४] हे पैगंबर (स.), तुम्हाला जो हवा आहे त्याला तुम्ही मार्गदर्शन करू शकत नाही परंतु अल्लाह ज्याला इच्छितो त्याला मार्गदर्शन करतो आणि तो त्या लोकांना चांगल्याप्रकारे जाणतो, जे मार्गदर्शन स्वीकारणारे आहेत. (५२-५६)

ते सांगतात, "जर आम्ही तुमच्याबरोबर या मार्गदर्शनाचे अनुसरण स्वीकारले तर आम्हाला आमच्या भूमीतून हिरावून टाकले जाईल."[१५] काय ही वस्तुस्थिती नाही की आम्ही एका शांतीपूर्ण 'हरम'ला यांच्याकरिता निवासस्थान बनविले, ज्याच्याकडे हरप्रकारची फळे आणली जातात, आमच्याकडून उपजीविका म्हणून? परंतु यांच्यापैकी बहुतेक लोक जाणत नाहीत.[१६] (५७)

आणि कित्येक अशा वस्त्या आम्ही नष्ट केल्या आहेत, ज्यांच्यातील लोक आपल्या उपजीविकेवर गर्व करीत होते, तर पहा, ती त्यांची निवासस्थाने पडलेली आहेत ज्यात त्यांच्यानंतर क्वचितच कोणी वसले आहे, सरतेशेवटी आम्हीच वारस होऊन राहिलो.[१७] (५८)

आणि तुझा पालनकर्ता कोणत्याही वस्तीला तोपर्यंत नष्ट करीत नाही जोपर्यंत त्यामध्ये तो एखादा प्रेषित पाठवित नाही, जो त्यांना आमची वचने ऐकवील. आणि

**१४)** जेव्हा या लोकांनी ईमान आणले तेव्हा अबूजहलने त्यांना शिव्या दिल्या. याच गोष्टीचा येथे उल्लेख होत आहे.

**१५)** अश्रद्धावंत कुरैश इस्लाम न स्वीकारण्यासाठी निमित्त म्हणून जी गोष्ट पुढे करीत असत तीच ही गोष्ट आहे. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ असा होता की आज तर आम्ही अरब अनेकेश्वरवादींचे धार्मिक नेते बनलो आहोत परंतु जर आम्ही मुहम्मद (स.) यांचे म्हणणे मान्य केले तर सारा अरबस्तान आमचा शत्रू बनेल.

**१६)** सर्वोच्च अल्लाहकडून त्यांच्या निमित्तावर हे पहिले उत्तर आहे. याचा अर्थ असा की हे 'हरम' (काबागृह) ज्याच्या शांती व सुरक्षिततेमुळे आणि ज्याच्या केंद्रीयतेमुळे आज तुम्ही या लायकीचे बनला आहात की जगभरातील व्यापारी माल या नापिक खोऱ्यात घेऊन येत आहे. काय याला ही शांती व सुरक्षितता आणि हे केंद्रीय स्थान तुमच्या एखाद्या उपाययोजनेमुळे मिळाले आहे?

**१७)** त्यांनी पुढे केलेल्या निमित्ताचे दुसरे उत्तर आहे. याचा अर्थ असा की ज्या धनदौलती आणि खुशालीवर तुम्ही ऐटीत आला आहात व जे हरवले जाण्याच्या भीतीपोटी असत्यावर दृढ राहणे व सत्यापासून विमुख होऊ इच्छिता, हीच गोष्ट कधीकाळी आद आणि समूद लोकांनादेखील प्राप्त होती, मग काय ही गोष्ट त्यांना वाचवू शकली?

आम्ही कोणतीही वस्ती नष्ट करीत नाही, जोपर्यंत तेथील लोक अत्याचारी होत नाहीत.[१८] (५९)

तुम्हा लोकांना जे काही दिले आहे ते केवळ ऐहिक जीवनाची सामुग्री व त्याची शोभा आहे आणि जे काही अल्लाहजवळ आहे ते यापेक्षा उत्तम व शेषतम आहे. काय तुम्ही बुद्धीचा उपयोग करीत नाही? बरे, तो मनुष्य ज्याला आम्ही चांगले वचन दिले असेल व तो त्याला प्राप्त करणारा असेल, कधी त्या माणसासारखा होऊ शकेल काय ज्याला आम्ही केवळ ऐहिक जीवनाची सामुग्री दिली असेल आणि मग तो पुनरुत्थानाच्या दिवशी शिक्षेकरिता हजर केला जाणार असेल? (६०-६१)

आणि (विसरू नये या लोकांनी) त्या दिवसाला, जेव्हा तो यांना पुकारील आणि विचारील, "कोठे आहेत ते माझे भागीदार ज्यांच्यासंबंधी तुम्ही कल्पना बाळगत होता?" हे कथन ज्यांना लागू पडेल ते म्हणतील, "हे आमच्या पालनकर्त्या! नि:संशय हेच ते लोक आहेत ज्यांना आम्ही पथभ्रष्ट केले होते, यांना आम्ही त्याचप्रकारे पथभ्रष्ट केले ज्याप्रकारे आम्ही स्वत: मार्गभ्रष्ट झालो,[१९] आम्ही आपल्यासमोर यांच्या जबाबदारीतून मुक्त असल्याचे जाहीर करतो. हे आमची तर भक्ती करीत नव्हते."[२०] मग यांना सांगितले जाईल की धावा करा आता आपल्या मानलेल्या भागीदारांचा. हे त्यांना हांका मारतील परंतु ते यांना काहीच उत्तर देणार नाहीत. आणि हे लोक प्रकोप पाहून खेदाने म्हणतील की हे मार्गदर्शन स्वीकारणारे असते तर! (६२-६४)

आणि (विसरू नये या लोकांनी) त्या दिवसाला, जेव्हा तो यांना पुकारील आणि विचारील की, "जे प्रेषित पाठविले गेले होते त्यांना तुम्ही काय उत्तर दिले होते?" त्यावेळेस कोणतेही उत्तर यांना सूचणार नाही आणि हे परस्पर एकमेकांशी विचारूदेखील शकणार नाहीत. तथापि ज्याने आज तौबा (पश्चात्ताप) केली आणि श्रद्धा ठेवली व

**१८)** हे त्यांच्या निमित्ताचे तिसरे उत्तर आहे. पूर्वी जे लोकसमूह नष्ट झाले त्यांचे लोक अत्याचारी बनले होते. परंतु ईश्वराने त्यांना नष्ट करण्याअगोदर आपले प्रेषित पाठवून त्यांना सावध केले. त्यांच्या तंबीनंतरदेखील ते आपल्या वक्र चालीपासून परावृत्त झाले नाही तेव्हा त्यांना नष्ट केले. हाच मामला आता तुमच्या पुढ्यातही आहे.

**१९)** याच्याने अभिप्रेत मानव आणि जिन्नांपैकी ते शैतान होत ज्यांना जगात ईश्वराचे सहभागी मानले गेले होते. ज्यांच्या वचनापुढे ईश्वर व त्याच्या प्रेषितांची वचने अमान्य केली गेली होती व ज्यांच्या भरवंशावर सरळमार्ग सोडून जीवनाचे चुकीचे मार्ग स्वीकारले गेले होते. अशा लोकांना कोणी ईश्वर आणि रब म्हटले असो की नसो कोणत्याही स्थितीत जेव्हा त्यांचे अनुकरण आणि आज्ञापालन त्याप्रमाणे केले गेले ज्याप्रमाणे ईश्वराचे केले पाहिजे तेव्हा खचितच त्यांना ईशत्वात सहभागी केले गेले.

**२०)** म्हणजे हे आमचे नव्हे तर आपल्या वासनांचे दास बनले होते.



सत्कृत्ये केली तोच ही अपेक्षा करू शकतो की तो तेथे सफलता प्राप्त करणाऱ्यांपैकी असेल. (६५-६७)

तुझा पालनकर्ता निर्माण करतो जे काही इच्छितो आणि (तो स्वत:च आपल्या कार्याकरिता ज्याला इच्छितो) निवड करतो, ही निवड करणे या लोकांचे काम नव्हे. अल्लाह पवित्र आहे आणि फार उच्चतम आहे त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करतात. तुझा पालनकर्ता जाणतो जे काही हे मनांत लपवून ठेवतात आणि जे काही हे प्रकट करतात. तोच एक अल्लाह आहे ज्याच्याशिवाय कोणी भक्तीला पात्र नाही. त्याच्याचकरिता स्तुती आहे इहलोकांतही व परलोकातदेखील. शासन त्याचेच आहे आणि त्याच्याकडेच तुम्ही सर्व परतविले जाणार आहात. हे पैगंबर (स.)! यांना सांगा, कधी तुम्ही लोकांनी विचार केला आहे काय? जर अल्लाहने पुनरुत्थानापर्यंत सदैव तुमच्यावर रात्र पसरविली तर अल्लाहखेरीज तो कोण असा ईश्वर आहे जो तुम्हासाठी प्रकाश आणील? तुम्ही ऐकत नाही काय? यांना विचारा कधी तुम्ही विचार केला आहे की अल्लाहने पुनरुत्थानापर्यंत तुम्हावर सदैव दिवस राहू दिला तर अल्लाहखेरीज तो कोण ईश्वर आहे जो तुमच्याकरिता रात्र आणील जेणेकरून तुम्ही त्यात विश्रांती घ्याल? काय तुम्हाला उमगत नाही? ही त्याचीच कृपा आहे की त्याने तुम्हाकरिता रात्र व दिवस बनविले जेणेकरून तुम्ही (रात्री) विश्रांती मिळवाल आणि (दिवसा) आपल्या पालनकर्त्याचा कृपाप्रसाद शोधाल. कदाचित तुम्ही कृतज्ञ व्हाल. (६८-७३)

(लक्षात ठेवावा या लोकांनी) तो दिवस जेव्हा तो यांना पुकारील मग विचारील, "कोठे आहेत माझे ते भागीदार ज्यांची इच्छा तुम्ही बाळगत होता?" आणि आम्ही प्रत्येक लोकसमुदायातून एक साक्षीदार बाहेर आणू, मग सांगू, "आणा आता आपले प्रमाण" त्या वेळेस यांना कळून चुकेल की सत्य अल्लाहच्या बाजूने आहे, आणि नष्ट होईल त्यांचे ते सगळे खोटेनाटे जे यांनी रचले होते. (७४-७५)

ही एक हकीकत आहे की कारून हा मूसा (अ.) च्या लोकसमूहातील एक माणूस होता, मग तो आपल्या लोकसमूहाविरूद्ध दुर्वर्तनी झाला, आणि त्याला आम्ही इतके खजिने देऊन ठेवले होते की त्यांच्या किल्ल्या बलवान माणसाची एक जमात मोठ्या कष्टाने उचलू शकत होती. एकदा जेव्हा त्याच्या लोकांनी त्याला सांगितले, "गर्व करू जाऊ नकोस. अल्लाह गर्व करणारांना पसंत करीत नाही. जी संपत्ती अल्लाहने तुला दिली आहे त्यापासून मरणोत्तर जीवनाचे घर बनविण्याची काळजी घे आणि जगातीलही आपला वाटा विसरू नकोस. उपकार कर ज्याप्रकारे अल्लाहने तुझ्यावर उपकार केले आहेत आणि जमिनीवर उपद्रव माजविण्याचा प्रयत्न करू नकोस. अल्लाहला उपद्रवी आवडत नाहीत. "तेव्हा तो म्हणाला, "हे सर्वकाही तर मला त्या ज्ञानामुळे दिले गेले आहे जे मला अवगत आहे." काय त्याला हे माहीत नव्हते की अल्लाहने त्याच्यापूर्वी अनेक अशा लोकांना नष्ट

केले आहे जे त्याच्यापेक्षा अधिक शक्ती आणि जमाव बाळगत होते? अपराध्यांना तर त्यांचे अपराध विचारले जात नाहीत.[२१] (७६-७८)

एके दिवशी तो आपल्या लोकांच्यासमोर दिमाखात निघाला, जे लोक ऐहिक जीवनाचे इच्छुक होते ते त्याला पाहून म्हणू लागले, ''आम्हालासुद्दा ते सर्वकाही मिळाले असते जे कारूनला दिले गेले आहे, हा तर मोठा भाग्यवान आहे.'' परंतु जे लोक ज्ञान बाळगणारे होते ते म्हणू लागले, ''खेद आहे तुमच्या स्थितीवर, अल्लाहचा मोबदला उत्तम आहे त्या माणसासाठी जो श्रद्धा ठेवील आणि सत्कृत्ये करील आणि ही संपत्ती संयम बाळगणाऱ्यांनाच प्राप्त होते.'' (७९-८०)

सरतेशेवटी आम्ही त्याला आणि त्याच्या घराला जमिनीत धसवून टाकले, मग कोणत्याही त्याच्या समर्थकाचा असा समूह नव्हता जो अल्लाहच्याविरूद्ध त्याच्या मदतीसाठी धावला असता आणि तो स्वत:देखील आपली मदत करू शकला नाही. आता तेच लोक जे काल त्याच्या स्थानाची मनीषा बाळगत होते, म्हणू लागले, ''खेद आहे, आम्ही विसरून गेलो होतो की अल्लाह आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो त्याची उपजीविका मुबलक करतो आणि ज्याला इच्छितो त्याला बेताचीच देतो. जर अल्लाहने आमच्यावर उपकार केले नसते तर आम्हालासुद्धा जमिनीत धसविले असते. खेद आहे की आमच्या स्मरणात राहिले नाही की अश्रद्धावंतांना यश प्राप्त होत नसते.'' (८१-८२)

ते मरणोत्तर जीवनाचे[२२] घर तर आम्ही त्या लोकांसाठी खास करू जे पृथ्वीवर आपली शेखी मिरवू इच्छित नाहीत आणि उपद्रवदेखील माजवू इच्छित नाहीत आणि शेवटी भले ईशपरायणांसाठीच आहे. जो कोणी भलेपणा घेऊन येईल त्याच्यासाठी त्यापेक्षा श्रेष्ठ भलाई आहे आणि जो वाईट घेऊन येईल तर अपकृत्ये करणाऱ्यांना तसाच मोबदला मिळेल जसे कृत्य ते करीत आहेत. (८३-८४)

हे पैगंबर (स.), विश्वास ठेवा की ज्याने हे कुरआन तुमच्यासाठी अनिवार्य ठरविले[२३] आहे तो तुम्हाला एका उत्तम परिणतीपर्यंत पोहचविणारा आहे. या लोकांना सांगा, ''माझा पालनकर्ता भल्याप्रकारे जाणतो की मार्गदर्शन घेऊन कोण आलेला आहे आणि कोण उघड पथभ्रष्टतेत गुरफटलेला आहे. तुम्ही या गोष्टीचे मुळीच पात्र नाहीत की

**२१)** म्हणजे अपराधी तर असाच दावा मांडीत असतात की आम्ही फार चांगले लोक आहोत. त्यांच्यात दुष्टाई आहे हे कोठे ते मान्य करीत असतात. परंतु त्यांची शिक्षा त्यांच्या स्वत: कबुलीवर अवलंबून असत नाही. त्यांना जेव्हा धरले जाते तेव्हा त्यांना विचारून धरले जात नाही की सांगा तुमचे अपराध कोणते आहेत.

**२२)** अभिप्रेत आहे स्वर्ग, वास्तविक सफलतेचे जे ठिकाण आहे.

**२३)** म्हणजे ह्या कुरआनने ईश्वराच्या निर्मितीपर्यंत पोहचविण्याची आणि त्याची शिकवण देण्याची व त्याच्या आदेशानुसार जगाची सुधारणा करण्याची जबाबदारी तुमच्यावर टाकली आहे.



तुम्हावर ग्रंथ अवतरला जाईल. हा तर केवळ तुमच्या पालनकर्त्याच्या कृपेने (तुमच्यावर अवतरला आहे) म्हणून तुम्ही अश्रद्धावंतांचे सहायक बनू नका. आणि असे कधी घडता कामा नये की अल्लाहचे संकेत जेव्हा तुमच्यावर अवतरले जातील तर अश्रद्धावंतांनी तुम्हाला त्यापासून परावृत्त करावे. आपल्या पालनकर्त्याकडे निमंत्रित करा आणि कदापि अनेकेश्वरवाद्यांत सामील होऊ नका, आणि अल्लाहसह कोणत्याही अन्य उपास्याचा धावा करू नका. त्याच्याशिवाय दुसरा कोणी उपास्य नाही. प्रत्येक वस्तू नश्वर आहे केवळ त्या अस्तित्वाखेरीज, सत्ताधिकार त्याचाच आहे आणि त्याच्याकडेच तुम्ही सर्व परतविले जाणार आहात. (८५-८८)

# २९ सूरह अल्‌अन्‌कबूत

*(मक्काकालीन, वचने ६९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ लाऽऽम मीऽऽम. काय लोक असे समजून बसले आहेत की त्यांना केवळ इतके म्हटल्यावर सोडून दिले जाईल की, ‘‘आम्ही श्रद्धा ठेवली.’’ आणि त्यांना अजमाविले जाणार नाही? वस्तुत: आम्ही त्या सर्व लोकांची परीक्षा घेतली आहे जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत. अल्लाहला तर हे अवश्य पाहावयाचे आहे की खरे कोण आहेत आणि खोटे कोण. (१-३)

आणि काय ते लोक जी वाईट कृत्ये करीत आहे[1] हे समजून बसले आहेत, की ते आम्हावर मात करतील? मोठे चुकीचे अनुमान आहे जो ते लावीत आहेत. (४)

जो कोणी अल्लाहशी भेट होण्याची अपेक्षा बाळगतो (त्याला माहीत व्हावे की) अल्लाहने निश्चित केलेली वेळ येणारच आहे, आणि अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो. जो कोणी प्रयत्नांची पराकाष्ठा करील, स्वत:च्याच कल्याणाकरिता करील.[2] अल्लाह निश्चितच जगवासियांपासून निरपेक्ष आहे.[3] आणि जे लोक श्रद्धा ठेवतील आणि सत्कृत्ये करतील त्यांच्यातील वाईट आम्ही दूर करू आणि त्यांना त्यांच्या सर्वोत्कृष्ट कृत्यांचा मोबदला देऊ. (५-७)

आम्ही मानवाला आदेश दिला की त्याने आपल्या आईवडिलांशी सद्व्यवहार करावा. परंतु जर त्यांनी तुझ्यावर दबाव आणला की तू माझ्याबरोबर एखाद्या अशा (उपास्या) ला भागीदार ठरवावे ज्याला तू (माझा भागीदार म्हणून) जाणत नाहीस तर त्यांची आज्ञा पाळू नकोस.[4] माझ्याकडेच तुम्हा सर्वांना परतून यावयाचे आहे. मग मी

१) वर्णनशैलीने हे स्पष्ट होते की या लोकाने अभिप्रेत ते अत्याचारी होत, जे ईमान आणणाऱ्यांवर अत्याचार करीत होते आणि इस्लामी आवाहनाला पराभूत करण्यासाठी वाईटातली वाईट साधने उपयोगात आणीत होते.

२) ‘मुजाहिद’ (प्रयत्नांची पराकाष्ठा) याच्याने अभिप्रेत अश्रद्धावंतांच्या मुकाबल्यात सत्यधर्माची पताका उच्च करण्या व राखण्यासाठी प्राणपणाला लावणारा.

३) म्हणजे अल्लाह तुमच्याकडे अशा प्रयत्नांच्या पराकाष्ठेची मागणी अशासाठी करीत आहे की त्याची काही गरज त्यामुळे अडकलेली असावी (मआजल्लाह) असे नाही तर हे तुमच्या स्वत:च्या नैतिक आणि अध्यात्मिक उन्नतीचे साधन आहे.

४) ज्या तरुणांनी मक्केत ईमान आणले होते त्यांचे आईवडील त्यांच्यावर असा दबाव आणीत होते की त्यांनी ईमानपासून परावृत्त व्हावे. यासाठी फर्माविले गेले की आई व वडिलांचे हक्क आपल्या जागी परंतु ईश्वराच्या मार्गापासून त्यांनी रोखावे असा हक्क त्यांना प्राप्त नाही.



तुम्हाला दाखवीन की तुम्ही काय करीत राहिला आहात. आणि ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली असेल व ज्यांनी सत्कृत्ये केली असतील, त्यांना आम्ही जरूर सदाचारींमध्ये समाविष्ट करू. (८-९)

लोकांपैकी कोणी असा आहे जो म्हणतो की आम्ही श्रद्धा ठेवली अल्लाहवर परंतु जेव्हा तो अल्लाहच्या बाबतीत सताविला गेला तेव्हा लोकांनी घेतलेल्या परीक्षेला त्याने अल्लाहच्या प्रकोपाप्रमाणे लेखले. आता जर तुझ्या पालनकर्त्याकडून विजय व सहाय्य आले तर हाच मनुष्य सांगेल की, ‘‘आम्ही तर तुमच्याबरोबर होतो.’’ काय जगवासियांची मन:स्थिती अल्लाहला चांगल्याप्रकारे माहीत नाही? आणि अल्लाहला तर हे अवश्य पाहावयाचे आहे की श्रद्धावंत कोण आहेत आणि दांभिक कोण? (१०-११)

हे अश्रद्धावंत लोक श्रद्धावंतांना म्हणतात की, तुम्ही आमच्या पद्धतीचे अवलंब करा आणि तुमचे अपराध आम्ही आमच्यावर घेऊ. वस्तुत: त्यांच्या अपराधांपैकी ते काहीही आपल्यावर घेणार नाहीत. ते अगदी खोटे बोलत आहेत. होय, अवश्य ते आपले ओझेही उचलतील आणि आपल्या ओझ्याबरोबरच अन्य बरेचसे ओझेसुद्धा.[5] आणि पुनरुत्थानाच्या दिवशी निश्चितच त्या कुभांड रचण्याविषयी त्यांची विचारणा होईल, जे ते करीत राहिले आहेत. (१२-१३)

आम्ही नूह (अ.) ला त्याच्या लोकसमूहाकडे पाठविले आणि तो पन्नास कमी एक हजार वर्षे त्यांच्यामध्ये राहिला सरतेशेवटी त्या लोकांना वादळाने येऊन घेरले या स्थितीत की ते अत्याचारी होते. मग नूह (अ.) ला आणि गलबतवाल्यांना आम्ही वाचविले आणि त्याला जगवासियांसाठी बोधप्रत संकेत बनवून ठेवले.[6] (१४-१५)

आणि इब्राहीम (अ.) ला पाठविले जेव्हा त्याने आपल्या लोकसमूहाला सांगितले, ‘‘अल्लाहची भक्ती करा व त्याचे भय बाळगा. हे तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही जाणले. तुम्ही अल्लाहला सोडून ज्यांची पूजा करीत आहात ते केवळ पुतळे आहेत आणि तुम्ही एक असत्य घडवीत आहात, वास्तविकत: अल्लाहशिवाय ज्यांची तुम्ही उपासना करता ते तुम्हाला कोणतीही उपजीविका देण्याची ऐपत बाळगत नाहीत. अल्लाहजवळ उपजीविका मागा आणि त्याचीच भक्ती करा आणि त्याच्याप्रती कृतज्ञता दाखवा आणि त्याच्याकडेच तुम्ही परतविले जाणार आहात. आणि जर तुम्ही खोटे ठरवीत असाल तर तुमच्यापूर्वी अनेक लोकसमुदायांनी खोटे ठरविले आहे. आणि पैगंबर (स.) वर स्पष्टपणे संदेश पोहचविण्याशिवाय अन्य कोणतीही जबाबदारी नाही. (१६-१८)

५) म्हणजे एक ओझे स्वत: मार्गभ्रष्ट असण्याचे आणि दुसरे ओझे इतरांना मार्गभ्रष्ट करणे अथवा मार्गभ्रष्ट करण्यास भाग पाडण्याचे.

६) म्हणजे त्या नावेला अथवा नूह (अ.) यांच्या जनसमूहावरील प्रकोपाच्या या घटनेला बोधप्रत निशाणी बनविले.

काय या लोकांनी कधी पाहिलेच नाही की कशाप्रकारे अल्लाह सृष्टीचा प्रारंभ करतो मग त्याची पुनरावृत्ती करतो? खचितच ही (पुनरावृत्ती तर) अल्लाहसाठी अधिक सुलभ आहे. यांना सांगा की भूतलावर हिंडा, फिरा आणि पहा की त्याने कशाप्रकारे सृष्टीचा प्रारंभ केला आहे. मग अल्लाह दुसऱ्यांदादेखील जीवन प्रदान करील. निश्चितच अल्लाह प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे, वाटेल त्याला शिक्षा करील व वाटेल त्यावर कृपा करील. त्याच्याकडेच तुम्ही वळविले जाणार आहात. तुम्ही भूतलावरही विवश करणारे नाही व आकाशांतसुद्धा नाही. आणि अल्लाहपासून वाचविणारा कोणी रक्षक आणि सहायक तुमच्यासाठी नाही. ज्या लोकांनी अल्लाहच्या संकेतांचा आणि त्याच्या भेटीचा इन्कार केला आहे ते माझ्या कृपेसंबंधी निराश झाले आहेत,[७] आणि त्यांच्यासाठी यातनादायक शिक्षा आहे. (१९-२३)

मग इब्राहीम (अ.) च्या लोकांचे उत्तर याशिवाय अन्य काहीही नव्हते की, ते म्हणाले, ''ठार करा याला अथवा जाळून टाका याला'' सरतेशेवटी अल्लाहने त्याला अग्नीपासून वाचविले, निश्चितपणे यात संकेत आहेत त्या लोकांसाठी जे श्रद्धा ठेवणारे आहेत. आणि त्याने सांगितले, ''तुम्ही ऐहिक जीवनात तर अल्लाहला सोडून मूर्तींना आपल्यादरम्यान प्रेमाचे साधन बनविले आहे,[८] पण पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्ही एकमेकाचा इन्कार आणि एक दुसऱ्याचा धिक्कार कराल, आणि अग्नी तुमचे ठिकाण असेल, आणि कोणी तुमचा सहायक नसेल.'' त्यावेळी लूत (अ.) ने त्याला मानले, आणि इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''मी माझ्या पालनकर्ताकडे देशांतर करतो. तो जबरदस्त आहे आणि बुद्धिमान आहे. आणि आम्ही त्याला इसहाक (अ.) व याकूब (अ.) (सारखी संतती) प्रदान केली आणि त्यांच्या वंशात प्रेषितत्व आणि ग्रंथ ठेवले व त्यांना जगात त्याचा मोबदला दिला आणि मरणोत्तर जीवनामध्ये तो निश्चितपणे सदाचाऱ्यांपैकी असेल. (२४-२७)

७) म्हणजे त्यांच्यासाठी कसलाही वाटा माझ्या कृपेत नाही. त्यांनी माझ्या कृपेत वाटा मिळविण्याची आशा धरावी याबाबतीत त्यांच्यासाठी कोणताही वाव नाही. त्यांनी जेव्हा परलोकाचा इन्कार केला आहे व त्यांना कधी ईश्वरासमोर हजर व्हावयाचे आहे, हे त्यांनी मान्यच केलेले नाही तेव्हा याचा अर्थ असा की त्यांनी ईश्वराकडून माफीची व बक्षीसाची मुळात आशाच धरली नाही.

८) म्हणजे तुम्ही ईश्वरोपासनेऐवजी मूर्तिपूजेच्या आधारावर आपल्या सामूहिक जीवनाची उभारणी केलेली आहे जेणेकरून लौकिक जीवनापुरते तुमच्या राष्ट्रीयत्वाची घडी नीट लावली जाऊ शकते कारण येथे कसल्याही श्रद्धेवर लोक एकत्र होऊ शकतात, मग ते सत्य असो की असत्य, आणि असले सर्वच एकोपे आणि एकत्रीकरण, मग ते कितीही चुकीच्या श्रद्धेच्या आधारे का असू नये, परस्परातील मित्रत्व, नातेवाईकी, भाऊबंदकी आणि इतर सर्व धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक व राजकीय संबंध प्रस्थापित करण्याचे साधन बनू शकतात.



आणि आम्ही लूत (अ.) ला पाठविले. तो आपल्या लोकांना म्हणाला, ''तुम्ही तर ते अश्लील कृत्य करता जे तुमच्यापूर्वी जगातील लोकांपैकी कोणीच केलेले नाही. काय तुमची ही अवस्था आहे की पुरुषाजवळ जाता, आणि वाटमारी करता व आपल्या सभेत वाईट कृत्ये करता?'' मग कोणतेही उत्तर त्याच्या लोकांपाशी याशिवाय नव्हते की त्यांनी सांगितले, ''घेऊन ये अल्लाहचा प्रकोप जर तू खरा असशील.'' लूत (अ.) ने सांगितले, ''हे माझ्या पालनकर्त्या, या उपद्रवी लोकांच्याविरूद्ध मला सहाय्य कर.'' (२८-३०)

आणि जेव्हा आमचे दूत इब्राहीम (अ.) जवळ सुवार्ता घेऊन पोहचले तेव्हा त्यांनी त्याला सांगितले, ''आम्ही या वस्तीच्या लोकांना नष्ट करणार आहोत.[९] या वस्तीचे लोक भयंकर अन्यायी बनलेले आहेत.'' इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''तेथे तर लूत उपस्थित आहे.'' त्यांनी सांगितले, ''आम्ही चांगले जाणतो की तेथे कोण कोण आहेत.'' आम्ही वाचविले त्याला व त्याच्या कुटुंबियांना त्याच्या पत्नीला वगळून, त्याची पत्नी मागे राहणाऱ्यांपैकी होती. (३१-३२)

मग जेव्हा आमचे दूत, लूत (अ.) पाशी पोहचले तेव्हा तो त्यांच्या आगमनाने अत्यंत अस्वस्थ व तंगहृदयी बनला, त्यांनी सांगितले, ''भिऊ नका व दुःखदेखील करू नका. आम्ही तुम्हाला व तुमच्या कुटुंबियांना वाचवू, तुमच्या पत्नीखेरीज की जी मागे राहणाऱ्यांपैकी आहे. आम्ही या वस्तीतील लोकांवर आकाशांतून प्रकोप कोसळविणार आहोत त्या दुराचाराबद्दल जे हे करीत राहिले आहेत.'' आणि आम्ही त्यावस्तीची एक उघड खूण ठेवली आहे,[१०] त्या लोकांसाठी जे बुद्धीचा वापर करतात. (३३-३५)

आणि आम्ही मदयनकडे त्यांचे भाऊ शूऐब (अ.) ला पाठविले. त्याने सांगितले, ''हे माझ्या लोकांनो, अल्लाहची भक्ती करा आणि अंतिम दिनाचे भय बाळगा आणि पृथ्वीवर उपद्रवी बनून अतिरेक करीत फिरू नका.'' परंतु त्यांनी त्याला खोटे ठरविले.

९) 'या वस्ती'चा संकेत लूत (अ.) च्या लोकसमूहाच्या प्रदेशाकडे होता. हजरत इब्राहीम (अ.) त्यावेळी फलस्तीनच्या हिबरून (हल्लीचे अलखलील) शहरी राहात असत. त्या शहराच्या आग्नेय दिशेत काही मैल अंतरावर मृत अंतरावर तो भाग विद्यमान आहे जेथे पूर्वी लूत (अ.) चा लोकसमूह बसलेला होता. हल्ली त्यावर समुद्राचे पाणी पसरले आहे. हा प्रदेश सखल भागात स्थित असून हिबरूनच्या उच्च पर्वतांवरून स्पष्टपणे दिसतो. म्हणूनच फरिश्त्यांनी त्याकडे निर्देश करून हजरत इब्राहीम (अ.) यांना सांगितले की, ''आम्ही ही वस्ती नष्ट करणार आहोत.''

१०) या उघड निशाणीने अभिप्रेत मृतसमुद्र आहे, याला लूत समुद्र असेही म्हटले जाते. दिव्य कुरआनात अनेक ठिकाणी मक्केतील अश्रद्धावंतांना उद्देशून फर्माविले गेले आहे की त्या अत्याचारी लोकसमूहावर त्याच्या कृत्यांपायी जो प्रकोप कोसळला होता, त्याची एक निशाणी आजही आम राजमार्गावर मौजूद आहे. तिला तुम्ही सीरियाकडे आपल्या व्यापारी प्रवासात जाताना रात्रन् दिवस पाहात असता.

सरतेशेवटी एका भयंकर भूकंपाने त्यांना गाठले आणि ते आपल्या घरांत पडले ते पडूनच राहिले. (३६-३७)

आणि आद व समूद लोकांना आम्ही नष्ट केले. तुम्ही ती स्थळे पाहिली आहेत जेथे ते राहात होते. त्यांच्या कृत्यांना शैतानाने त्यांच्यासाठी शोभिवंत बनविले आणि त्यांना सन्मार्गापासून दूर केले, वास्तविकत: ते सुज्ञ होते. आणि कारून, फिरऔन व हामान यांना आम्ही नष्ट केले. मूसा (अ.) त्यांच्याजवळ उज्ज्वल संकेत घेऊन आला, परंतु पृथ्वीवर त्यांनी आपल्या मोठेपणाचा अहंकार केला, वास्तविकत: ते मात करू शकणारे नव्हते. सरतेशेवटी आम्ही प्रत्येकाला त्याच्या गुन्ह्यांत पकडले. मग त्यांच्यापैकी कुणावर आम्ही दगडांचा वर्षाव करणारे झंझावात पाठविले आणि कुणाला भयंकर स्फोटाने गाठले तर कुणाला आम्ही जमिनीत धसविले आणि कुणाला बुडवून टाकले. अल्लाह त्यांच्यावर अत्याचार करणारा नव्हता पण ते स्वत:च आपल्यावर अत्याचार करीत होते. (३८-४०)

ज्या लोकांनी अल्लाहला सोडून इतरांना वाली बनविले आहे, त्यांचे उदाहरण कोळ्यासारखे आहे, जो आपले एक घर बनवितो आणि सर्व घरांपेक्षा जास्त दुर्बल कोळ्याचे घरच असते. यांना ज्ञान असते तर! हे लोक अल्लाहला सोडून ज्या कोणा वस्तूचा धावा करतात, अल्लाह त्याला चांगलेच जाणतो आणि तोच जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. ही उदाहरणे आम्हीं लोकांच्या प्रबोधनासाठी देत असतो, परंतु यांना तेच लोक समजतात जे ज्ञान बाळगणारे आहेत. अल्लाहने आकाशांना व पृथ्वीला सत्याधिष्ठित निर्माण केले आहे. वस्तुत: यात एक संकेत आहे श्रद्धावंतांसाठी. (४१-४४)

हे पैगंबर (स.), पठन करा या ग्रंथाचे जो तुमच्याकडे दिव्यबोधद्वारे पाठविला गेला आहे आणि नमाज कायम करा, निश्चितच नमाज, अश्लील व अपकृत्यांपासून रोखते आणि अल्लाहचे स्मरण याहूनही मोठी गोष्ट आहे.[११] अल्लाह जाणतो तुम्ही लोक जे काही करता. (४५)

आणि ग्रंथधारकांशी वाद घालू नका परंतु उत्तम रीतीने, त्या लोकांखेरीज जे

**११)** अर्थ असा की अश्लील कृत्यांपासून रोखणे तर एक लहान गोष्ट आहे, अल्लाहचे स्मरण म्हणजे नमाजचे लाभ याहून फार जास्त आहेत.



त्यांच्यापैकी अन्यायी असतील[१२] आणि त्यांना सांगा, ''आम्ही श्रद्धा ठेवली आहे त्या वस्तूवरही जी आमच्याकडे पाठविली गेली आहे आणि त्या वस्तुवरदेखील जी तुमच्याकडे पाठविली गेली होती, आमचा ईश्वर तुमचा ईश्वर एकच आहे आणि आम्ही त्याचेच (आज्ञाधारक) मुस्लिम आहोत.'' (हे पैगंबर (स.)) आम्ही याप्रमाणेच तुमच्याकडे ग्रंथ अवतरला आहे,[१३] म्हणून ते लोक ज्यांना आम्ही पूर्वी ग्रंथ दिला होता ते यावर श्रद्धा ठेवतात.[१४] आणि या लोकांपैकीदेखील बरेचसे यावर श्रद्धा ठेवीत आहेत[१५] आणि आमच्या संकेतांचा इन्कार केवळ अश्रद्धावंतच करतात. (४६-४७)

हे पैगंबर (स.), तुम्ही यापूर्वी कोणतेही ग्रंथ वाचतही नव्हता आणि आपल्या हातांनी लिहीततही नव्हता. जर असे असते तर असत्यवादी शंकेत पडू शकत होते. वस्तुत: हे उज्ज्वल संकेत आहेत त्या लोकांच्या अंत:करणात ज्यांना ज्ञान प्राप्त केले गेले आहे,[१६] आणि आमच्या संकेतांचा इन्कार करीत नाहीत परंतु ते, जे अन्यायी आहेत. हे लोक म्हणतात, ''का उतरविले गेले नाहीत या व्यक्तीवर संकेतचिन्हे याच्या पालनकर्त्या-कडून?'' सांगा, ''संकेतचिन्हे तर अल्लाहपाशी आहेत आणि मी केवळ सावध करणारा

**१२)** म्हणजे जे लोक अत्याचारी वर्तन अंगिकारतील त्यांच्याशी त्यांच्या अन्यायाच्या स्वरूपानुसार विभिन्न वर्तनेही स्वीकारली जाऊ शकतात. अर्थ असा की प्रत्येक वेळी, प्रत्येक स्थितीत आणि प्रत्येक प्रकारच्या लोकांच्या मुकाबल्यात मृदू आणि गोडच बनून राहू नये की जगाने सत्याचे आवाहन करणाऱ्यांच्या सज्जनतेला दुबळेपणा आणि लाचारी समजून बसावे. इस्लाम आपल्या अनुयायांना सभ्यता व सज्जनपणा आणि समंजसपणा तर जरूर शिकवितो परंतु लाचारी आणि दुबळेपणा पत्करणे शिकवीत नाही की त्यांनी प्रत्येक अत्याचारींसाठी मृदूघास बनून राहावे.

**१३)** याचे दोन अर्थ असू शकतात. एक असा की ज्याप्रमाणे पूर्वीच्या प्रेषितांवर आम्ही ग्रंथ उतरविले होते; त्याचप्रमाणे आता हा ग्रंथ तुमच्यावर उतरविला आहे. दुसरा असा की आमच्या अगोदरच्या ग्रंथांचा इन्कार करून नव्हे तर त्या सर्वांना मान्य करून याला मानावे याच शिकवणीसह आम्ही हा ग्रंथ उतरविला आहे.

**१४)** मागील व पुढील संदर्भावरून हे अगदी स्पष्ट होत आहे की याच्याने अभिप्रेत सर्वच ग्रंथधारक आहेत असे नाही तर ज्यांना ईश्वरी ग्रंथाचे खरे ज्ञान आणि आकलन लाभले होते, जे खऱ्या अर्थाने ग्रंथधारक होते तेच ग्रंथधारक आहेत.

**१५)** 'या लोकां'चा संकेत अरबवासियांकडे आहे. अर्थ असा की सत्यप्रिय लोक प्रत्येक जागी यावर श्रद्धा ठेवत आहेत मग ते ग्रंथधारकांपैकी असोत की ग्रंथधारक नसलेल्यांपैकी असोत.

**१६)** म्हणजे एका निरक्षराकडून कुरआनसारखा ग्रंथ प्रस्तुत करणे आणि अकस्मातपणे अशा अनन्यसाधारण योग्यतेचे प्रदर्शन करणे ज्यांच्यासाठी कसल्याही पूर्व तयारीची लक्षणे कधी व कुणाच्याही निदर्शनास आली नाहीत, याच बुद्धी व डोळसपणा बाळगणाऱ्यांच्या दृष्टीत त्याचे प्रेषितत्व प्रामाण्य ठरविणाऱ्या उज्ज्वलतम निशाण्या आहेत.

आहे उघडपणे.'' आणि काय या लोकांसाठी हे संकेतचिन्ह पुरेसे नाही की आम्ही तुमच्यावर ग्रंथ अवतरला जो यांना वाचून दाखविला जातो? वास्तविक पाहता यात जे लोक श्रद्धा ठेवतात त्या लोकांकरिता कृपा आणि उपदेश आहे. (हे पैगंबर (स.)) सांगा की, ''माझ्या आणि तुमच्या दरम्यान अल्लाह साक्षीकरिता पुरेसा आहे. तो आकाशांतील व पृथ्वीवरील सर्वकाही जाणतो. जे लोक असत्याला मानतात आणि अल्लाहशी द्रोह करतात तेच तोट्यात राहणारे आहेत.'' (४८-५२)

हे लोक तुमच्याकडे प्रकोप लवकर आणण्याची मागणी करतात. जर प्रकोपाची एक वेळ निश्चित केली गेली नसती तर यांच्यावर प्रकोप आला असता. आणि निश्चितच (ठरल्या वेळी) तो येणारच, अशा परिस्थितीत अकस्मातपणे की यांना पत्ताही लागणार नाही हे लोक तुमच्यापाशी प्रकोप लवकर आणण्याची मागणी करतात, वस्तुत: नरकाने या अश्रद्धावंतांना विळखा घातला आहे. (आणि यांना कळून चुकेल) त्या दिवशी जेव्हा प्रकोपाने यांना वरूनही आच्छादिले असेल आणि पायाखालूनदेखील, आणि सांगेल, की आता चाखा चव त्या कृत्यांची जी तुम्ही करीत होता. (५३-५५)

हे माझ्या दासांनो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, माझी भूमी विशाल आहे, म्हणून तुम्ही माझीच भक्ती करीत राहा.[१७] प्रत्येक सजीवाला मृत्यूचा आस्वाद घ्यावा लागणार आहे. मग तुम्ही सर्व आमच्याकडेच परतवून आणले जाणार आहात ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत, त्यांना आम्ही स्वर्गाच्या उच्च व बुलंद इमारतीत ठेवू ज्यांच्याखालून कालवे वाहात असतील. तेथे ते सदैव राहतील, किती छान मोबदला आहे कर्म करणाऱ्यांसाठी - त्या लोकांकरिता ज्यांनी संयम राखला आहे, आणि जे लोक आपल्या पालनकर्त्यावर विश्वास ठेवतात. कित्येक जनावरे आहेत जी आपले अन्न घेऊन फिरत नाहीत. अल्लाह त्यांना अन्न देतो आणि तुमचादेखील अन्नदाता तोच आहे. तो सर्वकाही ऐकतो व जाणतो. (५६-६०)

जर[१८] तुम्ही या लोकांना विचारले की पृथ्वी आणि आकाशांना कोणी निर्माण केले आहे, आणि चंद्र व सूर्याला कोणी अधीन केले आहे तर अवश्य म्हणतील की अल्लाहने,मग कोठून हे फसगत करून घेत आहेत? अल्लाहच आहे जो आपल्या दासांपैकी ज्याची इच्छितो उपजीविका विपुल करतो व ज्याची इच्छितो संकुचित करतो. निश्चितच अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आहे. आणि जर तुम्ही यांना विचारले, कोणी आकाशांतून पाणी वर्षविले आणि त्याद्वारे मृत पडलेल्या जमिनीला जिवंत केले तर ते

**१७)** हा संकेत आहे हिजरतकडे. अर्थ असा की जर मक्केत ईश्वराची बंदगी करणे मुश्किलीचे जात आहे तर देशत्याग करा, ईश्वराची भूमी तोकडी नाही. जेथे कोठे तुम्हाला ईश्वराचे दास बनून राहता येत असेल तेथे जा.

**१८)** येथून भाषणाचा रोख पुन्हा मक्केतील अश्रद्धावंतांकडे वळत आहे.



अवश्य म्हणतील, अल्लाहने. सांगा, स्तुती अल्लाहसाठीच आहे,[१९] परंतु यांच्यापैकी बहुतेकजण समजत नाहीत. (६१-६३)

आणि हे लौकिक जीवन काही नाही परंतु एक खेळ आणि मनोरंजन. वास्तविक जीवनाचे घर तर पारलौकिक घर आहे, हाय, या लोकांनी जाणिले असते जेव्हा हे लोक नावेत स्वार होतात तेव्हा आपला धर्म अल्लाहकरिताच निखालस ठेवून त्याची विनवणी करतात, मग जेव्हा तो यांना वाचवून खुष्कीवर आणतो तेव्हा अकस्मात हे अनेकेश्वरवाद करू लागतात जेणेकरून अल्लाहने दिलेल्या सुटकेबद्दल त्याच्याशी कृतघ्नता दाखवितात आणि (लौकिक जीवनाची) मौज लुटतात. लवकरच यांना कळून चुकेल. काय हे पाहात नाहीत की आम्ही एक शांतीपूर्ण 'हरम' बनविले आहे. वास्तविक पाहता यांच्या सभोवती लोक खेचून नेले जात आहेत.[२०] तरीसुद्धा हे लोक असत्याला मानतात व अल्लाहच्या देणगीशी कृतघ्नता दाखवितात? त्या व्यक्तीपेक्षा अधिक अत्याचारी कोण असेल जी अल्लाहशी खोटेनाटे रचीत असेल अथवा सत्याला खोटे ठरवीत असेल जेव्हा ते त्याच्या समक्ष आले असेल? अशा अश्रद्धावंतांचे ठिकाण नरकच नाही काय? जे लोक आमच्याकरिता प्रयत्नांची पराकाष्ठा करतील त्यांना आम्ही आमचे मार्ग दाखवू[२१] आणि निश्चितच अल्लाह सत्कर्मींच्याच समवेत आहे. (६४-६९)

**१९)** या ठिकाणी 'अलहम्दुलिल्लाह'– स्तुती अल्लाहसाठीच आहे. हे शब्द दोन अर्थ सांगत आहेत. एक असा की ज्याअर्थी ही सर्व कामे अल्लाहची आहेत त्याअर्थी स्तुतीस पात्रही केवळ तोच आहे. इतरांना स्तुतीची पात्रता कोठे प्राप्त झाली. दुसरा असा की ईश्वराचे आभारी आहोत, या गोष्टीची कबुली तुम्ही स्वत:देखील देत आहात.

**२०)** म्हणजे काय यांचे शहर मक्केला ज्याच्या आश्रयात यांना पराकोटीचे अभय प्राप्त आहे, कुणा 'लात' अथवा 'हुबल' या तथाकथित देवांनी आदरणीय बनविले आहे? काय कुणा देव देवतेचे हे सामर्थ्य होते की अडीच हजार वर्षांपासून अरबस्तानातील अत्यंत अशांततेच्या वातावरणात या ठिकाणाला सर्व उपद्रव आणि गोंधळापासून सुरक्षित ठेवावे? याचे आदर अबाधित ठेवणारे आम्ही जर नव्हतो तर अन्य कोण होता?

**२१)** अर्थ असा की जे लोक अल्लाहच्या मार्गात शुद्ध अंत:करणाने जगभराशी झुंज देण्याचा धोका पत्करतात त्यांना अल्लाह त्यांच्या दशेवर सोडून देतो असे नाही तर तो त्यांना हाती धरतो व त्यांचे मार्गदर्शन करतो व आपल्याकडे येण्याचे त्यांचे मार्ग खुले करतो. तो पदोपदी त्यांना दाखवितो की आमची प्रसन्नता तुम्ही कशा तऱ्हेने प्राप्त करू शकता. प्रत्येक वळणावर त्यांना प्रकाश दाखवितो की सरळ मार्ग कुणीकडे आहे आणि चुकीचे मार्ग कोणते आहेत. जितकी सद्‌भावना, ईशपरायणता आणि इच्छा त्यांच्यात असते तितकीच अल्लाहची मदत आणि सुबुद्धी व मार्गदर्शन त्यांच्यासमवेत असते.

# ३० सूरह अर्रूम

*(मक्काकालीन, वचने ६०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ लाऽऽम मीऽऽम. 'रोमन' लोक जवळच्या भूमीवर पराभूत झाले आहेत आणि आपल्या या पराभवानंतर काही वर्षांच्या आत ते विजयी होतील.[१] अल्लाहचाच अधिकार आहे अगोदरसुद्धा व नंतरदेखील, आणि तो दिवस असा असेल जेव्हा अल्लाहने प्रदान केलेल्या विजयावर मुसलमान आनंद व्यक्त करतील.[२] अल्लाह मदत करतो, ज्याला इच्छितो आणि तो जबरदस्त व दयावान आहे. हे वचन अल्लाहने दिले आहे. अल्लाह कधीही आपले वचन भंग करीत नसतो. परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत. (१-६)

लोक ऐहिक जीवनाचा केवळ दर्शनी पैलू जाणतात आणि मरणोत्तर जीवनाविषयी ते स्वतःच गाफिल आहेत. यांनी कधी आपल्या स्वतःशी मनन-चिंतन केले नाही काय? अल्लाहने पृथ्वी व आकाशांना आणि त्या सर्व वस्तू ज्या त्यांच्या दरम्यान आहेत, सत्याधिष्ठित व एका ठराविक मुदतीसाठीच निर्माण केल्या आहेत. परंतु बहुतेक लोक आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करणारे आहेत.[३] आणि हे लोक कधी पृथ्वीवर हिंडले-फिरले नाहीत काय की जेणेकरून यांना त्या लोकांचा शेवट पाहावयास मिळाला असता, जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत? ते यांच्यापेक्षा अधिक शक्तीशाली होते, त्यांनी जमिनीची खूप मशागत केली होती आणि त्यांनी तिला इतके वसविले होते की जितके यांनी वसविलेले नव्हते. त्यांच्यापाशी त्यांचे पैगंबर दिव्य संकेत घेऊन आले, मग अल्लाह त्यांच्यावर अन्याय करणारा नव्हता परंतु ते स्वतःच आपल्यावर अन्याय करीत

१) त्या काळी रोम आणि ईरान या दोन सत्तांच्या दरम्यान जे युद्ध सुरू होते त्याकडे हा संकेत आहे. त्यावेळी रोमनांचा दारूण पराभव झाला होता. ते पुन्हा उभे राहू शकतील अशी कोणी कल्पनादेखील करू शकत नव्हता. परंतु सर्वोच्च अल्लाहने सदरहू आयतीत अशी भविष्यवाणी केली की काही वर्षांनंतर रोमन पुन्हा विजयी होईल.

२) ही एक दुसरी भविष्यवाणी होती. हिचा अर्थ लोकांच्या लक्षात त्यावेळी आला जेव्हा बदरच्या युद्धात इकडे मुसलमानांना विजय प्राप्त झाला आणि रोम व ईरान यांच्या दरम्यानच्या युद्धात तिकडे रोमनांना वर्चस्व प्राप्त झाले.

३) म्हणजे जर माणसाने सृष्टी व्यवस्थेला सखोल दृष्टीने पाहिले तर त्याला दोन वास्तवता ठळकपणे दिसतील. एक अशी की ही काही एका खिलाडूचे खेळणे नव्हे तर बुद्धिमत्तेवर आधारित ध्येयपूर्ण अशी व्यवस्था आहे. दुसरी अशी की ही अनादी अनंत अशी व्यवस्था नव्हे तर एका वेळी निश्चितच ती संपुष्टात येणार आहे. या दोन्ही गोष्टी आखिरत-परलोकला प्रामाण्य ठरवितात परंतु लोक हे सर्वकाही पाहूनदेखील त्याचा इन्कार करतात.



होते. सरतेशेवटी ज्या लोकांनी वाईट कृत्ये केली होती त्यांचा शेवट फार वाईट झाला या कारणास्तव की त्यांनी अल्लाहच्या संकेतांना खोटे ठरविले होते आणि ते त्यांची थट्टा करीत होते. (७-१०)

अल्लाहच सृष्टीचा प्रारंभ करतो मग तोच तिची पुनरावृत्ती करील, मग त्याच्याकडेच तुम्ही परतविले जाल. आणि जेव्हा ती घटका उद्भवेल त्यादिवशी गुन्हेगार थक्क होतील.[४] त्यांच्या मानलेल्या भागीदारांपैकी कोणीही त्यांचा शिफारशी असणार नाही, आणि ते आपल्या भागीदारांचा इन्कार करणारे बनतील.[५] ज्या दिवशी ती घटका उद्भवेल त्या दिवशी (सर्व मानवमात्र) वेगळ्या गटांत विभागले जातील. ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे व ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत ते एका बागेत आनंदीत व प्रफुल्लित ठेवले जातील, आणि ज्यांनी इन्कार केला आहे आणि आमच्या संकेतांना व मरणोत्तर जीवनाच्या भेटीला खोटे ठरविले आहे ते प्रकोपांत हजर ठेवले जातील. (११-१६)

म्हणून पावित्र्यगान करा अल्लाहचे जेव्हा तुम्ही संध्याकाळी करीत असता व जेव्हा सकाळी करीत असता. आकाशांत व पृथ्वीवर त्याच्यासाठीच स्तुती आहे. आणि (पावित्र्यगान करा त्याचे) तिसऱ्या प्रहरी आणि जेव्हा दुपारची वेळ होते.[६] तो जीविताला मृतांतून काढतो. व मृताला जीवितातून काढून आणतो. आणि जमिनीला तिच्या मृत्यूनंतर जीवन प्रदान करतो. अशाच प्रकारे तुम्ही सुद्धा (मृतावस्थेतून) काढून आणले जाल. (१७-१९)

त्याच्या संकेतचिन्हांपैकी हे आहे की त्याने तुम्हाला मातीपासून निर्माण केले. मग अकस्मातपणे तुम्ही लोक (पृथ्वीवर) पसरत चालला आहात. (२०)

आणि त्याच्या संकेतचिन्हांपैकी ही आहे की त्याने तुमच्यासाठी तुमच्यामधून पत्नीं बनविल्या, जेणेकरून तुम्ही त्यांच्यापाशी संतोष प्राप्त करावा. आणि तुमच्या दरम्यान प्रेम आणि करुणा उत्पन्न केली, निश्चितच यात बरीच संकेतचिन्हे आहेत, त्या लोकांसाठी जे मनन व चिंतन करतात. (२१)

आणि त्याच्या संकेतचिन्हांपैकी आकाशांची व पृथ्वीची उत्पत्ती, आणि तुमच्या

४) मूळ अरबी शब्द 'मुबलिसून' प्रयुक्त झाला आहे. 'इबलास'चा अर्थ निराशा आणि दुःखामुळे एखाद्या माणसाचे सुन्न होणे, थक्क होणे असा होतो.

५) म्हणजे त्यावेळी हे अनेकेश्वरवादी स्वतः ही गोष्ट मान्य करतात की आम्ही त्यांना ईश्वराचे भागीदार ठरविण्यात मोठी चूक केली होती.

६) सदरहू आयतीत नमाजच्या चार वेळेकडे स्पष्ट संकेत आहे. फजर, मग़रिब, असर, जुहर. यांच्याबरोबर सूरह हूद आयत क्र. ११४, सूरह बनीइस्राईल, आयत क्र. ७८, आणि सूरह तॉऽहा आयत क्र. १३० वाचली गेल्यास नमाजच्या पाचही वेळांच्या आज्ञा समोर येतात.

भाषा व तुमच्या रंगांची भिन्नता आहे. निश्चितच यात बरीच संकेतचिन्हे आहेत बुद्धिमान लोकांसाठी. (२२)

आणि त्याच्या संकेतचिन्हांपैकी तुमचे रात्री व दिवसा झोपणे आणि तुमचे त्याच्या कृपाप्रसादाचा शोध घेणे होय, निश्चितच यात बरेच संकेत आहेत त्या लोकांसाठी जे (ध्यानपूर्वक) ऐकतील. (२३)

आणि त्याच्या संकेतांपैकी ही आहे की तो तुम्हाला विजेची चमक दाखवितो, भीतीबरोबरच आशा पल्लवीत करणारी, आणि आकाशातून पाण्याचा वर्षाव करतो, मग त्याच्याद्वारे तो भूमीला तिच्या मृत्यूनंतर जीवन प्रदान करतो. निश्चितच याच्यात बरेच संकेत आहेत. त्या लोकांसाठी जे बुद्धिचा उपयोग करतात. (२४)

आणि त्याच्या संकेतांपैकी हे आहे की आकाश व पृथ्वी त्याच्या आज्ञेने स्थायी आहेत. मग ज्याक्षणी तो तुम्हाला भूमीतून पुकारील केवळ एकाच हांकेत अकस्मात तुम्ही निघून याल. आकाशांत आणि पृथ्वीत जे जे आहेत त्याचे दास आहेत. सर्वच्या सर्व त्याच्या आज्ञाधीन आहेत. तोच आहे जो सृष्टीचा प्रारंभ करतो, मग तोच तिची पुनरावृत्ती करील आणि हे त्याच्यासाठी अधिक सुलभ आहे. आकाश आणि पृथ्वीत त्याचे गुणवैशिष्ठ्य सर्वात वरचढ आहे, आणि तो जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (२५-२७)

तो तुम्हाला खुद्द तुमच्या स्वत:चेच उदाहरण देतो. तुमच्या त्या दासांपैकी जे तुमच्या मालकीचे आहेत, काही दास असेसुद्धा आहेत का की जे आम्ही दिलेल्या मालमत्तेत तुमचे समान वाटेकरी म्हणून आहेत? आणि तुम्ही त्यांना असे भिता का आपापसात आपल्या तुल्यबळांना भिता?[७] अशा प्रकारे आम्ही संकेत उघड करून प्रस्तुत करतो, त्या लोकांसाठी जे बुद्धिचा उपयोग करतात. परंतु हे अत्याचारी काहीही न समजता-उमजता आपल्या कल्पनांच्या मागे लागले आहेत. आता त्या इसमाला कोण मार्ग दाखवू शकतो ज्याला अल्लाहने मार्गभ्रष्ट केले आहे? अशा लोकांचा तर कोणीही सहायक बनू शकत नाही. (२८-२९)

मग (हे पैगंबर (स.) आणि पैगंबरांच्या अनुयायांनो) एकाग्र होऊन आपले लक्ष या धर्माच्या दिशेत स्थिर करा. दृढ बना त्या प्राकृतिक स्वभावावर ज्यावर सर्वश्रेष्ठ अल्लाहने

७) सूरह नहल आयत क्र. ६२ मध्ये जो विषय येऊन गेला आहे तोच हा विषय आहे. दोन्ही ठिकाणी युक्तिवाद असा आहे, जेव्हा आपल्या मालमत्तेत आपल्या दासांना भागीदार बनवीत नाहीत तेव्हा तुमच्या बुद्धीला हे कसे पटते की ईश्वर आपल्या ईशत्वात आपल्या दासांना भागीदार बनवील?



मानवजातीला निर्माण केले आहे. अल्लाहने केलेली रचना बदलली जाऊ शकत नाही,[८] हाच अगदी रास्त आणि योग्य धर्म आहे परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत. (दृढ बना या गोष्टीवर) अल्लाहकडे रुजू होत असताना, आणि भय बाळगा त्याच्या प्रकोपाचे, व नमाज कायम करा, आणि बनू नका त्या अनेकेश्वरवाद्यांपैकी ज्यांनी आपापला धर्म वेगळा बनविला आहे आणि गटागटात विभागले गेले आहेत, प्रत्येक गटापाशी जे काही आहे त्यात तो मग्न आहे. (३०-३२)

लोकांची स्थिती अशी आहे की जेव्हा त्यांना एखादा त्रास होतो तेव्हा ते आपल्या पालनकर्त्याकडे रुजू होऊन त्याचा धावा करतात, मग जेव्हा तो आपल्या कृपेचा काही आस्वाद देतो तेव्हा अकस्मात त्यांच्यापैकी काही लोक अनेकेश्वरवाद अवलंबू लागतात जेणेकरून आम्ही केलेल्या उपकाराबद्दल कृतघ्नता दाखवावी. बरे, मौज करा. लवकरच तुम्हाला कळून चुकेल. काय आम्ही एखादी सनद आणि प्रमाण यांच्यावर उतरविला आहे की जो साक्ष देत असेल त्या अनेकेश्वरवादाच्या सत्यतेची जे हे करीत आहेत?

(३३-३५)

जेव्हा आम्ही लोकांना कृपेचा आस्वाद देतो तेव्हा ते त्याच्यावर फुलून जातात आणि जेव्हा त्यांनी आपण केलेल्या कृत्यामुळे त्यांच्यावर एखादे संकट येते तेव्हा ते अकस्मात निराश होऊ लागतात. काय हे लोक पाहात नाहीत की अल्लाहच उपजीविका विपूल करतो ज्याची इच्छितो आणि संकुचित करतो (ज्याची इच्छितो)? निश्चितच यात पुष्कळ संकेत आहेत त्या लोकांसाठी जे श्रद्धा ठेवतात. म्हणून (हे श्रद्धावंता) नातेवाईकास त्याचा हक्क दे आणि गरीब व वाटसरूला (त्याचा हक्क[९]), ही पद्धत उत्तम आहे त्या लोकांसाठी जे अल्लाहची प्रसन्नता इच्छित असतात. आणि तेच सफल होणार आहेत. जे व्याज तुम्ही देता जेणेकरून लोकांच्या मालमत्तेत मिसळून त्याची वाढ व्हावी, अल्लाहच्या जवळ ते वाढत नाही.[१०] आणि जी जकात तुम्ही अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याच्या

८) म्हणजे ईश्वराने मानवाला आपला दास बनविला आहे व आपल्याच दास्यत्वासाठी त्याला निर्माण केले आहे. ही रचना कोणाच्या बदलण्याने बदलू शकत नाही. माणूस दासाचा गैरदासही बनू शकत नाही व कुणा गैर ईश्वराला ईश्वर मानण्याने तो वास्तविकपणे त्याचा ईश्वर बनूही शकत नाही. माणसाने आपले कितीका देव मानू नये परंतु ही वस्तुस्थिती आपल्या जागी अटळ आहे की तो एका ईश्वराखेरीज कुणाचाच दास नाही. या आयतीचा दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो की 'अल्लाहने केलेल्या रचनेत बदल केला जाऊ नये' म्हणजे अल्लाहने ज्या सृष्टीवर माणसाला निर्माण केले आहे ती बिघडविणे अथवा विकृत करणे योग्य नाही.

९) असे फर्माविले नाही की नातेवाईक, गोरगरीब आणि वाटसरूला दान कर, संकेत असा झाला की हा त्याचा हक्क आहे, तो तू दिला पाहिजे आणि हक्क समजूनच तू त्याला दे.

१०) 'व्याज'च्या निषेधात उतरलेली ही पहिलीच आयत होय. नंतरच्या आज्ञेसाठी पहा. सूरह आलेइम्रान, आयत क्र. १३०, सूरह बकरा, आयत क्र. २७५ ते २८१.

इच्छेने देता, ती देणारेच वास्तविकत: आपल्या मालमत्तेत वाढ करतात. (३६-३९)

अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला निर्माण केले, मग तुम्हाला उपजीविका दिली, मग तो तुम्हाला मृत्यू देईल. मग तो तुम्हाला जिवंत करील. काय तुम्ही मानलेल्या भागीदारांपैकी कोणी असा आहे जो यापैकी कोणतेही काम करू शकेल? पवित्र आहे तो आणि फार उच्च व श्रेष्ठतम आहे तो त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करीत आहेत. खुष्की व समुद्रावर उपद्रव माजले आहेत, लोकांच्या आपल्या हातांच्या कमाईने[११] जेणेकरून चव चाखवावी त्यांना त्यांच्या काही कृत्यांची, कदाचित ते परावृत्त होतील. (हे पैगंबर (स.)) यांना सांगा की पृथ्वीवर भ्रमण करून पहा की पूर्वी होऊन गेलेल्या लोकांचा शेवट कसा झाला आहे, त्यांच्यापैकी बहुतेक अनेकेश्वरवादीच होते. तर (हे पैगंबर (स.)) आपले लक्ष दृढतेने स्थिर करा या रास्त धर्माच्या दिशेने, यापूर्वी की तो दिवस येईल जो टाळण्याचा कोणताही मार्ग अल्लाहकडून शिल्लक राहणारा नाही. त्यादिवशी लोक फुटून एक दुसऱ्यापासून विभक्त होतील. ज्याने द्रोह केला आहे त्याच्या द्रोहाचे अरिष्ट त्याच्यावरच आहे, आणि ज्या लोकांनी सत्कार्य केले आहे ते स्वत:साठीच (कल्याणाचा मार्ग) विस्तृत करीत आहेत जेणेकरून अल्लाह श्रद्धावंतांना व सत्कृत्ये करणाऱ्यांना आपल्या कृपेने मोबदला देईल निश्चितच तो अश्रद्धावंतांना पसंत करीत नाही.

(४०-४५)

त्याच्या संकेतांपैकी ही एक आहे की तो वारे पाठवीत असतो शुभवार्ता देण्यासाठी आणि तुम्हाला आपल्या कृपेने उपकृत करण्यासाठी आणि यासाठी की नौका त्याच्या आज्ञेने चालाव्यात आणि तुम्ही त्याची कृपा शोधावी आणि त्याचे कृतज्ञ बनावे. आणि आम्ही तुमच्यापूर्वी पैगंबरांना त्यांच्या जनसमूहांकडे पाठविले आणि ते त्यांच्यापाशी उज्ज्वल संकेत घेऊन आले. मग ज्यांनी अपराध केला, त्यांचा आम्ही सूड घेतला. आणि आम्हावर हा हक्क होता की आम्ही श्रद्धावंतांची मदत करावी. (४६-४७)

अल्लाहच आहे जो वाऱ्यांना पाठवितो आणि ते ढग उचलतात आणि मग तो या ढगांना आकाशात पसरवितो जसे इच्छितो आणि त्यांना तुकडीत विभागतो, मग तू पाहतोस की पावसाचे थेंब ढगातून ठिबकू लागतात. हा पाऊस जेव्हा तो आपल्या दासांपैकी ज्यांच्यावर इच्छितो वर्षवितो, तेव्हा ते अकस्मात हर्षभरित होतात. वस्तुत: त्याच्या कोसळण्यापूर्वी ते निराश होत होते. पहा, अल्लाहच्या कृपेचे परिणाम की मृत पडलेल्या जमिनीला तो कशाप्रकारे जीवित करतो. नि:संशय तो मृतांना जीवन प्रदान करणारा आहे व तो प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे आणि जर आम्ही एक असा वारा पाठविला की ज्याच्या प्रभावाने त्यांना आपली शेती पिवळी आढळली तर ते द्रोह करीत

**११)** संकेत त्या युद्धाकडे आहे, जे त्या काळच्या जगातील दोन बलाढ्य शक्ती ईरान आणि रोम यांच्या दरम्यान सुरू होते.



बसतात.[१२] (हे पैगंबर (स.)) तुम्ही मृतांना ऐकवू शकत नाही. त्या बहिऱ्यांनादेखील आपली हाक ऐकवू शकत नाही.[१३] जे पाठ फिरवून चालू लागले असतील आणि तुम्ही आंधळ्यांनादेखील त्यांच्या पथभ्रष्टतेतून काढून सरळमार्ग दाखवू शकत नाही. तुम्ही तर फक्त त्यांनाच ऐकवू शकता जे आमच्या संकेतांवर श्रद्धा ठेवतात व आज्ञापालनार्थ मान तुकवितात. (४८-५३)

अल्लाहच तर आहे ज्याने दुर्बल अवस्थेपासून तुमच्या निर्मितीस प्रारंभ केला, मग त्या दुर्बलतेनंतर तुम्हाला शक्ती प्रदान केली. मग त्या शक्तीनंतर तुम्हाला दुर्बल व वृद्ध केले. तो जे काही इच्छितो निर्माण करतो. आणि तो सर्वकाही जाणणारा व प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. आणि जेव्हा ती घटका[१४] उद्भवेल तेव्हा अपराधी शपथा घेऊन घेऊन सांगतील की आम्ही एका घटकेपेक्षा अधिक थांबलो नाही. अशाच प्रकारे ते लौकिक जीवनातही धोका खात असत परंतु ज्यांना ज्ञान व श्रद्धेने उपकृत केले गेले होते, ते म्हणतील की अल्लाहच्या लेखात तर तुम्ही उत्थापनाच्या दिवसापर्यंत पडून राहिला आहात, तर हाच तो उत्थापनाचा दिवस (रोजे हश्र) आहे, परंतु तुम्ही जाणत नव्हता. तर तो दिवस असेल ज्यात अत्याचाऱ्यांना त्याचे निमित्त पुढे करणे काहीच लाभदायी ठरणार नाही आणि त्यांना माफी मागण्याबद्दलही सांगण्यात येणार नाही.[१५] (५४-५७)

आम्हीं या कुरआनात लोकांना भिन्नभिन्न प्रकारे समजाविले आहे. मग तुम्ही कोणताही संकेत आणा, ज्या लोकांनी मानण्यास नकार दिला आहे. ते हेच म्हणतील की तुम्ही असत्यावर आहात. अशाप्रकारे मोहर लावतो अल्लाह त्या लोकांच्या हृदयावर जे ज्ञानरहित आहेत. म्हणून (हे पैगंबर (स.)) संयम बाळगा. निश्चितच अल्लाहचे वचन सत्य आहे. आणि कदापि तुम्ही दुबळे आढळू नये त्या लोकांना जे विश्वास ठेवीत नाहीत.[१६]

(५८-६०)

**१२)** म्हणजे मग ईश्वराला दूषणे देऊ लागतात व त्यावर आरोप ठेवू लागतात की त्याने कसल्या संकटात आम्हाला टाकले आहे. वास्तविकपणे जेव्हा त्यांच्यावर आपल्या देणगीचा वर्षाव केला होता, त्यावेळी त्यांनी कृतज्ञता दाखविण्याऐवजी त्यांचा अनादर केला होता.

**१३)** म्हणजे त्या लोकांना ज्यांची सद्सद्विवेकबुद्धी मृत झाली आहे.

**१४)** म्हणजे अंतिम प्रलय, ज्याच्या आगमनाची खबर दिली जात आहे.

**१५)** दुसरा अनुवाद, असाही होऊ शकतो 'त्यांच्याकडून असे इच्छिलेही जाणार नाही की आपल्या पालनकर्त्याला राजी करा.'

**१६)** म्हणजे शत्रूला तुम्ही असे आढळू नये की त्यांच्या आरडाओरडीमुळे तुम्ही नमते व्हावे, अथवा त्यांच्या आळ लावण्याच्या व कुभांड रचण्याच्या मोहिमेने तुम्ही भीडग्रस्त व्हावे अथवा त्यांच्या नावे ठेवण्यामुळे, त्यांच्या टोमणे आणि चेष्टा मस्करीमुळे तुमचे धैर्य खचावे किंवा त्यांच्या धमकी आणि शक्तीप्रदर्शनामुळे आणि जुलूम व अत्याचारामुळे तुम्ही भयभीत व्हावे अथवा त्यांनी दाखविलेल्या आमिषांना तुम्ही बळी पडावे.

# ३१ सूरह लुक़मान

*(मक्काकालीन, वचने ३४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ लाऽऽम मीऽऽम. हे बुद्धिमत्तापूर्ण ग्रंथाचे संकेत आहेत,[१] मार्गदर्शन व कृपा सदाचारी लोकांसाठी जे नमाज कायम करतात, जकात देतात, आणि मरणोत्तर जीवनावर विश्वास ठेवतात. हेच लोक आपल्या पालनकर्त्याकडून सरळमार्गावर आहेत आणि हेच सफल होणार आहेत. (१-५)

आणि माणसापैकी कोणी असाही आहे की मनमोहक कथा खरेदी करून आणतो,[२] जेणेकरून लोकांना अल्लाहच्या मार्गापासून ज्ञानाविना भटकवावे आणि या मार्गाचे आवाहन चेष्टेत उडवावे. अशा लोकांसाठी भयंकर अपमानजनक शिक्षा आहे. त्याला जेव्हा आमचे संकेत ऐकविले जातात तेव्हा तो मोठ्या गर्वाने अशाप्रकारे आपले तोंड फिरवितो जणू त्याने त्या ऐकल्याच नाहीत, जणू त्याचे कान बधीर आहेत. शुभवार्ता ऐकवा त्याला एका यातनादायक शिक्षेची. तथापि जे लोक श्रद्धा ठेवतील व सत्कृत्ये करतील त्यांच्यासाठी ऐश्वर्यसंपन्न स्वर्ग आहे, ज्यात ते संदैव राहतील, हे अल्लाहचे पक्के वचन आहे आणि तो जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (६-९)

त्याने आकाशांना निर्माण केले खांबाविना जे तुम्हाला दिसते. त्याने पृथ्वीत पर्वतांना दृढ केले जेणेकरून तिने तुम्हाला घेऊन कलंडू नये. त्याने हरप्रकारचे प्राणी पृथ्वीवर पसरविले आणि आकाशातून पाणी वर्षविले आणि जमिनीतून भिन्नभिन्न प्रकारच्या उत्तम वस्तू उगविल्या. ही तर आहे अल्लाहची निर्मिती, आता मला दाखवा पाहू इतरांनी काय निर्मिले आहे? - खरी गोष्ट अशी आहे की हे अत्याचारी लोक उघड पथभ्रष्टतेत पडलेले आहेत. (१०-११)

आम्ही लुकमानला बुद्धिमत्ता प्रदान केली होती की त्याने अल्लाहचे कृतज्ञ बनावे. जो कोणी कृतज्ञता दर्शवील त्याची कृतज्ञता त्याच्यासाठीच लाभप्रद आहे जो सत्याचा

१) म्हणजे अशा ग्रंथाच्या आयती ज्या बुद्धीमत्तेने ओतप्रोत आहेत, ज्याची प्रत्येक गोष्ट बुद्धीला धरून आहे.

२) मूळ अरबी शब्द 'लह्वल्हदीस' असे आहेत. म्हणजे असली गोष्ट जी माणसाला आपल्यात मशगूल ठेवून इतर प्रत्येक गोष्टीपासून गाफिल करीत असावी. निवेदनांत उल्लेख आहे की जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या प्रचाराचा प्रभाव कुरैशांच्या सर्व प्रयत्नांविरूद्धही, पसरण्यावाचून राहिला नाही तेव्हा त्यांनी ईरान देशातून रुस्तुम व असफंदयार यांच्या कथा मागवून कथा ऐकविण्याचा क्रम सुरू केला व गायन व वादन करणाऱ्या दासींची व्यवस्था केली जेणेकरून लोकांनी याच गोष्टीत मशगूल राहून पैगंबर (स.) यांची गोष्ट ऐकू नये.



इन्कार करील तर वास्तविकत: अल्लाह निरपेक्ष आहे आणि तो स्वयंस्तवनीय आहे. (१२)

स्मरण करा जेव्हा लुकमान आपल्या पुत्राला उपदेश करीत होता तेव्हा त्याने सांगितले, ''पुत्रा! अल्लाहसमवेत कोणालाही सहभागी ठरवू नकोस, सत्य असे आहे की शिर्क (धर्मात अल्लाहसोबत कोणालाही सहभागी ठरविणे) फार मोठा अन्याय आहे.'' - आणि ही वस्तुस्थिती आहे की आम्ही मानवाला आपल्या मातापित्यांचा हक्क ओळखण्याची स्वत: ताकीद केली आहे. त्याच्या आईने यातनामागून यातना सहन करून त्याला आपल्या उदरात ठेवले आणि दोन वर्षे तिचे दूध सोडविण्यास लागले. (म्हणूनच आम्ही त्याला उपदेश दिला की) माझ्याप्रती कृतज्ञता दाखव आणि आपल्या मातापित्यांशी कृतज्ञ रहा, माझ्याकडेच तुला परतावयाचे आहे. परंतु जर त्यांनी तुझ्यावर दबाव आणला की माझ्यासमवेत तू अशा एखाद्याला भागीदार ठरवावेस की ज्याला तू जाणत नाही,[३] तर त्यांचे म्हणणे अजिबात ऐकू नकोस. जगात त्यांच्याशी सद्व्यवहार करीत राहा परंतु अनुकरण त्या व्यक्तीच्या मार्गाचे कर जो माझ्याकडे रुजू झाला आहे. मग तुम्हा सर्वांना परतावयाचे माझ्याकडेच आहे, त्यावेळी मी तुम्हाला दाखवीन की तुम्ही कसली कृत्ये करीत होतात. (१३-१५)

(आणि लुकमानने सांगितले होते की) ''बेटा, कोणतीही वस्तू ती मोहरीच्या दाण्याबरोबर का असेना आणि कोणत्याही खडकात किंवा आकाशात अथवा पृथ्वीत कोठेही लपलेली का असेना, अल्लाह ती काढून आणील. तो सूक्ष्मदर्शी व खबर राखणारा आहे. बेटा, नमाज कायम कर, सत्कृत्यांचा आदेश दे, दुष्कृत्यांची मनाई कर, आणि जी काही आपत्ती येईल त्यावर संयम राख. या त्या गोष्टी आहेत ज्यांची ताकीद दिली गेली आहे,[४] आणि लोकांशी तोंड फिरवून बोलू नकोस, पृथ्वीवर ऐटीत चालूदेखील नकोस, अल्लाह कोणत्याही अहंकारी व गर्व करणाऱ्या व्यक्तीला पसंत करीत नाही. आपल्या चालीत मध्यमपणा राख आणि आपला आवाज थोडा धिमा ठेव, सर्व आवाजांपेक्षा अधिक वाईट आवाज गाढवाचा असतो.'' (१६-१९)

काय तुम्ही लोक पाहात नाही की अल्लाहने पृथ्वी व आकाशांच्या सर्व वस्तू

३) म्हणजे जो तुझ्या माहितीत माझा भागीदार नाही.

४) दुसरा अर्थ असाही होऊ शकतो की हे मोठ्या धाडसाच्या कामापैकी आहे.

तुमच्यासाठी अधीन करून ठेवल्या आहेत[5] आणि आपल्या प्रकट व अप्रकट देणग्या तुम्हावर पूर्ण केल्या आहेत? याउपर स्थिती अशी आहे की माणसांपैकी काही लोक आहेत जे अल्लाहच्याबाबतीत भांडण करतात, कोणतेही ज्ञान अथवा मार्गदर्शन किंवा प्रकाश देणाऱ्या ग्रंथाविना. आणि जेव्हा त्यांना सांगण्यात येते की अनुकरण करा त्या गोष्टीचे, जी अल्लाहने अवतरली आहे, तर ते म्हणतात की आम्ही तर त्या गोष्टीचे अनुकरण करू ज्यावर आमचे पूर्वज आम्हाला आढळले आहेत. काय हे त्यांचेच अनुकरण करतील जरी शैतान त्यांना भडकत्या आगीकडेच बोलावीत राहिला असेल? (२०-२१)

ज्या माणसाने, आपल्या स्वत:ला अल्लाहच्या स्वाधीन केले आणि आचरणाने तो नेक असेल, त्याने वास्तविकत: एक विश्वसनीय आधार धरला, आणि सर्व मामल्यांचा अंतिम निर्णय अल्लाहच्याच हाती आहे. आता जो सत्याचा इन्कार करतो त्याच्या द्रोहाने तुम्हाला दु:खात लोटू नये. त्यांना परतून यावयाचे तर आमच्याकडेच आहे, मग आम्ही त्यांना दाखवून देऊ की ते काय काय करून आलेले आहेत. निश्चितच अल्लाह उरांत लपलेली गुपितेसुद्धा जाणतो. आम्ही थोड्या मुदतीसाठी त्यांना दुनियेत मजा लुटण्याची संधी देत आहोत, मग त्यांना असहाय करून एका भयंकर यातनेकडे ओढून नेऊ. (२२-२४)

जर तुम्ही यांना विचारले की, पृथ्वी व आकाशांना कोणी निर्माण केले आहे तर हे जरूर म्हणतील की, अल्लाहने. म्हणा, सर्व स्तुती अल्लाहसाठीच आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण जाणत नाहीत. आकाशांत आणि पृथ्वीत जे काही आहे ते अल्लाहचे आहे, नि:संशय अल्लाह निरपेक्ष व स्वयंस्तवनीय आहे. पृथ्वीवर जितकी झाडे आहेत जर ती सर्वच्या सर्व लेखण्या बनली आणि समुद्र (दौत बनले) ज्याला आणखीन सात समुद्रांनी

५) एखाद्या वस्तूला कोणासाठी वशीभूत करणे दोन स्वरूपाचे असू शकते. एक असे की ती वस्तू त्याच्या आज्ञांकित केली जावी व त्याला अधिकार दिला जावा की हवे तसे त्याचा उपभोग घेतला जावा व हवे तसे ती उपयोगात आणली जावी. दुसरे असे की त्या वस्तुला अशा नियमांनी नियंत्रित करावे की ज्यामुळे ती वस्तू त्या माणसासाठी उपयुक्त ठरावी व त्याच्या हितासाठी कार्यरत राहावी. पृथ्वी व आकाशांच्या सर्व वस्तू सर्वोच्च अल्लाहने मानवासाठी एकाच अर्थाने वशीभूत केल्या आहेत असे नाही तर काही वस्तू, पहिल्या अर्थानुरूप वशीभूत केल्या आहेत व काही दुसऱ्या अर्थानुरूप. उदा. वारा, पाऊस, माती, अग्नी, वनस्पती, खनिजे, जनावरे इ. असंख्य वस्तू पहिल्या अर्थानुरूप आमच्यासाठी वशीभूत आहेत, आणि चंद्र, सूर्य इ. दुसऱ्या अर्थाप्रमाणे.



शाई पुरविली तरीसुद्धा अल्लाहच्या गोष्टी (लिहून) संपणार नाहीत,[6] नि:संशय अल्लाह जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. तुम्हा सर्व माणसांना निर्माण करणे मग दुसऱ्यांदा जिवंत उभे करणे तर (त्याच्यासाठी) बस्स असे आहे जसे एका जिवाला (निर्माण करणे आणि दुसऱ्यांदा जिवंत उभे करणे) वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे. (२५-२८)

काय तुम्ही पाहात नाही की अल्लाह रात्रीला दिवसात ओवीत आणतो आणि दिवसाला रात्रीत? त्याने सूर्य आणि चंद्राला अधीन करून ठेवले आहे, सर्व एका ठराविक अवधीपर्यंत वाटचाल करीत आहेत[7] आणि (तुम्ही जाणत नाही काय) की जे काही तुम्ही करता अल्लाह त्याची खबर राखणारा आहे? हे सर्व काही यामुळे आहे की अल्लाहच सत्य आहे, आणि त्याला सोडून ज्या दुसऱ्यांचा हे लोक धावा करतात ते सर्व असत्ये आहेत, आणि (या कारणाने की) अल्लाहच महान व उच्चतर आहे. (२९-३०)

काय तुम्ही पाहात नाही की नौका समुद्रात अल्लाहच्या कृपेने चालते जेणेकरून त्याने तुम्हाला आपले काही संकेत दाखवावेत? वस्तुत: यात खूपशी संकेतचिन्हे आहेत, त्या प्रत्येक माणसासाठी जो संयम आणि कृतज्ञता दर्शविणारा आहे. आणि जेव्हा (समुद्रात) या लोकांवर एक लाट छत्राप्रमाणे आच्छादित होते तेव्हा हे अल्लाहचा धावा करतात, आपल्या धर्माला अगदी त्याच्यासाठीच निर्भेळ करून, मग जेव्हा तो त्यांना वाचवून खुष्कीपर्यंत पोहचवितो, तेव्हा त्यांच्यापैकी कोणी मध्यममार्ग[8] अवलंबितो, आणि आमच्या संकेतांचा इन्कार करतो तो प्रत्येक मनुष्य जो विद्रोही व कृतघ्न आहे. (३१-३२)

लोकहो! स्वत:ला वाचवा, आपल्या पालनकर्त्याच्या कोपापासून आणि भीती बाळगा त्या दिवसाची जेव्हा कोणताही पिता आपल्या पुत्रातर्फे बदला देणार नाही आणि

६) हाच विषय थोड्या वेगळ्या शब्दात सूरह कहफ, आयत क्र. १०९ यात आलेला आहे. याच्याने अशी कल्पना देण्याचा हेतू आहे की ज्या ईश्वराने इतक्या विशाल सृष्टीला अस्तित्वात आणले आहे की त्याच्या सामर्थ्याच्या चमत्कारांना काही सीमाच नाही, त्याच्या ईशत्वात कुणी निर्मिती कशी भागीदार असू शकते बरे?

७) म्हणजे प्रत्येक वस्तूची जी आयुष्यमर्यादा घालून दिलेली आहे त्याच अवधीपुरती ती हालचाल करीत आहे. कोणतीही वस्तू आदीही नाही व अनादीदेखील नाही.

८) याचे दोन अर्थ असू शकतात. 'मध्यम मार्ग'ला जर सरळमार्गीच्या अर्थाने घेतले गेले तर त्याचा अर्थ असा की त्यांच्यापैकी कोणी ती वेळ टळल्यानंतरही एकेश्वरवादावर दृढ राहतो, पण जर ते मध्य आणि समतोलपणा या अर्थाने घेतले गेल्यास अर्थ असा होईल की काही लोक आपल्या अनेकेश्वरी व नास्तिकतेच्या श्रद्धेत त्या प्रमाणात जहाल राहात नाहीत अथवा काही लोकांत शुद्ध अंत:करणाची जी स्थिती त्यावेळी निर्माण झाली होती, ती मंद पडते.

कोणताही पुत्रसुद्धा आपल्या पित्यातर्फे कोणताही बदला देणार नाही. खरोखरच अल्लाहचे वचन सत्य आहे,[१] म्हणून या लौकिक जीवनाने तुम्हाला फसवू नये आणि धोकेबाजांनीसुद्धा तुम्हाला अल्लाहच्या बाबतीत फसवू नये. (३३)

त्या घटकेचे ज्ञान अल्लाहपाशीच आहे, तोच पर्जन्यवृष्टी करतो, तोच जाणतो की आईच्या उदरात काय वाढत आहे, कोणतीही व्यक्ती जाणत नाही की उद्या तो काय कमाई करणार आहे आणि कोणत्याही व्यक्तीला हे माहीत नाही की उद्या त्याला कोणत्या भूमीवर मृत्यू येणार आहे, अल्लाहच सर्वकाही जाणणारा व माहितगार आहे. (३४)

१) अर्थात कयामत (पुनरुज्जीवन) चे वचन.



# ३२ सूरह अस्सज्दह्

*(मक्काकालीन, वचने ३०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अलिफ लाऽऽम मीऽऽम. या ग्रंथाचे अवतरण नि:संशय सकल जगांच्या पालनकर्त्याकडून आहे. काय हे लोक म्हणतात की या व्यक्तीने हा स्वत: रचला आहे? नव्हे, तर हे सत्य आहे तुझ्या पालनकर्त्याकडून जेणेकरून तू सावध करावे एका अशा जनसमूहाला ज्याच्याजवळ तुझ्यापूर्वी कोणीही सावध करणारा आला नाही. कदाचित त्यांना मार्गदर्शन प्राप्त होईल. (१-३)

तो अल्लाहच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला आणि त्या सर्व वस्तूंना, ज्या त्याच्या दरम्यान आहेत, सहा दिवसांत निर्माण केले आणि त्यानंतर अर्श (राजसिंहासना) वर विराजमान झाला. त्याच्याशिवाय तुमचा कोणी समर्थक व सहायकही नाही आणि कोणी त्याच्यापुढे शिफारस करणारादेखील नाही, मग काय तुम्ही शुद्धीवर येणार नाही? तो आकाशापासून पृथ्वीपर्यंत जगाच्या मामल्यांची तजवीज करतो आणि त्या तजविजीचा अहवाल वर त्याच्या ठायी सादर होतो, एका अशा दिवसात ज्याचे प्रमाण तुमच्या गणनेनुसार एक हजार वर्षे आहे.[१] तोच आहे प्रत्येक गुप्त व प्रकट गोष्टीचा जाणणारा, जबरदस्त आणि परमकृपाळू जी जी वस्तू त्याने निर्माण केली उत्तमच निर्माण केली. त्याने माणसाच्या निर्मितीचा प्रारंभ चिखलमातीपासून केला, मग त्याचा वंश एका अशा सत्वाने चालविला जे क्षुद्र पाण्यासमान आहे. मग त्याला नखशिखांत व्यवस्थित केले आणि त्याच्यात आपला आत्मा फुंकला आणि तुम्हाला कान दिले, डोळे दिले व हृदय दिले. तुम्ही लोक कमीच कृतज्ञ बनता. (४-९)

आणि हे लोक म्हणतात, ''जेव्हा आम्ही मातीत मिसळून गेलेले असू तेव्हा काय आम्ही पुन्हा नव्यानेच निर्माण केले जाऊ?'' खरी गोष्ट अशी आहे की हे आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करणारे आहेत, यांना सांगा, ''मृत्यूचा तो दूत जो तुम्हावर नियुक्त केला गेला आहे, तुम्हाला पुरेपूर आपल्या ताब्यात घेईल आणि मग तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे परत आणले जाल.'' (१०-११)

तुम्ही ती घटका पहावी जेव्हा हे अपराधी मान खाली घालून आपल्या पालनकर्त्याच्या पुढे उभे असतील (त्यावेळी हे म्हणत असतील) ''हे आमच्या

१) म्हणजे तुमच्याजवळ जो एक हजार वर्षांचा इतिहास आहे तो ईश्वराच्या येथे जणू एका दिवसाचे काम आहे. त्याची योजना आज विधिलेख अंमलात आणणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या सुपूर्द केली जाते व उद्या ते तिचा अहवाल त्याच्या हुजूरात सादर करतात की जेणेकरून दुसऱ्या दिवसाचे (तुमच्या हिशेबाप्रमाणे एक हजार वर्षां) चे काम त्यांच्या सुपूर्द केले जावे.

पालनकर्त्या, आम्ही खूप पाहिले आणि ऐकले, आता आम्हाला परत पाठवून दे जेणेकरून आम्ही सत्कृत्ये करावीत, आम्हाला आता खात्री पटली आहे.'' (उत्तरात सांगितले जाईल) ''जर आम्ही इच्छिले असते तर आम्ही अगोदरच प्रत्येक जीवास त्याची सुबुद्धी दिली असती, परंतु माझे ते कथन पूर्ण झाले जे मी केले होते की नरकाला जिन्न (अदृश्ययोनी) आणि माणसे या सर्वांनी भरून टाकीन. तर आता चाखा चव आपल्या या कृत्याची की तुम्ही या दिवसाच्या भेटीला विसरून गेला. आम्हीही आता तुम्हाला विसरलो आहोत. चाखा चिरकालीन प्रकोपाची चव आपल्या कृत्यापायी.'' (१२-१४)

आमच्या वचनांवर तर ते लोक श्रद्धा ठेवतात ज्यांना ही वचने ऐकवून जेव्हा उपदेश दिला जातो तेव्हा ते नतमस्तक होतात आणि आपल्या पालनकर्त्याच्या प्रशंसेसह त्याचे पावित्र्यगान करतात व गर्व करीत नाहीत. त्यांच्या पाठी अंथरुणापासून अलग राहतात, आपल्या पालनकर्त्याचे भय व आशा बाळगून पुकारतात, आणि जी काही उपजीविका आम्ही त्यांना दिली आहे, तिच्यातून खर्च करतात. मग जशी नेत्रसुखाची सामग्री त्यांच्या कृत्यांच्या मोबदल्यात त्यांच्यासाठी लपवून ठेवली आहे, तिची कोणत्याही प्राण्याला खबर नाही. बरे असे कुठे होऊ शकते की जी व्यक्ती श्रद्धावंत असेल ती त्या व्यक्तीसमान होईल जी मर्यादांचे उल्लंघन करणारी असेल? या दोन्ही समान होऊ शकत नाहीत. ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे व ज्या लोकांनी सत्कृत्ये केली आहेत, त्यांच्यासाठी तर स्वर्गाची निवासस्थाने आहेत, आदरातिथ्य म्हणून त्यांच्या कृत्यांच्या मोबदल्यात. आणि ज्यांनी मर्यादांचे उल्लंघन अंगिकारले आहे, त्यांचे ठिकाण नरक आहे, जेव्हा कधी ते त्यातून बाहेर पडू इच्छितील तिच्यातच ढकलून दिले जातील आणि त्यांना सांगितले जाईल की घ्या, आता त्याच अग्नी-प्रकोपाचा आस्वाद ज्याला तुम्ही खोटे ठरवीत होता. (१५-२०)

त्या मोठ्या प्रकोपापूर्वी आम्ही याच जगात (कोणत्या ना कोणत्या लहान) प्रकोपाचा आस्वाद यांना देत राहू. कदाचित (आपल्या विद्रोही प्रवृत्तीपासून) हे परावृत्त व्हावेत. आणि त्याच्यापेक्षा मोठा अत्याचारी कोण असेल ज्याला त्याच्या पालनकर्त्याच्या संकेताने उपदेश केला जाईल आणि मग तो त्यापासून पराङमुख होईल. अशा अपराधींचा तर आम्ही सूड घेतल्याशिवाय राहणार नाही. (२१-२२)

यापूर्वी मूसा (अ.) ला आम्ही ग्रंथ दिला आहे, म्हणून तीच वस्तू मिळण्यावर तुम्हाला कसलीही शंका असू नये. त्या ग्रंथाला आम्ही बनीइस्राईलकरिता मार्गदर्शन बनविले होते, आणि जेव्हा त्यांनी संयम पाळला आणि आमच्या संकेतवचनांवर विश्वास बाळगत राहिले, तेव्हा त्यांच्यामध्ये आम्ही असे नेते निर्माण केले जे आमच्या आदेशाने मार्गदर्शन करीत होते. नि:संशय तुझा पालनकर्ताच पुनरुत्थानाच्या दिवशी त्या गोष्टीचा निवाडा करील ज्यांत (बनीइस्राईल) परस्पर मतभेद करीत राहिले आहेत. (२३-२५)



आणि काय या लोकांना (या ऐतिहासिक घटनामध्ये) कोणतेही मार्गदर्शन लाभले नाही की यांच्यापूर्वी कित्येक जनसमुदायांना आम्ही नष्ट केले आहे ज्यांच्या निवासस्थानात आज हे संचार करीत आहेत? यात मोठे संकेत आहेत, काय हे ऐकत नाहीत? आणि काय या लोकांनी हे दृश्य कधी पाहिले नाही की आम्ही एका ओसाड भूमीकडे पाणी वाहून आणतो, आणि मग त्याच जमिनीतून ते पीक उगवितो ज्यापासून यांच्या गुरांनाही चारा मिळतो व हे स्वत:ही खातात, तर काय यांना काहीच उमजत नाही? हे लोक म्हणतात की, ''हा निर्णय केव्हा लागेल जर तुम्ही खरे असाल?'' यांना सांगा, ''निर्णयाच्या दिवशी श्रद्धा ठेवणे त्या लोकांसाठी यत्किंचितही लाभदायी होणार नाही ज्यांनी सत्याचा इन्कार केला आहे आणि मग त्यांना कोणतीही सवड मिळणार नाही.'' बरे, यांना यांच्या स्थितीत सोडून द्या आणि प्रतीक्षा करा, हेसुद्धा प्रतीक्षेत आहेत. (२६-३०)

# ३३ सूरह अल्‌अहज़ाब

*(मदीनाकालीन, वचने ७३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे नबी (स.)! अल्लाहचे भय बाळगा आणि सत्याचा इन्कार करणाऱ्यांचे व दांभिकांचे आज्ञापालन करू नका. वास्तविकत: सर्वज्ञ व बुद्धिमान तर अल्लाहच आहे. अनुकरण करा त्या गोष्टीचे ज्याचा इशारा तुमच्या पालनकर्त्याकडून तुम्हाला दिला जात आहे. अल्लाह त्या प्रत्येक गोष्टीची माहिती राखणारा आहे जी तुम्ही लोक करता. अल्लाहवर भिस्त ठेवा, अल्लाहच भिस्त ठेवण्यास पुरेसा आहे. (१-३)

अल्लाहने कोणत्याही व्यक्तीच्या उरांत दोन हृदये ठेवलेली नाहीत, व तुम्हा लोकांच्या त्या पत्नींना ज्यांच्याशी तुम्ही मातेसमान वर्तन करता[१] त्याने तुमची आई बनविली नाही आणि त्याने तुमच्या मानलेल्या पुत्रांनाही तुमचे खरे मुलगे बनविलेले नाही. या तर त्या गोष्टी आहेत, ज्या तुम्ही लोक आपल्या तोंडाने काढता परंतु अल्लाह ती गोष्ट सांगतो जी सत्याधिष्ठित आहे, आणि तोच योग्य मार्गाकडे मार्गदर्शन करतो. दत्तक पुत्रांना त्यांच्या पित्यांशी संबंधित करून बोलावीत जा, ही अल्लाहपाशी अधिक न्यायसंगत गोष्ट आहे. आणि जर तुम्हाला माहीत नसेल की त्यांचे वडील कोण आहेत तर ते तुमचे धर्मबंधू आणि मित्र आहेत. न कळत जी गोष्ट तुम्ही सांगाल त्याबद्दल तुमच्यावर काही आक्षेप नाही परंतु त्या गोष्टीची जरूर विचारणा होईल जिचा तुम्ही हृदयापासून निश्चय कराल. अल्लाह क्षमाशील आणि परमकृपाळू आहे. (४-५)

नि:संशय नबी तर श्रद्धावंतांसाठी त्यांच्या आपल्या स्वत:वर अग्रक्रम राखतो. आणि नबीच्या पत्नी त्यांच्या माता आहेत. परंतु अल्लाहच्या ग्रंथानुसार सर्वसामान्य श्रद्धावंत व स्थलांतर करून आलेले, यांच्यापेक्षा नातेवाईक एकमेकाचे अधिक हक्कदार आहेत. तथापि आपल्या मित्रांशी तुम्ही एखादी भलाई (करू इच्छित असाल तर) करू शकता, ही आज्ञा अल्लाहच्या ग्रंथात लिहिलेली आहे. (६)

आणि (हे पैगंबर (स.)) आठवण ठेवा त्या करारमदाराची जो आम्ही सर्व पैगंबरांकडून तसेच तुमच्याकडून देखील करून घेतला आहे, नूह (अ.), व इब्राहीम (अ.)

१) 'जिहार' पत्नीला आईची उपमा देणे होय.



आणि मूसा (अ.) व मरयमपुत्र ईसा (अ.) कडूनदेखील, सर्वांकडून आम्ही पक्के वचन[२] घेतले आहे. (७)

जेणेकरून खऱ्या लोकांना (त्यांचा पानलकर्ता) त्यांच्या सचोटीसंबंधी विचारणा करील. आणि अश्रद्धावंतांसाठी तर त्याने यातनादायक प्रकोप तयार ठेवलाच आहे. हे लोकहो[३] ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, स्मरण करा अल्लाहच्या उपकाराचे जे (नुकतेच) त्याने तुम्हावर केले आहे. जेव्हा फौजा तुम्हावर चालून आल्या तेव्हा आम्ही त्यांच्यावर एक भयंकर वादळ पाठविले. आणि अशा फौजा रवाना केल्या ज्या तुम्हाला दिसत नव्हत्या.[४] अल्लाह ते सर्वकाही पाहात होता जे तुम्ही लोक त्यावेळी करीत होता. जेव्हा वरून व खालून तुम्हावर शत्रू चाल करून आले, जेव्हा भीतीपोटी डोळे थिजले, काळीज तोंडाशी आले आणि तुम्ही लोक अल्लाहसंबंधी तऱ्हेतऱ्हेचे ग्रह करू लागला, त्यावेळी श्रद्धावंतांची चांगलीच परीक्षा घेतली गेली आणि भयंकरपणे हादरवून सोडले गेले. (८-११)

स्मरण करा ती वेळ जेव्हा दांभिक आणि ते सर्व लोक ज्यांच्या हृदयांत रोग होता, स्पष्टपणे सांगत होते की अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांनी जे वचन आम्हाला दिले होते ते फसवणुकीशिवाय अन्य काहीच नव्हते. जेव्हा त्यांच्यापैकी एका गटाने सांगितले की, ''हे यसरिब (मदीना) च्या लोकांनो, तुमच्यासाठी आता थांबण्याचा कोणताही प्रसंग नाही, परत फिरा.'' जेव्हा त्यांचा एक गट असे म्हणून नबी (स.) कडून परवानगी मागत होता की, ''आमची घरे धोक्यात आहेत.'' वस्तुत: ते धोक्यात नव्हते, खरे तर ते (युद्ध आघाडीपासून) पळ काढू इच्छित होते. जर शहराच्या भोवतीने शत्रू घुसून आले असते आणि त्यावेळी यांना उपद्रवाकडे आमंत्रित केले गेले असते तर हे त्यात सामील झाले असते आणि मुश्किलीनेच यांना उपद्रवात सामील होण्यात संकोच वाटला असता. या

२) सदरच्या आयतीत सर्वोच्च अल्लाह पैगंबर मुहम्मद (स.) यांना या गोष्टीची आठवण करून देत आहे की सर्व प्रेषिताप्रमाणेच तुमच्याकडूनही सर्वोच्च अल्लाहने पक्के वचन घेतलेले आहे ज्याचे तुम्ही कटाक्षाने पालन केले पाहिजे. अगोदरपासून उल्लेखाचा जो क्रम सुरू आहे त्यावर सखोल विचार केला असता हे स्पष्टपणे कळते की ते पक्के वचन असे की पैगंबर, सर्वोच्च अल्लाहच्या प्रत्येक आज्ञेचे स्वत:देखील पालन करील आणि इतरांकडूनही करवून घेईल. अल्लाहची वचने कमी जास्त न करता पोचती करील व ती अंमलात आणण्याच्या प्रयत्नांत कसूर ठेवणार नाही. दिव्य कुरआनात या 'वचना'चा उल्लेख अनेक ठिकाणी केला गेला आहे. उदा. सूरह बकरा, आयत क्र. ८३, आलेइम्रान, आयत क्र. १८७, अल्‌माइदा, आयत क्र. ७, अल् आअराफ, आयत क्र. १६९ ते १७१, अश्‌शूरा, आयत क्र. १३.

३) येथून ते आयत क्र. २७ पर्यंत अहजाब युद्धाचा व बनीकुरैजा युद्धाचा उल्लेख केलेला आहे.

४) म्हणजे ईशदूतांच्या फौजा.

लोकांनी यापूर्वी अल्लाहशी करार केला होता की हे पाठ दाखविणार नाहीत आणि अल्लाहशी केलेल्या कराराची विचारपूस तर होणारच होती. (१२-१५)

हे पैगंबर (स.)! यांना सांगा, जर तुम्ही मृत्यू अथवा ठार होण्यापासून पळ काढला तर हे पळ काढणे तुमच्यासाठी काहीही लाभदायक ठरणार नाही. यानंतर जीवनाचा आनंद लुटण्याची थोडीच संधी तुम्हाला मिळू शकेल. यांना सांगा, कोण आहे जो तुम्हाला अल्लाहपासून वाचवू शकेल जर त्याने तुम्हाला नुकसान पोहचविण्याचे इच्छिले? आणि कोण त्याच्या कृपेला रोखू शकतो जर त्याने तुमच्यावर मेहरबानी करू इच्छिले? अल्लाहच्याविरूद्ध तर हे लोक कोणताही समर्थक व सहायक प्राप्त करू शकत नाहीत. (१६-१७)

अल्लाह तुमच्यापैकी त्या लोकांना चांगलेच जाणतो जे (युद्ध कार्यात) अडथळे आणणारे आहेत, जे आपल्या बंधूना म्हणतात की, ''या आमच्याकडे'' जे युद्धात जरी भाग घेतात तरी केवळ नावापुरतेच, जे तुम्हाला साथ देण्यात अत्यंत कंजूष आहेत. धोक्याची वेळ आली की तुमच्याकडे अशा प्रकारे बाहुल्या फिरवून फिरवून पाहतात जणू एखाद्या मरणाऱ्याला बेशुद्धी येत असावी परंतु जेव्हा धोका टळून जातो तेव्हा हेच लोक फायद्याचे लोभी बनून कात्रीप्रमाणे चालणाऱ्या जिभा घेऊन तुमच्या स्वागतासाठी येतात. या लोकांनी मुळीच श्रद्धा ठेवली नाही, म्हणूनच अल्लाहने यांची सर्व कार्ये वाया घालविली आणि असे करणे अल्लाहसाठी फारच सोपे आहे. हे समजत आहेत की हल्लेखोर टोळ्या अद्याप गेलेल्या नाहीत आणि जर त्यांनी पुन्हा आक्रमण केले तर यांची इच्छा होते की त्याप्रसंगी यांनी कोठे तरी वाळवंटात बद्दू लोकांच्या दरम्यान जाऊन बसावे आणि तेथूनच तुमच्या हालहवालाची विचारणा करीत राहावे. तथापि जर हे तुमच्या दरम्यान राहिले तरीसुद्धा हे युद्धात कमीच भाग घेतील. (१८-२०)

वस्तुत: तुम्हा लोकासाठी अल्लाहचे पैगंबर एक उत्कृष्ट आदर्श आहे,[५] त्या प्रत्येक माणसासाठी जो अल्लाह व मरणोत्तर जीवनाच्या दिवसाचा उमेदवार असेल आणि बहुतांशी अल्लाहचे स्मरण करीत असेल, आणि खऱ्या श्रद्धावंतांची (अवस्था त्यावेळी अशी होती की) जेव्हा त्यांनी आक्रमक लष्करांना पाहिले तेव्हा त्यांनी पुकारले, ''ही तीच गोष्ट आहे जिचे अल्लाह व त्याचा पैगंबर (स.) यांनी आम्हाला वचन दिले होते, अल्लाह व त्याचा पैगंबर (स.) यांचे म्हणणे अगदी खरे होते.'' या घटनेने त्यांच्या श्रद्धेला व त्यांच्या समर्पणाला अधिक वृद्धिंगत केले. श्रद्धा ठेवणाऱ्यांत असले लोक हजर आहेत ज्यांनी अल्लाहशी केलेल्या कराराला खरे करून दाखविले आहे. त्यांच्यापैकी कोणी आपले नवस पुरे केले आहे तर कोणी वेळ येण्याच्या प्रतीक्षेत आहेत. त्यांनी आपल्या

५) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो 'उत्कृष्ट आदर्श होते.'



वर्तनांत कोणतेही परिवर्तन केले नाही. (हे सर्वकाही याकरिता घडले) जेणेकरून अल्लाह खऱ्यांना त्यांच्या सचोटीचा मोबदला देईल आणि दांभिकांना हवे तर शिक्षा करील आणि हवे तर त्यांची तौबा (पश्चात्ताप) कबूल करील. नि:संशय अल्लाह क्षमाशील व कृपाळू आहे. (२१-२४)

अल्लाहने अश्रद्धावंतांना परतवून लावले, ते कोणताही लाभ प्राप्त केल्याविना आपल्या मनाच्या जळफळाटानिशी असेच मागे परतले, आणि श्रद्धावंतांकडून अल्लाहच लढण्यासाठी पुरेसा ठरला, अल्लाह महान शक्तिमान आणि जबरदस्त आहे. मग ग्रंथधारकांपैकी ज्या लोकांनी या हल्लेखोरांना साथ दिली होती.[६] अल्लाहने त्यांना त्यांच्या गढीतून उतरवून खाली आणले आहे त्यांच्या हृदयांत त्याने असा वचक बसविला की आज त्यांच्यापैकी एका गटाला तुम्ही ठार करीत आहात आणि दुसऱ्या गटाला कैद करीत आहात. त्याने तुम्हाला त्यांच्या जमिनीचे आणि त्यांच्या घरांचे व त्याच्या मालमत्तेचे वारस बनविले आणि तो प्रदेश तुम्हाला प्रदान केला ज्याला तुम्ही कधीही तुडविले नव्हते. अल्लाह प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. (२५-२७)

हे नबी (स.), आपल्या पत्नींना सांगा, जर तुम्ही हे भौतिक जग आणि त्याचे ऐश्वर्य इच्छित असाल तर या, मी तुम्हाला काही देऊन चांगल्या पद्धतीने निरोप देतो.[७] आणि जर तुम्ही अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) आणि मरणोत्तर जीवनाच्या घराचे इच्छुक असाल तर जाणून असा की तुम्हापैकी ज्या सत्कर्मी आहेत; अल्लाहने त्यांच्यासाठी मोठा मोबदला तयार ठेवला आहे. (२८-२९)

नबी (स.) च्या पत्नींनो, तुमच्यापैकी जी एखाद्या उघड अश्लील कृतीच्या आहारी जाईल तिला दुहेरी यातना दिली जाईल.[८] अल्लाहसाठी हे फारच सोपे काम आहे आणि तुमच्यापैकी जी अल्लाह आणि त्याच्या पैगंबर (स.) यांची आज्ञा पाळील आणि सत्कर्म करील तिला आम्ही दुप्पट मोबदला देऊ, आणि तिच्यासाठी आम्ही सन्मानाची उपजीविका उपलब्ध ठेवली आहे. (३०-३१)

नबी (स.) च्या पत्नींनो! तुम्ही सामान्य स्त्रियांप्रमाणे नाहीत, जर तुम्ही अल्लाहचे भय बाळगणाऱ्या असाल तर हळू आवाजात बोलत जाऊ नका की विकृत हृदयाचा एखादा माणूस

६) म्हणजे बनीकुरैजा यहूदी.

७) सदरहू आयत त्या काळात उतरली होती जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या येथे उपासमार होत होती, त्यामुळे पैगंबर (स.) यांच्या पवित्र पत्न्यांची हालअपेष्टा होत होती.

८) याचा अर्थ असा नव्हे की पैगंबर (स.) यांच्या पवित्र पत्न्यांकडून एखाद्या अश्लील कृत्याची (ईश्वर त्यापासून वाचवो) भिती होती तर त्यांना अशी जाण करून द्यावयाचा हेतू होता की तुम्ही अखिल मुस्लिम समुदायाच्या माता आहात, म्हणून आपल्या प्रतिष्ठेला खालावण्यासारखे कोणतेच काम करू नका.

लालसेत पडेल, तर स्पष्ट सरळ बोलणे बोला. आपल्या घरांत मर्यादेने राहा आणि गत अज्ञानमूलक काळाप्रमाणे शृंगाराचे प्रदर्शन करीत फिरू नका. नमाज कायम करा, जकात द्या, अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांचे आज्ञापालन करा, अल्लाह तर हे इच्छितो की तुम्ही पैगंबरांच्या घरवाल्यांपासून पाप दूर करावे आणि तुम्हाला पूर्णपणे पवित्र करावे. आठवण ठेवा अल्लाहच्या संकेतांची आणि बुद्धिमत्तेच्या त्या गोष्टींची ज्या तुमच्या घरांत ऐकविल्या जातात. नि:संशय अल्लाह सूक्ष्मदर्शी[९] आणि खबर राखणारा आहे. (३२-३४)

खचितच जे पुरुष आणि ज्या स्त्रिया मुस्लिम आहेत, श्रद्धावंत आहेत, आज्ञाधारक आहेत, सत्यानिष्ठ आहेत, संयमी आहेत, अल्लाहच्या समोर झुकणारे आहेत, दानधर्म करणारे आहेत, उपवास करणारे आहेत, आपल्या शीलांचे रक्षण करणारे आहेत, आणि मोठ्या प्रमाणात अल्लाहचे स्मरण करणारे आहेत, अल्लाहने त्यांच्यासाठी क्षमा आणि महान मोबदला तयार ठेवला आहे. (३५)

कोणत्याही श्रद्धावंत पुरुषाला आणि कोणत्याही श्रद्धावंत स्त्रीला हा अधिकार नाही की जेव्हा अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) यांनी एखाद्या बाबतीत निर्णय दिला असेल तर मग आपल्या त्या बाबीत स्वत: निर्णय घेणे त्याच्या अख्त्यारीत असेल आणि जो कोणी अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) यांची अवज्ञा करील तर तो उघडपणे मार्गभ्रष्टतेत पडेल. (३६)

हे पैगंबर (स.), स्मरण करा तो प्रसंग जेव्हा तुम्ही त्या माणसाला म्हणत होता ज्याच्यावर अल्लाहने आणि तुम्ही उपकार केले होते, ''आपल्या पत्नीला सोडू नको आणि अल्लाहचे भय बाळग.''[१०] त्यावेळी तुम्ही आपल्या मनात ती गोष्ट लपवून ठेवली होती जिला अल्लाह उघड करू इच्छित होता, तुम्ही लोकांना भीत होता, वस्तुत: अल्लाह या गोष्टीचा जादा हक्कदार आहे की तुम्ही त्याच्या कोपाला भ्यावे.[११] मग जेव्हा जैद (रजि.) ने तिचा

९) म्हणजे गुप्तातली गुप्त गोष्टदेखील जाणणारा.

१०) त्या इसमाने अभिप्रेत आहेत हजरत जैद बिन हारिसा. हे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे मुक्त केलेले गुलाम आणि त्यांचे मानलेले पुत्र होते. त्यांच्या पत्नीने अभिप्रेत आहेत हजरत जैनब (रजि.). त्या पैगंबर (स.) यांच्या आतेबहीण होत्या. पैगंबर (स.), यांनी त्यांचा विवाह हजरत जैद यांच्याशी लावला होता परंतु उभयता, पती व पत्नीत सलोखा राहात नव्हता, म्हणून हजरत जैद (रजि.) त्यांना तलाक देण्यास निघाले होते.

११) म्हणजे सर्वोच्च अल्लाहची इच्छा अशी होती की जेव्हा हजरत जैद (रजि.) यांनी हजरत जैनब (रजि.) यांना 'तलाक' द्यावा तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वत: त्यांच्याशी विवाह करून अरब लोकांच्या ज्या प्राचीन रूढीनुसार मानलेल्या पुत्राला सख्खा पुत्र समजले जात होते, ती रूढी मोडून टाकण्यात यावी, परंतु पैगंबर (स.), या भितीपोटी की अरबवासी यावर कडक टीका करतील, या परीक्षेत उतरण्यापासून दूर राहू इच्छित होते. याच कारणास्तव, जैद (रजि.) नी आपल्या पत्नीस घटस्फोट देऊ नये म्हणून ते प्रयत्न करीत होते.



उपभोग घेतला[१२] तेव्हा आम्ही तिचा (घटस्फोटित स्त्रीचा) तुमच्याशी विवाह केला, की जेणेकरून ईमानधारकांवर आपल्या मानलेल्या पुत्रांच्या पत्नींच्या मामल्यात कोणतीही अडचण राहू नये जेव्हा की त्यांनी त्यांचा उपभोग घेतला असेल. आणि अल्लाहचा हुकूम तर अंमलात आलाच पाहिजे होता. पैगंबर (स.) वर कोणत्याही अशा कार्यात कसलाही अडथळा नाही जे अल्लाहने त्यांच्यासाठी ठरविले असेल हाच अल्लाहचा शिरस्ता त्या सर्व प्रेषितांच्या बाबतीत राहिला आहे जे पूर्वी होऊन गेले आहेत आणि अल्लाहची आज्ञा पूर्णत: एक ठरलेला निर्णय आहे. (हा अल्लाहचा शिरस्ता आहे त्या लोकांकरिता) जे अल्लाहचे संदेश पोहचवितात आणि त्याच्याच कोपाचे भय बाळगतात आणि एक अल्लाहव्यतिरिक्त कोणाच्याही कोपाचे भय बाळगत नाहीत. आणि हिशेब घेण्यासाठी तर अल्लाहच पुरेसा आहे. (३७-३९)

(लोकहो!) मुहम्मद (स.) तुमच्या पुरुषांपैकी कोणाचे पिता नाहीत परंतु ते अल्लाहचे प्रेषित आणि अंतिम प्रेषित आहेत, आणि अल्लाह प्रत्येक वस्तूचे ज्ञान राखणारा आहे.[१३] (४०)

हे श्रद्धावंतांनो! अल्लाचे खूप स्मरण करा आणि सकाळ संध्याकाळ त्याचे

१२) म्हणजे तलाक देण्याची जी इच्छा बाळगून होते ती त्यांनी पूर्ण केली व आपल्या घटस्फोटित स्त्रीशी त्यांचा कोणताही संबंध उरला नाही.

१३) विरोधक पैगंबर (स.) यांच्या या विवाहावर जे आक्षेप घेत होते त्या सर्वांचे या वाक्यात मूळ कापले गेले आहे. त्यांचा पहिला आक्षेप असा होता की पैगंबर (स.) यांनी आपल्या सुनेशी विवाह केला आहे. याच्या उत्तरात फर्माविले गेले, ''मुहम्मद (स.) तुमच्या पुरुषांपैकी कुणाचेही पिता नाही'', म्हणजे तो पुत्र होताच कोठे की त्याच्या घटस्फोटितेशी विवाह 'हराम' ठरला? दुसरा आक्षेप असा होता की मानलेला पुत्र जरी खराखुरा पुत्र नाही तरी त्याने काडीमोड दिलेल्या स्त्रीशी विवाह करणे काही जरूरीचे नव्हते. याच्या उत्तरात फर्माविले गेले, ''परंतु ते अल्लाहचे प्रेषित आहेत'' म्हणजे प्रेषित म्हणून असल्याने ज्या वैध गोष्टीला तुमच्या रूढींनी विनाकारणच हराम ठरविलेले आहे त्यासंबंधाने सर्व पूर्वग्रहदोष संपुष्टात आणावे व ती वैध असण्याच्या संबंधाने कोणत्याही शंकाकुशंकेला त्यानी वाव उरू देऊ नये, हे त्यांचे कर्तव्य होते. मग अधिक ताकीद म्हणून फर्माविले, 'आणि ते अंतिम प्रेषित आहेत' म्हणजे त्यांच्यानंतर कोणी पैगंबर तर राहोच कोणी नबी (प्रेषित) देखील येणार नाही की जर कायदा व समाज सुधारणेची एखादी बाब त्यांच्या काळात लागू होण्यापासून राहिली असल्यास नंतरच्या येणाऱ्या नबीने ती उणीव भरून काढावी, म्हणून सदरहू अज्ञानमूलक रूढीचे त्यांनी स्वत:च उच्चाटन करून जाणे हे आणखीनच जरूरीचे ठरले होते. यानंतर अधिक भर देतांना फर्माविले गेले, ''अल्लाह प्रत्येक गोष्टीचे ज्ञान राखणारा आहे'' म्हणजे अल्लाहला माहीत आहे की यावेळी पैगंबर (स.) यांच्या हस्ते या अज्ञानमूलक रूढीचे समूळ उच्चाटन करविणे जरूरीचे का होते व तसे न करण्यात कोणती अयोग्यता होती.

पावित्र्यगान करीत राहा. तोच आहे जो तुम्हावर कृपा करतो आणि त्याचे दूत तुमच्यासाठी कृपेची प्रार्थना करीत असतात जेणेकरून त्याने तुम्हाला अंधकारातून प्रकाशात आणावे, तो श्रद्धावंतांवर फार मेहेरबान आहे. ज्या दिवशी ते त्याला भेटतील त्यांचे स्वागत सलामने होईल आणि त्यांच्यासाठी अल्लाहने मोठा सन्माननीय मोबदला तयार ठेवला आहे. (४१-४४)

हे नबी (स.)! आम्ही तुम्हाला पाठविले आहे साक्षीदार बनवून, शुभवार्ता देणारा आणि भय दाखविणारा बनवून. अल्लाहच्या अनुज्ञेने त्याच्याकडे आवाहन करणारा बनवून आणि प्रकाशमान दीप बनवून, आनंदवार्ता द्या त्या लोकांना; ज्यांनी (तुम्हावर) श्रद्धा ठेवली आहे, त्यांच्यासाठी अल्लाहकडून महान कृपाप्रसाद आहे आणि कदापि दबू नका अश्रद्धावंत व दांभिकाशी, काही पर्वा करू नका त्यांच्या यातनेची[१४] आणि विश्वास ठेवा अल्लाहवर, अल्लाहच याकरिता पुरेसा आहे की माणसाने आपले मामले त्याच्या स्वाधीन करावे. (४५-४८)

हे श्रद्धावंतांनो! जेव्हा तुम्ही श्रद्धावंत स्त्रियांशी विवाह कराल आणि मग त्यांना स्पर्श करण्याअगोदर फारकत द्याल तर तुमच्याकडून त्यांच्यावर कसलीही 'इद्दत'ची मुदत आवश्यक नाही, जिची गणना पूर्ण होण्याची मागणी तुम्ही कराल. म्हणून त्यांना काही धन देऊन भल्या पद्धतीने निरोप द्या. (४९)

हे नबी (स.)! आम्ही तुमच्यासाठी वैध ठरविल्या आहेत तुमच्या त्या पत्नीं ज्यांचे महर तुम्ही अदा केले आहेत,[१५] आणि त्या स्त्रिया ज्या अल्लाहने प्रदान केलेल्या दासींपैकी, तुमच्या मालकीत आल्या आणि त्या तुमच्या चुलत बहिणी आणि आते बहिणी व मामे बहिणी आणि मावस बहिणी ज्यांनी तुमच्याबरोबर स्थलांतर केले आहे आणि ती श्रद्धावंत स्त्री जिने स्वत:ला नबी (स.) साठी अर्पण केलेले असेल जर नबी (स.) तिला स्वत:च्या विवाहबंधनात घेऊ इच्छित असतील.[१६] ही सवलत केवळ तुमच्यासाठी आहे अन्य श्रद्धावंतांसाठी नाही. आम्हाला माहीत आहे की अन्य श्रद्धावंतांवर त्यांच्या पत्नी व

**१४)** म्हणजे हे लोक त्या विवाहावर जी टीका करीत आहेत त्याची.

**१५)** खरे पाहता हे उत्तर आहे त्या लोकांच्या आक्षेपाचे, जे म्हणत होते की मुहम्मद (स.) इतर लोकांसाठी तर एकाच वेळी चार पेक्षा जास्त पत्न्या ठेवणे निषिद्ध ठरवितात परंतु त्यांनी स्वत: ही पाचवी पत्नी कशी केली? हे लक्षात असावे की त्यावेळी पैगंबर (स.) यांच्या घरात, हजरत आयशा (रजि.), हजरत सौदा (रजि.), हजरत हफ्सा (रजि.) आणि हजरत उम्मे सलमा (रजि.) या चार पत्न्या अगोदरच मौजूद होत्या.

**१६)** म्हणजे सदरहू पाच पत्न्यांशिवाय, ज्यांचा या आयतीत उल्लेख आहे, त्या प्रकारच्या आणखीन स्त्रियांनादेखील आपल्या दांपत्यांत आणण्याची पैगंबर (स.) यांना परवानगी दिली गेली आहे.



दासींच्या बाबतीत कोणत्या मर्यादा घातलेल्या आहेत. (तुम्हाला या मर्यादांतून आम्ही यासाठी वगळले आहे) जेणेकरून तुमच्यासाठी कोणतीही अडचण राहू नये. आणि अल्लाह क्षमाशील व परमकृपाळू आहे. तुम्हाला अधिकार दिला आहे की आपल्या पत्नींपैकी हवे तिला आपल्यापासून अलग ठेवा आणि हवे तिला आपल्या जवळ ठेवा आणि हवे तिला अलग ठेवल्यानंतर आपल्या जवळ बोलावून घ्या, याबाबतीत तुम्हाला काहीही हरकत नाही. अशा प्रकारे हे जादा अपेक्षित आहे की त्यांचे डोळे अधिक सुखावतील आणि त्या दु:खी राहणार नाहीत, आणि जे काही तुम्ही त्यांना द्याल त्यावर त्या सर्व संतुष्ट राहतील. अल्लाह जाणतो जे काही तुम्हा लोकांच्या हृदयात आहे आणि अल्लाह सर्वज्ञ व सहिष्णू आहे. यानंतर तुमच्यासाठी अन्य स्त्रिया वैध नाहीत, आणि याचीही परवानगी नाही की यांच्या जागी अन्य पत्नी आणाव्यात, मग त्यांचे सौंदर्य तुम्हाला किती का पसंत असेना[१७] तथापि दासींची तुम्हाला परवानगी आहे.[१८] अल्लाह प्रत्येक गोष्टीवर लक्ष ठेवणारा आहे. (५०-५२)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, नबी (स.) च्या घरांत विना परवानगी प्रवेश करू नका. जेवणाच्या वेळेवरही नजर राखून असू नका, जर तुम्हाला जेवायला बोलाविले गेले तर अवश्य या. परंतु जेवण उरकले की निघून जा. गोष्टी करण्यात लागू नका. तुमच्या या कृती नबी (स.) यांना त्रास देतात, परंतु ते संकोचाने काही बोलत नाहीत, आणि अल्लाहला खरी गोष्ट सांगण्यात संकोच वाटत नाही. नबी (स.) च्या पत्नींपासून जर तुम्हाला काही मागावयाचे असल्यास पडद्यामागून मागत जा, ही तुमच्या आणि त्यांच्या हृदयाच्या निर्मळतेसाठी अधिक उचित पद्धती आहे. तुमच्याकरिता हे कदापि वैध नाही की अल्लाहचे पैगंबर (स.) यांना तुम्ही त्रास द्यावा, आणि हेदेखील वैध नाही की त्यांच्या पश्चात त्यांच्या पत्नींशी विवाह करावा. हा अल्लाहजवळ फार मोठा गुन्हा आहे. तुम्ही भले कोणतीही गोष्ट प्रकट करा अथवा गुप्त राखा, अल्लाहला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान

**१७)** या कथनाचे दोन अर्थ आहेत. एक असा की वरील आयत क्र. ५० नुसार पैगंबर (स.) यांच्यासाठी ज्या स्त्रिया हलाल ठरविलेल्या आहेत, त्यांच्याखेरीज इतर कोणतीही स्त्री त्यांच्यासाठी वैध नाही. दुसरा अर्थ असा की जेव्हा पैगंबर (स.) यांच्या पवित्र पत्नीं या गोष्टीसाठी स्वखुषीने तयार झाल्या आहेत की आर्थिक अडचणीच्या परिस्थितीतही त्यांना साथ द्यावी आणि आखिरतसाठी ऐहिक सुखांवर पाणी सोडावे, तसेच यावरही खूष आहेत की पैगंबर (स.) यांनी हवे तसे वर्तन त्यांच्याशी ठेवावे, तेव्हा आता तुमच्यासाठी हे वैध नाही की यांच्यापैकी कुणास घटस्फोट देवून तिच्या जागी कुणी दुसरी पत्नी आणावी.

**१८)** सदरहू आयत ही बाब स्पष्ट करीत आहे की विवाहात असलेल्या पत्नीशिवाय मालकीत असलेल्या दासींचा उपभोग घेण्याचीदेखील परवानगी आहे. त्यांच्यासंबंधी संख्येची कोणतीही मर्यादा नाही. याच विषयाचे स्पष्टीकरण सूरह निसा आयत क्र. ३, सूरह मोमिनून आयत क्र. ६, आणि सूरह सआरिज आयत क्र. ३०, यांच्यातही केलेले आहे.

आहे. (५३-५४)

पैगंबर (स.) च्या पत्नींसाठी यात काही हरकत नाही की त्यांचे पिता, त्यांचे पुत्र, त्यांचे बंधू, त्यांचे पुतणे त्यांचे भाचे, त्यांच्या मेलमिलाफातील स्त्रिया आणि त्यांच्या मालकीचे दास-दासी घरांत यावेत. (हे स्त्रियांनो!) तुम्हाला अल्लाहच्या अवज्ञेपासून दूर राहिले पाहिजे. अल्लाह प्रत्येक गोष्टीवर दृष्टी ठेवतो. (५५)

अल्लाह आणि त्याचे दूत प्रेषितांवर दरूद (शुभचिंतन) पाठवितात, हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, तुम्हीसुद्धा त्यांच्यावर दरूद (शुभचिंतन) आणि सलाम पाठवा.[१९] (५६)

जे लोक अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांना त्रास देतात, त्यांचा अल्लाहने जगात आणि परलोकात धिक्कार केला आहे आणि त्यांच्यासाठी नामुष्की आणणारी यातना उपलब्ध केली आहे. आणि जे लोक श्रद्धावंत निरपराध पुरुषांना व स्त्रियांना इजा पोचवितात. त्यांनी एका मोठ्या कुभांडाचे व उघड गुन्ह्याचे अरिष्ट आपल्या शिरावर घेतले आहे. (५७-५८)

हे नबी (स.), आपल्या पत्नी व मुली आणि श्रद्धावंतांच्या स्त्रियांना सांगा की आपल्या चादरीचे पदर आपणावर आच्छादून ठेवत जा.[२०] ही अधिक योग्य पद्धत होय जेणेकरून त्या ओळखल्या जाव्यात आणि त्रास दिला जाऊ नये.[२१] सर्वश्रेष्ठ अल्लाह क्षमाशील व परमकृपाळू आहे. (५९)

जर दांभिक आणि ते लोक ज्यांच्या हृदयांत रोग आहे आणि ते जे मदीनेत प्रक्षोभक अफवा पसरविणारे आहेत, आपल्या कारवायापासून परावृत्त झाले नाही तर आम्ही

---

**१९)** अल्लाहकडून आपल्या पैगंबरासाठी 'दरूद' (शुभचिंतन) चा अर्थ असा की तो त्यांच्यावर अत्यंत मेहरबान आहे, त्यांची प्रशंसा करतो, त्यांच्या कार्यात समृद्धी देतो. त्यांचे नाव उच्च करतो व त्यांच्यावर आपल्या कृपेचा वर्षाव करतो. ईशदूतांकडून त्यांच्यासाठी शुभचिंतनाचा अर्थ असा की ते पैगंबरावर अतिशय प्रेम करतात व त्यांच्यासाठी अल्लाहकडे प्रार्थना करतात की त्याने त्यांचे दर्जे अधिकाधिक उच्च करावे. श्रद्धावंतांकडून पैगंबरावर दरूद पाठविण्याचा अर्थ असा की त्यांनीदेखील त्यांच्यासाठी अल्लाहकडे प्रार्थना करावी की त्याने त्यांच्यावर आपल्या कृपेचा वर्षाव करावा.

**२०)** म्हणजे चादर पांघरून वरून घुंगट घेत जावे. दुसऱ्या शब्दात तोंड उघडे करून फिरू नये.

**२१)** 'ओळखल्या जाव्यात' याच्याने अभिप्रेत असे की त्याना अशा साध्यासुध्या आणि लज्जा ठेवणाऱ्या पोशाखात पाहून प्रत्येक पाहणाऱ्यास कळावे की त्या कुलीन आणि सुशील स्त्रिया आहेत. स्वैर आणि तमासगीर नाहीत की त्यांच्याकडे वासनादृष्टीने पहावे. 'सतावल्याही जाऊ नयेत' याच्याने अभिप्रेत असे की त्यांची छेड काढली जाऊ नये, त्यांना लक्ष्य बनविले जाऊ नये.



त्यांच्याविरूद्ध कारवाई करण्यासाठी तुम्हाला उभे करू, मग ते या शहरांत तुमच्यासमवेत मुष्किलीनेच राहू शकतील. त्यांच्यावर चोहोंकडून धिक्काराचा मारा होईल, जेथे कोठे ते सापडतील पकडले जातील आणि भयंकररीत्या ठार मारले जातील. हा अल्लाहचा शिरस्ता आहे जो अशा लोकांच्या बाबतीत पूर्वापार चालत आलेला आहे आणि तुम्हाला अल्लाहच्या परिपाठांत कोणताही बदल आढळणार नाही. (६०-६२)

लोक तुम्हाला विचारतात की पुनरुत्थानाची घटका केव्हा येईल. सांगा, त्याचे ज्ञान तर अल्लाहलाच आहे. तुम्हाला कायखबर कदाचित ती जवळच येऊन ठेपली असेल. कोणत्याही परिस्थितीत ही बाब निश्चित आहे की अल्लाहने सत्याचा इन्कार करणाऱ्यांचा धिक्कार केला आहे आणि त्यांच्यासाठी भडकलेली आग तयार ठेवली आहे, ज्यात ते सदैव राहतील. कोणताही समर्थक व सहायक ते मिळवू शकणार नाही. ज्या दिवशी त्यांचे चेहरे आगीवर उलथेपालथे केले जातील, त्यावेळी ते खेदाने म्हणतील की, "आम्ही अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) यांचे आज्ञापालन केले असते!" आणि म्हणतील, "हे आमच्या पालनकर्त्या, आम्ही आमच्या सरदारांचे व आपल्या ज्येष्ठांचे आज्ञापालन केले आणि त्यांनी आम्हाला सरळ मार्गापासून मार्गभ्रष्ट केले. हे पालनकर्त्या, यांना दुप्पट यातना दे आणि यांचा भयंकर धिक्कार कर." (६३-६८)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, त्या लोकांप्रमाणे बनू नका ज्यांनी मूसा (अ.) ला त्रास दिला होता, मग अल्लाहने त्यांनी रचलेल्या गोष्टीपासून त्याला मुक्त केले, आणि तो अल्लाहपाशी प्रतिष्ठित होता. हे श्रद्धावंतांनो, अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि रास्त गोष्ट करीत जा. अल्लाह तुमचे आचरण सुधारील आणि तुमच्या अपराधांना क्षमा करील. ज्याने अल्लाह आणि त्याचा पैगंबर (स.) यांच्या आज्ञा पाळल्या त्याने मोठे यश प्राप्त केले. (६९-७१)

आम्ही या अमानतीला[२२] आकाश, पृथ्वी व पर्वतासमोर ठेवले तर ते उचलण्यास तयार झाले नाहीत आणि तिच्याने भयभीत झाले परंतु मानवाने ती उचलली. नि:संशय तो मोठा अत्याचारी आणि अज्ञानी[२३] आहे. (या अमानतीचे ओझे उतरवण्याचा अपरिहार्य परिणाम आहे) की जेणेकरून अल्लाहने दांभिक पुरुषांना व स्त्रियांना आणि अनेकेश्वरवादी पुरुषांना व स्त्रियांना शिक्षा द्यावी आणि श्रद्धावंत पुरुषांचा आणि स्त्रियांचा पश्चात्ताप स्वीकारावा, अल्लाह क्षमाशील आणि परमकृपाळू आहे. (७२-७३)

---

**२२)** 'अमानत'ने अभिप्रेत आहे त्या जबाबदारीचे ओझे, जे सर्वोच्च अल्लाहने आपल्या पृथ्वीवर, अधिकार आणि बुद्धी देऊन माणसावर टाकले आहे.

**२३)** म्हणजे या अमानतीचे भार उचलले असतानादेखील आपली जबाबदारी ओळखत नाही व बेईमानी करून आपण होऊन स्वत:वर जुलूम करतो.

# ३४ सूरह सबा

*(मक्काकालीन, वचने ५४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

स्तुती त्या अल्लाहसाठी आहे जो आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक वस्तूंचा मालक आहे आणि पारलौकिक जीवनामध्येही त्याच्यासाठीच स्तुती आहे. तो बुद्धिमान आणि माहितगार आहे. जे काही जमिनीत जाते आणि जे काही तिच्यातून निघते आणि जे काही आकाशातून उतरते आणि जे काही त्याच्यात चढते, प्रत्येक वस्तूला तो जाणतो, तो परमकृपाळू आणि क्षमाशील आहे. (१-२)

सत्य नाकारणारे म्हणतात की काय कारण आहे की प्रलय आमच्यावर येत नाही! सांगा, ''शपथ आहे परोक्ष-ज्ञानी माझ्या पालनकर्त्याची, ती तुमच्यावर आल्याशिवाय राहणार नाही. त्याच्यापासून कणमात्र कोणतीही वस्तू आकाशातही लपलेली नाही व जमिनीतदेखील नाही, कणापेक्षा मोठीही नाही व त्यापेक्षा लहानदेखील नाही. सर्वकाही एका स्पष्ट दप्तरात नमूद आहे.'' आणि हा प्रलय यासाठी येईल की मोबदला द्यावा अल्लाहने त्या लोकांना ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे आणि सत्कर्म करीत राहिले आहेत. त्यांच्यासाठी क्षमा आहे आणि मानाची उपजीविका. आणि ज्या लोकांनी आमच्या संकेतांना खोटे ठरविण्यासाठी जोर लावला आहे, त्यांच्यासाठी अत्यंत वाईट प्रकारचा यातनादायक प्रकोप आहे. हे पैगंबर (स.), ज्ञान राखणारे चांगलेच जाणतात की जो काही तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यावर अवतरला गेला आहे तो पूर्णपणे सत्य आहे आणि प्रभुत्वसंपन्न व स्तुत्य ईश्वराचा मार्ग दाखवितो. (३-६)

सत्य नाकारणारे लोकांना सांगतात, ''आम्ही तुम्हाला दाखवावा असा मनुष्य जो बातमी देतो की जेव्हा तुमच्या शरीराचा कण न् कण विखुरला गेला असेल तेव्हा तुम्ही नव्याने निर्माण केले जाल? न जाणो हा मनुष्य अल्लाहच्या नावावर कुभांड रचतो अथवा याला वेड लागले आहे.'' (७-८-)

नाही! किंबहुना जे लोक परलोकाला मानीत नाहीत ते प्रकोपात गुरफटले जाणार आहेत व तेच वाईट प्रकारे बहकलेले आहेत. काय यांनी कधी त्या आकाशाला व पृथ्वीला पाहिले नाही ज्याने यांना पुढून व मागून वेढले आहे? आम्ही इच्छिले तर यांना जमिनीत धसवू अथवा आकाशाचे काही तुकडे यांच्यावर कोसळवू. वास्तविक पाहता यात एक संकेत आहे त्या प्रत्येक दासाकरिता जो ईश्वराकडे रुजू होणारा असेल. (-८-९)

आम्ही दाऊद (अ.) ला आपल्याकडून मोठा कृपाप्रसाद प्रदान केला होता. (आम्ही आज्ञा दिली की) हे पर्वतानो, त्याच्यासोबत नामस्मरण करा (आणि हीच आज्ञा आम्ही) पक्षांना दिली. आम्ही लोखंडाला त्याच्यासाठी मऊ केले, या आदेशानिशी की चिलखत



बनव व त्यांच्या कड्या ठीक अंदाजावर ठेव, (हे दाऊदची संतान) सत्कर्म करा, जे काही तुम्ही करता ते मी पाहात आहे. (१०-११)

आणि सुलैमान (अ.) करिता आम्ही वाऱ्याला अधीन केले. सकाळच्या वेळेस त्याचे वाहणे एका महिन्याच्या मार्गापर्यंत आणि संध्याकाळच्या वेळी त्याचे वाहणे एक महिन्याच्या मार्गापर्यंत. आम्ही त्याच्याकरिता वितळलेल्या तांब्याचा झरा प्रवाहित केला आणि असे जिन्नांना त्याच्या अधीन केले जे आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने त्याच्यापुढे काम करीत असत. त्यांच्यापैकी जो कोणी आमच्या आज्ञेपुढे शिरजोरी दाखवीत असे, त्याला आम्ही भडकत्या अग्नीची चव चाखवीत होतो. ते त्याच्याकरिता बनवीत असत जे काही तो इच्छित असे, उत्तुंग इमारती, चित्रे,[1] मोठमोठ्या हौदासमान पराती आणि आपल्या जागेवरून न हटणाऱ्या भारदस्त डेगा - हे दाऊदची संतान, कर्म करा कृतज्ञतेच्या[2] भावनेने, माझ्या दासांमध्ये थोडेच लोक कृतज्ञ आहेत. (१२-१३)

मग जेव्हा सुलैमान (अ.) वर आम्ही मृत्यूचा निर्णय लागू केला तेव्हा जिन्नांना त्याच्या मृत्यूची माहिती देणारी कोणतीही गोष्ट त्या वाळवी खेरीज नव्हती, जी त्याच्याकाठीला खातहोती. अशाप्रकारे जेव्हा सुलैमान (अ.) खाली कोसळला तेव्हा जिन्नांवर ही गोष्ट उघड झाली की जर ते परोक्ष जाणणारे असते तर ते (जिन्न) या अपमानजनक प्रकोपात गुरफटून राहिले नसते. (१४)

'सबा'करिता खुद् त्यांच्या निवासस्थानातच एक संकेत उपस्थित होता, दोन उद्याने उजव्या व डाव्या बाजूस.[3] खा आपल्या पालनकर्त्याने दिलेली उपजीविका आणि कृतज्ञ बनून राहा त्याचे, प्रदेश आहे उत्कृष्ट व स्वच्छ आणि पालनकर्ता आहे क्षमाशील. परंतु ते पराङ्मुख झाले. सरतेशेवटी आम्ही त्यांच्यावर भयंकर महापूर पाठविला. आणि त्यांच्या पूर्वीच्या दोन उद्यानांच्या जागी आणखीन दोन उद्याने दिली ज्यात कडू व बेचव फळे व झाऊची झाडे होती व काही अल्पशी बोरी. हा होता त्यांच्या द्रोहाचा बदला जो आम्ही त्यांना दिला आणि कृतघ्न माणसाखेरीज असा बदला आम्ही इतर कोणाला देत नाही. (१५-१७)

---

१) 'चित्रा'साठी हे आवश्यक नाही की ते मानवांचे अथवा जनावरांचेच असावे. हजरत सुलैमान (अ.) हे मूसवी शरीअतचे अनुयायी होते. हजरत मूसा (अ.) यांच्या शरीअतीत सजीवाचे चित्र रेखाटणे त्याचप्रमाणे निषिद्ध होते ज्याप्रकारे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शरीअतीत निषिद्ध आहे.

२) म्हणजे कृतज्ञ दासांप्रमाणे काम करा.

३) याचा अर्थ असा नाही की सबंध देशात दोनच बागा होत्या तर याच्याने अभिप्रेत असे की 'सबा' लोकांचा सर्व भूप्रदेश बहरलेला होता. माणूस जेथे कोठे उभा राहात असे त्याला आपल्या उजवीकडेही बाग दिसत असे आणि डावीकडेदेखील.

आणि आम्ही त्यांच्या व त्या वस्त्यांच्या दरम्यान ज्यांना आम्ही समृद्धी प्रदान केली होती, उठावदार वस्त्या वसविल्या होत्या आणि त्यांच्यात प्रवासाचे टप्पे नियोजित केले होते.[४] संचार करा या मार्गावर रात्र व दिवस पूर्ण सुरक्षेने. परंतु त्यांनी सांगितले, 'हे आमच्या पालनकर्त्या, आमच्या प्रवासाच्या टप्प्यामध्ये[५] वाढ कर. त्यांनी स्वत:च आपल्यावर अत्याचार केला. सरतेशेवटी आम्ही त्यांना कथा बनवून सोडले. आणि त्यांना पुरेपूर नष्ट करून टाकले. निश्चितच यात संकेत आहेत त्या प्रत्येक माणसाकरिता जो मोठा संयमी व कृतज्ञ असेल. त्यांच्या संबंधाने 'इब्लीस' (शैतान) ला आपली कल्पना खरीच आढळली आणि त्यांनी त्याचेच अनुकरण केले, एका अल्पशा गटाला वगळता जो श्रद्धावंत होता. इब्लीसला त्यांच्यावर कोणताही अधिकार प्राप्त नव्हता. परंतु जे काही घडले ते अशासाठी घडले की आम्ही हे पाहू इच्छित होतो की कोण मरणोत्तर जीवनाला मानणारा आहे आणि कोण त्याच्याबद्दल शंकेत पडलेला आहे. तुझा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीची देखरेख करणारा आहे. (१८-२१)

(हे पैगंबर (स.), या अनेकेश्वरवादींना) सांगा की, ''पुकारून पहा तुम्ही आपल्या त्या उपास्यांना ज्यांना तुम्ही अल्लाहला सोडून आपले उपास्य समजून बसला आहात. ते आकाशातही कोणत्या कणमात्र वस्तूचे मालक नाहीत आणि जमिनीवरसुद्धा नाहीत. ते आकाश आणि जमिनीच्या मालकीतही भागीदार नाहीत. त्यांच्यापैकी कोणी अल्लाहचा सहायकदेखील नाही. आणि अल्लाहच्या हुजुरात एखादी शिफारसदेखील कुणाला लाभदायक ठरू शकणार नाही केवळ त्या व्यक्तीखेरीज ज्यासाठी अल्लाहने शिफारसीची परवानगी दिलेली असेल. येथपावेतो की जेव्हा लोकांच्या मनांतील भीड चेपेल तेव्हा ते (शिफारस करणाऱ्यांना) विचारतील की तुमच्या पालनकर्त्याने काय उत्तर दिले? ते म्हणतील की योग्य उत्तर मिळाले आहे आणि तो महान आणि उच्चतर आहे.''

(२२-२३)

**४)** 'समृद्ध वस्त्यां'नी अभिप्रेत सीरिया आणि फलस्तीनचा प्रदेश आहे. 'उठावदार वस्ती'नी अभिप्रेत अशा वसाहती आहेत ज्या आम राजमार्गावर स्थित असाव्यात, कानाकोपऱ्यात दडल्या नसाव्यात आणि प्रवासाच्या मजला नियोजित करण्याने अभिप्रेत असे की यमनपासून ते सीरियापर्यंतचा संपूर्ण प्रवास आखंडपणे आबाद असलेल्या प्रदेशातून होत होता. त्याच्या प्रत्येक मजल्यापासून दुसऱ्या मजलपर्यंतचा प्रवास परिचितीचा व निश्चित स्वरूपाचा होता.

**५)** त्यांनी तोंडानेच ही प्रार्थना केली असेल हे आवश्यक नाही. काही वेळा माणूस अशी कृती करतो जेणेकरून कळते की जणू तो आपल्या ईश्वराला सांगत आहे की ही देणगी जी तू मला दिली आहेस; मी यास पात्र नाही. आयतच्या शब्दावरून ही गोष्ट स्पष्टपणे जाणवते की ते लोक आपल्या लोकसंख्येच्या आधिक्याला आपल्यासाठी संकट म्हणून समजत होते. त्यांची इच्छा अशी होती की लोकसंख्या इतकी कमी व्हावी जेणेकरून प्रवासाच्या मजला लांब पल्ल्याच्या व्हाव्यात.



(हे पैगंबर (स.)) यांना विचारा, ''कोण तुम्हाला आकाश व जमिनीपासून अन्न देतो?'' सांगा, ''अल्लाह. आता अनिवार्यपणे आमच्या व तुमच्यापैकी कोणी तरी एकच सरळ मार्गावर आहे अथवा उघड पथभ्रष्टतेत गुरफटला आहे.'' यांना सांगा, ''जो अपराध आम्ही केला असेल त्याची कोणतीही विचारणा तुमच्याकडे होणार नाही आणि जे काही तुम्ही करीत आहात त्याची कोणतीही विचारणा आम्हास केली जाणार नाही.'' ''सांगा, ''आमचा पालनकर्ता आम्हाला एकत्र करील, मग आमच्या दरम्यान यथायोग्य निर्णय लावील. तो असा जबरदस्त शासक आहे जो सर्वकाही जाणतो.'' यांना सांगा, ''जरा मला दाखवा त्या कोण विभूती आहेत ज्यांना तुम्ही त्यांच्यासमवेत भागीदार म्हणून लावलेले आहे?'' मुळीच नाही, जबरदस्त व बुद्धिमान तर केवळ तो अल्लाहच आहे. (२४-२७)

आणि (हे पैगंबर (स.)), आम्ही तुम्हाला अखिल मानवजातीसाठी शुभवार्ता देणारा आणि सावधान करणारा बनवून पाठविले आहे, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत.

(२८)

हे लोक तुम्हाला सांगतात की, ''ते (मरणोत्तर जीवनाचे) वचन केव्हा पूर्ण होईल जर तुम्ही खरे आहात?'' सांगा, ''तुमच्याकरिता एका अशा दिवसाचा क्षण निश्चित आहे ज्याच्या येण्यात एक घटकाभर तुम्ही उशीरही करू शकत नाही अथवा एक घटकाभर अगोदरही त्यास आणू शकत नाही.' (२९-३०)

हे अश्रद्धावंत म्हणतात की, ''आम्ही कदापि या कुरआनला मानणार नाही आणि या अगोदर आलेल्या कोणत्या ग्रंथालाही मान्य करणार नाही.'' तुम्ही पहाल यांची दशा त्यावेळी जेव्हा हे अन्यायी आपल्या पालनकर्त्याच्या पुढे उभे राहतील. त्यावेळेस हे एकदुसऱ्यावर दोषारोप करतील. हे लोक जगात दुर्बल समजले गेले होते ते घमेंडी लोकांना सांगतील, ''जर तुम्ही नसता तर आम्ही श्रद्धावंत बनलो असतो.'' ते घमेंडी लोक दुर्बल लोकांना उत्तर देतील, ''काय आम्ही तुम्हाला त्या मार्गदर्शनापासून रोखले होते जे तुमच्यापाशी आले होते? नाही, किंबहुना तुम्ही स्वत:च अपराधी होता.'' ते दुर्बल लोक त्या घमेंडी लोकांना सांगतील, ''नाही, किंबहुना ती रात्र दिवसाची कारस्थाने होती, जेव्हा तुम्ही आम्हाला सांगत होता की आम्ही अल्लाहचा इन्कार करावा आणि इतरांना त्याचा समकक्ष ठरवावा.'' सरतेशेवटी जेव्हा हे लोक प्रकोप पाहतील तेव्हा आपल्या मनात पश्चात्ताप करतील, आणि आम्ही या इन्कार करणाऱ्यांच्या गळ्यात जोखड घालू - काय लोकांना याखेरीज इतर कोणता बदला दिला जावू शकतो की जशी कृत्ये त्यांची होती तसा मोबदला त्यांना मिळेल? (३१-३३)

कधी असे घडले नाही की आम्ही एखाद्या वस्तीत एक सावध करणारा पाठविला असेल आणि त्या वस्तीच्या सुखवस्तु लोकांनी हे म्हटले नाही की, ''जो संदेश तुम्ही घेऊन आलात तो आम्ही मानत नाही.'' त्यांनी सदैव असेच म्हटले की, ''आम्ही

तुमच्यापेक्षा अधिक संपत्ती व संतती बाळगतो आणि आम्ही कदापि शिक्षा भोगणार नाही.'' हे पैगंबर (स.) यांना सांगा, माझा पालनकर्ता ज्याला इच्छितो विपुल उपजीविका देतो आणि ज्याला इच्छितो बेताची प्रदान करतो परंतु बहुतेक लोक याची वस्तुस्थिती जाणत नाहीत. ही तुमची संपत्ती आणि तुमची संतती नाही जी तुम्हाला आमच्या जवळ करीत असेल. होय, परंतु जे श्रद्धा ठेवतील आणि सत्कृत्ये करतील, हेच लोक आहेत ज्यांच्याकरिता त्यांच्या कृत्यांचा दुप्पट मोबदला आहे, आणि ते उंच व उत्तुंग इमारतीत समाधानाने राहतील. उरले ते लोक जे आमच्या संकेतांना खोटे ठरविण्यासाठी धावपळ करीत असतील तर ते प्रकोपात गुरफटले जातील. (३४-३८)

हे पैगंबर (स.)! यांना सांगा, माझा पालनकर्ता आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो विपुल उपजीविका देतो आणि ज्याला इच्छितो बेताची देतो. जे काही तुम्ही खर्च करता त्याच्या जागी तोच तुम्हाला आणखीन देतो. तो सर्व उपजीविका देणाऱ्यांपेक्षा अधिक चांगली उपजीविका देणारा आहे. (३९)

आणि ज्या दिवशी तो अखिल मानवांना एकत्र करील मग दूतांना विचारील, ''काय हे लोक तुमचीच उपासना करीत होते?'' तर ते उत्तर देतील, ''पवित्र आहे आपले अस्तित्व, आमचा संबंध तर आपल्याशी आहे, या लोकांशी नाही. खरे पाहता हे आमची नव्हे तर जिन्नांची उपासना करीत होते. यांच्यापैकी बहुतेक त्यांच्यावरच श्रद्धा ठेवलेले होते.''[६] (त्या वेळेस आम्ही म्हणू की), आज तुमच्यापैकी कोणी कोणाला लाभही पोहचवू शकत नाही अथवा नुकसान. आणि अत्याचाऱ्यांना आम्ही सांगू की आता चाखा त्या नरकाच्या प्रकोपाची चव, ज्याला तुम्ही खोटे ठरवीत होता. (४०-४२)

या लोकांना जेव्हा आमचे स्पष्ट संकेत ऐकविले जातात तेव्हा हे सांगतात, ''हा मनुष्य तर केवळ हेच इच्छितो की, तुम्हाला त्या उपास्यापासून पराङमुख करावे ज्यांची उपासना तुमचे वाडवडील करीत आले आहेत.'' आणि सांगतात की, ''हा (कुरआन) केवळ एक थोतांड आहे रचलेला.'' या अश्रद्धावंतांसमोर जेव्हा सत्य आले, तेव्हा यांनी सांगून टाकले की, ''ही तर उघड जादू आहे.'' वास्तविक पाहता आम्ही या लोकांना पूर्वीही कोणताच ग्रंथ दिला नव्हताच की ज्याला ते वाचत होते आणि तुमच्यापूर्वी यांच्याकडे कोणी सावध करणाराही पाठविला नव्हता. यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनी खोटे ठरविले आहे जे काही आम्ही त्यांना दिले होते, त्याच्या एक शतांशापर्यंत हे

६) अनेकेश्वरवादी अरब, ईशदूतांना उपास्य ठरवीत असल्याकारणाने सर्वोच्च अल्लाहने सांगितले आहे की प्रलयाच्या दिवशी जेव्हा ईशदूतांना विचारले जाईल तेव्हा ते उत्तर देतील की वस्तुत: हे आमची नाही तर आमच्या नावाने शैतानाची बंदगी करीत होते, कारण शैतानांनीच यांना हा मार्ग दाखविला होता की ईश्वराला सोडून दुसऱ्यांना आपल्या गरजा पुरविणारे समजा व त्यांच्या पुढे भेटी व नवस अर्पण करीत राहा.



पोहचलेले नाहीत. परंतु जेव्हा त्यांनी माझ्या प्रेषितांना खोटे लेखले तर पहा की माझी शिक्षा किती कठोर होती. (४३-४५)

हे पैगंबर (स.)! यांना सांगा की,''मी तुम्हाला केवळ एका गोष्टीचा उपदेश देतो. अल्लाहकरिता तुम्ही एकएकटे व दोनदोन मिळून विचार विनिमय करा, तुमच्या सोबत्यात[७] कोणती गोष्ट आहे जी वेडेपणाची आहे? तो तर एका भयंकर प्रकोपाच्या आगमनापूर्वी तुम्हाला सावध करणारा आहे.'' यांना सांगा, ''जर मी तुमच्याकडे काही मोबदला मागितला असेल तर तो तुम्हालाच लखलाभ असो. माझा मोबदला तर अल्लाहकडे आहे आणि तो प्रत्येक वस्तूवर साक्षी आहे.'' यांना सांगा, ''माझा पालनकर्ता (माझ्यावर) सत्याचे अवतरण करतो आणि तो सर्व अदृश्य सत्ये जाणणारा आहे.'' सांगा, ''सत्याचे आगमन झाले आणि आता मिथ्यासाठी काहीच होऊ शकत नाही.'' सांगा, ''जर मी पथभ्रष्ट झालो असेन तर माझ्या पथभ्रष्टतेचे अरिष्ट माझ्यावर आहे आणि जर मी सरळमार्गावर असेन तर त्या दिव्यबोधामुळे आहे जो माझा पालनकर्ता माझ्यावर अवतरीत असतो. तो सर्वकाही ऐकतो आणि जवळच आहे.'' (४६-५०)

तुम्ही पाहाल या लोकांना, त्यावेळी जेव्हा हे लोक भयभीत फिरत असतील, आणि वाचून कोठे जावू शकणार नाहीत किंबहुना जवळूनच पकडले जातील. त्यावेळेस हे सांगतील की आम्ही त्यावर श्रद्धा ठेवली. वस्तुत: आता लांब गेलेली वस्तू कोठे हाती लागू शकते! यापूर्वी यानी द्रोह केलेला होता आणि शोध न घेताच मोठमोठे तर्कवितर्क लढवीत होते. त्यावेळेस हे ज्या वस्तुची अभिलाषा बाळगत असतील त्यापासून वंचित केले जातील ज्याप्रकारे यांचे समविचारी पुढे गेलेले वंचित झाले असतील. हे मोठ्या मार्गभ्रष्ट करणाऱ्या शंकेत गुरफटले होते. (५१-५४)

७) अभिप्रेत आहेत पैगंबर मुहम्मद (स.), त्यांच्यासाठी 'त्यांचे सोबती' हा शब्द अशासाठी वापरला गेला आहे की ते त्यांच्यासाठी अपरिचित नव्हते किंबहुना त्यांच्याच शहरातील रहिवाशी आणि त्यांचे समवंशीच होते.

# ३५ सूरह फातिर

*(मक्काकालीन, वचने ४५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

स्तुती त्या अल्लाहसाठीच आहे जो आकाशांचा व पृथ्वीचा बनविणारा आणि दूतांना 'संदेश पोहचविणारा' नियुक्त करणारा आहे, (असे दूत) ज्यांचे दोन-दोन, तीन-तीन आणि चार-चार बाहू आहेत. तो आपल्या निर्मितीच्या रचनेत जसे इच्छितो वाढ करतो. निश्चितच अल्लाह प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे. अल्लाह ज्या कोणत्याही कृपेचे द्वार लोकांसाठी खुले करील त्याला कोणी रोखणारा नाही, आणि ज्याला तो बंद करील त्याला अल्लाहनंतर मग कोणीही उघडणारा नाही. तो जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (१-२)

लोकहो, तुम्हावर अल्लाहचे जे उपकार आहेत त्यांची आठवण ठेवा, काय अल्लाहशिवाय एखादा अन्य निर्माता आहे? जो तुम्हाला आकाश आणि पृथ्वीतून उपजीविका देत असेल? कोणी उपास्य त्याच्याखेरीज नाही. मग तुम्ही कोठे भरकटत आहात? आता जर (हे पैगंबर (स.)) हे लोक तुम्हाला खोटे ठरवतील. (तर ही काही नवीन गोष्ट नाही) तुमच्यापूर्वीदेखील बरेचसे प्रेषित खोटे लेखले गेले आहेत आणि सर्व प्रकरणे सरतेशेवटी अल्लाहकडेच रूजू होणार आहेत. (३-४)

लोकहो! अल्लाहचे वचन निश्चितपणे सत्य आहे, म्हणून ऐहिक जीवनाने तुमची आत्मवंचना होऊ नये. आणि त्या मोठ्या धोकेबाजानेदेखील तुम्हाला अल्लाहसंबंधी धोका देता कामा नये. वास्तविकपणे शैतान तुमचा शत्रू आहे म्हणून तुम्हीसुद्धा त्याला आपला शत्रूच माना. तो तर आपल्या अनुयायांना आपल्या मार्गावर यासाठी बोलवित आहे की ते नरकवासियांत समाविष्ट व्हावेत. जे लोक सत्याचा इन्कार करतील त्यांच्यासाठी कठोर यातना आहेत आणि जे श्रद्धा ठेवतील व सत्कृत्ये करतील त्यांच्यासाठी क्षमा व मोठा मोबदला आहे. (५-७)

(बरे काही ठाव आहे त्या माणसाच्या पथभ्रष्टतेचा) ज्याच्यासाठी त्याचे दुष्कर्म आकर्षक बनविले गेले आहे आणि तो त्याला चांगले समजत आहे? वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह ज्याला इच्छितो त्याला पथभ्रष्टतेत टाकतो आणि ज्याला इच्छितो त्याला सरळमार्ग दाखवितो, म्हणून (हे पैगंबर (स.)), तुमचा जीव या लोकांसाठी दु:खात व शोकात गमावू नका. जे काही हे करीत आहेत, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो. तो अल्लाहच तर आहे जो वारे प्रवाहित करतो. मग ते ढगांना जोडतात. नंतर आम्ही त्याला एका ओसाड प्रदेशाकडे नेतो आणि त्याद्वारे आम्ही त्या धरतीला नवजीवन देतो जी मृत पडलेली होती, दिवंगत माणसाचे पुनरुत्थान सुद्धा त्याचप्रकारे असेल. (८-९)

ज्या कोणास प्रतिष्ठा हवी असेल त्याला हे कळावे की सन्मान पूर्णत: अल्लाहचा



आहे, त्याच्या येथे जी गोष्ट वर चढते ती केवळ पवित्र वचन आहे आणि सत्कर्म त्याला वर चढविते. उरले ते लोक जे वाईट डावपेच लढवितात त्यांच्यासाठी भयंकर यातना आहे आणि त्यांची कुटिलता स्वत:च नष्ट होणार आहे. (१०)

अल्लाहने तुम्हाला मातीपासून निर्माण केले, मग वीर्यापासून. मग तुमच्या जोड्या बनविल्या (म्हणजे पुरुष आणि स्त्री) अल्लाहच्या ज्ञानाबाहेर कोणतीही स्त्री गर्भवतीही होत नाही आणि बाळंतही होत नाही. कोणी आयुष्य प्राप्त करणारा आयुष्य प्राप्त करीत नाही आणि कोणाच्या आयुष्यातही काही घट होत नाही पण हे सर्वकाही एका ग्रंथात लिखित असते. अल्लाहसाठी हे अगदी सोपे काम आहे, आणि पाण्याचे दोन्ही साठे समान नाहीत, एक गोड आणि तहान भागविणारे, पिण्यास आल्हाददायक; आणि दुसरे भयंकर खारट की घसा सोलून टाकणारे. परंतु दोन्हीपासून तुम्ही ताजे-ताजे मासे प्राप्त करता, वापरण्यासाठी शृंगाराचे साहित्य काढता आणि त्याच पाण्यात तुम्ही पाहता की होड्या पाणी कापीत जात असतात की जेणेकरून तुम्ही अल्लाहचा कृपाप्रसाद शोधावा आणि त्याचे कृतज्ञ बनावे. तो दिवसामध्ये रात्र आणि रात्रीमध्ये दिवसाला ओवीत आणतो. चंद्र आणि सूर्याला त्याने अधीन करून ठेवले आहे. हे सर्वकाही एका ठराविक वेळेपर्यंत चाललेले आहे. तोच अल्लाह (ज्याचे हे सर्व कार्य आहे) तुमचा पालनकर्ता आहे. राज्य त्याचेच आहे. त्याला सोडून ज्या इतरांचा तुम्ही धावा करीत आहात, ते एका कस्पटाचे देखील मालक नाहीत. त्यांचा धावा केला तर ते तुमची प्रार्थना ऐकू शकत नाहीत आणि ऐकली तरी तिचा तुम्हाला काही प्रतिसाद देऊ शकत नाहीत. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी ते तुमच्या अनेकेश्वरवादाचा इन्कार करतील. वस्तुस्थितीची अशी अचूक माहिती एका माहितगाराशिवाय इतर कोणीही तुम्हाला देऊ शकत नाही. (११-१४)

लोकहो! तुम्हीच अल्लाहचे गरजवंत आहात आणि अल्लाह तर निरपेक्ष आणि स्तुत्य आहे. त्याने इच्छिले तर तुम्हाला दूर सारून एखादी नवनिर्मिती तुमच्याऐवजी आणील. असे करणे अल्लाहला काहीच कठीण नाही. कोणी ओझे उचलणारा कुणा दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही. आणि कोणी ओझे लादलेला जीव आपले ओझे उचलण्यासाठी हाक देईल तर त्याच्या ओझ्याचा क्षुल्लक भारदेखील उचलण्याकरिता कोणी येणार नाही मग तो अतिजवळचा नातेवाईक का असे ना. (हे पैगंबर (स.)!) तुम्ही केवळ त्याच लोकांना सावध करू शकता, जे न पाहता आपल्या पालनकर्त्याच्या कोपाचे भय बाळगतात, आणि नमाज कायम करतात. जो कोणी शुचितेचा अंगिकार करतो, तो स्वत:च्या भल्यासाठीच करतो आणि सर्वांनाच अल्लाहकडे रूजू व्हायचे आहे. नेत्रहीन व डोळस समान नाहीत, अंधकार व प्रकाशही समान नाहीत, शीतल सावली व उन्हाची झळ एकसमान नाही. आणि जिवंत व मृत देखील समान नाहीत. अल्लाह ज्याला इच्छितो

ऐकवितो. परंतु (हे पैगंबर (स.)) तुम्ही लोकांना ऐकवू शकत नाही जे कबरीत दफन[१] आहेत. तुम्ही तर केवळ एक सावध करणारे आहात. आम्ही तुम्हाला सत्यानिशी पाठविले आहे. शुभवार्ता देणारा व इशारे देणारा बनवून. आणि कोणताही लोकसमुदाय असा होऊन गेला नाही ज्यात कोणी सावध करणारा आला नाही. आता जर हे लोक तुम्हाला खोटे ठरवीत असतील, तर यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीदेखील खोटे लेखले आहे. त्यांच्यापाशी त्यांचे पैगंबर, स्पष्ट प्रमाण, संदेश आणि उज्ज्वल आदेश करणारा ग्रंथ घेऊन आले होते. मग ज्या लोकांनी मान्य केले नाही त्यांना मी पकडले. आणि पाहून घ्या माझी शिक्षा किती कठोर होती. (१५-२६)

काय तुम्ही पाहत नाही की अल्लाह आकाशांतून जलवर्षाव करतो. मग त्याद्वारे विविध रंगाची विविध प्रकारची फळे उगवितो. पर्वतामध्ये देखील धवल, तांबडे व गडद काळे भिन्न रंगी पट्टे आढळतात. याचप्रकारे मनुष्य, जनावरे व प्राणीमात्रांचे रंगसुद्धा भिन्न भिन्न आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहच्या दासांपैकी केवळ ज्ञान राखणारे लोकच त्याचे भय बाळगतात[२] नि:संशय अल्लाह जबरदस्त आणि क्षमाशील आहे.

(२७-२८)

जे लोक अल्लाहच्या ग्रंथाचे पठन करतात आणि नमाज कायम करतात, आणि जी काही उपजीविका आम्ही त्यांना दिली आहे. त्यातून उघड आणि गुप्तपणे खर्च करतात, निश्चितपणे त्यांना एका अशा व्यापाराची आशा आहे ज्यांत कदापि तोटा होणार नाही. (या व्यापारात त्यांनी आपले सर्वस्व अशासाठी खर्चिले आहे) जेणेकरून अल्लाहने त्याचा मोबदला पुरेपूर त्यांना द्यावा. आणि आपल्या कृपेने त्यांना अधिक प्रदान करावे. नि:संशय अल्लाह क्षमाशील व गुणग्राहक आहे. (हे पैगंबर (स.)!) जो ग्रंथ आम्ही तुमच्याकडे दिव्यबोधाद्वारे पाठविला आहे तोच सत्य आहे, सत्यता प्रमाणित करीत आला आहे त्या ग्रंथांची जे त्याच्यापूर्वी आले होते. नि:संशय अल्लाह आपल्या दासांच्या स्थितीची माहिती राखणारा आणि प्रत्येक गोष्टीवर लक्ष ठेवणारा आहे. आम्ही आपल्या दासांपैकी ज्यांना निवडले अशांनाच या ग्रंथाचे उत्तराधिकारी केले. त्यापैकी कोणी स्वत:वर अत्याचार करणारा आहे, आणि कोणी मध्यमार्गी आहे, आणि कोणी अल्लाहच्या परवानगीने

१) म्हणजे अल्लाहच्या मनोरथाची तर गोष्टच वेगळी आहे. त्याने इच्छिले तर दगडांनादेखील श्रवणशक्ती प्रदान करावी परंतु पैगंबरांच्या आवाक्यातील हे काम नव्हे की ज्या लोकांची मनं सद्सद्विवेकबुद्धीची थडगी ठरली असावी त्यांच्या हृदयात त्याने आपले म्हणणे ठसवू शकावे आणि जे गोष्ट ऐकूच इच्छित नसावेत, त्यांच्या बधिर कर्णांना सत्याची हाक ऐकवू शकावी. तो तर अशाच लोकांना ऐकवू शकतो जे योग्य गोष्ट ऐकण्यास तयार असावेत.

२) यावरून असे कळते की विद्वान केवळ ग्रंथ वाचणाऱ्यास म्हटले जात नाही तर जो ईश्वरी कोपाचे भय बाळगणारा असतो, तोच विद्वान आहे.



सत्कार्यात पुढाकार घेणारा आहे. हाच महान कृपाप्रसाद आहे. सदैव राहणारे स्वर्ग आहेत ज्यात हे लोक प्रवेश करतील. तेथे यांना सोन्याच्या कंकणांनी व मोत्यांनी शृंगारित केले जाईल. तेथे त्यांचा पोशाख रेशमी असेल, आणि ते म्हणतील, ''धन्यवाद त्या अल्लाहला ज्याने आम्हापासून दु:ख दूर केले, नि:संशय आमचा पालनकर्ता क्षमाशील व कदर करणारा आहे. ज्याने आम्हाला आपल्या कृपेने चिरंतन वास्तव्यांच्या ठिकाणी वसविले. आता येथे आम्हाला कुठलाही त्रास सोसावा लागत नाही आणि कसला थकवादेखील येत नाही. (२९-३५)

आणि ज्या लोकांनी द्रोह केला त्यांच्याकरिता नरकाचा अग्नी आहे. त्यांना निकालातही काढले जाणार नाही आणि त्यांच्या नरकाच्या शिक्षेतदेखील कोणती कपात केली जाणार नाही. अशाप्रकारे आम्ही मोबदला देत असतो प्रत्येक इसमाला जो सत्याचा इन्कार करणारा आहे. ते तेथे एकदाच ओरडून म्हणतील, ''हे आमच्या पालनकर्त्या! येथून आम्हाला बाहेर काढ जेणेकरून आम्ही सत्कृत्ये करू. त्या कृत्यापासून भिन्न जे पूर्वी करीत होतो.'' (त्यांना उत्तर दिले जाईल) ''काय आम्ही तुम्हाला इतके आयुष्य दिले नव्हते ज्यात एखाद्याला बोध घ्यायचा असता तर त्याने घेतला असता? आणि तुमच्यापाशी सावध करणारादेखील आला होता. आता चव चाखा, अत्याचाऱ्यांचा येथे कोणीही सहायक नाही.'' (३६-३७)

नि:संशय अल्लाह आकाश आणि पृथ्वीतील प्रत्येक अदृष्य वस्तूपासून परिचित आहे. तो तर अंत:करणातील गुप्त रहस्यदेखील जाणतो. तोच तर आहे ज्याने तुम्हाला पृथ्वीतलावर खलीफा (उत्तराधिकारी) बनविले आहे. आता जो कोणी द्रोह करतो, त्याच्या द्रोहाचे अरिष्ट त्याच्यावरच आहे. आणि अश्रद्धावंतांना त्यांचा द्रोह याव्यतिरिक्त कसलीही वाढ देणार नाही की त्यांच्या पालनकर्त्याचा प्रकोप त्यांच्यावर जास्तीत जास्त भडकत जाईल अश्रद्धावंतांसाठी हानीत वाढीशिवाय कोणतीही वृद्धी नाही. (३८-३९)

(हे पैगंबर (स.)) यांना सांगा, ''कधी तुम्ही पाहिले तरी आहे का आपल्या त्या भागीदारांना ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता? मला दाखवा त्यांनी जमिनीत काय निर्माण केले आहे? अथवा आकाशात त्यांची कोणती भागीदारी आहे?'' (जर हे दाखवू शकत नसतील तर यांना विचारा) ''आम्ही यांना काही मजकूर लिहून दिला आहे? की ज्याच्या आधारे हे (आपल्या या अनेकेश्वरवादासाठी) एखादे स्पष्ट प्रमाण बाळगत असतील?'' नाही, किंबहुना हे अत्याचारी एकमेकांना केवळ हुलकावण्या देत आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की तो अल्लाहच आहे ज्याने आकाशांना व पृथ्वीला ढळण्यापासून सावरले आहे. आणि जर ते ढळले तर अल्लाहनंतर दुसरा कोणी त्यांना सावरू शकणार नाही. नि:संशय अल्लाह मोठा सहिष्णू आणि क्षमाशील आहे.

(४०-४१)

हे लोक कठोर शपथा घेऊन घेऊन सांगत असतात की जर एखादा सावध करणारा त्यांच्याकडे आला असता तर हे जगातील इतर प्रत्येक जनसमूहापेक्षा अधिक सरळमार्गी बनले असते. परंतु जेव्हा सावध करणारा यांच्याकडे आला तेव्हा त्याच्या आगमनाने यांच्यात सत्यापासून पळ काढण्याशिवाय इतर कोणत्याही गोष्टीत वाढ केली नाही. हे पृथ्वीवर आणखीन जास्तच दुर्वर्तन करू लागले आणि दुष्ट कारस्थाने करू लागले, वास्तविकत: दुष्ट कारस्थाने, ते करणाऱ्यांच्याच अंगलट येत असतात. आता काय हे लोक याची प्रतीक्षा करीत आहेत की पूर्वीच्या जनसमूहांशी अल्लाहची जी रीत राहिली आहे तीच यांच्यासाठीसुद्धा अवलंबिली जावी? असेच असेल तर तुम्हाला अल्लाहच्या रीतीत कोणताही बदल आढळणार नाही आणि तुम्ही कधीही पाहणार नाही की अल्लाहच्या शिरस्त्याला त्याच्या ठरलेल्या मार्गापासून एखादी शक्ती वळवू शकेल. काय या लोकांनी कधी पृथ्वीवर संचार केलेला नाही की जेणेकरून यांना त्या लोकांचा शेवट दिसला असता जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत आणि यांच्यापेक्षा फार शक्तीमान होते? पृथ्वी व आकाशांत त्याला कोणतीही गोष्ट नमवू शकत नाही. तो सर्वज्ञ आहे. आणि प्रत्येक गोष्टीवर सामर्थ्य बाळगतो जर का त्याने लोकांना त्यांच्या केलेल्या कृत्यांवर पकडले असते तर पृथ्वीवर कोणत्याही सजीवाला जिवंत सोडले नसते परंतु तो त्यांना एका निश्चित वेळेपर्यंत अवधी देत आहे, मग जेव्हा त्यांची घटका भरेल तेव्हा अल्लाह आपल्या दासांना बघून घेईल. (४२-४५)



# ३६ सूरह याऽसीऽऽन

*(मक्काकालीन, वचने ८३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

याऽसीऽऽन. शपथ आहे प्रबुद्ध कुरआनची की तुम्ही नि:संशय प्रेषितांपैकी आहात. सरळ मार्गावर आहात. (आणि हे कुरआन) प्रभुत्वशाली आणि दयावान अस्तित्वाकडून अवतरित आहे जेणेकरून तुम्ही सावध करावे अशा जनसमुदायाला ज्याचे पूर्वज सावध केले गेले नव्हते व या कारणाने ते गाफील पडलेले आहेत. (१-६)

यांच्यापैकी बहुतेक लोक शिक्षेस पात्र ठरले आहेत, याच कारणास्तव ते श्रद्धा ठेवत नाहीत.[१] आम्ही त्यांच्या मानेत जोखड घातले आहे ज्यामुळे ते हनुवटीपर्यंत जखडले गेले आहेत, म्हणून ते डोके वर करून उभे आहेत.[२] आम्ही एक भिंत त्यांच्यापुढे उभी केली आहे आणि एक भिंत त्यांच्यामागे, आम्ही त्यांना अच्छादले आहे, त्यांना आता काही सुचत नाही.[३] यांच्याकरिता समान आहे; तुम्ही यांना सावध करा अथवा करू नका; हे मानणार नाहीत. तुम्ही तर त्याच माणसाला सावध करू शकता; जो उपदेशाचे अनुसरण करील आणि न पाहता मेहरबान ईश्वराला भीत असेल त्याला क्षमा आणि सन्मान्य मोबदल्याची शुभवार्ता द्या. (७-११)

आम्ही निश्चितच एके दिवशी मृतांना जिवंत करणार आहोत. जी काही कृत्ये त्यांनी केलेली आहेत, ती सर्व आम्ही लिहित आहोत आणि जे काही अवशेष त्यांनी मागे सोडले आहेत तेसुद्धा आम्ही अंकित करीत आहोत. प्रत्येक गोष्ट आम्ही एका उघड ग्रंथात नोंद करून ठेवली आहे. (१२)

---

**१)** हा उल्लेख पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आवाहनाविरूद्ध जे हट्ट आणि अडेलतट्टूपणा दाखवीत होते आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचे म्हणणे कुठल्याही परिस्थितीत मानावयाचे नाहीच असे ज्यांनी ठरविलेले होते, अशा लोकांचा आहे. त्यांच्यासंबंधी फर्माविले गेले आहे, 'हे लोक प्रकोप-निर्णयास पात्र ठरले आहेत म्हणून हे श्रद्धा ठेवत नाहीत.'

**२)** 'जोखड'ने अभिप्रेत त्यांचा हट्टी आणि अडेलतट्टूपणा आहे. सत्य स्वीकारण्याच्या मार्गात तो आड येत होता. 'हनुवटीपर्यंत जखडणे' आणि 'डोके वर करून उभे असणे' याच्याने अभिप्रेत गर्व आणि अहंकाराचा परिणाम म्हणून मानेला जी ताठरता येते ती होय.

**३)** एक भिंत पुढे आणि एक मागे उभी करण्याने अभिप्रेत असे की त्याच अडेलतट्टूपणा आणि गर्वाचा परिणाम असा निघाला की हे लोक गत इतिहासापासूनही धडा घेत नाहीत आणि भावी परिणामांवरही विचार करीत नाहीत. यांच्या पूर्वग्रहदोषाने यांना सर्व बाजूंनी अशा प्रकारे व्यापून टाकले आहे व यांच्या गैरसमजूतींनी यांच्या डोळ्यांवर अशी झापड बसविली आहे की प्रत्येक सत्यनिष्ठ, सज्जन आणि नि:पक्षपाती माणसाला जी उघड उघड सत्ये दिसतात, तीसुद्धा यांना दिसत नाहीत.

यांना उदाहरणार्थ त्या वस्तीवाल्यांची कथा ऐकवा, जेव्हा त्यात प्रेषित आले होते. आम्ही त्यांच्याकडे दोन प्रेषित पाठविले आणि त्यांनी दोघांना खोटे ठरविले. मग आम्ही तिसरा मदतीसाठी पाठविला आणि त्या सर्वांनी सांगितले, "आम्ही तुमच्याकडे प्रेषित म्हणून पाठविले गेलो आहोत." वस्तीवाल्यांनी सांगितले, "तुम्ही काहीच नाही परंतु आमच्याचसारखी काही माणसे आणि परमकृपाळू ईश्वराने कोणतीच वस्तू मुळीच उतरविली नाही, तुम्ही निव्वळ खोटे बोलत आहात." (१३-१५)

प्रेषितांनी सांगितले, "आमचा पालनकर्ता जाणतो की आम्ही निश्चितच तुमच्याकडे प्रेषित म्हणून पाठविले गेलो आहोत, आणि आमच्यावर स्पष्टपणे संदेश पोहचविण्याव्यतिरिक्त कोणतीही जबाबदारी नाही." वस्तीवाले म्हणू लागले, "आम्ही तर तुम्हाला आमच्यासाठी अपशकून मानीत आहोत. जर तुम्ही परावृत्त झाला नाही तर आम्ही तुम्हाला दगडांनी मारून टाकू आणि आमच्याकडून तुम्ही भयंकर यातनादायक शिक्षा भोगाल." प्रेषितांनी उत्तर दिले, "तुमचे अशुभ फलित तर तुमच्या स्वत:बरोबरच आहे. काय या गोष्टी तुम्ही यासाठी करीत आहात की तुम्हाला आदेश केला गेला? वस्तुत: गोष्ट अशी आहे की तुम्ही मर्यादेपलीकडे गेलेले लोक आहात." (१६-१९)

इतक्यात शहरातील दूरवरच्या कोपऱ्याहून एक मनुष्य धावत आला आणि म्हणाला, "हे माझ्या देशबांधवांनो, प्रेषितांचे अनुकरण करा. अनुकरण करा त्या लोकांचे जे तुमच्याकडून कोणताही मोबदला इच्छित नाहीत आणि योग्य मार्गावर आहेत. मी त्या अस्तित्वाची भक्ती का करू नये ज्याने मला निर्माण केले आणि ज्याकडे तुम्हा सर्वांना रुजू व्हायचे आहे? काय मी त्याला सोडून दुसऱ्यांना उपास्य बनवावे? वास्तविकत: जर परमकृपाळू ईश्वराने मला काही हानी पोहचवू इच्छिली तर त्यांची शिफारसही माझ्या काही उपयोगी पडणार नाही किंवा ते मला सोडवूदेखील शकणार नाहीत. जर मी असे केले तर मी स्पष्ट पथभ्रष्टतेत गुरफटून जाईन. मी तर तुमच्या पालनकर्त्यावर श्रद्धा ठेवली, तुम्ही सुद्धा माझे म्हणणे ऐका." (२०-२५)

(सरतेशेवटी त्या लोकांनी त्याला ठार मारले आणि) त्या माणसाला सांगितले गेले की प्रवेश कर स्वर्गामध्ये. त्याने सांगितले, "माझ्या जातीबांधवांना हे माहीत झाले असते! की माझ्या पालनकर्त्याने कोणत्या कारणास्तव मला क्षमादान केले आणि मला प्रतिष्ठित लोकांत सामील केले." (२६-२७)

त्यानंतर त्याच्या जातीबांधवांवर आम्ही आकाशांतून एखादे लष्कर उतरविले नाही. आम्हाला लष्कर पाठविण्याची काही गरज नव्हती. केवळ एक विस्फोट झाला आणि अकस्मात ते सर्व विझले. खेद आहे दासांच्या दशेवर जो कोणी प्रेषित त्यांच्यापाशी आला त्याची ते थट्टाच करीत राहिले. काय यांनी पाहिले नाही की यांच्यापूर्वी आम्ही कित्येक जनसमूहांना नष्ट करून टाकले आहे आणि त्यानंतर ते पुन्हा कधीही त्यांच्याकडे परतून



आले नाहीत? त्या सर्वांना एके दिवशी आमच्यासमोर हजर केले जाणार आहे. (२८-३२)

या लोकांकरिता निर्जीव जमीन एक संकेत आहे. आम्ही तिला जीवन प्रदान केले आणि तिच्यापासून धान्य उत्पन्न केले जे हे खातात. आम्ही तिच्यात खजुरीच्या व द्राक्षांच्या बागा निर्माण केल्या आणि तिच्यातून झरे प्रवाहित केले जेणेकरून यांनी तिची फळे खावीत. हे सर्वकाही यांच्या स्वत:च्या हातांनी निर्माण केलेले नाही. तरीही काय हे कृतज्ञता दाखवत नाहीत? पवित्र आहे ते अस्तित्व ज्याने सर्व प्रकारच्या जोड्या निर्माण केल्या, मग त्या जमिनीतील वनस्पतींपैकी असोत अथवा खुद्द यांच्या स्वजातीय (अर्थात मनुष्य) पैकी, अथवा त्या वस्तूंपैकी ज्यांची यांना माहितीदेखील नाही. (३३-३६)

यांच्याकरिता आणखीन एक संकेत रात्र आहे, आम्ही तिच्यावरून दिवस हटवितो तेव्हा यांच्यावर अंधकार पसरतो. आणि सूर्य, तो आपल्या स्थानाकडे वाटचाल करीत आहे. जबरदस्त सर्वज्ञ अस्तित्वाकडून सुनिश्चित केलेला हा हिशोब आहे. आणि चंद्रासाठी आम्ही मजल ठरविल्या आहेत येथपावेतो की तो त्यातून वाटचाल करीत पुन्हा खजुरीच्या शुष्क फांदीसमान उरतो. सूर्याच्या आवाक्यात हे नाही की त्याने जाऊन चंद्राला गाठावे आणि रात्रही दिवसावर मात करू शकत नाही. सर्व एक-एका नभोमंडळात तरंगत आहेत. (३७-४०)

यांच्यासाठी हासुद्धा एक संदेश आहे की आम्ही यांच्या वंशजांना भरलेल्या नौकेत स्वार केले.[४] आणि मग यांच्याकरिता तशाच प्रकारच्या नौका आणखीन निर्माण केल्या ज्यावर हे स्वार होत असतात. आम्ही इच्छिले तर यांना बुडवून टाकू, कोणीही यांची दाद घेणारा नसेल आणि कोणत्याही प्रकारे त्यांचा बचाव होणार नाही. आमची कृपाच आहे जी यांना तारते आणि एका विशिष्ट वेळेपर्यंत जीवनाचा उपभोग घेण्याची संधी बहाल करते. (४१-४४)

या लोकांना जेव्हा सांगण्यात येते की स्वत:ला वाचवा त्या परिणामापासून जो तुमच्यापुढे येत आहे आणि तुमच्यापूर्वी ओढावला होता. कदाचित तुमच्यावर दया केली जाईल, (तर हे ऐकल्या न ऐकल्यासारखे करतात) यांच्यासमोर यांच्या पालनकर्त्याकडून संकेतामधून जो कोणता देखील संकेत येतो हे त्याकडे लक्ष देत नाहीत. आणि जेव्हा यांना सांगितले जाते की अल्लाहने जी उपजीविका तुम्हाला प्रदान केली आहे तिच्यापैकी काही अल्लाहच्या मार्गातसुद्धा खर्च करा, तर हे लोक ज्यांनी द्रोह केला आहे, श्रद्धा ठेवणाऱ्यांना उत्तर देतात, "आम्ही त्या लोकांना जेवू घालावे काय ज्यांना अल्लाहने

४) 'नावे'ने अभिप्रेत हजरत नूह (अ.) यांची नौका आहे.

इच्छिले असते तर स्वत: जेवू घातले असते? तुम्ही तर पूर्णपणे बहकलेले आहात.'' (४५-४७)

हे लोक म्हणतात की, ''ही पुनरुत्थानाची धमकी पूरी तरी केव्हा होणार? सांगा, जर तुम्ही खरे असाल.'' वास्तविकत: हे ज्या गोष्टीची वाट पाहात आहेत तो एक स्फोट आहे जो अकस्मात यांना अशा स्थितीत गाठील जेव्हा हे (आपल्या ऐहिक व्यवहारांत) भांडत असतील, आणि त्यावेळी हे मृत्यूपत्रदेखील करू शकणार नाहीत, आपल्या घरीदेखील परतू शकणार नाहीत. मग एक नरसिंघ फुंकले जाईल आणि अकस्मात हे आपल्या पालनकर्त्यांच्या पुढे हजर होण्याकरिता आपापल्या कबरीतून बाहेर पडतील. घाबरून म्हणतील, ''हे आम्हाला आमच्या शयनगृहातून कोणी उठविले?'' - ''ही तीच गोष्ट आहे जिचे परमदयाळू ईश्वराने वचन दिले होते आणि प्रेषितांचे प्रतिपादन सत्य होते.''[५] एकच प्रचंड मोठा आवाज होईल आणि सर्वच्या सर्व आमच्यासमोर हजर केले जातील. (४८-५३)

आज कोणावर यत्किंचितही अन्याय केला जाणार नाही आणि तुम्हाला तसाच मोबदला दिला जाईल जशी तुम्ही कृत्ये करीत होता. आज स्वर्गातील लोक मौज करण्यात मग्न आहेत. त्यांची जोडपी गडद छायेत आहेत. आसनावर लोड लावून, हर तऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ खाण्यापिण्यासाठी त्यांच्याकरिता तेथे उपलब्ध आहेत, जे काही ते मागतील त्यांच्यासाठी हजर आहे. परमकृपाळू पालनकर्त्याकडून त्यांना सलाम सांगितला गेला आहे. आणि हे गुन्हेगारांनो, आज तुम्ही विभक्त व्हा, आदमच्या मुलांनो, मी तुम्हाला आदेश दिला नव्हता काय की शैतानाची भक्ती करू नका, तो तुमचा उघड शत्रू आहे आणि माझीच भक्ती करा, हा सरळमार्ग आहे? परंतु असे असूनदेखील त्याने तुमच्यापैकी एका मोठ्या गटाला मार्गभ्रष्ट केले. तुम्हाला सुबुद्धी नव्हती काय? हा तोच नरक आहे ज्याची तुम्हाला भीती दाखविली जात होती, जो द्रोह तुम्ही करीत होता त्यापायी आता त्याचे इंधन बना. (५४-६४)

आज आम्ही यांची तोंडे बंद करून टाकत आहोत, यांचे हात आम्हाला सांगतील आणि यांचे पाय ग्वाही देतील की हे जगात कोणती कमाई करीत होते. (६५)

आम्ही इच्छिले तर यांचे डोळे बंद करून टाकू, मग यांनी रस्त्याकडे धाव घेऊन पाहावे, कुठून यांना रस्ता उमगेल? आम्ही इच्छिले तर यांना यांच्या जागीच अशाप्रकारे

५) हे उत्तर त्यांना श्रद्धावंतांनी द्यावे असेही शक्य आहे. अशीही शक्यता आहे की काही वेळेनंतर त्या लोकांना स्वत:च कळावे की हा तर तोच दिवस येऊन ठेपला ज्याची वार्ता प्रेषित आम्हाला देत होते. असेही घडू शकते की ईशदूतांनी त्यांना हे उत्तर द्यावे अथवा प्रलयाच्या एकूण वातावरणाने त्यांच्या निदर्शनात हे आणावे.



विकृत करून टाकू की यांना पुढेही जाता येऊ नये आणि मागेही फिरता येऊ नये. ज्या माणसाला आम्ही दीर्घायुष्य देतो त्याचा पाया आम्ही उखडून टाकतो, (ही दशा पाहून) यांना सुबुद्धी येत नाही काय? (६६-६८)

आम्ही या (पैगंबर (स.)) ला काव्य शिकविले नाही आणि याला काव्यरचना शोभतही नाही. हा तर एक उपदेश आहे आणि स्पष्ट वाचला जाणारा ग्रंथ, जेणेकरून त्याने त्या प्रत्येक माणसाला सावध करावे जो जिवंत असेल. आणि इन्कार करणाऱ्यांवर प्रमाण सिद्ध होईल. (६९-७०)

काय हे लोक पहात नाहीत की आम्ही आपल्या हाताने बनविलेल्या वस्तूंपैकी यांच्यासाठी प्राणीमात्र निर्माण केले आहेत आणि हे आता त्यांचे मालक आहेत? आम्ही त्यांना अशाप्रकारे यांच्या अधीन केले आहे की त्यांच्यापैकी कुणावर हे स्वार होतात, तर कोणाचे मांस खातात, आणि त्याच्यात यांच्यासाठी नाना प्रकारचे लाभ आणि पेये आहेत. मग काय हे कृतज्ञ होत नाहीत? हे सर्वकाही असूनसुद्धा यांनी अल्लाहशिवाय इतर उपास्य बनविले आहेत आणि हे आशा बाळगतात की यांना मदत दिली जाईल. ते यांना कोणतीच मदत करू शकत नाहीत किंबहुना हे लोक उलट त्यांच्यासाठी खडे लष्कर बनलेले आहेत. बरे ज्या गोष्टी हे रचत आहेत त्यांनी तुम्हाला दु:खी बनवू नये. यांच्या अंतर्बाह्य गोष्टींना आम्ही जाणतो. (७१-७६)

काय मनुष्य पाहात नाही की आम्ही त्याला वीर्यापासून निर्माण केले आणि मग तो भांडखोर बनून उभा ठाकला? आता तो आम्हावर दृष्टांत लावीत आहे आणि आपल्या निर्मितीस विसरत आहे. सांगतो, ''कोण या हाडांना जिवंत करील जेव्हा ती जीर्ण झाली असतील?'' त्याला सांगा, यांना तोच जिवंत करील ज्याने यांना पूर्वी निर्मिले होते आणि तो निर्मितीचे प्रत्येक कार्य जाणतो. तोच ज्याने तुम्हांकरिता हिरव्यागार झाडापासून अग्नी उत्पन्न केला आणि तुम्ही त्यापासून आपल्या चुली प्रज्वलित करता. काय तो, ज्याने आकाश आणि पृथ्वी निर्माण केले; यावर प्रभुत्व राखत नाही की यासारख्यांना निर्माण करू शकेल? का नाही, ज्याअर्थी तो निर्मितीत निष्णात आहे. तो तर जेव्हा एखाद्या वस्तूचा संकल्प करतो तेव्हा त्याचे काम फक्त एवढेच की तिला आज्ञा द्यावी की अस्तित्व धारण कर, आणि ती अस्तित्वात येते. पवित्र आहे तो ज्याच्या हाती प्रत्येक वस्तूचे संपूर्ण अधिपत्य आहे, आणि त्याच्याकडेच तुम्ही रुजू केले जाणार आहात. (७७-८३)

# ३७ सूरह अस्साऽऽफ्फात

*(मक्काकालीन, वचने १८२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

रांगारांगांनी कतारबद्ध होणाऱ्यांची शपथ, मग त्यांची शपथ जे दमदाटी करणारे आहेत, मग त्यांची शपथ जे उपदेश-वचन ऐकविणारे आहेत,[१] तुमचा खरा ईश्वर फक्त एकच आहे, तो जो पृथ्वी आणि आकाशांचा आणि त्या सर्व वस्तूंचा मालक आहे ज्या पृथ्वी आणि आकाशांत आहेत, आणि सर्व पूर्वांचा मालक.[२] (१-५)

आम्ही अनंत आकाशाला[३] नक्षत्रांच्या शृंगाराने सुशोभित केले आहे आणि प्रत्येक शिरजोर शैतानापासून त्याला सुरक्षित केलेले आहे. हे शैतान दूतलोकीच्या[४] गोष्टी ऐकू शकत नाहीत, सर्व बाजूंनी मारले आणि पिटाळले जातात व त्यांच्यासाठी निरंतर प्रकोप आहे. तथापि जर त्यांच्यापैकी एखाद्याने काही हेरलेच तर एक प्रखर ज्वाला त्याचा पाठलाग करते. (६-१०)

आता यांना विचारा, यांची निर्मिती अधिक कठीण आहे अथवा त्या वस्तूंची ज्या आम्ही निर्माण करून ठेवल्या आहेत? यांना तर आम्ही चिवट मातीपासून निर्माण केले आहे. तुम्ही अल्लाहच्या सामर्थ्याच्या चमत्कारावर चकित आहात आणि हे त्याचा उपहास करीत आहेत. समजावून दिले जाते तर समजून घेत नाहीत. एखादा संकेत पाहिला तर त्याचा उपहास करतात आणि म्हणतात, ''ही तर उघड जादू आहे, बरे असे कधी होऊ शकते काय की मृत्यूनंतर आमची माती होऊन (केवळ) हाडांचा सांगाडा उरत असेल, तद्नंतर आम्हाला पुनरुज्जीवित केले जाईल? आणि आमच्या पूर्वजांचे (सुद्धा) पुनरुत्थान

१) बव्हंशी भाष्यकारांचे या गोष्टीवर एकमत आहे की या तिन्ही समूहांनी अभिप्रेत ईशदूतांचे समूह आहेत जे सर्वोच्च अल्लाहची आज्ञा पाळण्यास सदैव तत्पर असतात. त्याची अवज्ञा करणाऱ्यांना दमदाटी करतात आणि निरनिराळ्या पद्धतीने अल्लाहची आठवण करून देतात व उपदेशपर वाणी ऐकवितात.

२) सूर्य नेहमी एकाच ठिकाणाहून निघतो असे नाही तर प्रत्येक दिवशी एक नवीन कोन बदलून तो उदय पावत असतो. तसेच संपूर्ण पृथ्वीवर तो एकाच वेळी उदयास येत असतो असे नाही तर पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांवर निरनिराळ्या वेळी तो उदय पावत असतो. या कारणास्तव पूर्व ऐवजी 'पूर्वा' असा शब्द वापरलेला आहे. याच्याबरोबर 'पश्चिमांचा' उल्लेख केला गेला नाही कारण पूर्वा हा शब्द स्वत:च पश्चिमांना प्रमाणित करतो.

३) जागतिक आकाशाने अभिप्रेत जवळ असलेले आकाश होय ज्याचे निरीक्षण कोणत्याही दुर्बिणीविना आम्ही निव्वळ डोळ्यांनी करतो.

४) याच्याने अभिप्रेत वरील जगताची निर्मिती अर्थात दूत होय.



होईल.'' आता सांगा, ''होय.'' आणि तुम्ही (अल्लाहसमोर) असहाय्य असाल. (११-१८)

केवळ एकच दटावणी असेल आणि अकस्मात हे आपल्या डोळ्यांनी (ते सर्वकाही ज्याची माहिती दिली जात आहे) पहात असतील.'' त्यावेळी हे सांगतील, ''किती आमचे दुर्दैव! हा तर मोबदल्याचा दिवस आहे'' - हा तोच निर्णयाचा दिवस आहे ज्याला तुम्ही खोटे ठरवीत होता,[५] (आज्ञा होईल) ''घेरून आणा सर्व अत्याचाऱ्यांना आणि त्यांच्या साथीदारांना व त्या उपास्यांना[६] ज्यांची ते अल्लाहला सोडून भक्ती करीत होते, मग या सर्वांना नरकाचा रस्ता दाखवा. आणि थोडे थांबवा यांना, काही विचारावयाचे आहे यांना, काय झाले तुम्हाला? आता का एकमेकाला मदत करीत नाही? आज तर हे आपल्या स्वत:ला (आणि एकमेकाला) हवाली करून टाकीत आहेत!'' यानंतर हे एकमेकांकडे वळतील आणि आपापसांत तक्रार सुरू करतील. (अनुकरण करणारे आपल्या नेत्यांना) म्हणतील, ''तुम्ही आमच्याजवळ उजव्या[७] बाजूने येत होता.'' ते उत्तर देतील, ''नाही, किंबहुना तुम्ही स्वत: श्रद्धा ठेवणारे नव्हता. आमचा तुमच्यावर काही जोर नव्हता, तुम्ही स्वत:च दुर्वर्तनी होतात. सरतेशेवटी आम्ही आपल्या पालनकर्त्याच्या या फर्मानाला पात्र ठरलो की आम्ही यातनेची चव चाखणार आहोत. तेव्हा आम्ही तुम्हाला बहकाविले, आम्ही स्वत: देखील बहकलेले होतो.'' (१९-३२)

५) ही गोष्ट त्यांना श्रद्धावंतांनी म्हणावी अशीही शक्यता आहे. असेही शक्य आहे की हे दूतांचे कथन असावे. याचीही शक्यता आहे की हश्रच्या मैदानाचे एकूण वातावरणच आपल्या वर्तमानानिशी जणू असे म्हणत असावे, आणि अशीही शक्यता आहे की खुद्द त्याच लोकांची स्वत:चीच दुसरी प्रतिक्रिया असावी. म्हणजे आपल्या मनात ते स्वत:लाच संबोधन करून सांगावे की जगात आयुष्यभर तर आम्ही असे समजत राहिलो की कसल्याच निर्णयाचा दिवस यावयाचा नाही, आता आले का तुमच्यावर अरिष्ट, ज्या दिवसाला खोटे ठरवीत होता; तोच समोर आला.

६) या ठिकाणी उपास्यांनी अभिप्रेत फरिश्ते, अवलिया व प्रेषित आहेत असे नाही तर दोन प्रकारचे उपास्य आहेत. एक ते, मनुष्य आणि शैतान ज्यांची स्वत:ची इच्छा व ज्यांचे प्रयत्न असे होते की लोकांनी ईश्वराला सोडून त्यांची भक्ती करावी. दुसरे त्या मूर्ती इ. आहेत, ज्यांना जगात पूजले जात होते.

७) मूळ अरबी शब्द 'यमीन' प्रयुक्त झाला आहे. वाक्प्रचारानुसार जर याला शक्ती या अर्थाने घेतले गेले तर अर्थ असा होईल की तुम्ही आपल्या जोरावर आम्हाला पथभ्रष्टतेकडे ओढून नेलेत. जर भले व कल्याण या अर्थाने घेतले गेले तर तुम्ही हितचिंतक बनून आम्हाला फसविले असा त्याचा अर्थ होईल आणि जर 'शपथ' असा अर्थ लावला गेला तर तुम्ही शपथा घेऊन आमची खात्री पटविली होती की जे तुम्ही प्रस्तुत करीत आहात तेच सत्य आहे, असा त्याचा अर्थ होईल.

अशाप्रकारे ते सर्व त्या दिवशी प्रकोपात भागीदार असतील. आम्ही गुन्हेगारांशी असेच काही करीत असतो. हे ते लोक होते की जेव्हा यांना म्हटले जात असे, "अल्लाहशिवाय कोणी खरा उपास्य नाही." तर ते घमेंडीत येत असत आणि म्हणत असत, "आम्ही एका वेड्या कवीसाठी आमच्या उपास्यांना सोडून द्यावे?" वस्तुत: तो सत्यनिशी आला होता आणि त्याने प्रेषितांची सत्यता प्रमाणित केली होती. (आता यांना सांगितले जाईल की) तुम्ही खचितच यातनादायक शिक्षेचा आस्वाद घेणारे आहात आणि तुम्हाला जो काही बदला दिला जात आहे तो त्याच कृत्यांचा दिला जात आहे जी तुम्ही करीत होता. (३३-३९)

पण अल्लाहचे निवडक दास (या वाईट शेवटापासून) सुरक्षित असतील. त्यांच्यासाठी ज्ञात उपजीविका आहे. हरतऱ्हेचे स्वादिष्ट पदार्थ आणि ऐश्वर्यसंपन्न स्वर्गामध्ये ते सन्मानपूर्वक राहतील. तख्तांवर समोरासमोर बसतील. पेयाचे पात्र भरून भरून त्यांच्या दरम्यान फिरविले जातील. चकाकणारे पेय जे पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. त्यांच्या शरीरालाही त्यापासून काही अपाय होणार नाही व त्यांची बुद्धीदेखील भ्रष्ट होणार नाही. आणि त्यांच्यापाशी नजरा जपणाऱ्या सुंदर नेत्रांच्या स्त्रिया असतील, अशा नाजुक जणूकाही अंड्याच्या आतील पापुद्रा? (४०-४९)

मग ते एकमेकाकडे वळून हाल-अहवाल विचारतील. त्यांच्यापैकी एक म्हणेल, "जगात माझा एक सहवासी होता जो मला म्हणत असे, काय तुम्हीदेखील खरे मानणाऱ्यांपैकी आहात, काय खरोखरच जेव्हा आम्ही मरणोत्तर माती झालेले असू, आणि हाडांचा सांगाडा बनून राहू, तेव्हा आम्हाला शिक्षा व मोबदला दिला जाईल? आता काय आपण पाहू इच्छिता की ते महाशय कोठे आहेत?" असे म्हणून ज्याक्षणी तो झुकेल तेव्हा नरकात खोलवर तो त्याला दिसेल आणि त्याला संबोधून म्हणेल, "अल्लाह शपथ, तू तर माझा नाशच करून टाकणारा होतास. माझ्या पालनकर्त्याची कृपा माझ्यावर नसती तर आज मीदेखील त्या लोकांसमवेत असतो जे पकडून आणले गेले आहेत. बरे तर आता आम्ही मरणार नाही काय?[८] मृत्यू जो आम्हाला येणार होता तो केवळ पूर्वीच येऊन गेला काय? आता आम्हाला काही यातना होणार नाही ना?" (५०-५९)

खरोखर हेच वैभवसंपन्न यश आहे. अशाच यशाकरिता कर्म करणाऱ्यांनी कर्म केले पाहिजे. सांगा, हा पाहुणचार चांगला आहे की 'जक्कूम'चे झाड? आम्ही त्या झाडाला

८) वर्णनशैलीद्वारे स्पष्टपणे असे निदर्शनात येत आहे की त्या नरकवासी मित्राशी बोलता बोलता हा जन्नतवासी मनुष्य स्वत:शीच बोलू लागतो व ही वाक्ये त्याच्या तोंडातून अशातऱ्हेने निघत आहेत जणू कुणी इसम आपल्या स्वत:ला सर्व, अंदाजे व अपेक्षेपेक्षा उच्चतर स्थितीत आढळून अत्यंत आश्चर्य व हर्षभराने स्वत:शीच बोलत असावा.



अत्याचारी लोकांसाठी उपद्रव बनविलेले आहे.[९] ते एक झाड आहे जे नरकाच्या तळातून निघते. त्याच्या कळ्या अशा आहेत जणूकाही शैतानाची डोकी. नरकाचे लोक ते खातील आणि त्यानेच पोट भरतील, मग त्यावर त्यांना पिण्यासाठी उकळते पाणी मिळेल. आणि त्यानंतर त्यांची रवानगी त्याच नरकाग्नीकडे होईल. हे ते लोक होत ज्यांना आपले पूर्वज मार्गभ्रष्ट आढळले, आणि त्यांच्याच पदचिन्हांवर धावले. वस्तुस्थिती अशी होती की यांच्यापूर्वी बरेचसे लोक मार्गभ्रष्ट झालेले होते. आणि त्यांच्यामध्ये आम्ही ताकीद देणारे प्रेषित पाठविले होते. आता पहा त्या ताकीद दिलेल्या लोकांचा शेवट कसा झाला. या वाईट शेवटापासून अल्लाहचे केवळ तेच दास वाचले आहेत, ज्यांना त्याने आपल्यासाठी विशेष म्हणून ठेवले आहे. (६०-७४)

आम्हाला (या पूर्वी) नूह (अ.) ने पुकारले होते. तर पहा की आम्ही कसे छान उत्तर देणारे होतो, आम्ही त्याला व त्याच्या कुटुंबियांना भयंकर यातनेतून वाचविले, आणि त्याच्याच वंशाला बाकी ठेवले, व नंतरच्या पिढ्यात त्याची स्तुती व गुणगान राहू दिले. सलाम आहे नूह (अ.) ला सर्व जगवासियांमध्ये. आम्ही नेकी करणाऱ्यांना असाच मोबदला देत असतो. वास्तविकपणे तो आमच्या श्रद्धावंत दासांपैकी होता. मग प्रतिपक्षाला आम्ही बुडवून टाकले. (७५-८२)

आणि नूह (अ.) च्याच रीतीप्रमाणे चालणारा इब्राहीम (अ.) होता. जेव्हा तो आपल्या पालनकर्त्याच्या हुजुरांत शुद्ध मनाने आला, जेव्हा त्याने आपल्या पित्याला व आपल्या लोकसमुदायाला सांगितले, "या काय वस्तू आहेत ज्यांची तुम्ही उपासना करीत आहात? काय अल्लाहला सोडून मिथ्या उपास्य तुम्ही इच्छिता? बरे सकल जगांच्या पालनकर्त्यासंबंधी तुमची काय कल्पना आहे?" (८३-८७)

मग त्याने नक्षत्रांवर एक नजर टाकली.[१०] आणि म्हणाला, माझी तब्येत बरी नाही.[११] म्हणून ते लोक त्याला सोडून निघून गेले. त्यांच्या पाठीमागे तो गुपचूप त्यांच्या देवळात शिरला आणि म्हणाला, "आपण का खात नाही? झाले तरी काय आपण बोलतसुद्धा नाही?" त्यानंतर तो त्यांच्यावर तुटून पडला आणि उजव्या हाताने खूप

९) म्हणजे ही गोष्ट ऐकून इन्कार करणाऱ्यांना कुरआनला टोमणे देण्याची व पैगंबर (स.) यांच्या टिंगल टवाळीची एक नवीन संधी सापडते. त्यावर अट्टहास करून म्हणतात, घ्या आता नवीनच ऐका, नरकाच्या धगधगत्या अग्नीतून झाड उगवणार.

१०) अरबी भाषेत हे शब्द वाक्प्रचार म्हणून बोलले जातात की त्याने विचार केला अथवा तो इसम विचार करू लागला.

११) कुठल्याही माध्यमाद्वारे आम्हाला याची माहिती नाही की त्यावेळी हजरत इब्राहीम (अ.) याना कोणत्याही प्रकारचा त्रास होत नव्हता. म्हणून हजरत इब्राहीम (अ.) यांनी वस्तुस्थितीच्या उलट असा बहाणा केला होता असे म्हटले जाऊ शकत नाही.

आघात केले. (परत येऊन) ते लोक धावत धावत त्याच्याजवळ आले. त्याने सांगितले, ''तुम्ही स्वत:च घडविलेल्या वस्तूंना पूजता काय? वास्तविकपणे अल्लाहनेच तुम्हालाही निर्माण केले आहे आणि या वस्तूंनादेखील ज्या तुम्ही बनविता.'' त्यांनी आपापसात सांगितले, ''याच्यासाठी एक अग्नीखाई तयार करा आणि याला धगधगत्या आगीच्या ढिगाऱ्यात फेकून द्या.'' त्यांनी त्याच्याविरूद्ध एक कार्यवाही करू इच्छिली होती, परंतु आम्ही त्यांचेच पतन केले. (८८-९८)

इब्राहीम (अ.) ने सांगितले, ''मी आपल्या पालनकर्त्याकडे जात[१२] आहे, तोच माझे मार्गदर्शन करील. हे पालनकर्त्या, मला एक पुत्र प्रदान कर जो सदाचाऱ्यांपैकी असेल.'' (या प्रार्थनेच्या उत्तरात) आम्ही त्याला एक सहनशील पुत्राची शुभवार्ता दिली.[१३] तो मुलगा जेव्हा त्याच्यासमोर धावपळ करण्याच्या वयात आला तेव्हा (एके दिवशी) इब्राहीम (अ.) ने त्याला सांगितले, ''हे माझ्या मुला, मी स्वप्नांत पाहतो की मी तुला बळी देत आहे, आता तू सांग तुझा काय विचार आहे?'' त्याने सांगितले, ''हे पित्या, जी काही आज्ञा आपणास दिली जात आहे तसेच करा, अल्लाहने इच्छिले तर आपणास मी धैर्यशील आढळेन.'' सरतेशेवटी जेव्हा या दोघांनी आज्ञापालनात मान तुकविली आणि इब्राहीम (अ.) ने पुत्राला पालथे केले, आणि आम्ही पुकारले, ''हे इब्राहीम, तू स्वप्न साकार केलेस.[१४] आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना असाच मोबदला देत असतो. निश्चितच ही एक उघड परीक्षा होती.'' आम्ही एक मोठे बलिदान[१५] प्रतिदानात देऊन त्या मुलाची सुटका केली. आणि त्याची प्रशंसा व गुणगान भावी पिढ्यांत सदैव ठेवले. सलाम आहे इब्राहीम (अ.) वर. आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना असाच मोबदला देत असतो. निश्चितच तो आमच्या श्रद्धावंत दासांपैकी होता. आणि आम्ही त्याला इसहाक (अ.) ची शुभवार्ता

**१२)** म्हणजे आपल्या पालनकर्त्यासाठी घर आणि स्वदेश त्याग करीत आहे.

**१३)** अभिप्रेत आहेत हजरत इस्माईल (अ.)

**१४)** जबह करून टाकले आहे. स्वप्नात असे दाखविलेले नसून, जबह करीत आहे केवळ इतकेच दाखविल्या असल्याकारणाने जेव्हा हजरत इब्राहीम (अ.) यांनी जबह करण्याची तयारी पूर्ण केली तेव्हा फर्माविले की तू आपले स्वप्न साकार करून दाखविलेस.

**१५)** 'मोठ्या बलिदाना'ने अभिप्रेत एक मेंढा आहे ज्याला त्यावेळी सर्वोच्च अल्लाहच्या दूताने हजरत इब्राहीम (अ.) यांच्यासमोर हजर केले जेणेकरून मुलाच्या बदल्यात त्याचा बळी द्यावा. याला मोठी कुर्बानी म्हणून याकरिता संबोधिले आहे की तो हजरत इब्राहीम (अ.) यांच्यासारख्या एकनिष्ठ दासासाठी इब्राहीम पुत्र इस्माईल (अ.) सारख्या सहिष्णू व प्राणार्पण करणाऱ्या मुलाचा फिदिया-बदल होता. याशिवाय त्याला 'मोठे बलिदान' ठरविण्याचे एक कारण असेदेखील आहे की प्रलयापर्यंत सर्वोच्च अल्लाहने असा पायंडा घालून दिला की त्याच तारखेला सर्व श्रद्धावंतांनी जगभरात जनावरे बळी द्यावेत आणि एकनिष्ठता व प्राणार्पणाच्या या वैभवशाली घटनेच्या आठवणींची उजळणी करावी.



दिली,[१६] सदाचारींपैकी एक पैगंबर. आणि त्याला व इसहाक (अ.) ला समृद्धी दिली. आता त्या दोघांच्या वंशापैकी कोणी परोपकारी आहे तर कोणी आपल्या स्वत:वर स्पष्ट अत्याचार करणारा आहे. (९९-११३)

आणि आम्ही मूसा (अ.) व हारून (अ.) यांच्यावर उपकार केले. त्यांना व त्यांच्या लोकसमूहाला मोठ्या यातनेतून मुक्त केले. त्यांना सहाय्य प्रदान केले की ज्यामुळे तेच विजयी ठरले, त्यांना अगदी स्पष्ट ग्रंथ प्रदान केले, त्यांना सन्मार्ग दाखविला, आणि नंतरच्या पिढ्यांत त्यांचे इष्ट स्मरण बाकी ठेवले. सलाम आहे मूसा (अ.) व हारून (अ.) वर. आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना असाच मोबदला देत असतो, वास्तविकत: ते आमच्या 'मुअ्मिन' (श्रद्धावंत) दासांपैकी होते. (११४-१२२)

आणि इलियास (अ.) देखील निश्चितच प्रेषितांपैकी होता. स्मरण करा जेव्हा त्याने आपल्या लोकसमूहाला सांगितले होते, ''तुम्ही भीत नाही का? काय तुम्ही 'बअ्ल' (सामी जमातीचा तथाकथित उपास्य) चा धावा करता. आणि जो तुमच्या पूर्वजांचा व भावी पिढ्यांचा पालनकर्ता आहे त्या सर्वोत्तम निर्माणकर्त्या अल्लाहला सोडून देता?'' परंतु त्यांनी त्याला खोटे ठरविले, म्हणून आता ते निश्चितच शिक्षेसाठी हजर केले जाणार आहेत, अल्लाहच्या त्या दासांखेरीज ज्यांना विशेष राखले गेले होते. आणि इलियास (अ.) चे सुस्मरण आम्ही नंतरच्या पिढ्यांत बाकी ठेवले. सलाम आहे इलियास (अ.) वर. आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना असाच मोबदला देत असतो. खरोखरच तो आमच्या श्रद्धावंत दासांपैकी होता. (१२३-१३२)

आणि लूत (अ.) ही त्याच लोकांपैकी होता ज्यांना प्रेषित म्हणून पाठविले गेले आहे. स्मरण करा जेव्हा आम्ही त्याची व त्याच्या सर्व कुटुंबियांची सुटका केली, एका वृद्धेखेरीज जी पाठीमागे राहणाऱ्यांपैकी होती. मग उरलेल्या सर्वांना आम्ही उद्‌ध्वस्त करून टाकले. आज तुम्ही रात्रंदिवस त्यांच्या उद्‌ध्वस्त अवशेषांवरून जात असता, काय तुम्हाला सुबुद्धी येत नाही? (१३३-१३८)

आणि खचितच यूनुस (अ.) सुद्धा प्रेषितांपैकी होता. स्मरण करा जेव्हा त्याने एका भरलेल्या जहाजाकडे पळ काढला, मग फासे टाकण्यात सामील झाला आणि त्यात मात

**१६)** म्हणजे बलिदानाच्या सदरहू घटनेनंतर हजरत इसहाक (अ.) यांच्या जन्माची खुषखबर दिली.

खाल्ली. सरतेशेवटी माशाने त्याला गिळंकृत केले आणि तो निर्भर्त्सित होता.[१७] आता जर तो पावित्र्यगान करणाऱ्यांपैकी नसता तर पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत तो माशाच्या पोटांतच राहिला असता.[१८] सरतेशेवटी आम्ही त्याला अत्यंत दुर्दशेत एका खडकाळ जमिनीवर फेकून दिले आणि त्यावर एक वृक्षलता उगविली. यानंतर आम्ही त्याला एक लक्ष अथवा त्यापेक्षा जास्त लोकांकडे[१९] पाठविले. त्यांनी श्रद्धा ठेवली आणि आम्ही एका विशिष्ट वेळेपर्यंत त्यांना राहू दिले. (१३९-१४८)

मग जरा या लोकांना विचारा, काय (यांच्या मनाला ही गोष्ट पटते) की तुमच्या पालनकर्त्यासाठी तर असाव्यात मुली आणि यांच्यासाठी असावीत मुले? काय खरोखरच आम्ही दूतांना स्त्रियाच बनविले आहे आणि हे 'आंखो देखी' गोष्ट सांगत आहेत? चांगले ऐकून घ्या, वास्तविकपणे हे लोक आपल्या मनाने ही गोष्ट म्हणत आहेत की अल्लाह संतती बाळगतो आणि प्रत्यक्षात हे खोटारडे आहेत. काय अल्लाहने पुत्राऐवजी मुली आपल्यासाठी पसंत केल्या? तुम्हाला झाले तरी काय, कसले निर्णय लावता? काय तुम्ही शुद्धीवर येत नाही? अथवा तुमच्याजवळ आपल्या या गोष्टीसंबंधी एखादे स्पष्ट प्रमाण असेल तर आणा तो आपला ग्रंथ जर तुम्ही खरे असाल. (१४९-१५७)

यांनी अल्लाह आणि दूतांच्या[२०] दरम्यान वंश-संबंध जोडलेले आहे. वास्तविकत: दूत चांगल्याप्रकारे जाणतात की हे लोक अपराधी म्हणून हजर होणार आहेत. (आणि ते

**१७)** सदरहू वाक्यावर विचार केल्यानंतर जी वस्तुस्थिती लक्षात येते ती अशी : (१) हजरत यूनुस (अ.) ज्या नावेत स्वार झाले होते, ती आपल्या क्षमतेपेक्षा जास्त भरलेली होती. (२) फासे नावेतच टाकले गेले, आणि बहुधा त्यावेळी टाकले गेले जेव्हा समुद्रप्रवासाच्या वेळी भार जास्त झाला असल्याकारणाने सर्वच प्रवाशांचे प्राण धोक्यात आले असल्याचे वाटू लागले. म्हणून फासे या हेतूने टाकले गेले की ज्याच्या नावाने ते निघतील त्याला पाण्यात टाकले जावे. (३) फासे टाकण्यात हजरत यूनुस (अ.) यांचेच नाव निघाले म्हणून त्याना समुद्रात फेकले गेले व एका माशाने त्यांना गिळून टाकले. (४) या परीक्षेत हजरत यूनुस (अ.) अशासाठी सापडले की ते आपला स्वामी (सर्वोच्च अल्लाह) च्या परवानगीविनाच आपल्या नियुक्तीच्या जागेतून फरार झाले होते. हाच अर्थ अरबी शब्द 'अबक' प्रमाणित करतो, कारण अरबी भाषेत पळून जाणाऱ्या दासासाठी तो वापरला जातो.

**१८)** म्हणजे प्रलयापर्यंत माशाचे पोट हजरत यूनुस (अ.) यांची कबर बनून राहिले असते.

**१९)** 'एक लक्ष किंवा त्यापेक्षा जास्त' म्हणण्याचा अर्थ सर्वोच्च अल्लाहला त्याच्या लोकसंख्येत शंका होती असे मुळीच नाही तर जर एखाद्याने त्या वस्तीला पाहिले असते तर त्याने असाच अंदाज केला असता की या शहराची लोकवस्ती एक लाखापेक्षा जास्तच असेल, कमी असणार नाही, असा अर्थ आहे.

**२०)** जरी जिन्न असा शब्द प्रयुक्त झाला आहे तरी नंतरच्या वर्णनाने हे स्पष्ट होते की दूत अभिप्रेत आहेत. जिन्नचा शाब्दिक अर्थ गुप्त निर्मिती असा होतो.



म्हणतात की,) ''अल्लाह त्या गुणांपासून मुक्त आहे जे त्याच्या निर्मळ दासांखेरीज इतर लोक त्याच्याशी जोडतात. तर तुम्ही आणि तुमचे हे उपास्य अल्लाहपासून कोणालाही भरकटवू शकत नाहीत परंतु केवळ त्याला जो नरकाच्या भडकणाऱ्या आगीत होरपळणार असेल. आणि आमची स्थिती तर अशी आहे की आमच्यापैकी प्रत्येकाचे एक स्थान निश्चित आहे, आणि आम्ही पंक्तीबद्ध सेवक आहोत आणि पावित्र्यगान करणारे आहेत.''

(१५८-१६६)

हे लोक पूर्वी तर सांगत असत, आमच्यापाशी ते 'स्मरण' असते जे पूर्वीच्या लोकांना मिळाले होते, तर आम्ही अल्लाहचे निवडक दास असतो. परंतु (जेव्हा ते आले) तेव्हा यांनी त्याचा इन्कार केला, आता लवकरच यांना (या वर्तनाची परिणती) माहीत होईल. आपल्या पाठविलेल्या दासांना आम्ही पूर्वीच वचन दिले आहे, की निश्चितच त्यांना मदत दिली जाईल. आणि आमचेच सैन्य विजयी ठरेल. तर हे पैगंबर (स.)! यांना जरा काही अवधीकरीता यांच्या स्थितीवर सोडून द्या. आणि पहा, लवकरच हे स्वत: देखील पाहतील. काय हे आमच्या प्रकोपासाठी घाई करीत आहेत? जेव्हा तो यांच्या प्रांगणांत कोसळेल तेव्हा तो दिवस अशा लोकांकरिता फारच वाईट असेल ज्यांना ताकीद दिलेली आहे तर जरा यांना काही अवधीसाठी सोडून द्या. आणि पहा, लवकरच हे स्वत:देखील पाहतील. (१६७-१७९)

पवित्र आहे तुझा पालनकर्ता, गौरवाचा स्वामी, त्या सर्व गोष्टींपासून ज्या हे लोक बनवीत आहेत. आणि सलाम आहे प्रेषितांवर, आणि सर्व स्तुती सकल जगांच्या पालनकर्त्या अल्लाहकरिताच आहे. (१८०-१८२)

# ३८ सूरह सॉऽऽद

*(मक्काकालीन, वचने ८८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

सॉऽऽद, शपथ आहे उपदेशपूर्ण कुरआनची, किंबहुना हेच लोक, ज्यांनी मानण्यास नकार दिला आहे अत्यंत अहंकार व हट्टात गुरफटलेले आहेत[१] यांच्यापूर्वी आम्ही अशा कित्येक जनसमूहांना नष्ट करून टाकले आहे (आणि जेव्हा त्यांच्यावर अरिष्ट आले आहे) तेव्हा ते आक्रोश करून उठले आहेत, परंतु ही बचावाची वेळ नाही. (१-३)

या लोकांना या गोष्टीचे मोठे आश्चर्य वाटते की एक भय दाखविणारा खुद्द यांच्यातूनच आला, इन्कार करणारे म्हणू लागले की, ''हा जादूगार आहे, अत्यंत खोटा आहे, याने साऱ्या ईश्वरांऐवजी केवळ एकच ईश्वर बनविला काय? ही तर फार आश्चर्यकारक गोष्ट आहे.'' आणि जनसमूहाचे सरदार असे म्हणून निघून गेले की, ''चला आणि दृढ रहा आपल्या उपास्यांच्या उपासनेवर, ही गोष्ट तर काही वेगळ्याच हेतूने म्हटली जात आहे,[२] ही गोष्ट आम्ही निकटवर्ती काळातील धर्मसमुदायांपैकी कोणाकडूनही ऐकली नाही, ही इतर काहीच नाही परंतु एक कपोलकल्पित गोष्ट. काय आमच्या दरम्यान केवळ हाच एक मनुष्य उरला होता ज्याच्यावर अल्लाहचे स्मरण अवतरले गेले?'' (४-८-)

खरी गोष्ट अशी आहे की हे माझ्या 'स्मरण'वर शंका घेत[३] आहेत. आणि या साऱ्या गोष्टी अशासाठी करीत आहेत की यांनी माझ्या प्रकोपाचा आस्वाद घेतलेला नाही. काय तुझ्या प्रभुत्वसंपन्न आणि दात्या पालनकर्त्याच्या कृपेचे खजिने यांच्या ताब्यात आहेत? काय हे आकाश व पृथ्वी आणि त्याच्या दरम्यानातील वस्तूंचे मालक आहेत? तर यांना त्यांच्या सर्व साधनांनिशी प्रयत्न करू दे! (-८-१०)

१) म्हणजे या इन्कार करणाऱ्यांच्या इन्काराचे कारण जो धर्म त्यांच्यासमोर प्रस्तुत केला जात आहे त्यात काही विकृती आहे असे नाही तर यांची खोटी बढाई, यांचा अज्ञानपर अहंकार आणि यांचा हट्टीपणा केवळ हेच त्याचे कारण आहे.

२) त्यांच्या म्हणण्याचा अर्थ असा होता की याच्यात काही काळेबेरे दिसते, खरे पाहता हे आमंत्रण या हेतूपोटी दिले जात आहे की आम्ही सर्व मुहम्मद (स.) च्या आज्ञांकित बनावे आणि याने आम्हावर आपला हुकूम चालवावा.

३) दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर सर्वोच्च अल्लाह फर्मावितो की हे मुहम्मद (स.), हे लोक वास्तविकपणे तुम्हाला खोटे ठरवीत नाहीत तर मला खोटे ठरवीत आहेत. यांना शंका तुमच्या सत्यतेवर नव्हे तर माझ्या शिकवणीवर आहे.



हा तर जथ्थ्यांपैकी एक लहानसा जथ्था आहे जो याच ठिकाणी पराभूत होणार आहे.[४] यांच्यापूर्वी नूह (अ.) चा जनसमूह, आणि 'आद' आणि मेखावाला 'फिरऔन' आणि 'समूद', व 'लूत' (अ.) चा जनसमूह, आणि 'ऐकावाले' यांनी खोटे ठरविले आहे. जथ्थे ते होते. त्यांच्यापैकी प्रत्येकाने प्रेषितांना खोटे ठरविले आणि माझ्या प्रकोपाचा निर्णय त्याच्यावर लागू झाल्याविना राहिला नाही. हे लोकसुद्धा केवळ एका विस्फोटाच्या प्रतीक्षेत आहेत ज्यानंतर कोणताही दुसरा विस्फोट होणार नाही, आणि हे म्हणतात की हे आमच्या पालनकर्त्या, हिशेबाच्या दिवसापूर्वीच आमचा हिस्सा आम्हाला लवकर देऊन टाक. (११-१६)

हे पैगंबर (स.), संयम राखा त्या गोष्टींसाठी ज्या हे लोक रचीत आहेत, आणि यांच्यासमोर आमचे दास दाऊद (अ.) यांचा किस्सा सांगा, जो प्रचंड शक्तींचा मालक होता. प्रत्येक बाबतीत अल्लाहकडे धाव घेणारा होता. आम्ही पर्वतांना त्याच्या अधीन करून ठेवले होते की सकाळ-संध्याकाळ ते त्याच्यासमवेत पावित्र्यगान करीत असत. पक्षी एकत्र येत असत, सर्वच्या सर्व त्याच्या पावित्र्यगानाकडे लक्ष केंद्रित करीत असत. आम्ही त्याचे राज्य बळकट केले होते, त्याला प्रबोध प्रदान केला होता आणि निर्णायक गोष्ट सांगण्याची क्षमता प्रदान केली होती. मग तुम्हाला काही वार्ता पोहचली आहे त्या वादी-प्रतिवादींची जे भिंत चढून आत शिरले होते? जेव्हा ते दाऊद (अ.) जवळ पोहचले होते तेव्हा तो त्यांना पाहून घाबरला. त्यांनी सांगितले, ''भिऊ नका, आम्ही दोघे खटल्यातील पक्षकार आहोत ज्यांच्यापैकी एकाने दुसऱ्याची आगळीक केली आहे. आता आमच्या दरम्यान ठीकठीक सत्यानिशी निवाडा करा, अन्याय करू नका आणि आम्हाला सरळमार्ग दाखवा. हा माझा भाऊ आहे, याच्याजवळ नव्याण्णव मेंढ्या आहेत आणि माझ्याजवळ केवळ एकच मेंढी आहे. याने मला सांगितले की ही एक मेंढीसुद्धा माझ्या हवाली कर आणि याने बोलाचालीत माझ्यावर दडपण आणले.''[५] दाऊद (अ.) ने उत्तर दिले, ''या व्यक्तीने आपल्या मेंढ्यासमवेत तुझी मेंढी सामील करण्याची मागणी करून निश्चितच तुझ्यावर अत्याचार केला, आणि वस्तुस्थिती तर अशी आहे की मिळून मिसळून एकत्र राहणारे लोक बहुधा एक दुसऱ्याची आगळीक करीत असतात, केवळ तेच लोक यापासून

४) 'याच ठिकाणी'चा संकेत मक्का शहराकडे आहे. म्हणजे ज्या ठिकाणी हे लोक या बाता मारीत आहेत, याच जागी एके दिवशी हे पराभूत होणार आहेत आणि याच जागी ती वेळ येणार आहे जेव्हा हे तोंड वासून त्याच माणसापुढे उभे असतील ज्याला आज हे तुच्छ मानून, प्रेषित म्हणून मान्य करण्यास नकार देत आहेत.

५) वादीने असे म्हटले नाही की माझी मेंढी हिसकावून घेतली तर माझ्या मेंढीची देखील माझ्याकडे मागणी केली आणि ती मी त्याच्या स्वाधीन करावी असे इच्छिले. हा भारदस्त माणूस असल्याकारणाने माझ्यावर याचे दडपण येत आहे असे सांगितले.

वाचलेले आहेत जे श्रद्धावंत आहेत व सत्कर्म करतात, आणि असे लोक कमीच आहेत.'' (ही गोष्ट सांगता सांगता) दाऊद (अ.) ला कळून चुकले की ही तर आम्ही वास्तविक्त: त्याची परीक्षा घेतली आहे, म्हणून त्याने आपल्या पालनकर्त्याकडे क्षमायाचना केली[६] आणि नतमस्तक झाला आणि रुजू झाला. तेव्हा आम्ही त्याची ती चूक माफ केली आणि निश्चितच आमच्यापाशी त्याच्यासाठी निकटवर्ती स्थान आणि अधिक चांगला शेवट आहे. (आम्ही त्याला सांगितले) ''हे दाऊद, आम्ही तुला पृथ्वीवर खलीफा (ईश्वराचा उत्तराधिकारी) बनविले आहे, म्हणून तू लोकांदरम्यान सत्यानिशी राज्य कर आणि मनोवासनेच्या आहारी जाऊ नकोस. ती तुला अल्लाहच्या मार्गापासून दूर करील. जे लोक अल्लाहच्या मार्गापासून भटकतात. निश्चितच त्यांच्याकरिता कठोर शिक्षा आहे कारण हिशोबाचा दिवस ते विसरून गेले.'' (१७-२६)

आम्ही या आकाशाला व पृथ्वीला आणि या जगाला जे त्याच्या दरम्यान आहे व्यर्थ निर्माण केले नाही. ही तर त्या लोकांची कल्पना आहे ज्यांनी द्रोह केला आहे, आणि अशा अश्रद्धावंतांचा सर्वनाश आहे नरकाच्या अग्नीद्वारे. काय आम्ही अशा लोकांना जे श्रद्धा ठेवतात व सत्कृत्ये करतात आणि त्या लोकांना जे पृथ्वीवर उपद्रव माजविणारे आहेत, एकसमान करावे? काय ईशपरायणांना दुराचाऱ्यांप्रमाणे करावे? हा एक मोठा समृद्धशाली ग्रंथ आहे जो (हे पैगंबर (स.)) आम्ही तुमच्याकडे अवतरित केला आहे, जेणेकरून या लोकांनी त्याच्या वचनांवर विचार करावा आणि बुद्धी व विवेक राखणाऱ्यांनी यापासून बोध घ्यावा. (२७-२९)

आणि दाऊद (अ.) ला आम्ही सुलैमान (अ.) सारखा पुत्र प्रदान केला, उत्तम दास, मोठ्या प्रमाणात आपल्या पालनकर्त्याकडे रुजू होणारा. उल्लेखनीय आहे तो प्रसंग जेव्हा संध्याकाळच्या वेळी त्याच्यासमोर खूप प्रशिक्षित घोडे सादर केले गेले. तेव्हा तो म्हणाला, ''मी या मालाचे प्रेम आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणामुळे स्वीकारले आहे.'' येथपावेतो जेव्हा ते घोडे दृष्टिआड झाले तेव्हा (त्याने आज्ञा दिली की) त्यांना माझ्याकडे परत आणा. मग लागला त्यांच्या पायावर व मानेवर हात फिरवायला. आणि (पहा की) सुलैमान (अ.) लाही आम्ही कसोटीला लावले आणि त्याच्या खुर्चीवर एक देह आणून

६) यावरून असे कळले की हजरत दाऊद (अ.) यांच्या हातून जरूर काही चूक झाली होती व ती चूक काही अशा स्वरूपाची होती की तिचे मेंढी बाबतच्या खटल्याशी काही सादृश्य होते, म्हणूनच त्याचा निवाडा करताना अकस्मात त्यांच्या लक्षात आले की ही माझी परीक्षा घेतली जात आहे, परंतु त्या चुकीचे स्वरूप असे भयंकर नव्हते की ती माफ केली गेली नसती अथवा माफ केली गेली असती तरी त्यांना आपल्या उच्च स्थानापासून खाली आणले गेले असते. सर्वोच्च अल्लाह याठिकाणी स्वत:च स्पष्ट करत आहे की जेव्हा त्यांनी नतमस्तक होऊन माफी मागितली तेव्हा त्यांना केवळ माफच केले गेले असे नाही तर जगात व परलोकात त्यांचे जे उच्चस्थान होते, त्यातही काही फरक पडला नाही.



टाकला. मग त्याने रुजू केले. आणि म्हटले की, ''हे माझ्या पालनकर्त्या, मला क्षमा कर आणि मला ते राज्य प्रदान कर जे माझ्यानंतर कोणासाठीही पात्र ठरू नये, नि:संदेह तूच खरा दाता आहेस.''[७] तेव्हा आम्ही त्याच्यासाठी वाऱ्याला अधीन केले जो त्याच्या आज्ञेने नरमाईने तो इच्छिल तिकडे प्रवाहित होत असे. आणि शैतानांना अधीन केले, हर प्रकारचे गवंडी आणि पाणबुडे. आणि अन्य जे साखळ्याने जखडलेले होते. (आम्ही त्याला सांगितले) ''हे आमचे बक्षीस आहे. तुला हा अधिकार आहे की तू ज्याला हवे त्याला द्यावे व हवे त्यापासून रोखून धरावे, काही हिशेब नाही.'' निश्चितच त्याच्यासाठी आमच्याजवळ निकटवर्ती स्थान व अधिक चांगला शेवट आहे. (३०-४०)

आणि आमचा दास अय्यूब (अ.) ची आठवण करा जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याला पुकारले की शैतानाने मला त्रास आणि यातनेत टाकले आहे.[८] (आम्ही त्याला आज्ञा दिली) आपला पाय जमिनीवर आदळ, हे आहे शीतल जल स्नानासाठी व पिण्याकरिता. आम्ही त्याला त्याचे कुटुंब परत दिले आणि त्यांच्याबरोबर तितकेच अन्य आपल्याकडून कृपा म्हणून, आणि बुद्धी व विवेक बाळगणाऱ्यांसाठी बोध म्हणून, (आणि

७) वक्तव्यक्रमानुसार स्पष्टपणे असे कळते की या ठिकाणी, सर्वोच्च अल्लाहने हजरत दाऊद (अ.) व हजरत सुलैमान (अ.) यासारख्या उच्च दर्जाचे प्रेषित आणि आपल्या प्रिय दासांनादेखील जाब विचारल्याविना सोडले नाही, हे दाखविण्याचा हेतू आहे. ज्या परीक्षेचा याठिकाणी उल्लेख आहे, भाष्यकारांचे ज्यावर एकमत असावे असा कोणताही खात्रीलायक तपशील आमच्या माहितीत नाही. परंतु हजरत सुलैमान (अ.) यांच्या प्रार्थनेचे हे शब्द ''हे माझ्या पालनकर्त्या! मला माफ कर व मला असे अधिपत्य बहाल कर जे माझ्यानंतर कुणालाच प्राप्त ठरू नये,'' जर बनीइस्राईलीच्या इतिहासाच्या प्रकाशात वाचले गेले तर सकृतदर्शनी असे वाटते की, त्यांच्यानंतर त्यांचा पुत्र त्यांचा उत्तराधिकारी व्हावा आणि राज्य व सत्ताधिकार पुढे त्यांच्याच वंशात राहावेत, बहुधा अशी त्यांची इच्छा होती. याच गोष्टीला सर्वोच्च अल्लाहने त्यांच्या बाबतीत उपद्रव म्हणून ठरविले. या गोष्टीसंबंधी ते सावध त्यावेळी झाले जेव्हा त्यांचा राजपुत्र 'रुजआम' हा असला नालायक तरुण निघाला ज्याचे अवगुण स्पष्टपणे निर्देश करीत होते की तो दाऊद आणि सुलैमान (अ.) यांचे राज्य चार दिवसदेखील सांभाळू शकणार नाही. त्यांच्या आसनावर एक देह आणून टाकण्याचा अर्थ बहुधा असाच आहे की ज्या पुत्राला ते आपल्या आसनावर आणू इच्छित होते, तो एक गोबरगणेश होता.

८) याचा अर्थ असा नाही की शैतानाने मला आजारी पाडले आहे व माझ्यावर संकटे आणली आहेत तर याचा खरा अर्थ असा की आजाराची तीव्रता, मालमत्तेची हानी आणि आप्तेष्ट व नातेवाईकांच्या तोंड फिरविण्यामुळे मी ज्या संकटात व यातनेत गुरफटलो आहे, त्याहूनही जास्त त्रास व यातना मला या गोष्टीने होत आहे की शैतान मला आपल्या विकृत विचारांनी छळत आहे. तो अशा स्थितीत मला आपल्या पालनकर्त्याकडून निराश करण्याचा प्रयत्न करतो, मला आपल्या पालनकर्त्याचा कृतघ्न बनवू पाहतो आणि संयमाची कास माझ्या हातून सुटावी अशा प्रयत्नात तो आहे.

आम्ही त्याला सांगितले) मूठभर गवत घे आणि त्याने मार, आपली शपथ मोडू नकोस[१] आम्हाला तो सहनशील आढळला, उत्तम दास, आपल्या पालनकर्त्याकडे फार रुजू होणारा. (४१-४४)

आणि आमचे दास इब्राहीम (अ.), इसहाक (अ.) व याकूब (अ.) यांचे वर्णन करा, प्रचंड कार्यशक्ती बाळगणारे आणि द्रष्टे लोक होते. आम्ही त्यांना निव्वळ एका गुणवैशिष्ट्याच्या आधारावर निवडले होते आणि ते परलोकाच्या घराचे स्मरण करणारे होते. निश्चितच आमच्या येथे त्यांची गणना निवडलेल्या पुण्यशील लोकांत आहे. आणि इस्माईल (अ.) व अलयसअ (अ.) आणि जुलकिफ्ल (अ.) चे वर्णन करा, हे सर्व पुण्यशील लोकांपैकी होते. (४५-४८)

ही एक आठवण होती. (आता ऐका की) ईशपरायणांसाठी निश्चितच उत्तम ठिकाण आहे, सदैव राहणाऱ्या स्वर्गात ज्यांची द्वारे त्यांच्यासाठी खुली असतील. त्यात ते लोड लावून बसले असतील, खूप खूप मेवे व पेये मागवीत असतील, आणि त्याच्याजवळ लाजऱ्या समवयस्क पत्नीं असतील. या त्या गोष्टी होत ज्या हिशेबाच्या दिवशी प्रदान करण्याचे तुम्हाला वचन दिले जात आहे. ही आमची सामग्री आहे जी कधीही संपणार नाही. (४९-५४)

हा तर आहे ईशपरायणांचा शेवट आणि दुराचाऱ्यांसाठी अत्यंत वाईट ठिकाण आहे, नरक ज्यात ते होरपळले जातील, फारच वाईट ठिकाण. हे आहे त्यांच्यासाठी, बस्स त्यांनी चव घ्यावी उकळते पाणी आणि पू, रक्त व अशाच प्रकारच्या कटुतेची. (ते नरकाकडे आपल्या अनुयायांना येताना पाहून आपापसांत म्हणतील) ''ही एक फौज तुमच्याकडे घुसून येत आहे, कोणतेही स्वागत यांच्यासाठी नाही, हे आगीत होरपळणारे आहेत.'' ते त्यांना उत्तर देतील, ''नाही, किंबहुना तुम्हीच होरपळले जात आहात, कोणतेही स्वागत तुमच्यासाठी नाही. तुम्हीच तर हा शेवट आमच्या पुढ्यात वाढला आहे, किती वाईट आहे हे निवासस्थान.'' मग

१) या शब्दांवर विचार केल्याने ही गोष्ट अगदी स्पष्ट होते की हजरत अय्यूब (अ.) यांनी आजाराच्या स्थितीत नाराजीने कुणास मार देण्याची शपथ घेतली होती, (निवेदनांत असे आहे की पत्नीला मार देण्याची शपथ घेतली होती) व त्या शपथेतच त्यांनी असेही म्हटले होते की तुला इतके कोरडे मारीन, जेव्हा सर्वोच्च अल्लाहने त्यांना पूर्णपणे रोगमुक्त केले आणि आजाराच्या स्थितीतील तो राग शमला ज्याच्या घरात सदरहू शपथ घेतली गेली होती, तेव्हा त्यांना काळजी पडली की शपथ पूर्ण करतो तर विनाकारणच एका निरपराध्याला मार द्यावा लागेल आणि शपथ मोडतो तर हेदेखील एक पापकर्म ठरते. या मुश्किलीतून सर्वोच्च अल्लाहने त्यांना अशाप्रकारे बाहेर काढले की त्यांना आज्ञा केली, एक केरसुणी घे. त्यात तितक्याच काड्या असाव्यात जितके कोरडे मारण्याची तू शपथ वाहिली होती व त्या केरसुणीने त्या व्यक्तीवर फक्त एकच आघात कर जेणेकरून तुझी शपथही पूर्ण व्हावी व तिला अयोग्य त्रासही होऊ नये.



ते म्हणतील, ''हे आमच्या पालनकर्त्या, ज्याने आम्हाला या शेवटापर्यंत पोहचविण्याची व्यवस्था केली त्याला नरकाग्नीची दुहेरी शिक्षा दे.'' आणि ते आपापसात म्हणतील, ''काय झाले आहे, आम्हाला ते लोक कोठेही दिसत नाहीत ज्यांना आम्ही जगात वाईट समजत होतो? आम्ही विनाकारणच त्यांना उपहासाचा विषय बनविला होता अथवा ते कुठे दृष्टिआड झाले आहेत?'' नि:संदेह ही गोष्ट सत्य आहे, नरकवासियांत अशाच प्रकारचे तंटे होणार आहेत. (५५-६४)

(हे पैगंबर (स.)) यांना सांगा, ''मी तर केवळ सावध करणारा आहे. कोणी खरा उपास्य नाही. परंतु अल्लाह, जो एकमेव आहे सर्वांवर प्रभुत्वसंपन्न, आकाशांचा आणि पृथ्वीचा स्वामी आणि त्या सर्व वस्तूंचा स्वामी ज्या त्यांच्या दरम्यान आहेत, महान आणि क्षमाशील.'' यांना सांगा, ''ही एक मोठी वार्ता आहे जी ऐकून तुम्ही तोंड वेंगाळता.''

(६५-६८)

(यांना सांगा) ''मला त्या प्रसंगाविषयी काही ज्ञान नव्हते जेव्हा उच्चलोकियांत तंटा सुरू होता. मला तर दिव्यबोधाने या गोष्टी केवळ अशासाठी कळविल्या जातात की मी स्पष्टपणे सावध करणारा आहे.'' जेव्हा तुझ्या पालनकर्त्याने दूतांना सांगितले, ''मी मातीपासून एक मानव बनविला आहे, मग जेव्हा मी त्याला पूर्णपणे बनवीन आणि त्यात माझा आत्मा फुंकीन तेव्हा तुम्ही त्याच्यासमोर नतमस्तक व्हा! या आज्ञेनुसार दूत सर्वच्या सर्व नतमस्तक झाले, परंतु इब्लीसने आपल्या मोठेपणाची घमेंड केली आणि तो अश्रद्धावंतांपैकी बनला. पालनकर्त्याने फर्माविले, ''हे इब्लीस, तुला कोणती गोष्ट त्याच्यासमोर नतमस्तक होण्यास बाधक ठरली ज्याला मी आपल्या दोन्ही हातांनी बनविले आहे? तू मोठा बनू लागला आहेस अथवा तू उच्च दर्जाच्या व्यक्तित्वांपैकी आहेस?'' त्याने उत्तर दिले, ''मी त्याच्यापेक्षा श्रेष्ठ आहे. आपण मला अग्नीपासून निर्माण केले आहे आणि याला मातीपासून.'' फर्माविले, ''निघून जा येथून, तू बहिष्कृत आहेस आणि बदल्याच्या दिवसापर्यंत तुझा धिक्कार आहे.'' तो म्हणाला, ''हे माझ्या पालनकर्त्या, अशी जर गोष्ट असेल तर मग त्या वेळेपर्यंत मला सवड दे जेव्हा हे लोक दुसऱ्यांदा उठविले जातील.'' फर्माविले, ''बरे, तुला त्या दिवसापर्यंतची सवड आहे, ज्याची वेळ मला माहीत आहे.'' त्याने सांगितले, ''तुझ्या प्रतिष्ठेची शपथ, मी या सर्व लोकांना बहकावून सोडीन, त्या तुझ्या दासांखेरीज ज्यांना तू प्रामाणिक केले आहेस.'' फर्माविले, ''तर सत्य असे आहे आणि मी सत्यच बोलत असतो की मी नरकाला तुझ्याने आणि त्या सर्वांनी भरून टाकीन जे या माणसांपैकी तुझे अनुसरण करतील.'' (६९-८५)

(हे पैगंबर (स.)) यांना सांगा की मी या प्रचाराबद्दल तुमच्याकडे कोणताही मोबदला मागत नाही, आणि मी बनावट लोकांपैकीही नाही. हा तर एक उपदेश आहे सर्व जगवासियांसाठी आणि थोडाच अवधी लोटेल जेव्हा तुम्हा स्वत:ला याची स्थिती कळून चुकेल. (८६-८८)

# ३९ सूरह अज़्ज़ुमर

*(मक्काकालीन, वचने ७५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

या ग्रंथाचे अवतरण महान व बुद्धिमान अल्लाहकडून आहे. (हे पैगंबर (स.)) हा ग्रंथ आम्ही तुमच्याकडे सत्याधिष्ठित अवतरला आहे. म्हणून तुम्ही अल्लाहचीच भक्ती करा, धर्माला त्यासाठी निर्भेळ करताना. सावधान, विशुद्ध धर्म हा अल्लाहचा अधिकार आहे. उरले ते लोक ज्यांनी त्याच्याशिवाय इतरांना वाली बनवून ठेवले आहे (आणि आपल्या या कृतीचे समर्थन असे करतात की) आम्ही तर त्यांची उपासना केवळ एवढ्यासाठीच करतो की आम्हाला अल्लाहचे सान्निध्य लाभावे. अल्लाह निश्चितच त्यांच्यादरम्यान त्या सर्व गोष्टींचा निर्णय लावील ज्यात ते मतभेद दर्शवीत आहेत. अल्लाह अशा कोणत्याही इसमाला मार्गदर्शन करीत नसतो जो खोटा आणि सत्याचा इन्कार करणारा असतो. (१-३)

जर अल्लाह एखाद्याला पुत्र बनवू इच्छित असता तर आपल्या निर्मितीपैकी हवे त्याला निवडले असते, पवित्र आहे तो यापासून (की एखादा त्याचा पुत्र असावा), तो अल्लाह आहे एकमेव आणि सर्वांवर प्रभुत्वसंपन्न. त्याने आकाशांना व पृथ्वीला सत्याधिष्ठित निर्माण केले आहे. तोच दिवसावर रात्र आणि रात्रीवर दिवसाला गुंडाळतो. त्यानेच सूर्य आणि चंद्राला अशाप्रकारे अधीन करून ठेवले आहे की प्रत्येक एका निश्चित वेळेपर्यंत भ्रमण करीत आहे. लक्षात ठेवा, तो महान आणि क्षमाशील आहे. त्यानेच तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले, मग तोच आहे ज्याने त्या जीवापासून त्याची जोडी बनविली. आणि त्यानेच तुमच्यासाठी जनावरांपैकी आठ नर[१] व माद्या निर्माण केल्या. तो तुमच्या मातांच्या पोटांत तीन-तीन अंधकारयुक्त पडद्यात तुम्हाला एकानंतर एक आकार देत जातो.[२] हाच अल्लाह (ज्याची ही कामे आहेत) तुमचा पालनकर्ता आहे. बादशाही त्याची आहे, कोणीही उपास्य त्याच्याखेरीज नाही, मग तुम्हाला कोण विमुख करत आहे? (४-६)

जर तुम्ही सत्याचा इन्कार केला तर अल्लाह तुमच्याकडून निरपेक्ष आहे, परंतु तो आपल्या दासांसाठी द्रोह पसंत करीत नाही, आणि जर तुम्ही कृतज्ञता व्यक्त केली तर तो तुमच्यासाठी ते पसंत करतो. कोणी भारवाहक दुसऱ्याचा भार उचलणार नाही. शेवटी तुम्हा सर्वांना आपल्या पालनकर्त्याकडे रुजू व्हायचे आहे. मग तो तुम्हाला दाखविल तुम्ही काय करत होता. तो तर अंतर्यामी आहे. (७)

---

**१)** जनावरांनी अभिप्रेत, उंट, गाय, मेंढी आणि शेळी होत. त्यांचे चार नर आणि चार माद्या मिळून आठ नर व माद्या होतात.

**२)** तीन पडद्यांनी अभिप्रेत पोट, गर्भ आणि गर्भावरण (ते आवरण ज्यात मूल गुंडाळलेले असते) आहेत.



माणसावर जेव्हा एखादी आपत्ती येते तेव्हा तो आपल्या पालनकर्त्याकडे रुजू होऊन त्याचा धावा करतो. मग जेव्हा त्याचा पालनकर्ता त्याला आपल्या देणगीने उपकृत करतो तेव्हा तो ती आपत्ती विसरून जातो ज्यासाठी पूर्वी तो धावा करीत होता, आणि दुसऱ्यांना अल्लाहचा तुल्यबळ ठरवितो जेणेकरून त्यांना मार्गभ्रष्ट करावे. (हे पैगंबर (स.)) त्याला सांगा की काही दिवस आपल्या द्रोहाची मौज घे. निश्चितच तू नरकाग्नीत जाणार आहेस. (या माणसाची वागणूक अधिक चांगली आहे का त्या माणसाची) जो आज्ञांकित आहे, रात्रीच्या प्रहरी उभा असतो आणि नतमस्तक होतो. परलोकाची भीती बाळगतो आणि आपल्या पालनकर्त्याच्या कृपेसंबंधी आशावादी असतो. यांना विचारा, जाणणारे आणि न जाणणारे दोघे कधी एकसमान होऊ शकतात काय? उपदेश तर बुद्धी असलेलेच ग्रहण करीत असतात. (८-९)

(हे पैगंबर (स.)) सांगा की हे माझ्या दासांनो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगा. ज्या लोकांनी या जगात सद्‌वर्तन अंगिकारले आहे, त्यांच्यासाठी कल्याण आहे आणि अल्लाहची पृथ्वी विशाल आहे,[३] संयम बाळगणाऱ्यांना तर त्यांचा मोबदला बेहिशोबी देण्यात येईल. (१०)

(हे पैगंबर (स.)) यांना सांगा, मला आज्ञा दिली गेली आहे की धर्माला अल्लाहसाठी विशुद्ध राखून मी त्याची भक्ती करावी, आणि मला आज्ञा दिली गेली आहे की सर्वांत प्रथम मी स्वत: मुस्लिम (आज्ञाधारक) बनावे. सांगा, जर मी आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली तर मला एका मोठ्या दिवसाच्या प्रकोपाचे भय आहे. सांगा मी तर आपल्या धर्माला अल्लाहसाठी विशुद्ध करून त्याचीच भक्ती करीन. तुम्ही त्याच्याशिवाय ज्याची ज्याची भक्ती करू इच्छित असाल करीत रहा. सांगा, खरे दिवाळखोर तर तेच होत ज्यांनी पुनरुत्थानाच्या दिवशी स्वत:ला व आपल्या कुटुंबियांना नुकसानीत टाकले. चांगले ऐकून घ्या, हीच उघड दिवाळखोरी होय. त्यांच्यावर वरून खालून अग्नीछत आच्छादलेले असेल. हा तो शेवट आहे ज्याची अल्लाह आपल्या दासांना भीती दाखवितो, म्हणून हे माझ्या दासांनो, माझ्या कोपापासून दूर रहा. याविरूद्ध जे लोक 'तागूत' (मर्यादेचे उल्लंघन करणारा) च्या भक्तीपासून अलिप्त राहिले आणि अल्लाहकडे रुजू झाले त्यांच्यासाठी खुशखबर आहे. म्हणून (हे पैगंबर (स.)) खुशखबर द्या माझ्या त्या दासांना जे म्हणणे लक्षपूर्वक ऐकतात आणि त्यातील उत्तम पैलूंचे अनुसरण करतात. हे ते लोक होत ज्यांना अल्लाहने मार्गदर्शन प्रदान केले आहे आणि हेच बुद्धिमान आहेत. (११-१८)

(हे पैगंबर (स.)) त्या माणसाला कोण वाचवू शकतो ज्याच्यावर प्रकोपाचा निर्णय लागू झाला असेल? काय तुम्ही त्याला वाचवू शकता जो आगीत पडला आहे? तथापि जे

---

**३)** म्हणजे जर एक शहर अथवा प्रदेश अथवा देश अल्लाहची भक्ती करणाऱ्यांसाठी तंग झाला आहे तर दुसऱ्या ठिकाणी निघून जा जेथे अशी संकटे नसावीत.

लोक आपल्या पालनकर्त्याशी भिऊन राहिले त्यांच्यासाठी उत्तुंग इमारती आहेत, मजल्यावर मजले चढविलेल्या, ज्यांच्या खाली कालवे वहात असतील, हे अल्लाहचे वचन आहे, अल्लाह कधीही आपल्या वचनाविरूद्ध जात नसतो. (१९-२०)

काय तुम्ही पहात नाही की अल्लाहने आकाशातून पाणी वर्षविले, मग त्याला स्रोत, झरे आणि नद्यांच्या रूपात[४] पृथ्वीच्या आत मार्गस्थ केले, मग त्या पाण्याद्वारे तो तऱ्हेतऱ्हेची शेते उगवितो ज्यांचे प्रकार वेगवेगळे आहेत, मग ती शेते पिकून वाळून जातात, मग तुम्ही पाहता की ती पिवळी पडतील, मग सरतेशेवटी अल्लाह त्यांचा भुसा करून टाकतो. वास्तविकत: यात एक बोध आहे बुद्धिवंतांसाठी. आता काय तो इसम ज्याचे हृदय अल्लाहने इस्लामसाठी उघडे केले आणि तो आपल्या पालनकर्त्याकडून एका प्रकाशावर चालत आहे (त्या व्यक्तीसमान असू शकेल ज्याने या गोष्टीपासून कोणताही बोध घेतला नाही?) सर्वनाश आहे त्या लोकांसाठी ज्यांची हृदये अल्लाहच्या उपदेशाने आणखी जास्त कठोर झाली. ते उघड पथभ्रष्टतेत पडले आहेत. (२१-२२)

अल्लाहने उत्तम वाणी अवतरली आहे, एक असा ग्रंथ ज्याचे सर्व भाग त्या सारखेच आहेत आणि ज्यात वरचेवर विषयांची पुनरावृत्ती केली गेली आहे. त्याच्या श्रवणाने त्या लोकांच्या अंगावर शहारे उभे राहतात जे आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगणारे आहेत आणि मग त्यांचे शरीर आणि त्यांची हृदये मृदू होऊन अल्लाहच्या स्मरणाकडे आकर्षित होतात. हे अल्लाहचे मार्गदर्शन आहे. तो ज्याला इच्छितो सन्मार्गावर आणतो आणि ज्याला अल्लाहनेच मार्गदर्शन केले नाही तर त्याच्यासाठी मग कोणीही मार्गदर्शक नाही. आता त्या इसमाच्या दुर्दशेची तुम्ही काय कल्पना करू शकता जो पुनरुत्थानाच्या दिवशी प्रकोपाचा भयंकर मार आपल्या तोंडावर घेईल? अशा अत्याचाऱ्यांना तर सांगितले जाईल की आता घ्या आस्वाद त्या कमाईचा जे तुम्ही करीत राहिला होता. याच्यापूर्वीसुद्धा बऱ्याचशा लोकांनी अशाप्रकारे खोटे ठरविलेले आहे. सरतेशेवटी त्यांच्यावर प्रकोप अशा दिशेने आला जिकडे त्यांचे लक्षदेखील जाऊ शकत नव्हते. मग अल्लाहने त्यांना ऐहिक जीवनातच नामुष्कीची चव घ्यावयास लावली, आणि परलोकांतील प्रकोप तर याच्यापेक्षा तीव्र आहे, या लोकांना त्याची जाणीव असती तर? (२३-२६)

आम्ही या कुरआनात लोकांना वैविध्यपूर्ण दृष्टांत दिले आहेत की यांनी शुद्धीवर यावे. असा कुरआन जो अरबी भाषेत आहे, ज्यात कसलीही वक्रता नाही, जेणेकरून यांनी वाईट शेवटापासून बचाव करावा. अल्लाह एक उदाहरण देत आहे, एक व्यक्ती तर ती आहे जिचे धनी होण्यासाठी बरेचसे वाईट प्रवृत्तीचे मालक सामील आहेत जे तिला आपापल्याकडे ओढत असतात आणि दुसरी व्यक्ती पूर्णपणे एकाच स्वामीची दास आहे. काय या दोघांची स्थिती एकसमान असू शकते? स्तुती आहे अल्लाहसाठी, परंतु बहुतेक लोक अज्ञानात

४) मुळात 'यनाबीअ' असा अरबी शब्द प्रयुक्त झाला आहे. त्यात या तिन्ही गोष्टी मोडतात.



गुरफटलेले आहेत.[५] (हे पैगंबर (स.)) तुम्हीही कालवश होणार आहात व हे लोकसुद्धा मरणार आहेत. सरतेशेवटी प्रलयाच्या दिवशी तुम्ही सर्वजण आपल्या पालनकर्त्यापाशी आपापला दावा मांडणार आहात. मग त्या इसमापेक्षा मोठा अत्याचारी कोण असू शकेल ज्याने अल्लाहवर कुभांड रचले आणि जेव्हा सत्य त्याच्यासमोर आले तेव्हा त्याला खोटे लेखले. अशा लोकांसाठी नरकामध्ये एखादे ठिकाण नाही काय? आणि जो इसम सत्य घेऊन आला आणि ज्यांनी ते खरे मानले तेच प्रकोपापासून वाचणार आहेत. त्यांना आपल्या पालनकर्त्यापाशी ते सर्वकाही मिळेल ज्याची ते इच्छा करतील. हा आहे पुण्य कार्य करणाऱ्यांचा मोबदला. जेणेकरून जी वाईट कृत्ये त्यांनी केली होती त्यांना अल्लाहने त्यांच्या हिशेबातून वगळावे आणि जी उत्तम कृत्ये ते करीत राहिले त्यानुसार त्यांना मोबदला प्रदान करावा. (२७-३५)

(हे पैगंबर (स.)) काय अल्लाह आपल्या दासांसाठी पुरेसा नाही? हे लोक त्याच्याशिवाय तुम्हाला दुसऱ्यांचे भय दाखवितात. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाहने ज्याला पथभ्रष्ट केले त्याला कोणीही मार्ग दाखविणार नाही, आणि ज्याला त्याने मार्गदर्शन केले त्याला पथभ्रष्ट कोणीही करणार नाही. काय अल्लाह जबरदस्त आणि सूड उगविणारा नाही? या लोकांना जर तुम्ही विचारले की जमीन आणि आकाशांना कोणी निर्माण केले तर हे स्वत:च म्हणतील की अल्लाहने. यांना विचारा, जेव्हा सत्य असे आहे तर तुमची काय कल्पना आहे की अल्लाहने जर मला काही नुकसान पोहचविण्याचे इच्छिले तर काय तुमचे हे उपास्य ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता, मला त्याने पोहचविलेल्या नुकसानापासून वाचवतील? अथवा अल्लाहने जर माझ्यावर कृपा करण्याचे इच्छिले तर काय हे त्याच्या कृपेला रोखू शकतील? बरे यांना सांगून टाका की माझ्यासाठी अल्लाहच पुरेसा आहे. विश्वास करणारे त्याच्यावरच निष्ठा ठेवतात. यांना स्पष्ट सांगा, "हे माझ्या जातीबांधवांनो! तुम्ही आपल्या जागी आपले कार्य करीत रहा. मी आपले कार्य करीत राहीन, लवकरच तुम्हाला कळून चुकेल की कोणावर अपमानजनक प्रकोप येतो आणि कोणाला ती शिक्षा मिळते, जी कधीही टळणारी नाही." (हे पैगंबर (स.)) आम्ही सर्व माणसांसाठी हा सत्याधिष्ठित ग्रंथ तुम्हावर उतरविला आहे. आता जो सरळ मार्गाचा अवलंब करील तो आपल्यासाठीच करील आणि जो भटकेल त्याच्या भटकण्याचे अरिष्ट त्याच्यावरच येईल, तुम्ही त्यांचे जबाबदार नाही. (३६-४१)

तो अल्लाहच आहे जो मृत्यूसमयी आत्मे ताब्यात घेतो आणि जो आता मरण पावलेला नाही त्याचा आत्मा झोपेत ताब्यात घेतो, मग ज्याच्यासाठी तो मृत्यूचा निर्णय जारी

५) म्हणजे एकाच स्वामीचे दास्यत्व आणि अनेक स्वामींचे दास्यत्व यांच्यातील फरक तर चांगल्याप्रकारे समजतात. परंतु एकाच ईश्वराची भक्ती आणि अनेक देवांची भक्ती यातील फरक जेव्हा समजावून देण्याचा प्रयत्न केला जातो तेव्हा अजाण बनतात.

करतो तो रोखून ठेवतो आणि इतरांचे आत्मे एका निश्चित वेळेसाठी परत पाठवतो. यांत मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे गंभीरतेने विचार करतात. काय त्या अल्लाहला सोडून या लोकांनी दुसऱ्यांना शिफारसी बनवून ठेवले आहे?[६] यांना सांगा, काय ते शिफारस करतील, ज्याच्या अख्त्यारीत मग काही असो वा नसो आणि ते समजतदेखील नसतील? सांगा, संपूर्ण शिफारस अल्लाहच्या अख्त्यारीत आहे.[७] आकाशांच्या व पृथ्वीच्या साम्राज्याचा तोच स्वामी आहे, मग त्याच्याकडेच रुजू केले जाणार आहात. (४२-४४)

जेव्हा एकट्या अल्लाहचाच नामोल्लेख केला जातो तेव्हा मरणोत्तर जीवनावर श्रद्धा न ठेवणाऱ्यांची हृदये व्याकुळ होतात, आणि जेव्हा त्याच्याशिवाय इतरांचा उल्लेख होतो तेव्हा ते अकस्मात प्रफुल्लित होतात.[८] सांगा, हे अल्लाह! आकाशांना व पृथ्वीला निर्माण करणाऱ्या, अपरोक्ष आणि परोक्षाचे ज्ञान राखणाऱ्या, तूच आपल्या दासांच्या दरम्यान त्या गोष्टीचा निवाडा कर ज्यात ते मतभेद करीत राहिले आहेत, जरी या अत्याचाऱ्यांच्या जवळ पृथ्वीची सारी संपत्ती असली आणि तितकीच आणखीनदेखील, तरी हे पुनरुत्थानाच्या दिवसाच्या वाईट प्रकोपापासून वाचण्यासाठी सर्वकाही खंडणी म्हणून देण्यास तयार होतील. तेथे अल्लाहकडून असे काही येईल ज्याची त्यांनी कधी कल्पनाही केली नाही. तेथे आपल्या

---

६) म्हणजे एकतर या लोकांनी आपण होऊन स्वत:च अशी धारणा केली आहे की काही विभूती अल्लाह येथे फार भारदस्त आहेत. त्यांची शिफारस कुठल्याही प्रकारे फेटाळली जाऊ शकत नाही, वास्तविकपणे त्या शिफारसी म्हणून असण्याचे कसलेही प्रमाण नाही व सर्वोच्च अल्लाहनेदेखील कधी असे फर्माविले नाही की यांना माझ्या येथे असा दर्जा प्राप्त आहे, त्या विभूतीनीदेखील कधी असा दावा केला नाही की आम्ही स्वबळावर तुमची सर्व कामे करवून देऊ. याउपर अधिक मूर्खपणा या लोकांचा असा की खऱ्या स्वामीला सोडून या कपोलकल्पित शिफारसींनाच सर्वकाही समजून बसले आहेत, यांच्या सर्व भाविकता त्यांच्यासाठीच अर्पित आहेत.

७) म्हणजे असे बळ कुणालाच नाही की सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरात स्वत:च शिफारसी बनून राहू शकावे, हे तर दूरच की आपली शिफारस मान्य करवून घेण्याचे बळ त्याच्यात असावे. ही गोष्ट संपूर्णत: अल्लाहच्या अख्त्यारीत आहे की हवे त्याला शिफारस करण्याची परवानगी द्यावी आणि हवे त्याला देऊ नये. तसेच हवे त्याच्यासंबंधी कुणाला शिफारस करू द्यावी व हवे त्याच्यासाठी शिफारस करू देऊ नये.

८) ही गोष्ट जवळ जवळ साऱ्याच जगातील अनेकश्वरवादाची आवड असणाऱ्या लोकांत सामायिक आहे, येथपावेतो की दुर्दैवाने मुसलमानांपैकीही ज्यांना हा रोग जडला आहे तेदेखील या दोषापासून मुक्त नाहीत. तोंडाने म्हणतात की आम्ही अल्लाहला मानतो परंतु वस्तुस्थिती अशी की एकट्या अल्लाहचा नामोल्लेख करावा तर त्यांचे चेहरे बिघडू लागतात, म्हणतात, नक्कीच हा माणूस बुजुर्ग आणि अवलियांना मानीत नाही, म्हणूनच तर अल्लाह, अल्लाहच्याच गोष्टी करीत आहे, परंतु जर इतरांचाही उल्लेख करावा तर त्यांची मने प्रफुल्लित होतात व हर्षभराने त्यांचे चेहरे उजळून निघतात.



कमाईचे सर्व वाईट परिणाम त्यांच्यावर उघड होतील आणि तीच गोष्ट त्यांच्यावर उलटेल, जिची हे थट्टा करीत राहिले आहेत. (४५-४८)

हाच मनुष्य, जेव्हा याला जरादेखील संकट स्पर्श करते, तेव्हा तो आमचा धावा करतो, आणि जेव्हा आम्ही आमच्याकडून देणगी देऊन त्याला फुलवितो तेव्हा म्हणतो की हे तर माझ्या ज्ञानाबद्दल दिले गेले आहे! नव्हे, तर हीच परीक्षा होय, परंतु यांच्यापैकी बहुतेकजण जाणत नाहीत. हीच गोष्ट यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीदेखील सांगितली आहे, परंतु जे काही ते कमवीत होते ते त्यांच्या काहीही उपयोगी पडले नाही. मग आपल्या कमाईची कटू फळे त्यांनी चाखली आणि या लोकांपैकीसुद्धा जे अत्याचारी आहेत ते लवकरच आपल्या कमाईची कटू फळे चाखतील, हे आम्हाला जेरीस आणणारे नाहीत. आणि काय यांना माहीत नाही की अल्लाह इच्छितो त्याची उपजीविका विपुल करतो आणि इच्छितो त्याची तंग करतो? यात संकेत आहेत त्या लोकांसाठी जे श्रद्धा ठेवतात. (४९-५२)

(हे पैगंबर (स.)) सांगून टाका की हे माझ्या दासांनो,[९] ज्यांनी आपल्या स्वत:शीच आगळीक केली आहे, अल्लाहच्या कृपेकडून निराश होऊ नका, निश्चितच अल्लाह सर्व गुन्हे माफ करून टाकतो, तो तर क्षमाशील परमकृपाळू आहे, परतून या आपल्या पालनकर्त्याकडे आणि आज्ञाधीन बनून जा त्याचे, यापूर्वी की तुमच्यावर प्रकोप येईल आणि मग कुठूनही तुम्हाला मदत मिळणार नाही. आणि अनुसरण अंगिकारा आपल्या पालनकर्त्याकडून पाठविल्या गेलेल्या ग्रंथाच्या उत्तम पैलूचे,[१०] यापूर्वी की तुमच्यावर अकस्मात प्रकोप येईल आणि तुम्हाला खबरसुद्धा नसेल. एखादे वेळी असे होऊ नये की एखाद्याने नंतर म्हणावे,

---

९) काही लोकांनी सदरच्या शब्दांचा मोठा अजबच असा अर्थ लावला आहे की सर्वोच्च अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांना स्वत:च 'हे माझ्या दासांनो' असे म्हणून संबोधन करण्याची आज्ञा दिली आहे. म्हणून सर्व मानव पैगंबर मुहम्मद (स.) यांचे दास आहेत. वास्तविकपणे हे अर्थ लावणे नसून अनर्थ करणे किंबहुना कुरआनात अत्यंत वाईट तऱ्हेने बदल आणि अल्लाहच्या वाणीशी खेळ आहे असे म्हटले पाहिजे. असले अर्थ लावणे जर यथार्थ असेल तर मग संपूर्ण कुरआनच अयोग्य ठरू लागतो कारण कुरआन तर प्रथमपासून ते शेवटपर्यंत मानवांना केवळ सर्वोच्च अल्लाहचेच दास ठरवितो आणि तुम्ही एक अल्लाहखेरीज इतर कुणाचीही बंदगी करू नका हेच त्याचे संपूर्ण आवाहन आहे.

१०) अल्लाहच्या ग्रंथातील उत्तम पैलूचे अनुसरण करण्याचा अर्थ असा की सर्वोच्च अल्लाहने ज्या कामाची आज्ञा केली आहे, माणसांनी तिचे पालन करावे, ज्या कामाची त्याने मनाई केली आहे त्यापासून अलिप्त राहावे, आणि उदाहरणे व किस्से-कहाण्यात त्याने जे काही सांगितले आहे त्यापासून बोध घ्यावा व उपदेश ग्रहण करावा. याउलट जो मनुष्य आदेशांपासून तोंड फिरवितो, मनाई केलेली कामे करतो आणि अल्लाहच्या उपदेशांपासून काहीच बोध घेत नाही, तो अल्लाहच्या ग्रंथातील अत्यंत वाईट पैलूवर अवलंब करतो, म्हणजे तो पैलू अंगिकारतो ज्याला ईश्वरी ग्रंथ अत्यंत वाईट ठरवितो.

''खेद आहे माझ्या त्या आगळिकीवर जी मी अल्लाहच्या हुजूरात करीत राहिलो, किंबहुना मी तर उलट टिंगल करणाऱ्यांत सामील होतो.'' अथवा खेदाने म्हणावे, ''अल्लाहने जर मला मार्गदर्शन प्रदान केले असते तर मीसुद्धा ईशभीरूपैकी असतो.'' अथवा प्रकोप पाहून म्हणावे, ''किती छान होईल जर मला आणखीन एक संधी मिळेल आणि मीसुद्धा पुण्यकर्म करणाऱ्यांत सामील होईन.'' (आणि त्यावेळी त्याला हे उत्तर मिळेल की) ''कदापी नाही, माझी संकेतवचने तुझ्याजवळ आली होती, मग तू त्यांना खोटे ठरविले आणि गर्व केला आणि तू सत्य नाकारणाऱ्यांपैकी होतास. आज ज्या लोकांनी अल्लाहवर कुभांड रचले आहे, पुनरुत्थानाच्या दिवशी तुम्ही पाहाल की त्यांची तोंडे काळी असतील. नरकामध्ये गर्विष्ठांसाठी पुरेशी जागा नाही काय? याउलट जे लोक येथे ईशपरायण आहेत त्यांच्या सफलता देणाऱ्या कारणामुळे अल्लाह त्यांना मुक्ती देईल, त्यांना काही इजाही पोहचणार नाही आणि ते दु:खीही होणार नाहीत. (५३-६१)

अल्लाह प्रत्येक वस्तूचा निर्माता आहे आणि तोच प्रत्येक वस्तूवर देखरेख ठेवणारा आहे. पृथ्वी आणि आकाशांच्या खजिन्याच्या किल्ल्या त्याच्याच जवळ आहेत. आणि जे लोक अल्लाहच्या संकेतांशी द्रोह करतात तेच तोट्यात राहणारे आहेत. (हे पैगंबर (स.)) यांना सांगा, ''मग काय हे अज्ञानी लोकहो, तुम्ही अल्लाहशिवाय अन्य एखाद्याची भक्ती करण्यास मला सांगता?'' (ही गोष्ट तुम्ही यांना स्पष्टपणे सांगायला हवी कारण की) तुमच्याकडे आणि तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या सर्व पैगंबरांकडे असा दिव्यबोध केला गेला आहे की जर तुम्ही अनेकेश्वरवाद स्वीकारला तर तुम्ही केले सवरलेले वाया जाईल आणि तुम्ही तोट्यात रहाल. म्हणून (हे पैगंबर (स.)) तुम्ही केवळ अल्लाहची भक्ती करा आणि कृतज्ञ दासांपैकी बना. (६२-६६)

या लोकांनी अल्लाहची कदरच केली नाही जशी त्याची कदर करण्याचा हक्क आहे. (त्याच्या परिपूर्ण सामर्थ्याची स्थिती तर अशी आहे की) पुनरुत्थानाच्या दिवशी संपूर्ण पृथ्वी त्याच्या मुठीत असेल आणि आकाश त्याच्या उजव्या हातात गुंडाळलेले असतील.[11] पवित्र आणि उच्चतर आहे तो त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करतात. आणि त्या दिवशी नरसिंघ फुंकले जाईल आणि ते सर्व मरून पडतील जे आकाशात आणि पृथ्वीत आहेत;

**११)** पृथ्वी आणि आकाशावर ईश्वराचे पूर्ण प्रभूत्व दर्शविण्यासाठी (त्याच्या) मुठीमध्ये असण्याचे आणि हातामध्ये सामावण्याचे रूपक उपयोगात आणले आहे. ज्याप्रमाणे एक मनुष्य एका छोट्याशा चेंडूला मुठीमध्ये दाबून ठेवतो आणि त्याच्यासाठी ते सहज कार्य असते किंवा एक व्यक्ती एखाद्या रुमालाला गुंडाळून हातामध्ये धरते आणि तिच्यासाठी ते अशक्य कार्य नसते, त्याचप्रमाणे कयामत-पुनरुत्थानाच्या दिवशी सर्व लोक (जे आज ईश्वराच्या महानतेचे आणि थोरवीचे आकलन करण्यामध्ये असमर्थ आहेत) आपल्या डोळ्यांनी पाहतील की पृथ्वी आणि आकाश ईश्वराच्या सामर्थ्यापुढे एक क्षुद्र चेंडूच्या आणि एका लहानशा रुमालाप्रमाणे आहेत.



त्यांच्याखेरीज ज्यांना अल्लाह जिवंत राखू इच्छिल. मग आणखीन दुसरे नरसिंघ फुंकले जाईल आणि अकस्मात सर्वच्या सर्व उठून पाहू लागतील. पृथ्वी आपल्या पालनकर्त्याच्या तेजाने उजळून निघेल, कर्माची नोंदवही आणून ठेवली जाईल, सर्व नबी (प्रेषित) आणि सर्व साक्षीदार उपस्थित केले जातील. लोकांच्या दरम्यान ठीक ठीक सत्याधिष्ठित निर्णय दिला जाईल त्यांच्यावर कोणताही अन्याय होणार नाही, आणि प्रत्येकजणाला जी काही कर्मे त्याने केली होती त्यांचा पुरेपूर बदला दिला जाईल. लोक जे काही करतात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो. (६७-७०)

(या निर्णयानंतर) ते लोक ज्यांनी द्रोह केला होता, नरकाकडे टोळ्याटोळ्यांनी हाकले जातील इथपावेतो की जेव्हा ते तेथे पोहचतील तेव्हा तिची दारे उघडली जातील आणि तिचे कर्मचारी त्यांना म्हणतील, ''तुमच्याजवळ तुमच्यापैकी असे प्रेषित आले नव्हते काय ज्यांनी तुम्हाला तुमच्या पालनकर्त्याची वचने ऐकविली आणि तुम्हाला या गोष्टीचे भय दाखविले की एका वेळी तुम्हाला असा दिवसदेखील पहावा लागेल?'' ते उत्तर देतील, ''होय, आले होते, परंतु प्रकोपाचा निर्णय अश्रद्धावंतांना लागू झाला.'' सांगितले जाईल, दाखल व्हा नरकाच्या दरवाजात, येथे आता तुम्हाला सदैव राहावयाचे आहे, अत्यंत वाईट स्थान आहे हे गर्विष्ठांसाठी. (७१-७२)

आणि जे लोक आपल्या पालनकर्त्याच्या अवज्ञेपासून अलिप्त राहात होते ते जथ्याजथ्याने स्वर्गाकडे नेले जातील येथपावेतो की जेव्हा ते तेथे पोहचतील आणि त्याची दारे अगोदरच उघडली गेली असतील तेव्हा त्याचे व्यवस्थापक त्यांना म्हणतील की, ''सलाम असो तुमच्यावर, फारच चांगले राहिला तुम्ही, दाखल व्हा यात नेहमीसाठी.'' आणि ते म्हणतील, ''कृतज्ञ आहोत त्या अल्लाहचे ज्याने आमच्याशी केलेले वचन सत्य करून दाखविले आणि आम्हाला पृथ्वीचे वारस बनविले, आता आम्ही स्वर्गामध्ये हवे तेथे आमची जागा बनवू शकतो.'' तर उत्तम मोबदला आहे कर्म करणाऱ्यांसाठी. (७३-७४)

आणि तुम्ही पाहाल की दूत अर्श (ईशसिंहासना) भोवती वर्तुळ बनवून आपल्या पालनकर्त्याची स्तुती व पावित्र्यगान करीत असतील. आणि लोकांच्या दरम्यान ठीकठीक सत्याधिष्ठित निर्णय दिला जाईल. आणि घोषित केले जाईल की स्तुती आहे सकल विश्वाच्या पालनकर्त्या अल्लाहसाठीच. (७५)

# ४० सूरह अल्मुअ्मिन

*(मक्काकालीन, वचने ८५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हाऽमीऽऽम. या ग्रंथाचे अवतरण अल्लाहकडून आहे जो जबरदस्त आहे, सर्वकाही जाणणारा आहे. गुन्हा माफ करणारा आणि पश्चात्ताप स्वीकारणारा आहे, कठोर शिक्षा देणारा आणि मोठा उदारहस्त आहे, कोणी उपास्य त्याच्याव्यतिरिक्त नाही. त्याच्याकडेच सर्वांना रुजू व्हायचे आहे. (१-३)

अल्लाहच्या वचनांत वाद घालीत राहतील केवळ ते लोक ज्यांनी द्रोह केला आहे. यानंतर जगाच्या देशातील त्यांच्या वावरण्याने तुमची फसगत होऊ नये. यांच्यापूर्वी नूह (अ.) च्या राष्ट्रानेसुद्धा खोटे ठरविले आहे, आणि त्यांच्यानंतर बऱ्याचशा अन्य जमातींनीसुद्धा हे काम केले आहे. प्रत्येक लोकसमूहाने आपल्या प्रेषितावर झडप घातली जेणेकरून त्याला पकडावे. त्या सर्वांनी असत्याच्या हत्याराने सत्याला नमविण्याचा प्रयत्न केला परंतु सरतेशेवटी मी त्यांना पकडले, मग पहा, माझी शिक्षा किती कठोर होती. अशाच प्रकारे तुझ्या पालनकर्त्याचा हा निर्णयसुद्धा त्या सर्व लोकांवर लागू झाला आहे ज्यांनी, सत्याचा इन्कार केला आहे, ते नरकवासी होणार आहेत. (४-६)

ईश-सिंहासनधारी दूत आणि जे ईश-सिंहासनाच्या सभोवती उपस्थित राहतात, ते सर्व आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबरच त्याचे पावित्र्यगान करीत आहेत. ते त्याच्यावर श्रद्धा ठेवतात आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांसाठी क्षमेची प्रार्थना करतात. ते म्हणतात, "हे आमच्या पालनकर्त्या, तू आपली कृपा व आपल्या ज्ञानानिशी प्रत्येक चराचरास व्यापिले आहेस, म्हणून क्षमा कर आणि नरकाच्या यातनेपासून वाचव, त्या लोकांना ज्यांनी पश्चाताप व्यक्त केला आहे आणि तुझा मार्ग स्वीकारला आहे. हे आमच्या पालनकर्त्या, आणि दाखल कर त्यांना सदैव राहणाऱ्या त्या स्वर्गामध्ये ज्यांचे तू त्यांना वचन दिले आहेस, आणि त्यांच्या आईवडील आणि पत्नीं व संततीपैकी जे सदाचारी असतील (त्यांनासुद्धा तेथे त्यांच्याबरोबर पोहचव) तू निःसंशय सामर्थ्यसंपन्न आणि बुद्धिमान आहेस. आणि वाचव त्यांना वाईट गोष्टींपासून. ज्याला तू वाईट गोष्टींपासून पुनरुत्थानाच्या दिवशी वाचविले त्यावर तू मोठी मेहरबानी केलीस, हेच महान यश आहे." (७-९)

ज्या लोकांनी द्रोह केलेला आहे, पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांना हांक मारून सांगितले जाईल, "आज तुम्हाला जितका भयंकर राग स्वतःवर येत आहे, अल्लाह तुम्हावर त्यापेक्षा जास्त क्रोधित त्यावेळी होतअसे जेव्हा तुम्हाला श्रद्धेकडे बोलविण्यात येत होते आणि तुम्ही द्रोह करीत होता." ते म्हणतील, "हे आमच्या पालनकर्त्या, तू



खरोखर आम्हाला दोन वेळा मृत्यू आणि दोन वेळा जीवन दिले,[1] आता आम्हीआपले गुन्हे मान्य करतो, आता येथून निघण्याचा एखादा मार्ग आहे काय?" (उत्तर मिळेल) "ही स्थिती ज्यामध्ये तुम्ही गुरफटलेले आहात, अशा कारणाने आहे की जेव्हा एकट्या अल्लाहकडे बोलाविले जात होते तेव्हा तुम्ही मानण्यास नकार देत होता, आणि जेव्हा त्याच्याबरोबर दुसऱ्यांना बोलाविले जात असे तेव्हा तुम्ही मान्य करीत होता, आता निर्णय श्रेष्ठ व उच्चतर अल्लाहच्या हाती आहे." (१०-१२)

तोच आहे जो तुम्हाला आपले संकेत दाखवीत असतो आणि आकाशांतून तुमच्याकरिता उपजीविका उतरवीत असतो.[2] परंतु (या संकेतांच्या निरीक्षणाने) बोध केवळ तोच मनुष्य घेतो; जो अल्लाहकडे रुजू होणारा असेल. (म्हणून हे रुजू होणाऱ्यांनो!) अल्लाहचाच धावा करा, आपला धर्म त्याच्याकरिता विशुद्ध राखून. मग तुमचे हे कृत्य अश्रद्धावंतांना कितीही अप्रिय वाटो. (१३-१४)

तो उच्च दर्जे राखणारा, सिंहासना (अर्श) चा स्वामी आहे. आपल्या दासांपैकी ज्यावर इच्छितो त्यावर आपल्या आज्ञेने आत्मा अवतरतो जेणेकरून भेटीच्या दिवसापासून त्याने सावध करावे. तो दिवस, जेव्हा सर्वजण उघडे असतील, अल्लाहपासून त्यांची कोणतीही गोष्ट लपलेली नसेल. (त्या दिवशी पुकारून विचारले जाईल.) आज साम्राज्य कोणाचे आहे? (सर्व जग मोठ्याने उद्गारेल) एकमेव महाप्रतापी अल्लाहचे. सांगितले जाईल आज प्रत्येक सजीवाला त्या कमाईचा बदला दिला जाईल जी त्याने केली होती, आज कोणावर कसलाही अत्याचार होणार नाही, आणि अल्लाह हिशेब घेण्यात फार तत्पर आहे. हे पैगंबर (स.), भय दाखवा या लोकांना त्या दिवसाचे जो जवळ येऊन ठेपला आहे. जेव्हा काळीज तोंडाशी येत असतील आणि लोक निमूटपणे दुःखाचे घोट गिळून उभे असतील, अत्याचाऱ्यांचा कोणी प्रेमळ मित्रही नसेल आणि कोणी शिफारस करणारादेखील नसेल की ज्याचे म्हणणे मान्य केले जावे. अल्लाह, दृष्टीच्या चोरीलादेखील जाणतो आणि ते रहस्यसुद्धा जाणतो जे मनांनी लपवून ठेवले आहेत. आणि अल्लाह ठीकठीक निःपक्षपणे निर्णय देईल. उरले ते ज्यांचा (हे अनेकेश्वरवादी) अल्लाहला सोडून धावा करतात, ते कोणत्याही गोष्टीचा निर्णय लावणार नाहीत, निःसंशय अल्लाहच सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे. (१५-२०)

हे लोक पृथ्वीवर कधी निरीक्षण करीत नाहीत काय की यांना त्या लोकांचा शेवट दिसला असता जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत? ते यांच्यापेक्षा अधिक शक्तिमान होते

---

१) दोन वेळा मृत्यू आणि दोन वेळा जीवनाने तीच गोष्ट अभिप्रेत आहे जिचा उल्लेख सूरह बकरा, आयत क्र. २८ मध्ये केलेला आहे.

२) म्हणजे पाऊस पाडतो, जो रोजीचे साधन आहे, उष्मा आणि थंडी पाडतो, रोजी उत्पन्न होण्यात यांना मोठे स्थान आहे.

आणि यांच्यापेक्षा अधिक प्रबळ अवशेष पृथ्वीवर सोडून गेले आहेत. परंतु अल्लाहने त्यांच्या अपराधांबद्दल त्यांना पकडले आणि त्यांना अल्लाहपासून वाचविणारा कोणीही नव्हता. असा त्यांचा शेवट यामुळे झाला की त्यांच्याजवळ त्याचे प्रेषित स्पष्ट प्रमाण[3] घेऊन आले आणि त्यांनी मानण्यास नकार दिला. सरतेशेवटी अल्लाहने त्यांना पकडले. निश्चितच तो मोठा सामर्थ्यवान आणि शिक्षा देण्यात अत्यंत कठोर आहे. (२१-२२)

आम्ही मूसा (अ.) ला फिरऔन, आणि हामान व कारूनकडे आपले संकेत आणि नियुक्तीच्या स्पष्ट सनदीसह पाठविले परंतु त्यांनी सांगितले, ''लबाड आणि जादुगार आहेत.'' जेव्हा त्यांनी आमच्याकडून सत्य त्यांच्यासमोर ठेवले तेव्हा त्यांनी सांगितले, ''जे लोक श्रद्धा ठेवून याच्याबरोबर सामील झाले आहेत, त्यांच्या सर्व मुलांना ठार मारा आणि मुलींना जिवंत सोडा.'' परंतु अश्रद्धावंतांची कारस्थाने फोल ठरली. (२३-२५)

एके दिवशी फिरऔनने आपल्या दरबारी लोकांना सांगितले, ''सोडा मला, मी या मूसा (अ.) ला ठार करून टाकतो, आणि पुकारून पहावे याने आपल्या पालनकर्त्याला. मला भीती आहे की हा तुमचा धर्म बदलून टाकील, अथवा देशात उपद्रव माजवील.'' (२६)

मूसा (अ.) ने सांगितले, ''मी तर त्या प्रत्येक गर्विष्ठांविरूद्ध जो हिशेबाच्या दिवसावर श्रद्धा ठेवीत नाही, आपला पालनकर्ता व तुमच्या पालनकर्त्याचा आश्रय घेतला आहे.'' (२७)

त्याप्रसंगी फिरऔनवंशियांपैकी एक माणूस ज्याने आपली श्रद्धा लपवून ठेवली होती, म्हणाला, ''काय तुम्ही एका माणसाला केवळ या कारणाने ठार कराल की तो सांगतो, माझा पालनकर्ता अल्लाह आहे? वस्तुत: तो तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्यापाशी स्पष्ट प्रमाण घेऊन आला, जर तो खोटा असेल तर त्याचे असत्य त्याच्याच अंगलट येईल, परंतु जर तो खरा असेल तर ज्या भयंकर परिणामांची तो तुम्हाला भीती दाखवीत आहे त्यापैकी काही तर जरूर तुमच्यावर येतील. अल्लाह कोणत्याही अशा माणसाला मार्गदर्शन करीत नाही जो मर्यादा ओलांडणारा आणि मोठा लबाड असेल. हे माझ्या राष्ट्रबांधवांनो! आज तुम्हाला राज्य प्राप्त आहे आणि पृथ्वीवर तुमचा वरचष्मा आहे परंतु जर अल्लाहचा प्रकोप आमच्यावर कोसळला तर मग कोण आहे जो आम्हाला

३) स्पष्ट प्रमाणाने तीन गोष्टी अभिप्रेत आहेत. एक अशी स्पष्ट, चिन्हे व निशाण्या ज्या त्यांचे अल्लाहकडून नियुक्त असण्यावर साक्ष म्हणून होत्या. दुसरी, असे उज्ज्वल युक्तीवाद जे, त्यांनी प्रस्तुत केलेली शिकवण सत्य असण्याचे पुरावे देत होते. तिसरी, जीवनाच्या समस्या आणि मामल्यांसंबंधी असे स्पष्ट आदेश ज्यांना पाहून प्रत्येक सुज्ञ माणसाला असे वाटू शकते की अशी पवित्र शिकवण कुणी लबाड व स्वार्थी मनुष्य सांगू शकत नाही.



मदत करू शकेल?'' (२८-२९-)

फिरऔनने सांगितले, ''मी तर तुम्हा लोकांसमोर तेच मत व्यक्त करीत आहे जे मला योग्य दिसते, आणि मी त्याच मार्गाकडे तुमचे मार्गदर्शन करतो जो यथायोग्य आहे.'' (-२९)

तो मनुष्य ज्याने श्रद्धा ठेवली होती त्याने सांगितले, ''हे माझ्या राष्ट्रबांधवांनो, मला भय आहे की एखादे वेळी तुमच्यावरसुद्धा तो दिवस येईल जो यापूर्वी बऱ्याचशा जथ्यांवर आलेला आहे, जसा दिवस नूह (अ.) च्या लोकांवर आणि आद व समूद व त्यांच्या नंतरच्या लोकसमूहांवर आला होता. आणि ही वस्तुस्थिती आहे की अल्लाह आपल्या दासांवर अत्याचाराचा कसलाही इरादा बाळगत नाही. हे राष्ट्रबांधवांनो, मला भय आहे की एखादे वेळी तुम्हावर गयावया करण्याचा दिवस येऊ नये. जेव्हा तुम्ही एकमेकाला हाका माराल आणि धावत फिराल, परंतु त्यावेळी अल्लाहपासून वाचविणारा कोणीही असणार नाही. सत्य असे आहे की ज्याला अल्लाहने भटकविले त्याला मग मार्ग दाखविणारा कोणीही नसेल. यापूर्वी यूसुफ (अ.) तुम्हापाशी स्पष्ट प्रमाण घेऊन आले होते, परंतु तुम्ही त्यांनी आणलेल्या शिकवणीसंबंधी साशंक राहिला. मग जेव्हा त्याचे निधन झाले तेव्हा तुम्ही सांगितले, आता त्यांच्यानंतर अल्लाह कोणताही प्रेषित कदापि पाठविणार नाही.'' - अशाच प्रकारे[4] अल्लाह त्यासर्व लोकांना पथभ्रष्टतेत टाकतो जे मर्यादा उल्लंघन करणारे आणि शंकाखोर असतात, आणि अल्लाहच्या संकेतात तंटे करतात याविना की त्यांच्याकडे एखादे प्रमाण अथवा सनद आलेली नसतानाही हे वर्तन अल्लाह आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांजवळ अत्यंत वाईट आहे. अशाच प्रकारे अल्लाह प्रत्येक गर्विष्ठ आणि कठोर व्यक्तीची हृदये मोहरबंद करतो. (३०-३५)

फिरऔनने सांगितले, ''हे हामान, माझ्यासाठी एक उत्तुंग इमारत बनव जेणेकरून मी मार्गापर्यंत पोहचू शकेन, आकाशांच्या मार्गापर्यंत, आणि मूसा (अ.) च्या ईश्वराला मी डोकावून पाहीन. मला तर हा मूसा (अ.) खोटारडाच वाटतो.'' - अशाप्रकारे फिरऔनसाठी त्याचा दुराचार आकर्षक बनविला गेला आणि सरळ मार्गापासून तो रोखला गेला. फिरऔनची संपूर्ण कुटिलता (त्याच्या स्वत:च्या) सर्वनाशाच्या मार्गात खर्ची पडली. (३६-३७)

तो मनुष्य ज्याने श्रद्धा ठेवली होती, म्हणाला, ''हे माझ्या राष्ट्रबांधवांनो, माझे म्हणणे ऐका, मी तुम्हाला सरळमार्ग दाखवीत आहे. हे राष्ट्रबंधुनो, हे ऐहिक जीवन तर क्षणभंगूर आहे, नेहमीच्या निवासाची जागा तर परलोकच आहे. जो दुराचार करील त्याला

४) बाह्यत: असे वाटते की पुढची ही काही वाक्ये सर्वोच्च अल्लाहने फिरऔनवंशी श्रद्धावंताच्या वचनात भर व त्याचे स्पष्टीकरण म्हणून फर्माविलेली आहेत.

तेवढाच बदला मिळेल जितका याने दुराचार केला असेल आणि जो सत्कर्म करील, मग तो पुरुष असो अथवा स्त्री, तो श्रद्धावंत असावा, असे सर्व लोक स्वर्गामध्ये प्रविष्ट होतील. तेथे त्यांना अमाप उपजीविका दिली जाईल. हे बंधूंनो, अखेर ही काय गोष्ट आहे की मी तर तुम्हा लोकांना मुक्तीकडे बोलावीत आहे आणि तुम्ही मला अग्नीकडे आमंत्रित करीत आहात! तुम्ही मला या गोष्टीचे आमंत्रण देत आहांत की मी अल्लाहशी द्रोह करावा आणि त्याच्याबरोबर अशा जणांना भागीदार ठरवावे ज्यांना मी जाणत नाही.[५] वास्तविकत: मी तुम्हाला त्या जबरदस्त क्षमाशील ईश्वराकडे बोलावीत आहे. नव्हे, सत्य असे आहे, आणि याच्याविरूद्ध असू शकत नाही की ज्यांच्याकडे तुम्ही मला बोलावीत आहात, त्यांच्यासाठी जगातही कुठले आवाहन नाही आणि परलोकमध्ये सुद्धा नाही.[६] आणि आम्हा सर्वांना परतणे अल्लाहकडेच आहे, आणि मर्यादा ओलांडणारे अग्नीत जाणार आहेत. आज जे काही मी म्हणत आहे, लवकरच ती वेळ येईल जेव्हा तुम्ही ते आठवाल. आणि आपले प्रकरण मी अल्लाहच्या स्वाधीन करतो. तो आपल्या दासांची काळजी घेणारा आहे.'' (३८-४४)

सरतेशेवटी त्या लोकांनी ज्या वाईटातल्या वाईट चाली त्या श्रद्धावंतांविरूद्ध लढविल्या, अल्लाहने त्या सर्वांपासून त्याला वाचविले,[७] आणि फिरऔनचे सोबती स्वत: अत्यंत वाईट प्रकोपाच्या चक्रात सापडले. नरकाग्नी आहे ज्याच्यापुढे ते सकाळ-संध्याकाळ पेश केले जातील. आणि जेव्हा पुनरुत्थानाची घटिका येऊन ठेपेल तेव्हा आज्ञा होईल की फिरऔनी लोकांना कठोरतम प्रकोपात दाखल करा. मग जरा कल्पना करा त्या वेळेची जेव्हा हे लोक नरकांत एकदुसऱ्याशी भांडत असतील. जगात जे लोक दुर्बल होते ते मोठे बनणाऱ्यांना सांगतील, ''आम्ही तुमच्या अधीन होतो, आता येथे तुम्ही

५) म्हणजे ईशत्वात यांचीही काही भागीदारी आहे, हे माझ्या माहितीत नाही.

६) या वाक्याचे अनेक अर्थ होऊ शकतात. एक हा की त्यांना इहलोकी हा अधिकार नाही आणि परलोकीही नाही की त्याचे ईशत्व स्वीकार करण्याचे लोकाना आवाहन करण्यात यावे. दुसरा (अर्थ) हा की त्यांना लोकानी बळेच ईश्वरपद बहाल केले आहे. वास्तविक ते स्वत:हून इहलोकीही आपल्या ईशत्वाचे पुरस्कर्ते नव्हते आणि परलोकीही ते हे प्रतिपादन करणार नाहीत की आम्हीही ईश्वर होतो, तुम्ही आम्हाला तसे का मानले नाही? तिसरा हा की त्यांना साकडे घालण्याने न इहलोकी काही लाभ न परलोकी, कारण त्यांना असा कोणताही अधिकार नाही. त्यांना साकडे घालणे निश्चितच व्यर्थ आहे.

७) यावरून असे कळते की त्या मनुष्याला फिरऔनच्या राज्यात इतके महत्व प्राप्त होते की भरदरबारात फिरऔनच्या तोंडावर असे कटू सत्य सांगितल्यानंतरदेखील उघडपणे त्याला शिक्षा देण्याचे धाडस केले जाऊ शकत नव्हते. म्हणून फिरऔन व त्याच्या समर्थकांना त्याला ठार करण्यासाठी गुप्त कारस्थाने योजावी लागली परंतु ती कारस्थानेदेखील अल्लाहने चालू दिली नाहीत.



नरकाग्नीच्या यातनेपैकी काही अंशी आम्हाला वाचवाल काय?'' ते मोठे बनणारे उत्तर देतील, ''आम्ही सर्वजण येथे एकाच परिस्थितीत आहोत, आणि अल्लाहने दासांच्या दरम्यान निर्णय करून टाकला आहे.'' मग हे नरकाग्नीत पडलेले लोक नरकाच्या कर्मचाऱ्यांना सांगतील, ''आपल्या पालनकर्त्याची प्रार्थना करा की आमच्या यातना त्याने केवळ एका दिवसाने कमी कराव्यात.'' ते विचारतील, ''तुमच्याजवळ प्रेषित स्पष्ट प्रमाण घेऊन येत राहिले नव्हते काय?'' ते म्हणतील, ''होय.'' नरकाचे कर्मचारी म्हणतील, ''मग तर तुम्हीच प्रार्थना करा, आणि अश्रद्धावंतांची प्रार्थना वायाच जाणार आहे.''

(४५-५०)

खात्री बाळगा की आम्ही आपल्या प्रेषितांची आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांची मदत या जगाच्या जीवनांतसुद्धा निश्चितपणे करीत असतो, आणि या दिवशीसुद्धा करू जेव्हा साक्षीदार उभे राहतील, जेव्हा अत्याचाऱ्यांना त्यांचे निमित्त दाखविणे काहीच लाभदायी ठरणार नाही आणि त्यांचा धिक्कार होईल आणि अत्यंत वाईट ठिकाण त्यांच्या वाट्यास येईल. शेवटी पहा, मूसा (अ.) ला आम्ही मार्गदर्शन केले आणि बनीइस्राईलना त्या ग्रंथाचे वारस बनविले, जो बुद्धी आणि विवेक बाळगणाऱ्यांसाठी मार्गदर्शन आणि उपदेश होता. म्हणून हे पैगंबर (स.), संयम राखा, अल्लाहचे वचन सत्याधिष्ठित आहे, आपल्या चुकीबद्दल क्षमा-याचना करा[८] आणि सकाळ-संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबरच त्याचे पावित्र्यगान करीत राहा. वस्तुस्थिती अशी आहे की जे लोक एखादी सनद अथवा प्रमाणाविना जो त्यांच्याजवळ आलेला आहे, अल्लाहच्या संकेतांमध्ये भांडत आहेत, त्यांच्या मनांत गर्व भरलेला आहे, परंतु ते त्या मोठेपणाप्रत पोहचणार नाहीत ज्याचा ते अभिमान बाळगतात. म्हणून अल्लाहचा आश्रय मागा, तो सर्वकाही पाहतो

८) ज्या संदर्भात ही गोष्ट फर्माविलेली आहे, त्याच्यावर विचार केला असता स्पष्टपणे असे जाणवते की या ठिकाणी 'चुकी'ने अभिप्रेत उतावीळपणाची ती स्थिती होय जी तीव्र विरोधाच्या त्या परिस्थितीत विशेषत: आपल्या साथीदारांची छळणूक पाहून पाहून पैगंबर (स.) यांच्यात निर्माण होत होती. पैगंबर (स.) इच्छित होते की विनाविलंब एखादा चमत्कार असा दाखविला जावा जेणेकरून अश्रद्धावंत मानते व्हावेत अथवा अल्लाहकडून एखादी अशी गोष्ट जलदपणे प्रकट व्हावी जेणेकरून विरोधाचे हे वादळ शांत व्हावे. अशी इच्छा आपल्या जागी काही गुन्हा होता की ज्यासाठी क्षमायाचना व पश्चात्ताप व्यक्त करणे आवश्यक होते असे खचितच नाही. परंतु सर्वोच्च अल्लाहने पैगंबर (स.) यांना उच्चस्थानाने उपकृत केले होते, जो जबरदस्त निर्धार व खंबीरपणा त्या स्थानासाठी आवश्यक होता, त्या दृष्टिने हा किंचितसा उतावीळपणादेखील सर्वोच्च अल्लाहला त्यांच्या प्रतिष्ठेच्या मानाने खालच्या दर्जाचा वाटला. म्हणून फर्माविले गेले की या उणीवेबद्दल आपल्या रबची क्षमा मागा आणि पर्वतासमान अविचलतेनिशी आपल्या भूमिकेवर दृढ राहा जसे की तुमच्यासारख्या महाप्रतिष्ठित माणसाला असले पाहिजे.

आणि ऐकतो. (५१-५६)

आकाशांना आणि पृथ्वीला निर्माण करणे मानवाला निर्माण करण्याच्या तुलनेत खचितच अधिक मोठे कार्य आहे, परंतु बहुतेकजण जाणत नाहीत. आणि असे होऊ शकत नाही की आंधळा आणि डोळस एकसमान होतील आणि श्रद्धावंत व सदाचारी आणि दुराचारी एकसमान ठरतील. परंतु तुम्ही लोक काहीसे कमीच समजता. निश्चितच पुनरुत्थानाची घटिका येणार आहे, तिच्या आगमनात कोणतीच शंका नाही, परंतु बहुतेक लोक मानत नाहीत. (५७-५९)

तुमचा पालनकर्ता सांगतो, ''माझा धावा करा. मी तुमच्या प्रार्थना स्वीकारीन.[९] जे लोक गर्वात येऊन माझ्या उपासनेपासून तोंड फिरवितात, निश्चितच ते अपमानित होऊन नरकामध्ये दाखल होतील.''[१०] (६०)

तो अल्लाहच तर आहे ज्याने तुमच्यासाठी रात्र बनविली जेणेकरून तुम्ही त्यात शांती व समाधान प्राप्त करावे आणि दिवसाला प्रकाशमान केले. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह लोकांवर मोठी मेहेरबानी करणारा आहे परंतु बहुतेक लोक कृतज्ञता मानीत नाहीत. तोच अल्लाह (ज्याने तुमच्यासाठी हे सर्वकाही केले आहे) तुमचा पालनकर्ता आहे. प्रत्येक वस्तूचा निर्माता. त्याच्या व्यतिरिक्त कोणीही उपास्य नाही. मग तुम्ही कोणीकडून बहकविले जात आहात? अशाच प्रकारे ते सर्व लोक बहकविले जात राहिले आहेत, जे अल्लाहच्या संकेतांचा इन्कार करीत असतात. (६१-६३)

तो अल्लाहच तर आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीला निवासस्थान बनविले आणि या आकाशाचे घुमट बनविले. ज्याने तुमचे रूप बनविले आणि फारच चांगले बनविले. ज्याने तुम्हाला शुद्ध वस्तूंची उपजीविका दिली, तोच अल्लाह (ज्याची ही कामे आहेत) तुमचा पालनकर्ता आहे, अतिशय समृद्धशाली आहे तो सृष्टीचा पालनकर्ता, तोच जिवंत आहे, त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही, त्याचाच तुम्ही धावा करा, आपल्या धर्माला

---

९) म्हणजे प्रार्थना स्वीकारण्याचे सर्वाधिकार माझ्याजवळ आहेत, म्हणून तुम्ही इतरांकडे प्रार्थना करू नका तर माझ्याकडे करा.

१०) या आयतीत दोन गोष्टी विशेषकरून लक्ष देण्यासारख्या आहेत. एक अशी की प्रार्थना व उपासना दोन्हींना येथे समानार्थी शब्द म्हणून वापरले गेले आहे कारण पहिल्या वाक्यात ज्या गोष्टीला प्रार्थना या शब्दाने संबोधले आहे, त्यालाच दुसऱ्या वाक्यात उपासना म्हणून सांगितलेले आहे. यावरून हे स्पष्ट झाले की प्रार्थना सर्वस्वी उपासना व उपासनेतील आत्मा होय, दुसरी अशी की अल्लाहकडे प्रार्थना न करणाऱ्यांसाठी 'गर्वात येऊन माझ्या उपासनेपासून तोंड फिरवितात' असे शब्द वापरले गेले आहे. यावरून असे कळते की अल्लाहकडे प्रार्थना करणे भक्तीची आवश्यक निकड आहे व त्यापासून तोंड फिरविणे म्हणजे माणसाचे गर्वात येणे होय.



त्याच्यासाठीच विशुद्ध राखून. सर्व स्तुती सकल जगांचा पालनकर्ता अल्लाहसाठीच आहे. (६४-६५)

हे पैगंबर (स.), या लोकांना सांगा की मला तर त्या अस्तित्वांच्या उपासनेची मनाई केली गेली आहे, ज्यांचा तुम्ही अल्लाहला सोडून धावा करता (मी हे काम कसे करू शकतो) जेव्हा माझ्या पालनकर्त्याकडून माझ्याकडे स्पष्ट प्रमाण आले आहेत, मला आज्ञा दिली गेली आहे की मी सकल जगांच्या पालनकर्त्यापुढे नतमस्तक व्हावे. (६६)

तोच तर आहे ज्याने तुम्हाला मातीपासून निर्माण केले, मग वीर्यापासून, मग रक्ताच्या गोळ्यापासून, मग तो तुम्हाला अर्भकाच्या रूपांत काढतो, मग तुम्हाला वाढवितो जेणेकरून तुम्ही आपल्या पूर्ण शक्तीप्रत पोहोचता. मग आणखी वाढवितो जेणेकरून तुम्ही वृद्धावस्था गाठावी. आणि तुमच्यापैकी एखादा अगोदरच परत बोलाविला जातो. हे सर्वकाही अशासाठी केले जाते की तुम्ही आपली ठरलेली वेळ गाठावी आणि अशासाठी की तुम्हाला वस्तुस्थिती कळावी. तोच आहे जीवन देणारा आणि तोच मृत्यू देणारा आहे. तो जेव्हा कोणत्या गोष्टीचा निर्णय घेतो, केवळ एक आज्ञा देतो की ती होवो आणि ती होते. (६७-६८)

तुम्ही पाहिले काय त्या लोकांना जे अल्लाहच्या वचनांमध्ये वाद घालतात, कोठून ते फिरविले जात आहेत? हे लोक जे या ग्रंथास आणि त्या सर्व ग्रंथांस खोटे लेखत आहेत, जे आम्ही आमच्या प्रेषितांबरोबर पाठविले होते, लवकरच यांना कळून येईल, जेव्हा जोखड यांच्या मानेत असतील आणि साखळ्या, ज्यांनी पकडून ते उकळत्या पाण्याकडे फरफटले जातील आणि नंतर नरकाग्नीत लोटले जातील. मग यांना विचारले जाईल, ''आता कोठे आहेत अल्लाहव्यतिरिक्त ते इतर उपास्य ज्यांना तुम्ही भागीदार करीत होता?'' ते उत्तर देतील, ''हरवले गेले ते आम्हाकडून किंबहुना आम्ही यापूर्वी कोणत्याही वस्तूचा धावा करीत नव्हतो.'' अशा प्रकारे अल्लाह, अश्रद्धावंतांचे मार्गभ्रष्ट असणे प्रमाणित करील. त्यांना सांगण्यात येईल, ''हा असा तुमचा शेवट यासाठी झाला आहे की तुम्ही पृथ्वीत असत्यावर मग्न होता आणि शिवाय त्यावर तुम्ही गर्व करीत होता आता जा नरकाच्या दारांत प्रविष्ट व्हा, सदैव तुम्हाला तेथेच राहावयाचे आहे, फारच वाईट ठिकाण आहे गर्विष्ठांचे.'' म्हणून हे पैगंबर (स.), संयम राखा, अल्लाहचे वचन सत्याधिष्ठित आहे. आता एक तर आम्ही तुमच्यासमोरच यांना त्या वाईट परिणामांचा काही भाग दाखवू, ज्यांची भीती आम्ही यांना दाखवीत आहोत, अथवा (त्यापूर्वी) तुम्हाला दुनियेतून उचलून घ्यावे, परतून यावयाचे तर यांना आमच्याकडेच आहे. (६९-७७)

हे पैगंबर (स.), तुमच्यापूर्वी आम्ही अनेक प्रेषित पाठवून दिलेले आहेत, ज्यांच्यापैकी काहींची माहिती आम्ही तुम्हाला सांगितली आहे व काहींची सांगितलेली नाही. कोणत्याही प्रेषिताचे हे सामर्थ्य नव्हते की अल्लाहच्या आज्ञेविना स्वत:च एखादा

संकेत घेऊन यावा. मग जेव्हा अल्लाहचा आदेश आला तेव्हा सत्याबरहुकुम निर्णय लावला गेला आणि त्यावेळी मिथ्याकारी लोक तोट्यात आले. अल्लाहनेच तुमच्यासाठी ही चतुष्पाद जनावरे बनविली आहेत जेणेकरून त्यांच्यापैकी काहींवर तुम्ही स्वार व्हावे आणि काहींचे मांस खावे. त्यांच्यात तुम्हासाठी अन्य पुष्कळसे लाभ आहेत. ते या कामीसुद्धा येतात की तुमच्या मनात जेथे जाण्याची गरज असेल, तेथे तुम्ही त्यांच्यावर स्वार होऊन पोहचू शकाल. त्यांच्यावरसुद्धा आणि नौकांवरसुद्धा तुम्ही स्वार केले जाता. अल्लाह आपले हे संकेत तुम्हाला दाखवीत आहे, बरे तुम्ही त्याच्या कोणकोणत्या संकेतांचा इन्कार कराल? (७८-८१)

मग काय हे पृथ्वीवर वावरले नाहीत की यांना त्या लोकांचा शेवट दिसला असता जे यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत? ते संख्येत यांच्यापेक्षा जास्त होते, यांच्यापेक्षा अधिक शक्तिशाली होते आणि पृथ्वीवर यांच्यापेक्षा जास्त वैभवशाली अवशेष सोडून गेले आहेत. जी काही कमाई त्यांनी केली होती, शेवटी ती त्यांच्या कोणत्या उपयोगी पडली बरे? जेव्हा त्यांचे प्रेषित त्यांच्याकडे स्पष्ट प्रमाण घेऊन आले तेव्हा ते त्या ज्ञानातच मग्न राहिले जे त्यांच्या स्वत:जवळ होते आणि मग त्या गोष्टीच्या फेऱ्यात आले जिची ते थट्टा करीत असत. जेव्हा त्यांनी आमचा प्रकोप पाहिला तेव्हा ते म्हणाले की आम्ही ज्याचा कोणीही भागीदार नाही अशा एकमेव अल्लाहला मानले आणि आम्ही इन्कार करतो त्या सर्व उपास्यांचा ज्यांना आम्ही त्याचा भागीदार ठरवीत होतो. परंतु आमचा प्रकोप पाहिल्यानंतर त्यांची श्रद्धा त्यांच्यासाठी काहीही लाभदायक ठरू शकत नव्हती, कारण हाच अल्लाहचा ठरलेला शिरस्ता आहे जो सदैव त्याच्या दासांमध्ये जारी राहिला आहे, आणि त्यावेळी अश्रद्धावंत लोक तोट्यात आले. (८२-८५)



# ४१ सूरह हामीऽऽम अस्सजदा

*(मक्काकालीन, वचने ५४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हामीऽऽम, ही परमदयाळू व परमकृपाळू ईश्वराकडून अवतरलेली वस्तू आहे, एक असा ग्रंथ जिची संकेतवचने खूप उघड करून सांगितली गेली आहेत, अरबी भाषेतील कुरआन, त्या लोकांसाठी जे ज्ञान बाळगतात, खुशखबरी देणारा व भय दाखविणारा. (१-४-)

परंतु या लोकांपैकी बहुतेकांनी त्याकडून तोंड फिरविले आणि ते ऐकून घेत नाहीत. म्हणतात, ''ज्या गोष्टीकडे तू आम्हाला बोलवीत आहेस; त्याच्यासाठी आमच्या हृदयांवर आवरणे चढलेली आहेत, आमचे कान बधीर झाले आहेत, आणि आमच्या व तुझ्या दरम्यान एक पडदा आड आहे. तू आपले काम कर, आम्ही आपले काम करीत राहू.'' (-४-५)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''मी तर एक मनुष्य आहे तुम्हासारखा. मला दिव्यबोधाद्वारे सांगण्यात येते की तुमचा उपास्य तर केवळ एकच उपास्य आहे, म्हणून तुम्ही सरळ त्याच्याकडेच रोख ठेवा, आणि त्याच्याकडे क्षमायाचना करा. विनाश आहे त्या अनेकेश्वरवाद्यांसाठी, जे जकात देत नाहीत आणि परलोकाचा इन्कार करणारे आहेत. उरले ते लोक ज्यांनी मान्य केले आणि सत्कृत्ये केली, त्यांच्यासाठी निश्चितपणे असा मोबदला आहे ज्याचा क्रम कधीही खंडित होणार नाही. (६-८)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, काय तुम्ही त्या ईश्वराशी द्रोह करता आणि दुसऱ्यांना त्याचा तुल्यबळ ठरविता ज्याने पृथ्वीला दोन दिवसांत बनवून टाकले? तोच तर सर्व जगवासियांचा पालनकर्ता आहे. त्याने (पृथ्वीला अस्तित्वात आणल्यानंतर) वरून तिच्यावर पर्वत रोवले आणि तिच्यात समृद्धी ठेवली आणि तिच्यात सर्व मागणाऱ्यांसाठी[१] प्रत्येकाच्या मागणी व गरजेप्रमाणे योग्य अंदाजाने अन्नधान्याची साधने उपलब्ध करून दिली. ही सर्व कामे चार दिवसांत उरकली. मग त्याने आकाशाकडे लक्ष दिले[२] जे त्यावेळी केवळ धुरासमान होते. त्याने आकाश व पृथ्वीला सांगितले, ''अस्तित्वात या, मग तुमची इच्छा असो वा नसो.'' दोघांनी सांगितले, ''आम्ही आलो आज्ञाधारकांप्रमाणे.'' तेव्हा त्याने दोन दिवसांच्या आत सात आकाश बनवून टाकले,

१) म्हणजे त्या सर्व निर्मितीसाठी जिला आहाराची आवश्यकता आहे.

२) अर्थ असा नाही की पृथ्वी बनविल्यानंतर व त्यात वास्तव्याची व्यवस्था केल्यानंतर त्याने आकाशांना बनविले, येथे मग हा शब्द काळक्रम म्हणून नव्हे तर वर्णनक्रमासाठी आलेला आहे, नंतरच्या वाक्याद्वारे ही गोष्ट स्पष्ट होते.

आणि प्रत्येक आकाशांत त्याचा कायदा दिव्यबोध केला. आणि दुनियेच्या आकाशाला आम्ही दिव्यांनी सुशोभित केले व त्याला खूप सुरक्षित केले. हे सर्वकाही एका जबरदस्त ज्ञानी अस्तित्वाची योजना आहे. (९-१२)

आता जर हे लोक तोंड फिरवीत असतील तर यांना सांगा, मी तुम्हाला त्याच प्रकारच्या एका अकस्मात कोसळणाऱ्या प्रकोपाचे भय दाखविले जसा आद व समूदवर कोसळला होता. जेव्हा प्रेषित त्यांच्याजवळ पुढून व पाठीमागून सर्व बाजूंनी आले आणि त्यांना समजाविले की अल्लाहशिवाय कोणाचीही भक्ती करू नका तेव्हा त्यांनी सांगितले, "आमच्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर दूत पाठविले असते, म्हणून आम्ही त्या गोष्टीला मानीत नाही ज्यासाठी तुम्ही पाठविले गेले आहात." (१३-१४)

आदची स्थिती अशी होती की ते पृथ्वीमध्ये कोणत्याही अधिकाराशिवाय मोठे बनून बसले. आणि म्हणू लागले, "कोण आहे आमच्यापेक्षा जास्त बलवान." त्यांना हे सुचले नाही की ज्या अल्लाहने त्यांना निर्माण केले आहे, तो त्यांच्यापेक्षा अधिक बलवान आहे? हे आमच्या संकेतांचा इन्कार करीत राहिले, सरतेशेवटी आम्ही काही अशुभ दिवसांत भयंकर वादळी वारे त्यांच्यावर पाठविले, जेणेकरून त्यांना ऐहिक जीवनातच अपमान व नामुष्कीच्या प्रकोपाचा आस्वाद द्यावा, आणि परलोकाचा प्रकोप तर त्याहूनही जास्त अपमानजनक आहे, तेथे कोणीही त्यांना मदत करणारा नसेल. (१५-१६)

उरले समूद तर त्यांच्यासमोर आम्ही सरळमार्ग प्रस्तुत केला परंतु त्यांनी मार्गाला पाहण्याऐवजी अंध बनून राहणेच पसंत केले. सरतेशेवटी त्यांच्या कर्तृत्वामुळे अपमानजनक प्रकोप त्यांच्यावर कोसळला. आणि आम्ही त्या लोकांना वाचविले ज्यांनी ईमान आणले होते आणि पथभ्रष्टता व दुराचारापासून अलिप्त राहत होते. (१७-१८)

आणि जरा त्यावेळेची कल्पना करा जेव्हा अल्लाहचे हे शत्रू नरकाग्नीकडे जाण्यासाठी घेरून आणले जातील.[३] यांच्यापुढे गेलेल्यांना नंतर येणाऱ्यांच्या आगमनापर्यंत रोखून धरले जाईल,[४] मग जेव्हा सर्वजण तेथे पोहचतील तेव्हा त्यांचे कान व त्यांचे डोळे आणि त्यांच्या

३) मुळात जेव्हा ते अल्लाहच्या न्यायालयात हजर होण्यासाठी घेरून आणले जातील, असा सांगणयाचा उद्देश आहे, परंतु हे म्हणणे अशा शब्दांत सांगितले गेले आहे की दोजख-नरककडे जाण्यासाठी घेरून आणले जातील, कारण त्यांचा शेवट सरतेशेवटी दोजखात जाणे असाच होणार आहे.

४) म्हणजे असे घडणार नाही की एकेक वंश व एकेका पिढीचा हिशेब करून त्यांचा निकाल एकामागून एक दिला जात राहील तर अगोदरच्या व नंतरच्या सर्व पिढ्या एकाच वेळी गोळा केल्या जातील व त्या सर्वांचा एकत्रितपणे हिशेब घेतला जाईल, कारण नंतर येणाऱ्या प्रत्येक पिढीचे सत्कर्मी अथवा दुष्कर्मी असण्यात तिच्या अगोदर होऊन गेलेल्या पिढीने मागे सोडलेल्या धार्मिक व नैतिक वारसाच्या अंशाचा समावेश असतो.



शरीराची त्वचा त्यांच्यावर साक्ष देतील की ते जगात काय काय करीत राहिले आहेत. ते आपल्या शरीराच्या त्वचांना म्हणतील, "तुम्ही आमच्याविरूद्ध साक्ष का दिली?" त्या उत्तर देतील, "आम्हाला त्याच अल्लाहने वाणी दिली आहे ज्याने प्रत्येक वस्तूला बोलके केले आहे. त्यानेच तुम्हाला पहिल्यांदा निर्माण केले होते आणि आता त्याच्याकडेच तुम्ही परत आणले जात आहात. तुम्ही जगात अपराध करतेवेळी जेव्हा लपत होता तेव्हा तुम्हाला याचा विचार नव्हता की कधी तुमचे स्वत:चे कान, आणि तुमचे डोळे व तुमच्या शरीराच्या त्वचा तुम्हावर साक्ष देतील किंबहुना तुम्ही तर असे समजला होता की तुमच्या पुष्कळशा कृत्यांची अल्लाहलासुद्धा खबर नाही. तुमची हीच धारणा जी तुम्ही आपल्या पालनकर्त्यासंबंधी केली होती, तिनेच तुम्हाला बुडविले आणि तिच्याचमुळे तुम्ही तोट्यात आला." अशा स्थितीत ते सहन करो (अथवा न करो); अग्नीच त्यांचे ठिकाण असेल आणि जर रुजू होण्याची संधी इच्छितील तर कोणतीही संधी त्यांना दिली जाणार नाही. आम्ही त्यांच्यावर असले सोबती नियुक्त केले होते, जे त्यांना पुढे व मागे प्रत्येक वस्तू शोभिवंत बनवून दाखवीत होते. सरतेशेवटी त्यांच्यावरसुद्धा तोच प्रकोपाचा निर्णय लागू झाल्याशिवाय राहिला नाही जो त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या जिन्न आणि माणसाच्या समूहावर लागू झाला होता, निश्चितच ते तोट्यात राहणारे होते. (१९-२५)

हे सत्याचा इन्कार करणारे म्हणतात, "या कुरआनला कदापि ऐकू नका आणि जेव्हा हा ऐकविला जाईल तेव्हा त्यात व्यत्यय आणा, कदाचित अशाप्रकारे तुम्ही वर्चस्व मिळवाल." या सत्य नाकारणाऱ्यांना आम्ही कठोर शिक्षेचा आस्वाद देणारच आणि ज्या अत्यंत वाईट कारवाया हे करीत राहिले आहेत, त्यांचा पुरेपूर बदला यांना देऊ. तो नरक आहे जो अल्लाहच्या शत्रूंना बदल्यात मिळेल. त्यातच सदासर्वदा त्यांचे वास्तव्य राहील. ही शिक्षा आहे त्या अपराधाची की ते आमच्या संकेतांचा इन्कार करीत राहिले तेथे हे अश्रद्धावंत म्हणतील की, "हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला दाखव जरा त्या जिन्नांना व माणसांना ज्यांनी आम्हाला मार्गभ्रष्ट केले होते, आम्ही त्यांना पायाखाली तुडवून टाकू जेणेकरून ते खूप फटफजीत व अपमानित होतील." (२६-२९)

ज्या लोकांनी सांगितले की, अल्लाह आमचा पालनकर्ता आहे आणि मग ते त्यावर दृढ राहिले,[५] निश्चितच त्यांच्यावर दूत उतरत असतात आणि त्यांना म्हणतात की,

५) म्हणजे केवळ योगायोगे एखादे वेळी अल्लाहला आपला पालनकर्ता सांगून थांबले असे नाही, तसेच अल्लाहला आपला पालनकर्ता म्हणून सांगतही राहावे आणि त्याच्याबरोबर इतरांना आपला पालनकर्ता ठरवीतही राहावे असल्या चुकीतदेखील ते पडले नाहीत. तर एकदाची ही श्रद्धा मान्य केल्यानंतर मग उभ्या आयुष्यात ते त्यावर ठाम राहिले. त्याविरूद्ध असलेली कोणतीही श्रद्धा स्वीकारली नाही की त्या श्रद्धेबरोबर असत्य श्रद्धेची सरमिसळ केली नाही. तसेच आपल्या व्यवहारी जीवनातदेखील एकेश्वरवादासंबंधीच्या आवश्यक गोष्टी पार पाडीत राहिले.

“भिऊही नका व दु:खदेखील करू नका आणि खूश व्हा त्या स्वर्गाच्या खुशखबरीने जिचे वचन तुम्हाला दिले गेले आहे. आम्ही या जगाच्या जीवनातसुद्धा तुमचे सोबती आहोत आणि परलोकातसुद्धा. तेथे जी काही इच्छा कराल तुम्हाला मिळेल आणि प्रत्येक गोष्ट जिची तुम्ही मनिषा बाळगाल, ती तुमची होईल, असा आहे मेजवानीसरंजाम त्या अस्तित्वाकडून जो क्षमाशील व दयावान आहे.” (३०-३२)

आणि त्या माणसाच्या वचनापेक्षा चांगले वचन अन्य कोणाचे असेल ज्याने अल्लाहकडे बोलाविले आणि सत्कर्म केले आणि म्हटले की मी ‘मुस्लिम’ (आज्ञाधारी) आहे. (३३)

आणि हे पैगंबर (स.), भलाई आणि दुष्टता एकसमान नाहीत. तुम्ही दुष्टतेचे त्या भलाईद्वारे निरसन करा जी अत्युत्तम असेल. तुम्ही पाहाल की तुमच्याशी ज्याचे शत्रुत्व होते, तो जिवलग मित्र बनला आहे. हा गुण लाभत असतो त्या लोकाना जे संयम बाळगतात, आणि हे स्थान प्राप्त होत असते त्या लोकांना जे मोठे भाग्यवान असतात. आणि जर शैतानकडून एखादी चेतवणूक होत असल्याचे तुम्हाला वाटत असेल तर अल्लाहचा आश्रय मागा.[६] तो सर्वकाही ऐकतो व जाणतो. (३४-३६)

अल्लाहच्या संकेतांपैकी आहेत ही रात्र आणि दिवस व सूर्य आणि चंद्र. सूर्य आणि चंद्रापुढे नतमस्तक होऊ नका, त्या अल्लाहपुढे नतमस्तक व्हा ज्याने यांना निर्माण केले आहे, जर खरोखरीच तुम्ही त्याची उपासना करणारे आहात. परंतु जर हे लोक गर्वात येऊन आपल्याच गोष्टीवर अडून बसले तर पर्वा नाही. जे दूत तुझ्या पालनकर्त्याच्या जवळ आहेत ते रात्रंदिवस त्याचे पावित्र्यगान करीत आहेत आणि कधीही थकत नाहीत. (३७-३८)

आणि अल्लाहच्या संकेतांपैकी एक हेही आहे की, जमीन ओसाड पडलेली आहे, मग आम्ही तिच्यावर पाण्याचा वर्षाव करताच अकस्मातपणे ती तजेलदार होते आणि फुलते. निश्चितच जो ईश्वर मृत जमिनीला जीवित करतो, तो मृतांनादेखील जीवन प्रदान करणारा आहे. निश्चितपणे तो प्रत्येक वस्तूवर प्रभुत्व राखतो. (३९)

जे लोक आमच्या संकेतचिन्हांना उलट अर्थ देतात, ते आम्हापासून काही लपलेले नाहीत. स्वत:च विचार करा की तो मनुष्य अधिक चांगला आहे जो अग्नीत टाकला जाणार

---

६) शैतानाच्या चेतवणुकीने अभिप्रेत क्रोधित करणे होय. जेव्हा माणसाला असे वाटत असेल की शिवीगाळ करणाऱ्या आणि दोषारोपण करणाऱ्या विरोधकांच्या गोष्टीमुळे मनात क्रोध उत्पन्न होत आहे व जशात तसे उत्तर देण्यासाठी प्रवृत्ती तत्पर होत आहे तेव्हा तुरंत असे समजावे की हा शैतान आहे जो त्याला त्याच्या असभ्य विरोधकांच्या स्तरापर्यंत खाली येण्याचे प्रोत्साहन देत आहे.



आहे अथवा तो, जो पुनरुत्थानाच्या दिवशी अभय स्थितीत हजर होईल? करीत राहा जसे काही तुम्हाला वाटेल तसे, तुमच्या सर्व कारवाया अल्लाह पाहात आहे हे ते लोक आहेत ज्यांच्यासमोर उपदेशवाणी आली तर यांनी ती मानण्यास नकार दिला, परंतु वस्तुस्थिती अशी आहे की हा एक जबरदस्त ग्रंथ आहे, असत्य समोरूनही याच्यावर येऊ शकत नाही आणि पाठीमागूनसुद्धा.[७] ही एका बुद्धिमान व स्तुत्यकडून अवतरलेली वस्तू आहे. (४०-४२)

हे पैगंबर (स.), तुम्हाला जे काही सांगितले जात आहे त्यापैकी कोणतीही अशी गोष्ट नाही जी तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या प्रेषितांना सांगितली गेलेली नाही. नि:संदेह तुमचा पालनकर्ता मोठा क्षमाशील आहे, आणि याचबरोबर भयंकर यातनादायक शिक्षा देणारासुद्धा आहे. (४३)

जर आम्ही याला अरबी व्यतिरिक्त भाषेचा कुरआन बनवून पाठविले असते तर हे लोक म्हणाले असते, “यांची वचने स्पष्ट करून का सांगितली गेली नाहीत? काय अजब गोष्ट आहे की वाणी तर अरबेतर आहे आणि श्रोता अरबी.”[८] यांना सांगा, हा कुरआन

---

७) ‘समोरूनही’ न येऊ शकण्याचा अर्थ असा की कुरआनवर समोरासमोर हल्ला करून जर एखादा मनुष्य त्यातील एखाद्या गोष्टीला चूक आणि एखाद्या शिकवणीला असत्य व वाईट सिद्ध करू इच्छित असेल तर त्यात तो यशस्वी होऊ शकत नाही. ‘पाठीमागून’ न येऊ शकण्याचा अर्थ असा की कयामत-अंतिम दिनापर्यंत कधीही व कोणतेही सत्य असे उघड होऊ शकत नाही जे कुरआनने प्रस्तुत केलेल्या सत्याविरूद्ध असावे. कोणतीही अनुभूती वा निरीक्षण असे असू शकत नाही जे कुरआनने श्रद्धा, नीती-नियम व कायदे, संस्कृती, अर्थकारण व समाजकारण आणि नागरी व्यवस्थेबाबतीत माणसाला जे मार्गदर्शन केले आहे ते चूक आहे, असे सिद्ध करावे.

८) पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचा मुकाबला ज्या हेकेखोरांनिशी केला जात होता, त्याचा हा एक नमुना आहे. अश्रद्धावंत म्हणत असत की मुहम्मद (स.) अरब आहेत. हे जर अरबी भाषेत कुरआन प्रस्तुत करीत आहेत तर ही वाणी त्यांनी स्वत:च रचलेली नसून ईश्वराने यांच्यावर उतरविली आहे हे कसे मान्य केले जाऊ शकते. ही वाणी ईश्वराकडून अवतरित झालेली वाणी तर त्याचवेळी मान्य केली जाऊ शकते जेव्हा की जिला हे जाणत नाहीत अशा एखाद्या भाषेत अकस्मातपणे फरडे भाषण करण्यास यांनी प्रारंभ केला असता, उदा. फारसी, अथवा रोमन अथवा ग्रीक. यावर सर्वोच्च अल्लाह फर्मावितो की, आता यांच्या स्वत:च्या भाषेत कुरआन पाठविला गेला आहे की ज्याला हे समजू शकावेत तर हा असा आक्षेप घेत आहेत की एका अरबद्वारे अरबी भाषेत ही वाणी का उतरविली गेली? परंतु जर एखाद्या दुसऱ्या भाषेत हा कुरआन पाठविला गेला असता तर त्यावेळी याच लोकांनी आक्षेप घेतला असता की हा मामलाही अजबच आहे. अरब लोकांत एका अरब माणसाला प्रेषित बनवून पाठविले गेले आहे परंतु वाणी त्यावर अशा भाषेत उतरविली गेली आहे, जिला प्रेषितही समजत नाही व लोकही नाही.

तर श्रद्धावंतांसाठी मार्गदर्शन व आरोग्यदायी आहे, परंतु जे लोक श्रद्धावंत नाहीत त्यांच्यासाठी कानाचा बहिरेपणा आणि डोळ्यांचे अंधत्व आहे. त्यांची स्थिती तर अशी आहे जणू त्यांना दुरून हांक दिली जात असेल. यापूर्वी मूसा (अ.) ला आम्ही ग्रंथ दिला होता व त्याच्याबाबतीतसुद्धा हेच मतभेद निर्माण झाले होते. जर तुझ्या पालनकर्त्याने अगोदरच एक गोष्ट ठरवून टाकलेली नसती तर या मतभेद करणाऱ्यांच्या दरम्यान निर्णय लावला गेला असता. आणि वस्तुस्थिती अशी आहे की हे लोक त्याच्याकडून अत्यंत शंकेत गुरफटलेले असल्याने अस्वस्थ झाले आहेत. (४४-४५)

जो कोणी सत्कर्म करील स्वत:साठीच चांगले करील, जो दुष्कर्म करील त्याचे अरिष्ट त्याच्यावरच येईल, आणि तुझा पालनकर्ता दासांसाठी अत्याचारी नाही. (४६)

त्या घटनेचे ज्ञान[९] अल्लाहकडेच रुजू होते, तोच त्या सर्व फळांना जाणतो जे आपल्या मोहोरांतून निघतात, त्यालाच माहीत आहे की कोणती मादी गर्भवती झाली आहे आणि कोण बाळंत झाली आहे. मग त्या दिवशी तो या लोकांना हांक देईल की कोठे आहेत ते माझे भागीदार? हे म्हणतील, ''आम्ही सांगितले आहे, आज आमच्यापैकी कोणी याची साक्ष देणार नाही.'' त्यावेळी ते सर्व उपास्य यांच्याकडून हरवले जातील ज्यांचा हे त्यापूर्वी धावा करीत होते. आणि हे लोक समजून घेतील की यांच्यासाठी आता कोणतेही आश्रयस्थान नाही. (४७-४८)

मनुष्य कधीही आपल्या भल्यासाठी प्रार्थना करताना थकत नाही, आणि जेव्हा त्याच्यावर एखादे अरिष्ट येते तेव्हा तो निराश आणि हताश होतो. परंतु संकटकाळ निघून जाताक्षणीच जेव्हा आम्ही त्याला आमच्या कृपेचा आस्वाद देतो तेव्हा तो म्हणतो, ''मी यालाच पात्र आहे. आणि मला नाही वाटत की पुनरुत्थान कधी येईल. परंतु जर खरोखरीच मी माझ्या पालनकर्त्याकडे परतविला गेलो तर तेथे सुद्धा मौजमजा करीन.'' वास्तविकत: द्रोह करणाऱ्यांना आम्ही खचितच हे दाखविल्याशिवाय राहणार नाही की ते काय करून आले आहेत आणि त्यांना आम्ही मोठ्या घृणास्पद प्रकोपाचा आस्वाद देऊ. (४९-५०)

माणसाला जेव्हा आम्ही देणगी देतो तेव्हा तो तोंड फिरवितो आणि ऐटीत येतो. आणि जेव्हा त्याला एखादे संकट स्पर्श करते तेव्हा तो लांबलचक प्रार्थना करू लागतो. (५१)

हे पैगंबर (स.) यांना सांगा, कधी तुम्ही असाही विचार केला की जर खरोखरच हा कुरआन अल्लाहकडूनच असला आणि तुम्ही याचा इन्कार करीत राहिला तर त्या

९) अभिप्रेत आहे प्रलय.



माणसापेक्षा मोठा पथभ्रष्ट अन्य कोण बरे असेल जो याच्या विरोधात दूरवर निघून गेला असेल? (५२)

लवकरच आम्ही यांना आमचे संकेत बाह्यजगतातही दाखवू आणि त्यांच्या अंतरंगातसुद्धा, येथपावेतो की यांच्यावर ही गोष्ट उघड होईल की हा कुरआन खरोखरीच सत्याधिष्ठित आहे. काय ही गोष्ट पुरेशी नाही की तुझा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीचा साक्षी आहे? जाणून असा, हे लोक आपल्या पालनकर्त्याच्या भेटीसंबंधी शंका बाळगतात. ऐकून असा, तो प्रत्येक वस्तूला वेढून आहे.[१०] (५३-५४)

**१०)** म्हणजे कोणतीही गोष्ट त्याच्या पकडीच्या बाहेरही नाही व त्याच्या ज्ञानापासून लपूनही असलेली नाही.

# ४२ सूरह अश्शूरा

*(मक्काकालीन, वचने ५३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हामीऽऽम. ऐऽऽन सीऽऽन क़ाऽऽफ, अशाच प्रकारे प्रभुत्वसंपन्न व बुद्धिमान अल्लाह तुमच्याकडे व तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या (प्रेषितां) कडे दिव्यबोध[१] पाठवीत राहिला आहे. आकाशात आणि पृथ्वीत जे जे काही आहे त्याचेच आहे, तो उच्चतर व महान आहे. दूर नव्हे की आकाश वरून फाटले असेल.[२] दूत आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबरच पावित्र्यगान करीत असतील आणि पृथ्वीवासियांसाठी क्षमेची याचना करीत असतील. जाणून असा की खरोखरच अल्लाह क्षमाशील व दयावान आहे. ज्या लोकांनी त्याला सोडून काही अन्य आपले वाली बनविले आहेत,[३] अल्लाहच त्यांच्यावर निरीक्षक आहे, तुम्ही त्यांचे हवालदार नाही. (१-६)

होय, अशाच प्रकारे हे पैगंबर (स.), हा अरबी कुरआन आम्ही तुमच्याकडे 'वह्य' (दिव्यबोध) केला आहे, जेणेकरून तुम्ही वस्त्यांचे केंद्र (मक्का शहर) आणि त्याच्या भोवती राहणाऱ्यांना खबरदार करावे, आणि एकत्र होण्याच्या दिवसाचे भय दाखवावे,

१) म्हणजे ज्या गोष्टी कुरआनात सांगितल्या जात आहेत याच गोष्टी अल्लाहने दिव्यबोधाद्वारे आपल्या प्रेषित हजरत मुहम्मद (स.) यांच्यावर उतरविल्या आहेत. पूर्वीच्या पैगंबरांवरदेखील तो याच गोष्टी उतरवीत राहिला आहे.

२) म्हणजे ईश्वराच्या ईशत्वात कोणत्याही निर्मितीला कुठल्याही स्वरूपात भागीदार ठरविणे ही काही क्षुल्लक बाब नव्हे. ही अशी भयंकर गोष्ट आहे की यासाठी तर आकाशाचे फाटून पडणे ही गोष्टदेखील दुरापास्त नाही.

३) मूळ अरबी भाषेत 'अवलिया' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. त्या भाषेत या शब्दाचा अर्थ फार व्यापक आहे. खोट्या उपास्यांसंबंधी मार्गभ्रष्ट माणसांच्या ज्या विभिन्न श्रद्धा आणि बऱ्याचशा वेगवेगळ्या कार्यप्रणाली आहेत, त्या सर्वांना महान कुरआनात 'अल्लाहशिवाय इतरांना आपले वाली बनवणे' असे संबोधिले गेले आहे. कुरआननुसार मनुष्य त्या व्यक्तीला आपला वाली (वली) बनवितो (१) ज्याच्या सांगण्यानुसार त्याने चालावे, ज्याच्या आदेशाची अंमलबजावणी करावी, ज्याच्या ठरवून दिलेल्या पद्धती, रसम, रिवाज आणि कायदे कानूनचे अनुकरण करावे. (२) ज्याच्या मार्गदर्शनावर त्याने विश्वास ठेवावा व तो त्याला सरळमार्ग दाखविणारा व चुकीपासून वाचविणारा आहे असे मानावे. (३) ज्यासंबंधी त्याचा समज असा असावा की मी जगात हवे ते करीत राहावे, तो मला त्याच्या वाईट परिणामांपासून व जर ईश्वर आहे व आखिरत-परलोकदेखील घडणार आहे तर, तो त्यातील प्रकोपापासून वाचवील, आणि (४) ज्याच्यासंबंधी त्याचा असा समज असावा की तो जगात निसर्गातील पद्धतीने त्याला सहाय्य करतो, आपत्ती व संकटांपासून त्याचे संरक्षण करतो, त्याला रोजगार प्राप्त करून देतो, संतती देतो, नवस पूर्ण करतो आणि इतर सर्व प्रकारच्या गरजा भागवितो.



ज्याच्या आगमनात कोणतीही शंका नाही. एका गटाला स्वर्गामध्ये जावयाचे आहे आणि दुसऱ्या गटाला नरकात. (७)

जर अल्लाहने इच्छिले असते तर या सर्वांना एकच 'धार्मिक समुदाय' बनविले असते, परंतु तो ज्याला इच्छितो त्याला आपल्या कृपाछत्राखाली घेतो, आणि अत्याचाऱ्यांचा कोणी वालीही नाही व सहायकही नाही. काय हे (इतके नादान आहेत की) यांनी त्याला सोडून इतर वाली बनवून ठेवलेले आहेत? वाली तर अल्लाहच आहे. तोच मृतांना जीवित करतो आणि तो प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. (८-९)

तुमच्या[४] दरम्यान ज्या बाबतीतही मतभेद असेल, त्याचा निर्णय लावणे अल्लाहचे काम होय. तोच अल्लाह माझा पालनकर्ता आहे, त्याच्यावरच मी भिस्त ठेवली आणि त्याच्याकडेच मी रुजू होतो. आकाशांला व पृथ्वीला बनविणारा, ज्याने तुमच्या सजातीपासून तुमच्यासाठी युगल निर्माण केली आणि त्याचप्रमाणे चतुष्पादांनासुद्धा (त्यांचेच सजातीय) युगल बनविली आणि अशा प्रकारे तो तुमचे वंश पसरवितो. सृष्टीतील कोणतीही वस्तू त्याच्या समान नाही, तो सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे. आकाशांच्या व पृथ्वीच्या खजिन्यांच्या किल्ल्या त्याच्याजवळ आहेत, ज्याला इच्छितो विपूल उपजीविका देतो आणि ज्याला इच्छितो त्याला बेताची देतो. त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे. (१०-१२)

त्याने तुमच्यासाठी धर्माची तीच पद्धत निश्चित केली आहे जिची आज्ञा त्याने नूह (अ.) ला दिली होती आणि जिला (हे मुहम्मद (स.)) आता तुमच्याकडे आम्ही दिव्यबोधाद्वारे पाठविले आहे, आणि जिचा आदेश आम्ही इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) व ईसा (अ.) यांना दिलेला आहे, या ताकीदसह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात फाटाफूट होऊ देऊ नका. हीच गोष्ट या अनेकेश्वरवाद्यांना अत्यंत अप्रिय झाली आहे, जिचे (हे मुहम्मद (स.)) तुम्ही यांना आमंत्रण देत आहात. अल्लाह ज्याला इच्छितो आपला बनवितो आणि तो आपल्याकडे येण्याचा मार्ग त्यालाच दाखवितो जो त्याच्याकडे रुजू होत असतो. (१३)

लोकांत जी फाटाफूट उद्भवली ती यानंतर उद्भवली की त्यांच्यापाशी ज्ञान आलेले होते, आणि हे यामुळे झाले की ते आपसात एक दुसऱ्याची आगळीक करू इच्छित होते.

४) येथून आयत क्र. १२ पर्यंत सारा मजकूर जरी सर्वोच्च अल्लाहकडून दिव्यबोध असला तरी त्यातील वक्ता सर्वोच्च अल्लाह नसून अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) आहेत. जणू प्रतापशाली अल्लाह आपल्या पैगंबराला आदेश देत आहे की तुम्ही असे घोषित करा. याचे उदा. सूरह फातिहा आहे. ती वाणी तर अल्लाहची आहे परंतु दास आपल्यातर्फे ती प्रार्थना म्हणून अल्लाहच्या हुजूरात सादर करतात.

जर तुझ्या पालनकर्त्याने अगोदरच हे फर्माविले नसते की एका निश्चित वेळेपर्यंत निर्णय स्थगित ठेवला जाईल तर त्यांचा निर्णय केव्हाच केला गेला असता आणि वस्तुस्थिती अशी आहे की अगोदर होऊन गेलेल्यानंतर जे लोक ग्रंथाचे वारस बनविले गेले, ते त्याकडून मोठ्या अस्वस्थजनक शंकेत गुरफटलेले आहेत.[५] (१४)

(ज्या अर्थी अशी स्थिती निर्माण झाली आहे) म्हणून हे मुहम्मद (स.), आता तुम्ही त्याच धर्माकडे आमंत्रित करा आणि जशी तुम्हाला आज्ञा दिली गेली आहे त्यावर भक्कमपणे कायम राहा आणि या लोकांच्या इच्छेचे अनुसरण करू नका, आणि यांना सांगा की, ''अल्लाहने जो ग्रंथही अवतरला आहे, मी त्यावर श्रद्धा ठेवली. मला आज्ञा दिली गेली आहे की मी तुमच्या दरम्यान न्याय करावा. अल्लाहच आमचाही पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्तासुद्धा. आमची कृत्ये आमच्यासाठी आहेत व तुमची कृत्ये तुमच्यासाठी. आमच्या दरम्यान कोणताही तंटा नाही.[६] अल्लाह एके दिवशी आम्हा सर्वांना एकत्र करील आणि त्याच्याकडेच सर्वांना जावयाचे आहे.'' (१५)

अल्लाहच्या आमंत्रणाला साद दिल्यानंतर जे लोक (साद देणाऱ्यांशी) अल्लाहच्या बाबतीत वाद घालीत असतात, त्यांची हुज्जतखोरी त्यांच्या पालनकर्त्याजवळ खोटी आहे आणि त्यांच्यावर त्याचा क्रोध आहे आणि त्यांच्यासाठी भयंकर प्रकोप आहे. (१६)

तो अल्लाहच आहे ज्याने सत्यानिशी हा ग्रंथ आणि तराजू अवतरला आहे.[७] आणि तुम्हाला काय माहीत कदाचित निर्णयाची घटका जवळच येऊन ठेपली असेल. जे लोक तिच्या येण्यावर श्रद्धा ठेवीत नाहीत; ते तर तिच्यासाठी घाई करतात, परंतु जे तिच्यावर श्रद्धा ठेवतात ते तिला भितात आणि जाणतात की ती निश्चितपणे येणार आहे. चांगले ऐकून घ्या, जे लोक त्या घटकेच्या आगमनात शंका निर्माण करणारे वादविवाद करतात, ते मार्गभ्रष्टतेत फार दूरवर गेले आहेत. (१७-१८)

अल्लाह आपल्या दासांवर फार मेहरबान आहे. ज्याला जे काही इच्छितो देतो,

५) म्हणजे नंतरच्या पिढ्यांना अशी खात्री राहिली नाही की जे ग्रंथ त्यांना पोहचले आहेत ते किती प्रमाणात आपल्या मूळ व खऱ्या स्वरूपात आहेत तसेच किती प्रमाणात त्यांच्यात भेसळ होत गेली आहे. त्यांच्या प्रेषितांनी कोणती शिकवण आणली होती, हेदेखील ते विश्वासपूर्ण रीतीने जाणत नाहीत. त्यांच्या येथील प्रत्येक गोष्ट शंकास्पद आहे व मनात गोंधळ निर्माण करीत आहे.

६) म्हणजे योग्य ते प्रमाण व युक्तीवादांनी गोष्ट समजाविण्याचे जे कर्तव्य होते ते आम्ही पूर्ण केले आहे. आता उगीचच काथ्याकुट करीत बसण्याने काय हशील! तुम्ही भांडण केले तरीपण आम्ही भांडणाला तयार नाही.

७) 'तराजू'ने अभिप्रेत अल्लाहची 'शरीअत' आहे. ती तराजू, समान वजन करून अचूक आणि चूक, सत्य व असत्य, अन्याय आणि न्याय, रास्त आणि वक्र यांच्यातील फरक स्पष्ट करते.



आणि तो मोठा शक्तिशाली आणि जबरदस्त आहे. जो कोणी परलोकाची शेती इच्छितो त्याच्या शेतीत आम्ही वाढ करतो, आणि जो जगाची शेती इच्छितो त्याला जगातूनच देतो. परंतु परलोकात त्याचा कोणताही वाटा नाही. (१९-२०)

काय हे लोक काही ईश्वराचे असले भागीदार ठेवतात ज्यांनी यांच्यासाठी धर्माचे स्वरूप असलेली एक अशी पद्धत निश्चित केली आहे ज्याची अल्लाहने परवानगी दिलेली नाही?[८] जर निर्णयाची गोष्ट ठरली गेली नसती तर यांचा खटला निकालात काढला गेला असता. खचितच या अत्याचाऱ्यांसाठी यातनादायक प्रकोप आहे. तुम्ही पाहाल की हे अत्याचारी त्यावेळी त्यांनी जी कृत्ये केली त्यांच्या परिणामापासून भीत असतील व तो त्यांच्यावर बेतल्याशिवाय राहणार नाही. याउलट ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत ते स्वर्गाच्या उद्यानात राहतील. जे जे काही ते इच्छितील ते त्यांना आपल्या पालनकर्त्याच्या येथे प्राप्त होईल. हीच मोठी कृपा आहे. ही आहे ती गोष्ट ज्याची शुभवार्ता अल्लाह आपल्या त्या दासांना देतो ज्यांनी मानले आणि सत्कृत्ये केली. हे पैगंबर (स.), या लोकांना सांगा की, ''मी या कामासाठी तुमच्याकडून कसल्याही

८) सदरहू आयतीत 'शुरकाअ' भागीदार ने अभिप्रेत, लोक ज्यांच्याकडे प्रार्थना करतात किंवा ज्यांच्या पुढ्यात भेटी व नवस अर्पण करतात अथवा ज्यांच्यासमोर पूजा व अर्चनेच्या विधी पार पाडतात असले भागीदार नाहीत, हे उघड आहे. तर अपरिहार्यपणे त्यांच्याने अभिप्रेत, असले भागीदार आहेत, लोकांनी ज्यांना आज्ञापनेत भागीदार ठरविले आहे, ज्यांचे शिकविलेले विचार व श्रद्धा आणि दृष्टिकोन व तत्त्वज्ञानांना लोक मान्यता देतात, ज्यांच्या सांगितलेल्या नीतीमूल्यांना लोक मानतात. ज्यांनी प्रस्तुत केलेले नैतिक नियम आणि संस्कृतीचे प्रमाण लोक स्वीकारतात, ज्यांनी ठरविलेले कानून-कायदे आणि पद्धती व नियम, लोक आपल्या धार्मिक विधी आणि उपासनेत, आपल्या व्यक्तिगत जीवनात, आपल्या सामाजिक जीवनात, आपल्या संस्कृतीत, आपले व्यवहार आणि देवाण व घेवाणात, आणि आपल्या राजकारणात व शासनात अशाप्रकारे अंगिकारतात की जणू हीच ती 'शरीअत' आहे जिचे अनुकरण त्यांनी केले पाहिजे.

मोबदल्याचा इच्छुक नाही, तथापि आप्तेष्ट संबंधाचे प्रेम निश्चितच इच्छितो.[९] जो कोणी भलेपणा कमवील, आम्ही त्याच्यासाठी त्या भलेपणांत उत्तमतेची भर करू. नि:संदेह अल्लाह मोठा क्षमाशील आणि गुणग्राहक आहे. (२१-२३)

काय हे लोक असे म्हणतात की या व्यक्तीने अल्लाहवर खोटे कुभांड रचले आहे?

**९)** या आयतीची तीन भाष्ये केली गेली आहेत. (१) 'मी तुमच्याकडे या कामाबद्दल कोणताही मोबदला मागत नाही परंतु हे जरूर इच्छितो की तुम्हा लोकांनी (अर्थात कुरैशांनी) कमीत कमी त्या नातेसंबंधाचा तरी आदर करावा जे माझ्या व तुमच्यात आहे. सर्वापेक्षा जास्त माझ्या शत्रुत्वाला तुम्हीच पेटला आहात, हा काय जुलूम आहे.' (२) 'मी तुमच्याकडे या कामाबद्दल कोणताही मोबदला याशिवाय इच्छित नाही की तुमच्यात अल्लाहशी जवळिकीची आवड निर्माण व्हावी.' (३) तिसरे भाष्य ज्या भाष्यकारांनी केले आहे त्यांच्यापैकी काही 'आप्तेष्टा'ने सर्व अब्दुल मुत्तलिब वंशीय अभिप्रेत असल्याचे मानतात, तर काही केवळ हजरत अली (रजि.) व बीबी फातिमा (रजि.) आणि त्यांच्या संततीपर्यंतच मर्यादित असल्याचे मानतात. परंतु अनेक कारणांनी सदरचे भाष्य कोणत्याही प्रकारे मान्य करण्यालायक ठरू शकत नाही. प्रथम तर ज्यावेळी मक्का शहरात सूरह शूरा उतरली त्यावेळी हजरत अली व फातिमा (रजि.) यांचा विवाहदेखील झाला नव्हता. त्यांच्या संततीचा तर प्रश्नच नाही. तसेच अब्दुल मुत्तलिब वंशीयातील सर्वचे सर्व पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना साथ देत नव्हते तर त्यांच्यापैकी काही उघडपणे शत्रूंचे साथीदार होते. अबू लहबचे शत्रुत्व तर जगजाहीर आहे. दुसरे असे की पैगंबर (स.) यांचे नातेवाईक केवळ अब्दुल मुत्तलिब वंशीयच होते असे नाही. त्यांचे आदरणीय मातापिता तसेच त्यांच्या आदरणीय पत्नी बीबी हजरत खदीजा (रजि.) यांच्या संबंधाने कुरैशांच्या सर्व घराण्यांशी त्यांचे नातेसंबंध जुळत होते. त्या सर्व घराण्यात त्यांचे उत्तम समर्थकही होते व कट्टर शत्रूदेखील. तिसरी गोष्ट, जी सर्वात जास्त महत्वाची आहे, ती अशी की एखादा प्रेषित ज्या उच्चस्थानी उभे राहून ईश्वरी आवाहनाचा पुकारा करतो, त्या उच्च स्थानावरून या महान कार्याचा हा मोबदला मागणे की माझ्या नातेवाईकांशी प्रेम करा, इतक्या खालच्या दर्जाची गोष्ट आहे की कुणी सज्जन गृहस्थ अशी कल्पनासुद्धा करू शकत नाही की अल्लाहने आपल्या पैगंबर (स.) यांना अशी गोष्ट शिकविली असेल व पैगंबरानी कुरैश लोकांत उभे राहून अशी गोष्ट उच्चारली असावी. याशिवाय ही गोष्ट आणखीन जास्त अनाठायी वाटते जेव्हा आम्ही पाहतो की या वाणीचे संबोधक श्रद्धावंत नसून अश्रद्धावंत आहेत. अगोदरपासून सर्व भाषण त्यांनाच संबोधून होत आले आहे व पुढेदेखील बोलण्याचा रोख त्यांच्याकडेच आहे. या भाषणक्रमात विरोधकांकडे कोणत्याही प्रकारचा मोबदला मागण्याचा बरे प्रश्नच कोठे निर्माण होतो? मोबदला तर त्या लोकांकडे मागितला जात असतो त्याच्या दृष्टीत त्या कामाला काही किंमत असेल, जे एखाद्या माणसाने त्याच्यासाठी पार पाडले असावे.



जर अल्लाहने इच्छिले तर तुमच्या हृदयांवर मोहोर करील.[१०] तो असत्याला नष्ट करतो आणि सत्याला आपल्या आदेशांनी खरे करून दाखवितो. तो उरांतील लपलेली गुपिते जाणतो. तोच आहे जो आपल्या दासांकडून पश्चात्ताप मान्य करतो आणि वाईट गोष्ट माफ करतो, वास्तविकत: तुम्हा लोकांच्या सर्व कृतीचे त्याला ज्ञान आहे. तो श्रद्धा ठेवणाऱ्या व सत्कृत्ये करणाऱ्यांची प्रार्थना मान्य करतो आणि आपल्या मेहरबानीने त्यांना अधिक जास्त देतो. उरले इन्कार करणारे तर त्यांच्यासाठी कठोर शिक्षा आहे. (२४-२६)

जर अल्लाहने आपल्या सर्व दासांना विपुल उपजीविका दिली असती तर त्यांनी भूतलावर दुर्वर्तनाचे तुफान माजविले असते परंतु तो एका हिशेबाने जितके इच्छितो तितके उतरवितो, नि:संदेह तो आपल्या दासांची खबर राखणारा आहे आणि त्यांच्यावर नजर ठेवतो. तोच आहे जो, लोक निराश झाल्यानंतर पर्जन्यवृष्टी करतो आणि आपली कृपा पसरवितो, आणि तोच प्रशंसेस योग्य वाली आहे. त्याच्या संकेतांपैकी आहे या आकाशाची व पृथ्वीची निर्मिती आणि ही प्राणीमात्र निर्मिती, जिचा त्याने दोन्ही ठिकाणी विस्तार केला आहे. तो हवे तेव्हा त्यांना एकत्रित करू शकतो. तुम्हा लोकांवर जे जे कोणते संकट आले आहे.[११] ते तुम्ही स्वत:च ओढवलेले आहे, आणि बऱ्याचशा चुकांकडे तो सहज दुर्लक्ष करीत असतो. तुम्ही पृथ्वीवर आपल्या ईश्वराला जेरीस आणणारे नाहीत. आणि अल्लाहच्याविरूद्ध तुमचा कोणताही समर्थक व सहायक नाही. त्याच्या संकेतांपैकी आहेत ह्या नौका ज्या समुद्रात पर्वतासमान दिसत असतात. अल्लाहने हवे तेव्हा वाऱ्याला स्थिर करावे आणि यांनी समुद्राच्या पाठीवर उभेच्या उभे राहावे, यात मोठे संकेत आहेत त्या प्रत्येक व्यक्तीसाठी जी जास्तीत जास्त संयम व कृतज्ञता दाखविणारी असेल. अथवा (त्यांच्यावर स्वार होणाऱ्यांच्या) पुष्कळशा अपराधांकडे दुर्लक्ष करीत त्यांच्या थोड्याच कृत्यांच्यापायी त्यांना बुडवून टाकील, आणि त्यावेळी आमच्या वचनांमध्ये वाद घालणाऱ्यांना कळेल की त्यांच्यासाठी कोणतेही आश्रयस्थान नाही.

(२७-३५)

जे काही तुम्हा लोकांना दिले गेले आहे ते केवळ जगाच्या क्षणभंगूर जीवनाचा सरंजाम आहे, आणि जे काही अल्लाहपाशी आहे ते उत्तम आहे आणि सदैव राहणारेदेखील. ते त्या लोकांसाठी आहे ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे आणि जे आपल्या

**१०)** अर्थ असा की, हे नबी (स.) या लोकांनी तुम्हालादेखील आपल्याच वृत्तीचा माणूस समजलेले आहे. ज्याप्रकारे हे स्वत: आपल्या हितासाठी मोठ्यातले मोठे प्रत्येक असत्य बोलून जातात, तुम्हीदेखील आपले दुकान थाटण्यासाठी एक असत्य घडवून आणले आहे अशी यांची कल्पना आहे. परंतु ही अल्लाहची मेहरबानी आहे की त्याने तुमच्या मनावर ती मोहर लावली नाही जी यांच्या मनावर त्याने लावलेली आहे.

**११)** मक्का शहरात त्याकाळी जो दुष्काळ होता, त्याकडे संकेत आहे.

पालनकर्त्यावर भरोसा ठेवतात, जे भयंकर पाप आणि अश्लील कृत्यांपासून अलिप्त राहतात आणि जर राग आला तर क्षमा करतात, जे आपल्या पालनकर्त्याची आज्ञा पाळतात, नमाज कायम करतात, आपले व्यवहार आपापसातील सल्लामसलतीने चालवितात, आम्ही जी काही उपजीविका त्यांना दिली आहे तिच्यातून खर्च करतात आणि जेव्हा त्यांच्यावर अत्याचार केला जातो तेव्हा त्याचा मुकाबला करतात,[१२] वाईट कृत्यांचा बदला तेवढ्याच प्रमाणात आहे मग जो कोणी माफ करील आणि सुधारणा करील त्याचा मोबदला अल्लाहकडे आहे. अल्लाह अत्याचाऱ्यांना पसंत करीत नाही. आणि जे लोक अत्याचार झाल्यानंतर बदला घेतील त्यांची निर्भर्त्सना केली जाऊ शकत नाही, निर्भर्त्सनेलायक तर ते आहेत जे दुसऱ्यावर अत्याचार करतात आणि पृथ्वीवर हकनाक आगळीक करतात. अशा लोकांसाठी यातनादायक प्रकोप आहे. तथापि जो मनुष्य संयमाने वागेल आणि क्षमा करील तर हे मोठ्या साहसी कर्मांपैकी होय. (३६-४३)

ज्याला अल्लाहनेच पथभ्रष्टतेत फेकले, त्याचा सांभाळ करणारा कोणी अल्लाहशिवाय नाही. तुम्ही पाहाल की हे अत्याचारी जेव्हा प्रकोप पाहतील तेव्हा सांगतील की आता परतण्याचाही एखादा मार्ग आहे? आणि तुम्ही पाहाल की हे नरकाच्या समोर जेव्हा आणले जातील तेव्हा अपमानामुळे ते वाकले जात असतील आणि त्याला नजर चुकवून कटाक्षाने पाहात असतील, त्यावेळी ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली होती सांगतील की प्रत्यक्षात खरे दिवाळखोर तेच लोक होत ज्यानी आज पुनरुत्थानाच्या दिवशी आपल्या स्वत:ला व आपल्या संबंधितांना तोट्यात घातले. सावध राहा, अत्याचारी लोक कायमचे प्रकोपात राहतील. आणि त्यांचे कोणी समर्थक आणि वाली नसतील ज्यांनी अल्लाहविरूद्ध त्यांच्या मदतीस यावे. ज्याला अल्लाहने पथभ्रष्टतेत फेकले त्याच्यासाठी बचावाचा कोणताही मार्ग नाही. (४४-४६)

मान्य करा आपल्या पालनकर्त्याचे म्हणणे यापूर्वी की तो दिवस टळण्याचा कोणताही उपाय अल्लाहकडून होणार नाही. त्यादिवशी तुमच्यासाठी कोणतेही आश्रयस्थान असणार नाही, आणि तुमच्या परिस्थितीत परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न करणारासुद्धा कोणी नसेल.[१३] आता जर हे लोक तोंड फिरवतील तर हे पैगंबर

**१२)** येथून ते आयत क्र. ४३ च्या शेवटपर्यंतचा मजकूर या अगोदरच्या आयतींचे स्पष्टीकरण म्हणून आहे.

**१३)** मूळ अरबी शब्द 'मालकुममिन्नकीर' असे आहेत. या वाक्याचे आणखीन इतर अनेक अर्थ आहेत. एक असा की तुम्ही आपल्या कृत्यांपैकी कुणाचाही इन्कार करू शकणार नाही. दुसरे असे की तुम्ही वेश पालटून कोठेही लपू शकणार नाही. तिसरे असे की तुमच्याशी जे काही केले जाईल त्यावर तुम्ही आपला विरोध आणि नापसंती व्यक्त करू शकणार नाही. चौथा असा की ज्या परिस्थितीत तुम्हाला टाकले गेले आहे ती बदलू शकावी हे तुमच्या अवाक्याबाहेरचे असणार नाही.



(स.), आम्ही तुम्हाला यांच्यावर रक्षक म्हणून तर पाठविलेले नाही. तुमच्यावर तर केवळ गोष्ट पोहचविण्याची जबाबदारी आहे. माणसाची स्थिती अशी आहे की जेव्हा आम्ही त्याला आपल्या कृपेचा आस्वाद देतो तर त्यावर फुलून जातो आणि जर त्याच्या स्वत:च्या हस्ते केले-सवरलेले एखाद्या संकटाच्या रूपाने त्याच्या अंगलट येते तर अत्यंत कृतघ्न बनतो. (४७-४८)

अल्लाह, पृथ्वी व आकाशांच्या राज्याचा मालक आहे, जे काही इच्छितो निर्माण करतो, ज्याला इच्छितो त्याला मुली देतो, ज्याला इच्छितो त्याला मुले देतो, ज्याला इच्छितो त्याला मुले व मुली दोन्ही देतो. आणि ज्याला इच्छितो त्याला अपत्यहीन बनवितो. तो सर्वकाही जाणतो आणि प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे. (४९-५०)

कोणत्याही मनुष्याचा हा दर्जा नाही की अल्लाहने त्याच्याशी समक्ष बोलणी करावी. त्याची बोलणी एक तर वह्य[१४] (संकेता) च्या स्वरूपात होते, अथवा पडद्यामागून,[१५] अथवा मग तो एखादा संदेशवाहक (फरिश्ता) पाठवितो आणि तो त्याच्या आज्ञेने जे काही इच्छितो 'वह्य' (बोध) करतो,[१६] तो उच्चतर आणि बुद्धिमान आहे. आणि अशाच प्रकारे (हे पैगंबर (स.)) आम्ही आपल्या आज्ञेने एक 'रूह' तुमच्याकडे 'वह्य' (दिव्यबोध) केली आहे.[१७] तुम्हाला काही माहीत नव्हते की ग्रंथ काय असतो व श्रद्धा काय आहे. परंतु त्या 'रूह'ला आम्ही एक प्रकाश बनविले ज्याद्वारे आम्ही मार्ग दाखवितो आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो. निश्चितच तुम्ही सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करीत आहात, त्या ईश्वराच्या मार्गाकडे जो पृथ्वी आणि आकाशातील प्रत्येक वस्तुचा मालक आहे. सावधान, सर्व बाबी अल्लाहकडेच रुजू होतात. (५१-५३)

**१४)** या ठिकाणी 'वह्य'ने अभिप्रेत आहे इल्का, इल्हाम, मनात एखादी गोष्ट टाकणे अथवा स्वप्नात काही दाखविणे. जसे हजरत इब्राहीम (अ.) व हजरत यूसुफ (अ.) यांना दाखविले गेले.

**१५)** अभिप्रेत आहे की दासाने एक हाक ऐकावी परंतु हाक देणारा त्याला दिसू नये. ज्याप्रकारे हजरत मूसा (अ.) यांच्यासमवेत घडले की तूर पर्वताच्या पायथ्याशी एका वृक्षातून अकस्मातपणे त्याना हाक ऐकू येणे सुरू झाले परंतु बोलणारा त्यांच्या दृष्टिआड होता.

**१६)** हे दिव्यबोध-वह्य येण्याचे ते स्वरूप आहे ज्याद्वारे सर्व दैवी ग्रंथ प्रेषितांपर्यंत पोहचले आहेत.

**१७)** 'अशाच प्रकारे'ने अभिप्रेत केवळ अंतिम पद्धत आहे असे नाही तर वरील आयतीत ज्याचा उल्लेख झाला आहे ते तिन्ही प्रकार आहेत, शिवाय 'रूह'ने अभिप्रेत 'वह्य दिव्यबोध' अथवा 'वह्य'द्वारे पैगंबर (स.) यांना जी शिकवण दिली गेली आहे, ती शिकवण होय.

# ४३ सूरह अज़्ज़ुख़्रूफ

*(मक्काकालीन, वचने ८९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हामीऽऽम. शपथ आहे या स्पष्ट ग्रंथाची. की आम्ही याला अरबी भाषेत कुरआन बनविला आहे जेणेकरून तुम्ही लोकांनी ते समजावे.[१] आणि वास्तविकत: हा 'उम्मूल किताब'[२] (आदि ग्रंथ) मध्ये नमूद आहे, आमच्या येथील फार उच्च दर्जाचा आणि विवेकाने ओतप्रोत ग्रंथ. (१-४)

आता काय आम्ही तुमच्याकडून बेजार होऊन हा उपदेश-पाठ तुमच्याकडे पाठविणे सोडून द्यावे केवळ यासाठी की तुम्ही मर्यादा बाहेर गेलेले आहात? पूर्वी होऊन गेलेल्या जनसमुहात सुद्धा अनेकदा आम्ही नबी पाठविले आहेत. कधी असे घडले नाही की एखादा नबी त्यांच्याकडे आला आणि त्यांनी त्याचा उपहास केला नाही. मग जे लोक यांच्यापेक्षा कित्येक पटीने अधिक शक्तिशाली होते, त्यांनाआम्ही नष्ट केले, पूर्वीच्या राष्ट्रांची उदाहरणे येऊन गेली आहेत. (५-८)

जर तुम्ही या लोकांना विचारले की पृथ्वी आणि आकाशांना कोणी निर्माण केले आहे तर हे स्वत: म्हणतील, ''यांना त्याच जबरदस्त सर्वज्ञ अल्लाहने निर्माण केले आहे.'' तोच ना ज्याने तुमच्यासाठी या पृथ्वीला पाळणा बनविला आणि यात तुमच्यासाठी रस्ते बनविले[३]

१) महान कुरआनची शपथ ज्या गोष्टीसाठी घेतली गेली आहे, ती अशी की हा ग्रंथ रचणारे 'आम्ही' आहोत, मुहम्मद (स.) हे नाहीत. शिवाय शपथ घेण्यासाठी कुरआनच्या ज्या गुणाची निवड झाली आहे तो असा की हा 'उज्ज्वल ग्रंथ' आहे. या गुणानिशी कुरआनचे दैवी ग्रंथ असण्यावर खुद्द कुरआनाचीच शपथ वाहण्यामुळे आपोआपच असा अर्थ व्यक्त होत आहे की लोकहो, हा उघड ग्रंथ तुमच्यासमोर मौजूद आहे, यास डोळे उघडून पहा, याच्यातील विषय, याची शिकवण, याची भाषा व सर्व गोष्टी, या ग्रंथाचा रचियता, विश्वाचा स्वामीखेरीज इतर कोणीही असू शकत नाही या सत्यतेची स्पष्टपणे साक्ष देत आहेत.

२) 'उम्मूलकिताब'ने अभिप्रेत आहे 'आदि ग्रंथ'. म्हणजे तो ग्रंथ ज्याच्यातून सर्व प्रेषितां (अ.) वर उतरणारे ग्रंथ निर्माण झाले आहेत. त्याच्यासाठी सूरह बुरूज मध्ये 'लौहे महफ़ूज' असे शब्द वापरले गेले आहेत. म्हणजे असे पट ज्यातील लेख पुसले जाऊ शकत नाहीत व जे सर्व प्रकारच्या ढवळाढवळीपासून सुरक्षित आहे.

३) पर्वतांच्या अधूनमधून असलेल्या दऱ्या व शिवाय डोंगराळ व मैदानी प्रदेशातील नद्या, ते नैसर्गिक मार्ग आहेत जे अल्लाहने भूतलावर बनविलेले आहेत. मानव यांच्याच सहाय्याने पृथ्वीगोलावर पसरला आहे. याशिवाय सर्व भूतल अल्लाहने एकसमान बनवून ठेवले आहे असे नाही तर आणखीन अशीही त्याने कृपा केली की त्यात निरनिराळ्या प्रकारच्या अशा विशेष खुणा प्रस्थापित केल्या ज्याच्या सहाय्याने मनुष्य निरनिराळे प्रदेश ओळखतो आणि एका व दुसऱ्या प्रदेशामधील फरक जाणून घेतो.



जेणेकरून तुम्हाला आपल्या अंतिम ध्येयाचा मार्ग मिळू शकेल? ज्याने एका विशिष्ट प्रमाणांत आकाशांतून पाणी उतरविले आणि त्याच्याद्वारे मृत जमिनीला चैतन्य दिले, अशा प्रकारे एके दिवशी तुम्ही जमिनीतून बाहेर काढले जाल. तोच ज्याने ही सर्व जोडपी निर्माण केली, आणि ज्याने तुमच्यासाठी नौका व जनावरांना वाहन बनविले जेणेकरून तुम्ही त्यांच्या पाठीवर स्वार व्हावे आणि जेव्हा त्यांच्यावर स्वार व्हाल तेव्हा आपल्या पालनकर्त्याचे उपकार स्मरण करावे आणि म्हणावे की, ''पवित्र आहे तो ज्याने आमच्यासाठी या गोष्टी अधीन केल्या. एरव्ही आम्ही यांना ताब्यात आणण्याचे सामर्थ्य बाळगत नव्हतो. आणि एके दिवशी आम्हाला आमच्या पालनकर्त्याकडे परतावयाचे आहे.'' (९-१४)

(हे सर्वकाही जाणून व मानूनसुद्धा) या लोकांनी त्याच्या दासांपैकी काहींना त्याचा अंश बनवून टाकले. वस्तुस्थिती अशी आहे की मनुष्य उघड कृतघ्न आहे. (१५)

काय अल्लाहने आपल्या निर्मितीपैकी स्वत:साठी मुलीची निवड केली आणि तुम्हाला मुले दिलीत? आणि स्थिती अशी आहे की ज्या संततीला हे लोक त्या परमदयाळू ईश्वराशी संबंधित करतात, तिच्या जन्माची शुभवार्ता जेव्हा खुद्द यांच्यापैकी कोणाला दिली जाते तेव्हा त्यांच्या तोंडावर काळिमा पसरतो आणि तो दु:खाने भरून जातो. काय अल्लाहच्या वाट्याला ती संतती आली जी दागदागिन्यांत पोसली जाते आणि वादविवादांत आपला मुद्दा पूर्णपणे स्पष्टसुद्धा करू शकत नाही? (१६-१८)

यांनी दूतांना, जे परमदयाळू ईश्वराचे दास आहेत, स्त्रिया ठरविले, यांनी त्यांची शरीर-रचना पाहिली आहे काय? यांची ग्वाही लिहून घेतली जाईल आणि यांना त्याचा जाब द्यावा लागेल. (१९)

हे म्हणतात, ''जर परमदयाळू ईश्वराने इच्छिले असते (की आम्ही त्यांची उपासना करू नये) तर आम्ही कधीही त्यांना पूजले नसते.''[४] हे या मामल्यातील हकीगत मुळीच जाणत नाहीत. केवळ तर्क-वितर्क लढवितात. काय आम्ही यापूर्वी यांना एखादा ग्रंथ दिला होता ज्याची सनद (फरिश्त्यांच्या पूजनासाठी) हे आपल्यापाशी ठेवतात, नव्हे तर हे म्हणतात की आम्हाला आमचे वाडवडील एका पद्धतीवर आढळले आहेत आणि आम्ही त्यांच्या पाऊलखुणांवर चालत आहोत. अशाप्रकारे तुमच्या अगोदर ज्या ज्या कुणा वस्तीत आम्ही एखादा भय दाखविणारा पाठविला, त्यातील सुखवस्तू लोकांनी हेच सांगितले की आम्हाला आमचे वाडवडील एका पद्धतीवर आढळले आहेत आणि आम्ही त्यांच्याच पाऊलखुणांचे अनुसरण करीत आहोत. प्रत्येक नबीने त्यांना विचारले, काय तुम्ही त्याच वहिवाटीवर चालत राहणार, मी जरी तुम्हाला त्या मार्गापेक्षा योग्यतम मार्ग दाखवावा, ज्यावर तुम्हाला आपले

४) नेहमीपासून कुकर्मी लोकांची आपल्या पथभ्रष्टतेसाठी दैवाचा युक्तिवाद मांडण्याची जी प्रवृत्ती राहिली आहे तोच त्यांचा हा युक्तिवाद आहे.

वाडवडील आढळले आहेत? त्यांनी सर्व प्रेषितांना हेच उत्तर दिले की ज्या धर्माकडे बोलविण्यासाठी तुम्ही पाठविला गेला आहात आम्ही त्याचे नाकारणारे आहोत. सरतेशेवटी आम्ही त्यांचा समाचार घेतला आणि पहा की खोटे ठरविणाऱ्यांचा शेवट कसा झाला. (२०-२५)

स्मरण करा ती वेळ जेव्हा इब्राहीम (अ.) ने आपल्या पित्याला व आपल्या समाजाला सांगितले होते की, ''तुम्ही ज्यांची भक्ती करता माझा त्याच्याशी काहीही संबंध नाही. माझा संबंध केवळ त्याच्याशी आहे ज्याने मला निर्माण केले. तोच मला मार्गदर्शन करील.'' आणि इब्राहीम (अ.) ने हेच वचन आपल्या पाठीमागे आपल्या वंशास देऊन गेला जेणेकरून त्यांनी त्याच्याकडे रुजू व्हावे.[५] (असे असतानासुद्धा जेव्हा हे लोक इतरांची भक्ती करू लागले तेव्हा मी यांना नष्ट केले असे नाही.) तर मी यांना आणि यांच्या वाडवडिलांना जीवन-सामग्री देत राहिलो, येथपावेतो की यांच्याजवळ सत्य आणि स्पष्टपणे सांगणारा पैगंबर (स.) आला. परंतु जेव्हा ते सत्य यांच्याजवळ आले तेव्हा यांनी सांगितले की ही तर जादू आहे आणि आम्ही ही मानण्यास नकार देतो. (२६-३०)

म्हणतात, हा कुरआन दोन्ही शहरांच्या मोठ्या माणसांपैकी कुणावर का अवतरला गेला नाही?[६] तुझ्या पालनकर्त्याच्या कृपेची वाटणी हे लोक मागतात काय? ऐहिक जीवनात तर यांच्या उपजीविकेची साधने तर आम्ही यांच्या दरम्यान वाटली आहे, आणि यांच्यापैकी काही लोकांना काही इतर लोकांवर अनेक पटीने श्रेष्ठत्व दिले आहे जेणेकरून यांनी एकमेकाकडून सेवा घ्यावी, आणि तुझ्या पालनकर्त्याची कृपा (म्हणजे प्रेषितत्व) त्या संपत्तीपेक्षा अधिक मौल्यवान आहे जी (यांचे श्रीमंत) गोळा करीत आहेत. जर अशी शंका नसती की सर्व लोक एकाच वहिवाटीचे होतील तर आम्ही परमदयाळू ईश्वराचा इन्कार करणाऱ्यांच्या घरांची छते आणि त्यांचे जिने ज्याद्वारे ते आपल्या वरच्या मजल्यावर चढतात, आणि त्यांचे दरवाजे व त्यांची आसने ज्यांच्यावर ते तक्के लावून बसतात, सर्व चांदी आणि सोन्याचे बनविले असते. ही तर केवळ ऐहिक जीवनाची सामग्री आहे, आणि मरणोत्तर जीवन

५) म्हणजे जेव्हा जेव्हा सरळ मार्गापासून पाऊल थोडे का हटू नये, हे वचन त्यांच्या मार्गदर्शनासाठी मौजूद आहे, त्यांनी त्याच्याकडेच परतावे. ही घटना ज्या हेतूने याठिकाणी सांगितलेली आहे ती अशी की अश्रद्धावंत कुरैशांना या गोष्टीची शरम वाटावी की तुम्ही आपल्या पूर्वजांचे अनुकरण केले तरी त्यासाठी आपले उत्तम पूर्वज इब्राहीम (अ.) व इस्माईल (अ.) यांना सोडून आपल्या अत्यंत वाईट पूर्वजांची निवड केली.

६) दोन्ही शहरांनी अभिप्रेत मक्का व ताइफ आहेत. अश्रद्धावंतांचे म्हणणे असे होते की जर खरोखरच ईश्वराला कुणी प्रेषित पाठवावयाचा होता आणि त्याने त्यावर आपला ग्रंथ उतरविण्याचा इरादा केला असता तर आमच्या या प्रमुख शहरातील एखाद्या मोठ्या माणसाला या हेतूसाठी निवडले असते.



तर तुझ्या पालनकर्त्यापाशी केवळ ईशपरायणांसाठी आहे. (३१-३५)

जो मनुष्य रहमान (परमदयाळू) च्या स्मरणाची उपेक्षा करतो, आम्ही त्याच्यावर एक शैतान नियुक्त करतो आणि तो त्याचा मित्र बनतो. हे शैतान असल्या लोकांना सरळ मार्गावर येण्यापासून रोखतात, आणि ते आपल्या जागी असे समजतात की आम्ही नीट चाललो आहोत. सरतेशेवटी जेव्हा हा मनुष्य आमच्या येथे पोहचेल तेव्हा आपल्या शैतानाला म्हणेल, ''अरेरे! तुझ्या आणि माझ्या दरम्यान पूर्व आणि पश्चिमचे अंतर असते! तू तर अत्यंत वाईट सोबती निघालास.'' त्यावेळी या लोकांना सांगितले जाईल की जेव्हा तुम्ही अन्याय केलेला आहे तेव्हा ही गोष्ट आज तुम्हाला जरादेखील लाभदायक नाही की तुम्ही आणि तुमचे शैतान प्रकोपात सामायिक आहात. आता काय हे नबी (स.), तुम्ही बहिऱ्यांना ऐकवाल अथवा आंधळ्या आणि उघड पथभ्रष्टतेत गुरफटलेल्या लोकांना मार्ग दाखवाल? आता तर आम्हाला यांना शिक्षा करावयाची आहे, मग आम्ही तुम्हाला जगातून बोलावून का घेऊ नये. अथवा तुम्हाला डोळ्यांनी यांचा तो शेवट दाखवावा; ज्याचे आम्ही यांना वचन दिले आहे, आम्हाला यांच्यावर पूर्ण प्रभूत्व प्राप्त आहे. काहीही झाले तरी तुम्ही तो ग्रंथ दृढतापूर्वक धरून असा जो दिव्यबोधाने तुमच्याकडे पाठविला गेला आहे, खचितच तुम्ही सरळ मार्गावर आहात. वस्तुस्थिती अशी आहे की हा ग्रंथ तुमच्यासाठी आणि तुमच्या राष्ट्रासाठी एक फार मोठा सन्मान आहे, आणि लवकरच तुम्हा लोकांना याचा जाब द्यावा लागेल.[७] तुमच्या पूर्वी आम्ही जितके प्रेषित पाठविले होते, त्या सर्वांना विचारून पहा, काय आम्ही परमदयाळू ईश्वराशिवाय काही इतर उपास्यसुद्धा नियुक्त केले होते की त्यांची भक्ती केली जावी?[८] (३६-४५)

आम्ही मूसा (अ.) याला आपल्या संकेतांसमवेत फिरऔन आणि त्याच्या सरदारांकडे पाठविले आणि त्याने जाऊन सांगितले की मी विश्वपालनकर्त्याचा प्रेषित आहे. मग जेव्हा त्याने आमचे संकेत त्यांच्यासमोर प्रस्तुत केले तेव्हा हे थट्टा उडवू लागले. आम्ही एकावर एक असे संकेत त्यांना दाखवीत गेलो की जे पहिल्यापेक्षा वरचढ होते आणि आम्ही त्यांना प्रकोपात धरले की त्यांनी आपल्या वर्तनापासून परावृत्त व्हावे. प्रत्येक प्रकोपाच्या वेळी ते सांगत असत, हे जादूगार! आपल्या पालनकर्त्याकडून जे पद तुला प्राप्त आहे त्याच्या आधारे

७) म्हणजे याहून अधिक कुणाही माणसाचे कसलेही सुदैव असू शकत नाही की सर्व मनुष्यांमधून त्यांचीच अल्लाहने आपला ग्रंथ उतरविण्यासाठी निवड करावी, तसेच जगातील इतर सर्व राष्ट्रे सोडून सर्वोच्च अल्लाहने ज्या कुणा राष्ट्रात आपला प्रेषित जन्मास आणावा व त्याच्या भाषेत आपला ग्रंथ उतरवावा व त्या राष्ट्राला जगात ईश्वरी संदेशधारक म्हणून उभे राहण्याची संधी द्यावी, अशा राष्ट्रासाठी याहून मोठी सुदैवाची कल्पनादेखील केली जाऊ शकत नाही. या महान सन्मानाची जर कुरैश व अरबवासींना जाणीव नाही व ते याची उपेक्षा करू इच्छितात तर यांना याचा जाब द्यावा लागेल, अशी एक वेळ आल्याशिवाय राहणार नाही.

८) प्रेषितांना विचारण्याचा अर्थ त्यांनी आणलेल्या ग्रंथातून माहिती घेणे होय.

आमच्यासाठी त्याच्याकडे प्रार्थना कर, आम्ही जरूर सरळ मार्गावर येऊ. परंतु ज्याक्षणी आम्ही त्यांच्यावरून प्रकोप हटवीत असू ते आपल्या शब्दांपासून फिरत असत. एके दिवशी फिरऔनने आपल्या राष्ट्रांदरम्यान पुकारा करून सांगितले, ''लोकहो, 'मिस्र' (इजिप्त) ची बादशाही माझी नव्हे काय, आणि हे कालवे माझ्याखालून वाहात नाहीत? तुम्हा लोकांना दिसत नाही काय? मी श्रेष्ठतर आहे की हा मनुष्य जो अपमानित आणि हीन आहे आणि आपले म्हणणेसुद्धा स्पष्ट करून सांगू शकत नाही? याच्यावर सुवर्ण कंकण का उतरविले गेले नाहीत? अथवा ईशदूतांचे एक पथक त्याच्या दिमतीला का आले नाही?'' (४६-५३)

त्याने आपल्या राष्ट्राला हलके समजले आणि त्यांनी त्याचे म्हणणे मान्य केले, वास्तविकत: ते होतेच अवज्ञाकारी लोक.[९] सरतेशेवटी जेव्हा त्यांनी आम्हाला क्रोधित केले तेव्हा आम्ही त्यांच्यावर सूड उगविला आणि त्यांना एकत्रित बुडवून टाकले. आणि नंतरच्या लोकांसाठी अग्रगामी व बोधप्रद उदाहरण बनवून सोडले. (५४-५६)

आणि ज्याक्षणी मरयम पुत्र (अ.) चे उदाहरण दिले गेले, तुमच्या लोकसमूहाने त्यावर हास्यकल्लोळ माजविला. आणि म्हणू लागले की आमचे उपास्य चांगले आहेत की तो?[१०] हे उदाहरण त्यांनी तुमच्यासमोर केवळ वितंडवादासाठी आणले आहे. वस्तुस्थिती अशी आहे

९) या लहानशा वाक्यात एक फार मोठे सत्य सांगितले गेले आहे. जेव्हा एखादा मनुष्य एखाद्या देशात आपली निरंकुश सत्ता चालविण्याचा प्रयत्न करतो व त्यासाठी उघड उघड हरतऱ्हेच्या चाली खेळू लागतो, सर्व प्रकारची लबाडी आणि कुटिलता व फसवेगिरीचा उपयोग करतो, खुल्या बाजारात निष्ठेच्या खरेदी विक्रीचा उद्योग चालवितो व विकत घेतले जात नाही त्यांना बिनधास्तपणे छळतो व पायदळी तुडवितो, तेव्हा तो तोंडाने जरी ही गोष्ट उच्चारत नसावा तरीपण आपल्या कृतीने तो प्रत्यक्षात असे दाखवून देतो की वास्तविकपणे तो या देशातील वासियांना, बौद्धिक, नैतिक आणि पौरुषाच्या दृष्टीने हलकट समजतो आणि त्यांच्यासंबंधी त्याने असे मत बनविले आहे की मी या मूर्ख, निष्ठाहीन आणि भेकड लोकांना हवे तिकडे वळवून नेऊ शकतो. मग जेव्हा त्याच्या क्लृप्त्या यशस्वी ठरतात व देशातील निवासी त्याच्यापुढे लोटांगण घालून त्याचे दास बनतात तेव्हा आपल्या कृतीने ते असे सिद्ध करतात की त्या खवीसाने त्यांना जे काही समजले होते खरोखर ते तसेच आहेत. त्या लोकांच्या अशा अपमानित स्थितीत येण्याचे खरे कारण म्हणजे मुळातच ते लोक 'अवज्ञाकारी' असतात.

१०) या अगोदर आयत क्र. ४५ मध्ये ही गोष्ट सांगितली आहे की 'तुमच्या पूर्वी जे प्रेषित होऊन गेले आहेत, त्या सर्वांना विचारून पहा, काय आम्ही परम कृपाळू ईश्वराशिवाय काही इतर उपास्यदेखील ठरविले होते की त्यांची बंदगी केली जावी?' हे भाषण जेव्हा मक्कावासियांसमोर होत होते तेव्हा एका माणसाने टीका केली की अहो महाशय, ख्रिस्ती लोक मरयम (अ.) च्या पुत्राला ईश्वराचा पुत्र मानून त्याची उपासना करतात की नाही? मग आमचेच उपास्य वाईट का? असे उदाहरण प्रस्तुत होताक्षणीच अश्रद्धावंतांच्या जमावात मोठ्याने हशा पिकला आणि याचे काय उत्तर आहे? अशा घोषणा सुरू झाल्या.



की हे आहेतच भांडखोर लोक. मरयम पुत्र (अ.) याशिवाय अन्य काहीच नव्हता की एक दास होता ज्याला आम्ही अनुग्रहित केले आणि बनीइस्राईलसाठी त्याला आमच्या सामर्थ्याचा एक नमूना बनविले. आम्ही जर इच्छिले तर तुमच्यापासून ईशदूत निर्माण करू ते पृथ्वीवर तुमचे उत्तराधिकारी होतील आणि तो (अर्थात मरयम पुत्र) वास्तविकत: पुनरुत्थानाची एक खूण होय, म्हणून तुम्ही त्यात संशय करू नका[११] आणि माझे म्हणणे मान्य करा, हाच सरळ मार्ग आहे, असे घडू नये की शैतानाने तुम्हाला त्यापासून रोखावे, तो तुमचा उघड शत्रू आहे. आणि जेव्हा ईसा (अ.) स्पष्ट संकेत घेऊन आला होता तेव्हा तो म्हणाला होता की, 'मी तुमच्याजवळ विवेक घेऊन आलो आहे, आणि अशा कारणास्तव आलेलो आहे की तुम्हावर त्या काही गोष्टींच्या हकीगतींचा उलगडा करावा, ज्यात तुम्ही मतभेद दर्शवीत आहात. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा. वस्तुस्थिती अशी आहेकी अल्लाहच माझा पालनकर्ता आहे आणि तुमचा सुद्धा. त्याचीच तुम्ही उपासना करा, हाच सरळ मार्ग आहे.''[१२] परंतु (त्याची अशी स्पष्ट शिकवण असतानासुद्धा) लोकांनी आपापसांत

११) असाही अनुवाद होऊ शकतो 'तो प्रलयाच्या माहितीचे एक साधन आहे' या ठिकाणी असा प्रश्न निर्माण होतो की पैगंबर येशू (अ.) यांना कयामतची निशाणी अथवा प्रलयाच्या माहितीचे साधन कोणत्या अर्थाने सांगितले गेले आहे? बहुतेक भाष्यकार म्हणतात की याच्याने अभिप्रेत हजरत ईसा-येशू (अ.) यांचे पुनरागमन आहे, याची वार्ता मोठ्या प्रमाणात हदीसीत आलेली आहे. परंतु सदरहू आयत नंतरची आयत पाहता असा अर्थ करता येत नाही. त्यांचे पुनरागमन तर प्रलयाच्या माहितीचे साधन केवळ अशाच लोकांसाठी ठरू शकते जे त्या काळात मौजूद असतील किंवा त्यानंतर जन्मतील. मक्केतील अश्रद्धावंतांसाठी बरे तो माहितीचे साधन कसे ठरू शकत होता की त्यांना संबोधून असे म्हणणे योग्य ठरले असते 'म्हणून तुम्ही यात शंका घेऊ नका?' म्हणून आमच्याजवळ, काही इतर भाष्यकारांनी जे भाष्य केले आहे तेच बरोबर आहे. हजरत ईसा-येशू (अ.) यांचे विनाबापाचे जन्मास येणे, मातीद्वारे त्यांचे पक्षी बनविणे आणि मृतांना जिवंत करणे या गोष्टींना प्रलयाच्या संभावनेचे एक प्रमाण ठरविले गेले आहे. ईश्वराचे असे फर्माविण्यामागील हेतू असा की, जो ईश्वर पिताविना मूल निर्माण करू शकतो, व ज्या ईश्वराचा एक दास मातीच्या पुतळ्यात जीव टाकू शकतो व मृतांना जिवंत करू शकतो, त्या ईश्वरासाठी बरे तुम्ही ही गोष्ट का अशक्य मानता की तो तुम्हाला आणि सर्व मानवांना मृत्यूनंतर पुन्हा जिवंत करील.

१२) म्हणजे ख्रिस्ती लोक वाटेल ते करीत व बोलत राहो, हजरत ईसा (अ.) यांनी स्वत: कधी असे म्हटले नव्हते की मी ईश्वर आहे किंवा ईश्वराचा पुत्र आहे व तुम्ही माझी उपासना करा, तर इतर सर्व प्रेषितांचे जे आवाहन होते व आता ज्याचे पैगंबर मुहम्मद (स.) तुम्हाला आवाहन करीत आहेत, तेच त्यांचेही आवाहन होते.

मतभेद दर्शविले,[१३] तर विनाश आहे अन्याय करणाऱ्या त्या लोकांचा यातनामय शिक्षेच्या दिवशी. (५७-६५)

काय हे लोक आता केवळ या गोष्टीच्या प्रतीक्षेत आहेत की अकस्मात यांच्यावर पुनरुत्थान यावे आणि यांना कळूसुद्धा नये? तो दिवस जेव्हा येईल ईशभीरूंव्यतिरिक्त इतर सर्व मित्र एकमेकाचे शत्रू बनतील. त्या दिवशी त्या लोकांना, ज्यांनी आमच्या वचनांवर श्रद्धा ठेवली होती आणि आज्ञाधारक बनून राहिले होते, सांगितले जाईल की, ''हे माझ्या दासांनो, आज तुमच्यासाठी कोणतेही भय नाही तुम्हाला कोणतेही दु:ख शिवणार नाही. प्रविष्ट व्हा स्वर्गामध्ये, तुम्ही आणि तुमच्या पत्नीं, तुम्हाला आनंदित केले जाईल.'' त्यांच्यासमोर सोन्याच्या थाळी आणि पेले फिरविले जातील. आणि प्रत्येक मनपसंत व आकर्षक वस्तू तेथे उपलब्ध असेल. त्यांना सांगितले जाईल, ''तुम्ही आता येथे सदैव राहाल. तुम्ही या स्वर्गाचे वारस आपल्या त्या कर्मामुळे बनला आहात, जे तुम्ही जगात करीत राहिलात. तुमच्यासाठी येथे विपुल प्रमाणांत फळफळावळ उपलब्ध आहे जी तुम्ही खाल.'' उरले अपराधी तर ते सदैव नरकाच्या प्रकोपात गुरफटलेले राहतील, कधीही त्यांच्या प्रकोपात घट होणार नाही आणि ते त्यात निराश पडलेले असतील. त्यांच्यावर आम्ही अन्याय केला नाही तर ते स्वत:च आपल्यावर अन्याय करीत राहिले. ते पुकारतील, ''हे मालका,[१४] तुझ्या पालनकर्त्याने आम्हाला निकालात काढले तर चांगले होईल.'' तो उत्तर देईल, ''तुम्ही असेच पडून राहाल, आम्ही तुमच्याजवळ सत्य घेऊन आलो होतो परंतु तुमच्यापैकी पुष्कळशांना सत्यच अप्रिय होते.''[१५] (६६-७८)

या लोकांनी एखादे पाऊल उचलण्याचा निर्णय घेतला आहे काय?[१६] बरे तर मग आम्हीसुद्धा एक निर्णय घेतो. काय यांनी असा समज करून घेतला आहे की आम्ही यांच्या गुप्त गोष्टी आणि यांच्या कानगोष्टी ऐकत नाही? आम्ही सर्वकाही ऐकत आहोत आणि आमचे

---

**१३)** म्हणजे एका समूहाने त्यांचा इन्कार केला तर विरोधात त्या समूहाने इतकी सीमा गाठली की त्यांच्यावर अनैतिकपणे जन्मास येण्याचे आळ लावले. दुसऱ्या समुहाने त्यांना मान्य केले तर श्रद्धेत बेछूटपणे अतिशयोक्ती करून त्यांना ईश्वर मानून घेतले. मग एका मानवाचे ईश्वर असण्याचा प्रश्न त्या समुहासाठी इतके विचकट कोडे ठरले की त्याचा उलगडा करता करता त्या समूहात अगणित गट निर्माण झाले.

**१४)** मालकाने अभिप्रेत आहे नरकाचा प्रमुख, जसे की भाषणाच्या ओघाने स्वत:च व्यक्त होत आहे.

**१५)** नरकाच्या प्रमुखाचे हे 'वचन' की 'आम्ही तुमच्याकडे सत्य घेऊन आलो होतो' तसेच आहे जसे एखादा शासकीय अधिकारी शासनातर्फे बोलताना 'आम्ही' असा शब्द उच्चारतो व त्याच्याने अभिप्रेत असे असते की आमच्या शासनाने हे काम केले अथवा हा हुकूम दिला.

**१६)** संकेत त्या गोष्टीकडे आहे ज्या कुरैशांचे सरदार आपल्या गुप्त बैठकीत अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याविरूद्ध एखादे निर्णायक पाऊल उचलण्यासाठी करीत होते.



दूत यांच्याजवळ नोंद घेत आहेत. (७९-८०)

यांना सांगा, ''जर खरोखर रहमान (परमदयाळू) ची एखादी संतती असती तर सर्वांच्या अगोदर उपासना करणारा मीच असतो. ''पवित्र आहे आकाशांचा व पृथ्वीचा शासक अर्श (राजसिंहासन) चा स्वामी, त्या सर्व गोष्टींपासून जे हे लोक त्याच्या संबंधित करतात. ठीक, यांना आपल्या मिथ्या कल्पनेत गर्क आणि आपल्या खेळांत मग्न राहू द्या, येथपावेतो की हे आपला तो दिवस पाहतील ज्याचे यांना भय दाखविले जात आहे. (८१-८३)

तोच एकटा आकाशांतही ईश्वर आहे आणि पृथ्वीवरही ईश्वर, आणि तोच बुद्धिमान आणि सर्वज्ञ आहे. फार उच्च व श्रेष्ठतर आहे तो ज्याच्या ताब्यात पृथ्वी व आकाशांचे व त्या प्रत्येक वस्तूचे राज्य आहे जे पृथ्वी व आकाशांच्या दरम्यान आढळते. आणि तोच पुनरुत्थानाच्या घटकेचे ज्ञान ठेवतो. आणि त्याच्याकडे तुम्ही सर्व परतविले जाणार आहात. (८४-८५)

त्याला सोडून हे लोक ज्यांचा धावा करतात ते कोणत्याही शिफारसीचा अधिकार बाळगत नाहीत, याव्यतिरिक्त की एखाद्या माहितीच्या आधारे सत्याची साक्ष देतील.[१७] (८६)

आणि जर तुम्ही यांना विचारले की यांना कोणी निर्माण केले आहे तर हे स्वत: म्हणतील की अल्लाहने.[१८] मग कोठून हे फसविले जात आहेत, शपथ आहे पैगंबर (स.) च्या या कथनाची की हे पालनकर्त्या, हे ते लोक होत जे मान्य करीत नाहीत.[१९] (८७-८८)

बरे, हे नबी (स.), यांच्याकडे दुर्लक्ष करा आणि सांगा की सलाम तुम्हाला, लवकरच यांना कळून येईल. (८९)

---

**१७)** म्हणजे एखादा मनुष्य जर असे म्हणतो की त्याने ज्या व्यक्तींना उपास्य बनविलेले आहे, ते निश्चितपणे शिफारसीचे अधिकार बाळगतात व हवे त्याला ते माफी मिळवून देवू शकतात, इतके बळ त्यांना सर्वोच्च अल्लाहच्या येथे प्राप्त आहे तर त्याने सांगावे की काय तो ज्ञानाच्या आधारावर या गोष्टीचे सत्याधिष्ठित असण्याची साक्ष देऊ शकतो?

**१८)** या आयतीचे दोन अर्थ आहेत. एक असा की, जर तुम्ही यांना विचारले की खुद्द यांना कोणी निर्माण केले आहे तर म्हणतील की अल्लाहने. दुसरा असा की जर तुम्ही यांना विचारले की तुमच्या या उपास्यांचा निर्माणकर्ता कोण आहे तर हे म्हणतील की अल्लाह.

**१९)** अर्थ असा की शपथ आहे पैगंबराच्या या वचनाची की 'हे पालनकर्त्या, हे ते लोक आहेत जे मान्य करीत नाहीत' किती विचित्र आहे या लोकांची फसवणूक की स्वत:च मान्य करतात की यांचा व यांच्या देवांचा निर्माणकर्ता सर्वोच्च अल्लाहच आहे तरीपण निर्माणकर्त्याला सोडून निर्मितीच्याच उपासनेचा आग्रह करीत आहेत.

# ४४ सूरह अद्दख़ान

*(मक्काकालीन, वचने ५९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हामीऽऽम. शपथ आहे या उज्ज्वल ग्रंथाची की आम्ही याला एका अत्यंत कल्याणकारी व समृद्धशाली रात्रीत अवतरला आहे.[१] कारण आम्ही लोकांना सावध करण्याचा इरादा बाळगत होतो. ही ती रात्र होती ज्यात प्रत्येक मामल्याचा विवेकपूर्ण निर्णय आमच्या आज्ञेने सादर केला जातो.[२] आम्ही एक प्रेषित पाठविणार होतो, तुझ्या पालनकर्त्याची कृपा म्हणून, निश्चितपणे तोच सर्वकाही ऐकणारा आणि जाणणारा आहे, आकाशांचा व पृथ्वीचा पालनकर्ता आणि त्या प्रत्येक वस्तूचा पालनकर्ता जी आकाशांच्या व पृथ्वीच्या दरम्यान आहे, जर तुम्ही लोक खरोखर विश्वास बाळगणारे असाल. कोणीही त्याच्याव्यतिरिक्त उपास्य नाही,[३] तोच जीवन प्रदान करतो आणि तोच मृत्यू देतो. तुमचा पालनकर्ता आणि तुमच्या त्या पूर्वजांचा पालनकर्ता जे पूर्वी होऊन गेले आहेत. (परंतु खरे पाहता या लोकांना विश्वास नाही) तर हे आपल्या शंकेत ग्रस्त, खेळत आहेत. (१-९)

ठीक, तर प्रतीक्षा करा त्या दिवसाची जेव्हा स्पष्ट धूरासमान असलेले आकाश येईल आणि ते लोकांवर पसरेल, ही आहे यातनादायक शिक्षा. (आता म्हणतात की), ''हे पालनकर्त्या, आम्हावरून हा प्रकोप दूर कर, आम्ही श्रद्धा ठेवतो.''[४] यांची गफलत कुठली दूर होते? यांची स्थिती तर अशी आहे की यांच्याजवळ तेजस्वी प्रेषित[५] आला, तरीसुद्धा हे त्याच्याकडे वळले नाहीत आणि म्हटले की, ''हा तर शिकविलेला-पढविलेला वेडसर आहे.'' आम्ही जरा प्रकोप हटवितो, तुम्ही लोक पुन्हा तेच काही कराल जे पूर्वी करीत होता. ज्यादिवशी आम्ही मोठा आघात करू तो दिवस असेल जेव्हा आम्ही तुमच्यावर सूड उगवू. (१०-१६)

---

१) अभिप्रेत 'लैलतुल कद्र' आहे. 'लैलतुल कद्र' म्हणजे रमजान महिन्यातील शेवटच्या दहा दिवशांतील विषम तारखांतली एक रात्र. त्याच रात्री कुरआनाचे अवतरण सुरू झाले.

२) यावरून असे कळते की सर्वोच्च अल्लाहच्या राज्यव्यवस्थेत ही एक अशी रात्र आहे ज्यात तो, व्यक्ती, राष्ट्रे आणि देशांच्या भाग्याचे फैसले करून आपल्या फरिश्त्यांच्या स्वाधीन करतो, मग ते याच फैसल्यानुसार अंमलबजावणी करीत असतात.

३) 'उपास्य'ने अभिप्रेत आहे खरा उपास्य. त्याचा हक्क असा की त्याची उपासना (बंदगी व भक्ती) केली जावी.

४) या आयती आणि आयत क्र. १६ मध्ये प्रलयाच्या प्रकोपाचा उल्लेख आहे तर आयत क्र. १५ मध्ये ज्या प्रकोपाचा उल्लेख आहे त्याच्याने अभिप्रेत, मक्कावासी या आयतीच्या उतरण्याच्या काळात ज्या दुष्काळात सापडले होते, ते दुष्काळी प्रकोप होय.

५) अर्थात असा प्रेषित ज्याचे प्रेषित होणे प्रत्यक्षत: प्रकट होते.



आम्ही यांच्यापूर्वी फिरऔनच्या लोकसमूहाला अशाच कसोटीत घातले आहे. त्याच्याजवळ एक अत्यंत सज्जन प्रेषित आला, आणि तो म्हणाला, ''अल्लाहच्या दासांना माझ्या हवाली करा, मी तुमच्यासाठी एक विश्वसनीय प्रेषित आहे. अल्लाहच्याविरूद्ध शिरजोरी करू नका. मी तुमच्यासमोर (आपल्या नियुक्तीची) स्पष्ट सनद प्रस्तुत करतो. आणि मी आपल्या पालनकर्त्याचे व तुमच्या पालनकर्त्याचे आश्रय घेतलेले आहे यापासून की तुम्ही माझ्यावर आक्रमक व्हावे. जर तुम्ही माझे म्हणणे ऐकत नसाल तर माझ्यावर हात टाकण्यापासून दूर रहा.'' सरतेशेवटी त्याने आपल्या पालनकर्त्याचा धावा केला की हे लोक अपराधी आहेत. (उत्तर दिले गेले), ''ठीक, तर रातोरात माझ्या दासांना घेऊन निघून जा तुम्हा लोकांचा पाठलाग केला जाईल. समुद्राला त्याच्या स्थितीत मोकळे सोड. हे संपूर्ण लष्कर बुडणार आहे.'' कित्येक उद्याने व झरे आणि शेते व वैभवशाली राजवाडे होते जे ते सोडून गेले व कितीतरी विलासाचा सरंजाम ज्यात ते विलास करीत असत, त्यांच्या पाठीमागे तसाच पडून राहिला. असा झाला त्यांचा शेवट आणि आम्ही दुसऱ्यांना या वस्तूंचे वारस बनविले मग ना आकाश त्यांच्यासाठी रडले व ना पृथ्वी, आणि थोडीशी सवडसुद्धा त्यांना दिली गेली नाही. अशा प्रकारे बनीइस्राईलना आम्ही अत्यंत अपमानास्पद यातना देणाऱ्या फिरऔनपासून मुक्ती दिली, जो मर्यादेपलीकडे जाणाऱ्यांपैकी खरोखरच मोठा उल्लंघनकारी मनुष्य होता. आणि त्यांची स्थिती जाणून त्यांना जगाच्या इतर लोकसमूहावर प्राधान्य दिले, आणि त्यांना असे संकेत दाखविले ज्यामध्ये उघड परीक्षा होती. (१७-३३)

हे लोक म्हणतात, ''आमच्या पहिल्या मृत्यूशिवाय अन्य काहीच नाही, त्यानंतर दुसऱ्यांदा आम्ही उठविले जाणार नाही जर तुम्ही खरे असाल तर उठवून आणा आमच्या वाडवडीलांना.'' हे श्रेष्ठतर आहेत की तुब्बअचे[६] राष्ट्र आणि त्याच्या पूर्वीचे लोक? आम्ही त्यांना याच कारणास्तव नष्ट केले की ते अपराधी बनले होते. हे आकाश व पृथ्वी आणि त्यांच्या दरम्यानातील वस्तू आम्ही काही खेळ म्हणून बनविल्या नाहीत. यांना आम्ही सत्याधिष्ठित निर्माण केले आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण जाणत नाहीत. या सर्वांच्या उठविण्यासाठी ठरलेली वेळ निर्णयाचा दिवस आहे. तो दिवस जेव्हा एखादा निकट स्नेही आपल्या निकट स्नेहीच्या कोणत्याही उपयोगी पडणार नाही आणि कोठूनही व कसलीही मदत त्यांना पोहचणार नाही, याव्यतिरिक्त की अल्लाहनेच एखाद्यावर दया करावी, तो जबरदस्त आणि परमकृपाळू आहे. (३४-४२)

---

६) 'तुब्बअ' हिमैर वंशीय राजांचे उपनाव होते, जसे किसरा, कैसर, फिरऔन इ. उपनावे विविध देशांच्या राजांसाठी विशेष राहिले आहेत. हिमैर वंशीय लोक सबा राष्ट्राच्या एका शाखेशी सबंधित होते आणि शतकानुशतके अरबस्तानात हे राजे म्हणून राहिले.

जक्कूमचे वृक्ष गुन्हेगारांचे खाद्य असेल, तेलाच्या उकळीप्रमाणे, पोटांत ते अशाप्रकारे उकळेल जसे उकळते पाणी उसळत असते, "धरा याला आणि फरफटत न्या याला नरकाच्या मधोमध. आणि ओता याच्या डोक्यावर उकळत्या पाण्याचा प्रकोप. चाख याची चव, मोठा जबरदस्त सन्माननीय मनुष्य आहेस तू. ही तीच गोष्ट आहे जिच्या येण्यात तुम्ही लोक शंका बाळगत होता." (४३-५०)

ईशभीरू लोक शांतीच्या स्थळी असतील. उद्यानात व झऱ्यांत, तलम रेशीम व जरतारी वस्त्रे परिधान करून समोरासमोर बसले असतील, असे असेल त्यांचे वैभव. आणि आम्ही गोऱ्यापान मृगनयनी स्त्रियाशी त्यांच्या जोड्या बनवू. तेथे ते समाधानपूर्वक हरतऱ्हेच्या चविष्ट वस्तू मागतील. तेथे मृत्यूची चव ते कधीही घेणार नाहीत. बस्स, जगात जो मृत्यू आला तोच आला. आणि अल्लाह आपल्या मेहेरबानीने त्यांना नरकाच्या प्रकोपापासून वाचवील. हेच मोठे यश होय. (५१-५७)

हे पैगंबर (स.), आम्ही या ग्रंथाला तुमच्या भाषेत सुलभ बनविले आहे जेणेकरून या लोकांनी उपदेश घ्यावा. आता तुम्हीही प्रतीक्षा करा आणि हेदेखील प्रतीक्षेत आहेत. (५८-५९)



# ४५ सूरह अल्‌जासियह्‌

*(मक्काकालीन, वचने ३७)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हामीऽऽम. या ग्रंथाचे अवतरण अल्लाहकडून आहे जो जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (१-२)

वस्तुस्थिती अशी आहे की, आकाशांत व पृथ्वीत अगणित संकेत आहेत श्रद्धा ठेवणाऱ्यांसाठी आणि तुमच्या स्वत:च्या निर्मितीत, आणि त्या जनावरांत ज्यांना अल्लाह (पृथ्वीवर) पसरवीत आहे, मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे विश्वास करणारे आहेत, आणि रात्र व दिवसांतील फरक व भिन्नतेत, आणि त्या उपजीविकेत जी अल्लाह आकाशांतून उतरवितो, तिच्याद्वारे मृत जमिनीला जिवंत करतो. आणि वाऱ्याच्या भ्रमणांत पुष्कळसे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे बुद्धीचा उपयोग करतात. हे अल्लाहचे संकेत आहेत ज्यांचे आम्ही तुमच्यासमोर ठीकठीक वर्णन करीत आहोत. आता शेवटी अल्लाह आणि त्याच्या वचनांनंतर अन्य कोणती गोष्ट आहे जिच्यावर हे लोक श्रद्धा ठेवतील. (३-४)

विनाश आहे त्या प्रत्येक खोटारड्या, दुराचारी माणसासाठी, ज्याच्यासमोर अल्लाहच्या वचनांचे पठण होते आणि तो ते ऐकतो, मग पूर्ण गर्वानिशी आपल्या सत्याच्या इन्कारावर अशाप्रकारे अडून बसतो जणूकाही त्याने ते ऐकलेच नाहीत. अशा माणसाला यातनादायक प्रकोपाची शुभवार्ता ऐकवा. आमच्या संकेतांपैकी एखादी गोष्ट जेव्हा त्याला कळते तेव्हा तो तिला थट्टेचा विषय बनवितो. अशा सर्व लोकांसाठी अपमानजनक प्रकोप आहे. त्यांच्यापुढे नरक आहे. जे काही त्यांनी जगात कमविले आहे त्यापैकी कोणतीही वस्तू त्यांच्या कोणत्याही उपयोगी पडणार नाही, त्यांचे ते वालीसुद्धा त्यांच्यासाठी काही करू शकणार नाहीत; ज्यांना त्यांनी अल्लाहला सोडून आपले संरक्षक बनवून ठेवले आहे, त्यांच्यासाठी महान प्रकोप आहे. (५-१०)

हा कुरआन सर्वस्वी मार्गदर्शन आहे, आणि त्या लोकांसाठी भयंकर यातनादायक प्रकोप आहे ज्यांनी आपल्या पालनकर्त्याचे संकेत मानण्यास नकार दिला. (११)

तो अल्लाहच तर आहे ज्याने तुमच्यासाठी समुद्रास अधीन केले जेणेकरून त्याच्या हुकूमाने नौका त्याच्यात चालतील आणि तुम्ही त्याचा कृपाप्रसाद शोधावा व कृतज्ञ बनावे. त्याने पृथ्वी व आकाशांतील सर्वच वस्तू तुमच्या अधीन केल्या. सर्वकाही आपल्या

जवळून,[1] यात मोठे संकेत आहेत त्या लोकांसाठी जे गंभीरतापूर्वक विचार करणारे आहेत. (१२-१३)

हे पैगंबर (स.), श्रद्धावंतांना सांगा की जे लोक अल्लाहकडून वाईट दिवस येण्याची कसलीही संभावना मानीत नाहीत, त्यांच्या कृत्यांकडे दुर्लक्ष करा जेणेकरून अल्लाहने खुद्द एका समुहाला त्याच्या कमाईचा बदला द्यावा. जो कोणी सत्कृत्ये करील स्वत:साठीच करील, आणि जो वाईट करील तो स्वत:च त्याचे दुष्परिणाम भोगेल. नंतर जायचे तर सर्वांना आपल्या पालनकर्त्याकडेच आहे. (१४-१५)

यापूर्वी बनीइस्राईलना आम्ही ग्रंथ व हुकूम आणि प्रेषितत्व प्रदान केले होते. त्यांना आम्ही उत्तम जीवनसामुग्रीने उपकृत केले. जगभरातील लोकांवर त्यांना श्रेष्ठत्व प्रदान केले, आणि धर्माच्या बाबतीत त्यांना स्पष्ट आदेश दिले. मग जे मतभेद त्यांच्या दरम्यान उद्भवले ते (अज्ञानामुळे नव्हे तर) ज्ञान प्राप्त झाल्यानंतर उद्भवले आणि यामुळे झाले की ते आपापसांत एक दुसऱ्यावर आगळीक करू इच्छित होते, अल्लाह पुनरुत्थानाच्या दिवशी त्या मामल्यांचे निर्णय देईल ज्यात ते मतभेद दर्शवीत राहिले आहेत, यानंतर आता हे पैगंबर (स.), आम्ही तुम्हाला धर्माच्या बाबतीत एका स्पष्ट राजमार्गा (शरीअत) वर कायम केले आहे. म्हणून तुम्ही त्यावर चाला आणि त्या लोकांच्या इच्छेचे अनुसरण करू नका ज्यांना ज्ञान नाही. अल्लाहच्या विरूद्ध ते तुमच्या काहीही उपयोगी पडू शकत नाहीत.[2] अत्याचारी लोक एकमेकांचे साथीदार आहेत, ईशपरायणांचा साथीदार अल्लाह आहे. हे डोळसांचे प्रकाश आहेत सर्व लोकांसाठी आणि मार्गदर्शन आणि कृपा आहे त्या लोकांसाठी जे विश्वास करतील. (१६-२०)

काय ते लोक ज्यांनी अपकृत्ये केली आहेत, असा समज करून बसले आहेत की आम्ही त्यांना, आणि श्रद्धावंतांना व सत्कृत्ये करणाऱ्यांना एकसमान बनवू की त्यांचे जिणे व मरणे एकसारखे व्हावे? फार वाईट हुकूम आहे जे हे लोक लावीत आहेत. अल्लाहने तर आकाशांना व पृथ्वीला सत्याधिष्ठित निर्माण केले आहे, आणि अशासाठी केले आहे

१) याचे दोन अर्थ आहेत. एक असा की अल्लाहचे हे बक्षीस, जगातील बादशाहांच्या बक्षिसीसारखे नाही जे रयतकडून वसूल केलेली संपत्ती रयतपैकीच काही लोकांना प्रदान करतात तर सृष्टीतील या सर्व देणग्या अल्लाहने स्वत:च निर्माण केलेल्या आहेत व त्याने आपल्याकडून त्या मानवाला प्रदान केल्या आहेत. दुसरा असा की या देणग्यांच्या निर्मितीत कुणी अल्लाहचा भागीदारही नाही व त्या देणग्यांना मानवासाठी वशीभूत करण्यात अन्य कुणा व्यक्तीचा सहभागही नाही. एकटा अल्लाहच त्यांचा निर्माणकर्ता आहे व त्यानेच स्वत:कडून त्या देणग्या माणसाला प्रदान केल्या आहेत.

२) म्हणजे तुम्ही जर यांना खुष करण्यासाठी अल्लाहच्या धर्मात कोणत्याही प्रकारचा फेरफार कराल तर तुम्हाला अल्लाहच्या पकडीपासून ते वाचवू शकणार नाहीत.



की प्रत्येकाला त्याच्या कमाईचा बदला दिला जावा. लोकांवर अन्याय कदापि केला जाणार नाही. (२१-२२)

मग काय तुम्ही कधी त्या माणसाच्या स्थितीचाही विचार केला ज्याने आपल्या मनोवासनेला आपला उपास्य बनविला, आणि अल्लाहने ज्ञान असतानासुद्धा[3] त्याला पथभ्रष्टतेत फेकून दिले, आणि त्याच्या हृदयावर व कानावर मोहर लावली आणि त्याच्या डोळ्यावर पडदा घातला? अल्लाहव्यतिरिक्त आता अन्य कोण आहे जो त्याला मार्गदर्शन करील? काय तुम्ही लोक कसलाही बोध घेत नाही? (२३)

हे लोक म्हणतात की, ''जीवन केवळ हेच आमचे जगातील जीवन होय, येथेच आमचे मरणे व जगणे आहे, आणि कालचक्राव्यतिरिक्त कोणतीही गोष्ट नाही जी आम्हाला नष्ट करील. वास्तविक याबाबतीत यांचेजवळ कोणतेच ज्ञान नाही. हे केवळ कल्पनेच्या आधारे या गोष्टी करतात. आणि जेव्हा आमची स्पष्ट वचने यांना ऐकविली जातात तेव्हा याच्याजवळ कोणताही युक्तिवाद याशिवाय असणार नाही की उठवून आणा आमच्या वाडवडीलांना जर तुम्ही खरे असाल. हे पैगंबर (स.), यांना सांगा, अल्लाहच तुम्हाला जीवन प्रदान करतो, मग तोच तुम्हाला मृत्यू देईल. मग तोच तुम्हाला त्या पुनरुत्थानाच्या दिवशी एकत्रित करील ज्याच्या येण्यात कोणताही संदेह नाही, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत. पृथ्वी आणि आकाशांचे राज्य अल्लाहचेच आहे, आणि ज्या दिवशी पुनरुत्थानाची घटका येऊन ठेपेल त्या दिवशी मिथ्यावादी तोट्यात येतील. (२४-२७)

त्यावेळी तुम्ही प्रत्येक समूहाला गुडघे टेकून पडलेले पाहाल. प्रत्येक समूहाला हाक दिली जाईल की त्याने यावे व आपली कृति-नोंद पाहावी. त्यांना सांगितले जाईल, ''आज तुम्हा लोकांना त्या कृत्यांचा बदला दिला जाईल जो तुम्ही करीत राहिला होता. ही आम्ही तयार करविलेली कृति-नोंद आहे जी तुमच्यावर ठीकठीक साक्ष देत आहे, जे जे काही तुम्ही करीत होता, ते आम्ही लिहवीत जात होतो.'' मग ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली होती आणि सत्कृत्ये करीत राहिले होते, त्यांना त्यांचा पालनकर्ता आपल्या कृपेत दाखल करील आणि हेच उज्ज्वल यश आहे. आणि ज्या लोकांनी द्रोह केला होता (त्यांना सांगितले जाईल), ''माझी वचने तुम्हाला ऐकविली जात नव्हती काय? परंतु तुम्ही गर्व केला आणि अपराधी बनून राहिलात, आणि जेव्हा सांगितले जात होते की अल्लाहचे वचन सत्याधिष्ठित आहे व पुनरुत्थानाच्या येण्यात कोणतीही शंका नाही तेव्हा तुम्ही सांगत

३) मूळ अरबी शब्द 'अजल्लाहूल्लाहू अला इलमिन' असे आहेत. या शब्दांचा एक अर्थ असा होऊ शकतो की तो मनुष्य विद्वान असतानादेखील अल्लाहकडून पथभ्रष्टतेत टाकला गेला, कारण तो मनोवासनेचा दास बनला होता. दुसरा अर्थ असाही होऊ शकतो की अल्लाहने आपल्या या माहितीच्या आधारे की त्याने आपल्या मनोवासनेला आपला ईश्वर बनविलेला आहे, त्याला पथभ्रष्टतेत फेकले.

होता की आम्हाला माहीत नाही की पुनरुत्थान काय असते, आम्ही तर काहींशी कल्पनाच तेवढी बाळगतो, खात्री आम्हाला नाही.'' त्यावेळी त्यांच्यावर त्यांच्या कृत्यांचे अरिष्ट उघड होईल आणि ते त्याच गोष्टीच्या फेऱ्यात येतील जिची ते टिंगल-टवाळी करीत होते. आणि त्यांना सांगितले जाईल की, ''आज आम्हीसुद्धा त्याचप्रमाणे तुम्हाला विसरून जातो ज्याप्रमाणे तुम्ही या दिवसाची भेट विसरून गेला होता. तुमचे ठिकाण आता नरक आहे आणि कोणीही तुम्हाला मदत करणारा नाही. असा तुमचा शेवट यामुळे झाला की तुम्ही अल्लाहच्या संकेतांना थट्टेचा विषय बनवित होता आणि ऐहिक जीवनाने तुमची फसगत केली होती, म्हणून आज हे लोक नरकामधून काढलेही जाणार नाहीत आणि यांना सांगितलेही जाणार नाही की क्षमायाचना करून आपल्या पालनकर्त्याला प्रसन्न करा.''[४] (२८-३५)

म्हणून प्रशंसा अल्लाहसाठीच आहे जो पृथ्वी आणि आकाशांचा स्वामी आणि सकल जगवासियांचा पालनकर्ता आहे. पृथ्वी आणि आकाशांत मोठेपणा त्याच्यासाठीच आहे आणि तोच जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (३६-३७)

४) हे शेवटचे वाक्य अशा शैलीत आहे जसे कुणी स्वामी आपल्या काही सेवकांची खरडपट्टी केल्यानंतर इतरांना संबोधून सांगतो की, 'अच्छा, आता या नालायकांना ही शिक्षा आहे.'



# ४६ सूरह अल्अह्क़ाफ

*(मक्काकालीन, वचने ३५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हामीऽऽम. या ग्रंथाचे अवतरण जबरदस्त आणि बुद्धिमान अल्लाहकडून आहे. (१-२)

आम्ही पृथ्वीला व आकाशांना आणि त्या सर्व वस्तूंना ज्या त्यांच्या दरम्यान आहेत, सत्याधिष्ठित आणि एका विशिष्ट मुदतीच्या निश्चितीसह निर्माण केले आहे. परंतु हे अश्रद्धावंत लोक त्या वस्तुस्थितीपासून तोंड फिरवून आहेत ज्यापासून यांना सावध केले गेले आहे. (३)

हे पैगंबर (स.), यांना सांगा, ''कधी तुम्ही डोळे उघडून पाहिले की त्या व्यक्ती आहेत तरी कोण की अल्लाहला सोडून ज्यांचा धावा तुम्ही करता? जरा मला दाखवा तर खरे की जमिनीत त्यांनी काय निर्माण केले आहे? अथवा आकाशांच्या निर्मिती व नियोजनात त्यांचा काही वाटा आहे? याच्यापूर्वी आलेला एखादा ग्रंथ अथवा ज्ञानाचे एखादे अवशेष (या श्रद्धेच्या पुराव्यादाखल) तुमच्याजवळ असल्यास तेच घेऊन या, जर तुम्ही खरे असाल. बरे त्या माणसापेक्षा अधिक बहकलेला माणूस इतर कोण असेल जो अल्लाहला सोडून त्यांना पुकारतो जे पुनरुत्थानापर्यंत त्याला उत्तर देऊ शकत नाहीत?[१] किंबहुना यापासूनही अनभिज्ञ आहेत की पुकारणारे त्यांना पुकारीत आहेत, आणि जेव्हा सर्व माणसे एकत्र केली जातील त्यावेळी ते आपणास पुकारणाऱ्यांचे शत्रू आणि त्यांच्या उपासनेचा ते इन्कार करणारे असतील.[२] (४-६)

या लोकांना जेव्हा आमची स्पष्ट वचने ऐकविली जातात आणि सत्य यांच्यापुढे येते तेव्हा हे अश्रद्धावंत लोक त्यासंबंधी म्हणतात की ही तर उघड जादू आहे. काय त्यांचे म्हणणे असे आहे की प्रेषिताने हे स्वत:च रचले आहे? यांना सांगा, ''जर मी हे स्वत: रचलेले असेल तर तुम्ही मला अल्लाहच्या पकडीतून जरासुद्धा वाचवू शकणार नाही, ज्या गोष्टी तुम्ही रचता अल्लाह त्या चांगल्या प्रकारे जाणतो, माझ्या आणि तुमच्या दरम्यान

१) उत्तर देण्याने अभिप्रेत एखाद्याच्या विनंतीवर निर्णय देणे होय. अर्थ असा की या उपास्यांजवळ ते अधिकारच नाहीत ज्यांच्या आधारे ते यांच्या प्रार्थना व विनवणीवर एखादा निर्णय सादर करू शकावेत.

२) म्हणजे ते स्वच्छपणे सांगतील की आम्ही तुमच्या गरजा भागविणारे आहोत, म्हणून तुम्ही सहाय्यासाठी आमचा धावा करीत जा, असे कधीही आम्ही यांना म्हटले नव्हते व हे आमचा धावा करीत असत याचीही आम्हाला माहिती नव्हती. यांनी स्वत:च आम्हाला गरजा भागविणारा म्हणून मानले व स्वत:च आमचा धावा करणे प्रारंभ केले.

तोच साक्ष देण्यास पुरेसा आहे, आणि तो अत्यंत क्षमाशील व परमकृपाळू आहे.''[३]

(७-८)

यांना सांगा, ''मी कोणी निराळा प्रेषित नाही,[४] मला माहीत नाही की उद्या तुमच्याशी काय घडेल व माझ्याशी काय, मी तर केवळ त्या दिव्यबोधाचे अनुसरण करतो जे माझ्याकडे पाठविले जाते आणि मी एक स्पष्टपणे सावध करणाऱ्याशिवाय अन्य काही नाही.'' हे पैगंबर (स.) यांना सांगा, ''कधी तुम्ही विचार तरी केला की जर ही वाणी अल्लाहकडूनच असली आणि तुम्ही तिचा इन्कार करून बसला तर (तुमचा शेवट कसा होईल) आणि यासारख्या एका वाणीची तर बनीइस्राईलपैकी एका साक्षीदाराने साक्षसुद्धा दिलेली आहे, त्याने श्रद्धा ठेवली आणि तुम्ही आपल्या गर्वात गुरफटून राहिलात,[५] अशा अत्याचाऱ्यांना अल्लाह मार्गदर्शन करीत नसतो.'' (९-१०)

ज्या लोकांनी मान्य करण्यास नकार दिलेला आहे ते श्रद्धावंतांसंबंधी म्हणतात, जर या ग्रंथास मानणे काही चांगले काम असते तर हे लोक याबाबतीत आमच्यावर मात करू शकले नसते.[६] ज्याअर्थी यांनी त्यापासून मार्गदर्शन प्राप्त केले नाही, त्याअर्थी हे आता

---

३) या ठिकाणी सदरहू वाक्यातून दोन अर्थ निघत आहेत. एक असा की खरोखरीच ही अल्लाहची कृपा व त्याचे दुर्लक्ष करणेच होय की ज्यामुळे, ईशवाणीला जे लोक थोतांड म्हणून ठरविताना भीत नाहीत असले लोक जमिनीवर श्वासोच्छवास करीत आहेत एरवी जर कुणी निर्दयी व कठोर ईश्वर या सृष्टीचा स्वामी असता तर असे धाडस करणाऱ्यांना एका श्वासानंतर दुसरा श्वास घेणे लाभले नसते. दुसरा अर्थ या वाक्याचा असा होतो की अत्याचाऱ्यांनो! आता तरी या हेकेखोरीपासून परावृत्त व्हा की ईश्वराच्या कृपेचे द्वार तुमच्यासाठी खुले आहे व आतापर्यंत तुम्ही जे काही केलेले आहे माफ होऊ शकते.

४) म्हणजे ज्याप्रकारे पूर्वी सर्व प्रेषित मनुष्यच असत व ईश्वरी गुण व त्याच्या अधिकारात त्यांचा कसलाही वाटा असत नसे, त्याच प्रकारचा प्रेषित मीदेखील आहे.

५) येथे साक्षीदाराने अभिप्रेत कुणी विशिष्ट इसम नव्हे तर बनीइस्राईलपैकी एक सामान्य मनुष्य आहे. ईश्वराच्या सांगण्याचा हेतू असा की महान कुरआन तुमच्यासमोर जी शिकवण प्रस्तुत करीत आहे, ती जगात प्रथमच तुमच्यासमोर प्रस्तुत केलेली असावी व त्यामुळे मानवजातीसमोर कधी न आलेल्या अशा निरनिराळ्या गोष्टी कशा मान्य कराव्या म्हणून तुम्ही निमित्त सांगावे, अशा प्रकारची जगावेगळी ही गोष्ट नव्हे. यापूर्वी अशीच शिकवण अशाचप्रकारे वही-दिव्यबोधाद्वारे बनीइस्राईलीसमोर तौरात-बायबल आणि इतर दुसऱ्या दैवी ग्रंथाच्या स्वरूपात आलेली आहे व त्यांच्यापैकी एका सामान्य माणसाने ती शिकवण मान्य केलेली आहे.

६) त्यांचा हेतू असा होता की या कुरआनवर काही नासमज लोकांनी ईमान आणले आहे, एरवी जर हे चांगले काम असते तर आम्हासारखे बुद्धिमान लोक ते मानण्यात मागे कसे राहू शकले असते.



अवश्य सांगतील की हे तर जुने थोतांड आहे. वास्तविकपणे याच्यापूर्वी मूसा (अ.) चा ग्रंथ मार्गदर्शक आणि कृपा म्हणून आलेला आहे, आणि हा ग्रंथ त्याची सत्यता प्रमाणित करणारा अरबी भाषेत आला आहे जेणेकरून अत्याचाऱ्यांना ताकीदही द्यावी आणि सन्मार्ग स्वीकारणाऱ्यांना शुभवार्ता द्यावी. निश्चितच ज्यांनी सांगितले की अल्लाहच आमचा पालनकर्ता आहे, मग त्यावर दृढ राहिले, त्यांच्यासाठी कोणतेही भय नाही आणि ते दु:खीही होणार नाहीत. असले लोक स्वर्गामध्ये जाणारे आहेत जेथे ते सदैव राहतील, आपल्या त्या सत्कर्माबद्दल जे ते जगात करीत राहिले आहेत. (११-१४)

आम्ही मनुष्याला आदेश दिला की त्याने आपल्या आईवडिलांशी सद्‌व्यवहार करावा, त्याच्या आईने कष्ट सोसून त्याला पोटात बाळगले आणि कष्ट करून त्याला प्रसवले, आणि त्याचा गर्भ व त्याचे दूध सोडविण्यात तीस महिने लागले येथपावेतो की तो जेव्हा आपल्या पूर्ण शक्तीला पोहचला आणि चाळीस वर्षांचा झाला तेव्हा तो म्हणाला, ''हे माझ्या पालनकर्त्या, मला सद्‌बुद्धी दे की मी तुझ्या त्या देणग्यांबद्दल कृतज्ञता दर्शवावी ज्या तू मला व माझ्या आईवडिलांना प्रदान केल्या आणि असे सत्कृत्य करावे ज्याने तू प्रसन्न व्हावे, आणि माझ्या संततीलासुद्धा सदाचारी बनवून मला सुख दे. मी तुझ्या पुढे पश्चात्ताप व्यक्त करतो आणि आज्ञाधारक (मुस्लिम) दासांपैकी आहे.'' अशाप्रकारच्या लोकांकडून आम्ही त्यांच्या उत्तम कृत्यांचा स्वीकार करतो आणि त्यांच्या वाईट गोष्टींकडे दुर्लक्ष करतो. हे स्वर्गस्थ लोकांमध्ये सामील होतील, त्या खऱ्या वचनानुसार जे त्यांना दिले जात राहिले आहे. आणि त्या माणसाने आपल्या आईवडिलांना सांगितले, ''हाय! त्रस्त करून टाकले तुम्ही, काय तुम्ही मला असली भीती दाखविता की मी मेल्यानंतर थडग्यातून काढला जाईन? वास्तविकत: माझ्यापूर्वी पुष्कळशा पिढ्या होऊन गेल्या आहेत (त्यांच्यापैकी तर कोणी उठून आला नाही)'' आई आणि वडील अल्लाहचा धावा करीत सांगतात, ''अरे अभाग्या, मान्य कर, अल्लाहचे वचन सत्य आहे.'' परंतु तो म्हणतो, ''या सर्व पुरातनकालीन जुनाट कथा होत.'' हे लोक आहेत ज्यांच्यावर प्रकोपाचा निर्णय लागू झालेला आहे. यांच्यापूर्वी जिन्न आणि माणसांची जी टोळकी (अशाच चालीची) होऊन गेली आहेत त्यांच्यातच हेसुद्धा जाऊन सामील होतील. नि:संशय हे तोट्यात राहणारे लोक होत. दोन्ही गटांपैकी प्रत्येकाचे दर्जे त्यांच्या कृत्यानुसार आहेत जेणेकरून अल्लाह त्यांच्या कर्माचा पुरेपूर बदला त्यांना देईल. त्यांच्यावर अन्याय कदापि केला जाणार नाही. मग जेव्हा हे अश्रद्ध अग्नीपुढे आणून उभे केले जातील तेव्हा यांना सांगितले जाईल, तुम्ही आपल्या वाट्याची सगळी ऐश्वर्ये जगातील आपल्या जीवनातच संपवून टाकली आहेत आणि त्यांचा आनंद उपभोगिला, आणि तो गर्व तुम्ही पृथ्वीतलावर कोणत्याही अधिकाराविना करीत राहिला आणि ज्या अवज्ञा तुम्ही केल्या त्यापायी आज तुम्हाला अपमानास्पद यातना दिली जाईल. (१५-२०)

जरा यांना 'आद'चा भाऊ (हूद (अ.)) ची कथा ऐकवा जेव्हा त्याने 'अह्क़ाफ'मध्ये आपल्या राष्ट्राला सावध केले होते आणि अशाप्रकारे सावध करणारे त्याच्या अगोदरसुद्धा होऊन गेले होते व त्याच्यानंतरसुद्धा येत राहिले की, ''अल्लाहच्या व्यतिरिक्त कोणाचीही भक्ती करू नका. मला तुमच्यासंबंधी एका मोठ्या भयंकर दिवसाच्या प्रकोपाची भीती आहे.'' त्यांनी सांगितले, ''काय तू यासाठी आला आहेस की आम्हाला बहकवून आमच्या उपास्यांशी फितुरी करवावी? बरे तर घेऊन ये आपला तो प्रकोप ज्याचे भय तू आम्हाला भय दाखवितोस जर खरोखर तू सच्चा आहेस.'' त्याने सांगितले, ''याचे ज्ञान तर अल्लाहला आहे.[७] मी केवळ तो संदेश तुम्हापर्यंत पोहचवीत आहे जो देऊन मला पाठविले गेले आहे परंतु मी पाहात आहे की तुम्ही लोक अडाणीपणा करीत आहात.'' मग जेव्हा त्यांनी त्या प्रकोपास आपल्या खोऱ्यांकडे येताना पाहिले तेव्हा म्हणू लागले, ''हा ढग आहे जो आम्हाला तृप्त करील.'' - ''नव्हे,[८] तर ही तीच गोष्ट आहे जिच्यासाठी तुम्ही घाई करीत होता, हे झंझावात आहे, ज्यात यातनादायक प्रकोप चालून येत आहे, आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने प्रत्येक वस्तू नष्ट करून टाकील.'' सरतेशेवटी त्यांची दशा अशी झाली की त्यांच्या राहण्याच्या जागेशिवाय तेथे काहीच दिसत नव्हते. अशातऱ्हेने आम्ही अपराध्यांना बदला देत असतो. त्यांना आम्ही ते काही दिले होते जे तुम्हा लोकांना दिलेले नाही. त्यांना आम्ही कान, डोळे व हृदय, सर्वकाही दिलेले होते, परंतु ते कानही त्यांच्या काही उपयोगी पडले नाही की डोळे आणि हृदयदेखील, कारण ते अल्लाहच्या संकेतांना नाकारीत होते, आणि त्याच गोष्टीच्या फेऱ्यात ते आले ज्याची ते टिंगल उडवीत होते. (२१-२६)

तुमच्या सभोवताली प्रदेशातील अनेक वस्त्यांना आम्ही नष्ट करून टाकले आहे. आम्ही आमचे संकेत पाठवून वरचेवर तऱ्हेतऱ्हेने त्यांना समजाविले कदाचित त्यांनी परावृत्त व्हावे. मग त्या व्यक्तींनी त्यांना मदत का केली नाही ज्यांना अल्लाहला सोडून

७) म्हणजे या गोष्टींचे ज्ञान की तुम्हांवर प्रकोप केव्हा पाठविला जावा व कुठपर्यंत तुम्हाला सवड दिली जावी.

८) त्यांना हे उत्तर कोणी दिले, या ठिकाणी त्यासंबंधीचे कोणतेही स्पष्टीकरण नाही. प्रत्यक्षात परिस्थितीने जे रूप धारण केले होते तिनेच त्याना दिलेले हे उत्तर होय, ही गोष्ट वर्णनशैलीने आपोआपच स्पष्ट होते. ते समजत होते की त्यांच्या खोऱ्यांना तृप्त करण्यासाठीच येणारा हा ढग आहे, पण खरेतर तो होता झंझावात जो त्यांना उद्‌ध्वस्त व नष्ट करण्यासाठी चालून येत होता.



त्यांनी अल्लाहशी जवळिकीचे साधन समजून उपास्य बनविले होते?[९] किंबहुना ते तर त्यांच्याकडून हरवले गेले आणि हे होते त्यांच्या खोट्या व त्या बनावटी श्रद्धांचे परिपाक ज्या त्यांनी रचल्या होत्या. (२७-२८)

(आणि तो प्रसंगसुद्धा उल्लेखनीय आहे) जेव्हा आम्ही जिन्नांच्या एका समूहाला तुमच्याकडे घेऊन आलो होतो जेणेकरून त्यांनी कुरआन ऐकावे.[१०] जेव्हा ते त्या जागी पोहचले (जेथे तुम्ही कुरआन पठण करीत होता) तेव्हा त्यांनी आपापसात सांगितले, स्तब्ध रहा. मग जेव्हा ते पठण पूर्ण झाले तेव्हा ते सावध करणारे बनून आपल्या राष्ट्राकडे परतले. त्यांना जाऊन सांगितले, ''हे आमच्या जनसमूहाच्या जिन्नांनो, आम्ही एका ग्रंथाचे श्रवण केले आहे जो मूसा (अ.) च्या नंतर उतरविला गेला आहे, सत्य प्रमाणित करणारा आहे आपल्या अगोदर आलेल्या ग्रंथांचे, मार्गदर्शन करीत आहे सत्य आणि सरळ मार्गाकडे.[११] हे आमच्या जनसमूहाच्या जिन्नांनो, अल्लाहकडे बोलाविणाऱ्यांचे आमंत्रण स्वीकारा आणि त्याच्यावर श्रद्धा ठेवा, अल्लाह तुमच्या अपराधांना क्षमा करील आणि

९) म्हणजे त्या व्यक्तींवरील श्रद्धेला प्रारंभ त्यांनी या कल्पनेने केला होता की हे ईश्वराचे लाडके दास आहेत, यांच्या शिफारसीमुळे ईश्वरापर्यंत आमची पोहोच होईल, परंतु त्यांनी खुद्द त्याच व्यक्तींना उपास्य मानून घेतले. मदतीसाठी त्यांचाच धावा करू लागले, व त्यांच्याकडेच प्रार्थना करू लागले, व हेच विनियोगाचे अधिकार बाळगणारे आहेत. आमची दाद फिर्याद ऐकणारे व आमची विघ्ने दूर करणारे हेच आहेत असा त्यांच्यासंबंधी त्यांनी समज करून घेतला. या मार्गभ्रष्टतेतून त्यांना बाहेर काढण्यासाठी सर्वोच्च अल्लाहने आपल्या आयती आपल्या प्रेषितांद्वारे पाठवून निरनिराळ्या प्रकारे त्यांना समजावण्याचा प्रयत्न केला परंतु ते आपल्या खोट्या देवांच्या उपासनेवर अडून राहिले व आग्रह धरीत राहिले की आम्ही अल्लाहऐवजी यांचीच कास धरून राहू. आता सांगा, या अनेकेश्वरवादींवर जेव्हा त्यांच्या मार्गभ्रष्टतेपायी अल्लाहचा प्रकोप कोसळला तेव्हा यांचे ते विघ्नहर्ते व दाद फिर्याद ऐकणारे देव कोठे मेले होते? त्या वाईट समयी ते त्यांच्या मदतीसाठी का धावून आले नाहीत?

१०) हा उल्लेख त्या घटनेचा आहे जी ताईफच्या प्रवासावरून मक्केला परततांना वाटेत घडली होती. पैगंबर (स.) नमाजमध्ये कुरआन पठण करीत होते की जिन्नांच्या एका टोळीचे तिकडे येणे झाले. ते पैगंबर (स.) यांचे कुरआन पठन ऐकण्यासाठी थांबले, यासंबंधाने आलेल्या सर्व निवेदनांचे या गोष्टीवर एकमत आहे की त्याप्रसंगी जिन्न, पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्यासमोर प्रकटही झाले नव्हते व त्यांच्या आगमनाची पैगंबर (स.) यांना जाणीवदेखील झाली नव्हती तर त्यांच्या आगमनाची व कुरआन ऐकण्याची खबर नंतर सर्वोच्च अल्लाहने वही-दिव्यबोधाद्वारे त्यांना दिली.

११) यावरून कळले की पूर्वीपासून या जिन्नांनी पैगंबर हजरत मूसा (अ.) आणि दैवी ग्रंथावर ईमान आणलेले होते. कुरआन ऐकल्यानंतर पूर्वीचे प्रेषित जी शिकवण देत आले आहेत हीदेखील तीच शिकवण आहे हे त्यांनी ओळखले. म्हणून त्यांनी या ग्रंथावर व हा ग्रंथ आणणाऱ्या पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचीही श्रद्धा बाळगली.

तुम्हाला यातनादायक प्रकोपातून वाचवील.'' आणि जो कोणी अल्लाहच्या निमंत्रकाचे म्हणणे ऐकत नसेल तो स्वत:ही भूतलावर असे सामर्थ्य बाळगत नाही की अल्लाहला असफल करतील आणि त्याचे असले समर्थक व वालीही नाहीत की जे अल्लाहपासून त्याला वाचवतील. असले लोक उघड पथभ्रष्टतेत पडलेले आहेत. (२९-३२)

आणि काय या लोकांना हे उमगत नाही की ज्या अल्लाहने ही पृथ्वी आणि आकाशांना निर्माण केले व त्यांना निर्माण करताना तो थकला नाही, तो खचितच याला समर्थ आहे की मृतांना जिवंत करील? का नाही, निश्चितच तो प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. ज्या दिवशी हे अश्रद्धावंत अग्नीसमोर आणले जातील, तेव्हा यांना विचारले जाईल, ''काय हे सत्य नाही?'' हे म्हणतील, ''होय, आमच्या पालनकर्त्याची शपथ (हे खरोखर सत्य आहे).'' अल्लाह फर्मावील, ''बरे तर आता प्रकोपाचा आस्वाद घ्या आपल्या त्या इन्कारापायी जे तुम्ही करीत राहिला होता.'' (३३-३४)

मग हे पैगंबर (स.), संयम राखा ज्याप्रमाणे दृढनिश्चयी प्रेषितांनी संयम राखले आहे आणि यांच्या बाबतीत घाई करू नका, ज्या दिवशी हे लोक त्या गोष्टीस पाहतील ज्याचे भय यांना दाखविले जात आहे तेव्हा या लोकांना असे वाटेल जणू जगात दिवसाच्या एका घटकेपेक्षा अधिक राहिले नव्हते. म्हणणे पोहचविले गेले, आता काय अवज्ञाकारी लोकांव्यतिरिक्त अन्य कोणी नष्ट होईल? (३५)



# ४७ सूरह मुहम्मद

*(मदीनाकालीन, वचने ३८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

ज्या लोकांनी द्रोह केला आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखले, अल्लाहने त्यांची कृत्ये वाया घालविली व ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आणि ती गोष्ट मान्य केली जी मुहम्मद (स.) वर अवतरली आहे, आणि ती पूर्णत: सत्य आहे त्यांच्या पालनकर्त्याकडून, अल्लाहने त्यांच्या वाईट गोष्टी त्यांच्यापासून दूर केल्या आणि त्यांची स्थिती सुधारली. हे अशासाठी की द्रोह करणाऱ्यांनी असत्याचे अनुसरण केले आणि श्रद्धा ठेवणाऱ्यांनी त्या सत्याचे अनुसरण केले जे त्यांच्या पालनकर्त्याकडून आलेले आहे. अशा तऱ्हेने अल्लाह लोकांना त्यांची वास्तविक योग्यता दाखवून देत आहे. (१-३)

म्हणून जेव्हा या अश्रद्धावंतांशी तुमचा सामना होईल तेव्हा पहिले काम मानेवर प्रहार करणे आणि जेव्हा तुम्ही त्यांना चांगल्या प्रकारे ठेचून काढाल तेव्हा त्यांना बांधून ठेवा. नंतर त्यांच्यावर अनुग्रह करा किंवा खंडणी घ्या, इथपर्यंत की ते शरण येतील.[१] हे आहे तुम्ही करावयाचे काम. अल्लाहने इच्छिले असते तर स्वत:च त्यांच्याशी निपटले असते, परंतु (ही पद्धत त्याने अशासाठी स्वीकारली आहे) जेणेकरून तुम्हा लोकांना एक दुसऱ्याच्या द्वारे अजमवावे.[२] आणि जे लोक अल्लाहच्या मार्गात मारले जातील, अल्लाह

---

१) सदरहू आयतच्या शब्दावरूनही व ज्या संदर्भात ती आली आहे त्यावरूनदेखील ही गोष्ट स्पष्टपणे कळते की युद्धाचा हुकूम आल्यानंतर व प्रत्यक्ष युद्ध सुरू होण्याच्या अगोदर ती उतरली आहे. 'जेव्हा अश्रद्धावंतांशी तुमचा सामना होईल' हे शब्द याचे प्रमाण देत आहेत की अद्याप सामना झालेला नाही व तो होण्यापूर्वी हा आदेश दिला जात आहे की जेव्हा सामना होईल तेव्हा मुसलमानांनी सर्वप्रथम आपले लक्ष शत्रूच्या युद्धशक्तीचा चांगल्या प्रकारे बिमोड करण्यावर पुरविले पाहिजे. त्यानंतर ज्या लोकांना गिरफतार केले जाईल त्यांच्या बाबतीत मुसलमानांना असाही अधिकार आहे की खंडणी घेऊन अथवा कैद झालेल्या आपल्या माणसांच्या मोबदल्यात त्यांना मुक्त करावे, कैदेत ठेवून त्यांच्याशी उपकाराचे वर्तन केले जावे. अथवा योग्य वाटत असेल तर उपकार म्हणून त्याना मुक्त करावे असादेखील त्यांना अधिकार आहे.

२) म्हणजे सर्वोच्च अल्लाहला, असत्यवादींचा केवळ बिमोडच करावयाचा असता तर या कामासाठी तो तुमचा अधीन नव्हता. हे काम तर त्याचे एक धरणीकंप किंवा वादळ क्षणार्धात करू शकत होते. परंतु मनुष्यापैकी जे सत्यवादी असतील त्यांचा असत्यवादींशी संघर्ष व्हावा व त्यांच्याविरूद्ध त्यांनी संघर्ष करावा जेणेकरून ज्या कुणात जे जे काही गुण आहेत ते या परीक्षेत तावून सुलाखून पूर्णपणे प्रकट व्हावेत व प्रत्येकजण आपल्या आचरणानुसार ज्या दर्जाला व प्रतिष्ठेला पात्र असेल ते त्याला दिले जावे, हे त्याच्या दृष्टिसमोर आहे.

त्यांच्या कृत्यांना कदापि वाया जाऊ देणार नाही. तो त्यांचे मार्गदर्शन करील,[३] त्यांची स्थिती सुधारेल, आणि त्यांना त्या स्वर्गामध्ये दाखलकरील जिच्याशी त्याने त्यांना परिचित केले आहे. (४-६)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे! जर तुम्ही अल्लाहला सहाय्य कराल तर तो तुम्हाला सहाय्य करील[४] आणि तुमचे पाय मजबूतीने दृढ करील. उरले ते लोक ज्यांनी द्रोह केला आहे तर त्यांच्यासाठी विनाश आहे आणि अल्लाहने त्यांच्या कृत्यांना भटकविले आहे, कारण त्यांनी त्या गोष्टीला नापसंत केले ज्याला अल्लाहने अवतरले आहे, म्हणून अल्लाहने त्यांची कृत्ये वाया घालविली. काय ते भूतलावर वावरले नव्हते की त्यांनी त्या लोकांचा शेवट पाहिला जे त्यांच्यापूर्वी होऊन गेले आहेत? अल्लाहने त्यांचे सर्व काही त्यांच्यावर उलटविले आणि असलेच परिणाम या अश्रद्धावंतांसाठी नियोजित आहेत.[५] हे अशासाठी की श्रद्धावंतांचा वाली व सहायक अल्लाह आहे आणि अश्रद्धावंतांचा वाली व सहायक कोणीही नाही. श्रद्धावंतांना व सत्कृत्ये करणाऱ्यांना अल्लाह त्या स्वर्गात दाखल करील ज्यांच्याखाली कालवे वाहतात, आणि द्रोह करणारे बस्स, जगाच्या क्षणभंगुर जीवनाचा आनंद लुटत आहेत, चतुष्पादाप्रमाणे खात-पीत आहेत आणि त्यांचे अखेरचे स्थान नरक आहे. (७-१२)

हे पैगंबर (स.), कित्येक वस्त्या अशा होऊन गेल्या आहेत ज्या तुमच्या त्या वस्तीपेक्षा फारच बलवान होत्या जिने तुम्हाला काढून टाकले आहे.[६] त्यांना आम्ही अशाप्रकारे नष्ट केले की कोणीच त्यांना वाचविणारा नव्हता. बरे कधी असे होऊ शकेल की जो आपल्या पालनकर्त्याकडून एक स्वच्छ व स्पष्ट मार्गदर्शनावर असेल, तो त्या लोकांप्रमाणे बनेल ज्यांच्यासाठी त्यांचे वाईट कृत्य विलोभनीय बनविलेले आहे आणि ते आपल्या वासनेचे अनुयायी बनलेले आहेत. ईशपरायण लोकांसाठी ज्या स्वर्गाचे वचन दिले गेले आहे त्याचे वैभव तर असे आहे की त्यात कालवे वाहत असतील निवळलेल्या पाण्याचे, अशा दुधाचे ज्याच्या चवीत यत्किंचितसुद्धा फरक आलेला नसेल, अशा पेयांचे

३) म्हणजे नरकाकडे मार्गदर्शन करील.

४) अल्लाहला मदत करण्याने अभिप्रेत अल्लाहचे 'वचन' बुलंद करणे आणि सत्याच्या वर्चस्वाच्या कार्यात भाग घेणे होय.

५) याचे दोन अर्थ आहेत. एक असा की त्या अश्रद्धावंतांवर जो विनाश ओढवला तसलाच विनाश आता या अश्रद्धावंतांसाठीही निश्चित आहे जे हजरत मुहम्मद (स.) यांचे आवाहन मान्य करीत नाहीत. दुसरा अर्थ असा की त्या लोकांवरील विनाश केवळ जगातील प्रकोपावरच थांबला आहे असे नाही तर हाच विनाश त्यांच्यासाठी परलोकातदेखील ठरलेला आहे.

६) म्हणजे मक्का, तेथूनच कुरैश लोकांनी हजरत मुहम्मद (स.) यांना हिजरत करणे भाग पाडले होते.



जे पिणाऱ्यांसाठी स्वादिष्ट असेल. कालवे वाहत असतील स्वच्छ व शुद्ध मधाचे.[७] त्यात त्यांच्यासाठी हर प्रकारची फळे असतील आणि त्यांच्या पालनकर्त्याकडून क्षमादान (काय तो मनुष्य ज्याच्या वाट्याला हा स्वर्ग येणार आहे) त्या लोकांसमान होऊ शकतो जे नरकामध्ये सदैव राहतील आणि ज्यांना असले गरम पाणी पाजले जाईल जे त्यांचे आंतडेसुद्धा कापून टाकील? (१३-१५)

यांच्यापैकी काही लोक असे आहेत जे कान लावून तुमचे म्हणणे ऐकतात आणि मग जेव्हा तुमच्या जवळून निघतात तेव्हा त्या लोकांना ज्यांना ज्ञानाची देणगी प्रदान केली गेली आहे, विचारतात की आता इतक्यात यांनी काय सांगितले होते?[८] हे ते लोक आहेत ज्यांच्या हृदयावर अल्लाहने मोहर लावून टाकली आहे आणि हे आपल्या वासनांचे अनुयायी बनले आहेत. उरले ते लोक ज्यांना मार्गदर्शन प्राप्त झाले आहे, अल्लाह त्यांना आणखी जास्त मार्गदर्शन देतो आणि त्यांना त्यांच्या हिश्याची ईशपराणता प्रदान करतो. आता काय हे लोक बस्स पुनरुत्थानाच्याच प्रतीक्षेत आहेत की ते अकस्मात यांच्यावर यावे? त्याची चिन्हे तर आलेली आहेत. जेव्हा ते प्रत्यक्ष येईल तेव्हा यांच्यासाठी उपदेश स्वीकारण्याची कोणती संधी बाकी उरेल? (१६-१८)

तर हे पैगंबर (स.), चांगल्या प्रकारे जाणून असा की अल्लाहशिवाय कोणीही उपासनेस पात्र नाही, आणि क्षमायाचना करा आपल्या चुकांसाठीसुद्धा आणि श्रद्धावंत पुरुष व स्त्रियांसाठीसुद्धा.[९] अल्लाह तुम्ही जिथे वावरता आणि जिथे राहता ती ठिकाणे

७) हदीसीत याचे स्पष्टीकरण असे आले आहे की ते दूध जनावरांच्या स्तनातून निघालेले असणार नाही, ते मद्य फळे कुजवून गाळलेले नसेल. तो मध, मधमाशांच्या पोटातून निघालेला नसेल तर हे सर्व पदार्थ नैसर्गिक झऱ्यांच्या रूपात वाहतील.

८) पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या सभेत जे अश्रद्धावंत, दांभिक आणि ग्रंथधारक येऊन बसत असत व पैगंबर (स.) यांचे म्हणणे किंवा कुरआनच्या आयती ऐकत असत परंतु त्यांचे मन पैगंबर (स.) यांच्या मुखातून निघणाऱ्या विषयापासून दूर असल्याकारणाने सर्वकाही ऐकूनसुद्धा ते काहीच ऐकत नसत व बाहेर येऊन ते मुसलमानांना विचारीत असत की नुकतेच पैगंबर साहेब (स.) काय फर्मावीत होते, त्याच लोकांचा हा उल्लेख आहे.

९) इस्लामने माणसाला जे नैतिक नियम शिकविले आहेत, त्यापैकीच एक असाही आहे की ईश्वराच्या दासाने आपल्या रबची बंदगी व उपासना पार पाडण्यात व त्याच्या धर्मासाठी प्राणपणाला लावण्यात आपल्या परीने कितीही प्रयत्न का केले असेना पण जे काही मी केले पाहिजे होते ते मी पार पाडले आहे, अशा दर्पात कदापि येऊ नये तर माझ्या स्वामीचा माझ्यावरील जो हक्क होता तो मी अदा करू शकलो नाही असेच त्याने सदैव मानले पाहिजे. तसेच सदैव आपल्या चुका कबूल करून अल्लाहकडे हीच प्रार्थना करीत राहिले पाहिजे की तुझ्या सेवेत माझ्याकडून ज्या काही उणीवा राहिल्या आहेत त्या दुर्लक्ष कर. हाच खरा आत्मा आहे सर्वोच्च अल्लाहच्या असे फर्माविण्याचा की, "हे नबी (स.) आपल्या अपराधांसाठी क्षमायाचना करा."

जाणतो. (१९)

ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे[१०] ते म्हणत होते की एखादी सूरत का उतरविली जात नाही (जिच्यात युद्धाचा हुकूम दिला जावा). परंतु जेव्हा एक परिपक्व सूरत अवतरली गेली जिच्यात युद्धाचा उल्लेख होता तेव्हा तुम्ही पाहिले की ज्यांच्या हृदयांना रोग जडलेला होता ते तुमच्याकडे अशाप्रकारे पाहात आहेत जणू एखाद्यावर मृत्यू पसरला होता. खेद आहे त्यांच्या दशेवर. (त्यांच्या जिभेवर आहे) आज्ञाधारकतेचा स्वीकार आणि चांगल्या चांगल्या गोष्टी परंतु जेव्हा निर्णायक हुकूम दिला गेला तेव्हा ते अल्लाहशी आपल्या वचनांत खरे उतरले असते तर त्यांच्यासाठी चांगले होते. आता काय तुम्हा लोकांकडून याशिवाय अन्य काही अपेक्षा केली जाऊ शकते की जर तुम्ही उलट तोंड फिरविले तर भूतलावर पुन्हा उपद्रव माजवाल आणि आपापसात एकमेकांचे गळे कापाल?[११] हे लोक आहेत ज्यांचा अल्लाहने धिक्कार केला आणि त्यांना आंधळे व बहिरे करून टाकले. काय या लोकांनी कुरआनवर विचार केला नाही, अथवा हृदयांवर त्यांच्या कुलुपे लागलेली आहेत? वस्तुस्थिती अशी आहे की जे लोक मार्गदर्शन स्पष्ट झाल्यानंतर त्याच्यापासून पराङमुख झाले; त्यांच्यासाठी शैतानाने या वर्तनाला सुलभ बनविले आहे आणि खोट्या अपेक्षांची मालिका त्यांच्यासाठी दीर्घ केलेली आहे. म्हणूनच त्यांनी अल्लाहने अवतरलेल्या धर्माला नापसंत करणाऱ्यांना सांगून टाकले की काही बाबतीत आम्ही तुमचे मान्य करू.[१२] अल्लाह त्यांच्या या गुप्त गोष्टी चांगल्या प्रकारे जाणतो. मग त्यावेळी काय दशा होईल जेव्हा दूत यांचे प्राण हरण करतील आणि यांच्या तोंडावर व पाठीवर मारत यांना नेतील? हे या कारणास्तव होईल की यांनी त्या पद्धतीचे अनुसरण केले जी अल्लाहला नाराज करणारी आहे आणि त्याच्या प्रसन्नतेचा मार्ग अवलंबिणे पसंत

१०) अर्थ असा की जे लोक सच्चे मुसलमान होते, युद्ध आदेशासाठी ते तर बेचैन होते, परंतु श्रद्धेविनाच जे लोक मुस्लिम समुदायात सामील झाले होते, युद्ध आदेश येताक्षणीच त्यांना ते प्राणांतिक संकट वाटले.

११) या कथनाचा अर्थ असा की, जर यावेळी तुम्ही इस्लामच्या रक्षणापासून जीव वाचवीत आहात व हजरत मुहम्मद (स.) आणि श्रद्धावंत ज्या महान वैभवशाली विधायक क्रांतीसाठी झटत आहेत त्यापासून तुम्ही तोंड फिरवीत आहात तर याचा परिणाम याशिवाय अन्य काय निघू शकतो की त्याच अज्ञानमूलक व्यवस्थेत ज्यात तुम्ही शतकानुशतके एकमेकाचे गळे चिरत आला आहात, आपल्या संततीलादेखील जिवंत पुरत आला आहात आणि ईश्वराच्या भूमीवर जुलूम व अत्याचार आणि उपद्रव माजवीत आला आहात, तुम्ही पुन्हा परतावे.

१२) म्हणजे श्रद्धेचा स्वीकार आणि मुसलमानांच्या समूहात सामील झाले असतानादेखील ते आतल्या आत इस्लामच्या शत्रूशी जे संगनमत साधून राहिले आणि त्यांना वचन देत राहिले की काही मामल्यात आम्ही तुम्हाला साथ देऊ.



केले नाही, यापायीच त्याने यांची सर्व कृत्ये वाया घालविली.[१३] (२०-२८)

काय ते लोक ज्यांच्या हृदयांत रोग आहे: असे समजून बसले आहेत की अल्लाह त्यांच्या हृदयांतील दोष उघड करणार नाही? आम्ही इच्छिले तर तुम्हाला ते डोळ्यांनी दाखवू आणि त्यांच्या चेहऱ्यावरून तुम्ही त्यांना ओळखून घ्याल परंतु त्यांच्या बोलण्याच्या शैलीवरून तर तुम्ही त्यांना ओळखून घ्यालच. अल्लाह तुम्हा सर्वांच्या कृत्याशी चांगला परिचित आहे. आम्ही जरूर तुम्हा लोकांना कसोटीत घालू जेणेकरून तुमच्या स्थितीचे परीक्षण करू आणि पाहू की तुमच्यात 'मुजाहिद' (प्रयत्नांची पराकाष्ठा करणारा) आणि दृढतेने अढळ राहणारा कोण आहे. (२९-३१)

ज्या लोकांनी द्रोह केला आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखले व पैगंबराबरोबर भांडण केले, जेव्हा की त्यांच्यावर सरळमार्ग स्पष्ट झाला होता, वस्तुत: ते अल्लाहची कोणतीही हानी करू शकत नाहीत तर अल्लाहच त्यांचे सर्व केले सवरलेले नष्ट करील. हे श्रद्धावंतांनो, तुम्ही अल्लाहचे आज्ञापालन करा आणि पैगंबराचे आज्ञापालन करा आणि आपल्या सत्कृत्यांना नष्ट करून घेऊ नका.[१४] द्रोह करणाऱ्यांना आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखणाऱ्यांना आणि मरेपर्यंत द्रोहावर दृढ राहणाऱ्यांना तर अल्लाह कदापि माफ करणार नाही. म्हणून तुम्ही भ्याड बनू नका आणि तहाची विनंती करू नका.[१५]

१३) कृत्यांनी अभिप्रेत मुसलमान बनून जी काही कर्मे ते पार पाडीत राहिले, ती सर्व कृत्ये आहेत. त्यांची नमाज, त्यांचे रोजे, त्यांची जकात, तात्पर्य सकृतदर्शनी ज्याचा पुण्य कर्मात समावेश होतो त्यांच्या त्या सर्व उपासनाविधी आणि सत्कर्मे या कारणाने वाया गेलीत की मुसलमान असतानादेखील त्यांनी अल्लाह व त्याचा दीन-धर्म आणि इस्लामी-राष्ट्राशी एकनिष्ठता व प्रांजळपणाचे वर्तन ठेवले नाही तर केवळ आपल्या ऐहिक स्वार्थापोटी धर्म-शत्रूंशी ते संगनमत करीत राहिले व अल्लाहच्या मार्गात संघर्षाचा प्रसंग येताक्षणीच स्वत:ला संकटांपासून वाचविण्याच्या काळजीत लागले.

१४) दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर इतर कृत्यांचे लाभदायी व परिणामकारक ठरण्याची सर्व मदार अल्लाह आणि त्याच्या पैगंबरां (स.) च्या आज्ञापालनावर अवलंबून आहे. आज्ञापालनाशी विमुख झाल्यानंतर कोणतेच कृत्य सत्कृत्य म्हणून राहात नाही की माणूस त्याच्यासाठी एखाद्या मोबदल्यास पात्र ठरू शकावा.

१५) या ठिकाणी ही गोष्ट दृष्टीसमोर असली पाहिजे की हे शब्द त्याकाळी फर्माविले आहेत जेव्हा मदीनेतील लहानशा वस्तीत दोन चारशेच्या संख्येत असलेली मुहाजिरीन व अन्सार या मुसलमानांच्या अत्यल्प जमातने इस्लामचा ध्वज उंचावलेला होता व त्या जमातीचा मुकाबला केवळ कुरैशांच्या बलाढ्य जमातीशीच होता असे नाही तर सर्व अरब देशातील अश्रद्धावंत व अनेकेश्वरवादींशी होता. अशा परिस्थितीत फर्माविले जात आहे की धैर्य खचवून या शत्रूंना तहासाठी विनंती करू लागू नका तर प्राण पणाला लावण्यासाठी तयार व्हा.

तुम्हीच वरचढ ठरणार आहात. अल्लाह तुमच्यासमवेत आहे आणि तुमच्या कृत्यांना तो कदापि वाया घालविणार नाही. हे ऐहिक जीवन तर एक खेळ आणि तमाशा आहे. जर तुम्ही श्रद्धा ठेवता आणि ईशपरायणांचा मार्ग अनुसरत राहिला तर अल्लाह तुमचा मोबदला तुम्हाला देईल आणि तो तुमची मालमत्ता तुमच्याकडून मागणार नाही.[१६] जर एखादे वेळी त्याने तुमची मालमत्ता तुमच्याकडून इच्छिली आणि सर्वच्या सर्व तुमच्याकडून मागून घेतली तर तुम्ही कंजूषपणा दाखवाल आणि तो तुमची चूक बाहेर आणील. पहा, तुम्हा लोकांना आवाहन केले जात आहे की अल्लाहच्या मार्गात माल खर्च करा. यावर तुमच्यापैकी काहीजण आहेत जे कंजूषपणा करीत आहेत, वास्तविकपणे जो कंजूषपणा करतो तो खरे पाहता आपल्या स्वत:शीच कंजूषपणा करीत आहे. अल्लाह तर निरपेक्ष आहे, तुम्हीच त्याचे गरजवंत आहात, जर तुम्ही तोंड फिरवाल तर अल्लाह तुमच्या जागी अन्य एखाद्या राष्ट्राला आणील आणि ते तुमच्यासारखे असणार नाही.

(३२-३८)

---

१६) म्हणजे तो निरपेक्ष आहे. त्याला स्वत:साठी तुमच्याकडून काही घेण्याची गरज नाही. जर तो आपल्या मार्गात काही खर्च करण्याचे तुम्हाला सांगत आहे तर ते त्याच्या स्वत:साठी नव्हे तर तुमच्याच भल्यासाठी सांगत आहे.



# ४८ सूरह अल्फतह्

*(मदीनाकालीन, वचने २९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे पैगंबर (स.), आम्ही तुम्हाला उघड विजय प्रदान केला[१] जेणेकरून अल्लाहने तुमच्या पुढील व पाठीमागील प्रत्येक अपराध माफ[२] करावे आणि तुमच्यावर आपली देणगी परिपूर्ण करावी व तुम्हाला सरळमार्ग दाखवावा[३] आणि तुम्हाला जबरदस्त सहाय्य प्रदान केले. तोच आहे ज्याने श्रद्धावंतांच्या हृदयांत 'सकीनत' (शांती)[४] उतरविली जेणेकरून आपल्या श्रद्धेसमवेत त्यांनी आणखी एक श्रद्धा वाढवावी. पृथ्वी व आकाशांचे सर्व लष्कर अल्लाहच्या अधिकारात आहे आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. (त्याने हे

---

१) हुदैबियाच्या तहानंतर जेव्हा विजयाची ही आनंदवार्ता ऐकविली गेली तेव्हा लोकांना आश्चर्य वाटत होते की या तहाला विजय कसे म्हटले जाऊ शकते ज्यात सकृतदर्शनी आम्ही त्या सर्व अटी मान्य केल्या आहेत ज्या आमच्याकडून अश्रद्धावंत मान्य करवून घेऊ इच्छित होते परंतु अल्पावधीनंतरच कळून आले की हा तह खरोखरच एक मोठा विजय होता.

२) ज्या प्रसंगी व स्थितीत हे सांगितलेले आहे ते दृष्टीसमोर ठेवले तर या ठिकाणी ज्या उणीवांकडे दुर्लक्ष करण्याचा उल्लेख आहे, त्या म्हणजे इस्लामचे यश व त्याच्या वर्चस्वासाठी काम करताना अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या नेतृत्वात गेल्या १९ वर्षापासून मुसलमान जी प्रयत्नांची शिकस्त करीत होते त्यातील उणीवा होय, हे स्पष्टपणे जाणवते. या उणीवा कोणत्याही मनुष्याला माहीत नाहीत किंबहुना मानवी बुद्धी तर त्या प्रयत्नांच्या पराकाष्ठेत कसलाही दोष शोधून काढण्यास पूर्णपणे असमर्थ आहे. परंतु सर्वोच्च अल्लाहच्या दृष्टित पूर्णत्वाचे जे परमोच्च प्रमाण आहे त्यानुसार त्यात काही अशा उणीवा होत्या ज्यामुळे मुसलमानांना अरब अनेकेश्वरवादींवर इतक्या जलद विजय मिळू शकत नव्हता. सर्वोच्च अल्लाहच्या सांगण्याचा अर्थ असा की त्या उणीवांसह जर तुम्ही प्रयत्नशील राहिला असता तर अरबस्तान वर्चस्वाखाली आणण्यासाठी अजून दीर्घकाळ लागला असता परंतु त्या सर्व उणीवा आणि दुर्बलतेकडे दुर्लक्ष करून केवळ आपल्या मेहेरबानीने आम्ही त्या भरून काढल्या आहेत व हुदैबियाच्या ठिकाणी तुमच्यासाठी त्या विजयाचे द्वार खुले केले आहे जो आजवरच्या तुमच्या प्रयत्नांमुळे तुम्हाला प्राप्त होऊ शकत नव्हता.

३) या ठिकाणी पैगंबर (स.) यांना सरळमार्ग दाखविण्याचा अर्थ त्यांना विजयप्राप्तीचा मार्ग दाखविणे होय.

४) 'सकीनत'ने अभिप्रेत शांती व मानसिक स्वास्थ्य होय. अर्थ असा की हुदैबिया तहाच्या प्रसंगी जे जे प्रक्षुब्ध करणारे प्रसंग गुदरले होते व त्या सर्वात मुसलमानांचे संयम राखणे आणि अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्या नेतृत्वावर पूर्णपणे विश्वास टाकताना त्याच्यातून सुखरूप बाहेर पडणे हे अल्लाहच्या कृपेचा परिणाम होता एरवी त्यावेळी एखाद्या लहानशा चुकीमुळेदेखील सर्व काम बिघडले असते.

काम अशासाठी केले आहे) जेणेकरून श्रद्धावंत पुरुष आणि स्त्रियांना सदैव राहण्यासाठी अशा स्वर्गामध्ये दाखल करावे ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील आणि त्यांच्या वाईट गोष्टी त्यांच्यापासून दूर केल्या जातील. अल्लाह जवळ हे मोठे यश आहे आणि त्या दांभिक पुरुष आणि स्त्रियांना आणि अनेकेश्वरवादी पुरुष आणि स्त्रियांना शिक्षा द्यावी जे अल्लाहच्या संबंधाने वाईट कल्पना बाळगतात. वाईटाच्या फेऱ्यात ते स्वत:च आले, अल्लाहचा प्रकोप त्यांच्यावर झाला आणि त्याने त्यांचा धिक्कार केला आणि त्यांच्यासाठी नरक उपलब्ध करून दिला जे फारच वाईट स्थान आहे. पृथ्वी आणि आकाशांचे लष्कर अल्लाहच्याच अधिकारांत आहेत आणि तो जबरदस्त व बुद्धिमान आहे. (१-७)

हे पैगंबर (स.), आम्ही तुम्हाला साक्ष देणारा,[५] शुभवार्ता देणारा, आणि खबरदार करणारा बनवून पाठविले आहे जेणेकरून हे लोकहो तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर श्रद्धा ठेवावी आणि त्याला (अर्थात पैगंबराला) साथ द्यावी. त्याचा आदर-सन्मान करावा आणि सकाळ-संध्याकाळ अल्लाहचे पावित्र्यगान करीत राहावे. (८-९)

हे पैगंबर (स.), जे लोक तुमच्याशी 'बैअत' (प्रतिज्ञा) करीत होते[६] वास्तविकत: ते अल्लाहशी 'बैअत' करीत होते. त्यांच्या हातावर अल्लाहचा हात होता.[७] आता जो ती प्रतिज्ञा भंग करील त्याच्या प्रतिज्ञाभंग करण्याचे अरिष्ट त्याच्या स्वत:वरच येईल, आणि जो त्या प्रतिज्ञेचे पालन करील जी त्याने अल्लाहशी केलेली आहे, अल्लाह लवकरच त्याला महान मोबदला प्रदान करील. (१०)

---

५) शाह वलिउल्लाह साहेब (रह.) या इस्लामी विद्वानांनी 'शाहिद'चा अनुवाद फारसी भाषेत 'इजहारे हक कुनन्दा' असा केला आहे म्हणजे सत्याची ग्वाही देणारा.

६) संकेत त्या बैअत-प्रतिज्ञेकडे आहे जी हजरत उस्मान (रजि.) हे मक्का शहरात शहीद झाले असल्याची खबर ऐकून पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहाबा-साथीदारांकडून 'हुदैबिया' या ठिकाणी घेतली होती. सदरहू 'बैअत' या गोष्टीसाठी घेतली गेली होती की हजरत उस्मान (रजि.) यांच्या शहीद होण्याची बातमी जर खरी ठरली तर मुसलमान येथेच व याचवेळी कुरैशांशी निपटून घेतील मग परिणामत: ते सर्व ठार मारले गेले तरी बेहतर.

७) म्हणजे ज्या हातावर लोक त्यावेळी बैअत करीत होते तो प्रेषित या व्यक्तीचा हात नव्हता तर अल्लाहच्या प्रतिनिधीचा हात होता व ही बैअत-प्रतिज्ञा वास्तविकपणे पैगंबर (स.) यांच्या माध्यमाने सर्वोच्च अल्लाहशी केली जात होती.



हे पैगंबर (स.), ग्रामीण अरबांपैकी जे लोक पाठीमागे सोडलेले होते[८] ते आता येऊन जरूर तुम्हाला सांगतील की, "आम्हाला आपली मालमत्ता व कुटुंबाच्या चिंतेने गुंतवून ठेवले होते, आपण आमच्यासाठी क्षमेची प्रार्थना करावी." हे लोक आपल्या जिभांनी त्या गोष्टी सांगतात ज्या यांच्या हृदयांत नाहीत. यांना सांगावे, "अच्छा, अशीच गोष्ट असेल तर कोण तुमच्या बाबतीत अल्लाहचा निर्णय रोखण्याचा जरासुद्धा अधिकार बाळगतो, जर तो तुम्हाला काही नुकसान पोहचवू इच्छित असेल अथवा लाभ प्रदान करू इच्छित असेल? तुमच्या कृत्याची तर अल्लाहच खबर राखणारा आहे. (परंतु खरी गोष्ट ती नव्हे जी तुम्ही सांगत आहात) तर तुम्ही असे समजला की पैगंबर व श्रद्धावंत आपल्या कुटुंबियांत कदापि परतून येऊ शकणार नाहीत आणि ही कल्पना तुमच्या मनाला फार चांगली वाटली आणि तुम्ही फार वाईट कल्पना लढविल्या व तुम्ही अत्यंत दुष्ट अंत:करणाचे लोक आहात. (११-१२)

अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर जे लोक श्रद्धा ठेवत नसतील अशा अश्रद्धावंतांसाठी आम्ही भडकत असलेला अग्नी तयार ठेवला आहे. आकाशांच्या व पृथ्वीच्या बादशाहीचा स्वामी अल्लाहच आहे, ज्याला हवे त्याला माफ करील व हवे त्याला शिक्षा करील आणि तो क्षमाशील व परम कृपाळू आहे. (१३-१४)

जेव्हा तुम्ही गनीम माल प्राप्त करावयास जाऊ लागाल तेव्हा हे पाठीमागे सोडण्यात आलेले लोक तुम्हाला जरूर सांगतील की आम्हालासुद्धा आपल्या बरोबर येऊ द्या.[९] हे इच्छितात की अल्लाहच्या आदेशाला बदलून टाकावे. यांना स्पष्ट सांगा की, "तुम्ही कदापि आमच्याबरोबर येऊ शकत नाही, अल्लाहने अगोदरच हे फर्माविले आहे." हे म्हणतील की, "नव्हे, तर तुम्ही आमच्याशी मत्सर बाळगत आहात." (वस्तुत: ही गोष्ट मत्सराची नव्हे) तर हे लोक सत्य गोष्ट क्वचितच समजतात. या पाठीमागे सोडलेल्या ग्रामीण अरबांना सांगा की, "लवकरच तुम्हाला अशा लोकांशी लढावयाला पाचारण केले जाईल जे मोठे बलवान आहेत. तुम्हाला त्यांच्याशी युद्ध करावे लागेल अथवा ते

---

८) हा मदीना शहराच्या सभोवतालच्या प्रदेशातील अशा लोकांचा उल्लेख आहे ज्यांना, उमरा अदा करण्याची तयारी सुरू करताना पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी आपल्याबरोबर येण्याचे आमंत्रण दिले होते परंतु ईमानचा दावा सांगूनदेखील केवळ यासाठी ते आपल्या घराबाहेर निघाले नव्हते की त्यांना आपले प्राण प्रिय होते. ते समजत होते की या प्रसंगी कुरैशांच्या ऐन घरात 'उमरा' अदा करण्यासाठी जाणे म्हणजे मृत्यूच्या मुखात शिरणे होय.

९) म्हणजे, लवकरच ती वेळ येणार आहे जेव्हा हेच लोक, ज्यांनी आज धोकादायक मोहिमेत तुमच्याबरोबर येण्यापासून जीव वाचविला होता, त्यावेळी हे खुद्द फक्त येतील व म्हणतील की आम्हालादेखील आपल्याबरोबर घेऊन चला.

आज्ञाधारक बनतील. त्यावेळी जर तुम्ही युद्धाच्या आज्ञेचे पालन केले तर अल्लाह तुम्हाला चांगला मोबदला देईल, आणि जर तुम्ही पुन्हा तसेच तोंड फिरविले जसे पूर्वी फिरविले आहे तर अल्लाह तुम्हाला यातनादायक शिक्षा देईल. परंतु जर आंधळा व लंगडा आणि रुग्ण; युद्धासाठी आले नाहीत तर काही हरकत नाही. जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांचे आज्ञापालन करील, अल्लाह त्याला त्या स्वर्गात दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील, आणि जो तोंड फिरवील त्याला तो दु:खदायक यातना देईल.'' (१५-१७)

अल्लाह श्रद्धावंतांवर प्रसन्न झाला जेव्हा ते वृक्षाखाली तुमच्याशी बैअत (प्रतिज्ञा) करीत होते. त्यांच्या हृदयांची स्थिती त्याला माहीत होती, म्हणून त्याने त्यांच्यावर 'सकीनत' (शांती) उतरविली.[१०] त्यांना बक्षीस म्हणून निकटचा विजय प्रदान केला आणि बराचसा गनीमचा माल त्यांना प्रदान केला ज्याला ते (लवकरच) प्राप्त करतील.[११] अल्लाह जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. अल्लाह तुम्हाला पुष्कळ गनीमच्या मालाचे वचन देतो जो तुम्ही प्राप्त कराल.[१२] तूर्त तर हा विषय त्याने तुम्हाला प्रदान केला[१३] आणि लोकांचे हात तुमच्याविरूद्ध उठण्यापासून रोखले,[१४] जेणेकरून श्रद्धावंतांसाठी एक संकेत बनून राहावा आणि अल्लाहने तुम्हाला सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करावे. याच्या व्यतिरिक्त दुसऱ्या अन्य गनीम मालांचासुद्धा तो तुमच्याशी वायदा करतो - ज्यासाठी तुम्ही अद्याप समर्थ झालेले नाही आणि अल्लाहने त्यांना वेढून ठेवले आहे. अल्लाह प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे.[१५] (१८-२१)

**१०)** या ठिकाणी 'सकीनत'ने अभिप्रेत ती मन:स्थिती आहे जेणेकरून एखादा इसम एखाद्या महान हेतूसाठी शांत चित्ताने मोठ्या संतोष व समाधानानिशी आपल्या स्वत:ला संकटाच्या मुखात झोकून देतो व कसलीही भीती व भीड न बाळगता निर्णय घेतो की कोणत्याही परिस्थितीत हे काम करावयचेच आहे मग परिणाम काही का होऊ नये.

**११)** हा संकेत आहे खैबरचा विजय आणि त्यातील गनीम संपत्तीकडे.

**१२)** याच्याने अभिप्रेत ते इतर विजय आहेत जे खैबरच्या विजयानंतर मुसलमानांना सतत प्राप्त होत गेले.

**१३)** याच्याने अभिप्रेत आहे हुदैबियाचा तह, ज्याला सूरहच्या प्रारंभी उघड विजय ठरविलेला आहे.

**१४)** म्हणजे अश्रद्धावंत कुरैशांना हे धैर्य त्याने दिले नाही की हुदैबियाच्या ठिकाणी ते तुमच्याशी लढावेत, वास्तविकपणे एकूण बाह्य परिस्थितीनुसार ते अधिक बेहतर स्थितीत होते तर युद्धाच्या दृष्टीने तुमचे पारडे त्यांच्या तुलनेत फार दुर्बल दिसत होते.

**१५)** बहुतेक करून हा संकेत मक्केच्या विजयाकडे आहे. म्हणजे अद्याप मक्का तर तुमच्या ताब्यात आलेले नाही परंतु अल्लाहने ते वेढ्यात घेतले आहे व हुदैबियाच्या या विजयाच्या परिणामात तेही तुमच्या ताब्यात येईल.



हे अश्रद्धावंत लोक जर यावेळी तुमच्याशी लढले असते तर निश्चितच त्यांनी पाठ फिरविली असती आणि कोणीही संरक्षक आणि सहायक त्यांना प्राप्त झाला नसता. हा अल्लाहचा प्रघात आहे जो पूर्वापार चालत आलेला आहे, आणि तुम्हाला अल्लाहच्या शिरस्त्यांत कोणतेही परिवर्तन आढळणार नाही. तोच आहे ज्याने मक्केच्या खोऱ्यात त्यांचे हात तुमच्यापासून व तुमचे हात त्यांच्यापासून रोखले, वस्तुत: त्याने तुम्हाला त्यांच्यावर वर्चस्व प्रदान केलेले होते आणि जे काही तुम्ही करीत होता अल्लाह ते पाहत होता. तेच लोक तर आहेत ज्यांनी द्रोह केला आणि तुम्हाला 'मसजिदे हराम' (काबा मस्जिद) पासून रोखले आणि कुर्बानीच्या उंटांना त्यांच्या कुर्बानीच्या स्थळी पोहचू दिले नाही. जर (मक्केत) असे श्रद्धावंत पुरुष व स्त्री उपस्थित नसते ज्यांना तुम्ही जाणत नाही, आणि अशी भीती नसती की अजाणपणे तुम्ही त्यांना चिरडून टाकाल आणि त्यामुळे तुमच्यावर आळ येईल (तर युद्ध रोखले गेले नसते, ते यासाठी रोखले गेले) जेणेकरून अल्लाहने आपल्या कृपाछत्रांत हवे त्याला सामावून घ्यावे. ते श्रद्धावंत वेगळे झाले असते तर (मक्कावासीयांपैकी) जे अश्रद्धावंत होते त्यांना आम्ही जरूर कठोर शिक्षा दिली असती.[१६] (हेच कारण आहे की) जेव्हा या अश्रद्धावंतांनी आपल्या हृदयांत अज्ञानपूर्ण दुराभिमान बाळगला तेव्हा अल्लाहने आपल्या पैगंबरांवर व श्रद्धावंतांवर 'सकीनत' (शांती) उतरविली,[१७] आणि श्रद्धावंतांना ईशपरायणतेच्या वचनावर कायम ठेवले की तेच

**१६)** सर्वोच्च अल्लाहने हुदैबिया येथे ज्या कारणाने युद्ध होऊ दिले नाही त्यात ही अशी हिकमत होती. मक्का शहरात त्यावेळी बरेचसे मुसलमान स्त्री व पुरुष असे मौजूद होते ज्यांनी एकतर आपले श्रद्धावंत लपवून ठेवलेले होते अथवा ज्यांचे श्रद्धावंत सर्वांना माहीत होते परंतु ते आपल्या लाचारीमुळे हिजरत करू शकत नव्हते व जुलूम व अत्याचारास बळी पडत होते. अशा परिस्थितीत जर युद्ध झाले असते व मुसलमान अश्रद्धावंतांना रेटत मक्का शहरात शिरले असते तर अश्रद्धावंतांसमवेत सदरहू मुसलमानदेखील नकळत मुसलमानांच्या हातून मारले गेले असते. दुसरा पैलू या मसलतीचा असा होता की सर्वोच्च अल्लाह कुरैशांना एका रक्तरंजित युद्धात पराभूत करून मक्का जिंकवू इच्छित नव्हता तर दोन वर्षांच्या आत चारही बाजूंनी वेढून त्यांना अशा प्रकारे जेरीस आणावे की कोणत्याही प्रतिकाराविना हे पराभूत व्हावेत व मग सर्वच्या सर्व कुरैश वंशाने इस्लामचा स्वीकार करून अल्लाहच्या कृपाछत्राखाली यावे, हे त्याच्या दृष्टिसमोर होते जसे की नंतर मक्केच्या विजयाप्रसंगी घडले.

**१७)** या ठिकाणी 'सकीनत'ने अभिप्रेत आहे संयम आणि प्रताप, ज्यासह पैगंबर हजरत मुहम्मद (स.) व मुसलमानांनी अश्रद्धावंतांच्या या अज्ञानमूलक अहंकाराचा मुकाबला केला. ते त्यांच्या या हेकेखोरी आणि उघड आगळिकीवर प्रक्षुब्ध होऊन बेफाम झाले नाहीत व त्यांच्या उत्तरात सत्याच्या मर्यादा ओलांडणारी व रास्तपणाच्याविरूद्ध असलेली अथवा ज्यामुळे प्रकरण इष्ट व चांगल्या प्रकारे सुटण्याऐवजी आणखीनच चिघळले असते अशी कोणतीही गोष्ट त्यांनी केली नाही.

त्याचे अधिक हक्कदार व त्यास पात्र होते. अल्लाहला सर्व गोष्टींचे ज्ञान आहे. (२२-२६)

प्रत्यक्षात अल्लाहने आपल्या पैगंबराला खरे स्वप्न दाखविले होते जे तंतोतंत सत्याधिष्ठित होते.[१८] अल्लाहने इच्छिले तर तुम्ही जरूर 'मसजिदे हराम'मध्ये पूर्ण शांततेने प्रविष्ट व्हाल,[१९] आपल्या डोकीचे मुंडन करवाल आणि केस कापवाल आणि तुम्हाला कोणतेही भय असणार नाही. तो ती गोष्ट जाणत होता जी तुम्ही जाणत नव्हता, म्हणून ते स्वप्न साकार होण्यापूर्वी त्याने हा निकटचा विजय तुम्हाला प्रदान केला. (२७)

तो अल्लाह आहे ज्याने आपल्या पैगंबराला मार्गदर्शन आणि सत्य धर्मानिशी पाठविले आहे जेणेकरून सर्व धर्म - प्रकारांवर त्याचे वर्चस्व बहाल करावे आणि या सत्यतेवर अल्लाहची ग्वाही पुरेशी आहे.[२०] मुहम्मद (स.) अल्लाहचे प्रेषित आहेत, आणि जे लोक त्यांच्यासमवेत आहेत ते अश्रद्धावंतांच्याविरूद्ध कठोर[२१] आणि आपापसांत

१८) मुसलमानांच्या मनात वरचेवर जो प्रश्न डोकावत होता त्याचेच हे उत्तर होय. त्यांचे म्हणणे असे होते की अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी तर स्वप्नात पाहिले होते की ते मस्जिदेहराम मध्ये दाखल झाले आहेत व अल्लाहचे घराला-काबाला त्यांनी प्रदक्षिणा घातल्या आहेत. मग आम्ही उमरा अदा केल्याविनाच परत जात आहोत हे असे का घडले?

१९) हे वचन पुढच्या वर्षी हि. स. ७ च्या जिल्कद महिन्यात पूर्ण झाले. इतिहासात हा 'उमरा' 'उमरतुलकजा' या नावाने प्रसिद्ध आहे.

२०) या ठिकाणी ही गोष्ट फर्माविण्याचे कारण असे आहे की हुदैबिया येथे जेव्हा तहाचा करार लिहिला जात होता त्यावेळी मक्केच्या अश्रद्धावंतांनी पैगंबर (स.) यांच्या शुभ नामाबरोबर 'रसुलुल्लाह'-अल्लाहचे पैगंबर हा शब्द लिहिण्यावर आक्षेप घेतला होता. त्यावर फर्माविले गेले आहे की पैगंबरांचे पैगंबर असणे ही एक वस्तुस्थिती आहे, त्यात कुणाच्या मान्य अथवा अमान्य करण्याने काहीच फरक पडत नाही. याला जर काही लोक मानीत नाहीत तर न मानो. ही वस्तुस्थिती असण्यावर अल्लाहची साक्ष पुरेशी आहे.

२१) अरबी भाषेत म्हणतात, 'फलानून शदीदुन अलैह'. अमूक माणूस त्यावर कठोर आहे, म्हणजे त्याला दाबून टाकणे अथवा कह्यात आणणे व आपल्या वळणी आणणे त्याच्यासाठी कठीण आहे. सहाबा (रजि.) यांचे अश्रद्धावंतांवर कठोर असण्याचा अर्थ असा की सहाबा (रजि.) मेणबाहुले नाहीत की त्याना अश्रद्धावंतांनी हवे तसे वळवावे. ते नरमचारा नव्हते की अश्रद्धावंतांनी त्यांना सहजपणे गिळावे. त्यांना कोणतीही भीती दाखवून दाबले जाऊ शकत नाही, त्यांना कसल्याही प्रलोभनाने विकत घेतले जाऊ शकत नाही. ज्या महान उद्दिष्टासाठी ते प्राण पणाला लावून हजरत मुहम्मद (स.) यांना साथ देण्यासाठी उभे ठाकले आहेत त्या ध्येयापासून हटवू शकावे, अश्रद्धावंतात असे बळ नाही.



दयाळू आहेत.[२२] तुम्ही जेव्हा पहाल, त्यांना वांकताना व नतमस्तक होताना आणि अल्लाहची कृपा व त्याच्या प्रसन्नतेच्या शोधार्थ निमग्न पहाल. नतमस्तक होण्याचे परिणाम त्यांच्या चेहऱ्यावर विद्यमान आहेत ज्यांच्यामुळे ते वेगळे ओळखले जातील.[२३] असे आहे त्यांचे गुणवैशिष्ट्य तौरातमध्ये. आणि इंजीलमध्ये त्यांचा दृष्टांत असा दिला गेला आहे की जणू एक शेती आहे जिने प्रथम अंकुर बाहेर काढले, मग त्याला बळकटी दिली, नंतर त्याची रोपे झाली मग आपल्या खांद्यावर उभे राहिले, शेती करणाऱ्यांना ते खुश करते जेणेकरून अश्रद्धावंताचा त्याच्या बहरण्याने जळफळाट होईल. या जनसमूहाचे लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत अल्लाहने त्यांना क्षमा व महान मोबदल्याचे वचन दिले आहे. (२८-२९)

२२) म्हणजे त्यांच्यातील कठोरता जी काही आहे धर्मशत्रूंसाठी आहे, श्रद्धावंतांसाठी नव्हे. श्रद्धावंतांपुढे ते मृदू आहेत, दयाळू व मायाळू आहेत, कळवळा व सहानुभूती बाळगणारे आहेत. तत्त्व आणि ध्येयातील एकात्मतेने त्यांच्यात एकमेकासाठी प्रेम, एकरूपता व अनुकूलता निर्मिली आहे.

२३) याच्याने अभिप्रेत, सजदा करण्यामुळे काही नमाजी लोकांच्या कपाळावर जो घट्टा येतो तो नव्हे तर ईशभिरूता, उदारता, सज्जनपणा आणि सदाचरणाची ती चिन्हे आहेत जी ईश्वरापुढे नमण्यामुळे स्वभावत:च माणसाच्या चेहऱ्यावर प्रकट होतात. सर्वोच्च अल्लाहच्या फर्माविण्याचा हेतू असा की पैगबर हजरत मुहम्मद (स.) यांचे हे सोबती तर असे आहेत की यांना पाहिल्याबरोबर मनुष्य एका दृष्टिक्षेपात हे जाणून घेऊ शकतो की हे श्रेष्ठजन आहेत कारण ईशभक्तिचे तेज त्यांच्या मुखावर झळाळत आहे.

# ४९ सूरह अल्‌हुजुरात

*(मदीनाकालीन, वचने १८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या पुढे पाऊल टाकू[१] नका आणि अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा, अल्लाह सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. (१)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, आपला आवाज नबी (स.) च्या आवाजापेक्षा उंच करू नका, आणि नबी (स.) बरोबर उंच आवाजाने बोलूसुद्धा नका ज्याप्रमाणे तुम्ही आपापसांत एकमेकांशी बोलता, एखादे वेळी असे होऊ नये की तुम्ही केले सवरलेले सर्व वाया जावे आणि तुम्हाला कळूसुद्धा नये. जे लोक अल्लाहच्या पैगंबराच्या पाशी बोलताना आपला आवाज खाली ठेवतात ते वास्तविकत: तेच लोक होत ज्यांच्या हृदयांना अल्लाहने ईशपरायणतेसाठी पारखले[२] आहे, त्यांच्यासाठी क्षमा आहे आणि महान मोबदला. (२-३)

हे पैगंबर (स.), जे लोक तुम्हाला घराच्या बाहेरून हाका मारतात; त्यापैकी बहुतेक जण निर्बुद्ध आहेत. जर त्यांनी तुमच्या बाहेर येण्यापर्यंत धीर धरला असता

१) म्हणजे अल्लाह आणि पैगंबर (स.) यांच्या पुढे होऊन चालू नका, मागे चला. अग्रेसर बनू नका, आधीन बनून रहा. आपल्या व्यवहारात पुढे पाऊल टाकून आपल्यापरीने स्वत:च निर्णय घेत जाऊ नका तर अगोदर हे पहा की अल्लाहचा ग्रंथ व त्याच्या पैगंबरांच्या शिरस्त्यात या संबंधाने कोणते आदेश आढळतात.

२) म्हणजे जे लोक सर्वोच्च अल्लाहच्या अजमावणीत खरे ठरले आहेत व त्या परीक्षेतून पार पडून, खरोखरच त्यांच्या मनात ईशभय आहे, हे ज्यांनी सिद्ध केलेले आहे तेच लोक अल्लाहच्या पैगंबरांची आदब व प्रतिष्ठेची काळजी घेतात. या कथनाने आपोआप ही गोष्ट निघते की जे मन पैगंबर (स.) यांच्या आदरभावाला मुकले आहे ते खरेतर ईशभयाला मुकले आहे.



तर त्यांच्यासाठी उत्तम होते,[३] अल्लाह क्षमा करणारा व परमदयाळू आहे. (४-५)

हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे जर कुणी अवज्ञाकारी तुमच्यापाशी एखादी बातमी घेऊन आला तर चौकशी करून घेत चला. एखाद्या वेळी असे घडू नये की तुम्ही एखाद्या समूहाला न कळत हानी पोहचवावी आणि मग आपल्या कृतीवर पश्चात्ताप करावा.[४] चांगले जाणून असा की तुमच्या दरम्यान अल्लाहचा पैगंबर हजर आहे. जर बऱ्याचशा मामल्यात तो तुमचे म्हणणे ऐकत राहिला तर तुम्ही स्वत:च अडचणीत सापडाल, परंतु अल्लाहने तुम्हाला श्रद्धेचे प्रेम दिले आणि त्याला तुमच्यासाठी मनपसंत बनविले, आणि द्रोह व मर्यादाउल्लंघन आणि अवज्ञेचा तुम्हाला तिटकारा आणला आहे. असलेच लोक अल्लाहच्या कृपेने व उपकाराने सन्मार्गी आहेत, आणि अल्लाह सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. (६-८)

आणि जर श्रद्धावंतांपैकी दोन गट परस्परांशी लढलेच[५] तर त्यांच्या दरम्यान समेट घडवून आणा, मग जर त्यांच्यापैकी एका गटाने दुसऱ्या गटाची आगळिकी

३) अरब सभोवताली प्रदेशातून येणाऱ्यांत काही असे अशिष्ट लोकही येत असत जे अल्लाहचे पैगंबर (स.) यांची भेट घेण्यासाठी यायचे तेव्हा एखाद्या सेवकाकरवी आत खबर पाठविण्याची तसदीही घेत नसत. पैगंबर (स.) यांच्या पवित्र पत्नींच्या घरांना फेऱ्या मारून बाहेरूनच पैगंबर (स.) यांना हांका मारीत असत. अशा लोकांच्या वर्तनामुळे पैगंबर (स.) याना फार त्रास होत असे तरीपण आपल्या स्वभाविक सहनशीलतेमुळे ते सर्व सहन करीत असत, सरतेशेवटी सर्वोच्च अल्लाहने या मामल्यात हस्तक्षेप केला व या असभ्य वर्तनाची निर्भर्त्सना करताना लोकांना असा आदेश दिला की जेव्हा ते पैगंबरांना भेटावयास आले व ते त्यांना दिसले नाही तर हांका मारून मारून त्याना बोलवण्याऐवजी ज्यावेळेस ते स्वत:च बाहेर येतील त्यावेळेची संयमाने प्रतीक्षा करीत बसावे.

४) सदरहू आयतीत मुसलमानांना असा तात्त्विक आदेश दिला गेला आहे की जेव्हा एखादी महत्वाची बातमी, जिचे पडसाद मोठ्या प्रमाणात निघत असतील, तुम्हाला मिळाली तेव्हा ती बातमी घेण्याअगोदर बातमी आणणारा मनुष्य कसा आहे हे पहात चला. जर तो कुणी अवज्ञाकारी इसम असला, म्हणजे त्याची बातमी विश्वासार्ह नाही हे त्याच्या बाह्यावस्थेवरून दिसत असेल तेव्हा त्याने आणलेल्या बातमीवर कृती करण्याअगोदर वस्तुस्थिती काय आहे याची शहानिशा करून घेत चला.

५) असे फर्माविले नाही की 'जेव्हा श्रद्धावंतांपैकी दोन गट आपापसात लढतील' तर असे फर्माविले आहे की, 'जर श्रद्धावंतांपैकी दोन गट परस्पराशी लढलेच' या शब्दावरून ही गोष्ट आपोआप निघते की परस्परात लढणे मुसलमानांची पद्धत नव्हे व असूदेखील नये. श्रद्धावंत असतानादेखील ते आपापसात लढत राहतील ही गोष्ट त्यांच्याकडून अपेक्षित नाही. तथापि जर एखाद्यावेळी असे घडलेच तर अशा परिस्थितीत पुढे जे सांगितले जाणार आहे त्या पद्धतीचा अवलंब केला गेला पाहिजे.

केली तर आगळिकी करणाऱ्याशी लढा येथपावेतो की तो अल्लाहच्या आदेशाकडे परत येईल, मग जर तो परत आला तर त्यांच्या दरम्यान न्यायाने समेट करा आणि न्याय करा, अल्लाह न्याय करणाऱ्यांना पसंत करतो. श्रद्धावंत तर एक दुसऱ्याचे भाऊ आहेत, म्हणून आपल्या भावांच्या दरम्यान संबंध सुरळीत करा आणि अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, आशा आहे की तुमच्यावर दया केली जाईल. (९-१०)

हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, पुरुषांनी दुसऱ्या पुरुषांची टिंगल उडवू नये, शक्य आहे की ते त्यांच्यापेक्षा उत्तम असतील, आणि स्त्रियांनीसुद्धा दुसऱ्या स्त्रियांची टिंगल उडवू नये, शक्य आहे की त्या त्यांच्यापेक्षा उत्तम असतील.[६] आपापसांत एकमेकांना टोमणे मारू नका[७] आणि एकमेकांचा उल्लेख वाईट नावानेही करू नका.[८] श्रद्धा ठेवल्यानंतर दुराचारांत नाव मिळविणे फार वाईट गोष्ट आहे. जे लोक या वर्तनापासून परावृत्त होत नसतील ते अत्याचारी होत. (११)

हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अधिक शंका घेण्यापासून दूर रहा कारण

६) थट्टा उडविण्याने अभिप्रेत केवळ तोंडानेच थट्टा उडविणे आहे असे नाही तर एखाद्याची नक्कल करणे, त्याच्याकडे इशारे करणे, त्याची गोष्ट अथवा त्याच्या कामावर किंवा त्याचा चेहरा व पोषाखावर हसणे अथवा त्याचा दोष अथवा व्यंगाकडे लोकांचे अशा प्रकारे लक्ष वेधणे की इतरांनी त्याचे हसे करावे हे सर्वदेखील थट्टा उडविण्यात समाविष्ट आहेत.

७) याच्या अर्थात, टोमणे मारणे, नावे ठेवणे, आळ लावणे, आक्षेप घेणे, छिद्रान्वेषण करणे आणि उघड उघड अथवा तोंडातल्या तोंडात संकेताने एखाद्याला निर्भर्त्सनेचे लक्ष्य बनविणे, ही सर्व कृत्ये समाविष्ट आहेत.

८) या आज्ञेतील गर्भित हेतू असा की कोणत्याही माणसाला अशा नावाने पुकारले जाऊ नये अथवा असे टोपण नाव दिले जाऊ नये जेणेकरून त्याची मानहानी होत असावी. उदा. एखाद्याला अवज्ञाकारी अथवा दांभिक म्हणणे. कुणास पांगळा किंवा आंधळा अथवा चकणा म्हणणे. कुणा एकाला त्याच्या स्वत:च्या अथवा त्याच्या आई व वडील अथवा कुळातील एखादा दोष अथवा व्यंगाचे उपनाव ठेवणे. कुणा एकाला मुसलमान झाल्यानंतर त्याच्या पूर्वीच्या धर्मावरून यहूदी अथवा ख्रिस्ती म्हणणे. कुणा मनुष्याचे अथवा कुळाचे अथवा जात व समूहाचे असे नाव ठेवणे ज्यात त्यांची निर्भर्त्सना आणि मानहानीचा पैलू असावा. या आज्ञेला केवळ अशाच टोपण नावांचा अपवाद आहे जे बाह्य स्वरूपानुसार तर कुरूप आहेत परंतु त्यांचा हेतू निर्भर्त्सनेचा नसतो तर ज्या लोकांचा अशा नावांनी उल्लेख केला जातो ते त्या लोकांच्या ओळखीचे साधन ठरतात. उदा. अंध हकीम, की हेतू केवळ त्याच्या ओळखीचा आहे निर्भर्त्सनेचा नाही.



काही बाबतीत कुतर्क करणे हे पाप आहे.[९] हेरगिरी करू नका.[१०] आणि तुमच्यापैकी कुणीही कुणाची चहाडी करू नये.[११] काय तुमच्यापैकी एखादा असा आहे की जो

९) तर्क करण्यास पूर्णपणेच प्रतिबंध केलेला आहे असे नाही तर फार जास्त कल्पना लढविण्याची व सर्व तऱ्हेचे अनुमान करण्याची मनाई केलेली आहे, व काही अनुमान अपराध असतात असे त्याचे कारण सांगितलेले आहे. वास्तविकत: ज्या कल्पना गुन्हे ठरतात त्या म्हणजे माणसाने विनाकारणच कुणासंबंधी वाईट कल्पना करावी अथवा मत प्रस्थापित करताना नेहमी वाईट कल्पनेने सुरुवात करीत राहावे. अथवा ज्यांच्या वर्तनावरून उघडपणे हे दिसत असावे की ते सदाचारी व सज्जन लोक आहेत, अशा लोकांच्या बाबतीत वाईट कल्पना करावी. त्याचप्रमाणे एखाद्या माणसाच्या एखाद्या कथनात अथवा कृतीत वाईट अथवा चांगली दोन्ही गोष्टींची संभावना असावी परंतु आम्ही केवळ कुतर्काने त्यास वाईटच ठरवावे ही गोष्टदेखील गुन्हा आहे. **१०)** म्हणजे लोकांच्या गुपितांची चौकशी करू नका, एक दुसऱ्यांचे दोष शोधू नका, इतरांच्या स्थिती व त्यांच्या मामल्यांच्या मागावर राहू नका. लोकांची वैयक्तिक पत्रे वाचणे, दोन इसमांच्या गोष्टींचा कानोसा घेणे, शेजाऱ्यांच्या घरात डोकावणे, आणि निरनिराळ्या पद्धतींनी इतरांच्या कौटुंबिक जीवनाची व वैयक्तिक मामल्यांची चौकशी करणे, या सर्वांचा त्या चौकशीत समावेश होतो ज्यांची मनाई केलेली आहे. **११)** अल्लाहचे पैगंबर (स.) यांना विचारले गेले की 'चहाडी'ची व्याख्या काय आहे? आपण फर्माविले, चहाडी ही आहे की "तू आपल्या भावाचा उल्लेख अशा प्रकारे करावा जे त्याला अप्रिय वाटत असावे." सांगितले गेले की, माझ्या भावात ती गोष्ट आढळत असावी जी मी सांगत आहे तर अशा स्थितीत आपला काय विचार आहे? फर्माविले, "जर त्या ती गोष्ट आढळत असेल तर तू चहाडी केलीस व जर त्यात ती गोष्ट आढळत नसेल तर त्याच्यावर तू कुभांड रचलेस." या निषिद्धतेला अपवाद केवळ असेच प्रकार आहेत ज्यात एका माणसाच्या पाठीमागे, अथवा त्याच्या मृत्यूनंतर त्याच्यातील वाईटपणा सांगण्याची शरीअतच्या दृष्टीने जी योग्य असेल अशीच एखादी खरी गरज भासत असावी व ती गरज निंदा केल्याविना भागली जात नसावी तसेच त्यासाठी जर निंदा केली गेली नाही तर त्या निंदेच्या तुलनेत अधिक मोठी वाईट गोष्ट अपरिहार्य ठरत असेल. पैगंबर (स.) यांनी हा अपवाद तत्त्वत: अशाप्रकारे सांगितला आहे, "अत्यंत वाईट आगळिकी कुणा मुसलमानाच्या अब्रूवर नाहक हल्ला करणे होय." या कथनात 'नाहक' ही मर्यादा हे दर्शविते की 'हक'नुसार असे करणे वैध आहे. उदा. अत्याचाऱ्यांविरूद्ध अत्याचारपीडिताकडून अशा प्रत्येक इसमासमोर तक्रार केली जाणे ज्याच्यासंबंधी अपेक्षा असेल की तो अत्याचार निवारणासाठी काही करू शकतो. सुधारणेच्या इच्छेने कुणा व्यक्ती अथवा समूहातील वाईट गोष्टींचा उल्लेख अशा लोकांसमोर जे या वाईट गोष्टी दूर करण्यासाठी काही करू शकतील अशी त्यांच्याकडून आशा असावी. शास्त्रीय आज्ञा जाणून घेण्याच्या हेतूने कुणा मुफ्ती-इस्लामी शास्त्रीसमोर वस्तुस्थिती सांगणे ज्यात एखाद्या माणसाच्या एखाद्या दुष्कृत्याचा उल्लेख व्हावा, लोकांना एखादा इसम अथवा इसमांच्या अरिष्टांपासून सावध करणे जेणेकरून त्याच्या हानीपासून वाचू शकावे, अशा लोकांविरूद्ध उघडपणे आवाज उठविणे व त्यांच्यातील वाईट गोष्टींवर टीका करणे जे दुराचाराचा फैलाव करीत असावेत अथवा स्वरचित रूढी (बिदआत) आणि मार्गभ्रष्टतेचा प्रसार करीत असावेत, अथवा लोकांना अधर्म आणि जुलूम व अन्यायाच्या उपद्रवात टाकीत असावेत.

आपल्या मृत भावाचे मांस खाणे पसंत करील?[१२] पहा, तुम्हा स्वत:ला याची घृणा वाटेल अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, अल्लाह मोठा पश्चात्ताप स्वीकारणारा आणि परम कृपाळू आहे. (१२)

लोकहो, आम्ही तुम्हाला एका पुरुष व एका स्त्रीपासून निर्माण केले आणि मग तुमची राष्ट्रे आणि जाती बनविल्या जेणेकरून तुम्ही एकमेकांना ओळखावे. वास्तविकत: अल्लाहजवळ तुमच्यापैकी सर्वात जास्त प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वात जास्त ईशपरायण[१३] आहे. निश्चितच अल्लाह सर्वकाही जाणणारा आणि खबर राखणारा आहे. (१३)

**१२)** चहाडीला मृत भावाचे मांस खाण्याची उपमा अशासाठी दिलेली आहे की ज्याची चहाडी केली जात असते तो बिचारा पूर्णपणे अजाण असतो की कोठे व कुणी त्याच्या अब्रूवर हल्ला करीत आहे.

**१३)** या अगोदरच्या आयतीत श्रद्धावंतांना उद्देशून, मुस्लिम समाजाला बिघाडांपासून सुरक्षित ठेवण्यासाठी आवश्यक असलेल्या सूचना दिल्या गेल्या होत्या. आता या आयतीत अखिल मानवजातीला उद्देशून, जगात सदैव विश्वव्यापी उपद्रवास कारणीभूत ठरत आले आहे त्या महापथभ्रष्टतेची सुधारणा केलेली आहे. म्हणजे वंश, वर्ण, भाषा, देश, आणि राष्ट्रीयतेचा पक्षपातीपणा. या लहानशा आयतीत सवोच्च अल्लाहने मानवांना संबोधून तीन अत्यंत महत्वाची तात्त्विक सत्ये सांगितली आहेत. एक असे की तुम्हा सर्वांचे मूळ एकच आहे. एकाच पुरुष व एकाच स्त्रीपासून तुमचा सर्व वंश अस्तित्वात आला आहे व आज जगात तुमचे जे जे वंश आढळतात ते वास्तविकपणे एकाच आई व वडिलांपासून ज्यांचा प्रारंभ झाला होता, त्याच एका वंशाच्या शाखा आहेत. दुसरे असे की आपल्या मूळ स्वरूपाच्या दृष्टीने एकच असतानादेखील तुमचे राष्ट्र आणि जाती व कुळात विभागले जाणे स्वाभाविकच होते. परंतु या स्वाभाविक भिन्नता व विविधतेची निवड अशी कदापि नव्हती की या आधारावर उच्च, नीच, श्रेष्ठ व कनिष्ठ, स्पृश्य, अस्पृश्य असले भेदभाव कायम केले जावेत, एका वंशाने दुसऱ्या वंशावर आपले श्रेष्ठत्व गाजवावे, एका वर्णाच्या लोकांनी दुसऱ्या वर्णाच्या लोकांना तुच्छ व क्षुद्र मानावे व एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्रावर जम बसवावा. निर्माणकर्त्याने ज्या कारणास्तव मानवी समूहांना राष्ट्र आणि जातींच्या स्वरूपात उभारले होते ते केवळ इतकेच होते की त्यांच्या दरम्यान परस्परातील सहकार आणि ओळखीची हीच स्वाभाविक शक्कल होती. तिसरे असे की माणसा माणसांदरम्यान श्रेष्ठता व उच्चतेचा आधार जर कोणता आहे व असू शकतो तर तो केवळ नैतिकतेतील श्रेष्ठता होय.



हे बदावी (ग्रामीण अरब) म्हणतात, ''आम्ही श्रद्धा ठेवली.''[१४] यांना सांगा, तुम्ही श्रद्धा ठेवली नाही, तर असे म्हणा, ''आम्ही समर्पित झालो.'' श्रद्धा अद्याप तुमच्या हृदयात दाखल झालेली नाही जर तुम्ही अल्लाहआणि त्याचे पैगंबर (स.) यांची आज्ञाधारकता स्वीकारली तर तो तुमच्या कर्म मोबदल्यात कोणतीही कमतरता करणार नाही. खचितच अल्लाह मोठा क्षमाशील आणि परमकृपाळू आहे. खरोखर श्रद्धावंत तर ते आहेत ज्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर श्रद्धा ठेवली, मग त्यांनी कोणतीही शंका ठेवली नाही आणि आपल्या जीवितवित्तानिशी अल्लाहच्या मार्गात पराकाष्ठा केली तेच खरे लोक होत. (१४-१५)

हे पैगंबर (स.), यांना (श्रद्धेच्या दावेदारांना) सांगा, काय तुम्ही अल्लाहला आपल्या धर्माची खबर देत आहात? वस्तुत: अल्लाह पृथ्वी आणि आकाशांच्या प्रत्येक वस्तूला जाणतो आणि त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे. हे लोक तुमच्यावर उपकार दर्शवितात की त्यांनी इस्लामचा स्वीकार केला. यांना सांगा, आपल्या इस्लामचे उपकार माझ्यावर लादू नका, तर अल्लाह तुमच्यावर आपले उपकार ठेवतो की त्याने तुम्हाला श्रद्धेची सुबुद्धी दिली, जर खरोखर तुम्ही आपल्या श्रद्धेच्या दाव्यांत खरे असाल. अल्लाहला पृथ्वी व आकाशातील प्रत्येक गुप्त गोष्टीचे ज्ञान आहे आणि जे काही तुम्ही करीत असता ते सर्वकाही त्याच्या दृष्टीत आहे. (१६-१८)

**१४)** याच्याने अभिप्रेत सर्वच बदावी (अरब खेडूत) आहेत असे नाही तर इस्लामची वाढत असलेली शक्ती पाहून केवळ या विचाराने जे मुसलमान बनले होते की ते मुसलमानांच्या माऱ्यापासून सुरक्षितही राहतील आणि इस्लामी विजयांच्या फायद्यांचाही उपभोग घेता येईल, अशा काही विशिष्ट बदावी टोळ्यांचा या ठिकाणी उल्लेख केला जात आहे. या लोकांनी खरे म्हणजे मनापासून श्रद्धा ठेवली नव्हती, केवळ तोंडी श्रद्धेची कबुली देऊन सहेतुक त्यांनी स्वत:ला मुसलमानांत सामील केलेले होते.

# ५० सूरह क़ाऽऽफ़

*(मक्काकालीन, वचने ४५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

क़ाऽऽफ़. शपथ आहे महान कुरआनची - किंबहुना या लोकांना आश्चर्य या गोष्टीचे वाटले की एक खबरदार करणारा खुद्द यांच्यातूनच यांच्याजवळ आला.[१] मग इन्कार करणारे म्हणू लागले, ''ही तर अजब गोष्ट आहे, काय जेव्हा आम्ही मरू आणि माती बनून जाऊ (तेव्हा दुसऱ्यांदा उठविले जाऊ)? हे पुनरागमन तर बुद्धी पलीकडचे[२] आहे.'' (वास्तविकत:) जमीन यांच्या शरीरांतून जे काही खाते ते आम्हाला ज्ञात आहे, आणि आमच्याजवळ एक ग्रंथ आहे ज्यात सर्वकाही सुरक्षित आहे. (१-४)

किंबहुना या लोकांनी तर ज्यावेळी सत्य यांच्यापाशी आले त्याचवेळी ते साफ खोटे ठरविले. याच कारणाने आता हे गोंधळात पडले आहेत. (५)

बरे, तर काय यांनी कधी आपल्यावरील आकाशाकडे पाहिले नाही? कशाप्रकारे आम्ही ते बनविले आणि सुशोभित केले, आणि त्यात कोठे कसली उणीव नाही. आणि पृथ्वीला आम्ही अंथरले आणि त्यात पर्वत रोवले व त्यात हरतऱ्हेच्या सुदृश्य वनस्पती उगविल्या. या सर्व वस्तू डोळे उघडविणाऱ्या आणि बोधप्रद आहेत त्या प्रत्येक दासासाठी जो (सत्याकडे) रुजू होणारा असेल. आणि आकाशांतून आम्ही समृद्धशाली जल उतरविले, मग त्यापासून बागा आणि धान्याची पिके, आणि उंच उंच खजुरीची झाडे निर्माण केली, ज्यांना फळांनी भरलेले घड थरावर थर लागतात. अशी व्यवस्था आहे दासांना उपजीविका देण्याची, या पाण्याने आम्ही एका मृत जमिनीला जीवन प्रदान करतो (मेलेल्या माणसांचे जमिनीतून) निघणेसुद्धा अशाच प्रकारेच असेल. (६-११)

---

१) अर्थ असा की मक्कावासींनी हजरत मुहम्मद (स.) यांचे प्रेषितत्व एखाद्या योग्य आधारे अमान्य केले आहे असे नाही तर त्यांच्या एका सजातीय पुरुष व त्यांच्याच राष्ट्राच्या एका इसमाचे ईश्वराकडून सावध करणारा म्हणून येणे त्यांच्याजवळ अत्यंत विचित्र अशी गोष्ट आहे, या पूर्णपणे अयोग्य कारणाने त्यांनी अमान्य केले आहे.

२) हे त्या लोकांचे दुसरे आश्चर्य होते. पहिले आश्चर्य त्यांना या गोष्टीचे वाटले की एक मनुष्य प्रेषित बनून आला व त्याउपर जास्त आश्चर्य त्यांना या गोष्टीचे वाटले की सर्व माणसें मृत्यूनंतर नव्याने पुन्हा जिवंत केले जातील व त्या सर्वांना एकत्र करून अल्लाहच्या न्यायालयात उभे केले जाईल.



यांच्यापूर्वी नूह (अ.) चे राष्ट्र आणि अर्रसवाले व समूद, आणि आद व फिरऔन आणि लूतचे भाऊ आणि ऐकावाले व तुब्बअच्या राष्ट्रातील लोकांनीसुद्धा खोटे ठरविले आहे. प्रत्येकाने प्रेषितांना खोटे ठरविले आणि सरतेशेवटी माझी धमकावणी त्यांच्यावर लागू झाली. (१२-१४)

पहिल्या वेळेच्या निर्मितीला आम्ही असमर्थ होतो काय? परंतु एका नवीन निर्मितीसंबंधी हे लोक शंकाग्रस्त झालेले आहेत. (१५)

आम्ही मनुष्याला निर्माण केले आहे आणि त्यांच्या मनात उद्भवणारे 'वसवसे'सुद्धा आम्ही जाणतो. आम्ही त्याच्या मानेच्या शिरेपेक्षाही अधिक त्याच्याजवळ आहोत, (आणि आमच्या या प्रत्यक्ष ज्ञानाशिवाय) दोन नोंदणारे त्याच्या उजव्या व डाव्या बाजूला बसून प्रत्येक गोष्टीची नोंद घेत आहेत. कोणताही शब्द त्याच्या तोंडातून असा निघत नाही ज्याला सुरक्षित करण्यासाठी एक विद्यमान निरीक्षक हजर नाही. मग पहा ती मृत्यूकळा सत्यानिशी येऊन ठेपली, ही तीच गोष्ट आहे ज्यापासून तू पळ काढीत होतास. आणि मग नरसिंघ फुंकले गेले. हा आहे तो दिवस ज्याचे भय तुला दाखविले जात होते. प्रत्येक इसम अशा स्थितीत आला की त्याच्याबरोबर एक हांकून आणणारा आहे आणि एक साक्ष देणारा. या गोष्टीपासून तू गाफिल होतास, आम्ही तो पडदा दूर केला जो तुझ्यापुढे पडलेला होता आणि आज तुझी दृष्टी खूप तीक्ष्ण आहे.[३] त्याच्या साथीदाराने सांगितले,[४] हा जो माझ्या स्वाधीन होता, हजर आहे. आज्ञा दिली गेली, ''फेकून द्या नरकामध्ये प्रत्येक कट्टर अश्रद्धावंताला जो सत्याचा द्वेष करीत असे, भलाईला रोखणारा आणि मर्यादांचे उल्लंघन करणारा होता. शंकेत गुरफटलेला होता. आणि अल्लाहच्या समवेत कुणा दुसऱ्याला उपास्य बनवून बसला होता, टाका त्याला कठोर यातनेत.'' त्याच्या सोबत्याने विनविले,[५] ''हे प्रभू, मी याला दुर्वर्तनी बनविले नाही तर हा स्वत:च पराकोटीच्या पथभ्रष्टतेत पडलेला होता.'' उत्तरादाखल फर्माविले गेले, ''माझ्या पुढे भांडण करू नका, मी तुम्हाला अगोदरच वाईट परिणामांपासून खबरदार केले होते. माझ्या येथे शब्द बदलला जात नाही, आणि मी आपल्या दासांवर जुलूम करणारा नाही.'' (१६-२९)

---

३) म्हणजे ईश्वराचे प्रेषित तुला ज्याची खबर देत होते ते सर्व या ठिकाणी मौजूद असल्याचे तुला चांगल्याप्रकारे दिसत आहे.

४) साथीदाराने अभिप्रेत हाकून आणणारा दूत होय व तोच ईश्वरी न्यायालयात पोहचून सांगेल की माझ्या स्वाधीन असलेला हा मनुष्य हुजूराच्या सेवेत हजर आहे.

५) येथे साथीदाराने अभिप्रेत तो शैतान आहे जो त्या अवज्ञाकारी माणसाबरोबर जगात लागलेला होता.

तो दिवस जेव्हा आम्ही नरकाला विचारू, काय तू भरून गेलीस? आणि ती म्हणेल, आणखीन काही आहे?[६] आणि स्वर्ग ईशपरायणांच्या जवळ आणला जाईल, जरादेखील दूर असणार नाही. फर्माविले जाईल, ''ही आहे वस्तू जिचे तुम्हाला वचन दिले जात असे, त्या प्रत्येक माणसासाठी जो रुजू होणारा[७] आणि खूप खबरदारी घेणारा होता.[८] जो न पाहता 'रहमान' (परमदयाळू अल्लाह) ला भीत असेल आणि जो ईश्वरासक्त हृदयाने आला असेल. दाखल व्हा स्वर्गामध्ये सुखरूपपणे.'' त्या दिवशी शाश्वत जीवनाचा दिवस असेल तेथे त्यांच्यासाठी ते सर्वकाही असेल जे ते इच्छितील, आणि आमच्याजवळ त्यापेक्षाही जास्त बरेचसे त्यांच्यासाठी असेल. (३०-३५)

आम्ही त्यांच्या अगोदर बऱ्याचशा राष्ट्रांना नष्ट करून टाकले आहे जे त्यांच्यापेक्षा खूप अधिक शक्तिमान होते आणि त्यांनी जगाच्या देशांना पालथे घातले होते. मग काय ते एखादे आश्रयस्थान प्राप्त करू शकले? या इतिहासात बोधप्रद वद्य आहे त्या प्रत्येक माणसासाठी जो हृदय बाळगतो अथवा जो लक्षपूर्वक म्हणणे ऐकतो. (३६-३७)

आम्ही पृथ्वी व आकाशांना आणि त्यांच्या दरम्यानच्या साऱ्या वस्तूंना सहा दिवसांत निर्माण केले. आणि आम्हाला थकव्याने स्पर्शसुद्धा केला नाही. म्हणून हे पैगंबर (स.), ज्या गोष्टी हे लोक बनवितात; त्यावर संयम राखा आणि आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्यगान करीत रहा, सूर्योदय आणि सूर्यास्तापूर्वी. आणि रात्रीच्या वेळी पुन्हा त्याचे पावित्र्यगान करा आणि नतमस्तक होणे पूर्ण झाल्यानंतरसुद्धा.[९] (३८-४०)

६) याचे दोन अर्थ असू शकतात. एक असा की, 'माझ्यात आता यापेक्षा जास्त माणसांची जागा नाही.' दुसरा अर्थ असा, 'आणखीन जितकेही अपराधी असतील, आणा.'

७) याच्याने अभिप्रेत असा इसम आहे ज्याने अवज्ञा आणि मनोवासनेचे अनुसरण करण्याचा मार्ग सोडून आज्ञापालन व अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याचा मार्ग स्वीकारला असावा, जो मोठ्या प्रमाणात अल्लाहचे स्मरण करणारा व आपल्या सर्व व्यवहारात त्याकडे रुजू होणारा असावा.

८) याच्याने अभिप्रेत असा माणूस आहे ज्याने अल्लाहने घातलेल्या मर्यादा, सांगितलेली कर्तव्ये, ठरविलेली निषिद्धे आणि स्वाधीन केलेल्या अमानतीचे रक्षण करावे, ज्याने, मी आपल्या उक्ती व कृतीत आपल्या रबची अवज्ञा तर करीत नाही ना, हर समयी याचे आत्मपरीक्षण करीत राहावे.



आणि ऐका ज्या दिवशी दवंडी देणारा (प्रत्येक व्यक्तीच्या) जवळूनच पुकारील,[१०] ज्या दिवशी सर्व लोक उत्थान-कल्लोळ ठीकठीक ऐकत असतील, तो जमिनीतून मृतांचा निघण्याचा दिवस असेल. आम्हीच जीवन प्रदान करतो आणि आम्हीच मृत्यू देतो, आणि आमच्याकडेच सर्वांना त्या दिवशी परतावयाचे आहे, जेव्हा जमीन भंग पावेल आणि लोक तिच्यातून निघून भरधाव पळत सुटले असतील. हे उत्थान आमच्यासाठी फार सोपे आहे. (४१-४४)

हे पैगंबर (स.), ज्या गोष्टी हे लोक बनवीत आहेत, त्यांना आम्ही चांगलेच जाणतो, आणि तुमचे काम यांच्याकडून जबरीने म्हणणे मान्य करविणे नव्हे. फक्त तुम्ही या कुरआनद्वारे त्या प्रत्येक माणसाला उपदेश करा जो माझ्या ताकीदीला भीत असेल. (४५)

९) पालनकर्त्याची स्तुती व त्याचे पावित्र्यगानाने अभिप्रेत या ठिकाणी नमाज आहे 'सूर्योदयापूर्वी' फजरची नमाज आहे. 'सूर्यास्तापूर्वी' दोन नमाज आहेत, एक जुहर (दुपार) व दुसरी असर (तिसऱ्या प्रहर), 'रात्रीच्या वेळी' मगरीब (संध्या) आणि ईशा या नमाज होत व तिसरी तहज्जुद-मध्यरात्री नंतरची नमाजदेखील रात्रीच्या पावित्र्यगानात समाविष्ट आहे.

१०) म्हणजे जो मनुष्य जेथे मृत पडलेला असेल अथवा जगात जेथे कोठे तो मृत्यू पावला असेल तेथेच ईश्वरातर्फे हाक देणाऱ्याची हाक त्याला ऐकू येईल की ऊठ आणि चालता हो आपल्या पालनकर्त्याकडे आपला हिशोब देण्यासाठी. हा आवाज काही अशा प्रकारचा असेल की भूतलावरील जागजागेतून जो जो मनुष्य जिवंत होऊन उठेल त्याला असे जाणवेल की हाक देणाऱ्याने जवळूनच कोठून त्याला हाक दिली आहे.

# ५१ सूरह अज़्ज़ारियात

*(मक्काकालीन, वचने ६०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे त्या वाऱ्यांची जे धूळ उडविणारे आहेत, मग पाण्याने भरलेले मेघ उचलणारे आहेत, मग चपळतेने वाहणारे आहेत, मग एका मोठ्या कार्याचे (पावसाचे) वाटप करणारे आहेत, सत्य असे आहे की ज्या गोष्टीचे भय तुम्हाला दाखविले जात आहे ती खरी आहे. आणि कर्मफळनिष्पत्ती खचितच घडून येणार आहे.[१] (१-६)

शपथ आहे भिन्नभिन्न रूपे असलेल्या आकाशाची, (मरणोत्तर जीवनासंबंधी) तुमचे म्हणणे एक दुसऱ्यापासून विभिन्न आहे.[२] त्याच्यापासून तोच विमुख होतो जो सत्यापासून विमुख झाला आहे. (७-९)

विनाश पावले कयास आणि तर्काने हुकूम लावणारे जे अज्ञानांत गर्क आणि

१) ही आहे ती गोष्ट जिच्यासाठी शपथ घेतली गेली आहे. या शपथ घेण्याचा अर्थ असा की पावसाचा हा भव्य कायदा ज्या अद्वितीय व नियमित पद्धतीने तुमच्या दृष्टिसमोर चाललेला आहे तसेच यात ज्या व्यवहारिकता व जी कौशल्ये स्पष्टपणे कार्यरत असल्याचे दिसत आहेत त्या या गोष्टीची साक्ष देत आहेत की हे जग एखादे निर्हेतुक व निरर्थक घरकुल नाही ज्यात लाखो, करोडो वर्षांपासून एक फार मोठा खेळ विनाकारण अललटपपणे चाललेले असावे. तर वास्तविकपणे ही पराकोटीची एक विवेकपूर्ण व्यवस्था आहे. त्यातील प्रत्येक काम कोणत्या न कोणत्या हेतू आणि कौशल्यानेच होत आहे. अशा व्यवस्थेत मनुष्याला अधिकार बहाल करून तसेच सोडले जावे, त्याने या अधिकारांचा उपयोग कसा केला यांचा हिशेब त्याच्याकडून कधी घेतलाच जाऊ नये, हे संभाव्यच नाही.

२) म्हणजे ज्याप्रकारे आकाशातील ढग आणि तारकापुंजाच्या आकृत्या भिन्न भिन्न आहेत, त्याच्यात कोणतेही साम्य आढळत नाही, त्याचप्रकारे परलोकासंबंधी तुम्ही लोक भिन्न भिन्न गोष्टी बोलत आहात व प्रत्येकाचे बोलणे दुसऱ्याशी भिन्न आहे. बोलण्यातील ही मतांतरे स्वत:च या गोष्टीचा पुरावा आहे की प्रेषितत्व आणि वही-दिव्यबोध पासून निरपेक्ष राहून मनुष्याने स्वत:च्या व या जगाच्या शेवटासंबंधी जेव्हा जेव्हा एखादे मत प्रस्थापित केले आहे; ते ज्ञानांविना केले आहे एरवी याबाबतीत मानवाजवळ प्रत्यक्षपणे ज्ञानाचे एखादे साधन खरोखरीच जर असते तर इतकी विभिन्न आणि परस्परविरूद्ध मते निर्माण झाली नसती.



गफलतीत धुंद आहेत.[३] विचारणा करतात की अखेर तो फलनिष्पत्तीचा दिवस येणार तरी केव्हा? तो त्या दिवशी येईल जेव्हा हे लोक अग्नीवर भाजले जातील. (यांना सांगितले जाईल) आता घ्या आस्वाद आपल्या उपद्रवाचा. ही तीच गोष्ट आहे ज्याची तुम्ही घाई करीत होता.[४] मात्र ईशपरायण लोक त्या दिवशी उद्यानात आणि झऱ्यांच्या दरम्यान असतील, जे काही त्यांचा पालनकर्ता त्याना देईल ते आनंदाने घेत असतील. ते त्या दिवसाच्या येण्यापूर्वी सत्कर्मी होते, रात्री कमीच झोपत असत, मग तेच रात्रीच्या शेवटच्या प्रहरी क्षमायाचना करीत असत, आणि त्यांच्या मालमत्तेत हक्क होता याचकांचा आणि वंचितांचा.[५] (१०-१९)

पृथ्वीवर बरेचसे संकेत आहेत विश्वास बाळगणाऱ्यांसाठी, आणि खुद्द तुमच्या स्वत:च्या अस्तित्वात आहेत. तुम्हाला उमगत नाही काय? आकाशांतच आहे तुमची उपजीविकासुद्धा आणि ती गोष्टसुद्धा जिचे वचन तुम्हाला दिले जात आहे.[६] तर शपथ आहे आकाश आणि पृथ्वीच्या स्वामीची, ही गोष्ट सत्य आहे, तशीच खात्रीलायक

३) म्हणजे आपल्या चुकीच्या अनुमानांमुळे ते कोणत्या शेवटाकडे चाललेले आहेत याची त्यांना काहीच कल्पना नाही वास्तविकत: परलोकासंबंधी चुकीचे मत प्रस्थापित करून जो कोणता मार्ग स्वीकारला गेला आहे तो विनाशाकडेच नेतो.

४) अश्रद्धावंतांचे असे विचारणे की, 'तो मोबदल्याचा दिवस केव्हा येईल बरे?' यात खुद्द असा अर्थ दडलेला होता की त्याच्या येण्यात उशीर का होत आहे? जेव्हा आम्ही त्याचा इन्कार करीत आहोत व तो खोटे ठरविण्याची सजा आमच्यासाठी निश्चित झाली आहे तेव्हा तो का येत नाही?

५) दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर, एकीकडे ते आपल्या पालनकर्त्याचा हक्क ओळखीत होते व तो अदा करीत असत. दुसरीकडे जे काही अल्लाहने त्याना दिले होते मग ते थोडे असो की बहू, त्यात ते स्वत:चे व स्वत:च्या कुटुंबियांचेच हक्क मानत होते असे नाही तर आमच्या या मालमत्तेत सहाय्याची गरज असलेल्या अशा ईश्वराच्या प्रत्येक दासाचा हक्क आहे असे त्यांना वाटत लोकांशी त्यांचा असा व्यवहार होता.

६) आकाशाने अभिप्रेत या ठिकाणी वरील जगत आहे. रोजीने अभिप्रेत ते सर्वकाही आहे जे जगात माणसाला जगण्या व काम करण्यासाठी दिले जाते आणि ज्या गोष्टीचे वचन दिले जात आहे तिच्याने अभिप्रेत अंतिम प्रलय-पुनरुत्थान, हिशेब व जाब विचारणी, मोबदला व शिक्षा आणि स्वर्ग व नरक होय. हे सर्व घडण्याचे वचन सर्व दिव्य ग्रंथात दिले गेले आहे. तसेच कुरआनातही दिले जात आहे. ईश्वरी कथनाचा अर्थ असा की वरील जगतातच याचा निर्णय होतो की तुमच्यापैकी कुणाला काय काय दुनियेत दिले जावे, आणि तुम्हाला जाब विचारण्यासाठी कर्म मोबदल्यासाठी केव्हा पाचारण केले जावे याचा निर्णयदेखील तेथेच होणार.

जशी तुम्ही बोलत आहात. (२०-२३)

हे पैगंबर (स.), इब्राहीम (अ.) च्या मान्यवर पाहुण्यांची कथाही तुम्हांपर्यंत पोहचली आहे. जेव्हा ते त्याच्या येथे आले तेव्हा त्यांनी सांगितले, आपल्याला सलाम. त्याने सांगितले, "आपणांससुद्धा सलाम - काही अनोळखी लोक आहेत."[७] मग तो गुपचुप आपल्या कुटुंबियांकडे गेला, आणि एक (भाजलेले) जाडजूड वासरू आणून पाहुण्यांच्या पुढे ठेवले. तो म्हणाला, महाशय, आपण खात नाही? मग तो मनातल्या मनात त्यांना भ्याला. त्यांनी सांगितले, भिऊ नका, आणि त्याला एका ज्ञानी मुलाच्या जन्माची शुभवार्ता एकविली.[८] हे ऐकून त्याची पत्नी ओरडत पुढे सरसावली आणि तिने आपले तोंड बडवून घेतले आणि म्हणू लागली, वृद्धा वांझोटी.[९] ते म्हणाले, "हे असेच फर्माविले आहे तुझ्या पालनकर्त्याने तो बुद्धिमान आहे आणि सर्वकाही जाणतो." इब्राहीम (अ.) ने सांगितले, "हे ईश्वरी दूतांनो! कोणती मोहीम आपल्यासमोर आहे?" त्यांनी सांगितले, "आम्हाला एका गुन्हेगार लोकसमूहाकडे पाठविण्यात आले आहे,[१०] जेणेकरून त्यावर खंगरांच्या दगडांचा वर्षाव करावा. तुझ्या पालनकर्त्याकडे त्या लोकांसाठी संकेतचिन्हे करण्यात आली आहेत जे मर्यादांचे

---

७) मागील व पुढील संदर्भानुसार या वाक्याचे दोन अर्थ असू शकतात. एक असा की हजरत इब्राहीम (अ.) यांनी खुद्द त्या पाहुण्यांना फर्माविले की यापूर्वी आपली भेट घडलेली नाही, आपले कदाचित या प्रदेशात नव्यानेच आगमन झाले आहे. दुसरा अर्थ असा की त्यांच्या सलामचे उत्तर दिल्यानंतर हजरत इब्राहीम (अ.) यांनी मनातल्या मनात सांगितले अथवा पाहुणचाराच्या व्यवस्थेसाठी घरात जाताना आपल्या सेवकांना सांगितले की हे काहीसे अपरिचित लोक आहेत, पूर्वी कधी या प्रदेशात असे वैभव आणि वेशभूषेचे लोक पाहण्यात आले नाहीत.

८) सूरह हूद यातही, हजरत इसहाक (अ.) यांच्या जन्माची खुशखबर होती, असे स्पष्टीकरण आहे.

९) म्हणजे एक तर मी वृद्धा. याउपर वांझ. तरी आता मला मूल होणार? बायबलमध्ये सांगितले आहे की त्यावेळी हजरत इब्राहीम (अ.) यांचे वय शंभर वर्षे आणि हजरत सारा (अ.) यांचे वय ९० वर्षांचे होते. (बायबल, उत्पत्ती १८ : १७)

१०) अभिप्रेत आहे लूतचे राष्ट्र. त्या राष्ट्राचे अपराध इतक्या प्रमाणात वाढले होते की केवळ 'अपराधी राष्ट्र' हाच शब्द हे दर्शविण्यासाठी पुरेसे होते की त्याने अभिप्रेत कोणते राष्ट्र आहे.



उल्लंघन करीत आहेत.[११] मग आम्ही[१२] त्या सर्व लोकांना काढून घेतले जे त्या वस्तीत श्रद्धावंत होते, आणि आम्हाला तेथे एका घराशिवाय ईमानधारकांचे कोणतेच घर आढळले नाही. यानंतर आम्ही तेथे केवळ एक निशाणी त्या लोकांसाठी सोडली जे यातनादायक प्रकोपाची भीती बाळगत होते.[१३] (२४-३७)

आणि (तुमच्यासाठी निशाणी आहे) मूसा (अ.) च्या कथेत. जेव्हा आम्ही त्याला स्पष्ट प्रमाणासहित फिरऔनपाशी पाठविले,[१४] तेव्हा तो आपल्या बळावर गर्विष्ठ बनला आणि म्हणाला, हा जादूगार आहे किंवा वेडा आहे. सरतेशेवटी आम्ही त्याला आणि त्याच्या लष्करांना पकडले आणि सर्वांना समुद्रात फेकून दिले आणि तो निंदनीय बनून राहिला. (३८-४०)

आणि (तुमच्यासाठी निशाणी आहे) आद मध्ये, जेव्हा आम्ही त्यांच्यावर एक असा कल्याणरहित वारा पाठविला की ज्या ज्या वस्तूवरून तो वाहिला त्याला जर्जर करून टाकले. (४१-४२)

आणि (तुमच्यासाठी निशाणी आहे) समूदमध्ये, जेव्हा त्यांना सांगितले गेले होते की एका विशिष्ट वेळेपर्यंत मजा करून घ्या. परंतु या ताकीदीतसुद्धा त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेची अवज्ञा केली. सरतेशेवटी त्यांना पाहता पाहताच एका अकस्मात कोसळणाऱ्या प्रकोपाने त्यांना गाठले. मग त्यांच्यात उठण्याचेही त्राण नव्हते की ते आपला बचावदेखील करू शकत नव्हते. (४३-४५)

आणि या सर्वांअगोदर आम्ही नूह (अ.) च्या राष्ट्राला नष्ट केले कारण ते अवज्ञाकारी लोक होते. (४६)

आकाशाला आम्ही स्वबळाने बनविले आहे आणि आम्ही याचे सामर्थ्य

---

११) म्हणजे एकेका पत्थरावर तुमच्या रबने चिन्हांकित केले आहे की त्याला कोणत्या अपराध्यास नष्ट करावयाचे आहे.

१२) मधूनच ही कथा सोडून दिलेली आहे की हजरत इब्राहीम (अ.) यांच्या जवळून हे दूत कशा प्रकारे हजरत लूत (अ.) यांच्याकडे पोहोचले व तेथे त्यांच्या व लूत राष्ट्रांदरम्यान काय काय घडले.

१३) या निशाणीने अभिप्रेत मृत समुद्र आहे. या समुद्राचा दक्षिणी प्रदेश अद्यापही महाभयंकर विनाशाचे भग्नावशेष प्रस्तुत करीत आहे.

१४) म्हणजे असे स्पष्ट चमत्कार व अशा उघड उघड खुणांसहित पाठविले जेणेकरून पृथ्वी व आकाशांच्या निर्माणकर्त्याकडून ते नियुक्त होऊन आलेले आहेत; या गोष्टीत शंका राहू नये.

बाळगतो.[१५] पृथ्वीला आम्ही अंथरले आहे आणि आम्ही फार चांगले समतोल करणारे आहोत आणि प्रत्येक वस्तूचे आम्ही युगल बनविले आहेत.[१६] कदाचित तुम्ही यावरून बोध घ्यावा.[१७] म्हणून धाव घ्या अल्लाहकडे, मी तुमच्यासाठी त्याच्याकडून उघडउघड खबरदार करणारा आहे. आणि बनवू नका अल्लाहच्या समवेत कोणी अन्य उपास्य, मी तुमच्यासाठी त्याच्याकडून उघडउघड खबरदार करणारा आहे.[१८] (४७-५१)

असेच घडत आले आहे, यांच्यापूर्वीच्या राष्ट्रांकडेदेखील कोणी असा प्रेषित आलेला नाही ज्याला त्यांनी असे म्हटले नाही की हा जादूगार आहे अथवा वेडा. या सर्वांनी आपापसात यासंबंधी काही समझोता केला आहे काय? नव्हे तर हे सर्व

**१५)** मूळ अरबी भाषेत 'व इन्ना लामूसिअुन' असे शब्द आहेत. 'मुमिअ'चा अर्थ शक्ती व सामर्थ्य राखणारा असाही होऊ शकतो आणि विस्तृत करणारा असादेखील. पहिल्या अर्थानुसार या कथनाचा अर्थ असा की आकाशांना आम्ही कुणाच्या मदतीने नव्हे तर स्वबळाने बनविले आहे व त्यांची उत्पत्ती आमच्या आवाक्यापलीकडची नव्हती, मग आम्ही तुम्हाला दुसऱ्यांदा पुन्हा निर्माण करू शकणार नाही, ही कल्पना तुमच्या डोक्यात कशी आली बरे? दुसरा अर्थ असा की या महान सृष्टीला आम्ही केवळ एकदाचे बनवून बस केले आहे असे नाही तर आम्ही सतत तिचा विस्तार करीत आहोत व प्रत्येकक्षणी तिच्यात आमच्या निर्मितीचे नवनवीन चमत्कार घडत आहेत. अशा जबरदस्त सर्जनकर्त्याला तुम्ही निर्मितीची पुनरावृत्ती करण्यात असमर्थ असल्याचे का समजला आहात बरे?

**१६)** म्हणजे जगातील सर्व वस्तू संयोजनाच्या नियमावर बनविलेल्या आहेत. ही सर्व सृष्टिव्यवस्था या नियमावर चालत आहे की काही वस्तूंचा दुसऱ्या वस्तूंशी संयोग होतो व मग त्यांच्या संयोगामुळेच नाना तऱ्हेच्या रचना अस्तित्वात येत असतात. येथे दुसऱ्या एखाद्या वस्तूशी जिचा संयोग होत नसावा अशी एकटी वस्तू कोणतीच नाही तर प्रत्येक वस्तू आपल्या जोडीदाराच्या संयोगामुळेच फलद्रूप ठरते.

**१७)** म्हणजे हा बोध की इहलोकाचा जोडीदार परलोक आहे ज्याविना दुनियेतील हे जीवन निरर्थक ठरते.

**१८)** ही वाक्ये अल्लाहचेच शब्द असले तरी यांच्यात वक्ता अल्लाह नाही तर पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आहेत, जणू खरी गोष्ट अशी की, धाव घ्या अल्लाहकडे, मी तुम्हाला त्याच्याकडून सावध करतो असे पैगंबर (स.) यांच्या मुखाने, अल्लाह वदवून घेत आहे.



शिरजोर लोक आहेत.[१९] म्हणून हे पैगंबर (स.), यांच्याकडून तोंड फिरवा. तुम्हावर काही दोषारोपण नाही. तथापि उपदेश करीत रहा कारण उपदेश श्रद्धावंतांसाठी लाभदायी आहे. (५२-५५)

मी जिन्न आणि माणसांना याशिवाय कोणत्याही अन्य कामासाठी निर्माण केले नाही की त्यांनी माझी भक्ती करावी[२०] मी काही त्यांच्याकडून उपजीविका इच्छित नाही आणि असेही इच्छित नाही की त्यांनी मला जेवू घालावे. अल्लाह तर स्वतःच उपजीविका देणारा आहे, मोठा शक्तिमान आणि जबरदस्त. तर ज्या लोकांनी जुलूम केला आहे[२१] त्यांच्या हिश्श्याचा सुद्धा तसाच प्रकोप तयार आहे जसा यांच्याचसारख्या लोकांना त्यांच्या वाट्याचा मिळाला आहे, यासाठी या लोकांनी घाई करू नये. सरतेशेवटी, विनाश आहे द्रोह करणाऱ्यांसाठी त्या दिवशी ज्याचे भय यांना दाखविले जात आहे. (५६-६०)

**१९)** म्हणजे सहस्रावधी वर्षापर्यंत प्रत्येक युगात निरनिराळ्या देशाच्या व राष्ट्रांच्या लोकांचे पैगंबरी आवाहनाविरूद्ध एकाच प्रकारचे वर्तन अवलंबिणे काही यामुळे तर असू शकत नव्हते की एक परिषद भरवून या सर्व अगोदर व नंतरच्या पिढ्यांनी आपापसात ठरविले असावे की जेव्हा जेव्हा कुणी प्रेषित येऊन असे आवाहन प्रस्तुत करील तेव्हा त्याला असे उत्तर दिले जावे. वास्तविकपणे त्यांच्या वर्तनातील या साम्याचे कारण याशिवाय इतर कोणतेच नाही की मर्यादा सोडणे व शिरजोरी, या सर्वांचा सामायिक गुण आहे.

**२०)** म्हणजे मी यांना इतरांच्या भक्तीसाठी नव्हे तर स्वतःच्या भक्तीसाठी निर्माण केले आहे. माझी भक्ती तर त्यांनी अशासाठी केली पाहिजे की मी त्यांचा निर्माण करणारा आहे. इतर दुसऱ्यांनी ज्या अर्थी यांना निर्माण केलेले नाही तर त्यांना कोणता अधिकार पोहचतो की यानी त्यांची भक्ती करावी आणि यांचा निर्माणकर्ता तर आहे मी व यांनी भक्ती करीत फिरावे दुसऱ्यांची, ही गोष्ट यांच्यासाठी वैध कशी ठरू शकते.

**२१)** जुलूमने अभिप्रेत या ठिकाणी वास्तवता आणि सचोटीवर जुलूम करणे आणि स्वतः आपल्या प्रकृतीवर जुलूम करणे होय.

# ५२ सूरह अत्तूर

*(मक्काकालीन, वचने ४९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे ‘तूर’ची आणि अशा एका उघड ग्रंथाची जो तलम कातडीवर लिहिला गेला आहे, आणि सदैव वावर असलेल्या गृहाची (काबागृहाची), आणि उंच छताची आणि उसळत्या समुद्राची, की तुझ्या पालनकर्त्याचा प्रकोप निश्चितपणे घडणार आहे, ज्याचे कोणी निवारण करू शकणार नाही.[1] तो त्या दिवशी घडेल जेव्हा आकाश भयंकरपणे डगमगू लागेल आणि पर्वत उडत फिरतील. विनाश आहे त्या दिवशी त्या खोटे ठरविणाऱ्यांसाठी जे आज खेळ म्हणून आपल्या वितंडवादात गुंतलेले आहेत. ज्या दिवशी त्यांना धक्के मारून मारून नरकाग्नीकडे चालते केले जाईल त्यावेळी त्यांना सांगण्यात येईल की, “हा तोच अग्नी आहे ज्याला तुम्ही खोटे ठरवीत होता. आता सांगा, ही जादू आहे अथवा तुम्हाला उमजत नाही? जा आता होरपळले जा याच्यात, मग तुम्ही सहन करा अथवा न करा, तुमच्यासाठी एकसारखे आहे, तुम्हाला तसाच बदला दिला जात आहे जसे तुम्ही आचरण करीत होता.” (१-१६)

ईशपरायण लोक तेथे उद्यानांत व ऐश्वर्यात असतील. आनंद लुटत असतील

---

१) पालनकर्त्याच्या प्रकोपाने अभिप्रेत आखिरत-परलोक आहे कारण इन्कार करणाऱ्यांसाठी ते येणे म्हणजे प्रकोपच होय. ते येण्यावर पाच गोष्टींची शपथ घेतली गेली आहे, म्हणजे या गोष्टी ते घडण्याचे प्रमाण देत आहेत. (१) तूर, जेथे एका अत्याचारपीडित राष्ट्राला वर उचलण्याचा आणि एका अत्याचारी राष्ट्राला खाली पाडण्याचा निर्णय झाला. हा निर्णय ईश्वराची ही सृष्टी अंधेरनगरी नव्हे या गोष्टीचे चिन्ह म्हणून आहे. (२) प्राचीन काळी पवित्र ग्रंथांचा संग्रह तलम कातडींवर लिहिला जात असे. ते या गोष्टीचे प्रमाण आहे की प्रत्येक काळात ईश्वराकडून येणाऱ्या प्रेषितांनी परलोकीय जीवनाचे विवरण आहे. (३) ‘आबाद’ घर म्हणजे काबागृह, हे एका निर्जन, ओसाड प्रदेशात बनविले गेले, मग अल्लाहने त्यास अशी भरभराटी प्रदान केली की दुनियेत तशी कोणत्याच इमारतीला लाभली नाही. ही गोष्ट. ईश्वराचे प्रेषित व्यर्थ गोष्टी करीत नसतात याची खूण आहे. हजरत इब्राहीम (अ.) यांनी जेव्हा त्या घराला ओसाड पर्वतांच्या दरम्यान बांधून हजसाठी हाक दिली होती त्यावेळी हजारों वर्षांपर्यंत त्याकडे जग ओढले जात राहील अशी कोणी कल्पनादेखील करू शकत नव्हता. (४) उंच छत म्हणजे आकाश आणि (५) उसळते समुद्र ही अल्लाहच्या सामर्थ्याची उघड चिन्हे असून यांचा निर्माणकर्ता परलोकी जीवन घडविण्याला असमर्थ असू शकत नाही, अशी ते साक्ष देत आहेत.



त्या वस्तूपासून ज्या त्यांचा पालनकर्ता त्यांना देईल. आणि त्यांचा पालनकर्ता त्यांना नरकाच्या प्रकोपापासून वाचवील. (त्यांना सांगितले जाईल) खा आणि प्या मजेत आपल्या त्या कृत्यांच्या मोबदल्यात जी तुम्ही करीत राहिला आहात. ते समोरासमोर मांडलेल्या आसनांवर तक्के लावून बसले असतील आणि आम्ही सुंदर डोळ्यांच्या अप्सरांशी त्यांचा विवाह करू. ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे, आणि त्यांच्या संततीनेदेखील एखाद्या श्रद्धा-श्रेणीत त्यांचे अनुकरण केले आहे, त्यांच्या त्या संततीलासुद्धा आम्ही (स्वर्गामध्ये) त्यांच्यात मिळवू आणि त्यांच्या कृत्यांत कोणतीही घट त्यांना होऊ देणार नाही. प्रत्येकजण आपल्या कमाईच्या मोबदल्यात गहाण आहे.[2] आम्ही त्यांना हरतऱ्हेचे फळ आणि मांस, ज्या पदार्थाचीही त्यांना इच्छा होईल खूप देत राहू. ते एक दुसऱ्याकडून पेयपात्रे पुढे पुढे होऊन घेत असतील ज्यांत बकवास असणार नाही की दुराचार.[3] आणि त्यांच्या सेवेत अशी मुले धावत फिरत असतील जी त्यांच्याच (सेवे) साठी खास असतील, असे सुंदर जणू लपवून ठेवलेले मोती. हे लोक आपापसांत एकमेकांशी (जगात ओढवलेल्या) प्रसंगांची हालहवाल विचारतील, हे म्हणतील की आम्ही पूर्वी आपल्या घरवाल्यांमध्ये भीत भीत जीवन व्यतीत करीत होतो,[4] सरतेशेवटी अल्लाहने आमच्यावर मेहरबानी केली आणि आम्हाला होरपळून टाकणाऱ्या वाऱ्याच्या प्रकोपापासून वाचविले. आम्ही पूर्वीच्या जीवनात त्याचाच धावा करीत होतो. तो खरोखरच मोठा उपकारी व दयावान आहे. (१७-२८)

---

२) म्हणजे ज्याप्रमाणे कोणीही इसम कर्जाची परतफेड केल्याशिवाय गहाण वस्तू सोडवू शकत नाही त्याचप्रमाणे कोणीही इसम कर्तव्ये पार पाडल्याशिवाय स्वथ:ला अल्लाहच्या पकडीपासून वाचवू शकत नाही. संतती जर स्वत: सदाचारी नाही तर वाडवडीलांची पुण्याई ताबेगहाणातून मुक्त करवू शकत नाही.

३) म्हणजे ते मद्य नशा आणणारे नसेल की ते प्राशन करून ते मदमस्त व्हावेत आणि असभ्य बकवास करू लागावेत अथवा शिवीगाळ आणि हाणामारीला यावेत अथवा जगात मद्यपान करणारे जशी अश्लील कृत्ये करतात तशी कृत्ये करू लागावेत.

४) म्हणजे आम्ही तेथे विलासात बुडून व आपल्या संसारात मग्न राहून गाफीलपणाचे जीवन जगत नव्हतो तर सदैव आम्हाला याची धास्ती वाटत होती की एखादे वेळी ईश्वराच्या येथे आमची पकड व्हावी असे एखादे काम आमच्याकडून घडू नये. या ठिकाणी विशेष करून आपल्या कुटुंबियांदरम्यान भीत भीत जीवन व्यतीत करण्याचा उल्लेख अशासाठी केला गेला आहे की मनुष्य सर्वात जास्त ज्या कारणाने गुन्ह्यात अडकतो ते म्हणजे आपल्या मुलाबाळांना ऐशआरामात ठेवणेची व त्यांचे दुनियेतील भविष्य सुधारण्याची काळजी होय.

म्हणून हे पैगंबर (स.), तुम्ही उपदेश करीत रहा, आपल्या पालनकर्त्याच्या मेहरबानीने तुम्ही मांत्रिकही नाही आणि वेडेदेखील नाही.[५] (२९)

काय हे लोक म्हणतात की हा मनुष्य कवी आहे ज्याच्यासाठी आम्ही आपत्तीची वाट पहात आहोत? यांना सांगा बरे, प्रतीक्षा करा, मीसुद्धा तुमच्याबरोबर प्रतीक्षा करतो. काय त्यांची बुद्धी यांना अशाच गोष्टी करण्यास सांगते? अथवा वस्तुत: हे शत्रुत्वांत मर्यादेपलीकडे गेलेले लोक आहेत?[६] (३०-३२)

काय हे म्हणतात की या माणसाने हा कुरआन स्वत:च रचला आहे? खरी गोष्ट अशी आहे की हे लोक श्रद्धा ठेवू इच्छित नाहीत. जर हे आपल्या या कथनात खरे असतील तर यांनी अशाच वैभवाची वाणी रचून आणावी. (३३-३४)

काय हे एखाद्या निर्मात्याविना स्वत:च जन्मले आहेत? अथवा हे खुद्द स्वत:चे निर्माते आहेत? अथवा पृथ्वी आणि आकाशांना यांनी निर्मिले आहे? खरी गोष्ट अशी आहे की हे विश्वास बाळगत नाहीत.[७] (३५-३६)

काय तुझ्या पालनकर्त्याचे खजिने यांच्या ताब्यात आहेत? अथवा त्यांच्यावर

---

५) परलोकाचे चित्र प्रस्तुत केल्यानंतर भाषणाचा रोख आता मक्केतील अश्रद्धावंतांच्या त्या अट्टहासाकडे वळत आहे ज्याने हे अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्या आवाहनाचा मुकाबला करीत होते. सदरहू आयतीत वर वर पाहता संबोधन पैगंबर(स.) यांच्याकडे आहे परंतु वास्तविकपणे त्यांच्याद्वारे ही गोष्ट मक्केतील अश्रद्धावंतांना ऐकविण्याचा हेतू आहे.

६) या संक्षिप्त वाक्यांद्वारे विरोधकांच्या सर्व अपप्रचाराची हवा काढून टाकली गेली आहे. युक्तिवाद संक्षिप्तपणे असा की हे कुरैशांचे सरदार आणि श्रेष्ठी स्वत:ला मोठे अक्कलवान म्हणून मिरवितात परंतु जो मनुष्य कवी नाही त्याला कवी म्हणा, ज्याला सर्व लोक बुद्धिमान माणूस म्हणून मानतात त्याला वेडा म्हणा, व ज्या माणसाचा मांत्रिकीशी दूरचादेखील संबंध नाही त्याला उगीचच मांत्रिक ठरवा, यांच्या अकला यांना असाच हुकूम देतात का? मग अकलेच्या आधारेच जर हे लोक निर्णय घेत असतील तर कोणता तरी एकच निर्णय घेतला असता, बरेचसे परस्परविरूद्ध निर्णय एकाच वेळी सांगणे शक्य नव्हते. एकाच वेळी माणूस कवी, वेडा आणि मांत्रिक बरे कसा असू शकतो?

७) म्हणजे तोंडी कबुली देतात की त्यांचा व साऱ्या विश्वाचा निर्माणकर्ता अल्लाह आहे परंतु जेव्हा सांगितले जाते की मग भक्तीसुद्धा त्याच ईश्वराची करा तेव्हा लढण्यास उभे ठाकतात. यांचा ईश्वरावर विश्वास नाही याचा हा पुरावा आहे.



यांचा हुकूम चालतो?[८] (३७)

काय यांच्याजवळ एखादी शिडी आहे जिच्यावर चढून हे लोक वरील जगताचा कानोसा घेतात? यांच्यापैकी ज्याने कानोसा घेतला असेल त्याने आणावे एखादे स्पष्ट प्रमाण. काय अल्लाहसाठी तर आहेत मुली आणि तुम्हा लोकांसाठी आहेत मुले?[९] (३८-३९)

काय तुम्ही यांच्यापाशी काही मोबदला मागता? की हे जबरदस्तीने लादलेल्या भुर्दडाच्या ओझ्याखाली दबले जात आहेत? काय यांच्यापाशी परोक्षाच्या हकीकतीचे ज्ञान आहे की त्याच्या आधारे हे लिहीत आहेत?[१०] (४०-४१)

काय हे एखादे कारस्थान करू इच्छितात? (जर अशी गोष्ट आहे) तर द्रोह करणाऱ्यांवर त्यांचे कारस्थान उलटल्याशिवाय राहणार नाही. (४२)

काय अल्लाहशिवाय यांचा एखादा अन्य उपास्य आहे? अल्लाह पवित्र आहे त्या अनेकेश्वरवादापासून जो हे लोक करीत आहेत. (४३)

---

८) मक्केतील काफिरांचा हा आक्षेप की अब्दुल्लाह पुत्र मुहम्मद (स.) यांनाच प्रेषित का बनविले गेले याचे हे उत्तर आहे. या उत्तराचा अर्थ असा की या लोकांना पथभ्रष्टतेतून बाहेर काढण्यासाठी कोणत्याही परिस्थितीत कुणाला तरी प्रेषित म्हणून नियुक्त करावयाचे होतेच. आता प्रश्न असा की, ईश्वराने आपला प्रेषित कुणास करावे व कुणास करू नये हा निर्णय घेणे काम कुणाचे आहे? जर हे लोक ईश्वराने बनविलेल्या प्रेषिताला मानण्यास नकार देत आहेत तर याचा अर्थ असा की एक तर ईश्वराच्या ईशत्वाचे मालक हे स्वत:ला समजून बसले आहेत अथवा आपल्या ईशत्वाचा स्वामी तर ईश्वरच राहावा परंतु त्यात हुकूम यांचा चालावा असा या लोकांचा अहंभाव आहे.

९) म्हणजे जर तुमचा प्रेषिताची गोष्ट ऐकण्यास नकार आहे तर तुमच्या स्वत:जवळ वस्तुस्थिती जाणून घेण्याचे साधन काय आहे बरे? काय तुमच्यापैकी कुणी इसम वरील जगतात पोहचला आहे व सर्वोच्च अल्लाह, अथवा त्याच्या दूतांकडून प्रत्यक्षपणे त्याने हे माहीत करून घेतले आहे की ज्या श्रद्धेवर तुम्ही आपल्या धर्माचा पाया उभारलेला आहे त्या अगदी वस्तुस्थितीला धरून आहेत? असा दावा जर तुम्ही सांगत नाही तर मग स्वत:च विचार करा की सकल जगांच्या पालनकर्त्या अल्लाहसाठी तुम्ही संतती योजिता आणि संततीसुद्धा मुलींची, ज्यांना तुम्ही स्वत:साठी खुद्द लज्जास्पद मानता, याहून अधिक हास्यास्पद श्रद्धा इतर कोणती असू शकते.

१०) म्हणजे काय हे लोक असे लिहून देऊ शकतात की परोक्षांच्या हकिकतीसंबंधी प्रेषिताच्या निवेदनांना हे यासाठी खोटे ठरवीत आहेत की प्रेषित जी निवेदने करीत आहेत, वस्तुस्थिती तशी नाही व ही गोष्ट त्यांनी परोक्षाच्या पडद्यामागे डोकावून पाहून घेतली आहे?

या लोकांनी आकाशाचे तुकडे कोसळताना जरी पाहिले तरी म्हणतील की हे ढग आहेत जे उसळून येत आहेत. म्हणून हे पैगंबर (स.), यांना यांच्या दशेत सोडा येथपावेतो की हे आपला तो दिवस गाठतील ज्यात हे हाणून पाडले जातील. ज्या दिवशी यांचा कोणताही डाव यांच्या कोणत्याही उपयोगी पडणार नाही की कुणी यांच्या मदतीलासुद्धा येणार नाही. आणि ती वेळ येण्यापूर्वीसुद्धा अत्याचाऱ्यांसाठी एक प्रकोप आहे, परंतु यांच्यापैकी बहुतेकजण जाणत नाहीत. (४४-४७)

हे पैगंबर (स.), आपल्या पालनकर्त्याचा निर्णय येईपर्यंत धीर धरा, तुम्ही आमच्या नजरेत आहात. तुम्ही जेव्हा उठाल तेव्हा आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबर त्याचे पावित्र्यगान करा,[११] रात्रीसुद्धा त्याचे पावित्र्यगान करीत जा आणि तारे ज्यावेळी परततात त्यावेळीसुद्धा.[१२] (४८-४९)

---

**११)** म्हणजे जेव्हा तुम्ही नमाजसाठी उभे राहाल तेव्हा अल्लाहची स्तुती व पावित्रगानाने प्रारंभ करा. याच आज्ञेच्या अंमलबजावणीसाठी अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी 'अल्लाहु अकबर' अल्लाहच महान आहे. या 'तकबीरे तहरीमा'नंतर खालील शब्द उच्चारावेत 'सुबहानकल्लाहुम्म व बिहम्दीक व तबारकसमुक वतआला जद्दूक वलाइलाह गैरूक'- हे अल्लाह तू पवित्र आहेस व मी तुझी स्तुती व प्रशंसा करतो. तुझे नाम बरकतवान आहे. तुझा महिमा व प्रतिष्ठा उच्च आहे व तुझ्याशिवाय कोणीच ईश्वर नाही. नंतर नमाजला प्रारंभ करावा, असा आदेश दिला आहे.

**१२)** याच्याने अभिप्रेत फजर-पहाटेच्या नमाजची वेळ आहे.



# ५३ सूरह अन्नज्म

*(मक्काकालीन, वचने ६२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे नक्षत्राची जेव्हा तो अस्तंगत झाला,[१] तुमचा मित्र भटकलेला नाही की बहकलेलाही नाही.[२] तो आपल्या इच्छेने बोलत नाही, हा तर एक दिव्यबोध आहे जो त्याच्यावर अवतरला जातो. त्याला जबरदस्त बलशालीने शिकविले आहे. जो मोठा विवेकशील[३] आहे. तो समोर येऊन उभा राहिला जेव्हा तो वरील क्षितिजावर होता,[४] मग जवळ आला आणि वर अधांतरी झाला, येथपावेतो की दोन धनुष्याइतके किंवा त्याहून काही कमी अंतर उरले.[५] तेव्हा त्याने अल्लाहच्या दासाला दिव्यबोध पोचविले जे काही दिव्यबोध त्याला पोहोचवायचे होते. दृष्टिने जे काही पाहिले, मनाने त्यात असत्य

---

**१)** म्हणजे जेव्हा शेवटचे नक्षत्र अस्त पावून प्रकाशित सकाळ उदयास आली.

**२)** मित्राने अभिप्रेत अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आहेत कारण मक्केतील अश्रद्धावंतांसाठी ते कोणी अनोळखी माणूस होते असे नाही तर त्यांच्याच दरम्यान ते जन्मास आले, बालवयापासून तरुणपण आणि तारुण्यापासून मध्यम वयास पोहचले. अर्थ असा की अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) तुमच्या ओळखीचे मनुष्य असून ते बहकलेले किंवा पथभ्रष्ट माणूस नाहीत, ही गोष्ट उजाडलेल्या सकाळप्रमाणे स्पष्ट आहे.

**३)** याने अभिप्रेत सर्वोच्च अल्लाह आहे असे नाही तर दूत जिब्रईल (अ.) आहेत जसे की नंतरच्या लिखाणाने स्वत:च तसे स्पष्ट होत आहे.

**४)** क्षितिजाने अभिप्रेत आहे आकाशातील ती पूर्वेची किनार जेथून सूर्य उदयास येतो आणि दिवसाचा उजेड पसरतो. अर्थ असा की प्रथमत: जिब्रईल (अ.) जेव्हा पैगंबर (स.) यांना दिसले तेव्हा ते आकाशातील पूर्वेच्या किनाऱ्यातून प्रकट झाले होते.

**५)** म्हणजे आकाशात पूर्व दिशेच्या वरच्या किनारपट्टीतून प्रकट झाल्यानंतर हजरत जिब्रईल (अ.) यांनी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याकडे पुढे येणे सुरू केले इथपावेतो की पुढे येता येता ते पैगंबर (स.) यांच्या डोक्यावर येऊन अंतरिक्षात अधांतरित स्थित झाले, मग ते त्यांच्याकडे खाली वळले आणि इतके जवळ आले की पैगंबर (स.) व त्यांच्या दरम्यान केवळ दोन धनुष्याएवढे अथवा काही कमी अंतर उरले. सर्व धनुष्ये समान असतात असे नाही म्हणून उभयतामधील अंतराची कल्पना येण्यासाठी दोन धनुष्याएवढे अथवा काही कमी अंतर उरले असे फर्माविले गेले आहे.

मिसळले नाही.[६] आता काय तुम्ही त्या गोष्टीवर त्याच्याशी भांडता ज्याला तो डोळ्यांनी पाहतो? (१-१२)

आणि एकदा पुन्हा त्याने 'सिदरतुल मुन्तहा'[७] (चरम सीमेवरील बोरीचे झाड) जवळ त्याला उतरताना पाहिले जेथे जवळच निवासाचा स्वर्ग (जन्नतुल मावा) आहे. त्यावेळी बोरीला आच्छादित होते जे काही आच्छादित होते. दृष्टी न विचलित झाली न मर्यादेपलीकडे गेली, आणि त्याने आपल्या पालनकर्त्याचे मोठमोठे संकेत पाहिले.[८] (१३-१८)

आता जरा सांगा की तुम्ही कधी या 'लात' आणि या 'उज्जा' आणि तिसरी एक देवी

---

६) म्हणजे दिवसाच्या उजेडात, पूर्णपणे जागृतावस्थेत उघड्या डोळ्यांनी हजरत मुहम्मद (स.) यांना हे जे निरीक्षण घडले त्यावर त्यांच्या मनाने, असे म्हटले नाही की हा माझा दृष्टिभ्रम आहे किंवा हा एखादा जिन्न अथवा शैतान आहे जो मला दिसत आहे अथवा माझ्यासमोर एखादी काल्पनिक आकृती उभी राहिली आहे व मी जागृतावस्थेतच एखादे स्वप्न पाहात आहे तर त्यांच्या मनाने तंतोतंत तेच सर्वकाही समजले जे त्यांचे डोळे पाहात होते. प्रत्यक्षपणे हे जिब्रईल (अ.) आहेत आणि जो संदेश हे पोहचवीत आहेत तो खरोखरच ईश्वराकडून वही-दिव्यबोध आहे याबातीत त्यांना कसलीही शंका वाटली नाही.

७) अरबी भाषेत 'सिदरा' बोरीच्या वृक्षाला म्हणतात आणि 'मुन्तहा' या शब्दाचा 'अंतिम टोक' असा अर्थ होतो. 'सिदरतुल मुन्तहा'चा शाब्दिक अर्थ 'बोरीचे ते वृक्ष जे अंतिम अथवा परम टोकावर स्थित आहे' असा होतो. या भौतिक विश्वाच्या अंतिम सीमेवर ते बोरीचे झाड कसे आहे व त्याचे खरे वैशिष्ट व हकिगत काय आहे हे जाणून घेणे आमच्यासाठी कठीण आहे. ईश्वरी सृष्टीचे हे असे रहस्य आहे जे आमच्या आकलनापलीकडचे आहे. मात्र इतके खरे की ती एखादी अशी वस्तू आहे जिच्यासाठी मानवी भाषेतील शब्दात 'सिदरा' यापेक्षा अधिक योग्य शब्द ईश्वराजवळ इतर कोणता नव्हता.

८) सदरहू आयत या गोष्टीचा उलघडा करते की अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी सर्वोच्च अल्लाहला नव्हे तर त्याच्या वैभवशाली निशाण्या पाहिल्या होत्या. मागील व पुढील संदर्भानुसार, ही दुसरी भेटदेखील, ज्या अस्तित्वाशी पहिली भेट घडली होती त्याच्याशीच घडली होती. म्हणून अपरिहार्यपणे उच्च क्षितिजावर पैगंबर (स.) यांनी ज्याला पाहिले होते तोदेखील ईश्वर नव्हता आणि दुसऱ्यांदा ज्याला परमसीमेवरील बोरीच्या वृक्षाजवळ पाहिले तोही ईश्वर नव्हता हे मान्य केल्याशिवाय गत्यंतर नाही. जर पैगंबर (स.) यांनी सदरहू प्रसंगापैकी कोणत्याही प्रसंगी परम वैभवशाली अल्लाहला पाहिले असते तर ही गोष्ट इतकी महान होती की तिचे स्पष्टीकरण जरूर केले गेले असते.



'मनात'च्या वस्तुस्थितीवर काही विचार तरी केला आहे?[९] काय मुले तुमच्यासाठी आहेत आणि मुली त्याच्यासाठी?[१०] ही तर मग मोठ्या गोंधळाची वाटणी झाली! वास्तविकत: या काहीच नाहीत परंतु काही नावे जी तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनी ठेवली आहेत, अल्लाहने यांच्या बाबतीत कोणतेही प्रमाण उतरविले नाही. वस्तुस्थिती अशी आहे की हे लोक केवळ भ्रामक कल्पनांचे अनुसरण करीत आहेत आणि मनोवासनाचे अंकित बनलेले आहेत. वस्तुत: त्यांच्या पालनकर्त्याकडून त्यांच्यापाशी मार्गदर्शन आलेले आहे. काय मनुष्य जे काही इच्छिल तेच त्याच्याकरिता सत्य आहे?[११] इहलोक आणि परलोकाचा स्वामी तर अल्लाहच आहे. (१९-२५)

आकाशात कितीतरी दूत हजर आहेत, त्यांची शिफारस काहीच उपयोगी पडू शकत नाही जोपर्यंत की अल्लाह एखाद्या अशा इसमाच्या संबंधी तशी परवानगी देत नाही ज्याच्यासाठी तो एखादी विनंती ऐकू इच्छित असेल आणि ती पसंत करील. परंतु जे लोक परलोकावर विश्वास ठेवत नाहीत, ते दूतांना देवीच्या नावाने संबोधितात. वस्तुत: या बाबतीत कोणतेही ज्ञान त्यांना प्राप्त नाही. ते केवळ कल्पनांचे अनुसरण करीत आहेत, आणि कल्पना सत्याच्या स्थानी काहीच उपयोगी पडू शकत नाही. (२६-२८)

म्हणून हे पैगंबर (स.), जो माणूस आमच्या स्मरणापासून तोंड फिरवितो आणि ऐहिक जीवनाशिवाय काहीच इच्छित नाही, त्याला त्याच्या स्थितीत सोडा. या[१२] लोकांच्या ज्ञानाची

---

९) अर्थ असा की हजरत मुहम्मद (स.) तुम्हाला जी शिकवण देत आहेत तिला तर तुम्ही लोक कुमार्ग व मार्गभ्रष्टता म्हणून ठरवीत आहात, वास्तविकपणे हे ज्ञान त्यांना सर्वोच्च अल्लाहकडून दिले जात आहे. शिवाय ज्या हकिकतीची ग्वाही ते तुमच्यासमोर देत आहेत त्या सर्वोच्च अल्लाहने त्यांना प्रत्यक्षपणे दाखविलेल्या आहेत. आता जरा तुम्ही स्वत:च विचार करा की ज्या श्रद्धांवर अनुसरणाचा तुम्ही हट्ट धरून बसला आहात त्या किती अयोग्य आहेत व त्यांच्याविरूद्ध जो मनुष्य तुम्हाला सरळमार्ग दाखवीत आहे त्याला विरोध करून तुम्ही कुणाचे नुकसान करीत आहात बरे.

१०) म्हणजे या देवतेंना तुम्ही सकल जगांचा रब अल्लाहच्या मुली म्हणून ठरवून घेतले आणि अशी असभ्य श्रद्धा रचतांना तुम्ही याचाही विचार केला नाही की मुलीचे जन्मणे तर तुम्ही लज्जास्पद मानता व तुम्हाला पुत्र संतती व्हावी अशी इच्छा करता परंतु अल्लाहसाठी तुम्ही जी संतती योजता तीदेखील मुलींची संतती?

११) या आयतीचा दुसरा अर्थ असाही केला जाऊ शकतो की 'काय माणसाला हा अधिकार आहे की हवे त्याला त्याने देव मानावे?' शिवाय तिसरा अर्थ असादेखील केला जाऊ शकतो की 'काय मनुष्य या देवांकडून आपल्या इच्छापूर्तीच्या ज्या आकांक्षा बाळगतो त्या कधी पूर्ण होऊ शकतात?'

१२) भाषणाचा ओघ मध्येच खंडित करून अगोदरच्या गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ फर्माविले गेलेले हे विषयांतरित वाक्य आहे.

मजल केवळ इतकीच आहे. ही गोष्ट तुझा पालनकर्ताच जास्त जाणतो की त्याच्या मार्गापासून कोण भटकला आहे आणि कोण सरळमार्गावर आहे, आणि पृथ्वी व आकाशांच्या प्रत्येक वस्तूचा स्वामी अल्लाहच आहे जेणेकरून[१३] अल्लाहने वाईट करणाऱ्यांना त्यांच्या कृत्यांचा बदला द्यावा आणि त्या लोकांना चांगल्या मोबदल्याने उपकृत करावे, ज्यांनी सद्वर्तन अंगिकारले आहे, जे मोठमोठाले अपराध आणि उघड उघड घृणास्पद कृत्यापासून अलिप्त राहतात, याव्यतिरिक्त की काही चुका त्यांच्याकडून घडतात. नि:संशय तुझ्या पालनकर्त्याचे क्षमा-छत्र फार विस्तृत आहे. तो तुम्हाला त्या वेळेपासून चांगल्या प्रकारे जाणतो जेव्हा त्याने जमिनीपासून तुम्हाला निर्माण केले आणि जेव्हा तुम्ही आपल्या आईच्या पोटात अद्याप गर्भावस्थेत होता, म्हणून आपल्या स्वत:च्या पावित्र्याचे दावे सांगू नका, तोच उत्तम जाणतो की खरोखर ईशपरायण कोण आहे. (२९-३२)

मग हे पैगंबर (स.), तुम्ही त्या इसमालाही पाहिले जो ईशमार्गापासून परावृत्त झाला आणि अल्पसे देऊन थांबला?[१४] काय त्याच्यापाशी परोक्षाचे ज्ञान आहे की तो वास्तवतेला पाहत आहे? काय त्याला त्या गोष्टीची काहीच खबर पोहचली नाही जी मूसा (अ.) च्या पुस्तिका आणि त्या इब्राहीम (अ.) च्या पुस्तिकात सांगितल्या आहेत ज्याने एकनिष्ठतेचे हक्क परिपूर्ण केले?[१५] "असे की कोणीही ओझे उचलणारा दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही[१६] आणि असे की मानवासाठी काहीच नाही परंतु ते ज्यासाठी त्याने प्रयत्न

**१३)** वरून भाषणाचा जो क्रम चालत आलेला होता येथून तो पुन्हा सुरू होतो. मधले विषयांतरित वाक्य वगळता जणूकाय मजकुराचा क्रम असा आहे, 'त्याला त्याच्या स्थितीवर सोडा जेणेकरून अल्लाहने बुराई करणाऱ्यांना त्यांच्या कर्माचे फळ द्यावे.'

**१४)** संकेत आहे वलीद बिन् मुगीराकडे. हा कुरैशांच्या मोठ्या सरदारांपैकी होता. हा गृहस्थ अगोदर अल्लाहचे पैगंबर (स.) यांचे आवाहन मान्य करण्यासाठी तयार झाला होता परंतु त्याच्या एका अनेकेश्वरवादी मित्राला हे ठाऊक झाले की तो मुसलमान होण्याच्या बेतात आहे तेव्हा त्याने सांगितले की तू वडिलोपार्जित धर्म सोडू नकोस, जर तुला परलोकातील यातनेची भीती आहे तर मला इतकी रक्कम दे, तुझ्याऐवजी मी तेथे यातना भोगीन अशी मी हमी देतो. वलीदने ही गोष्ट मान्य केली आणि ईश्वरी मार्गावर येता येता पराङ्मुख झाला. परंतु आपल्या अनेकेश्वरवादी दोस्ताला जी रक्कम देण्याचे त्याने कबूल केले होते त्यापैकीही थोडीच दिली व उरलेली दिली नाही.

**१५)** पुढे हजरत मूसा (अ.) आणि हजरत इब्राहीम (अ.) यांच्या दैवी पुस्तिकांत जी शिकवण अवतरलेली होती ती संक्षिप्तपणे सांगितली जात आहे.

**१६)** म्हणजे प्रत्येक इसम स्वत:च आपल्या कर्मासाठी जबाबदार आहे. एका मनुष्याची जबाबदारी दुसऱ्यावर टाकली जाऊ शकत नाही. कुणा माणसाने तसे इच्छिले तरी इतर कुणाच्या कृत्याची जबाबदारी तो स्वत:वर घेऊ शकत नाही. खरा अपराधीसुद्धा या आधारावर सोडला जाऊ शकत नाही की त्याच्या जागी शिक्षा भोगण्यासाठी कुणी इतर मनुष्य स्वत:ला पुढे करीत आहे.



केला आहे,[१७] आणि असे की त्याचा प्रयत्न लवकरच पाहिला जाईल मग त्याचा पूर्ण बदला त्याला दिला जाईल, आणि असे की सरतेशेवटी पोहचावयाचे तर तुझ्या पालनकर्त्यापाशीच आहे, मग असे की त्यानेच हसविले आणि त्यानेच रडविले.[१८] आणि असे की त्यानेच मृत्यू दिला आणि त्यानेच जीवन प्रदान केले, आणि असे की त्यानेच नर व मादीचे युगल निर्माण केले, एका थेंबाने जेव्हा ते टपकाविले जाते. आणि असे की दुसरे जीवन प्रदान करणेसुद्धा त्याच्यावरच आहे, आणि असे की त्यानेच धनवान बनविले आणि संपत्ती प्रदान केली, आणि असे की तोच 'शिअरा'चा पालनकर्ता आहे[१९] आणि असे की त्यानेच पहिल्या 'आद'ला नष्ट केले आणि समूदला असे नष्ट केले की त्यांच्यापैकी कोणास शिल्लक ठेवले नाही, आणि त्यांच्यापूर्वी नूह (अ.) च्या राष्ट्राला नष्ट केले कारण ते होतेच अत्यंत अत्याचारी आणि दुर्वर्तनी लोक, आणि पालथ्या पडणाऱ्या वस्त्यांना उचलून फेकले. मग आच्छादित केले त्यांच्यावर ते काही जे (तुम्हाला माहीतच आहे की) काय आच्छादिले.[२०] म्हणून हे मानवा, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांत तू शंका घेशील?'' (३३-५५)

ही एक ताकीद आहे पूर्वी आलेल्या ताकीदींपैकी. येणारी घटका जवळ येऊन ठेपली आहे, अल्लाहच्या शिवाय कोणीही तिला हटविणार नाही. आता काय याच त्या गोष्टी होत ज्यावर तुम्ही आश्चर्य व्यक्त करता? हसता आणि रडत नाही? आणि गाऊन-वाजवून त्यांना टाळता? नतमस्तक व्हा अल्लाहच्या समोर आणि त्याचीच भक्ती करा. (५६-६२)

**१७)** म्हणजे प्रत्येक इसमाला जे काही मिळेल स्वत:च्या कर्माचे फळ मिळेल. एका माणसाच्या कर्माचे फळ दुसऱ्याला मिळू शकत नाही. शिवाय कृती व प्रयत्न केल्याविना कुणाही माणसाला काहीच मिळू शकत नाही.

**१८)** म्हणजे सुख व दु:ख दोन्हींची साधने त्याच्याकडूनच आहेत. चांगल्या व वाईट भाग्याचे सर्वाधिकार त्याच्याच हातात आहेत. कुणी दुसरे अस्तित्व या सृष्टीत असे नाही ज्याला भाग्य घडविण्यात अथवा बिघडविण्यात कोणत्याही प्रकारचा अधिकार असावा.

**१९)** 'शिअरा' आकाशातील अत्यंत प्रकाशमान नक्षत्र आहे. मिस्र आणि अरबस्तानातील लोकांची अशी श्रद्धा होती की या नक्षत्राचा माणसाच्या भाग्यावर प्रभाव पडतो. या कारणाने त्यांच्या देवांत त्या नक्षत्राचा समावेश होता.

**२०)** पालथ्या पडलेल्या वस्तींनी अभिप्रेत लूत राष्ट्राच्या वस्ती आहेत. तसेच आच्छादिले त्यांच्यावर जे काही आच्छादिले ने बहुधा मृत समुद्राचे पाणी आहे. हे पाणी, या वस्ती जमिनीत खचल्यानंतर त्यांच्यावर पसरले होते व आजतागायत ते त्या प्रदेशावर आच्छादलेले आहे.

# ५४ सूरह अल्क़मर

*(मक्काकालीन, वचने ५५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

पुनरुत्थानाची घटका जवळ येऊन ठेपली आणि चंद्र दुभंगला.[1] परंतु या लोकांची स्थिती अशी आहे की मग कोणती का निशाणी पाहू नये, पराङमुख होतात आणि म्हणतात की ही तर नित्याचीच जादू आहे. यांनी (यालाही) खोटे ठरविले आणि आपल्या मनोवासनांचे अनुसरण केले. प्रत्येक बाबीला अखेरीस एक शेवट गाठावाच लागणार आहे. (१-३)

या लोकांसमोर (पूर्वीच्या राष्ट्रांचे) ते अहवाल आलेले आहेत ज्यात दुराचारापासून दूर ठेवण्यासाठी विपुल बोधसामुग्री आहे, आणि अशी बुद्धिमत्ता जी उपदेशाचा उद्देश पराकोटीने पूर्ण करते. पण धमकावण्या यांच्यावर परिणामकारक ठरत नाहीत. म्हणून हे पैगंबर (स.), यांच्याकडून विमुख व्हा, ज्या दिवशी साद घालणारा एक अत्यंत अप्रिय गोष्टीकडे हाक मारील, लोक भयभीत दृष्टीने आपल्या कबरीतून अशाप्रकारे निघतील जणूकाही विखुरलेले टोळ आहेत. पुकारणाऱ्याकडे धावत सुटले असतील आणि तेच इन्कार करणारे (जे जगात याचा इन्कार करीत होते) त्यावेळी म्हणतील की हा दिवस तर फार कठीण आहे. (४-८)

यांच्यापूर्वी नूह (अ.) च्या राष्ट्राने खोटे ठरविले आहे, त्यांनी आमच्या दासाला खोटे ठरविले आणि सांगितले की हा वेडा आहे, आणि तो भयंकर रीतीने झिडकारला गेला. सरतेशेवटी त्याने आपल्या पालनकर्त्याचा धावा केला की, ''मी जेरीस आलो आहे. आता तू यांच्यावर सूड उगव.'' तेव्हा आम्ही मुसळधार पावसाने आकाशाची दारे उघडली. आणि जमिनीला फाडून तिला स्रोतांत परिवर्तित केले, आणि हे सर्व पाणी ते कार्य पूर्ण करण्यास मिळाले जे निश्चित झाले होते, आणि नूह (अ.) ला आम्हीएका

१) म्हणजे चंद्राचे दुभंगणे या गोष्टीचे लक्षण आहे की कयामत - अंतिम प्रलय - जवळ आहे व ते कोणत्याही क्षणी उद्‌भवण्याची संभावना आहे. हे वाक्य व नंतरच्या मजकुरामुळे स्पष्टपणे हे उघड होते की त्यावेळी चंद्र खरोखरच दुभंगला होता. ज्या लोकांनी सदरहू घटना प्रत्यक्षपणे पाहिली होती त्यांचे निवेदन आहे की पौर्णिमेच्या रात्री उगवल्यानंतर अकस्मातपणे चंद्र फाटला व त्याचे दोन खंड होऊन समोरील पर्वताच्या दोन्ही बाजूंना ते दिसले, मग क्षणार्धातच दोन्ही मिळाले. हदीसीनुसार कथनकाराचे असे सांगण्यात काहीच तथ्य नाही की सदरहू घटना पैगंबर (स.) यांच्या इशाऱ्याने घडली होती अथवा मक्केतील अश्रद्धावंतांनी चमत्काराची मागणी केली होती म्हणून हा चमत्कार त्यांना दाखिला गेला होता.



फळ्या व खिळे धारीवर स्वार केले,[2] जी आमच्या देखरेखीत वाहत होती. हा होता बदला त्या माणसाखातर ज्याचा अनादर केला गेला होता. त्या नावेला आम्ही एक निशाणी बनवून ठेवले, मग आहे काय कोणी उपदेश घेणारा? पाहून घ्या, कसा होता माझा प्रकोप आणि कशा होत्या माझ्या धमकावण्या. आम्ही या कुरआनला उपदेशासाठी सुलभ साधन बनविले आहे,[3] मग आहे काय कोणी उपदेश घेणारा? (९-१७)

'आद'ने खोटे ठरविले तर पाहून घ्या कसा होता माझा प्रकोप आणि कशा होत्या माझ्या धमकावण्या. आम्ही एका निरंतर अशुभ दिवशी भयंकर वादळी वारा त्यांच्यावर पाठविला, जो लोकांना उचलून उचलून अशाप्रकारे फेकत होता जणूकाय ती मुळापासून उपटलेली खजुरीची खोडे असावीत. तर पाहून घ्या कसा होता माझा प्रकोप आणि कशा होत्या माझ्या धमकावण्या. आम्ही या कुरआनला उपदेशासाठी सुलभ साधन बनविले आहे, मग आहे काय कोणी उपदेश घेणारा? (१८-२२)

समूदनी ताकीदींना खोटे ठरविले आणि म्हणू लागले, ''एकटाच एक मनुष्य जो आमच्यापैकीच आहे, काय आम्ही आता त्याच्या पाठीमागे चालावे? याचे अनुसरण आम्ही जर कबूल केले तर याचा अर्थ असा होईल की आम्ही बहकलो आहोत आणि आमची अक्कल मारली गेली आहे. काय आमच्या दरम्यान हाच एक मनुष्य होता ज्याच्यावर ईश्वर-स्मरण उतरविले गेले? नव्हे, तर हा पराकोटीचा लबाड व दुराभिमानी आहे.'' (आम्ही आपल्या पैगंबराला सांगितले) ''उद्याच यांना कळेल की कोण पराकोटीचा लबाड आणि दुराभिमानी आहे. आम्ही उंटिणीला यांच्यासाठी उपद्रव बनवून पाठवीत आहोत. आता जरा धीराने पहा यांचा शेवट काय होतो. यांना बजावून सांग की पाणी यांच्या व उंटिणीच्या दरम्यान वाटले जाईल आणि प्रत्येक आपल्या पाळीच्या दिवशी

२) अभिप्रेत आहे ती नौका जिला वादळाच्या आगमनापूर्वीच अल्लाहच्या आदेशानुसार हजरत नूह (अ.) यांनी बनविली होती.

३) अर्थ असा की उपदेशाचे एक साधन तर शिरजोर राष्ट्रांवर कोसळलेले भयंकर प्रकोप आहेत. दुसरे साधन म्हणजे हा कुरआन, तो प्रमाण व पुरावे आणि उपदेश व समजावणीद्वारे तुम्हाला सरळमार्ग दाखवीत आहे. त्या साधनांच्या तुलनेत उपदेशाचे हे साधन अधिक सोपे आहे, मग का तुम्ही याचा लाभ घेत नाही व प्रकोपच पाहण्याचा आग्रह धरीत आहात?

पाणवठ्यावर येईल.''[४] सरतेशेवटी त्या लोकांनी आपल्या माणसाला हाक दिली आणि त्याने या कामाचा विडा उचलला आणि उंटिणीला ठार केले. मग पहा की कसा होता माझा प्रकोप आणि कशा होत्या माझ्या धमकावण्या. आम्ही त्यांच्यावर केवळ एकच विस्फोट सोडला आणि ते कुंपणवाल्यांच्या तुडविलेल्या कुंपणाप्रमाणे भुसा बनून राहिले.[५] आम्ही या कुरआनला उपदेशासाठी सुलभ साधन बनविले आहे, आता आहे कोणी उपदेश स्वीकारणारा? (२३-३२)

लूत (अ.) च्या राष्ट्राने ताकीदींना खोटे ठरविले आणि आम्ही दगडफेक करणारा वारा त्यांच्यावर पाठविला, केवळ लूत (अ.) च्या घरचे लोक त्यापासून सुरक्षित राहिले. त्यांना आम्ही आपल्या मेहरबानीने रात्रीच्या शेवटच्या प्रहरी वाचवून बाहेर काढले. असा मोबदला देत असतो आम्ही त्या माणसाला जो कृतज्ञता दर्शवीत असतो. लूत (अ.) ने आपल्या राष्ट्राला आमच्या पकडीपासून खबरदार केले परंतु ते साऱ्या ताकीदींना संशयास्पद समजून बोलण्यात उडवीत राहिले. मग त्यांनी त्याला आपल्या पाहुण्यांच्या संरक्षणापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. सरतेशेवटी आम्ही त्यांचे डोळे मिटविले की घ्या आता माझ्या प्रकोपाचा व माझ्या धमकीचा आस्वाद. सकाळीसकाळीच एका अटळ प्रकोपाने त्यांना गाठले. घ्या आस्वाद आता माझ्या प्रकोपाचा आणि माझ्या तंबीचा. आम्ही या कुरआनला उपदेशासाठी सुलभ साधन बनविले आहे, तर आहे कोणी उपदेश स्वीकारणारा? (३३-४०)

आणि फिरऔन लोकांपाशीसुद्धा धमक्या आलेल्या होत्या परंतु त्यांनी आमच्या सर्व संकेतांना खोटे ठरविले. सरतेशेवटी आम्ही त्यांना पकडले ज्याप्रमाणे एखादा जबरदस्त सामर्थ्यवान पकडीत असतो. (४१-४२)

---

**४)** हे स्पष्टीकरण आहे या कथनाचे की 'आम्ही उंटिणीला त्यांच्यासाठी उपद्रव बनवून पाठवीत आहोत.' ते उपद्रव असे की अकस्मातपणे एक उंटीण आणून त्यांच्यासमोर उभी केली गेली व त्यांना सांगितले गेले की एक दिवस ही एकटी पाणी पिणार आणि दुसऱ्या दिवशी तुम्ही सर्वजण स्वत:साठी व आपल्या जनावरांसाठी पाणी घेऊ शकाल. तिच्या पाळीच्या दिवशी तुमच्यापैकी कोणत्याही इसमाने कोणत्याही झऱ्यावर अथवा विहिरीवर स्वत:साठीही पाणी प्यावयास येऊ नये व आपल्या जनावरांनासुद्धा पाण्यासाठी आणू नये. हे आव्हान त्या माणसाकडून दिले गेले होते ज्यासंबंधी ते खुद्द सांगत होते की हा मनुष्य कोणताही फौजफाटा बाळगत नाही व एखादा मोठा जथादेखील याच्या पाठीशी नाही.

**५)** जे लोक पशुपालन करतात ते आपल्या जनावरांच्या वाड्यांना सुरक्षित करण्यासाठी लाकडे व झाडींचे एक कुंपण बनवितात. अशा कुंपणाच्या झाडी हळूहळू सुकल्या जाऊन झडतात व जनावरांच्या वर्दळीमुळे तुडवल्या जाऊन त्याचा चुराडा होतो. समूद लोकांच्या चिरडून चेंदामेंदा झालेल्या प्रेतांना अशाच भुगराळ्याची उपमा दिलेली आहे.



काय तुमचे अश्रद्धावंत काही त्या लोकांपेक्षा उत्तम आहेत?[६] अथवा दिव्य ग्रंथात तुमच्यासाठी काही क्षमा लिहिलेली आहे? अथवा या लोकांचे असे म्हणणे आहे की आम्ही एक मजबूत जथा आहोत, स्वत:चे रक्षण करून घेऊ? लवकरच हा जथा पराभूत होईल आणि हे सर्व पाठ दाखवून पळताना दिसतील किंबहुना यांना निपटण्यासाठी मूळ वायद्याची वेळ तर पुनरुत्थान आहे आणि ती मोठी आपत्ती व अधिक कटू घटका आहे. हे गुन्हेगार लोक वास्तविकत: गैरसमजुतीत गुरफटलेले आहेत आणि यांची अक्कल नष्ट झालेली आहे. ज्या दिवशी हे तोंडघशी फरफटले जातील त्या दिवशी यांना सांगितले जाईल की आता चाखा नरकाच्या ज्वाळांची गोडी. (४३-४८)

आम्ही प्रत्येक वस्तू एका योजनेनिशी निर्माण केली आहे,[७] आणि आमची आज्ञा केवळ एकच आज्ञा असते व पापणी लवेतोपर्यंत ती अंमलात येते. तुम्हासारख्या अनेकांना आम्ही नष्ट करून टाकले आहे. मग आहे का कोणी उपदेश स्वीकारणारा? जे काही त्यांनी केलेले आहे ते सर्व दप्तरांत नोंदलेले आहे, आणि प्रत्येक लहानमोठी गोष्ट लिहिलेली आहे. (४९-५३)

अवज्ञेपासून अलिप्त राहणारे खचितच उद्यानात आणि कालव्यांत असतील, खऱ्या प्रतिष्ठेची जागा, महान सत्ताधिकारी बादशहाच्या समीप. (५४-५५)

---

**६)** संबोधन कुरैशच्या लोकांशी आहे. अर्थ असा की तुमच्यात अशी कोणती खुबी आहे. कोणती हिरे माणके तुम्हाला जडली आहेत की ज्या कुफ्र व अट्टहास आणि खोटे ठरविण्याच्या वर्तनासाठी इतर राष्ट्रांना शिक्षा दिली गेली आहे तेच वर्तन तुम्ही अवलंबिले तर तुम्हाला शिक्षा केली जाऊ नये?

**७)** म्हणजे जगातील कोणतीही वस्तू अळंटळंपणे निर्माण केली गेलेली नाही तर प्रत्येक वस्तूचे नियोजन आहे, त्यानुसार ती एका निश्चित समयी बनते, विशिष्ट आकार घेते, एका विशिष्ट मर्यादेपर्यंत विकास पावते, एका विशिष्ट मुदतीपर्यंत तिचे अस्तित्व राहते व एका विशिष्ट वेळी ती नाश पावते.

# ५५ सूरह अर्‌रह्मान

*(मदीनाकालीन, वचने ७८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अत्यंत मेहरबान (ईश्वरा) ने कुरआनचे शिक्षण दिले आहे. त्यानेच मानवाला निर्माण केले, आणि त्याला बोलणे शिकविले. (१-४)

सूर्य आणि चंद्र एका हिशेबाने बांधलेले आहेत. आणि तारे व वृक्ष सर्व नतमस्तक आहेत.[१] आकाशाला त्याने उंच केले आणि संतुलन प्रस्थापित केले.[२] याची निकड अशी आहे की तुम्ही संतुलन बिघडऊ नका. न्यायपूर्ण रीतीने ठीकठीक वजन करा आणि तराजूने तोलताना वजन कमी करू नका.[३] (५-९)

पृथ्वीला त्याने संपूर्ण प्राणिमात्रासाठी बनविले. त्यात हरतऱ्हेची विपुल चवदार फळे आहेत. खजुरीचे वृक्ष आहेत ज्याची फळे वेष्टनात गुंडाळलेली आहेत. वेगवेगळी धान्ये आहेत ज्यात भुसाही असतो आणि दाणेसुद्धा. तर हे जिन्न व मानव तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांचा[४] इन्कार कराल? (१०-१३)

मानवाला त्याने चिखलमातीपासून बनविले आणि जिन्नला अग्नीच्या ज्वालापासून निर्माण केले. मग हे जिन्न व मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या सामर्थ्य-आश्चर्यांना खोटे ठरवाल? (१४-१६)

दोन्ही पूर्व आणि दोन्ही पश्चिम,[५] सर्वांचा स्वामी व पालनकर्ता तोच आहे. मग

१) म्हणजे आज्ञाधीन आहेत. अल्लाहच्या हुकुमापुढे यत्किंचितही शिरजोरी करीत नाहीत.

२) जवळ जवळ सर्वच भाष्यकारांनी या ठिकाणी 'संतुलना'ने अभिप्रेत न्याय मानले आहे. संतुलन प्रस्थापित करण्याचा अर्थ असा सांगितला आहे की सर्वोच्च अल्लाहने या सृष्टीव्यवस्थेला न्यायानिशी उभारले आहे.

३) ज्याअर्थी तुम्ही एका समतोल सृष्टीत राहता जिची संपूर्ण व्यवस्था न्यायावर आधारित आहे त्याअर्थी तुम्हीसुद्धा न्यायावर कायम राहिले पाहिजे. ज्या क्षेत्रात तुम्हाला अधिकार दिलेले आहेत त्यात जर तुम्ही अन्याय कराल तर हे सृष्टीस्वभावाविरूद्ध तुमचे बंड ठरेल.

४) मूळ अरबी भाषेत 'आलाऽइ' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. पुढील आयतीत पुन्हा पुन्हा या शब्दाची पुनरावृत्ती झालेली असून निरनिराळ्या ठिकाणी त्याचा अर्थ आम्ही निरनिराळ्या शब्दात व्यक्त केलेला आहे. या शब्दाचा अर्थ 'देणगी' असाही होतो. 'सामर्थ्य-खुबी' असाही होतो आणि 'स्तुत्य गुण' असादेखील अर्थ होतो. पुढील प्रत्येक ठिकाणी मागील व पुढील मजकुरांशी सुसंगत असेल असाच अर्थ आम्ही या शब्दाचा करणार आहोत.

५) दोन पूर्व आणि दोन पश्चिम दिशांनी अभिप्रेत हिवाळ्यातील लहानातल्या लहान दिवसाच्या आणि उन्हाळ्यातील मोठ्यातल्या मोठ्या दिवसांच्या पूर्व व पश्चिम दिशाही असू शकतात आणि पृथ्वीगोलाच्या दोन्ही अर्धगोलाच्या पूर्व व पश्चिम दिशादेखील असू शकतात.



हे जिन्न आणि मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याची कोणकोणती सामर्थ्ये खोटी ठरवाल? (१७-१८)

दोन समुद्रांना त्याने सोडले की ते परस्परात मिळावे तरीपण त्यांच्या दरम्यान एक पडदा आड आहे ज्याचे उल्लंघन ते करीत नाहीत, मग हे जिन्न आणि मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या सामर्थ्याच्या कोणकोणत्या चमत्कारांना खोटे ठरवाल? या समुद्रातून मोती आणि प्रवाळ निघतात. तर हे जिन्न आणि मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या सामर्थ्यांच्या कोणकोणत्या वैशिष्ट्यांना खोटे ठरवाल? (१९-२३)

आणि ही जहाजे त्याचीच आहेत, जी समुद्रात पर्वतासमान उंच गेलेली आहेत, म्हणून हे जिन्न व मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना नाकाराल? (२४-२५)

प्रत्येक वस्तू जी या पृथ्वीवर आहे लोप पावणारी आहे आणि तुझ्या पालनकर्त्याचे प्रतापी आणि उदार रूपच तेवढे बाकी राहणार आहे. मग हे जिन्न व मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या खुबींना खोटे ठरवाल? पृथ्वी व आकाशात जे जे कोणी आहेत. सर्वजण आपल्या गरजा त्याच्याकडेच मागत आहेत. प्रत्येक क्षणी त्याचे वैभव नवनवीनच.[६] मग हे जिन्न व मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या स्तुत्य गुणांना खोटे ठरवाल? (२६-३०)

हे धरणीच्या भारांनो,[७] लवकरच आम्ही तुमची विचारणा करण्यासाठी

६) म्हणजे प्रत्येकक्षणी या सृष्टीव्यवस्थेत त्याच्या कार्यप्रभावाची एक अनंत शृंखला गतीमान आहे व तो असंख्य व अमाप वस्तू विविध आकार रूप आणि गुणासहित निर्माण करीत आहे. त्याचे विश्व नेहमी एकाच स्थितीत राहते असे नाही तर क्षणोक्षणी त्याच्यात स्थित्यंतरे घडत असतात. त्याचा निर्माता त्याला प्रत्येकवेळी एका नव्या रूपात साकारीत असतो. ते रूप अगोदरच्या सर्व रूपांपेक्षा आगळे वेगळे असते.

७) मूळ अरबी भाषेत 'सकलान' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. 'सकल' म्हणजे ते भार जे स्वारीवर लादलेले असावे. 'सकलान'चा शाब्दिक अर्थ लादलेले दोन भार असा होईल. या ठिकाणी हा शब्द जिन्न आणि मानव या दोन्ही जातींसाठी प्रयुक्त झाला आहे. कारण हे दोन्ही पृथ्वीवर लादलेले आहेत. संबोधन अशा जिन्न व मानवांना केले जात आहे जे आपल्या पालनकर्त्याची भक्ती व आज्ञाधारकतेपासून विमुख आहेत. म्हणून त्यांना 'हे जमिनीच्या भारांनो' म्हणून संबोधिले जात आहे जणूकाय निर्माणकर्ता आपल्या निर्मितीच्या या उभय नालायक समूहांना फर्मावीत असावा की 'हे त्या लोकांनो, जे माझ्या पृथ्वीला भार बनलेला आहात, लवकरच मी तुमचा समाचार घेण्यासाठी मोकळा होणार आहे.'

मोकळे[८] होत आहोत, (मग पाहून घेऊ की) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरविता. हे जिन्न व मानव समूहांनो, जर तुम्ही पृथ्वी व आकाशांच्या सरहद्दीतून निघून पळ काढू शकत असाल तर पळून पहा. नाही पळू शकत. त्याच्याकरिता मोठे बळ हवे आहे.[९] आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या सामर्थ्यांना तुम्ही खोटे ठरवाल? (पळ काढण्याचा प्रयत्न केला तर) तुमच्यावर अग्नीज्वाळा व धूर सोडले जातील ज्याचा मुकाबला तुम्ही करू शकणार नाही. हे जिन्न व मानव, तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या सामर्थ्यांचा इन्कार कराल? (३१-३६)

मग (काय बेतेल त्यावेळी) जेव्हा आकाश फाटेल[१०] आणि लाल कातड्याप्रमाणे तांबडा होईल? हे जिन्न व मानव (त्यावेळी) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या सामर्थ्यांना खोटे ठरवाल? (३७-३८)

त्या दिवशी कोणत्याही मानव आणि जिन्नला त्याचा गुन्हा विचारण्याची गरज भासणार नाही. मग (पाहून घेतले जाईल की) तुम्ही दोन्ही समूह आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना नाकारता? गुन्हेगार तेथे आपल्या चेहऱ्यावरून ओळखून घेतले जातील आणि त्यांना कपाळाचे केस आणि पाय धरधरून फरफटले जाईल. (त्यावेळी) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या सामर्थ्यांना खोटे लेखाल? (त्यावेळी सांगितले जाईल) हा तोच नरक आहे ज्यास गुन्हेगार खोटे ठरवीत असत. त्याच नरक व उकळत्या पाण्यादरम्यान ते भ्रमण करीत राहतील. मग आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या सामर्थ्यांना तुम्ही खोटे ठरवाल? (३९-४५)

---

८) याचा अर्थ असा नव्हे की यावेळी सर्वोच्च अल्लाह इतका निमग्न आहे की त्याला या अवज्ञाकारीचा समाचार घेण्यास फुरसदच मिळत नाही तर याचा खरा अर्थ असा की सर्वोच्च अल्लाहने एक विशिष्ट वेळापत्रक निश्चित केलेले आहे, त्यानुसार अद्याप मानव आणि जिन्नांच्या अंतिम जाब विचारण्याची वेळ आलेली नाही.

९) पृथ्वी व आकाशांनी अभिप्रेत आहे सृष्टी अथवा दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर ईश्वराचे संपूर्ण विश्व. आयतचा अर्थ असा की ईश्वराच्या पकडीतून निसटणे तुमच्या आवाक्यात नाही. ज्या जाबविचारणीची तुम्हाला खबरबात दिली जात आहे तिची वेळ आल्यानंतर तुम्ही कोणत्याही जागी का असू नये पकडून आणले जाल. त्यापासून वाचण्यासाठी तुम्हाला ईश्वराच्या सृष्टितून बाहेर पळून जावे लागेल व असे बळ तुमच्यात खचितच नाही. जर तुम्ही आपल्या मनात अशी घमेंड बाळगत असाल तर आपले बळ अजमावून पहा.

१०) आकाशाच्या फाटले जाण्याने अभिप्रेत आहे नभोमंडलाची घडी विस्कटणे, विश्वव्यवस्थेचे उद्ध्वस्त होणे, ग्रह व नक्षत्रांचे विखुरले जाणे.



आणि त्या प्रत्येक इसमासाठी जो आपल्या पालनकर्त्याच्या पुढे पेश होण्याची भीती बाळगत असेल.[११] दोन उद्याने आहेत. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? हिरव्यागार शाखांनी भरपूर. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? दोन्ही उद्यानांत दोन झरे प्रवाहित. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? दोन्ही उद्यानांत प्रत्येक फळाचे दोन प्रकार.[१२] आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? जन्नती लोक अशा बिछाईतीवर लोड लावून बसतील ज्यांचे अस्तर दाट रेशमाचे असेल आणि उद्यानाच्या (झाडांच्या) शाखा फळांनी वाकल्या जात असतील, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल. या ऐश्वर्यादरम्यान लाजाळू नजरवाल्या[१३] असतील, ज्यांना या स्वर्गस्थ लोकांच्या अगोदर कधी कोणा मानवाने अथवा जिन्नाने स्पर्श केलेला नसेल,[१४] आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? अशा सुंदर जणू हिरे आणि मोती, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना खोटे ठरवाल? (४६-५९)

---

११) म्हणजे ज्याने जगात ईशभय बाळगून जीवन जगले आणि एके दिवशी मला आपल्या पालनकर्त्यासमोर उभे राहावयाचे व आपल्या कर्माचा हिशेब द्यावयाचा आहे असे भान ठेवून कार्य केले आहे.

१२) याचा अर्थ असा होऊ शकतो की दोन्ही उद्यानांतील फळांची शान निराळी असेल. एका उद्यानात गेल्यावर एका शानची फळे तेथील फांदीना लगडलेली असती. दुसऱ्या उद्यानात गेला असता त्याच्या फळांची काही औरच शान असेल. दुसरा अर्थ असाही होऊ शकतो की यापैकी प्रत्येक उद्यानांत एका अशा प्रकारची परिचित फळे असतील जी जगातही त्याच्या ओळखीची होती, मग चवीत ती फळे जगातील फळांपेक्षा कितीही श्रेष्ठ का असू नये. दुसऱ्या प्रकारची फळे दुर्मिळ असतील जी जगात त्याच्या कल्पनेतसुद्धा आलेली नव्हती.

१३) स्त्रीचे हे खरे वैशिष्ट्य आहे की ती निर्लज्ज आणि निर्भीड नसावी तर डोळ्यात लज्जा बाळगणारी असावी. म्हणूनच सर्वोच्च अल्लाहने जन्नतीच्या ऐश्वर्यादरम्यान स्त्रियांचा उल्लेख करताना सर्वप्रथम त्यांच्या सौंदर्याची व लावण्याची नव्हे तर त्यांच्या लाजाळूपणा व सुशीलतेची स्तुती केलेली आहे. सौंदर्यवती तर मुक्त-क्लब आणि सिने-सौंदर्य सभेतही गोळा होत असतात आणि सौंदर्य व लावण्य स्पर्धेत तर निवडून निवडून एकाहून एक वरचढ अशी लावण्यवती स्त्री आणली जाते, परंतु दुराभिरूची आणि दुर्वृत्त मनुष्यच त्यांच्यात रस घेऊ शकतो. कुणा सभ्य माणसाला असले लावण्य आकर्षित करू शकत नाही जे पापी नजर बाळगणाऱ्या प्रत्येकाला लावण्यावलोकनांचे आमंत्रण देणारे असावे आणि जे प्रत्येक आलिंगन भूषविण्यास तत्पर असावे.

१४) यावरून असे कळले की स्वर्गामध्ये सदाचारी माणसांप्रमाणे सदाचारी जिन्नदेखील प्रवेश करतील, मानवांसाठी मानवस्त्रिया असतील आणि जिन्नांसाठी जिन्न स्त्रिया असतील. शिवाय दैवी सामर्थ्याने त्या सर्व कुमारिका बनविल्या जातील.

सदाचाराचा बदला सदाचाराव्यतिरिक्त काय बरे असू शकतो? तर हे जिन्न व मानव, आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या प्रशंसनीय गुणांचा तुम्ही इन्कार कराल? आणि त्या दोन उद्यानांशिवाय दोन उद्याने आणखीन असतील.[१५] आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? टवटवीत हिरवी गडद उद्याने. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? दोन्ही उद्यानांत दोन झरे कारंजाप्रमाणे उसळत असलेले. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? त्यांत विपुल फळे आणि खजुरी व डाळिंबे. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? या ऐश्वर्याच्या दरम्यान सुचरित्र आणि सुस्वरूप पत्नीं. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? तंबूत ठेवल्या गेलेल्या अप्सरा.[१६] आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल? या स्वर्गस्थ लोकांपूर्वी कधी कोणा मानवाने अथवा जिन्नने त्यांना स्पर्श केलेला नसेल. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या देणग्यांना तुम्ही खोटे ठरवाल? ते स्वर्गस्थ लोक हिरवे गालीचे आणि सुंदर व दुर्मिळ बिछान्यांवर तक्के लावून बसतील. आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या इनामांना तुम्ही खोटे ठरवाल?

(६०-७७)

अत्यंत समृद्धशाली आहे तुझ्या प्रतापी व उदार पालनकर्त्याचे नाव. (७८)

**१५)** बहुधा पहिली दोन उद्याने निवासस्थान म्हणून असतील आणि दुसरी दोन उद्याने करमणूक स्थळ म्हणून.

**१६)** तंबूंनी अभिप्रेत बहुधा अमीर उमरावांसाठी करमणुकीच्या ठिकाणी ज्याप्रमाणे तंबू उभारले जातात त्याच प्रकारचे तंबू आहेत. त्या करमणूक स्थळात जागोजागी तंबू लावलेले असतील. त्यांच्यात अप्सरा त्यांच्यासाठी आनंद व सुखोपभोगाचा सरंजाम उपलब्ध करतील.



# ५६ सूरह अल्‌वाक़िआ

*(मक्काकालीन, वचने ९६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जेव्हा ती घडणारी घटना घडून येईल तेव्हा ती घडून येण्यास नाकारणारा कोणी असणार नाही. ती उलथापालथ करणारी आपत्ती असेल. पृथ्वी त्यावेळी अकस्मात हादरून टाकली जाईल.[१] आणि पर्वत अशाप्रकारे चूरचूर केले जातील की ते उधळलेली धूळ बनून राहतील. तुम्ही लोक त्यावेळी तीन गटात विभागले जाल, उजव्या बाजूवाले, उजव्या बाजूवाल्यां (च्या सौभाग्या) बद्दल काय सांगावे! आणि डाव्या बाजूवाले, तर डाव्या बाजूवाल्यांचे (दुर्भाग्याचे) कसले ठिकाण आणि अग्रगामी तर अग्रगामीच आहेत. तेच तर निकटवर्ती लोक आहेत, ऐश्वर्यसंपन्न स्वर्गामध्ये राहतील. पुढच्यांच्यापैकी पुष्कळ असतील आणि मागच्यांच्यापैकी थोडे. मढविलेल्या आसनावर तक्के लावून समोरासमोर बसतील, त्यांच्या मैफिलीत सदोदित मुले,[२] वाहत्या झऱ्यातील पेयाने ओतप्रोत पेले व सुरई आणि पात्रे घेऊन धावत फिरत असतील. जे प्यायल्याने त्यांचे डोकेही गरगरणार नाही व त्यांची बुद्धिही भ्रष्ट होणार नाही. आणि ते त्यांच्या पुढे विविध प्रकारची स्वादिष्ट फळे हजर करतील की हवी ती निवडावीत, आणि पक्ष्यांचे मांस हजर करतील की हवे त्या पक्ष्याला उपयोगात आणावे. आणि त्यांच्यासाठी सुंदर नेत्रांच्या अप्सरा असतील. अशा सुंदर जणू लपवून ठेवलेले मोती. हे सर्वकाही त्या कर्माचा मोबदला म्हणून त्यांना मिळेल जे ते जगात करीत राहिले होते. तेथे ते कोणतेही असभ्य शब्द अथवा पापाची गोष्ट ऐकणार नाहीत. जी काही गोष्ट होईल ती नीटनेटकी असेल. (१-२६)

आणि उजव्या बाजूवाले, उजव्या बाजूवाल्या (च्या सौभाग्या) बद्दल काय म्हणावे! ती निष्कंटक बोरी,[३] आणि थरावर थर असलेली केळी आणि लांबपर्यंत

**१)** म्हणजे तो एखादा स्थानिक स्वरूपाचा धरणीकंप असेल असे नाही तर संपूर्ण पृथ्वी एकदम हादरून सोडली जाईल.

**२)** याच्याने अभिप्रेत आहे अशी मुले जी सदैव मुलेच राहतील. त्यांचे वय सदैव एकाच अवस्थेवर स्थिर राहील.

**३)** म्हणजे अशी बोरे ज्याच्या वृक्षांना कंटक नसतील. बोरे जितक्या उच्च दर्जाची असतात तितकेच त्यांना कंटक कमी असतात. म्हणून जन्नतीतील बोरांचे वैशिष्ट्य असे सांगितले गेले आहे की ते निष्कंटक असतील. म्हणजे अशा उत्तम दर्जाचे असतील जे जगात आढळत नाहीत.

पसरलेल्या सावल्या, आणि सदैव प्रवाहित पाणी, आणि कधीही न संपणारी व निर्विघ्नपणे मिळणारी असंख्य फळे आणि उच्च बैठकीत असतील त्यांच्या पत्नीं आम्ही विशेष प्रकारे नव्याने निर्माण करू आणि त्यांना कुमारिका बनवू. आपल्या पतीच्या प्रिय आणि वयात समवयस्क, हे असे उजव्या बाजूवाल्यांसाठी आहे. ते पुढच्यांच्यापैकी पुष्कळ असतील आणि मागच्यांपैकीदेखील पुष्कळ. (२७-४०)

आणि डाव्या बाजूवाले, डाव्या बाजूवाल्या (च्या दुर्भाग्या) बद्दल काय विचारावे! ते होरपळणाऱ्या वाऱ्याच्या तडाख्यात आणि उकळत्या पाण्यात, आणि काळ्या धुराच्या छायेत असतील, जे न शीतलही असेल न आल्हाददायक. हे ते लोक असतील जे या अंतापर्यंत पोहोचण्यापूर्वी सुखवस्तू होते आणि महापापाचा आग्रह धरीत होते. म्हणत असत, "जेव्हा आम्ही मरून माती होऊन राहू आणि हाडाचे सापळे होऊन राहू तरीपण आम्ही उठवून उभे केले जाऊ काय? आणि काय आमचे वाडवडीलसुद्धा उठविले जातील जे पूर्वी होऊन गेले आहेत?" हे पैगंबर (स.), या लोकांना सांगा, नि:संशय पूर्वीचे व नंतरचे सर्व एके दिवशी अवश्य जमा केले जाणार आहेत, ज्याची वेळ निश्चित करण्यात आली आहे. मग हे पथभ्रष्टांनो, आणि खोटे ठरविणाऱ्यांनो, तुम्ही जक्कूम (निवडुंग) च्या झाडाचे खाद्य खाणार आहात, त्यानेच तुम्ही पोट भराल आणि त्यावर उकळते पाणी, पाणढोसळणी लागलेल्या उंटाप्रमाणे प्याल. असा आहे (या डाव्या बाजूवाल्यांच्या) मेजवानीचा सरंजाम मोबदल्याच्या दिवशी. (४१-५६)

आम्ही तुम्हाला निर्माण केले आहे, मग सत्याची कबुली का देत नाही.[४] कधी तुम्ही विचार केला की हे जे वीर्य तुम्ही टाकता त्यापासून मूल तुम्ही बनविता की ते घडविणारे आम्ही आहोत? आम्ही तुमच्या दरम्यान मरण वाटले आहे, आणि आम्ही यासाठी असमर्थ नाही की तुमची रूपे बदलून टाकावीत आणि एखाद्या अशा रूपांत तुम्हाला निर्माण करावे की जे तुम्ही जाणत नाही. आपल्या पहिल्या जन्माला तर तुम्ही जाणताच, मग का बोध घेत नाही? (५७-६२)

कधी तुम्ही विचार केला की ही बीजे जी तुम्ही पेरता, त्यापासून पिके आम्ही उगवितो की ती उगविणारे तुम्ही आहात? आम्ही इच्छिले तर या शेतीचा भुसा करून टाकू आणि तुम्ही तऱ्हेतऱ्हेच्या गोष्टी बनवीत बसाल की आमच्यावर तर उलट भुर्दंड बसले, किंबहुना आमचे तर भाग्यच फुटके आहे. (६३-६७)

---

४) म्हणजे या गोष्टीच्या सत्यतेची कबुली की आम्हीच तुमचे पालनकर्ता आणि उपास्य आहोत, आणि आम्ही तुम्हाला दुसऱ्यांदाही निर्माण करू शकतो.



कधी तुम्ही डोळे उघडून पाहिले, हे पाणी जे तुम्ही पिता याला तुम्ही ढगांतून वर्षविले आहे अथवा याचा वर्षाव करणारे आम्ही आहोत? आम्ही इच्छिले तर याला अशुद्ध करून टाकू, मग का तुम्ही कृतज्ञ बनत नाही? (६८-७०)

कधी तुम्ही विचार केला, हा अग्नी जो तुम्ही पेटविता, याचे झाड तुम्ही उत्पन्न केले आहे अथवा हे निर्माण करणारे आम्ही आहोत?[५] आम्ही त्याला आठवणीचे साधन आणि गरजूंसाठी जीवनसामग्री बनविले आहे. (७१-७३)

म्हणून हे पैगंबर (स.), आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाचे पावित्र्यगान करा.[६] (७४)

तर नव्हे[७] मी शपथ घेतो ताऱ्यांच्या स्थानांची आणि जर तुम्ही समजून घेतले तर ही फार मोठी शपथ आहे की हा एक उच्च कोटीचा कुरआन आहे,[८] एका सुरक्षित ग्रंथांत अंकित, ज्याला पवित्रांशिवाय कोणी स्पर्श करू शकत नाही.[९] हा सकल जगांच्या पालनकर्त्याकडून अवतरित आहे. मग काय तुम्ही या वाणीची उपेक्षा करता, आणि या देणगीत आपला वाटा तुम्ही असा ठेवला आहे की याला तुम्ही खोटे ठरविता? (७५-८२)

आता जर कुणाचे आज्ञांकित नसाल आणि आपल्या या विचारांत खरे आहात,

---

५) म्हणजे ज्या वृक्षांच्या लाकडांपासून तुम्ही अग्नी पेटविता ती वृक्षे तुम्ही निर्मिली आहेत की आम्ही.

६) म्हणजे त्याचे शुभ नाव उच्चारून असे सर्व दोष, उणीवा आणि दुर्बलता ज्या अश्रद्धावंत आणि अनेकेश्वरवादी त्याच्याशी जोडतात, ज्या विद्रोह आणि अनेकेश्वरवादाच्या प्रत्येक तत्त्वात व श्रद्धेत आणि परलोकाच्या इन्कार करणाऱ्यांच्या प्रत्येक युक्तिवादात दडलेल्या आहेत. त्या सर्वांपासून तो पवित्र आहे असे तुम्ही जाहिरपणे घोषित करा.

७) म्हणजे जसे तुम्ही समजून बसला आहात गोष्ट तशी नाही. या ठिकाणी कुरआन अल्लाहकडून असल्यासंबंधीची शपथ घेण्या-अगोदर 'ला' (अर्थात 'नव्हे') या शब्दाचा वापर स्वत:च असे उघड करीत आहे की लोक या पवित्र ग्रंथासंबंधी काही गोष्टी बनवीत होते व त्यांचे खंडन करण्यासाठी ही शपथ घेतली जात आहे.

८) नक्षत्र आणि ग्रहांच्या स्थानांनी अभिप्रेत त्यांची स्थळे, त्यांच्या मजला आणि त्यांच्या कक्षा आहेत. कुरआन उच्च दर्जाचा ग्रंथ असण्यासंबंधी त्यांची शपथ घेण्याचा अर्थ असा की वरील जगतात नभोमंडळातील ग्रह व नक्षत्रांची व्यवस्था ज्या प्रकारे भक्कम व मजबूत आहे त्याचप्रकारे भक्कम व मजबूत ही वाणीदेखील आहे. ज्या ईश्वराने ती व्यवस्था बनविली आहे त्याच ईश्वराने ही वाणीही बनविली आहे.

९) म्हणजे हा पवित्र फरिश्त्याद्वारे आला आहे, शैतानांचा यात कसलाही हात नाही.

तर जेव्हा मरणाऱ्याचा जीव कंठापर्यंत पोहचलेला असतो आणि तुम्ही डोळ्याने पाहत असता की तो मरत आहे तेव्हा त्याच्या निघत असलेल्या प्राणाला परत का आणत नाही? त्यावेळी तुमच्यापेक्षा त्याच्या अधिक जवळ आम्ही असतो परंतु तुम्हाला दिसत नाही. मग तो मरणारा जर निकटवर्तीयांपैकी असेल तर त्याच्यासाठी सुख आणि उत्तम उपजीविका व ऐश्वर्यसंपन्न स्वर्ग आहे. आणि जर तो उजव्या बाजूवाल्यांपैकी असेल तर त्याचे स्वागत असे होईल की सलाम आहे तुला, तू उजव्या बाजूवाल्यांपैकी आहेस आणि जर तो खोटे ठरविणाऱ्या पथभ्रष्ट लोकांपैकी असेल तर त्याच्या पाहुणचारासाठी उकळते पाणी आहे आणि नरकामध्ये झोकले जाणे. (८३-९४)

हे सर्वकाही पूर्णत: सत्य आहे, म्हणून हे पैगंबर (स.), आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाने पावित्र्यगान करा.[१०] (९५-९६)

१०) या आदेशानुसार पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी नमाजातील 'रूकू'मध्ये 'सुबहान रब्बियल अजीम' 'पवित्र आहे माझा महान पालनकर्ता' म्हणण्याची आज्ञा दिली आहे.



# ५७ सूरह अल्हदीद

*(मदीनाकालीन, वचने २९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अल्लाहचे पावित्र्यगान केले आहे त्या प्रत्येक वस्तूने जी पृथ्वी व आकाशांत आहे, आणि तोच जबरदस्त व बुद्धिमान आहे. पृथ्वी व आकाशांच्या राज्यांचा स्वामी तोच आहे, जीवन प्रदान करतो व मृत्यू देतो, आणि प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे. तोच आदीही आहे आणि अंतिमसुद्धा. आणि प्रकटही आहे व अप्रकटसुद्धा.[१] आणि त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे. तोच आहे ज्याने आकाशांना आणि पृथ्वीला सहा दिवसांत निर्माण केले, आणि मग अर्श (राजसिंहासना) वर विराजमान झाला. त्याला ज्ञात आहे जे काही जमिनीत जाते आणि जे काही त्यातून निघत असते, आणि जे काही आकाशांतून उतरत असते आणि जे काही त्यात चढत असते.[२] तो तुमच्यासमवेत आहे जेथे-कुठे तुम्ही आहात. जे काही कार्य तुम्ही करता; तो ते पाहत आहे. तोच पृथ्वी आणि आकाशांच्या बादशाहीचा स्वामी आहे आणि सर्व मामले निर्णयासाठी त्याच्याकडेच रुजू केले जातात. तोच रात्रीला दिवसात आणि दिवसाला रात्रीत दाखल करतो, आणि मनात लपलेली रहस्येसुद्धा जाणतो. (१-६)

श्रद्धा ठेवा अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर[३] आणि खर्च करा त्या वस्तूंपैकी

१) म्हणजे जेव्हा काहीच नव्हते तेव्हा तो होता व जेव्हा काहीच राहणार नाही तेव्हा तो राहील. तो सर्व प्रकटांपेक्षा अधिक प्रकट आहे कारण जगात जे काही प्रकट रूप आहे त्याच्याच गुणांचे, कृतींचे आणि तेजाचे प्रकटन आहे. तो प्रत्येक गुप्त पेक्षा अधिक गुप्त आहे कारण ज्ञानेंद्रियांनी त्याचे अस्तित्व जाणून घेणे तर दूरच राहो, बुद्धी आणि कल्पना व विचारानेसुद्धा त्याचा ठाव घेणे व हकीकत जाणून घेणे शक्य नाही.

२) दुसऱ्या शब्दात सांगावयाचे तर तो केवळ समष्टी, समग्रतेचाच ज्ञानी आहे असे नाही तर व्यष्टी, पृथक घटकांचेही ज्ञान त्याला आहे, प्रत्येक दाणा जो जमिनीच्या थरात शिरत असतो, प्रत्येक अंकुर आणि पात जी जमिनीतून उगवते, पावसाचा प्रत्येक थेंब जो आकाशातून पडत असतो आणि बाष्पाचे ते प्रत्येक प्रमाण जे समुद्र आणि सरोवरातून निघून आकाशाकडे जात असते, त्याच्या नजरेत आहे. त्याला माहीत आहे की कुठला दाणा जमिनीत कोठे पडलेला आहे, तेव्हाच तर तो त्याला फाडून त्यातून अंकुर बाहेर काढतो व त्याची जोपासना करून त्याला वाढवितो. त्याला माहीत आहे की बाष्प किती, किती प्रमाणांत कोठकोठून निघाले आहे व कोठे पोहचले आहे, तेव्हाच तर तो ते सर्व एकत्र करून त्यांचे ढग बनवितो व पृथ्वीच्या विविध भागात वाटप करून प्रत्येक ठिकाणी एका हिशेबाने पाऊस पाडतो.

३) या ठिकाणी श्रद्धा ठेवण्याने अभिप्रेत केवळ इस्लामचा तोंडी स्वीकार करणे असे नाही तर मन:पूर्वक श्रद्धा ठेवणे होय.

ज्यावर त्याने तुम्हाला नायब (खलिफा) नियुक्त केले आहे. जे लोक तुमच्यापैकी श्रद्धा ठेवतील व माल खर्च करतील त्यांच्यासाठी महान मोबदला आहे. तुम्हाला झाले तरी काय की तुम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवीत नाही? वस्तुत: पैगंबर तुम्हाला आपल्या पालनकर्त्यावर श्रद्धा ठेवण्याचे आमंत्रण देत आहे,[४] आणि त्याने तुम्हांकडून प्रतिज्ञा घेतली आहे,[५] जर खरोखर तुम्ही मानणारे असाल. तो अल्लाहच तर आहे जो आपल्या दासावर अगदी स्पष्ट वचने अवतरीत आहे जेणेकरून तुम्हाला अंधारातून बाहेर काढून प्रकाशात आणावे, आणि वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह तुमच्यासाठी अत्यंत मायाळू आणि मेहरबान आहे. बरे कारण तरी काय आहे की तुम्ही अल्लाहच्या मार्गात खर्च करीत नाही? वस्तुत: पृथ्वी आणि आकाशांचा वारसा अल्लाहसाठीच आहे.[६] तुमच्यापैकी जे लोक विजयानंतर खर्च व युद्ध करतील ते कधीही त्या लोकांच्या बरोबरीचे ठरू शकत नाहीत ज्यांनी विजयापूर्वी खर्च व युद्ध केले आहे. त्यांचा दर्जा नंतर खर्च व युद्ध करणाऱ्यांपेक्षा मोठा आहे, जरी अल्लाहने दोघांनाही चांगली वचने दिलेली आहेत.[७] जे काही तुम्ही करता अल्लाहला त्याची खबर आहे. (७-१०)

कोण आहे जो अल्लाहला कर्ज देईल? उत्कृष्ट कर्ज, जेणेकरून अल्लाह कित्येक

४) येथेही श्रद्धा ठेवण्याने अभिप्रेत मनापासून श्रद्धा ठेवणे आहे.

५) म्हणजे आज्ञापालनाची प्रतिज्ञा.

६) याचे दोन अर्थ आहेत. एक असा की हा माल तुमच्याजवळ सदैव राहील असे मुळीच नाही. एके दिवशी खचितच तुम्हाला हे टाकून जावयाचेच आहे व अल्लाहच त्याचा वारस राहणार आहे. दुसरा अर्थ असा की अल्लाहच्या मार्गात माल खर्च करताना तुम्हाला कसल्याही गरिबी आणि टंचाईची भीती वाटू नये कारण ज्या ईश्वराखातर तुम्ही ते खर्च काराल, तो पृथ्वी आणि आकाशांतील सर्व खजिन्यांचा मालक आहे. त्याच्याजवळ तुम्हाला देण्यासाठी केवळ तितकेच होते जितके आज तुम्हाला दिले आहे. असे नाही तर उद्या तो यापेक्षाही फार जास्त तुम्हाला देऊ शकतो.

७) यावरून असे कळले की जेव्हा कधी इस्लामवर अशी वेळ यावी ज्यात द्रोह आणि अश्रद्धावंतांचे पारडे फारच जड झाले असावे आणि सकृतदर्शनी इस्लामच्या वर्चस्वाची लक्षणे दूरवरपर्यंत कोठेच दिसत नसावी तेव्हा जे लोक इस्लामच्या समर्थनासाठी आपले प्राण पणाला लावतील व संपत्ती खर्च करतील त्यांच्या मानमरातबापर्यंत ते लोक पोहचू शकत नाहीत जे द्रोह आणि इस्लाम यांच्यातील संघर्षाचा फैसला इस्लामच्या बाजूने निघाल्यानंतर या मार्गात त्याग करतील.



पटीने वाढवून परत करील आणि त्यांच्यासाठी उत्तम मोबदला असेल,[८] त्यादिवशी जेव्हा की तुम्ही श्रद्धावंत पुरुषांना आणि स्त्रियांना पहाल की त्यांचे तेज त्यांच्या पुढेपुढे आणि उजव्या बाजूने धावत असेल.[९] (त्यांना सांगितले जाईल की) "आज खुशखबर आहे तुमच्यासाठी. "स्वर्ग असतील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील ज्यात ते सदैव राहतील. हेच आहे मोठे यश. त्या दिवशी दांभिक पुरुषांची आणि स्त्रियांची दशा अशी असेल की श्रद्धावंतांना म्हणतील, "जरा आमच्याकडे पहा जेणेकरून आम्ही तुमच्या तेजापासून काही लाभ घ्यावा," परंतु त्यांना सांगण्यात येईल, "मागे व्हा, आपले तेज कोठे अन्यत्र शोधा." मग त्यांच्या दरम्यान एक भिंत टाकली जाईल जिच्यात एक दार असेल, त्या दाराच्या आत कृपा असेल आणि बाहेर प्रकोप. ते श्रद्धावंतांना ओरडून ओरडून सांगतील, "काय आम्ही तुमच्यासमवेत नव्हतो?" श्रद्धावंत उत्तर देतील, "होय, परंतु तुम्ही स्वत:च स्वत:ला उपद्रवात झोकले, संधिसाधूपणा केला, शंकेत गुरफटलेले राहिलात, आणि खोट्या अपेक्षा तुम्हाला फसवीत राहिल्या, येथपावेतो की अल्लाहचा फैसला आला, आणि शेवटच्या वेळेपर्यंत तो मोठा फसवणूक करणारा तुम्हाला अल्लाहच्या बाबतीत फसवीत राहिला. म्हणून आज तुमच्याकडूनही एखादे प्रतिदान (फिदया) स्वीकारले जाणार नाही आणि त्या लोकांकडूनही नाही ज्यांनी उघडउघड द्रोह केला होता. तुमचे स्थान नरक आहे. तोच तुमची काळजी वाहणारा आहे. आणि हा अत्यंत वाईट शेवट आहे." (११-१५)

काय श्रद्धावंतांसाठी[१०] अद्याप ती वेळ आली नाही की त्यांची हृदये अल्लाहच्या

८) सर्वोच्च अल्लाहची ही वैभवशाली उदारता आहे की त्यानेच प्रदान केलेली संपत्ती जर माणसाने त्याच्या मार्गात खर्च केली तर तिला तो आपल्या जिम्मे कर्ज म्हणून ठरवितो परंतु अट अशी की ते उत्तम कर्ज असावे. म्हणजे शुद्ध अंत:करणानिशी कोणत्याही व्यक्तिगत स्वार्थाविना दिले जावे. या कर्जाविषयी अल्लाहचे दोन वायदे आहेत. एक असा की तो ते अनेक पटीने वाढवून त्याची परतफेड करील. दुसरा असा की याउपर तो आपल्याकडून उत्तम मोबदलाही प्रदान करील.

९) या ठिकाणी माणसाच्या मनात जो प्रश्न शंका निर्माण करू शकतो तो असा की पुढेपुढे प्रकाशाचे धावणे तर समजू शकते परंतु प्रकाशाचे केवळ उजव्या बाजूने धावणे म्हणजे काय? त्यांच्या डाव्या बाजूला अंधार असेल काय? याचे उत्तर असे की जर एखादा मनुष्य आपल्या उजव्या हातात प्रकाश घेऊन चालत असेल तर त्यामुळे प्रकाशित तर डावी बाजूदेखील होईल पण प्रकाश त्याच्या उजव्या हातात आहे हीच वस्तुस्थिती असेल.

१०) या ठिकाणी श्रद्धा ठेवणाऱ्यांनी अभिप्रेत सर्वच मुसलमान आहेत असे नाही तर ईमानची कबुली देऊन जो अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना मानणाऱ्यांच्या समूहात सामील झाला होता तरीपण इस्लामच्या सहानुभूतीचा त्याच्या मनाला स्पर्शही नव्हता, मुसलमानातील तो विशिष्ट समूह अभिप्रेत आहे.

स्मृतीने द्रवली जातील, आणि त्याने अवतरलेल्या सत्यापुढे नमतील, आणि ते त्या लोकांप्रमाणे होऊ नयेत ज्यांना पूर्वी ग्रंथ दिला गेला होता, मग एक दीर्घकाळ त्यांच्यावर लोटला तर त्यांची हृदये कठोर बनली आणि आज त्यांच्यापैकी बहुतेक अवज्ञाकारी बनलेले आहेत? चांगले जाणून असा की अल्लाह पृथ्वीला तिच्या मृत्यूनंतर जीवन प्रदान करतो,[११] आम्ही तुम्हाला अगदी स्पष्टपणे संकेत दाखविले आहेत, कदाचित तुम्ही बुद्धिचा उपयोग करा. (१६-१७)

पुरुष आणि स्त्रियांपैकी जे लोक दान करणारे आहेत[१२] व ज्यांनी अल्लाहला उत्तम कर्ज दिलेले आहे, त्यांना निश्चितच कित्येक पटीने वाढवून दिले जाईल आणि त्यांच्यासाठी उत्तम मोबदला आहे. आणि ज्या लोकांनी अल्लाह आणि त्याच्या प्रेषितांवर श्रद्धा ठेवली आहे तेच आपल्या पालनकर्त्याजवळ (सिद्दीक) सत्यनिष्ठ[१३] आणि (शहीद) साक्षीदार[१४] असतील त्यांच्यासाठी त्यांचा मोबदला आणि त्यांचे तेज आहे, आणि ज्या लोकांनी द्रोह केला आहे आणि आमच्या वचनांना खोटे ठरविले आहे ते नरकवासी आहेत. (१८-१९)

चांगल्याप्रकारे जाणून असा की हे दुनियेतील जीवन याशिवाय अन्य काहीच नाही की एक खेळ आणि मनोरंजन व बाह्य टापटीप आणि तुमचे आपापसात एकमेकाविरूद्ध

**११)** या ठिकाणी ही गोष्ट ज्या अनुषंगाने फर्माविलेली आहे ते चांगल्या प्रकारे समजून घेतले पाहिजे. महान कुरआनात अनेक ठिकाणी प्रेषितत्व आणि ग्रंथाच्या उतरण्यास पर्जन्यवृष्टीच्या समृद्धींची उपमा दिलेली आहे. कारण जमिनीवर पर्जन्यवृष्टीमुळे जे परिणाम उत्पन्न होत असतात तसेच प्रेषितत्व आणि ग्रंथ उतरण्याचे मानवतेवर परिणाम उमटत असतात. ज्या भूमीत निपजण्याची थोडीशी जरी क्षमता असते ती बहरून उठते परंतु जी जमीन नापीक असते ती जशी होती तशीच पडून राहते.

**१२)** 'सदका' हा शब्द उर्दू भाषेत तर फारच वाईट अर्थाने घेतला जातो परंतु इस्लामी परिभाषेत जे दान मन:पूर्वक आणि शुद्ध अंत:करणाने केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी दिलेले असेल व ज्यात कोणत्याही प्रकारचा मानभावीपणा नसेल व कुणावर उपकारही सांगितला जात नसेल, अशा दानधर्माला म्हटले आहे.

**१३)** ही 'सदका' या शब्दाची अतिशयोक्ती आहे. सादिक म्हणजे सच्चा आणि सिद्दीक म्हणजे अत्यंत सच्चा. अभिप्रेत आहे असा सत्यवादी मनुष्य ज्यात कसल्याही प्रकारचा खोटेपणा नसावा, जो कधीही सत्य आणि सचोटीपासून ढळला नसावा, तो आपल्या सद्सद्विवेक बुद्धीच्याविरूद्ध एखादी गोष्ट उच्चारेल अशी ज्याकडून अपेक्षा केली जाऊ शकत नसेल, ज्याने जी कोणती गोष्ट मानली असेल ती अंत:करणापासून मानली असावी. तिच्याशी प्रामाणिक राहण्याच्या कर्तव्याची पूर्ती केली असावी आणि आपल्या कृतीने असे सिद्ध केले असावे की खरोखरी तो तसाच मानणारा आहे जसे एखाद्या मानणाऱ्यास असले पाहिजे.

**१४)** 'शहीद'ने अभिप्रेत या ठिकाणी असा मनुष्य आहे ज्याने आपल्या उक्ती व कृतीने सत्याची ग्वाही दिली असावी.



बडेजाव करणे आणि संपत्ती व संततीमध्ये एक दुसऱ्यावर मात करण्याचा प्रयत्न करणे होय. याची उपमा अशी होय जणू एक पाऊस पडला तर त्याने उत्पन्न होणाऱ्या वनस्पतींना पाहून शेतकरी आनंदित झाले, मग तीच शेती पिकते आणि ती पिवळी पडल्याचे तुम्ही पाहता, मग ती भुसा बनून राहते. याउलट परलोक ते स्थान होय जेथे कठोर यातना आहे आणि अल्लाहची क्षमा व त्याची प्रसन्नता आहे. जगातील जीवन एका फसव्या सामग्रीशिवाय अन्य काहीच नाही. धावा, आणि एक दुसऱ्याच्या पुढे जाण्याचा प्रयत्न करा आपल्या पालनकर्त्याच्या क्षमा आणि त्या स्वर्गाकडे जिचा विस्तार आकाश आणि पृथ्वीसमान आहे,[१५] जी उपलब्ध केली गेली आहे त्या लोकांसाठी ज्यांनी अल्लाह आणि त्याच्या प्रेषितांवर श्रद्धा ठेवली आहे. हा अल्लाहचा कृपाप्रसाद आहे, ज्याला इच्छितो त्याला प्रदान करतो, आणि अल्लाह मोठा कृपानिधी आहे. (२०-२१)

कोणतीही विपत्ती अशी नाही जी पृथ्वीवर अथवा तुमच्या स्वत:वर कोसळत असते आणि आम्ही तिला निर्माण करण्यापूर्वी एका ग्रंथात (अर्थात विधी-लेखात) लिहिलेली नसते. असे करणे अल्लाहसाठी अत्यंत सोपे काम आहे. (हे सर्वकाही अशासाठी आहे) जेणेकरून जी काही हानी तुम्हाला होईल त्यावर तुम्ही विषण्ण होऊ नये आणि जे काही अल्लाह तुम्हाला प्रदान करील त्यावर तुम्ही फुगून जाऊ नये. अल्लाह अशा लोकांना पसंत करीत नाही जे आपल्या स्वत:ला फार मोठे समजतात आणि घमेंड दाखवितात, जे स्वत: कंजुषपणा करतात आणि दुसऱ्यांना कंजुषपणा करण्यास प्रोत्साहित करतात. आता जर कोणी तोंड फिरवीत असला तर अल्लाह निरपेक्ष आणि स्तुत्य गुण-संपन्न आहे. (२२-२४)

आम्ही आपल्या प्रेषितांना अगदी स्पष्ट संकेतचिन्हे व सूचनेसहित पाठविले, आणि त्यांच्याबरोबर ग्रंथ आणि तुळा उतरविली जेणेकरून लोकांनी न्यायाधिष्ठित व्हावे,[१६]

**१५)** सदरहू आयत सूरह आले इम्रानातील आयत क्र. १३३ बरोबर मिळवून वाचली असता मनात काही अशी कल्पना येते की स्वर्गात माणसाला जी उद्याने व महाल मिळतील ते तर केवळ त्याच्या निवासासाठी असतील परंतु वास्तविकपणे संपूर्ण सृष्टीच त्याच्यासाठी पर्यटनस्थान म्हणून असेल.

**१६)** या लहानशा वाक्यात संपूर्ण प्रेषित वर्गाच्या प्रचारकार्याच्या उद्दिष्टाचे सार पूर्णपणे सांगितलेले आहे. जगात ईश्वराचे जितकेही प्रेषित सर्वोच्च अल्लाहकडून आले त्या सर्वांनी तीन गोष्टी आणल्या होत्या. (१) उघड उघड संकेतचिन्हे (बय्यनात), उज्ज्वल प्रमाण पुरावे आणि स्पष्ट सूचना व आदेश (२) ग्रंथ, ज्यात ती सर्व शिकवण लिहिलेली होती जी माणसाच्या मार्गदर्शनासाठी आवश्यक होती जेणेकरून मार्गदर्शनासाठी लोकांनी त्याकडे रुजू व्हावे (३) तुळा (मीजान) म्हणजे सत्य व असत्यामधील ते प्रमाण जे तराजूसमान तोलन करून हे दाखवीत असावे की विचार, नीती, आणि व्यवहारातील न्यूनाधिक्क्यातील निरनिराळ्या परिसीमेच्या दरम्यान न्यायोचित गोष्ट कोणती आहे.

आणि लोखंड उतरविले ज्यात मोठे बळ आहे आणि लोकांसाठी फायदे आहेत,[१७] हे अशासाठी केले गेले आहे की अल्लाहला माहीत व्हावे की कोण न पाहता त्याला व त्याच्या पैगंबरांना मदत करतो. निश्चितच अल्लाह मोठा बलवान आणि जबरदस्त आहे. (२५)

आम्ही नूह (अ.) आणि इब्राहीम (अ.) ना पाठविले आणि त्या दोघांच्या वंशात प्रेषितत्व आणि ग्रंथ ठेवले. मग त्यांच्या संततीपैकी काहींनी मार्गदर्शन स्वीकारले आणि बरेचसे अवज्ञाकारी बनले. त्यांच्यानंतर आम्ही लागोपाठ आपले प्रेषित पाठविले, आणि त्या सर्वांनंतर मरयम पुत्र ईसा (अ.) ला पाठविले आणि त्याला इंजील प्रदान केली, आणि ज्या लोकांनी त्याचे अनुयायित्व स्वीकारले त्यांच्या हृदयांत आम्ही करुणा आणि दया घातली, आणि वैराग्य,[१८] त्यांनी स्वत:च काढले, आम्ही ते त्यांच्यासाठी कर्तव्य म्हणून ठरविले नव्हते, परंतु अल्लाहच्या प्रसन्नतेच्या शोधात त्यांनी स्वत:च ही बिदअत (कुप्रथा) काढली आणि मग त्यावर कायम राहण्याचे जे कर्तव्य होते त्यांनी ते पूर्ण केले नाही. त्यांच्यापैकी ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली होती त्यांचा मोबदला आम्ही त्यांना प्रदान केला, परंतु त्यांच्यापैकी बहुतेकजण अवज्ञाकारी आहेत. (२६-२७)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा आणि त्याचे पैगंबर (मुहम्मद (स.)) यांच्यावर श्रद्धा ठेवा, अल्लाह तुम्हाला आपल्या कृपेचा दुहेरी वाटा प्रदान करील, आणि तुम्हाला असे तेज प्रदान करील ज्याच्या प्रकाशात तुम्ही चालाल, आणि तुमचे अपराध माफ करील, अल्लाह मोठा क्षमा करणारा आणि मेहरबान आहे. (तुम्ही असे वर्तन अवलंबिले पाहिजे) जेणेकरून ग्रंथधारकांना हे कळावे की अल्लाहच्या कृपेवर त्यांची काही मक्तेदारी नाही. आणि असे की अल्लाहची कृपा त्याच्या स्वत:च्याच हातात आहे, ज्याला इच्छितो त्याला प्रदान करतो, आणि तो महान कृपानिधी आहे. (२८-२९)

**१७)** प्रेषितांच्या प्रचारकार्यातील उद्दिष्टे सांगितल्यानंतर लगेच असे फर्माविणे स्वत:च या गोष्टीकडे निर्देश करते की या ठिकाणी लोखंडाने अभिप्रेत राजकीय आणि युद्धशक्ती आहे. वाणीतील उद्देश असा की सर्वोच्च अल्लाहने आपल्या प्रेषितांना न्याय प्रस्थापनेची केवळ एक योजना प्रस्तुत करण्यासाठी नियुक्त केले होते असे नाही तर त्याच्या उद्दिष्टात या गोष्टीचाही समावेश होता की ती योजना प्रत्यक्ष व्यवहारात आणण्याचा प्रयत्न केला जावा व ती शक्ती उपलब्ध केली जावी जेणेकरून प्रत्यक्षपणे न्याय प्रस्थापित होऊ शकावा, ती योजना उधळून लावणाऱ्यांना शिक्षा करता यावी आणि तिला प्रतिकार करणाऱ्यांचे बळ नाहीसे करता यावे.

**१८)** वैराग्य याचा अर्थ संसार त्याग करणे व सांसारिक जीवनातून पळ काढून पर्वत आणि रानावनांचा आश्रय घेणे अथवा एकांतवासात बसून राहणे होय.



# ५८ सूरह अल्मुजादला

*(मदीनाकालीन, वचने २२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अल्लाहने[१] ऐकले त्या स्त्रीचे म्हणणे जी आपल्या पतीसंबंधी तुमच्याशी तक्रार करीत आहे आणि अल्लाहकडे फिर्याद करीत आहे. अल्लाह तुम्हा दोघांचे संभाषण ऐकत आहे, तो सर्वकाही ऐकणारा व पाहणारा आहे. तुमच्यापैकी जे लोक आपल्या पत्नीशी 'जिहार' करतात[२] त्यांच्या पत्नीं त्यांच्या माता नव्हेत, त्यांच्या माता तर त्याच होत ज्यांनी त्यांना जन्म दिले आहे. हे लोक एक अत्यंत अप्रिय आणि खोटी गोष्ट बोलत आहेत, आणि वास्तविकता अशी आहे की अल्लाह मोठा माफ करणारा व क्षमाशील आहे.[३] (१-२)

हे लोक आपल्या पत्नींशी 'जिहार' करतील आणि मग त्या आपल्या शब्दापासून

**१)** सदरहू आयत 'खव्ला बिन्ते सातबा' नावाच्या एका स्त्रीच्या मामल्यात उतरली होती. त्या महिलेशी त्यांच्या पतीने 'जिहार' केला होता म्हणून त्या पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याकडे विचारण्यास आल्या होत्या की या संबंधाने इस्लाम काय आज्ञा सांगतो. त्यावेळपर्यंत 'जिहार' संबंधाने सर्वोच्च अल्लाहकडून कोणतीच आज्ञा उतरलेली नसल्या कारणाने पैगंबर (स.) यांनी सांगितले, तू आपल्या पतीसाठी 'हराम' झाली असावी अशी माझी कल्पना आहे. यावरून त्या आर्जवे करू लागल्या की माझे व माझ्या मुलांबाळांचे आयुष्य नष्ट होईल. जेव्हा त्या रडून रडून पैगंबर (स.) यांना विनंती करीत होत्या की माझ्या घराचे वाटोळे होण्याचे थांबावे असा एखादा उपाय सांगा, अशा परिस्थितीत सर्वोच्च अल्लाहकडून 'वही' उतरली व या बाबतचा आदेश सांगितला गेला.

**२)** अरबस्तानात काही प्रसंगी जेव्हा पती व पत्नी दरम्यान भांडण होत असे तेव्हा स्थिती अशी होत असे की रागाच्या भरात पती, पत्नीला म्हणत असे, ''तू माझ्यासाठी तशीच आहे जशी माझ्या आईची पाठ'' याचा खरा अर्थ असा होत असे, ''तुझ्याशी संभोग करणे माझ्यासाठी असे आहे जसे मी आपल्या आईशी संभोग करावा.'' या काळातदेखील काही नादान लोक पत्नीशी भांडून तिला आई, बहीण व मुलीची उपमा देऊन टाकतात. याचा स्पष्ट अर्थ असा होतो की तो जणू तिला पत्नी नव्हे तर त्याच्यासाठी ज्या स्त्रिया हराम आहेत, त्या स्त्रियांसमान मानतो. याच कृतीला जिहार असे म्हणतात. अज्ञानाच्या काळात अरबवासींच्या येथे ही गोष्ट 'तलाक' किंबहुना त्याहूनही जास्त तीव्रपणे संबंध तोडण्याची घोषणा मानली जात असे.

**३)** म्हणजे हे कृत्य तर असे आहे की ज्यासाठी माणसाला फारच कडक शिक्षा मिळाली पाहिजे परंतु प्रथम तर सर्वोच्च अल्लाहने 'जिहार'च्या बाबतीत अज्ञानाच्या काळातील नियम रद्दबातल ठरवून तुमचे कौटुंबिक जीवन उद्ध्वस्त होण्यापासून वाचविले. दुसरे असे की हे कृत्य करणाऱ्यासाठी शिक्षाही ती योजली जी या अपराधाची अत्यंत सौम्य शिक्षा ठरू शकते.

परत फिरतील जे त्यांनी उच्चारले होते,[४] तर यापूर्वी की उभयतांनी एकमेकांस स्पर्श करावे, एक गुलाम मुक्त करावा लागेल. याद्वारे तुम्हाला उपदेश केला जात आहे, आणि जे काही तुम्ही करता अल्लाह त्याची खबर राखणारा आहे.[५] आणि ज्या व्यक्तीला गुलाम उपलब्ध होत नसेल त्याने दोन महिने निरंतर उपवास करावेत यापूर्वी की उभयतांनी एकमेकांस स्पर्श करावा.[६] आणि ज्याला हे सामर्थ्यही नसेल त्याने साठ गरिबांना जेवण घालावे.[७] (३-४-)

ही आज्ञा अशासाठी दिली जात आहे की तुम्ही अल्लाह व त्याच्या पैगंबरावर श्रद्धा ठेवावी.[८] या अल्लाहने निश्चित केलेल्या मर्यादा होत आणि अश्रद्धावंतांसाठी यातनादायक शिक्षा आहे. जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतात ते त्याचप्रकारे अपमानित व फटफजित केले जातील ज्याप्रकारे त्यांच्या पूर्वीचे लोक अपमानित व फटफजित केले गेले आहेत. आम्ही अगदी स्पष्ट वचने अवतरली आहेत, आणि इन्कार करणाऱ्यांसाठी अपमानाचा प्रकोप आहे. त्यादिवशी (हा अपमानास्पद प्रकोप होणार आहे) जेव्हा अल्लाह त्या सर्वांना पुन्हा जिवंत करून उठवील आणि त्यांना दाखवील की ते काय काय करून आलेले आहेत. ते विसरले आहेत परंतु अल्लाहने त्यांचे सर्व केले सवरलेले मोजून सुरक्षित केले आहे, आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीवर साक्षी आहे. (-४-६)

काय तुम्हाला माहीत नाही की पृथ्वी आणि आकाशांच्या प्रत्येक वस्तूचे अल्लाहला

---

४) याचे दोन अर्थ असू शकतात. एक असा की त्यांनी जी गोष्ट उच्चारली होती त्यावर उपाययोजना केली पाहिजे. दुसरा असा की ही गोष्ट उच्चारून त्यांनी स्वत:साठी जिला हराम करू इच्छिले होते ती हलाल करण्याची इच्छा धरावी.

५) म्हणजे माणसाने जर गुपचुपपणे घरात पत्नीशी 'जिहार' केला व मग कफ्फारा - प्रायश्चित केल्याविना पती व पत्नीच्या दरम्यान पूर्वीप्रमाणे संबंध चालत राहिले, तर जगात भलेही कुणालाही हे माहीत नसो, अल्लाहला तर खचितच ते माहीत असणार, अल्लाहच्या पकडीतून त्याचे वाचणे कोणत्याही प्रकारे शक्य होणार नाही.

६) म्हणजे अखंडपणे दोन महिनेपर्यंत रोजे करावेत, मध्ये एकही रोजा सुटू नये.

७) म्हणजे दोन वेळेचे पोटभर जेवण दिले जावे. मग ते शिजवलेले असो की शिधा स्वरूपात असो. ६० माणसांना एकाच दिवशी पोटभर जेवण दिले जावे अथवा एकाच माणसाला ६० दिवसांपर्यंत जेवण दिले जावे.

८) येथे 'ईमान आणण्या'ने अभिप्रेत खऱ्या आणि प्रामाणिक मुसलमानांसमान वर्तन अंगिकारले पाहिजे, असे आहे.



ज्ञान आहे?[९] असे कधीही घडत नाही की तीन माणसांमध्ये एखादी कानगोष्ट होते आणि त्यांच्या दरम्यान चौथा अल्लाह नसतो अथवा पाच माणसांमध्ये कानगोष्ट होते आणि त्यांच्या दरम्यान सहावा अल्लाह नसतो. गुप्त गोष्ट करणारे मग ते यापेक्षा कमी असोत किंवा जास्त, जेथे कोठे ते असतील अल्लाह त्यांच्या समवेत असतो. मग पुनरुत्थानाच्या दिवशी तो त्यांना दाखवून देईल की त्यांनी काय काय केलेले आहे. अल्लाह सर्व वस्तूंचे ज्ञान राखतो. काय तुम्ही पाहिले नाही त्या लोकांना ज्यांना कानगोष्टी करण्याची मनाई केली गेली होती, तरीसुद्धा ते तेच कृत्य करीत जात आहेत, ज्याची त्यांना मनाई केली गेली होती? हे लोक लपून छपून आपापसांत गुन्हा आणि आगळिकी व पैगंबरांच्या अवज्ञेच्या गोष्टी करतात, आणि जेव्हा तुमच्याजवळ येतात तेव्हा तुम्हाला त्या पद्धतीने सलाम करतात ज्या पद्धतीने अल्लाहने तुम्हाला सलाम केलेले नाही.[१०] आणि आपल्या मनात म्हणतात की आमच्या या गोष्टीवर अल्लाह आम्हाला यातना का देत नाही? त्यांच्यासाठी नरकच पुरेसा आहे. तिचेच ते इंधन बनतील, फारच वाईट शेवट आहे त्यांचा. (७-८)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जेव्हा तुम्ही आपापसात गुप्त गोष्ट कराल तेव्हा पाप, आणि आगळीक व पैगंबरांच्या अवज्ञेच्या गोष्टी नव्हे तर सदाचार आणि ईशपरायणतेच्या गोष्टी करा आणि त्या अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगत रहा ज्याच्या पुढे तुम्हाला एकत्र हजर व्हावयाचे आहे. कानगोष्टी तर एक शैतानी कृत्य आहे आणि त्या यासाठी केल्या जातात की श्रद्धा ठेवणारे लोक त्यामुळे दु:खी व्हावेत. वस्तुत: अल्लाहच्या आज्ञेविना त्या त्यांना काहीही हानी पोहचवू शकत नाहीत आणि श्रद्धावंतांनी अल्लाहवरच भिस्त ठेवली पाहिजे. (९-१०)

---

९) येथून आयत क्र. १० पर्यंत सतत दांभिकांच्या त्या वर्तनाचा समाचार घेतलेला आहे जे त्यांनी त्यावेळी मुस्लिम समाजात राहताना अंगिकारलेले होते. ते वरवर मुसलमानांच्या जमातीत सामील होते परंतु आतल्या आत त्यांनी श्रद्धावंतांपासून वेगळा आपला एक गट बनविलेला होता. मुसलमान जेव्हाही त्यांना पाहात, ते आपापसात डोक्याला डोके भिडवून कुजबुजत असल्याचे, त्यांना दिसे. अशाच गुप्त गुप्त कानगोष्टींत ते मुसलमानांमध्ये फाटाफूट, उपद्रव आणि दहशतीचे वातावरण निर्माण करण्यासाठी नाना तऱ्हेच्या योजना तयार करीत व नवनव्या अफवा उठवीत असत.

१०) हे यहूदी आणि दांभिकांचे संयुक्त वर्तन होते. अनेक निवेदनांत असे आलेले आहे की काही यहूदी पैगंबर (स.) यांच्या सेवेत हजर झाले व त्यांनी "आस्साम अलैक या अवलकासिम" असे उच्चारले, म्हणजे 'असाम'चा उच्चार काही अशा पद्धतीने केला की ऐकणाऱ्याला वाटावे 'सलाम' सांगितले आहे परंतु वास्तविकपणे त्यांनी 'साम' उच्चारले होते ज्याचा अर्थ मृत्यू असा होतो.

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जेव्हा तुम्हाला सांगितले जाईल की आपल्या बैठकींमध्ये विस्तार आणा तेव्हा जागा विस्तृत करीत जा, अल्लाह तुम्हाला विस्तृतता प्रदान करील[११] आणि जेव्हा तुम्हाला सांगितले जाईल की उठा, तेव्हा उठत जा.[१२] तुम्हापैकी जे लोक श्रद्धावंत आहेत आणि ज्यांना ज्ञान प्रदान केले गेले आहे - अल्लाह त्यांना उच्च दर्जे प्रदान करील आणि जे काही तुम्ही करता; अल्लाहला त्याची खबर आहे. (११)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जेव्हा तुम्ही पैगंबरांशी एकांतात बोलाल तेव्हा बोलण्यापूर्वी काही दान करा,[१३] हे तुमच्यासाठी उत्तम आणि अधिक पवित्र आहे परंतु जर दान करण्यासाठी काही उपलब्ध होत नसेल तर अल्लाह क्षमाशील व परमकृपाळू आहे. (१२)

काय तुम्ही या गोष्टीने भयभीत झालात की एकांतात बोलणी करण्यापूर्वी तुम्हाला दान करावे लागेल? बरे, जर तुम्ही असे केले नाही - आणि अल्लाहने तुम्हाला हे माफ केले - तर नमाज कायम करीत रहा, जकात देत रहा आणि अल्लाह व त्याच्या पैगंबरांची आज्ञा पाळीत रहा, तुम्ही जे काही करता अल्लाह त्याची खबर राखणारा आहे.[१४] (१३)

काय तुम्ही पाहिले नाही त्या लोकांना ज्यांनी मित्र बनविले आहे एका अशा

**११)** अल्लाह व त्याच्या पैगंबराने मुसलमानांना जे शिष्टाचार शिकविले आहेत त्यापैकी एक गोष्ट अशीही आहे की जेव्हा एखाद्या सभेत अगोदरपासून काही लोक बसलेले असतील नंतर आणखीन काही लोक आले तर स्वत: होऊन नवीन आलेल्यांना जागा द्यावी व शक्य तितके आवळून व एकवटून त्याच्यासाठी जागा निर्माण करावी. इतका सुसंस्कृतपणा पूर्वीपासून बसलेल्या लोकांत असला पाहिजे तसेच जबरदस्तीने अगोदरपसून बसलेल्यांच्यामध्ये शिरू नये व कुणाही इसमाने दुसऱ्याला उठवून त्याच्या जागी बसण्याचा प्रयत्न करू नये इतकी सभ्यता नंतर येणाऱ्या लोकात असली पाहिजे.

**१२)** म्हणजे जेव्हा सभा बरखास्त करण्याचे सांगितले जाईल तेव्हा उठून जायला पाहिजे, ठाण मांडून बसायला नको.

**१३)** हजरत अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) या आदेशांचे कारण असे सांगतात की लोक पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याकडे फार जास्त प्रमाणात व आवश्यकतेविनाच एकांतात भेट घेण्याची विनंती करू लागले होते.

**१४)** ही दुसरी आज्ञा पहिल्या आज्ञेच्या थोड्या काळानंतर उतरली व त्यामुळे 'दान' देण्याची आज्ञा रद्द ठरली. 'दान'चा हा आदेश किती काळापर्यंत राहिला याबाबतीत मतभिन्नता आहे. 'कतादा' म्हणतात की एका दिवसापेक्षाही कमी काळ राहिला, नंतर रद्द केला गेला. मुकातिल बिन हय्यान म्हणतात की, 'दहा दिवसांपर्यंत राहिला'. ही या आदेशाच्या राहण्याची जास्तीत जास्त मुदत आहे जी कुणा निवेदनात सांगितलेली आहे.



लोकसमूहाला ज्यावर अल्लाहचा कोप आहे? ते तुमचेही नाहीत आणि त्यांचेही नाहीत, आणि ते जाणूनबुजून खोट्या गोष्टींवर शपथा घेतात. अल्लाहने त्यांच्यासाठी भयंकर यातना उपलब्ध करून ठेवल्या आहेत, फारच वाईट कृत्ये आहेत ती जे ते करीत आहेत. त्यांनी आपल्या शपथांना ढाल बनवून टाकले आहे ज्यांचा आडोसा घेऊन ते अल्लाहच्या मार्गापासून लोकांना रोखतात. यामुळे त्यांच्यासाठी अपमानास्पद यातना आहेत. अल्लाहपासून वाचविण्यासाठी त्यांची मालमत्ताही काही उपयोगी पडणार नाही की त्यांची संतती. ते नरकाचे सोबती आहेत, त्यातच ते सदैव राहतील. ज्या दिवशी अल्लाह त्यासर्वांना उठवील, ते त्याच्यासमोर तशाच शपथा घेतील जशा ते तुमच्यासमोर घेतात आणि ते आपल्याठायी असे समजतील की याच्याने त्यांचे काही काम साधेल, चांगले समजून असा, ते पराकोटीचे लबाड आहेत. शैतान त्यांच्यावर स्वार झालेला आहे आणि त्याने त्यांच्या मनातून अल्लाहच्या स्मरणाचा विसर पाडला आहे. ते शैतानाच्या पार्टीचे लोक होत. सावध रहा, शैतानाच्या पार्टीचेच लोक तोट्यात राहणारे आहेत. निश्चितच नीचतम लोकांपैकी आहेत ते लोक जे अल्लाह व त्याच्या पैगंबराचा मुकाबला करतात. अल्लाहने लिहून टाकले आहे की मी आणि माझे प्रेषितच वरचढ ठरू, खरोखरच अल्लाह जबरदस्त आणि बलवान आहे. (१४-२१)

तुम्हाला असे कधीही आढळणार नाही की जे लोक अल्लाह आणि मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवणारे आहेत ते त्या लोकांवर प्रेम करीत असतील ज्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला आहे, मग ते त्यांचे वडील असोत अथवा त्यांचे पुत्र, किंवा त्यांचे भाऊ अथवा त्यांची कुटुंबीय मंडळी, हे ते लोक होत ज्यांच्या हृदयात अल्लाहने श्रद्धा दृढ केली आहे आणि आपल्याकडून एक आत्मा प्रदान करून त्यांना शक्ती प्रदान केली आहे. तो त्यांना अशा स्वर्गामध्ये दाखल करील ज्यांच्याखालून कालवे वाहत असतील. त्यांच्यात ते सदैव राहतील. अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला आणि ते अल्लाहशी खुश झाले. ते अल्लाहच्या पार्टीचे लोक आहेत. सावधान, अल्लाहच्या पार्टीचेच लोक सफलता प्राप्त करणारे आहेत. (२२)

# ५९ सूरह अल्हश्र

*(मदीनाकालीन, वचने २४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अल्लाहचेच पावित्र्यगान केले आहे त्या प्रत्येक वस्तूने जी आकाशांत व पृथ्वीत आहे, आणि तोच प्रभुत्वसंपन्न आणि बुद्धिमान आहे. तोच आहे ज्याने ग्रंथधारी अश्रद्धावंतांना पहिल्याच हल्ल्यात त्यांच्या घरांतून काढून घालवून लावले.[१] तुम्हाला याची कल्पनादेखील नव्हती की ते निघून जातील आणि तेही असे समजून बसले होते की त्यांच्या गढ्या त्यांना अल्लाहपासून वाचवतील परंतु अल्लाह अशा रोखाने त्यांच्यावर आला जिकडे त्यांचे लक्षसुद्धा गेले नव्हते.[२] त्याने त्यांच्या हृदयांत वचक बसविला. परिणाम असा झाला की ते स्वत:देखील आपल्या हाताने आपल्या घरांना उद्ध्वस्त करीत होते आणि श्रद्धावंतांच्या हातूनसुद्धा उद्ध्वस्त करवीत होते. म्हणून बोध घ्या हे डोळसपणा बाळगणाऱ्यांनो! (१-२)

जर अल्लाहने त्यांच्या वाट्यात देशांतर लिहिले नसते तर जगातच त्याने त्यांच्यावर प्रकोप केला असता.[३] आणि मरणोत्तर जीवनामध्ये तर त्यांच्यासाठी नरकाग्नीचा

**१)** ग्रंथधारक अश्रद्धावंतांनी अभिप्रेत या ठिकाणी यहुदींपैकी बनू नजीर जमात आहे. ही जमात मदीनेतील एका भागात राहात असे. त्या जमातीशी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचा करार झालेला होता परंतु वारंवार या जमातीने करारभंग केला. सरतेशेवटी माहे रबिउल अव्वल हि. स. ४ मध्ये पैगंबर (स.) यांनी त्या लोकांना मदीनेतून चालते व्हावे किंवा युद्धासाठी तयार व्हावे अशी नोटीस बजावली. त्यांनी मदीना सोडण्यास नकार दिला, म्हणून पैगंबर (स.) यांनी मुसलमानांचे सैन्य घेऊन त्यांच्यावर हल्ला चढविला. अद्याप युद्धाला तोंडही फुटले नव्हते की त्यांनी देशबाह्य होणे मान्य केले वस्तुत: त्यांच्या गढी फार मजबूत होत्या. त्यांची संख्याही मुसलमानांपेक्षा काही कमी होती असे नाही. युद्ध साहित्यदेखील त्यांच्याजवळ भरपूर होते.

**२)** अल्लाहचे त्यांच्यावर येणे या अर्थाने नव्हे की अल्लाह एखाद्या दुसऱ्या ठिकाणी होता व मग तेथून त्यांच्यावर चाल करून आला. तर ही उपलक्षणात्मक भाषाशैली आहे. मूळ हेतू याची कल्पना देणे होय की मुसलमानांच्या हल्ल्याअगोदर त्यांची अशी कल्पना होती की बाहेरून जर एखादा हल्ला झाला तर आम्ही आमच्या तटबंदीद्वारे तो थोपवून धरू परंतु सर्वोच्च अल्लाहने अशा मार्गाने त्यांच्यावर हल्ला केला जिकडून एखादी आपत्ती येण्याची त्यांना कोणतीही अपेक्षा नव्हती. तो मार्ग असा की त्याने आतून त्यांचे धैर्य आणि प्रतिकारशक्ती खचवून टाकली, त्यानंतर न त्यांची शस्त्रास्त्रे त्यांच्या काही उपयोगी पडू शकत होती न त्यांच्या भक्कम गढी.

**३)** जगातील प्रकोपाने अभिप्रेत आहे त्यांचे नावनिशाण मिटवून टाकणे. जर ते तह करून आपले प्राण वाचविण्याऐवजी लढले असते तर त्याचा पूर्णपणे बिमोड झाला असता.



प्रकोप आहेच. हे सर्वकाही अशासाठी घडले की त्यांनी अल्लाह आणि त्यांच्या पैगंबराचा मुकाबला केला आणि जो कोणी अल्लाहचा मुकाबला करील; अल्लाह त्याला शिक्षा करण्यात अत्यंत कठोर आहे. तुम्ही लोकांनी खजुरीची जी झाडे कापली अथवा ज्यांना आपल्या मुळावर उभे राहू दिले हे सर्व अल्लाहच्या आज्ञेनेच होते.[४] आणि (अल्लाहने ही आज्ञा अशासाठी दिली) जेणेकरून अवज्ञाकारींना अपमानित करावे.[५] (३-५)

आणि जे माल[६] अल्लाहने त्यांच्या कब्जातून काढून आपल्या पैगंबराकडे वळविले[७] ते असले माल नव्हेत ज्यांच्यावर तुम्ही आपले घोडे व आपले उंट दौडविले

**४)** हा संकेत आहे या मामल्याकडे की बनू नजीर जमातीच्या वस्तीच्या सभोवती खजुरीच्या ज्या बागा उभ्या होत्या त्यांच्यातील बरेचशी झाडे मुसलमानांनी वेढ्याच्या प्रारंभी तोडून टाकली अथवा जाळून टाकली जेणेकरून वेढा सुलभतेने देता यावा व जी झाडे सैन्य हालचालीच्या आड येत नव्हती त्यांना उभे राहू दिले. यावर मदीनेतील दांभिक आणि यहूदींनी आरडाओरड केली की मुहम्मद (स.) हे तर जमिनीवर उपद्रव माजविण्याची मनाई करतात. परंतु हे पहा, हिरवीगार, फळे देणारी झाडे तोडली जात आहेत. हे जमिनीवर उपद्रव माजविणे नाही तर अन्य काय आहे? म्हणून सर्वोच्च अल्लाहने सदरहू आज्ञा उतरविली की तुम्ही लोकांनी जी झाडे तोडली व ज्याना उभे राहू दिले, त्यापैकी कोणतीही कृती अवैध नाही तर दोन्ही अल्लाहच्या आज्ञेबरहुकूम आहेत. **५)** म्हणजे अल्लाहचा इरादा असा होता की या वृक्षतोडीनेही ते अपमानित व फटफजित व्हावेत व न तोडण्यानेदेखील. झाडे तोडण्यात त्यांच्या अपमान व फटफजितीचा पैलू असा होता की ज्या बागा त्यांनी आपल्या हातांनी लावल्या होत्या व ज्यांचे दीर्घ काळापासून ते मालक म्हणून मिरवीत आले होते, त्यातील झाडे त्यांच्या डोळ्यादेखत तोडली जात होती व ती तोडणाऱ्यांना ते कोणत्याही प्रकारे रोखू शकत नव्हते. उरला झाडे न तोडण्यात त्यांचा अपमान व फटफजितीचा पैलू तर तो असा की जेव्हा ते मदीनेबाहेर निघाले तेव्हा आपल्या डोळ्यांनी ते पाहात होते की कालपर्यंत ज्या हिरव्यागार बागा त्यांच्या मालकीच्या होत्या आज त्या मुसलमानांच्या ताब्यात जात आहेत. त्यांच्या आवाक्यात असते तर त्यांनी ती पूर्णपणे उद्ध्वस्त केली असती व सुस्थितीत असे एकही झाड मुसलमानांच्या ताब्यात जाऊ दिले नसते. परंतु निमुटपणे सर्वकाही जसेच्या तसेच सोडून अत्यंत निराशेच्या अवस्थेत ते निघाले. **६)** आता त्या मालमत्तेचा व जायदादीचा उल्लेख होत आहे ज्या पूर्वी बनू नजीरच्या मालकीच्या होत्या व त्यांचे देशांतर झाल्यानंतर इस्लामी राज्याच्या ताब्यात आल्या. त्यांची व्यवस्था कशा पद्धतीने करावी हे, येथून ते आयत क्र. १० पर्यंत सर्वोच्च अल्लाहने सांगितले आहे. **७)** या शब्दावरून अनायासे हा अर्थ निघतो की ही पृथ्वी व त्या सर्व वस्तू ज्या येथे आढळतात, खरे तर जे वैभवशाली अल्लाहशी द्रोह करणारे आहेत अशा लोकांचा, त्यांच्यावर हक्क नाही, म्हणून एका वैध व सत्याधिष्ठित युद्धाच्या परिणामी जी जी मालमत्ता अश्रद्धावंतांच्या ताब्यातून निघून श्रद्धावंतांच्या ताब्यात यावी, तर त्या मालमत्तेच्या खऱ्या मालकाने आपल्या भ्रष्ट आणि द्रोही नोकरांच्या ताब्यातून काढून घेऊन आपल्या आज्ञाधारक नोकरांकडे वळविली आहे असे तिचे खरे स्वरूप आहे. म्हणून अशा मालमत्तेला इस्लामी कायद्याच्या परिभाषेत फय् (परत आणलेली मालमत्ता) ठरविले गेले आहे.

असावे, तर अल्लाह आपल्या प्रेषितांना ज्यावर इच्छितो ताबा बहाल करतो, आणि अल्लाहला प्रत्येक वस्तूवर सामर्थ्य प्राप्त आहे.[८] जे काही अल्लाह वस्तींच्या लोकाकडून आपल्या पैगंबराकडे वळवील ते अल्लाह आणि पैगंबर व नातेवाईक[९] आणि अनाथ व गोरगरीब आणि प्रवाशांसाठी आहे जेणेकरून ते तुमच्या श्रीमंतांच्या दरम्यानच भ्रमण करीत राहू नये.[१०] जे काही पैगंबर तुम्हाला देईल ते घ्या आणि ज्या गोष्टीची तो तुम्हाला मनाई करील त्यापासून अलिप्त रहा. अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, अल्लाह कठोर शिक्षा देणारा आहे.[११] (तसेच तो माल) त्या गरीब स्थलांतर केलेल्यांसाठी आहे जे

८) म्हणजे सदरहू मालमत्तेचे मुसलमानांच्या ताब्यात येणे प्रत्यक्षपणे लढणाऱ्या फौजेच्या बाहुबळाचा परिणाम नव्हे तर अल्लाहने आपले पैगंबर व त्याचे राष्ट्र व त्याने प्रस्थापित केलेल्या व्यवस्थेला एकंदरीतपणे जी शक्ती बहाल केली आहे तिचा हा परिणाम होय. म्हणून सदरहू मालमत्ता गनीम मालापासून अगदी भिन्न स्वरूपाची आहे. लढाईनंतर हाती आलेल्या गनीममालाप्रमाणेच याचेही सैन्यात वाटप केले जाणे असा लढणाऱ्या फौजेला हक्क पोहचत नाही. अशाप्रकारे 'शरीअत'ने गनीम माल, आणि फय्, यांच्यासाठी वेगवेगळे आदेश दिले आहेत. 'गनीमत' म्हणजे अशी जंगम मालमत्ता होय जी युद्धाची कारवाई होत असताना शत्रूच्या सैन्याकडून हस्तगत होते. त्याशिवाय शत्रूच्या जमिनी, घरेदारे आणि इतर जंगम व स्थावर मालमत्ता गनीमत मध्ये मोडत नाही ती फय् मध्ये मोडते.

९) नातेवाईकांनी अभिप्रेत अल्लाहचे पैगंबर (स.) यांचे नातेवाईक आहेत, अर्थात बनी हाशिम व बनी मुत्तलिब. हा वाटा यासाठी ठेवला गेला होता की पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांनी स्वत: व स्वत:च्या कुटुंबियांचे हक्क व जबाबदाऱ्या पार पाडण्याबरोबरच त्यांच्या अशा नातेवाईकांचे हक्कही फेडू शकावेत जे त्यांच्या सहाय्याचे मोहताज असावेत अथवा ज्यांना सहाय्य करण्याची त्यांना गरज भासावी. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या निधनानंतर हा वेगळ्या व कायमस्वरूपी हक्काच्या रूपाने उरला नाही तर मुसलमानांपैकी इतर गोरगरीब, अनाथ आणि वाटसरूंसमवेत बनी हाशिम व बनी मुत्तलिब वंशातील मोहताज लोकांचे हक्कदेखील बैतुलमाल - सरकारी खजिन्याच्या जिम्मे लागू झाले, तथापि जकातमध्ये त्यांचा वाटा नसल्या कारणाने इतरांच्या हक्कावर त्यांना प्राधान्य दिले गेले.

१०) दिव्य कुरआनातील महत्वपूर्ण तात्त्विक आदेशांपैकी हे एक आहे, यात इस्लामी समाज आणि शासनाच्या आर्थिक धोरणासाठी हा मौलिक नियम सांगितला गेला आहे की संपत्तीचे प्रमाण साऱ्या समाजात खुलेआम असले पाहिजे. संपत्ती केवळ श्रीमंत लोकांच्या दरम्यानच भ्रमण करीत राहावी किंवा श्रीमंत दिवसेंदिवस जास्त श्रीमंत आणि गरीब दिवसेंदिवस जास्त गरीब बनत जावेत असे होता कामा नये.

११) हा आदेश जरी बनूनजीर जमातीच्या मालमत्तेच्या वाटपासंबंधी उतरला होता तरीपण आज्ञेतील शब्द सर्वसामान्य आहेत, म्हणून सांगण्याचा उद्देश असा आहे की सर्व बाबतीत मुसलमानांनी पैगंबर (स.) यांचे आज्ञापालन करावे. या उद्देशाला ही गोष्ट अधिक चांगल्याप्रकारे स्पष्ट करते की 'जे काही पैगंबर तुम्हाला देतील' याच्याविरूद्ध 'जे काही देणार नाहीत' असे शब्द फर्माविलेले नाहीत तर फर्माविले आहे, 'ज्या गोष्टीची तो तुम्हाला मनाई करील त्यापासून अलिप्त रहा.'



आपल्या घरातून व मालमत्तेतून काढून बाहेर केले गेले आहेत. हे लोक अल्लाहचा कृपाप्रसाद आणि त्याची प्रसन्नता इच्छितात व अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या सहाय्यासाठी सज्ज असतात. हेच सत्यनिष्ठ लोक होत. आणि (ते त्या लोकांसाठीसुद्धा आहे) जे या स्थलांतर करून आलेल्या लोकांच्या आगमनापूर्वी श्रद्धा ठेवून स्थानांतरीत जागी राहात[१२] असत. हे त्या लोकांशी प्रेम करतात जे स्थानांतर करून यांच्याजवळ आले आहेत आणि जे काही यांना दिले जाईल त्याची काही अपेक्षासुद्धा ते आपल्या मनात धरीत नाहीत, आणि आपल्या स्वत:वर इतरांना प्राधान्य देतात, मग ते स्वत: गरजवंत का असेनात. वस्तुस्थिती अशी आहे की जे लोक मनाच्या संकुचितपणापासून वाचविले गेले तेच साफल्य प्राप्त करणारे आहेत (आणि ते त्या लोकांसाठीसुद्धा आहे) जे या पहिल्यांच्या नंतर आले आहेत,[१३] जे म्हणतात की, "हे आमच्या पालनकर्त्या आम्हाला आणि आमच्या त्या सर्व बांधवांना क्षमा प्रदान कर ज्यांनी आमच्यापूर्वी श्रद्धा ठेवलेली आहे. आणि आमच्या मनामध्ये श्रद्धावंतांविषयी कोणताही द्वेष ठेवू नकोस, हे आमच्या पालनकर्त्या, तू मोठा मेहरबान आणि दयावान आहेस."[१४] (६-१०)

तुम्ही पाहिले[१५] नाही त्या लोकांना ज्यांनी दांभिकतेचे वर्तन अवलंबिले आहे? ते आपल्या अश्रद्धावंत ग्रंथधारक बंधुंना म्हणतात, "जर तुम्हाला काढले गेले तर आम्ही तुमच्याबरोबर निघू, आणि तुमच्याबाबतीत आम्ही कोणाचेही म्हणणे कदापि ऐकणार

१२) अभिप्रेत आहेत अन्सार, म्हणजे फय् मध्ये केवळ मुहाजिरांचाच हक्क आहे असे नाही तर पूर्वीपासून जे मुसलमान दारूल इस्लाममध्ये वास्तव्य करून आहेत, तेही याच्यात वाटेकरीचा अधिकार बाळगतात.

१३) म्हणजे फय् मालमत्तेत केवळ हल्लीच्या पिढींचाच हक्क आहे असे नाही तर नंतरच्या पिढ्यांचाही त्यात हक्क आहे.

१४) सदरच्या आयतीत मुसलमानाना हे महत्वपूर्ण नैतिक पाठ दिले गेले आहे की त्यानी कोणत्याही मुसलमानांसाठी आपल्या मनात द्वेष ठेवू नये व आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या मुसलमानांसाठी क्षमेची प्रार्थना करीत राहावी, ना की त्यांचा धिक्कार करीत राहावा व त्यांच्यासाठी अपशब्द (तबरी) उच्चारावेत.

१५) या संपूर्ण रुकूत दांभिकांच्या वर्तनासंबंधी बोलले गेले आहे. जेव्हा अल्लाहचे प्रेषित हजरत मुहम्मद (स.) यांनी बनूनजीर या यहूदी जमातीला मदीनेतून निघून जाण्यासाठी दहा दिवसांची नोटीस दिली होती व त्यांना वेढा प्रारंभ करण्यास अद्याप अनेक दिवसांचा अवकाश होता तेव्हा मदीनेतील दांभिक नेत्यांनी त्यांना असा सांगावा दिला की आम्ही दोन हजार माणसांनिशी तुमच्या मदतीसाठी येऊ तसेच बनी गतफान आणि बनी कुरैजा या जमातीही तुमच्या समर्थनासाठी उभ्या ठाकतील. म्हणून तुम्ही मुसलमानांच्या मुकाबल्यासाठी ठाम रहा व त्यांच्या पुढे कदापि शस्त्रे खाली ठेऊ नका. हे तुमच्याशी लढतील तर आम्ही तुमच्यातर्फे लढू व तुम्ही येथून घालविला गेलात तर आम्हीसुद्धा तुमच्याबरोबर निघू.

नाही, आणि जर तुमच्याशी युद्ध केले गेले तर आम्ही तुम्हाला मदत करू.'' परंतु अल्लाह साक्षी आहे की हे लोक पूर्णपणे खोटे आहेत. जर ते काढले गेले तर हे त्यांच्याबरोबर कदापि निघणार नाहीत आणि जर त्यांच्याशी युद्ध केले गेले तर हे त्यांना कदापि मदत करणार नाहीत, आणि जर त्यांनी मदत केलीसुद्धा तर हे पाठ फिरवतील आणि मग त्यांना कोठून काही मदत मिळणार नाही. यांच्या मनात अल्लाहपेक्षा जास्त तुमची भीती आहे या कारणास्तव की हे असले लोक आहेत जे समजउमज बाळगत नाहीत.[१६] हे कधी एकत्रित होऊन (खुल्या मैदानात) तुमचा मुकाबला करणार नाहीत. लढतीलही तर कडेकोट वस्तीत बसून अथवा भिंतीच्या आड लपून. हे आपापसातील विरोधात अत्यंत कठोर आहेत, तुम्ही यांना एकत्रित समजता. परंतु यांची मने एक दुसऱ्यापासून फाटलेली आहेत. यांची ही स्थिती अशासाठी आहे की हे निर्बुद्ध लोक आहेत. हे त्याच लोकांप्रमाणे आहेत ज्यांनी यांच्या थोड्याच काळापूर्वी आपल्या कृतीची फळे चाखली आहेत[१७] आणि यांच्यासाठी यातनादायक प्रकोप आहे. यांचे उदाहरण शैतानासारखे आहे की प्रथम तो मनुष्याला सांगतो की द्रोह कर, आणि जेव्हा मनुष्य द्रोह करून चुकतो तेव्हा तो म्हणतो की मी तुझ्या जबाबदारीतून मुक्त आहे, मला तर सकल जगांचा पालनकर्ता अल्लाहचे भय वाटते. मग दोघांचा शेवट असा होणार आहे की कायमचे नरकाग्नीत जातील, आणि अत्याचाऱ्यांचा हाच बदला आहे. (११-१७)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा आणि

१६) या लहानशा वाक्यात एक मोठे सत्य सांगितलेले आहे. ज्या माणसात समजूतदारपणा असेल त्याला तर हे कळते की वास्तविकत: ज्याचे भय बाळगले जावे या योग्यतेची केवळ ईश्वरशक्ती आहे, मानवी शक्ती नव्हे. म्हणून तो अशा प्रत्येक कामापासून दूर राहील ज्याबद्दल ईश्वराकडून जाबविचारणीचे भय असेल मग एखादी मानवी शक्ती जाब विचारणारी असो वा नसो, तसेच असे प्रत्येक कर्तव्य पार पाडण्यासाठी तो उभा राहील जे त्यावर ईश्वराने टाकले असेल, मग साऱ्या जगातील शक्ती अडथळा आणणाऱ्या व प्रतिकारक का असेनात परंतु असंमजस माणूस सर्व बाबतीत आपल्या कार्यपद्धतीसंबंधी निर्णय ईश्वराऐवजी मानवी शक्तीच्या दृष्टीने करतो. एखाद्या गोष्टीपासून दूर राहील तर यामुळे नव्हे की ईश्वराच्या येथे त्याला धरले जाणार आहे तर यामुळे की समोर कुणी मानवी शक्ती त्याचा समाचार घेण्यासाठी हजर आहे. तसेच एखादे काम करेल तर या कारणाने नव्हे की ईश्वराने त्यासाठी आज्ञा दिली आहे तर केवळ या कारणास्तव की कुणी मानवी शक्ती तसा हुकूम देणारी अथवा पसंत करणारी आहे. हाच समंजस व असमंजसपणातील फरक वास्तविकत: श्रद्धावंत व श्रद्धा नसलेल्या माणसाची वागणूक व चारित्र्याला एकमेकापासून विलग करतो.

१७) संकेत आहे अश्रद्धावंत कुरैश आणि बनी कैनुका यहुदीकडे. हे लोक मोठी संख्या व विपुल साधनसामग्री असतानादेखील याच दुबळेपणापायी मुसलमानांच्या अल्पशा व बेसरंजाम जमातीकडून पराभूत झाले होते.



प्रत्येक इसमाने हे पाहावे की त्याने उद्यासाठी काय सरंजाम केला आहे.[१८] अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगत रहा. अल्लाह खचितच तुमच्या त्या सर्व कृत्यांची खबर राखणारा आहे जी तुम्ही करता. त्या लोकांप्रमाणे बनू नका जे अल्लाहला विसरून गेले तर अल्लाहने त्यांना स्वत:चा विसर पाडला.[१९] हेच लोक अवज्ञाकारी आहेत. नरकात जाणारे आणि स्वर्गामध्ये जाणारे कदापि एकसमान असू शकत नाहीत. स्वर्गामध्ये जाणारेच वास्तविकपणे यशस्वी होत. (१८-२०)

जर आम्ही हा कुरआन एखाद्या पर्वतावर अवतरला असता तर तुम्ही पाहिले असते की ते लीन झाले आहेत आणि ईश्वरी प्रकोपाच्या भयाने दुभंगले असते[२०] ही उदाहरणे आम्ही लोकांसमोर अशासाठी सांगत असतो की त्यांनी (आपल्या परिस्थितीचा) विचार करावा. (२१)

तो अल्लाहच आहे ज्याच्या व्यतिरिक्त कोणी उपास्य नाही.[२१] अदृश्य आणि दृश्य सर्व गोष्टींना जाणणारा तोच मेहरबान व दयावान आहे. तो अल्लाहच आहे ज्याच्या व्यतिरिक्त कोणी उपास्य नाही, तो बादशाह आहे अत्यंत पवित्र,[२२] सर्वस्वी शांती[२३]

१८) उद्या ने अभिप्रेत आखिरत - परलोक आहे. जणू दुनियेतील हे जीवन 'आज' आणि या आज नंतर येणारा तो प्रलयाचा दिवस म्हणजे 'उद्या'.

१९) म्हणजे ईशविस्मृतीचे अपरिहार्य परिणाम स्वविस्मृती आहे. जेव्हा मनुष्य हे विसरतो की तो कुणाचा दास आहे तेव्हा अपरिहार्यपणे तो जगात स्वत:चे एक चुकीचे स्थान ठरवून घेतो व त्याचे संपूर्ण जीवन याच मौलिक स्वरूपाच्या चुकीच्या समजुतीमुळे चुकीचे बनते. त्याचप्रमाणे जेव्हा तो हे विसरतो की एकमेव ईश्वराशिवाय तो इतर कुणाचाही दास नाही तेव्हा तो त्या एकट्याची भक्ती तर करीतच नाही ज्याचा तो खराखुरा दास आहे, परंतु ज्यांचा तो खरेतर दास नाहीच अशा बहुतेकांची तो भक्ती करीत असतो.

२०) सदरहू दृष्टांताचा अर्थ असा की कुरआन ज्याप्रकारे ईश्वराची महता व त्याच्या हुजूरी दासाची जबाबदारी व जाबविचारणेला स्पष्टपणे सांगत आहे त्याचे आकलन जर पर्वतासमान महान निर्मितीलाही लाभले असते व त्याला कळाले असते की त्याला कशा सर्वशक्तीमान पालनकर्त्याच्या समोर आपल्या कृत्यांबद्दल जाब द्यावा लागेल तर भीतीने त्याचाही थरकांप उडाला असता.

२१) म्हणजे ज्याच्याखेरीज अन्य कोणाचीच ही योग्यता व स्थान आणि प्रतिष्ठा नाही की त्याची भक्ती व पूजा केली जावी, ज्याच्या खेरीज इतर कुणीही ईश्वरी गुण व अधिकार बाळगतच नाही की त्याला उपास्य होण्याचा हक्क पोहचत असावा.

२२) म्हणजे त्याच्या अस्तित्वात एखादा दोष अथवा उणीव अथवा दुर्गुण असावा यापासून तो अतिउच्च व श्रेष्ठ आहे किंबहुना त्याचे अस्तित्व परम पवित्र असून त्यासंबंधी एखाद्या दोषाची कल्पनासुद्धा केली जाऊ शकत नाही.

२३) म्हणजे त्याचे अस्तित्व यापासून उच्च आहे की एखादी आपत्ती अथवा दुर्बलता किंवा उणीव त्याला जडावी अथवा त्याच्या उत्कर्षाचा कधी ऱ्हास व्हावा.

अभयदान करणारा,[२४] निगाहबान,[२५] सर्वांवर प्रभावी आपली आज्ञा बळाने लागू करणारा आणि मोठाच बनून राहणारा, पवित्र आहे अल्लाह त्या अनेकेश्वरवादापासून जे हे लोक करीत आहेत. तो अल्लाहच आहे जो निर्मितीची योजना आखणारा आणि ती अमलात आणणारा व त्यानुसार रंगरूप देणारा आहे. त्याच्यासाठी सर्वोत्तम नावे आहेत. प्रत्येक वस्तू जी आकाशात व पृथ्वीत आहे त्याचे पावित्र्यगान करीत आहे,[२६] आणि तो जबरदस्त व बुद्धिमान आहे. (२२-२४)

**२४)** म्हणजे त्याच्या निर्मितीला यापासून अभय आहे की तो तिच्यावर कधी जुलूम करील, तिचे हक्क मारेल किंवा तिला मिळणारा मोबदला वाया घालवील किंवा आपण दिलेल्या वचनांच्याविरूद्ध करील.

**२५)** मूळ अरबी भाषेत 'अलमुहैमिन' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. याचे तीन अर्थ आहेत. एक निगाहबानी व रक्षण करणारा, दुसरा निरीक्षक की कोण काय करीत आहे हे पाहात असावा. तिसरा, असे अस्तित्व ज्याने लोकांच्या गरजा व आवश्यकता भागविण्याची जबाबदारी उचललेली असावी.

**२६)** म्हणजे उक्तीने व कृतीने असे सांगत आहे की तिला निर्माण करणारा सर्व दोष, उणीवा, दुर्बलता आणि चुकीपासून पवित्र आहे.



# ६० सूरह अल्‌मुम्‌तहिना

*(मदीनाकालीन, वचने १३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे लोकहो,[१] ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जर तुम्ही माझ्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा (जिहाद) करण्यासाठी आणि माझी प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी (देश व घरेदारे सोडून) निघाला आहात तर माझ्या आणि स्वत:च्या शत्रूंना मित्र बनवू नका. तुम्ही त्यांच्याशी मैत्रीचा पायंडा पाडता, वस्तुत: जे सत्य तुमच्यापाशी आले आहे त्याला स्वीकारण्यास त्यांनी नकार दिला आहे आणि त्यांची रीत अशी आहे की पैगंबराला आणि खुद्द तुम्हाला केवळ या अपराधापायी देशबाह्य करतात की तुम्ही आपला पालनकर्ता अल्लाहवर श्रद्धा ठेवली आहे. तुम्ही गुप्तरीत्या त्यांना मैत्रीचा संदेश पाठवता, वस्तुत: जे काही तुम्ही गुप्तपणे करता आणि जे उघडपणे करता, प्रत्येक गोष्ट मी चांगल्या प्रकारे जाणतो. जो मनुष्य तुमच्यापैकी असे करील तो खचितच सरळमार्गापासून भरकटला आहे. त्यांचे वर्तन तर असे आहे की जर तुमच्यावर नियंत्रण मिळविले तर तुमच्याशी शत्रुत्व करील आणि हातानी आणि जिभेने तुम्हाला यातना देईल. ते तर हेच इच्छितात की तुम्ही कसेही करून अश्रद्धावंत व्हावे. पुनरुत्थानाच्या दिवशी न तुमचे नातेसंबंध काही उपयोगी पडतील न तुमची संतान.[२] त्या दिवशी अल्लाह तुमच्या दरम्यान ताटातूट[३] निर्माण करील, आणि तोचतुमची कृत्ये पाहणारा आहे. (१-३)

तुम्हा लोकांसाठी इब्राहीम (अ.) आणि त्याच्या साथीदारांत एक उत्कृष्ट आदर्श आहे की त्यांनी आपल्या राष्ट्राला स्पष्ट सांगून टाकले, ''आम्ही तुम्हाला आणि तुमच्या त्या उपास्यांना ज्यांची तुम्ही अल्लाहला सोडून पूजा करता अगदी विटलो आहोत, आम्ही

**१)** भाष्यकारांचे या गोष्टीवर एकमत आहे की जेव्हा मक्केतील अनेकेश्वरवादींच्या नावे लिहिलेले हजरत हातिब बिन आबिबल्तआ (रजि.) यांचे पत्र पकडले गेले होते, त्याप्रसंगी या आयती उतरल्या होत्या. सदरच्या पत्रात त्यांनी वेळेपूर्वीच शत्रूंना खबर दिली होती की अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) हे मक्केवर हल्ला चढविणार आहेत.

**२)** हजरत हातिब बिन अबिबलतआ (रजि.) यांनी हे काम अशासाठी केले होते की मक्केत त्यांचे जे कुटुंबीय आहेत, ते युद्धाच्या प्रसंगी सुरक्षित राहावेत. म्हणून फर्माविले गेले की ज्या कुटुंबियांसाठी तुम्ही हे काम केले आहे ते परलोकात उपयोगी पडणार नाहीत.

**३)** म्हणजे दुनियेतील सर्व नातेगोतेसंबंध आणि संपर्क तेथे तोडले जातील. प्रत्येक इसम आपल्या व्यक्तिगत स्वरूपात हजर होईल व प्रत्येकाला स्वत:चाच हिशेब द्यावा लागेल. म्हणून जगात कोणत्याही माणसाला कोणत्याही नातेसंबंध अथवा मित्रत्व अथवा संघटनेखातर कोणतेही अवैध कृत्य न केले पाहिजे कारण आपल्या कृत्याची शिक्षा त्याला स्वत:लाच भोगावी लागेल. त्याच्या वैयक्तिक जबाबदारीत दुसरा कोणी सहभागी होणार नाही.

तुमच्याशी द्रोह केला[४] आणि आमच्या व तुमच्यात कायमस्वरूपी शत्रुत्व आले व वैर झाले जोपर्यंत तुम्ही एकमेव अल्लाहवर श्रद्धा ठेवीत नाही.'' पण इब्राहीम (अ.) चे आपल्या वडिलांना हे सांगणे (याला अपवाद आहे) की, ''मी आपणासाठी क्षमेची याचना जरूर करेन, आणि अल्लाहपासून आपणासाठी काही प्राप्त करून घेणे माझ्या अखत्यारीत नाही.''[५] आणि इब्राहीम व त्यांच्या साथीदारांची प्रार्थना अशी होती की,) ''हे आमच्या पालनकर्त्या तुझ्यावरच आम्ही भिस्त ठेवली आणि तुझ्याकडेच आम्ही वळलो व तुझ्याच हुजुरांत आम्हाला परतावयाचे आहे. हे आमच्या पालनकर्त्या, आम्हाला अश्रद्धावंतांसाठी उपद्रव बनवू नकोस.[६] आणि हे आमच्या पालनकर्त्या, आमच्या अपराधांची क्षमा कर, नि:संशय तूच जबरदस्त आणि बुद्धिमान आहेस.'' (४.-५)

त्याच लोकांच्या कार्यपद्धतीत तुमच्यासाठी आणि त्या प्रत्येक माणसासाठी उत्कृष्ट आदर्श आहे, जो अल्लाह आणि अंतिम दिनाचा उमेदवार असेल. यापासून कोणी पराङ्‌मुख झाला तर अल्लाह निरपेक्ष व आपल्याठायी स्वयं प्रशंसनीय आहे. (६)

दूर नाही की अल्लाह केव्हा तरी तुमच्या आणि त्या लोकांच्या दरम्यान प्रेम निर्माण

४) म्हणजे आम्ही तुमचे अश्रद्धावंत आहोत, न तुम्हाला सत्यावर असत्याचे मानतो न तुमच्या धर्माला.

५) दुसऱ्या शब्दात याचा अर्थ असा आहे की तुमच्यासाठी हजरत इब्राहीम (अ.) यांची ही गोष्ट अनुकरणीय आहे की त्यांनी आपल्या अश्रद्धावंत व अनेकेश्वरवादी राष्ट्राशी वीट आल्याची व संबंध तोडण्याची स्वच्छ व स्पष्टपणे घोषणा केली परंतु त्यांनी आपल्या अनेकेश्वरवादी पित्यासाठी क्षमेची प्रार्थना करण्याचे वचन दिले आणि त्यानुसार कृती करून त्याच्यासाठी क्षमेची प्रार्थना केली, त्याची ही गोष्ट अनुकरणीय खचितच नाही.

६) अश्रद्धावंतांसाठी श्रद्धावंतांचे उपद्रव म्हणून ठरण्याचे अनेक प्रकार असू शकतात. उदाहरणार्थ, एक असा की अश्रद्धावंतांचे त्यांच्यावर वर्चस्व प्रस्थापित व्हावे व आपले वर्चस्व त्यांनी या गोष्टीचे प्रमाण मानावे की आम्ही सत्याला धरून आहोत व श्रद्धावंत असत्यावर, अथवा असे की श्रद्धावंतांवरील अश्रद्धावंतांचे जुलूम अत्याचार त्यांच्या सहनशक्तीच्या बाहेरचे होऊन सरतेशेवटी त्यामुळे दबून त्यांनी आपल्या धर्म व नीतीमत्तेला विकण्यास तयार व्हावे. अथवा असे की सत्य धर्माच्या प्रतिनिधित्वाच्या उच्च पदावर आरूढ असतानादेखील या पदाच्या वैभवाला शोभेल असे जे नैतिक श्रेष्ठत्व आहे त्याला ते पारखे व्हावेत व जगाला त्यांच्या वर्तनात व आचरणातदेखील तसलेच दोष आढळावेत जे अज्ञानमूलक काळातील समाजात सर्रासपणे फैलावलेले असावेत, यामुळे अश्रद्धावंतांना असे सांगण्याची संधी सापडेल की या धर्मात अशी ती कोणती खुबी आहे बरे जी याला आमच्या द्रोहावर श्रेष्ठत्व बहाल करीत असावी?



करील, ज्यांच्याशी आज तुम्ही शत्रुत्व पत्करले आहे.[७] अल्लाह मोठे सामर्थ्य बाळगतो आणि तो क्षमाशील व दयावान आहे. (७)

अल्लाह तुम्हाला या गोष्टीची मनाई करीत नाही की तुम्ही त्या लोकांशी सद्‌व्यवहार आणि न्यायाचे वर्तन करावे, ज्यांनी धर्माच्या बाबतीत तुमच्याशी युद्ध केले नाही आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले नाही. अल्लाह न्याय करणाऱ्यांना पसंत करतो.[८] तो तुम्हाला ज्या गोष्टीची मनाई करतो ती तर ही आहे की तुम्ही त्या लोकांशी मैत्री करावी ज्यांनी तुमच्याशी धर्माच्या बाबतीत युद्ध केले आहे आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले आहे आणि तुम्हाला बाहेर घालविण्यात एक दुसऱ्यास मदत केली आहे. त्यांच्याशी जे लोक मैत्री करतील तेच अत्याचारी आहेत. (८-९)

हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जेव्हा श्रद्धावंत स्त्रिया स्थलांतर करून तुमच्यापाशी येतील तेव्हा (त्यांच्या श्रद्धावंत असण्याची) शहानिशा करून घ्या, आणि त्यांच्या श्रद्धेची वास्तवता तर अल्लाहच चांगल्या प्रकारे जाणतो. मग जेव्हा तुम्हाला माहीत होईल की त्या श्रद्धावंत आहेत तर त्यांना अश्रद्धावंतांकडे परत पाठवू नका.[९] न

७) वरील आयतीत मुसलमानांना त्यांच्या अश्रद्धावंत नातेवाईकांशी संबंध तोडण्याचे आदेश दिल्यानंतर अशी आशाही दाखविली गेली आहे की जेव्हा तुमचे हेच नातेवाईक मुसलमान बनतील व आजचे शत्रुत्व उद्या पुन्हा प्रेमात रूपांतरित व्हावे अशी वेळही येऊ शकते.

८) अर्थ असा की जो मनुष्य तुमच्याशी वैर करीत नाही, तुम्हीसुद्धा त्याच्याशी वैर धरू नका, अशी न्यायाची निकड आहे. शत्रू आणि गैरशत्रू दोघांना एकाच कक्षात ठेवणे व दोन्हींशी एकसमान वर्तन ठेवणे न्यायोचित नाही. तुम्हाला त्या लोकांशी कठोर वर्तन ठेवण्याचा अधिकार आहे ज्यांनी श्रद्धा ठेवल्यापायी तुमचा छळ केला व तुम्हाला देशांतरित होण्यास भाग पाडले व काढल्यानंतरही तुमचा पिच्छा सोडला नाही परंतु ज्या लोकांनी या छळवणुकीत भाग घेतला नाही, न्यायाधिष्ठित हे आहे की तुम्ही त्यांच्याशी चांगले वर्तन ठेवावे व नाते संबंध आणि भाऊबंदकीच्या दृष्टीने त्यांचे जे हक्क तुमच्यावर येतात, ते अदा करण्यात कमी करू नका.

९) हुदैबियाच्या तहानंतर प्रथम तर मुसलमान पुरुष मक्केतून पळून मदीनेला येऊ लागले व त्यांना कराराच्या अटीप्रमाणे परत पाठविले जात राहिले, मग मुस्लिम स्त्रियां येण्याचा क्रम सुरू झाला व अश्रद्धावंतांनी करारातील अटीचा हवाला देऊन त्यांना परत करण्याची मागणीही केली. यावरून असा प्रश्न निर्माण झाला की हुदैबिया तह स्त्रियांवरही लागू होतो का? सर्वोच्च अल्लाहने याच प्रश्नाचे येथे उत्तर दिले आहे की जर त्या मुसलमान असतील व खरोखरच श्रद्धेखातर हिजरत करून आल्या आहेत, अन्य कोणत्याही कारणाने आलेल्या नाहीत अशी त्या खात्री पटवून देत असतील तर त्याना परत केले जाऊ नये. ही आज्ञा या आधारे दिली गेली की तहाच्या ज्या अटी लिहिल्या गेल्या होत्या त्यात 'रुजूलून' अर्थात 'पुरुष' असा शब्द लिहिलेला होता, जसे की बुखारीच्या निवेदनात आले आहे.

त्या अश्रद्धावंतांसाठी वैध आहेत, आणि न अश्रद्धावंत त्यांच्यासाठी वैध. त्यांच्या अश्रद्धावंत पतींनी जे महर त्यांना दिले होते ते त्यांना परत करा आणि त्यांच्याशी विवाह करण्यात तुमचा काही अपराध नाही जेव्हा की तुम्ही त्यांचे महर त्यांना चुकते कराल.[१०] आणि तुम्ही स्वत:देखील अश्रद्धावंत स्त्रियांना आपल्या विवाहात अडकवून ठेवू नका. जे महर तुम्ही आपल्या अश्रद्धावंत पत्नींना दिले होते ते तुम्ही परत मागून घ्या आणि जे महर अश्रद्धावंतांनी आपल्या मुसलमान पत्नींना दिले होते ते त्यांनी परत मागावे. ही अल्लाहची आज्ञा आहे. तो तुमच्या दरम्यान निर्णय देतो आणि तो सर्वज्ञ आणि बुद्धिमान आहे. आणि जर तुमच्या अश्रद्धावंत पत्नींची महरांमधून तुम्हाला अश्रद्धावंतांकडून काही परत मिळाले नाही आणि मग तुमची पाळी आली तर ज्या लोकांच्या पत्नीं तिकडे राहिल्या आहेत त्यांना तितकी रक्कम चुकती करा जी त्यांना दिलेल्या महरांच्या प्रमाणात असेल. आणि त्या अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगत रहा ज्यावर तुम्ही श्रद्धा ठेवली आहे. (१०-११)

हे नबी (स.)! जेव्हा तुमच्याजवळ श्रद्धावंत स्त्रिया बैअत[११] (प्रतिज्ञा) करण्याकरिता येतील आणि या गोष्टीची प्रतिज्ञा करतील की त्या अल्लाहच्या बरोबर कोणत्याही वस्तूला सामील करणार नाहीत, चोरी करणार नाहीत, व्यभिचार करणार नाहीत, आपल्या संततीची हत्या करणार नाहीत, आपल्या हातापायांपुढे कोणतेही कुभांड रचून आणणार नाहीत,[१२] आणि कोणत्याही चांगल्या कामात तुमची अवज्ञा करणार

**१०)** अर्थ असा की त्यांच्या अश्रद्धावंत पतींना त्यांचे जे महर परत केले जातील तेच या स्त्रियांचे महर गणले जाणार असे नाही तर आता जो कोणी मुसलमान या स्त्रियांपैकी कुणा स्त्रीशी विवाह करू इच्छित असेल त्याने तिचा महर अदा करावा व तिच्याशी विवाह करावा.

**११)** सदरहू आयत मक्केच्या विजयाच्या काही दिवसाअगोदर उतरली होती. यानंतर जेव्हा मक्का जिंकले गेले तेव्हा कुरैश लोकांच्या झुंडीच्या झुंडी पैगंबर (स.) शी बैअत (प्रतिज्ञा) साठी हजर होऊ लागल्या. पैगंबर (स.) यांनी सफा पर्वतावर पुरुषांची खुद्द बैअत घेतली व हजरत उमर (रजि.) यांना आपल्याकडून नियुक्त केले की त्यांनी स्त्रियांकडून बैअत घ्यावी व या आयतीत ज्या गोष्टी सांगितलेल्या आहेत त्या मान्य असण्याची कबुली त्यांच्याकडून घ्यावी. मग मदीनेत प्रयाण करून पैगंबर (स.) यांनी अन्सार स्त्रियांना एका घरात एकत्र करण्याची आज्ञा केली व त्यांच्याशी बैअत घेण्यासाठी हजरत उमर (रजि.) ना पाठविले.

**१२)** याच्याने दोन प्रकारचे कुभांड अभिप्रेत आहेत. एक असा की कोणत्याही स्त्रीने इतर स्त्रियांवर परपुरुषांशी अनैतिक संबंध असल्याचा आळ लावू नये व अशा प्रकारच्या कंड्या लोकात पसरवू नये. दुसरा असा की स्त्रीने मूल तर प्रसवावे इतर कुणाचे व पतीला खात्री द्यावी की हे तुझेच मूल आहे.



नाहीत,[१३] तर त्यांच्याकडून 'बैअत' (प्रतिज्ञा) घ्या, आणि त्यांच्या बाबतीत अल्लाहपाशी क्षमेची प्रार्थना करा, नि:संशय अल्लाह क्षमा करणारा आणि दया करणारा आहे. (१२)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, त्या लोकांना मित्र बनवू नका ज्यांच्यावर अल्लाहचा क्रोध झाला आहे, जे परलोकाबद्दल त्याचप्रकारे निराश आहेत ज्याप्रकारे कबरीत पडलेले अश्रद्धावंत निराश आहेत. (१३)

**१३)** या लहानशा वाक्यात दोन फार महत्वाचे कायद्यात्मक कलम सांगितले गेले आहेत. एक असे की पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या आज्ञापालनातदेखील भलाईत आज्ञापालनाची मर्यादा घातली गेली आहे, वास्तविकपणे पैगंबर (स.) यांच्या बाबतीत, ते कधी बुराईचा आदेशही देऊ शकतात अशा यत्किंचितशा शंकेलादेखील वाव नव्हता. यावरून अनायासे असे सिद्ध झाले की जगातील कोणत्याही सृष्टजनाचे आज्ञापालन ईश्वरी कायद्याच्या मर्यादेबाहेर जाऊन केले जाऊ शकत नाही. कारण ज्याअर्थी ईश्वराच्या पैगंबरांचेदेखील आज्ञापालन भल्या कामाच्या अटीने मर्यादित आहे त्याअर्थी इतरांचा हा दर्जा कसा असू शकतो की बिनशर्त आज्ञापालनाचा अधिकार त्यांना पोहचत असावा व त्यांच्या एखाद्या अशा आदेशाचे अथवा कायद्याचे व नियमाचे अथवा रूढीचे पालन केले जावे जे ईश्वरी कायद्याच्याविरूद्ध असेल. दुसरी गोष्ट जी कायद्यात्मक दृष्टिने फार महत्वाची आहे अशी की सदरहू आयतीत पाच नकारात्मक आज्ञा सांगितल्यानंतर होकारात्मक आज्ञा केवळ एकच सांगितलेली आहे ती अशी की सर्व नेक कामात पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या आज्ञेचे पालन केले जाईल. जेथपावेतो बुराईचा संबंध आहे तर मोठमोठ्या वाईट गोष्टी ज्यांच्यात अज्ञानमूलक काळातील स्त्रिया गुरफटल्या होत्या; त्या सांगितल्या व त्या वर्ज्य मानण्याची त्यांच्याकडून प्रतिज्ञा घेतली गेली, परंतु जेथपावेतो भलाईचा संबंध आहे त्यांची कोणतीही यादी देऊन प्रतिज्ञा घेतली गेली नाही की तुम्ही अमुक अमुक कार्ये करावीत किंबहुना केवळ इतकीच प्रतिज्ञा घेतली गेली की ज्या कोणत्या भल्या कामाचे पैगंबर मुहम्मद (स.) हुकूम देतील त्याचे पालन तुम्हाला करावे लागेल.

# ६१ सूरह अस्सफ

*(मदीनाकालीन, वचने १४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अल्लाहचे पावित्रगान केले आहे त्या प्रत्येक वस्तूने, जी आकाशांत आणि पृथ्वीत आहे, आणि तो प्रभुत्वसंपन्न आणि बुद्धिमान आहे. (१)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, तुम्ही का ती गोष्ट सांगता जी तुम्ही करीत नाही? अल्लाहच्या जवळ हे अत्यंत अप्रिय कृत्य आहे की तुम्ही सांगावी ती गोष्ट जी करीत नाही. अल्लाहला तर प्रिय ते लोक आहेत जे त्याच्या मार्गात अशाप्रकारे फळी बांधून लढतात जणूकाय ते शिसे पाजलेली भिंत असावेत.[१] (२-४)

आणि आठवा मूसा (अ.) ची ती गोष्ट जी त्याने आपल्या राष्ट्राला सांगितली होती की, "हे माझ्या राष्ट्रबांधवांनो! तुम्ही मला का इजा देता, वस्तुत: तुम्ही चांगल्या प्रकारे जाणता की मी तुमच्याकडे पाठविलेला अल्लाहचा प्रेषित आहे?"[२] मग जेव्हा त्यांनी वक्रता अवलंबिली तेव्हा अल्लाहनेसुद्धा त्यांची हृदये वक्र केली. अल्लाह अवज्ञाकारींना मार्गदर्शन करीत नसतो.[३] (५)

आणि आठवा मरयमपुत्र ईसाची ती गोष्ट जी त्याने सांगितली होती, "हे

१) यावरून सर्वप्रथम तर असे कळते की सर्वोच्च अल्लाहची प्रसन्नता अशाच श्रद्धावंतांना लाभते जे त्याच्या मार्गात प्राणप्रयणाला लावण्यासाठी व धोके पत्करण्यासाठी तयार असावेत. दुसरी गोष्ट अशी की अल्लाहला जे सैन्य प्रिय आहे त्यात तीन गुण आढळले पाहिजेत. एक असा की चांगल्या प्रकारे समजूनउमजून अल्लाहच्या मार्गात लढावे व अशा कोणत्याही कारणासाठी लढू नये जे अल्लाहच्या मार्गाच्या व्याख्येत बसत नसावे. दुसरा असा की ते सैन्य अव्यवस्थित व विस्कळीतपणात गुरफटले नसावे तर भक्कम संघटितपणे फळी बांधून लढावे. तिसरा गुण असा की शत्रुच्या मुकाबल्यासाठी त्याची स्थिती 'शिसे पाजलेल्या भिंती' समान असावी.

२) ही गोष्ट यासाठी फर्माविली गेली आहे की मुसलमानांनी आपल्या पैगंबरांशी असे वर्तन अवलंबू नये जसे बनीइस्राईलींनी आपल्या पैगंबराबरोबर ठेवले होते. नाहीतर ज्या परिणामांना बनीइस्राईलींना तोंड द्यावे लागले तशाच परिणामांना त्यांनाही तोंड देण्याशिवाय गत्यंतर नसेल.

३) म्हणजे सर्वोच्च अल्लाहची ही रीत नव्हे की जे लोक स्वत: वक्रमार्गाने चालू इच्छित असतील त्यांना त्याने उगीचच सरळ मार्गावर न्यावे जे लोक त्याच्या अवज्ञेला तत्पर असावेत त्यांना जबरदस्तीने मार्गादर्शन व सरळमार्गाने उपकृत करावे.



बनीइस्राईल, मी तुमच्याकडे पाठविलेला अल्लाहचा प्रेषित आहे,[४] सत्यता प्रमाणित करणारा आहे त्या तौरातची जी माझ्यापूर्वी आलेली हजर आहे आणि खुशखबर देणारा आहे एका प्रेषिताची जो माझ्यानंतर येईल, ज्याचे नाव अहमद असेल.[५] (६-)

परंतु जेव्हा तो त्यांच्याजवळ उघडउघड संकेत घेऊन आला तेव्हा ते म्हणाले, ही तर चक्क फसवेगिरी आहे.[६] आता बरे त्या माणसापेक्षा मोठा अत्याचारी अन्य कोण असू शकेल जो अल्लाहवर खोटा आळ घेईल[७] वास्तविकपणे त्याला इस्लाम (अल्लाहसमोर आज्ञापालनार्थ मान तुकविणे) चे आमंत्रण दिले जात आहे?[८] अशा अत्याचाऱ्यांना अल्लाह मार्गदर्शन करीत नसतो. हे लोक आपल्या तोंडाच्या फुंकरीने अल्लाहच्या प्रकाशाला विझवू इच्छितात, आणि अल्लाहचा निर्णय हा आहे की तो आपल्या प्रकाशाचा पूर्णपणे फैलाव करणारच मग अश्रद्धावंतांना हे कितीही अप्रिय का असेना. तोच तर आहे ज्याने आपल्या पैगंबर (स.) ला मार्गदर्शन आणि सत्यधर्मासह पाठविले आहे जेणेकरून

४) बनीइस्राईलींच्या दुसऱ्या अवज्ञेचा हा उल्लेख आहे. एक अवज्ञा ती होती जी त्यांनी आपल्या उत्कर्षाच्या प्रारंभीच्या काळात केली तर दुसरी अवज्ञा ही आहे जी त्या काळाच्या शेवटच्या व तो पूर्णपणे समाप्त होत असताना त्यांनी केली. त्यानंतर नेहमीसाठी ते ईश्वराकडून धि:कृत बनले. या दोन्ही घटना सांगण्यामागील हेतू असा की मुसलमानांना ईश्वराच्या पैगंबरांशी बनीइस्राईलींसमान वर्तन अवलंबिण्याच्या परिणामापासून सावध केले जावे.

५) अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्यासंबंधी प्रेषित हजरत ईसा येशू (अ.) यांच्या स्पष्ट अशा भविष्यवाणीचा हा उल्लेख आहे. सदरहू भाकिताचा सविस्तर पुरावा आम्ही 'तफहीमूल कुरआन (कुरआनचे उर्दू भाष्य) खंड ५ वा यात या आयतीचे भाष्य करताना दिला आहे.

६) मुळात 'सहर' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. 'सहर' या ठिकाणी जादू या अर्थाने नव्हे तर 'फसवेगिरी व धोकेबाजी' या अर्थात प्रयुक्त झाला आहे. अरबी शब्दकोशात 'जादू' या अर्थाप्रमाणेच याचा असा अर्थ प्रचलित आहे. आयतीचा अर्थ असा की जेव्हा 'तो नबी' ज्याच्या आगमनाची खुशखबर हजरत ईसा (अ.) यांनी दिली होती, स्वत:च्या नबी असण्याच्या उघड चिन्हासहित आला तेव्हा बनीइस्राईल आणि ख्रिस्ती लोकांनी त्याच्या प्रेषितत्वाचा दावा सांगण्याला पूर्णपणे फसवेगिरी ठरविले.

७) म्हणजे अल्लाहने पाठविलेल्या नबीला खोटा दावा सांगणारा ठरविले व अल्लाहच्या वाणीला जी त्याच्या नबीवर उतरत होती, नबीची स्वरचित वाणी ठरविली.

८) म्हणजे प्रथम तर सच्चा नबीला खोटा दावा सांगणारा म्हणजेच आपल्या जागी काही कमी जुलूम नाही, कोठे याउपर आणखीन जुलूम असा केला जावा की बोलाविणारा तर ईश्वराची बंदगी व आज्ञाधारकतेकडे बोलावित असावा व ऐकणाऱ्याने त्याला शिविगाळ करावी व त्याच्या आवाहनाला हानी पोचविण्यासाठी खोटेपणा, आळ आणि कुभांड रचण्याची कारस्थाने करीत राहावी.

त्याला समस्त धर्मांवर प्रभुत्व द्यावे मग अनेकेश्वरवाद्यांना ते कितीही अप्रिय का वाटू नये. (-६-९)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, मी दाखवू तुम्हाला तो व्यापार[९] जो तुम्हाला यातनादायक प्रकोपापासून वाचवील? श्रद्धा ठेवा अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर आणि प्रयत्नांची पराकाष्ठा (जिहाद) करा अल्लाहच्या मार्गात आपल्या मालांनिशी आणि आपल्या प्राणानिशी. हेच तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही समजून घेतले. अल्लाह तुमचे गुन्हे माफ करील आणि तुम्हाला अशा उद्यानात दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील, आणि चिरंतन निवासाच्या स्वर्गात तुम्हाला उत्तम घर प्रदान करील. हे आहे मोठे यश. आणि ती दुसरी गोष्ट जी तुम्ही इच्छिता तीसुद्धा तुम्हाला देईल, अल्लाहकडून सहाय्य आणि लवकरच प्राप्त होणारा विजय. हे पैगंबर (स.), श्रद्धावंतांना याची खुशखबर द्या. (१०-१३)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहचे सहाय्यक बना ज्याप्रकारे मरयमपुत्र ईसाने हवारींना उद्देशून सांगितले होते, ''कोण आहे अल्लाहकडे (बोलविण्यात) माझा सहायक?'' आणि हवारींनी उत्तर दिले होते, ''आम्ही आहोत अल्लाहचे सहायक.'' त्यावेळी बनीइस्राईलच्या एका गटाने श्रद्धा ठेवली आणि दुसऱ्या गटाने इन्कार केला. मग आम्ही श्रद्धावंतांचे त्यांच्या शत्रुविरूद्ध समर्थन केले आणि तेच विजयी ठरले.[१०] (१४)

---

९) व्यापार असा उद्योग आहे ज्यात मनुष्य आपली संपत्ती, वेळ, श्रम, चातुर्य आणि योग्यता अशासाठी खर्ची घालतो की जेणेकरून नफा प्राप्त व्हावा, याच अनुषंगाने या ठिकाणी श्रद्धा आणि अल्लाहच्या मार्गातील संघर्षाला व्यापार म्हटले गेले आहे. अर्थ असा की या मार्गात आपले सर्वस्व खर्ची घालाल तर तुम्हाला तो नफा प्राप्त होईल जो पुढे सांगितला जात आहे.

१०) येशू मसीह (अ.) यांना न मानणारे यहूदी लोक आहेत. त्यांना मानणारे ईसाई-ख्रिस्ती लोकही आहेत व मुसलमानदेखील, सर्वोच्च अल्लाहने प्रथम यहूदी लोकांवर ईसाईंचे वर्चस्व प्रस्थापित केले नंतर मुसलमानांचेही त्यांच्यावर वर्चस्व प्रस्थापित झाले. अशाप्रकारे मसीह (अ.) यांचा इन्कार करणारे दोन्हीकडून पराभूत झाले. या मामल्याला या ठिकाणी या हेतूने सांगितले गेले आहे की ज्याप्रमाणे पूर्वी हजरत ईसा-येशू (अ.) यांना मानणाऱ्यांचे त्यांच्या इन्कार करणाऱ्यांवर वर्चस्व प्रस्थापित झाले आहे त्याचप्रकारे आता हजरत मुहम्मद (स.) यांना मानणारे, त्यांच्या इन्कार करणाऱ्यांवर वर्चस्व मिळवतील, असा मुसलमानांत विश्वास निर्माण व्हावा.



# ६२ सूरह अल्‌जुमुआ

*(मदीनाकालीन, वचने ११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अल्लाहचे पावित्र्य गान करीत आहे ती प्रत्येक वस्तू, जी आकाशांत आहे आणि ती प्रत्येक वस्तू जी जमिनीत आहे - बादशाह आहे अत्यंत पवित्र, जबरदस्त आणि बुद्धिमान. (१)

तोच आहे ज्याने निरक्षर[१] लोकांत एक प्रेषित खुद्द त्यांच्यापैकीच उभा केला जो त्यांना त्याची वचने ऐकवितो, त्यांचे जीवन सावरतो आणि त्यांना ग्रंथाची आणि बुद्धिमत्तेची शिकवण देतो, वास्तविक पाहता यापूर्वी ते उघड पथभ्रष्टतेत पडलेले होते. आणि (या प्रेषितांचे उभे केले जाणे) त्या दुसऱ्या लोकांसाठीदेखील आहे जे अद्याप त्यांना मिळालेले[२] नाहीत. अल्लाह जबरदस्त आणि बुद्धिमान आहे.[३] ही त्याची कृपा आहे, ज्याला इच्छितो देतो आणि तो मोठा कृपा करणारा आहे. (२-४)

ज्या लोकांना 'तौरात' धारक बनविले गेले होते, त्यांनी त्याचा भार उचलला नाही, त्यांचे उदाहरण त्या गाढवाप्रमाणे आहे ज्याच्यावर पुस्तके लादलेली असावीत, याच्यापेक्षाही अधिक वाईट उदाहरण आहे त्या लोकांचे ज्यांनी अल्लाहच्या वचनांना खोटे

---

१) या ठिकाणी 'उम्मी' हा शब्द 'यहूदी'चा पारिभाषिक शब्द म्हणून आलेला असून यात एक मार्मिक टोमणा दडलेला आहे. याचा अर्थ असा आहे की ज्या अरबांना यहूदी तुच्छतेने 'उम्मी' म्हणतात व आपल्या तुलनेत नीच मानतात त्यांच्यातच प्रभुत्वसंपन्न व बुद्धिमान अल्लाहने एक प्रेषित उभा केला तो स्वत: होऊन उभा राहिला आहे असे नाही तर त्याला उभा करणारा तो आहे जो सृष्टि-सम्राट आहे, सामर्थ्यशाली व बुद्धिमान आहे, ज्याच्या शक्तीशी लढून हे लोक स्वत:चेच ते काय वाटोळे करतील, त्याचे काहीच बिघडवू शकत नाहीत.

२) म्हणजे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे प्रेषितत्व केवळ अरब राष्ट्रापर्यंतच सीमित आहे असे नाही तर जगभरातील अशी सर्व राष्ट्रे व पिढ्यांसाठीही आहे ज्या अद्याप श्रद्धावंतांत समाविष्ट झालेल्या नाहीत परंतु पुढे प्रलयापर्यंत येत राहणाऱ्या आहेत.

३) म्हणजे हा त्याच्या सामर्थ्याचा व बुद्धिमत्तेचा चमत्कार आहे की अशा एका अघड, अडाणी राष्ट्रात त्याने असा महान पैगंबर निर्माण केला ज्याची शिकवण व मार्गदर्शन इतक्या उच्च कोटीची क्रांतिकार आहे, शिवाय असे विश्वव्यापी व कायमस्वरूपी नियम बाळगणारी आहे ज्याच्या आधारावर सर्व मानवजाती एकत्र येऊन एक राष्ट्र बनू शकते व सदासर्वदा त्या तत्त्व व नियमापासून मार्गदर्शन प्राप्त केले जाऊ शकते.

ठरविले आहे.[४] अशा अत्याचाऱ्यांना अल्लाह मार्गदर्शन करीत नसतो. (५)

यांना सांगा, "हे लोकहो जे यहुदी बनलेले आहेत,[५] जर तुम्हाला अशी घमेंड आहे की बाकीच्या सर्व लोकांना सोडून केवळ तुम्हीच अल्लाहचे आवडते आहात तर मृत्यूची अभिलाषा करा, जर तुम्ही आपल्या या दर्पात खरे असाल."[६] परंतु हे कदापि त्याची अभिलाषा करणार नाहीत आपल्या त्या कृत्यामुळे जी यांनी केलेली आहेत, आणि अल्लाह या अत्याचाऱ्यांना चांगलेच जाणतो. यांना सांगा, "ज्या मृत्यूपासून तुम्ही पळ काढता तो तर तुम्हाला येऊन राहील. मग तुम्ही त्याच्यासमोर हजर केले जाल, जो अप्रकट आणि प्रकटचा जाणणारा आहे आणि तो तुम्हाला दाखवून देईल की तुम्ही काय काय करीत राहिला आहात." (६-८)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, जेव्हा पुकारले जाईल नमाजसाठी शुक्रवारच्या

---

४) म्हणजे यांची दशा गाढवापेक्षाही जास्त हीन आहे, गाढवाला तर समजउमज नसल्याकारणाने तो निरुपायी आहे, परंतु यांना समज आहे. तौरातचे ते स्वत:ही पठन करतात व तिचे पाठही देत असतात. त्यातील अर्थ त्यांना माहीत नाही असे नाही तरीदेखील हे तिच्या मार्गदर्शनाशी विमुख होत आहेत. तौरातनुसार जो प्रेषित पूर्णपणे खरा प्रेषित आहे त्याला मान्य करण्यास हे मुद्दाम नकार देत आहेत. यांच्यात अनभिज्ञतेची उणीव आहे असे नाही तर बुद्धिपुरस्सर अल्लाहच्या आयती खोटे ठरविणारे हे अपराधी आहेत.

५) हा मुद्दा लक्ष देण्याजोगा आहे, 'हे यहुदींनो' असे म्हटलेले नाहीतर 'हे त्या लोकांनो जे यहूदी बनला आहात' अथवा 'ज्यांनी यहुदित्व स्वीकारले आहे' असे फर्माविले आहे. याचे कारण असे की हजरत मूसा (अ.) व त्यांच्यापूर्वी व नंतरच्या प्रेषितांनी जो खरा धर्म आणला होता तो तर इस्लाम धर्मच होता. सदरहू प्रेषितांपैकी कोणीही यहूदी नव्हता व त्यांच्या काळात यहुदित्व निघालेही नव्हते. यहूदी नावाचा हा धर्म फार नंतरची उत्पत्ती आहे.

६) अरबस्तानातील यहूदी लोक आपली संख्या व शक्तीच्या दृष्टीने मुसलमानांच्या तुलनेत कोणत्याही प्रकारे कमी नव्हते. सरंजामाच्या दृष्टिने तर फार वरचढ होते. परंतु या अशा असमान मुकाबल्यात ज्या गोष्टीने मुसलमानांना विजयी व यहूदींना पराजित केले ती म्हणजे मुसलमान ईशमार्गातील मरणाला भिण्याचे तर दूरच राहो, मनापासून त्याची उत्कट इच्छा बाळगणारे होते. ते तळहातावर शिर घेऊन युद्धाच्या मैदानात उतरत असत, याउलट यहूदींची स्थिती अशी होती की ते कोणत्याही मार्गात प्राण देण्यास तयार नव्हते. ना अल्लाहच्या मार्गात, ना राष्ट्रासाठी व ना स्वत:च्या जीवित व वित्ताच्या व इज्जत अब्रूच्या रक्षणासाठी. त्यांना केवळ जीवन हवे होते. मग ते कसे का असेना. याच गोष्टीने त्याना भ्याड बनविले होते.



दिवशी तेव्हा अल्लाहच्या स्मरणाकडे धाव घ्या आणि खरेदी-विक्री सोडून द्या,[७] हे तुमच्यासाठी अधिक उत्तम आहे जर तुम्ही जाणून घ्याल. मग जेव्हा नमाज पूर्ण होईल तेव्हा भूतलावर पसरले जा आणि अल्लाहच्या कृपाप्रसादाचा शोध घ्या.[८] आणि अल्लाहचे मोठ्या प्रमाणात स्मरण करीत रहा कदाचित तुम्हाला सफलता प्राप्त होईल.[९] (९-१०)

आणि जेव्हा त्यांनी व्यापार आणि खेळ-तमाशे होताना पाहिले तेव्हा त्याकडे धाव

---

७) सदरहू आज्ञेत 'जिक्र' (स्मरण) ने अभिप्रेत खुतबा (प्रवचन) आहे. कारण अजाननंतर पैगंबर (स.) प्रथम जे कार्य करीत असत ते नमाज नसून खुतबा असे. नमाज ते नेहमी खुतबा सांगितल्यानंतर अदा करीत असत. 'अल्लाहच्या जिक्र (स्मरण) कडे धाव घ्या' याचा अर्थ 'पळत या' असा नाही तर लवकरात लवकर तेथे पोहचण्याचा प्रयत्न करा असा अर्थ आहे. 'खरेदी विक्री सोडून' याचा अर्थ केवळ खरेदी करणे व विकणे सोडून असा नाही तर नमाजसाठी जाण्याची काळजी व तयारीखेरीज इतर सर्व व्यवहार सोडणे होय. इस्लामी शास्त्रींचे याबाबतीत एकमत आहे की जुमआच्या अजाननंतर खरेदी व विक्री आणि इतर सर्व तऱ्हेचे व्यापार व उद्योग निषिद्ध आहेत. तथापि हदीसनुसार मुलें, स्त्रिया, रुग्ण आणि वाटसरूंना 'जुमआ'च्या अनिवार्यतेतून वगळले गेले आहे.

८) याचा अर्थ असा नाही की जुमआच्या नमाजनंतर पृथ्वीवर पसरणे व रोजी शोधण्याच्या धावपळीत लागणे आवश्यक आहे तर हा आदेश परवानगी म्हणून आहे. जुमआची अजान ऐकून सर्व व्यवहार बंद करण्याचा आदेश दिला असल्या कारणाने फर्माविले गेले की नमाज संपल्यानंतर आपापल्या मार्गात जाण्याची व आपली इच्छित कामे करण्याची तुम्हाला परवानगी आहे. हे तसेच आहे जसे एहराम (हजचा वेष) परिधान केलेल्या स्थितीत शिकारीची मनाई केल्यानंतर फर्माविले आहे की जेव्हा तुम्ही एहराम सोडाल तेव्हा शिकार करा. (सूरह माइदा - आयत क्र. २) याचा अर्थ असा नव्हे की अवश्यपणे शिकार कराच तर अर्थ असा की यानंतर तुम्ही शिकार करू शकता म्हणून जे लोक या आयतीच्या आधारे असा युक्तीवाद करतात की कुरआननुसार इस्लाममध्ये शुक्रवारची सुट्टी नाही; ते चुकीची गोष्ट सांगतात. आठवड्यातून एकदा सुट्टी करावयाची असली तर मुसलमानांनी जुमआच्या दिवशी केली पाहिजे ज्याप्रमाणे यहूदी शनिवारी व ख्रिस्ती लोक रविवारी करतात.

९) अशा तऱ्हेच्या प्रसंगी 'कदाचित' हा शब्द उपयोगात आणण्याचा अर्थ असा होत नाही की सर्वोच्च अल्लाहला काही शंका वाटत आहे (अल्लाह त्यापासून वाचवो) तर वास्तविकपणे ही सांगण्याची राजसशैली आहे. ही शैली तशीच आहे जसे एखाद्या मेहेरबान मालकाने आपल्या सेवकाला म्हणावे की तू अमूक सेवा पार पाड कदाचित तुला बढती मिळावी. यात एक मार्मिक वचन गर्भित असते. त्या उमेदीवर सेवक मन लावून मोठ्या उत्साहाने ती सेवा पार पाडीत असतो.

घेतली आणि तुम्हाला दिले उभे सोडून,[१०] यांना सांगा, जे काही अल्लाहजवळ आहे ते खेळ-तमाशे आणि व्यापारापेक्षा उत्तम आहे.[११] आणि अल्लाह सर्वांपेक्षा उत्तम उपजीविका देणारा आहे.[१२] (११)

**१०)** ही मदीनेच्या प्रारंभीच्या काळातील घटना आहे. शाम-सीरियाहून एक व्यापारी काफिला ऐन जुमआच्या नमाजच्या वेळी आला व ढोल ताशे बडवणे प्रारंभ केले जेणेकरून वस्तीतील लोकांना त्याच्या आगमनाची कल्पना यावी. अल्लाहचे पैगंबर (स.) त्यावेळी प्रवचन देत होते. ढोल ताशांचा आवाज ऐकून लोक अस्वस्थ झाले व १२ जणांशिवाय इतर सर्वांनी काफिल्याकडे धाव घेतली.

**११)** सदरहू वाक्याने, सहाबा (रजि.) यांच्याकडून जी चूक घडली होती ती कोणत्या स्वरूपाची होती हे दृग्गोचर होत आहे. जर (अल्लाह त्यापासून वाचवो) ईमानाची कमतरता आणि आखिरतवर मुद्दाम भौतिक सामग्रीला प्राधान्य देणे असे त्यामागील कारण असते तर सर्वोच्च अल्लाहच्या प्रकोप आणि कानउघडणीची तऱ्हा काही दुसरीच असती. परंतु असा कोणताही दोष तेथे नव्हता तर जे काही घडले होते ते केवळ संस्कारातील अपूर्णपणामुळे घडले होते. म्हणून प्रथम उपदेशात्मक रीतीने जुमआचे शिष्टाचार सांगितले गेले. मग त्या चुकीला धरून उपदेशात्मक पद्धतीने लक्षात आणले गेले की जुमआतील खुतबा ऐकणे व नमाज अदा केल्यावर जे काही तुम्हाला ईश्वराच्या येथे मिळेल ते या दुनियेतील व्यापार आणि खेळ तमाशापेक्षा श्रेष्ठ आहे.

**१२)** म्हणजे या जगात लाक्षणिक प्रकारे जे कोणी उदरनिर्वाहाच्या प्राप्तीचे साधन बनतात, त्या सर्वांपेक्षा सर्वोच्च अल्लाह उत्तम रोजी देणारा आहे.



# ६३ सूरह अल्‌मुनाफिक़ून

*(मदीनाकालीन, वचने ११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे पैगंबर (स.), जेव्हा हे दांभिक तुमच्यापाशी येतात तेव्हा म्हणतात, ''आम्ही ग्वाही देतो की आपण खरोखर अल्लाहचे प्रेषित आहात.'' होय, अल्लाह जाणतो की तुम्ही निश्चितच त्याचे प्रेषित आहात परंतु अल्लाह ग्वाही देतो की हे दांभिक पूर्णत: खोटे आहेत.[१] यांनी आपल्या शपथांना ढाल बनवून घेतले आहे आणि अशा प्रकारे हे अल्लाहच्या मार्गापासून स्वत: दूर राहतात व दुनियेला रोखतात. कशी वाईट कृत्ये आहेत जी हे लोक करीत आहेत. हे सर्वकाही या कारणामुळे आहे की या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि मग इन्कार केला, म्हणून यांच्या हृदयांवर मोहर लावली गेली, आता यांना काहीच समजत नाही.[२] (१-३)

यांना पाहिले तर यांची शरीरयष्टी तुम्हाला फार शानदार दिसेल. यांनी बोलले तर यांच्या गोष्टी तुम्ही ऐकतच राहाल. परंतु खरे पाहता हे जणू लाकडाचे ओंडके

**१)** म्हणजे जी गोष्ट ते तोंडातून काढत आहेत ती आपल्या जागी सत्य आहे खरी, परंतु तोंडातून जे शब्द ते व्यक्त करीत आहेत तशीच त्यांची श्रद्धा नसल्याकारणाने आपल्या या वचनात, की आपण प्रेषित असल्याची आम्ही ग्वाही देतो, ते खोटे आहेत.

**२)** सदरहू आयतीत ईमान आणण्याने अभिप्रेत श्रद्धेची कबुली देऊन मुसलमानांत सामील होणे आहे आणि द्रोह करण्याने अभिप्रेत मनापासून श्रद्धा न ठेवणे आणि वरवरच्या आपल्या दिखाऊ श्रद्धा बाळगण्या अगोदर ते ज्या द्रोहावर दृढ होते त्यावरच कायम राहणे होय. सदरहू आयत एकंदरीत त्या आयतींपैकी एक आहे ज्यांच्यात अल्लाहकडून कुणाच्या हृदयावर मोहोर लावण्याचा अर्थ अगदी स्पष्टपणे सांगितलेला आहे. या दांभिकांच्या हृदयांवर अल्लाहने मोहोर लावली होती म्हणून त्यांची अशी स्थिती झाली आहे व या कारणाने श्रद्धा त्यांच्या मनात शिरूच शकली नाही व नाइलाज म्हणून ते दांभिक बनले आहेत असे नाही तर त्याने त्यांच्या हृदयांवरही मोहोर त्यावेळी लावली जेव्हा श्रद्धा व्यक्त केल्यानंतरसुद्धा त्यांनी द्रोहावर कायम राहण्याचा निर्णय घेतला, तेव्हा त्यांच्याकडून शुद्ध अंत:करणीय श्रद्धेची सुबुद्धी हिरावून घेतली गेली व त्याच दांभिकतेची दुर्बुद्धी त्यांना देण्यात आली जी त्यांनी स्वत: होऊनच पत्करली होती.

आहेत जे भिंतीला जडवून ठेवले असावेत.[३] प्रत्येक जोराच्या आवाजाला हे आपल्याविरूद्ध समजतात, हे पक्के शत्रू आहेत, यांच्यापासून जपून रहा, अल्लाहचा मार यांच्यावर, हे कोणीकडे उलटे फिरविले जात आहेत.[४] (४)

आणि जेव्हा यांना सांगण्यात येते की, या, जेणेकरून अल्लाहच्या पैगंबरांनी तुमच्यासाठी क्षमेची प्रार्थना करावी तर ते मान झटकतात आणि तुम्ही पाहता की ते मोठ्या गर्वाने स्वतःला रोखतात. हे पैगंबर (स.), तुम्ही मग यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना करा अथवा करू नका यांच्यासाठी एकसारखेच आहे. अल्लाह यांना कदापि माफ करणार नाही, अल्लाह अवज्ञाकारी लोकांना कदापि मार्गदर्शन करीत नसतो. (५-६)

हे तेच लोक होत जे म्हणतात की पैगंबर (स.) च्या साथीदारांवर खर्च करावयाचे बंद करून टाका जेणेकरून हे विस्कळीत होतील, वास्तविकत: पृथ्वी व आकाशांच्या खजिन्यांचा स्वामी अल्लाह आहे परंतु हे दांभिक समजत नाहीत. ते म्हणतात की आम्ही परत मदीन्याला पोहचू तेव्हा जो प्रतिष्ठित आहे तो, जो अप्रतिष्ठित आहे त्याला घालवून लावील[५] वस्तुत: प्रतिष्ठा तर अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) व श्रद्धावंतांसाठी आहे, पण हे दांभिक जाणत नाहीत. (७-८)

---

**३)** म्हणजे हे जे भिंतीला तक्के लावून बसतात, हे मानव नसून लाकडी ठोकळे आहेत. त्यांना लाकडी ठोकळ्यांची उपमा देऊन माणुसकीचे जे खरे सत्व आहे त्या नैतिकतेच्या आत्म्याला हे पारखे आहेत, असे दाखविलेले आहे. शिवाय त्यांना भिंतींना लागून असलेल्या ठोकळ्यांची उपमा देऊन, हे अगदी निरुपयोगी आहेत असे दर्शविले गेले आहे कारण लाकूडदेखील जर उपयुक्त ठरते तर केवळ त्याचवेळी जेव्हा ते एखाद्या छतात अथवा दारात अथरा एखाद्या फर्निचरात लागले असावे. भिंतीला लावून ठोकळ्याच्या स्वरूपात जे लाकूड ठेवलेले असेल ते काहीच लाभ देत नाही.

**४)** त्यांना श्रद्धेकडून दांभिकतेकडे परत फेरणारा कोण आहे हे सांगितलेले नाही. याचा खुलासा न केला असल्यामुळे अनायासे असाच अर्थ निघतो की त्यांच्या या अशा उफराट्या चालीचे कोणतेही एकच कारण नाही तर त्यात अनेक कारणे कार्यरत आहेत, शैतान आहे, वाईट मित्र आहेत, त्यांच्या वासना व स्वार्थ आहे, कुणाची पत्नी कारणीभूत आहे, कुणाची मुले त्याला कारणीभूत आहेत, कुणाच्या जातबिरादरीतील दुष्ट व्यक्ती कारणीभूत आहेत तर कुणाला मत्सराने, कपटाने व गर्वाने या मार्गावर टाकले आहे.

**५)** म्हणजे केवळ यावरच थांबतात की पैगंबराजवळ क्षमायाचनेसाठी न यावे, असे नाही तर ही गोष्ट ऐकून गर्व आणि अभिमानाने डोकी झटकतात व पैगंबराजवळ येणे व क्षमा मागणे याला अपमान मानून आपल्या जागी खिळून बसून राहतात. हे त्यांचे श्रद्धावंत नसण्याचे उघड लक्षण आहे.



हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, तुमची मालमत्ता आणि तुमची संतती तुम्हाला अल्लाहच्या स्मरणापासून गाफिल करून टाकू नये. जे लोक असे करतील तेच तोट्यात राहणारे आहेत. जी उपजीविका आम्ही तुम्हाला दिली आहे तिच्यातून खर्च करा यापूर्वी की तुमच्यापैकी एखाद्याची मृत्यूघटका (जवळ) येईल आणि त्यावेळी तो म्हणेल, ''हे माझ्या पालनकर्त्या, का बरे तू मला थोडीशी आणखी सवड दिली नाही की मी सदका (दान) केला असता आणि सदाचारी लोकांत सामील झालो असतो.'' वास्तविक पाहता जेव्हा एखाद्याचा कार्यकालावधी पूर्ण होण्याची वेळ येते तेव्हा अल्लाह कोणत्याही व्यक्तीला अधिक सवड देत नसतो. आणि जे काही तुम्ही करता; अल्लाह त्याची खबर राखणारा आहे. (९-११)

# ६४ सूरह अत्तग़ाबुन

*(मदीनाकालीन, वचने १८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

अल्लाहचे पावित्र्यगान करीत आहे ती प्रत्येक वस्तू जी आकाशांत आहे आणि ती प्रत्येक वस्तू जी पृथ्वीत आहे. त्याचेच राज्य आहे आणि त्याच्यासाठीच प्रशंसा आहे व तो प्रत्येक वस्तूला समर्थ आहे.[१] तोच आहे ज्याने तुम्हाला निर्माण केले मग तुमच्यापैकी कोणी सत्याचा इन्कार करणारा आहे तर कोणी श्रद्धावंत, आणि अल्लाह ते सर्वकाही पाहत आहे जे तुम्ही करता. त्याने पृथ्वी आणि आकाशांना सत्याधिष्ठित निर्माण केले आहे, आणि तुमचे स्वरूप बनविले आणि फारच छान छान बनविले आहे. आणि त्याकडेच सरतेशेवटी तुम्हाला परतावयाचे आहे. पृथ्वी आणि आकाशांच्या प्रत्येक गोष्टीचे त्याला ज्ञान आहे. जे काही तुम्ही लपविता आणि जे काही तुम्ही उघड करता,[२] सर्व त्याला माहीत आहे आणि तो अंत:करणाची स्थितीदेखील जाणतो. (१-४)

काय तुम्हाला त्या लोकांची काही हकीगत पोहचली नाही ज्यांनी यापूर्वी द्रोह केला आणि मग आपल्या कर्माची कटू फळे चाखली? आणि पुढे त्यांच्यासाठी एक दु:खदायक प्रकोप आहे. या परिणामाला ते पात्र यासाठी झाले की त्यांच्याजवळ त्यांचे प्रेषित उघडउघड प्रमाण आणि संकेत घेऊन येत राहिले, परंतु त्यांनी सांगितले, ''काय माणसे आम्हाला मार्गदर्शन करतील?'' अशाप्रकारे त्यांनी मान्य करण्यापासून इन्कार केला आणि तोंड फिरविले, तेव्हा अल्लाहसुद्धा त्यांच्याकडून बेपर्वा झाला व अल्लाह तर आहेच निरपेक्ष आणि आपल्याठायी स्वयंस्तुत्य. (५-६)

इन्कार करणाऱ्यांनी मोठ्या दाव्यानिशी म्हटले आहे की ते मृत्यूनंतर कदापि पुन्हा उठविले जाणार नाहीत, त्यांना सांगा, ''नव्हे, माझ्या पालनकर्त्याची शपथ, तुम्ही

१) म्हणजे तो सर्वशक्तिमान आहे जे काही करू इच्छित असेल, करू शकतो, त्याच्या सामर्थ्याला मर्यादा घालू शकावी अशी कोणतीही शक्ती नाही.

२) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो की 'जे काही तुम्ही गुप्तपणे करीत असता व जे काही उघडपणे करीत असता.'



अवश्य उठविले जाल,[३] मग जरूर तुम्हाला दाखविले जाईल की तुम्ही (जगात) काय काय केले आहे, आणि असे करणे अल्लाहसाठी फार सोपे आहे.'' (७)

तर श्रद्धा ठेवा अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर आणि त्या प्रकाशावर जो आम्ही अवतरला आहे.[४] जे काही तुम्ही करता अल्लाह त्याची खबर राखणारा आहे. (याचा समाचार तुम्हाला त्या दिवशी कळेल) जेव्हा जमवाजमवीच्या दिवशी तो तुम्हा सर्वांना एकत्र करील.[५] तो दिवस असेल एक दुसऱ्याच्या मुकाबल्यात लोकांच्या जय-

३) या ठिकाणी प्रश्न असा उद्भवतो की परलोकाचा इन्कार करणाऱ्याच्या दृष्टीने यात काय फरक पडू शकतो बरे की परलोकाच्या निश्चिततेची वार्ता आपण त्याला शपथ घेऊन सांगावी अथवा शपथ न घेताच सांगावी? ज्याअर्थी तो या गोष्टीला मानीतच नाही त्याअर्थी केवळ या कारणाने तो कसे मान्य करेल की आपण शपथेवर त्याला ही गोष्ट सांगत आहात? याला उत्तर असे की अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे संबोधन अशा लोकांना होते ज्यांना ज्ञान व अनुभवाने याची प्रचिती आली होती की पैगंबर (स.) यांनी उभ्या हयातीत कधीच खोटे बोललेले नाही. म्हणून ते लोक मुखाने पैगंबर (स.) यांच्याविरूद्ध कितीही कुभांड का रचेनात. मनात मात्र, इतका सच्चा माणूस ईश्वराची शपथ घेऊन अशी गोष्टही कधी उच्चारू शकतो जी सत्याधिष्ठित असल्याचे त्याला ज्ञानही नसावे व विश्वासदेखील, अशी कल्पनासुद्धा ते करू शकत नव्हते.

४) मागील व पुढील संदर्भाद्वारे ही गोष्ट या ठिकाणी स्वत:च स्पष्ट होत आहे की अल्लाहने उतरविलेल्या प्रकाशाने अभिप्रेत कुरआन आहे. ज्याप्रमाणे प्रकाश स्वयं प्रकट असतो व पूर्वी ज्या वस्तू अंधारात लपलेल्या होत्या, सभोवती असलेल्या अशा सर्व वस्तूंनाही तो प्रकट करतो, त्याचप्रमाणे कुरआनदेखील एक असा दीप आहे ज्याचे सत्याधिष्ठित असणे ही गोष्ट आपल्याजागी स्वयं प्रकाशित असून ज्या प्रश्नांच्या आकलनात मानवी बुद्धीची व ज्ञानाची सर्व साधने तोकडी व अपुरी पडतात असे सर्व प्रश्नदेखील मनुष्य त्याच्या प्रकाशात समजून घेऊ शकतो.

५) जमवाजमवीच्या दिवसाने अभिप्रेत या ठिकाणी प्रलय आहे तर सर्वांना एकत्र करण्याने अभिप्रेत त्या सर्व माणसांना जिवंत करून एकाच वेळी गोळा करणे होय, जे निर्मितीच्या प्रारंभापासून ते प्रलयापर्यंत जगात जन्मले असतील.

पराजयाचा.[६] ज्याने अल्लाहवर श्रद्धा ठेवली आहे व जो सत्कृत्ये करतो, अल्लाह त्याचे अपराध झाडून टाकील आणि त्याला अशा स्वर्गात दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील. हे लोक सदासर्वदा त्यात राहतील. हेच मोठे यश होय. आणि ज्या लोकांनी द्रोह केला आहे आणि आमच्या संकेतवचनांना खोटे ठरविले आहे, ते नरकवासी असतील ज्यात ते सदैव राहतील, आणि ते अत्यंत वाईट ठिकाण आहे. (८-१०)

कोणतेही संकट कधीही येत नसते पण अल्लाहच्या आज्ञेनेच येते. जो मनुष्य अल्लाहवर श्रद्धा ठेवत असेल, अल्लाह त्याच्या हृदयाला मार्गदर्शन करतो. अल्लाहला प्रत्येक वस्तूचे ज्ञान आहे. अल्लाहची आज्ञा पाळा आणि पैगंबर (स.) ची आज्ञा पाळा. परंतु जर तुम्ही आज्ञापालनापासून तोंड फिरवीत असाल तर आमच्या पैगंबरावर स्पष्टपणे सत्य पोहचविण्याशिवाय कोणतीही जबाबदारी नाही. अल्लाह तो आहे ज्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही, म्हणून श्रद्धावंतानी अल्लाहवरच भिस्त ठेवली पाहिजे.[७] (११-१३)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, तुमच्या पत्नीं आणि तुमच्या संततीपैकी काही तुमचे शत्रू आहेत, त्यांच्यापासून सावध रहा. आणि जर तुम्ही क्षमा आणि दुर्लक्ष

६) म्हणजे खरे यशापयश प्रलयाच्या दिवशी कळेल. तेथे पोहचल्यावर समजेल की खऱ्या अर्थाने नुकसान कोणाचे झाले आहे व नफा कोणी कमविला आहे. खरोखर फसगत कुणाची झाली आहे व चतुर कोण ठरला आहे. आपल्या उभ्या जीवनाचे भांडवल वास्तविकपणे कोणी एका चुकीच्या व्यवसायात खर्चून आपले दिवाळे काढले आहे तर कुणी आपल्या शक्ती, योग्यता, प्रयत्न आणि वेळ व मालमत्तेला लाभदायक व्यवहारात खर्चून, ते सर्व फायदे लुटून घेतले जे पहिल्या माणसालाही लुटता आले असते जर त्याने दुनियेची वास्तवता समजून घेण्यात धोका खाल्ला नसता.

७) म्हणजे ईशत्वाचे सर्वाधिकार एकट्या सर्वोच्च अल्लाहच्या हातात आहेत. कुणा दुसऱ्याने तुमचे चांगले किंवा वाईट भाग्य घडविणे, वास्तविकपणे ही गोष्ट मुळात त्याच्या अधिकारातच नाही. चांगली वेळ येऊ शकते तर केवळ त्याच्याच आणण्याने येऊ शकते व वाईट वेळ टळू शकते तर केवळ त्याच्या टाळण्यानेच टळू शकते. म्हणून जो माणूस शुद्ध मनाने अल्लाहला एकमेव ईश्वर मानत असेल, त्याने अल्लाहवर विश्वास टाकावा आणि जगात एका श्रद्धावंताच्या भूमिकेत या निर्धाराने आपले कर्तव्य पार पाडत राहावे की कोणत्याही परिस्थितीत भले केवळ त्याच मार्गाने आहे ज्याकडे अल्लाहने मार्गदर्शन केले आहे, या मार्गाशिवाय त्याच्यासाठी मुळापासून इतर कोणताच मार्ग नाही.



करण्याच्या व्यवहाराने त्यांना माफ केले तर अल्लाह क्षमाशील व परमकृपाळू आहे.[८] तुमची मालमत्ता आणि तुमची संतती तर एक कसोटी आहे. आणि अल्लाहच तर आहे ज्याच्याजवळ महान मोबदला आहे. म्हणून जितके तुमच्या आवाक्यात आहे तितके अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगत रहा आणि ऐका व आज्ञा पाळा, आणि आपली मालमत्ता खर्च करा, हे तुमच्यासाठी उत्तम आहे. जे आपल्या मनातील संकुचितपणापासून सुरक्षित राहिले केवळ तेच सफलता प्राप्त करणारे आहेत. जर तुम्ही अल्लाहला उत्तम कर्ज दिले तर तो तुम्हाला कित्येक पटीने वाढवून देईल आणि तुमच्या चुकांना माफ करील. अल्लाह मोठा कदर करणारा व सहनशील आहे, हजर आणि परोक्ष प्रत्येक गोष्ट जाणतो, जबरदस्त आणि बुद्धिमान आहे. (१४-१८)

८) म्हणजे सांसारिक नातेगोत्यांच्या दृष्टीने हे लोक असे आहेत जे माणसाला सर्वात जास्त प्रिय असतात. परंतु धर्माच्या दृष्टीने हे लोक तुमचे शत्रू आहेत. हे शत्रुत्व मग अशा स्वरूपात का असेना की ते तुम्हाला नेकीपासून परावृत्त करू पाहात असावेत व बुराईकडे वळवीत असावेत किंवा अशा स्वरूपात की ते तुम्हाला श्रद्धेपासून परावृत्त करीत असावेत द्रोहाकडे ओढीत असावेत. अथवा त्यांच्या सहानुभूतीं अश्रद्धावंतांशी असाव्यात, कसेही असो ही बाबच अशी आहे की त्यापासून तुम्ही सावध असले पाहिजे. त्यांच्या प्रेमपाशात अडकून स्वत:च्या शेवटाची वाईटगत होता कामा नये. तथापि याचा अर्थ असा नाही की तुम्ही त्याना शत्रू मानून त्यांच्याशी कठोर वर्तन करू लागावे तर हेतू केवळ इतकाच की तुम्ही जर त्यांची सुधारणा करू शकत नसाल तर कमीत कमी बिघडण्यापासून स्वत:चे तरी रक्षण करा.

# ६५ सूरह अत्तलाक़

*(मदीनाकालीन, वचने १२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे नबी (स.), जेव्हा तुम्ही लोक स्त्रियांना 'तलाक' (फारकत) द्याल तेव्हा त्यांना त्यांच्या 'इद्दत' (प्रतिक्षाकाळा) साठी 'तलाक' देत जा.[१] आणि 'इद्दत'च्या कालावधीची योग्य प्रकारे गणना करा, आणि अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा जो तुमचा पालनकर्ता आहे,[२] ('इद्दत'च्या कालावधीत) न तुम्ही त्यांना त्यांच्या घरातून काढा आणि न त्यांनी स्वत: निघावे.[३] याव्यतिरिक्त की त्यांच्याकडून एखादा उघड व्यभिचार घडला असेल.[४] या अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादा आहेत. आणि जो कोणी अल्लाहच्या मर्यादांचे उल्लंघन करील तो आपल्यावर स्वत: अत्याचार करील. तुम्ही जाणत नाही, कदाचित यानंतर अल्लाह (समेटाची) एखादी स्थिती निर्माण करील. मग जेव्हा त्या आपल्या ('इद्दत'च्या) मुदतीच्या समाप्तीला पोहचतील तेव्हा एक तर त्यांना चांगल्या रीतीने (आपल्या विवाहबंधनात) रोखून ठेवा अथवा चांगल्या रीतीने त्यांच्यापासून विभक्त व्हा आणि दोन

---

१) 'इद्दत'करिता तलाक देण्याचे दोन अर्थ असून ते दोन्ही या ठिकाणी अभिप्रेत आहेत. त्यापैकी एक असा की विटाळ आलेल्या अवस्थेत स्त्रीला तलाक देऊ नका तर अशा वेळी तलाक द्या की जेथून इद्दत आरंभ होऊ शकावी. दुसरा अर्थ असा की इद्दत-कालावधीच्या आत रुजू करण्यास वाव ठेवून तलाक द्या. अशा प्रकारे तलाक देऊ नका जेणेकरून रुजू होण्यास वावच ठरू नये. सदरहू आयतीचे स्पष्टीकरण हदीसमध्ये आढळते. त्यानुसार तलाकची पद्धत अशी की विटाळ आलेल्या अवस्थेत तलाक दिली जाऊ नये तर शुद्ध झालेल्या अवस्थेत अशावेळी तलाक दिली जावी जेव्हा पतीने पत्नीशी संभोग केला नसावा किंवा अशा स्थितीत दिली जावी जेव्हा स्त्रीचे गर्भवती असणे माहीत असावे तसेच एकाच वेळी तीन तलाक दिल्या जावू नयेत.

२) अर्थात तलाक म्हणजे खेळ समजू नका की तलाकसारखी महत्वपूर्ण घटना घडल्यानंतर ती केव्हा दिली गेली आहे. इद्दतला केव्हा प्रारंभ झाला, व ती संपते केव्हा याचीसुद्धा आठवण ठेवली जाऊ नये. जेव्हा तलाक दिली जाईल तेव्हा ती देण्याची वेळ व तारीख ध्यानात ठेवली पाहिजे. शिवाय स्त्रीला कोणत्या अवस्थेत तलाक दिली गेली आहे तेही लक्षात ठेवले पाहिजे.

३) म्हणजे ना पुरुषाने क्रोधात येऊन स्त्रीला घराबाहेर करावे व ना स्त्रीने स्वत: होऊन रागाच्या भरात घर सोडावे. इद्दतपर्यंत घर तिचेच आहे. उभयतांनी त्याच घरात राहिले पाहिजे जेणेकरून परस्पराशी अनुकूलतेचा काही मार्ग निघत असेल तर त्याचा लाभ उचलला जावा. दोन्ही एकाच घरात वावरत असतील तर तीन महिन्यापर्यंत किंवा तीन मासिक पाळ्या लोटेपर्यंत किंवा गर्भावस्थेच्या स्थितीत गर्भमुक्त होईपर्यंत अशा प्रकारच्या संधी वरचेवर निघू शकतात.

४) म्हणजे दुराचाराच्या आहारी गेली असावीत किंवा इद्दतच्या कालावधीत भांडणतंटे करीत असावीत व अपशब्द उच्चारीत असावीत.



अशा इसमांना साक्षीदार बनवा जे तुमच्यापैकी न्यायनिष्ठ असतील.[५] आणि (हे साक्षीदार बनणाऱ्यांनो) साक्ष ठीकठीक अल्लाहसाठी द्या. (१-२-)

या गोष्टी आहेत ज्यांचा तुम्हा लोकांना उपदेश दिला जात आहे. त्या प्रत्येक इसमाला जो अल्लाह आणि मरणोत्तर जीवनाच्या दिवसावर श्रद्धा ठेवीत असेल.[६] जो कोणी अल्लाहच्या प्रकोपाला भिऊन काम करील, अल्लाह त्याच्यासाठी अडचणीतून निघण्याचा एखादा मार्ग निर्माण करून देईल आणि त्याला अशा मार्गाने उपजीविका देईल जी त्याच्या कल्पनेतदेखील नसेल. जो अल्लाहवर भिस्त ठेवील त्याच्यासाठी तो पुरेसा आहे. अल्लाह आपले कार्य सिद्ध करूनच राहतो. अल्लाहने प्रत्येक वस्तूसाठी एक प्रमाण नियोजित करून ठेवले आहे. (-२-३)

आणि तुमच्या स्त्रियांपैकी ज्या विटाळासंबंधी निराश झालेल्या असतील त्यांच्या बाबतीत जर तुम्हा लोकांना काही शंका असेल तर (तुम्हाला माहीत व्हावे की) त्यांची 'इद्दत' तीन महिने आहे. आणि हीच आज्ञा त्यांच्यासंबंधी आहे ज्यांना अद्याप विटाळ आला नसेल.[७] आणि गर्भवती स्त्रियांच्या 'इद्दत'ची सीमा हीआहे की जेव्हा त्या गर्भमुक्त होतील.[८] जो इसम अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगील त्याच्याबाबतीत तो सवलत

---

५) याच्याने अभिप्रेत तलाकप्रसंगी तसेच रुजू करतानाही साक्षीदार करावेत, असे आहे.

६) हे शब्द स्वत:च असे दर्शवीत आहेत की वर ज्या सूचना सांगितलेल्या आहेत, त्या कायद्यात्मक नसून उपदेशात्मक आहेत. माणसाने जर वरील सांगितलेल्या पद्धतीच्याविरूद्ध तलाक देऊन टाकली, इद्दतची कालगणना सुरक्षित ठेवली नाही, पत्नीला योग्य कारणाविनाच घराबाहेर केले, इद्दतज्या शेवटी रुजू केले तरी स्त्रीला छळण्यासाठी केले, व रजा दिली तरी भांडणतंटे करूनच दिली शिवाय तलाक, रुजू आणि फारकत कोणत्याही वेळी साक्षीदार ठेवले नाही तर यामुळे तलाक, रुजू आणि फारकतच्या कायद्यात्मक होणाऱ्या परिणामात काहीही फरक पडणार नाही. तथापि सर्वोच्च अल्लाहच्या उपदेशाविरूद्ध केलेली कृती या गोष्टीचे प्रमाण ठरेल की त्याच्या मनात अल्लाह आणि आखिरतच्या दिवसावरील खऱ्या श्रद्धेचे अस्तित्व नाही व म्हणूनच त्याने एखाद्या खऱ्या श्रद्धावंताने अंगिकारायला नको होते असे वर्तन अंगिकारले आहे.

७) मासिकपाळी मग ती अल्पवयामुळे आली नसो की काही स्त्रियांना फार उशिरा वयात पाळी येणे सुरू होते, या कारणाने असो किंवा कदाचित प्रसंगी असेही घडते की एखाद्या स्त्रीला आयुष्यभर पाळी येतच नाही, म्हणून असो, कसेही असो अशा सर्व स्थितीत, मासिक पाळी येण्यापासून निराश झालेल्या स्त्रीसाठी जी इद्दत आहे तीच 'इद्दत' अशा स्त्रियांसाठीही आहे, अर्थात तलाक दिल्यावेळेपासून तीन महिने.

८) म्हणजे स्त्रीची गर्भमुक्ती, मग ती पती निधनानंतर लगेच व्हावी की चार महिने व दहा दिवसांपेक्षा जास्त काळ घेत असावी. कसे का असेना, मूल जन्मल्याबरोबर ती 'इद्दत' बाह्य ठरेल.

निर्माण करतो. ही अल्लाहची आज्ञा आहे जी त्याने तुमच्याकडे अवतरली आहे. जो अल्लाहच्या कोपाचे भय बाळगेल, अल्लाह त्याचे दोष दूर करील आणि त्याला मोठा मोबदला देईल. (४-५)

त्यांना ('इद्दत'च्या काळात) त्याच जागी ठेवा जेथे तुम्ही राहता, जशी जागा तुम्हाला उपलब्ध असेल. आणि त्यांना अडचणीत आणण्यासाठी त्रास देऊ नका. (६-)

आणि जर त्या गर्भवती असतील तर त्यांच्यावर त्या वेळेपर्यंत खर्च करीत रहा जोपर्यंत त्या गर्भमुक्त होत नाहीत. मग जर त्या तुमच्यासाठी (बाळाला) दूध पाजतील तर त्याचा मोबदला त्यांना द्या, आणि भल्याप्रकारे (मोबदल्याचा मामला) परस्पर सल्लामसलतीने ठरवा. परंतु जर तुम्ही (मोबदला ठरविण्यात) एकमेकाला अडचणीत आणले तर बाळाला कोणी अन्य स्त्री दूध पाजील. सुखवस्तू माणसाने आपल्या सुखद परिस्थितीनुसार मोबदला (नफ़क़ा) द्यावा आणि ज्याला उपजीविका कमी दिली गेली असेल त्याने त्याच मालातून खर्च करावा जो अल्लाहने त्याला दिला आहे. अल्लाहने ज्याला जितके दिलेले आहे त्यापेक्षा अधिक त्याला तो जबाबदार धरत नाही. हे दूर नव्हे की अल्लाह अडचणींच्या स्थितीनंतर सुबत्तादेखील प्रदान करील. (-६-७)

कित्येक[९] वस्त्या अशा आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्ता आणि त्याच्या प्रेषितांच्या आज्ञेविरूद्ध दुर्लक्ष केले तर आम्ही त्यांचा सक्तीने हिशेब घेतला आणि त्यांना वाईट प्रकारे शिक्षा दिली. त्यांनी आपण केलेल्या कर्मांची फळे चाखली आणि त्यांची कार्यपरिणती तोटाच तोटा आहे, अल्लाहने (परलोकांत) त्यांच्यासाठी तीव्र प्रकोप उपलब्ध करून ठेवला आहे. म्हणून अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, हे बुद्धिमान लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहने तुमच्याकडे एक आदेश अवतरला आहे. एक असा पैगंबर[१०] जो तुम्हाला अल्लाहची स्पष्टपणे मार्गदर्शन करणारी वचने ऐकवितो जेणेकरून श्रद्धावंत व सत्कृत्ये करणाऱ्यांना अंधारातून काढून प्रकाशात आणावे. जो

९) आता मुसलमानांना बजावले जात आहे की अल्लाहचे पैगंबर (स.) आणि त्याच्या ग्रंथाद्वारे ज्या आज्ञा त्यांना दिल्या गेल्या आहेत त्याचेविरूद्ध जर ते करतील तर या जगात आणि परलोकातही त्यांना कोणत्या परिणामांना तोंड द्यावे लागेल व जर आज्ञापालनाचा मार्ग अवलंबतील तर त्यांना कोणता मोबदला मिळेल.

१०) भाष्यकारांपैकी काहींनी उपदेशाने अभिप्रेत कुरआन असल्याचे मानले आहे तर रसूलने अभिप्रेत मुहम्मद (स.). काही भाष्यकार म्हणतात की उपदेशाने अभिप्रेत खुद्द हजरत मुहम्मद (स.) हेच आहेत. म्हणजे पैगंबर (स.) यांचे अस्तित्व सर्वस्वी उपदेश होते. आमच्याजवळ हेच दुसरे भाष्य अधिक योग्य आहे.



कोणी अल्लाहवर श्रद्धा ठेवील आणि सत्कर्म करील, अल्लाह त्याला अशा स्वर्गात दाखल करील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील, हे लोक त्यांच्यात सदासर्वदा राहतील. अल्लाहने अशा इसमांसाठी उत्तम उपजीविका ठेवली आहे. (८-११)

अल्लाह तो आहे ज्याने सप्त आकाश बनविले आणि त्याच प्रमाणात पृथ्वी सुद्धा निर्माण केली.[११] त्यांच्या दरम्यान आज्ञा उतरत असते (ही गोष्ट तुम्हाला अशासाठी सांगितली जात आहे) जेणेकरून तुम्ही जाणून घ्यावे की अल्लाह प्रत्येक वस्तूवर प्रभुत्व राखतो, आणि असे की अल्लाहचे ज्ञान प्रत्येक वस्तुला व्यापून आहे. (१२)

११) 'त्याचप्रमाणे'चा अर्थ जितके आकाश बनविले तितक्याच पृथ्वीही बनविल्या असा नाही, तर अर्थ असा की ज्याप्रमाणे त्याने अनेक आकाश बनविले आहेत त्याचप्रमाणे अनेक पृथ्वीही त्याने बनविल्या आहेत. तसेच 'पृथ्वीसुद्धा' याचा अर्थ असा की ज्याप्रकारे ही पृथ्वी ज्यावर मानव राहतात, आपल्यावरील अस्तित्वांसाठी बिछायत आणि पाळणे बनलेली आहे त्याचप्रमाणे सर्वोच्च अल्लाहने सृष्टीत आणखीन पृथ्वींही बनवूनं ठेवल्या आहेत. त्या आपापल्या वस्तीसाठी बिछायत आणि पाळणे आहेत. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचे तर असे की आकाशात हे जे असंख्य ग्रह व नक्षत्रे दिसतात हे सर्व सुने, भकास पडले आहेत असे नाही तर पृथ्वीप्रमाणे त्यांच्यापैकी बहुतेक असे आहेत ज्यांच्यात जग वसले आहे.

# ६६ सूरह अत्‌तह्‌रीम

*(मदीनाकालीन, वचने १२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे नबी (स.), तुम्ही का त्या वस्तूला निषिद्ध ठरविता जी अल्लाहने तुमच्यासाठी वैध केली आहे?[१] (काय अशासाठी की) तुम्ही आपल्या पत्नीची मर्जी सांभाळू इच्छिता?[२] - अल्लाह माफ करणारा आणि दया करणारा आहे. अल्लाहने तुम्हा लोकांसाठी आपल्या शपथांच्या बंधनांतून मुक्त होण्याची पद्धत ठरवून दिली आहे.[३] अल्लाह तुमचा वाली आहे, आणि तो सर्वज्ञ व बुद्धिमान आहे. (१-२)

(आणि हा मामलासुद्धा लक्ष देण्याजोगा आहे) नबी (स.) यांनी एक गोष्ट आपल्या एका पत्नीशी गुप्तपणे सांगितली होती. मग जेव्हा त्या पत्नीने (अन्य कुणावर) ते गुपित

१) वास्तविकपणे हा विचारलेला प्रश्न नाही तर नापसंती व्यक्त केलेली आहे. म्हणजे हेतू पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना, तुम्ही हे काम का केले म्हणून विचारावयाचा नाही तर अल्लाहने वैध ठरविलेल्या वस्तू स्वत:साठी वर्ज्य मानण्याची जी कृती आपणाकडून घडली ती सर्वोच्च अल्लाहला रुचली नाही या गोष्टीबद्दल त्यांना बजावणे असा हेतू आहे. पैगंबर (स.) यांचे स्थान कुणा सामान्य माणसासमान नाही तर अल्लाहचे प्रेषित म्हणून ते होते. शिवाय त्यांचे एखाद्या वस्तूला स्वत:साठी निषिद्ध ठरविल्याने या गोष्टीची आशंका होती की मुस्लिम समाजदेखील त्या वस्तूला निषिद्ध अथवा कमीत कमी अप्रिय समजू लागेल, म्हणून सर्वोच्च अल्लाहने पैगंबर (स.) यांच्या या कृतीवर पकड केली व त्यांना या वर्ज्य करण्यापासून परावृत्त होण्याची आज्ञा दिली. यावरून ही गोष्टही स्पष्ट होते की पैगंबर (स.) यांनादेखील स्वत: होऊन कोणत्याही गोष्टीला वैध अथवा निषिद्ध ठरविण्याचा अधिकार प्राप्त नव्हता.

२) यावरून असे कळले की पैगंबर (स.) यांनी वर्ज्य करण्याची ही कृती आपल्या स्वत:च्या एखाद्या इच्छेमुळे केली होती असे नाही तर त्यांच्या पत्नींनी असे इच्छिले होते की पैगंबर (स.) यांनी असे करावे. पैगंबर (स.) यांनी केवळ त्यांना खुश करण्यासाठी एका वैध वस्तूला आपल्यासाठी निषिद्ध करून घेतली होती. हदीसच्या विश्वसनीय निवेदनावरून असे कळते की अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या एक पत्नी (हजरत जैनब-रजि.) यांच्या येथे कुठून तरी मध आला होता. मध, पैगंबर (स.) यांना अत्यंत आवडत असे, म्हणून ते तेथे नेहमीपेक्षा जास्त वेळ थांबू लागले होते. म्हणून त्यांच्या इतर काही पत्नींना मत्सर वाटला व त्यांनी संगनमत करून पैगंबर (स.) यांच्या मनात त्या मधासंबंधी अशी घृणा उत्पन्न केली की त्यांनी तो उपयोगात न आणण्याचा निश्चय करून घेतला.

३) अर्थ असा की कफ्फारा-प्रायश्चित अदा करून शपथेच्या बंधनातून मुक्त होण्याची जी पद्धत सर्वोच्च अल्लाहने सूरह माईदा आयत क्र. ८९ मध्ये ठरवून दिलेली आहे त्यानुसार कृती करून, आपण एका वैध वस्तूला स्वत:साठी निषिद्ध ठरविण्याचा जो संकल्प केला आहे: तो संकल्प मोडून टाका.



उघड केले, आणि अल्लाहने नबी (स.) यांना या (गौप्यस्फोटा) ची बातमी दिली तेव्हा नबी (स.) यांनी त्यावर काही अंशी (त्या पत्नीला) खबरदार केले आणि काही अंशी त्याबाबतीत दुर्लक्ष केले. मग जेव्हा नबी (स.) नी तिला (गौप्यस्फोटाची) ही गोष्ट सांगितली तेव्हा तिने विचारले, आपणास याची बातमी कुणी दिली? नबी (स.) नी सांगितले, ''मला त्याने बातमी दिली जो सर्वकाही जाणतो - आणि खूप खबर राखणारा आहे.''[४] (३)

जर तुम्ही दोघी अल्लाहकडे तौबा-पश्चात्ताप करणार असाल (तर हे तुमच्यासाठी उत्तम आहे) कारण तुमची मने सरळ मार्गावरून हटली आहेत.[५] आणि जर नबी (स.) च्या विरोधात तुम्ही गटबाजी केली तर जाणून असा की अल्लाह त्याचा वाली आहे आणि त्यानंतर जिब्रील आणि तमाम सदाचारी श्रद्धावंत व सर्व दूत त्याचे सोबती आणि सहायक आहेत.[६] दूर नव्हे की नबी (स.) ने तुम्हा सर्व पत्नींना तलाक दिला तर अल्लाह त्याला

४) कोणत्याही हदीसच्या निवेदनाद्वारे निश्चितपणे हे कळत नाही की ती गोपनीय गोष्ट कोणती होती. शिवाय ज्या उद्देशाने सदरहू आयत उतरली आहे त्यानुसार, ती गोपनीय गोष्ट कोणती होती, मुळात या प्रश्नाला काहीच महत्व नाही. दिव्य कुरआनात या मामल्याचा उल्लेख ज्या कारणाने केला गेला आहे त्यातील मूळ उद्देश पैगंबर (स.) यांच्या पवित्र पत्नी व त्यांच्यामार्फत मुसलमानांच्या सर्व जबाबदार माणसांच्या पत्नींना ही गोष्ट बजावून सांगण्याचा आहे की त्यांनी गुपितांच्या रक्षणासंबंधी निष्काळजीपणा दाखवू नये. जो माणूस जितक्या मोठ्या जबाबदारीच्या स्थानी असेल त्याच्या घरातून गुपितांचे स्फोट होणे तितकेच जास्त धोकादायी असते, गोष्ट मग महत्वाची असो वा नसो. रहस्यांच्या रक्षणात जर निष्काळजीपणाची सवय जडली तर महत्व नसलेल्या गोष्टीप्रमाणे एखाद्या वेळेस महत्वाची गोष्टही उघड होऊ शकते.

५) या दोघींनी अभिप्रेत, हजरत उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार, हजरत आयशा (रजि.) आणि हजरत हफसा (रजि.) या आहेत. सरळ मार्गापासून दूर होण्याचा, हजरत उमर (रजि.) यांनी, जो अर्थ सांगितला आहे तो म्हणजे पैगंबर (स.) यांच्या या दोघी पत्नीं पैगंबर (स.) यांच्याशी काही जास्त धीटपणे वागू लागल्या होत्या, सर्वोच्च अल्लाहला ते आवडले नाही म्हणून त्यांना तंबी दिली गेली.

६) अर्थ असा की अल्लाहचे पैगंबर (स.) यांच्याविरूद्ध गटबाजी करून तुम्ही स्वत:चेच नुकसान करून घ्याल, कारण ज्याचा वाली अल्लाह आहे आणि जिब्रईल (अ.) व फरिश्ते आणि सर्व सदाचारी श्रद्धावंत ज्याच्यासमवेत आहेत, त्याच्याविरूद्ध गटबाजी करून कोणीही जिंकू शकत नाही.

अशा पत्नीं तुमच्याऐवजी प्रदान करील ज्या तुमच्यापेक्षा उत्तम असतील.[७] खऱ्या मुसलमान, श्रद्धावंत, आज्ञाधारक, पश्चात्ताप व्यक्त करणाऱ्या, उपासना करणाऱ्या आणि उपवास करणाऱ्या, मग पतीचा स्पर्श झालेल्या असोत की कुमारिका. (४-५)

हे लोकहो! ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, वाचवा स्वत:ला आणि आपल्या कुटुंबियांना त्या अग्नीपासून जिचे इंधन मनुष्य आणि दगड असतील,[८] त्यावर अत्यंत तापट व कठोर स्वभावी दूत नेमलेले असतील जे कधीही अल्लाहच्या आज्ञेचा भंग करीत नाहीत आणि जी काही आज्ञा त्यांना दिली जाते तिची ते अंमलबजावणी करतात. (त्यावेळी सांगितले जाईल की) हे अश्रद्धावंतांनो, आज निमित्ते पुढे करू नका. तुम्हाला तर तसाच बदला दिला जात आहे जसे तुम्ही आचरण करीत होता. (६-७)

हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहपुढे पश्चात्ताप करा. विशुद्ध पश्चात्ताप. दूर नव्हे की अल्लाहने तुमचे दोष दूर करावेत आणि तुम्हाला अशा स्वर्गामध्ये दाखल करावे ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील. हा तो दिवस असेल जेव्हा अल्लाह आपल्या नबी (स.) ला आणि त्या लोकांना ज्यांनी त्यांच्यासमवेत श्रद्धा ठेवली आहे. खजील होणार नाही.[९] आणि त्यांचे तेज त्यांच्या पुढे पुढे त्यांच्या उजव्या बाजूने पळत

**७)** यावरून कळले की चूक केवळ हजरत आयशा (रजि.) व हजरत हफसा (रजि.) यांचीच होती असे नाही तर पैगंबर (स.) यांच्या इतर पवित्र पत्नींचादेखील काहीना काही अंशी चूक होती. म्हणूनच त्या दोघींनंतर या आयतीत इतर सर्व पत्नींनाही तंबी दिलेली आहे. हदीसद्वारे कळते की त्या काळात पैगंबर (स.) आपल्या पत्नींशी इतके नाराज झाले होते की एक महिन्यांपर्यंत ते त्यांच्याशी संपर्क तोडून होते व सहाबा (रजि.) यांच्यात असे प्रसिद्ध झाले होते की पैगंबर (स.) यांनी त्यांना तलाक देऊन टाकला आहे.

**८)** सदरहू आयत दर्शविते की एखाद्या इसमाची जबाबदारी केवळ आपल्या स्वत:लाच ईश्वराच्या प्रकोपापासून वाचविण्याच्या प्रयत्नांपुरतीच मर्यादित आहे असे नाही तर निसर्ग व्यवस्थेने ज्या कुटुंबाच्या व्यवस्थेचा भार त्यावर टाकला आहे शक्य तितके त्यांनाही असे शिक्षण द्यावे व असे संस्कार त्यांच्यावर घडविण्याचा त्याने प्रयत्न करावा, जेणेकरून ते ईश्वराचे आवडते दास बनावेत, हेही त्याचे कर्तव्य आहे, जर ते नरकाच्या मार्गावर जात असतील तर जितके त्याला शक्य असेल तितके त्या मार्गापासून त्यांना परावृत्त करण्याचा प्रयत्न त्याने करावा. नरकाचे इंधन दगड असतील याच्याने अभिप्रेत बहुधा दगडी कोळसा असावा. इब्ने मसऊद (रजि.), इब्ने अब्बास (रजि.), मुजाहिद (रह), इमाम मुहम्मद बाकर (रह.) आणि सुद्दी (रह.) म्हणतात की हे गंधकाचे दगड असतील.

**९)** म्हणजे त्यांच्या सत्कर्मांचा मोबदला वाया घालविणार नाही. अश्रद्धावंत व दांभिकांना असे बोलण्याची संधी मुळीच देणार नाही की या लोकांनी ईशभक्ती केली तरी त्याचा मोबदला काय मिळविला. नामुश्की, बंडखोर आणि अवज्ञाकारींच्या वाट्याला येईल, निष्ठावान आणि आज्ञाधारकांच्या वाट्यास नाही.



असेल आणि ते म्हणत असतील की हे आमच्या पालनकर्ता, आमचे तेज आमच्यासाठी पूर्ण कर आणि आम्हाला क्षमा कर, तू प्रत्येक गोष्टीला समर्थ आहेस. (८)

हे नबी (स.), अश्रद्धावंतांशी व दांभिकांशी संघर्ष (जिहाद) करा आणि त्यांच्याशी कठोर व्यवहार करा. त्यांचे ठिकाण नरक आहे आणि ते फार वाईट ठिकाण आहे. (९)

अल्लाह अश्रद्धावंतांच्या संबंधात नूह (अ.) आणि लूत (अ.) च्या पत्नींना उदाहरण म्हणून प्रस्तुत करतो. त्या आमच्या दोन सदाचारी दासांच्या दांपत्यात होत्या. परंतु त्यांनी आपल्या पतींशी प्रतारणा[१०] केली, आणि ते अल्लाहच्याविरूद्ध त्यांच्या काहीही उपयोगी पडू शकले नाही. दोघींना सांगितले गेले की, जा नरकाग्नीत जाणाऱ्यांसमवेत, तुम्हीदेखील चालत्या व्हा. आणि श्रद्धावंतांच्या बाबतीत अल्लाह फिरऔनच्या पत्नीचे उदाहरण प्रस्तुत करतो जेव्हा की तिने प्रार्थना केली, ''हे माझ्या पालनकर्त्या, माझ्यासाठी आपल्या येथे स्वर्गामध्ये एक घर बनव आणि मला फिरऔन व त्याच्या कृत्यापासून वाचव, आणि अत्याचारी समाजापासून मला मुक्ती दे.'' आणि इमरानची मुलगी मरयम[११] चे उदाहरण देतो जिने आपल्या शीलाचे रक्षण केले होते[१२] मग आम्ही तिच्यात आपल्याकडून आत्मा फुंकला[१३] आणि तिने आपल्या पालनकर्त्याच्या वचनांची व त्याच्या ग्रंथांची सत्यता प्रमाणित केली आणि ती आज्ञाधारक लोकांपैकी होती.[१४] (१०-१२)

**१०)** ही प्रतारणा, या अर्थाने नाही की त्यांनी बदकर्म केले होते, तर या अर्थाने आहे की त्यांनी ईमान-श्रद्धेच्या मार्गात हजरत नूह (अ.) व हजरत लूत (अ.) यांना साथ दिली नव्हती किंबहुना त्यांच्याविरूद्ध धर्मशत्रूंना साथ देत होत्या.

**११)** असेही शक्य आहे की हजरत मरयम (अ.) यांच्या वडिलांचे नाव इम्रान असावे किंवा त्या इम्रान वंशीय होत्या, म्हणून त्यांना इम्रानची लेक म्हटले गेले असावे याचीही शक्यता आहे.

**१२)** हे यहूदी लोकांनी लावलेल्या या आळाचे खंडन आहे की त्यांच्या पोटी हजरत ईसा-येशू (अ.) यांचा जन्म एखाद्या पापाची परिणती होती (अल्लाह त्यापासून वाचवो). सूरह निसा आयत क्र. १५६ मध्ये या जुलमींच्या याच 'आळा'ला महाकुभांड ठरविले गेले आहे.

**१३)** म्हणजे याविनाच की त्यांचा एखाद्या पुरुषाशी संबंध येता, त्यांच्या गर्भात स्वत:कडून एक प्राण टाकला.

**१४)** हजरत मरयम यांना उदाहरण म्हणून ज्या हेतूने या ठिकाणी प्रस्तुत केले गेले आहे, ते म्हणजे कुमारी अवस्थेतच चमत्काराने त्यांना गर्भवती बनवून सर्वोच्च अल्लाहने त्यांना एका कठोर परीक्षेत टाकले होते परंतु त्यांनी सहनशीलतेने अल्लाहच्या इच्छेपुढे आपली मान तुकविली.

# ६७ सूरह अल्मुल्क

*(मक्काकालीन, वचने ३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

परम प्रतिष्ठित व उच्च आहे तो ज्याच्या हातात (सृष्टीची) सत्ता आहे आणि तो प्रत्येक वस्तूवर प्रभुत्व राखतो.[१] ज्याने मृत्यू आणि जीवन निर्माण केले जेणेकरून तुम्हा लोकांना अजमावून पहावे की तुमच्यापैकी कोण अधिक चांगले कृत्य करणारा आहे.[२] आणि तो जबरदस्तही आहे आणि क्षमाशीलदेखील, ज्याने थरावर थर असे सात आकाश बनविले. तुम्हाला कृपावंताच्या निर्मितीत कोणत्याही प्रकारची विसंगती आढळणार नाही.[३] पुन्हा वळून पहा, कोठे तुम्हाला काही उणीव दिसून येते का?[४] पुन्हा पुन्हा दृष्टिक्षेप करा, तुमची दृष्टी थकून निराश परत येईल. (१-४)

आम्ही तुम्हास जवळ असलेल्या आकाशाला[५] वैभवशाली दिव्यांनी सुशोभित केले, आणि त्यांना शैतानांना पिटाळून लावण्याची साधने बनविली आहेत. या शैतानांसाठी आम्ही भडकत असलेला अग्नी उपलब्ध करून ठेवला आहे. (५)

ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याशी द्रोह केला आहे त्यांच्यासाठी नरकाचा प्रकोप आहे आणि ते फारच वाईट ठिकाण आहे. जेव्हा ते त्यात फेकले जातील

१) म्हणजे हवे ते करू शकतो, कोणतीही गोष्ट त्याला निरुपायी करू शकणारी नाही की एखादे काम करण्याची त्याची इच्छा असावी व ते तो करू शकत नसावा.

२) म्हणजे जगात माणसांच्या जीवन व मरणाचा हा क्रम त्याने यासाठी सुरू केला आहे की त्यांची परीक्षा घ्यावी व कोणत्या माणसाचे कार्य अधिक चांगले आहे हे पहावे.

३) मूळ अरबी भाषेत 'तफावुत' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ विसंगती, एका वस्तूची दुसऱ्या वस्तूशी अनुकूलता नसणे, बेजोड आणि मेळ न होऊ शकणे असा होतो.

४) मूळ अरबी भाषेत 'फुतूर' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ खिंडार, भोक, फट, फाटलेले असणे, मोडके तोडके असणे असा होतो. अर्थ असा की संपूर्ण सृष्टीची बांधणी इतकी चोख आहे, तसेच जमिनीतील एका कणापासून ते भव्य अशा आकाशगंगेपर्यंत प्रत्येक वस्तू अशा प्रकारे बंदिस्त आहे की कोठेही सृष्टीव्यवस्थेचा क्रम खंडित होत नाही. तुम्ही मग किती का शोध घेऊ नये तेथे कोणत्याही जागी तुम्हाला कोणतीही फट सापडू शकत नाही.

५) जवळच्या आकाशाने अभिप्रेत ते आकाश आहे ज्यातील नक्षत्रे, ग्रह आम्ही दुर्बिणीविनाच उघड्या डोळ्यांनी पाहतो.



तेव्हा ते त्याच्या गर्जनेचा भयंकर आवाज ऐकतील,[६] आणि तो उसळी घेत असेल, क्रोधाच्या तीव्रतेने तो बेभान होत असेल. प्रत्येक वेळी जेव्हा त्याच्यात एखादी झुंड फेकली जाईल, त्याचे कर्मचारी त्या लोकांना विचारतील, ''तुमच्याजवळ कोणी सावध करणारा आलेला नव्हता काय?'' ते उत्तर देतील, ''होय, सावध करणारा आमच्याजवळ आलेला होता, परंतु आम्ही त्याला खोटे ठरविले आणि सांगितले की अल्लाहने काहीही अवतरलेले नाही, तू मोठ्या पथभ्रष्टतेत पडला आहेस.'' आणि ते म्हणतील, ''अरेरे! जर आम्ही ऐकले असते अथवा समजून घेतले असते तर आज या भडकत्या अग्नीला पात्र असलेल्यात समाविष्ट नसतो.'' अशाप्रकारे ते आपल्या अपराधाची स्वत: कबुली देतील. धिक्कार आहे या नरकवासियांवर. (६-११)

जे लोक न पाहता आपल्या पालनकर्त्याला भितात, खचितच त्यांच्यासाठी क्षमा आहे आणि मोठा मोबदला. तुम्ही मग हळूच बोला अथवा मोठ्या आवाजांत (अल्लाहसाठी एकसारखे आहे) तो तर मनाच्या स्थितीलादेखील जाणतो. काय तो जाणणार नाही ज्याने निर्माण केले आहे[७] वस्तुत: तो सूक्ष्मदर्शी आणि खबर ठेवणारा आहे. (१२-१४)

तोचतर आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीला अधीनस्थ करून ठेवले आहे, तिच्यावर संचार करा आणि खा अल्लाहची उपजीविका, त्याच्याच पुढे तुम्हाला पुन्हा जिवंत होऊन जावयाचे आहे. काय तुम्ही यापासून निर्भय आहात की तो जो आकाशात आहे,[८] त्याने तुम्हाला जमिनीत खचवावे आणि अकस्मात ही पृथ्वी कंप

६) याचा अर्थ असाही असू शकतो की हा खुद्द नरकाचा आवाज असेल वा हा आवाज नरकामधून येत असेल जेथे त्या लोकांच्या अगोदर टाकलेले लोक ओरडत असतील, असा अर्थही होऊ शकतो.

७) दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो की 'काय तो आपल्या निर्मितीलाच जाणणार नाही?'

८) सर्वोच्च अल्लाह आकाशात राहतो असा याचा अर्थ नाही तर ही गोष्ट या दृष्टीने सांगितलेली आहे की मनुष्य स्वाभाविकपणे जेव्हा ईश्वराकडे वळू इच्छितो तेव्हा आकाशाकडे पाहतो. प्रार्थना करतो तेव्हा आकाशाकडे हात पसरवितो. एखाद्या विपत्तीच्या प्रसंगी जेव्हा तो इतर सर्व आधारांकडून निराश होतो तेव्हा आकाशाकडे रोख करून ईश्वराची करुणा भाकतो. एखादे आकस्मिक अरिष्ट कोसळल्यावर ते वरून कोसळले आहे असे तो सांगतो. असामान्यपणे प्राप्त होणाऱ्या वस्तुसंबंधी म्हणतो की ती वरील जगतातून आलेली आहे. सर्वोच्च अल्लाहकडून पाठविलेल्या ग्रंथांना अस्मानी ग्रंथ म्हणून सांगितले जाते. या सर्व गोष्टीवरून, मानवी स्वभावातच ही गोष्ट आहे की तो जेव्हा ईश्वराचे ध्यान करतो तेव्हा त्याचे लक्ष खाली जमिनीकडे न जाता वर आकाशाकडे जाते, असे स्पष्ट होते.

पावू लागावी? काय तुम्ही यापासून निर्भय आहात की तो जो आकाशांत आहे तो तुम्हावर दगडांचा मारा करणारे वारे पाठवील? मग तुम्हाला कळेल की माझी धमकी कशी असते. यांच्यापूर्वी होऊन गेलेले लोक खोटे ठरवून चुकले आहेत, मग पाहून घ्या की माझी पकड कशी कठोर होती. काय हे लोक आपल्यावरून उडणाऱ्या पक्षांना पंख पसरताना व आखडताना पाहत नाहीत? कृपावंताशिवाय अन्य कोणी नाही की ज्याने त्यांना तोलून धरले असेल, तोच प्रत्येक वस्तूची काळजी घेणारा आहे. दाखवा, बरे ते कोणते सैन्य आहे तुमच्याजवळ जे कृपावंताच्या मुकाबल्यात तुम्हाला सहाय्य करू शकेल?[९] वस्तुस्थिती अशी आहे की हे इन्कार करणारे फसवणुकीत सापडले आहेत. अथवा सांगा कोण आहे जो तुम्हाला उपजीविका देऊ शकतो जर कृपावंताने आपली उपजीविका रोखून धरली? वस्तुत: हे लोक शिरजोरी आणि सत्यापासून विमुख राहण्यावर अडून बसले आहेत. बरे विचार करा जो इसम तोंड खाली घालून चालत असेल[१०] तो अधिक सरळमार्ग प्राप्त करणारा आहे अथवा तो जो डोके वर करून सरळ एका समतल मार्गावर चालत असेल? यांना सांगा, अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला निर्माण केले. तुम्हाला ऐकण्या व पाहण्याच्या शक्ती दिल्या आणि समजउमज बाळगणारी मने दिली, परंतु तुम्ही कमीच कृतज्ञता दाखविता.[११]

(१५-२३)

यांना सांगा, अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला पृथ्वीवर फैलावले आहे आणि त्याच्याकडेच तुम्ही एकत्रित केले जाल. हे म्हणतात, ''जर तुम्ही खरे असाल तर सांगा हे वचन केव्हा पूर्ण होईल?'' सांगा, ''याचे ज्ञान तर अल्लाहपाशी आहे, मी तर केवळ स्पष्टपणे सावध करणारा आहे.'' मग जेव्हा हे त्या गोष्टीला जवळ पाहतील तेव्हा त्या सर्व लोकांचे चेहरे बिघडतील ज्यांनी इन्कार केला आहे आणि त्यावेळी त्यांना सांगण्यात येईल की हीच आहे ती गोष्ट जिचा तगादा तुम्ही करीत होता.

(२४-२७)

**९)** दुसरा अनुवाद असाही होऊ शकतो 'कृपावंताशिवाय असा कोण आहे जो तुमचे सैन्य बनून तुमचे समर्थन करीत असावा.'

**१०)** म्हणजे पशुप्रमाणे तोंड खाली टाकून त्याच वाटेने चालत असावा ज्यावर कुणी एखाद्याने त्याला हाकलेले असावे.

**११)** म्हणजे सर्वोच्च अल्लाहने ज्ञान, बुद्धी आणि श्रवण व दृष्टीच्या या देणग्या तुम्हाला सत्य ओळखण्यासाठी दिलेल्या होत्या. तुम्ही मात्र कृतघ्नता दाखवीत आहात की या शक्तींचा इतर सर्व कामासाठी उपयोग तर करता परंतु ज्या कामासाठी या दिल्या गेल्या होत्या तेवढ्याच एका कामासाठी याचा उपयोग तुम्ही करीत नाही.



यांना सांगा, कधी तुम्ही असाही विचार केला की अल्लाह हवे तर मला व माझ्या साथीदारांना नष्ट करो अथवा आमच्यावर दया करो, अश्रद्धावंतांना यातनादायक प्रकोपापासून कोण वाचवील?[१२] यांना सांगा, तो मोठा दयाळू आहे, त्याच्यावरच आम्ही श्रद्धा ठेवली आहे आणि त्याच्यावरच आमचा विश्वास आहे, लवकरच तुम्हाला कळेल की स्पष्ट पथभ्रष्टतेत कोण पडलेला आहे. यांना सांगा, कधी तुम्ही असाही विचार केला की जर तुमच्या विहिरीचे पाणी जमिनीत उतरले तर कोण आहे जो या वाहणाऱ्या पाण्याचे स्रोत तुम्हाला काढून देईल? (२८-३०)

**१२)** मक्का शहरात जेव्हा अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या आवाहनास प्रारंभ झाला व कुरैशांच्या विविध कुळांशी संबंधित असलेल्या व्यक्तींनी इस्लाम स्वीकारणे सुरू केले तेव्हा घराघरातून पैगंबर (स.) व त्यांच्या साथीदारांना शापांच्या लाखोल्या वाहिल्या जाऊ लागल्या. जादू व करणी केल्या जाऊ लागल्या जेणेकरून पैगंबर (स.) यांचा नाश व्हावा. इथपावेतो की ठार करण्याची कारस्थानेही शिजू लागली. यावर असे फर्माविले गेले की यांना सांगा, आमचा नाश होवो की ईशकृपेने आम्ही जिवंत राहो, यापासून तुम्हाला काय हशील होणार आहे? ईश्वराच्या प्रकोपापासून तुम्ही कसे वाचणार याची तुम्ही काळजी घ्या.

# ६८ सूरह अल्क़लम

*(मक्काकालीन, वचने ५२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

नूऽऽन. शपथ आहे लेखणीची आणि त्याची ज्याला लिहिणारे लिहीत आहेत,[१] तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने वेडे नाहीत.[२] आणि खचितच तुमच्यासाठी असा मोबदला आहे जो कदापि संपणार नाही.[३] आणि निःसंशय तुम्ही नीतिमत्तेच्या उच्च दर्जावर आहात.[४] लवकरच तुम्हीही पाहाल आणि तेही पाहतील की तुमच्यापैकी कोण वेडेपणात गुरफटलेला आहे. तुमचा पालनकर्ता त्या लोकांनासुद्धा चांगलेच जाणतो जे त्याच्या मार्गापासून भटकलेले आहेत, आणि तोच त्यांनाही चांगल्या प्रकारे जाणतो जे सरळ मार्गावर आहेत. म्हणून तुम्ही या खोटे ठरविणाऱ्यांच्या दबावात मुळीच येऊ नका. हे तर इच्छितात की थोडे तुम्ही नमते घेतले तर यांनीसुद्धा नमते घ्यावे.[५] मुळीच दबू नका,

१) भाष्यकार्यांचे इमाम, मुजाहिद म्हणतात की लेखणीने अभिप्रेत ती लेखणी आहे जिच्याने, स्मरण अर्थात कुरआन लिहिला जात होता, म्हणून जी गोष्ट लिहिली जात होती त्याने अभिप्रेत दिव्य कुरआन आहे असा निष्कर्ष अनायासेच निघतो.

२) या ठिकाणी सकृतदर्शनी संबोधन पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याशी जरी असले तरी मक्केतील अश्रद्धावंतांना, ते जे पैगंबर (स.) यांना वेड लागलेले म्हणून सांगत असत, या कुभांडाचे उत्तर त्यांना देणे असा याचा मूळ उद्देश आहे. अर्थ असा की हा कुरआन, ज्या उतरवून घेणाऱ्याच्या हस्ते लिहून घेतला जात आहे, आपल्या जागी तो स्वतःच या कुभांडाचे खंडन करण्यासाठी पुरेसा आहे.

३) म्हणजे तुमच्यासाठी या गोष्टीत अमाप आणि अनश्वर मोबदला आहे की तुम्ही ईश्वराच्या निर्मितीच्या मार्गदर्शनासाठी जे प्रयत्न करीत आहात त्यांच्या उत्तरात तुम्हाला अशा प्रकारच्या दुःखदायी गोष्टी ऐकाव्या लागत आहेत व तरीदेखील तुम्ही आपले हे कर्तव्य पार पाडीत आहात.

४) म्हणजे कुरआनशिवाय तुमचे उच्च कोटीतले नैतिक आचरणदेखील या गोष्टीचे स्पष्ट प्रमाण आहे की अश्रद्धावंत, वेडेपणाचा जो आळ घेत आहेत तो धादांत खोटा आहे कारण उच्च कोटीचे आचरण आणि वेडेपण एकाच जागी एकत्र राहू शकत नाहीत.

५) म्हणजे इस्लामच्या प्रचारात तुम्ही काही नमते घेतले तर यांनीसुद्धा तुमच्या विरोधात काही नरमाई आणावी अथवा त्यांच्या मार्गभ्रष्टतेंच्या अनुषंगाने तुम्ही आपल्या धर्मात काही बदल करण्यास तयार झाले तर यांनी तुमच्याशी समेट करावा.



एखाद्या अशा इसमाशी जो पुष्कळ शपथा घेणारा तुच्छ मनुष्य आहे, टोमणे मारतो, चहाड्या लावीत फिरतो, भल्या गोष्टीपासून रोखतो, अत्याचार आणि आगळिकीत मर्यादेपलीकडे जाणारा आहे, अत्यंत दुष्कर्मी आहे, छळवादी आहे आणि या सर्व दोषांसह कमअस्सल आहे, यामुळे की तो खूप संपत्ती व संतती बाळगतो.[६] जेव्हा आमचे संकेत त्याला ऐकविले जातात तेव्हा तो म्हणतो, या तर पूर्वकालीन कथा आहेत. लवकरच आम्ही याच्या नाकावर डाग देऊ.[७] (१-१६)

आम्ही या (मक्कावासी) ना त्याचप्रकारे कसोटीत घातले आहे ज्याप्रकारे एका बागेच्या मालकांना कसोटीत घातले होते, जेव्हा त्यांनी शपथ घेतली की सकाळी सकाळी निश्चितच आपल्या बागेची फळे तोडू आणि ते कोणताही अपवाद ठेवीत नव्हते.[८] रात्री ते निद्राधीन पडले होते की तुमच्या पालनकर्त्याकडून एक अरिष्ट त्या बागेवर फेकले गेले आणि त्याची दशा अशीझाली जणू कापलेले पीक असावे. सकाळी त्या लोकांनी एकमेकांना हाक दिली की जर फळे तोडावयाची असतील तर सकाळीसकाळीच आपल्याशेताकडे निघा. त्याप्रमाणे ते निघाले आणि आपापसात हळूहळू बोलत होते की आज कोणीही गरीब तुमच्याकडे बागेत येता कामा नये. ते काहीही न देण्याचा निर्णय घेऊन सकाळीसकाळी अशा प्रकारे तेथे गेले जणू ते (फळे तोडण्यास) समर्थ आहेत. परंतु जेव्हा बाग पाहिली तेव्हा सांगू लागले, "आम्ही वाट चुकलो आहोत, नव्हे, तर आम्ही पारखे झालो." त्यांच्यातील जो सर्वात चांगला मनुष्य होता, तो म्हणाला, "मी तुम्हाला सांगितले नव्हते की तुम्ही पावित्र्यगान का करीत नाही?"[९] ते उद्गारले, "पवित्र आहे

६) या वाक्याचा संबंध आगोदरपासून चाललेल्या वक्तव्यक्रमाशीही असू शकतो आणि नंतरच्या वाक्याशीदेखील. पहिल्या स्थितीत अर्थ असा होईल की अशा माणसाच्या दमबाजीला यासाठी भीक घालू नका की तो पुष्कळ संपत्ती व संतती बाळगतो. दुसऱ्या स्थितीत अर्थ असा होईल की पुष्कळ संपत्ती व संतती असल्यामुळे तो गर्विष्ठ बनला आहे. जेव्हा आमच्या आयती त्याला ऐकविल्या जातात तेव्हा म्हणतो की या पूर्वकालीन कथा आहेत.

७) कारण तो आपल्या स्वतःला मोठा उंच नाक असलेला समजत होता, म्हणून त्याच्या नाकाला सोंड म्हटले गेले आहे. तसेच नाकावर डाग देण्याने अभिप्रेत फटफजिती होय. म्हणजे आम्ही जगात आणि परलोकात त्याला असे फटफजित करू की अनंतापर्यंत हा काळिमा त्याचा पिच्छा सोडणार नाही.

८) म्हणजे त्यांना आपले सामर्थ्य व आपल्या अधिकारावर इतका विश्वास होता की शपथ घेऊन बिनदिक्कतपणे सांगून टाकले की आम्ही उद्या जरूर आपल्या बागेतील फळे तोडू आणि असे सांगण्याची त्यांना काही गरज वाटत नव्हती की जर अल्लाहने इच्छितले तर आम्ही हे काम करू.

९) म्हणजे अल्लाहची आठवण का करीत नाही? वर पवित्र पालनकर्ता मौजूद आहे ही गोष्ट का विसरलात?

आमचा पालनकर्ता, खरोखरच आम्ही अपराधी होतो.'' मग त्यांच्यापैकी प्रत्येकजण दुसऱ्याची निर्भर्त्सना करू लागला. शेवटी ते म्हणाले, ''खेद वाटतो आमच्या दशेवर, नि:संशय आम्ही शिरजोर बनलो होतो. दूर नव्हे की आमच्या पालनकर्त्याने आम्हाला बदल्यात याच्यापेक्षा उत्तम बाग प्रदान करील. आम्ही आमच्या पालनकर्त्याकडे रुजू होतो.'' असा असतो प्रकोप आणि परलोकाचा प्रकोप यापेक्षाही मोठा आहे, या लोकांनी हे जाणले असते. (१७-३३)

निश्चितच[१०] ईशपरायण लोकांसाठी त्यांच्या पालनकर्त्यापाशी ऐश्वर्यसंपन्न स्वर्ग आहेत. काय आम्ही आज्ञाधारकांची दशा अपराध्यांसारखी करावी? तुम्हा लोकांना काय झाले आहे, तुम्ही कसे हुकूम लावता? काय तुमच्याजवळ एखादा ग्रंथ आहे[११] ज्यात तुम्ही असे वाचता की तुमच्यासाठी निश्चितच तेथे तेच काही आहे जे तुम्ही आपल्यासाठी पसंत करता? अथवा मग काय तुमच्यासाठी पुनरुत्थानाच्या दिवसापर्यंत आमच्यावर करार-वचन सिद्ध आहे की तुम्हाला तेच काही मिळेल ज्याचा हुकूम तुम्ही लावला? यांना विचारा, तुमच्यापैकी कोण याबद्दल जामीन आहे? अथवा मग त्यांनी ठरविलेले काही भागीदार आहेत (ज्यांनी याची हमी घेतली असेल)? अशी गोष्ट असेल तर आणावे यांनी आपल्या त्या भागीदारांना जर हे खरे आहेत. (३४-४१)

ज्या दिवशी कठीण वेळ येऊन ठेपेल आणि लोकांना नतमस्तक होण्यास बोलविले जाईल तर हे लोक नतमस्तक होऊ शकणार नाहीत, यांच्या नजरा खाली असतील, मानहानी यांच्यावर पसरलेली असेल. हे जेव्हा सुदृढ अवस्थेत होते त्यावेळी यांना नतमस्तक होण्यास बोलविले जात असे (आणि हे इन्कार करीत असत.) (४२-४३)

म्हणून हे पैगंबर (स.), तुम्ही या वाणीला खोटे ठरविणाऱ्यांचा मामला माझ्यावर सोडून द्या. आम्ही अशा पद्धतीने यांना क्रमाक्रमाने विनाशाकडे नेऊ की यांना कळणारसुद्धा नाही. मी यांची दोरी लांबवीत आहे. माझी चाल मोठी जबरदस्त आहे. (४४-४५)

काय तुम्ही यांच्याकडून काही मोबदला मागत आहात की हे या भूर्दंडाच्या ओझ्याखाली दबून जात आहेत? काय यांच्याजवळ परोक्षाचे ज्ञान आहे ज्याला हे लिहीत

**१०)** मक्केतील मोठमोठे सरदार मुसलमानांना सांगत असत की आम्हाला जगात या ज्या देणग्या मिळत आहेत, या ईश्वराठायी आम्ही प्रिय असण्याचे लक्षण आहेत. उलट तुम्ही ज्या दुर्दशेत गुरफटला आहात, ती या गोष्टीचे प्रमाण आहे की तुम्हावर ईश्वराचा प्रकोप आहे. म्हणून जरी एखादे परलोक घडले असे तुम्ही सांगता तरी तेथेसुद्धा आम्ही मौज करू आणि प्रकोप तुमच्यावर होईल, आमच्यावर नव्हे. याचे उत्तर या आयतीत दिलेले आहे.

**११)** म्हणजे सर्वोच्च अल्लाहने पाठविलेला ग्रंथ.



आहेत? बरे, आपल्या पालनकर्त्याचा निर्णय सादर होईपर्यंत धैर्य राखा आणि मासेवाल्या (यूनुस (अ.)) सारखे बनू नका.[१२] जेव्हा त्याने हाक दिली होती आणि तो दु:खाने भरलेला होता. जर त्याच्या पालनकर्त्याची मेहरबानी त्याला लाभली नसती तर तो वाळीतावस्थेत खडकाळ मैदानात टाकला गेला असता. सरतेशेवटी त्याच्या पालनकर्त्याने त्याला निवडून घेतले आणि त्याला सदाचारी दासांमध्ये सामील केले. (४६-५०)

जेव्हा हे अश्रद्धावंत लोक उपदेशवाणी (पवित्र कुरआन) ऐकतात तेव्हा तुम्हाला अशा दृष्टीने पाहतात जणू काय ते तुमचे पाय उखडून टाकतील. आणि म्हणतात की हा निश्चितच वेडा आहे, वास्तविकत: हा तर सर्व जगवासियांसाठी एक उपदेश आहे. (५१-५२)

**१२)** म्हणजे प्रेषित हजरत यूनुस (अ.) यांच्याप्रमाणे उतावळेपणा दाखवू नका. ते आपल्या उतावळेपणामुळेच माशाच्या पोटात पोहचविले गेले होते.

# ६९ सूरह अल्हाऽऽक्क़ा

*(मक्काकालीन, वचने ५२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

घडून राहणारी![1] काय आहे ती घडून राहणारी? आणि तुम्हाला काय माहीत की काय आहे ती घडून राहणारी? (१-३)

समूद आणि आद लोकांनी त्या अकस्मात कोसळणाऱ्या आपत्तीला[2] खोटे ठरविले, तेव्हा समूद एका भयंकर दुर्बलतेने नष्ट केले गेले. आणि आद एका महाभयंकर वादळी झंझावाताने उद्‌ध्वस्त केले गेले. महान अल्लाहने त्यास निरंतर सात रात्री आणि आठ दिवसांपर्यंत त्यांच्यावर आरूढ ठेवले. (तुम्ही तेथे असता तर) पाहिले असते की ते तेथे अशा प्रकारे पछाडलेले पडले आहेत जणू ते खजूरीची कुजलेली खोडे असतील. आता त्यांच्यापैकी कोणी तुम्हाला बाकी राहिलेला दिसतो काय? (४-८)

आणि अशीच घोडचूक फिरऔन आणि त्याच्या पूर्वीच्या लोकांनी आणि उलथापालथ होणाऱ्या वस्त्यांनी[3] केली. या सर्वांनी आपल्या पालनकर्त्याच्या पैगंबराचे म्हणणे ऐकले नाही तेव्हा त्याने त्यांना मोठ्या कठोरतेने धरले. (९-१०)

जेव्हा पाण्याचे वादळ मर्यादेपलीकडे गेले[4] तेव्हा आम्ही तुम्हाला नावेत स्वार केले होते[5] जेणेकरून या घटनेला तुमच्यासाठी एक बोधप्रद स्मृती बनवावी आणि स्मरणात ठेवणाऱ्या कानांनी तिची आठवण सुरक्षित ठेवावी. (११-१२)

मग जेव्हा एकदाची नरसिंगात फूंक मारली जाईल आणि पृथ्वी व पर्वतांना उचलून एकाच प्रहारांत चक्काचूर केले जाईल त्या दिवशी ती घडणारी घटना घडेल. त्या दिवशी आकाश फाटून जाईल आणि त्याची बांधणी ढिली पडेल. दूत त्याच्या सभोवती असतील आणि आठ दूतांनी त्या दिवशी तुझ्या पालनकर्त्याचे राजसिंहासन आपल्यावर उचलून

१) मूळ अरबी भाषेत 'अलहक्का' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ अशी घटना जी निश्चितच घडून येणार आहे. अर्थ असा की तुम्ही वाटेल तितका तिचा इन्कार करा, ती तर घडल्याशिवाय राहणार नाही, तुमच्या इन्कारामुळे तिचे घडून येणे थांबणार नाही.

२) 'कयामत'- अंतिम प्रलयाला घडूनच राहणारी घटना सांगितल्यानंतर आता तिच्यासाठी हा दुसरा शब्द तिच्या भयंकरपणाची कल्पना येण्यासाठी वापरला गेला आहे.

३) अभिप्रेत आहे लूत राष्ट्राच्या वस्त्या, या वस्त्या उलथापालथ करून टाकल्या गेल्या होत्या.

४) संकेत नूहच्या महाप्रलयाकडे आहे.

५) नौकेत स्वार जरी ते लोक केले गेले असले जे हजारों वर्षांपूर्वी होऊन गेले होते तरी नंतरच्या सर्व मानवी पिढ्या, जे त्यावेळी प्रलयातून वाचविले गेले होते, त्याच लोकांचे वंशज आहेत म्हणून, आम्ही तुम्हाला नौकेत स्वार केले, असे फर्माविले गेले.



धरलेले असेल.[6] तो दिवस असेल जेव्हा तुम्ही हजर केले जाल, तुमचे कोणतेही रहस्य लपून राहणार नाही. (१३-१८)

त्यावेळी ज्याची कर्मांची नोंद त्याच्या उजव्या हातात दिली जाईल तो म्हणेल, ''घ्या, पहा, वाचा माझी कर्मनोंद मला वाटत होते की जरूर माझा हिशेब मला मिळणार आहे.''[7] तर तो मनपसंत ऐश्वर्यात असेल, उच्च स्थानी स्वर्गात, ज्याच्या फळांचे घड झुकले जात असतील. (अशा लोकांना सांगितले जाईल) मजेत खा आणि प्या आपल्या त्या कृत्यांच्या मोबदल्यात जी तुम्ही गत दिवसांत केली आहेत. (१९-२४)

आणि ज्याची कर्मनोंद त्याच्या डाव्या हातात दिली जाईल. तो म्हणेल, ''हाय हाय माझी कर्मनोंद मला दिली गेली नसती आणि मी जाणले नसते की माझा हिशेब काय आहे.[8] माझा तोच मृत्यू (जो जगात आला होता) निर्णायक ठरला असता. आज माझी संपत्ती माझ्या काहीच उपयोगी पडली नाही. माझी सर्व सत्ता संपुष्टात आली.''[9] (आज्ञा होईल) धरा याला आणि याच्या मानेत जोखड घाला, मग याला नरकामध्ये झोकून द्या, मग याला सत्तर हात लांब साखळीत जखडा. हा श्रेष्ठ व उच्चतर अल्लाहवर श्रद्धाही

६) सदरहू आयत मुतशाबिहात- संदिग्ध- आयतींपैकी आहे. या आयतीचा अर्थ निश्चित करणे कठीण आहे. 'अर्श'- राजसिंहासन काय चीज आहे, हे आम्ही जाणू शकत नाही व प्रलयाच्या दिवशी आठ दूतांनी ते उचलले असण्याची स्थिती काय असेल हेदेखील आमच्या लक्षात येऊ शकत नाही. परंतु सर्वोच्च अल्लाह राजसिंहासनावर बसला असेल व आठ दूतांनी त्या समवेत अर्श उचललेले असेल ही गोष्ट कोणत्याही प्रकारे कल्पना करण्यासारखी नाही. त्यावेळी अल्लाह सिंहासन (अर्श) वर बसलेला असेल, आयतीतदेखील असे सांगितलेले नाही शिवाय त्या परम अस्तित्वाची जी कल्पना दिव्य कुरआनात सांगितलेली आहे तीसुद्धा विचारात ही गोष्ट आणण्यापासून रोखते की शरीर, दिशा आणि स्थळ अशा मर्यादांपासून पवित्र असलेले अस्तित्व एखाद्या जागी स्थानापन्न असावे व एखाद्या निर्मितीने त्यास उचलले असावे. म्हणून याचा अर्थ निश्चित करण्यासाठी उकरून काढण्याचा व छडा घेण्याचा प्रयत्न करणे म्हणजे आपल्या स्वत:ला मार्गभ्रष्टतेच्या धोक्यात टाकणे होय.

७) म्हणजे आपल्या सुदैवाचे कारण तो असे सांगेल की जगात तो परलोकाकडून गाफिल नव्हता तर एके दिवशी त्याला ईश्वरासमोर हजर होऊन त्यापुढे आपला हिशेब द्यावयाचा आहे असे समजून तो जीवन व्यतीत करीत राहिला.

८) दुसरा अर्थ, या आयतीचा असाही होऊ शकतो की हिशेब काय चीज असते हे मी कधी जाणलेच नव्हते. एके दिवशी मला स्वत:चा हिशेबही द्यावा लागेल व माझे केले सवरलेले सर्वकाही माझ्या पुढ्यात ठेवले जाईल, माझ्या मनात असा विचारही आला नव्हता.

९) म्हणजे जगात ज्या शक्तीच्या जोरावर मी ताठपणा दाखवीत होतो, ती येथे संपली आहे. आता येथे माझे कोणतेही सैन्य नाही, कुणी माझी आज्ञा पाळणारा नाही, मी एक लाचार व असहाय्य दास म्हणून उभा आहे, आपल्या रक्षणासाठी मी काहीच करू शकत नाही.

ठेवीत नव्हता व गरिबांना जेवण देण्यास लोकांना उद्युक्तही करीत नव्हता.[१०] म्हणून आज येथे याचा ना कोणी दु:खाचा वाटेकरी मित्र आहे आणि ना जखमांच्या पू शिवाय त्याच्यासाठी कोणते जेवण, ज्यास अपराध्याशिवाय कोणीही खात नाही. (२५-३७)

[११]तर नव्हे, मी शपथ घेतो त्या वस्तूचीही ज्या तुम्ही पाहता आणि त्या वस्तूचीदेखील ज्या तुम्ही पाहत नाही. ही एका प्रतिष्ठित प्रेषिताची वाणी आहे, कुणा कवीची वाणी नव्हे, तुम्ही लोक क्वचित श्रद्धा ठेवता आणि ही कुणा ज्योतिषाचीही वाणी नव्हे, तुम्ही लोक कमीच विचार करता, ही सकल जगांच्या पालनकर्त्याकडून उतरली आहे. आणि जर या (पैगंबर (स.)) ने स्वत: रचून एखादी गोष्ट आमच्या नावाने जोडली असती तर आम्ही याचा उजवा हात धरला असता आणि याच्या मानेची शीर कापून टाकली असती, मग तुमच्यापैकी कोणी (आम्हाला) या कामापासून रोखणारा नसता.[१२] वस्तुत: हा अल्लाहच्या कोपाचे भय बाळगणाऱ्या लोकांसाठी एक उपदेश आहे. आणि आम्ही जाणतो की तुमच्यापैकी काही लोक खोटे ठरविणारे आहेत. अशा अश्रद्धावंतांसाठी निश्चितच ही निराशाजनक आहे. आणि हे अगदी विश्वसनीय सत्य आहे. म्हणून हे पैगंबर (स.), आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाचे पावित्र्यगान करा. (३८-५२)

---

**१०)** म्हणजे स्वत: कुणा एखाद्या गरीबाला जेवू घालणे तर दूरच राहो, कुणाला असे सांगणेही आवडत नव्हते की ईश्वराच्या भुकेल्या दासांना भाकर द्या.

**११)** म्हणजे तुम्हा लोकांनी जो काही समज करून घेतला आहे गोष्ट तशी नाही.

**१२)** मूळ उद्देश असे दर्शविणे आहे की प्रेषिताला आपल्यातर्फे वही - दिव्यबोधात कोणताही कमी जास्तपणा करण्याचा अधिकार नाही व जर तो तसे करील तर आम्ही त्याला कठोर शिक्षा करू. परंतु या गोष्टीला अशा पद्धतीने सांगितले गेले आहे जेणेकरून एखाद्या बादशाहकरवी नियुक्त झालेल्या कुणा अधिकाऱ्याने बनावटगिरी केली तर बादशाहने त्याचा हात धरून त्याचा शिरच्छेद करावा, असे चित्र दृष्टीसमोर उभे रहावे. काही लोकांनी या आयतीवरून असा चुकीचा युक्तीवाद केला आहे की ज्या कुणा मनुष्याने प्रेषित असण्याचा दावा सांगितला असेल, त्याची रोहिणी अथवा मानेतील शिर सर्वोच्च अल्लाहकडून जर तडकाफडकी तोडली गेली नाही तर हे त्याचे प्रेषित असण्याचे प्रमाण आहे. वास्तविकत: या आयतीत जी गोष्ट फर्माविलेली आहे ती सच्चा प्रेषितासंबंधी सांगितली आहे. प्रेषितत्वाचा खोटा दावा सांगणाऱ्यासंबंधी नव्हे. खोटे दावे सांगणारे तर प्रेषितत्वाचेच नव्हे तर ईशत्वाचेदेखील दावे सांगतात व पृथ्वीवर दीर्घ काळापर्यंत मिरवीत राहतात, हा काही त्यांच्या खरेपणाचा पुरावा आहे असे मुळीच नाही.



# ७० सूरह अल्मआरिज

*(मक्काकालीन, वचने ४४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

मागणाऱ्याने प्रकोप मागितला आहे, (तो प्रकोप) जो निश्चितपणे उद्भवणार आहे. अश्रद्धावंतांसाठी आहे, तो टाळणारा कुणीही नाही. त्या अल्लाहकडून आहे जो उंच स्थानाचा मालक आहे. दूत आणि आत्मा[१] चढून त्याच्या पुढे जातात.[२] एका अशा दिवशी ज्याचे प्रमाण पन्नास हजार वर्षे आहे.[३] म्हणून हे पैगंबर (स.), धैर्य राखा, शांततापूर्ण धैर्य[४] हे लोक त्याला दूर समजतात आणि आम्ही त्याला जवळ पाहत आहोत, (तो प्रकोप त्या दिवशी कोसळेल) ज्या दिवशी आकाश वितळलेल्या चांदीसमान होईल[५] आणि पर्वत रंगीबेरंगी पिंजलेल्या लोकरीसमान होतील. आणि कोणी जिवलग दोस्त आपल्या जिवलग दोस्ताला विचारणार नाही, वस्तुत: ते एकमेकाला दाखविले जातील. अपराधी इच्छिल की त्या दिवसाच्या प्रकोपापासून वाचण्यासाठी आपल्या संततीला, आपल्या पत्नीला, आपल्या भावाला आणि आपल्या

---

**१)** आत्माने अभिप्रेत हजरत जिब्रईल (अ.) आहेत. इतर दूतांपासून त्यांचा वेगळा उल्लेख त्यांच्या मोठेपणाच्या दृष्टीने केला गेला आहे.

**२)** हा मजकूर मुतशाबिहात-संदिग्धतेपैकी आहे. याचा अर्थ निश्चित केला जाऊ शकत नाही. आम्ही ना दूतांची वास्तवता जाणतो व ना त्यांच्यावर चढण्याच्या स्थितीला समजू शकतो शिवाय ही गोष्टही आमच्या लक्षात येण्यापलीकडची आहे की ज्यांच्यावरून दूत चढतात ते जिने कसे आहेत, तसेच सर्वोच्च अल्लाहसंबंधीदेखील अशी कल्पना केली जाऊ शकत नाही की तो एखाद्या विशिष्ट जागी राहतो, कारण त्याचे अस्तित्व, स्थळ व काळ यांच्या मर्यादांपासून अलिप्त आहे.

**३)** सूरह हज, आयत क्र. ४७ आणि सूरह अस्सजदा, आयत क्र. ५ यांच्यात हजार वर्षांएवढ्या एका दिवसाचा उल्लेख केला गेला आहे, तर या ठिकाणी प्रकोपाच्या मागणीच्या उत्तरात सर्वोच्च अल्लाहच्या एका दिवसाचे प्रमाण ५० हजार वर्षे इतके सांगितले आहे. अर्थ असा की लोक आपली बुद्धी आणि विचार व दृष्टीकक्षेतील संकुचितपणामुळे ईश्वराच्या व्यवहारांना आपल्या कालप्रमाणाद्वारे मापतात व त्यांना शंभर वा पन्नास वर्षांचा कालावधीदेखील प्रदीर्घ वाटतो. परंतु सर्वोच्च अल्लाहच्या येथे एकेक योजना हजार हजार वर्षे आणि पन्नास पन्नास हजार वर्षांची असते. हा कालावधीसुद्धा उदाहरणादाखल आहे.

**४)** म्हणजे असे धैर्य जे कुणा उदार मताच्या माणसाला साजेसे आहे.

**५)** म्हणजे वरचेवर रंग बदलेल.

निकटतम कुटुंबाला जे त्याला आश्रय देणारे होते, आणि पृथ्वीतलावरील सर्व लोकांना, मोबदला म्हणून तो देईल आणि या युक्तीमुळे त्याला मुक्ती मिळेल. कदापि नाही, ती तर भडकत्या अग्नीची ज्वाला असेल जी मांस व कातडीला चाटून टाकील. हांका मारूनमारून आपल्याकडे बोलाविल त्या प्रत्येक माणसाला जो सत्यापासून विमुख झाला आणि ज्याने पाठ फिरविली, आणि संपत्ती संचित केली आणि जपूनजपून ठेवली. (१-१८)

मनुष्य चंचल हृदयी[६] निर्माण केला गेला आहे, जेव्हा त्याच्यावर संकट येते तेव्हा तो घाबरून जातो आणि जेव्हा त्याला सुस्थिती लाभते तेव्हा कंजुषपणा करू लागतो. परंतु ते लोक (या दोषांपासून अलिप्त आहेत) जे नमाज अदा करणारे आहेत, जे आपल्या नमाजात नेहमी नियमितपणा ठेवतात, ज्यांच्या मालमत्तेत याचक व वंचित असलेल्यांचा एक ठराविक हक्क आहे, जे मोबदल्याच्या दिवसाला सत्याधिष्ठित मानतात, जे आपल्या पालनकर्त्याच्या प्रकोपाचे भय बाळगतात कारण त्यांच्या पालनकर्त्याचा प्रकोप अशी गोष्ट नाही ज्यापासून एखाद्याने निर्भय रहावे, जे आपल्या गुप्तांगाचे रक्षण करतात, आपल्या पत्नी आणि आपल्या मालकीच्या स्त्रियांना वगळून की ज्यांच्यापासून सुरक्षित न ठेवण्यावर त्यांची कोणतीही निर्भर्त्सना नाही. तथापि जे याखेरीज अन्य काही इच्छितील तेच मर्यादेचे उल्लंघन करणारे होत. जे आपल्या अमानतीचे रक्षण आणि आपल्या वचनांचा आदर करतात, जे आपल्या साक्षीत सचोटीवर दृढ राहतात, आणि जे आपल्या नमाजचे रक्षण करतात, हे लोक प्रतिष्ठापूर्वक स्वर्गाच्या उद्यानात राहतील. (१९-३५)

म्हणून हे पैगंबर (स.), काय कारण आहे की हे इन्कार करणारे उजव्या व डाव्या बाजूने तुमच्याकडे झुंडी, झुंडीने धावत येत आहेत?[७] काय यांच्यापैकी प्रत्येकजण ही लालसा बाळगतो की तो ऐश्वर्यसंपन्न स्वर्गात दाखल केला जाईल? कदापि नाही, आम्ही ज्या वस्तूपासून यांना निर्माण केले आहे त्याला हे स्वत: जाणतात. तर नव्हे, मी शपथ घेतो पूर्वेच्या व पश्चिमेच्या[८] स्वामीची, आम्ही याला समर्थ आहोत की यांच्या जागी यांच्यापेक्षा उत्तम लोक आणू आणि कोणीही

---

**६)** ज्या गोष्टीला आम्ही आपल्या भाषेत 'ही गोष्ट माणसाच्या स्वभावात आहे', अथवा 'ही माणसाची स्वाभाविक उणीव आहे', असे म्हणतो, तिलाच सर्वोच्च अल्लाह अशा प्रकारे सांगतो की, 'मनुष्य अशा प्रकारे निर्माण केला गेला आहे.'

**७)** हा त्या लोकांचा उल्लेख आहे जे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचे आवाहन प्रचार आणि कुरआन पठनाचा आवाज ऐकून थट्टा उडविण्यासाठी व टोमणे मारण्यासाठी चारही बाजूंनी धावून येत असत.



आमच्यावर मात करणारा नाही. म्हणून यांना आपल्या वाह्यात गोष्टी आणि आपल्या खेळांत मग्न राहू द्या, येथपावेतो की हे आपल्या त्या दिवसाला पोहोचतील ज्याचे याना वचन दिले जात आहे. जेव्हा हे आपल्या थडग्यातून निघून अशाप्रकारे पळत सुटले असतील जणू आपल्या मूर्तींच्या स्थानाकडे पळत असावेत, यांच्या नजरा झुकलेल्या असतील, फटफजिती यांच्यावर पसरली असेल, तो दिवस आहे ज्याचे यांना वचन दिले जात आहे. (३६-४४)

---

**८)** पूर्व आणि पश्चिम असे शब्द यासाठी वापरले गेले आहेत की वर्षभरात सूर्य प्रत्येक दिवशी एका नवीन कोनातून उगवत असतो व नवीन कोनातच अस्त पावत असतो. शिवाय पृथ्वीवरील निरनिराळ्या भागांवर सूर्य वेगवेगळ्या वेळी निरंतरपणे उदय व अस्त पावत राहतो, या अनुषंगाने पूर्व आणि पश्चिम एक नसून अनेक आहेत.

# ७१ सूरह नूह

*(मक्काकालीन, वचने २८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

आम्ही नूह (अ.) ला त्याच्या राष्ट्राकडे पाठविले (या आदेशानिशी) की आपल्या राष्ट्राच्या लोकांना खबरदार करावे यापूर्वी की त्यांच्यावर एक यातनादायक प्रकोप कोसळेल. (१)

त्याने सांगितले, ''हे माझ्या राष्ट्रबांधवांनो, मी तुमच्यासाठी एक स्पष्टपणे खबरदार करणारा (पैगंबर) आहे (तुम्हाला सावध करतो) की अल्लाहची भक्ती करा आणि त्याच्या कोपाचे भय बाळगा व माझी आज्ञा पाळा. अल्लाह तुमच्या गुन्ह्याकडे दुर्लक्ष करील आणि तुम्हाला एका ठराविक वेळेपर्यंत बाकी ठेवील,[१] वास्तविकता अशी आहे की अल्लाहने निश्चित केलेली वेळ जेव्हा येऊन ठेपते तेव्हा ती टाळता येत नाही,[२] जर तुम्हाला याचे ज्ञान झाले असते? (२-४)

त्याने विनविले,[३] ''हे माझ्या पालनकर्त्या, मी आपल्या राष्ट्रातील लोकांना रात्रंदिवस हांक दिली परंतु माझ्या हांकेने त्यांच्या पलायनातच वृद्धी केली आणि ज्या ज्या वेळी मी त्यांना बोलाविले जेणेकरून तू त्यांना माफ करावे, त्यांनी कानात बोटे खुपसली आणि आपल्या वस्त्रांनी तोंडे झाकली[४] आणि आपल्या चालीवर अडून बसले

१) म्हणजे जर तुम्ही या तीन गोष्टी मान्य केल्या तर तुम्हाला जगात त्या वेळेपर्यंत जगण्याची सवड दिली जाईल जी वेळ सर्वोच्च अल्लाहने तुमच्या नैसर्गिक मृत्यूसाठी निश्चित केली आहे.

२) या दुसऱ्या वेळेने अभिप्रेत, एखाद्या राष्ट्रावर प्रकोप कोसळविण्यासाठी अल्लाहने जी वेळ ठरवून दिलेली असेल, ती वेळ आहे, या संबंधाने अनेक ठिकाणी दिव्य कुरआनात ही गोष्ट अगदी स्पष्टपणे सांगितलेली आहे की जेव्हा एखाद्या राष्ट्रासंबंधी प्रकोप कोसळविण्याचा निर्णय सादर होतो, त्यानंतर त्या राष्ट्राने ईमान आणले तरी त्याला माफी दिली जात नाही.

३) मध्येच एका प्रदीर्घ काळाचा इतिहास सोडून आता, हजरत नूह (अ.) यांनी आपल्या प्रेषितत्वाच्या शेवटच्या काळात सर्वोच्च अल्लाहच्या सेवेत जी विनंती सादर केली होती तिचा उतारा दिला जात आहे.

४) तोंड झाकण्याचा हेतू एकतर असा होता की हजरत नूह (अ.) यांची गोष्ट ऐकणे तर राहोच, त्यांचे मुख पाहणेदेखील त्यांना आवडत नव्हते. अथवा ही कृती ते अशासाठी करीत होते की त्यांच्या समोरून जात असताना तोंड लपवून निघून जावे व त्यांना ओळखून हजरत नूह (अ.) नी त्यांच्याशी बोलू लागावे अशी पाळीच येऊ देऊ नये.



आणि मोठा गर्व केला. मग मी त्यांना पुकारून व हाक देऊन आवाहन केले. मग मी जाहीरपणेही त्यांच्यात प्रचार केला व गुपचुपगुपचुपदेखील समजाविले. मी सांगितले, ''आपल्या पालनकर्त्याची क्षमा मागा, नि:संदेह तो मोठा क्षमाशील आहे. तो तुमच्यावर आकाशांतून खूप पावसाचा वर्षाव करील. तुम्हाला मालमत्ता आणि संततीने उपकृत करील. तुमच्यासाठी बागा निर्माण करील आणि तुमच्यासाठी कालवे प्रवाहीत करील. तुम्हाला झाले तरी काय की अल्लाहसाठी तुम्ही कोणत्याही प्रतापाची अपेक्षा धरीत[५] नाही? वस्तुत: त्याने तऱ्हेतऱ्हेने तुम्हाला बनविले आहे.[६] काय पाहत नाही की कसे अल्लाहने सात आकाश थरावर थर बनविले आणि त्यात चंद्राला प्रकाश व सूर्याला दीप बनविले? आणि अल्लाहने तुम्हाला जमिनीतून गवताप्रमाणे उगविले,[७] मग तो तुम्हाला याच जमिनीत परत नेईल आणि यातून अकस्मात तुम्हाला काढून उभे करील. आणि अल्लाहने पृथ्वीला तुमच्यासाठी बिछान्याप्रमाणे अंथरले जेणेकरून तुम्ही त्यात खुल्या मार्गाने वाटचाल करावी.'' (५-२०)

नूह (अ.) ने सांगितले, ''माझ्या पालनकर्त्या, यांनी माझे म्हणणे रद्द केले आणि त्या (श्रीमंता) चे अनुकरण केले जे मालमत्ता व संतती लाभल्याने अधिकच विफल झाले आहेत. या लोकांनी महाभयंकर कुटिलतेचे जाळे पसरून ठेवले आहे. यांनी सांगितले, कदापि सोडू नका आपल्या उपास्यांना, आणि 'वद्द' व 'सुवाअ' यांनाही सोडू नका आणि यगूस व यअूक आणि नसरलादेखील.[८] यांनी बऱ्याचशा

५) अर्थ असा की जगातील लहान सहान सरदार, श्रीमंतांच्या बाबतीत तर तुम्ही असे समजता की त्यांच्या प्रतिष्ठेविरूद्ध एखादे काम करणे धोक्याचे आहे. परंतु विश्वस्वामीसंबधी तुम्हाला अशी अपेक्षा नाही की तेही कुणी प्रतापशाली अस्तित्व असेल. त्याच्याविरूद्ध तुम्ही बंड करता, त्याच्या ईशत्वात इतरांना भागीदार ठरविता, त्याच्या आज्ञा भंग करता आणि यामुळे तो तुम्हाला शिक्षा करील अशी भीती तुम्हाला वाटत नाही.

६) म्हणजे निर्मितीचे विविध टप्पे आणि पद्धतीतून नेत तुम्हाला विद्यमान स्थितीवर आणले आहे.

७) या ठिकाणी जमिनीतील द्रव्यापासून मानवाच्या निर्मितीला वनस्पतींच्या उगवण्याची उपमा दिली गेली आहे. ज्याप्रमाणे एकेवेळी पृथ्वीतलावर वनस्पतीचे अस्तित्व नव्हते मग नंतर सर्वोच्च अल्लाहने त्यांना उगविले, त्याचप्रमाणे एक काळ असा होता जेव्हा भूतलावर मानवाचे कोणतेही अस्तित्व नव्हते मग सर्वोच्च अल्लाहने येथे त्याचे रोप लावले.

८) नूहच्या राष्ट्राच्या उपास्यांपैकी येथे अशा उपास्यांची नावे सांगितलेली आहेत नंतर ज्यांना अरबवासींनीदेखील पूजणे सुरू केले होते व इस्लामच्या आरंभासमयी अरबस्तानात जागोजागी त्याची मंदिरे बांधलेली होती.

लोकांना मार्गभ्रष्ट केले आहे, आणि तूसुद्धा या अत्याचाऱ्यांना पथभ्रष्टतेखेरीज इतर कोणत्याच गोष्टीत उन्नती देऊ नकोस.''[९] (२१-२४)

आपल्या अपराधापायीच ते बुडवून टाकले गेले आणि अग्नीत झोकून दिले गेले, मग त्यांना स्वत:साठी अल्लाहपासून वाचविणारा कोणीही सहायक आढळला नाही. आणि नूह (अ.) ने सांगितले, ''माझ्या पालनकर्त्या, या अश्रद्धावंतांपैकी पृथ्वीवर कोणी निवास करणारा सोडू नकोस. जर तू यांना सोडून दिलेस तर हे तुझ्या दासांना पथभ्रष्ट करतील आणि यांच्या वंशात जो कोणी जन्मेल तो दुराचारी आणि कट्टर अश्रद्धावंतच असणार. माझ्या पालनकर्त्या मला व माझ्या आईवडिलांना आणि त्या प्रत्येक माणसाला जो माझ्या घरात श्रद्धावंत म्हणून शिरला आहे आणि सर्व श्रद्धावंत पुरुषांना आणि स्त्रियांना क्षमा कर, आणि अत्याचाऱ्यांसाठी विनाशाशिवाय अन्य कोणत्याही गोष्टीत वाढ करू नकोस.'' (२५-२८)

९) पैगंबर हजरत नूह (अ.) यांचा हा शाप काही उतावळेपणामुळे होता असे नाही तर हा शाप अशा वेळी त्यांच्या मुखातून निघाला होता जेव्हा शतकानुशतके प्रचाराची कर्तव्यपूर्ती केल्यानंतर ते आपल्या राष्ट्राकडून पूर्णपणे निराश झाले होते.



# ७२ सूरह अल्‌जिन्न

*(मक्काकालीन, वचने २८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे पैगंबर (स.), सांगा, माझ्याकडे दिव्यबोध (वही) पाठविले गेले आहे की जिन्नांच्या एका तुकडीने लक्षपूर्वक ऐकले,[१] मग (जाऊन) आपल्या जातीच्या लोकांना सांगितले, ''आम्ही एक मोठा आश्चर्यजनक कुरआन ऐकला आहे जो सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करतो, म्हणून आम्ही त्यावर श्रद्धा ठेवली आहे आणि आता आम्ही कदापि आपल्या पालनकर्त्याबरोबर कोणालाही भागीदार ठरविणार नाही.'' आणि असे की, ''आमच्या पालनकर्त्याचे वैभव मोठे उच्च आणि श्रेष्ठ आहे, त्याने कुणाला पत्नी अथवा पुत्र बनविलेले नाही.'' आणि असे की, ''आमचे नादान लोक[२] अल्लाहसंबंधी खूप अवास्तव गोष्टी सांगत राहिले आहेत.'' आणि असे की, ''आमचा असा समज होता की, मनुष्य आणि जिन्न अल्लाहसंबंधी कधी खोटे बोलू शकत नाहीत.'' आणि असे की, ''मनुष्यांपैकी काही लोक जिन्नांपैकी कांही जणांचा आश्रय मागत असत. अशा प्रकारे, त्यांनी जीन्नचा अहंकार अधिकच वृद्धिंगत केला.'' आणि असे की, ''माणसांनी सुद्धा तशीच कल्पना केली जशी तुमची कल्पना होती की, अल्लाह कुणाला प्रेषित बनवून पाठविणार नाही.'' आणि असे की, ''आम्ही आकाशाला चाचपडले तर पाहिले की ते पहारेकऱ्यांनी भरून गेले आहे, आणि उल्कांचा वर्षाव होत आहे.'' आणि असे की, ''आम्ही पूर्वी कानोसा घेण्यासाठी आकाशात बसण्यासाठी जागा मिळवू शकत होतो, परंतु आता जो लपून छपून ऐकण्याचा प्रयत्न करतो त्याला आपल्यावर दबा धरून बसलेली एखादी उल्का आढळते.'' आणि असे की, ''आमच्या लक्षात येत नव्हते की पृथ्वीवाल्यांशी एखादा वाईट मामला करण्याचा बेत केला

१) याच्याने असे कळते की जिन्न त्यावेळी अल्लाहचे पैगंबर (स.) यांना दिसत नव्हते व ते कुरआन ऐकत आहेत हे त्यांना माहीत नव्हते, तर नंतर दिव्यबोधाद्वारे सर्वोच्च अल्लाहने त्यांना या घटनेची बातमी दिली. हजरत अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) देखील या घटनेचे वर्णन करताना खुलासा करतात की, ''अल्लाहचे पैगंबर (स.) यांनी जिन्नांपुढे कुरआन पठन केले नव्हते व त्यांना पाहिलेही नव्हते.'' (मुस्लिम, तिर्मिजी, मुसनद अहमद, इब्ने जरीर)

२) मूळ अरबी भाषेत 'सफीहुना' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. हा एका व्यक्तीसाठीही वापरला जाऊ शकतो व एका समूहासाठीदेखील. जर 'एक नादान इसम' या अर्थाने हा घेतला गेला तर अभिप्रेत इब्लीस असेल व जर एक समूह या अर्थाने घेतला तर, जिन्नांपैकी पुष्कळसे मूर्ख आणि बेअक्कल लोक अशा गोष्टी सांगत होते, असा अर्थ होईल.

गेला आहे की त्यांचा पालनकर्ता त्यांना सरळ मार्ग दाखवू इच्छितो.''[३] आणि असे की, ''आमच्यापैकी काही लोक सदाचारी आहेत आणि काही याहून खालावलेले आहेत, आम्ही विभिन्न पद्धतीत विभाजित झालो आहोत.'' आणि असे की, ''आम्हाला समजत होते की, आम्ही ना पृथ्वीवर अल्लाहला असफल करू शकतो ना कुठे पळून त्याला हरवू शकतो.''[४] आणि असे की, ''आम्ही जेव्हा मार्गदर्शनपर शिकवण ऐकली तेव्हा आम्ही त्यावर श्रद्धा ठेवली. आता जो जो कोणी आपल्या पालनकर्त्यावर श्रद्धा ठेवील त्याला कोणताही हक्क मारला जाण्याची किंवा अन्यायाची भीती नसेल.'' आणि असे की, ''आमच्यापैकी काही मुस्लिम (अल्लाहचे आज्ञाधारक) आहेत. आणि काही सत्याशी विमुख. तर ज्यांनी इस्लाम (आज्ञापालनाचा मार्ग) अंगिकारला त्यांनी मुक्तीचा मार्ग शोधून काढला, आणि जे सत्याशी विमुख आहेत; ते नरकाचे इंधन बनणारे आहेत.''[५] (१-१५)

आणि (हे पैगंबर (स.)) सांगा, मला असे दिव्य बोधही केले गेले आहे की, लोक जर सरळ मार्गावर दृढतेने चालले असते तर आम्ही त्यांना खूप तृप्त केले असते, जेणेकरून या देणगीने त्यांची परीक्षा घ्यावी, आणि जो आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणापासून पराङमुख होईल. त्याचा पालनकर्ता त्याला कठोर प्रकोपात टाकील आणि असे की, मस्जिदी अल्लाहसाठी आहेत म्हणून त्यात अल्लाहबरोबर इतर कोणाला पुकारू नका.[६] आणि जेव्हा अल्लाहचा दास त्याला पुकारण्यासाठी उभा राहिला तेव्हा लोक त्याच्यावर तुटून पडण्यास तयार झाले. हे पैगंबर (स.), सांगा की, ''मी तर आपल्या पालनकर्त्याला पुकारतो आणि

३) यावरून असे कळले की आकाशाची अशी स्थिती पाहून हे जिन्न या शोधात निघाले होते की जमिनीवर असा कोणता मामला उद्‌भवला आहे बरे अथवा उद्भवणार आहे ज्याची बातमी सुरक्षित ठेवण्यासाठी इतके कडक बंदोबस्त ठेवलेले आहेत की आता आम्हाला वरील जगताचा कानोसा घेण्याची कोणतीही संधी सापडत नाही व जिकडेही आम्ही जातो; पिटाळले जात आहोत.

४) अर्थ असा की आमच्या याच विचाराने आम्हाला मुक्तीचा मार्ग दाखवून दिला. आम्ही अल्लाहकडून निर्भीड नव्हतो, जर आम्ही त्याची अवज्ञा केली तर त्याच्या पकडीतून कोणत्याही प्रकारे आम्ही वाचू शकणार नाही असा आमचा विश्वास होता. म्हणून सर्वोच्च अल्लाहकडून सरळमार्ग दाखविण्यासाठी आलेली ती वाणी जेव्हा आम्ही ऐकली तेव्हा सत्य कळून आल्यानंतरसुद्धा आमच्यातील नादान लोकांनी आमच्यात पसरवून ठेवलेल्या श्रद्धांवर अडून राहण्याचे धारिष्ट्य आम्ही करू शकलो नाही.

५) सवाल केला जाऊ शकतो की कुरआनानुसार जिन्न तर स्वत:च अग्निउत्पत्ति म्हणून आहेत मग जहन्नमच्या आगीचा त्यांना कसा त्रास होऊ शकतो? याचे उत्तर असे की कुरआननुसार तर मनुष्यदेखील मातीपासून बनलेला आहे मग मातीचे ढेकूळ फेकून मारले असता त्याला आघात का बसतो?

६) म्हणजे अल्लाहसमवेत इतर कुणाची उपासना करू नका, इतर कुणाची प्रार्थना करू नका, इतर कुणाला मदतीसाठी पुकारू नका.



त्याच्याबरोबर कुणाला भागिदार ठरवीत नाही.'' सांगा, ''मी तुम्हा लोकांसाठी ना एखाद्या हानीचा अधिकार राखतो ना एखाद्या भल्याचा.'' सांगा, ''मला अल्लाहच्या पकडीतून कुणी वाचवू शकत नाही आणि मी त्याच्या छत्राशिवाय कोठेही आश्रयस्थान प्राप्त करू शकत नाही. माझे काम या व्यतिरिक्त काहीच नाही की अल्लाहचे म्हणणे आणि त्याचे संदेश पोहोचवावे. आता जो जो कोणी अल्लाह व त्याचे पैगंबर (स.) चे ऐकणार नाही त्याच्यासाठी नरकाग्नी आहे आणि असले लोक त्यात सदैव राहतील.'' (१६-२३)

(हे लोक आपल्या या कारवायांपासून परावृत्त होणार नाहीत) येथपावेतो की जेव्हा त्या गोष्टीला पाहतील ज्याचे वचन दिले जात आहे, तर त्यांना कळेल की कुणाचे सहाय्यक दुर्बल आहेत आणि कुणाचा दल संख्येत कमी आहे.[७] सांगा, ''मला माहीत नाही की, ज्या गोष्टीचे वचन तुम्हाला दिले जात आहे ती जवळ आहे अथवा माझा पालनकर्ता तिच्यासाठी एखादी दीर्घ मुदत निश्चित करील. तो परोक्षाचा ज्ञाता आहे, आपले परोक्ष कोणावरही उघड करीत नाही, त्या प्रेषिताखेरीज ज्याला त्याने (परोक्ष ज्ञान देण्यासाठी) पसंत केले असेल.[८] तर त्यांच्या पुढे व मागे तो रक्षक ठेवतो[९] जेणेकरून त्यांनी जाणावे की त्यांनी आपल्या पालनकर्त्याचे संदेश पोहचते केले,[१०] आणि तो त्यांच्या संपूर्ण परिसराला वेढून आहे, आणि एकेका वस्तूची त्याने गणना[११] करून ठेवली आहे. (२४-२८)

७) त्याकाळी कुरैशातील जे लोक अल्लाहचे पैगंबर (स.) यांचे अल्लाहकडे केलेले आवाहन ऐकताक्षणीच त्यांच्यावर तुटून पडत असत; ते या दर्पात होते की त्यांचा जथा मोठा जबरदस्त आहे व पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याबरोबर मूठभर काही माणसे आहेत, म्हणून सहजपणे ते त्यांना दाबून टाकतील.

८) म्हणजे पैगंबर स्वयंभू परोक्षज्ञाता असत नाही तर सर्वोच्च अल्लाह जेव्हा प्रेषितत्वाचे कर्तव्य पार पाडण्यासाठी त्याची निवड करतो तेव्हा परोक्षाच्या सत्यांपैकी ज्या गोष्टींचे ज्ञान तो इच्छितो त्याला प्रदान करतो.

९) रक्षकांनी अभिप्रेत दूत आहेत. अर्थ असा की जेव्हा सर्वोच्च अल्लाह दिव्यबोधाद्वारे परोक्षाच्या सत्याचे ज्ञान प्रेषितांजवळ पाठवितो तेव्हा त्याच्या रक्षणासाठी सर्वत्र दूत नियुक्त करतो जेणेकरून ज्ञान अत्यंत सुरक्षितपणे प्रेषितापर्यंत पोहचावे व त्यात कोणत्याही प्रकारची भेसळ होऊ नये.

१०) यावरून कळाले की प्रेषिताला, प्रेषितत्वाचे कर्तव्य पार पाडण्यासाठी ज्या परोक्षाच्या ज्ञानाची आवश्यकता असते, परोक्षाचे ते ज्ञान त्याला दिले जाते आणि दूत या गोष्टीची खबरदारी घेतात की ते ज्ञान प्रेषितापर्यंत खऱ्या स्वरूपात पोहचावे, त्याचप्रमाणे याचीही खबरदारी घेतात की प्रेषिताने आपल्या पालनकर्त्याचे संदेश त्याच्या दासांपर्यंत यथायोग्य स्वरूपात पोहचवावे.

११) म्हणजे प्रेषितावरही व दूतांवरही सर्वोच्च अल्लाहचे सामर्थ्य अशाप्रकारे व्याप्त आहे की जर तिळमात्रदेखील त्यांनी त्याच्या मर्जीविरूद्ध हालचाल केली तर तुरंत धरले जातील. जे संदेश सर्वोच्च अल्लाह पाठवितो त्याच्यातील शब्द न् शब्द गणलेला आहे. त्यात एका शब्दानेसुद्धा वाढ किंवा कमी करावे अशी प्रेषित आणि दूतांची बिशाद नाही.

# ७३ सूरह अल्मुज़्ज़म्मिल

*(मक्काकालीन, वचने २०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे पांघरूण ओढून झोपणाऱ्या, रात्री नमाजीसाठी उभे राहात जा, परंतु थोडे, अर्धी रात्र किंवा त्यापेक्षा कमी करा अथवा त्यापेक्षा काही अधिक वाढवा, आणि कुरआनचे खूप थांबून थांबून पठण करा, आम्ही तुमच्यावर एक भारदस्त वाणी अवतरणार आहोत. वस्तुत: रात्रीचे उठणे आत्मसंयम ठेवण्यासाठी अत्यंत उपयुक्त आणि कुरआन नीट पठण करण्यासाठी अधिक योग्य आहे. दिवसाचे वेळी तर तुमच्यासाठी खूप व्याप आहे. आपल्या पालनकर्त्याच्या नामाचे स्मरण करीत जा आणि सर्वांपासून तुटून त्याचेच बनून रहा. तो पूर्व व पश्चिमेचा स्वामी आहे, त्याच्याशिवाय कोणीही ईश्वर नाही. म्हणून त्यालाच आपला मुखत्यार[1] बनवा. आणि ज्या गोष्टी लोक बनवीत आहेत त्यावर धैर्य राखा आणि सभ्यतेने त्यांच्यापासून वेगळे व्हा.[2] या खोटे ठरणाऱ्या सुखवस्तू लोकांशी निपटण्याचे कार्य तुम्ही माझ्यावर सोडा, आणि त्यांना काही थोडा वेळ याच अवस्थेत राहू द्या. आमच्याजवळ (यांच्यासाठी) भारी बेड्या आहेत आणि भडकत असलेला अग्नी, आणि घशात अडकणारे जेवण व यातनामय प्रकोप. हे त्या दिवशी घडेल जेव्हा पृथ्वी आणि पर्वत हादरून उठतील आणि पर्वतांची स्थिती अशी होईल जणू वाळूचे ढिगारे विखुरले जात आहेत. (१-१४)

तुम्हा लोकांकडे आम्ही[3] त्याच प्रकारे एक प्रेषित तुमच्यावर साक्षीदार बनवून पाठविला आहे जसे आम्ही फिरऔनकडे एक प्रेषित पाठविला होता. (मग पहा जेव्हा) फिरऔनने त्या प्रेषिताचे म्हणणे ऐकले नाही तेव्हा आम्ही त्याला फार कठोरतेने धरले. जर

१) अरबी भाषेत वकील (मुखत्यार) अशा व्यक्तीला म्हणतात ज्यावर विश्वास टाकून कुणा माणसाने आपला मामला त्याच्या स्वाधीन करावा, जवळ जवळ याच अर्थाने आम्ही उर्दू (मराठी इ.) भाषेत वकील हा शब्द अशा व्यक्तीसाठी वापरतो ज्याच्या सुपूर्द आपला खटला करून एखादा मनुष्य निश्चिंत होतो की त्याच्या बाजूने तो चांगल्या प्रकारे खटला लढवील व त्याला स्वत:ला खटला लढण्याची गरज भासणार नाही.

२) वेगळे व्हा, याचा अर्थ असा नाही की त्याच्याशी संबंध तोडून आपला प्रचार बंद करून टाका तर त्यांच्या तोंडी लागू नका, त्यांच्या वाह्यात चाळ्यांकडे पूर्णपणे दुर्लक्ष करा व त्यांच्या कोणत्याही असभ्यतेला उत्तर देऊ नका. मग ही अलिप्ततादेखील एखादे दु:ख अथवा क्रोध वा वैतागासह असू नये तर कुणी सभ्य मनुष्य कुणा हलकट मनुष्याच्या शिव्या ऐकून ज्याप्रकारे दुर्लक्ष करतो व मनांत मळसुद्धा येऊ देत नाही त्याच प्रकारची अलिप्तता असावी.

३) आता मक्केतील त्या अश्रद्धावंतांना संबोधून सांगितले जात आहे जे अल्लाहचे पैगंबर (स.) यांना खोटे ठरवीत होते व त्यांच्या विरोधात प्रयत्नशील होते.



तुम्ही मानण्यास नकार दिला तर त्या दिवशी कसे वाचाल जो बालकांना वृद्ध बनवील आणि ज्याच्या कठोरतेने आकाश फाटले जात असेल? अल्लाहचे वचन तर पूर्ण होणारच आहे. हा एक उपदेश आहे आता ज्याची इच्छा असेल त्याने आपल्या पालनकर्त्याकडे जाण्याचा मार्ग स्वीकारावा. (१५-१९)

हे पैगंबर (स.)[4] तुमचा पालनकर्ता जाणतो की तुम्ही कधी सुमारे दोन तृतियांश रात्र आणि कधी अर्धी रात्र आणि कधी एक तृतियांश रात्र उपासना करीत उभे राहता, आणि तुमच्या साथिदारांपैकी एक गट कृती करतो. अल्लाहच रात्र आणि दिवसाच्या वेळेचा हिशोब ठेवतो, त्याला माहित आहे की, तुम्ही लोक वेळेची ठीक गणना करू शकत नाही. म्हणून त्याने तुमच्यावर मेहेरबानी केली, आता सुलभतेने जितका कुरआन वाचू शकता वाचत जा.[5] त्याला माहित आहे की तुमच्यात काही आजारी असतील, काही अन्य लोक अल्लाहच्या कृपाप्रसादाच्या शोधात प्रवास करतात आणि काही अन्य लोक अल्लाहच्या मार्गात युद्ध करतात, म्हणून जितका कुरआन सहजरित्या वाचता येणे शक्य आहे वाचत जा, नमाज कायम करा, जकात[6] द्या आणि अल्लाहला चांगले कर्ज देत जा. जे काही पुण्य तुम्ही आपल्यासाठी पुढे पाठवाल ते तुम्हाला अल्लाहपाशी आढळेल, तेच जास्त उत्तम आहे आणि त्याचा मोबदला फार मोठा आहे. अल्लाहची क्षमायाचना करीत रहा, नि:संशय अल्लाह अत्यंत क्षमाशील व परमकृपाळू आहे. (२०)

४) हा रुकूअ-पोटभाग पहिल्या रुकूअच्या दहा वर्षांनंतर मदीनेत उतरला.

५) नमाजातील दीर्घता जास्त करून कुरआनच्या दीर्घपठनानेच होते, म्हणून फर्माविले की तहज्जुद-मध्यरात्री नंतरच्या नमाजात जितका कुरआन सुलभतेने पठन करू शकता, पठन करीत जा. त्यामुळे 'नमाजा'तील प्रदीर्घता आपोआप कमी होईल.

६) भाष्यकारांचे या गोष्टीवर एकमत आहे की याच्याने अभिप्रेत पाच वेळेची नमाज आणि अनिवार्य जकात अदा करणे होय.

# ७४ सूरह अल्मुद्दस्सिर

*(मक्काकालीन, वचने ५६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे पांघरूण ओढून[१] पहुडणाऱ्या, उठा आणि खबरदार करा. आणि आपल्या पालनकर्त्याच्या महानतेची घोषणा करा. आणि आपले कपडे शुचिर्भूत ठेवा आणि अपवित्रतेपासून दूर रहा. आणि उपकार करू नका अधिक प्राप्त करण्यासाठी आणि आपल्या पालनकर्त्यासाठी धैर्य राखा. (१-७)

जेव्हा[२] नरसिंगात फुंक मारली जाईल तो दिवस फारच कठीण दिवस असेल, अश्रद्धावंतांसाठी सोपा असणार नाही. सोडा मला आणि त्या माणसाला ज्याला मी एकटे[३] निर्माण केले, पुष्कळशी मालमत्ता त्याला दिली. त्याच्याबरोबर हजर राहणारे पुत्र दिले, आणि त्याच्यासाठी सत्तेचा मार्ग प्रशस्त केला, मग तो लालसा बाळगतो की मी त्याला आणखी अधिक द्यावे, कदापि नाही, तो आमच्या संकेतवचनांशी वैर करतो, मी तर लवकरच एक कठीण चढण चढवीन. त्याने विचार केला आणि काहीतरी गोष्ट बनविण्याचा प्रयत्न केला तर ईश्वराचा कोप त्याच्यावर, कशी गोष्ट बनविण्याचा प्रयत्न केला, होय, ईश्वराचा कोप त्याच्यावर, कशी गोष्ट बनविण्याचा प्रयत्न केला, मग (लोकांच्याकडे) पाहिले, मग कपाळ आखडले आणि तोंड वेडावले, मग फिरला आणि अहंकारात आला. सरतेशेवटी म्हणाला, हे काहीच नसून एक जादू जी पूर्वीपासून चालत आली आहे, ती तर एक मानवी वाणी आहे, लवकरच मी त्याला नरकामध्ये झोकून देईन.

---

१) या सुरतीतील पहिल्या सात आयती त्या आहेत ज्यात सर्वप्रथम इस्लामचा प्रचार करण्याची पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना आज्ञा दिली गेली. पैगंबर (स.) यांच्यावर 'इकरा बिस्मि रब्बिकल लजी'नंतर उतरणारा हा दुसरा दिव्यबोध-वही आहे.

२) हा भाग प्रारंभिक आयतींच्या काही महिन्यानंतर त्यावेळी उतरला होता जेव्हा अल्लाहचे प्रेषित (स.) यांच्याकरवी जाहिरपणे इस्लामचा प्रचार सुरू झाल्यानंतर प्रथमत:च हज्जचा काळ आला व कुरैशांच्या सरदारांनी परिषद भरवून असे ठरविले की बाहेरून येणाऱ्या हजयात्रेकरूंमध्ये कुरआन आणि पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्याविषयी गैरसमज पसरविण्यासाठी प्रचाराची एक जबरदस्त मोहीम चालविली जावी.

३) याच्याने अभिप्रेत वलीद बिन् मुगीरा आहे. या गृहस्थाची, कुरआन ईश्वरीवाणी असल्याची मनातून खात्री झालेली होती परंतु मक्केत आपली सरदारी कायम ठेवण्यासाठी त्याने वर उल्लेखित परिषदेत, पैगंबर (स.) यांना जादूगार आणि कुरआनाला जादू म्हणून प्रसिद्ध करण्याचा सल्ला दिला.



आणि तुम्हाला काय कल्पना की काय आहे तो नरक? ना बाकी ठेवणार ना सोडणार.[४] कातडी होरपळून टाकणारा. एकोणीस कर्मचारी त्याच्यावर नियुक्त आहेत. आम्ही[५] नरकाग्नीचे कर्मचारी या दूतांना बनविले आहे आणि त्यांच्या संख्येला व अश्रद्धावंतांसाठी उपद्रव बनविले आहे जेणेकरून ग्रंथधारकांचा विश्वास बसावा आणि श्रद्धावंतांच्या श्रद्धेमध्ये वाढ व्हावी. आणि ग्रंथधारक व श्रद्धावंतांना कोणतीही शंका राहू नये,[६] व मनोरुग्ण आणि अश्रद्धावंतांनी असे म्हणावे की अल्लाहचा या अजब गोष्टीपासून काय अर्थ असू शकतो. अशा प्रकारे अल्लाह ज्याला इच्छितो त्याला पथभ्रष्ट करतो आणि ज्याला इच्छितो मार्गदर्शन प्रदान करतो. आणि तुझ्या पालनकर्त्याच्या लष्कराला स्वत: त्याच्याशिवाय अन्य कोणी जाणत नाही. आणि या नरकाग्नीचा उल्लेख याशिवाय अन्य कोणत्याही हेतूने केला गेला नाही की लोकांना यापासून उपदेश मिळावा. कदापि नाही[७]. शपथ आहे चंद्राची आणि रात्रीची जेव्हा ती पालटते, आणि सकाळची जेव्हा ती उजळते, हा नरकाग्नीसुद्धा मोठ्या गोष्टींपैकी एक आहे,[८] माणसासाठी भय दाखविणारी, तुमच्यापैकी त्या प्रत्येक माणसासाठी भय दाखविणारी, जो पुढे जाऊ इच्छित असेल अथवा मागे राहू इच्छित असेल. (८-३७)

---

४) म्हणजे प्रकोपाला पात्र ठरणाऱ्यांपैकी कुणी तिच्या कचाट्यात आल्यावाचून राहावा, कुणालाही ती असे बाकी ठेवणार नाही. व जो कोणी तिच्या कचाट्यात येईल त्याला यातना दिल्याशिवाय सोडणार नाही.

५) येथपासून ते 'तुझ्या पालनकर्त्याच्या लष्करांना स्वत: त्याच्याशिवाय इतर कोणी जाणत नाही'पर्यंतचा सर्व मजकूर हरकतीचा मुद्दा म्हणून आहे. भाषणाच्या मध्येच वक्तव्यक्रम खंडित करून आक्षेप घेणाऱ्यांच्या उत्तरादाखल तो फर्माविला गेला आहे. आक्षेप घेणाऱ्यांनी अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या तोंडाने हे ऐकून की नरकाच्या कर्मचारीची संख्या केवळ १९ असेल, याची थट्टा उडविणे सुरू केले होते. त्यांना ही गोष्ट मोठी विचित्र वाटली की एकीकडे आम्हाला असे सांगितले जात आहे की आदम (अ.) च्या काळापासून प्रलयापर्यंत जगात जितक्याही मनुष्यांनी द्रोह आणि महापातके केलेली आहेत; ते नरकात टाकले जातील व दुसरीकडे आम्हाला असे कळविले जात आहे की इतक्या मोठ्या नरकात इतक्या असंख्य प्रमाणातील माणसांवर प्रकोप करण्यासाठी केवळ १९ कर्मचारी नियुक्त असतील.

६) ग्रंथधारक आणि श्रद्धावंतांना दूतांच्या असामान्य शक्तीची माहिती आहे, म्हणून त्यांना याबाबतीत कोणतीही शंका असू शकत नाही की १९ दूत नरकाची व्यवस्था राखण्यासाठी पुरेसे आहेत.

७) म्हणजे ही काही आवई गोष्ट नव्हे जिची अशाप्रकारे थट्टा उडविली जावी.

८) म्हणजे ज्याप्रकारे चंद्र, रात्र आणि दिवस सर्वोच्च अल्लाहच्या सामर्थ्याची महान चिन्हे आहेत त्याचप्रकारे नरकदेखील त्याचे महासामर्ध्य-चिन्हांपैकी एक आहे.

प्रत्येक मनुष्य आपल्या कमाईच्या बदल्यात गहाण आहे. उजव्या बाजूवाल्यां-खेरीज, ते स्वर्गामध्ये असतील, ते गुन्हेगारांना विचारतील,[९] "तुम्हाला कोणत्या गोष्टीने नरकात नेले?" ते म्हणतील "आम्ही नमाज अदा करणाऱ्यांपैकी नव्हतो आणि गरिबांना जेवू घालत नव्हतो, आणि सत्याविरूद्ध गोष्टी रचणाऱ्यांविरूद्ध आम्हीही गोष्टी बनविण्यात लागत होतो. आणि मोबदल्याच्या दिवसाला खोटे ठरवीत होतो, येथपावेतो की त्या निश्चित गोष्टीशी आमचा प्रसंग घडला." त्यावेळी शिफारस करणाऱ्यांची कोणतीही शिफारस त्यांच्या काहीच उपयोगी पडणार नाही. (३८-४८)

शेवटी या लोकांना झाले तरी काय आहे की हे या उपदेशापासून तोंड फिरवीत आहेत, जणू हे रानटी गाढवे होत. जे सिंहाला भिऊन पळत सुटले आहेत.[१०] किंबहुना यांच्यापैकी तर प्रत्येकजण असे इच्छितो की त्याच्या नावे खुली पत्रे पाठविली जावीत.[११] कदापि नाही[१२] खरी गोष्ट अशी आहे की हे परलोकाची भीती बाळगत नाही. हा तर एक उपदेश आहे, आता ज्याची इच्छा असेल त्याने यापासून धडा घ्यावा. आणि हे कोणताही धडा घेणार नाहीत. याखेरीज की अल्लाह तशी इच्छा करील. तो याचा हक्क राखतो की त्याला भिऊन वागावे. आणि तो या गोष्टीला पात्र आहे की (भय बाळगणाऱ्यांना) त्याने क्षमा प्रदान करावी. (४९-५६)

---

९) म्हणजे स्वर्गात बसल्या बसल्याच ते नरकातील लोकांशी बोलतील व असा प्रश्न करतील.

१०) अरबी भाषेतील हा एक वाक्प्रचार आहे. झेब्रांचे हे वैशिष्ट्य असते की धोक्याची चाहूल लागताच ते इतके बेभान होऊन पळतात की इतर कोणतेही पशू त्याप्रमाणे पळत नाहीत.

११) म्हणजे हे इच्छितात की सर्वोच्च अल्लाहने खरोखरच जर मुहम्मद (स.) यांना प्रेषित म्हणून नियुक्त केले आहे तर मक्केतील प्रत्येक सरदार व प्रत्येक शेखच्या नावाने त्याने पत्र लिहून पाठवावे की मुहम्मद (स.) आमचे प्रेषित आहेत, तुम्ही त्यांचे अनुकरण मान्य करा.

१२) म्हणजे त्यांची असली कोणतीही मागणी कदापि पूर्ण केली जाणार नाही.



# ७५ सूरह अल्क़ियामा

*(मक्काकालीन, वचने ४०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

नव्हे,[१] मी शपथ घेतो पुनरुत्थानाच्या दिवसाची[२] आणि नाही, मी शपथ घेतो निर्भत्सना करणाऱ्या मनाची[३] काय माणूस असे समजतो की आम्ही त्याच्या हाडांना गोळा करू शकणार नाही? का नाही? आम्ही तर त्याच्या बोटांची पेरे पेरे सुद्धा नीट बनविण्यास समर्थ आहोत, परंतु माणूस इच्छितो की पुढेसुद्धा दुष्कृत्ये करीत रहावीत.[४] विचारतो, "शेवटी केव्हा येणार आहे बरे तो पुनरुत्थानाचा दिवस?" मग जेव्हा डोळे थिजून जातील आणि चंद्र निस्तेज होऊन जाईल आणि चंद्र सूर्य मिळून एक केले जातील आणि त्यावेळी हाच माणूस म्हणेल, "कुठे पळून जाऊ?" कदापि नाही, तेथे कोणतेही आश्रयस्थान असणार नाही. त्या दिवशी तुझ्या पालनकर्त्याच्या समोरच जाऊन थांबावे लागेल, त्या दिवशी मानवाला त्याचे सर्व पुढील व मागील केले व करविलेले दाखविले जाईल किंबहुना मानव स्वत:च स्वत:ला चांगल्या प्रकारे जाणतो. मग तो कितीही निमित्ते पुढे का करेना,[५] हे पैगंबर (स.)[६] या

---

१) नकाराने वक्तव्याचा प्रारंभ करणे आपल्या आपण या गोष्टीचे प्रमाण ठरते की पूर्वीपासून एखादी गोष्ट चाललेली होती व तिचे खंडन करण्यासाठी ही सूरत उतरली आहे. म्हणून या ठिकाणी 'नव्हे' सांगण्याचा अर्थ असा की जे काही तुम्ही समजत आहात ते खरे नाही, मी शपथ घेऊन सांगतो की खरी गोष्ट अशी आहे.

२) प्रलयाच्या आगमनावर स्वत: प्रलयाची शपथ अशासाठी घेतलेली आहे की तिचे आगमन विश्वसनीय आहे. सर्व विश्वव्यवस्था साक्ष देत आहे की ही व्यवस्था ना अनादी आहे, ना अनंत. एकेवेळी काही नसताना ती अस्तित्वात आली आहे व एकेवेळी ती खचितच संपुष्टात येणार आहे.

३) अर्थात सद्सद्विवेकबुद्धीचीही; जी वाईट गोष्टीवर माणसाची निर्भर्त्सना करते. माणसातील तिचे अस्तित्व हे या गोष्टीची ग्वाही देते की मनुष्य आपल्या कृत्यांसाठी उत्तरदायी आहे.

४) म्हणजे प्रलयाच्या इन्काराचे खरे कारण हे आहे, इतर एखादे बौद्धिक आणि शास्त्रीय प्रमाण नव्हे, ज्या आधारे, कयामत कदापि उद्भवणार नाही किंवा ती उद्भवणे असंभवनीय आहे असे मनुष्य सांगू शकत असावा.

५) म्हणजे माणसाची कृतीनोंद त्याच्या पुढ्यात ठेवण्याचा हेतू, अपराधींना त्यांचे अपराध दाखविले जावे, असा नाही तर खरे म्हणजे असे करणे यासाठी जरूरीचे असेल की अपराध्यांचे पुरावे न्यायालयासमोर प्रस्तुत केल्याविना न्यायाची निवड पूर्ण होत नाही एरवी तो कसा आहे हे प्रत्येक मनुष्य स्वत: चांगल्या प्रकारे जाणतो.

६) येथपासून ते 'मग त्याचा अर्थ समजावून देणेसुद्धा आमच्यावरच आहे' पर्यंत सर्व मजकूर एक हरकतीचा मुद्दा म्हणून मध्येच वक्तव्यक्रम खंडित करून प्रेषित मुहम्मद (स.) यांना संबोधून फर्माविले गेले आहे. हजरत जिब्रईल (अ.) जेव्हा सदरहू सूरह प्रेषित (स.) यांना ऐकवीत होते त्यावेळी या भीतीपोटी की एखादे वेळी मला विसर पडू नये म्हणून प्रेषित (स.) तोंडाने त्याचा पुनरुच्चार करण्याचा प्रयत्न करीत होते.

दिव्यबोधाला घाईघाईने पाठ करण्यासाठी आपल्या जीभेला चालना देऊ नका. याला पाठ करविणे व पठण करविणे आमच्यावर आहे, म्हणून जेव्हा आम्ही त्याचे पठण करीत असू त्यावेळी तुम्ही हे पठण लक्षपूर्वक ऐकत जा. मग याचा अर्थ समजावून देणेसुद्धा आमच्यावरच आहे. कदापि नाही[७] खरी गोष्ट अशी आहे की, तुम्ही लोक त्वरित प्राप्त होणाऱ्या गोष्टींशी (अर्थात इहलोकाशी) प्रेम ठेवता, आणि परलोक सोडून देता. त्या दिवशी काही चेहरे टवटवीत असतील आपल्या पालनकर्त्याकडे पाहात असतील, आणि काही चेहरे उदास असतील आणि समजत असतील की त्यांच्याशी कंबर खचविणारा व्यवहार होणार आहे. कदापि नाही[८] जेव्हा प्राण कंठापर्यंत पोहोचेल आणि म्हटले जाईल की आहे का कोणी मंत्र-तंत्र करणारा, आणि मनुष्य समजून घेईल की ही जगाशी ताटातूट होण्याची वेळ आहे, आणि पायात पाय अडकतील. तो दिवस असेल तुझ्या पालनकर्त्याकडे जाण्याचा. (१-३०)

परंतु त्याने ना खरे मानले आहे आणि ना नमाज अदा केली, तर खोटे ठरविले आणि पालटला आणि मग दिमाखात आपल्या घरवाल्याकडे निघाला. ही चाल तुझ्याच लायकीची आहे आणि तुलाच शोभा देते. होय, ही चाल तुझ्याच लायकीची आहे आणि तुलाच शोभा देते. (३१-३५)

काय मानवाने असा समज करून घेतला आहे की तो असाच व्यर्थ[९] सोडून दिला जाईल? काय तो तुच्छ वीर्याचा थेंब नव्हता जो (गर्भाशयात) टपकविण्यात आला. मग तो एक गोळा बनला. मग अल्लाहने त्याचे शरीर बनविले व त्याचे अवयव व्यवस्थित केले मग त्यापासून पुरुष आणि स्त्रीचे दोन प्रकार बनविले. काय तो यासाठी समर्थ नाही की तो मृतांना जीवित करील? (३६-४०)

---

७) येथून वक्तव्यक्रम, मधल्या हरकतीच्या मुद्यापूर्वी जो विषय सुरू होता पुन्हा त्याच विषयाशी जुळतो. कदापि नाही याचा अर्थ असा की तुम्हा लोकांचे परलोकाच्या इन्काराचे खरे कारण हे नाही की तुम्ही सृष्टीच्या निर्माणकर्त्याला प्रलय घडवून आणण्यास व मृत्यूनंतर पुन्हा जिवंत करण्यास असमर्थ समजता तर खरे कारण हे असे आहे.

८) या 'कदापि नाही'चा संबंध त्याच वक्तव्यक्रमाशी आहे जो अगोदरपासून चाललेला आहे. म्हणजे तुमची ही कल्पना चुकीची आहे की मृत्यूनंतर तुम्ही संपून जाल व आपल्या पालनकर्त्यासमोर हजर होणार नाही.

९) मूळ अरबी भाषेत 'सुदा' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. अरबी भाषेत 'इबिलून सुदा' अशा उंटाला म्हणतात जो मोकाट फिरत असावा, हवे तेथे त्याने चरत फिरावे, त्याची देखरेख करणारा कुणी नसावा, याच अर्थाने आम्ही उनाड व मोकाट जनावर असा शब्द वापरतो.



# ७६ सूरह अद्दह्र

*(मदीनाकालीन, वचने ३१)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

काय मानवावर अनंत काळाची एक वेळ अशीही येऊन गेली आहे जेव्हा तो काही उल्लेखनीय वस्तू नव्हता?[१] आम्ही मानवाला एका मिश्र वीर्यापासून निर्माण केले, जेणेकरून त्याची परीक्षा घ्यावी आणि यासाठी आम्ही त्याला ऐकणारा व पाहणारा बनविला.[२] आम्ही त्याला मार्ग दाखविला, मग त्याने कृतज्ञता मानणारा बनावे अथवा द्रोह करणारा.[३] (१-३)

द्रोह करणाऱ्यांसाठी आम्ही साखळदंड आणि जोखड व भडकणारा अग्नी तयार ठेवला आहे. (४)

पुण्यशील लोक (स्वर्गामध्ये) पेयाचे असे पेले पितील ज्यात कापूराचे मिश्रण असेल, हा एक प्रवाहित झरा असेल ज्याच्या पाण्यासमवेत अल्लाहचे दास पेयपान करतील आणि जेथे इच्छितील तिकडे प्रवाहित करतील. हे ते लोक असतील जे (जगात) नवस फेडतील[४] आणि त्या दिवसाला घाबरतील ज्याची आपत्ती सर्वत्र पसरलेली असेल. आणि अल्लाहच्या प्रेमात गरीब आणि अनाथ व कैद्यांना जेवू घालतील (आणि त्यांना म्हणतील), ''आम्ही तुम्हाला केवळ अल्लाहसाठी जेवू घालीत आहोत, आम्ही तुमच्याकडून कोणताही मोबदला इच्छित नाही की आभारप्रदर्शन. आम्हाला तर आमच्या पालनकर्त्याकडून त्या दिवसाच्या प्रकोपाची भीती लागलेली आहे जो भयंकर संकटाचा अत्यंत प्रदीर्घ दिवस असेल.'' म्हणून महान अल्लाह त्यांना त्या दिवसाच्या संकटापासून वाचवील आणि त्यांना टवटवीतपणा व उल्हास प्रदान करील आणि त्यांच्या संयमाबद्दल[५]

---

१) याचा हेतू प्रश्न विचारण्याचा नव्हे तर माणसाकरवी या गोष्टीची कबुली घेणे आहे की होय, त्यावर एक अशी वेळ आलेली आहे. याउपर अधिक असे की ज्याअर्थी पूर्वी काही नसताना त्याला अस्तित्वात आणलेले आहे त्याअर्थी पुन्हा त्याचे निर्माण होणे अशक्य का असावे, या गोष्टीवर त्याला विचार करावयास लावणे होय.

२) म्हणजे त्याला सूज्ञ व समंजस बनविले.

३) म्हणजे द्रोह आणि कृतज्ञतेचा अधिकार त्याला बहाल करताना हे स्पष्ट केले की द्रोहाचा मार्ग कोणता आहे व कृतज्ञतेचा मार्ग कोणता.

४) 'नवस' करण्याचा अर्थ ईश्वराला असे वचन देणे आहे की माणूस त्याच्या प्रसन्नतेसाठी फर्ज-अनिवार्य कर्तव्याहून जास्त अमूक पुण्यकर्म करील.

५) संयम हा शब्द या ठिकाणी, श्रद्धा ठेवल्यानंतर ते मरेपर्यंत ईश्वराच्या आज्ञेचे पालन करीत राहिले व त्याच्या अवज्ञेपासून दूर राहिले, या अर्थाने वापरला गेला आहे.

त्यांना स्वर्ग व रेशमी पोशाख प्रदान करील. तेथे ते उच्च आसनावर तक्के लावून बसले असतील. त्यांना ना उन्हाची उष्णता त्रास देणार ना हिवाळ्याचा गारवा. स्वर्गाची छाया त्यांच्यावर झुकून सावली करीत असेल आणि त्याची फळे सदैव त्यांच्या आवाक्यात असतील (ती हवे तशी तोडून घ्यावीत) त्यांच्यापुढे चांदीची भांडी[६] आणि काचेचे पेले फिरविले जात असतील. पेलेही ते जे चांदीचे[७] असतील आणि ते (स्वर्गाच्या व्यवस्थापकांनी) नीट योजून भरले असतील. त्यांना तेथे अशा पेयाची पेये पाजली जातील ज्यात सुंटीचे मिश्रण असेल.[८] हा स्वर्गाचा एक झरा असेल ज्याला 'सलसबील' म्हटले जाते. त्याच्या सेवेसाठी अशी मुले धावत फिरत असतील जी सदैव मुलेच राहतील. तुम्ही त्यांना पाहिले तर असे वाटेल की मोती आहेत जे विखुरले गेले आहेत. तेथे जिकडे कुणीकडे तुम्ही दृष्टी टाकाल तिकडे देणग्याच देणग्या आणि एका मोठ्या राज्याचा सरंजाम तुम्हाला दिसेल. त्यांच्यावर तलम रेशमाचा हिरवा पोशाख व 'अतलस' आणि 'दिबा'ची वस्त्रे असतील, त्यांना चांदीचे कडे घातले जातील,[९] आणि त्यांचा पालनकर्ता त्यांना अत्यंत पवित्र पेय पाजील. हा आहे तुमचा मोबदला आणि तुमची कामगिरी कदर करण्यालायक ठरलेली आहे. (५-२२)

हे पैगंबर (स.), आम्हीच तुमच्यावर हा कुरआन थोडे थोडे करून अवतरला आहे[१०] म्हणून तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेवर धैर्य राखा[११] आणि यांच्यापैकी

६) सूरह जुख्रुफ, आयत क्र. ७१ मध्ये फर्माविले गेले आहे की त्यांच्यापुढे सोन्याची भांडी फिरविली जात असतील. यावरून असे कळले की तेथे कधी सोन्याची भांडी वापरली जातील तर कधी चांदीची.

७) म्हणजे ती असेल तर चांदी परंतु काचेसमान पारदर्शक असेल.

८) अरबवासींना मद्याबरोबर सुंठमिश्रित पाणी मिसळणे आवडत असे, म्हणून ज्यात सुंठमिश्रित असेल असे पेय त्यांना तेथे पाजले जाईल असे फर्माविले गेले आहे.

९) सूरह हज्ज आयत क्र. २३ आणि सूरह फातिर आयत क्र. ३३ यात सांगितले आहे की त्यांना तेथे सुवर्णकंकण घातले जातील. यावरून कळाले की आपल्या इच्छा व आवडीनुसार जेव्हा त्यांची इच्छा असेल ते सुवर्णकंकण घालतील, इच्छा होईल तेव्हा चांदीची कंकणे लेतील आणि जेव्हा इच्छा होईल तेव्हा दोन्ही एकत्रितपणे लेतील.

१०) या ठिकाणी सकृतदर्शनी संबंधित प्रेषित मुहम्मद (स.) आहेत परंतु वस्तुतः उत्तर अश्रद्धावंतांच्या एका आक्षेपाला दिले जात आहे. ते म्हणत असत की हजरत मुहम्मद (स.) हा कुरआन स्वतःच विचार करून करून रचीत आहेत एरवी जर सर्वोच्च अल्लाहकडून एखादे फर्मान आले असते तर एकत्रितपणे एकाचवेळी ते आले असते.

११) म्हणजे तुमच्या पालनकर्त्याने ज्या महान कार्यावर तुम्हाला नेमले आहे; त्यातील बिकटता आणि मुश्किलीवर संयम पाळा, जे काही तुम्हावर बेतेल ते दृढतेने सहन करीत रहा आणि भक्कमपणा ढळू देऊ नका.



एखाद्या दुराचारी अथवा सत्य नाकारणाऱ्याचे म्हणणे ऐकू नका. आपल्या पालनकर्त्याच्या नावाचे सकाळ-संध्याकाळ स्मरण करा. रात्रीसुद्धा त्याच्यापुढे नतमस्तक होत रहा. आणि रात्रीच्या प्रदीर्घ वेळेत त्याचे पावित्र्यागान करीत रहा.[१२] हे लोक तर त्वरित प्राप्त होणाऱ्या वस्तूंशी (जग) प्रेम ठेवतात आणि पुढे जो कठोर दिवस येणार आहे त्याला दुर्लक्षितात. आम्हीच त्यांना निर्माण केले आहे आणि यांची शरीरसंपदा सुदृढ केली आहे. आणि आम्ही जेव्हा इच्छा करू यांचे रूप बदलून टाकू हा एक उपदेश आहे, आता ज्याची इच्छा असेल त्याने आपल्या पालनकर्त्याकडे जाणारा मार्ग स्वीकारावा. आणि तुम्ही इच्छा केल्याने काही होणार नाही जोपर्यंत अल्लाह इच्छित नाही. अल्लाह निश्चितच मोठा ज्ञानी आणि बुद्धिमान आहे. आपल्या कृपाछत्रात ज्याला इच्छितो दाखल करतो आणि अत्याचाऱ्यांसाठी त्याने यातनामय प्रकोप तयार ठेवला आहे. (२३-३१)

१२) जेव्हा अल्लाहच्या स्मरणाची आज्ञा वेळनिश्चितीसह दिली जाते तेव्हा त्याच्याने अभिप्रेत नमाज असते. सदरहू आयतीत सर्वप्रथम फर्माविले, 'वजकुरिस्म रब्बि-क बुकरतं व असीला' 'बुकरा' अरबी भाषेत सकाळला म्हणतात आणि 'असील हा शब्द सूर्य ढळू लागल्यापासून ते सूर्यास्तापर्यंतसाठी बोलला जातो. त्यात जुहर आणि असर (दुसरा, तिसरा प्रहर) च्या वेळा येतात. मग 'व मिनललैली फसजुदलाहू' फर्माविले. रात्रीची वेळ सूर्यास्तानंतर सुरू होते म्हणून रात्री सजदा करण्याच्या आज्ञेत मगरिब (संध्या) व इशा (रात्र) दोन्ही वेळीच्या नमाज समाविष्ट होतात. यानंतर असे फर्माविणे, 'रात्रीच्या प्रदीर्घ वेळेत त्याचे पावित्र्यगान करीत रहा', तहज्जुदच्या नमाजकडे स्पष्ट संकेत आहे.

# ७७ सूरह अल्मुर्सलात

*(मक्काकालीन, वचने ५०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे त्या वाऱ्यांची जे लागोपाठ पाठविले जातात, मग तुफान वेगाने वाहतात आणि (मेघांना) उचलून पसरवितात. मग (त्यांना) फाडून विभक्त करतात. मग (मनात ईश्वराची) आठवण निर्माण करतात, कारण म्हणून अथवा भीती म्हणून,[१] ज्या गोष्टीचे तुम्हाला वचन दिले जात आहे ती जरूर घडणार आहे.[२] (१-७)

मग जेव्हा नक्षत्रे निस्तेज बनतील आणि आकाश फाडून टाकले जाईल आणि पर्वत पिंजून काढली जातील आणि प्रेषितांच्या हजेरीची वेळ येऊन ठेपेल.[३] (त्या दिवशी ती गोष्ट घडेल.) कोणत्या दिवसासाठी हे काम तहकूब ठेवले गेले आहे? निर्णयाच्या दिवसासाठी. आणि तुम्हाला काय कल्पना की तो निर्णयाचा दिवस काय आहे? विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी. (८-१५)

काय आम्ही या आधीच्यांना नष्ट केले नाही. मग त्यांच्याच पाठीमागे नंतर त्यांना चालते करू. अपराध्यांशी आम्ही असेच काही करीत असतो. विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी.[४] (१६-१९)

काय आम्ही एका तुच्छ जलाने तुम्हाला निर्माण केले नाही? आणि एका ठराविक कालावधीपर्यंत त्याला एका सुरक्षित जागी थांबवून ठेवले? तर पहा आम्ही याला समर्थ होतो, अशाप्रकारे आम्ही फार चांगले सामर्थ्य बाळगणारे आहोत. विनाश आहे त्या दिवशी खोटे

१) म्हणजे कधीतर त्यांचे येणे थांबल्याने व दुष्काळाची भीती निर्माण झाल्याने मने द्रवतात आणि लोक अल्लाहकडे क्षमायाचना व पश्चात्ताप व्यक्त करू लागतात. कधी त्यांच्या ढग वाहून आणण्यामुळे लोक अल्लाहकडे कृतज्ञता व्यक्त करू लागतात, तर कधी त्यांचे वादळी उग्ररूप मनात भीती उत्पन्न करते व विनाशाच्या भयाने लोक ईश्वराकडे वळतात.

२) म्हणजे वाऱ्यांची ही व्यवस्था या गोष्टीची साक्ष देते की एके वेळी प्रलय अवश्य उद्भवणार, वारा निर्मितीच्या जीवनाचे एक महत्वाचे साधन जरी असले तरी अल्लाह हवे तेव्हा त्याला विनाशाचे साधन बनवू शकतो व बनवितो.

३) महान कुरआनात अनेक ठिकाणी ही गोष्ट सांगितलेली आहे की एकत्रित उत्थापने (हश्र) च्या मैदानात जेव्हा अखिल मानवजातीचा खटला उभा राहील तेव्हा प्रत्येक राष्ट्राच्या प्रेषिताला साक्ष देण्यासाठी पुढे केले जाईल जेणेकरून त्याने अल्लाहचा संदेश लोकांप्रत पोहचविला होता या गोष्टीची ग्वाही द्यावी.

४) येथे सदरचे वाक्य या अर्थाने सांगितलेले आहे की जगात त्यांचा जसा शेवट झाला आहे अथवा पुढे होणार आहे तोच त्यांची खरी शिक्षा आहे असे नाही तर त्यांचा खरा विनाश त्यांच्यावर तर फैसल्याच्या दिवशी ओढवणार आहे.



ठरविणाऱ्यांसाठी.[५] (२०-२४)

काय आम्ही पृथ्वीला आवरून धरणारी बनविली नाही, जीवितांसाठीही आणि मृतांसाठीदेखील, आणि तिच्यात उंचउंच पर्वते रोविली आणि तुम्हाला गोड पाणी पाजले? विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी.[६] चला[७] आता या गोष्टीकडे जिला तुम्ही खोटे ठरवीत होतात. चला त्या सावलीकडे जिथे तीन भाग आहेत.[८] न गारवा पोहचविणारी न अग्नीज्वालापासून वाचविणारी, तो अग्नी महालासमान मोठमोठाल्या ठिणग्या फेकील, (ज्या उसळताना अशा वाटतील) जणू त्या पिवळे उंट असावेत, विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी. (२५-३४)

हा तो दिवस आहे ज्यात ते न काही बोलणार आणि न त्यांना संधी दिली जाणार की काही निमित्त पुढे करावे.[९] विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी. हा निर्णयाचा दिवस आहे. आम्ही तुम्हाला आणि तुमच्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांना एकत्र केलेले आहे. आता जर माझ्याविरूद्ध तुम्ही एखादे कारस्थान करू शकत असाल तर करू पहा. विनाश आहे त्या दिवशी. खोटे ठरविणाऱ्यांसाठी. ईशपरायण लोक आज सावली आणि झऱ्याच्या सान्निध्यात आहेत. आणि जी फळे ते इच्छितील (त्यांच्यासाठी) हजर आहेत. खा आणि प्या मजेने आपल्या त्या कृत्यांच्या मोबदल्यात जी तुम्ही करीत राहिला आहात. आम्ही सदाचारी लोकांना असाच मोबदला देत असतो. विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी. (३५-४५)

खाऊन[१०] घ्या आणि मौज करून घ्या थोडे दिवस. वस्तुत: तुम्ही लोक अपराधी आहात. विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी. जेव्हा त्यांना सांगितले जाते की, अल्लाहपुढे झुका तर झुकत नाहीत. विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी. आता या (कुरआन) नंतर इतर कोणती वाणी अशी असू शकते जिच्यावर हे श्रद्धा ठेवतील? (४६-५०)

५) म्हणजे मरणोत्तर जीवनाच्या संभावनेचे हे स्पष्ट प्रमाण समोर असतानादेखील जे लोक आज त्याला खोटे ठरवीत आहेत, ते त्यादिवशी विनाशाला सामोरे जातील. **६)** म्हणजे जे लोक ईश्वराच्या सामर्थ्याचे व बुद्धिमत्तेचे असे चमत्कार पाहूनदेखील परलोकाचे संभाव्य व योग्य असण्याचा इन्कार करीत आहेत; ते आपल्या या अपरिपक्व कल्पनेत मग्न राहू इच्छितात तर त्यांनी खुशाल राहावे, ज्या दिवशी हे सर्वकाही त्यांच्या अपेक्षेच्याविरूद्ध घडून येईल त्या दिवशी त्याना कळून चुकेल की त्यांनी हा मूर्खपणा करून स्वत:च आपल्यावर विनाश ओढवून घेतला आहे. **७)** परलोकाचे पुरावे दिल्यानंतर आता हे सांगितले जात आहे की जेव्हा ते घडून येईल तेव्हा तेथे या इन्कार करणाऱ्यांचा शेवट कसा होईल. **८)** सावलीने अभिप्रेत धुराची सावली आहे तर त्रि-शाखेंचा अर्थ असा की जेव्हा एखादा महाप्रचंड, धूर उसळतो तेव्हा वर जाऊन तो अनेक शाखात विभागला जातो. **९)** म्हणजे त्यांच्याविरूद्ध खटला अशा भक्कम साक्ष पुराव्यानिशी सिद्ध केला जाईल की ते अवाक व थक्क बनतील व स्वत:साठी निमित्त पुढे करण्याचा त्यांना वावच उरणार नाही. **१०)** आता वक्तव्य संपविताना केवळ मक्केतील अश्रद्धावंतांनाच नव्हे तर जगातील सर्व अश्रद्धावंतांना उद्देशून ही वचने उच्चारली जात आहेत.

# ७८ सूरह अन्नबा

*(मक्काकालीन, वचने ४०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

हे लोक कोणत्या गोष्टीविषयी विचारपूस करीत आहेत? काय त्या मोठ्या बातमीसंबंधी जिच्याविषयी हे उलटसुलट चर्चा करू लागले आहेत? कदापि[१] नाही, लवकरच यांना कळेल. होय, कदापि नाही, लवकरच यांना कळेल. (१-५)

काय ही वस्तुस्थिती नाही की आम्ही पृथ्वीला बिछाना बनविले, आणि पर्वतांना मेखांसमान रोवले, आणि तुम्हाला (पुरुष आणि स्त्रियांच्या) युगल रुपात निर्माण केले, आणि तुमच्या निद्रेला विश्रांतीसाठी बनविले आणि रात्रीला पांघरूण आणि दिवसाला उपजीविकेची वेळ बनविली आणि तुमच्यावर सात मजबूत आकाश उभारले आणि एक अत्यंत तेजस्वी व उष्ण दीप निर्माण केला.[२] आणि ढगांतून निरंतर पाऊस वर्षविला जेणेकरून त्याद्वारे धान्य व भाजीपाला आणि घनदाट बागा उगविल्या. (६-१६)

नि:संदेह निर्णयाचा दिवस एक निश्चित वेळ आहे. ज्या दिवशी नरसिंगात फुंक मारली जाईल, तुम्ही झुंडी झुंडीने निघून याल. आणि आकाश उघडले जाईल येथपावेतो की ते दारेच दारे बनून जाईल, आणि पर्वत चालविले जातील, येथपावेतो की ते मृगजळ बनतील. (१७-२०)

वस्तुत: नरक एक[३] सापळा आहे, दुराचाऱ्यांचे ठिकाण, ज्यात ते युगानुयुगे पडून राहतील.[४] त्यात गारवा आणि पिण्यालायक कोणत्याही पदार्थाचा आस्वाद ते घेणार

१) म्हणजे परलोकासंबंधी ज्या गोष्टी हे लोक बनवीत आहेत सर्व चुकीच्या आहेत. जे काही ते समजून बसले आहेत ते मुळीच बरोबर नाही.

२) अभिप्रेत आहे सूर्य. मूळ अरबी भाषेत 'वह्हाज' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ अत्यंत उष्ण असाही होतो आणि अत्यंत तेजस्वी असादेखील. म्हणून भाषांतरात आम्ही दोन्हींचा समावेश केला आहे.

३) सापळा अशा जागेला म्हणतात जो सावजाला पकडण्यासाठी बनविला जात असतो जेणेकरून बेसावध स्थितीत येऊन त्याने अकस्मात त्यात अडकावे. जहन्नमसाठी हा शब्द अशासाठी योजला गेला आहे की ईश्वराशी द्रोह करणारे त्याच्याकडून निर्भय बनून असे समजून जगात उड्या मारीत असतात की ईश्वराची सृष्टी त्यांच्यासाठी मोकळे रान आहे, येथे पकडल्या जाण्याचा कसलाही धोका नाही, परंतु जहन्नम त्यांच्यासाठी एक असा गुप्त सापळा आहे ज्यात ते अकस्मात अडकतील व मग अडकल्या स्थितीतच राहतील.

४) मूळ अरबी भाषेत 'अहकाब' असा शब्द प्रयुक्त झाला आहे. याचा अर्थ एकामागून एक येणारे प्रदीर्घ काळ व युगांचा असा अखंड क्रम की एक युग संपताच दुसऱ्या युगास प्रारंभ व्हावा.



नाहीत. काही मिळेल तर केवळ गरम पाणी आणि जखमांचा पू (त्यांच्या कृत्यांचा), भरपूर बदला. ते कोणत्याही हिशोबाची अपेक्षा बाळगीत नव्हते आणि आमच्या संकेतवचनांना त्यांनी पूर्णत: खोटे ठरविले होते. आणि स्थिती अशी होती की आम्ही प्रत्येक गोष्ट गणना करून नोंदवून ठेवली होती. आता चाखा चव, आम्ही तुमच्यासाठी प्रकोपाशिवाय कोणत्याही गोष्टीत कदापि वाढ करणार नाही. (२१-३०)

निश्चितच ईशपरायणांसाठी यशाचे एक स्थान आहे. उद्याने आणि द्राक्षे आणि समवयस्क नवयुवती आणि ओथंबणारे पेले. तेथे कोणतीही व्यर्थ आणि खोटी गोष्ट ते ऐकणार नाहीत. मोबदला आणि पुष्कळ इनाम.[५] तुमच्या पालनकर्त्याकडून त्या अत्यंत मेहेरबान ईश्वराकडून जो पृथ्वी आणि आकाशांचा आणि त्यांच्यामधील प्रत्येक वस्तूचा स्वामी आहे, ज्याच्यासमोर कुणाची बोलण्याची हिंमत नसेल.[६] (३१-३७)

ज्या दिवशी[७] आत्मा आणि दूत रांगेत उभे राहतील, कुणीही बोलणार नाही याखेरीज की ज्यास कृपावंत परवानगी देईल आणि जो योग्य गोष्ट बोलेल. तो दिवस सत्याधिष्ठित आहे. आता ज्याची इच्छा असेल त्यांनी आपल्या पालनकर्त्याकडे परतण्याचा मार्ग स्वीकारावा. (३८-३९)

आम्ही तुम्हा लोकांना त्या प्रकोपाचे भय दाखविले आहे जो जवळ येऊन ठेपला आहे. ज्या दिवशी मनुष्य ते सर्वकाही पाहील जे त्याच्या हातांनी पुढे पाठविले आहे. आणि अश्रद्धावंत ओरडेल की मी माती असतो. (४०)

५) मोबदल्यानंतर विपुल इनाम देण्याच्या उल्लेखाचा अर्थ असा की आपल्या सत्कर्मामुळे ज्या मोबदल्यासाठी ते पात्र ठरतील केवळ तितकाच मोबदला त्यांना दिला जाईल असे नाही तर त्याउपर अधिक आणि मुबलक इनामदेखील त्यांना दिले जाईल.

६) म्हणजे एकत्रितपणे उत्थापनेच्या मैदानात ईश दरबारातील दरारा असा असेल की पृथ्वीवासी असो की आकाशवासी, स्वत: होऊन सर्वोच्च अल्लाहच्या हुजूरात तोंड उघडावे अथवा न्यायदानाच्या कामात हस्तक्षेप करावे, कोणाचीदेखील अशी बिशाद होणार नाही.

७) 'आत्मा'ने अभिप्रेत दूत हजरत जिब्रईल (अ.) आहेत. सर्वोच्च अल्लाहच्या येथे त्यांचे जे उच्च स्थान आहे त्या कारणाने इतर दूतांपासून त्यांचा उल्लेख वेगळा केला गेला आहे.

# ७९ सूरह अन्नाज़िआत

*(मक्काकालीन, वचने ४६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे (त्या दूतांची) जे ओढून खेचून आणीत असतात.[१] आणि हळूच काढून नेतात आणि (त्या दूतांची जे सृष्टीत) चपळाईने झेपावत असतात.[२] मग (हुकुमाची अंमलबजावणी करण्यासाठी) चढाओढ करतात.[३] मग (ईश्वरी आज्ञेनुसार) मामल्यांची व्यवस्था चालवितात.[४] ज्या दिवशी हादरून सोडील भूकंपाचा झटका, आणि त्याच्या पाठोपाठ आणखी एक झटका बसेल, काही हृदये असतील ज्यांचा त्या दिवशी भयाने थरकाप उडत असेल, नजरा त्यांच्या भयभीत झाल्या असतील. (१-९)

ते लोक म्हणतात, ''काय खरोखर आम्ही पूर्वीच्या स्थितीत पुन्हा परत आणले जाऊ? काय जेव्हा आम्ही जीर्ण हाडे बनलेले असू?'' म्हणू लागले, ''हे परतणे मग तर फार तोट्याचे होईल.''[५] वस्तुत: ते केवळ इतके काम आहे की एक जोराची दर्डावणी होईल आणि अकस्मात ते खुल्या मैदानात हजर होतील. (१०-१४)

काय तुम्हाला मूसा (अ.) च्या कथेची वार्ता पोहोचली आहे? जेव्हा त्याच्या पालनकर्त्याने त्याला तुवाच्या पवित्र खोऱ्यात हांक दिली होती, ''फिरऔन जवळ जा, तो दुराचारी झाला आहे, आणि त्याला सांग, काय तू यासाठी तयार आहेस की पवित्रता प्राप्त करावी आणि मी तुझ्या पालनकर्त्याकडे तुझे मार्गदर्शन करावे तर (त्याचे) भय तुझ्यात निर्माण होईल?'' मग मूसाने (अ.) (फिरऔनपाशी जाऊन) त्याला मोठा संकेत

१) अभिप्रेत ते दूत आहेत जे मृत्यूसमयी माणसाचे प्राण, त्याच्या शरीरात खोलपर्यंत शिरून व त्याच्या शिरेशिरेतून खेचून काढतात.

२) म्हणजे ईश्वरी आज्ञेच्या अंमलबजावणीसाठी अशाप्रकारे तीव्रगतीने संचलन करीत असतात जणू ते अंतरिक्षात पोहत असावेत.

३) चढाओढ करण्याने अभिप्रेत असे की ईश्वरी आज्ञेचा संकेत मिळताच त्यांच्यापैकी प्रत्येक तिच्या अंमलबजावणीसाठी धाव घेतो.

४) सृष्टीच्या राज्यातील हे ते कर्मचारी आहेत ज्यांच्या हस्ते जगाची सर्व व्यवस्था सर्वोच्च अल्लाहच्या आज्ञेनुसार पार पडत आहे.

५) म्हणजे जेव्हा त्यांना उत्तर दिले गेले की होय असेच घडेल तेव्हा ते उपहास म्हणून आपापसात एक दुसऱ्याला म्हणू लागले, गड्यांनो, जर खरोखरच आम्हाला परत दुसऱ्यांदा जीवनावस्थेत परतून यावे लागले, तेव्हा तर आम्ही ठार मेलो.



दाखविला[६] परंतु त्याने खोटे ठरविले आणि मानले नाही, मग कुटील कारस्थान खेळण्यासाठी परतला आणि लोकांना गोळा करून त्याने सांगितले, ''मी तुमचा सर्वश्रेष्ठ पालनकर्ता आहे.'' सरतेशेवटी अल्लाहने त्याला मरणोत्तर जीवन आणि जगाच्या प्रकोपात पकडले. वस्तुत: यात मोठा धडा आहे त्या प्रत्येक इसमासाठी जो भीत असेल.[७]

(१५-२६)

काय तुम्हा लोकांची निर्मिती अधिक कठीण काम आहे की आकाशाची? अल्लाहने ते बनविले. त्याचे छत खूप उंच उठविले मग त्यांच्यात संतुलन प्रस्थापित केले. आणि त्याची रात्र झाकली आणि त्याचा दिवस उजाडला. त्यानंतर पृथ्वीला त्याने अंथरले. तिच्यातून तिचे पाणी व तिचा चारा काढला आणि पर्वत तिच्यात रोवले जीवनसामग्री म्हणून तुमच्यासाठी व तुमच्या जनावरांसाठी. (२७-३३)

मग जेव्हा तो मोठा हलकल्लोळ माजेल[८] ज्या दिवशी मनुष्य आपले सर्व कर्म आठवील आणि प्रत्येक पहाणाऱ्यासमोर नरक उघडून ठेवले जाईल. तर ज्याने दुराचार केला होता आणि जगातील जीवनाला प्राधान्य दिले होते, नरकच त्याचे ठिकाण असेल. आणि ज्याने आपल्या पालनकर्त्यासमोर उभे राहण्याचे भय बाळगले होते आणि मनाला वाईट इच्छेपासून दूर ठेवले होते, स्वर्ग त्याचे ठिकाण असेल. (३४-४१)

हे लोक तुम्हाला विचारतात की, ''अखेर ती घटका केव्हा येऊन ठेपेल?'' तुमचे काय काम, की तिची वेळ सांगावी. तिचे ज्ञान तर अल्लाहवर समाप्त आहे. तुम्ही केवळ खबरदार करणारे आहात त्या प्रत्येक इसमाला जो तिचे भय बाळगीत असेल. ज्या दिवशी हे लोक तिला पाहतील तर त्यांना असे वाटेल की (जगात आणि मृतावस्थेत) हे केवळ एका दिवसाच्या शेवटच्या अथवा पहिल्या प्रहरापर्यंत थांबले आहेत. (४२-४६)

६) मोठ्या निशाणीने अभिप्रेत काठीचे अजगर बनणे होय. याचा उल्लेख दिव्य कुरआनात अनेक ठिकाणी आलेला आहे.

७) म्हणजे ईश्वराच्या प्रेषिताला खोटे ठरविण्याचा जो परिणाम फिरऔनला पहावा लागला; त्या परिणामाची भीती धरावी.

८) अभिप्रेत प्रलय आहे.

# ८० सूरह अबस

*(मक्काकालीन, वचने ४२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

क्रोधिष्ट झाला आणि उपेक्षा केली, या गोष्टीवर की तो अंध त्याच्याजवळ आला.[१] तुम्हाला काय कल्पना कदाचित तो सुधरेल अथवा उपदेशावर लक्ष देईल आणि उपदेश करणे त्याच्यासाठी लाभदायी ठरेल? जो इसम दुर्लक्ष करतो त्याच्याकडे तर तुम्ही लक्ष देता, वस्तुत: जर तो सुधारला नाही तर तुम्हावर त्याची काय जबाबदारी? आणि जो स्वत: तुमच्यापाशी धावत येतो आणि भीत असतो त्याची तुम्ही उपेक्षा करता! कदापि[२] नाही, हा तर एक उपदेश आहे. ज्याची इच्छा असेल त्याने हा स्वीकारावा. हे अशा पत्रिकात नमूद आहेत ज्या प्रतिष्ठित आहे, उच्चकोटीच्या आहेत, पवित्र[३] आहेत, सन्माननीय आणि प्रामाणिकपणे लिहिणाऱ्यांच्या हातात असतील.[४] (१-१६)

१) नंतरच्या वाक्यावरून कळते की ही उपेक्षा आणि नाराजी व्यक्त करणारे खुद्द पैगंबर हजरत मुहम्मद (स.) होते. ज्या अंध व्यक्तीचा याठिकाणी उल्लेख केलेला आहे ते हजरत इब्ने उम्मे मकतूम होत. ते हजत खदीजा (रजि.) यांचे आत्येभाऊ होते. पैगंबर (स.) त्यावेळी मक्केतील अश्रद्धावंतांच्या मोठमोठ्या सरदारांना इस्लाम धर्माचे आवाहन देण्यात मश्गूल होते की इतक्यात हे अंध गृहस्थ हजर झाले व त्यांनी काही प्रश्न विचारू इच्छिले. पैगंबर (स.) यांना या प्रसंगी त्यांच्याकडून मध्येच होणाऱ्या या अडथळ्याचे वाईट वाटले.

२) म्हणजे असे कदापि करू नका. ईश्वराला विसरलेल्या व आपल्या ऐहिक प्रतिष्ठेचा दर्प असलेल्या लोकांना अनाठायी महत्व देऊ नका. जे तोंड फिरवीत असतील अशांच्या समोरदेखील विनंतीपूर्वक प्रस्तूत करू नका, इस्लामची शिकवण अशी नाही. आणि तुमची शान अशी नाही की या गर्विष्ठ लोकांना इस्लामकडे वळविण्यासाठी एखाद्या अशा पद्धतीने प्रयत्न करावे जेणेकरून तुमची एखादी गरज यात अडकली आहे व हे मान्य करतील तेव्हाच तुमचे आवाहन विकास पावेल एरवी ते अपयशी ठरेल, असा या लोकांचा गैरसमज व्हावा. सत्य यांच्याकडून तितकेच निरपेक्ष आहे जितके हे सत्याकडून निरपेक्ष आहेत.

३) म्हणजे सर्वप्रकारच्या भेसळीपासून मुक्त आहेत. याच्यात शुद्ध सत्याची शिकवण सांगितलेली आहे, कोणत्याही प्रकारचे असत्य आणि कुविचार व चुकीच्या दृष्टिकोनांना यात मुळीच वाव मिळू शकलेला नाही.

४) याने अभिप्रेत ते फरिश्ते आहेत जे कुरआनच्या या पत्रिकांना सर्वोच्च अल्लाहच्या प्रत्यक्ष आदेशानुसार लिहीत होते, त्यांचे रक्षण करीत होते व पैगंबर हजरत मुहम्मद (स.) पर्यंत जसेच्या तसे पोहचवीत होते.



धिक्कार[५] असो माणसाचा, सत्याचा किती कट्टर इन्कार करणारा आहे हा, कोणत्या वस्तूने अल्लाहने त्यास निर्माण केले आहे? वीर्याच्या एका थेंबाने अल्लाहने त्याला निर्माण केले, मग त्याचे भाग्य ठरविले मग त्याच्यासाठी जीवनाचा मार्ग सोपा केला, मग त्याला मृत्यू दिला आणि कबरीत पोहचविले. मग हवे तेव्हा त्याने त्याला पुन्हा उठवून उभे करावे. कदापि नाही, याने ते कर्तव्य बजावले नाही ज्याची आज्ञा अल्लाहने त्याला दिली होती. मग जरा माणसाने आपल्या आहाराकडे पहावे. आम्ही खूप पाणी ओतले[६], मग जमिनीला अजब तऱ्हेने फाडले, मग तिच्यात उगविली धान्य आणि द्राक्षे व भाज्या आणि जैतुन व खजुरी आणि घनदाट बागा आणि विभिन्न प्रकारची फळे व चारा तुमच्यासाठी आणि तुमच्या जनावरांसाठी जीवनसामग्री म्हणून. (१७-३२)

सरतेशेवटी जेव्हा तो कान बधीर करणारा आवाज दुमदुमेल[७] त्या दिवशी माणूस आपला भाऊ आणि आपली आई आणि आपले वडील आणि आपली पत्नी व आपल्या संततीपासून दूर पळेल त्यांच्यापैकी प्रत्येक माणसावर त्या दिवशी अशी वेळ येऊन ठेपेल की त्याला आपल्याखेरीज कुणाचेही भान राहणार नाही. काही चेहरे त्या दिवशी चमकत असतील, प्रफुल्लीत, प्रसन्न आणि आनंदित व हर्षभरीत असतील, आणि काही चेहऱ्यांवर त्या दिवशी धूळ उडत असेल आणि काळिमा पसरलेला असेल. हेच अश्रद्धावंत व दुराचारी लोक असतील. (३३-४२)

५) येथून क्रोधाचा रोख सरळ त्या अश्रद्धावंतांकडे वळत आहे जे सत्याची उपेक्षा करीत होते. याअगोदर सूरहच्या आरंभापासून ते आयत क्र. १६ पर्यंत संबोधन पैगंबर (स.) यांना केले जात होते आणि अप्रत्यक्ष क्रोध अश्रद्धावंतांवर व्यक्त केला जात होता. या अभिव्यक्तीची पद्धत अशी होती की हे पैगंबर (स.), एका सत्य शोधणाऱ्याला सोडून तुम्ही या अशा कोणत्या लोकांकडे लक्ष घालवू लागला आहात. सत्याच्या आवाहनाच्या दृष्टिने हे तर अगदी कुचकामाचे आहेत. तुमच्यासारख्या महाप्रतापी पैगंबराने कुरआनसारख्या उच्च कोटीची गोष्ट यांच्यासमोर प्रस्तुत करावी असा यांचा दर्जा नाही.

६) याच्याने अभिप्रेत पाऊस आहे.

७) अभिप्रेत आहे नरसिंगातील शेवटच्या फुंकीचा प्रलयंकारी आवाज. हा आवाज निघाल्याबरोबर मेलेली सर्व माणसे जिवंत होतील.

# ८१ सूरह अत्तकवीर

*(मक्काकालीन, वचने २९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जेव्हा सूर्य गुंडाळून टाकला जाईल[१] आणि जेव्हा तारे निखळून पडलीत, आणि जेव्हा पर्वत चालविले जातील आणि जेव्हा दहा महिन्यांच्या गर्भिणी उंटिणी आपल्या दशेत सोडून दिल्या जातील.[२] आणि जेव्हा वन्य पशू समेटून एकत्र केले जातील आणि जेव्हा समुद्र भडकविले जातील आणि जेव्हा प्राण (शरीरांशी) जोडले जातील.[३] आणि जेव्हा जिवंत गाडलेल्या मुलीला विचारले जाईल की ती कोणत्या अपराधापायी ठार केली गेली? आणि जेव्हा कर्मनोंदी उघडल्या जातील आणि जेव्हा आकाशाचा पडदा दूर केला जाईल आणि जेव्हा नरक भडकविले जाईल आणि जेव्हा स्वर्ग जवळ आणला जाईल त्यावेळी प्रत्येक माणसाला कळेल की तो काय घेऊन आला आहे.[४] नव्हे, मी शपथ घेतो परतणाऱ्या व लपणाऱ्या ताऱ्याची आणि रात्रीची जेव्हा ती निरोप घेते आणि सकाळची जेव्हा ती श्वास घेते, हे प्रत्यक्षात एका प्रतिष्ठित संदेशवाहकाचे[५] कथन आहे जो मोठी शक्ती बाळगतो, राजसिंहासनवाल्यापाशी उच्चपदस्थ आहे. तेथे त्याची आज्ञा मानली जाते.[६] तो विश्वसनीय आहे. आणि (हे मक्कावासियांनो) तुमचा मित्र वेडा[७] नाही. त्याने त्या संदेशवाहकाला उजळ क्षितिजावर पाहिले आहे आणि तो परोक्ष (च्या या ज्ञानाला लोकांपर्यंत पोहचविण्याच्या) बाबतीत कंजुष नाही. आणि हे कोणा धिक्कारलेल्या शैतानाचे कथन नाही. मग तुम्ही लोक कुणीकडे भरकटत आहात? हा तर सकल जगवासियांसाठी एक उपदेश आहे. तुमच्यापैकी त्या प्रत्येक माणसासाठी जो सरळ मार्गावर चालू इच्छित असेल. आणि तुमच्या इच्छिण्याने काहीही होत नाही जोपर्यंत सर्व जगांचा पालनकर्ता अल्लाह इच्छित नाही. (१-२९)

---

**१)** म्हणजे सूर्यातून निघून जो प्रकाश जगात पसरतो, तो त्यालाच गुंडाळून टाकला जाईल व त्याचे फैलावणे थांबेल. **२)** अरबवासीयांसाठी त्या उंटिणीपेक्षा जास्त मोलाची वस्तू इतर कोणतीच नव्हती जिचे व्यायने जवळ आले असावे. अशा स्थितीत तिच्या रक्षणाची व देखरेखीची फारच काळजी घेतली जात असे. अशा उंटिणीकडून गाफिल होणे, याचा अर्थ जणू असा की त्यावेळी काही अशी भयंकर आपत्ती लोकांवर कोसळेल की त्यांना आपल्या अत्यंत प्रिय संपत्तीच्या रक्षणाचेही भान राहणार नाही. **३)** म्हणजे माणसे पुनरपि त्याचप्रकारे निर्माण केली जातील ज्याप्रकारे ते जगात मृत्यू पावण्यापूर्वी शरीर व आत्म्यानिशी जिवंत होते. **४)** म्हणजे तुम्हा लोकांची ही कल्पना बरोबर नाही की कुरआनात हे जे काही सांगितले जात आहे ते एखाद्या वेड लागलेल्याची बडबड आहे, अथवा एखादा शैतानी वसवसा आहे. **५)** या ठिकाणी 'प्रतिष्ठित संदेशवाहक'ने अभिप्रेत दिव्यबोध घेऊन येणारा दूत आहे जसे की पुढील आयतीद्वारे स्पष्टपणे कळत आहे. कुरआनला संदेशवाहकाचे कथन म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की हे त्या दूताचे स्वत:चे कथन आहे, तर 'संदेशवाहकाचे कथन' हे शब्द आपण होऊनच दर्शवीत आहेत की ही त्या अस्तित्वाची वाणी आहे ज्याने त्याला संदेशवाहक बनवून पाठविले आहे. **६)** म्हणजे तो दूतांचा प्रमुख आहे. सर्व दूत त्याच्या आज्ञेनुसार काम करतात. **७)** मित्रने अभिप्रेत अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) आहेत.



# ८२ सूरह अल्इन्फितार

*(मक्काकालीन, वचने १९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जेव्हा आकाश फाटेल आणि जेव्हा तारे विस्कळून पडतील आणि समुद्र फाडून टाकले जातील आणि कबरी उघडल्या जातील[१] त्यावेळी प्रत्येक माणसाला त्याने पुढचे मागचे केले सवरलेले सर्व कळेल. (१-५)

हे मानवा, कोणत्या गोष्टीने तुला आपल्या उदार पालनकर्त्याच्या बाबतीत संभ्रमात टाकले ज्याने तुला निर्माण केले, तुला नखशिखांत व्यवस्थित केले, तुला प्रमाणबद्ध बनविले, आणि ज्या रूपात इच्छिले तुला जोडून तयार केले? कदापि नाही,[२] तर (खरी गोष्ट अशी आहे की) तुम्ही लोक मोबदला व शिक्षेला खोटे ठरविता[३] वस्तुत: तुमच्यावर निरीक्षक नेमले आहे, असे सन्माननीय लिहिणारे जे तुमच्या प्रत्येक कृत्याला जाणतात. (६-१२)

खचितच सदाचारी लोक मजेत असतील आणि दुराचारी लोक नरकात जातील. बदल्याच्या दिवशी ते तिच्यात दाखल होतील आणि तिच्यातून मुळीच बाहेर पडू शकणार नाहीत. आणि तुम्ही काय जाणता की तो बदल्याचा दिवस काय आहे? होय, तुम्हाला काय कल्पना की बदल्याचा तो दिवस काय आहे? हा तो दिवस आहे जेव्हा कोणत्याही माणसासाठी काही करणे कुणाच्याही आवाक्यात नसेल. निर्णय त्या दिवशी अल्लाहच्याच अखत्यारीत असेल. (१३-१९)

---

**१)** कबरी उघडल्या जाण्याने अभिप्रेत लोकांचे पुनरपि नव्याने जिवंत करून उठविले जाणे होय.

**२)** म्हणजे या संभ्रमात अडकण्याचे कोणतेही योग्य कारण नाही.

**३)** म्हणजे खरे पाहता ज्या गोष्टीने तुम्ही संभ्रमात अडकले आहात ती एखादा योग्य युक्तीवाद आहे असे नाही तर तुमची केवळ ही खुळेपणाची कल्पना आहे की जगातील या कर्मलोकानंतर कोणतेही कर्मफळलोक नाही, याच चुकीच्या आणि निराधार कल्पनेने तुम्हाला ईश्वराकडून गाफिल, त्याच्या न्यायाकडून निर्भय आणि आपल्या नैतिक आचरणात बेजबाबदार बनविलेले आहे.

# ८३ सूरह अल्‌मुतफ्फ़फ़ीन

*(मक्काकालीन, वचने ३६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

विनाश आहे काटा मारणाऱ्यांसाठी, ज्याची स्थिती अशी आहे की जेव्हा लोकांकडून घेतात तेव्हा पुरेपूर घेतात आणि जेव्हा त्याला मापून किंवा तोलून देतात तेव्हा त्यांना कमी देतात. काय या लोकांना समजत नाही की एका मोठ्या दिवशी[१] हे उठवून आणले जाणार आहेत? त्या दिवशी जेव्हा सर्व लोक जगांच्या पालनकर्त्यासमोर उभे असतील. (१-६)

कदापि नाही[२], निश्चितच दुराचाऱ्यांच्या कर्मांची नोंद तुरुंगाच्या दप्तरात आहे आणि तुम्हाला काय माहीत की काय आहे ते तुरुंगाचे दप्तर? ते एक पुस्तक आहे लिहिलेले. विनाश आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी जे बदल्याच्या दिवसाला खोटे ठरवितात आणि त्याला तो खोटा ठरवितो जो मर्यादेचे उल्लंघन करणारा दुराचारी आहे. त्याला जेव्हा आमची वचने ऐकविली[३] जातात तेव्हा म्हणतो, या तर पूर्वकालीन कथा आहेत. कदापि नाही, किंबहुना वस्तुत: या लोकांच्या हृदयांवर यांच्या वाईट कृत्यांचा गंज चढलेला आहे.[४] कदापि नाही, खचितच त्या दिवशी हे आपल्या पालनकर्त्याच्या दर्शनाला पारखे ठरलेले असतील. मग हे नरकामध्ये जाऊन पडतील, मग त्यांना सांगितले जाईल ही तीच गोष्ट आहे जिला तुम्ही खोटे ठरवीत होता. (७-१७)

१) प्रलयाच्या दिवसाला मोठा दिवस या कारणास्तव सांगितलेला आहे की त्यात सर्व माणसांचा तसेच सर्व जिन्नांचा हिशेब ईश्वराच्या न्यायालयात एकाच वेळी घेतला जाईल आणि शिक्षा व मोबदल्याचे महत्वपूर्ण निकाल दिले जातील.

२) म्हणजे या लोकांची ही कल्पना चुकीची आहे की जगात असे गुन्हे केल्यानंतर हे तसेच सुटून जातील.

३) म्हणजे त्या आयती ज्यांच्यात मोबदल्याच्या दिवसाची वार्ता दिलेली आहे.

४) म्हणजे शिक्षा व मोबदला यांना कथा म्हणून ठरविण्याचे एखादे योग्य कारण आहे असे नाही तर ज्याकारणाने हे लोक त्यास कथा म्हणून सांगतात ते असे की जे अपराध हे करीत राहिले आहेत, त्यांचा गंज यांच्या हृदयांवर पूर्णपणे बसलेला आहे. म्हणून जी गोष्ट संपूर्णत: योग्य आहे; ती यांना कथा म्हणून दिसते.



कदापि नाही[५] नि:संदेह सदाचारी माणसाची कर्मनोंद उच्च दर्जाच्या लोकांच्या दप्तरात आहे आणि तुम्हाला काय माहीत की काय आहे ते उच्च दर्जाच्या लोकाचे दप्तर? एक लिहिलेले पुस्तक, ज्याची देखरेख जवळीक असलेले दूत करतात. नि:संदेह सदाचारी लोक मोठ्या मजेत असतील. उच्च आसनांवर बसून पहात असतील. त्यांच्या चेहऱ्यावर तुम्हाला आनंदाचे तेज जाणवेल. त्यांना शुद्ध व उत्तम मोहोरबंद पेय पाजले जाईल ज्यावर कस्तुरीची मोहर लागली असेल. जे लोक दुसऱ्यावर मात करू इच्छितात त्यांनी ही वस्तू प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा. त्या पेयात तसनीम[६] चे मिश्रण असेल. हा एक झरा आहे ज्याच्या पाण्याबरोबर जवळचे लोक पेय प्राशन करतील. (१८-२८)

अपराधी लोक जगात श्रद्धावंतांची टिंगल उडवीत असत. जेव्हा त्यांच्या जवळून जात असत तेव्हा तिरक्या नजरेने त्यांच्याकडे इशारे करीत असत. आपल्या घरांकडे परततात तेव्हा मजा करीत परतत असत. आणि जेव्हा त्यांना पहात असत तेव्हा म्हणत असत की हे बहकलेले लोक आहेत. वस्तुत: ते त्यांच्यावर निरीक्षक म्हणून पाठविले गेले नव्हते. आज श्रद्धा ठेवणारे अश्रद्धावंतांवर हसत आहेत आसनांवर बसून त्यांची दशा पहात आहेत. मिळाला ना अश्रद्धावंतांना त्या कृत्यांचा बदला जी ते करीत होते?[७] (२९-३६)

५) म्हणजे या लोकांचा हा चुकीचा समज आहे की कोणताही मोबदला अथवा शिक्षा घडणार नाही.

६) 'तसनीम'चा अरबी भाषेत उंची असा अर्थ होतो तर एखाद्या झऱ्याला 'तसनीम' सांगण्याचा अर्थ असा की तो झरा उंचावरून वाहत खाली येत असावा.

७) सदरच्या वाक्यात एक मार्मिक टोमणा आहे. ते अश्रद्धावंत, पुण्यकार्य समजून मुसलमानांना छळत होते म्हणून फर्माविले गेले की परलोकात श्रद्धावंत स्वर्गात मजेत बसल्या बसल्या नरकात जळणाऱ्या या अश्रद्धावंतांची दुर्दशा पाहतील व आपल्या मनांत म्हणतील की चांगला मोबदला यांना यांच्या कृत्यांचा मिळाला.

# ८४ सूरह अल्इन्शिक़ाक़

*(मक्काकालीन, वचने २५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जेव्हा आकाश फाटून जाईल आणि आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेची अंमलबजावणी करील व त्याच्यासाठी सत्य हेच आहे (की आपल्या पालनकर्त्याची आज्ञा पाळावी) आणि जेव्हा पृथ्वी पसरविली[१] जाईल आणि जे काही तिच्यात आहे त्याला बाहेर फेकून रिकामी होईल.[२] आणि आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेची अंमलबजावणी करील व तिच्यासाठी सत्य हेच आहे की (त्याची अंमलबजावणी करावी) हे मानवा, तू खेचला जाऊन आपल्या पालनकर्त्याकडे वाटचाल करीत आहेस आणि त्याला भेटणार आहेस. मग ज्याची कर्मनोंद त्याच्या उजव्या हातात दिली जाईल. त्याच्याकडून सौम्य हिशोब घेतला जाईल.[३] आणि तो आपल्या माणसांकडे आनंदाने परतेल.[४] आता उरला तो इसम ज्याची कर्मनोंद त्याच्या पाठीमागून दिली जाईल.[५] तर तो आपल्या मृत्यूला हांक देईल आणि भडकणाऱ्या आगीत जाऊन

१) पृथ्वीला पसरविण्याचा अर्थ असा की समुद्र आणि नद्या बुजवून टाकल्या जातील, पर्वत चुराचुरा करून उधळून टाकले जातील आणि जमिनीचे सर्व खाचखळगे व उंचवटे समतल करून सपाट मैदान बनविले जाईल.

२) म्हणजे जितकी मृत माणसे तिच्यात पडली असतील त्या सर्वांना काढून ती बाहेर टाकेल. त्याचप्रमाणे त्यांच्या कृत्यांचे जे साक्षी पुरावे तिच्यात असतील ते सर्वही पूर्णपणे बाहेर येतील. त्यातील कोणतीही गोष्ट तिच्यात लपलेली व दडलेली राहणार नाही.

३) म्हणजे त्याचा हिशेब कडकपणे विचारला जाणार नाही. त्याला असे विचारले जाणार नाही की अमूक अमूक काम तू का केले होतेस व त्या कामासाठी तुझ्याजवळ कारणे कोणती आहेत. त्याच्या भल्या कामाबरोबर त्याची दुष्कर्मेदेखील त्याच्या कृतीनोंदीत नमूद जरूर असतील परंतु सत्कर्मांचे पारडे दुष्कर्मांपेक्षा जड असल्याचे पाहून त्याच्या अपराधांकडे दुर्लक्ष केले जाईल व त्याला क्षमा केली जाईल.

४) 'आपली माणसं'ने अभिप्रेत माणसाचे ते कुटुंबीय, नातेवाईक, आणि साक्षीदार आहेत ज्यांना त्याच्याचप्रमाणे क्षमा केली गेली असेल.

५) सूरह अलहाक्कात फर्माविले गेले आहे की ज्याची कृतीनोंद त्याच्या डाव्या हातात दिली जाईल, तर येथे फर्माविले आहे, त्याच्या पाठीच्या मागून दिली जाईल. बहुधा याचे स्वरूप असे असेल की सर्व लोकांसमक्ष डाव्या हातात कृतीनोंद घेताना त्याला लज्जा वाटेल, म्हणून तो आपला हात मागे सारील, परंतु कृतीनोंद तर कसेही करून त्याच्या हातात दिली जाणारच मग तो हात पुढे करून येवो की पाठीच्या मागे लपवून घेवो.



पडेल. तो आपल्या कुटुंबियांत मग्न होता. त्याची समजूत होती की त्याला कधी परतावयाचे नाही. परतणे कसे नव्हते, त्याचा पालनकर्ता ते दुष्कृत्य पहात होता. (१-१५)

तर नव्हे मी शपथ घेतो संध्या-लालीमाची, आणि रात्रीची व जे काही ती समेटून घेते आणि चंद्राची जेव्हा तो पूर्णचंद्र बनतो, तुम्हाला जरूर क्रमाक्रमाने एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेकडे वाटचाल करीत रहावयाचे आहे.[६] मग लोकांना काय झाले आहे की हे श्रद्धा ठेवीत नाहीत. आणि जेव्हा कुरआनचे त्यांच्या समोर पठण केले जाते तेव्हा नतमस्तक होत नाहीत? किंबहुना हे इन्कार करणारे तर उलट खोटे ठरवितात. वस्तुत: जे काही हे (आपल्या कर्मनोंदीत) जमा करीत आहेत, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.[७] म्हणून यांना यातनादायक प्रकोपाची खुशखबरी द्या. तथापि ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आहे आणि ज्यांनी सत्कृत्ये केली आहेत त्यांच्यासाठी कधी न संपणारा मोबदला आहे. (१६-२५)

६) म्हणजे तुम्हाला एकाच स्थितीत राहावयाचे नाही तर तारुण्य ते वार्धक्य, वार्धक्य ते मृत्यू, मृत्यू ते बर्जख - पितृलोक, बर्जख - पितृलोक ते पुनर्जीवन, पुनर्जीवन ते उत्थानेचे मैदान, मग हिशेबतपासणी आणि मग मोबदला व शिक्षा अशा असंख्य टप्प्यातून हमखासपणे तुम्हाला जावे लागेल. या गोष्टीवर तीन वस्तूंची शपथ घेतली गेली आहे. (१) सूर्यास्तानंतरची तांबड सांज, (२) दिवसानंतर रात्रीचा अंधार व त्यात दिवसा भूतलावर जे फैलावलेले असतात अशा बव्हंशी माणसांचे व पशूंचे एकवटणे, आणि चंद्राचे प्रतिपदेपासून क्रमाक्रमाने वाढत जाऊन पूर्ण मास होणे. ह्या जणू त्या काही वस्तू आहेत ज्या उघडपणे या गोष्टीची साक्ष देत आहेत की ज्या सृष्टीत मानव राहतो त्यात कोठेही स्थैर्य नाही, एक निरंतर बदल आणि क्रमाक्रमाने स्थित्यंतर सर्वत्र आढळते. म्हणून अश्रद्धावंतांची ही कल्पना बरोबर नाही की मृत्यूच्या अंतिम गटंगळीबरोबर एकंदरीत प्रकरण आटोपेल.

७) दुसरा अर्थ असाही होऊ शकतो की आपल्या उरात द्रोह, द्वेष, वैर, वाईट साहस आणि विकृत इच्छेची जी घाण त्यांनी भरून ठेवलेली आहे; ती अल्लाहला चांगल्याप्रकारे माहीत आहे.

# ८५ सूरह अल्बुरूज

*(मक्काकालीन, वचने २२)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे मजबूत किल्लेधारी आकाशाची[१] आणि त्या दिवसाची ज्याचे वचन दिले गेले आहे (अर्थात पुनरुत्थान) आणि पाहणाऱ्याची व पाहिली जाणाऱ्या गोष्टीची[२] की मारले गेले खाईवाले (त्या खाईत) जिच्यात खूप भडकणाऱ्या इंधनाचा अग्नी होता जेव्हा की ते त्या खाईच्या काठावर बसलेले होते आणि जे काही ते श्रद्धावंतांशी करीत होते ते पहात होते.[३] आणि त्या श्रद्धावंतांशी त्यांचे शत्रुत्व याशिवाय अन्य कोणत्याही कारणास्तव नव्हते की त्यांनी त्या अल्लाहवर श्रद्धा ठेवली होती जो जबरदस्त आणि आपल्या ठायी स्वयंस्तुत्य आहे, जो आकाशांच्या व पृथ्वीच्या राज्याचा स्वामी आहे, आणि तो अल्लाह सर्वकाही पहात आहे. ज्या लोकांनी श्रद्धावंत पुरुषांवर आणि स्त्रियांवर अत्याचार केले आणि मग त्यावर पश्चात्ताप केला नाही खचितच त्यांच्यासाठी नरकाचा प्रकोप आहे आणि त्यांच्यासाठी जाळले जाण्याची शिक्षा आहे. ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली खचितच त्यांच्यासाठी स्वर्गाची उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील, हे आहे मोठे यश. (१-११)

वस्तुतः तुमच्या पालनकर्त्याची पकड फार कठोर आहे, तोच पहिल्यांदा निर्माण करतो व तोच दुसऱ्यांदा निर्माण करील. आणि तो क्षमा करणारा आहे. प्रेम करणारा आहे. राजसिंहासनाचा स्वामी आहे. गौरवशाली आहे आणि जे काही इच्छिल, करून टाकणारा आहे. काय तुम्हाला लष्कराची खबर पोहोचली आहे? फिरऔन आणि समूदच्या (लष्करांची)? परंतु ज्यांनी द्रोह केला आहे ते खोटे ठरविण्यास लागले आहेत. वस्तुतः अल्लाहने त्यांना वेढ्यात घेतलेले आहे. (त्यांच्या खोटे ठरविण्याने या कुरआनचे काही बिघडत नाही.) तर हा कुरआन उच्चकोटीचा आहे. त्या लौहमध्ये (पाटीत कोरलेले आहे) जी सुरक्षित[४] आहे. (१२-२२)

---

१) अभिप्रेत आकाशातील वैभवशाली ग्रह व तारे आहेत.

२) पाहणाऱ्याने अभिप्रेत तो प्रत्येक मनुष्य आहे जो प्रलयाच्या दिवशी हजर असेल आणि पाहिल्या जाणाऱ्या गोष्टीने अभिप्रेत खुद्द प्रलय आहे जिचे चित्तथरारक प्रसंग सर्व पाहणारे पाहतील.

३) खाईवाल्यांनी अभिप्रेत ते लोक आहेत ज्यांनी मोठमोठ्या खाईत अग्नी भडकवून श्रद्धा ठेवणाऱ्या लोकांना त्यांच्यात लोटले व त्यांच्या जळण्याचे दृश्य पाहिले होते. मारले गेले यांचा अर्थ त्यांचा अल्लाहने धिक्कार केला व ते प्रकोपास पात्र ठरले.

४) अर्थ असा की या कुरआनातील लिखाण अटळ आहे. ईश्वराच्या त्या सुरक्षित पाटीत नमूद आहे ज्यात कोणताही फेरफार होऊ शकत नाही.



# ८६ सूरह अत्तारीक़

*(मक्काकालीन, वचने १७)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे आकाशाची आणि रात्री प्रकट होणाऱ्याची. तुम्हाला काय माहीत की तो रात्री प्रकट होणारा काय आहे? चमकत असलेला तारा, कोणताही जीव असा नाही ज्याच्यावर कोणी निगाह राखणारा नाही,[१] मग जरा मानवाने हेच पाहून घ्यावे की तो कोणत्या वस्तूने निर्माण केला गेला आहे. एका उसळणाऱ्या पाण्यापासून निर्माण केला गेला आहे जे पाठीच्या आणि छातीच्या हाडांच्या दरम्यानातून निघते.[२] खचितच तो (निर्माणकर्ता) त्याला पुन्हा निर्माण करण्यास समर्थ आहे. ज्या दिवशी गुप्त रहस्यांची तपासणी होईल[३] त्यावेळी मानवाजवळ न त्याच्या स्वतःचे बळ असेल आणि न कोणी त्याला सहाय्य करणारा असेल. शपथ आहे पाऊस वर्षविणाऱ्या आकाशाची आणि (वनस्पती उगविताना) भग्न होणाऱ्या जमिनीची, ही एक तोलामोलाची प्रमाणित गोष्ट आहे थट्टामस्करी नव्हे.[४] हे लोक (अर्थात मक्क्यातील अश्रद्धावंत) काही चाली खेळत आहेत आणि मीसुद्धा एक चाल खेळत आहे. म्हणून सोडून द्या हे पैगंबर (स.), या अश्रद्धावंतांना, किंचित, जराशा यांच्या स्थितीत सोडा. (१-१७)

---

१) 'निगा राखणारा'ने अभिप्रेत सर्वोच्च अल्लाहचे स्वतःचे अस्तित्व आहे. तेच अस्तित्व पृथ्वी व आकाशातील लहान मोठी प्रत्येक सृष्टिची देखरेख आणि रक्षण करीत आहे. अर्थ असा की रात्री आकाशात हे जे असंख्य व अगणित तारे व ग्रह चमकताना दिसतात त्यांच्यापैकी प्रत्येकाचे अस्तित्व या गोष्टीची साक्ष देत आहे की कोणीतरी आहे ज्याने याला बनविले आहे, प्रकाशित केले आहे, अंतरिक्षात अधांतरी धरून ठेवले आहे व अशा प्रकारे त्याचे रक्षण व देखरेख करीत आहे की ना तो आपल्या स्थानापासून खाली पडतो, ना अगणित नक्षत्रांचे भ्रमण होत असताना तो इतर कुणावर आदळतो व ना दुसरा एखादा तारा त्यावर आदळतो, अशाच प्रकारे अल्लाह सृष्टितील प्रत्येक वस्तूची निगाह राखत आहे.

२) स्त्री आणि पुरुष दोन्हीचे वीर्य, मानवी शरीरातील पाठ आणि छाती याच्या दरम्यान जे धड आहे त्यातून निघत असते, म्हणून, मानव त्या पाण्यापासून निर्माण केला गेला आहे जे पाठ व छातीच्या मधून निघते, असे फर्माविले गेले आहे.

३) गुप्त रहस्याने अभिप्रेत प्रत्येक माणसाची अशी कृत्येही आहेत जी जगात रहस्ये बनलेली होती आणि ते मामलेही आहेत जे सकृतदर्शनी तर जगासमोर प्रकट झाले परंतु त्यांच्या पाठीमागे ज्या नियती, हेतू आणि इच्छा व आकांक्षा कार्यरत होत्या, त्यांचे वर्तमान लोकांपासून गुप्त राहिले.

४) म्हणजे ज्याप्रकारे आकाशातून पावसाचा वर्षाव आणि जमिनीचे दुभंगून वनस्पती आपल्यातून उत्पन्न करणे काही थट्टा नव्हे किंबहुना ते एक गंभीर स्वरूपाचे सत्य आहे, त्याचप्रकारे कुरआन ज्या गोष्टीची वार्ता देत आहे की मानवाला पुन्हा आपल्या ईश्वराकडे परतावयाचे आहे, हादेखील काही थट्टा व मस्करीचा विषय नव्हे तर एक निर्णायक गोष्ट आहे.

# ८७ सूरह अल्आला

*(मक्काकालीन, वचने १९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

(हे पैगंबर (स.)) आपल्या उच्चतर पालनकर्त्याच्या नावाचे पवित्र्य गान करा ज्याने निर्माण केले व प्रमाणबद्धता प्रस्थापित केली.[१] ज्याने भाग्य[२] बनविले मग मार्ग दाखविला,[३] ज्याने वनस्पती उगविल्या, मग त्यांना काळा केरकचरा बनवून टाकला. (१-५)

आम्ही तुम्हाला पठण करवू मग तुम्ही विसरणार[४] नाही त्याखेरीज की अल्लाहने

१) म्हणजे पृथ्वीपासून ते आकाशांपर्यंत सृष्टितील प्रत्येक वस्तू निर्माण केली व जी वस्तू पण निर्माण केली ती अगदी नीटनेटकी व योग्य बनविली, तिच्यातील प्रमाणबद्धता व संतुलन नीटनेटके ठेवले. ती अशा स्वरूपात निर्माण केली की तिच्यासारख्या वस्तूसाठी त्यापेक्षा चांगल्या स्वरूपाची कल्पनासुद्धा केली जाऊ शकत नाही.

२) म्हणजे प्रत्येक वस्तू निर्माण करण्याअगोदर, तिला जगात कोणते काम करावयाचे आहे, त्या कामासाठी ती किती प्रमाणात असावी, तिचे स्वरूप काय असावे, तिचे गुणधर्म कोणते असावेत, तिचे ठिकाण कोणत्या जागी असावे, किंवा जगण्याच्या मुक्कामाच्या आणि कामाच्या कोणत्या संधी व कोणकोणती साधने उपलब्ध केली जावीत, कोणत्या वेळी ती अस्तित्वात यावी, केव्हापर्यंत आपल्या वाट्याचे काम तिने करावे आणि केव्हा व कोणत्या प्रकारे ती समाप्त व्हावी हे सर्व निश्चित केलेले आहे. या संपूर्ण योजनेचे एकत्रितपणे तिचे 'तकदीर-भाग्य' असे नाव आहे.

३) म्हणजे कोणत्या वस्तूलाही केवळ निर्माण करून सोडून दिले आहे असे नाही तर जी वस्तू ज्या कामासाठी निर्माण केली, तिला ते काम पार पाडण्याची पद्धत सांगितली.

४) आरंभीच्या काळात जेव्हा दिव्यबोध येणे नुकतेच सुरू झाले होते तेव्हा कधी कधी असे घडत असे की हजरत जिब्रईल (अ.) ते ऐकवून मोकळे होत न होत तोच पैगंबर (स.) विसरण्याच्या भीतीने प्राथमिक भागाचा पुनरुच्चार करू लागत. याच कारणास्तव सर्वोच्च अल्लाहने पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना, दिव्यबोध उतरत असताना तुम्ही स्तब्धपणे ऐकत जा, ते आम्ही तुम्हाला शिकऊ व ते नेहमीसाठी तुम्हाला पाठ राहील, अशी खात्री दिली.



ज्याची इच्छा करावी.[५] तो प्रकटही जाणतो आणि जे काही गुप्त आहे ते सुद्धा. (६-७)

आणि आम्ही तुम्हाला सुलभ पद्धतीची सवलत देतो, म्हणून तुम्ही उपदेश करा, जर उपदेश लाभदायक असेल.[६] जो मनुष्य भितो तो उपदेश स्वीकारील आणि त्याच्यापासून अलिप्त राहील तो अत्यंत दुर्दैवी जो मोठ्या अग्नीत जाईल, मग तो मरणारही नाही व जिवंतही राहणार नाही. (८-१३)

सफल झाला तो ज्याने पावित्र्य अंगिकारले आणि आपल्या पालनकर्त्याचे नामस्मरण केले. मग नमाज अदा केली. परंतु तुम्ही लोक ऐहिक जीवनाला प्राधान्य देता वास्तविकपणे परलोक उत्तम आहे आणि बाकी उरणारा आहे. हीच गोष्ट अगोदर आलेल्या पुस्तिकातसुद्धा सांगितली गेली होती. इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) यांच्या पुस्तिकात. (१४-१९)

५) म्हणजे संपूर्ण कुरआनातील शब्द न् शब्द पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या स्मरणात सुरक्षित होणे म्हणजे हा काही त्यांचा स्वत:च्या सामर्थ्याचा चमत्कार होता असे नाही तर अल्लाहची कृपा व त्याने दिलेल्या सुबुद्धीचा तो परिणाम आहे, एरवी अल्लाहने इच्छिले असते तर विसरवून टाकले असते.

६) म्हणजे आम्ही धर्मप्रचाराच्या बाबतीत तुम्हाला कोणत्याही अडचणीत टाकू इच्छित नाही की तुम्ही बहिऱ्यांना ऐकवावे, आंधळ्यांना मार्ग दाखवावे, तर एक सोपा मार्ग तुमच्यासाठी उपलब्ध करून देत आहोत, तो मार्ग असा की उपदेश करा, ज्यांच्यासंबंधी तुम्हाला असे वाटत असेल की कुणी त्याचा लाभ घेण्यासाठी आहे. त्या लोकांच्या मागे लागण्याची गरज नाही ज्यांच्यासंबंधी अनुभवाने तुम्हाला कळून आले की कोणताही उपदेश ते स्वीकारू इच्छित नाहीत.

# ८८ सूरह अल्ग़ाशिया

*(मक्काकालीन, वचने २६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

काय तुम्हाला त्या व्यापून टाकणाऱ्या आपत्ती (म्हणजे पुनरुत्थानाची) खबर पोहचली आहे? काही चेहरे त्या दिवशी भयभीत असतील,[१] कठोर परिश्रम करीत असतील. थकून जात असतील. तीव्र आगीत होरपळून निघत असतील. उकळत्या झऱ्याचे पाणी त्यांना पिण्यास दिले जाईल. काटेरी वाळलेल्या गवताशिवाय कोणतेही भोजन त्यांच्यासाठी असणार नाही जे ना पुष्ट करील, जे ना भूक शमवील. काही चेहरे त्या दिवशी प्रफुल्लीत असतील. आपल्या कामगिरीवर आनंदीत असतील, उच्चकोटीच्या स्वर्गामध्ये असतील. कोणतीही वाह्यात गोष्ट ते तेथे ऐकणार नाहीत त्यात झरे प्रवाहित असतील, त्याच्यात उच्च आसने असतील, पेले ठेवलेले असतील, लोडांच्या रांगा लावलेल्या असतील, आणि उत्कृष्ट बिछाने अंथरलेले असतील. (१-१६)

(हे लोक मानीत नाहीत) तर काय हे उंटांना पाहात नाहीत की कसे बनविले गेलेत? आकाशाला पहात नाहीत की कसे उभारले गेले? पर्वतांना पहात नाहीत की कसे दृढ केले गेलेत? आणि पृथ्वीला पहात नाहीत की कशी अंथरली गेली?[२] (१७-२०)

बरे तर (हे पैगंबर (स.)), उपदेश करीत रहा, तुम्ही केवळ उपदेशच करणारे आहात, यांच्यावर जबरदस्ती करणारे नाहीत. तथापि जो इसम विमुख होईल आणि इन्कार करील तर अल्लाह त्याला भारी शिक्षा देईल. या लोकांना परतावयाचे आमच्याकडे आहे, मग त्याचा हिशोब घेणे आमच्याकडेच आहे. (२१-२६)

---

१) 'चेहरे' हा शब्द येथे व्यक्ती या अर्थाने प्रयुक्त झालेला आहे. माणसाच्या शरीरातील सर्वाधिक ठळक भाग त्याचा चेहराच असल्याकारणाने 'काही लोक' असे म्हणण्याऐवजी 'काही चेहरे' असे शब्द वापरले गेले आहेत.

२) म्हणजे हे लोक परलोकासंबंधीच्या या गोष्टी ऐकून जर सांगत आहेत की हे सर्वकाही कसे होऊ शकते बरे? तर काय आपल्या सभोवती असलेल्या जगावर दृष्टी टाकून यांनी कधी पाहिले नाही व कधी विचार केला नाही की हे उंट कसे बनले? हे आकाश कसे उंच उभारले गेले? हे पर्वत कसे दृढ केले गेले? ही पृथ्वी कशी अंथरली? या सर्व वस्तू जर घडल्या जाऊ शकत होत्या व घडलेल्या स्वरूपात यांच्यासमोर विद्यमान आहेत तर प्रलय का येऊ शकत नाही? परलोकात एक दुसरे जग का बनविले जाऊ शकत नाही? नरक आणि स्वर्ग का घडू शकत नाही?



# ८९ सूरह अल्फ़ज्र

*(मक्काकालीन, वचने ३०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे उष:काळची आणि दहा रात्रींची आणि सम व विषमाची आणि रात्रीची जेव्हा ती निरोप घेत असेल, काय यात बुद्धी असलेल्यांसाठी एखादी शपथ आहे?[१] (१-५)

तुम्ही पाहिले नाही की तुमच्या पालनकर्त्याने काय व्यवहार केला, उंच स्तंभवाल्या आदेइरमशी ज्यांच्या समान कोणतेही राष्ट्र जगाच्या मुलुखात निर्माण केले गेले नव्हते? आणि समूदशी ज्यांनी खोऱ्यात खडक कोरले होते? आणि मेखावाल्या फिरऔनशी, हे ते लोक होते ज्यांनी जगाच्या मुलुखात मोठा दुराचार केला होता आणि त्यांच्यात खूप उपद्रव माजविला होता. सरतेशेवटी तुमच्या पालनकर्त्याने त्यांच्यावर प्रकोपाचा कोरडा ओढला. वस्तुस्थिती अशी आहे की तुमचा पालनकर्ता दबा धरून बसला आहे.[२] (६-१४)

परंतु माणसाची स्थिती अशी आहे की त्याचा पालनकर्ता त्याची परीक्षा घेतो आणि त्याला प्रतिष्ठा आणि देणगी देतो, तेव्हा तो म्हणतो की, माझ्या पालनकर्त्याने मला प्रतिष्ठित बनविले. आणि तो जेव्हा त्याला कसोटीत घालतो आणि त्याची उपजीविका त्याच्यासाठी तंग करतो तर तो म्हणतो माझ्या पालनकर्त्याने मला

---

१) पुढील आयतीवर विचार केल्याने स्पष्टपणे असे कळते की अल्लाहचे प्रेषित हजरत मुहम्मद (स.) आणि अश्रद्धावंत यांच्या दरम्यान मोबदला व शिक्षा या प्रश्नावर वादविवाद चाललेला होता. त्यात प्रेषित (स.) ते खरे ठरवीत होते आणि अश्रद्धावंत त्याचा इन्कार करीत होते. या गोष्टीवर चार वस्तूंची शपथ घेऊन फर्माविले गेले की, या सत्य गोष्टीची साक्ष देण्यासाठी यानंतर काय अन्य कुणा शपथेची गरज उरते?

२) दबा धरून बसण्याची जागा अशी असते जेथे कुणी मनुष्य इतर कुणाच्या प्रतीक्षेत या हेतूने दबा धरून बसलेला असतो की जेव्हा तो माऱ्याखाली आला की बरोबर त्यावर हल्ला करावा. परिणामापासून बेसावध, बेपर्वाईने तो त्या ठिकाणाजवळ येतो आणि अकस्मात त्याची शिकार होते. अशीच स्थिती सर्वोच्च अल्लाहच्याविरूद्ध त्या जालिमांची आहे ज्यांनी जगात उपद्रवांचे तांडव माजविलेले असते व ईश्वरही कुणी आहे व तो त्यांना पाहात आहे, याचे त्यांना कोणतेही भान राहात नाही. ते पूर्णपणे निर्भय बनून दिवसेंदिवस अधिकाधिक खोडसाळ्या करीत राहतात, येथपावेतो की जेव्हा ती सीमा गाठली जाते जिच्यापुढे सर्वोच्च अल्लाह त्यांना जाऊ देऊ इच्छित नाही त्यावेळी अकस्मातपणे त्यांच्यावर त्याच्या प्रकोपाचा कोरडा ओढला जातो.

अपमानित केले,[३] कदापि नाही, किंबहुना तुम्ही अनाथांशी मानाचा व्यवहार करीत नाही. आणि गरिबाला जेवू घालण्यासाठी एकदुसऱ्याला उत्तेजन देत नाही, आणि वारसाची सर्व मालमत्ता गिळंकृत करता, आणि संपत्तीच्या प्रेमात वाईटरित्या गुरफटला आहात. कदापि नाही.[४] जेव्हा पृथ्वी निरंतर वाळवंट करून टाकली जाईल आणि तुमचा पालनकर्ता प्रकट होईल, अशा स्थितीत की दूत रांगारांगानी उभे राहतील. आणि नरक त्या दिवशी समोर आणले जाईल, त्या दिवशी मानवाला समज येईल आणि त्यावेळी त्याला समज येण्याने काय हशील? तो म्हणेल की, मी आपल्या ह्या जीवनासाठी पूर्वतयारी केली असती! मग त्या दिवशी अल्लाह जी यातना देईल तशी यातना देणारा कुणी नाही, आणि अल्लाह ज्या प्रकारे बांधील तसा बांधणारा कुणी नाही. (१५-२६)

(दुसरीकडे फर्माविले जाईल) हे संतुष्ट जीवा![५] चला आपल्या पालनकर्त्याकडे अशा स्थितीत की तू (आपल्या चांगल्या शेवटाने) आनंदीत (आणि आपल्या पालनकर्त्यापाशी) आवडता आहेस. सामील हो माझ्या (सदाचारी दासांत) आणि दाखल हो माझ्या स्वर्गामध्ये. (२७-३०)

---

३) म्हणजे असा आहे माणसाचा भौतिकवादी जीवन-दृष्टिकोन. या जगातच धनदौलत आणि अधिकार व सत्ता लाभण्यास तो प्रतिष्ठा आणि न मिळाल्यास आपली अप्रतिष्ठा मानतो. वास्तविकपणे खरी वस्तुस्थिती जी त्याच्या लक्षात येत नाही, अशी आहे की अल्लाहने ज्या कुणास जगात जे काही दिलेले आहे, परीक्षा घेण्यासाठी दिलेले आहे. श्रीमंती व सत्ता यातही परीक्षा आहे, तसेच गरिबीदेखील कसोटी आहे.

४) म्हणजे तुमची ही कल्पना चुकीची आहे की जगात जीवन जगतांना तुम्ही हे सर्वकाही करीत राहावे व त्याच्या जाब विचारण्याची वेळ कधीच येऊ नये.

५) संतुष्ट जिवाने अभिप्रेत तो मनुष्य आहे ज्याने कसलीही शंकाकुशंका न बाळगता संपूर्ण संतोष आणि शांतचित्तानिशी, कुणीच भागीदार नसलेल्या त्या एकमेव अल्लाहला आपला पालनकर्ता, आणि प्रेषितांनी आणलेल्या सत्यधर्माला आपला धर्म मान्य केला आहे.



# ९० सूरह अल्‌बलद

*(मक्काकालीन, वचने २०)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

नव्हे,[१] मी शपथ घेतो या (मक्का) शहराची आणि स्थिती अशी आहे की (हे पैगंबर (स.)) या शहरात तुम्हाला वैध[२] करून घेतले गेले आहे. आणि शपथ घेतो बाप (म्हणजे आदम (अ.)) आणि त्या संततीची जी त्याच्यापासून जन्मली. वस्तुत: आम्ही मानवाला परिश्रमात निर्माण केले आहे.[३] काय त्याने असा समज करून घेतला आहे की कोणीही त्याच्यावर वर्चस्व मिळवू शकणार नाही? म्हणतो, की मी ढिगाने माल उधळले काय तो समजतो की कुणी त्याला पाहिले नाही?[४] काय आम्ही त्याला दोन डोळे आणि एक जीभ व दोन ओठ दिले नाहीत?[५] आणि (पुण्य व पापाचे) दोन्ही स्पष्ट मार्ग त्याला (नाही का) दाखविले? परंतु त्याने दुर्गम घाटातून जाण्याचे साहस केले नाही. आणि तुम्हाला काय कल्पना की काय आहे तो दुर्गम घाट? एखाद्या मानेला गुलामीतून मुक्त करणे, अथवा उपासमारीच्या दिवशी एखाद्या निकटच्या अनाथाला अथवा मातीत पडलेल्या गरिबाला जेवू घालणे. मग (याबरोबर असे की) माणसाने त्या लोकांत सामील व्हावे ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी एकमेकाला संयम आणि दयेचा उपदेश दिला. हे लोक आहेत उजव्या बाजूवाले आणि ज्यांनी आमच्या वचनांना मानण्यास नकार दिला ते डाव्या बाजूवाले आहेत.[६] त्यांच्यावर अग्नी पसरला असेल. (१-२०)

---

१) म्हणजे वस्तुस्थिती ती नाही जी तुम्ही समजून बसला आहात.

२) म्हणजे ज्या शहरात जनावरांसाठी देखील अभय आहे, तेथे तुमच्यावरील अत्याचार वैध ठरविले गेले आहेत.

३) म्हणजे हे जग माणसासाठी मौजमजा आणि चैनीत बुडून राहण्याची जागा नाही तर श्रम व त्रास आणि कष्ट सोसण्याची जागा आहे. कोणताही मनुष्य अशा परिस्थितीतून गेल्यावाचून राहू शकत नाही.

४) म्हणजे काय या गर्व करणाऱ्याला हे समजत नाही की वर कुणी ईश्वरही आहे जो पहात आहे की कोणत्या मार्गांनी याने ही संपत्ती मिळविली व कोणत्या कार्यात ती खर्च केली?

५) अर्थ असा की काय आम्ही याला ज्ञान आणि बुद्धिची साधने दिली नाहीत?

६) उजव्या बाजू आणि डाव्या बाजूवाल्यांच्या सविस्तर माहितीसाठी, सूरह वाकिआ, आयत क्र. ८, ९, २७ आणि ४१ पहा.

# ९१ सूरह अश्शम्स

*(मक्काकालीन, वचने १५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

सूर्य आणि त्याच्या उन्हाची शपथ आणि चंद्राची शपथ जेव्हा तो त्याच्या पाठीमागे येतो. आणि दिवसाची शपथ जेव्हा तो (सूर्याला) स्पष्ट करतो आणि रात्रीची शपथ जेव्हा ती (सूर्याला) झाकून घेते, आणि आकाशाची व त्या अस्तित्वाची शपथ ज्याने त्याला उभारले, आणि पृथ्वीची व त्या अस्तित्वाची शपथ ज्याने तिला अंथरले आणि मानवी जीवाची व त्या अस्तित्वाची शपथ ज्याने त्याला नीटनेटके केले.[१] मग त्याच्यातील दुष्टता व पापभिरूता त्यावर प्रकट केली.[२] खचितच सफल झाला तो ज्याने अंत:करणाची शुद्धी केली आणि विफल झाला तो ज्याने त्याला दाबून टाकले.[३] (१-१०)

समूदने आपल्या दुर्वर्तनाने खोटे ठरविले. जेव्हा त्या राष्ट्राचा सर्वात जास्त कठोर माणूस चवताळून उठला तेव्हा अल्लाहच्या प्रेषिताने त्या लोकांना सांगितले की खबरदार, अल्लाहच्या उंटिणीला (हात लावू नका) आणि तिच्या पाणी पिण्यात (अडथळा बनू नका). परंतु त्यांनी त्याचे म्हणणे खोटे ठरविले आणि उंटिणीला ठार केले. सरतेशेवटी त्यांच्या अपराधापायी त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्यावर अशी आपत्ती कोसळविली की एकाच वेळी सर्वांना जमीनदोस्त[४] केले आणि आपल्या (या कृत्याच्या) कोणत्याही दुष्परिणामाची कोणतीही भीती नाही. (११-१५)

---

१) म्हणजे त्याला असे शरीर आणि अशी बुद्धी प्रदान केली, अशी ज्ञानेंद्रिये बहाल केली आणि अशा शक्ती व योग्यता दिल्या जेणेकरून माणसाला जगात जे काम करावयाचे आहे ते तो करण्यालायक बनला.

२) याचे दोन अर्थ आहेत. एक असा की त्याच्यात, सर्जनकर्त्याने नेकी आणि बुराई दोन्हीच्या प्रवृत्ती आणि ओढा ठेवलेला आहे. दुसरा असा की प्रत्येक माणसाच्या अंत:करणात सर्वोच्च अल्लाहने या कल्पना ठेवलेल्या आहेत की नीतीपैकी काही भलाई तर काही बुराई आहेत. चांगली नीती व चांगले आचरण आणि वाईट नीती व वाईट आचरण समान नाहीत. दुराचरण घृणास्पद गोष्ट आहे तर सदाचरण चांगली गोष्ट आहे. या कल्पना मानवासाठी काही अनोळख्या नाहीत तर त्याच्या स्वभावाला या परिचित आहेत. सर्जनकर्त्याने भले व बुरे यांच्यात फरक करणे त्याला जन्मजातपणे प्रदान केलेले आहे.

३) अंत:करण शुद्ध करण्याचा अर्थ त्याला बुराईपासून शुद्ध करणे व त्याच्यात भलाईची वाढ करणे होय. ते दाबून टाकण्याचा अर्थ असा की माणसाने आपल्या अंत:करणातील वाईट प्रवृत्तींना चालना देऊन चांगल्या प्रवृत्ती दाबून टाकाव्यात.

४) कारण त्या अभागी माणसाने राष्ट्राला खुश करण्यासाठी, किंबहुना त्याच्या मागणीवरून उंटीण ठार केली होती, असे की सूरह कमर, आयत क्र. २९ यात सांगितलेले आहे, म्हणून त्या संपूर्ण राष्ट्रावर प्रकोप कोसळविला गेला.



# ९२ सूरह अल्लैल

*(मक्काकालीन, वचने २१)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे रात्रीची जेव्हा ती पसरते आणि दिवसाची जेव्हा तो प्रकाशमान होतो, आणि त्या अस्तित्वाची ज्याने नर आणि मादी निर्माण केली, वस्तुत: तुम्हा लोकांचे प्रयत्न विभिन्न प्रकारचे आहेत.[१] तर ज्याने (ईश्वराच्या मार्गात) धन दिले आणि (ईश्वराच्या अवज्ञेपासून) दूर राहिला आणि भल्या गोष्टींना खरे मानले, त्याला आम्ही सोप्या मार्गासाठी सवलत देऊ.[२] आणि ज्याने कंजुषपणा केला आणि (आपल्या ईश्वराशी) बेपर्वाई दाखविली आणि भल्या गोष्टींना खोटे ठरविले, त्याला आम्ही कठीण मार्गासाठी सवलत देऊ.[३] आणि त्याची मालमत्ता शेवटी त्याच्या काय उपयोगी पडेल जेव्हा की तो नाश पावेल? (१-११)

नि:संदेह मार्ग दाखविणे आमच्यावर आहे, आणि खरे पाहता परलोक आणि इहलोक, दोन्हींचे स्वामी आम्हीच आहोत. तर मी तुम्हाला खबरदार केले आहे भडकत्या अग्नीपासून. त्यात होरपळणार नाही परंतु तो अत्यंत दुर्दैवी ज्याने खोटे ठरविले आणि तोंड फिरविले, आणि त्यापासून दूर ठेवला जाईल तो अत्यंत पापभिरू, जो निर्मल होण्यासाठी आपले धन देतो, त्याच्यावर कुणाचेही काही उपकार नाहीत. ज्याचा बदला त्याने द्यायला हवा. तो तर केवळ आपल्या उच्चतर पालनकर्त्याच्या प्रसन्नतेच्या प्राप्तीसाठी हे कार्य करतो. आणि जरूर तो (त्यावर) प्रसन्न होईल. (१२-२१)

---

१) म्हणजे ज्याप्रकारे रात्र आणि दिवस व नर आणि मादी एकमेकापासून भिन्न आहेत व त्यांची लक्षणे व परिणामही परस्पराच्याविरूद्ध आहेत त्याचप्रकारे तुम्ही लोक ज्या मार्गांनी व ज्या हेतूसाठी आपले श्रम खर्चित आहात तेसुद्धा आपल्या स्वरूपात विभिन्न आणि आपल्या परिणामांच्या दृष्टीने परस्परविरूद्ध आहेत.

२) म्हणजे जो मार्ग मानवी प्रकृतीला धरून आहे, त्या मार्गावर चालणे त्याला सोपे करू.

३) म्हणजे प्रकृतीविरूद्ध चालणे त्याला सोपे करू.

# ९३ सूरह अज़्ज़ुहा

*(मक्काकालीन, वचने ११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे प्रकाशमान दिवसाची आणि रात्रीची जेव्हा ती शांतपणे पसरते. (हे पैगंबर (स.),) तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला मुळीच सोडलेले नाही आणि तो नाराजही झाला नाही. निश्चितच तुमच्यासाठी नंतरचा काळ अगोदरच्या काळापेक्षा उत्तम आहे. लवकरच तुमचा पालनकर्ता तुम्हाला इतके देईल की तुम्ही प्रसन्न व्हाल. काय त्याने तुम्हाला अनाथ पाहिले नाही. मग त्याने ठिकाण उपलब्ध करून दिले? आणि मग तुम्ही मार्ग अनभिज्ञ आढळला व मग मार्गदर्शन प्रदान केले. आणि तुम्ही गरीब आढळला. आणि मग श्रीमंत केले. म्हणून अनाथावर सक्ती करू नका, आणि याचकाला झिडकारू नका. आणि आपल्या पालनकर्त्याच्या देणगीची अभिव्यक्ती करा. (१-११)



# ९४ सूरह अलम् नश्राह्

*(मक्काकालीन, वचने ८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

(हे पैगंबर (स.)) काय आम्ही तुमचे मन[१] तुमच्यासाठी उघडले नाही? आणि तुमच्यावरून ते भारी ओझे उतरविले जे तुमची कंबर खचवीत होते.[२] आणि तुमच्याखातर तुमच्या लौकिकाचा नाद दुमदुमला. तर वस्तुस्थिती अशी आहे की, अडचणीबरोबर संपन्नताही आहे. निःसंशय अडचणींबरोबर संपन्नताही आहे.[३] म्हणून जेव्हा तुम्ही मोकळे व्हाल तेव्हा उपासनेच्या परिश्रमात लागा आणि आपल्या पालनकर्त्याकडेच ओढ ठेवा.[४] (१-८)

---

**१)** मन उघडणे हा शब्द दिव्य कुरआनात ज्या ज्या प्रसंगी आलेला आहे त्यावर दृष्टिक्षेप केल्याने असे कळले की त्याचे दोन अर्थ आहेत. (१) असा की सर्व प्रकारचे मानसिक गोंधळ व द्विधावस्थेपासून मुक्त होऊन माणसाने, इस्लामचाच मार्ग सत्य आहे, या गोष्टीवर पूर्णपणे संतुष्ट व्हावे. (२) असा की माणसाचे धैर्य उच्च व्हावे. एखाद्या मोठ्यातल्या मोठ्या मोहिमेवर जाण्यात व कोणत्याही कठिणातले कठीण काम करण्यात त्याला संकोच वाटू नये. तसेच प्रेषितत्वाच्या महान जबाबदाऱ्या उचलण्याचे साहस त्याच्यात उत्पन्न व्हावे.

**२)** याच्याने अभिप्रेत शोक व दुःख आणि चिंता व अस्वस्थतेचे ओझे आहे जे आपल्या राष्ट्राचा अज्ञानीपणा व अडाणीपणा पाहून पाहून पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या संवेदनशील स्वभावावर पडत होते. पैगंबर (स.) त्यासाठी कुढत असत परंतु तो बिघाड दूर करण्याचा कोणताही मार्ग त्यांना दिसत नव्हता. याच काळजीने त्यांची कंबर मोडली जात असे. त्यांच्यावरील हे भारी ओझे, सर्वोच्च अल्लाहने मार्गप्राप्तीची सुबुद्धी प्रदान करून दूर केले. त्यांच्या मनावरील सर्व दडपण नाहीसे केले व ते पूर्णपणे संतुष्ट बनले की इस्लामद्वारे ते केवळ अरबस्तानच नव्हे तर अरबस्तानच्या बाहेरील सर्व जगदेखील ज्या बिघाडांनी ग्रासले होते, त्या बिघाडापासून अखिल मानवजातीचीही सुटका करू शकतात.

**३)** या गोष्टीचा दोनदा पुनरुच्चार केलेला आहे की जेणेकरून पैगंबर (स.) यांची पूर्णपणे खात्री करून दिली जावी की ज्या कठीण परिस्थितीतून आपणास यावेळी जावे लागत आहे ती जास्त वेळ टिकून राहणार नाही तर यानंतर निकटच्या काळातच चांगली परिस्थिती येईल.

**४)** म्हणजे इतर कोणताही व्याप नसेल तेव्हा आपला मोकळा वेळ उपासनेतील रियाज व श्रम यात खर्च करा आणि सर्व बाजूंनी लक्ष काढून केवळ आपल्या पालनकर्त्याचा ध्यास धरा.

# ९५ सूरह अत्तीन

*(मक्काकालीन, वचने ८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे अंजीर व जैतुनची,[१] आणि तुर-ए-सीना आणि या शांततापूर्ण (मक्का) शहराची, आम्ही मानवाला उत्कृष्ट रचनेत निर्माण केले, मग उलट फिरवून आम्ही त्याला निकृष्टात निकृष्ट करून टाकले, त्या लोकांखेरीज ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कृत्ये करीत राहिले की त्यांच्यासाठी कधी न संपणारा मोबदला आहे. तर (हे पैगंबर (स.)) यानंतर कोण मोबदला व शिक्षेच्या बाबतीत तुम्हाला खोटे ठरवू शकतो? काय अल्लाह सर्व शासकांपेक्षा मोठा शासक नाही?[२] (१-८)

१) म्हणजे सदरहू फळे उत्पन्न करणाऱ्या (सीरिया व फलस्तीन) या प्रदेशाची जेथे मोठ्या प्रमाणात प्रेषित जन्मास आले.

२) म्हणजे जगातील लहानसहान शासकांकडूनही जेव्हा तुम्ही असे इच्छिता आणि हीच अपेक्षा करता की त्यांनी न्याय करावा, अपराध्यांना शिक्षा करावी व चांगली कामे करणाऱ्यांना मोबदला व बक्षीस द्यावे, तेव्हा ईश्वराच्या संबंधी तुमची काय कल्पना आहे? तुम्ही समजता की तो सर्व शासकांचा शासक काही न्याय करणार नाही? काय त्याच्याकडून तुम्ही अशी अपेक्षा करता की तो वाईट आणि भले एकसमान करील? काय त्याच्या जगात अत्यंत वाईट कृत्ये करणारे आणि उत्तम कृत्ये करणारे दोन्ही मरून माती होतील आणि कुणालाही ना दुराचाराची शिक्षा मिळेल व ना चांगल्या कामाचा मोबदला?



# ९६ सूरह अल्‌अलक़

*(मक्काकालीन, वचने १९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

वाचा, (हे पैगंबर (स.)) आपल्या पालनकर्त्याच्या नामासहित ज्याने निर्माण केले, गोठलेल्या रक्ताच्या एका गोळ्यापासून मानवाची निर्मिती केली. वाचा, आणि तुमचा पालनकर्ता मोठा उदार आहे, ज्याने लेखणीद्वारे ज्ञान शिकविले, मानवाला ते ज्ञान दिले जे तो जाणत नव्हता.[१] कदापि नाही,[२] मानव मर्यादाभंग करतो आहे, या कारणास्तव की तो आपल्या स्वत:ला स्वयंपूर्ण पाहतो. (वस्तुत:) आपल्या पालनकर्त्याकडेच, त्याला परत जायचे आहे. तुम्ही पाहिले त्या माणसाला जो एका दासाला मनाई करतो, जेव्हा तो नमाज पढत असतो? तुमचा काय विचार आहे जर तो सरळ मार्गावर असता किंवा ईशपरायणतेचा आदेश देत असता? तुमचा काय विचार आहे जर (हा मनाई करणारा माणूस सत्याला) खोटे ठरवीत आहे व विमुख होत आहे? काय त्याला माहीत नाही की अल्लाह पहात आहे? कदापि नाही, जर तो परावृत्त झाला नाही तर आम्ही त्याला, कपाळाचे केस धरून ओढू, त्या कपाळाचे जे खोटारडे व मोठे गुन्हेगार आहेत. त्याने बोलवावे आपल्या समर्थकांच्या टोळीला, आम्हीसुद्धा प्रकोपाच्या दूतांना बोलावून घेऊ. कदापि नाही, त्याचे म्हणणे ऐकू नका. आणि नतमस्तक व्हा. व (आपल्या पालन-कर्त्याशी) जवळीक साधा. (१-१९)

# ९७ सूरह अल्‌क़द्र

*(मक्काकालीन, वचने ५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

आम्ही याला (कुरआनला) कद्रच्या रात्री अवतरले आहे. आणि तुम्हाला काय माहीत, 'कद्र'ची रात्र काय आहे? कद्रची रात्र हजार महिन्यांपेक्षा अधिक उत्तम आहे. दूत आणि रूह (जिब्रिल (अ.)) त्यात आपल्या पालनकर्त्याच्या आज्ञेने प्रत्येक आदेश घेऊन उतरतात. ती रात्र पूर्णत: 'शांती' आहे. उष:काळापर्यंत. (१-५)

१) अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरलेली दिव्य कुरआनातील या सर्वात पहिली वचने आहेत.

२) ही वचने त्यावेळी अवतरली जेव्हा प्रेषितत्वाच्या पदावर नियुक्त झाल्यानंतर पैगंबर (स.) यांनी हरम-काबागृहाच्या आवारात नमाज पढणे सुरू केले व अबू जहलने त्यांना नमाज पढण्यापासून रोखू इच्छिले.

# ९८ सूरह अल्बय्यिन:

*(मदीनाकालीन, वचने ८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

ग्रंथधारक व अनेकेश्वरवाद्यांपैकी जे लोक अश्रद्धावंत होते, (ते आपल्या द्रोहापासून) परावृत्त होणारे नव्हते. जोपर्यंत त्यांच्यापाशी उज्ज्वल प्रमाण येत नाही. (अर्थात) अल्लाहकडून एक प्रेषित[१] ज्याने पवित्र पत्रिका वाचून दाखवाव्यात, ज्यांच्यात अगदी रास्त आणि यथायोग्य लिखाण लिहिलेले असेल.[२] (१-३)

पूर्वी ज्या लोकांना ग्रंथ दिला गेला होता, त्यांच्यात फाटाफूट निर्माण झाली नाही, परंतु यानंतर की त्यांच्याजवळ (सरळमार्गाचा) स्पष्ट उल्लेख[३] आलेला होता आणि त्यांना याशिवाय कोणताही आदेश दिला गेला नव्हता की अल्लाहची भक्ती करावी, आपल्या धर्माला शुद्ध त्याच्यासाठीच ठेवून, अगदी एकाग्र होऊन आणि नमाज कायम करावी आणि जकात द्यावी. हाच अगदी बरोबर आणि योग्य धर्म आहे. (४-५)

ग्रंथधारक आणि अनेकेश्वरवाद्यांपैकी ज्या लोकांनी द्रोह केला आहे[४] ते निश्चितच नरकाग्नीत जातील आणि सदैव त्यात राहतील, हे लोक दुष्टतम निर्मिती आहेत. ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली ते निश्चितच उत्तम निर्मिती आहेत. त्यांचा बदला त्यांच्या पालनकर्त्यापाशी चिरंतन निवासाचे स्वर्ग आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहात असतील, ते त्यात सदासर्वदा राहतील. अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला व ते अल्लाहशी राजी झालेत. हे असे आहे त्या माणसासाठी ज्याने आपल्या पालनकर्त्याच्या कोपाचे भय बाळगले. (६-८)

---

१) या ठिकाणी पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना व्यक्तीश: स्वत: उज्ज्वल प्रमाण सांगितलेले आहे.

२) म्हणजे अशा पत्रिका ज्यांच्यात कोणत्याही प्रकारचे असत्य, कोणत्याही प्रकारची मार्गभ्रष्टता आणि कोणत्याही अनैतिकतेची लागण लागलेली नसावी.

३) म्हणजे याच्यापूर्वी ग्रंथधारक जे विभिन्न मार्गभ्रष्टतेत भरकटून असंख्य गटात विभागले गेले त्याचे कारण हे नव्हते की सर्वोच्च अल्लाहने आपल्याकडून त्यांच्या मार्गदर्शनासाठी उज्ज्वल प्रमाण पाठविण्यात काही कसूर केली होती तर हे वर्तन त्यांनी अल्लाहकडून मार्गदर्शन आल्यानंतर स्वीकारले होते. म्हणून आपल्या मार्गभ्रष्टतेला ते स्वत:च जबाबदार होते.

४) येथे द्रोहने अभिप्रेत हजरत मुहम्मद (स.) यांना मान्य करण्यास इन्कार होय.



# ९९ सूरह अज़्ज़िल्ज़ाल

*(मदीनालीन, वचने ८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जेव्हा पृथ्वी आपल्या संपूर्ण आवेशानिशी हालवून सोडली जाईल आणि पृथ्वी आपल्या आतील सर्व ओझे बाहेर टाकील आणि मानव म्हणेल की, हिला हे काय होत आहे? त्या दिवशी ती आपले (वरील घडलेले) अहवाल निवेदन करील कारण तुझ्या पालनकर्त्याने तिला (असे करण्याची) आज्ञा दिलेली असेल त्या दिवशी लोक विभिन्न स्थितीत परततील जेणेकरून त्यांची कृत्ये त्यांना दाखविली जातील. मग ज्याने तिळमात्र पुण्य केले असेल ते तो पाहील. आणि ज्याने तिळमात्र पाप केले असेल तेही तो पाहील. (१-८)

# १०० सूरह अल्आदीयात

*(मक्काकालीन, वचने ११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

शपथ आहे त्या (घोड्यांची) जे फुत्कार टाकीत धावतात मग (आपल्या टापांनी) ठिणग्या उडवितात. मग सकाळी सकाळी छापा मारतात. मग त्या प्रसंगी धुळीचे लोट उसळतात. मग अशा स्थितीत एखाद्या जमावात शिरतात. वस्तुस्थिती अशी आहे की मानव आपल्या पालनकर्त्याशी फार कृतघ्न आहे.[१] आणि तो स्वत: याला साक्षी आहे.[२] आणि तो धनदौलतीच्या प्रेमात तीव्रपणे गुरफटलेला आहे. तर काय तो त्या वेळेला जाणत नाही जेव्हा थडग्यात जे काही (दफन केलेले आहे) ते काढले जाईल आणि हृदयात जे काही (लपलेले) आहे ते काढले जाऊन त्याची तपासणी[३] केली जाईल? निश्चितच त्यांचा पालनकर्ता त्या दिवशी त्यांच्याशी चांगलाच परिचित असेल.[४] (१-११)

---

१) म्हणजे ज्या शक्ती अल्लाहने त्याला दिल्या होत्या त्यांना जुलूम व अत्याचारासाठी वापर करीत राहिला.

२) म्हणजे त्याची सद्सद्विवेकशक्ती याची ग्वाही देते, त्याची कृत्ये याची ग्वाही देतात, आणि बरीचशी अश्रद्धावंत माणसे खुद्द आपल्या तोंडानेदेखील उघडपणे कृतघ्नता व्यक्त करतात.

३) म्हणजे हृदयात जे इरादे, जे हेतू आणि उद्दिष्टे दडलेली आहेत, ती सर्व उघड करून ठेवली जातील व त्यांची तपासणी करून चांगुलपणा वेगळा व वाईटपणा वेगळा केला जाईल.

४) म्हणजे त्याला चांगल्या प्रकारे माहीत असेल की कोण कसा आहे व कोणत्या शिक्षेस वा मोबदल्यास पात्र आहे.

# १०१ सूरह अल्क़ारिया

*(मक्काकालीन, वचने ११)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

प्रचंड घटना! काय आहे ती प्रचंड घटना? तुम्हाला काय ठाऊक की ती प्रचंड घटना काय आहे? तो दिवस जेव्हा लोक विखुरलेल्या पतंग्यांसमान आणि पर्वत रंगीबेरंगी पिंजलेल्या लोकरीप्रमाणे असतील. मग ज्याचे पारडे जड असेल[१] तो मनपसंत ऐश्वर्यात असेल, आणि ज्याचे पारडे हलके असेल त्याचे विश्रामधाम खोल खाई असेल, आणि तुम्हाला काय ठाऊक की ती वस्तू काय आहे? भडकणारा अग्नी. (१-११)

# १०२ सूरह अत्तकासुर

*(मक्काकालीन, वचने ८)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तुम्हा लोकांना अधिकात अधिक आणि एकदुसऱ्यापेक्षा जास्त धन प्राप्त करण्याच्या मोहाने बेसावध करून टाकले आहे इथपावेतो की (याच चिंतेत) तुम्ही थडग्यापर्यंत पोहचता, कदापि नाही, लवकरच[१] तुम्हाला कळून येईल पुन्हा (ऐकून घ्या) कदापि नाही, लवकरच तुम्हाला कळून येईल, कदापि नाही, जर तुम्ही खात्रीचे ज्ञान म्हणून (या चालीच्या परिणामाला) जाणत असता (तर तुमचे वर्तन असे नसते). तुम्ही नरक पाहणारच! पुन्हा (ऐकून घ्या) तुम्ही अगदी खात्रीने तो पहाल. मग जरूर त्या दिवशी या देणग्यांसंबंधी तुम्हाला जाब विचारला जाईल. (१-८)

---

**अल्क़ारिआ**

१) म्हणजे नेकीचे पारडे जड असेल.

**अत्तकासुर**

१) लवकरच ने अभिप्रेत परलोकही असू शकते आणि मृत्यूही, कारण मृत्यू पावताच ही गोष्ट माणसावर उघड होते की ज्या उद्योगात तो आपले उभे जीवन खर्चून आला आहे, ते त्याच्यासाठी सुदैवाला कारणीभूत होते की वाईट शेवट आणि दुर्भाग्याला कारणीभूत.



# १०३ सूरह अल्अस्र

*(मक्काकालीन, वचने ३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

काळाची शपथ,[१] मानव वस्तुतः तोट्यात आहे, त्या लोकांखेरीज ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि सत्कर्मे करीत राहिले. आणि एकमेकांना सत्याचा उपदेश आणि संयमाचा आदेश देत राहिले. (१-३)

# १०४ सूरह अल्हुमज़ः

*(मक्काकालीन, वचने ९)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

विनाश आहे त्या प्रत्येक माणसासाठी ज्याला लोकांना टोमणे मारण्याची व (पाठीमागे) निंदा करण्याची सवय आहे, ज्याने धन गोळा केले आणि मोजून मोजून ठेवले. तो समजतो की त्याचे धन सदैव त्याच्यापाशी राहील,[१] कदापि नाही, तो मनुष्य तर चक्काचूर करून टाकणाऱ्या जागी फेकून दिला जाईल आणि तुम्हाला काय माहीत की काय आहे ती चक्काचूर करणारी जागा? अल्लाहचा अग्नी, खूप भडकलेला, जो हृदयापर्यंत पोहचेल, तो त्यांच्यावर झाकून बंद केला जाईल. (अशा अवस्थेत की ते) उंचउंच स्तंभात (वेढले गेले असतील)[२] (१-९)

---

**अल्अस्र**

१) 'काळ'ने अभिप्रेत गतकाळही आहे व वर्तमानकाळदेखील. त्याची शपथ घेण्याचा अर्थ असा की इतिहासही साक्षी आहे व हल्ली जात असलेला काळही साक्ष देत आहे की पुढे जी गोष्ट सांगितली जात आहे ती सत्य आहे.

**अल्हुमज़ः**

१) दुसरा अर्थ असाही होऊ शकतो की तो समजतो, त्याची संपत्ती त्याला चिरंतन जीवन प्रदान करील व त्याच्या मनात असा विचारही कधी येत नाही की एकेवेळी त्याला हे सर्वकाही सोडून रिकाम्या हातांनी जगाचा निरोप घ्यावा लागेल.

२) 'फी अमदिम मुमद्दा' या अरबी शब्दाचे अनेक अर्थ होऊ शकतात. एक असा की नरकाची दारे बंद करून त्यांच्यावर उंच उंच खांब उभे केले जातील. दुसरा अर्थ असा की हे अपराधी उंच उंच खांबाना बांधलेले असतील. तिसरा अर्थ असा की त्या अग्नीच्या ज्वाला उंच खांबाच्या आकारात उसळत असतील.

# १०५ सूरह अल्फ़ील

*(मक्काकालीन, वचने ५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तुम्ही पाहिले नाही की तुमच्या पालनकर्त्याने हत्तीवाल्याशी काय केले? काय त्याने त्यांची युक्ती फोल ठरविली नाही? आणि त्यांच्यावर पक्षांचे थवेच्या थवे पाठविले जे त्यांच्यावर खंगराच्या खड्यांचा मारा करीत होते. मग त्यांची अशी दशा करून टाकली जसा (जनावरांनी) खाल्लेला भूसा.[१] (१-५)

# १०६ सूरह कुरैश

*(मक्काकालीन, वचने ४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

ज्याअर्थी कुरैश सरावले[१] (अर्थात) हिवाळ्याच्या व उन्हाळ्याच्या प्रवासांना सरावले, त्याअर्थी त्यांना हवे की या घराच्या[२] पालनकर्त्याची उपासना करावी ज्याने त्यांना भूकेपासून वाचवून, खायला दिले, आणि भयापासून वाचवून शांती प्रदान केली.[३] (१-४)

**अल्फ़ील**

**१)** अल्लाहचे पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या शुभ जन्माच्या ५० दिवस अगोदर जी घटना घडली होती त्याच घटनेचा हा उल्लेख आहे. येमन देशाचा हबशी ख्रिस्ती राजा अबरहा ६० हजारांचे सैन्य घेऊन या हेतूने मक्का शहरावर चालून आला होता की काबागृह उद्ध्वस्त करून टाकावे. त्या सैन्यात अनेक हत्तीदेखील होते. जेव्हा तो मुज्दल्फा व मिना या ठिकाणांच्या दरम्यान पोहचला तेव्हा अकस्मात समुद्राकडून पक्ष्यांचे थवे आपल्या चोचीत व पंजात खडे घेऊन आले व त्या सैन्यावर आणलेल्या खड्यांचा वर्षाव केला. ज्या ज्या कुणावर तो खडा पडत असे त्याचे मांस गळून गळून पडणे सुरू होत असे. अशाप्रकारे हे सर्व सैन्य नष्ट झाले. अरबस्तानात ही घटना अत्यंत प्रसिद्ध होती. हा सूरह उतरण्याच्या वेळी ज्यांच्या डोळ्यासमोर ही घटना घडली होती मक्केत अशी हजारो माणसे हयात होती. सर्व अरबवासी हे मान्य करीत होते की हत्तीवाल्यांवर हा विनाश केवळ सर्वोच्च अल्लाहच्या सामर्थ्यामुळे ओढवला होता.

**कुरैश**

**१)** उन्हाळा व हिवाळ्यातील सफरीनी अभिप्रेत व्यापारी सफरी आहेत. उन्हाळ्यात कुरैश लोक सीरिया व फलस्तीनकडे तर हिवाळ्यात अरबस्तानाच्या दक्षिणेकडे व्यापारासाठी जात असत. याच सफरीमुळे ते श्रीमंत बनले होते. **२)** या गृहाने अभिप्रेत काबागृह आहे. **३)** 'मक्का' 'हरम' आदरणीय असल्या कारणाने कुरैशांना हा धोका नव्हता की त्यांच्या शहरावर कुणी आज टोळीवाले हल्ला करतील. तसेच कुरैश लोक काबागृहाचे मुजावर असल्यामुळे त्यांचे व्यापारी काफिले बिनधोकपणे अरबस्तानातील सर्व प्रदेशातून प्रवास करीत असत व त्यांना कोणीही छेडत नसे.



# १०७ सूरह अल्माऊन

*(मक्काकालीन, वचने ७)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तुम्ही पाहिले त्या माणसाला जो परलोकातील मोबदला व शिक्षेला खोटे ठरवितो? तोच तर आहे जो अनाथाला धक्के देतो आणि गरिबांना जेवण देण्यासाठी उत्तेजन देत नाही.[१] मग विनाश आहे त्या नमाज पढणाऱ्यांसाठी जे आपल्या नमाजात गफलत करतात.[२] जे दिखाऊपणा करतात, आणि क्षुल्लक गरजेच्या वस्तू (लोकांना) देण्यास टाळाटाळ करतात. (१-७)

# १०८ सूरह अल्कौसर

*(मक्काकालीन, वचने ३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

(हे पैगंबर (स.)) आम्ही तुम्हाला कौसर[१] प्रदान केले. म्हणून तुम्ही आपल्या पालनकर्त्यासाठीच नमाज पढा व कुर्बानी करा, तुमचा शत्रूच संततीहीन आहे.[२].

(१-३)

**अल्माऊन**

**१)** म्हणजे आपल्या स्वत:लाही तो या कामासाठी उद्युक्त करीत नाही व आपल्या कुटुंबियांनादेखील म्हणत नाही की गरिबाला जेवण देत राहावे तसेच लोकांनाही गोरगरिबांच्या मदतीसाठी प्रोत्साहन देत नाही.

**२)** याच्याने अभिप्रेत नमाज पठण करण्यात विसर पडणे नव्हे तर नमाजासंबंधी निष्काळजीपणा करणे होय.

**अल्कौसर**

**१)** 'कौसर'ने अभिप्रेत आहे जगातील व परलोकातील अगणित कल्याणकारी गोष्टी, ज्यांच्यात पुनरुत्थापनेच्या दिवसातील कौसर हौद आणि स्वर्गातील कौसर हौद आणि स्वर्गातील कौसर कालवा यांचाही समावेश आहे.

**२)** पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांना अश्रद्धावंत लोक 'अबतर' या अर्थाने म्हणत असत की ते आपल्या लोकांशीही दुरावले आहेत व त्यांची पुत्र संततीदेखील जिवंत राहिली नाही. म्हणून पैगंबर (स.) यांचा नावनिशाण राहणार नाही असा त्यांचा समज होता. यावरून फर्माविले गेले की नावनिशाणीविना तुम्ही नव्हे तुमचे शत्रू राहतील.

# १०९ सूरह अल्काफ़िरून

*(मक्काकालीन, वचने ६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

सांगा की, हे अश्रद्धावंतांनो[१] मी त्यांची उपासना करीत नाही ज्यांची उपासना तुम्ही करता.[२] आणि न तुम्ही त्याची उपासना करणारे आहात ज्याची उपासना मी करतो.[३] आणि न मी त्यांची उपासना करणारा आहे ज्यांची उपासना तुम्ही केली आहे.[४] आणि न तुम्ही त्याची उपासना करणारे आहात ज्याची उपासना मी करतो. तुमच्यासाठी तुमचा धर्म आहे आणि माझ्यासाठी माझा धर्म.[५] (१-६)

# ११० सूरह अन्नस्र

*(मदीनाकालीन, वचने ३)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

जेव्हा[१] अल्लाहची मदत आली आणि विजय प्राप्त झाला आणि (हे पैगंबर स.) तुम्ही पाहिले की लोक झुंडी झुंडीने अल्लाहच्या धर्मात प्रवेश करीत आहेत. तेव्हा आपल्या पालनकर्त्याच्या स्तुतीबरोबरच त्याचे पावित्र्य गान करा, आणि त्याच्याकडे क्षमेची प्रार्थना करा.[२] नि:संदेह तो मोठा पश्चात्ताप स्वीकारणारा आहे. (१-३)

---

**अल्काफ़िरून**

**१)** म्हणजे हे त्या लोकांनो, ज्यांनी माझे प्रेषितत्व व मी आणलेली शिकवण मान्य करण्यास इन्कार केला आहे. **२)** यद्यपि अश्रद्धावंत इतर उपास्यांबरोबर अल्लाहचीदेखील उपासना करीत असत तरीपण अनेकेश्वरवादासहित अल्लाहची उपासना मुळापासून अल्लाहची उपासना ठरत नसल्या कारणाने अनेकेश्वरवादींच्या सर्व उपास्यांच्या उपासनेचा इन्कार केला गेला. **३)** म्हणजे ज्या गुणांनी संपन्न ईश्वराची मी उपासना करतो तुम्ही त्या गुणांनी संपन्न ईश्वराची उपासना करणारे नाहीत. **४)** म्हणजे ज्या उपास्यांची पूजा याअगोदर तुम्ही व तुमच्या वाडवडिलांनी केलेली आहे, मी त्यांची पूजा करणारा नाही. **५)** म्हणजे धर्माच्या बाबतीत माझ्या व तुमच्यात कोणताच मेळ नाही. माझी वाट वेगळी व तुमची वाट वेगळी आहे.

**अन्नस्र**

**१)** विश्वसनीय निवेदनांनुसार, कुरआनातील ही सर्वात शेवटची सूरत आहे. पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांच्या निधनाच्या सुमारे तीन महिने अगोदर ही उतरली आहे. या सूरतीनंतर काही आयती उतरल्या खऱ्या परंतु कोणतीही परिपूर्ण सूरत उतरली नाही. **२)** निवेदनावरून असेही कळते की सदरहू सूरत उतरल्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या शेवटच्या दिवसांत मोठ्या प्रमाणात स्तुती व पावित्र्यगान आणि क्षमायाचनेच्या वचनांचा उच्चार करू लागले होते.



# १११ सूरह अल्लहब

*(मक्काकालीन, वचने ५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

तुटून गेले अबू लहबचे[१] हात आणि विफल झाला तो.[२] त्याची मालमत्ता आणि जे काही त्याने कमविले ते त्याच्या काहीच उपयोगी पडले नाही. अवश्य तो उसळत्या ज्वालांच्या अग्नीत टाकला जाईल आणि (त्याच्याबरोबर) त्याची पत्नीसुद्धा.[३] आगलावेपणा करणारी, तिच्या मानेत खजुरीची दोरी असेल. (१-५)

# ११२ सूरह अल्इख़्लास

*(मक्काकालीन, वचने ४)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

सांगा,[१] तो अल्लाह आहे[२] एकमेव.[३] अल्लाह सर्वांपासून निरपेक्ष आहे आणि सर्व त्याचे गरजवंत आहेत. न त्याची कुणी संतती आहे आणि न तो कोणाची संतती. आणि कुणी त्याच्या समान नाही. (१-४)

---

**अल्लहब** **१)** पैगंबर हजरत मुहम्मद (स.) यांचा हा चुलता होता व अबूलहब याच नावाने तो प्रसिद्ध होता. **२)** म्हणजे इस्लामचा मार्ग रोखण्यासाठी त्याने जितका जोर लावला त्यात तो अपयशी व निष्फळ ठरला. सदरच्या वाक्यात जरी नंतर घडणाऱ्या घटनेची भविष्यवाणी केलेली आहे तरीपण अशा पद्धतीने सांगितलेली आहे की जणू ती घडली आहे. **३)** त्या स्त्रीचे नाव 'उम्मे जमील' असे होते. अबूसुफ़्यानची ती बहीण होती व इस्लामच्या शत्रुत्वात ती आपल्या पतीपेक्षा कोणत्याही बाबतीत कमी नव्हती.

**अल्इख़्लास** **१)** अल्लाहचे पैगंबर (स.) यांना, अश्रद्धावंत व अनेकेश्वरवादी विचारीत असत की, तुमचा पालनकर्ता, ज्याला तुम्ही इतर सर्व उपास्यांना सोडून, एकमेव उपास्य म्हणून मान्य करवू इच्छिता, कसा आहे. त्याची वंशावळ काय? कोणत्या पदार्थाने तो बनला आहे? कोणाकडून त्याला सृष्टीचा हा वारसा मिळाला आहे व कोण त्याचा वारस होईल? या प्रश्नांच्या उत्तरात ही सूरत उतरली. **२)** म्हणजे ज्या अस्तित्वाला तुम्ही लोक खुद्द अल्लाह या नावाने ओळखता व ज्याला स्वत:चा व इतर सर्व सृष्टीचा सर्जनकर्ता व पालनकर्ता म्हणून मानता; तोच माझा पालनकर्ता आहे. अरबस्तानातील अनेकेश्वरवादींची श्रद्धा सर्वोच्च अल्लाहसंबंधी कोणती होती ती खुद्द कुरआनात ठिकठिकाणी सांगितलेली आहे. उदा. पहा, सूरह यूनुस, आयत क्र. २२, २३, ३१ बनीइस्राईल, आयत क्र. ६७, अल्मुअ्मिनून, आयत क्र. ८४ ते ८९, अल्अन्कबूत आयत क्र. ६१ ते ६३ आणि अज्जुखरूफ, आयत क्र. ८७. **३)** 'वाहिद' ऐवजी 'अहद' मूळ अरबीत असा शब्द प्रयुक्त झालेला आहे. दोन्हींचा अर्थ जरी एक असा होतो तरीपण अरबी भाषेतील 'वाहिद' हा शब्द अशा सर्व वाहिद- एक असेच म्हणतात. जरी या सर्वांतही अनेकता गणली जात नाही तरीपण 'अहद' हा शब्द अरबी भाषेत केवळ अशासाठीच वापरला जातो जो सर्व दृष्टींनी एकमेव असावा, ज्यात कोणत्याही प्रकारची अनेकता आढळत नसावी. म्हणूनच अरबी भाषेत हा शब्द केवळ सर्वोच्च अल्लाहसाठीच विशिष्ट आहे.

# ११३ सूरह अल्फ़लक़

*(मक्काकालीन, वचने ५)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

सांगा, मी शरण मागतो सकाळच्या पालनकर्त्याची,[१] त्या प्रत्येक वस्तूच्या अरिष्टापासून जी त्याने निर्माण केली आहे आणि रात्रीच्या अंधाराच्या अरिष्टापासून जेव्हा की तो पसरतो,[२] आणि गंड्यांत फुंकणाऱ्यांच्या अरिष्टापासून[३] आणि मत्सर करणाऱ्यांच्या अरिष्टापासून जेव्हा ते मत्सर करतात.[४] (१-५)

# ११४ सूरह अन्नास

*(मक्काकालीन, वचने ६)*

***कृपावंत आणि दयावंत अल्लाहच्या नावाने***

सांगा, मी शरण मागतो मानवांच्या पालनकर्त्यापाशी, मानवांच्या बादशाहपाशी, मानवांच्या खऱ्या ईश्वरापाशी, त्या दुष्प्रवृत्त करणाऱ्याच्या अरिष्टापासून जो पुन्हा पुन्हा परतून येतो,[१] जो लोकांच्या मनात दुष्प्रवृत्ती निर्माण करतो, मग तो जिन्नांपैकी असो की मानवांपैकी.[२] (१-६)

---

**अल्फ़लक़**

**१)** म्हणजे त्या पालनकर्त्याची जो रात्रीचा अंधकार दूर सारून प्रकाशित सकाळ उगवतो.

**२)** कारण अधिकतर अपराध व अत्याचार रात्रीच घडत असतात. तसेच अपायकारक पशू व जनावरेदेखील बव्हंशी रात्रीच बाहेर पडतात.

**३)** अभिप्रेत आहेत मांत्रिक पुरुष व स्त्रिया.

**४)** म्हणजे जेव्हा मत्सरापोटी त्यांनी काही हानी पोहचविण्याचा प्रयत्न करावा.

**अन्नास**

**१)** म्हणजे एकावेळी दुष्प्रवृत्ती मनात टाकून जेव्हा बहकविण्यात यशस्वी ठरत नाही तेव्हा दूर होतो व मग पुन्हा वसवसा घालू लागतो. असा प्रयत्न तो वरचेवर सुरू ठेवतो.

**२)** म्हणजे हे दुष्प्रवृत्ती टाकणारा मग मानवांपैकी असो की जिन्न (शैतान) पैकी, दोन्हींच्या खोडसाळपणापासून मी आश्रय मागतो.